# भाग पहिला

## अ–कालगणना

संपादक :

**यशवंत रामकृष्ण दाते,** बी. ए., एलएल्. बी.

**चिंतामण गणेश कर्वे,** बी. ए.

संपादक — ज्ञानकोश, शब्दकोश, वाक्संप्रदायकोश,
शास्त्रीय परिभाषाकोश, इत्यादि.

८ फेब्रुवारी १९४१

किंमत २५ रुपये

# सुलभ विश्वकोश

## संपादकीय निवेदन

महाराष्ट्रीय ज्ञानकोश, शब्दकोश, वाक्संप्रदायकोश व शास्त्रीय परिभाषाकोश या कोशग्रंथांच्या संपादनानंतर आम्हीं प्रस्तुत लघुज्ञानकोशासारखें कार्य अंगावर घेतलें व तें एका वर्षांत पुरें करून हस्तलिखित प्रकाशकांना छापण्यास दिलें.

हा कोश म्हणजे निव्वळ महाराष्ट्रीय ज्ञानकोशाची छोटी आवृत्ति नसून यांतील लेखांचें धोरण आणि आंखणी–मांडणी अगदीं वेगळ्या प्रकारची आहे. या कोशांत जगांतील सर्व विषयांची, व्यवहारांची माहिती सुबोध आणि थोडक्यांत सांपडेल. इतिहास, भूगोल, शास्त्रें, धर्म, राजकारण, समाजजीवन यांसारख्या सर्व क्षेत्रांतील ठळक आणि समजण्यास आवश्यक असणाऱ्या गोष्टींचें सरळ, सुटसुटीत विवेचन या कोशांत त्या त्या नांवाखालीं वाचावयास मिळेल. एकाच मोठ्या लेखांत त्यांतील सर्व पोटविषयांची माहिती देण्याचें टाळून प्रत्येक विषयांतील पोटभागांवर लहान लहान लेख, वाचण्यास व कळण्यास सुलभ जावेत म्हणून, देण्याचें धोरण मुद्दाम ठेवलें आहे. आजचें जग शास्त्रांनीं नियंत्रित झालें असल्यानें आधिभौतिक आणि आध्यात्मिक शास्त्रांची फोड या कोशांत केलेली आढळेल. तसेंच चालू व्यवहारांत पदोपदीं आढळणाऱ्या व नडणाऱ्या गोष्टी यांत स्पष्ट करून समजावलेल्या आहेत.

इतिहास–पुराणक्षेत्रांत मागें प्राचीन काळापर्यंत जाऊन व शास्त्रें, भूगोल, आणि राजकारण या विषयांत अद्ययावत् पुढें येऊन माहिती दिली आहे. वाङ्मयांतील आढावा प्राचीनापासून अर्वाचीनापर्यंत थोडक्यांत घेतला आहे. चरित्रनायक, मृत तसेच विद्यमानहि, निवडले आहेत. यांत कांहीं विशिष्ट धोरणानेंच निवड केलेली दिसेल. लेखांतून विशेष काळजी, थोडक्यांत पुष्कळ माहिती देण्याची, घेतली असून माहितीचा अचूकपणा आणि ताजेपणा शक्यतों ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि, जरूर त्या संदर्भग्रंथांची अनुपलब्धि व अशा ज्ञानकोशाच्या संपादनाला अवश्य असणाऱ्या भरपूर कालमर्यादेचा अभाव यांची अडचण फार जाणवली. हिंदुस्थानांतील जातीच्या व लहान स्थलांच्या लोकसंख्येचे आंकडे १९११ च्या खानेसुमारीनंतर संपूर्ण उपलब्ध नाहींत व त्यांच्या विश्वसनीयतेबद्दल शंकाहि वाटते. गेल्या तीस वर्षांतील अनेक राजकीय आंदोलनांमुळें या बाबतींतील सरकारी व्यवस्था कार्यक्षम होऊं शकली नाहीं. संस्थानांच्या घडामोडी सारख्या चालू आहेत. तेव्हां त्यांसंबंधीं आजचें लिहिणें उद्यां वस्तुस्थितीला सोडून असण्याचा संभव आहे. तीच स्थिति इंडोनेशिया, चीन, जपान, जर्मनी, पॅलेस्टाइन, इ. राष्ट्रांची आहे. अशा अस्थिर परिस्थितींत कोशकाराच्या काष्ठासनावरून कांटेकोरपणानें जगाकडे दृष्टि फेंकून वर्णन देणें किती अवघड असेल याची कल्पना करावी.

महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचा पहिला विभाग बाहेर पडल्याला आज तीस वर्षें झालीं ; तेव्हां त्या ज्ञानकोशापेक्षां मोठा व आजतागायत माहितीचा बृहत् विश्वकोश यापूर्वींच व्हावयास पाहिजे होता, ही गोष्ट अगदीं स्पष्ट व निःसंदेह आहे. पण पहिल्या ज्ञानकोशाच्या वेळीं जी सर्व बाजूंनीं परिस्थिति होती तीपेक्षां गेल्या वीस वर्षांतील व त्यांतून गेल्या दशकांतील परिस्थिति अत्यंत चिकट झाली, याविषयीं वाद नाहीं. मुंबई सरकारनें अशा मराठी कामाकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं व खाजगी प्रयत्न धाडसी प्रकाशकांच्या अभावीं होऊं शकले नाहींत. आजहि एखादा संक्षिप्त, लघु ज्ञानकोश प्रस्तुत कोशाचे प्रकाशक श्री. य. गो. जोशी यांनीं स्वतःच्या उच्च अभिरुचीनें आणि मराठी वाङ्मयनिर्मितीसंबंधींच्या कर्तव्यबुद्धीनें जोराचें पाऊल टाकलें नसतें तर आणखी कांहीं वर्षें तरी प्रसिद्ध होण्याची आशा नव्हती. गेलीं तीस वर्षें आम्ही सर्वस्वीं अशा कोशकार्यालाच वाहिलेलों आहों. तेव्हां आमचा लेखनकामाठीपणा या सत्प्रवृत्तीच्या प्रकाशकांच्या उपयोगी पडून, दुधाची तहान ताकावर भागविण्याइतपत तरी हा ' सुलभ विश्वकोशा 'चा अवतार होत आहे, याचा आम्हांप्रमाणें अखिल महाराष्ट्राला आनंद वाटेल. यापुढें लवकरच देशांत शांतता आणि सुबत्ता यांचा अनुकूल काल उदयास येऊन, ज्याकडे सर्वांचे आतुरतेनें डोळे लागले आहेत त्या बृहत् विश्वकोशाच्या संपादनाला आमची उपस्थिति ( असल्यास ) कारणीं लागावी अशी जगन्नियंत्याजवळ प्रार्थना आहे.

## ऋणनिर्देश व आभार—

कोशाच्या कामाला अनेकांचें सवेतन किंवा निर्वेतन साहाय्य लागतें. संक्षेप, भाषांतर, रूपांतर, नक्कल, इ. करण्यास, तसेंच स्वतंत्र लेख लिहिण्यास आम्हांस ज्यांचें साहाय्य झालें त्यांपैकीं कांहींचा येथें साभार उल्लेख करणें जरूर आहे.

१. श्री. ना. गो. चापेकर, बदलापूर ( कांहीं धर्मशास्त्रीय लेख )
२. ,, श्री. वा. जोग, पुणें ( कांहीं वाङ्मयविषयक लेख )
३. ,, रा. स. भागवत, ठाणें ( थिऑसफीविषयक लेख )
४. ,, गो. वि. शिंत्रे, सांगली ( कांहीं स्थापत्यशास्त्रीय लेख )
५. ,, वा. ह. मनोहर, मुंबई, ( कांहीं यंत्रशास्त्रीय लेख )
६. डॉ. वा. मो. कानिटकर, पुणें ( कांहीं नवीन शास्त्रीय शोध )
७. डॉ. साखरलाल याज्ञिक ,, ( आयुर्वेदीय औषधें )
८. डॉ. य. गं. लेले ,, ( रसायनशास्त्रीय लेख )
९. प्रा. अ. चा. चंद्रचूड ( गणितशास्त्रीय लेख )
१०. रेव्ह० फादर शॉख, एस्. जे. ,, (ख्रिस्ती संप्रदायविषयक लेख)
११. श्री. ना. म. खुपेरकर ,, (संक्षेप, भाषांतर, रूपांतर, इ. कामें)
१२. ,, ल. के. भावे, पाली ,,
१३. ,, शं. रा. गोडबोले, इंदापूर ,,
१४. ,, गि. वा. हुपरीकर, पुणें ,,
१५. ,, य. ए. धायगुडे ,,

विश्वकोशासारख्या व्यापक संदर्भग्रंथांत अनेक प्रकारची माहिती अनेक ग्रंथांतून घ्यावी लागते. ज्या ग्रंथांतून ही माहिती घेतली असते त्या ग्रंथांत देखील ती माहिती त्यामागच्या ग्रंथांतून घेतलेली आढळेल. अशी एकाकडून दुसऱ्याला, दुसऱ्याकडून तिसऱ्याला माहिती देण्याची एकसारखी सांखळी लागलेली असते. अशा कोश-लेखनप्रकारांत उसनें घेण्याची रीतच असते. ती मात्र आभारपूर्वक उल्लेखिली पाहिजे. तेव्हां आम्हीं सुलभ विश्वकोशाच्या संपादनकार्यांत ज्या अनेक ग्रंथांचें अतोनात साहाय्य घेतलें त्यांतील प्रत्यक्ष साहाय्यक अशा कांहीं प्रमुख ग्रंथांचीं नांवें येथें देणें आमचें कर्तव्य आहे:—

१. महाराष्ट्रीय ज्ञानकोश, विभाग १–२३.
२–४. प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन चरित्रकोश.
५. महाराष्ट्र शब्दकोश, विभाग १–७.
६. महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश, विभाग १–२.
७. शास्त्रीय परिभाषाकोश.
८. दि कॉंपॅक्ट एन्सायक्लोपीडिया, विभाग १–६.
९. दि न्यू एज्युकेटर ,, विभाग १–१० व पुरवणी.
१०. दि स्टॅन्डर्ड एन्सायक्लोपीडिया.
११. दि इंडियन ईयर बुक.
१२. दि स्टेट्समन्स ईयरबुक.
१३. पीयर्स एन्सायक्लोपीडिया.
१४. नालंदा ईयरबुक,
१५. हिंदुस्थान ईयरबुक.
१६. दि हँडी एन्सायक्लोपीडिया ऑफ यूसफुल इन्फॉर्मेशन.
१७. दि वर्ल्ड ऑफ टुडे, विभाग १–६.
१८. सायन्स इन् मॉडर्न लाइफ, विभाग १–६.
१९. डेली मेल ईयरबुक.
२०. दि पेन्ग्विन पोलिटिकल डिक्शनरी.
२१. व्यायाम ज्ञानकोश.
२२. एन्सायक्लोपीडिया ऑफ लिटरेचर.
२३. एव्हरीबॉडीज कंप्लीट एन्सायक्लोपीडिया.
२४. हिंदुधर्मदीपिका.
२५. पेशवाईच्या सावलींत. —ना. गो. चापेकर.
२६. पशु, पक्षी व इतर प्राणी. —गोखले–देशपांडे.
२७. सेन्सस ऑफ इंडिया, १९४१.
२८. मराठी साहित्य (१९४१–१९४४). —मॉडर्न बुकडेपो.
२९. वाङ्मयीन समालोचन, १९४७. —म. साहित्य परिषद्.

या सर्व ग्रंथांच्या संपादकांचे आणि प्रकाशकांचे आम्हीं फार आभारी आहों.

सर्व विभाग बाहेर पडल्यानंतर तेथपर्यंत ज्यांची ज्यांची मदत झाली असेल त्या सर्वांचे आभार मानण्यांत येतीलच. तेव्हां हा त्रुटपुटता ऋणनिर्देश समजावा व वर ज्यांचा उल्लेख झाला नसेल त्यांनीं गैरसमज करून घेऊं नये, अशी विनंति आहे.

कोशकार्यालय,
१ बुधवार पेठ, पुणें

—यशवंत रामकृष्ण दाते
—चिंतामण गणेश कर्वे

# सृष्ट्युत्पत्तीपासून मानवोत्पत्तीपर्यंत
# विश्वविकास

विश्वतः चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतो बाहुरुत विश्वतस्पात्।
संबाहुभ्यां धमति संपत त्रैर्द्यावाभूमी जनयन् देव एकः॥
(ऋ. १०-८१, ३. तै. सं. ४-६-२-४. वा. सं. १७-१९. अथर्व. १३-२, २६.)

**विश्वसृष्टि व मानव—**

आज या चराचरसृष्टीमध्यें ज्या अनेक आश्चर्यकारक घटना आपल्या दृष्टीस पडतात त्यांमध्यें कांहीं ठिकाणीं अत्यंत उंच पर्वत तर कांहीं ठिकाणीं अथांग खोल महासागर, कांहीं ठिकाणीं विस्तीर्ण अफाट ओसाड मैदानें तर कांहीं ठिकाणीं प्रवेश करण्यासहि अत्यंत कठिण अशीं दाट व अभेद्य अरण्यें, व त्यांत गगनचुंबी व सूर्याच्या प्रकाशकिरणांसहि प्रवेश मिळूं न देणाऱ्या अशा निबिड पल्लवमय शाखायुक्त वृक्ष व लतांचीं जाळीं; कांहीं ठिकाणीं अतिशय उष्ण हवा व अग्निरस ओकणारे ज्वालामुखी, तर कांहीं ठिकाणीं सतत वर्षभर कधीं कमी न होणारा हिमाचा थर; असे नाना प्रकारचे अनेक भौगोलिक चमत्कार दृष्टीस पडतात. त्यांत नाना प्रकारचे जलचर, स्थलचर व व्योमचर प्राणी इतस्ततः भ्रमण करीत असतांना आढळतात. अशा या सृष्टीच्या विकासामध्यें नाना प्रकारच्या वनस्पती व प्राण्यांप्रमाणेंच मनुष्यप्राण्याचा विकास झाला. इतर प्राणी व मनुष्यप्राणी यांमध्यें आपणांस पुष्कळच अंतर दिसून येतें. त्यामुळें इतर सृष्टीपेक्षां, विशेषतः इतर प्राण्यांपेक्षां, मनुष्यप्राणी हा निराळा आहे हें दाखविण्याकरितां मनुष्यप्राण्याचीं निरनिराळीं वैशिष्ट्यें पुढें करण्यांत येतात. तो एक संघजीवी प्राणी आहे. तो उभा राहणारा प्राणी आहे. तो स्पष्ट वाणीयुक्त प्राणी आहे, वगैरे. तसेंच इतर प्राण्यांस स्वसंरक्षणाकरितां जशीं केंस, कवच, नखें, दांत, वगैरे साधनें आहेत तशीं साधनें नसलेला म्हणून मनुष्यप्राणी हा इतरांपेक्षां निराळा समजण्यांत येतो. अर्थात् मनुष्यप्राण्याचा जीवनक्रम इतर अनेक प्राण्यांपेक्षां निराळा व अधिक प्रगत आहे यांत शंका नाहीं. त्यामुळें त्यास इतर प्राण्यांपेक्षां वेगळा व इतर प्राण्यांपेक्षां श्रेष्ठ मानण्याची प्रवृत्ति स्वाभाविक आहे व तसा तो आहे ही गोष्ट त्यानें आपल्या सुसंस्कृत राहणीवरून सिद्धहि केलेली आहे. परंतु शास्त्रज्ञांच्या मतें मनुष्य व इतर प्राणी यांमध्यें जर कोणता विशेष फरक असेल तर मानव हा एक विचार करणारा प्राणी आहे हा होय. म्हणूनच त्यास होमो सेपाइन्स अशी संज्ञा देण्यांत येते. ही विचारशक्ति इतर प्राण्यांमध्यें आढळून येत नाहीं. इतर प्राण्यांमध्यें कांहीं सहजप्रवृत्ती असतात व त्यांस आपलें भरणपोषण व संरक्षण तसेंच वंशवर्धन करण्याकरितां या सहजप्रवृत्ती अवश्यहि असतात व ते प्राणी त्यांचा उपयोगहि करतात. कोणताहि प्राणी प्रथम जन्मास आला म्हणजे त्यास आपलें भक्ष्य कसें मिळवावें हें ज्ञान स्वाभाविकच असतें व त्याचा उपयोग ते प्राणी जन्मापासूनच करीत असतात. जे प्राणी जन्मतः परावलंबी असतात त्यांच्या मातांच्या ठिकाणीं ही स्वापत्यभरणाची सहजप्रवृत्ति असते व त्यामुळें त्यांचें भरणपोषण होतें, तसेंच सर्व प्राण्यांमध्यें स्ववंशरक्षणाचीहि सहजप्रवृत्ति असते. परंतु या सर्व प्राण्यांपेक्षां मनुष्यामध्यें हा विशेष आहे कीं, इतर प्राण्यांत विचार करण्याची शक्ति नसते ती मनुष्यप्राण्यांत मात्र असते. या विचारशक्तीमुळें त्यानें आपल्या ज्ञानाचा व बुद्धीचा विकास करून घेतला आहे. त्यानें आपल्या विचारशक्तीची वाढ होण्याकरितां भाषा निर्माण केली आहे. आपले विचार स्थिर किंवा कायम करण्याकरितां लेखनकला निर्माण केली आहे. अशा तऱ्हेनें त्यानें आपल्या विचारशक्तीचा उपयोग करून आपली राहणी व आपलें जीवित अधिक सुखकर व विविध प्रकारांनीं प्रगत करण्याकरितां आपल्या ज्ञानाची वाढ करून घेऊन अनेक नवे नवे प्रकार, वस्तू, साधनें, वगैरे निर्माण करून आपली नाना दिशांनीं प्रगति करून घेतली आहे व आपला आज अत्यंत सुसंस्कृत व सुधारलेला आयुष्यक्रम आचरणांत आणला आहे. या सर्व संस्कृतीचें बीज त्याच्या विचारशक्तीमध्यें आहे. म्हणून मनुष्याची व्याख्या विचार करणारा प्राणी अशी करण्यांत येते.

**सृष्ट्युत्पत्तीसंबंधीं विचारप्रवृत्ति—**

ही विचारशक्ति आज आपणांस जी मनुष्यजाति दृष्टीस पडत आहे तिच्या ठिकाणीं तिच्या विकासाच्या अगदीं आरंभापासून अथवा बाल्यावस्थेपासून दिसून येते. मनुष्य जेव्हां या सृष्टीचें अवलोकन करूं लागला तेव्हां ही सृष्टि म्हणजे काय आहे, ही कोणीं उत्पन्न केली, सृष्टीमध्यें ज्या निर-

निराळ्या वस्तू दिसतात त्या ज्या कालीं उत्पन्न झालेल्याच नसतील त्यापूर्वी काय असेल, या सृष्टीचें पुढें काय होणार आहे, वगैरे गोष्टींचा तो विचार करूं लागला. अशा तऱ्हेचे विचार आपणांस आज उपलब्ध असलेल्या प्राचीनांतल्याहि प्राचीन वाङ्मयांत आढळतात. अत्यन्त जुन्यांत जुनें असें जें वाङ्मय आपणांस उपलब्ध आहे त्यामध्यें या सृष्टीची उत्पत्ति कशी झाली असेल यासंबंधीं मनुष्यानें प्रदर्शित केलेले विचार आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात.

## ऋक्संहितेंतील सृष्टीसंबंधींचे मूलभूत विचार—

अशा तऱ्हेचें प्राचीनतम परंतु मूळ स्वरूपांतच आज आपणांस उपलब्ध असलेलें वाङ्मय म्हणजे आपणां आर्यांचें वैदिक वाङ्मय होय. त्या वैदिक वाङ्मयांतहि ऋग्वेदसंहितेंतील सूक्तें हीं कानामात्रेचाहि फरक न होतां किंवा पाठभेदहि निर्माण न होतां आपणांपर्यंत चालत आलेलीं आहेत. अशा ऋक्संहितेच्या एका सूक्तांत सूक्तकर्ता सृष्टीच्या आरंभीं काय असेल व ही सृष्टि कशी निर्माण झाली असेल यासंबंधीं विचार प्रदर्शित करतांना आढळतो :

नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमा परो यत् ।
किमावरीवः कुह कस्य शर्मन्नम्भः किमासीद्गहनं गभीरम् ॥ १ ॥
न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अह्न आसीत्प्रकेतः ।
आनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्न परः किं च नास ॥ २ ॥
तम आसीत्तमसा गूळ्हमग्रेऽप्रकेतं सलिलं सर्वमा इदम् ।
तुच्छ्येनाभ्वपिहितं यदासीत्तपसस्तन्महिना जायतैकम् ॥ ३ ॥
कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।
सतो बन्धुमसति निरविन्दन्हृदि प्रतीष्या कवयो मनीषा ॥ ४ ॥
तिरश्चीनो विततो रश्मिरेषामधः स्विदासीदुपरि स्विदासीत् ।
रेतोधा आसन्महिमान आसन्त्स्वधा अवस्तात्प्रयतिः परस्तात् ॥५॥
को अद्धा वेद क इह प्र वोचत्कुत आजाता कुत इयं विसृष्टिः ।
अर्वाग्देवा अस्य विसर्जनेनाथा को वेद यत आबभूव ॥ ६ ॥
इयं विसृष्टिर्यत आबभूव यदि वा दधे यदि वा न ।
यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्त्सो अङ्ग वेद यदि वा न वेद ॥ ७ ॥

—( ऋ. १०. १२९ )

हें सूक्त वैदिक वाङ्मयांत फार महत्त्वाचें मानण्यांत येतें व भारतीय तत्त्वज्ञानाच्या विचारेतिहासामध्यें यास फार महत्त्व देण्यांत येतें व यावर आतांपर्यंत अनेकांनीं भाष्य केलें आहे व अनेक निरनिराळे विचार प्रकट केले आहेत. आपण येथें त्याच्या फार खोल अर्थांत न शिरतां सध्या केवळ त्याचा उत्तानार्थ अथवा शब्दार्थ घेऊन पुढें जाऊं.

त्या वेळीं ( जगदारंभीं ) असत् नव्हतें सत्‌हि नव्हतें. अन्तरिक्षांत रज नव्हतें व त्यापलीकडील व्योम अथवा आकाशहि नव्हतें. ( अशा कालांत ) कोणीं कोणाला व कोठें आवरण घातलें होतें ? हें सर्व कोणाच्या कल्याणाकरितां ? त्या कालीं गहन व गंभीर असें जल तरी होतें काय ? १.

त्या कालांत मृत्यु म्हणजे विनाश नव्हता, तसेंच अमृतत्व अथवा अविनाशित्वहि नव्हतें. दिवस आणि रात्र यांतील भेद कळण्यासारखी परिस्थिति नव्हती. जें कोणी होतें तें आपल्याच सामर्थ्यानें निर्वातस्थितींत श्वासोच्छ्वास करीत होतें. त्याशिवाय अन्य असें दुसरें कांहींहि नव्हतें. २.

प्रथम केवळ सर्वत्र तम म्हणजे अन्धकार होता. सर्वत्र तमानें व्याप्त व गूढ असें सलिल होतें. सर्वव्यापी असें तत्त्व तुपानें आच्छादिलेलें होतें. तें तपाच्या महिम्यानें उत्पन्न झालेलें होतें. ३.

प्रबल इच्छा अथवा काम हा प्रथम उत्पन्न झाला. हा काम हें मनाचें वीर्य होतें. हाच असताचा सत्‌शीं पहिला संबंध होय. हें कवींनीं म्हणजे ज्ञात्यांनीं मनामध्यें विचार करून बुद्धीनें ठरविलें. ४.

हा रश्मि त्यांच्यामध्यें तिरपा पसरला व त्याच्या खालींहि होतें आणि वरतींहि होतें. याचें वीर्य उत्पत्तिकारक व महान् असें झालें. त्याचें सामर्थ्य अलीकडे व प्रभाव पलीकडे ( सर्वत्र ) पसरला. ५.

ही विसृष्टि कोठून आली व कोठें पसरली हें कोण जाणतो व कोण त्याचें प्रवचन करूं शकतो ? देव देखील या सृष्टीच्या नंतर उत्पन्न झालेले आहेत, तेव्हां ही सृष्टि कोठून निर्माण झाली हें कोण जाणूं शकतो ? ६.

ही सृष्टि कोठून निर्माण झाली ? ती धारण झाली किंवा नाहीं ? जो या सृष्टीचा अध्यक्ष उंच आकाशांत आहे तो कदाचित् जाणीत असेल किंवा नसेल. ७.

## या विचारांची सार्वत्रिकता—

वरील विचार आपणांस केवळ ऋक्संहितेंतच व्यक्त केलेले आढळतात असें नव्हे तर हें सूक्त आपणांस तैत्तिरीय ब्राह्मणांतहि ( २-८-९-३ ) आढळतें व पुन्हां शुक्ल यजुःशाखेच्या शतपथ ब्राह्मणांतहि दृष्टीस पडतें ( १०-५-३-२ ). यावरून प्रस्तुत सूक्तांत व्यक्त केलेले विचार हे केवळ एकाच मंत्रद्रष्ट्या ऋषीचे नसून, ते तत्कालीन अनेक ज्ञानी मंडळीस परिचित होते एवढेंच नव्हे तर हें ज्ञान परंपरागत व सार्वत्रिक होतें असें धरून चालण्यास हरकत नाहीं.

**याच विचारांची पुनरुक्ति—**

अशाच तऱ्हेचे विचार आपणांस दुसऱ्याहि एका सूक्तांत प्रकट केलेले आढळून येतात. त्यांतील मंत्र व अर्थ पुढें दिले आहेत :

देवानां नु वयं जाना प्रवोचाम विपन्यया।
उक्थेषु शस्यमानेषु यः पश्यादुत्तरे युगे ॥ १ ॥
ब्रह्मणस्पतिरेता सं कर्मार इवाधमत्।
देवानां पूर्व्ये युगेऽसतः सदजायत ॥ २ ॥
देवानां युगे प्रथमेऽसतः सदजायत।
तदाशा अन्वजायन्त तदुत्तानपदस्परि ॥ ३ ॥
भूर्जज्ञ उत्तानपदो भुव आशा अजायन्त।
अदितेर्दक्षो अजायत दक्षाद्वदितिः परि ॥ ४ ॥
अदितिर्ह्यजनिष्ट दक्ष या दुहिता तव।
तां देवा अन्वजायन्त भद्रा अमृतबन्धवः ॥ ५ ॥
यद्देवा अदः सलिले सुसंरब्धा अतिष्ठत।
अत्रा वो नृत्यतामिव तीव्रो रेणुरपायत ॥ ६ ॥
यद्देवा यतयो यथा भुवनान्यपिन्वत।
अत्रा समुद्र आगूळ्हमा सूर्यमजभर्तन ॥ ७ ॥
अष्टौ पुत्रासो अदितेर्ये जातास्तन्व १ स्परि।
देवाँ उपप्रैत्सप्तभिः परा मार्ताण्डमास्यत् ॥ ८ ॥
सप्तभिः पुत्रैरदितिरुप प्रैत्पूर्व्यं युगम्।
प्रजायै मृत्यवे त्वत्पुनर्मार्ताण्डमाभरत् ॥ ९ ॥ ऋ. १०-७२.

पूर्वी व सांप्रत ज्याचें स्तोत्रांनीं स्तवन केलें जातें त्या देवांचा जन्म कसा झाला तें आम्ही स्पष्ट करून सांगतों. १.

ब्रह्मणस्पतीनें या देवांना लोहार ज्याप्रमाणें भाता फुंकून (वस्तु) तयार करतो त्याप्रमाणें उत्पन्न केलें. देवांच्या पूर्वयुगांत असत् होतें त्यापासून सत् निर्माण झालें. २.

देवांच्या पूर्वयुगांत प्रथम असतापासून सत् झालें. नंतर दिशा उत्पन्न झाल्या व नंतर वर वाढणारे वृक्ष निर्माण झाले. ३.

भूमीपासून वर वाढणारे वृक्ष निर्माण झाले, नंतर दिशा उत्पन्न झाल्या. अदितीपासून दक्ष उत्पन्न झाला व दक्षापासून अदिति उत्पन्न झाली. ४.

अदिति जी तुझी मुलगी ती, दक्षा उत्पन्न झाली. तिच्यापासून भद्र व अमृत असे देव उत्पन्न झाले. ५.

जेव्हां देव जलामध्यें सुसंरब्ध असे राहिले तेव्हां तुम्ही जणुं काय नृत्य करीत असतां त्यापासून तीव्र असा प्रकाशकिरण (रेणु) वर आला. ६.

जेव्हां तुम्ही मेघाप्रमाणें सर्वत्र व्यापून टाकिलेंत तेव्हां समुद्रांत गुप्त असलेला सूर्य वर आला. ७.

अदितीचे जे आठ पुत्र झाले त्यांतील सात पुत्रांसह ती देवांकडे गेली व आठवा मार्तण्ड तिने आकाशांत वर टाकला. ८.

सात पुत्रांसह अदिति पूर्वयुगांत विलीन झाली व प्राण्यांच्या उत्पत्तीकरितां व विनाशाकरितां मार्तण्डास (आकाशांत) स्थापन केला. ९.

या सूक्ताकडे त्यांतील अदितीविषयक ती केवळ देवांची माता व कश्यपाची पत्नी ही पौराणिक कल्पना सोडून दिली व अदिति ही विश्वव्यापक अशी कांहीं तरी विस्तृत अवकाशात्मक अशी रचना असून तीमध्यें प्रथम सूर्याची उत्पत्ति कशी झाली यासंबंधीं कल्पना जी सूक्तकर्त्या ऋषीनें व्यक्त केली आहे ती पाहिली म्हणजे कौतुक वाटतें. या सूक्तांत एक महत्त्वाची कल्पना व्यक्त केली आहे, ती म्हणजे प्रथम असत् होतें त्यापासून सत् निर्माण झालें ही होय. प्रथम जेथें कांहीं नव्हतें, रिक्त अवकाश होता, नास्तित्व होतें, तेथें प्रथम अस्तित्वाची कल्पना आली. नंतर त्या अवकाशांत दिशा उत्पन्न झाल्या, नंतर खालीं व वर या कल्पना उत्तानपद वृक्षांवरून आल्या, नंतर भूः, भुवः या अवकाशवाचक कल्पना उत्पन्न झाल्या, नंतर सर्व व्यापक अदिति उत्पन्न झाली व तीपासून नंतर मार्तण्ड म्हणजे तेजोमय, प्रकाशमय सूर्य उत्पन्न झाला व या प्रकाशामुळें सर्व जीवसृष्टीची उत्पत्ति व क्षय हीं सुरू झालीं.

ऋक्संहितेमध्यें अशाच तऱ्हेचे पण जरा निराळ्या प्रकारचे विचार व्यक्त केलेले आपणांस अन्यत्र एका स्थळीं आढळून येतात. तें सूक्त असें :

ऋतं च सत्यं चाभीद्धात् तपसोऽध्यजायत।
ततो रात्र्यजायत ततः समुद्रो अर्णवः ॥ १ ॥
समुद्रादर्णवादधि संवत्सरो अजायत।
अहोरात्राणि विदधद्विश्वस्य मिषतो वशी ॥ २ ॥
सूर्याचन्द्रमसौ धाता यथा पूर्वमकल्पयत्।
दिवं च पृथिवीं चान्तरिक्षमथो स्वः ॥ ३ ॥ (ऋ. १०-१९०)

तपापासून म्हणजे तेजोयुक्त परमेश्वरापासून प्रथम ऋत व सत्य हीं निर्माण झालीं. त्यानंतर रात्रि उत्पन्न झाली व नंतर जलमय समुद्र उत्पन्न झाला. १.

समुद्रापासून अर्णव व त्यापासून संवत्सर निर्माण झाला. नंतर अहोरात्र उत्पन्न झाले व सर्व निमिषमान म्हणजे डोळ्यांची उघडझाप करणाऱ्या विश्वावर त्यांची सत्ता चालू झाली, २,

यानंतर जगदुत्पत्तिकर्त्या धात्यानें यथापूर्व सूर्य व चंद्र निर्माण केले. नंतर द्यौ, पृथिवी व अन्तरिक्ष हीं निर्माण केलीं. नंतर स्वर्लोक निर्माण केला. ३.

या ठिकाणीं ही गोष्ट प्रामुख्यानें सांगण्यांत आली आहे कीं; सर्व सृष्टीच्या प्रारंभीं प्रथम ऋत म्हणजे नियम ज्याला अर्वाचीन भाषेत निर्बंध किंवा कायदा म्हणतात तो व सत्य म्हणजे ज्यांस वास्तविक अस्तित्व आहे अशा गोष्टी निर्माण झाल्या व याप्रमाणें सर्व जग नियमबद्ध पद्धतीनें योग्य क्रमानें उत्पन्न होत गेलें. त्यांत संवत्सर अथवा वर्ष व नंतर दिवस, रात्र निर्माण झालीं असें म्हटलें आहे. यावरून आजच्या चोवीस तासांच्या दिवसाच्या पूर्वीची–कदाचित् ज्या वेळीं दिवस व रात्र हीं आजच्यापेक्षां मोठीं होतीं अशा ध्रुवाच्या जवळपासची–स्थिति व्यक्त होत असावी.

या कल्पना पांच हजार वर्षांपूर्वी आधुनिक शास्त्रांचा गंधहि नसतां व अर्वाचीन बुद्धीची प्रगल्भता नसतांना केवळ कल्पनाशक्तीनें, विचारशक्तीनें व्यक्त केलेल्या पाहिल्या म्हणजे या वाङ्मयरचनाकारांबद्दल आदर वाटल्याशिवाय कसा राहील ?

या सूक्तांत व्यक्त केलेले विचार खरोखर अत्यन्त उदात्त व अर्वाचीन तत्त्वज्ञान्यासहि मान डोलवावयास लावतील असे आहेत. परंतु अशा तऱ्हेचे विचार भारतीय आद्य वाङ्मयांत आपणांस केवळ एखाद्या सूक्तामध्येंच आढळतात असें नव्हे, तर अशा तऱ्हेचे मौलिक विचार भारतीय वैदिक वाङ्मयांत अनेक ठिकाणीं व्यक्त केलेले आपणांस दिसून येतील.

### असतापासून सत् निर्माण झालें—

अशाच तऱ्हेचे विचार आपणांस ऋग्वेदसंहितेंतहि इतरत्र इतस्ततः प्रकट केलेले आढळून येतात. उदाहरणार्थ, दहाव्या मंडळांतील एक्यायशींव्या सूक्तांत आपणांस पुढील ऋचा आढळतात :—

किंस्विदासीदधिष्ठानमारम्भणं कतमत्स्वित्कथासीत् ।
यतो भूमिं जनयन्विश्वकर्मा वि द्यामौर्णोन्महिना विश्वचक्षाः
(ऋ. १०-८१-२. तैत्ति. सं. ४-६-२-११ )

किंस्विद्वनं क उ स वृक्ष आस यतो द्यावा पृथिवी निष्टतक्षुः ।
मनीषिणो मनसा पृच्छतेदु तद्यदध्यतिष्ठद्भुवनानि धारयन्
(ऋ. १०-८१-४. तैत्ति. सं. ४-६-२-१२ )

त्यानें अधिष्ठान काय होतें ? त्याचें आरंभण म्हणजे उपादानकारण कोणतें होतें ? व हें कसें झालें ? ज्या अर्थी सर्व द्रष्टा असा विश्वकर्मा या भूमीची रचना करता झाला आणि आपल्या महिम्यानें आकाश निर्माण केलें त्या अर्थी हें त्यानें कसें केलें असावें ?

ज्यापासून द्यावापृथिवी निर्माण झाली असा वृक्ष कोणता वरें असावा ? तो कोणत्या वनांत निर्माण झाला असावा ? हे विद्वान् लोक हो ! तुम्ही मनांत याचा विचार करा व ज्या स्थानामध्यें भुवनें उत्पन्न झालीं त्याचाहि विचार करा.

### सृष्ट्युत्पत्तीसंबंधीं प्रश्नोत्तरें—

अशा तऱ्हेच्या सृष्टीच्या उत्पत्तीविषयींच्या व जगाचा आरंभ कसा झाला व प्रथम काय व कसें उत्पन्न झालें, यासंबंधीं निरनिराळ्या ठिकाणीं उपस्थित केलेल्या प्रश्नांस तत्कालीन ऋषींनीं आपल्या सूक्ष्म विचारपद्धतीनें विचार करून कांहीं ठिकाणीं उत्तरेंहि दिलेलीं आढळतात. अशा तऱ्हेचें एक उत्तर आपणांस ऋग्वेदसंहितेंतच पुढील ऋचेंत दिलेलें आढळतें.

चक्षुषः पिता मनसा हि धीरो घृतमेने अजनन्नम्नमाने ।
यदेदन्ता अददृहन्त पूर्व आदिद् द्यावा पृथिवी अप्रथेताम्
(ऋ. १०-८२. १. तैत्ति. सं. ४-६-२. ९).

चक्षुप्रधान शरीराचा उत्पादक व मनानें धीर असा विश्वकर्मा प्रथम घृत म्हणजे उदक निर्माण करता झाला व त्यांत इतस्ततः हालणारी पृथिवी त्यानें निर्माण केली. जेव्हां याचे कडेचे भाग दृढ झाले तेव्हां द्यावा पृथिवी या विश्वांत प्रथित झाली म्हणजे पसरली.

यानंतर याच सूक्तांत पुढील प्रश्नोत्तरांत असेच विचार व्यक्त करण्यांत आले आहेत.

परो दिवा पर एना पृथिव्या परो देवेभिरसुरैर्यदस्ति ।
कँ स्विद्गर्भं प्रथमं दध्र आपो यत्र देवाः समपश्यन्त विश्वे ॥
( ऋ. १०-८२,५. तै. स. ४-६-२-६ )

तमिद्गर्भं प्रथमं दध्र आपो यत्र देवाः समगच्छन्त विश्वे ।
अजस्य नाभावध्येकमर्पितं यस्मि विश्वानि भुवनानि तस्थुः
( ऋ. १०-८२,६. तै. सं. ४-६-२-७)

जें या पृथ्वीच्या आणि आकाशाच्याहि पूर्वीचें आहे जें देवांच्या आणि असुरांच्याहि पूर्वी गूढ होतें त्याचा जो प्रथम आप म्हणजे जलानें गर्भ धारण केला व ज्यामुळें सर्व देव एकत्र निर्माण झाले तो कोणता होता ? त्याचा ( ब्रह्माचा ) प्रथम पाण्यांनीं मूळ गर्भ धारण केला. त्यापासून सर्व देव एकत्र निर्माण झाले. तो गर्भ प्रथम अज असें जें ब्रह्म किंवा परमात्मा त्याच्या नाभीच्या ठिकाणीं ठेवलेला होता. त्यामध्यें हें सर्व विश्व आश्रित होतें.

न तं विदाथ य इदं जनानान्यद् युष्माकमंतरं बभूव ।
नीहारेण प्रावृता जल्प्या चाऽसुतृप उक्थशासश्चरन्ति ॥
(ऋ. १०-८२,७. तै. सं. ४-६-२-५)

ज्यानें हें सर्व निर्माण केलें त्याला तुम्ही जाणणार नाहीं. तो तुम्हांमध्यें पण भिन्न आहे. तो धुक्यानें आवृत असून मंत्र म्हणणारे जल्पना करीत भ्रमण करीत असतात.

## तैत्तिरीय संहितेंतील पुरावा—

अशा तऱ्हेचे विचार केवळ ऋग्वेदांतच आढळतात असें नाहीं तर ऋग्वेदाबरोबरच किंबहुना यज्ञसंस्थेकरितां अत्यन्त आवश्यक म्हणून कदाचित् त्यापूर्वींच जी तैत्तिरीय संहिता ग्रथन करण्यांत आली व जीमध्यें अत्यंत प्राचीनं भाग ग्रथित केला गेला आहे त्या तैत्तिरीय संहितेंतहि सृष्ट्युत्पत्तीसंबंधाचे विचार मधून मधून ग्रथित केलेले आढळतात. त्यांत सर्व विश्व प्रथम जलमय होतें व त्यापासून सर्व सृष्टि उत्पन्न झाली ही प्राथमिक कल्पनाच व्यक्त केलेली आपणांस आढळून येते.

वर दिलेल्या ऋग्वेदांतील ८२ व्या सूक्तांतीलच बहुतेक ऋचा परंतु भिन्न क्रमानें व किंचित् शाब्दिक फेरफारानें तैत्तिरीय संहितेंत (४–६–२–) आपणांस आढळून येतात ही गोष्ट वर दिलेल्या स्थाननिर्देशांवरून लक्षांत येईलच. त्यांतील प्रश्नोत्तर-पद्धति पाहिली म्हणजे कदाचित् त्या प्रथम तैत्तिरीय संहितेंतीलच असून ऋग्वेदामध्यें ठाकठिकीनें ग्रथित केल्या असाव्या अशीहि कल्पना होते. कारण यज्ञप्रसंगीं ब्रह्मोद्य म्हणजे प्रश्नोत्तरपद्धतीचा अवलंब केल्याचीं उदाहरणें यजुःसंहितांत अधिक आढळतात व त्यांतल्या त्यांत तैत्तिरीय संहिता ही हळूहळू यज्ञप्रसंगानें उप-बृंहण पावत गेल्यामुळें तितकी व्यवस्थित नाहीं ही गोष्ट स्पष्टच आहे. तैत्तिरीय संहितेंतील (४–६–२) या अनुवाकांत आढळणारे मंत्र ऋक्संहितेंत आढळून येतात एवढेंच नव्हे तर वाजसनेयी संहितेच्या सतराव्या कांडांत व मैत्रायणी संहितेच्याहि दुसऱ्या कांडांतील दहाव्या प्रपाठकांत आणि काठक संहितेच्या अठराव्या कांडांत आपल्याला दिसून येतात. यावरून सृष्ट्युत्पत्ती-संबंधींच्या या कल्पनाहि त्या वेळीं जवळजवळ सार्वजनिक ज्ञानाचा ठेवा होता असें म्हणावयास हरकत नाहीं. असो.

अशा तऱ्हेचेच विचार इतरत्रहि तैत्तिरीय संहितेमध्यें ग्रथित केलेले आपणांस आढळून येतात. उदाहरणार्थ—

आपो वा इदमग्रे सलिलमासीत् तस्मिन् प्रजापतिर्वायुर्भूत्वाऽचरत् स इमामपश्यत् तां वराहो भूत्वा ऽहरत् तां विश्वकर्मा भूत्वा व्यमार्ट् सा ऽप्रथत सा पृथिव्यभवत् तत्पृथिव्यै पृथिवित्वं तस्यामश्राम्यत् प्रजापतिः सदेवानसृजत । (तैत्ति. सं. ७-१-५-१).

प्रथम हें सर्व आप अथवा जलमय होतें. त्या जलामध्यें प्रथम प्रजापति वायुरूपानें संचार करिता झाला. त्यानें या पृथ्वीला पाहिलें व वराहरूप धारण करून तिला वर उचललें. नंतर विश्वकर्मा बनून तिला घडविली. तिला प्रसरण पावावयास लावलें. ती पसरत गेली व म्हणून पृथिवी (प्रथ्–पसरणें) झाली. हेंच पृथिवीचें पृथिवित्व. त्या पृथिवीच्या ठिकाणीं प्रजापति श्रम करता झाला व त्यानें देवांना निर्माण केलें.

या ठिकाणीं प्रथम जलतत्त्वापासून पृथ्वी कशी निर्माण झाली हें सांगितलें आहे. त्याप्रमाणेंच पुढें उपबृंहित झालेल्या वराह अवताराची कल्पना येथें बीजरूपानें व्यक्त करण्यांत आली आहे.

यानंतर एका ठिकाणीं विश्वकर्म्यानें ही पृथिवी कशी निर्माण केली व गन्धर्व कसे निर्माण झाले यासंबंधीं कल्पना व्यक्त करण्यांत आली आहे.

विश्वकर्मा ह्य जनिष्ट देव आदिद्गन्धर्वो अभवद्द्वितीयः ।
तृतीयः पिताजनितौषधीनामपां गर्भं व्यदधात् पुरुत्रा ॥
(तै. सं. ४-६-२-८)

विश्वकर्म्यानें देव निर्माण केले. त्यानंतर दुसरे गंधर्व झाले. त्यानंतर औषधींचा पिता निर्माण झाला. पुरुत्रानें पाण्याच्या ठिकाणीं गर्भ स्थापन केला.

## प्रजापतीची तपश्चर्या—

प्रजापतिरकामयत प्रजाः सृजेयेति स तपोऽतप्यत स सर्पानसृजत सोऽकामयत प्रजाः सृजेयेति स द्वितीयमतप्यत स वयांस्यसृजत सोऽकामयत प्रजाः सृजेयेति स तृतीय-मतप्यत स एतं दीक्षितवादमपश्यत् तमवदत् ततो वै स प्रजा असृजत यत् तपस्तप्त्वा दीक्षितवादं वदति प्रजा एव तद्यजमानः सृजते । (तै. सं. ३-१-१-१)

प्रजापतीनें अशी इच्छा केली कीं, आपण प्रजा निर्माण करावी. याकरितां त्यानें तप (परिश्रम) केलें. तप करून त्यानें प्रथम सर्पसृष्टि निर्माण केली. (त्यानें त्याचें समाधान झालें नाहीं. म्हणून) त्यानें पुन्हा प्रजा निर्माण करण्याची इच्छा केली व दुसऱ्यानें तप केलें व त्यानें पक्षी निर्माण केले. पुन्हां त्यास प्रजा निर्माण करण्याची इच्छा झाली. तेव्हां त्यानें तिसऱ्यांदां तप केलें...व याप्रमाणें तप करून प्रजा निर्माण केली.

## विकासक्रमांतील तीन अवस्था—

या ठिकाणीं प्रजापतीनें आपल्या सृष्टीच्या निर्मितीच्या क्रमांत प्रथम उरग, नंतर विहग व नंतर मानवप्राणी निर्माण केला ही गोष्ट स्पष्टपणें सांगितली आहे. प्रथम उरग, नंतर पक्षी व नंतर मनुष्यप्राणी या जीवकोटींच्या विकासांतील तीन महत्त्वा-

ऱ्या पायऱ्या आहेत ही गोष्ट आजच्याहि विकासवाद्यांस मान्य आहे. अर्थात् आज पांच हजार वर्षांनीं जी गोष्ट सुस्पष्टपणें ज्ञात झाली ती प्राचीन कालच्या विद्वानांनीं केवळ विचारशक्तीनें जाणून नमूद करून ठेवली हें विशेष होय.

तैत्तिरीय संहितेंतील वरील उताऱ्यांत सृष्टयुत्पत्तीसंबंधीं प्राचीन विद्वानांचीं मतें कशीं होतीं याचा उल्लेख झाला आहे. अशा तऱ्हेचे विचार इतस्ततः वैदिक वाङ्मयांत अनेक ठिकाणीं व्यक्त केलेले आपणांस आढळून येतात. उदाहरणार्थ, पुढील उताऱ्यांत असें म्हटलें आहे कीं,

**पंचमहाभूतांची उत्पत्ति—**

ओं ब्रह्मविदाप्नोति परम्।

तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः। आकाशाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी। पृथिव्या ओषधयः। ओषधीभ्योऽन्नम्। अन्नात्पुरुषः॥ (तै. आर. ८.१).

ब्रह्म जाणणाऱ्याला पलीकडचें (ज्ञान) प्राप्त होतें. तें कसें? तर आत्म्यापासून आकाश उत्पन्न झालें, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथिवी, पृथिवी पासून वनस्पति, वनस्पतींपासून अन्न व अन्नापासून मनुष्य उत्पन्न झाला. (तै. आर. ८. १).

या ठिकाणीं तेजोमेघापासून आपल्या पृथिवीची उत्पत्ति झाली अशी कल्पना देण्याइतकी विचारप्रणाली आपणांस दृष्टीस पडते. प्रथम आत्म्यापासून आकाश म्हणजे अंतरिक्ष अथवा पोकळी उत्पन्न झाली. त्यांत वायुरूप गोल किंवा त्यापूर्वी तेजोमेघासारखें वायुमय विरल पटल उत्पन्न झालें. त्यांत उष्णता उत्पन्न झाली. त्या उष्णतेच्या कमीजास्त होण्यानें द्रवरूप उत्पन्न झालें, त्यापासून घन अशी पृथिवी निर्माण होऊन तीवर वनस्पती व प्राणी उत्पन्न झाले. हे विचार उपनिषत्कर्त्या ऋषींनीं सहस्रों वर्षांपूर्वी व कांहीं साधनें नसतांना व्यक्त करून ठेवलेले आहेत.

असेच विचार आपणांस अन्यत्रहि तैत्तिरीय आरण्यकांत व्यक्त केलेले आढळून येतात. उदाहरणार्थ—

स ईक्षित लोकान्नु सृजाइति स इमाँल्लोकानसृजत।

अम्भो मरीचीर्मरमापः।

उदोऽम्भः परेण दिवं द्यौः प्रतिष्ठाऽन्तरिक्षं मरीचयः

पृथिवी मरो या अधस्तात्ता आपः।

सो अद्भ्य एव पुरुषं समृद्धृत्यामूर्च्छयत्। (तै. आर. २.४.१)

त्यानें अवलोकन केलें व लोक निर्माण करावे अशी त्याला इच्छा झाली. तेव्हां त्यानें या लोकांची निर्मिति केली. नंतर त्यानें मरीची म्हणजे किरण व जल उत्पन्न केलें. त्यानंतर दिशा, आकाश, अंतरिक्ष, त्यांत तेज व पृथिवी व मरूच्या खालीं पाणी निर्माण केलें. त्या पाण्यापासून पुरुष निर्माण करून तो मूर्छेप्रत गेला.

असन्नेव स भवति। असद्ब्रह्मेति वेद चेत्। अस्ति ब्रह्मेति, चेद्वेद।

सन्तमेनं ततो विदुरिति।

तस्यैष एव शारीर आत्मा। यः पूर्वस्य।

अथातोऽनुप्रश्नाः।

उताविद्वानमुं लोकं प्रेत्य। कश्चन गच्छती ३। आहो विद्वानमुं लोकं प्रेत्य। कश्चित्समुश्नुताऽउ॥

सोऽकामयत। बहुस्यां प्रजायेयेति। स तपोऽतप्यत। स तपस्तप्त्वा। इदँ सर्वमसृजत।

यदिदं किं च। तत्सृष्ट्वा। तदेवानुप्राविशत्।

तदनुप्रविश्य। सच्चत्यच्चाभवत्। निरुक्तं चानिरुक्तं च। निलयं चानिलयं च। विज्ञानंचाविज्ञानं च। सत्यं चानृतं च सत्यमभवत्। यदिदं किं च। तत्सत्यमित्याचक्षते।

तदप्येषः श्लोको भवति॥ (८.६)॥

असद्वा इदमग्र आसीत्, ततो वै सदजायत। तदात्मानँ स्वयमकुरुत, तस्मात्तत्सुकृतमुच्यत इति। (८.७).

तो परमात्मा प्रथम असद्रूप होता. असत् हेंच ब्रह्म म्हणून जाणावें किंवा ब्रह्म असतें म्हणून जाणावें. सुज्ञ लोक त्याला असणारें म्हणून जाणत होते. त्याचा हाच शारीर आत्मा होता. तोच पूर्वीच्याचाहि होता. यावर आतां प्रश्न असा. या लोकाप्रत येऊन कोण विद्वान् जात नाहीं! विद्वान् या लोकाप्रत येऊन कोणी राहतो.

त्याला इच्छा झाली आपण बहुत व्हावें व प्रजा उत्पन्न करावी. त्यानें तप केलें. तप केल्यानंतर त्यानें हें सर्व निर्माण केलें.

हें जें कांहीं सर्व आहे तें निर्माण करून त्यानें त्यांत प्रवेश केला. त्यांत प्रवेश केल्यानंतर तो तेंच झाला. निरुक्त व अनिरुक्त, निलय व अनिलय, विज्ञान व अविज्ञान, सत्य व अनृत, सर्व सत्य झालें. हें जें कांहीं सर्व आहे त्यास सत्य असें म्हणतात.

याकरितां हा श्लोक म्हणण्यांत येतो.

हें सर्व पहिल्यानें असत् होतें, त्यापासून सत् झालें. नंतर आत्म्यानें आपणांस निर्माण केलें म्हणून त्यास सुकृत असें म्हणतात. (तै. आर. ८-६-७)

**शतपथ ब्राह्मणोक्त सृष्ट्युत्पत्ति—**

शतपथ ब्राह्मणांत हेच विचार आपणांस अधिक विस्तारानें मांडलेले आढळतात. कारण शतपथ ब्राह्मण हें तैत्तिरीय, वगैरे संहितांतीलच भाग अधिक व्यवस्थित रीतीनें मांडणाऱ्या व तदनंतर झालेल्या वाजसनेयी संहितेवरील भाष्यरूपानें निर्माण करण्यांत आलें आहे.

आपो ह वाऽइदमग्रे सलिलमेवास । ताऽअकामयंत कथं नु प्रजाये महीति ताऽअश्राम्यंस्तास्तपोऽतप्यंत तासु तपस्तप्यमानासु हिरण्मयमाण्डं संबभूवा जातो ह्यर्हि संवत्सरऽआस तदिदँ हिरण्मयमाण्डं यावत्संव्वत्सरस्य व्वेला तावत्पर्य्यप्लवत ॥ १ ॥ ( शतपथ. ११·१·६·१ ).

ततः संवत्सरे पुरुषः समभवत् । त्स ( स ) प्रजापतिस्तस्मादु संवत्सरऽएव स्त्री वा गौर्वा व्वडवाव्विजायते संवत्सरे हि प्रजापतिरजायत स इदँ हिरण्मयमाण्डं व्यरुजत्नाह तर्हि काचन प्रतिष्ठाऽऽस तदेनमिदमेव हिरण्मयमाण्डं यावत्संव्वत्सरस्य व्वेलाऽऽसी त्तावद् बिभ्रत्पर्य्यप्लवत ॥ २ ॥

स सम्वत्सरे व्याजिहीर्षत् । ( त्स ) स भूरिति व्याहरत्सेयम्पृथिव्यभवद्भुवऽ इति तदिदमन्तरिक्षमभवत्स्वरिति साऽ सौ द्यौरभवत्तस्मादु सम्वत्सरऽ एव कुमारो व्या जिहीर्षति संवत्सरे हि प्रजापतिर्व्याहरत् ॥ ३ ॥

( त्स ) स वाऽएकाक्षर द्व्यक्षरेण्येव । प्रथमं व्वदन्यन्प्रजापतिरवदत्तस्मादेकाक्षरद्व्याक्षरेण्येव प्रथमं व्वदन्कुमारो व्वदति ॥४॥

तानि वा एतानि पञ्चाक्षराणि । तान्पञ्चर्तून्कुरुत तऽइमे पञ्चर्तवः सऽएवमिमांल्लोकाञ्जातान्त्संवत्सरे प्रजापतिरभ्युदतिष्ठत्तस्मादु संवत्सरऽएव कुमार उत्तिष्ठासति संवत्सरे हि प्रजापतिरुदतिष्ठत् ॥ ५ ॥

स सहस्रायुर्जज्ञे । स यथा नद्यै पारं परापश्येदेवं स्वस्यायुषः पारंपराचख्यै ॥ ६ ॥

सोऽर्च्चञ्छ्राम्यँश्चचार प्रजाकामः । स आत्मन्येव प्रजातिमधत्त सऽआस्येनैव देवानसृजत ते देवा दिवमभिपद्यासृज्यंत तद्देवानां देवत्वं यद्दिवमभिपद्यासृज्यन्त तस्मै ससृजानाय दिवेवास तदेव देवानां देवत्वं यदस्मै ससृजानाय दिवेवास ॥ ७ ॥

( साऽथ ) अथ योयमवाङ् प्राणः । ( स्ते ) तेनासुरानसृजत तऽइमामेव पृथिवीमभिपद्या सृज्यन्त तस्मै ससृजानाय तमऽइवास ॥ ८ ॥ ( शतपथ. ११·१·६·१–८ ).

या शतपथ ब्राह्मणांतील उताऱ्यांत व्यक्त केलेले विचार आतांपर्यंत वर दिलेल्या विचारांपेक्षां फारसे वेगळे नाहींत. त्यांचा सारांश असा—

प्रथम हें सर्व आप होतें म्हणजे सलिल होतें. त्याच्या मनांत इच्छा झाली कीं, प्रजा कशी निर्माण करावी. तेव्हां त्यानें श्रम केले व तप केलें. याप्रमाणें त्याचें तप चालू असतांना एक सुवर्णमय अण्ड निर्माण झालें. त्या वेळीं संवत्सर निर्माण झालें. त्या वेळीं तें सुवर्णमय अण्ड संवत्सराच्या कालापर्यंत तरंगत राहिलें. त्या संवत्सरांच्या ठिकाणीं पुरुष उत्पन्न झाला. तो प्रजापति होता. त्यापासून संवत्सररूपी स्त्री, गाय किंवा वडवा कोणी तरी उत्पन्न झाली. संवत्सराच्या ठिकाणीं प्रजापति उत्पन्न झाला. त्यानें त्या सुवर्णमय अण्ड्यास रुजत घातलें. त्या वेळीं कोठें तरी स्थापना केली. हें हिरण्मय अंड जी संवत्सराची मर्यादा होती तावत्कालपर्यंत तरंगत होतें. तें संवत्सराच्या ठिकाणीं विहार करीत होतें. त्यानें भूः असा उच्चार केला त्याबरोबर पृथिवी उत्पन्न झाली, भुवः असा उच्चार केला त्याबरोबर द्यौ उत्पन्न झालें, स्वः असा उच्चार केला त्याबरोबर अन्तरिक्ष उत्पन्न झालें. त्यानंतर संवत्सरकुमार विहार करता झाला व संवत्सराच्या ठिकाणीं प्रजापति विहार करता झाला. तो प्रजापति प्रथम एक अक्षर, दोन अक्षरें असलेल्या शब्दांनीं बोलता झाला. त्यामुळेंच मुलें प्रथम एकाक्षरी, द्व्यक्षरी शब्दांनींच बोलतात.

**सृष्ट्युत्पत्तीबद्दल पौराणिक कल्पना—**

आपल्या वाङ्मयाच्या इतिहासामध्यें वैदिक वाङ्मय अथवा संहिता, ब्राह्मणें व आरण्यकें अथवा उपनिषदें, यानंतर पौराणिक वाङ्मय येतें. आपलीं पुराणें हे एक प्रकारचे ज्ञानकोशच असून तत्कालीन सर्व उपलब्ध ज्ञानाचा संग्रह त्यांनीं करून ठेवलेला आढळतो. हीं पुराणें निरनिराळ्या काळीं रचलीं गेलीं असून त्यांनीं आपलीं वर्णनें आपआपल्या कालापर्यंत आणून ठेवलेलीं आहेत. पुराणांमध्यें मुख्यतः कोणते विषय असतात हें पुराणांतच त्यांनीं नमूद करून ठेवलें आहे. सर्गः प्रतिसर्गश्च वंशो मन्वन्तराणि च । वंशानुचरितं चेति पुराणं पंचलक्षणम् ॥ म्हणजे पृथ्वीची उत्पत्ति व प्रतिसृष्टीची उत्पत्ति निरनिराळे वंश व मन्वंतरें आणि निरनिराळ्या वंशांनीं केलेलें कार्य या पांचांचें वर्णन करणें हें पुराणांचें कार्य आहे. या पुराणांत सर्वच विषय येतात. पण त्यांत पृथ्वीची उत्पत्ति हा विषय प्रथमच घेतलेला असतो व हें वर्णन थोडयाफार फरकानें बहुतेक सर्व पुराणांत सारखेंच असतें. तेव्हां नमुन्याकरितां म्हणून अग्निपुराणांत आढळणारें सृष्टीच्या उत्पत्तीचें वर्णन पुढें दिलें आहे त्यावरून पुराण-रचनाकालीन लोकांच्या यासंबंधीं काय कल्पना होत्या त्याचें ज्ञान आपणांस सामान्यतः शितावरून भाताची परीक्षा या न्यायानें होईल.

जगत्सर्गादिकां क्रीडां विष्णोर्वक्ष्येऽधुना शृणु ।
सर्गादिकृत्स सर्गादिः सृष्ट्यादिः सगुणोऽगुणः ॥ १ ॥
ब्रह्माव्यक्तं सदग्रेऽभून्न खं रात्रि दिनादिकम् ।
प्रकृतिः पुरुषं विष्णुं प्रविश्या क्षोभयत्ततः ॥ २ ॥
सर्ग काले महत्तत्त्वमहंकारस्ततोऽभवत् ।
वैकारिकस्तैजसश्च भूतादिश्चैव तामसः ॥ ३ ॥
अहंकाराच्छब्दमात्रमाकाशमभवत्ततः ।
स्पर्शमात्रोऽनिलस्तस्माद्रूपमात्रोऽनलस्ततः ॥ ४ ॥
रसमात्रा आप इतो गन्धमात्रा धरित्र्यभूत् ।
अहंकारात्तामसात्तु तैजसानीन्द्रियाणि च ॥ ५ ॥
वैकारिका दश देवा मन एकादशेन्द्रियम् ।
ततः स्वयंभूर्भगवान्सिसृक्षुर्विविधाः प्रजाः ॥ ६ ॥
आप एव ससर्जाऽऽदौ तासुवीर्यमवासृजत् ।
आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः ॥ ७ ॥
अयनं तस्य ताः पूर्वं तेन नारायणः स्मृतः ।
हिरण्यवर्णमभवत्तदण्डमुदकेशयम् ॥ ८ ॥
तस्मिञ्जज्ञे स्वयं ब्रह्मा स्वयंभूरिति नः श्रुतम् ।
हिरण्यगर्भो भगवानुषित्वा परिवत्सरम् ॥ ९ ॥
तदण्डकमकरोद्द्वैधं दिवं भुवमथापि च ।
तयोः शकलयोर्मध्य आकाशमसृजत्प्रभुः ॥ १० ॥
अप्सु पारिप्लवां पृथ्वीं दिशश्च दशधा दधे ।
तत्र कालं मनो वाचं कामं क्रोधमथो रतिम् ॥ ११ ॥
ससर्ज सृष्टिं तद्रूपांस्स्रष्टुमिच्छन्प्रजापतिः ।
विद्युतोऽशनिमेघांश्च रोहितेन्द्रधनूंषि च ॥ १२ ॥
वयांसि च ससर्जाऽऽदौ पर्जन्यं चाथ वक्त्रतः ।
ऋचो यजूंषि सामानि निर्ममे यज्ञसिद्धये ॥ १३ ॥
साध्यास्तैरयजन्देवान्भूतमुच्चावचं भुजात् ।
सनत्कुमारं रुद्रं च ससर्ज क्रोधसंभवम् ॥ १४ ॥
मरीचिमत्र्यंगिरसं पुलस्त्यं पुलहं क्रतुम् ।
वसिष्ठं मानसास्सप्तब्राह्मणानिति निश्चितम् ॥ १५ ॥
सप्तैते जनयन्ति स्म प्रजा रुद्राश्च सत्तम ।
द्विधा कृत्वाऽऽत्मनोदेहमर्धेन पुरुषोऽभवत् ॥ १६ ॥
अर्धेन नारी तस्यां स ब्रह्मा वै चासृजत्प्रजाः ।

विष्णूची जग उत्पन्न करण्याची क्रीडा मी आतां सांगतों ती ऐका. त्यानें ही सृष्टि निर्माण केली आहे आणि उत्पत्तीचा आरंभ तो आहे. आणि सृष्टीचा आरंभहि तोच असून सगुण असून निर्गुण आहे. (१)

ब्रह्म हें अव्यक्त आहे, परंतु अस्तित्वांत आहे. प्रथम आकाश नव्हतें. रात्र नव्हती. दिवस वगैरेहि नव्हता. त्या वेळीं प्रकृति पुरुष विष्णूमध्यें प्रवेश करून त्याच्या ठिकाणीं क्षोभ उत्पन्न करती झाली. (२)

सृष्टीच्या उत्पत्तिकालीं प्रथम महत् हें तत्त्व निर्माण झालें. त्यानंतर अहंकार निर्माण झाला. त्यानंतर वैकारिक, तैजस आणि तामस भूतादि निर्माण झालीं. (३)

अहंकारापासून शब्द निर्माण करणारें आकाश निर्माण झालें. स्पर्शाचें ज्ञान करून देणारा वायु व रूपाचें ज्ञान करून देणारें तेज अथवा अग्नि निर्माण झाला. (४)

रसाचें ज्ञान करून देणारें जल आणि वासाचें ज्ञान करून देणारी पृथिवी झाली. अहंकार व तम यांच्यापासून तैजस वस्तु आणि इन्द्रियें उत्पन्न झालीं. (५)

नंतर वैकारिक दहा देव व अकरावें इन्द्रिय जें मन तें निर्माण झालें. त्यानंतर स्वयंभू भगवानानें निरनिराळ्या प्रकारची प्रजा निर्माण केली. (६)

त्यानें प्रथम पाणी उत्पन्न केलें व त्या पाण्यांत वीर्य उत्पन्न केलें. पाण्यास नार असें म्हणतात, कारण तीं नराचीं अपत्यें होत. आणि उदकें हीं ज्या अर्थी त्याचीं प्रथम अयनें म्हणजे आश्रयस्थानें होत त्या अर्थी त्यास नारायण असें म्हणतात. त्या उदकांत शयन करणारें एक सुवर्णाच्या रंगाचें अंडें उत्पन्न झालें. (७-८)

त्या अण्ड्यामध्यें स्वतः ब्रह्मा उत्पन्न झाला म्हणून त्यास स्वयंभू असें म्हणतात. त्या अण्ड्यामध्यें एक वर्ष राहिल्यानंतर त्या हिरण्यगर्भ भगवानानें त्या अण्ड्याचीं दोन शकलें केलीं व त्यांपासून द्यौ आणि पृथिवी हीं बनलीं. त्या दोन शकलांमध्यें प्रभूनें आकाश निर्माण केलें. (९-१०)

पाण्यामध्यें बुडालेल्या पृथ्वीला दहा ठिकाणीं दश दिशांनीं धारण केलें. त्या ठिकाणीं सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा असलेल्या प्रजापतीनें (पृथिवीवर) काल, मन, वाचा, काम, क्रोध, रति व तद्रूप सृष्टि निर्माण केली. त्यानें (आकाशांत) विजेपासून अशनि व मेघ आणि रोहितवर्णाचें इन्द्रधनुष्य निर्माण केलें. त्यानें प्रथम पक्षी उत्पन्न केले व पर्जन्य उत्पन्न केला. नंतर मुखापासून ऋक्, यजु, साम यज्ञसिद्धीकरितां निर्माण केले. त्यांच्या साहाय्यानें साध्यांनीं यज्ञ केला व त्यांच्या योगानें देवांस व श्रेष्ठ व कनिष्ठ कोटींतील भूतमात्रांस (तुष्ट केलें). त्यानें नंतर आपल्या भुजापासून सनत्कुमार व क्रोधापासून रुद्रास उत्पन्न केलें. (११-१४)

नंतर त्यानें आपल्या मनापासून मरीचि, अत्रि, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ या सात ब्रह्मयाच्या मानस-पुत्रांस निर्माण केलें. ( १५ )

या सातांनीं उत्तम अशी प्रजा व रुद्र यांस जन्म देण्याचें कार्य केलें आहे. नंतर त्यानें स्वतःचा देह द्विधा करून त्याच्या अर्धभागापासून पुरुष व अर्धभागापासून स्त्री उत्पन्न केली. त्या स्त्रीच्या ठिकाणीं ब्रह्मयानें प्रजा उत्पन्न केली. ( १६ )

**अवतार-कल्पना—**

भारतीयांमध्यें जी अवतारांची कल्पना आहे तीहि या जगद्विकासाच्या क्रमासच अनुलक्षून आहे. पहिला जो मत्स्यावतार तो होण्यापूर्वी सर्व विश्व केवल जलमय होतें. त्या जलामध्यें पहिला जो जीव उत्पन्न झाला तो मत्स्य होय. हा केवळ जलचर व पहिलाच पृष्ठवंश असलेला प्राणी होय, ही कल्पना आधुनिक विकासवादामध्येंहि व्यक्त केलेली आढळते. त्यानंतर कूर्म अथवा कासव हा भूजलचर म्हणजे पाणी व जमीन या दोहोंवर राहणारा प्राणी उत्पन्न झाला. त्यानंतर वराह हा दलदलीच्या पाणथळ जमिनींत राहणारा प्राणी उत्पन्न झाला. त्यानंतर नरसिंह हा अर्धवट पशु व अर्धवट मनुष्य असा प्राणी उत्पन्न झाला. त्यानंतर खुजा मनुष्य बटु वामन हा निर्माण झाला. नंतर वनचारी किंवा अरण्यवासी असा परशुधारी परशुराम निर्माण झाला. यानें सह्याद्रि पर्वतापलीकडे जंगल साफ करून नवीन वसाहत निर्माण केली. यानंतर धनुष्यबाणाच्या साहाय्यानें स्वसंरक्षण करणारा व मृगाची शिकार करणारा व वानरांशीं सख्य जोडणारा राम हा अवतीर्ण झाला व त्यानंतर सर्व सुसंस्कृत आयुष्यक्रम आचरणारा व कर्मयोगी असा श्रीकृष्ण हा पूर्णावतार झाला. वरील सांस्कृतिक विकासाच्या पायऱ्या या आधुनिक विकासवादापासून फारशा दूर नाहींत ही गोष्ट कोणाच्याहि सहज लक्षांत येईल.

विश्वोत्पत्तीसंबंधीं भारतीयांच्या कल्पना काय होत्या यासंबंधीं आतांपर्यंत विवेचन करण्यांत आलें. आतां आपण इतर देशांतील लोकांच्या शास्त्रीय युग निर्माण होण्यापूर्वींच्या कल्पना काय होत्या याचें थोडक्यांत अवलोकन करूं.

**इतर देशांतील प्राचीन लोकांच्या सृष्टीसंबंधीं कल्पना—**

सामान्यतः जगांतील सर्व देशांमध्यें विश्वोत्पत्तीसंबंधीं कांहीं आख्यायिका अथवा लोककथा परंपरेनें चालत आलेल्या असतात व त्यांमध्यें पुष्कळच विविधता आढळून येते.

ईजिप्तमध्यें अशी समजूत होती कीं, प्रारंभीं जड व चित् अशीं दोन तत्त्वें अनादिकालापासून होतीं. त्यांपैकीं चित्तत्त्वास सृजनाची इच्छा उत्पन्न होऊन जडतत्त्वांत त्यामुळें गति उत्पन्न होते. नंतर एका अण्डाची उत्पत्ति होऊन तेज निर्माण होतें. या तेजापासून सर्व वस्तुजाताची उत्पत्ति होते.

बाबिलोनी लोकांमध्यें जलतत्त्वापासून विश्वोत्पत्ति झाली असेंच मानण्यांत येत असे.

इराणची संस्कृतिहि बरीच प्राचीन आहे. त्यांतील विश्वोत्पत्तीच्या कल्पनेच्या मूळाशीं प्रथम आकाश, तारे, सूर्य, चंद्र, भूमि, नद्या, समुद्र, वनस्पति व प्राणी हीं असून नंतर मनुष्य या क्रमानें सर्व जगताची उत्पत्ति झाली असें प्रतिपादन केलेलें आढळतें.

चीनमध्यें अशी परंपरा आहे कीं, प्रथम येंग व यिंग हीं पुरुष व स्त्री तत्त्वें निर्माण होऊन त्यांच्या संयोगानें प्रथम चार ऋतु व नंतर आठ सृष्टिचमत्कार उत्पन्न होऊन त्यांपासून सर्व सृष्टि विकास पावली.

जपानी लोकांचे कोजिकी व निहोंगी असे दोन प्राचीन ग्रंथ आहेत. त्यांत प्रथम स्वर्ग व तीन देवता निर्माण झाल्यानंतर पृथ्वी व दोन देवता उत्पन्न झाल्या असें पहिल्या ग्रंथांत नमूद असून दुसऱ्या ग्रंथांत स्वर्ग व पृथिवी मिळून एक अंड असून त्यांतील जड व स्थूल भागाची पृथिवी आणि शुद्ध व विरल भागाचा स्वर्ग झाला व नंतर अनेक देवता निर्माण होऊन इझनगी व इझनमी या भूमिदेवतांपासून सर्व जग निर्माण झालें असें सांगितलें आहे.

ख्रिस्ती बायबलच्या जुन्या करारांतील उत्पत्ति या प्रकरणांत परमेश्वरानें सहा दिवसांत सर्व जग निर्माण करून सातव्या दिवशीं विश्रांति घेतल्याची प्रसिद्ध कथा सांगितली आहे.

हीच कथा महंमदीयांनीं कुराणांतहि ग्राह्य धरली आहे. त्यांच्या मतें प्रथम ईश्वराचें सिंहासन तयार झालें. त्याच्या खालून जो धूर निघत होता त्याचा स्वर्ग, व जल निघत होतें तें आटून पृथिवी झाली.

या सर्व निरनिराळ्या विचारांमध्यें तात्त्विक असा विचार कोठें मांडलेला नाहीं. तो आपल्या वैदिक ग्रंथांत 'असतः सदजायत' या कल्पनेंत व्यक्त केलेला आढळतो.

आतांपर्यंत आपण ज्या सृष्टीमध्यें वसति करून आपले सर्व व्यापार करतों त्या सृष्टीच्या उत्पत्तीबद्दलच्या आपल्या पूर्वजांच्या कल्पना काय होत्या, व त्यांनीं यासंबंधीं काय विचार केला होता, तो वेदकालापासून पौराणिक कालापर्यंत मांडला आहे. ऋग्वेदसंहितेमधील ऋचांवरून तत्कालीन लोक यासंबंधीं कांहीं विचार करीत होते व विचारांची सूक्ष्मता त्यांस जेथपर्यंत घेऊन जात होती तेथपर्यंत ते पोंचले होते व त्यांनीं या सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधीं कांहीं बीजरूपी विचार व्यक्त केले आहेत हें आपणांस दिसून येतें. त्यानंतर ब्राह्मण व आरण्यक अथवा उपनिषत्कालांत त्या विचारांत थोडी प्रगति झालेली

दिसते. त्यानंतर पौराणिक कालांत त्या विचारांत फारशी वाढ झालेली दिसत नाहीं. येथपर्यंत कांहीं दैवी चमत्कार व कांहीं आध्यात्मिक विचार यांचीच मांडणी केलेली आपल्या दृष्टीस पडते.

त्या वेळच्या जगांतील इतर ज्या संस्कृति होत्या त्यांच्या पुरस्कर्त्यांनीं सृष्टयुत्पत्तीसंबंधीं जे विचार आपल्या ग्रंथांत नमूद केले आहेत त्यांचेंहि त्रोटक सिंहावलोकन आपण केलें आहे. त्यामध्येंहि विचारांची फारशी प्रगति आपणांस झालेली दिसत नाहीं.

**सृष्टिचमत्काराबद्दल उलगडा करण्याची प्रवृत्ति—**

कोम्ट या तत्त्ववेत्त्यानें असें म्हटलें आहे कीं, कोणत्याहि घटनेबद्दल जेव्हां एखादा प्रश्न उत्पन्न होत असतो, त्या वेळीं त्या घटनेसंबंधीं स्पष्टीकरण देण्याच्या प्रयत्नांत आपणांस तीन निरनिराळ्या अवस्था दृष्टीस पडतात. त्या म्हटल्या म्हणजे (१) आधिदैविक, (२) आध्यात्मिक आणि (३) आधिभौतिक. यांपैकीं पहिल्या अवस्थेमध्यें मानवी मनाची अशी स्थिति असते कीं, तो प्रत्येक गोष्ट परमेश्वराकडून घडून येते असें मानतो व प्रत्येक घटनेचें कारण अथवा कर्ता परमेश्वर आहे असें सांगतो. त्या वेळीं त्याची विचारशक्ति बाल्यावस्थेंत असून फारशी प्रगल्भ झालेली नसते. यानंतर तो विचार करूं लागतो व दुसऱ्या अवस्थेमध्यें कांहीं तरी तात्त्विक कारण शोधून काढूं लागतो व त्या वेळीं या आधिभौतिक सृष्टीच्यापलीकडे व मानवास अज्ञात अशी कांहीं तरी आध्यात्मिक घटना असून तीमुळें जगांतील सर्व घडामोडी होत असतात अशी त्याची कल्पना होते. याकरितां तो या अवस्थेमध्यें सर्व गोष्टींचें कारण कांहीं तरी आध्यात्मिक घटनेमध्यें शोधीत असतो व तशा तऱ्हेचें स्पष्टीकरण देत असतो. त्यानंतर मानवाची बुद्धि अधिक प्रगल्भ झाली, त्याची विचारशक्ति वाढली, त्याच्या ज्ञानाचा विकास झाला म्हणजे तो सभोंवतींच्या सृष्टिक्रमाचा अधिक सूक्ष्मपणें अभ्यास करूं लागतो व त्यास या सृष्टिक्रमांतील कार्यकारणभाव हळूहळू समजूं लागतात. मग तो त्यांचा अभ्यास करूं लागतो व या अभ्यासाचें फल म्हणून या सृष्टिक्रमासंबंधीं कांहीं तरी नियम अथवा आडाखे बसवूं लागतो. नंतर हे नियम तो पडताळून पाहतो व ते निश्चित करतो. यामुळें त्याच्या ज्ञानाची कक्षा वाढत जाते व अधिकाधिक नैसर्गिक चमत्कारांचा त्यास उलगडा होऊं लागतो. यानंतर त्यास आधिदैविक किंवा आध्यात्मिक स्पष्टीकरणापासून समाधान होत नाहीं. तेव्हां तो निरनिराळ्या घटनांचें आधिभौतिक अथवा सृष्टीच्या नैसर्गिक नियमांस जें अनुसरून असेल असें स्पष्टीकरण

५५. प्रयत्न करीत असतो व त्यामध्यें अनेक सिद्धान्त मांडण्याचा प्रयत्न करतो व जे सिद्धान्त त्यास वारंवार पडताळून पाहतां येतात ते त्याप्रमाणें सिद्ध झाले म्हणजे त्यांस अबाधित नियम असें मानूं लागतो व त्या नियमांनुसार या सृष्टींतील सर्व कोडीं सोडविण्याचा प्रयत्न करीत असतो.

या कसोटीला लावून पाहतां वर जे निरनिराळे भारतीय व इतर देशांतील ज्ञानी जनांनीं सृष्टीसंबंधीं विचार व्यक्त केलेले आपण अवलोकन केले ते कोम्टच्या पहिल्या दोन पायऱ्यांच्या पुढें गेलेले दिसत नाहींत. त्यांतल्या त्यांत भारतीय विचार थोडे प्रगल्भ दिसतात, परंतु पौराणिक काळांत तर ते थोडे मागासलेले दिसतात; कारण ते विचार सामान्य लोकांकरतांच मांडण्यांत आलेले होते.

आज मानवी ज्ञानाची वाढ पुष्कळच झालेली असून आतां कोणाची आधिदैविक किंवा आध्यात्मिक भूमिकेवरून केलेल्या स्पष्टीकरणावर फारशी भिस्त राहिलेली नाहीं. तर मनुष्याची जिज्ञासा अधिकाधिक वाढून त्यानें सृष्टींतील चमत्कारांचा पद्धतशीरपणें व वारंवार निरीक्षण करून अभ्यास चालविला आहे व हा सृष्टिक्रम कसा चालला याचें यथार्थ ज्ञान मिळविण्याची त्याची धडपड सारखी चालू आहे.

तेव्हां अशा काळांत आतांपर्यंत वर्णन केलेल्या सृष्टयुत्पत्ती-संबंधींच्या कल्पना कितीहि उदात्त असल्या तरी त्या आधुनिक चिकित्सक बुद्धीस पटण्यासारख्या नाहींत. याकरितां मनुष्यानें जें आपणांस आतांपर्यंत ज्ञान करून घेतलें आहे त्याचें पद्धतशीर वर्गीकरण करून निरनिराळीं शास्त्रें बनविलीं आहेत. त्या निरनिराळ्या शास्त्रांच्या साहाय्यानें तो सर्व सृष्टींतील घडामोडींचें अवलोकन करीत असतो व त्यांचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न करीत असतो.

**आद्यशास्त्र गणितशास्त्र—**

या सर्व शास्त्रांच्या मुळाशीं गणितशास्त्र आहे. गणितशास्त्र हें प्रत्यक्ष एखाद्या घटनेचा अभ्यास करीत नाहीं तर कोणत्याहि शास्त्राचे नियम कसे बनवावे याचा अभ्यास करतें. गणित-शास्त्रानें घालून दिलेल्या नियमांप्रमाणें इतर सर्व शास्त्रांतील सिद्धान्त काढण्यांत येतात व इतर शास्त्रांतील सिद्धान्त गणित-शास्त्राच्या निकषावर घांसून त्यांचें यथार्थत्व तपासून पाहण्यांत येतें व त्याप्रमाणें सूत्रें अथवा सारण्या बनविण्यांत येतात व त्या सूत्रांचा व सारण्यांचा उपयोग अधिक सिद्धान्त काढण्याच्या कामीं करण्यांत येतो व याप्रमाणें प्रत्येक शास्त्रांत ज्ञानाची प्रगति होत असते व मिळालेलें ज्ञान निश्चित व सूत्रबद्ध करण्यांत येतें.

या गणितशास्त्राच्या मुळाशीं साधें अंकगणित आहे. सर्व गणितशास्त्राच्या उभारणीचा पाया अंकगणित आहे. व या अंकगणिताचा पाया आपल्या भरतखंडांत घालण्यांत आला ही

गोष्ट आपणांस अभिमानास्पद वाटेल यांत शंका नाहीं. नऊ अंक व शून्य मिळून दशमानात्मक संख्यालेखनपद्धति मूळ भारतीयांनीं शोधून काढली याबद्दल सर्वांचें ऐकमत्य आहे. भारतीयांपासून ही दशमानात्मक पद्धति अरबांनीं ग्रहण केली व मसूदी, अल ख्वारिझ्मि, आव्हिसेना, इत्यादि अरब ग्रंथकारांनीं त्याबद्दल भारतीयांची ठिकठिकाणीं भरपूर स्तुतिहि केलेली आहे. या अरबी ग्रंथकारांपासून पाश्चात्यांनीं नऊ अंक व शून्ययुक्त दशमानपद्धति घेतली व ती त्यांनी साक्षात् अरबांपासून घेतल्यामुळें सध्यांच्या अंकांस ते अरबी अंक असें म्हणतात. पण वास्तविक ते भारतीय अंकच आहेत.

या दशमानपद्धतीचा पुढील ऋचांत स्पष्ट उल्लेख आहे—

आविंशत्यात्रिंशताया ह्यर्वाङा चत्वारिंशता हरिभिर्युजानः ।
आपंचाशता सुरथेभिरिन्द्रा ऽऽ षष्ट्या सप्तत्या सोमपेयम् ॥
आशीत्या नवत्या याह्यर्वा ङ्शतेन हरिभिरुह्यमानः ॥

ऋ. २.१८,५–६

हे इन्द्रा, तूं आपल्या रथास वीस, तीस, चाळीस अश्व जोडून ये. हे इन्द्रा, तूं पन्नास उत्तम रथास जोडलेल्या अश्वांसह ये, किंवा साठ, सत्तर अश्व जोडून सोमपानाकरितां ये. हे इन्द्रा, तूं आमच्याकडे ऐंशीं, नव्वद, शंभर अश्वांनीं ओढल्या जाणाऱ्या रथावरून ये.

यावरून ही दशमानपद्धति ऋग्वेदकालीन लोकांसहि परिचित होती ही गोष्ट स्पष्ट आहे.

सुमेरियन किंवा खाल्डी लोक आपलें गणित बारा या संख्येच्या घटकानें करीत, परंतु तें बोजड असल्यामुळें मागें पडलें. ग्रीक लोक अंकांबद्दल अक्षरें वापरीत असत. तीहि पद्धति गैरसोयीची म्हणून मागें पडली. त्याप्रमाणेंच रोमन आंकडेहि लेखनास सोयीस्कर नसल्यामुळें मागें पडले.

## बीजगणित व भूमिति—

बीजगणिताचीहि उत्पत्ति भरतखंडांतच झालेली असून त्या शास्त्राचेंहि ज्ञान पाश्चात्यांस अरबांमार्फत झालेलें असून अल्जिब्रा हा शब्दहि अल ख्वारिझ्मी याच्या 'अल जब्र' व अल मुकाबला या एका अरबी ग्रंथाच्या आद्याक्षरांपासून बनलेला आहे. याप्रमाणेंच भूमितीचें ज्ञानहि भारतीयांस होतें ही गोष्ट शुल्बसूत्रांवरून दिसून येते. त्या वेळीं यज्ञांकरितां ज्या वेदी बांधण्यांत येत असत त्या बांधण्याकरितां किंवा निरनिराळ्या मंडपांचें आकारमान काढण्याकरितां त्यांस भूमितीच्या ज्ञानाची आवश्यकता असे व एका चौरसाच्या दुप्पट क्षेत्रफळाचा दुसरा चौरस काढावयाचा असल्यास पहिल्या चौरसाचा कर्ण हा दुसऱ्या चौरसाचा पाया धरून काढावा असें शुल्बसूत्रांत सांगितलें आहे. यावरून आज पायथागोरसच्या नांवानें ज्ञात असलेला सिद्धान्त त्या वेळीं भारतीयांस अवगत होता ही गोष्ट स्पष्ट होत आहे. याप्रमाणें गणितशास्त्राच्या तिन्ही शाखांचें ज्ञान प्राचीन काळीं भारतीयांस होतें हें स्पष्ट होतें. परंतु त्या वेळचें गणितशास्त्र हें तीन परिमाणांचेंच असे. आतां आइन्स्टीन या शास्त्रज्ञानें मोठमोठ्या घटनांच्या बाबतींत काल हें चौथें परिमाणहि ध्यानांत घेणें अवश्य आहे ही गोष्ट स्पष्ट केली आहे. याप्रमाणें गणितशास्त्राचें क्षेत्र हें मानवाच्या ज्ञानाच्या वाढीबरोबर वाढत जात आहे ही गोष्ट आपल्या लक्षांत येईल. असो. गणितशास्त्राच्या विकासाचा विचार पुढें आपण सर्व भौतिक शास्त्रांच्या विकासाबरोबर करूं. सध्यां आपण सृष्टिविषयक स्थूल ज्ञानाकडेच लक्ष देऊं.

## ज्योतिषशास्त्राची उत्पत्ति—

मानवप्राणी हा जेव्हां सृष्टीवर उत्पन्न होऊन आपल्या आयुष्यक्रमाचा हळूहळू विकास करूं लागला तेव्हां त्याचें निरनिराळ्या सृष्टिक्रमांकडे साहजिकच लक्ष गेलें. त्याला रोज उगवणारा व मावळणारा सूर्य व त्यापासून मिळणारा प्रकाश व उष्णता यांचें महत्त्व प्रथम पटलें, याकरितां त्यानें सूर्यास सविता असें म्हटलें. सूर्यापासून मिळणारा प्रकाश व उष्णता यांच्या योगानें पृथ्वीवरील वनस्पती, वगैरे उत्पन्न होतात व वाढतात ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली व तसेंच सर्व प्राण्यांस प्रकाश व उष्णतेची आवश्यकता आहे ही गोष्टहि त्याच्या लक्षांत आली. याकरितांच आर्यांमध्यें सूर्योपासना सुरू झाली. जगांतील इतर अनेक देशांतहि प्रथम सूर्योपासनाच सुरू असलेली दृष्टीस पडते. उदाहरणार्थ, ईजिप्तमध्यें ॲमॉन किंवा रा या सूर्यदेवताच आहेत. तसेंच इराणी मिथ्र हा वैदिक मित्र असून सूर्यदेवताच आहे. तसेंच हिटाइट व मित्तानि या प्राचीन राष्ट्रांतहि मित्र या सूर्यदेवतेची उपासना होत असे हें बोगाझकुई येथील शिलालेखांवरून व अमर्ना येथील इष्टिकांवरून स्पष्ट होतें. सूर्य पूर्वेकडे उगवतो व सायंकाळीं पश्चिमेकडे मावळतो यावरून त्यास दिवस व रात्र यांचें ज्ञान झालें. त्यानंतर चंद्र हा एक पंधरवडा मोठा होत जातो व एक पंधरवडा लहान होत जाऊन एका महिन्यानें पूर्ववत् होतो ही गोष्ट त्याच्या लक्षांत येऊन त्यास महिना या कालपरिमाणाचें ज्ञान आलें. अशा रीतीनें बारा महिने पाहिले तर त्यांत निरनिराळे ऋतू होऊन पुन्हां पूर्ववत् स्थिति येते हें माहीत झाल्यावर त्याला वर्षमानाचें ज्ञान आलें. या वर्षमानांतहि चान्द्रवर्ष व सौरवर्ष हीं भिन्न आहेत ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली ती इतक्या प्राचीन काळीं भारतीयांच्या लक्षांत आली कीं, चान्द्रमानामध्यें एक अधिक महिना धरून त्याची

सौरमानाशीं मेळ घालावा लागतो ही गोष्ट त्यांनीं ऋग्वेदांतीलच एका ऋचेंत नमूद करून ठेवली आहे. ती ऋचा अशी : वेद मासो धृतव्रतो द्वादश प्रजावतः । वेदा य उपजायते ॥ (ऋ. १. २५,८). तो धृतव्रत द्वादश मास जाणतो व जो अधिक मास उत्पन्न होतो तोहि जाणतो. याप्रमाणें मनुष्यास आपला योगक्षेम नीट चालविण्याकरितां कालज्ञान करून घ्यावें लागलें. त्यानें जी यज्ञसंस्था निर्माण केली तिलाहि त्यानें निरनिराळ्या कालमर्यादा घातल्या व त्याकरितां आकाशाचे विभाग करून नक्षत्रांचे प्रदेश ठरविले व विशिष्ट नक्षत्राच्या सन्निध सूर्य येण्यास किती काल लागतो यावरून चिनचूक वर्षमान ठरविलें. या त्यानें आंखलेल्या वर्षमानांत आर्य लोक हे उत्तर ध्रुवाकडून दक्षिणेकडे भ्रमण करीत असतां जो फरक पडत गेला तो कसा पडत गेला व दीर्घ रात्रीपासून दैनिक रात्रीपर्यंत रात्रिमान कसें बदलत गेलें याहि गोष्टींची नोंद त्यानें करून ठेवली. परंतु त्या सर्व तपशिलाकडे पाहण्याचें येथें आपणांस कारण नाहीं. स्थूलमानानें असें म्हणतां येईल कीं, गणितशास्त्रापासून खगोलशास्त्राकडे अथवा ज्योतिःशास्त्राकडे त्यानें आपली प्रगति करून घेतली व या ज्योतिःशास्त्राचा अभ्यास त्यानें हळूहळू बराच वाढविला. सूर्यास ग्रहण लागतें व तें सुटतें याचें ज्ञान वैदिक ऋषींनीं करून घेतलें होतें व सूर्यग्रहणाच्या वेळी सूर्य केवळ तमानें आच्छादित होतो ही गोष्ट अत्रिऋषींनीं जाणून नमूद करून ठेवली होती असें आपणांस ऋग्वेदांतच पाहावयास सांपडतें. यं वै सूर्ये स्वर्भानुस्तमसा विध्यदासुरः । अत्रय स्तमन्वविन्दन् न ह्यन्ये अशक्नुवत् ॥ (ऋ. ५-४०,९).

असुर कुळांत उत्पन्न झालेल्या स्वर्भानूनें म्हणजे राहूनें सूर्यास अन्धकारानें व्यापलें त्यास अत्रींनीं परत मिळविला. ही गोष्ट करण्याचें सामर्थ्य इतर कोणांत नव्हतें. यावरून अत्रि कुळांत फार प्राचीन काळीं ज्योतिःशास्त्राचें अध्ययन होत होतें ही गोष्ट आपणांस प्रतीत होते.

### वर्षमान—

याप्रमाणें वर्षमान दिनमानादि ज्ञान करून घेणें हें तत्कालीन मनुष्यास त्याच्या आयुष्यक्रमास आवश्यक होतें व तें ज्यांनीं प्राप्त करून घेतलें त्यांस त्यांच्या समाजांत महत्त्व प्राप्त झालें. तसेंच सौरवर्ष व चान्द्रवर्ष यांत फरक आहे ही गोष्टहि माहीत होणें हेंहि फार महत्त्वाचें असून त्याचा प्राचीन मानवांच्या आयुष्यक्रमांत फार मोठा उपयोग होता. उदाहरणार्थ, ईजिप्तमधील सर्व जीवनक्रम तेथील नाइल नदीला जो ठराविक वेळीं वार्षिक पूर येत असे त्यावर अवलंबून असे. त्या पुराच्या योगानें सर्व नाइल नदीच्या किनाऱ्याजवळील जमीन जलमय होऊन जात असे व तो पूर ठराविक वेळीं ओसरत असे आणि त्या जागीं जो गाळ सांचत असे त्यावर ईजिप्तमधील शेती अवलंबून असे. याकरितां तत्कालीन विद्वान् लोक सतत निरीक्षण करून हा पूर येण्याची वेळ आगाऊ निश्चित करण्याची खटपट करीत असत व सतत अभ्यासानें त्यांना तसें करणें शक्य झालें व त्यांनीं नाइल नदीचा पूर व व्याध हा तारा आकाशांत दिसूं लागणें या गोष्टींचा संबंध जोडून दिला व त्याप्रमाणें पूर येण्याची वेळ ते आगाऊ जाहीर करूं लागले व त्यामुळें त्यांचें महत्त्व समाजांत वाढलें. हे लोक तेथील ॲम्मन अथवा सूर्यदेवतेचेच उपासक होते. यावरून सूर्याचें महत्त्व जगांतील सर्व लोकांस कसें वाटत होतें ही गोष्ट स्पष्ट होते. याप्रमाणें नाइलच्या पुरावरून ईजिप्ती लोकांनीं आपला वर्षकाल ठरवून आपली वर्षगणना सुरु केली व चान्द्रवर्ष व सौरवर्ष यांत फरक होतो, असें जेव्हां त्यांस कळून आलें तेव्हां त्यांनीं सौरवर्षाचा स्वीकार करून चान्द्रवर्ष सोडून दिलें.

या पुरामुळें सर्व नाइल नदीच्या दोन्ही तीरांवरील प्रदेशांवर गाळाचा थर पसरत असे व त्यामुळें जरी पीक उत्तम येण्यास मदत होत असे तरी ही जमीन ज्या निरनिराळ्या लोकांच्या मालकीची असे त्यांच्या शेतांच्या सर्व मर्यादा व घातलेले बांध वगैरे सर्व वाहून जात आणि त्यामुळें त्यांस पुन्हा पुन्हा आपआपल्या हक्कांप्रमाणें जमिनीची वांटणी करून घ्यावी लागत असे. याकरितां जमिनीच्या मोजणीचें ज्ञान त्यांस आवश्यक झालें व यामुळेंच भूमिति अथवा जमिनीचें मापन करण्याच्या शास्त्राचें ज्ञान त्यांच्यामध्यें वृद्धिंगत झालें. म्हणूनच या शास्त्रास भूमिति हें नांव पडलें.

असुरिया देशामध्येंहि याप्रमाणेंच सूर्याचें महत्त्व त्यांनीं ओळखलें होतें व त्यांनींहि आपलें वर्षमान ठरवलें. मात्र त्यांनीं सूर्याच्या भ्रमणाच्या मार्गाचे बारा समान भाग पाडून त्यांस राशी असें नांव दिलें व दिवसाचे बारा व रात्रीचे बारा असे विभाग पाडून त्यांस तास असें नांव दिलें. त्यांची संख्यागणना दशमानपद्धतीची नसून द्वादशमानपद्धतीची असल्यामुळें त्यांच्या सर्व संख्यामानांत बारा या संख्येस प्रामुख्य असे. हें द्वादशमान त्यांनीं चांद्रवर्षाच्या बारा महिन्यांवरून घेतलें होतें व चंद्रदेवतेचें माहात्म्य या लोकांत फार होतें. त्यामुळें जसे महिने बारा, तशा राशी बारा, दिवसाचे तास बारा, रात्रीचे तास बारा अशी संख्यामानें त्यांनीं ठरविलीं व तासांचे विभाग जी मिनिटें तींहि बाराच्या पटीनें साठ ठरविलीं. मिनिटांचे सेकंदहि साठ ठरविले व वर्षाचे दिवसहि तीनशें साठ ठरविले. तसेंच त्यांनीं सात ग्रहांवरून प्रत्येक दिवशीं ज्या ग्रहाचा होरा सूर्योदयीं असेल त्या ग्रहावरून त्या दिवसास नांव देऊन सात दिवसांच्या आठव-

ड्याची योजना केली. आपण सध्यां मानीत असलेल्या राशी व वार हे आपण याच असुर किंवा खाल्डी लोकांपासून घेतले. परंतु त्यांनीं आपलें वर्ष सौरमानाचें न घेतां चान्द्रमानाचेंच ठेवलें. तेंच बहुतेक शिमी लोकांत प्रचलित असून आज महंमदीयांनींहि त्याचाच म्हणजे चान्द्रवर्षाचा अवलंब केलेला आढळतो. त्यामुळें त्यांचे सण दर तीन वर्षांनीं मागें पडून निरनिराळ्या ऋतूंत येतात. इराणमध्यें सूर्याची अथवा मित्राची पूजा चालू असून त्यांनींहि सूर्य व चंद्र यांच्या गतीवरून आपलें वर्षमान निश्चित केलें व तीस दिवसांचा प्रत्येक महिना ठरवून त्या प्रत्येक महिन्यास व प्रत्येक दिवसास स्वतंत्र नांवें दिलीं. व या चान्द्र व सौरवर्षांचा मेळ दरवर्षी अखेरीस पांच दिवस अधिक धरून घातला व या पांच दिवसांस गाथादिन असें नांव ठेवलें.

## विश्वसंस्थेची कल्पना—

याप्रमाणें निरनिराळ्या राष्ट्रांत आपल्या दैनंदिन आयुष्यक्रमाकरितांच ज्योतिश्शास्त्राची प्रथम उत्पत्ति झाली व त्याची वाढ हळूहळू इतकी होत गेली कीं, आकाशांतील केवळ सूर्य, चंद्र, ग्रह व उपग्रह यांचाच अभ्यास करून मानवी मनाची तृप्ति झाली नाहीं, तर त्यानें हे गोल ज्या विश्वसंस्थेंत निर्माण झाले आहेत व भ्रमण करीत आहेत त्या विश्वसंस्थेचा अभ्यास करण्यास सुरवात केली. आपला सूर्य व सूर्यमाला एवढ्याच मर्यादित क्षेत्राच्या ज्ञानानें त्याची भूक शमेना म्हणून त्यानें या अंतरिक्षांत दिसणाऱ्या अनेक गोलांचा, त्यांच्या गतींचा, त्यांच्या घटनेचा अभ्यास सुरू केला. त्याचबरोबर मानवाची इतर शास्त्रांतील ज्ञानाचीहि गति वाढत असल्यामुळें त्याला इतर शास्त्रांच्या ज्ञानाचाहि या अभ्यासास अधिकाधिक उपयोग होऊं लागला. तसेंच त्याच्या अभ्यासाचीं साधनेंहि अधिकाधिक वाढत गेलीं. प्रथम त्यास निरीक्षणाकरितां केवळ डोळे होते त्या ठिकाणीं त्यास दुर्बिणींचें साहाय्य मिळालें. या दुर्बिणींची शक्तिहि दिवसेंदिवस वाढत गेली. त्यानंतर प्रकाशलेख घेण्याचीं साधनें निर्माण झालीं. त्यानंतर प्रकाशाचे विच्छिन्नकिरणपट पाहाण्याचीं व त्यांचे प्रकाशलेख घेण्याचीं साधनेंहि उपलब्ध झालीं व त्यामुळें जे आकाशस्थ गोल त्याच्या दृष्टिपथांत, एवढेंच नव्हे तर दूरदर्शिकेच्याहि पथांत येत नव्हते त्यांचेंहि ज्ञान त्यास विच्छिन्नकिरण-प्रकाशलेखांच्या द्वारें करून घेतां येऊं लागलें व ते गोल कसे आहेत, एवढेंच नव्हे तर ते कोणत्या द्रव्यांचे बनलेले आहेत, ते स्थिर आहेत कीं गतिमान आहेत, गतिमान असल्यास ते कोणत्या दिशेनें व किती वेगानें भ्रमण करीत आहेत, याचेंहि आकलन त्यास करतां येऊं लागलें व याप्रमाणें मनुष्य जो आतांपर्यंत एका आकुंचित जगांत वावरत होता त्याचें विश्व अत्यन्त विशाल व अमर्याद बनलें व आपण एका अत्यन्त अवाढव्य अशा विश्वसंस्थेचे घटक असून त्या मानानें आपलें ज्ञान, आपले व्यापार वगैरे किती अल्प व तुटपुंजे आहेत व या विश्वसंस्थेच्या चालकाचें सामर्थ्य किती अफाट व अमर्याद आहे हें कळून येऊन परमात्म्याचें विशालत्व व स्वतःचें लघुत्व हेंहि त्याच्या प्रत्ययास आलें. असो. आतां आपण या विश्वसंस्थेचें थोडेंसें निरीक्षण करूं.

## विश्वसंस्थेबद्दल जिज्ञासा—

आपण ज्या सूर्यास प्रतिदिवशीं उगवतांना व मावळतांना पाहतों त्याच्या सूर्यमालेचें कांहींसें ज्ञान आपणांस आहे परंतु आपणांस आकाशांत जे असंख्य तारे दृष्टीस पडतात तेही निरनिराळे सूर्यच असून त्यांच्याभोंवतींहि त्यांच्या माला असण्याचा संभव आहे. अशा तऱ्हेचे आपल्या डोळ्यांस दिसण्यासारखे सुमारें ५–६ हजार तारे आकाशांत पाहतां येतात. हेच दुर्बिणीनें पाहिले असतां पुष्कळच मोठे दिसतात, व त्यांची संख्याहि पुष्कळच मोठी दिसते. आतांपर्यंत सुमारें ४० ते ५० कोटी निरनिराळे तारे दृष्टिपथांत आले आहेत. म्हणजे दुर्बिणीनें इतके तारे स्पष्ट पहातां येतात, परंतु ज्यांचा प्रकाशलेख फक्त घेतां येतो परंतु दुर्बिणींतूनही ज्यांना प्रत्यक्ष पहातां येत नाहीं अशा ताऱ्यांची संख्या जर धरली तर एकंदर ताऱ्यांची संख्या १०० कोटींहूनही अधिक होईल. या बाबतींत पुन्हां ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, आज आपणांस या ताऱ्यांचें ज्ञान केवळ त्यांचे जे प्रकाशलेख घेतां येतात त्यांच्यामुळेच होऊं शकतें. हे प्रकाशलेख घेण्याचीं साधनें पूर्वी उपलब्ध नव्हतीं तीं आज उपलब्ध आहेत, तथापि आजच्या प्रकाशलेखन-साधनांची शक्तिहि मर्यादित आहे आणि ती जर वाढत गेली तर या ताऱ्यांची संख्याहि त्या मानानें पुष्कळच अधिक वाढेल यांत शंका नाहीं, व त्या दिशेनें प्रगतिहि होत आहे.

## तारारूपी सूर्य—

ज्योतिषशास्त्रज्ञ या ताऱ्यांचें त्यांच्या प्रकाशावरून निरनिराळ्या प्रतींमध्यें वर्गीकरण करतात. अशा तऱ्हेनें पहिल्या सहा प्रतींचे तारे दुर्बिणीशिवाय नुसत्या डोळ्यांस दिसूं शकतात व दुर्बिणीनें विसाव्या प्रतीपर्यंत पहातां येतात. अर्थात् त्यांची संख्या त्यांच्या प्रकाशाच्या उलट प्रमाणांत वाढत जाते. उदा. पहिल्या प्रतीचे सुमारें वीस तारे दिसतात तर दुसऱ्या प्रतीचे ६५, तिसऱ्या प्रतीचे २०० व चवथ्या प्रतीचे ५०० तारे आपल्या डोळ्यांस दिसूं शकतात. अशा तऱ्हेनें हें संख्येचें प्रमाण सुमारें कांहीं मर्यादेपर्यंत तिपटीनें व पुढें दुपटीनें वाढत जातें. आपणांस दिसणारा व्याध हा तारा पहिल्या प्रतीचा मानण्यांत येतो. त्या मानानें

शुक्राचें तेज त्याच्या चौपट आहे व सूर्याचें तेज २६ पट भरेल. दहा प्रतीपर्यंतच्या सर्व ताऱ्यांचा प्रकाश एकत्र केला तर तो पूर्ण चंद्राच्या सुमारें ८० व्या अंशाइतका भरेल.

निरनिराळ्या ताऱ्यांचा रंगहि निरनिराळा असतो. उदा. रोहिणी, आर्द्रा, ज्येष्ठा यांचा रंग तांबडा आहे. ब्रह्महृदय आणि तिमिंगल यांचा रंग पिवळसर आहे. व्याध आणि अभिजित (वेगा) यांचा निळा आहे, पुनर्वसूंतील प्रश्चा व ध्रुव यांचा रंग पांढरा आहे. या ताऱ्यांना निरनिराळ्या देशांत निरनिराळीं नांवें देण्यांत आलीं आहेत. त्यांपैकीं सप्तर्षि अथवा बृहदृक्ष, मृग, वगैरे तारकापुंज आपल्या ओळखीचे आहेत.

हे तारे आपल्या पृथ्वीपासून किती दूर अंतरावर आहेत याची मोजदाद करण्यांत आलेली आहे. अर्थात् ही गणना आपल्या साध्या मैल किंवा योजनांमध्यें करतां येणें शक्य नाहीं. याकरितां विशिष्ट ताऱ्यापासून येणारा प्रकाश आपल्या पृथ्वीपर्यंत पोंचण्यास जितका काल लागतो त्यावरून या ताऱ्यांच्या अंतराचा निर्देश करण्यांत येतो. अशा तऱ्हेनें पाहूं गेल्यास पृथ्वीपासून सर्वांत जवळ असणारा तारा नरतुरंग (सेंटॉर) नक्षत्रांतील पहिला, मित्र अथवा विजय, हा पृथ्वीपासून ४·३३ प्रकाशवर्षे इतका दूर आहे. हंस हा तारा ७·२ प्रकाशवर्षे अंतरावर असून व्याध हा ८·५ प्रकाशवर्षे अंतरावर आहे. म्हणजे पृथ्वीपासून व्याधाचें अंतर ५ शंकू मैल इतकें असावें. आपणांस लहानशा दिसणाऱ्या कृत्तिका ३२५ प्रकाशवर्षे अंतरावर आहेत आणि मृग नक्षत्रांतील निळे तारे ६०० प्रकाशवर्षे इतक्या अंतरावर आहेत.

या एकंदर वर्णनावरून ही विश्वसंस्था किती जगड्व्याळ आहे याची आपणांस अंधुकशी कल्पना येईल.

### सूर्याचें भ्रमण व गमन—

आपणांस आकाशांतील सर्व तारे स्थिर आहेत असें वाटतें. परंतु प्रत्यक्ष वस्तुस्थिति तशी आढळून येत नाहीं. आपली पृथ्वी व आपल्या सूर्यमालेंतील ग्रह हे सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा घालीत असतात, आणि आपला सूर्य स्थिर असेल अशी कल्पना होते. परंतु वस्तुस्थिति तशी नसून आपला सूर्यहि सभोंवतीं असणाऱ्या विश्वाच्या अवकाशांतून भ्रमण करीत आहे. आणि कांहीं ज्योतिषशास्त्रज्ञांचा असा तर्क आहे कीं, हा आपला सूर्य दुसऱ्या एखाद्या मध्यवर्ती सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा घालीत असावा आणि हा मध्यवर्ती सूर्य म्हणजे कृत्तिका नक्षत्रांतील अंबा (आल्सिओन) हा तारा असावा. परंतु या तर्कास अद्यापि पुरेशी पुष्टि मिळाली नाहीं. प्रसिद्ध ज्योतिषी हर्शेल यानें आपल्या निरीक्षणावरून असें अनुमान काढलें आहे कीं, विश्वावकाशामध्यें दोन मोठाल्या तारकांच्या मोठमोठ्या लहरी असाव्या. त्यांपैकीं एक एका वर्तुळाच्या मध्यापासून परिघाकडे शौरी या ताऱ्यापासून जात असावी, आणि दुसरी त्याच्या उलट दिशेनें गतिमान असावी. या दुसऱ्या तारकासमूहांत आपला सूर्य असून हा तारकासमूह आपल्या सूर्यासह वीणा (लायरा) नक्षत्राकडे गमन करीत असावा व त्याचा वेग दर सेकंदास सुमारें १२ मैल असावा. या गतीमुळें हजारों वर्षांनंतर आकाशांतील तारका आपणांस आज ज्या स्थितींत दिसतात त्या स्थितींत दिसणार नाहींत; तर निराळ्याच परस्परसापेक्ष स्थितींत दृष्टीस पडतील. याप्रमाणें हे दोन तारकासमूहांचे प्रवाह एकमेकांकडे वाहत असून एकमेकांत मिसळत आहेत. या गतीच्या कारणाचा अद्याप निश्चितपणें शोध लागला नाहीं.

### विच्छिन्नकिरण-प्रकाशलेखन—

या निरनिराळ्या ताऱ्यांमध्यें कोणतीं द्रव्यें असतात याचाहि शोध करण्याचा प्रयत्न झालेला आहे. अर्थात् हा शोध अर्वाचीन साधनांमध्यें पडलेली नवीन नवीन भर यामुळें शक्य झालेला आहे. अशा तऱ्हेचें अर्वाचीन साधन म्हणजे विच्छिन्नकिरणप्रकाशलेखक हें होय. या साधनानें ताऱ्याच्या प्रकाशाच्या विच्छिन्नकिरणाचा प्रकाशलेख प्रथम ड्रेपर या शास्त्रज्ञानें घेतला. त्यानंतर हजारों ताऱ्यांच्या वर्णपटांचे प्रकाशलेख घेण्यांत आले आहेत, व त्यांच्या वर्णपटलेखांतील साम्य निदर्शनास आणण्यांत आलें आहे. या वर्णलेखाचा त्यांच्या गतीशींहि संबंध असतो असें आढळून आलें आहे व जुन्या ताऱ्यांची गति नवीन ताऱ्यांपेक्षां अधिक असते असें दिसून आलें आहे, व जसजसे तारे जुने होतात तसतशी त्यांची गति वाढत जाते. तेजोमेघांची गति सर्वांत अधिक असते. यावरून तेजोमेघावस्था ही ताऱ्याच्या विकासांतील अखेरची अवस्था असावी असें अनुमान निघतें.

### तारकापुंज—

आकाशांत जसे एकाकी तारे दिसतात तसे कांहीं तारकापुंजहि आढळतात. कृत्तिका नक्षत्र हा असा एक तारकापुंजच आहे व तो आपणांस नुसत्या डोळ्यांनींहि दिसतो. त्यामध्यें तेजोमेघासारखा प्रकाशहि दृष्टीस पडतो. शौरी नक्षत्रांत अशा तऱ्हेचा एक नक्षत्रपुंज असून त्याच्या प्रकाश-लेखावरून त्यांत पन्नास हजार तारका असाव्यात असें दिसून येतें, व त्यांपैकीं पस्तीस हजारांवर तारे सूर्यापेक्षांहि तेजस्वी आहेत, व कांहीं तर एक हजार पट तेजस्वी दिसतात. अशाच तऱ्हेचा एक तारकापुंज नरतुरंग या नक्षत्रांत असून त्यामध्यें अगणित तारे आहेत. परंतु हें नक्षत्र केवळ पांचव्या प्रतीचें आहे. अशा तऱ्हेनें एकंदर शंभर तारकापुंज असून त्यांची गति भोंवऱ्यासारखी असते. अशा तऱ्हेच्या तारकापुंजांमुळेंच आपणांस आकाशाच्या मध्यभागीं

दिसणारा आकाशगंगा या नांवाचा पट्टा दृष्टीस पडतो. कॅप्टीन यानें असा शोध लावला आहे कीं, या आकाशगंगेचा आपल्या सौरमालेशीं कांहीं संबंध नसून अत्यंत दूर असलेल्या अनेक ताऱ्यांच्या समूहानें हा तेजोमय प्रवाह आपल्या आकाशांत दृश्यमान होत आहे. या पट्ट्याचा व्यास सुमारें तीन लक्ष प्रकाशवर्षांचा असावा असें सिअरिस याजकडून अनुमान काढण्यांत आलें आहे. पांक्रारे या ज्योतिषशास्त्रज्ञानें या आकाशगंगेस भ्रमणगति असून तिच्या एका भ्रमणास २५ कोटी वर्षें लागतात असें अनुमान केलें आहे.

### तेजोमेघ—

एक शतकापूर्वी तारकापुंज यांच्या पुढचीच अवस्था म्हणजे तेजोमेघ होत, असें मानण्यांत येत असे. परंतु विच्छिन्नकिरणदर्शकाच्या सहाय्यानें असें निश्चित झालें आहे कीं, तेजोमेघ हे तारकापुंज नसून वायुमय द्रव्याचे बनलेले असतात. आकाशामध्यें अशा तऱ्हेचे अनेक तेजोमेघ दृष्टीस पडतात. त्यांपैकीं सात हजार तेजोमेघांचें मापन बिगुर्दन या ज्योतिषशास्त्रज्ञानें केलें आहे व १५ हजारांपेक्षां जास्त तेजोमेघांचे प्रकाशलेख घेण्यांत आलेले असून त्यांची सूची तयार केलेली असून त्यांचे विच्छिन्नकिरणपटहि घेण्यांत आलेले आहेत. मृगनक्षत्रांतील तेजोमेघ बराच मोठा असून त्याच्या विच्छिन्नकिरणपटावरून त्यामध्यें उज्ज, सौर, नत्र, इत्यादि वायू असावे असें दिसून येतें. अशा तऱ्हेच्या तेजोमेघांची संख्या ताऱ्यांच्या खालोखाल म्हणजे सुमारें सात लक्ष असावी असें कर्टिस यानें अनुमान काढलें आहे. त्यांचीं अंतरें मोठीं असून तीं पांच लक्षांपासून एक कोटी प्रकाशवर्षांइतकीं असावींत. त्यांची गतिहि ताऱ्यांच्या गतीच्या वीस पट असते. त्यामुळें अंतराळामध्यें तीं लहान लहान द्वीपरूपी विश्वें असावीं असें वाटतें.

### कांटची तेजोमेघ-उपपत्ति—

अशा रीतीनें हे जगडव्याळ विश्व बनलें आहे. आपली सौरमाला हा त्याचा केवळ एक लहानसा अंश आहे, व तो एखाद्या अफाट अशा विषुववृत्तापासून दूर असलेल्या समशीतोष्ण प्रदेशांतील एखाद्या वाळवंटांतील ओलवणाप्रमाणें एकाकी स्थितींत आहे. असें हें विश्व निर्माण तरी कसें झालें असावें, यासंबंधीं कांहीं शास्त्रज्ञांनीं विचार केलेला आहे. त्यामध्यें तेजोमेघापासून विश्वाची उत्पत्ति झाली असावी असें मत प्रथम कांट या तत्त्वज्ञान्यानें पुढें मांडलें. त्याची उपपत्ति अशी होती कीं, सृष्टीमध्यें आपणांस जे अनेक पदार्थ अथवा वस्तू दृष्टीस पडतात त्या सर्व मुळारंभीं केवळ मूलद्रव्यांच्या स्वरूपांत अवकाशामध्यें स्थित होत्या. पुढें गुरुत्वाकर्षणशक्तीमुळें त्यांतील घनभाग केंद्राकडे जमूं लागला आणि स्वतःपेक्षां कमी घन असलेल्या भागास त्यानें आकर्षून घेतलें. त्यामुळें एक प्रकारची भ्रमणगति उत्पन्न झाली, व ही क्रिया दीर्घकाल चालून अनेक गोल तयार झाले. या गोलांच्या बाह्यभागावर वायुरूप आवरण असून ते वायू हळूहळू थंड होत होते. या उपपत्तीप्रमाणें आपल्या सूर्यमालेतील सूर्याप्रमाणें केवळ ग्रहमालाविरहित निरनिराळे गोल तयार झाले असतील असेंच अनुमान निघूं शकत होतें. परंतु मोठ्या हर्शेलनें या तेजोमेघांचा अभ्यास करून असें दाखविलें कीं, आपणांस आकाशामध्यें शीत होण्याच्या निरनिराळ्या अवस्थांतील तेजोमेघ दृष्टीस पडतात.

### लाप्लासची उपपत्ति—

यावरून त्यानें ग्रह-उपग्रहयुक्त सूर्यमाला कशा तयार होत असाव्या यासंबंधीं उपपत्ति बसविण्याचा प्रयत्न केला. अखेरीस लाप्लास या फ्रेंच ज्योतिषशास्त्रज्ञानें सूर्यमालेची तेजोमेघजनित उपपत्ति पूर्णत्वास नेली व ही उपपत्ति आज त्याच्याच नांवानें ज्ञात आहे. या उपपत्तीप्रमाणें एका अवाढव्य तेजोमेघाच्या मध्यभागीं भ्रमणगतीमुळे एक सूर्य तयार होऊन तो दृढस्वरूप पावला. अशा स्थितींत तो सूर्य आपल्यासभोंवतीं एक मोठें ज्वलंत वातावरण घेऊन आपल्या अक्षाभोंवतीं फिरत राहिला. या भ्रमणगतीमुळें त्या ज्वलंत वायुमय आवरणाचा बाह्यभाग हळूहळू थंड होऊं लागला व मध्यभाग आकुंचन पावूं लागला, यामुळें त्याच्या भ्रमणगतींत वाढ होत गेली. याचा परिणाम असा झाला कीं, या गोलकाचा ध्रुवव्यास मध्यव्यासापेक्षां आंखूड होऊन मध्यभागीं हा गोल फुगीर होऊं लागला आणि जेव्हां त्याच्या मध्यभागाची केंद्रोत्सारक शक्ति केंद्राकर्षक शक्तीशीं समान होऊं लागली तेव्हां मध्यभागाचा कांहीं भाग सुटून त्याची स्वतंत्र वलयें होऊन तीं मध्यवर्ती गोलाभोंवतीं फिरूं लागलीं. मध्यवर्ती गोलाचें भ्रमण चालूच राहिलें व याच पद्धतीनें कांहीं कालानें दुसरें एक वलय तयार होऊन मध्यगोलाच्याभोंवतीं त्याच दिशेनें पण अलग होऊन फिरूं लागलें. अशा रीतीनें एकामागून एक अनेक वलयें तयार झालीं व हीं वलयें भ्रमण करीत असतां त्यांच्या द्रव्याचें घनीभवन होऊं लागलें व त्यांमध्यें निरनिराळीं केंद्रें उत्पन्न झालीं व अखेरीस सवात मोठ्या केंद्राकडे सर्व लहान गोलक आकर्षिले जाऊन ग्रहांची पूर्वावस्था तयार झाली. या अवस्थेंत हे ग्रह लहानशा सूर्याप्रमाणें ज्वलद्वायूचे बनलेले व आपल्या अंक्षाभोंवतीं मूळ सूर्याच्या गतीच्या दिशेनेंच भ्रमण करणारे गोलक होते. या ग्रहांपासून याच पद्धतीनें उपग्रह किंवा चंद्र तयार होऊन ते त्या ग्रहांभोंवतीं फिरूं लागले. अशाच तऱ्हेनें शनीचीं वलयें व इतर

शुक्राचें तेज त्याच्या चौपट आहे व सूर्याचें तेज २६ पट भरेल. दहा प्रतीपर्यंतच्या सर्व ताऱ्यांचा प्रकाश एकत्र केला तर तो पूर्ण चंद्राच्या सुमारें ८० व्या अंशाइतका भरेल.

निरनिराळ्या ताऱ्यांचा रंगहि निरनिराळा असतो. उदा. रोहिणी, आर्द्रा, ज्येष्ठा यांचा रंग तांबडा आहे. ब्रह्महृदय आणि तिमिंगल यांचा रंग पिंवळसर आहे. व्याध आणि अभिजित (वेगा) यांचा निळा आहे, पुनर्वसूंतील प्रश्वा व ध्रुव यांचा रंग पांढरा आहे. या ताऱ्यांना निरनिराळ्या देशांत निरनिराळीं नावें देण्यांत आलीं आहेत. त्यांपैकीं सप्तर्षि अथवा बृहदृक्ष, मृग, वगैरे तारकापुंज आपल्या ओळखीचे आहेत.

हे तारे आपल्या पृथ्वीपासून किती दूर अंतरावर आहेत याची मोजदाद करण्यांत आलेली आहे. अर्थात् ही गणना आपल्या साध्या मैल किंवा योजनांमध्यें करतां येणें शक्य नाहीं. याकरितां विशिष्ट ताऱ्यापासून येणारा प्रकाश आपल्या पृथ्वीपर्यंत पोंचण्यास जितका काल लागतो त्यावरून या ताऱ्यांच्या अंतराचा निर्देश करण्यांत येतो. अशा तऱ्हेनें पाहूं गेल्यास पृथ्वीपासून सर्वांत जवळ असणारा तारा नरतुरंग (सेंटॉर) नक्षत्रांतील पहिला, मित्र अथवा विजय, हा पृथ्वीपासून ४·३३ प्रकाशवर्षें इतका दूर आहे. हंस हा तारा ७·२ प्रकाशवर्षें अंतरावर असून व्याध हा ८·५ प्रकाशवर्षें अंतरावर आहे. म्हणजे पृथ्वीपासून व्याधाचें अंतर ५ शंकू मैल इतकें असावें. आपणांस लहानशा दिसणाऱ्या कृत्तिका ३२५ प्रकाशवर्षें अंतरावर आहेत आणि मृग नक्षत्रांतील निळे तारे ६०० प्रकाशवर्षें इतक्या अंतरावर आहेत.

या एकंदर वर्णनावरून ही विश्वसंस्था किती जगडव्याळ आहे याची आपणांस अंधुकशी कल्पना येईल.

### सूर्याचें भ्रमण व गमन—

आपणांस आकाशांतील सर्व तारे स्थिर आहेत असें वाटतें. परंतु प्रत्यक्ष वस्तुस्थिति तशी आढळून येत नाहीं. आपली पृथ्वी व आपल्या सूर्यमालेंतील ग्रह हे सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा घालीत असतात, आणि आपला सूर्य स्थिर असेल अशी कल्पना होते. परंतु वस्तुस्थिति तशी नसून आपला सूर्यहि सभोंवतीं असणाऱ्या विश्वाच्या अवकाशांतून भ्रमण करीत आहे. आणि कांहीं ज्योतिषशास्त्रज्ञांचा असा तर्क आहे कीं, हा आपला सूर्य दुसऱ्या एखाद्या मध्यवर्ती सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा घालीत असावा आणि हा मध्यवर्ती सूर्य म्हणजे कृत्तिका नक्षत्रांतील अंबा (आल्सिओन) हा तारा असावा. परंतु या तर्कास अद्यापि पुरेशी पुष्टि मिळाली नाहीं. प्रसिद्ध ज्योतिषी हर्शेल यानें आपल्या निरीक्षणावरून असें अनुमान काढलें आहे कीं, विश्वावकाशामध्यें दोन मोठाल्या तारकांच्या मोठमोठ्या लहरी असाव्या. त्यांपैकीं एक एका वर्तुळाच्या मध्यापासून परिघाकडे शौरी या ताऱ्यापासून जात असावी, आणि दुसरी त्याच्या उलट दिशेनें गतिमान असावी. या दुसऱ्या तारकासमूहांत आपला सूर्य असून हा तारकासमूह आपल्या सूर्यासह वीणा (लायरा) नक्षत्राकडे गमन करीत असावा व त्याचा वेग दर सेकंदास सुमारें १२ मैल असावा. या गतीमुळें हजारों वर्षांनंतर आकाशांतील तारका आपणांस आज ज्या स्थितींत दिसतात त्या स्थितींत दिसणार नाहींत, तर निराळ्याच परस्परसापेक्ष स्थितींत दृष्टीस पडतील. याप्रमाणें हे दोन तारकासमूहांचे प्रवाह एकमेकांकडे वाहत असून एकमेकांत मिसळत आहेत. या गतीच्या कारणाचा अद्याप निश्चितपणें शोध लागला नाहीं.

### विच्छिन्नकिरण-प्रकाशलेखन—

या निरनिराळ्या ताऱ्यांमध्यें कोणतीं द्रव्यें असतात याचाहि शोध करण्याचा प्रयत्न झालेला आहे. अर्थात् हा शोध अर्वाचीन साधनांमध्यें पडलेली नवीन नवीन भर यामुळें शक्य झालेला आहे. अशा तऱ्हेचें अर्वाचीन साधन म्हणजे विच्छिन्नकिरण-प्रकाशलेखक हें होय. या साधनानें ताऱ्याच्या प्रकाशाच्या विच्छिन्नकिरणाचा प्रकाशलेख प्रथम ड्रेपर या शास्त्रज्ञानें घेतला. त्यानंतर हजारों ताऱ्यांच्या वर्णपटांचे प्रकाशलेख घेण्यांत आले आहेत, व त्यांच्या वर्णपटलेखांतील साम्य निदर्शनास आणण्यांत आलें आहे. या वर्णलेखाचा त्यांच्या गतीशींहि संबंध असतो असें आढळून आलें आहे व जुन्या ताऱ्यांची गति नवीन ताऱ्यांपेक्षां अधिक असते असें दिसून आलें आहे, व जसजसे तारे जुने होतात तसतशी त्यांची गति वाढत जाते. तेजोमेघांची गति सर्वांत अधिक असते. यावरून तेजोमेघावस्था ही ताऱ्याच्या विकासांतील अखेरची अवस्था असावी असें अनुमान निघतें.

### तारकापुंज—

आकाशांत जसे एकाकी तारे दिसतात तसे कांहीं तारकापुंजहि आढळतात. कृत्तिका नक्षत्र हा असा एक तारकापुंजच आहे व तो आपणांस नुसत्या डोळ्यांनींहि दिसतो. त्यामध्यें तेजोमेघासारखा प्रकाशहि दृष्टीस पडतो. शौरी नक्षत्रांत अशा तऱ्हेचा एक नक्षत्रपुंज असून त्याच्या प्रकाश-लेखावरून त्यांत पन्नास हजार तारका असाव्यात असें दिसून येतें, व त्यांपैकीं पस्तीस हजारांवर तारे सूर्यापेक्षांहि तेजस्वी आहेत, व कांहीं तर एक हजार पट तेजस्वी दिसतात. अशाच तऱ्हेचा एक तारकापुंज नरतुरंग या नक्षत्रांत असून त्यामध्यें अगणित तारे आहेत. परंतु हें नक्षत्र केवळ पांचव्या प्रतीचें आहे. अशा तऱ्हेनें एकंदर शंभर तारकापुंज असून त्यांची गति भोंवऱ्यासारखी असते. अशा तऱ्हेच्या तारकापुंजांमुळेंच आपणांस आकाशाच्या मध्यभागीं

दिसणारा आकाशगंगा या नांवाचा पट्टा दृष्टीस पडतो. कॅपटीन यानें असा शोध लावला आहे कीं, या आकाशगंगेचा आपल्या सौरमालेशीं कांहीं संबंध नसून अत्यंत दूर असलेल्या अनेक ताऱ्यांच्या समूहानें हा तेजोमय प्रवाह आपल्या आकाशांत दृश्यमान होत आहे. या पट्टयाचा व्यास सुमारें तीन लक्ष प्रकाश-वर्षांचा असावा असें सिअरिस याजकडून अनुमान काढण्यांत आलें आहे. पांकारे या ज्योतिषशास्त्रज्ञानें या आकाशगंगेस भ्रमणगति असून तिच्या एका भ्रमणास २५ कोटी वर्षे लागतात असें अनुमान केलें आहे.

**तेजोमेघ—**

एक शतकापूर्वी तारकापुंज यांच्या पुढचीच अवस्था म्हणजे तेजोमेघ होत, असें मानण्यांत येत असे. परंतु विच्छिन्नकिरण-दर्शकाच्या सहाय्यानें असें निश्चित झालें आहे कीं, तेजोमेघ हे तारकापुंज नसून वायुमय द्रव्याचे बनलेले असतात. आकाशा-मध्यें अशा तऱ्हेचे अनेक तेजोमेघ दृष्टीस पडतात. त्यांपैकीं सात हजार तेजोमेघांचें मापन बिगुर्देन या ज्योतिषशास्त्रज्ञानें केलें आहे व १५ हजारांपेक्षां जास्त तेजोमेघांचे प्रकाशलेख घेण्यांत आलेले असून त्यांची सूची तयार केलेली असून त्यांचे विच्छिन्न-किरणपटहि घेण्यांत आलेले आहेत. मृगनक्षत्रांतील तेजोमेघ बराच मोठा असून त्याच्या विच्छिन्नकिरणपटावरून त्यामध्यें उज्ज, सौर, नत्र, इत्यादि वायू असावे असें दिसून येतें. अशा तऱ्हेच्या तेजोमेघांची संख्या ताऱ्यांच्या खालोखाल म्हणजे सुमारें सात लक्ष असावी असें कर्टिस यानें अनुमान काढलें आहे. त्यांचीं अंतरें मोठीं असून तीं पांच लक्षांपासून एक कोटी प्रकाश-वर्षांइतकी असावींत. त्यांची गतिहि ताऱ्यांच्या गतीच्या वीस पट असते. त्यामुळें अंतराळामध्यें तीं लहान लहान द्वीपरूपी विश्वें असावीं असें वाटतें.

**कांटची तेजोमेघ-उपपत्ति—**

अशा रीतीनें हें जगडव्याळ विश्व बनलें आहे. आपली सौर-माला हा त्याचा केवळ एक लहानसा अंश आहे, व तो एखाद्या अफाट अशा विषुववृत्तापासून दूर असलेल्या समशीतोष्ण प्रदेशां-तील एखाद्या वाळवंटांतलि ओलवणाप्रमाणें एकाकी स्थितींत आहे. असें हें विश्व निर्माण तरी कसें झालें असावें, यासंबंधीं कांहीं शास्त्रज्ञांनीं विचार केलेला आहे. त्यामध्यें तेजोमेघापासून विश्वाची उत्पत्ति झाली असावी असें मत प्रथम कांट या तत्त्वज्ञान्यानें पुढें मांडलें. त्याची उपपत्ति अशी होती कीं, सृष्टीमध्यें आपणांस जे अनेक पदार्थ अथवा वस्तू दृष्टीस पडतात त्या सर्व मुळारंभीं केवळ मूलद्रव्यांच्या स्वरूपांत अवकाशामध्यें स्थित होत्या. पुढें गुरुत्वाकर्षणशक्तीमुळें त्यांतील घनभाग केंद्राकडे जमूं लागला आणि स्वतःपेक्षां कमी घन असलेल्या भागास त्यानें आकर्षून घेतलें. त्यामुळें एक प्रकारची भ्रमणगति उत्पन्न झाली, व ही क्रिया दीर्घकाल चालून अनेक गोल तयार झाले. या गोलांच्या बाह्यभागावर वायुरूप आवरण असून ते वायू हळूहळू थंड होत होते. या उपपत्तीप्रमाणें आपल्या सूर्यमालेंतील सूर्याप्रमाणें केवळ ग्रहमालाविरहित निरनिराळे गोल तयार झाले असतील असेंच अनुमान निघूं शकत होतें. परंतु मोठ्या हर्शेलनें या तेजोमेघांचा अभ्यास करून असें दाखविलें कीं, आपणांस आकाशामध्यें शीत होण्याच्या निरनिराळ्या अवस्थां-तील तेजोमेघ दृष्टीस पडतात.

**लाप्लासची उपपत्ति—**

यावरून त्यानें ग्रह-उपग्रहयुक्त सूर्यमाला कशा तयार होत असाव्या यासंबंधीं उपपत्ति बसविण्याचा प्रयत्न केला. अखेरीस लाप्लास या फ्रेंच ज्योतिषशास्त्रज्ञानें सूर्यमालेची तेजोमेघ-जनित उपपत्ति पूर्णत्वास नेली व ही उपपत्ति आज त्याच्याच नांवानें ज्ञात आहे. या उपपत्तीप्रमाणें एका अवाढव्य तेजो-मेघाच्या मध्यभागीं भ्रमणगतीमुळें एक सूर्य तयार होऊन तो द्रवस्वरूप पावला. अशा स्थितींत तो सूर्य आपल्यासभोंवतीं एक मोठें ज्वलंत वातावरण घेऊन आपल्या अक्षाभोंवतीं फिरत राहिला. या भ्रमणगतीमुळें त्या ज्वलंत वायुमय आवरणाचा बाह्यभाग हळूहळू थंड होऊं लागला व मध्यभाग आकुंचन पावूं लागला, यामुळें त्याच्या भ्रमणगतींत वाढ होत गेली. याचा परिणाम असा झाला कीं, या गोलकाचा ध्रुवव्यास मध्यव्यासापेक्षां आंखूड होऊन मध्यभागीं हा गोल फुगीर होऊं लागला आणि जेव्हां त्याच्या मध्यभागाची केंद्रोत्सारक शक्ति केंद्राकर्षक शक्तीशीं समान होऊं लागली तेव्हां मध्यभागाचा कांहीं भाग सुटून त्याचीं स्वतंत्र वलयें होऊन तीं मध्यवर्ती गोलाभोंवतीं फिरूं लागलीं. मध्यवर्ती गोलाचें भ्रमण चालूच राहिलें व याच पद्धतीनें कांहीं कालानें दुसरें एक वलय तयार होऊन मध्यगोलाच्या-भोंवतीं त्याच दिशेनें पण अलग होऊन फिरूं लागलें. अशा रीतीनें एकामागून एक अनेक वलयें तयार झालीं व हीं वलयें भ्रमण करीत असतां त्यांच्या द्रव्याचें घनीभवन होऊं लागलें. व त्यांमध्यें निरनिराळीं केंद्रें उत्पन्न झालीं व अखेरीस सर्वांत मोठ्या केंद्राकडे सर्व लहान गोलक आकर्षिले जाऊन ग्रहांची पूर्वावस्था तयार झाली. या अवस्थेंत हे ग्रह लहानशा सूर्याप्रमाणें ज्वलद्वायूचे बनलेले व आपल्या आंसाभोंवतीं मूळ सूर्याच्या गतीच्या दिशेनेंच भ्रमण करणारे गोलक होते. या ग्रहांपासून याच पद्धतीनें उपग्रह किंवा चंद्र तयार होऊन ते त्या ग्रहां भोंवतीं फिरूं लागले. अशाच तऱ्हेनें शनीचीं वलयें व द

ग्रहांचे उपग्रह तयार झाले. या उपपत्तीप्रमाणें सूर्यापासून सर्वांत दूर असणारा अथवा अगदीं बाहेरचा ग्रह जो वरुण ( नेपच्यून ) किंवा आजच्या माहितीप्रमाणें प्लूटो हा प्रथम तयार झाला असला पाहिजे व त्यानंतर क्रमानें प्रथम प्रजापति अथवा युरेनस व नंतर शनि, गुरु, मंगळ, पृथ्वी, शुक्र व बुध हे ग्रह व त्यांचे चंद्र तयार झाले असले पाहिजेत.

## पृथ्वीच्या गोलाचें मापन—

आपल्या पृथ्वीचा व्यास सुमारें आठ हजार मैल आहे. पृथ्वी आपल्या अक्षाभोंवतीं २४ तासांत एक प्रदक्षिणा करते. तिचा उत्तर-दक्षिण व्यास हा भूमध्य व्यासापेक्षां २४-२७ मैलांनीं लहान आहे. तिच्या प्रदक्षिणेमुळें दिवस आणि रात्र होते आणि ती सूर्याभोंवतीं एका दीर्घवर्तुळाकृति मार्गानें भ्रमण करीत असल्या-मुळें वर्ष व त्यांतील ऋतू उत्पन्न होतात. सूर्यापासून तिचें अंतर ९ कोटी ३० लक्ष मैल आहे. यावरून सूर्याचा व्यास ८६५ हजार मैल आहे ही गोष्ट स्पष्ट होते. पृथ्वीसारखेंच सूर्या-भोंवतीं भ्रमण करणारे बुध, शुक्र, मंगळ, गुरु, शनि, प्रजापति ( युरेनस ), वरुण ( नेपच्यून ) व अलीकडे माहीत झालेला प्लूटो हे ग्रह फिरत असतात व आपल्या पृथ्वीभोंवतीं जसा एक चंद्र फिरत आहे त्याप्रमाणें इतर ग्रहांभोंवतींहि कांहीं चंद्र फिरत असून त्यांपैकीं बऱ्याच चंद्रांची माहिती आतां मिळाली आहे. शनीभोंवतींचें वलय हें अशाच चंद्रांचें बनलेलें आहे ही गोष्ट आतां ज्योतिषशास्त्रज्ञांनीं स्पष्ट केली आहे. यांखेरीज कांहीं धूमकेतू कांहीं वर्षांच्या अवधीनें आपल्या सूर्यमालेंत भ्रमण करतांना आढळून येतात व त्यांपैकीं हॅलेचा धूमकेतु याचा प्रदक्षिणा-काल ७५ वर्षें निश्चित झाला आहे. असाच एक धूमकेतु नुकताच सूर्याला प्रदक्षिणा करून गेल्याचें आपल्या दृष्टोत्पत्तीस आलेंच आहे. मोठमोठे धूमकेतू नक्की केव्हां दृष्टीस पडतील तें अद्यापि ज्योतिषशास्त्रज्ञांस निश्चितपणें सांगतां येत नाहीं परंतु दुर्बिणींतून दृष्टीस पडण्यासारखे कांहीं धूमकेतू दरवर्षी येऊन जातात. यांखेरीज उल्का नांवाचे तुटणारे तारे मधून मधून आपल्या दृष्टीस पडतात. त्यांपैकीं कांहीं आपल्या पृथ्वी-पर्यंत येऊन पोंचतात. असा एक तारा क्रीट बेटांत ख्रि. पू. १४७८ मध्यें पडल्याचें तेथील बखरींत नमूद आहे. मक्केमधील काबांतील पवित्र कृष्ण पाषाण हाहि एक उल्कापाषाणच होय. कधीं कधीं अशा उल्कांचा मोठा पाऊस पडतो.

याप्रमाणें ही विश्वसंस्था अंतराळामध्यें अनेक तारारूपी सूर्य, तेजोमेघ, वगैरेंची बनलेली असून आपल्या सूर्यमालेची उत्पत्ति अंतराळांत असणाऱ्या व एका विरल अशा एका वायुरूप तेजोमेघापासून होऊन त्याच्याच अंगभूत वायुमय द्रव्यापासून आपल्याला प्रकाश व उष्णता देणारा सूर्य प्रथम तयार झाला व त्यानंतर त्यासभोंवतीं फिरणारे ग्रह व उपग्रह तयार झाले.

## भूगोलावरील आवरणें—

यानंतर आपण ज्या गोलावर प्रत्यक्ष राहतों त्या पृथ्वीचा थोडासा अभ्यास करूं. या अभ्यासास भूशास्त्र किंवा भूस्तरशास्त्र असें म्हणतात. आपली पृथ्वी ही तीन निरनिराळ्या विभागांची मिळून बनलेली आहे. पहिला विभाग पृथ्वीसभोंवतींचें वायूचें आवरण हा होय. यास वातावरण असें म्हणतात. यानंतर दुसरा विभाग म्हणजे वातावरणापेक्षां थोडें लहान असें जलावरण. याच्या योगानें महासागर व समुद्र बनलेले आहेत व ते पृथ्वीच्या पृष्ठभागाचा सुमारें ¾ भाग व्यापून राहिले आहेत. यानंतरचा तिसरा विभाग हा एक प्रस्तरगोलक किंवा दगडाचा गोळा आहे. याच्यासभोंवतीं एक घन कवच असून त्याच्या आंत अंतर्गर्भ आहे. या अंतर्गर्भाचें ज्ञान अजून शास्त्रज्ञांस निश्चितपणें झालें नाहीं.

## वातावरण—

वातावरणाची उंची कांहीं ठिकाणीं सुमारें २० मैलांची आहे. अंतरिक्षांत असलेल्या बाष्पामुळें हवेमध्यें ढग, बर्फ व हिम तयार होतें. याच्या योगानें अंशतः अंधकार तयार होऊन त्यामुळें सूर्याचे किरण आंत येण्यास कांहींसा अडथळा होतो व त्यामुळें ते किरण मेघांच्या बाह्य पृष्ठभागावर केंद्रित होतात; यामुळें जी हवा तप्त होते ती वर जाऊं लागते आणि शीत होते ती पतन पावूं लागते. अशा तऱ्हेची हवा भिन्न भिन्न हवेच्या दाबाच्या प्रदेशांत आली म्हणजे वाऱ्याचे प्रवाह सुरू होतात, व मेघांमध्यें आर्द्रांश बराच वाढला म्हणजे पाऊस पडतो. वर्षा व हिम हीं ह्या मेघांची अशी अवस्था दर्शवितात कीं, ज्या अवस्थे-मध्यें त्यास हवेमध्यें तरंगत राहणें अशक्य होतें. पावसाचे थेंब पडण्यापूर्वी ते पुढील अवस्थांतून जातात : (१) वाऱ्याच्या प्रवाहांमुळें बारीक बारीक कण एकत्र येतात. (२) रात्रीं किंवा छायेमध्यें उष्णमानांत फरक पडल्यामुळें हे केंद्रित कण खालीं येऊं लागतात. (३) या कणांवर धन किंवा ऋण विद्युद्भाराचा संचय असल्यामुळें विरुद्ध प्रकारची विद्युत् त्यांस आकर्षून घेते. (४) त्यामुळें वातावरणांत क्षोभ उत्पन्न होऊन मेघांचा गडगडाट होतो, आणि हे कण एकत्र खेंचले जातात. (५) आकाशांत असलेले रजःकण अथवा धुळीचे कण या आर्द्र कणांस ओढून घेऊन पाण्याचे बिंदू तयार होतात, असें विल्सन या शास्त्रज्ञाचें मत आहे.

**प्रस्तर आवरण—**

क्षार व शुद्ध जलमय आवरणाच्या खालीं आपणांस प्रस्तरमय आवरण लागतें. त्याच्यावर कांहीं कवचासारखा भाग असून आंत गाभा असतो. या कवचाच्या अंतर्भागांत भयंकर उष्णता असून त्यापासून ज्वालामुखी तयार होतात. त्यांचा स्फोट झाला म्हणजे त्यांतून अतिशय उष्ण वाफ व शिलारस अथवा लाव्हा बाहेर पडतो. ठिकठिकाणीं आढळणारे उष्ण पाण्याचे झरे हेहि यामुळेंच तयार होतात. तसेंच खाणींच्या मोठाल्या बोगद्यांच्या किंवा भूमीच्या अंतर्भागांत जी आपणांस उष्णता आढळते तिचें कारणहि हेंच होय. पृथ्वीचें जें प्रस्तरमय कवच असतें तें अनेक निरनिराळ्या प्रकारच्या प्रस्तरांचें बनलेलें असतें त्यांचाहि अलीकडे बराच अभ्यास झालेला आहे.

**भूप्रस्तरांचें वर्गीकरण—**

पृथ्वीच्या कवचांतील खडकांचे पुढें दिल्याप्रमाणें प्रथम दोन मोठाले वर्ग करण्यांत येतात: (१) मूळ प्राकृतिक खडक. हे बहुतेक लाव्हाचे बनलेले असून त्यांस अग्निजन्य किंवा स्फोटक खडक म्हणतात. यांच्या अंतर्भागांत कोणतीहि विशिष्ट रचना आढळून येत नाहीं, व त्यामुळें ते घनरूप अस्तरयुक्त असे असून त्यांत पदर नसतात. हे बहुतेक सर्व खडकांच्या तळाशीं असतात. (२) गाळाचे अथवा प्रस्तरीभूत खडक. यांचे पुढें दिल्याप्रमाणें तीन पोटवर्ग पाडण्यांत येतात: (अ) शकलयुक्त खडक. हे वरच्या खडकापासून तुकडे होऊन बनलेले असतात. (आ) सांच्याचे खडक अथवा रासायनिक क्रियेनें पाण्याच्या तळाशीं बनलेले खडक. (इ) प्राणी व वनस्पती यांच्या अवशेषापासून बनलेले खडक. यांमध्यें विशेषतः पोंवळ्यांचे खडक, माशांच्या शिंपल्यांचे बनलेले खडक, दगडी कोळसा अथवा प्रस्तरीभूत वनस्पतींचे बनलेले खडक हे येतात. शेवटचे खडक हे वनस्पती व प्राणी हे कुजल्यामुळें उत्पन्न होतात. या शेवटच्या खडकांस अग्निजन्य खडकांच्या विरुद्ध जलजन्य खडक असें म्हणतात. वाळूवर वाऱ्याच्या प्रवाहाचा परिणाम होऊन जे खडक बनतात त्यांस एओलियन खडक असें म्हणतात. याच खडकांत बहुतेक भूस्तरशास्त्राचा इतिहास भरलेला आहे. (३) रूपांतरित खडक. यामध्यें अग्निजन्य व जलजन्य खडकांचें रूपांतर होऊन बनलेले खडक येतात. यांस संपुटशिला (सिस्ट) असें म्हणतात.

**पृथ्वीच्या कवचांतील फेरफार—**

पृथ्वीच्या कवचामध्यें हालचाल झाली असतां भूकंप होतात. तसेंच मधून मधून पृथ्वीचे कांहीं भाग वर येतात किंवा कांहीं खालीं खचतात. यामुळें कांहीं ठिकाणीं नवीं बेटें तयार होतात व कांहीं ठिकाणीं जमीन बुडून जाते. पाण्यामुळें जमिनीचा



पृष्ठभाग झिजण्याची क्रिया अव्याहत चालू असते. त्यामुळें मोठमोठाल्या दऱ्या, नद्यांचीं खोरीं नदीमुखप्रदेश व बेटें, वगैरे तयार होत असतात.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें लाप्लासच्या उपपत्तीप्रमाणें पृथ्वी ही एका तेजोमेघापासून भ्रमणगतीबरोबर सूर्यमालेपासून उत्पन्न झालेली आहे. या पृथ्वीवर किंवा विश्वामध्यें कोणतीहि वस्तु स्थिर असत नाहीं. प्रत्येक वस्तूमध्यें बदल होत असतो व हा बदल होण्याची क्रिया सतत चालू असते. पृथ्वीची भ्रमणगति हळूहळू कमी होत चालली आहे, त्यामुळें दिनमान हळूहळू वाढत आहे. पृथ्वी उत्पन्न झाली तेव्हां बरीच उष्ण असून ती हळूहळू थंड होत चालली आहे. पृथ्वीचा उत्तर-दक्षिण ध्रुवांतील व्यास ७,९०० मैल असून विषुववृत्तावरील व्यास ७,९२७ मैल आहे. पृथ्वीवरील सर्वांत उंच पर्वत एव्हरेस्ट हा २९,१४१ फूट उंच आहे. तसेंच जपानजवळ पॅसिफिक महासागराची जास्तींत जास्त खोली ३२,६४४ फूट आहे. या फक्त बारा मैल रुंदीच्या पट्टयांतीलच माहिती आपणांस मिळूं शकते. एकंदर पृथ्वीच्या आकाराच्या मानानें हा फारच अल्प अंश आहे.

**पृथ्वीचें स्थित्यंतर—**

शास्त्रज्ञांच्या मतें पृथ्वीचें आयुष्य सुमारें १५० कोटींहून अधिक आहे. पृथ्वीवर जीवाची उत्पत्ति होऊन शंभर कोटींहून अधिक वर्षे झालीं असावीं. त्या वेळीं सूर्याची उष्णता आजच्यापेक्षां बरीच अधिक असून दिनमान व रात्रिमान लहान होतें. भरती—ओहोटीचें प्रमाण फार मोठें असून एकंदर उष्णतेचें प्रमाणहि फार तीव्र होतें. त्या वेळीं वादळें व भूकंप वरचेवर व फार मोठ्या प्रमाणावर होत. हळूहळू पृथ्वीचें कवच दृढ होत गेलें व त्यासभोंवतीं बाष्पयुक्त जलाचें आवरण बनलें. या बाष्पाचें पाणी होऊन त्याच्या योगानें महासागर व समुद्र बनले. तथापि एक वायुमय आवरण पृथ्वीच्याभोंवतीं कायम राहिलें. त्यामध्यें प्राण, नत्र, कर्बद्विप्राणिद, बाष्प, वगैरे वायु आढळतात. यांपासूनच सर्व जडद्रव्यें व जीव उत्पन्न झाले.

**प्राण्यांचें उत्पत्तिस्थान—**

पृथ्वीच्या पृष्ठभागावरील उथळ समुद्र हेंच सर्व जीवमात्राचें उत्पत्तिस्थान होय. वर सांगितलेल्या प्राण, नत्र, कर्बाम्लवायु व बाष्प यांतच कांहीं थोड्याफार प्रमाणांत इतर द्रव्यें मिळून जडद्रव्यापासून निराळें असें द्रव्य तयार झालें. या द्रव्यामध्यें दोन गुण होते: १ स्वयंचलन आणि २ चैतन्य. हें द्रव्य सजीव असून त्यास जीवनरस किंवा आद्य जीवद्रव्य असें म्हणतात. हक्स्ले यानें या द्रव्यास जीवाचें भौतिक मूळ किंवा मूळ जीवना-

धार असें म्हटलें आहे. या वेळीं जीव हा स्वभावतःच अत्यंत अस्थिर होता. त्या मानानें जडद्रव्यें स्थिर होतीं. या जीवामध्यें सतत चालू असणाऱ्या रासायनिक क्रियांस सभोंवतालच्या वातावरणांतून कांहीं सूक्ष्म कण वरचेवर शोषून घ्यावे लागत व कांहीं बाहेर टाकून द्यावे लागत. याच क्रियेचें रूपांतर पुढें पचन व पुनर्जनन या क्रियांमध्यें होऊन त्यांतूनच पुढें लिंगोत्पत्ति झाली. या अस्थिर जीवास प्रतिकूल परिस्थितीपासून दूर राहणें आवश्यक असल्यामुळें त्यामध्यें वरचेवर क्षोभ किंवा प्रेर्यत्व उत्पन्न होऊं लागलें, आणि त्यामुळें कांहीं वस्तूंबद्दल आकर्षण व कांहींबद्दल अपकर्षण उत्पन्न होऊन त्यांतूनच पुढें हळूहळू मेंदूची, बुद्धीची व प्राणाची उत्पत्ति झाली. अत्यंत प्राथमिक अवस्थेंतील जीव इतके नाशवंत होते कीं, त्यांचे अवशेष कोणत्याहि खडकामध्यें आढळून येत नाहींत. कारण खडकांत आढळणाऱ्या अवशेषांवरूनच आपणांस प्राण्यांचा इतिहास कळतो. असे प्रस्तर अवशेष राहण्याइतकें काठिण्य कांहीं कालानें प्राण्यांमध्यें उत्पन्न झालें. हेकेल यानें आद्य जीवनरसापासून मनुष्याची उत्पत्ति होण्याच्यामधील एकंदर २६ अवस्था नमूद केल्या आहेत. त्यांमध्यें एकपेशीमय जीवापासून अनेकपेशीमय जीव उत्पन्न होतां होतां जल-स्थल-चर प्राणी, सरीसृप, सस्तनप्राणी, वगैरे विकास होत होत मनुष्यप्राणी कसा जन्मास आला तें दिलें आहे. या अवस्था अनुक्रमानें पुढें दिल्या आहेत :—

**प्राणिविकासांतील अवस्था—**

१. अगदीं प्राथमिक साधा एकपेशीमय प्राणी. यास जीवकेंद्र नव्हतें. उदाहरणार्थ मोनेरा.

२. जीवकेंद्रयुक्त एकपेशीमय प्राणी. उदाहरणार्थ अमीबा. मनुष्याच्या डिंब अथवा आदिगर्भामध्यें व यामध्यें फारसा फरक नसतो.

३. एकपेशीमय जीवसंघ अथवा डिंबसमुच्चय म्हणजे सिन अमीबियम अथवा अमीबासंघ.

४. या एकपेशीमय जीवसंघाचें रूपांतर एका पोकळ द्रवयुक्त गोलकामध्यें होतें. याच्या बाजू अथवा आवरण एकाकी पेशींच्या थरांचें बनलेलें असतें. या गोलकांपासून रोमाकृति प्रसर निघतात व ते गतिक्षम असतात. गोड्या पाण्यांतील गोलक जाति (व्होलव्हॉक्स) अथवा आवर्त हे या प्रकाराचीं उदाहरणें होत.

५. यानंतर हे गोलकजाति जीव स्वतःच्या शरीरांतच विवर्तन पावून एका जोडभिंत- किंवा बाजू- असलेल्या पेल्याप्रमाणें बनतात. यांस उदरी (गॅस्ट्रूला) म्हणतात व ते अळीसारखे असतात.

६. यानंतर यांचे चपटकृमि होतात. ते इतस्ततः मोकळेपणानें तरंगत फिरतात. यांचा आकार एका चापट पिशवीप्रमाणें असून त्यांस एकच तोंड असतें. रोमश संवर्तकृमि (कॉन्व्होल्यूटा) हे या जातीचीं उदाहरणें होत. हे स्वतंत्र रीतीनें पोहत भ्रमण करीत असतात.

७. यानंतरच्या अवस्थेंतील जीवांना पश्चिमद्वार अथवा गुदद्वार तयार होतें. त्याप्रमाणेंच अंत्र व शरीरावरण यांचेमध्यें पोकळी तयार होते.

८. यानंतरच्या अवस्थेंत एखाददुसरा रक्तगोलक अथवा रक्तनाडी (ब्लड व्हेसल) तयार होते. तसेंच बहिर्द्वारगात्रांची एक जोडी कांहीं जातींत तयार होते.

९. यानंतर जरा उच्च वर्गांतील कृमि तयार होतात. यांच्यामध्यें अन्नमार्गाचा पुढील भाग किंवा पचनमार्ग यांचें रूपांतर श्वसनेंद्रियांत होतें. यामुळें त्यांस आंत्रश्वासी (गट ब्रीदर्स) म्हणतात. यामध्येंच पृष्ठवंशाचें बीज असतें.

१०. यानंतरची अवस्था एका दोहों बाजूंनीं निमुळत्या माशामध्यें आढळते. यास उभयतस्तीक्ष्ण (अँफी ऑक्सस) असें म्हणतात. या माशाला अस्थींचा कणा असतो. हा मासा म्हणजे अपृष्ठवंश प्राणी व सपृष्ठवंश प्राणी यांचेमधील दुव्यासारखा आहे. याला कवटी नसते, मणके नसतात, बरगड्या नसतात व गात्रें नसतात. परंतु याच्या शरीरावर मध्यमत्वचा (मेसोडर्म) असते. यापासून पुढें अस्थी बनतात आणि याच्या शरीराचे स्पष्ट विभाग दिसतात.

११. यानंतर वर्तुलमुखी प्राणी येतात. या जातीमध्यें वाम व मत्स्यजलुका (हॅगफिश) येतात. यांस पृष्ठवंश असून शीर्ष असतें. अशा जातींच्या प्राण्यांपैकीं ही सर्वांत नीचतम अवस्थेंतील जात होय. यांस अंत्र अथवा शारीरिक वलयें नसतात. जबडा किंवा गात्रयुग्म नसतें. परंतु अगदीं निकृष्ट अवस्थेंतील शिरोस्थि अथवा कपाल (कवटी-क्रेनियम) असतें. हे प्राणी चिखलांत राहतात किंवा जळूसारखे दुसऱ्या माशांच्या शरीरावर राहून उपजीविका करतात.

१२. यानंतरच्या अवस्थेंत खरा मत्स्य अथवा मासा उत्पन्न होतो. प्रथमावस्थेंत शार्क किंवा रे मासे हे कूर्चमत्स्य प्राणी उत्पन्न झाले. हे सिलुरियन युगापर्यंत अस्तित्वांत होते. यांचे जबडे विशिष्ट आकाराचे असत, यांस पक्षधारी वलयें अथवा कल्ले असणाऱ्या कमानीसारखे अवयव असत. यामुळें यांस पाण्यांतच श्वासोच्छ्वास करतां येत असे. तसेंच चार मत्स्यपक्ष (फिन्स) अथवा गात्रें असत.

१३. यानंतर जरा विलक्षण गात्ररचना असलेले संकरजद्विपक्ष-गात्री ( क्रासोप्टेरीगी ) मत्स्य उत्पन्न झाले. यांच्या आज फक्त दोन जाती अस्तित्वांत असून बाकी सर्व नष्ट झाल्या आहेत.

१४. यानंतर सफुप्फुस ( डिप्नॉइड ) मासे येतात. यांच्या कांहीं जाती गाळांत राहणाऱ्या माशांमध्यें सध्यां दृष्टीस पडतात. यांच्या शरीरामध्यें पूर्वी असलेल्या कल्ल्यांचें अथवा वायुकोशाचें रूपांतर फुप्फुसामध्यें झालेलें आढळतें. यामुळें या जातींचे मासे पाण्याशिवाय पुष्कळ वेळ जिवंत राहूं शकतात. हे प्राणी म्हणजे मत्स्य व जलस्थलचर यांमधील दुवा होत.

१५. यानंतर सर्वांत प्राचीन जलस्थलचर प्राणी हे येतात. वर सांगितलेल्या सफुप्फुस मत्स्यांच्या शरीरांतील मत्स्यपक्षांच्या जोडीचें यांच्या शरीरांत चार पंजांच्या आकाराच्या गात्रांमध्यें रूपांतर झालेलें आढळतें. यांपैकीं कांहीं अधिक प्राथमिक अवस्थे-तील प्राण्यांत कल्ले आणि फुप्फुसें हीं दोन्हीहि आढळतात व थोड्या विकास पावलेल्या जातींत फक्त फुप्फुसें आढळतात.

१६. यानंतरच्या अवस्थेंतील प्राण्यांच्या फक्त दोन जाती अस्तित्वांत असून बाकी सर्व नष्ट झाल्या आहेत. या अवस्थेंतील प्राणी म्हणजे आद्य सरपटणारे प्राणी अथवा उरगांचे पूर्वज होत. हे उरोगामी जातीचे प्राथमिक अवस्थेंतील प्राणी असून यांच्या शरीरांतील कल्ले पूर्णपणें नष्ट झालेले असून केवळ कल्ल्यांच्या भेगा अथवा छिद्रें गर्भावस्थेमध्यें जननपूर्व अवस्थेंत आढळून येतात.

१७. यानंतर सस्तनसदृश उरोगामी प्राण्यांचा वर्ग येतो. यांस सस्तन जातीय प्राणी ( सौरो मॅमॅलिया ) म्हणतात. हे प्राणी आज नष्ट झाले असून त्यांचे फक्त प्रास्तर अवशेष खडकांतून आढळतात.

१८. यानंतर सस्तन प्राण्यांचे पूर्वज अथवा पूर्वसस्तन प्राणी ( प्रोममॅलिया ) यांचा वर्ग येतो. या प्राथमिक अवस्थेंतील अनेक जातींचे सस्तन प्राणी आढळतात. हे आपल्या अपत्यांचें संगोपन स्तनपान देऊन करतात. परंतु यांच्यामध्यें उरोगामी प्राण्यांचे बरेच विशेष आढळून येतात. या जातींपैकीं बदकचोंची ( डकबिल ) प्राणी व कणा असलेला पिपीलिकाभक्षक हे या जातीचे हयात प्राणी आहेत. हे दोन्हीहि प्राणी उरोगामी प्राण्यांसारखीं अंडीं घालतात. यांस स्तन नसतात व त्यांचें दूध छिद्रांतून पोटावर गळतें व तेथून पिलें तें कसें तरी चाटून खातात.

१९. सकोश प्राणी अथवा सोदरकोश प्राणी ( मार्सुपि-अल ) हे यानंतरच्या अवस्थेंतील प्राणी होत. यांच्या पिलांस वार नसते. त्यामुळें त्यांचें पोषण नाळेंतून होत नाहीं. यांचे स्तन पोटावर एक पिशवी असते तीमध्यें असतात आणि जन्म पावल्या-नंतर थोड्या वेळानें पिलें या पिशवींत ठेवण्यांत येतात. कांगारू व ओपोसम हे या जातीपैकीं प्रमुख हयात प्राणी आहेत.

२०. यानंतर जरायुज अथवा सस्तन वारयुक्त प्राणी यांचा वर्ग येतो. या प्राण्यांतील प्राथमिक अवस्थेंतील प्राणी म्हणजे लेमुर प्राणी होत. हे म्हणजे वानर, माकडें व मनुष्यप्राणी यांचे पूर्वज होत.

२१. यांपैकीं लेमुर हे निकृष्ट जातीचे वानर असून ते लहान खारीसारखे असत. यांस शेपट्या असत. पण त्यांचा हस्त व्यापारासारखा उपयोग करतां येत नसे. यांच्या गात्राचें रूपांतर हातांच्या पंजामध्यें झालेलें असे व पाय झाडांवर चढणाऱ्या अथवा राहणाऱ्या प्राण्यांच्या पायांसारखे असत व त्यांस पुढें नखें वाढलेलीं असत. या जातींचे कांहीं प्राणी अद्यापि मादागास्कर बेटांत हयात असलेले आढळतात.

२२. या वर्गामध्यें आढळणाऱ्या प्राण्यांस ( सिमी ) छातीवर स्तन असतात. त्यांचीं नखें चपटीं व शेपूट लांब असते. तिचा धरण्याच्या कामीं उपयोग करतां येतो. या वर्गांतील प्राणी दक्षिण अमेरिकेमध्यें दृष्टीस पडतात.

२३. अधोनासाछिद्र मर्कट या वर्गांत मोडतात. यांची शेपटी लांब असून, यांच्या शरीरावर दाट लव असते. यांच्या नाकपुड्या पुढें आलेल्या असून खालच्या बाजूस झुकलेल्या असतात.

२४. यानंतर मानवसदृश मर्कट आढळतात. हे शरीरानें मोठे असून यांस शेपटी नसते. यांच्या अंगावर फार लव नसते. हे अर्धवट उभे राहून चालतात. सुमात्रा व बोर्निओ या बेटांत आढळणारा ओरांग उटांग, आफ्रिकेमध्यें विषुवप्रदेशांत आढळणारा गोरिला व चिंपांझी, आशिया खंडांत आढळणार गिबन हे या वर्गांतील प्राणी होत.

२५. यानंतरचे वानरसदृश मानव यांचे अवशेष फक्त अश्मी-भूत थरांत अथवा प्रास्तरावशेषांत आढळतात व हे अवशेष जावा बेटांतील ( प्लिओसीन—नवनूतन ) थरांत आढळून येतात.

२६. यानंतर मनुष्याचा अवतार होतो. हा प्रथम हिमयुगा-मध्यें ( प्लीस्टोसीन—नूतनतम काळांत ) प्रादुर्भूत होतो. याची प्रथम उत्पत्ति बहुधा कोठें तरी मध्य आशियामध्यें झाली असावी.

### प्राण्यांचें जीवन आप—

जीवाची उत्पत्ति पाण्यामध्यें झाली. अत्यंत उच्च प्रतीच्या वनस्पतीससुद्धां आपलें अन्न पाण्यांत विरलेल्या जमिनीपासूनच घ्यावें लागतें, व सपुष्प वनस्पतींच्या खालच्या दर्जाच्या तीनहि

प्रकारच्या वनस्पतींचे उदा०, शेवाळ अथवा नेचे यांचें पुनरुत्पादन पाण्यांतच होतें. कोणत्याहि प्राण्याला आपलें अन्न पाण्याशिवाय पचवितां येत नाहीं. हवेंतील प्राणवायु प्राण्याच्या फुप्फुसामध्यें पाण्यांत विद्रुत व्हावा लागतो व सर्वांत उच्च प्रतीच्या प्राण्याचेंहि अन्न पचनापूर्वी द्रवरूपांत रूपांतर पावावें लागतें. याकरितांच आपल्या भाषेमध्यें पाण्यास जीवन असें म्हटलें आहे. व आपल्या वाङ्मयांत आप हें सृष्टीचें आद्यतत्त्व मानून त्यापासून सर्व विश्वाची उत्पत्ति झाली असें मानण्यांत आलें आहे, ही गोष्ट पूर्वी सांगितलीच आहे. भूजलचर प्राण्यामध्यें प्रथम आपणांस पाण्यांतील प्राण्यापेक्षां भिन्न आकार दृष्टीस पडतो. यानंतर आपणांस पोहणारे व चालणारे प्राणी आणि उडणारे सर्प आढळतात. त्यानंतर प्राण्याचें रूपांतर पक्ष्यांमध्यें व पोहणाऱ्या सस्तन प्राण्यांमध्यें झालेलें दृष्टीस पडतें. अशा तऱ्हेचे प्राणी म्हटले म्हणजे सिंह, वानर, वटवाघूळ व मनुष्य हे होत.

### आदिमानव—

सुमारें पांच लक्ष वर्षांपूर्वी मनुष्यप्राणी प्रथम जावा बेटामध्यें भटकत असलेला आढळतो. या जावामानवापेक्षांहि एक प्राचीन मानव पेकिन येथें आढळून आल्याचें सांगतात. याचें स्वरूप वानरासारखेंच होतें. यानंतर अडीच लाख वर्षांनीं वानरापेक्षां बऱ्याच निराळ्या दिसणाऱ्या एका प्राण्याची जात आपणांस युरोपमध्यें भटकत असलेली आढळते. यास हायडेलबर्ग असें नांव देण्यांत आलें आहे. हा प्राणी कदाचित् आशियांतहि असावा. हा काल एका हिमकालानंतरचा असावा. सुमारें पाऊण लाख वर्षांपूर्वी पिल्टडाउन नांवाच्या मानवांची जात इंग्लंड व युरोपच्या इतर भागांत असावी. सुमारें २५ हजार ते ५० हजार वर्षांच्या दरम्यान व हिमकाल संपल्यानंतर नियांडरथाल नांवाची मनुष्याची एक जात युरोप व आशियाच्या कांहीं भागांत भ्रमण करीत असावी असें दिसतें. यानंतर होमोसेपाइन अथवा विचार करणारा मनुष्य उत्पन्न झाला. अशा मनुष्याची उत्पत्ति प्रथम ग्रिमाल्डी निग्रॉइड लोकांमध्यें क्रोमॅग्नन, ग्रेनेल आणि इतर जातींमध्यें झाली. या सर्व गोष्टींचा पुरावा आपणांस प्रास्तर अवशेषांत आढळून येतो. या सर्व प्रकारांचें आपण थोडें तपशीलवार अवलोकन करूं.

### प्राण्यांचे प्रास्तर अवशेप—

आपणांला या विश्वांतील जीवासंबंधींचे मानवाची स्मृति आणि परंपरा यांच्यापूर्वीच्या काळचें ज्ञान केवळ भूम्यंतर्गत प्रस्तरांचे जे निरनिराळे थर आहेत त्यांमध्यें पूर्वीच्या जिवंत प्राण्यांचे जे प्रास्तर अवशेष अथवा अश्मीभूत शेष आढळतात त्यांवरूनच बहुतेक करून घेतां येतें. चुनखडींचे दगड, वाळूचे दगड, पाटीचे दगड यांमध्यें निरनिराळ्या प्राण्यांच्या अस्थी व कवचें, तसेंच झाडांचे तंतू, खोडें व फळें, प्राण्यांच्या पावलांच्या खुणा, वगैरे आढळून येतात व त्याच्याशेजारींच समुद्रांच्या लाटांच्या खुणा व पावसांच्या थेंबांच्या खुणाहि दृष्टीस पडतात. अशा तऱ्हेनें या खडकांतील अवशेषांची परीक्षा करूनच आपणांस पृथ्वीवरील प्राण्यांचा इतिहास समजावून घ्यावा लागतो. आज ही गोष्ट सर्वज्ञात झाली आहे. आतां पृथ्वीच्या पृष्ठभागाखालीं आढळणारे गाळाच्या खडकांचे थर हे एकावर एक सारखे पसरलेले आढळत नाहींत. तर मधून मधून कांहीं ठिकाणीं ते खचलेले असतात तर कांहीं ठिकाणीं दबलेले असतात. उलट कांहीं ठिकाणीं वर उचललेले असून त्यांच्या आकारांत फरक झालेला असतो, व कांहीं एकमेकांत मिसळलेले आढळतात. यामुळें अनेक शास्त्रज्ञांस आपलें सर्व आयुष्य खर्च करून या थरांतील प्राण्यवशेषांचें ज्ञान मिळवावें लागलें आहे. अशा तऱ्हेनें आपणांस ज्ञात होणारा काल १६० कोटी वर्षांवर पसरलेला आहे.

### अजीव प्रस्तर—

या खडकांतील अगदीं प्राचीनतम खडकांस भूस्तरशास्त्रज्ञांनीं अजीव खडक (अझोइक) असें नांव दिलें आहे. कारण त्यामध्यें जीवाचे अवशेष सांपडत नाहींत. अशा तऱ्हेचे विस्तृत क्षेत्रावर पसरलेले खडक उत्तर अमेरिकेमध्यें आढळतात, व त्यांचा थर इतका जाड आहे कीं, त्यांचा काल निदान ८० कोटी वर्षांचा असावा. यावरून आपणांस ही गोष्ट कळून येते कीं, भूपृष्ठावर जमीन आणि पाणी हीं पृथक् झाल्यानंतर सुमारें ८० कोटी वर्षांत आपणांस कोणत्याहि प्रकारच्या जीवाचा मागमूस आढळत नाहीं. या खडकांत पाण्याच्या लाटांच्या खुणा व पावसाच्या थेंबांच्या खुणा आढळतात. परंतु जिवंत प्राण्यांचा मागमूस लागत नाहीं.

### अधःप्राचीन जीवयुग—

यानंतर आपण जसजसे वरच्या थराकडे येऊं लागतों तसतशा कांहीं जिवंत प्राण्यांच्या खुणा दिसूं लागतात. यानंतरच्या काळास भूस्तरशास्त्रज्ञांनीं ' अधःप्राचीन जीवयुग ' (लोअर पॅलिओझोइक) असें नांव दिलें आहे. या युगामध्यें कांहीं कालवें व कवचांतील मासे व कांहीं वनस्पतींचे आणि सागरी लव्हाळ्यांचे व कवचधर कीटकांचे अवशेष आढळतात. यानंतर कांहीं लक्ष वर्षांनीं समुद्रांत रहाणारे विंचवासारखे प्राणी आढळूं लागतात.

या कालांत भूपृष्ठावर वनस्पती अथवा प्राणी आढळत नाहींत तसेंच माशांचेंहि अस्तित्व दिसून येत नाहीं. या कालांत मासे किंवा कोणत्याहि तऱ्हेचे पृष्ठवंश असलेले प्राणी दृष्टीस पडत नाहींत. आपण आज जर एक

पाण्याचा बिंदु घेऊन तो सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं ठेवला तर त्यांत जसे शैवालमय प्राणी व वनस्पती दृष्टीस पडतील त्यां-प्रमाणेंच पण मोठ्या आकाराच्या वनस्पती व कवचधर प्राणी या वेळीं अस्तित्वांत होते. अर्थात् यांच्या शरीरांत हाडें किंवा कोणताहि कठीण भाग नसल्यामुळें त्यांचे अवशेष दीर्घ काला-नंतर राहूं शकले नाहींत. परंतु त्या वेळीं अशा तऱ्हेचे मृदुकाय प्राणी अथवा वनस्पती कोट्यवधि जातींच्या असूं शकतील.

## सजीव व निर्जीव सृष्टि—

सजीव सृष्टीची उत्पत्ति कशी झाली यासंबंधीं आतांपर्यंत अनेकांनीं अनेक मतें व्यक्त केलीं आहेत; परंतु अद्यापपर्यंत निश्चित असें मत कोणींहि व्यक्त केलें नाहीं. प्रत्येक जीव हा एक स्वतंत्र व्यक्ति असतो व त्यास निश्चित आकार असून अजीव पदार्थाप्रमाणें ते केवळ द्रव्याचे गोळे व चलनवलनरहित अमर्याद स्फटिक नसतात. सजीव प्राणी हे आपल्यामध्यें निर-निराळे पदार्थ आत्मसात् करून घेतात व आपली वंशोत्पत्ति करून घेतात. ते आपणांपासून आपल्यासारखीच प्रजा निर्माण करतात. परंतु ही प्रजा त्यांच्यासारखी असली तरी व्यक्तिशः भिन्न असते. एखादी व्यक्ति व तिची प्रजा यांमध्यें कांहीं बाबतींत साम्य व कांहीं बाबतींत भेद हा असतोच. ही गोष्ट आपणांस प्रत्येक जातीच्या व प्रत्येक प्रकारच्या व प्रत्येक कालांतील प्राण्यांमध्यें आढळून येते. शास्त्रज्ञांनीं व्यक्ति व तिची प्रजा यांमध्यें साम्य व भेद कां असतो यासंबंधीं निश्चित स्पष्टीकरण अद्याप केलेलें नाहीं. परंतु आपणांस ही गोष्ट सहज कळून येईल कीं, सभोंवतालच्या परिस्थितीमध्यें जसजसा बदल होत जाईल त्याप्रमाणें त्या व्यक्तीमध्येंहि बदल होत जाईल. अशा वेळीं ज्या प्राण्यांमध्यें परिस्थितीस अनुरूप बदल होत जाईल ते जिवंत राहतील व ज्यांमध्यें असा बदल होणार नाहीं ते नष्ट होतील. याप्रमाणेंच कांहीं प्राणी नवीन नवीन तयार होत जातील व कांहीं नष्ट होत जातील. या पद्धतीस स्वाभाविक निवड किंवा प्राकृतिक अनुरूपता असें नांव देण्यांत येतें. हें शास्त्रीय तत्त्व नसून एक अनुमानित गोष्ट आहे.

## निरिंद्रिय व सेंद्रिय सृष्टि—

सृष्ट्युत्पत्तीच्या क्रमामध्यें एक मोठा महत्त्वाचा दुवा म्हटला म्हणजे प्रथम निरिंद्रिय द्रव्यें अथवा सृष्टि होती, तिचें रूपांतर सेंद्रिय अथवा सजीव सृष्टींत कसें झालें हा होय. यासंबंधीं अनेक शास्त्रज्ञांनीं आतांपर्यंत विचार केलेला आहे व यासंबंधीं आपलीं मतें नमूद केलीं आहेत. प्रारंभीं अशी कल्पना होती कीं, निरिंद्रिय व सेंद्रिय किंवा अजीव आणि सजीव सृष्टि यांमध्यें एक अभद्य भिंत असून या दोन अगदीं स्वतंत्र सृष्टि आहेत. परंतु दिवसेंदिवस या कल्पनेंत फरक पडत चालला आहे व या दोन कोटींमध्यें आतां पूर्वीइतकें मोठें अंतर मानण्यांत येत नसून निरिंद्रिय अथवा निर्जीव सृष्टीचेंच रूपांतर सेंद्रिय अथवा सजीव सृष्टीमध्यें झालें असलें पाहिजे व हा एक सृष्टिक्रमच आहे या मताकडे लोकांची प्रवृत्ति अधिकाधिक होत चालली असून या दोन सृष्टींमधील अभेद्य भिंतीस आतां खिंडारें पडूं लागलीं असून ती बहुतेक ढांसळल्यासारखीच आहे.

निर्जीव आणि सजीव अशा आपणांस दोन अगदीं भिन्न अशा कोटी आढळल्या तरी त्या दोन्ही कोटींमध्यें कांहीं गुणधर्म सामान्य आहेत असें आढळून येतें.

सजीव सृष्टीमध्यें जे विशेष गुण आढळून येतात ते हे कीं, (१) केवळ अन्तर्गत कारणांमुळेंच व बाह्य कारणांशिवाय गति उत्पन्न होणें, (२) अन्तर्गत भागांपासून वाढ होत जाणें, (३) चेतना अथवा क्षोभ किंवा संवेदनशीलता, (४) श्वासोच्छ्वास क्रिया आणि (५) पुनर्जनन अथवा अपत्योत्पादन.

आज आपणांस परिचित असे अगदीं साधे सचेतन जीव हे निदान एकपेशीमय असतात. अशा पेशीमध्यें (१) केंद्रभाग, (२) जीवनरस, व (३) केन्द्रवेष्टन किंवा गोलकवेष्टन असे तीन भाग असतात. परंतु हेकेल यानें वरती आपण उल्लेख केल्याप्रमाणें अगदीं आद्य वर्गांतील जीव जो मोनेरा म्हणून नमूद केला आहे तो या एकपेशीमय जीवाहूनहि अधिक साध्या स्वरूपाचा असून त्यास विशिष्ट रचनाहि नसते. तथापि ते जिवंत स्थितींत असतात असेंच त्यानें म्हटलें आहे. (अशाच तऱ्हेचे क्रोमॅशिया हे जीव होत.) हे मोनेरा किंवा क्रोमॅशिया म्हणजे खडकावर पसरलेल्या केवळ श्लेष्ममय (जेली) पदार्थां-प्रमाणें दिसणारे थर होत. यांचें सूक्ष्मदर्शक यंत्रांतून निरीक्षण केल्यास हे जीवनरसाचे बनलेले असून सूक्ष्म असे निळ्या-हिरव्या रंगाचे गोल पिंड असल्याचें दिसून येतें.

मोनेरा व ज्यामध्यें योगवाही क्रिया (कॅटॅलेटिक ॲक्शन) दिसून येते असे निरिंद्रिय पदार्थ यांमध्यें जो फरक आढळून येतो तो केवळ कर्बग्रहण संबंधाचा होय. परंतु मोनेरा व निरिंद्रिय स्फटिक यांच्यामध्यें फारच थोडा फरक असतो त्या मानानें मोनेरा व उच्च दर्जाचा सेंद्रिय पदार्थ यांमध्यें फारच मोठा फरक असतो. गोलकांतील मूलाधारभूत द्रव्य जो गोलक-रस तो कर्ब, उज्ज, प्राण, नत्र, स्फुर व गन्धक इतक्या मूल-द्रव्यांचा बनलेला असतो म्हणजे निरिंद्रिय सृष्टींत नाहीं असें एकहि अधिक द्रव्य त्यामध्यें नसतें.

या सजीव गोलकाचे महत्त्वाचे गुणधर्म पाहिले असतां पुढील-प्रमाणें आढळतात: (१) सजातीय जीवापासून उत्पत्ति,

( २ ) सामान्यतः गोल आकार, ( ३ ) स्वतःस योग्य असें अन्न मिश्रणांतूनहि निवडून घेण्याची शक्ति, ( ४ ) वाढण्याची प्रवृत्ति, ( ५ ) नवीन द्रव्य घेऊन जुनें टाकून देण्याचें सतत कार्य, ( ६ ) गति व संवेदनशीलता, ( ७ ) अपत्योत्पादन, ( ८ ) अतिशय उष्णता लावल्यास शक्तीचा ऱ्हास.

आतां हे गुणधर्म थोड्याफार प्रमाणांत स्फटिकांतहि आढळतात व सजीव पदार्थांकडून ज्या क्रिया होतात त्या योग्य परिस्थितींत स्फटिकांकडूनहि होतात.

**अनुस्फटिक व प्रतिस्फटिक—**

तसेंच सचेतन पदार्थांतील आधारभूत द्रव्य जसें अतिस्फटिक (कोलॉयडल ) जातीचें असतें तसे अनुस्फटिक जातीचे पदार्थहि प्रतिस्फटिक बनवितां येतात ( खटगंधकित, सिंधुहरिद, इ. ). अंड्यामधील प्रतिस्फटिक जातीचा भाग अनुस्फटिक बनवितां येतो. एवढेंच नव्हे तर कांहीं पदार्थ अनुस्फटिक व प्रतिस्फटिक या दोन्ही स्थितींतहि आढळतात.

पृथ्वीची रचना होत असतां ती वायुमय स्थितींतून बाहेर पडल्यावर पृथ्वीवरील पदार्थांना प्रतिस्फटिक रूप प्राप्त होऊं लागलें व नंतर त्यांचें अनुस्फटिक जातीच्या पदार्थांमध्यें रूपांतर झालें. कोणतीहि जीवजाति ही विकाससिद्धान्ताप्रमाणें निरनिराळ्या अवस्थांतून जात असते ( फायलोजेनी ) व या सर्व अवस्थामधून तज्जातीय प्राणी गर्भावस्थेच्या थोडक्या काळांत जात असतो ( ऑंटोजेनी ) यावरून अनुस्फटिक व प्रतिस्फटिक जातीच्या पदार्थांची उत्पत्ति मूळ एकाच प्रकारच्या द्रव्यापासून झालेली असावी असें सिद्ध होतें. निरिंद्रिय पदार्थांत सिकता ( सिलिकॉन ) या द्रव्याचें आधिक्य असतें तर सेंद्रिय पदार्थांमध्यें कर्बाचें प्राधान्य असतें.

ज्याप्रमाणें सेंद्रिय किंवा सचेतन द्रव्यास चेतना ( स्टिम्युलस ) दिल्यास त्यामध्यें चैतन्य उत्पन्न होतें तसें निरिंद्रिय द्रव्यांतहि होतांना आढळतें. पहिल्या वर्गातील चैतन्य विद्युद्यंत्राच्या सहाय्यानें दाखवितां येतें. शरीरभागांत जें संवादिनी क्रिया करण्याचें सामर्थ्य असतें तें ज्ञानशक्तिहारक द्रव्यांच्या योगानें तात्पुरतें व विषारी द्रव्यांनीं कायमचें नष्ट करतां येतें. तसेंच निरिंद्रिय सृष्टींतील जस्ताच्या तारेवर सिंधुकर्बित याचा उत्तेजक परिणाम होतो व पालाशस्तम्भिदाचा ( पोट्याशम ब्रोमाइड ) ज्ञानशक्तिहारक परिणाम होतो व चुक्रिकाम्लाचा ( ऑक्झॅलिक ॲसिड ) विषासारखा परिणाम होतो.

**सजीव व निर्जीव सृष्टींतील मूलद्रव्यें एकच असतात—**

सर जगदीशचंद्र बोस यांनीं असें म्हटलें आहे कीं, ‘ धातु, वनस्पती व प्राणी यांच्यावर ज्या सर्व प्रकारच्या संवादिनी क्रिया होत असतात त्यांमध्यें कोठेंहि फरक दिसून येत नाहीं म्हणून संवादिनी क्रिया होतात त्या अदृश्य शक्तीच्या साहाय्यामुळें होतात असें मानण्याची मुळींच आवश्यकता नाहीं ; म्हणजेच सजीव सृष्टि किंवा निर्जीव सृष्टि या सर्वांतील मूलद्रव्य एकच प्रकारचें आहे.

याप्रमाणें जें संशोधन आज जगावर निरनिराळ्या ठिकाणीं चालू आहे त्यावरून असें दिसून येतें कीं, जीवोत्पत्ति होण्यापूर्वीं अनेक प्रकारचीं कर्बनत्राचीं संयुक्तें निर्माण होत गेलीं असलीं पाहिजेत. नंतर त्यांच्यापासून ओजोद्रव्य अथवा प्रोटीन तयार झालें असावें. नंतर या प्रोटीनचे अणू त्यांतील अनिश्चित स्वरूपाच्या रासायनिक आकर्षणामुळें विवक्षित प्रकारें एकत्र येऊन त्यापासून एक प्रकारच्या जीवनरसाच्या सूक्ष्म कणांची उत्पत्ति झाली असावी आणि या सूक्ष्म कणांपासून अगदीं साध्या स्वरूपाचे आद्य जीव निर्माण झाले असावे व हेच मोनेरा नांवाचे आद्य सूक्ष्म जीव अथवा सजीव सृष्टीचे आद्य घटक होत.

याप्रमाणें सजीव व निर्जीव सृष्टि किंवा सेंद्रिय व निरिंद्रिय पदार्थ यांमध्यें आतां मूलतः फरक राहिलेला नसून निरिंद्रिय द्रव्याचें रूपांतर सेंद्रिय द्रव्यांत होऊं शकतें ही गोष्ट आतां शास्त्रज्ञांनीं सिद्ध केली आहे. रासायनिक पद्धतीनें यूरिया हा सेंद्रिय पदार्थ प्रथम तयार करण्यांत आला व आतां अनेक सेंद्रिय संयुक्त पदार्थ कृत्रिमरीत्या तयार करण्यांत येतात ही गोष्ट सर्वपरिचित आहे. तेव्हां आतां या दोन वर्गांमध्यें फारसा भेद मानण्याचें कारण नाहीं. असो. आतां आपण पुन्हां आपल्या सृष्टिरचनेच्या क्रमाकडे वळूं.

**आद्यजीवयुक्त प्रस्तर—**

मनुष्यपूर्व प्राण्यांचा अभ्यास बहुतेक प्रास्तर अवशेषांवरून करण्यांत आलेला आहे. अशा तऱ्हेचे सर्वांत खालचे प्रस्तर म्हटले म्हणजे अझोइक अथवा अजीव प्रस्तर होत हें मागें सांगितलेंच आहे. त्या प्रस्तरांवर आद्यजीवयुक्त प्रस्तर (प्रोटोझोइक) आढळतात. यांमध्यें आळंबी किंवा भूछत्रासारख्या शैवालमय वनस्पतींचे अवशेष आढळतात व क्वचित् मधून मधून समुद्रकीटकांचे अवशेप दृष्टीस पडतात. या थरास पूर्वजीवक थर किंवा आद्यप्राणिविशिष्ट थर ( पॅलीओझोइक ) असें नांव देतात. या थरांत शिंपांतील मासे, कीटक, समुद्रशैवाल आणि पाणविंचू हे आढळतात. यांतील कांहीं पाणविंचू नऊ फूट लांब असतात.

**मध्य प्राणियुग—**

यांच्या वरील थरास मध्यप्राणियुग किंवा मध्यजीवकाल म्हणतात. या थरांत मोठमोठे सरपटणारे प्राणी असून त्यांतील

कांहीं शंभर फूट लांबीपर्यंत आढळतात. यास समुद्रसर्पकाल म्हणतां येईल. यावरील थरास अर्वाचीन जीवकाल असें म्हणतात.

आद्यजीवकालांत प्रथम केवळ पाणविंचू हेच प्राणी होते, व दीर्घकाळपर्यंत यांचेंच पृथ्वीवर साम्राज्य असे. यानंतर या प्राचीन जीवयुगांतील खडकांमध्यें सिल्युरियन खडक या नांवाचा एक प्रकार आढळून येतो. त्याचा काल सुमारें ५० कोटी वर्षांचा जुना असावा. त्या खडकांत ज्यांस डोळे, दांत व पोहण्याची शक्ति आहे अशा प्राण्यांचे अवशेष आढळून येतात. यांस प्रथमच पृष्ठवंश आढळून येतो. हे पृष्ठवंश असलेले मत्स्य होत.

यानंतरचा खडकांचा थर डेव्होनियन या नांवानें प्रसिद्ध आहे. या खडकांच्या काळास मत्स्ययुग असें म्हणतात. हे मासे शार्क माशासारखे असत. हे पाण्यांतून पोहत जात, तसेंच हवेंत उडत असत, व समुद्रांतील लव्हाळ्यांत पडून रहात असत. ते एकमेकांस भक्षण करून आपली उपजीविका करीत. हे फारसे मोठे नसून बहुधा २।३ फूट लांब असत. परंतु कांहीं २० फुटां-पर्यंत लांबहि आढळतात.

**जलमग्न सृष्टि—**

या मत्स्ययुगामध्यें समुद्रांत जरी मासे आढळून येतात तरी जमिनीवर कोणत्याच जातीचे प्राणी नसावे. वास्तविक या वेळीं खरी जमीनच अस्तित्वांत नसावी. कारण जमीन उत्पन्न करणारे प्राणी जे मृत्कृमी अथवा गांडुळें तेच या वेळीं अस्तित्वांत नव्हते. तसेंच खडकांचा भुगा करणाऱ्या वनस्पतीहि अस्तित्वांत नव्हत्या. शेवाळ किंवा बुरशीहि अस्तित्वांत नव्हती. या वेळची जीवसृष्टि केवळ पाण्यांत होती.

अशा तऱ्हेची ओसाड खडकमय पृथ्वी असतांना वातावरणांत मोठमोठे बदल होत होते. हे बदल होण्याचीं कारणें बरींच भानगडीचीं होतीं व त्यांचें अजून निश्चित अनुमान करण्यांत आलें नाहीं. पृथ्वीच्या कक्षेमध्यें अथवा भ्रमणमार्गामध्यें बदल होत होता. तसेंच पृथ्वीचे उत्तर व दक्षिण ध्रुव हेहि भ्रमणगती-मुळें बदलत होते. पृथ्वीच्या भूखंडांच्या आकारांत बदल होत होता. किंबहुना सूर्याच्या उष्णतेंतहि फरक होत होता. त्यामुळें पृथ्वीच्या कांहीं पृष्ठभागावर दीर्घकालपर्यंत भयंकर शीतता व कांहीं भागावर भयंकर उष्णता आढळून येत होती.

या कालांत ज्वालामुखींचेहि मोठमोठे स्फोट होत असावे व त्यामुळें भूपृष्ठभागांची घटना होत असावी. कांहीं ठिकाणीं उंच पर्वत व कांहीं ठिकाणीं अथांग खोल महासागर उत्पन्न होत असावे. मधून मधून हिम व पर्जन्य यांची भयंकर वृष्टि होऊन नद्यांच्या पाण्याच्या जोरानें पर्वतांमध्यें मोठमोठी खोरीं चरून त्यांतील गाळ व माती समुद्रांत वाहून जात असावी व त्यामुळें कांहीं ठिकाणीं समुद्राचे तळ वर येऊन त्याचें पाणी दूरवर पसरत असावें. या दीर्घकालांत पृथ्वीचा पृष्ठभाग एकसारखा थंडच होत जात होता असें नव्हे तर पृथ्वीच्या पोटांतील भयंकर उष्णतेमुळें पृथ्वीच्या पृष्ठभागावर फार भयंकर परिणाम होत असत. तसेंच मधून मधून हिमप्रलयहि होत असत.

**भूपृष्ठावरील जीवसृष्टि—**

या मत्स्ययुगाच्या अखेरी अखेरीस समुद्रावरून जमिनीकडे जीवसृष्टीचा प्रसार होऊं लागला. अर्थात् पृथ्वीच्या पृष्ठभागावर जीवसृष्टीच्या क्रमामध्यें वनस्पतींचा प्रसार हा अगोदर होऊन नंतरच प्राण्यांची उत्पत्ति झाली हें सरळच आहे. शैवालापासून वनस्पती तयार होण्याच्या मार्गांत मुख्य अडचण ही होती कीं, त्यांस आपलीं पानें सूर्याची उष्णता घेण्याकरितां तशा स्थितींत धारण करण्यास कांहीं ताठपणा अवश्य होता आणि त्याच-वेळीं जमिनीमध्यें असलेलें पाणी शोषून घेणाऱ्या अवयवांची आवश्यकता होती. ही गोष्ट वनस्पतींमध्यें जे काष्ठमय तंतू निर्माण झाले त्यामुळें साध्य झाली. अशा तऱ्हेचीं दलदलींत वाढणारीं झाडें व शैवालासारख्या वृक्षमय वनस्पतींचे अवशेष या कालच्या खडकांमध्यें फार मोठ्या प्रमाणावर आढळून येतात. या वनस्पतींमधूनच हळूहळू क्रमानें सरपटणारे प्राणी आढळून येऊं लागले. प्रथमतः हे प्राणी सहस्रपाद, शतपाद अशा स्वरूपाचे होते. त्यानंतर प्राथमिक अवस्थेंतील कीटक निर्माण झाले. नंतर पूर्वीच्या पाणविंचवासारखेच परंतु कोळी व जमिनी-वरच्या विंचवासारखे प्राणी तयार झाले व यानंतर सपृष्ठवंश प्राणी आढळूं लागले.

यांपैकीं कांहीं कीटक बऱ्याच मोठ्या आकाराचे असत. उदा., त्या वेळच्या पतंगाचे पंख २९ इंचांपर्यंत भरत.

**श्वासोच्छ्वास करणारे प्राणी—**

ह्या नवीन जातीचे प्राणी हवेमध्यें श्वासोच्छ्वास करूं लागले. यापूर्वीचे प्राणी फक्त पाण्यांत विद्रुत असलेली हवा ग्रहण करीत असत व आजहि पाण्यांतील बहुतेक प्राणी पाण्यांतील विद्रुत हवेचाच उपयोग करतात. त्या वेळीं माशाच्या शरीरास जे कल्ले असत त्यांचाच विकास पुढें हवेंत श्वासोच्छ्वास करणाऱ्या प्राण्यांमध्यें फुप्फुसांत झाला. सध्यां जे बेडूक वगैरे जलस्थलचर प्राणी आढळतात त्यांना श्वासोच्छ्वासाकरितां प्रथम कल्ले असतात परंतु पुढें हे प्राणी त्यांच्या गळ्याजवळ असलेल्या पोहण्याच्या पिशव्यांच्या सहाय्यानें श्वासोच्छ्वास करूं लागतात व त्यांचे कल्ले हळूहळू नष्ट होऊं लागतात व त्या ठिकाणीं त्यांचें श्रोत्रेंद्रिय उत्पन्न होतें. अशा स्थितींत हे प्राणी जमिनीवर राहूं शकतात. परंतु आपल्या वंशवृद्धीकरितां अंडीं घालण्याकरितां त्यांना पुन्हां

पाण्यांत जावें लागतें. यामुळें आद्यकालांतील दलदलींत राहणारे सर्व सपृष्ठवंश प्राणी आणि वनस्पती ह्या भूजलचर वर्गांतीलच होत्या. बहुतेक त्या वेळचे सर्व प्राणी गोधा वर्गांतील म्हणजे घोरपडीसारखे असत, व त्यांचा आकार फार अजस्र असे. हे जरी जमिनीवर राहणारे प्राणी होते तरी त्यांना जवळच पाण्याची अथवा दलदलीची आवश्यकता असे. या कालांतील मोठमोठे वृक्षहि असेच जलस्थलवासी अथवा उभयचर होते. त्या वेळच्या झाडांना फळें येत नसत व त्यांच्या चिया जमिनीवर पडून केवळ जमिनींतील ओलाव्यानें किंवा दंव आणि पाऊस यांनीं उगवतील अशी परिस्थिति नव्हती. त्या वेळच्या झाडांचीं बीजें पाण्यांत पडलीं तरच उगवत असत. या बाबतींत प्राणी व वनस्पती यांच्या प्राथमिक अवस्थेच्या शरीररचनेचा अभ्यास करणें फार मनोरंजक आहे. या काळच्या सर्व वनस्पती व प्राणी प्रथमतः जलनिवासी असत. उदा., माशांच्या वरच्या जातीचे मनुष्यापर्यंतचे सर्व प्राणी त्यांच्या विकासक्रमांत जन्मापूर्वी एका अंड्यासारख्या अवस्थेतून जातात. त्या अवस्थेंत त्यांना कल्ल्यासारख्या फटी असतात व त्या पुढें जन्मल्यानंतर बुजतात. माशाचा डोळा जरी उघडा असतो तरी त्याच्या वरच्या अवस्थेंतील प्राण्यांचे डोळे पापण्यांनीं झांकलेले असतात, व माशांचे डोळे उघडे असल्यामुळें पाण्यानें जसे धुतले जातात तसे या प्राण्यांचे डोळे धुतले जाण्याकरितां त्यांच्या डोळ्यांमध्यें जलस्रावक ग्रंथींची योजना केलेली असते. तसेंच हवेच्या लहरींतील कंप जललहरींतील कंपापेक्षां सूक्ष्म असल्यामुळें माशाच्या वरच्या जातीच्या प्राण्यांमध्यें कान व त्यांतील पडदा यांची आवश्यकता असते. याप्रमाणें या प्राण्यांच्या शरीररचनेंत प्रत्येक अवयवामध्यें भोंवतालच्या परिस्थितीशीं अनुरूप करून घेण्याकरितां कांहीं तरी फरक झालेला आढळून येतो. या जलस्थलचर अथवा उभयचर प्राणियुगास कर्बयुग ( कार्बोनिफेरस एज ) असें म्हणतात. या कालांत दलदलीच्या जागा व उथळ पाण्याच्याजवळील सखल जमिनीचा प्रदेश व समुद्रशाखा अशा ठिकाणीं प्राण्यांची वस्ती असे. येथपर्यंतच प्राण्यांची मजल पोंचली होती. या वेळीं पर्वत व वरील पठारें हीं ओसाड व प्राणिविरहित होतीं. प्राण्यास हवेंत श्वासोच्छ्वास करितां येऊं लागला होता तरी त्याचें मूळ अद्याप पाण्यांतच होतें, व पुनरुत्पादनाकरितां त्यास पाण्याकडेच जावें लागत असे.

कर्बयुगाच्या नंतरचा बराच मोठा काल रुक्ष असावा. त्या कालांतील खडकांमध्यें आढळणाऱ्या अवशेषांत म्हणजे वालुकामय व इतर प्रस्तरांत त्या मानानें फारच थोडे प्रास्तरावशेष अथवा प्राण्यवशेष आढळून येतात. या वेळीं वातावरणांतील हवामानांत फार मोठ्या प्रमाणावर फरक झाले असावे व दीर्घकालीन असे हिमप्रलय होऊन गेले असावे. जेथें पूर्वी मोठमोठ्या वनस्पतियुक्त दलदली होत्या त्या क्षेत्रावर वालुकामय प्रस्तरांचा थर पसरला असावा आणि त्या थराखालीं त्या वनस्पती दाबल्या गेल्यामुळें त्यांचें खनिज द्रव्यांत रूपांतर झालें असावें. याच रूपांतरापासून आपणांस आज दगडी कोळशाचा लाभ होत आहे.

परंतु अशा स्थित्यंतराच्या काळांतच प्राण्यांचें फार जलद रूपांतर होत असतें. आणि अत्यंत बिकट परिस्थितींतच प्राणी नवीन नवीन स्थित्यंतरांतून जात असतां महत्त्वाचे धडे शिकत असतो. ज्याप्रमाणें परिस्थिति उष्ण किंवा आर्द्र होत जाईल त्याप्रमाणें त्या परिस्थितीस अनुसरून नवीन प्राणी व वनस्पती तयार होत असतात. या कालच्या खडकांतील अवशेषांमध्यें आपणांस कांहीं असे सपृष्ठवंश प्राणी आढळून येतात कीं, जे आपल्या वंशवृद्धीकरितां अंडीं घालीत असत, परंतु बेडकाप्रमाणें त्यांचीं पिलें होण्याकरितां त्यांस पाण्याची आवश्यकता लागत नसे, व त्या अंड्यांतील पिलें बाहेर येतांच एकदम श्वासोच्छ्वास करूं लागत. यांच्या शरीरांत कल्ल्यांचा अजीबात अभाव असून त्यांच्या फटीचें आस्तित्व केवळ गर्भावस्थेंतच दृष्टीस पडत असे.

## सरीसृप काल—

हे मंडूकार्भक अवस्थाविरहित प्राणी म्हणजे सरीसृप अथवा सरपटणारे किंवा उरोगामी प्राणी होत. याच वेळीं वनस्पतीमध्येंहि बीजधारक वनस्पतींची वाढ झाली होती, व हीं वृक्षबीजें सरोवरें किंवा दलदली नसलेल्या ठिकाणींहि उगवत असत. तथापि अजून पुष्पयुक्त वनस्पती अथवा तृण यांची वाढ झाली नव्हती. या वेळीं नेचांचे ( फर्न्स ) अनेक प्रकार असत. तसेंच कीटकांच्याहि अनेक जाती निर्माण झाल्या होत्या. त्या वेळीं भ्रमरजातीय अनेक प्राणी होते. परंतु फुलपांखरें किंवा मधमाशा अद्याप तयार झाल्या नव्हत्या. परंतु या कालांत अनेक प्रकारचे वृक्ष व वनस्पती तयार होऊन आपल्या संवर्धनाची व प्रसाराची त्या वाट पहात होत्या.

कालांतरानें या परिस्थितींतहि बदल होत गेला. पृथ्वीच्या कवचाच्या हालचालींतील फरक तसेंच तिच्या कक्षेंत होणारा बदल, त्याप्रमाणेंच तिची कक्षा आणि ध्रुव यांमधील कोनांत होणारा फरक, इत्यादि अनेक गोष्टींचा परिणाम होऊन एक प्रकारचें उष्ण असें वातावरण उत्पन्न झालें. हा काल सुमारें १० कोटी वर्षांचा असावा. या कालास मध्यजीवकाल ( मेसोझोइक ) असें म्हणतात. तसेंच याला उरोगामी प्राणिकाल असेंहि दुसरें नांव आहे; कारण या कालांत उरोगामी प्राण्यांची विशेष वस्ती होती. या कालाचा अंत सुमारें आठ कोटी वर्षांपूर्वी झाला.

आजच्या सृष्टीमध्यें उरोगामी प्राण्यांच्या जाती त्या मानानें फार कमी असून त्यांचा प्रसारहि मर्यादित स्वरूपांतच आहे. अर्थात् त्यांच्यापूर्वींच्या भूजलचर प्राण्यांच्या ज्या जाती आज उपलब्ध आहेत त्यांच्या जाती व संख्या पुष्कळच आहेत हें खरें. अशा जातींपैकीं सर्प, कासव, मगर, सुसर, पाल, वगैरे प्राणी आपल्या परिचयाचे आहेत. या प्राण्यांस सर्व वर्षभर उष्ण हवा लागते व त्यांस थंडी सहन होत नाहीं. या युगांतील बहुतेक प्राण्यांचा हाच स्वभाव असावा. हे प्राणी फक्त उष्ण हवेंतच राहूं शकत, परंतु त्या वेळच्या सृष्टींमध्यें कोरडी जमीन पुष्कळच तयार होऊन कोरड्या हवेंत वाढणाऱ्या अनेक वनस्पती व प्राणी तयार झाले होते.

**प्रचंड सरट—**

या कालांत कांहीं आश्चर्यकारक असे मोठमोठे प्राणी अस्तित्वांत असून आज ते नष्ट झाले आहेत. त्यांस डिनोसोर असें म्हणत. यानंतर वेत, नेचे, वगैरे अनेक वनस्पतींची वाढ पृथ्वीच्या सखल भागांत होऊं लागली. आणि त्यांमध्यें चरणाऱ्या शाकाहारी उरोगामी प्राण्यांची वस्ती होऊं लागली, व या मध्यजीवनकालामध्यें त्यांची वाढ अतिशय मोठ्या प्रमाणावर झाली. यांपैकीं कांहीं प्राणी आकारानें अतिशय मोठे असून ते व्हेल माशापेक्षांहि मोठे असत. उदा., डिप्लोडोकस कार्नेगी नांवाचा प्राणी शेपटीपासून नाकाच्या शेंड्यापर्यंत ८४ फूट लांब असे. जायगँटोसोरस हा तर शंभर फूट लांब असे. या प्राण्यांवर उपजीविका करणारे डीनोसोरस हे अशाच आकाराचे असत. यांतील प्रचंड प्राणी टीरॅनोसोरस या नांवाचा असे.

याच कालामध्यें एक सरपटणारा प्राणी जंगलामध्यें वास करीत असतां त्याच्या शरीराचा पुढचा भाग वटवाघुळासारखा बनत गेला व तो जंगलांतील झाडावर उड्या मारूं लागला. या प्राण्यास प्टेरोडेक्टॉइल अथवा प्टेरोडॅक्टिल (पक्षांगुली प्राणी) असें नांव देण्यांत येतें. हे पहिले सपृष्ठवंश उडतां येणारे प्राणी होत. ही उडण्याची शक्ति प्राण्यास याच युगामध्यें प्राप्त झाली.

याच वेळीं कांहीं उरोगामी प्राणी समुद्राच्या पाण्यांत पुनः जाऊन राहूं लागले. अशा तऱ्हेचे प्राणी म्हटले म्हणजे— मेसोसोरस, प्लेसीओसोरस, एक्थीओसोरस हे होत. हे प्राणी व्हेल माशाएवढे मोठे असत. यांतील शेवटचे एक्थीओसोरस हे माशासारखे प्राणी होते. परंतु दुसऱ्या दोन प्राण्यांचे वंशज आज आढळत नाहींत. याप्रमाणें मध्यजीवनकालांत स्थिति होती. या कालांत मोठमोठ्या आकाराचे, शक्तीचे व चलनवलनादि क्रिया करणारे प्राणी उत्पन्न झाले. या प्राण्यांत अद्यापर्यंत उत्पन्न झालेल्या कोणत्याहि प्राण्यापेक्षां अधिक शक्ति असे.

समुद्रामध्यें मात्र फारशा नवीन मोठ्या प्राण्यांची वाढ झाली नव्हती, परंतु लहान लहान शंखसदृश कवच असलेल्या प्राण्यांच्या जाती उथळ समुद्रामध्यें उत्पन्न झाल्या होत्या. या प्राण्यांचे वंशज आज अस्तित्वांत असलेले दिसत नाहींत. त्यांच्या सदृश अगदीं जवळचा प्राणी ज्यास गुजरातेमध्यें घोंघा म्हणतात तो दृष्टीस पडतो. हा उष्णकटिबंधांत आढळतो. तसेंच नवीन जातीचे हलके व सुंदर खवले असलेले प्राणी अलीकडे सर्व समुद्रांतून व नद्यांतून आढळूं लागले असावेत.

ज्या वेळीं मध्यजीवन युगामध्यें सर्वत्र वनस्पतींचा विस्तार झालेला होता, आणि त्यांत अनेक उरोगामी प्राणी भटकत होते, तसेंच ज्या वेळीं त्यांतील डिनोसोर नांवाचे प्रचंड सरट उष्ण आणि दलदलीच्या प्रदेशांतून भटकत होते व सपक्ष सरट जंगलांतून आरोळ्या मारीत फिरत होते व कृमिकीटकांचा फडशा पाडीत होते त्या वेळीं वृक्षांना फुलें येत नव्हतीं व अशा वेळीं कांहीं प्राणी एका विशिष्ट तऱ्हेनें हळूहळू विकास पावत होते. हे प्राणी डिनोसोर वर्गांतीलच पण कांहींसे लहान आकाराचे परंतु उड्या मारणारे प्राणी होते. हे मोठमोठ्या प्राण्यांपासून आपलें संरक्षण करण्याकरितां उंच उंच पर्वतांवर किंवा समुद्राच्या बाजूस राहूं लागले. अशा तऱ्हेच्या प्राण्याच्या शरीरावर हळूहळू एक प्रकारचे खवले निर्माण झाले. हे खवले हळूहळू रूपांतर पावून त्यांस प्राथमिक अवस्थेंतील पिसांचा आकार उत्पन्न झाला. हे पिसासारखे खवले एकावर एक रचलेले असल्यामुळें यांच्यामध्यें इतर सरपटणाऱ्या प्राण्यांपेक्षां शरीरांतील उष्णता धारण करण्याची शक्ति अधिक असे. त्यामुळें या प्राण्यांस अधिक थंड प्रदेशांत जाऊन राहणें शक्य होऊं लागलें. याच कालांत त्यांच्या ठिकाणीं आपल्या अंड्यांबद्दल विशेष काळजी घेण्याची प्रवृत्ति वाढूं लागली. बहुतेक सरट वर्गीय प्राणी आपल्या अंड्यांची काळजी घेत नसत. तीं केवळ उन्हाच्या योगानें योग्य वेळीं आपोआप फुटून पिलें बाहेर येत असत. परंतु हे नवीन प्राणी आपल्या अंड्यांची काळजी घेऊन तीं आपल्या शरीरांतील उष्णतेनें उबवूं लागले.

**पक्ष्यांची उत्पत्ति—**

याप्रमाणें त्यांचीं शरीरें थंड हवेंत राहण्यास योग्य अशीं बनल्यामुळें त्यांच्या शरीराच्या अंतर्गत रचनेंतहि हळूहळू रूपांतर घडून येऊं लागलें. त्यांच्या अंगांतच बरीच उष्णता असल्यामुळें त्यांच्या अंगांतील रक्त उष्ण असे व त्यामुळें त्यांस उन्हांत पडून राहण्याची आवश्यकता वाटत नसे. अगदीं प्राथमिक अवस्थेंतील पक्षी बहुतेक समुद्रकांठीं राहत असून ते आपली उपजीविका माशांवर करीत असत. त्यांच्या शरीराच्या पुढील भागांतील अवयव पंखासारखे नसून वल्ह्यांच्या आकाराचे असत. हे पक्षी

बहुधा पेंग्विन पक्ष्यासारखे असावेत. न्यूझीलंडमध्यें अगदीं प्राथमिक अवस्थेंतील आजहि आढळून येणारा किवी पक्षी पाहिला तर त्याचीं पिसें अगदीं साधीं असतात, व त्यास उडतां येत नाहीं, व त्याचे पूर्वजहि कधीं उडत असावे असें वाटत नाहीं. पक्ष्यांच्या शरीराची वाढ होत असतांना त्यांस प्रथम पिसें उत्पन्न झालीं व त्यानंतर पंख उत्पन्न झाले, परंतु पिसांपासून पंख तयार होण्यास फारसा विलंब लागला नाहीं. एका पक्ष्याचे प्रास्तर अवशेष सांपडले आहेत त्यांमध्यें त्याच्या जबड्यांत उरोगामी प्राण्यासारखे दांत आणि त्या प्राण्यासारखी शेपटी असल्याचें दिसून आलें आहे. परंतु त्यास पक्ष्याप्रमाणें पंख होते असेंहि दृष्टीस पडलें. परंतु या मध्यजीवकालामध्यें पक्ष्यांची संख्या व जाती फार मोठ्या प्रमाणावर असाव्या असें वाटत नाहीं. जर एखाद्या मनुष्यास मध्यजीवन युगामध्यें प्रत्यक्ष जातां आलें तर त्यास अनेक दिवसांचा प्रवास करूनहि पक्ष्याचें ओरडणें ऐकूं येणार नाहीं, किंवा पक्षी दृष्टीस पडणार नाहीं. परंतु इतर उडणारे उरोगामी प्राणी मात्र अनेक प्रकारचे दृष्टीस पडतील. तसेंच त्या वेळीं त्याला सस्तन प्राण्याचाहि मागमूस आढळणार नाहीं. वास्तविक पक्ष्यांच्या जाती निर्माण होण्यापूर्वीं सस्तन प्राण्यांच्या जाती निर्माण झाल्या असल्या पाहिजेत. परंतु ते फार लहान असल्यामुळें त्यांच्याकडे लक्ष जाण्यासारखें नसावें.

### प्राथमिक सस्तन प्राणी—

अगदीं प्राथमिक अवस्थेंतील सस्तन प्राणी हेहि प्राथमिक पक्ष्याप्रमाणेंच आपलें संरक्षण व जीवितरक्षण करण्याकरितां धडपड केल्यामुळें व अनेक बिकट परिस्थितीच्या जीवनावस्थेंत काल काढावा लागल्यामुळें व थंडीपासून स्वसंरक्षण करावें लागल्यामुळें उत्पन्न झाले असावे. त्यांच्या शरीरावर एक प्रकारचे खवले उत्पन्न होऊन त्यांचें रूपांतर एका भिन्न प्रकारच्या आवरणामध्यें होऊन उष्णतारक्षणास उपयोगी पडणारें असें आच्छादन तयार झालें. त्यांच्या शरीरांतील आंतररचनेंतहि पक्ष्याप्रमाणेंच पण निराळ्या स्वरूपांत रूपांतर झालें. कारण पक्ष्याप्रमाणें त्यांसहि उन्हांत शेकत न बसतां आपल्या शरीरांत उष्णता राखून ठेवणें अवश्य होतें. त्यांच्या शरीरामध्यें खवल्यांचें रूपांतर पिसांमध्यें होण्याऐवजीं केसांमध्यें झालें. तसेंच आपल्या अंड्यांचें संरक्षण करून त्यांस आपल्या शरीराची ऊब देण्याऐवजीं त्यांनीं त्यांची पूर्ण वाढ होईपर्यंत त्यांचें आपल्या शरीरांतच रक्षण करण्याचें कार्य केलें. यामुळें बहुतेक प्राणी जरायुज बनले, व आपल्या अपत्यांस जिवंत अवस्थेंत जन्म देऊं लागले, व जन्म झाल्यावरहि आपल्या अपत्यांचें संरक्षण-पोषण करण्याकरितां त्यांशीं संबंध ठेवूं लागले. अद्यापहि दोन सस्तन जातीचे प्राणी असे आढळतात कीं, जे अंडीं घालतात व ज्यांस स्तन नाहींत व जे आपल्या पिलांचें आपल्या अंतस्त्वचेपासून निघणाऱ्या रसानें पोषण करतात. असे प्राणी म्हटले म्हणजे प्लॅटिपस आणि एकिड्ना हे होत. यांतील एकिड्ना हा प्राणी आपलीं त्वचामय अंडीं घातल्यानंतर त्यांस उदराखालीं असलेल्या एका पिशवींत ठेवतो व याप्रमाणें तीं फुटेपर्यंत त्यांस ऊब देऊन त्यांचें रक्षण करतो.

### भूरचनेंतील खळबळ व बदल—

उरोगामी प्राण्यांचा काल सुमारें आठ कोटी वर्षांचा होता. यानंतर पृथ्वीच्या पृष्ठभागांत फार मोठे बदल घडून आले. जमिनीच्या सपाटीमध्यें आणि पर्वत आणि समुद्र यांच्या स्थानामध्यें मोठी खळबळ उडून मोठे फरक घडून आले ही गोष्ट आपणांस तत्कालीन प्रास्तर अवशेषांवरून दिसूत येते. मध्यजीवनयुगाचा ऱ्हास होऊन या वेळीं नवीनच प्रकारची सृष्टि उत्पन्न झाल्याचें दृष्टीस पडतें. नवीन नवीन व चमत्कारिक प्राण्यांच्या जाती निर्माण झालेल्या आढळतात. जुन्या प्राण्यांच्याहि जातीमध्यें व वर्गांमध्यें मोठमोठे फरक घडून आलेले दिसून येतात. मध्यजीवनयुगाच्या अखेरच्या कालांत एकाच वर्गांतील प्राण्यांच्या अनेक प्रकारच्या जाती आढळून येतात. उदा., त्या कालांतील अमोनाइट वर्गाच्या प्राण्यांच्या असंख्य व चमत्कारिक जाती दृष्टीस पडतात. जेव्हां कालाची गति संथ असून कोणत्याहि प्रकारची खळबळ नसते तेव्हां नवीन नवीन प्रकारच्या जाती उत्पन्न होण्यास कांहीं उत्तेजक कारण नसतें. तसेंच त्यांच्या स्वरूपांतहि फारसा विकास होत नाहीं. कारण परिस्थितीस अनुरूप होण्याकरितां जी वाढ व्हावयाची ती पूर्ण झालेली असते. जेव्हां परिस्थिति बदलते तेव्हां सामान्य प्रकारचे प्राणी नष्ट होतात व नवीन प्रकारचे प्राणी जिवंत राहतात.

### नवीन सृष्टि—

यानंतर प्रास्तर अवशेषांमध्यें एक फार मोठा दीर्घ काळाचा कप्पा आढळतो. हा काळ कोट्यवधि वर्षांचा असावा. त्यानंतरचे ज्या काळांतील प्रास्तर अवशेष आढळतात त्यांमध्यें फारच मोठा फरक झालेला आढळून येतो. उरोगामी प्राण्यांचें अथवा सरठ वर्गीय प्राण्यांचें युग संपलेलें असतें. त्या वेळचे डिनोसोर, प्लेसिओसोर, एक्थायोसोर व प्टेरोडॅक्टिल यांच्या अनेक जाती व अॅमोनाइट प्राण्यांचे सर्व वर्ग आणि जाती नष्ट झालेल्या असतात. यांचा नायनाट होऊन त्यांचे कोणीहि वंशज शिल्लक असलेले आढळत नाहींत. अतिशय थंडीमुळें ते मरून गेलेले असतात. यांना ह्या थंडींत जिवंत राहणें अशक्य झालें असतें. मध्यजीवनकालांतील सर्व जीवसृष्टि व वनस्पतिसृष्टि नष्ट

झालेली असते व आपणांस या जगतीतलावर नवीनच अधिक दमदार अशा तऱ्हेच्या वनस्पती व प्राणी दृष्टीस पडतात. पूर्वीचे सूचीपर्ण वृक्ष जाऊन त्यांच्या ठिकाणीं थंडीच्या दिवसांत पानें गाळून टाकून आपलें संरक्षण करणारे वृक्ष आढळतात, तसेंच पुष्पयुक्त झाडें आणि झुडपें दृष्टीस पडतात व सरपटणाऱ्या प्राण्यांच्याऐवजीं पक्षी व सस्तन प्राणी इतस्ततः भ्रमण करतांना दृष्टीस पडतात.

### अर्वाचीन युग—

या नवीन युगास कायनोझोइक अथवा अर्वाचीन युग असें म्हणतात. या काळांत ज्वालामुखींनीं फार उग्र स्वरूप धारण करून मोठी खळबळ उडवून दिली होती. याच काळांत आल्प्स, हिमालय, रॉकी आणि अँडीज यांसारखे पर्वत वर उंचावले होते. तसेंच सध्यां आपल्या दृष्टीस पडणारे महासागर आणि भूखंडें तयार झालीं होतीं. सामान्यतः पृथ्वीवर आज दृष्टीस पडणाऱ्या जमीन व पाणी यांच्या मर्यादा आजच्याप्रमाणें बहुतेक निश्चित झाल्या होत्या. या युगास आरंभ होऊन सुमारें ४ ते ८ कोटी वर्षें झालीं असावीं.

या नवयुगाच्या आरंभीं हवामान जरा कडक थंडीचें असावें. त्यानंतर तें हळूहळू उष्ण होऊं लागलें. परंतु पुनः एकदां हिमयुगाच्या आवर्तामध्यें पृथ्वी सांपडून अलीकडे ती आतां या हिमयुगाच्या पर्यायांतून हळूहळू बाहेर पडत आहे, परंतु आपणांस अद्यापि हवामानाचें पूर्ण ज्ञान झालें नसल्यामुळें यापुढील हवामान कसें राहील तें आज निश्चितपणें सांगतां येणें शक्य नाहीं. कदाचित् आपण एखाद्या अत्यंत उष्णयुगाच्या किंवा हिमयुगाच्या तावडींत सांपडणें शक्य आहे. तसेंच ज्वालामुखीचे पुनः स्फोट होऊन खळबळ माजण्याचा, किंवा पर्वतांची उंची वाढण्याचा किंवा कमी होण्याचा अद्यापहि संभव आहे. नुकताच १९३४ सालीं झालेला बिहारमधील भूकंप ज्यांनीं पाहिला असेल त्यांस अशा तऱ्हेच्या उत्पातांची थोडीफार कल्पना येईल. त्या भूकंपामुळें गंगेच्या खोऱ्यांत बरीच मोठी उलथापालथ झाली व हिमालयाचीहि उंची किंचित् वाढली असली पाहिजे. पूर्वीं झालेल्या भूकंपांच्या मानानें हा फारच अल्प प्रमाणांतील कंप होता. या बाबतींत अद्यापि शास्त्राची प्रगति पुरेशी झालेली नसून आपणांस निश्चित असें कोणतेंच अनुमान काढतां येत नाहीं.

### तृणाच्छादित भूमि—

या अर्वाचीन युगास आरंभ झाल्यावर प्रथमच आपणांस जमिनीवर तृण दिसूं लागतें, व त्यामुळें पृथ्वीच्या पाठीवर प्राण्यांस चरण्याकरितां कुरणें तयार झालेलीं आढळतात. त्याचबरोबर सस्तन प्राण्यांची बरीच वाढ होऊन अनेक जातींचे प्राणी या कुरणांमध्यें चरत असलेले दृष्टीस पडतात, व त्यांना भक्षण करणारे मांसाहारी प्राणीहि अनेक जातींचे आढळून येतात.

### उरोगामी व सस्तन प्राणी यांतील भेद—

प्राथमिक अवस्थेंतील या सस्तन प्राण्यांमध्यें व दीर्घ कालापूर्वी होऊन गेलेल्या उरोगामी, शाकाहारी आणि वनस्पत्याहारी प्राण्यांमध्यें आपणांस फारसा फरक आढळून येत नाहीं, असें वाटतें. परंतु प्रत्यक्ष वस्तुस्थिति पाहिली असतां या दोन कालांतील प्राण्यांच्या शरीररचनेमध्यें जरी आपणांस फारसा फरक आढळला नाहीं तरी त्यांच्या मनोरचनेमध्यें बराच मोठा फरक आढळून येतो. विशेषतः जन्य-जनक कोटीमध्यें म्हणजे प्राणी व त्यांचीं पिलें यांचा जो साहचर्यसंबंध आपणांस दिसून येतो त्या बाबतींत सस्तन प्राणी आणि पक्षी व पूर्वीचे उरोगामी अजस्र प्राणी यांच्यामध्यें पुष्कळच फरक आपणांस दृष्टीस पडतो. फार थोडे अपवाद सोडल्यास बहुतेक उरोगामी प्राणी आपलीं अंडीं यदृच्छेनें फुटून पिलें निर्माण व्हावीं अशा वृत्तीनें त्याबद्दल बेफिकीर असतात. उरोगामी प्राण्यास आपल्या मातापित्यांचें ज्ञान नसतें. तो फक्त व्यक्तिशः आपलीच काळजी घेतो व त्याचें आयुष्य आत्मनिष्ठच असतें. तसाच त्याचा इतर प्राण्यांशींहि संबंध आढळून येत नाहीं. तो कोणाचें अनुकरण करीत नाहीं. त्यांपासून कांहीं शिकत नाहीं. संघशक्तीनें कोणतेंहि काम करूं शकत नाहीं व त्याचें आयुष्य अगदीं एकाकी असतें. परंतु सस्तन प्राण्यांमध्यें आणि पक्ष्यांमध्यें आपल्या अपत्यांचें संरक्षण करण्याचें व त्यांचें पोषण करण्याचें कार्य त्यांच्या मातापितरांकडून होत असतें. ही गोष्ट पूर्वीच्या आणि या प्राण्यांमध्यें विशेष फरकानें दृष्टीस पडते. हे नवीन प्राणी अनुकरणानें शिकत असतात. तसेंच एकमेकांस शब्द काढून भयाची सूचना देतात. आपले संघ करून निरनिराळीं कार्यें करतात, परस्परांवर नियंत्रण ठेवूं शकतात व परस्परांपासून निरनिराळ्या गोष्टी शिकून घेतात. यामुळें एक ज्ञानग्राहक असा नवीन प्राणी या वेळीं उत्पन्न झाल्याचें आपणांस दिसून येतें.

अगदीं प्राथमिक अवस्थेंतील या अर्वाचीन युगांतील सस्तन प्राणी पूर्वीच्या मांसाहारी डिनोसोर प्राण्यांशीं तुलना करून पहातां यांचा मेंदू त्यांपेक्षां आकारानें फारसा मोठा आहे असें नाहीं. परंतु जसजसें आपण अर्वाचीन कालाकडे येऊं लागतों तसतसें आपणांस असें दृष्टीस पडतें कीं, प्रत्येक जातीच्या व वर्गाच्या सस्तन प्राण्यांच्या मेंदूच्या आकारांत एकसारखी वाढ होत आहे. उदा., आपणांस अगदीं प्राथमिक अवस्थेंत गेंड्यासारखे पशु आढळतात. तसेंच अगदीं आरंभींच्या काळांत

टिटॅनोथेरियम या नांवाचा एक प्राणी अस्तित्वांत होता. याचा आकार व आयुष्यक्रम बहुतेक अर्वाचीन गेंड्यासारखाच असे; परंतु त्याचा मेंदू गेंड्याच्या मेंदूच्या १/१० आकाराचा असल्यामुळें तो प्राणी लवकरच नष्ट झाला.

## अपत्यवात्सल्य व सांघिक जीवन—

आरंभींचे सस्तन प्राणी बहुतेक आपल्या मुलांच्या पोषणास आवश्यक असा काल म्हणजे त्यांस स्तनपान करण्याचा काल एवढ्याच अवधीपर्यंत त्यांच्याशीं सहवास करीत असत. परंतु हळूहळू परस्परांची ओळख होऊन एकमेकांचें मनोगत जाणण्याची शक्ति त्यांच्यामध्यें निर्माण झाली व परस्परसंहवासामुळें परस्परांस होणाऱ्या लाभाचीहि जाणीव झाली, त्यामुळें अनेक प्राण्यांमध्यें सामाजिक आयुष्यक्रम आचरण्याची कल्पना प्रादुर्भूत होऊन आपले कळप, थवे अथवा संघ तयार करून परस्परांचें संरक्षण करणें, परस्परांचें अनुकरण करणें, आणि एकमेकांस भयसूचक सूचना देणें, वगैरे क्रिया होऊं लागल्याचें दृष्टीस पडतें. या गोष्टी पूर्वींच्या; सपृष्ठवंश प्राण्यांमध्यें आढळून येत नाहींत. कांहीं उरोगामी प्राणी अथवा मत्स्य यांच्या टोळ्या किंवा घोळके केव्हां केव्हां दृष्टीस पडतात. परंतु तें केवळ त्यांची उत्पत्ति समुचयानें होते एवढेंच त्यांच्या एकत्र येण्यास कारण असतें. एकत्र सहवासाची व सांघिक जीवनाची कल्पना ही बाह्य कारणावर अवलंबून नसून आंतून उस्फूर्त झालेली असावी लागते. अर्वाचीन सस्तन प्राणी हे केवळ आपाततः एकत्र आलेले नसतात तर त्यांस परस्परांबद्दल आवड उत्पन्न होऊन ते एकत्र राहतात.

आपणांला सरीसृप अथवा उरोगामी प्राणी यांच्यामध्यें आढळणारा उत्कट प्रवृत्तींचा, उदाहरणार्थ, त्यांची भयंकर क्षुधा, भीति अथवा द्वेष यांचा उलगडा करतां येत नाहीं; कारण आपणांमध्यें प्रत्येक कृतीच्या मागें कांहीं तरी हेतु असतो. आपण केवळ सहजप्रवृत्तीनेंच कोणतेंहि काम करीत नाहीं. त्यांच्या क्रिया केवळ सहजप्रवृत्तीनेंच होत असतात, म्हणून त्या उत्कट असतात. सस्तन प्राणी आणि पक्षी यांच्यामध्यें आपल्या प्रवृत्तींचें नियमन आणि इतर व्यक्तींच्या भावनांबद्दल आदर, एक प्रकारची सामाजिक प्रवृत्ति आणि संयम या वृत्ती आढळून येतात. त्यामुळें आपण अनेक व्यक्तींशीं संबंध ठेवूं शकतों. इतरांच्या हालचालीमुळें आणि आक्रंदनानें आपल्या भावना जागृत होतात, तसेंच आपण इतर प्राण्यांच्या ठिकाणीं भावना व परस्पर सहानुभूतिक प्रवृत्ति उत्पन्न करून त्यांचें पालन करूं शकतों व परस्परांच्या संबंधाचें ज्ञान करून घेऊं शकतों. यामुळेंच आपणांस पशुपालनादि क्रिया करतां येतात.

ही मेंदूची असाधारण वाढ हाच अर्वाचीन युगांतील केंद्रबिंदु होय. यामुळें प्राण्यांतील परस्परांचे संबंध व परस्परावलंबन या गोष्टी सुलभ झाल्या आहेत. यामुळेंच मनुष्यांचे मोठमोठे समाज स्थापन झालेले आहेत.

जसजसा या अर्वाचीन युगाचा काळ लोटत गेला तसतसा आज आपल्या दृष्टीस पडणारे प्राणी व वनस्पती यांचा विकास होत गेला व त्यांची वाढ होत गेली. युइन्टाथेरीस व टिटॅनोथेरीस, इत्यादि ओबडधोबड व अगडबंब प्राणी हळूहळू नष्ट झाले व कांहीं अशा ओबडधोबड प्राण्यांपासून आपणांस आज आढळणारे जिराफ, उंट, हत्ती, घोडे, कुत्रे, सिंह, वाघ, इत्यादि प्राणी उत्पन्न झाले. अश्व या प्राण्याची उत्पत्ति भूस्तरशास्त्रज्ञांनीं फार बारकाईनें चित्रित करून ठेविली आहे. त्याप्रमाणेंच लामा आणि उंट यांचाहि विकास फार मनोरंजक आहे.

## प्राथमिक सस्तन प्राणी—

निसर्गशास्त्रवेत्ते सस्तन प्राण्यांचे अनेक वर्ग पाडतात. या सर्वांच्या आरंभीं प्राथमिक (प्रायमेटस्) हा वर्ग येतो. यामध्यें लेमूर, मर्कट, वानर व मनुष्य हे प्राणी येतात. हें वर्गीकरण केवळ त्यांच्या शारीरिक रचनेवरून करण्यांत आलेलें असून त्यांच्या मानसिक गुणांचा विचार केलेला नव्हता. या प्राथमिक वर्गांतील प्राण्यांचा जुना इतिहास भूस्तरशास्त्रास शोधून काढणें कठिण आहे. घोडे, उंट, वगैरे प्राण्यांप्रमाणें या प्राण्यांचे प्रास्तर अवशेष फारसे आढळत नाहींत. परंतु चार कोटी वर्षांपूर्वी लेमूर व मर्कट यांच्या पूर्वजांचा मेंदू लहान असावा व तो आजच्या वानराइतका मोठा नसावा असें वाटतें. यानंतर भूस्तरशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें एकंदर चार हिमयुगें झालीं व प्रत्येक दोन हिमयुगांमध्यें कांहीं मध्यंतरींचा काळ लोटला व त्यांत निरनिराळ्या प्राण्यांचे प्रचंड पूर्वज उत्पन्न होऊन नष्ट झाले. त्यांपैकीं पाणघोडा व हत्तीच्या पूर्वजांचे तसेंच वाघाच्याहि पूर्वजांचे तरवारीसारख्या दांतासारखे कांहीं अवशेष भूस्तरांतून आढळून येतात. पहिल्या हिमयुगाचा काल सहा लाख वर्षांपूर्वींचा असावा तर चवथ्या हिमयुगाचा काल पन्नास हजार वर्षांपूर्वीं होऊन गेला असावा. या अर्वाचीन युगाच्या मध्यकालमध्यें कांहीं अर्धवट मनुष्यासारखे प्राणी होऊन गेले असावे, परंतु आपणांस या अखेरच्या हिमयुगाच्या कालांतीलच कांहीं मानवविषयक अवशेष आढळून येतात, आणि हे अवशेष अस्थींच्या स्वरूपाचे नसून आयुधांच्या स्वरूपांत आढळतात. युरोपमध्यें सुमारें दहा लक्षांपासून पांच लक्ष वर्षांपूर्वींच्या काळांत कांहीं घांसून किंवा कोरून धार आणलेलीं गारेचीं व दगडाचीं आयुधें आढळतात. या दगडास अरुणोदयकालीन दगड किंवा नवप्रभातप्रास्तरायुधें (एओलिथ्स)

असें म्हणतात. हीं आयुधें करणाऱ्या लोकांचे अस्थि, वगैरे कांहीं अवशेष आढळत नाहींत. परंतु जावा बेटामध्यें या कालांतील अवशेषांत एका प्राण्याच्या कवटीचा तुकडा, कांहीं दांत व अस्थि आढळल्या. याच्या कवटींतील मेंदूची पोकळी आजच्या वानराच्या कवटीपेक्षां मोठी होती व तो ताठ उभा राहून चालत असे. यास चालणारा वानर ( पिथेकॅन्थ्रॉपस् इरेक्टस ) असें नांव देण्यांत आलें आहे.

## मानवसदृश प्राणी—

यानंतर सुमारें अडीच लाख वर्षांपूर्वींच्या कालापर्यंत येईतोंपर्यंत मानवसदृश प्राण्याचा कोठें पत्ता लागत नाहीं. परंतु त्याचीं आयुधें मात्र अधिकाधिक सांपडत असून तीं बरींच सुधारलेलीं दिसून येतात व तीं करण्यांत बरेंच चातुर्य दिसून येत असून तीं आजच्या मनुष्यानें केलेल्या आयुधांइतकीं चांगलीं दिसून येतात. यानंतर हायडेलबर्ग येथील एका वाळूच्या खड्डयामध्यें एका अर्धवट मनुष्याच्या जबड्याचें हाड आढळून आलें. यास हनुवटी मुळींच नव्हती व तें रुंद असून बरेंच जड होतें. यामुळें या स्थितींतील मनुष्यास स्पष्टपणें बोलतां येत असावें असें वाटत नाहीं. यावरून हा एक मानवी राक्षस असून त्याच्या अंगावर बरेंच केंस असावे व त्याचे अवयव बरेंच प्रचंड असावे. यास हायडेलबर्ग मनुष्य असें म्हणतात. नंतर पिल्टडाउन येथें एका प्राण्याचे अवशेष सांपडले; तो एक लाखापासून दीड लाख वर्षांपूर्वींचा असावा. या प्राण्याची कवटी आजच्या वानरासारखी असून चिंप्यांझीसारखा जबडा असावा. या मनुष्याच्या अवशेषाजवळ एक चोपणीसारखें घासलेलें हत्तीचें आंत छिद्र पाडलेलें हाड व एका हरणाचें खांचा पाडलेलें मांडीचें हाड सांपडलें. शास्त्रज्ञांनीं यास अरुणमानव अथवा नवप्रभातमानव (इओॲन्थ्रोपस्) असें नांव दिलें आहे. हा पूर्वींच्या मानवसदृश प्राण्यापासून अगदीं निराळा असावा. अशा तऱ्हेचा प्राणी यानंतर पुढें कधीं आढळला नाहीं, परंतु एक वर्षाच्या अलीकडील काळांत गारांचीं व दगडांचीं विपुल हत्यारें आढळलीं असून त्यांमध्यें कांहीं खरवडण्याचीं, कांहीं छिद्रें पाडण्याचीं, कांहीं चाकूप्रमाणें, कांहीं भाल्याप्रमाणें भोंसकण्यासारखीं, कांहीं दगड फेंकण्यासारखीं आयुधें आढळून आलीं.

## नियांडरथाल मानव—

यानंतर ५०।६० हजार वर्षांपूर्वी चौथ्या हिमयुगाचा कहर होण्यापूर्वीं एक इतका मानवसदृश प्राणी आढळून आला कीं, त्याला प्रथम लोक मानवच समजूं लागले. त्याच्या कवट्या व व अस्थी सांपडल्या असून त्यानें केलेलीं बरींच आयुधेंहि सांपडलीं आहेत. याला विस्तव पेटवितां येत असे. तो गुहेंत राहून शीतापासून आपलें संरक्षण करीत असे. तसेंच कातडीं कमावून अंगावर पांघरीत असे, आणि आजच्या मनुष्याप्रमाणें उजव्या हातानें काम करीत असे. तथापि मानवशास्त्रज्ञांच्या मतें तो खरा मानव नसून त्याच वर्गांतील एका निराळ्या जातीचा प्राणी होता. याचा जबडा पुढें आलेला असून त्याचें कपाळ खोल गेलेलें असे व भिवयांचीं हाडें डोळ्यांवर पुढें आलेलीं असत. आजच्या मनुष्याप्रमाणें त्याच्या हाताचे अंगठे इतर बोटांच्या समोर नसत. त्याची मान अशा तऱ्हेनें बसविलेली होती कीं, त्याला ती मागें वळवितां येत नसे किंवा उंच आकाशाकडे पाहतां येत नसे. तो बहुतेक खालीं मान घालून चालत असे. त्याची बसकी हनुवटी व जबडा हायडेलबर्ग मनुष्यासारखा असे व त्याच्या हातांतहि बराच फरक असे. त्यास सुळे नसत. त्याचा मेंदू जरी मोठा असला तरी तो मागच्या बाजूस मोठा असून पुढच्या बाजूस खालीं बसलेला असे; त्याची बुद्धि व शक्तिहि निराळी असून तो मनुष्यापासून भिन्न जातीचा असावा.

या जातीच्या मनुष्याच्या कवट्या व हाडें नियांडरथाल येथें आढळून आलीं त्यावरून यास नियांडरथाल मानव असें नांव देण्यांत आलें. या जातीचे प्राणी युरोप खंडांत कांहीं शतकें किंवा कांहीं हजार वर्षें वस्ती करून राहिले असावे.

त्या कालांत आपल्या पृथ्वीवरील हवामान व भूपृष्ठरचना अगदीं निराळ्या प्रकारची होती. युरोपच्या मध्यभागापर्यंत बर्फ पसरलेलें होतें. ब्रिटिश बेटें युरोप खंडास जोडलेलीं होतीं. भूमध्यसमुद्र व तांबडा समुद्र यांमध्यें पाणी नसून तीं पर्वतामधील मोठीं खोरीं होतीं, व काळ्या समुद्रापासून दक्षिण रशिया व मध्य आशिया यांस व्यापणारा एक भूम्यंतर्गत समुद्र पसरलेला होता. स्पेन, वगैरे दक्षिण युरोपांतील भाग जो पाण्यावरती होता त्याची हवा अतिशय थंड होती. फक्त उत्तर आफ्रिकेमध्यें त्या वेळीं समशीतोष्ण हवा असावी. दक्षिण युरोपमध्यें त्या वेळीं हत्ती, गेंडा, बैल व रेनडियर यांच्यासारख्या जातींचे व केंसाळ प्राणी भटकत असून ते हवामानाप्रमाणें दक्षिणेकडे अथवा उत्तरेकडे असलेल्या कुरणांत चरत असत.

अशा परिस्थितींत नियांडरथाल जातीचा मनुष्य फिरत असून बहुधा फळेंमुळें व झाडपाला खाऊन राहत असावा. तो बहुतेक शाकाहारी असावा असें त्याच्या दांतांच्या घडणीवरुन दिसतें. परंतु त्याच्या गुहांमध्यें कांहीं प्राण्यांचीं हाडेंहि आढळलेलीं आहेत. तो आपली शिकार भाल्याच्या साहाय्यानें किंवा जमिनींत खड्डे खणून त्यांत इतर प्राणी पडतील अशी तजवीज करून करीत असावा. तो बहुधा कांहीं पशु पाळीत असावा.

त्याच्या अंगावर बरेच केस असावे. तो अगदीं ताठ उभ्यानें चालत असे किंवा नाहीं याबद्दल शंका आहे. तो एकाकी किंवा कुटुंब करूनहि राहत असेल. त्याच्या जबड्याच्या आकारावरून त्यास बोलतां येत नसावें असें दिसतें.

### क्रोमॅग्नन व ग्रिमाल्डी मानव—

हजारों वर्षे युरोपमध्यें हे नियांडरथाल लोक राहत असावे, त्यानंतर सुमारें ३०।३५ हजार वर्षांपूर्वी हवामान जसजसें उष्ण होत गेलें तसतशी एक अधिक सुबुद्ध, ज्ञानवान्, बोलतां येणारी व एकत्र सहवास करून राहणारी अशी मानवजात दक्षिणेकडील प्रदेशांत आली. या नवीन लोकांनीं या नियांडरथाल लोकांस त्यांच्या गुहांतून व आश्रयस्थानांतून बाहेर घालवून लाविलें, त्यांच्यासारखेच ते शिकार करून राहूं लागले व त्यांनीं बहुतेक युद्धामध्यें या लोकांस मारून नाहींसें केलें. हे दक्षिणेकडून किंवा पूर्वेकडून आले हें नक्की कळत नाहीं. परंतु हेच लोक खऱ्या मानवाचे पूर्वज असावे. त्यांच्या कवटींतील मेंदूची पोकळी, त्यांच्या हातांचे अंगठे, मान व दांत, इत्यादि शारीरिक रचना अगदीं आजच्या मानवाप्रमाणें होती. क्रोमॅग्नन आणि ग्रिमॉल्डी या दोन ठिकाणीं बरेचसे अस्थींचे सांपळे सांपडले आहेत व ते आतांपर्यंत सांपडलेल्या अवशेषांत सर्वांत जुने आणि प्रथमच सांपडलेले अवशेष आहेत यांत कांहीं शंका नाहीं.

या वेळीं सृष्टीची रचना बरीचशी आजच्यासारखी झालेली होती. तथापि हवामान अजूनहि कडाक्याच्या थंडीचें होतें. हिमयुगांतील युरोपांतील हिमनद्या आतां हळूहळू ओसरूं लागल्या होत्या. फ्रान्स व स्पेनमधील रेनडियर नाहींसे होऊन त्यांच्या ठिकाणीं डोंगरावर जसजसें गवत उगवूं लागलें तसतसे घोड्यांचे कळप चरूं लागले. हत्तीच्या पूर्वजासारखे अजस्र प्राणी हळूहळू नष्ट होत गेले.

### ऱ्होडेशियन मनुष्य—

खऱ्या मनुष्याची उत्पत्ति प्रथम कोठें झाली हें अद्यापि निश्चितपणें ठाऊक झालेलें नाहीं. तथापि दक्षिण आफ्रिकेमध्यें ब्रोकनहिल ह्या ठिकाणीं १९२१ मध्यें एका अस्थिपंजराचे कांहीं तुकडे आढळले. त्यांवरून आजचा मनुष्य व नियांडरथाल मनुष्य यांच्यामधील अवस्थेतील हा तिसराच एक मनुष्य असावा असें वाटूं लागलें. याच्या मेंदूच्या पोकळीवरून तो पुढच्या बाजूस मोठा व मागच्या बाजूस नियांडरथाल मनुष्यांपेक्षां लहान असावा असें वाटतें. डोक्याची कवटी पाठीच्या कण्यावर अगदीं उभी ताठ बसविलेली होती, तसेंच दांत व इतर हाडें अगदीं मनुष्यासारखीं दिसून आलीं; परंतु चेहरा मात्र वानरासारखा दिसत असावा. कारण भिवयांचीं हाडें पुढें आलेलीं व मोठीं असून डोक्याच्या कवटीवर एक उन्नत रेषा मध्यावर आढळून आली. हा प्राणी मनुष्यासारखाच परंतु वानरासारख्या चेहऱ्याचा असावा. यास ऱ्होडेशियन मनुष्य म्हणतात, व तो नियांडरथाल मनुष्यापेक्षां आजच्या मनुष्याशीं अधिक सदृश दिसून येतो.

### मानवाचा विकास—

आतांपर्यंत सुमारें तीस हजार वर्षें किंवा त्यापूर्वींचे मनुष्याचे अवशेष—उदा., त्याच्या अस्थि, आयुधें, त्यानें अस्थि अथवा खडक यांवर कोरलेल्या आकृति, गुहांतील चित्रें, वगैरे गोष्टी—युरोपमध्यें फ्रान्स, स्पेन या देशांत विपुलतेनें आढळले आहेत. परंतु अद्यापि आशिया व आफ्रिका या खंडांतील पुष्कळच प्रदेशांवरून आतांपर्यंत मनुष्य चालूनही गेला नाहीं. त्यामुळें आज उपलब्ध असलेल्या एवढ्याच साहित्यावरून मानवाची उत्पत्ति प्रथम कोठें झाली हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. आशिया व आफ्रिका या खंडांत किंवा आज जेथें समुद्र पसरलेला आहे त्याच्या तळाशीं खऱ्या मनुष्याचे अवशेष सांपडण्याचा संभव आहे. अमेरिका खंडामध्यें मात्र फक्त एक दांताखेरीज प्राथमिक अवस्थेतील मनुष्य किंवा अजस्र वानर, मानवसदृश प्राणी, किंवा नियांडरथाल, वगैरे कोणत्याच प्रकारच्या प्राण्यांचे अवशेष आढळून आले नाहींत. हा मानवप्राण्याचा विकास बहुधा जुन्या जगामध्येंच झालेला असावा, व हा सर्व विकास बहुधा पूर्व अश्मायुधयुगाच्या अखेरीस पूर्ण होऊन त्या कालीं मनुष्यानें बेहरिंग सामुद्रधुनीच्या पलीकडे प्रवास करून अमेरिका खंडांत वस्ती केली असावी.

युरोपमध्यें आढळणाऱ्या खऱ्या मानवांचे सामान्यतः दोन भिन्न वंश मानण्यांत येतात. त्यांपैकीं एका वंशांतील लोक अधिक उच्च प्रतीचे होते. ते उंच असून त्यांचा मेंदू बराच मोठा होता. तत्कालीन एका स्त्रीची कवटी सांपडली आहे. तींतील मेंदूची पोकळी आजच्या सामान्य मनुष्याच्या पोकळीपेक्षां मोठी असल्याचें दिसून आलें आहे. एका मनुष्याचा अस्थिपंजर सहा फुटांपेक्षां अधिक उंच दिसून आला. त्याच्या शरीराची रचना उत्तर अमेरिकेंतील इंडियन मनुष्याच्या शरीराप्रमाणें असावी. हे हाडांचे सांपळे प्रथम क्रोमॅग्नन दरीमध्यें आढळल्यामुळें त्यास कोमॅग्नाडे असें म्हणतात. ते जरी रानटी अवस्थेंत होते तरी उच्च कोटीचे होते. दुसऱ्या वंशांतील लोकांचे सांपळे ग्रिमाल्डी येथील दरींत आढळले. ते स्पष्टपणें निग्रो वंशाचे असावे. या वंशाशीं सदृश मानवजाती म्हटल्या म्हणजे दक्षिण आफ्रिकेंतील बुशमेन व हॉटेन्टॉट या होत. मानवजातीचा उदय होण्याच्या कालींच मानवामध्यें दोन मुख्य वंशांमध्यें विभागणी

झाली असावी ही गोष्ट विशेष आश्चर्यकारक आहे. त्यापैकीं पहिली पिंगट वर्णाची असून ती पूर्व किंवा उत्तरेकडून आली असावी. दुसरी जात कृष्ण वर्णाची असून तिची उत्पत्ति भूमध्यप्रदेशांत झाली असावी.

**मानवाचीं आयुधें व कलाकौशल्य—**

या लोकांचीं बरींचशीं आयुधें व त्यांनीं केलेल्या वस्तू आपणांस पदार्थसंग्रहालयांत ठेवलेल्या दृष्टीस पडतात. त्यांमध्यें त्यांनीं केलेले गळ्यांत घालावयाचे हार, अस्थी किंवा दगड यांत कोरलेल्या मूर्ती, प्राण्यांचीं केलेलीं चित्रें हीं दिसून येतात. ते राहत असलेल्या दऱ्यांतून किंवा खडकावर चित्रेंहि काढीत किंवा कोरीत असत. हे बहुतेक शिकार करून राहत. व त्याकरितां घोडे व गवे यांच्या पाठीमागून भटकत. त्यांस हत्तीचा पूर्वज ( मॅमथ ) ठाऊक असावा. कारण त्यांनीं त्याचीं चित्रें काढलेलीं आढळतात. ते त्यास खड्ड्यांत पाडून मारीत असावे. ते भाल्याच्या साहाय्यानें व दगड फेंकून शिकार करीत असत. त्यांच्याजवळ बहुधा धनुष्य नसावें, व ते पशुपालनहि शिकले नव्हते. कुत्राहि त्यांनीं बाळगलेला आढळत नाहीं. ते आपणांस राहावयाकरितां घरें बांधीत असावे, असें दिसत नाहीं. कदाचित् कातड्याचे तंबू करीत असावे. जरी ते मातीच्या आकृती तयार करीत, तरी मातीचीं मडकीं तयार करण्याची कला त्यांस अवगत नसावी. ते अन्न शिजवून खात असावे. परंतु यासंबंधीं कांहीं अवशेष आढळत नाहींत. त्यांना शेतकी, टोपल्या विणणें, किंवा कापड विणणें माहीत नसावें. ते कातडीं पांघरीत व अंगास रंग लावीत असावे.

हे लोक सुमारें दहा हजार वर्षे युरोपमधील पठारावर शिकार करून राहत असावे, व त्यानंतर हवामान बदलल्यामुळें दुसरीकडे गेले असावे. युरोपमधील हवामान शतकानुशतकें उष्ण व सर्द होत होतें. त्यामुळें रेनडियर हा प्राणी उत्तरेकडे व पूर्वेकडे गेला. त्यांच्या मागोमाग घोडे व गवेहि चालते झाले. युरोपांतील पठारावर अरण्यें वाढलीं व त्यांमध्यें हरणें, घोडे व गवे राहूं लागले. या वेळीं मनुष्याच्या हत्यारांमध्येंहि फरक झालेला दिसून येतो. या काळांत मनुष्य नदी व तळीं यांतून मासे मारून उपजीविका करूं लागला. हाडांचीं हत्यारें अधिक कौशल्ययुक्त व सूक्ष्म बनवूं लागला. या वेळीं तो हाडांच्या इतक्या चांगल्या सुया करण्याचें शिकला कीं, त्याच्यानंतरच्या काळांतहि, एवढेंच नव्हे तर रोमन काळांतहि इतक्या चांगल्या सुया आढळत नाहींत.

**अझीलियन लोक—**

यानंतर सुमारें १५ ते २० हजार वर्षांपूर्वी एका नवीन जातीचे लोक दक्षिण स्पेनमध्यें आलेले दिसतात. त्यांचीं चित्रें तेथील खडकावर आढळून येतात. त्यांस मास डी अझील या नांवाच्या गुहेवरून अझीलियन असें नांव देण्यांत आलें आहे. ते धनुष्याचा उपयोग करीत असत. पिसें लावलेलीं शिरोभूषणें घालीत. ते चित्रें चांगलीं काढीत.

या जातीचे मनुष्य म्हणजे प्राचीन अश्मायुधयुगांतील ( पॅलिओलिथिक किंवा ओल्ड स्टोन एज ) अखेरचे मानवप्राणी होत. हे फक्त दगडांचीं हत्यारें वापरीत म्हणून त्यांस हें नांव देण्यांत येतें. सुमारें १०।१२ हजार वर्षांपूर्वीं युरोपमध्यें नवीनच आयुष्यक्रम दृष्टीस पडतो. या कालांत मनुष्यास आपलीं दगडाचीं हत्यारें गुळगुळीत करतां येऊं लागलीं व घासतां येऊं लागलीं; व संस्कृतीचा आरंभ झाला. या वेळीं नवअश्मायुधयुग ( निओलिथिक किंवा न्यू स्टोन एज ) यास प्रारंभ होत होता.

**टॅस्मानियांतील प्राथमिक मानव—**

या ठिकाणीं ही गोष्ट नमूद करून ठेवली पाहिजे कीं, सुमारें शंभर वर्षांच्याहि अलीकडे टॅस्मानिया बेटामध्यें एक मानवाची जात अशा अवस्थेंत आढळण्यांत आली कीं, त्याची शरीररचना व बुद्धीची वाढ वर वर्णन केलेल्या अगदीं आद्यमानवजातीच्या लोकांपेक्षांहि कमी झालेली होती. हे टॅस्मानियांतील लोक फार दीर्घकाळापूर्वींच भौगोलिक रूपांतरामुळें इतर मानवजातीपासून पृथक् केले गेले होते, आणि त्यामुळें त्यांच्यांत इतर मानववंशाप्रमाणें सुधारणा किंवा चैतन्य उत्पन्न झालें नाहीं. त्यांची उन्नति होण्याच्याऐवजीं उलट अवनतिच होत गेली. युरोपीय लोकांस जेव्हां ते प्रथम आढळून आले तेव्हां ते कालवें व बारीकसारीक प्राण्यांची शिकार करून आपली उपजीविका करीत असत. ते राहण्याकरितां घरें बांधीत नसत तर केवळ बसण्यापुरेशा त्यांच्या जागा असत. ते खरे मानवजातीचे प्राणी होते. परंतु त्यांना कोणतेंहि हस्तकौशल्य अवगत नव्हतें किंवा कोणत्याहि कला येत नव्हत्या. कारण ऑस्ट्रेलिया हा भूखंड उत्तर गोलार्धांतील भूखंडापासून या मानवाच्या प्राथमिक अवस्थेंतच अलग पडला होता. त्यामुळें व त्यांतल्या त्यांत हा मानव एका लहान द्वीपरूपी भूखंडामध्यें राहिल्यामुळें त्याचा इतर मानवजातीशीं संबंध राहिला नाहीं. त्यामुळें साहचर्याभावीं तो एकाकी राहिला. इतर भूखंडामध्यें ज्या सुधारणा झाल्या त्या त्याच्यापर्यंत पोंचल्या नाहींत म्हणून त्याच्या आयुष्यक्रमाचा विकास न होतां तो असंस्कृत स्थितींतच राहून गेला होता.

**सजीव सृष्टिविकासांतील कालखंड—**

सजीव सृष्टीच्या विकासांतील कालखंडांचें आतां आपण एकदां सिंहावलोकन करूं म्हणजे अजीव सृष्टीपासून आजच्या बुद्धिमान् मानवाच्या विकासापर्यंत किती दीर्घकाल लोटला

आहे व जीवसृष्टीस किती निरनिराळ्या अवस्थांतून जावें लागलें आहे हें एकसमयावच्छेदेंकरून आपल्या लक्षांत येईल.

(१) प्रथम अजीव (अझोइक) सृष्टीचा काल किती दीर्घ होता याची आपणांला कल्पना करतां येत नाहीं.

(२) त्यानंतर, प्रारंभिक जीवकाल (आर्किओझोइक) किंवा आदिजीवकाल हा एकपेशीमय जीवांचा असून त्याचा अवधि शंभर कोटी वर्षांचा असावा.

(३) त्यानंतर जीवनारंभिक (प्रोटरोझोइक) किंवा जीवकाल हा अपृष्ठवंशीय प्राण्यांचा काल येतो. त्याची मर्यादा साठ कोटी वर्षांची असावी.

(४) त्यामागून पूर्वजीवयुग किंवा प्राचीन जीवयुग (पॅलिओझोइक) अथवा मत्स्ययुग होऊन गेलें. यामध्यें (अ) कॅम्ब्रिअन अथवा कवचयुक्त किंवा शिंपयुक्त मत्स्यकाल, (आ) ऑर्डोव्हिशिअन अथवा संरक्षक कवचयुक्त म्हणजे खवलेयुक्त मत्स्यकाल, (इ) सिल्युरियन अथवा सफुफ्फुस मत्स्यकाल, (ई) डेव्होनियन अथवा भूजलचर प्राणिकाल, व (उ) कर्बसंयुक्तयुग (कार्बोनिफेरस) अथवा उरोगामी प्राणिकाल, हे होऊन गेले. या सर्वांचा कालावधि छत्तीस कोटी वर्षांचा असावा. या कालाच्या अखेरीस प्राचीन जीवांचा संहार होऊन जमिनीवरील सरट उत्पन्न झाले असावे.

(५) वरील कालाच्यानंतर मध्यजीवकाल (मेसोझोइक) अथवा सरटकाल येतो. यामध्यें पुन्हां (अ) त्रिस्तरयुग (ट्रिआसिक) अथवा डिनोसोर काल, (आ) गोल सुधाश्मयुग (जूरासिक) अथवा पाक्षिकाल, (इ) खटिकयुग (क्रेटेशिअस) अथवा खड्डूचा काल हे विभाग पडतात. या वेळीं महासरटांचा अंत होऊन प्राथमिक सस्तन प्राणी उत्पन्न होतात. या कालाचा अवधि पंधरा कोटी वर्षांचा असावा.

(६) यानंतर अर्वाचीन जीवकाल (केनोझोइक) किंवा सस्तन प्राणिकाल येतो. याचे पुन्हां (अ) नवप्रभात (एओसीन) अथवा प्राथमिक सस्तन प्राणिकाल, (आ) नवपूर्वेतर अथवा नवजलजकाल (ऑलिगोसीन) अथवा उच्च सस्तन प्राणिकाल, (इ) मध्यसांप्रत किंवा नवपूर्वयुग (मायोसीन) अथवा सस्तन प्राणि–पूर्णविकासकाल व (ई) नवनूतन (प्लायोसीन) अथवा मानवसदृश मर्कटकाल असे विभाग पडतात. हे सर्व मिळून चार कोटींचा कालावधि असावा. यानंतर याच कालांतील नूतनतम (प्लेस्टोसीन) अथवा हिमयुग किंवा सस्तन प्राणि–विकासावधिकाल हा एक विभाग येतो. याचा काल पांच लाख वर्षांचा असावा.

(७) यानंतर मानसयुक्त जीवकाल (सायकोझोइक) म्हणजेच बुद्धिवान् मानवाच्या आजच्या संस्कृतियुक्त कालाचा उदय होतो. याचा अवधि आतांपर्यंत पंचवीस हजार वर्षें इतका लोटला असावा.

अजीव सृष्टीपासून फार दीर्घ कालानंतर जीवकोटीची उत्पत्ति होऊन त्यानंतरहि बऱ्याच दीर्घ कालानंतर ज्याच्यामध्यें इतर कर्मेंद्रियांनंतर ज्ञानेंद्रियांची व मनाची वाढ झालेली आहे असा मानवप्राणी उत्पन्न झाला. निसर्गानें आपल्या विकास क्रमास अनुसरून हळूहळू पायऱ्या–पायऱ्यांनीं या सृष्टीचा याप्रमाणें अनेक युगांनंतर वर्तमानकालीन विकास घडवून आणला आहे. या सर्व घडामोडींस किती दीर्घ काल लागला याची वर थोडक्यांत कल्पना दिली आहे. ही केवळ कल्पनाच आहे. कारण याला निश्चित असें कांहीं मान लावणें शक्य नाहीं.

एवढें असूनहि या सृष्टिक्रमांत ज्या क्रमानें जीवकोटीचा विकास होत गेला त्या सर्व अवस्थांचें स्वरूप प्राण्याच्या गर्भाची वाढ होत असतांना आपण निरीक्षण केलें असतां आपल्या सहज दृष्टीस पडते. याप्रमाणें या सर्व घडामोडींचा इतिहास इतक्या अल्प मानाच्या आदर्शांत आपणांस सांठविलेला आढळतो. व प्राण्याच्या व विशेषतः मनुष्याच्या गर्भाला या सर्व जीवकोटींतलि निरनिराळ्या अवस्थांमधून आजहि प्रवास करावा लागतो व त्याचें निरनिराळ्या गर्भावस्थांमध्यें वर निर्दिष्ट केलेल्या भिन्न भिन्न अवस्थांतील प्राण्यांशीं भिन्न भिन्न कालीं सादृश्य असतें. याप्रमाणें या अल्प नऊ महिन्यांच्या कालांत सर्व जीवसृष्टीच्या विकासाचा इतिहास आपणांस सांठवून ठेवलेला आढळून येतो.

## सिंहावलोकन—

याप्रमाणें आतांपर्यंत आपण या प्रचंड विश्वासंबंधीं व त्याच्या उत्पत्तीविषयीं मनुष्याच्या काय कल्पना होत्या; मनुष्याचें या बाबतींत कुतूहल जागृत होऊन या विश्वोत्पत्तीसंबंधीं त्याच्या मनांत कोणते प्रश्न उत्पन्न होत गेले व त्यांचीं उत्तरें त्यानें कशीं दिलीं हें आपण *भारतीय वैदिक कालापासून पौराणिक* कालापर्यंत व्यक्त केलेल्या निरनिराळ्या ठिकाणच्या आधारांवरून अवलोकन केलें. त्यानंतर जगांतील इतर *ईजिप्ती, असुरी, इराणी, चिनी, जपानी, ख्रिस्ती व महंमदी, वगैरे लोकांच्याहि या* बाबतींत काय कल्पना होत्या त्यांचें विहंगमावलोकन केलें. त्यानंतर मानवामध्यें शास्त्रीय दृष्टि कशी उत्पन्न झाली व त्यानें गणितशास्त्राचा पाया कसा घातला व त्यापासून पुढें ज्योतिःशास्त्राची कशी उत्पत्ति झाली व त्यामुळें विश्वसंस्थेचें स्वरूप आजकालच्या परिणतावस्थेंतील ज्योतिःशास्त्राच्या साहाय्यानें आपणांस कसें ज्ञात करून घेतां येतें व सर्व विश्वसंस्था ही केवढी मोठी प्रचंड असून ती कशी अनंत अशा अंतराळांत व अनंत अवकाशांत स्थित असून तीहि कशी गतिमान् असावी याबद्दल

आजकालच्या शास्त्रज्ञांचे विचार कोणत्या मर्यादेपर्यंत पोंचले आहेत व नवीन उपलब्ध होणाऱ्या शास्त्रीय उपकरणांच्या साहाय्यानें व त्यामुळें होणाऱ्या संशोधनानें व शास्त्रांमध्यें होणाऱ्या प्रगतीमुळें या अवाढव्य विश्वाची कल्पना किती व्यापक होत जात आहे, हेंहि आपण थोडक्यांत अवलोकन केलें. त्यानंतर अशा या अमर्याद अन्तरिक्ष-सागरामध्यें आपली सूर्यमाला ही कशी एखाद्या जलबिंदुवत् अल्प प्रमाणाची असून ती एखाद्या तेजोमेघापासून कशी उत्पन्न झाली असावी व या सूर्यमालेंत केन्द्रवर्ती सूर्यासभोंवतीं ग्रह व उपग्रह हे तयार होऊन आपल्या कक्षांतून सतत भ्रमण करीत राहून हें सृष्टिचक्र कसें चालू ठेवीत आहेत याचेंहि अवलोकन आपण केलें. यानंतर या सूर्यमालेंतील पृथ्वी या एका ग्रहाची उत्पत्ति प्रथम वायुरूप, नंतर जलरूप व नंतर भूजलयुक्त अशी होऊन तिला स्थैर्य कसें प्राप्त झालें असावें व तीवर प्रथम जलचर व नंतर जलस्थलचर, नंतर उरग, नंतर विहग व नंतर पादचर असे प्राणी कसकसे तयार झाले असावे व त्याच वेळीं निरनिराळ्या प्रकारच्या वनस्पती कशा तयार झाल्या असाव्या याचेंहि आपण अवलोकन केलें व तें करीत असतां निरिंद्रिय सृष्टीपासून सेंद्रिय सृष्टीचाहि विकास कसा झाला असावा व यांतील अभेद्य असें अन्तर आतां कसें नष्ट झालें आहे याचीहि थोडीशी माहिती आपण करून घेतली व या सजीव सृष्टीचा विकास होत असतां निरनिराळ्या पायऱ्यांनीं तो कसा होत गेला हेंहि आपण पाहिलें.

याप्रमाणें आद्य मूलतत्त्वांपासून सजीव सृष्टि व त्या सजीव सृष्टींत प्राथमिक अवस्थेंतील जिवाणूपासून हळूहळू आंजचा निरनिराळ्या कार्यक्षम व उपयुक्त अशा अवयवांनीं युक्त व मेंदूची पूर्ण वाढ झाल्यामुळें बुद्धियुक्त व विचार करण्याचें सामर्थ्य असलेला असा हा मानवप्राणी प्राण्यांची निरनिराळ्या अवस्थांत रूपांतरें होत असतां पूर्णत्वाप्रत जाऊन कसा उत्पन्न झाला, एवढेंच नव्हे तर त्याच्या ठिकाणीं असलेली सामाजिक भावना, साहचर्यकल्पना, परस्परांबद्दल सहानुभूति, स्ववंशरक्षणाची आतुरता, त्याकरितां अवश्य असलेलें वात्सल्य व अपत्यप्रेम व आपला आयुष्यक्रम अधिकाधिक विकसित करून घेण्याची आकांक्षा, इत्यादि नवीन नवीन प्रवृत्ति कशा निर्माण झाल्या व त्या त्याच्या संचारामुळें सांघिक जीवन, साहचर्य, परस्पर देवघेव परस्पर सहानुभूति, इत्यादि गुणांमुळें कशा विकास पावल्या, याचें दिग्दर्शन करून त्या जेथें वाढीस लागल्या नाहींत तेथें मानवप्राण्याचा विकास कसा कुंठित झाला हेंहि टास्मानियाच्या उदाहरणावरून दाखवून दिलें आहे.

याप्रमाणें या विभागाच्या प्रस्तावनेंत सृष्ट्युत्पत्तीपासून मानवोत्पत्तीपर्यंतचा विश्वविकास वर्णन करण्यांत आला आहे. यानंतर यापुढील भागांच्या प्रस्तावनांत हेंच कथासूत्र पुढें चालवून प्रथम या भूगोलाच्या स्वरूपाची पाहणी करून त्यावरील निरनिराळ्या प्रदेशांतील नैसर्गिक परिस्थिति व हवामान यांचें वर्णन करून त्या अनुरोधानें मानवाची प्रगति त्या त्या भूभागांत कसकशी होत गेली व त्यानंतर निरनिराळ्या ठिकाणच्या प्रादेशिक संस्कृति भिन्न भिन्न कालीं कशा विकसित होऊन पुढें लय पावल्या व मानवाचा या भूमीवरील इतिहास कसा घडत गेला याचें अवलोकन करून आज जगांतील संस्कृति कोणत्या पायरीवर आहे व ही पायरी गांठण्यास मानवानें आपल्या बुद्धीच्या सामर्थ्यानें निरनिराळ्या शास्त्रांमार्फत ज्ञानाची वाढ कसकशी केली आहे, याचें सर्व शास्त्रांच्या इतिहासांचें अवलोकन करून आपणांस ज्ञान करून घ्यावयाचें आहे व त्यानंतर मानवाचें या जगतामध्यें ध्येय काय असावें, तें साध्य करण्याकरितां निरनिराळे मानवसंघ काय काय प्रयत्न करीत आहेत, आपल्या समाजाचा व आपल्या सामाजिक, राजकीय, वगैरे संस्थांचा विकास कसा घडवून आणीत आहेत व कोणतीं सामाजिक तत्त्वें निर्माण करीत आहेत, यांकडे लक्ष देऊन सर्व विश्वांतील मानवप्राण्याचें आयुष्य अधिक प्रगत, समृद्ध, सुखकारक व बौद्धिक शक्तींचा व ज्ञानाचा अधिकतम उपयोग करून शांततामय व सौख्यमय कसें करतां येईल. यासंबंधीं आतांपर्यंतच्या व आजकालच्या तत्त्ववेत्त्यांचा काय विचार आहे यांचें ज्ञान करून घ्यावयाचें आहे व अशा रीतीनें या विश्वकोशाबरोबरच या विश्वविकासाची कथा पूर्ण होणार आहे.

**आभार—**

ही प्रस्तावना लिहितांना अनेक निरनिराळ्या ग्रंथांचें साहाय्य घेण्यांत आलें आहे, त्यांचे आभार मानणें अवश्य आहे. यापुढील विभागांचीहि प्रस्तावना लिहिण्याच्या कामीं अनेक ग्रंथांचा व अनेक व्यक्तींच्या माहितीचा उपयोग करून घ्यावा लागणार आहे. त्यांत कदाचित् पुन्हां पुन्हां त्याच नांवांचा उल्लेख करावा लागणार आहे. याकरितां सर्व प्रस्तावना संपूर्ण झाल्यावरच या ऋणाचा निर्देश करून आभार-प्रदर्शन करणें युक्त होईल असें वाटतें व त्याचबरोबर या विषयाच्या अभ्यासास उपयुक्त अशा ग्रंथांचीहि यादी देण्याचा विचार आहे. याकरितां येथें विशिष्ट ग्रंथ अथवा त्यांचा नामनिर्देश करण्यांत आला नाहीं तरी त्यांचे मोघम स्वरूपांत का होईना पण आभार व्यक्त करण्यांत येत आहेत.

पुणें.
८-१-४९

—यशवंत रामकृष्ण दाते
—चिंतामण गणेश कर्वे

## प्रकाशकाचें निवेदन

सुलभ विश्वकोशाचा पहिला भाग आज प्रसिद्ध होत आहे. राहिलेले पांच भाग तीन ते चार महिन्यांच्या अंतरानें क्रमशः प्रसिद्ध होतील. अशा तऱ्हेनें सुलभ विश्वकोशाचें संपूर्ण प्रकाशन उशिरांत उशिरां मे १९५० अखेरपर्यंत पूर्ण व्हावें, अशी आजची योजना आहे. ग्रंथाचें संपादन पूर्ण झालें असून राजगुरु प्रेसनें छपाईकामाकरितां स्वतंत्र खातेंच ठेविलें आहे. ग्रंथांतील चित्रांकरितां मधून मधून खोटी होते म्हणून सर्व चित्रें व त्यांचे ब्लॉक अगोदर तयार करून मगच काम एकदम चालू करावें असें ठरविलें आहे. तेव्हां लागलीच छपाईचें काम चालू न करतां फेब्रुवारीअखेर सर्व चित्रें व ब्लॉक तयार होतांच, विश्वकोशाच्या दुसऱ्या भागाच्या छपाईस सुरुवात होऊन मेअखेर दुसरा भाग प्रसिद्ध होईल; व मग पुढें मात्र राहिलेले भाग दर तीन ते साडेतीन महिन्यांच्या अंतरानें प्रसिद्ध होतील.

या कोशाचे संपादक श्री. य. रा. दाते व श्री. चिं. ग. कर्वे यांच्या अमोल सहकार्यानेंच या प्रचंड धाडसी प्रकाशनास मीं हात घातला आहे. माझे स्नेही व सुप्रसिद्ध आर्टिस्ट श्री. जि. भि. दीक्षित यांनीं या कोशांतील चित्रांचें काम आपुलकीनें केलें आहे. राजगुरु प्रेसशीं माझा व्यावहारिक कांहीं संबंध नसला तरी तो छापखाना मी माझ्या कार्याकरितां 'मालकी हक्का' सारखाच वापरीत असल्यामुळें त्यांचे आभार मानण्याचें कांहींच कारण नाहीं.

आतांपर्यंत वादविवेचनमाला, काळांतील निवडक निबंध, इत्यादि प्रकाशनांनीं मला यश दिलें म्हणून या विश्वकोशाच्या प्रकाशनाचें धाडस मी करीत आहें. यांतहि यश आल्यास आणखी बऱ्याच योजना आहेत; पण तें पुढें.

'प्रसाद-प्रकाशन'-
कार्यालय, पुणें.
८।१।१९४९

—यशवंत गोपाळ जोशी

# सुलभ विश्वकोश

भाग पहिला

★

## अ ते कालगणना

## अ

**अ**—देवनागरी व मराठी वर्णमालेंतील पहिलें अक्षर. शब्दाच्या आरंभीं हा वर्ण अभाव, राहित्य अशा अर्थी पुष्कळदां येतो. उदा० अनादर, अपार इ. ओम् (अ + उ + म्) या संज्ञेत विष्णु देवतेबद्दल अ योजलेला आहे.

ग्रीक अल्फा किंवा अरबी आलिफ् या प्रथम वर्णाप्रमाणें आपला अ आहे.

अ अक्षराची आकृति कशी तयार झाली हें पाहूं गेल्यास, या अक्षराला आजचें स्वरूप प्राप्त होण्यास निरनिराळ्या काळीं पांच अवस्थांतून जावें लागलें असें दिसेल. गिरनार येथील शिलालेखांत (खि. पू. ३ रें शतक) पहिली अवस्था (इंग्रजी उलट्या K अक्षरासारखी) आढळते.

**अइ**—आसाममधील एक नदी. भूतानमध्यें उगम. लांबी ९५ मैल. हींत मोठ्या ओझ्याच्या होड्या चालतात.

**अइजल**—आसाममधील लुशाई डोंगरी जिल्ह्यांतील एक पोटविभाग, व त्या विभागाचें व लुशाई जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या सुमारें चार हजार. पाऊस सरासरी ८० इंच. लष्करी ठाणें. हवा उत्तम व थंड आहे.

**अंक**–१, २, ३, ४ इत्यादि क्रमानें येणारे अंक हे पूर्णांक आहेत. कोणत्याहि पूर्णांकाला दुसऱ्या पूर्णांकानें भागावयाचें असल्यास अपूर्णांकाची जरूरी भासते. $\frac{६}{३} = २$ परंतु $\frac{६}{४} = १\frac{१}{२}$. ७ तून ३ वजा केले असतां बाकी चार राहते. परंतु ३ तून ७ वजा करावयाचे असल्यास ऋण अंकांची कल्पना आवश्यक होते. एक सरळ रेषा काढली

−४ −३ −२ −१ ० १ $\frac{३}{२}$ २ ३ ४ ५ ६ ७ ८

व तिच्या आरंभस्थानीं ० मांडलें तर उजव्या बाजूस सारख्या अंतरावर १, २, ३, वगैरे धन अंक व डाव्या बाजूला ऋण अंक दाखवितां येतील. याप्रमाणेंच अपूर्णांकहि पूर्णांकाचे जरूर तेवढे विभाग पाडून दाखवितां येतील. परंतु $क्ष^{२} = २$ असें समीकरण सोडवावयाचें असल्यास $\pm\sqrt{२}$ एवढ्या लांबीची रेषा काढतां येईल. परंतु पूर्णांकांनीं किंवा अपूर्णांकांनीं ती संख्या बरोबर लिहितां येणार नाहीं म्हणून ही एक नवीनच प्रकारची संख्या येते. अशा संख्येस अपरिमेय (incommensurable) अंक म्हणतात. हे सर्व वास्तविक (real) अंक आहेत. ह्या अंकांची उपपत्ति वर्तुळास अनुसरून डेडीकँड, वायरश्ट्रास, कँटॉर वगैरे गणितज्ञांनीं मांडली आहे.

**अंक**—संस्कृत परिभाषेंत रूपकाच्या एका प्रकारास म्हणजे एकांकी नाटकास अंक अशी संज्ञा आहे. यांतील कथाभाग पौराणिक अथवा काल्पनिक असतो. वृत्तींपैकीं सात्त्वती, आरभटी आणि कैशिकी या वृत्ति यांत नसतात (भरत १८·८ इ.). संधींपैकीं मुख आणि निर्वहण (भरत १९·४९) तेवढेच आढळून येतात. यांत प्रामुख्यानें करुणरस आढळून येतो. यांतील नायक देव नसून कोणत्याहि जातीचा असतो. कांहींच्या मतें तो प्राकृत

जन असला तरी चालतो. स्त्रीविरह अगर अशाच प्रकारच्या इतर गोष्टीहि यांत येतात. युद्ध, कलह इत्यादिकांचें वर्णनहि आढळतें. पण हे प्रकार रंगभूमीवर दाखविण्यांत येत नाहींत. नाटकामध्येंच जें उपनाटक असतें त्यालाहि अंक हें नांव आहे. 'बालरामायणा'च्या तिसऱ्या अंकांत याला 'प्रेक्षणक' हें अभिधान योजलेलें आहे; तसेंच भास्कर कवीच्या 'उन्मत्तराघव' नाटकामध्यें अशाच प्रकारचें एक प्रेक्षणक आढळतें. याला वास्तविक अंक म्हणतां येईल. लोकनाथभट्टाचें 'कृष्णाभ्युदय' हेंहि प्रेक्षणक या नांवानें संबोधिलें जातें. त्यालाहि अंक म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. साहित्यदर्पणामधील (६·२५२) 'शर्मिष्ठा-ययाती'च्या उल्लेखप्रसंगीं त्याला अंक म्हणण्यांत आलें आहे. याचप्रमाणें हरिमोहन प्रामाणिकाच्या 'कमलाकरुणाविलासा' संबंधानेंहि म्हणतां येईल.

**अंकगणित**—अंकगणित हें मूलतः अंकांचें शास्त्र आहे. बीजगणिताशीं ताडून पाहतां हें शास्त्र जास्त व्यवहारोपयोगी आहे असें दिसेल. ह्या शास्त्राच्या प्राथमिक आरंभासंबंधीं कांहींच माहिती मिळत नाहीं. प्राचीन ईजिप्शियन, ग्रीक आणि रोमन यांची वस्तु अथवा संख्या मोजण्याची पद्धति चमत्कारिक व भानगडीची असल्यामुळें त्या लोकांस ह्या शास्त्रांत फारच थोडी प्रगति करता आली. हिंदी दशमानपद्धति अरब लोकांमार्फत ज्या वेळीं युरोपमध्यें सुरू झाली त्यानंतरच या शास्त्राची विशेष प्रगति दिसून येते. ह्या पद्धतींत १, २, ३, ४, ५, ६, ७, ८, ९, ० ह्या अंकांच्या चिन्हांच्या साहाय्यानें या चिन्हांस स्वतःची व स्थानगत किंमत देऊन सर्व संख्या सुलभतेनें मांडतां येतात. ईजिप्त वगैरे देशांत अत्यंत प्राचीन अंकांचीं चिन्हें चित्राकृति असत. पण तीं गणितशास्त्राच्या प्रगतीच्या दृष्टीनें निरुपयोगी ठरलीं. खाल्डियन, हिब्रू, व ग्रीक लोक मुळाक्षरांचाच उपयोग अंकांचीं चिन्हें म्हणून करीत व १००,०००,००० एवढ्या मोठ्या संख्येपर्यंतहि संख्या त्यांनीं मांडून दाखविलेल्या आढळण्यांत आल्या आहेत.

आपण जे आंकडे घड्याळावर रेघांनीं काढलेले पाहतों ते रोमन आंकडे होत. त्यांत १, ५, १० हे स्वतंत्र आंकडे असून पांचाच्यापूर्वी एक मांडून ४ व पुढें एक मांडून ६ हे अंक दाखवितात. पन्नासबद्दल L हें अक्षर व शंभर व हजारांबद्दल C व D हीं अक्षरें वापरतात; पण मोठमोठे हिशोब करावयाचे झाल्यास हे अंक भानगडीचे व निरुपयोगी ठरतात.

सोळाव्या शतकांत दशांश अपूर्णांकांचा शोध लागला व घातांकांचा (Logarithms) शोध सतराव्या शतकांत लागला व त्यामुळें मोठमोठे गुणाकार-भागाकार फार सुलभतेनें करतां येऊं लागले.

भारतीय गणितज्ञांमध्यें भास्कराचार्य हे प्रसिद्ध आहेत. त्यांनीं आपल्या 'लीलावती' या नांवाच्या ग्रंथांत अंकगणिताचें विवरण केलें असून नियम दिलेले आहेत. त्यामध्यें बेरीज, वजाबाकी, गुणाकार व भागाकार हा पूर्ण अंकांचा त्याचप्रमाणें अपूर्णांकांचाहि कसा करावा त्याच्या रीती दिल्या आहेत. त्याचप्रमाणें वर्गमूळ, घनमूळ व श्रेढीव्यवहार यांचीहि माहिती अंकगणितांत आलेली आहे. यास पाटीगणित असेंहि म्हणत.

**अकॅडमिक पंथ**—प्लेटोचें तत्त्वज्ञान हें युरोपांत ९०० शें वर्षें अव्याहत चालू होतें, पण त्यास पुढें निरनिराळे फांटे फुटले. इतकीं वर्षें हें तत्त्वज्ञान एका परंपरेनें चालत आल्यामुळें युरोपच्या तत्त्वज्ञानवाङ्मयांत यास महत्त्वाचें स्थान आहे. प्लेटोच्या अनुयायांतील विद्वान् पंडितांनीं यांतील तत्त्वें व विचार यांस निरनिराळीं वळणें दिलीं. प्रथम त्यांतील प्रमाण मानलेलीं आध्यात्मिक तत्त्वें सुटून त्यांत कार्नेडीझचें नास्तिक मत व स्टोइकां (सुखदुःखाविषयीं उदासीन वृत्ति) चें मत यांचा समावेश झाला व त्यांतील प्रमाणवादाचें संभाव्यवादांत रूपांतर झालें. प्लेटो ते सिसरोपर्यंत या तत्त्वज्ञानांत पुढीलप्रमाणें स्थित्यंतर झालेलें आढळतें:—

(१) प्लेटोची कल्पनासृष्टीची उपपत्ति त्याच्या शिष्यांस मान्य नव्हती. वस्तूंचे गुणधर्म त्या वस्तूंच्या अस्तित्वास कारणीभूत होत नाहींत असें त्यांचें मत होतें.

(२) "सर्व वस्तूंमध्यें ऐक्य आहे व त्याच्या योगानें निश्चित ज्ञान मिळविण्यास मदत होते," हीं प्रमेयें सुटून अज्ञेयवादास सुरुवात झाली.

(३) कॉर्नेडीझच्या नास्तिकमताचा पुढें समावेश होऊं लागला.

(४) प्लेटोच्या अनुयायांनीं भिन्न तत्त्वें, शाखा व सरणी यांचें एकीकरण करण्याचा प्रयत्न केला.

**अकॅडमी**—(विद्यापीठ अथवा सरस्वतीमंदिर.) अथेन्स शहराजवळ ग्रीक वीर अकॅडीमस याच्या नांवानें एक बाग आहे. तेथें प्लेटोनें ५० वर्षें आपल्या अनुयायांस तत्त्वज्ञान शिकविलें म्हणून अकॅडमी याचा विद्यापीठ असा अर्थ झाला. व लक्षणेनें प्लेटोच्या तत्त्वज्ञानास अकॅडमिक पंथाचें तत्त्वज्ञान असें नांव पडलें. असलीं विद्यापीठें ईजिप्त, इटली, फ्रान्स, इंग्लंड, वगैरे देशांत निघालीं. इंग्लंडांतील रॉयल अकॅडमी १७६८ त स्थापन झाली आहे. आज अकॅडमी म्हणजे शास्त्र, कला किंवा वाङ्मय यांच्या अभिवृद्ध्यर्थ स्थापन झालेली उच्च अध्ययन-अध्यापनाची संस्था, असा अर्थ झाला आहे.

**अकंपन**—१. एक राजर्षि. यास हरि नांवाचा मोठा पराक्रमी असा एकच मुलगा होता. तो युद्धांत मरण पावल्यावर अकंपन शोक करीत असतां नारद ऋषींनीं मृत्यु अनिवार्य आहे, याविषयीं कथा सांगून त्याचें समाधान केलें.

२. एक रावणदूत राक्षस. राम—रावण युद्धांत मारुतीच्या हातून मरण पावला.

**अकबर** (१५५६–१६०५)— मोंगल घराण्यांतील तिसरा बादशहा. संपूर्ण नांव जलालुद्दीन महंमद अकबर. उमरकोट येथें हुमायून वनवासांत असतां ता. १५ ऑक्टोबर १५४२ रोजीं जन्म. लहानपणीं आई-बापांची ताटातूट, संकटें, कैद यांमुळें विद्याभ्यास मुळींच नाहीं. हुमायुनानें शिक्षक ठेविला होता पण उपयोग झाला नाहीं. प्रत्यक्ष अनुभवजन्य ज्ञान बरेंच मिळालें.

बुद्धि चलाख. हुमायुनाच्या मरणसमयीं अकबर १३ वर्षांचा होता. परंतु बहिरामखान या एकनिष्ठ सेवकानें त्याचें उत्तम पालन केलें व राज्यकारभार पाहिला.

अवघ्या १४ वर्षांच्या वयांत अकबराला अनेक संकटांस तोंड द्यावें लागलें. बहिरामखान कारभार पाही तरी स्वतां सर्व गोष्टींत अकबर लक्ष घाली. शत्रु चारी बाजूंस होते. प्रथम सिकंदरशहाचा मोड करून त्यास काश्मीरांत पिटाळलें. याच वेळीं सूर घराण्यातर्फे हिमूनें दिल्लीवर चाल केली. तेव्हां बहिरामखानाच्या मदतीनें ता. ५ नोव्हेंबर १५५६ रोजीं पानपत येथें हिमूचा पराभव केला. पण हिमू हातीं लागल्यावर बहिरामखानानें अकबराच्या मर्जीविरुद्ध त्यास ठार मारलें.

अकबरानें आग्रा शहर घेतल्यावर पुढील दोन-तीन वर्षें सिकंदर-शहाचें पारिपत्य करण्यांत गेलीं. त्या वेळीं बहिरामखान कारभार पाही. पण अकबर व बहिरामखान यांना एकत्र काम करण्याचा प्रसंग आल्यावर त्यांचें जमेना. बहिरामखान एककल्ली, निष्ठुर व खुनशी होता. त्यामुळें तक्रारी होत. म्हणून अकबरानें युक्तीनें त्यास कळविलें कीं, "आपलें राज्य आपण स्वतां चालवावें असें आम्हीं योजिलें आहे; तरी आमचें कल्याण व्हावें या इच्छेनें तुम्हीं सर्व कारभार सोडून द्यावा; तुमच्या खर्चाचा नीट बंदोबस्त ठेविला जाईल." तेव्हां बहिरामखानानें बंड केलें. अकबरानें त्याचा पराभव केला पण त्याचे पूर्वीचे उपकार स्मरून त्याचा सन्मान केला. पुढें तो मक्केस जात असतां वाटेंत त्याचा खून झाला. अकबरानें त्याचा मुलगा मिर्झाखान यास खानखानान पदवी देऊन मोठी नोकरी दिली.

अकबरानें हातीं कारभार घेतल्यावर १५६०–६७ पर्यंतचा काल बंडें मोडण्यांतच गेला. या वेळीं माळवा, चिनागड, बऱ्हाण-पूर व रावळपिंडी-जिल्ह्याचा ईशान्यभाग त्याच्या ताब्यांत आला. आमदखान या सरदारास दुष्कृत्याबद्दल देहान्तशासन मिळालें. १५६४ त चुनारचा किल्ला घेतला. १५६५ त आग्र्याचा किल्ला बांधण्यास सुरवात करून तो आठ वर्षांनीं पुरा केला. जोनपूर व ओरिसा हे प्रांत अकबराच्या ताब्यांत आले. १५६८ त चितोड व १५६९ त रतनभोर हे राजपुतान्यांतील किल्ले घेतले व फत्ते-पूर-शिक्री वसविली. १५७२ पर्यंत बहुतेक सर्व रजपूत राजे बादशहाचे अंकित झाले. गुजरातेंतील मुसलमान राजे वारंवार त्रास देत म्हणून १५७२ त गुजरातवर स्वारी केली. त्यांत जय-पूरचे भगवानदास व मानसिंग यांचा फार उपयोग झाला. गुजरातमधील राजांचा पाडाव करून १५७३ त अकबरानें आपला सुभेदार तेथें नेमला. १५७५ पर्यंत अकबराच्या अमलाखालीं पंजाब, काबूल, मध्य व पश्चिम हिंदुस्थान, गुजरात, बहार, बंगाल एवढा प्रांत आला. राजपुतान्यांतील मेवाडचा राणा प्रतापसिंह मात्र शेवटपर्यंत अकबरास शरण आला नाहीं. १५७६ त मानसिंग याच्याबरोबर सैन्य देऊन व आपण स्वतां येऊन त्यानें हळदी-घाटांत प्रतापसिंहाचा पाठलाग केला. त्याचें सर्व राज्य घेतलें, परंतु त्यानें दाद दिली नाहीं. १५८२ मध्यें अकबराचा काबूल येथील भाऊ हकीम यानें पंजाबवर चाल केली व त्याचा पराभव केला. तो वारल्यावर १५८५ त काबूल प्रांत आपल्या राज्यास जोडला. १५८४ त बंगाल्यांत व गुजरातेंत शांतता स्थापन केल्यावर १५८४ ते १५९८ पर्यंत अकबरानें सरहद्दीवरील बंडें मोडण्यासाठीं लाहोर ही राजधानी केली. या मोहिमेंत काश्मीर त्यास मिळालें. पण बिरबल मात्र कामीं आला. १५८८–९२ पर्यंत सिंध प्रांत अकबरानें आपल्या राज्यास जोडला व १५९४ त कंदाहार घेतलें. १५९६ त अहमदनगरच्या निजामशाहींत बखेडा आहे म्हणून स्वारी केली. पण चांदबिबीच्या पराक्रमामुळें उपयोग न होतां फक्त बऱ्हाड प्रांत मिळाला. चांदबिबीच्या खुनानंतर (१६००) अकबरानें अहमदनगर घेतलें; परंतु अहमदनगर राज्याच्या चाहत्यांनीं हें तक्त दुसरीकडे नेलें. अकबरानें खानदेश व बऱ्हाड काबीज करून त्यांवर आपला मुलगा दानियल यास सुभेदार नेमलें.

अकबराचीं शेवटचीं वर्षें फार त्रासांत गेलीं. त्याच्या बरोबरची मित्रमंडळी व नातलगमंडळी मरण पावली. युवराज सलीमनें आपल्या वागणुकीनें त्यास त्रास दिला. अकबरास मुलांपासूनहि सुख मिळालें नाहीं. पहिलीं दोन मुलें लहानपणींच वारलीं. सलीम दुष्ट होता. त्याचा आवडता मुलगा दानियल हा मात्र हुषार होता. पांचवा मुलगा मुराद. मुराद जालना येथें मरण पावला व १६०५ सालीं दानियल मरण पावल्यावर अकबर भ्रमिष्ट झाला व ता. १५ ऑक्टोबर १६०५ रोजीं मरण पावला. आपल्यानंतर सलिमासच गादीवर बसवावें असें त्यानें ठरविलें होतें. धार्मिक बाबतींत तो

अगदीं निष्ठावंत असा नव्हता तरी मरणसमयीं त्यानें इस्लामचा विधि पाळला.

अकबर लठ्ठ, गोरा होता. कपाळ रुंद असून चेहरा पाणीदार होता. त्याची राहणी साधी असून तो उद्योगी व मिताहारी असे. क्वचित् मद्य घेत असे. मर्दानी खेळाची आवड होती. त्याची बुद्धि शोधक होती. चित्रकलेची व ललितकलेची आवड होती व तीमुळें या कलांस त्यानें उत्तेजन दिलें. आपलें राज्य चिरस्थायी करण्यासाठीं त्यानें रजपुतांसारख्या लढवय्या जातीस आपल्याकडे खुबीनें वळवून घेतलें. सर्वांस सारखें वागवून, कोणावरहि जुलूम न करतां, हिंदूंवरचा जिझीया कर कमी करून व रजपुतांशीं शरीर-संबंध करून त्यानें रजपूत व हिंदु यांना आपलेंसें केलें. पण त्याचबरोबर हिंदूंमधील बालविवाह, पशुयज्ञ, सती या अनिष्ट चाली बंद केल्या व पुनर्विवाहास परवानगी दिली. मित्र संपादण्यांत तो कुशल होता व स्वतां विद्वान् नसतांहि विद्वानांशीं खुबीनें बोले.

अकबर प्रजावत्सल होता. न्याय देण्याच्या कामीं तो फार जपत असे. तो रयतेशीं ममतेनें वागे पण सरदारांवर त्याचा वचक त्याच्या राज्याचे एकंदर १६ सुभे होते व उत्पन्न ४० कोटींवर प्रत्येक सुभ्यावर सुभेदार हा लष्करी व मुलकी अधिकारी राजा तोडरमल व शहामनसूर यांच्या देखरेखीखालीं त्यानें ...ंदी करून व जमिनींची प्रतवारी लावून सारा ठरवून दिला ...त. तो साधारणतः उत्पन्नाच्या १/३ असे. पण शेतकऱ्यांवर याशिवाय कर नसे. शेतकऱ्यांस तगाई वगैरे सवलती असून लांच खाणाऱ्या अधिकाऱ्यांस कडक शासन होई. पडीत जमिनी लागवडीस आणण्यास प्रोत्साहन मिळे. जमीनमहसुलाशिवाय कित्येक जिनसांवर कर होते. अकबराच्या लष्करांत रजपूत व मुसल्मानी फौजा होत्या. रजपूत राजांस मोठ्या हुद्याच्या जागा दिल्यामुळें ते खुष होते. अमलदारांस जाहगिरींऐवजीं रोकड नेमणुका मिळत. मोंगल लोक भाडोत्रीपणासारखें काम करीत, परंतु रजपूत एकनिष्ठपणें सेवा करीत.

अकबरानें आपल्या दरबारीं विद्वान् लोक गोळा केले हें त्याच्या मोठेपणाचें लक्षण होय. तो गुणग्राही व लोकसंग्रही असल्यामुळें अनेक गुणी माणसें त्याच्याजवळ होतीं. त्यांतील प्रमुख पुढील-प्रमाणें :— (१) अबुल फज्ल व अबुल फैजी. फैजी कवि असून फज्ल हा विद्वान्, सर्व धर्मांबद्दल समता बाळगणारा होता. त्यानें 'अकबरनामा' हा ग्रंथ लिहिला असून, त्याच्या तिसऱ्या भागास 'ऐने अकबरी'—अकबराच्या राज्यव्यवस्थेचा वृत्तांत—म्हणतात. (२) राजा मानसिंग हा अकबराचा प्रमुख सेनापति होता. (३) राजा तोडरमल यानें जमाबंदीची व राज्याचे हिशेब फारशी भाषेंत ठेवण्याची पद्धत चालू केली. (४) राजा बिरबल हा हुशार, बुद्धिवान् व कवि होता. यास अकबर परदरबारीं वकील म्हणून पाठवीत असे. (५) तानसेन उत्कृष्ट गवई होता. (६) बदाउनी हा हुशार व विद्वान् मुसलमान गायन, ज्योतिष व इतिहास यांत पारंगत होता. यानें रामायण व महाभारत यांचें फारशी भाषांतर करून अकबराच्या कारकीर्दीचा इतिहास लिहिला. अशीं अनेक विद्वद्रत्नें अकबराच्या दरबारीं होतीं व त्यांत गुणी जनांचा परामर्ष घेतला जाई. त्यानें बऱ्याच संस्कृत ग्रंथांचें फारशींत भाषांतर करविलें.

अकबराचें सर्व धर्मांशीं समत्वाचें धोरण होतें. ज्यांच्यावर राज्य करावयाचें त्यांच्याशीं गोडीनें व मनमिळाऊपणानेंच वागणें युक्त ही त्याची ठाम समजूत होती. अबुल फज्ल यास उलेमांचा तिटकारा येई. त्यामुळें सर्व धर्मांची माहिती करून घेऊन त्यांचीं तत्त्वें समजून घ्यावीं असें त्याचें मत होतें व तें त्यानें अकबरास पटविलें. म्हणून अकबरानें १५७६ त फत्तेपूर शिक्री येथें एक मंदिर बांधलें व तेथें दर गुरुवारीं रात्रीं धार्मिक वादविवाद चालत. त्यामुळें अकबराचा मुसलमान धर्मावरचा विश्वास कमी होऊन आपण उलेमांचा अधिकार घ्यावा असें त्यास वाटूं लागलें. अबुल फज्लच्या मदतीनें सर्व धर्मांतील चांगलीं तत्त्वें घेऊन त्यानें 'दीने इलाही' हा धर्म स्थापला, व आपण स्वतां त्या धर्माचा पैगंबर बनला. तथापि त्याच्या पश्चात् तो धर्म लुप्तप्राय झाला. या सर्वधर्म-समत्वाचा राज्यवाढीस व बळकटीस मात्र चांगला उपयोग झाला.

**अकबरपूर**—१. संयुक्त प्रांतांतील कानपूर जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ २४५ चौ. मै., लोकसंख्या सुमारें दीड लक्ष. यांत १९९ खेडीं आहेत. व अकबरपूर हा गांव सात हजार लोकवस्तीचा आहे.

२. संयुक्त प्रांतांतील फैजाबाद जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ५३७ चौ. मै., लोकसंख्या सुमारें ४ लक्ष. यांत तीन मोठीं गांवें व ८५४ खेडीं आहेत. मुख्य ठिकाण अकबरपूर. रेल्वे स्टेशन. लोकसंख्या सुमारें दहा हजार. गांवांत किल्ल्याचे अवशेष, पूल व मशीद हीं प्रेक्षणीय आहेत. धान्याचा व कातड्याचा व्यापार चालतो.

**अकबराबाद**—संयुक्त प्रांत, अंतर्वेदींतील एक महाल. पूर्वी सुभा होता. पुढें मराठ्यांस बादशहाकडून याची सुभेदारी मिळाली. १६७१ सालीं ही सुभेदारी शिंदे-होळकर यांजकडे पेशव्यांनीं दिली.

**अकरमासे**—अनौरस, अधर्म संततीस हा शब्द लावतात. याचा अर्थ हीन, कमअस्सल जात असा आहे. ठाणें व पश्चिम खानदेश जिल्ह्यांत अशा नांवाचे लोक आढळतात. इतर ठिकाणीं यांस 'कडू', 'शिंदळे', 'लेकावळे', वगैरे संबोधतात. हे हलके धंदे करतात. बाकी रहाणी मराठी धाटणीची. 'अधर्मसंतति' पाहा.

**अकराणी**—पश्चिम खानदेशांत तापी व नर्मदा या नद्यांमधील पठाराचा प्रदेश. यांत १७२ गावें असून त्यांपैकीं १७ ओसाड आहेत. जंगलांत औषधी व रंग तयार करण्याच्या वनस्पति सांपडतात. डोंगराळ भागांतील दगडांत रुपें, तांबें, व लोखंड यांचे कण सांपडतात. पाऊस व पाणीपुरवठा भरपूर. हवा सौम्य. लोक उद्योगी व मेहनती. शेती व गाई-म्हशींचे कळप पाळणें हे धंदे. खानदेशांतून बाहेर इकडे येण्यास पांच मार्ग असून शहादें-मार्ग चांगला असून बाकीचे पायरस्ते आहेत. यांत एक नैसर्गिक मजबूत किल्ला आहे. त्याच्या भिंती वगैरे आतां पडल्या आहेत.

**अकरॉन**—अमेरिका, संयुक्त संस्थानें, ओहिओ. क्लीव्हलँडच्या आग्नेयेला ३५ मैलांवर हें शहर असून त्याचें महत्त्व रबरी वस्तू तयार करण्याच्या दृष्टीनें फार आहे. येथील वीस प्रचंड कारखान्यांतून अनेक प्रकारच्या रबरी वस्तू तयार होतात. यांशिवाय विमानें, चिनी मातीचीं भांडीं, पोलाद, काड्यांच्या पेट्या, वगैरे मालांचे येथें कारखाने आहेत. अमेरिकेंतले एरी सरोवर ओहिओ नदीला जोडण्यांत आल्यावर मूळच्या खेड्याची एकदम भरभराट इ. स. १६८९ पासून सुरू झाली; आणि तेथें मोटारटायरचा धंदा सुरू झाल्यापासून लोकसंख्या सारखी वाढत आहे. लो. सं. (१९४५) २३९६६६. येथें एक विद्यापीठ आहे.

**अकलंकदेव**—एक जैन ग्रंथकार. यानें अनेक तर्कज्ञानविषयक ग्रंथ लिहिले असून जैन वाङ्मयांत याला वरचें स्थान आहे. हा राष्ट्रकूट कृष्ण (पहिला) याचा समकालीन (८ वें शतक) असून, यानें आपल्या पांडित्यानें दक्षिणेंतून बौद्धांचें पार उच्चाटण केलें असें म्हणतात.

**अकलूज**—मुंबई, सोलापूर जिल्ह्यांत नीरा नदीच्या कांठीं तालुक्याचें व बाजाराचें मोठें गांव. सोमवारीं बाजार भरतो. इ. स. १६८९ सालीं औरंगजेबाचा येथें मुक्काम होता, व १८०३ सालीं जनरल वेलस्लीचा पुण्याकडे जातांना तीन दिवस मुक्काम होता. येथें एक साखरेचा मोठा कारखाना आहे.

**अंकलेश्वर**—मुंबई इलाखा, भडोच जिल्ह्यांतील अंकलेश्वर तालुक्याचें मुख्य ठिकाण. भडोचच्या दक्षिणेस सहा मैलांवर बी. बी. सी. आय. रेल्वेचें हें एक स्टेशन आहे. व्यापाराचा मुख्य जिन्नस कापूस असून सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कांहीं कारखाने आहेत. या ठिकाणीं पूर्वी कागद तयार करीत असत. परंतु तो धंदा हल्लीं बसला आहे. इ. स. १८७६ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. लो. सं. (१९४१) १४१८७. गुजरराजा दुसरा दद्द (इ. स. ६२९-६४२) यानें ब्राह्मणांना गांव इनाम दिल्याबद्दलचे जे ताम्रपट सांपडले आहेत त्यांत अक्रूरेश्वर किंवा अंकुलेश्वर म्हणून जें गांवाचें नांव येतें तें अंकलेश्वराचेंच प्राचीन नांव असावें, असें डॉ. बुल्हर म्हणतात. पेशवा बाळाजी बाजीराव (नानासाहेब) याला लिहिण्यांत आलेल्या शके १७०१ मार्गशीर्षमधील एका पत्रांत जलचर नर्मदा उतरून अंकलेश्वरीं पोहोंचले, वगैरे माहिती देऊन मदत मागविली आहे. (रा. खं. १० ले. २४९.). अंकलेश्वरास पूर्वी बंदर होतें तें मोंगलांनीं मोडलें. तेव्हां पेशवाईंत नवीन बंदर करण्याचा विचार होता. (रा. खं. १० ले. ३३४.)

**अका**—आसाममधील दरंग जिल्ह्याच्या उत्तरेकडील हिमालयाचा एक भाग. जंगल फार व लोकवस्ती रानटी. एका जातीचे दोन वर्ग असून ते तिबेटी-ब्रह्मी रक्ताचे आहेत. हे रयतेस त्रास देतात. यांचेवर स्वारी करणें फायद्याचें नाहीं म्हणून ब्रिटिश सरकार स्वारी करीत नसे. तेजपूरच्या उत्तरेकडील डोंगराळ प्रदेशांत यांची स्वतंत्र राष्ट्रजाति बनली आहे. डाफ्ला मिरिस व अबोर लोक व हे जवळचे असावे असें कर्नल डाल्टनचें मत आहे. परंतु हे भिन्न दिसतात.

**अंकाई-टंकाई**—मुंबई, नाशिक जिल्हा. अंकाई हा नाशिक जिल्ह्यांतील सर्वांत मजबूत डोंगरी किल्ला येवल्याच्या उत्तरेस सहा मैलांवर मनमाड-अहमदनगर सडकेवर पायथ्यापासून ९०० फूट उंच असलेल्या एका टेंकडीवर आहे. याचा माथा समुद्रसपाटीपासून ३२०० फूट उंचीवर असून येथून खानदेश व गोदावरी कांठच्या सर्व प्रदेशाचा देखावा दिसतो. डोंगरावर चारी बाजूंनीं १५० पासून २०० फूट उभे तुटलेले कडे असलेला खडक आहे. याची चढण अतिशय बिकट आहे. वाट उभी व खडकाळ आहे. यांत प्रवेश होण्यास सात तटांतून जावें लागतें. सर्वांत खालची वेस भक्कम बांधलेली असून फारच मजबूत आहे. पहिल्या वेशींतून गेल्यावर एका बिकट नागमोडी वाटेनें व खडकांत खोदलेल्या पायऱ्या चढून गेलें म्हणजे पुनः एक दरवाजा व तटबंदी लागते. यांतून पुढें गेलें म्हणजे एक अरुंद नागमोडी पायऱ्यांचा रस्ता खडकाच्या कड्याकडे जातो. येथेंहि एक दरवाजा व तटबंदी आहे. वर जाण्याचा हाच काय तो एकच मार्ग आहे. वर लिहिलेल्या पायऱ्यांच्या मार्गानें एका वेळीं एकच मनुष्य येऊं शकतो. शेवटच्या दरवाजाच्या आंतल्या बाजूस एक घुमट असलेलें चमत्कारिक घर असून तेथें खजिना होता असें सांगतात. याच टेंकडीच्या ईशान्येस एका मैलावर टंकाई नांवाची एक टेंकडी असून तिलाहि तटबंदी केलेली आहे. टंकाईचा उपयोग अंकाई येथील शिबंदीस अन्नसामग्रीच्या कोठाराप्रमाणें होत असे. इ. स. १६३५ मध्यें अंकाई-टंकाई व आल्का-पाल्का हे किल्ले शहाजहानचा सेनापति खानखानान यानें घेतले. शेवटच्या मराठ्यांच्या युद्धांत ले. कर्नल मॅकडोनेल याची तुकडी ५ एप्रिल १८१८ गेली आली तेव्हां किल्लेदारानें एकहि तोफ न डागतां हा मजबूत किल्ला

अगदीं निष्ठावंत असा नव्हता तरी मरणसमयीं त्यानें इस्लामचा विधि पाळला.

अकबर लठ्ठ, गोरा होता. कपाळ रुंद असून चेहरा पाणीदार होता. त्याची राहणी साधी असून तो उद्योगी व मिताहारी असे. क्वचित् मद्य घेत असे. मर्दानी खेळाची आवड होती. त्याची बुद्धि शोधक होती. चित्रकलेची व ललितकलेची आवड होती व तीमुळें या कलांस त्यानें उत्तेजन दिलें.आपलें राज्य चिरस्थायी करण्यासाठीं त्यानें रजपुतांसारख्या लढवय्या जातीस आपल्याकडे खुबीनें वळवून घेतलें. सर्वांस सारखें वागवून, कोणावरहि जुलूम न करतां, हिंदूंवरचा जिझीया कर कमी करून व रजपुतांशीं शरीर-संबंध करून त्यानें रजपूत व हिंदु यांना आपलेंसें केलें. पण त्याचबरोबर हिंदूंमधील बालविवाह, पशुयज्ञ, सती या अनिष्ट चाली बंद केल्या व पुनर्विवाहास परवानगी दिली. मित्र संपादण्यांत तो कुशल होता व स्वतां विद्वान् नसतांहि विद्वानांशीं खुबीनें बोले.

अकबर प्रजावत्सल होता. न्याय देण्याच्या कामीं तो फार जपत असे. तो रयतेशीं ममतेनें वागे पण सरदारांवर त्याचा वचक असे. त्याच्या राज्याचे एकंदर १६ सुभे होते व उत्पन्न ४० कोटींवर असून प्रत्येक सुभ्यावर सुभेदार हा लष्करी व मुलकी अधिकारी असे. राजा तोडरमल व शहामनसूर यांच्या देखरेखीखालीं त्यानें जमाबंदी करून व जमिनींची प्रतवारी लावून सारा ठरवून दिला होता. तो साधारणतः उत्पन्नाच्या ⅓ असे. पण शेतकऱ्यांवर याशिवाय कर नसे. शेतकऱ्यांस तगाई वगैरे सवलती असून लांच खाणाऱ्या अधिकाऱ्यांस कडक शासन होई. पडीत जमिनी लागवडीस आणण्यास प्रोत्साहन मिळे. जमीनमहसुलाशिवाय कित्येक जिनसांवर कर होते. अकबराच्या लष्करांत रजपूत व मुसल्मानी फौजा होत्या. रजपूत राजांस मोठ्या हुद्याच्या जागा दिल्यामुळें ते खुप होते. अमलदारांस जाहगिरींऐवजीं रोकड नेमणुका मिळत. मोंगल लोक भाडोत्रीपणासारखें काम करीत, परंतु रजपूत एकनिष्ठपणें सेवा करीत.

अकबरानें आपल्या दरबारीं विद्वान् लोक गोळा केले हें त्याच्या मोठेपणाचें लक्षण होय. तो गुणग्राही व लोकसंग्रही असल्यामुळें अनेक गुणी माणसें त्याच्याजवळ होतीं. त्यांतील प्रमुख पुढील-प्रमाणें :— (१) अबुल फज्ल व अबुल फैजी. फैजी कवि असून फज्ल हा विद्वान्, सर्व धर्मांबद्दल समता बाळगणारा होता. त्यानें 'अकबरनामा' हा ग्रंथ लिहिला असून, त्याच्या तिसऱ्या भागास 'ऐने अकबरी'—अकबराच्या राज्यव्यवस्थेचा वृत्तांत—म्हणतात. (२) राजा मानसिंग हा अकबराचा प्रमुख सेनापति होता. (३) राजा तोडरमल यानें जमाबंदीची व राज्याचे हिशेब फारशी भाषेंत ठेवण्याची पद्धत चालू केली. (४) राजा बिरबल हा हुशार, बुद्धिवान् व कवि होता. यास अकबर परदरबारीं वकील म्हणून पाठवीत असे. (५) तानसेन उत्कृष्ट गवई होता. (६) बदाउनी हा हुशार व विद्वान् मुसलमान गायन, ज्योतिष व इतिहास यांत पारंगत होता. यानें रामायण व महाभारत यांचें फारशी भाषांतर करून अकबराच्या कारकीर्दीचा इतिहास लिहिला. अशीं अनेक विद्वद्रत्नें अकबराच्या दरबारीं होतीं व त्यांत गुणी जनांचा परामर्ष घेतला जाई. त्यानें बऱ्याच संस्कृत ग्रंथांचें फारशींत भाषांतर करविलें.

अकबराचें सर्व धर्मांशीं समत्वाचें धोरण होतें. ज्यांच्यावर राज्य करावयाचें त्यांच्याशीं गोडीनें व मनमिळाऊपणानेंच वागणें युक्त ही त्याची ठाम समजूत होती. अबुल फज्ल यास उलेमांचा तिटकारा येई. त्यामुळें सर्व धर्मांची माहिती करून घेऊन त्यांचीं तत्त्वें समजून घ्यावीं असें त्याचें मत होतें व तें त्यानें अकबरास पटविलें. म्हणून अकबरानें १५७६ त फत्तेपूर शिक्री येथें एक मंदिर बांधलें व तेथें दर गुरुवारीं रात्रीं धार्मिक वादविवाद चालत. त्यामुळें अकबराचा मुसलमान धर्मावरचा विश्वास कमी होऊन आपण उलेमांचा अधिकार घ्यावा असें त्यास वाटूं लागलें. अबुल फज्लच्या मदतीनें सर्व धर्मांतील चांगलीं तत्त्वें घेऊन त्यानें 'दीने इलाही' हा धर्म स्थापला, व आपण स्वतां त्या धर्माचा पैगंबर बनला. तथापि त्याच्या पश्चात् तो धर्म लुप्तप्राय झाला. या सर्वधर्म-समत्वाचा राज्यवाढीस व बळकटीस मात्र चांगला उपयोग झाला.

**अकबरपूर**—१. संयुक्त प्रांतांतील कानपूर जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ २४५ चौ. मै., लोकसंख्या सुमारें दीड लक्ष. यांत १९९ खेडीं आहेत. व अकबरपूर हा गांव सात हजार लोकवस्तीचा आहे.

२. संयुक्त प्रांतांतील फैजाबाद जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ५३७ चौ. मै., लोकसंख्या सुमारें ४ लक्ष. यांत तीन मोठीं गांवें व ८५४ खेडीं आहेत. मुख्य ठिकाण अकबरपूर. रेल्वे स्टेशन. लोकसंख्या सुमारें दहा हजार. गांवांत किल्ल्याचे अवशेष, पूल व मशीद हीं प्रेक्षणीय आहेत. धान्याचा व कातड्याचा व्यापार चालतो.

**अकबराबाद**—संयुक्त प्रांत, अंतर्वेदींतील एक महाल. पूर्वी सुभा होता. पुढें मराठ्यांस बादशहाकडून याची सुभेदारी मिळाली. १६७१ सालीं ही सुभेदारी शिंदे-होळकर यांजकडे पेशव्यांनीं दिली.

**अकरमासे**—अनौरस, अधर्म संततीस हा शब्द लावतात. याचा अर्थ हीन, कमअस्सल जात असा आहे. ठाणें व पश्चिम खानदेश जिल्ह्यांत अशा नांवाचे लोक आढळतात. इतर ठिकाणीं यांस 'कडू', 'शिंदळे', 'लेकावळे', वगैरे संबोधतात. हे हलके धंदे करतात. बाकी रहाणी मराठी धाटणीची. 'अधर्मसंतति' पाहा.

**अक्राणी**—पश्चिम खानदेशांत तापी व नर्मदा या नद्यांमधील पठाराचा प्रदेश. यांत १७२ गांवें असून त्यांपैकीं १७ ओसाड आहेत. जंगलांत औषधी व रंग तयार करण्याच्या वनस्पति सांपडतात. डोंगराळ भागांतील दगडांत रुपें, तांबें, व लोखंड यांचे कण सांपडतात. पाऊस व पाणीपुरवठा भरपूर. हवा सौम्य. लोक उद्योगी व मेहनती. शेती व गाई-म्हशींचे कळप पाळणें हे धंदे. खानदेशांतून बाहेर इकडे येण्यास पांच मार्ग असून शहादें-मार्ग चांगला असून बाकीचे पायरस्ते आहेत. यांत एक नैसर्गिक मजबूत किल्ला आहे. त्याच्या भिंती वगैरे आतां पडल्या आहेत.

**अक्रॉन**—अमेरिका, संयुक्त संस्थानें, ओहिओ. क्लीव्हलँडच्या आग्नेयेला ३५ मैलांवर हें शहर असून त्याचें महत्त्व रबरी वस्तु तयार करण्याच्या दृष्टीनें फार आहे. येथील वीस प्रचंड कारखान्यांतून अनेक प्रकारच्या रबरी वस्तु तयार होतात. यांशिवाय विमानें, चिनी मातीचीं भांडीं, पोलाद, काड्यांच्या पेट्या, वगैरे मालांचे येथें कारखाने आहेत. अमेरिकेंतलें एरी सरोवर ओहिओ नदीला जोडण्यांत आल्यावर मूळच्या खेड्याची एकदम भरभराट इ. स. १६८९ पासून सुरु झाली; आणि तेथें मोटार-टायरचा धंदा सुरु झाल्यापासून लोकसंख्या सारखी वाढत आहे. लो. सं. (१९४१) २३१६६६. येथें एक विद्यापीठ आहे.

**अकलंकदेव**—एक जैन ग्रंथकार. यानें अनेक तर्कज्ञान-विषयक ग्रंथ लिहिले असून जैन वाङ्मयांत याला वरचें स्थान आहे. हा राष्ट्रकूट कृष्ण (पहिला) याचा समकालीन (८ वें शतक) असून, यानें आपल्या पांडित्यानें दक्षिणेंतून बौद्धांचें पार उच्चाटण केलें असें म्हणतात.

**अकलूज**—मुंबई, सोलापूर जिल्ह्यांत नीरा नदीच्या कांठीं तालुक्याचें व बाजाराचें मोठें गांव. सोमवारीं बाजार भरतो. इ. स. १६८९ सालीं औरंगजेबाचा येथें मुक्काम होता, व १८०३ सालीं जनरल वेलस्लीचा पुण्याकडे जातांना तीन दिवस मुक्काम होता. येथें एक सालरेचा मोठा कारखाना आहे.

**अंकलेश्वर**—मुंबई इलाखा, भडोच जिल्ह्यांतील अंकलेश्वर तालुक्याचें मुख्य ठिकाण. भडोचच्या दक्षिणेस सहा मैलांवर बी. बी. सी. आय्. रेल्वेचें हें एक स्टेशन आहे. व्यापाराचा मुख्य जिन्नस कापूस असून सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कांहीं कारखाने आहेत. या ठिकाणीं पूर्वी कागद तयार करीत असत. परंतु तो धंदा हल्लीं बसला आहे. इ. स. १८७६ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. लो. सं. (१९४१) १४१८७. गुर्जरराजा दुसरा दद्द (इ. स. ६२९-६४२) यानें ब्राह्मणांना गांव इनाम दिल्याबद्दलचे जे ताम्रपट सांपडले आहेत त्यांत अक्रूरेश्वर किंवा अंकुलेश्वर म्हणून जें गांवाचें नांव येतें तें अंकलेश्वराचेंच प्राचीन नांव असावें, असें डॉ. बुल्हर म्हणतात. पेशवा बाळाजी बाजीराव (नानासाहेब) याला लिहिण्यांत आलेल्या शके १७०१ मार्गशीर्षमधील एका पत्रांत जल्चर नर्मदा उतरून अंकलेश्वरीं पोहोंचले, वगैरे माहिती देऊन मदत मागविली आहे. (रा. खं. १० ले. २४९.). अंकलेश्वरास पूर्वी बंदर होतें तें मोंगलांनीं मोडलें. तेव्हां पेशवाईंत नवीन बंदर करण्याचा विचार होता. (रा. खं. १० ले. ३३४.)

**अका**—आसाममधील दरंग जिल्ह्याच्या उत्तरेकडील हिमालयाचा एक भाग. जंगल फार व लोकवस्ती रानटी. एका जातीचे दोन वर्ग असून ते तिबेटी-ब्रह्मी रक्ताचे आहेत. हे रयतेस त्रास देतात. यांचेवर स्वारी करणें फायद्याचें नाहीं म्हणून ब्रिटिश सरकार स्वारी करीत नसे. तेजपूरच्या उत्तरेकडील डोंगराळ प्रदेशांत यांची स्वतंत्र राष्ट्रजाति बनली आहे. डाफ्ला मिरिस व अबोर लोक व हे जवळचे असावे असें कर्नल डाल्टनचें मत आहे. परंतु हे भिन्न दिसतात.

**अंकाई-टंकाई**— मुंबई, नाशिक जिल्हा. अंकाई हा नाशिक जिल्ह्यांतील सर्वांत मजबूत डोंगरी किल्ला येवल्याच्या उत्तरेस सहा मैलांवर मनमाड-अहमदनगर सडकेवर पायथ्यापासून ९०० फूट उंच असलेल्या एका टेंकडीवर आहे. याचा माथा समुद्रसपाटीपासून ३२०० फूट उंचीवर असून येथून खानदेश व गोदावरी कांठच्या सर्व प्रदेशाचा देखावा दिसतो. डोंगरावर चारी बाजूंनीं १५० पासून २०० फूट उभे तुटलेले कडे असलेला खडक आहे. याची चढण अतिशय बिकट आहे. वाट उभी व खडकाळ आहे. यांत प्रवेश होण्यास सात तटांतून जावें लागतें. सर्वांत खालची वेस भक्कम बांधलेली असून फारच मजबूत आहे. पहिल्या वेशींतून गेल्यावर एका बिकट नागमोडी वाटेनें व खडकांत खोदलेल्या पायऱ्या चढून गेलें म्हणजे पुनः एक दरवाजा व तटबंदी लागते. यांतून पुढें गेलें म्हणजे एक अरुंद नागमोडी पायऱ्यांचा रस्ता खडकाच्या कड्याकडे जातो. येथेंहि एक दरवाजा व तटबंदी आहे. वर जाण्याचा हाच काय तो एकच मार्ग आहे. वर लिहिलेल्या पायऱ्यांच्या मार्गानें एका वेळीं एकच मनुष्य येऊं शकतो. शेवटच्या दरवाजाच्या आंतल्या बाजूस एक घुमट असलेलें चमत्कारिक घर असून तेथें खजिना होता असें सांगतात. याच टेंकडीच्या ईशान्येस एका मैलावर टंकाई नांवाची एक टेंकडी असून तिलाहि तटबंदी केलेली आहे. टंकाईचा उपयोग अंकाई येथील शिबंदीस अन्नसामग्रीच्या कोठाराप्रमाणें होत असे. इ. स. १६३५ मध्यें अंकाई-टंकाई व आल्का-पाल्का हे किल्ले शहाजहानचा सेनापति खानखानान यानें घेतले. शेवटच्या मराठ्यांच्या युद्धांत ले. कर्नल मॅकडोनेल याची तुकडी ५ एप्रिल १८१८ रोजीं आली तेव्हां किल्लेदारानें एकहि तोफ न डागतां हा मजबूत किल्ला

लढाईची सर्व जय्यत तयारी असतां इंग्रजांच्या हवालीं केला; व शिबंदीचे लोक ऐकेनात तेव्हां त्यांना मोठमोठीं इनामें देऊन मोठ्या मुष्किलीनें त्यांची समजूत केली. अंकाई हें दौंड-मनमाड रेल्वेचें एक स्टेशन आहे. येथें ३ ब्राह्मणी संस्कृतीचीं लेणीं आहेत. पैकीं पहिलें लेणें किल्ल्याच्या चढणीवर दुसऱ्या दरवाजाच्या आंतील बाजूस असून त्यांत महादेवाचें लिंग आहे. हें दहाव्या किंवा अकराव्या शतकांतलें असावें. टंकाई टेकडीच्या दक्षिणेकडील उतारावर अंकाई गांवाच्या बाजूस तोंडे असलेलीं ७ जैन लेणीं आहेत. हीं लहान आहेत तथापि यांत पुष्कळ शिल्पकाम केलेलें आहे.

**अकाकांग्वा**—दक्षिण अमेरिकेंतील चिली देशांतील ज्वालामुखी पर्वत व नदी. भाग डोंगराळ. द्राक्षें चांगलीं होतात.

**अकाडोया**—जुनें 'नोव्हा स्कॉशिया'. १६०३ सालीं उत्तर अमेरिकेंत फ्रेंचांना मिळालेली वसाहत. जुने ॲकेडियन लोकांचे वंशज आज सुमारें २७०००० असून त्यांपैकीं सुमारें एक लाख लोक फ्रेंच कानडांत राहतात.

**अकाडीया संस्थान**—काठेवाडांतील बाब्र ठाण्यांतील स्वतंत्र खंडणी देणारें संस्थान. हें करी नदीच्या उत्तर तीराला वसलें आहे. नुकतें सौराष्ट्रसंघांत विलीन झालें.

**अकापुलको**—मेक्सिको देशांतील पॅसिफिक महासागरावरच्या किनाऱ्यावरील एक शहर. उत्तम व कोळसे घेण्याचें बंदर. सृष्टिसौंदर्य चांगलें. हवा थंड. लो. सं. सुमारें पांच हजार.

**अकालवर्ष कृष्ण (पहिला)**—राष्ट्रकूट घराण्यांतील एक राजा. हा दंतिदुर्गाचा चुलता असून त्याच्यामागून गादीवर बसला (७५६-७६५). यानें चालुक्यांस नामशेष केलें. यानेंच वेरूळ येथील प्रसिद्ध कैलास हें लेणें कोरविलें.

**अकालॅरेन्शिआ**—ही फास्टयुलस या धनगराची बायको. यानें रोम शहराचे आद्य संस्थापक रोम्युलस व रीमस यांना टायबर नदींतून वाहत जात असतांना वांचविलें. तिनें आपल्या मुलाप्रमाणें यांचें संगोपन केलें. ही बाई वाईट चालीची होती. म्हणून तीस 'लांडगी' म्हणत व या मुलांस लांडगीनें वाढविलेले म्हणत, अशी एक दंतकथा आहे. दुसऱ्या दंतकथेप्रमाणें ही एक सुंदर मुलगी हर्क्युलीसनें द्यूतांत जिंकली, व हिनें आपली सर्व संपत्ति रोमन लोकांना दिली म्हणून हिचा वार्षिकोत्सव करण्याचा क्रम सुरू झाला. कांहीं हिला भूदेवीची माता समजतात.

**अकाली पंथ**—शिखांचा दहावा व शेवटचा गुरु गुरुगोविंद यानें हा पंथ स्थापला. हा संग्रामोत्सुक पंथ असून मूळ शीख पंथाहून निराळा आहे. "सत् श्री काल" हा त्यांचा रणगर्जनेचा शब्द असून त्यांचा पोषाख निळा असतो. हे हातांत पोलादी कांकणें घालतात व बारीक खंजीर, चाकू व एक लोखंडी सांखळी व पोलादी चक्र आपल्या निळ्या निमुळत्या पागोट्यांत खोवतात. कांहीं जटा वाढवतात.

अकाल्यांना 'निहंग' (बेफिकीर) असें म्हणतात. त्यांचा पुढारी फुलासिंग याचा रणजितसिंगास इंग्रजांविरुद्ध (१८०९-१८२३) चांगला उपयोग झाला. नौशहरांत त्याची समाधि आहे. हे अकाली मित्रांना व शत्रूंनाहिं भीतिप्रद वाटत. १८२३ नंतर खुद्द रणजितसिंगानें त्यांची सत्ता पुष्कळ कमी केली. यांची गादी अमृतसर येथें अकालबूंग नांवानें प्रसिद्ध होती. येथें धार्मिक विधि चालत. खालसाचा पुढारीपणा आपणांकडेच आहे असें अकाली समजत. पुढें ही गादी आनंदपूरला गेली. पण त्यांचें वजन मात्र बरेंचसें कमी झालें.

ब्रह्मचर्य पाळावें अशी आज्ञा या पंथांत आहे. गुरूचें उष्टें चेला खातो. इतर शिखांप्रमाणें हे मद्य-मांस सेवन करीत नाहींत पण भांग बेसुमार पितात.

एका महंताचे देखरेखीखालीं 'गुरुद्वार' नांवाचें शिखांचें प्रार्थनामंदिर असे. हे महंत दुराचारी निघाले तेव्हां १९१९-२० सालीं गुरुद्वार प्रबंध-कमेटी स्थापन झाली. हिचे स्वयंसेवक अकाली असतात. कमिटीस गुरुद्वारें ताब्यांत घेतांना रक्तपात करावा लागला. १९२३ सालीं नाभाचे संस्थानिक रिपुदमनसिंह यांनीं दिलेल्या गादीच्या राजीनाम्यांत सरकारचा हात असावा अशा समजुतीनें अकाली लोकांनीं नाभ्यांत सत्याग्रह केला. राष्ट्रीय चळवळींत अकाली शिखांनीं फार महत्त्वाचा भाग घेतलेला आहे.

**अकिमिनिअन**—हखामनी (ख्रि. पू. ५५८ ते ३३०) या नांवाचें एक प्राचीन राजघराणें इराण देशांत होऊन गेलें. या वंशाची राज्यावर स्थापना सायरस यानें आस्तायाजीसचा पासार्गडी येथें पराभव करून व त्याची एकबटाना ही राजधानी जिंकून केली. यानें इराणी लोकांचें एक बलाढ्य साम्राज्य बनविलें. यानें सार्डिसचा क्रीसस याचा पराभव करून आपली सत्ता भूमध्यसमुद्रापर्यंत वाढविली व नंतर ग्रीक शहरेंहि काबीज केलीं. तसेंच नाबोनिडसचा पराभव करून खाल्डियन राज्य, सीरिया व पॅलेस्टाइन जिंकलें. याच्यानंतर याचा मुलगा कंबायसिस यानें ईजिप्त जिंकलें. यानेंच ईजिप्तमधील देवतेकरितां सोडलेला एपिस बैल मारल्याची कथा सांगतात. याच्यानंतर स्मेर्डिस व त्यानंतर पहिला दरायस हे गादीवर बसले. यानें इराणी साम्राज्य पुष्कळच भरभराटीस आणलें. याची राज्यपद्धति फार उत्तम होती. याच्यानंतर याचा मुलगा क्सर्क्सीझ (पहिला) यानें ग्रीस देशावर एक प्रचंड स्वारी केली व अथेन्स शहर काबीज केलें. परंतु सालामिस येथें याच्या आरमाराचा मोड झाला व प्लॅटिया येथें याच्या सैन्याचाहि मोड झाला. यानंतर पहिला

अर्टाक्सर्क्सीझ, दुसरा क्सर्क्सीझ, दुसरा दरायस नोथस, दुसरा अर्टाक्सर्क्सीझ, तिसरा अर्टाक्सर्क्सीझ ओकस, अर्ससेज व तिसरा दरायस हे राजे होऊन गेले.

**अकियन लोक**—ग्रीक लोकांच्या चार शाखांपैकीं एक. अकियस मूळ पुरुष. होमर कवीच्या मतें यांची सत्ता सबंध ग्रीसवर होती व तो सर्व ग्रीक लोकांस अकियन म्हणतो. यांचें एओलियन शाखेशीं बरेंच साम्य दिसतें. यांचा बांधा उंच व डोळे घारे असत. हे आपणांस झ्युस या ग्रीक देवाचे वंशज समजत. हे लोखंडी हत्यारें व चौकोनी ढाली यांचा उपयोग करीत. यांची वस्ती ग्रीसच्या उत्तर भागांत व पिलॅपोनिसस प्रांतांत होती.

यांचा ३० गांवांचा संघ अथवा जूट होती. परकीय स्वाऱ्यांचा प्रतिकार व झ्युसची पूजा हीं जुटीचीं कारणें. यांचा अरेटस हा मुत्सद्दी होता. यांची मध्यवर्ती शासनसंस्था लोकमतानुवर्ती असून तिच्या वर्षांतून तीन बैठकी होत व कायदे पास होत. १२० सभासदांचें पोटमंडळ असे व स्ट्रेटेजिया हा मुख्य अधिकारी असे. या जुटींत लष्करी व्यवस्था व गुन्हेगारांस शासन करण्याची सोय नव्हती. रोमनांनीं हा संघ विध्वंसिला (ख्रि. पू. १४७).

**अकियाब**—ब्रह्मदेशांतील आराकान विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ५१३७ चौ. मै.. हवा समशीतोष्ण असून हिंवाळा आल्हाददायक असतो. पाऊस सुमारें १८० इंच पडतो. वावटळीपासून फार त्रास होतो. १५–१६ व्या शतकांतील अवशेष म्योहंग येथें अद्यापि सांपडतात. महामुनि येथील एका देवळांतील गौतमाची मूर्ति मंडाले येथें आराकान देवालयांत आहे.

या जिल्ह्याची लोकसंख्या सुमारें ६३०००० आहे. शेतकरी-वर्ग आळशी. गुरांत रोग फार. शेतीची वाढ योग्य होत नाहीं. मजुरीनें काम करण्याची पद्धत फार. सपाट भागांत भात व इतर ठिकाणीं बागायती पिकें. इतर पिकें तंबाखू, ऊंस, मिरची, मोहरी. म्हशींची पैदास होते. रेंकेलच्या विहिरी आहेत. या जिल्ह्याचे चार विभाग व आठ पोटविभाग आहेत. प्रत्येक विभागावर एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर असतो.

अकियाब (गांव)—हें कलदन नदीच्या मुखाशीं आहे. लोकसंख्या सुमारें ३८०००. यांत बंगाली लोक निम्मे व बाकीचे चिनी, ब्रह्मी, आराकानी. पूर्वी म्योहंग ही राजधानी होती. परंतु ब्रिटिश अमलापासून हें शहर राजधानी आहे. बंदरांत मोठमोठीं गलबतें येतात. मुख्य व्यापार तांदूळ व तो बहुतेक हिंदूंच्या ताब्यांत. हवा रोगट. १८७४ पासून या शहरांत म्युनीसिपालिटी आहे.

**आकीलीस**—एक प्रसिद्ध पौराणिक ग्रीक वीर. होमरच्या इलियड महाकाव्यांत त्यास महत्त्वाचें स्थान आहे. याच्या आईनें (थीटिस) यास युद्धकला, वक्तृत्व, संगीत व वैद्यक यांचें शिक्षण दिलें होतें. कांहींच्या मतें यास अमरत्व येण्याकरितां त्याच्या आईनें प्रयत्न केले. ट्रॉय समरांगणावर यानें शौर्य गाजविलें, व आपला मित्र पॅट्रोक्लीस याच्या मरणाचा सूड उगविला. हा शूर, कोपिष्ट व कांहींसा उदासीन वृत्तीचा असे. मरणोत्तर याची देवासारखी पूजा होत असे.

**अकीक**—हा मूळचा अरबी शब्द पैलूदार वाळूच्या दगडास लावण्यांत येत असला तरी त्याचा समावेश रत्नांत होतो. अगेट व ओपल (शिवधातु) हीं रत्नें याच जातींत पडतात. लाल अकीकास कार्नेलियन (रुधिराख्य) असें इंग्रजी नांव आहे. अकीकाचे अनेक रंग व आकार असतात. कृत्रिम रंगहि देतां येतो. हें रत्न जगभर सांपडतें. हिंदुस्थानांत गुजारतच्या खाणी प्रसिद्ध आहेत. कृष्णा, गोदा, सीना यांसारख्या नद्यांतून व कांहीं खोऱ्यांतून अकीकाचे खडे सांपडतात. अकीकाचे पुष्कळ जिन्नस होतात. उदा० पेले, सुऱ्यांच्या मुठी, दागिने, माळा, वाटल्या, डब्या, इ०. अगेट पहा.

**अकुवा**—उत्तर आफ्रिका. या ठिकाणीं येथील सत्ताधीश ग्रेगरी याचा अबदुल्ला अबीसर यानें इ. स. ६४७ मध्यें झालेल्या लढाईत पराभव करून त्यास ठार मारलें.

**अंकुश कृमि**—(ॲंकिलोस्टोमिआसिस) हा कांहीं विशिष्ट ठिकाणीं खाणींत काम करणाऱ्या लोकांस होणारा कृमिजन्य विकार आहे. हे कृमि परोपजीवी असून ते मनुष्याच्या जठरांत किंवा अन्नमार्गाच्या वरच्या भागांत जमतात. या जंतूंपासून रक्तक्षय उत्पन्न होतो व त्यावर इलाज केला नाहीं तर मृत्यु येतो. या रोगावर प्रतिबंधक उपचार करतां येतात आणि त्यांपासून गुणहि येतो. हा रोग विशेषतः उष्ण कटिबंधांत आढळतो. युरोपमध्यें हा प्रथम १८७१ सालीं आढळून आला.

**अकृतव्रण**—एक वेदवेत्ता ऋषि, परशुरामाचा मित्र, व परशुरामाच्या भीष्माशीं अंबेप्रीत्यर्थ झालेल्या युद्धांत त्याचा सारथी.

**ॲकेडियन वाङ्मय**—पश्चिम आशियांत असीरिया व बाबिलोनिया हीं दोन प्राचीन राष्ट्रें फार भरभराटलेलीं होतीं. त्यांच्या वाङ्मयास ॲकेडियन वाङ्मय म्हटलें आहे. सुमेरियन संस्कृति सगळ्यांत जुनी. या सुमेरियन वाङ्मयाचा आधार घेऊन ॲकेडियन कवींनीं आपली काव्यरचना केली. इसवी सनापूर्वी २००० ते १००० या काळांत ही काव्यरचना झाली. परंतु ती सर्व मातीच्या विटांवर कोरलेली आहे. या विटांवरील काव्याचें वाचन गेल्या शतकांत करण्यांत आलें. या काव्यांतील प्रमुख काव्य 'गिलगमेश' हें ख्रिस्तपूर्व ३००० वर्षांच्या सुमारास रचण्यांत आलें. या काव्याच्या सुमारें ३००० ओळी असाव्या. आजपर्यंत ११ विटा सांपडल्या आहेत पण काव्य अर्धेच सांपडलें आहे.

काव्याचीं अनेक भाषांत रूपांतरें झालीं. त्यांपैकीं हिटाइट भाषेतील कांहीं भाग सांपडला आहे. या काव्यांत सर्व मानवी समाजास सर्व काळांत लागू पडणाऱ्या भावना, म्हणजे मैत्री, एकनिष्ठा, कीर्ति, पराक्रमप्रियता, अमरत्वाची पिपासा, यांचाच विस्तार केलेला आहे. दुसरें महाकाव्य 'एनमा एलिश' हें आहे. अॅकेडियन देवतासमूहांतील प्रमुख देवता जी 'मार्डुक' तिच्या पराक्रमाचें वर्णन यांत आहे. त्याच्या सुमारें १००० ओळी आहेत व तें बहुतेक सबंध मातीच्या विटांवर कोरलेलें सांपडलें आहे. तिसरें महाकाव्य 'इरा' हें आहे. या इरा देवानें तत्कालीन अनेक देशांवर हल्ले करून अॅकेडियन लोकांस सर्वश्रेष्ठ स्थानीं आणून बसविलें. बऱ्याच लोककथाहि सांपडल्या आहेत. स्तोत्रें व प्रार्थना बऱ्याच मिळाल्या आहेत. प्रमुख देवता 'मार्डुक', युद्ध व प्रेम यांची देवता 'इश्तर', सूर्यदेवता 'शमाश' व विज्ञान-देवता 'ईआ' यांना उद्देशून या प्रार्थना आहेत. उपदेश-वाङ्मय, कल्पित लघुकथा, वगैरेहि पुष्कळ सांपडल्या आहेत. एकंदर अॅकेडियन वाङ्मय हल्लींच्या सुधारलेल्या युगांत देखील वाचण्यास आनंद वाटण्यासारखें आहे.

**अकोट**—वऱ्हाड, अकोला जिल्हा. अकोट तालुक्यांत २६४ खालसा व दोन जहागिरी गांवें आहेत. बहुतेक जमीन काळी, खोल व सुपीक. उत्तरेस थोडी डोंगराळ. पाण्याची टंचाई व पाणी खारट. रस्ते चांगले. देवळें फार त्यामुळें वार्षिक यात्रा पुष्कळ. आठवड्याचे बाजार १४ असून अकोट, मुंडगांव व मालेगांव वगैरे गांवीं भरतात.

अकोट हा तालुक्याचा मुख्य गांव. लोकसंख्या २२४६५. बुधवार व रविवारीं बाजार. इ. स. १८८४ पासून म्युनिसिपालिटी. कापूसबाजार व सरकी काढण्याचे व रुई दाबण्याचे कारखाने. येथील सतरंज्या प्रसिद्ध आहेत. मुसल्मान वस्ती बरीच. मोठमोठे वाडे व हवेल्या प्रेक्षणीय आहेत. पीर दर्यासाहेब नांवाच्या टेंकडीवरील थडगें व मशीद प्रसिद्ध आहे. एकनाडनारायणाची समाधि हिंदु व मुसल्मान यांस पूज्य आहे. नरसिंहबोवाचें देऊळ महत्त्वाचें आहे. मीर जाफर करोडा थडग्याजवळ गैबी पीर असून तेथें हिंवताप बरा होतो अशी समजूत आहे. या दोन्ही ठिकाणीं फारसी शिलालेख आहेत.

**अॅकोनकाग्वा शिखर**—दक्षिण अमेरिकेंतील चिली देशांतील अँडीज या पर्वताचें सर्वांत उंच शिखर. याची उंची २३०९७ फूट आहे. पश्चिम गोलार्धांत हें सर्वांत उंच आहे.

**अँकोना**—इटली. हें याच नांवाच्या प्रांताच्या राजधानीचें शहर असून धर्माध्यक्षाचें राहण्याचें ठिकाण आहे. हें बंदर बोलोनाहून ब्रिंडिसीला जाणाऱ्या रेल्वे-सडकेवर आहे. कोळसा, इमारतीचें लांकूड, धातु आणि ताग, इत्यादि माल परदेशांहून या बंदरांत येतो. या बंदरांतून परगांवांस जाणारा महत्त्वाचा माल म्हटला म्हणजे डांबर आणि कॅल्शिअम कार्बाइड होय. येथें पूर्वी एक मोठें व्हीनसचें मंदिर होतें. नकशीचें व कोरीव काम केलेल्या पुष्कळ इमारती आहेत. शहराच्या पूर्वेस मोठें बंदर आहे. येथील लोक ग्रीक भाषा बोलत असत. रोमचें राष्ट्र अस्तित्वांत होतें तेव्हां सुद्धां येथील लोक स्वतःचें नाणें वापरीत असत. लो. सं. ८४०००.

ख्रि. पू. १५०० च्या सुमारास डोरियननीं हें स्थापलें. ख्रि. पू. १७८ वर्षांपर्यंत इलिरियन युद्धामध्यें आरमाराचें ठिकाण म्हणून हें बंदर प्रसिद्ध होतें. एक महत्त्वाचा किल्ला म्हणून अँकोना प्रसिद्ध आहे.

**अंकोर**—कांबोजमधील प्राचीन ख्मेर संस्कृतीचा अवशेष म्हणून असलेल्या पडक्या झडक्या इमारतींच्या समूहाला हें नांव आहे. टॉन्ले-सप या महासरोवराच्या उत्तरेस असणाऱ्या जंगलांत हे अवशेष असून त्यांपैकीं प्रमुख म्हणजे अंकोरथोम हें गांव आणि अंकोरवात नांवाचें देवालय हीं दोन्ही टॉन्ले-सपला मिळणाऱ्या सियेमरीप नदीच्या दक्षिण तीरावर आहेत. इतर याच तऱ्हेचे अवशेष नदीच्या दोन्ही कांठांवर जवळच इकडे तिकडे पडले आहेत. अंकोरथोम हें नदीपासून अजमासें पाव मैलावर आहे. आयमोनियरच्या मतें तिसऱ्या जयवर्मनच्या कारकीर्दींत (इ. स. ८६० त) या शहराच्या वसाहतीला सुरवात होऊन ९०० च्या सुमाराला याचें काम पुरें झालें. ख्मेर कलाकौशल्याचें अति उत्तम राखून ठेविलेलें उदाहरण म्हणजे अंकोर वात होय. अंकोरथोमच्या दक्षिणेस एका मैलाच्या आंत एका चौकोनी प्राकारांत हें आहे.

गेल्या चाळीस-पन्नास वर्षांतच फ्रेंच इंडोचीनमधील अंकोर या प्राचीन शहरांतील उत्कृष्ट अवशेष उघडकीस आले आहेत. सिंक्सएवढे मोठाले बुद्धाचे (ब्रह्माचे असें वाटतें) दगडी पुतळे ज्यांत आहेत असे पुष्कळ अवशेष परवांपर्यंत अफाट जंगलांतील गर्द झाडींत लोपून गेल्यानें जगाच्या निदर्शनास आले नव्हते.

**अकोला**—वऱ्हाडांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ४१११ चौ. मै. लोकसंख्या ९०७७४२ (१९४१ प्रमाणें). यांत पांच तालुके असून एकूण ९७६ गांवें आहेत. पैकीं ४२ जहागिरीचीं गांवें. पूर्णा नदी यांतून जाते. जमीन काळी व सुपीक. हवा उष्ण. पाऊस सुमारें ३४ इंच. नर्नाळा व बाळापूर येथील किल्ले, बाळापूरची छत्री, पातूर डोंगरांतील दोन विहार व हेमाडपंती देवळें प्रेक्षणीय आहेत. ज्वारी व कापूस हीं मुख्य पिकें असून कापसाचे गठ्ठे करून पाठविण्याचा व्यापार चालतो. दुष्काळ वारंवार पडतो व तो फारच जाणवतो. जी. आय. पी. व सी. पी. रेल्वे या जिल्ह्यांतून जाते. तालुक्याचें क्षेत्रफळ ७३९ चौ. मै.

३५८ गांवें असून त्यांत १९ जहागिरीचीं गांवें. आठवड्याचे बाजार १४ ठिकाणीं भरतात. जमीन सपाट व सुपीक आहे. फक्त दक्षिणेस डोंगराळ. दर.गांवास सरासरी ११ विहिरी आहेत, तरी खाऱ्या पाण्याच्या भागांत पाण्याची टंचाई भासते.

शहर—अकोला जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून भुसावळ-नागपूर रेल्वेवरील प्रसिद्ध शहर. कापसाचा मोठा व्यापार चालतो. कापसाच्या व तेलाच्या पुष्कळ गिरण्या आहेत. हवा दिवसां फार उष्ण व रात्रीं बरीच थंड असते. मोर्ना नदी शहरांतून वाहते. पश्चिम तीरावर शहर असून पूर्व तीरावर ताजना पेठ आहे. तेथें सरकारी कचेऱ्या आहेत. गांवाला पाणी विहिरींचें असून मोर्नेस दोन तलाव आहेत. हल्लीं कापशी येथें जलाशय बांधून नळ आणले आहेत. अकोल्यापासून ६ मैलांवर असलेल्या कन्हेरी गांवच्या अकोलसिंग या रजपुतानें हें शहर वसविलें म्हणून यास अकोला म्हणतात. लो. सं. ६२५६४. नागपूर विद्यापीठाला जोडलेलें एक कॉलेज आहे.

**अकोला**—मुंबई इलाखा, अहमदनगर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ५७२ चौ. मै. लोकसंख्या ८३१३४. प्रवरा व मुळा या नद्यांच्या भोंवतालचा प्रदेश यांत येतो. पाऊस पश्चिमेस २००–२५० इंच व पूर्वेस २० इंच. जमीन रुक्ष व उंचसखल. १९१८ सालीं येथील मुसलमान मामलेदारानें सैन्यभरतीसाठीं जुलूम केला म्हणून त्यास जिवंत जाळलें म्हणून तालुका थोडा प्रसिद्ध. यांतील ढोकरी गांव चिंतो विठ्ठल यांस इनाम असल्याचा उल्लेख सांपडतो.

**अंकोला**—मुंबई इलाखा, उत्तर कानडा जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तालुका. क्षेत्रफळ ३७५ चौ. मै. या तालुक्यांत ९० खेडीं आहेत. लोकसंख्या ४२२१३. अंकोला हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. हा भाग कुमठा तालुक्यांत पूर्वी मोडत असे; परंतु इ. स. १८८० पासून हा स्वतंत्र तालुका करण्यांत आला. पावसाची सरासरी येथें १३२ इंच आहे. अंकोला नदी नावा चालविण्याइतकी मोठी असून अंकोला गांवापर्यंत नावा येतात. बांबू, तांदूळ, शिंगें, मासे, मीठ, सागवान हे निर्गतीचे जिन्नस व तांदूळ, गहूं, सूत, मासे हे आयातीचे जिन्नस होत. अंकोला हें तालुक्याचें मुख्य ठिकाण कारवारच्या आग्नेयीस सुमारें १५ मैलांवर आहे. या ठिकाणीं एक पडका किल्ला आहे. समुद्रकिनाऱ्यापासून गांव दोन मैल आंत आहे. येथें दर्यावेपार चांगला चालतो. सारस्वत, कोंकणी, वैश्य, नाडोद, हाल आणि करेवक्कल, कलावंत, ख्रिस्ती, मुसलमान, वगैरे लोक येथें आहेत. टोपल्या व चटया चांगल्या होतात. अंकोला किल्ला फार जुना आहे असें सांगतात. किल्ल्याभोंवतीं खोल खंदक आहे व तट आहे. किल्ल्यांत कोटेश्वराचें देवस्थान आहे. १५१० सालापासून अंकोल्याचा इतिहासांत उल्लेख आढळतो. अंकोला येथें पोर्तुगीजांचा व्यापार असे. १६७६ च्या फेब्रुवारी महिन्यांत शिवाजीनें याचा अर्धवट नाश केला. पुढें हें गांव ओसाड पडलें. १७२० मध्यें मोंगलांनीं मराठ्यांना जें स्वराज्य दिलें त्यांतील सोळा जिल्ह्यांपैकीं अंकोला हा एक होता. १७६३ त हैदरनें येथील किल्ला पाडला. १९४१ सालीं अंकोल्यास ४१०४ वस्ती होती.



**अकोळनेर**—जुन्नरसुभ्याखालीं असलेल्या बारा मावळांपैकीं एक. हीं मावळें जुन्नरापासून चाकणपर्यंत आहेत: (१) शिवनेर, (२) जुनेर, (३) मिननेर, (४) घोडनेर, (५) भीमनेर, (६) भामनेर, (७) जामनेर, (८) पिंपळनेर, (९) पारनेर, (१०) सिन्नेर, (११) संगमनेर, (१२) अकोळनेर.

**अक्कड**—बाबिलोनियांतील निमरुड राज्याच्या केन्द्रस्थानांतील एका शहराचें हिब्रू नांव. जुन्या करारांत याचा उल्लेख आहे. बाबिलोनियन राजा पहिला सार्गन याची राजधानी अगडे शहर हें अक्कड याचें अपभ्रष्ट रूप असावें. अगडे याचा अर्थ 'अग्निमुकुट'. याचा इश्तरच्या पूजेकडे संबंध असावा. कारण इश्तरच्यानंतर अनुचित देवतेची उपासना येथें सुरू झाली. या देवतेचें सिप्पूर येथें देवालय होतें व सिप्पूरचा जुना भाग अक्कड शहर असा तर्क आहे. सुमेर राजांच्या बिरुदावलींत या शहराचा उल्लेख सांपडतो. बाबिलोनिया पाहा.

**अक्कण्णा**—उर्फ एकनाथपंत. कुतुबशाहींतील एक सुप्रसिद्ध ब्राह्मण मुत्सद्दी. आडनांव पिंगळे. आश्वलायन शाखेच्या देशस्थ ऋग्वेदी भारद्वाजगोत्री ब्राह्मणकुलांत जन्म. याचा भाऊ मादण्णा व हा कुतुबशाहींत प्रसिद्धीस आले. या दोघां भावांचा १६८६ त गोवळकोंड्याच्या बादशहानें खून करविला. अक्कण्णा धूर्त व कावेबाज होता, पण मादण्णासारखा बुद्धिमान् नव्हता. हे दोघे वैष्णव असून यांचे वंशज वरंगळनजीक हणमकोंडा येथें व आसपास देशमुखी करतात. मादण्णा पाहा.

**अक्कलकारा**—एक औषधी वनस्पति. संस्कृत नांव अकल्लक. झाड हातभर उंच असून त्याचीं पिंवळीं फुलें औषधी असतात. खोकल्यावर, जिह्वादोषावर व शेंदूर पोटांत गेल्यास याचा उपयोग करतात. स्पष्ट वर्णोच्चार व बोबडेपणा वगैरे विकारांवर तोंडांत धरून लाळ गाळतात.

**अक्कलकोट (संस्थान)**—मुंबई इलाख्यांतील सोलापूर जिल्ह्यांत आग्नेयीकडील संस्थान. माळशिरस तालुक्यांतील सहा व खटाव तालुक्यांतील एक गांव या संस्थानांत आहे. एकंदर गांवें १०३ असून क्षेत्रफळ ४९८ चौ. मै., उत्पन्न ६–७ लाख. सरहद्दीवरून भीमा व सीना व संस्थानांतून बोरी नदी वाहते. हवा पावसाळ्याच्या अखेरीस थोडी रोगी, थाकीच्या वेळीं चांगली.

पांऊस ३० इंच. पाणी--पुरवठा विहिरींपासून. मुख्य पिकें बाजरी, तूर, अंबाडी, कापूस, ज्वारी व विड्याचीं पानें. लोकवस्ती हिंदु, मुसलमान व ख्रिस्ती लोकांची असून विणकऱ्यांचा धंदा मोठया प्रमाणावर चालतो. जी. आय्. पी. रेल्वे १८ मैल संस्थानांतून जाते व अक्कलकोट रोड हेंच मोठें स्टेशन. संस्थानिक भोसले आडनांवाचे आहेत. अक्कलकोटकर भोसले पहा. संस्थानची लोकसंख्या १०३९०३ ( १९४१ ) आहे.

अक्कलकोट राजधानीची लोकसंख्या ७०९५ ( १९४१ ). जी. आय्. पी. रेल्वेच्या अक्कलकोट रोड स्टेशनपासून ७ मैल. जुना व नवा राजवाडा, छत्र्या, हायस्कूल, शस्त्रागार पाहण्यासारखें आहे. वेधशाला प्रसिद्ध आहे.

**अक्कलकोटकर भोसले**—१७०७ सालीं पारद येथील पाटलाच्या बायकोनें आपला मुलगा राणोजी लोखंडे शाहूमहाराजांच्या पायांवर घातला. त्याचा शाहूमहाराजांनीं पुत्रवत् सांभाळ केला. त्याचें नांव फत्तेसिंग ठेवून त्यास अक्कलकोट परगण्याची जहागीर दिली. त्यानें स्वतंत्र राजाप्रमाणें अष्टप्रधानांच्या नेमणुका केल्या होत्या. या फत्तेसिंगानें शाहूबरोबर पुष्कळ लढायांत भाग घेतला होता. फत्तेसिंगानंतर त्याचा पुतण्या शहाजी यास दत्तक घेण्यांत येऊन त्यास जहागिरीचीं वस्त्रें मिळालीं. बाबूजी नाइकाचें कर्ज देऊन शहाजीजवळ अक्कलकोटचीच मोठ्या जहागिरीपैकीं जहागीर राहिली. थोरल्या माधवराव पेशव्यानें हैदरवर केलेल्या स्वारींत याचें एक पथक होतें. १७८९ त हा मरण पावल्यावर याचा मुलगा फत्तेसिंग उर्फ आबासाहेब गादीवर बसला. याचा भाऊ तुळाजी यानें भांडण केल्यावरून त्यास खटाव ताल्लुक्यांतील कुर्ली गांव देऊन गप्प बसविण्यांत आलें. सातारचें राज्य इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेतल्यावर ( १८२० ) ब्रिटिश सरकारनें फत्तेसिंगाशीं तह केला. १८२२ त फत्तेसिंग मरण पावल्यावर त्याचा मुलगा मालोजी गादीवर आला. या वेळीं निजाम हद्दींतील २५००० रु. चा मोकासबाबीचा हक्क इंग्रजांनीं काढून घेतला. १८२८ त मालोजी वारल्यावर १८५७ पर्यंत त्याचा मुलगा गादीवर होता. १८४८ त सातारचें राज्य खालसा झाल्यावर अक्कलकोटकर ब्रिटिशांचे मांडलिक झाले. शहाजीनंतर मालोजी गादीवर आला, पण १८६६ त त्यास पदच्युत करण्यांत आलें. पुढें १८९१ पर्यंत त्याचा मुलगा शहाजी अल्पवयी असल्यामुळें ब्रिटिश सरकारच कारभार पाहत असे. १८९८ त तोहि निपुत्रिक वारल्यावर कुर्ल्यांच्या वंशजांपैकीं फत्तेसिंगास दत्तक घेतलें, व पूर्ववत् सरकारनें व्यवस्था केली. १९१६ सालीं फत्तेसिंग वयांत आल्यावर ते कारभार पाहूं लागले. पण १९२३ सालीं पुण्याच्या ससुन हॉस्पिटलमध्यें शस्त्रक्रियेकरितां आले असतां चुकीच्या औषधामुळें त्यांस मृत्यु आला. यांच्यामागून त्यांचा मुलगा विजयसिंह हे सध्यां गादीवर आहेत. यांनीं आतां आपलें संस्थान मुंबई इलाख्यांत विलीन केलें आहे.

**अक्कलकोटकर स्वामीमहाराज**—गेल्या शतकाच्या उत्तरार्धांतील एक साधु पुरुष. पूर्वायुष्यासंबंधीं माहिती मिळत नाहीं. मंगळवेढयाहून येऊन अक्कलकोटास स्थाईक झाले. नांव दिगंबरबाबा. माणिकनगरचे प्रभु समाधिस्थ झाल्यावर हे प्रगट झाले. त्यांच्या भक्तांत सर्व वर्गांचे व दर्जाचे लोक आहेत. वागणूक चमत्कारिक पण वैराग्यपूर्ण असे. धड कोणाशीं बोलत नसत, पण जे शब्द बोलत ते दर्शनेच्छूंच्या मूक प्रश्नांना तें उत्तर म्हणून नेमके जुळत. स्वामींच्या चमत्कारांच्या गोष्टी पुष्कळ सांगतात. स्वामी चैत्र वद्य १२ शके १८०० रोजीं अक्कलकोट येथें 'निजानंदीं निमग्न' झाले. यांचे पुष्कळ शिष्य व भक्त असून अक्कलकोटाबाहेरहि मठ आहेत.

**अक्कादेवी**— कल्याणीच्या पश्चिम चालुक्य घराण्यांतील दुसऱ्या जयसिंहाची वडील बहीण. बऱ्याच शिलालेखांत व कागदपत्रांत उल्लेख आढळतो म्हणून प्रसिद्ध व्यक्ति असावी असें वाटतें. हिचा नवरा हानगलच्या कदंबांपैकीं असावा.

**अक्काबाई**—अक्का म्हणजे वडील बहीण. ही लक्ष्मीची वडील बहीण अवदशा. यावरून अक्काबाईचा फेरा म्हणजे वाईट ग्रह येणें, दारिद्र्य प्राप्त होणें. यावरून आणखी निरनिराळ्या म्हणी झाल्या आहेत.

**अक्काबाई**—रामदासस्वामींची शिष्या. ही कऱ्हाडकर रुद्राजीपंत देशपांडे यांची कन्या असून हिचा नवरा लहानपणींच मरण पावला. बापाच्या अनुमतीनेंच तिनें समर्थांचा उपदेश घेतला. ही मोठी एकनिष्ठ गुरुभक्त होती. परळी किल्ल्यावरील रामदासस्वामींची समाधि व देऊळ हिनें बांधलें. ही समर्थांच्या मागून चाळीस वर्षांनीं ( शके १६४३ त ) वारली. हिचें वृंदावन सज्जनगडावर दाखवितात.

**अॅक्चुअरी**— विगणक किंवा विमागणक. सरासरीचे आंकडे आणि विमाहिशेब या कामीं विगणकाची फार आवश्यकता असते. मोठया विमा कंपनीला असा एक गणिततज्ज्ञ लागतोच. सरकारी खात्यांतूनहि विगणक नेमतात. इंग्लंडमध्यें इन्स्टिटयूट ऑफ अॅक्चुअरीज व स्कॉटलंडमध्यें फॅकल्टी ऑफ अॅक्चुअरीज या संस्था अॅक्चुअरी परीक्षा घेऊन प्रशस्तिपत्रें देतात. याचें काम विशेषेंकरून विमा कंपनीच्या कार्याचें व मालमत्तेचें मूल्यमापन करणें हें असतें.

**अॅक्टन**— इंग्लंडांतील मिडलसेक्सच्या ईलिंग पार्लमेंटरी विभागांतील शहरी भाग. सध्यां अर्वाचीन लंडनचा नगरोपान्त भाग. लोकसंख्या ६० हजार. हें शहर मोठमोठया लोकांचें राहण्याचें स्थान होतें.

**ऑक्टियम भूशिर**—अकर्नेनिया (ग्रीस) च्या उत्तरेस, आर्ट आखाताच्या मुखाजवळील भूशिर. येथें असलेलें ऑक्टियमचें प्राचीन देवालय होतें. पहिला रोमन बादशहा ऑगस्टसनें मार्क ॲन्टनीवर मिळविलेल्या विजयाबद्दल (ख्रि. पू. ३१) प्रसिद्ध.

**ऑक्टियम शक**—ख्रि. पू. ३१ या वर्षी सप्टेंबरच्या तीन तारखेस ऑक्टियम येथें झालेल्या युद्धाच्या स्मरणार्थ हा शक रोमन व ईजिप्शियन लोकांत चालू झाला होता. परंतु त्याच्या चवथ्या वर्षी म्हणजे ख्रि. पू. २७ या वर्षी ऑगस्टस यानें रोमची सत्ता आपल्या हातांत घेतली व त्या गोष्टीच्या स्मरणार्थ ऑगस्टस शक सुरू केला.

**अक्तिन**—(ॲक्टिनियम). एक किरणोत्सर्जक (रेडिओ ॲक्टिव्ह) मूलद्रव्य. हें अगदीं अल्प प्रमाणांत सांपडतें. इ. स. १८९९ सालीं डेबिर्ने यानें त्याचा शोध लावला.

**अक्याय**—अक्रियाव पाहा.

**ॲक्युम्युलेटर**—विद्युत्संचायक पाहा.

**अक्रा**—१. हिंदुस्थान, मध्यप्रान्त, बस्तु जिल्ह्यांतील एक प्राचीन ठिकाण. येथें खड्यांचें काम केलेलीं जुनीं नाणकें सांपडतात.

२. गिनी आखातानजीकच्या "गोल्ड कोस्ट" या ब्रिटिश वसाहतींतील मुख्य बंदर व शहर. लोकसंख्या ७२०७७ (१९३१). येथें कोकोचे मळे आहेत.

**अक्रियावाद**—क्रियावादाच्या विरुद्ध हा वाद प्रचलित होता. विशेषतः तो वेदांत, सांख्य, योग व बौद्धसंप्रदाय यांमध्यें आढळून येतो. मुख्य क्रियावाद वैशेषिक व जैन यांमध्यें प्रचलित होता. त्यामध्यें क्रिया, विकार, वगैरे गोष्टी आत्म्यावर आपला पगडा बसवितात असें मत प्रतिपादन केलेलें असे.

**अक्रूर**—आयुपुत्र नहुषराजाच्या यदुनामक पौत्राच्या वंशांतील वृष्णीचा पौत्र. याचें नांव श्वफल्क म्हणून श्वफल्की असेंहि म्हणतात. हा वसुदेव व कृष्ण यांचा समकालीन असून रामकृष्णांना मथुरेस आणण्यास कंसानें याला पाठविलें. स्यमंतक मण्याशीं याचा संबंध यात येतो. अक्रूरानें भोजाच्या शतधन्व्याकडून सूर्योपासक सत्राजितास मारून स्यमंतक मणि मिळविला. शतधन्व्यानें सत्राजितास मारल्याची गोष्ट कळतांच कृष्णानें शतधन्व्यास मारलें, पण अक्रूर शतधन्व्याच्या मदतीस आला नाहीं. उलट अक्रूर द्वारकेंतूनहि निघून गेला. या सर्व गोष्टी कृष्णास कळल्यावर ज्ञातींत भेद नको म्हणून उपेक्षा करून त्यानें अक्रूरास परत बोलावून आणलें.

**अक्रोड**—(वर्ग-जुग्लांडानी) हें एका जातीचें (जुग्लान्स) झाड असून याचीं फळें प्रसिद्ध आहेत. हीं झाडें पूर्वेकडील देशांत होतात. हें झाड फार मोठें, सुंदर व बळकट असून याच्या फांद्यांचा विस्तारहि फार मोठा होतो. याचें लांकूडहि फार महत्त्वाचें आहे. कारण तें टिकाऊ असून त्यास उत्तम तकाकी आणतां येते व त्याचें कसुनी सामान उत्कृष्ट होतें. याचीं फळेंहि चांगलीं असून त्यांतील बी खातात व त्याचें तेलहि निघतें. या तेलाचा उपयोग चित्रकार आपले रंग तयार करण्याकरितां करतात. तसेंच छापण्याकरितां तांब्याचे ठसे बनविण्यास व जाळण्याकरितां याचा उपयोग होतो. याच्या फळाचें लोणचें होतें.

**अखती समारंभ**—कहार जातीच्या लोकांमध्यें अक्षय्यतृतीयेच्या दिवशीं देवीच्या देवळामध्यें स्त्री-पुरुष जमून एक समारंभ करतात. त्या वेळीं पुढें येणाऱ्या वर्षाकाळामध्यें पाऊस कसा काय पडणार, यासंबंधीं शकुन पाहतात व नूतन वधूवरांस परस्परांचीं नांवें घ्यावयास लावतात. अक्षय्यतृतीया पाहा.

**अखलकोप**—सातारा जिल्ह्यांतील खटावच्या ईशान्येस ४ मैलांवर कृष्णा नदीच्या कांठीं एक गांव. लोकसंख्या तीन हजार. जमीन सुपीक. दत्तात्रेय व म्हसोबा हीं देवळें प्रसिद्ध. दत्तात्रेयाच्या देवळांत वर्षांतून मार्गशीर्ष, माघ व आश्विनांत यात्रा भरते. येथील व परस्थ शेट-सावकार या देवस्थानांस मदत करतात. म्हसोबाची यात्रा एप्रिल महिन्यांत भरते व त्यांत मांग, रामोशी, मराठे भाग घेतात.

**अखा**—ब्रह्मदेशांतील शान संस्थानांतील पठारावरील एक रानटी जात. लोकवस्ती ३० हजार. माकेवसन निर्यात करण्यावर दिसतात, पण चिनी लोकांशीं सर्वसंबंधापर्यंत व्यवहार होतो. अफूस व अफूचीं बोंडें यांची लागवड करतात. भुतांची व पूर्वजांची पूजा हा धर्म असून मृतांचीं श्राद्धें करतात. मृतास पुरतात तेव्हां डोणगा करतात.

**अखुंद**—युसुफझी टोळ्यांपैकीं एका टोळीचा नायक. याची सत्ता पेशावरच्या उत्तरेकडील मुलखावर असे. हा सन १८७७ मध्यें मृत्यु पावला. त्यानंतर याचा मुलगा मियांगुल यानें दुसरा-खान नांवाच्या वजीरच्या खानाशीं दोस्ती करून दीरच्या खाना-वरस्वारी केली व त्याचा अर्धा मुलूख काबीज केला. परंतु पुढें याचा उमराखानाशीं कलह झाला व दीरचा नवा मुलूख उमराखानानें ताब्यांत घेतला. पण पुढें त्यास इंग्रजांनीं काबुलास हाकून दिलें व दीरच्या खानानें ब्रिटिशांशीं तह केला. सद्य या ठिकाणीं अखुंदचें थडगें असून तें एक प्रेक्षणीय स्थळ आहे.

**अंग (देश)**—बंगाल्यांतील हें एक प्राचीन राज्य असून याला कामाश्रम असेंहि नांव होतें. याच ठिकाणीं शंकरानें मदनाला जाळून अनंग केलें (वा. रामायण, बालकांड, स. २३). हा प्रदेश मगधाच्या पूर्वेस असून त्यांत मोंघीर, भागलपूर आणि पूर्णिआ या सध्याच्या जिल्ह्यांचा समावेश होत असे. अंगदेशाचा उल्लेख अथर्ववेदांत एकदां आला असून, त्या ठिकाणीं "

हा 'तक्मा' (ज्वर) गंधारी, अंग आणि मगध या लोकांच्या स्वाधीन करतों", असें म्हटलें आहे (अथ. ५.२२. १४). यावरून आथर्वणकाळीं अंग लोक हे ब्राह्मणशत्रु किंवा परके समजले जात. पुढील काळीं अंग लोक शोण आणि गंगा यांच्या तीरीं वस्तीस राहिल्यावर या प्रदेशाला सुद्धां अंगदेश म्हणूं लागले. महाभारतांत अंग लोकांविषयीं बरेच उल्लेख सांपडतात. कर्ण हा अंगदेशाचा राजा होता म्हणून त्यास पुष्कळदां अंगराज म्हणून संबोधिलें आहे. बृहत्संहितेंत (१४.८), मत्स्यादि पुराणांत देशनामांत अंगदेशाचा उल्लेख सांपडतो. बौद्ध धर्माचा उदय होण्याच्या वेळीं हिंदुस्थानचे जे मुख्य १६ राजकीय विभाग कल्पिले आहेत त्यांत अंगदेश येतो. याची राजधानी चंपा होती. हल्लींच्या भागलपूर शहरानजीक चंपा शहर असावें. मगधराजा बिंबिसार यानें राज्याभिषेकानंतर (इ. स. पू. ५३०) थोड्याच दिवसांनीं अंगदेश हस्तगत केला. बुद्धकाळचा अंगराजा म्हणजे केवळ एक श्रीमंत सरदार असून त्यानें कोणा एका ब्राह्मणास त्याच्या पूर्वायुष्यांतल्या सेवेबद्दल एक नेमणूक करून दिली एवढीच आपणांला माहिती मिळते. नवव्या शतकांत अंगदेशांत पाल घराणें उदयास आलें व त्यानें आपली सत्ता सबंध उत्तर बंगाल व बिहार प्रांतांवर बसविली. यानंतर अंगदेशाचें नांव फारसें निघत नाहीं. चंपा नगरीला जीं अनेक नांवें पडलीं आहेत, त्यांत अंगपुरी हें एक आहे. मुसलमानी अमदानीच्या पूर्वयुगांत गौडच्या एका मुसलमानी राजघराण्याकडे हा प्रदेश होता; पुढें अकबरानें दिलीच्या साम्राज्यांत तो समाविष्ट केला. १७६५ त शहाअलम बादशहानें बंगाल, बिहार व ओरिसा यांची सनद ईस्ट इंडिया कंपनीच्या नांवानें जेव्हां करून दिली तेव्हांपासून अंगदेश ब्रिटिश मुलूख बनून राहिला आहे.

**अंगठी**—कोणत्याहि पदार्थाचें निरनिराळ्या उपयोगाकरितां व निरनिराळ्या आकाराचें केलेलें वेटोळें असा याचा कला-व्यवहारांत अर्थ आहे. विशेषतः चांदी, सोनें किंवा इतर मौल्यवान् पदार्थ यांच्या अंगठ्या अलंकारार्थ बनवितात. अंगठींत दोन भाग असतात. एक कोंदणाचा किंवा ज्यावर कांहीं चिन्ह काढतात तो वरचा भाग; व दुसरा बोटाभोंवतीं येणारा काडी-सारखा भाग. ज्या काळीं लेखनकला फार थोडक्यांनाच अवगत होती त्या काळीं आत्मविशिष्ट चिन्हें अंगठ्यांवर खोदून महत्त्वाच्या कागदपत्रांवर त्यांचा शिक्का मारीत व असे शिक्के लेखांचा खरेपणा सिद्ध करण्यास उपयोगी पडत. जेव्हां एखादा राजपुरुष आपला अधिकार कोणाला अर्पण करी तेव्हां आपल्या शिक्क्याची अंगठी त्याच्या हवालीं करीत असे. सुमात्रांतील बत्ता लोक अद्याप विशिष्ट प्रकारच्या अंगठ्या परवान्याप्रमाणें वापरतात. भरतखंडांत अंगठीचा उपयोग ऋग्वेदकालापासून आढळतो. ऋग्वेदांत खादि असा शब्द अंगठी या अर्थी आलेला आढळतो. अंगठीला प्रचलित संस्कृत प्रतिशब्द अंगुली (री) यक, ऊर्मिका, मुद्रा, इ. होत. अतिप्राचीन काळींहि अंगठ्यांवर नांवें खोदून त्यांचा प्रसंग पडल्यास खुणेकरितां उपयोग करीत. रामायणांत रामानें मारुतीजवळ तो सीताशुद्धीला निघण्याच्या वेळीं आपल्या नांवाची अंगठी तिच्या खुणेकरितां म्हणून दिली असें वर्णन आहे (किष्किंधा सर्ग ४४, श्लो. १२). कालिदासाचें 'अभिज्ञान-शाकुंतलम्' नाटक या खुणेच्या अंगठीवरच रचलें आहे.

अंगठ्यांत, विशेषतः विशिष्ट प्रकारांनीं केलेल्या अंगठ्यांत, जादू असते, अशी सर्वसाधारण समजूत असल्यानें शरीरविभूषण हाच केवळ हेतु अंगठी घालण्यांत नसतो. उदाहरणार्थ, नवग्रहांच्या अंगठ्या, श्राद्धकर्माच्या वेळीं दर्भाच्या अंगठ्या (पवित्रकें) ज्या घालाव्या लागतात, त्यांचा हेतु दुरितनिवारण असाच असावा. सोन्याचीं पवित्रकें—विशिष्ट आकाराचींहि—घालण्याची जुन्या लोकांत चाल आहे.

मोहोरेची अंगठी घालण्याची चाल फार जुनी दिसते. गरीब बायकांच्या हातांतसुद्धां ही अंगठी साधारणपणें असते. ज्याप्रमाणें मोहोरांच्या अंगठ्या श्रीमंत घालतात त्याप्रमाणें गरीब लोक चवल्या बसविलेल्या अंगठ्या घालतांना आढळतात. अलीकडे रोल्डगोल्डच्या, कांचमीना नक्षीच्या नवीन नवीन अंगठ्या घालण्याकडे प्रवृत्ति वाढत आहे.

**अंगदशाहा**—शीखांचा एक गुरु. हा इ. स. १५०४ सालीं जन्मला. तो नानकाप्रमाणेंच खत्री जातीचा असून नानकामागून १५३९ सालीं तो शीखांचा गुरु झाला. नानकानेंच आपल्या स्वतःच्या मुलांना वगळून अंगडाला आपला वारस केलें होतें. गुरु अंगडाच्या कार्याची फारशी माहिती मिळत नाहीं. त्यानें गुरुमुखी लिपि शोधून काढिली व 'ग्रंथसाहेब' विस्तृत केला असें म्हणतात. त्याची राहणी अतिशय साधी असे. दोर विणून तो उदरनिर्वाह करी. इ. स. १५५२ मध्यें हा दिवंगत झाला. अमरदासाला आपल्यामागें यानें गुरु निवडलें होतें.

**अॅगॅथॉक्लिस** (सु. ख्रि. पू. ३६१)—एक ग्रीक राजा. याचा अमल काबूल व पश्चिम पंजाब या भागावर असावा. कारण याचीं नाणीं त्या प्रदेशांत आढळून आलीं आहेत. याच्या नाण्यांवर ब्राह्मी लिपींत अक्षरें कोरलेलीं आहेत. याचीं कांहीं नाणीं तांब्याचीं आढळलीं आहेत. त्यांच्यावर दोन्ही बाजूंवर खरोष्टी लिपींतील लेख आहेत. तसेंच याच्या काळचीं कांहीं बॅक्ट्रियन पद्धतीच्या कारागिरीचीं पदकें उपलब्ध झालीं आहेत. त्या पदकांवर अलेक्झांडर दि ग्रेट, ॲंटिओकस निकेटर, डायोडोरस, युथिडिमीस नाण्यांसारखे मुखवटे, आकृति व नांवें कोरलेलीं आढळतात.

**अंगद**— वालीपासून, त्याची स्त्री तारा हिच्या पोटीं झालेला पुत्र. हा रामचंद्राच्या साहाय्यार्थ बृहस्पतीच्या अंशानें जन्मला होता. म्हणून भाषण करण्यांत हा परम चतुर असे. रामानें, किष्किंधेच्या राज्यासनावर सुग्रीवास स्थापिलें असतां यास युवराजाचा अधिकार देवविला होता. सकल वानरांसहित रामचंद्र लंकेस गेल्यावर युद्ध आरंभण्यापूर्वी हा रामाकडून रावणाकडे शिष्टाई करण्यासाठीं गेला होता. परंतु याच्या हितोपदेशाचा रावणानें अनादर केल्यामुळें हा परत येतांच, उभयपक्षीं युद्धाची सिद्धता होऊन त्यास आरंभ झाला. त्या प्रसंगीं यानें विकट, कंपन, प्रजंघ, इ. अनेक महान् महान् राक्षसांस मारून, रामाला उत्तम साहाय्य केलें होतें. रावणाचा वध करून राम अयोध्येस गेल्यावर अकरा सहस्र वर्षें राज्य करून निजधामास जाण्याचें मनांत आणिलें असतां, त्यासमागमें सुग्रीव गेला, तेव्हां हाच किष्किंधेचा राजा झाला.

**अगमुदैयन्**— तामीळ प्रांतांतील एक जात. हे लोक शैव पंथाचे आहेत. मरवन् आणि कल्लन् या जाती अगमुदैयनांत मोडतात. यांचे भिक्षुक ब्राह्मण असतात. मध्यप्रांतांतहि या जातीचे थोडे लोक आहेत.

**अगर**— ग्वाल्हेर संस्थानांतील जिल्ह्याचें व लष्कराचें ठाणें. उज्जयिनीपासून ४१ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें १५ हजार. दोन तलावांच्यामध्यें वसलें आहे. धान्य व कापूस यांचा मोठा व्यापार चालतो.

**अगर**— जुन्या खाकांठा एजन्सींतील सांखेड मेहवाच्या चोहाण संस्थानसंघांतील एक तुकडा. जमीन कांहीं चिकण मातीची व कांहीं रेताड. कापूस, ज्वार, तीळ, तांदूळ व हरभरे हीं पिकें. वस्ती भिल्लांची. शेती अव्यवस्थित. जवळच जुन्या कुकेज किल्ल्याचे अवशेष सांपडतात.

**अगरखेड**— भीमेच्या तीरावरील इंडीच्या ईशान्येस १५ मैलांवरील चारपांच हजार लोकवस्तीचा गांव. जुनें शंकरलिंग व धैरापना गुडी या हेमाडपंती देवळांबद्दल प्रसिद्ध.

**अगरतला**— बंगाल, टिपरा संस्थानचें होरा नदीच्या दोन्ही तीरावरील मुख्य शहर. लोकसंख्या सु. पंधरा हजार. येथें म्युनिसिपालिटी असून कॉलेज, संस्कृत पाठशाळा व कारागिरीची शाळा आहे.

**अगरबत्ती**—हा उदबत्तीचाच एक प्रकार आहे व या करण्याची कृतिहि उदबत्तीप्रमाणेंच आहे. अगरबत्तींत पुढील द्रव्यें घालतातः कस्तुरी १ गुंज, अंबर २ गुंजा, चंदन १ तोळा, लवंग फूल -॥- तोळा, गव्हला १ तोळा, अगरु २ तोळे, ऊद -॥।- तोळा, शिलारस २ तोळे, नखला १ तोळा, वेलदोडे १ तोळा, जायफळ -॥- तोळा, कोष्टकोळिंजन २ तोळे, गूळ १ तोळा, कृष्णागरु १ तोळा, नागरमोथा -॥- तोळा.

**अगरु**— ( वर्ग- ॲक्विलॅरिॲसी ) आशिया खंडांतील उष्ण प्रदेशांत आढळणाऱ्या दोन जातींच्या ( आक्विलारिया ओव्हारा व अगल्लोचम ) झाडांच्या गाभ्यापासून एक राळेसारखा पदार्थ निघतो त्यास अगरु म्हणतात. हा जाळला असतां सुगंध सुटतो. या झाडाचें लांकूड जाळलें तरीहि सुवास येतो.

**अँगलसी बेट**— उत्तर वेल्स देशांत या नांवाचें एक बेट व एक परगणा आहे. क्षेत्रफळ १७६६३० एकर आहे. लो. सं. पन्नास हजार आहे. हा प्रदेश बराच सपाट असून ओट, बार्ली, गहूं, राय, बटाटे, गाजरेंमुळे येथें होतात. गुरें व मेंढ्याहि पुष्कळ पाळतात. जस्त, रुपें, तांबें, गेरू, वगैरे खनिज द्रव्यें सांपडतात.

**अगसा**— कानडी धोब्यांची जात. म्हैसूर संस्थान व दक्षिण कानडा वगैरे ठिकाणीं आढळते. ही जात द्राविडवंशसंभव दिसते. यांचा वर्ण शूद्र समजण्यांत येत असून ब्राह्मण पुरोहित धार्मिक संस्कार चालविण्यास जात नाहींत. कांहीं धोब्याचा धंदा करतात व कांहीं शेती करतात. मराठी अगर हिंदुस्थानी धोब्यांशीं यांचा संबंध नाहीं. भाषेवरून यांचे कानडी अगसा व तेलंगी अगसा असे विभाग पडले असून यांच्यांत रोटी व बेटी व्यवहार होत नाहीं. बहुपत्नीत्वाची चाल असून बाल व प्रौढ विवाह रुढ आहेत. स्त्रीस अविवाहित राहतां येत असून विधवा-विधुर विवाह रुढ आहे. स्त्री अगर पुरुष जातिभ्रष्ट झाल्यास घटस्फोट मिळतो.

अगसा जातीचे लोक शैव व वैष्णवहि आहेत. लक्ष्मीदेवी ही देवी व भूमी देवरु हा या जातीचा देव. दक्षिण कानडा जिल्ह्यांत यांच्या तीन जाती आहेतः—( १ ) कोंकणी खिस्ती; ( २ ) कानडी बोलणारे धोबी (म्हैसूरच्या अगसांशीं यांचा संबंध दिसतो); ( ३ ) तुळू बोलणारे. या तिसऱ्या जातींत मातेच्या वंशाकडे वारसा असतो. यांनाच 'मडिवाल' असें दुसरें नांव आहे.

प्रत्येक खेड्यांत एक पंचायत असून गुन्ह्याबद्दल केलेल्या दंडाचा ⅓ भाग देवाला व बाकीचा जेवण देण्यांत खर्च करतात.

**अगस्ता**— हदगा. या झाडाच्या पांढऱ्या व तांबड्या फुलांवरून दोन जाती. झाड बरेंच मोठें असून पानें आंवळीच्या पानासारखीं असतात. फुलें व शेंगा यांची भाजी करतात. पाला, फुलें व शेंग औषधीहि आहेत. हें झाड ७।८ वर्षांवर टिकत नाहीं. लांकूड ठिसूळ पण छायेकरितां पानमळ्याच्या कडेस लावतात. अगस्ता त्रिदोषनाशक समजला जातो. अर्धशिशींत पाल्याचा रस विरुद्ध नाकपुडींत पिळतात, तर अपस्मारावर पानांच्या रसांत गोमूत्र व मिरपूड घालून देतात.

**अगस्त्य**—१. स्वायंभुव मन्वन्तरांतील ब्रह्ममानसपुत्र पुलस्त्य ऋषीस कर्दमप्रजापतीची कन्या हविर्भुवा हिच्यापासून झालेला ज्येष्ठ पुत्र. याचा भाऊ विश्रवा ऋषि.

पूर्वी कित्येक असुर समुद्रांत लपून राहून इंद्रादि देवांना, ऋषींना व प्रजेला त्रास देत. हा त्रास चुकविण्यासाठीं इंद्रानें अग्नि आणि वायु यांना समुद्र शोषण्याची केलेली आज्ञा त्यांनीं न मानल्यामुळें तुम्हांस मृत्युलोकीं जन्म घडेल असा इन्द्रानें शाप दिला. त्याप्रमाणें चालू वैवस्वत मन्वन्तरांत त्यांना मित्रवरुणांपासून एकाच देहानें जन्म घडले. त्यासच अगस्त्य असें नांव होतें. त्यास कनिष्ठ भ्राता वसिष्ठ असून मित्रवरुणांनीं आपलें तेज कुंभांत सोडलें व त्यापासून अगस्त्य व वसिष्ठ उत्पन्न झाले म्हणून त्यांस मैत्रावरुणि, कुंभयोनि अशीं नांवें पडलीं.

अगस्त्य महातपस्वी व विरक्त होता. परंतु पितरांच्या आज्ञेमुळें त्यानें विदर्भ राजकन्या लोपामुद्रा हिच्याशीं विवाह केला. (लोपामुद्रा पहा.) त्यांस दृढस्यु व इढास्य हे दोन मुलगे झाले. पैकीं पहिला इध्मवाह या नांवानें अतिप्रसिद्ध होता.

अगस्त्य ऋषि स्त्रीपुत्रांसहित आश्रमधर्म चालवीत असतां महान् ऋषि आणि इंद्रादि देव यांचीं त्यानें समुद्रोदकाचें शोषण करून व कालकेयांचा नाश करून सुटका केली. (कालकेय पहा.) अगस्त्य ऋषि उत्तम तत्त्ववेत्ता असून परोपकारी व धनुर्वेदामध्यें प्रवीण होता. दंडकारण्यांत दाशरथि रामानेंहि याचें दर्शन घेतलें होतें.

अगस्त्यानें द्राविडखंडांत जाऊन तेथें शास्त्र, विद्या आणि कला यांची वाढ केली. दक्षिणेंत अगस्त्याला संस्कृतिसंवर्धक म्हणून मोठा मान आहे. अनेक प्राचीन ग्रंथ त्याच्या नांवावर मोडतात.

२. एक शूद्र वैयाकरण व सुमारें हजार वर्षांमागील एक तामीळ कवि. यास अगस्त्य ऋषीचा अवतार समजतात व यानें व्याकरणाशिवाय इतर ग्रंथनिष्पत्ति केली आहे.

**अगस्त्य तारा**—दक्षिण गोलार्धांतील एक तारा. (ग्रीक कॅनोपस.) आपले ग्रह बरोबर घेऊन सूर्य ज्या कक्षेंत फिरतो तिचा मध्य या अगदिं नक्षत्राच्या मध्यांत असावा, असें कांहीं शास्त्रज्ञांचें मत आहे. अगस्तीला महासूर्य म्हणतात. त्याचा व्यास सूर्याच्या व्यासाच्या १३४ पट आहे; क्षेत्रफळ १८००० पट व घनफळ २४२०००० पट आहे.

**अगस्त्य मलय**—त्रावणकोर संस्थानांतील नैय्या तिनकर तालुक्यांतील पश्चिम घाटांतील एक कोनाकृति गिरिशृंग. उंची ६२०० फूट. यास इकडे सह्यपर्वत हें नांव असून तान्यांचे वेध घेण्यास उत्तम सोयीचें ठिकाण. ताम्रपर्णी व नेयार या नद्यांचें उगमस्थान.

**अगाखान**—अगाखान (पहिला) (१८००–१८८१):—हसनअली शहा (जन्म इराणांत) यास तो ब्रिटिशांच्या आश्रयार्थ आल्या वेळीं 'हिज हायनेस अगाखान' ही पदवी देण्यांत आली. महंमद पैगंबरचा जांवई अली हा यांचा पूर्वज मानतात. अलीचा मुलगा हसन यातर्फे अगाखानानें आपला संबंध इराणच्या राजघराण्याशीं जोडला आहे. इराणच्या शहाची प्रथम याच्यावर मर्जी होती. परंतु कारस्थानामुळें गैरमर्जी झाल्यावर तो आश्रयार्थ मुंबईस आला. पहिलें अफगाण युद्ध व सिंधवरील स्वारी यांत इंग्रजांना याची फार मदत झाली. नेपियरनें सरहद्दीवरील जातींचा हा जो गुरु अगाखान यासच येथील बंदोबस्ताचें काम दिलें व या यशस्वी कामगिरीबद्दल नेपियर याची वाहवा करीत असे. पुढें ब्रिटिशांनीं आपल्या इस्मायली संप्रदायाच्या प्रजेचा वरिष्ठ पुढारी म्हणून यास मान्य करून त्यास 'हिज हायनेस' ही पदवी व मोठें पेन्शन दिलें. त्या वेळेपासून मरेपर्यंत (१८८१) यानें ब्रिटिशांच्या छत्राखालीं आनंदानें काळ कंठून आपल्या अनुयायांचीं धर्मकृत्यें पार पाडलीं. याचा शिष्यसंप्रदाय हिंदुस्थानबाहेरहि असून ब्रिटिशांना वेळोवेळीं सरहद्दीवरील व हिंदुस्थानांतील बंडाळी मोडण्यास याची बहुमोल मदत झाली. याचा वडील मुलगा जो अगाखान दुसरा यानेंहि वडिलांच्या कित्याप्रमाणें वागून ब्रिटिश सरकारकडून Knighthood of the Order of the Indian Empire ही पदवी व मुंबईच्या विधिमंडळांत एक जागा मिळविली.

अगाखान तिसरा:—सुलतान महमद शहा; सी. आय्. ई.; जी. सी. एस्. आय्.; जी. सी. व्ही. ओ.; के. सी. आय्. ई.; एलएल्. डी. (ऑन. कें.). हे इस्मायली मुसलमानांचे मुख्य आहेत. जन्म १८७५. यांनीं सर्व आयुष्यभर मुसलमानांची प्रगति करण्याकरितां परिश्रम केले आहेत, व त्यामुळें ते सर्व मुसलमान–जगांत प्रसिद्ध आहेत. इंग्लंडमध्यें मशिदी बांधणाऱ्या वेस्टर्न इस्लामिक असोसिएशनचे ते आश्रयदाते आहेत. मॉंटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणांच्या वेळीं त्यांनीं हिंदुस्थानांतील मुसलमानांचें पुढारीपण पत्करलें होतें. त्याप्रमाणेंच गोलमेज परिषदेंतहि त्यांनीं मुसलमानांतर्फे भाग घेतला होता. त्यांस पहिल्या वर्गाच्या संस्थानिकाचा मान असून पहिल्या महायुद्धांतील कामगिरीबद्दल अकरा तोफांच्या सलामीचा मान मिळाला आहे. यांस घोड्यांच्या शर्यतींचा मोठा शोक आहे. हे राजकारणांत बरेंच लक्ष घालतात. निःशस्त्रीकरण परिषदेच्या वेळीं ते दोन वर्षे जिनिव्हा येथें होते. तसेंच लीग ऑफ नेशन्सची बैठक व चीन–जपान परिषद्

या वेळींहि ते हजर होते. लहानपणापासून पार्लमेंटांतील ग्लॅड्स्टन, चॅंबर्लेन, रोजबरी वगैरेंचीं भाषणें व वादविवाद ऐकून व हिंदुस्थानांतील कौन्सिलांतील चर्चा ऐकून त्यांस राजकारणाची गोडी लागत गेली व ते एक राजकारणी पुरुष बनले. १९३७ सप्टेंबरच्या लीग ऑफ नेशन्सच्या अधिवेशनाचे हे अध्यक्ष होते. यांच्या अनुयायांनीं नुकतीच यांची हीरकतुला मुंबईस केली.

**अंगापूरकर (हरि)**—हा महाराष्ट्रकवि शालिवाहन शके १७१४ च्या सुमारास होऊन गेला. हा राम जोशी, मोरोपंत व सोहिरोबानाथ आंबिये यांचा समकालीन होता. अंगापूरगांवीं गोपाळराव देशमुख नांवाचे एक वासिष्ठ गोत्री ब्राह्मण असत. त्यांची पत्नी यमुनाबाई. त्यांचा हा मुलगा. याच्या गुरूचें नांव हरिनारायण असें होतें. या कवीनें लिहिलेला असा उपलब्ध ग्रंथ फक्त 'केदारविजय' होय. या ग्रंथाचे ३५ अध्याय व ६११० ओव्या आहेत.

**अंगारा**—हा शब्द अंगार म्हणजे विस्तव, निखारा या शब्दापासून उत्पन्न झाला असावा. चूल, यज्ञकुंड अगर एखादें पवित्र ठिकाण यांतील राखेचा अंगाऱ्यासाठीं उपयोग करतात. एखाद्या मनुष्यास कांहीं भूतबाधा वगैरे झाली असल्यास देवर्षिपणाचा धंदा करणारे लोक बाधा झालेल्यास कांहीं मंत्रपठण करून त्यानें मंत्रित केलेली राख लावितात. याला अंगारा असें म्हणतात. ही अंगारा लावण्याची चाल पुराणग्रंथांतहि आढळून येते. मात्र तेथें अंगारा असा उल्लेख नसून त्याला भस्म असें म्हटलें आहे. हें भस्म म्हणजे तीन अग्नींची उपासना करणाऱ्या अग्निहोत्र्याच्या अग्निकुंडांतील भस्म होय. पद्मपुराण, अध्याय १०६ यांत एका मृत ब्राह्मणास अरुंधतीनें अग्निहोत्र्याच्या अग्निकुंडांतील भस्म मृत्युंजय मंत्रानें मंत्रित करून लाविलें असतां तो ब्राह्मण जिवंत झाल्याची कथा आहे. भस्म धारण केलें असतां एक प्रकारची अद्भुत शक्ति अंगीं येत असल्याची कल्पना शिवकवचांत आढळते. रामरक्षा, शिवकवच वगैरे स्तोत्रें नित्य सायंकाळीं पठण करून मंत्रित केलेला अंगारा लहान मुलांना लावण्याची जुनी चाल महाराष्ट्रांत अद्यापि कांहीं ठिकाणीं आढळते. एखाद्या सुंदर बालकास एकाएकीं ज्वर वगैरे आल्यास त्याला दृष्ट झाली असेल म्हणून दृष्टीचा अंगारा लावतात.

**अंगारिन**—(अँथ्रेसीन). दगडी कोळशाच्या डांबरांतील एक प्रमुख उज्जकर्ब (हायड्रोकार्बन). ह्याच्यापासून अँथ्राकिनोन, अलिझेरिन आणि तज्जन्य अनेक पदार्थ तयार करतात. डांबराचें ऊर्ध्वपातन (डिस्टिलेशन) करतांना २७०° सें. सुमारास अँथ्रेसीन तेल मिळतें; तें पुन्हा उत्पातित केलें असतां शेंकडा ५० अँथ्रेसीन असलेला स्फटिकयुक्त पदार्थ मिळतो. स्फटिकीकरणानें अँथ्रेसीन शुद्ध स्वरूपांत मिळवतां येतो. शुद्ध अँथ्रेसीनचे स्फटिक पत्रीच्या आकाराचे असून स्वच्छ पारदर्शक असतात, व २१६° सें. उष्णतामानांत ते वितळतात. अँथ्रेसीन स्फटिकाला जांभळ्या रंगाची झांक असते.

**अगारिया**—गोंडांची एक पोटजात. ही बहुतेक आसामांत आहे. लो. सं. ५०७९५. अगारिया लोक लोखंडाचें काम करतात म्हणून त्यांच्या धंद्याचा देव लोहासुर आहे. शिवाय दुल्हा हा त्यांचा देव आहे. यांच्यांत पथारिया आणि खुंटिया असे पोटभेद आहेत. मुलींचीं लग्नें प्रौढपणीं होतात. वराला भावी सासऱ्याच्या घरीं नोकरी करावी लागते. विधवेनें दिराबरोबर पुनर्विवाह करणें अधिक योग्य मानतात.

**अगाशिव लेणीं**—मुंबई प्रांत, कऱ्हाडपासून चार मैलांवर हीं बौद्ध लेणीं आहेत. लेण्यांच्या तीन रांगा असून पहिलींत २३, दुसरींत १९ व तिसरींत २२ गुहा आहेत. या ६४ लेण्यांखेरीज आणखी लहान कितीतरी आहेत. हीं लेणीं फार प्राचीन दिसतात. एका लेखावरून तो ख्रि. पू. पहिल्या-दुसऱ्या शतकांत कोरलेला वाटतो.

**अगीर**—पंजाबांतील एक हिंदु जात. लो. सं. सुमारें चार हजार. धंदा मीठ तयार करणें. वस्ती रोहटक, गुरुगांव, दिल्ली व मुलतान या जिल्ह्यांत. गुरुगांव जिल्ह्यांत अगीर आपणांस बिडोरच्या रजपुतांचे वंशज समजतात. यांचा सामाजिक दर्जा लोहाराहून श्रेष्ठ पण जाटाहून कमी आहे.

**अंगुत्तर निकाय**—बौद्धांच्या तीन पीटकांपैकीं दुसरें जें सुत्तपीटक त्यांतील पांच निकायांतील हें चौथें आहे. याच्यांत ९५५७ सुत्तें (सूत्रें) आहेत. सुत्तांचा विस्तार एका ओळीपासून तीनचार पानांपर्यंत वेगवेगळा आढळतो. त्यांतून बौद्ध संप्रदायांतील नीतिशास्त्र, मानसशास्त्र आणि स्वाध्यायपद्धति विवेचिली आहे. थोडक्यांत साररूपानें सिद्धांत मांडण्याची पद्धत ज्या वेळीं फारसे ग्रंथ अस्तित्वांत नव्हते त्या वेळीं स्मरणांत राहण्याला सोपें जावें म्हणून अंगीकारलेली दिसते. अंगुत्तर निकायांत प्रथम एकसंख्याक, त्यानंतर द्विसंख्याक मग त्रयी अशा क्रमानें निर्वाणाला पोंचण्यास आवश्यक अशा अकरा गुणांपर्यंत मांडणी केलेली आढळते. बुद्धाच्या निर्वाणानंतर थोड्याच दिवसांनीं उत्तर हिंदुस्थानांत हा ग्रंथ तयार झाला असावा.

**अंगुळ**—ओरिसा प्रांत, एक जिल्हा. पूर्वी हें संस्थान होतें; पण १८९१ सालीं खालसा करून, खोंडमाळला जोडून एक जिल्हा करण्यांत आला. क्षे. फ. १६८१. लो. सं. सुमारें दोन लाख. खोंडमाळ हें १७०० फूट उंचीचें एक पठार आहे. त्यावर खोंड या वन्य जातीची वस्ती आहे. अंगुळ विभाग सपाट आहे व त्यावर भाताचें पीक होतें. हातमागावरील सुती कापड, टोपल्या-चटया विणणें, लोखंडाचें व इतर धातूंचें काम

किरकोळ उद्योगधंदे या जिल्ह्यांत आहेत. अंगुळ हें मुख्य ठिकाण फार लहान गांव आहे.

**अॅगेट**—गोमेद किंवा सुलेमानी पत्थर. हा अकीक (क्याल्सेडोनी) रत्नाचाच एक प्रकार आहे. व्हेन अॅगेट, मोचा अॅगेट असे अॅगेटांत कांहीं भेद आहेत. राजपिंपळा संस्थानांतील रत्नपूर खाणींत पट्टेदार व शेवाळी नक्षीचे अॅगेट सांपडतात. खंबायतेस पूर्वी या रत्नांचे कारखाने होते, पण कृत्रिम रत्नें निघाल्यापासून ते फारसे चालत नाहींत. पाश्चात्य देशांत जर्मनींत ऑवस्टेन येथें कित्येक शतकांपासून अॅगेटला पैलू पाडण्याचे व तकाकी आणण्याचे मोठे कारखाने चालले आहेत. ब्राझील देशांतहि सुंदर रंगांचे अॅगेट होतात. अकीक पहा.

**अंगोरा**— तुर्कस्तान, आशिया मायनरमधील शहर. ही तुर्की सरकारची राजधानी आहे. यालाच अंकारा असेंहि म्हणतात. या प्रदेशांत पशुपालनाचा धंदा फारच मोठ्या प्रमाणावर चालत असून येथील मेंढयांची लोंकर जगप्रसिद्ध आहे. तसेंच अंगोरा येथून रंगाला लागणारे जिन्नस मध, मेण आणि डिंक बाहेर खाना होतात. या सर्व प्रदेशाचें क्षेत्रफळ २७३७० चौ. मैल आहे. लो. सं. २२७५०५ (१९४५).

**अंगोला**—पश्चिम पोर्तुगीज आफ्रिकेंत कांगो नदीच्या दक्षिणेस समुद्रापासून ऱ्होडेशियापर्यंत पसरणाऱ्या या प्रांताचें क्षेत्रफळ ४८४८०० चौ. मैल आहे. क्वांझा ही या प्रांतांतून वाहणारी सर्वांत मोठी नदी होय. लोआंडा (राजधानी व बंदर), बेंगुएला (बंदर) आणि मोसामीडीस (कॉफी, कांतडीं, डिंक, रबर आणि मेण वगैरे जिन्नस निर्यात करणारें बंदर) हीं अंगोलांतील महत्त्वाचीं शहरें आहेत. या प्रांतांतून खनिज संपत्ति विपुल असून तीमध्यें मुख्यत्वें तांबें, लोखंड, पेट्रोल, आणि खनिज मीठ यांचा भरणा जास्त प्रमाणावर आहे. लो. सं. ३७३८०१० (१९४०) यापैकीं सुमारें ४४००० युरोपियन आहेत. बाकीचे नीग्रो.

**अग्निकणदर्शक**—(स्पिंथॅरिस्कोप). १९३० मध्यें सर विल्यम क्रुक्स यानें रेडियम या धातुमुळें होणारे कांहीं चमत्कार दाखविण्यासाठीं हें यंत्र शोधून काढलें. यामध्यें एका पितळेच्या नळीस एका बाजूस एक भिंग (लेन्स) बसविलेलें असतें व दुसऱ्या बाजूस एक जसदगंधकीदाची (झिंक सल्फाइड) जाळी बसविलेली असून तिच्या मध्यभागीं एक रेडियमचा लहान तुकडा बसविलेला असतो.

**अग्निजकाष्ठाम्ल**—(पायरोलिग्निअस अॅसिड). लांकडाच्या निर्जल उत्पातनानें मिळणारा जलमय अम्लविद्राव. त्यांत मुख्यतः असेटिक अम्ल (सिरका) असतें.

**अग्निकुमार**—एक आयुर्वेदीय औषध. पारा, गंधक, कज्जली, टाकणखार, बचनाग, मिरें, शंख-भस्म, कपर्दिक-भस्म यांचा लिंबाच्या रसांत खल करून हें बनवितात. हें औषध पाचक, अग्निदीपक व वातघ्न आहे. हें उष्णवीर्य असल्यामुळें कफप्रधान रोगांमध्यें याचा चांगला उपयोग होतो. पोटांत दुखणें, पोट फुगणें, अपचनाचे जुलाब होणें यांवर लिंबाच्या रसांत घेतात. ॥ गुंजेपासून २ गुंजांपर्यंत, गरम पाणी किंवा मध याबरोबर घेतात.

**अग्निकुलें**—चौहान, चालुक्य, परमार आणि प्रतिहार अथवा पडिहार या चार रजपूत कुलांचा समावेश या कुलांत होतो. कै. चिंतामणराव वैद्य यांच्या मतें हीं कुलें आपणांस अग्निकुलोत्पन्न म्हणवितात हें चुकीचें आहे. पण डॉ. होर्नले यांनीं प्राचीन तामीळ वाङ्मयावरून त्या बाजूस एक अग्निकुलोत्पन्न राजवंश होता हें सिद्ध केलें आहे.

**अग्निक्रीडा**—मनुष्यानें आपली करमणूक व मनोरंजन करण्याकरितां शोधून काढलेल्या कल्पनांपैकीं अग्निक्रीडा किंवा आतषबाजी ही एक होय. ज्वालाग्राही पदार्थ व इतर स्फोटक द्रव्यें यांच्या योगानें दृष्टीची व मनाची एक प्रकारें करमणूक होते. चौसष्ट कलांच्या यादींत अग्निक्रीडेचा उल्लेख नसल्यामुळें ही कला हिंदुस्थानांत केव्हां व कोणीं सुरू केली हें नक्की सांगतां येत नाहीं. महाभारतांत शतघ्नी, युद्धयंत्रें हे शब्द आढळतात. परंतु शतघ्नी म्हणजे तोफ किंवा तत्सम यंत्र असा निर्णय देणें कठीण आहे. बंदुकीची दारू, फटाके वगैरेंची कृति चिनी लोकांनीं शोधून काढली व मग ती इतरत्र पसरली अशी समजूत आहे. अजूनहि फटाके वगैरे दिवाळींतील दारू, चीन, जपान वगैरे देशांतून येते. युरोपियन देशांप्रमाणें आपलेकडेहि लग्नसमारंभांत व उत्सवाचे वेळीं दारुकाम सोडतात. बंदुकीची दारू व तींत निराळीं रसायनें व सोरा, गंधक, वगैरे द्रव्यें मिसळून रंगीबेरंगी चक्रें व तारे तयार करतात. पेशवाईत आतषबाजीस बरेंच उत्तेजन होतें हें बखरींवरून दिसून येतें. सवाई माधवरावाच्या लग्नाच्या वेळच्या दारूकामाचें तपशीलवार वर्णन एका बखरींत आहे. नवीन शास्त्रीय शोधांमुळें हिंदुस्थान या कलेंत परावलंबी आहे.

**अग्निजगॅलिकाम्ल**—(पायरोगॅलिक अॅसिड). फेनॉलच्या वर्गांतील एक पदार्थ. हा वर्णहीन, गंधहीन व स्फटिकमय असून, पाणी, अल्कोहोल आणि ईथर ह्यांमध्यें सहज विरघळतो. ह्याच्या क्षारयुक्त (अल्कलाईन) विद्रावांत प्राणवायु (ऑक्सिजन) शोषला जातो व त्यामुळें विद्रावाचा रंग गर्द पिंगट होतो. फोटोग्राफींत ह्याचा चित्रविकसनासाठीं उपयोग होतो.

**अग्निजन्य प्रस्तर**—जे प्रस्तर पृथ्वीच्या कवचामध्यें केव्हांतरी वितळलेल्या रूपांत होते व कांहीं कालानें पृथ्वीच्या पोटांतील

थरांत हळूहळू घनस्वरुप पावले किंवा कांहीं फटींतून बाहेर पडल्यामुळें त्यांस वेंधाऱ्यांचा आकार प्राप्त झाला आहे किंवा ज्वालामुखीच्या तोंडांतून जे अग्निरसाच्या रुपानें बाहेर पडले आहेत किंवा स्फोटाबरोबर दूरवर उडून जाऊन एकाकी पडले आहेत अशा सर्वांचा अन्तर्भाव अग्निजन्य प्रस्तरांत होतो. हे सर्व बहुवा सिकतिन (सिलिकेट) असतात. पण कांहीं प्राणिदें (सामान्यतः लोह, टिटानियम, क्रोमियम या धातूंचीं) असतात. कांहीं कालापूर्वी वरुणपक्ष (नेपच्युनिस्ट) व अग्निपक्ष (व्हल्कनिस्ट) अशा दोन पक्षांमध्यें या प्रस्तरांच्या स्वरुपाबद्दल मोठा मतभेद होता. वरुणपक्षाचा पुढारी वर्नर हा शास्त्रज्ञ होता व त्याचें म्हणणें असें होतें कीं, बसाल्ट हा खडक गाळापासून बनलेला आहे व वज्रतुंडाचे स्फटिक जलमय द्रवापासून निराळे झालेले आहेत. अग्निपक्षाचा प्रमुख हटन हा होता व त्याचें म्हणणें असें होतें कीं, पृथ्वीच्या पोटांत भयंकर उष्णता असून तीमुळें त्या ठिकाणीं खडकांचाहि द्रवरस होतो व तो कांहीं प्रसंगीं बाहेर येतो. अखेरीस अग्निपक्षाची सरशी झाली. तथापि ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, खडकाच्या कठिण कवचाच्या पोटांत जे द्रवरसाचे गोळे किंवा ढिगारे बनलेले आढळतात त्यांचें एक कारण या कठिण थरांच्या पोटांत कोंडून राहिलेलें पाणी असावें.

अग्निजन्य खडकांचा विशेष अभ्यास आतांपर्यंत फार बारकाईनें करण्यांत आलेला आहे व या खडकांचें फार सूक्ष्मपणें वर्गीकरण करण्यांत आलेलें आहे. परंतु हें वर्गीकरण करतांना या खडकांत आढळणारें सिकतेचें (सिलिका) प्रमाण हें वर्गीकरणाचा आधार म्हणून धरण्यांत आलेलें आहे व त्याप्रमाणें मोठमोठे वर्ग प्रथम पाडण्यांत येऊन नंतर त्यांचे घटनेच्या दृष्टीनें पुन्हां पोटवर्ग पाडण्यांत आले आहेत. पूर्वीचेच अम्ल (अॅसिड) व भस्म (बेसिक) हेच शब्द ७० टक्के व ४५ टक्के सिकता असलेल्या वर्गांस लावण्यांत आले आहेत व या दोन वर्गांच्या मध्यंतरीं एक मोठा वर्ग कल्पिण्यांत आला आहे. वज्रतुंड हा खडक गार, पालाश (पोट्याशम) फेल्स्पार आणि अभ्रक यांचा बनलेला असून हा अम्लवर्गाचें प्रतीक म्हणून समजला जातो व ओलिव्हिन ग्रॅब्रो हा खट (कॅल्शम) युक्त फेल्स्पार, पायरोक्सीन, ओलिव्हिन आणि लोहटिटानियम अशुद्ध धातु यांचा बनलेला खडक भस्मयुक्त खडकांचा नमुना मानण्यांत येतो.

**अग्निदेवता**—अग्नीच्या उत्पत्तीचा शोध ही मानववंशाच्या प्रगतीची पहिली पायरी होय. हा शोध चार लक्ष वर्षांपूर्वी दुसऱ्या हिमांतर युगांत लागला असावा, असें विद्वानांचें मत आहे. अनेक मानववंशांतील अग्निसंबंधीं दंतकथात्मक वाङ्मयावरुन या शोधाची प्राचीनता सिद्ध होते. सर्व जगांतील अत्यंत जुनें वाङ्मय जे वेदग्रंथ त्यांत अग्निसंबंधीं कल्पना व दंतकथा बऱ्याच आहेत. सर्व संस्कृतींत अग्निदेवतेची उत्पत्ति इतर देवतांपेक्षां विशेष तऱ्हेनें झालेली दिसते. वैदिक हिंदु धर्म व झरतुष्ट्राचा धर्म यांतच इतर धर्मांपेक्षां खरी अग्निदेवतेची उपासना दिसून येते.

१. भारतीयः— अग्नि हा शब्द इंडोयुरोपीय. पण या नांवानें उपासना फक्त भारतीयांतच आहे. इतर देवतांप्रमाणेंच पौराणिक काळीं अग्नीसंबंधीं बऱ्याच कथा-उपकथा प्रचारांत येऊन त्यांस सगुण रुप प्राप्त झालें व वन्हि, वैश्वानर, हुतभुज् वगैरे वैशिष्ट्यनिदर्शक नांवें पडलीं. अंगिरसपुत्र, मरुत्, शांडिल्याचा नातू अशा भूमिका अग्नीला पुराणांतरीं दिलेल्या आढळतात. वैश्वदेवांतील अग्नीचें स्थान एक, तर हरिवंशांत दुसरेंच आहे. अग्नीचा पौराणिक इतिहास थोडक्यांत असाः —

हा स्वायंभुव मन्वन्तरांतील ब्रह्ममानसपुत्र. दक्षप्रजापतीची मुलगी स्वाहा ही याची बायको. तिच्यापासून याला स्वारोचिष हा मुलगा व सुच्छाया ही मुलगी झाली. ही मुलगी उत्तानपादपुत्र ध्रुवास दिली व तिचा मुलगा 'स्वारोचिष' हा दुसरा मनु झाला. याशिवाय पावक, पवमान व शुचि या तीन मुलांपासून ४५ निरनिराळ्या अग्निदेवता भिन्न नांवांनीं प्रसिद्ध आहेत.

वैवस्वत मन्वंतरांत वरुणानें कपिल यज्ञ केल्यावर निर्माण झालेल्या तीन ऋषींस—भृगु, कवि, गिरा—अनुक्रमें वरुण, ब्रह्मदेव व अग्नि यांनीं पुत्रत्वेंकरुन ग्रहण केलें. ब्रह्मदेवानें कल्पारंभीं दक्षिण व पूर्व या दिशांमधील दिशेचें स्वामित्व अग्नीस दिलें म्हणून तीस आग्नेयी म्हणतात.

श्वेतकी राजानें केलेल्या पुष्कळ यज्ञांत हविर्भक्षणामुळें अग्नीस जाड्य झालें. तेव्हां अग्नि उपाय विचारण्याकरितां ब्रह्मदेवाकडे गेला. त्या वेळीं द्वापार युग संपत आलें होतें. ब्रह्मदेवानें व्याधिशमनार्थ अग्नीला कृष्णार्जुनांस खांडववन भक्षणार्थ मागण्यास सांगितलें. ब्राह्मणवेषानें अग्नीनें तें वन भक्षणार्थ मागितल्यावर कृष्णार्जुनांनीं 'तथास्तु' सांगितलें. यावर अग्नीनें वरुणाजवळून एक दिव्य रथ व 'गांडीव' धनुष्य अर्जुनास व वज्रनाभ चक्र व 'कौमोदकी' गदा कृष्णास दिली. त्यामुळें उभयतां संतुष्ट झाले. अग्नि तें वन भक्षण करुं लागला असतां इंद्र निवारणार्थ धांवून आला. पण कृष्णार्जुनांनीं त्याचा पराभव केला. पंधरा दिवस तें वन भक्षण केल्यावर अग्नि व्याधिमुक्त झाला.

२. ज्यू धर्मांतील अग्निपूजा:—अग्नि किंवा यज्ञकर्म यांचा उल्लेख ज्यू धर्मग्रंथांत क्वचित् स्थळीं आढळतो. जेहोवानें आदम व ईव्ह या मानवजातीच्या मूळ स्त्रीपुरुषांस अन्नुत्पत्तीची पद्धति सांगितली अशी आख्यायिका आहे. आदम अंधारांत गुरफटला असतां ईश्वरानें अग्नि उत्पन्न करण्याकरितां त्यास दोन विटा दिल्या अशी ज्यू ग्रंथांत अग्नीची उत्पत्ति [illegible] दाखविली आहे.

३. झोरोआस्ट्रियन धर्मांतील अग्निपूजा :—इराणी व भारतीय धर्मांतील अग्निपूजेंत दोन मुख्य भेद आहेत :—(१) इराणी धर्मांत प्रेतसंस्कारास अग्नीचा निरुपयोग; (२) भारतीय 'अग्नि' देवतेच्या मानानें इराणी 'आतर' देवतेचें अपूर्ण व काल्पनिक स्वरूप. कांहीं विद्वान् तर अग्नीला इराणी धर्मांत देवतास्वरूप मुळींच नाहीं म्हणतात. भारतीयांत कालेंकरून अग्निपूजा फक्त ब्राह्मणवर्गातच राहिली, पण कोणीहि पारशी मनुष्य हल्लींसुद्धां जुन्या पद्धतीनें अग्निपूजा करतो. आतरो हें दिव्य प्रकाशाचें पार्थिव रूप होय, व यापासून झरतुष्ट्र जन्मला. अवेस्ता व पल्हवी ग्रंथांत यासंबंधानें अनेक आख्यायिका आहेत. इराणी धर्मांत अग्नि संरक्षकांस धर्मगुरु समजत असून ते अग्नि कधीं विझूं देत नाहींत. अग्नींत प्रेतें जाळणें, वाईट पदार्थ टाकणें यास देहान्त शासन असून पारशी धर्मांतील प्रातःकालच्या प्रार्थनापद्धतीचें वैदिक-कालीन पद्धतीशीं साम्य आहे. फक्त या प्रार्थना अव्यक्तोपासनापर आहेत. पारशांतहि मोठे यज्ञ करण्याची चाल आहे.

**अग्निपुराण**—अग्निपुराण या नांवावरून या पुराणांत अग्निमाहात्म्य वर्णन केलें असावें असा तर्क होतो. परंतु यांत सामान्यतः पुराणांत आढळणारीं सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वंतर, आणि वंशानुचरित हीं पांच लक्षणें व इतर विषय यांस गौण स्थान दिलें असून, परा व अपरा या विद्याच जास्त विवेचिल्या आहेत. थोडक्यांत अग्निपुराण हा एक प्राचीन ज्ञानकोशच म्हणावयास हरकत नाहीं; कारण यांत विविध शास्त्रें व विषय यांबद्दल माहिती आहे. यांत परमार्थासंबंधीं थोडाच ऊहापोह असल्यानें हा ग्रंथ तामस कोटींत गेला आहे. यांत कोणत्या एका पंथाचा पुरस्कार केलेला नसला तरी शैव धर्म व मंत्रतंत्र यांकडे त्या वेळीं लोकांचा कल असावा असें वाटतें.

आनंदाश्रम संस्कृत ग्रंथावलींतील अग्निपुराणाच्या प्रतींत ३८३ अध्याय व ११४५७ श्लोक आहेत. नारद व मत्स्य पुराणांत ही श्लोकसंख्या निराळी दाखविली आहे. हें पुराण ख्रिस्तपूर्व ५ व्या शतकानंतर पण मुसलमानी स्वाऱ्यांपूर्वीं संकलित झालें असावें असें वाटतें.

अग्नीनें वसिष्ठास हें पुराण कथन केलें आहे. ब्रह्मज्ञान सांगणें हाहि या पुराणाचा हेतु आहे. या पुराणांत अवतारांचें वर्णन आहे. शिवोपासनेसंबंधानें कित्येक तांत्रिक मार्ग या पुराणांत दर्शविले आहेत. कित्येक क्षेत्रांचें वर्णन यांत आलें आहे. त्यांत गया क्षेत्राची महती विशेष प्रकारें वर्णिली आहे. राजाचे धर्म, युद्धाचे नियम, न्यायशास्त्र (मिताक्षर) यांचा समावेश या पुराणांत केलेला आहे. औषधोपचारासंबंधानें बरीच माहिती या पुराणांत असून ती सुश्रुताच्या पद्धतीवर आहे. या पुराणास बरेंच महत्त्व दिलें जातें. कारण यांत प्राचीन कथांचा भरणा विशेष असून हिंदूंच्या प्राचीन रीतीभाती कशा होत्या याची त्यांवरून बरीच कल्पना येते.

**अग्निपूजा**—अग्नि हें सूर्याचें एक स्वरूप आहे. त्याला आद्य मानव किती मानीत असत हें अग्निपूजेचे प्रकार हिंदु, पारशी व इतर कांहीं समाज यांतून जे आढळतात त्यावरून कळेल. यज्ञकर्म हें बहुशीं अग्नीवरच चालतें व वैदिक लोक या शक्तीला किती महत्त्व देत याची कल्पना श्रौत वाङ्मयावरून येईल. पारशी धर्मांत तर अग्निमंदिर (अग्यारी) आवश्यक मानलें असून तेथील अग्नि कधीं विझूं देत नाहींत. पंचमहाभूतांपैकीं तेजोमय अग्नीची उपासना विशेष आहे. अग्निदेवता पहा.

**अग्निमांद्य**—या रोगाचें स्वरूप तीव्र किंवा दीर्घकालीन असतें. मनुष्य जेव्हां पोटांत पचन होईल त्यापेक्षां अधिक अन्न खातो किंवा पचण्यास कठिण असें अन्न खातो तेव्हां या रोगाची तीव्र भावना होते. याचीं लक्षणें म्हणजे डोकें दुखणें, गळल्यासारखें वाटणें, अरुचि उत्पन्न होणें, ओकारी होणें, पोटांत दुखूं लागणें, वगैरे होऊं लागतात. जिभेवर बुरा येतो व यांचा परिणाम बहुधा अतिसार होण्यांत होतो. विशेष तीव्र स्वरूपांत थंडी वाजून ताप येतो. हा विकार एक दिवसापासून चार दिवसांपर्यंत टिकतो. रोग फार तीव्र नसेल तर एरंडेल वगैरेसारखें रेचक देऊन जठरास पूर्ण विश्रांति देणें व मधूनमधून पाणी पिणें एवढें केलें असतां पुरेसें होतें. वरचेवर अपचन होऊं लागल्यास त्याचें दीर्घकालीन रोगांत रूपांतर होतें. तसेंच रक्तक्षय किंवा इतर क्षय रोगांतहि अपचनाचा विकार उद्भवतो. यावर मुख्य उपचार म्हणजे योग्य पथ्य पाळणें, नियमित व्यायाम घेणें, हवापालट करणें आणि मनाचें औदासीन्य घालविणें इत्यादि होत. दुग्ध-आहार ठेवणें चांगलें. तेलकट व तुपकट पदार्थ खाण्याचें वर्ज्य करावें. या रोगावर औषधांचा फारसा उपयोग होत नाहीं. परंतु कुचल्यासारखीं कडू औषधें उपयोगी पडतात. अवष्टंभ झाला असल्यास त्यावर उपचार करावे.

**अग्निमापक**—(पायरोमीटर). अत्युष्णमान मोजण्याचें यंत्र. मशेनब्रोक यानें धातुशलाकेच्या प्रसरणानें उष्णमान मोजण्याच्या यंत्रासाठीं पायरोमीटर शब्द योजला. त्या भट्टीचें उष्णमान पहावयाचें असल तींत प्रिन्सेप यानें शोधून काढलेल्या युक्तीनें मिश्रधातूचे गोळे क्रमानें टाकावयाचे व जो लवकर वितळेल त्यावरून त्या भट्टीचें उष्णमान अजमावयाचें. कार्नेली व विल्यम्स हे ठराविक द्रवणांक ज्ञात असलेल्या क्षारांचा उपयोग करीत.

**अग्निमित्र**—शुंग वंशांतील दुसरा राजा. पतंजलि-उल्लेखित पुष्पमित्राचा मुलगा, व सुज्येष्ठ राजाचा बाप. कालिदासानें 'मालविकाग्निमित्र' नाटकांत याची जी माहिती दिली आहे ती

कितपत ऐतिहासिक आहे हें पहावें लागेल. अग्निमित्र पुष्यमित्रानंतर खि. पू. १४८ मध्यें मगधाच्या राज्यावर आला व खि. पू. १४० त मृत्यु पावला.

**अग्निमृत्तिका**—( फायरक्ले ). भाजलेल्या व न भाजलेल्या मातीच्या विशिष्ट मिश्रणाला, अतिशय उष्णता लागली तरी वितळून न जाणाऱ्या मातीला हें नांव आहे. कांच वगैरे करण्याच्या कामांत भट्टीकरितां या मातीच्या विटा वापरतात. ही मृत्तिका १५००° शतमान ( सेंटिग्रेड ) उष्णतेपर्यंत टिकाव धरूं शकते, म्हणजे वितळत नाहीं. यांतील द्रव्यांचें पृथक्करण साधारणतः खालीलप्रमाणें आढळतें: सिकता ( सिलिका ) ५५·६ ; अश्मा ( ॲल्युमिना ) २७·५ ; लोहप्राणिद १·९ ; चुना ०·३ ; मग्न ( मॅग्नेशिया ) ०·८ ; पालाश ०·८ ; तितनाम्ल ०·३ ; संयुक्त जल १०·० ; आर्द्रता २·१. चिनी मातीचीं भांडीं करण्यासाठीं ही मृत्तिका लागते.

**अग्निवेश्य**—१. सूर्यवंशी नरिष्यंत कुलांतील देवदत्त राजाचा जातुकर्ण्य आणि कानीन नांवाचा मुलगा. हा तपानें ब्राह्मण झाला व याच्या संततीस अग्निवेश्यायन नांव पडलें.

२. द्रोणाचार्यांकडून धनुर्वेदाची शिक्षा व ब्रह्मशिर अस्त्र संपादन केलेला अगस्त्य ऋषींचा शिष्य. हा पांडवांबरोबर द्वैत वनांत होता.

३. या नांवाचे राजे भारतीय युद्धांत पांडवांकडे होते.

**अग्निशांतक यंत्र**—आग विझविण्यासाठीं एखाद्या गाडीवर हातानें किंवा एंजिननें चालणारा आणि जोरानें पाणी फेकणारा जो पंप असतो त्याला म्हणतात. इ. स. ७० पासून या यंत्राची माहिती आहे. आज या यंत्रांत फार सुधारणा झाल्या आहेत.

**अग्निशामक यंत्र**—( फायर एक्स्टिंग्विशर ). याचा उपयोग आग विझविण्यासाठीं, विशेषत आग लहान प्रमाणावर असेल तरच, होतो. कोणतीहि वस्तु जळण्यासाठीं तिला हवेचा पुरवठा लागत असतो; विशेषतः प्राणवायु ( ऑक्सिजन ) लागत असतो. हा जर मिळाला नाहीं तर आग पेटणार नाहीं किंवा पेटलेली आग विझून जाईल. याच तत्त्वाचा उपयोग अग्निशामकामध्यें केलेला असतो. त्यामध्यें एका बंद डब्यांत पाणी भरून ठेवलेलें असतें. तसेंच कर्बद्विप्राणिद ( कार्बन डायॉक्साइड ) वायु ज्या तऱ्हेनें उत्पन्न होईल अशीं कांहीं द्रव्यें घातलेलीं असतात. अग्निशामकाच्या तोंडास एक पडदा (व्हाल्व) व त्याला एक रबरी नळी बसवलेली असते. ज्या वेळीं हा वापरावयाचा असेल त्या वेळीं त्यावर दिलेल्या उपसूचनांप्रमाणें कृति करून व हा वायु उत्पन्न करून नळीवाटे शामकामधील पाणी १० ते २० फूट लांबवर फेकतां येतें. पाण्याबरोबर कर्बद्विप्राणिद वायु मिसळलेला असतो व त्या वायूमुळें एक प्रकारचा दावहि उत्पन्न झालेला असतो. जळणाऱ्या वस्तूवर हें पाणी फेकल्यामुळें त्या मिश्रणांतील कर्बद्विप्राणिद वेगळा होऊन जळणाऱ्या वस्तूभोंवतीं पसरतो व या वायूमध्यें कोणतीहि वस्तू जळत नसल्यामुळें आग आपोआप विझते. याला पाण्याचीहि कांहींशी मदत होते.

**अग्निष्टोम**—सोमयागांतील पहिली संस्था. यांत सोमरसानें आहुति देतात. या यागानंतर अत्यग्निष्टोम करतात. नंतर शेवटची सोमसंस्था सर्वपृष्ठ्याग होय.

**अग्निस्फोटक**—(पायरोक्सिलिन). बंदुकीच्या कापसाला ( गनकॉटन ) आणि सेल्युलोज आणि नत्राम्ल यांच्यापासून तयार होणाऱ्या इतर पदार्थांना कांहींतरी दिलेलें नांव. स्फोटक द्रव्यें पहा.

**अग्निहोत्र**—होत्र म्हणजे आहुति. अग्नीमध्यें आहुति देण्याच्या कर्माला अग्निहोत्र म्हणतात. अग्निहोत्र स्वीकारतांना प्रथम अग्न्याधाननामक विधि असतो. या विधीनें अग्नि पिंपळाच्या झाडाच्या अरणी करून त्यांच्या घर्षणानें उत्पन्न करावयाचा असतो. आहवनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नि असे तीन कुंडांत तीन मुख्य अग्नि असतात. अग्निहोत्र्यानें प्रतिदिनीं सकाळीं व संध्याकाळीं तीनहि अग्नींत दोन आहुति द्यावयाच्या असतात. त्या आहुति तुपाच्या, दुधाच्या किंवा दुसऱ्या एखाद्या हवनीय द्रव्याच्या असतात. सकाळीं सूर्य व प्रजापति ह्या देवतांना उद्देशून तर सायंकाळीं अग्नि व प्रजापति ह्यांना उद्देशून आहुति देतात. ह्यांत प्रजापति ही सामान्य देवता आहे. ऋग्वेदांत सूर्याला प्रजापति म्हटलें आहे. ह्यावरून अग्नि, सूर्य व प्रजापति हीं एकार्थींच म्हणजे सूर्याचीं तीन नांवें आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. अग्नि-उपासना ही सूर्योपासना असल्यामुळेंच सूर्याचें उपस्थान म्हणजे प्रार्थनामंत्र म्हणतात. गृह्याग्नि एकच असतो; श्रौताग्नि तीन असतात. दक्षिणाग्नीवर फक्त पिण्डपितृयज्ञ होतो. तो पितरांचा अग्नि. आहवनीय देवांचा व गार्हपत्य मनुष्यांचा. श्रौतकर्मे आहवनीयावर व गृह्यकर्मे गार्हपत्याग्नीवर होतें. यावरून देव, पितर व मनुष्य यांचे निरनिराळे अग्नि या तीनहि समाजांचें एकीकरण झालें तेव्हां अग्निहोत्राच्या नांवाखालीं एकत्र आले. यालाच त्रेताग्नि असें म्हणतात. गृह्याग्नीला आवसथ्याग्नि हें दुसरें नांव आहे. अग्निहोत्र कलियुगांत वर्ज्य असूनहि त्याचें ग्रहण केलें जातें. तीन अग्नींच्या जोडीला आवसथ्य व सभ्य अशा आणखी दोन अग्नींचीं कुंडें असतात. सभ्य हें अग्नीचें विशेषण आहे. हे दोन अग्नि म्हणजे भाकड आहे. पत्नी मेल्यानंतर श्रौताग्नि ठेवावा कीं नाहीं ह्याविषयीं उलट-सुलट वचनें आहेत.

**अग्रदानी**—प्रेतदहनाच्या वेळीं मंत्र सांगणारे व दान घेणारे ब्राह्मणांतील एक हलकी पोटजात. आसामांत लोकसंख्या सुमारें

द्रोनतीनशें आहे. या जातीची व्याख्या खालीलप्रमाणें आहे :--

लोभी विप्रश्च शूद्राणामग्रेदानं गृहीतवान्।
ग्रहणे मृतदानानां अग्रदानी बभूव सः ॥

**अग्रहार**—ब्राह्मणांना योगक्षेमासाठीं राजांनीं दिलेलें भूमिदान. या अग्रहारासंबंधींचे बरेच जुने ताम्रपट उपलब्ध आहेत. ब्राह्मणांप्रमाणेंच देवस्थानांनाहि अग्रहार दिलेले आढळतात. [ 'वापी कूप आराम। अग्रहारें हन महाग्राम।'– ज्ञा. १८. ९९. जाले ब्रह्मदत्त अग्रहार। तिन्हीं भुवनें।'–कित्ता १७.३४०.]

**अग्रहारी**— जबलपूर जिल्हा व राजगड संस्थान यांतील अगारियांशीं संबंध असलेली बनिया लोकांची एक जात. मुख्य जात संयुक्त प्रांतांत. लोकसंख्या सुमारें ऐशीं हजार असून त्यांत हिंदु, शीख व जैन धर्मीय आहेत.

**अग्रिजेन्टम्**—सिसिलीच्या दक्षिण किनाऱ्यावरील किनाऱ्यापासून २॥ मैलांवरील शहर. इ.स.पू. ५८२ त गॉल वसाहतवाल्यांनीं वसविलें. इ. स. पू. ६ व्या शतकांत येथें प्रातिनिधिक राज्य स्थापिलें गेलें, व इ. स.पू. ३ऱ्या शतकांत रोमन व कार्थेजिनिअन लोकांनीं स्वाऱ्या करून हें शहर लुटलें. या शहराच्या पूर्वेस असलेल्या ॲक्रेगॅस दरीवरून शहराला हें नांव पडलें. शहराच्या उत्तरेकडील एका उंच शिखरावरील खडकावर देवालयें असून दुसऱ्यावर हें शहर आहे. मध्यें मोठी दरी आहे. शहराचे जुने अवशेष म्हणजे डोरिक पद्धतीचीं जुनीं निरनिराळ्या देवतांचीं देवालयें. शहराच्या पश्चिमेस ग्रीक लोकांचीं थडगीं व दक्षिणेच्या भिंतीबाहेर रोमन लोकांची स्मशानभूमि आहे. येथून धान्य, कापड आणि गंधक परदेशांस जातो. ग्रीक तत्त्वज्ञानी एंपेडोक्लस याचा जन्म येथें झाला.

**अग्रेरिअन कायदा**—अग्रेरिअन लॉज् या नांवाचे कायदे प्राचीन रोमन राज्यांत सरकारी जमिनी लोकांना वांटून देण्याकरितां करण्यांत आले. या जमिनींवर प्रथम पॅट्रीशियन उर्फ राज्यकर्त्या रोमन लोकांना फक्त मालकी हक्क मिळाला होता. पण नंतर प्लिबीअन म्हणजे रोमनेतर लोकांना हा मालकी हक्क देण्यांत आला; पण त्यांना जमिनींची मालकी व वांटणी न्याय्य प्रमाणांत मिळत नसे म्हणून त्या लोकांत मोठा असंतोष माजला. तो नाहींसा करण्याकरितां वरील नांवाचे कायदे अनेक वेळां करण्यांत आले, पण या कायद्यांचा, असंतोष नाहींसा करण्याचा हेतु थोड्याफार प्रमाणांतच सिद्धीस जात असे.

**अग्रोर खोरें**—वायव्य सरहद्द (पाकिस्तान), हझारा जिल्ह्यांतील मानशेर तहशिलींतील एक खोरें. लांबी १० मैल व रुंदी ६ मैल. प्रदेश जिन्याच्या पायऱ्यांप्रमाणें चढत गेलेला आहे. पाणी भरपूर असल्यामुळें पीक क्वचितच बुडतें. खोऱ्यांतील झोंपड्या, खेडीं, राया, पाईन वृक्षांनीं आच्छादिलेला पर्वत, यांमुळें सृष्टिशोभा चांगली व पीक उत्तम. वस्ती, गुजर व स्वाती या इस्लामी धर्माच्या लोकांची. इ. स. १८९१ पूर्वी स्वतंत्र संस्थान होतें. परंतु तेथील अली गोहर या संस्थानिकानें सरहद्दीवरील टोळ्यांच्या स्वाऱ्यांना मदत केल्यामुळें इ. स. १८९१ त सरकारजमा करण्यांत आलें. येथें फक्त कापसाचें कापड तयार होत असून मुख्य गांव ओघी आहे. येथें सैन्याचें ठाणें आहे.

**अग्रोहा**—पंजाब, हिसार जिल्ह्यामधील फत्तेबाद तहशीलींतील हिसारच्या वायव्येस १३ मैलांवरील जुनें शहर. हें आग्रवाल बनिया जातीचें मूळस्थान असें म्हटलें जात असून अवशेषांवरूनहि हें पूर्वी महत्त्वाचें शहर होतें हें सिद्ध होतें. परंतु सध्यां या गांवास महत्त्व नाहीं.

**ॲंग्लीस**—ही एक सखल (लो) जर्मनींतील जात असून या लोकांनीं पांचव्या शतकांत सॅक्सन लोकांबरोबर इंग्लंड व स्कॉटलंडमध्यें जाऊन कायमची वसाहत केली. त्यामुळें यांच्या नांवावरून तेथील देशाचें नांव इंग्लंड असें पडलें.

**ॲंग्लो-सॅक्सन**—इंग्लंडमध्यें इ. स. ५ व्या व ६ व्या शतकांत ॲंग्लीस, सॅक्सन व ज्यूट या जमातींचे जे लोक येऊन वसाहत करून राहिले. त्यांच्या एकत्र मिश्रणानें जी नवी जात तयार झाली त्या लोकांना व त्यांच्या राष्ट्राला. हें नांव देण्यांत आलें. म्हणून ॲंग्लो-सॅक्सन्स म्हणजे इंग्लंडच्या इतिहासांतील आद्य काळांतले इंग्रज लोक असा त्याचा साधा अर्थ आहे. सदरहू ३ टोळ्यांचे लोक मूळ उत्तर जर्मनीमधून इंग्लंडांत आले व त्यांच्यापैकीं पहिल्या टोळीनें ४४९ सालीं ब्रिटनमध्यें आपला पाय रोंवला. त्या वेळीं त्यांचे पुढारी हजिस्ट व होर्सा हे होते. ॲंग्लो-सॅक्सन जमातीमध्यें सरदार आणि सामान्य लोक असे दोन वर्ग असत. यांपैकीं सरदार लोकांच्या इस्टेटी मोठ्या आणि दर्जा उच्च असे. सामान्य लोक थोड्या थोड्या जमिनीचे मालक आणि लहान लहान उद्योगधंदे करणारे असत व ते सरदारांच्या आश्रयाखालीं राहत असत. तिसरा वर्ग निव्वळ गुलामांचा असून त्यांना गुरांप्रमाणें मालकाची मालमत्ता अशा अर्थानें वागवीत असत.

या लोकांचीं लहान लहान स्वतंत्र संस्थानें, राज्यें होतीं व या प्रत्येक राज्याचा मुख्याधिकारी राजा असे व तोच सर्वांत वरिष्ठ न्यायाधीश असे. पण या राजाचा अधिकार ईश्वरदत्त ( डिव्हाइन राइट ) नसून राजा लोकांनीं निवडलेला असे. कारण राजपदवारसा हक्काच्या क्रमानें मिळत नसे; मात्र राजघराण्यांतील जो इसम बुद्धिमत्ता आणि चारित्र्य यांनीं संपन्न असेल त्याची निवड राजपदावर होत असे. अशा राजाला एक सल्लागार-मंडळ नेमलेलें असे व त्याचा दर्जा राजाच्या खालोखाल मानण्यांत येई. यांपैकीं प्रत्येक सल्लागाराकडे एकेका परगण्यांतील न्यायदानाचा आणि अंमलबजावणीचा अधिकार असे. या इसमांना एल्डरमेन

म्हणत असत. राजाचे व प्रत्येक एल्डरमनचे स्वतंत्र अनुयायी असत. त्यांना थेन्स म्हणत.

अँग्लो-सॅक्सन लोकांचे मुख्य व्यवसाय गुरें, मेंढ्या व डुकरें पाळणें आणि शेती करणें हे असत. फळबागा आणि फुलबागा ते तयार करीत आणि दक्षिण भागांत द्राक्षांचे मळे परेच असत. उत्तर भागांत मोठालीं जंगलें होतीं, व त्यांत शिकार करण्यासारखे प्राणी पुष्कळ असत. शिकार करणें हा त्या लोकांचा आवडता धंदा होता. मच्छीमारीचा धंदा मोठ्या प्रमाणावर चालत असे. मुख्यतः ते हेरिंग्ज व साल्मन या जातींचे मासे पकडीत असत. व्हेल मासे पकडण्याकरितां अँग्लो-सॅक्सन लोक आपलीं जहाजें घेऊन दूर आइसलंड बेटापर्यंत जात असत.

त्या काळीं कारखान्यांना महत्त्व साहजिकच थोडें असे. कांहीं लोखंडाचे कारखाने व कांहीं कापड तयार करण्याचे कारखाने होते. मिठागरें माल पुष्कळ होतीं. सोनारकाम व भरतकाम याबद्दल इंग्लिश लोकांची प्रसिद्धि युरोपभर पसरली होती व त्यामुळें नॉर्मन, फ्रेंच, फ्लेमिंग्ज व इतर अनेक ठिकाणचे परके व्यापारी लंडन शहरीं येत असत.

**अँग्लो-सॅक्सन भाषा**—ही भाषा म्हणजे आजच्या इंग्लिश भाषेचें अगदीं आद्य स्वरूप होय. या भाषेंत डच, आइसलँडिक, डॅनिश, स्वीडिश व जर्मन या भाषांतून शब्द घेतलेले होते. उत्तरेकडील व दक्षिणेकडील अँग्लो-सॅक्सन लोक निरनिराळी भाषा बोलत असत असें त्या वेळच्या आज उपलब्ध असलेल्या वाङ्मयावरून दिसून येतें; तथापि पुढें दक्षिणेकडील भाषाच सर्वत्र पसरली आणि अँग्लो-सॅक्सन वाङ्मयांतील मुख्य ग्रंथ याच भाषेंत लिहिलेले आहेत. अँग्लो-सॅक्सन वाङ्मयापैकीं जें पद्यवाङ्मय उपलब्ध आहे त्यांत 'बोवुल्फ' हें महाकाव्य अत्यंत महत्त्वाचें आहे. ६००० पंक्तींचें हें महाकाव्य आहे. त्याशिवाय ख्राइस्ट, एलेन आणि ज्युलिआना हीं तीन काव्यें चांगलीं आहेत. यांतील कविता यमकबद्ध नाहीं, पण अनुप्रासयुक्त आहे. बरेंच काव्य धार्मिक विषयावर असून इतरहि अनेक विषयांवर पद्यवाङ्मय निर्माण झालेलें आहे.

अँग्लो-सॅक्सन गद्यवाङ्मयांत बायबलाचे भाषांतरग्रंथ, तत्त्वज्ञानविषयक लेख, इतिहास, चरित्रें, कायदे, शास्त्रें आणि वैद्यक विषयावरचे निबंध, व्याकरण, धर्मप्रवचन वगैरे अनेक विषयांवरचे ग्रंथ आहेत. यांपैकीं बरेचसे ग्रंथ लॅटिन भाषेंतील ग्रंथांचीं भाषांतरें आहेत. सॅक्सन क्रॉनिकल हा अँग्लो-सॅक्सन गद्यग्रंथ फार उपयुक्त आहे, कारण त्यावरून त्या काळचा इतिहास बरोबर समजतो. यांत सन ११५४ पर्यंत हकीगत आलेली आहे.

**अघमर्षण**—१. एक ऋषि. मधुच्छंदाचा पुत्र व त्याचें कुळ. २. विंध्य पर्वताजवळील प्रचेतस दक्षानें तप केलेलें तीर्थ. ३. अघमर्षण म्हणजे पापक्षालन. संध्येंत या अघमर्षण विधीच्या वेळीं पुढील ऋग्वेद १० वें मंडळ, १९१ सूक्त, म्हणतात—

ऋतं च सत्यं ... चान्तरिक्षमथोस्वः ॥ ३ ॥

या सूक्तास पदपाठ नाहींत. हें सूक्त उच्चारून पाणी हुंगून जमिनीवर टाकतात. याचा अर्थ शरीरांतील पापपुरुष हातांतील पाण्यांत श्वासरूपानें टाकून तें पाणी आपल्या डावे बाजूस जमिनीवर आपटलें असतां त्या पापपुरुषाचा नाश होतो. असा या सूक्ताचा प्रभाव आहे. स्नानाच्या वेळींहि हें सूक्त म्हणतात व गुरुपत्नी-जननी-भगिनी-स्नुषागमनासारखीं पापें पाण्यांत उभें राहून त्रिवार हें सूक्त म्हटलें असतां नाहींशीं होतात, असें या विधीच्या स्तोत्यांकडून सांगण्यांत आलें आहे.

**अघारिया**—एक जात. आग्र्याहून आलेले असा नांवाचा अर्थ. यांची लोकसंख्या सु. पंचावन हजार. वस्ती वऱ्हाड, मध्यप्रांत, बिहार, ओरिसा व छोटा नागपूर. हे आपणांस आग्र्याजवळच्या रजपुतांचे वंशज समजतात; व दिल्लीपर्यंत डोकें न लववितां सलाम करीत. दिल्ली-नरेशानें सर्वांचा नाश करण्याची युक्ति काढली, पण एकानें आपल्याऐवजीं एका चांभारास पाठवून आपला बचाव करून घेतला, व बाकी बळी पडले. म्हणून पितृतर्पणाच्या वेळीं प्रथम चांभारास पाणी देतात. गजपति उडिया राजाकडे तिघे भाऊ नोकरी मागण्याकरितां आले असतां त्यानें तरवारीचीं म्यानें त्यांच्यापुढें ठेवून जो जें उचलील त्यावरून त्याचा धंदा ठरेल असें सांगितलें. एकानें सुवर्ण मुठीची तरवार उचलली, पण त्यांत चाबूक निघाला, म्हणून तो शेतकरी झाला व बाकीचे क्षत्रिय झाले अशी कथा आहे. हे स्वतःला सोमवंशीय रजपूत समजत असून यांची ठेवण व चेहरा आर्यन् लोकांप्रमाणें आहे.

यांत बडे व छोटे या जाती आहेत. अघारिया पुरुष व आहिर बायका यांपासून छोट्यांचा उद्भव. एकंदर गोत्रें ८४. यांतील ६० गोत्रांस पटेल, १८ स नाईक व ६ स चौधरी म्हणतात. उपवर वधूवरांचीं लग्नें ५।६ वर्षांत एकदम करतात. 'दुल्हा' हा यांचा देव. उडिया ब्राह्मणांच्या हातचें पाणी घेत नाहींत. धंदा शेती व मालगुजार. बायकांची संख्या पुरुषांपेक्षां जास्त आहे.

**अघासुर**—बक व पूतना यांचा भाऊ व कंसाचा सेनानायक. कंसानें कृष्णवधार्थ याला पाठविला असतां यानें मोठा सर्पदेह धारण केला व त्यांत गोप व गाई दरी म्हणून शिरल्या. मग कृष्णानें आंत प्रवेश केला व मोठा देह धारण करून यास फाडलें. (भागवत, द. स्कं., अ. १२).

**अघोरी**—अघोरी, अघोरपंथी, औघर, औघर हीं हिंदुस्थानांतील एका साधूच्या पंथाचीं नांवें आहेत. या पंथांतील लोक

नरमांसभक्षक व क्रूरकर्मे म्हणून पूर्वीपासून प्रसिद्ध आहेत. 'अघोर' (न घोर) या शिवनामापासून हा पंथ उत्पन्न झाल्यानें याचा शैव संप्रदायाशीं संबंध व्यक्त होतो. म्हैसुरांत इक्केरीच्या देवळांत व इतरत्र अघोरीश्वर या नांवानें शिवोपासना दृष्टीस पडते. या पंथानुयायांना अघोर पंथी म्हणतात.

हल्लीं या पंथाचा प्रसार फारसा होत नाहीं. १९०१ च्या शिरगणतीप्रमाणें यांची संख्या ५५८० होती. त्यांपैकीं बरेचसे बिहारांत (५१८६), व बाकीचे अजमीर, मेरवाडा व वऱ्हाडांत आढळले. पूर्वी अबूचा पहाड, गिरनार, बुद्धगया, काशी व हिंगलाज येथें यांचे मठ असत; परंतु हल्लीं नाहींत. हे गोरखनाथ साधूस आपला पूर्वज समजतात. चिताभस्म लावणें, गळ्यांत नररुंडमाळा घालणें, व्याघ्रचर्म गुंडाळणें, हातांत डोक्याची कवटी घेणें, नरमांस व मलमूत्र सेवन करणें अशा भयंकर चाली यांच्यांत आहेत. स्मशानांत वास्तव्य व मृत प्रेताचें मांस खाणें हें पुण्यप्रद समजतात. कालिका मातेला बळी देण्याकरितां माणसें धरतात. हल्लीं या साधूंना नागवें हिंडणें व नरमांस खाणें यांस बंदी आहे.

अघोरी नरमांस व मलमूत्र खातात, व कवटीचा भांड्यासारखा उपयोग करतात हें विशेष आहे. काली, दुर्गा या देवींचे शाक्त उपासक जे गूढ संस्कारविधि करतात, त्यांच्याशीं नरमेध व नरमांसभक्षण या चालींचा संबंध पोहोंचतो. या कालीपूजेला ५ व्या शतकांत बंगालांत सुरवात झाली. कालिका पुराणांत नरमेध सांगितला आहे, परंतु हल्लीं इतर कांहीं बळी देतात. हिंदु धर्मांत असले प्रकार अनार्य, भिल्ल, रानटी जाती यांकडून करवून घेत असत. तेव्हां अघोरी पंथाचा हिंदु धर्मांतील या बाजूशीं निकट संबंध आहे. रानटी जातींत चेटकें, वैदू आध्यात्मिक उन्नतीकरितां किळसवाणे पदार्थ खातात. तेव्हां या चालीचें मूळ अघोरी चालींतच आहे. कवट्यांचा भांड्याप्रमाणें उपयोग करण्यांतहि हाच हेतु असावा. माणसांचीं प्रेतें खाण्याबद्दल व त्यांचा उपमर्द केल्याबद्दल पुष्कळ अघोऱ्यांना शिक्षा झाल्यामुळें हल्लीं ही चाल बंद पडली आहे. बहुतेक साधुवर्ग नवशिक्याला शिक्षा देण्याचे मंत्र व विधि गुप्त ठेवतात, त्यामुळें अघोरी पंथाबद्दल माहिती मिळणें कठीण पडतें.

**अचल**—दुर्योधनाचा मामा व शकुनीचा भाऊ. आपल्या ५० भावांसह अर्जुनाकडून भारती युद्धांत मारला गेला. पुत्रदर्शनपर्वांत इतरांप्रमाणें यांचेंहि दर्शन धृतराष्ट्र-गांधारींना व्यासांनीं करविलें.

**अचलस्थान**—(नोड). पदार्थविज्ञानशास्त्रामध्यें, कंप पावणाऱ्या पदार्थांमध्यें ज्या बिंदूच्या ठिकाणीं गति नसते त्यास स्थिर अथवा अचल बिंदु असें म्हणतात. उदा. एखादी तार दोन ठिकाणीं पक्की बसवून तिच्यामध्यें कंप उत्पन्न केल्यास हीं दोन स्थानें तिचे स्थिर बिंदु होतील.

**अचला किल्ला**—मुंबई, नाशिक जिल्ह्यांतील दिंडोरीच्या उत्तरेस ८० मैलांवर चांदवडच्या डोंगरांतील किल्ला. किल्ला डोंगरी. चढ उभा व बिकट. एक वेस. नुसता तटाचा पाया दिसतो. यावरून तट अपूर्ण असावा. छपरी चौकी व दारूचें कोठार असावें असें १८१८ त ब्रिग्जनें वर्णन केलें आहे. १८१८ त मॅकडोनेल यास मिळालेल्या १७ पैकींच हा एक किल्ला होता.

**अचीलस**(खि. पू. ५२५-४५६)—प्राचीन ग्रीस देशांतील तीन महाकवींपैकीं हा सर्वांत प्राचीन होय. हा ग्रीक शोकान्तिक नाटकांचा (ट्रॅजेडी) जनक. एल्युसिस या गांवीं जन्मला. त्याचा बाप अथेन्स शहरांतील जुन्या सरदार घराण्यापैकीं होता. अचीलसनें इराणविरुद्ध ग्रीक लोकांनीं केलेल्या स्वाऱ्यांत भाग घेतला होता आणि सालामिस, मॅरेथॉन, आर्टेमिसियम आणि प्लॅटिया या लढायांत तो स्वतः हजर होता. या लष्करी अनुभवाचा त्याच्या मानवी जीवनविषयक मतांवर फार परिणाम झाला; आणि म्हणून त्याच्या नाटकांत दूरदर्शी उच्च स्वदेशभक्ति सर्वत्र दिसून येते. तसेंच त्याची लेखनशैली, प्राच्य अलंकार व प्रतिभा यांनीं युक्त आहे; त्याचें कारण इराणी लोकांबरोबर त्याचा झालेला परिचय हें असावें. तो मरण पावल्यावर त्याच्याबद्दलच्या स्मारकलेखांत त्याच्या लष्करी शौर्याचा उल्लेख आहे; पण नाटकांचा उल्लेख नाहीं. खि. पू. ४९९ मध्यें त्याच्या पहिल्या नाटकाचा जाहीर प्रयोग झाला. त्यानें एकंदर ९० नाटकें लिहिलीं व तीं अत्यंत लोकप्रिय झालीं. आणि त्या नाटकांचे प्रयोग त्याच्या मरणोत्तर अनेक वेळां झाले. हा क्वचित् मिळणारा बहुमान अचीलसच्या नाटकांना मिळाला. अचीलसच्या चारित्र्याबद्दल पुष्कळ दंतकथा व कल्पित गोष्टी उपलब्ध आहेत. परंतु त्या सर्व खऱ्या नाहींत. त्याच्या एकंदर ९० नाटकांपैकीं फक्त सात शोकांतिक नाटकें आजपर्यंत टिकलीं आहेत आणि तीं सर्व अत्यंत महत्त्वाचीं आहेत. आज उपलब्ध असलेल्या नाटकांमध्यें सर्वांत अगोदरचें सप्लिसिस हें नाटक आहे. पर्शी हें एकच ग्रीक ऐतिहासिक नाटक आज उपलब्ध असून त्याचें कथानक सालामिसच्या युद्धाभोंवतीं गुंफलेलें आहे. सेप्तेम काँट्राथीबस, प्रॉमिथिअस हीं त्याचीं वीणाकाव्यात्मक नाटकें असून या नाटकांतील पात्रांचें स्वभावलेखन फार काळजीपूर्वक केलेलें आहे. यांपैकीं दुसऱ्या नाटकांतील बहुतेक पात्रें अतिमानव कोटींतील असूनहि त्यांत मानवी स्वभावाचें चित्रण कांहीं ठिकाणीं सुरेख झालें आहे. या नाटकांत करुण रस व भयानक रस यापूर्वीच्या नाटकांतल्यापेक्षां फार चांगला उतरला आहे. अचीलसनें अगदीं शेवटीं एक नाट्यत्रयी लिहिली. तींत अॅगेमेम्नॉन, चोफोरी,

युमिनिडीस हीं नाटकें आहेत. सर्व ग्रीक वाङ्मयांत या तीन नाटकांहून अधिक सरस असें एकहि नाटक नाहीं आणि त्यांची बरोबरी शेक्स्पिअरच्या अत्यंत प्रसिद्ध शोकान्तिक नाटकांनीं मात्र केली आहे.

**अचेष्ट (अर्ग)**—(अर्गान). हवेंत असणारा एक वायु. हवेपेक्षां हा जड असून हवेंत त्याचें प्रमाण शें. १ असतें. १८९४ सालीं रॅले आणि रॅम्से यांनीं हा वायु हवेंतून निराळा काढला. नत्रवायूचें (नायट्रोजनचें) विशिष्टगुरुत्व तपासून पाहत असतांना त्यांना असें आढळून आलें कीं, हवेंतून काढलेल्या नत्राचें विशिष्टगुरुत्व अमोनिया किंवा नत्राच्या इतर संयुक्तांपासून तयार केलेल्या नत्राच्या विशिष्टगुरुत्वापेक्षां जास्त असतें. तेव्हां त्यांना हवेंतील नत्रामध्यें आणखी एखादा अज्ञात वायु असावा असा संशय आला; व काळजीपूर्वक अनेक प्रयोग केल्यानंतर हा वायु त्यांना स्वतंत्र करतां आला. हा वायु रंगहीन असून त्याला चव नाहीं. हा द्रवरूपांत किंवा घनरूपांतहि आणतां येतो. रासायनिकदृष्ट्या हा क्रियाशून्य (इनर्ट) आहे; व ह्याच त्याच्या वैशिष्ट्याचा उपयोग करून हवेंतून त्याचें मोठ्या प्रमाणांत उत्पादन करतात. 'हाफ वॅट'च्या विजेच्या दिव्यांत त्याचा उपयोग केलेला असतो.

**अचोली**—आफ्रिकेंत आलबर्ट नियांझा सरोवराच्या उत्तरेस १०० मैलांवर अप्पर नाईलच्या थडींत राहणाऱ्या निग्रो लोकांचें नांव. हे शरीर शोभविण्यासाठीं गालावर व मांडीवर नागमोडी पट्टे काढतात. झोंपड्या वाटोळ्या व चिखलानें सारवलेल्या असून पारध हें उपजीविकेचें साधन आहे. लढाईंत ढाल व भाला वापरतात.

**अंचोव्ही**— हा एक हेरिंग जातीचा मासा आहे. याच्या

अनेक जाती असून त्या सर्व हिंदुस्थान व अमेरिका यांमधील उष्ण समुद्रांत आढळतात. हा सामान्यतः हाताच्या मधल्या बोटापेक्षां मोठा नसतो. भूमध्य समुद्रांतहि हे पुष्कळ आढळतात.

**अच्युतराय**—(१५३०-४१). विजयनगरच्या तुळुव घराण्यांतील एक राजा. हा क्रूर व जुलमी असून याच्या दुर्बल कारभारामुळें परकीयांना फार फावलें. हा धार्मिक बुद्धीचा मात्र होता. विजयनगरचें प्रख्यात विठ्ठलरायाचें मंदिर यानेंच बांधविलें.

**अछनेरा**— संयुक्त प्रान्त, आग्रा जिल्हा, करवाली तालुक्यांतील आग्रा-राजपुताना रस्त्यावरील व राजपुताना-माळवा व कानपुर-अच्छनेरा रेल्वेच्या जंक्शनवरील शहर. लोकसंख्या सु. आठ हजार. जाटांच्या वेळीं (१८ वें शतक) भरभराटींत होतें. पुनः ऱ्हास पावून रेल्वे जंक्शन झाल्यापासून थोडें महत्त्व पावलें. व्यापार नाहीं.

**अज**— ब्राह्ममुहूर्तावर याचा जन्म झाला, म्हणून अज हें नांव पडलें. इक्ष्वाकुवंशांतील रघुराजाचा हा पुत्र व याचा मुलगा दशरथ. कालिदासानें रघुवंशांत 'अजविलाप' जो दिला आहे, तो फार रसाळ आहे.

**अंज (धातु)**—(ॲन्टिमनी). निळसर शुभ्र रंगाचा एक ठिसूळ धातु. याचे स्फटिक पत्तीच्या आकाराचे लांबट असतात. स्टिब्नाइट ह्या खनिज पदार्थांत अंज हा गंधकयुक्त असतो; व त्यापासूनच हा धातु तयार करतात. फ्रान्स, स्पेन, हंगेरी, इटली, कॅनडा, ऑस्ट्रेलिया आणि बोर्निओ वगैरे देशांत स्टिब्नाइट पुष्कळ प्रमाणांत सांपडतें. अंज धातूवर हवेचा परिणाम होत नाहीं, त्यामुळें त्याची चकाकी मंद होत नाहीं. हा धातु स्वतः ठिसूळ असला तरी दुसऱ्या धातूंत मिसळला असतां तो त्यांना कठिणपणा आणून देतो. ब्रिटानिया मेटल, टाइप मेटल आणि प्युटर ह्यांत अंज धातु अवश्य असतो. मोठमोठ्या घंटा तयार करतांना मिश्र धातूंत (ॲलॉय) अंज घातला असतां त्यांचा आवाज स्पष्ट होतो. अंजामुळें कथिल (टिन) चा शुद्धपणा वाढून, त्याला नादमाधुर्य आणि कठिणपणा येतो. छापखान्यांतील टाइपांत अंज असल्यामुळें अक्षरांचें वळण कायम राहून झीजहि कमी होते. अंजचीं लवणें साधारणपणें विषारी असलीं तरी टार्टर एमेटिक, जेम्स पावडर वगैरे औषधांत त्यांचा उपयोग केलेला असतो.

**ॲजॅकासियो**—कॉर्सिका बेटाची राजधानी, नेपोलियनची जन्मभूमि व क्षयरोग्यांचें निवासस्थान, या दृष्टीनें या बेटास फार महत्त्व आहे. येथील मच्छीमारीचा व्यापार फार दांडगा चालतो. लो. सं. २४०००.

**अजगर**—(अजाला-बोकडाला-गिळणारा). ही एक सापाची जात आहे. यांच्या जबड्याची रचना अशी असते कीं, ते आपल्या शरीरापेक्षां प्राणीहि गिळून ...

इतका तो उघडतां येतो. यांच्या गुदद्वाराशीं प्रत्येक बाजूस एक आंकड्यासारखा अवयव असतो. हे अवयव त्यांच्या मागील पायांचे अवशेष आहेत. यांच्या शेपटीनें हे विळखा घालून एखाद्या फांदीस वगैरे धरून ठेवूं शकतात. शरीर मध्यभागाच्या ठिकाणीं घट्ट व दाबल्यासारखें असतें. यांस डोक्याच्या मागील बाजूस बारीक बारीक खवले असतात. हे उष्ण प्रदेशांत आढळतात. यांची लांबी साधारणपणें २० फुटांवर नसते.

**अजंठा डोंगर**—वऱ्हाडांतील बुलढाणा जिल्ह्याच्या दक्षिणेकडील प्रदेश अजंठा डोंगरानें व्यापलेला आहे. यास चांदोर, सातमाळा, इनद्याद्रि, सह्याद्रि अशीं नांवें असून पश्चिम सह्याद्रि ज्या फत्तराचा आहे तोच फत्तर येथें आढळतो. नाशिक जिल्ह्यांत मनवाडजवळ हा सह्याद्रीपासून काटकोनांत सुरू होऊन पूर्वेस ५० मैलपर्यंत पसरला आहे. सरासरी उंची ४००० फूट. बऱ्याच खिंडी आहेत व यांतून जी. आय्. पी. रेल्वे मनमाडजवळून जाते. दुसरी खिंड कासारी. या डोंगराच्या ओळी पुढें निजाम राज्य, वऱ्हाड, गुजरात व माळवा इकडे पसरल्या आहेत. पूर्वी गुजरात आणि माळवा यांमधील दळणवळण मनमाड व कासारी खिंडींतून चालत असे; आणि गावताला व अजंठा हे मार्ग असत. डोंगरांत पुष्कळ किल्ले असून अजंठा येथें कोरीव लेणीं आहेत. मारकिंद (मार्कंडेय-४३८४ फूट), सप्तशृंग क्षेत्र (४६५९ फूट), धोडप (४७४१ फूट), तुद्रई (४५२६ फूट) हीं शिखरें व रावळ्या-जावळ्या हे किल्ले आहेत. ऐन-इ-अकबरींत या डोंगरांचा सहिया अथवा सहाया असा उल्लेख आहे.

**अजंठा लेणीं**—हिंदुस्थान, हैद्राबाद संस्थान, औरंगाबादच्या

ईशान्येस ५० मैलांवर असलेलीं लेणीं. या लेण्यांची संख्या २९ आहे; पैकीं ५ चैत्य व २४ विहार आहेत. यांचा काल खि. पू. २ रें शतक ते इ. स. ७ वें शतक इतका नऊ शतकांचा आहे. या लेण्यांत वास्तु-मूर्तिशिल्प तर आहेच, पण विशेषतः यांतील भिंतींवरच्या चित्रांविषयीं अजंठा जगांत प्रसिद्ध आहे. इतकीं वर्षें हीं चित्रें बरींचशीं चांगल्या स्थितींत राहिलीं यावरूनच त्या वेळच्या चित्रकलेची योग्यता कळून येते. तथापि हवापाण्यानें हीं जागजागीं खराब झालीं आहेत.

बौद्धवाङ्मयांतील कथानकांवर चित्रें उभारलीं आहेत, तरी त्यांतून त्या काळचीं सुंदर दृश्यें प्रतीत होतात. स्त्रियांचीं चित्रें विशेषतः विविध प्रकारचीं व प्रेक्षणीय अशीं आहेत. तसेंच हत्ती, हरणें, बैल, पक्षी इत्यादि जनावरें त्यांच्या स्वाभाविक हालचालींत दाखविलीं आहेत.

भारतीय चित्रकलेचा एक विशेष म्हणून अजंठा चित्रकला मानण्यांत येते व हिंदुस्थानांतील एक महत्त्वाचें प्रेक्षणीय स्थळ म्हणून अजंठ्याला मान आहे.

बौद्ध धर्माच्या वेळीं या गुंफा तीर्थयात्रेचें स्थान म्हणून होत्या. हजारों माणसें येत-जात. पुढें बौद्ध धर्माच्या ऱ्हासानंतर या स्थळांचें महत्त्व कमी झालें. इकडे कोणी जाईना. जंगल व हिंस्र पशु यांमुळें हें स्थळ अज्ञात राहिलें. ही स्थिति १८२१ पर्यंत होती. पुढें सर जेम्स अलेक्झांडर यानें अनेक संकटांना तोंड देऊन तेथें जाण्याचें ठरविलें. तीं लेणीं पाहून तो थक्क झाला व तीं त्यानें प्रसिद्धीस आणलीं. तरी १८४९ पर्यंत त्यांची उपेक्षाच झाली. पुढें १८४९–५५ च्या दरम्यान कंपनी सरकारनें मेजर गिल यास तेथील चित्रांच्या नकला करण्यास पाठविलें. १८७४ त त्यानें चित्रांची पाहणी करून बरींच साफ केलीं. त्यांना खिडक्या बसविण्याचें काम तसेंच राहिलें; पण साफसुफी अद्याप चालू आहे. हीं लेणीं एकंदर २९ असून दोन अर्धवट, एकाचा रस्ता बिकट व एकास रस्ताच नाहीं. यांपैकीं पांच लेणीं चैत्य (बौद्ध देवळें) असून लांबट आकाराचीं व आंतील बाजूस वाटोळीं आहेत. मध्यें खांबांच्या दोन रांगा व अर्धवर्तुलाकृति भागांत दागोबा आहे. पुढें कमजास्त उंचीच्या भिंती असून एक दरवाजा, दोन खिडक्या अथवा तीन दरवाजे आहेत. कांहींच्या पुढें पडव्या असून गच्ची आहे. बाकीचे विहार चौकोनी आहेत. समोरच बहुतेक बुद्धाची मूर्ति असते. कांहीं लेणीं अर्धवट आहेत. परंतु एकाखेरीज सर्व लेण्यांतील चित्रें रंगवलेलीं आहेत. यांत शिलालेख आहेत; पण त्यांवरून विशेष ऐतिहासिक माहिती मिळत नाहीं. परंतु चित्रांवरून त्या वेळच्या लोकांची राहणी, पोषाख, चालीरीती व धर्म यांचें चांगलें ज्ञान होतें. कलेच्या दृष्टीनें तर असलीं भावनादर्शक चित्रें अन्यत्र क्वचितच आढळतील असें विद्वानांचें म्हणणें आहे. लेणें नं. १६ तील एक

प्रसंग–यांत एक राजकन्या मृत्युशय्येवर आहे व तिच्याजवळ तिचे आप्त व दासदासी आहेत. त्या राजकन्येचें आयुष्य संपत आलें आहे, असा हृदयंगम देखावा आहे. लेण्यांतील चित्रांत मुख्य व्यक्ति राजा. हे सर्व हिंदुच दिसतात. कांहीं चित्रांत राजे मृगया व लढाई करण्यांत तर कांहींत खाजगी व दरबारी व्यवसायांत गुंतलेले दाखविले आहेत. राजांबरोबर राण्याहि त्यांच्या अलंकारांसह दाखविल्या आहेत. राजपुत्र, प्रधान, दरबारी, सैनिक यांचींहि चित्रें असून त्यांचे पोशाख निरनिराळे दाखविले आहेत. पायदळ व घोडेस्वार, हत्यारें व वाहनें यांचींहि चित्रें आहेत. या सर्वांवरून त्या वेळची कला, रीतरिवाज व धर्म या सर्वांविषयीं माहिती मिळते.

**अजदुग्धभक्षी**—(गोट-सकर). हे एका जातीचे पक्षी असून हे बकरीचें दूध पिऊन टाकतात अशा समजुतीनें त्यांस 'अजदुग्धभक्षी' या अर्थाचें नांव पडलें आहे. इंग्लंडमध्यें हे पक्षी उन्हाळ्यांत येतात. यांचा आवाज कर्कश असून त्यावरून त्यांस रात्रिकर्कश (नाइट जार) असें नांव पडलें आहे. पक्ष्याची लांबी १० इंच असून त्याचा रंग इतका चित्रविचित्र असतो कीं, तो झाडावर बसला असतां सहज दृष्टीस पडत नाहीं.

**अंजनगांव (सुर्जी)**—वऱ्हाड, उमरावती जिल्हा, दर्यापूर तालुक्याच्या उत्तरेस अंजनगांव आणि सुर्जी हीं दोन खेडेगांवें मिळून झालेला एक गांव. मूर्तिजापूर–एलिचपूर रेल्वेचा फांटा या गांवावरून गेला आहे. सरकारी वसुलीकरितां अंजनगांव व सुर्जी अशीं निरनिराळीं गांवें समजलीं जातात. सुर्जी हा सुरंगीचा अपभ्रंश आहे असें म्हणतात. पूर्वी सुरंगीचीं झाडें येथें फार होत असत. येथें एक पडका किल्ला असून त्याच्या उंच चवथऱ्यावर उर्दू आणि इंग्रजी शाळा आहेत. कोष्टी लोकांची येथें बरीच वस्ती असून, साड्या, चोळखण, धोतरें, खादी, पागोटीं वगैरे चांगलीं होतात. कांहीं सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने या गांवीं आहेत. गांवाच्या दक्षिण बाजूस एक महादेवाचें देऊळ आहे. त्यानिमित्त सबंध श्रावण महिना तेथें यात्रा भरते व 'काठीची' मिरवणूक निघते. येथें फार मोठी व्यापारी पेठ व प्रसिद्ध सावकार आहेत. ह्या ठिकाणीं जैन धर्मीय लाड व सईतवाड ह्यांची संख्या फार आहे.

अंजनगांव हें अलीकडील इतिहासांत महत्त्वाचें आहे. कारण येथेंच दुसऱ्या इंग्रज–मराठ्यांच्या लढाईचा शेवट झाला. नागपूरच्या राजाबरोबर झालेल्या तहावर २३ डिसेंबर सन १८०३ रोजीं येथें सह्या झाल्या. इ. स. १८५० सालीं एलिचपूरच्या नवाब गुलाम हसनखान यानें अकोटचा मुन्सिफ सय्यद सिराजुद्दीन हसन याजबरोबर उघड उघड युद्ध सुरू केलें. दोघांच्या सैन्यांची अंजनगांव येथें गांठ पडली व नबाबाचा जवळजवळ मोड झाला होता; परंतु त्याच्या प्रतिपक्षानें लुटीस आरंभ केला; इतक्यांत नबाबानें उलटून मुन्सिफचा पराजय केला. वऱ्हाड ब्रिटिश राज्यांत सामील होण्यापूर्वी तीन वर्षें वऱ्हाडची ही स्थिति होती.

प्रसिद्ध मराठी कवि शिवनाथ रंगोपंत हा अंजनगांवीं जन्मला. देवनाथमहाराजांची जन्मभूमि हीच होय. त्यांच्या संप्रदायाचा काव्यसंग्रह येथें आहे. रामदासांचा चरित्रकार उद्धवसुत याचा मठ येथेंच आहे.

**अंजनवेल**—मुंबई, रत्नागिरी जिल्ह्यांत चिपळूण तालुक्यांतील एक प्रसिद्ध गांव. हें वासिष्ठी नदीवर असून तेथें एक जुना किल्ला आहे. मराठे अमदानींत हें जिल्ह्याचें ठिकाण होतें. पण १८१९ मध्यें गुहागर हें पेट्याचें ठाणें झाल्यामुळें अंजनवेलचें महत्त्व कमी झालें. याच्यानजीक ३०० फूट उंच टेंकडीवर तारकेश्वराचें प्राचीन देवालय आहे. या बंदरांत दीपगृह, कस्टम कचेरी व धर्मशाळा आहे. अंजनवेलच्या किल्ल्यासच गोपाळगड म्हणतात. तो अंजनवेल बंदरापासून अर्ध्या मैलावर असून तीन बाजूंनीं समुद्रवेष्टित आहे व चवथ्या बाजूस खंदक आहे. भोंवतालचा तट जाड दगड व चुन्याचा असून २० फूट उंच, ८ फूट रुंद व चांगला मजबूत आहे. खंदक १८ फूट रुंद व बराच खोल आहे. किल्ल्याला दोन दरवाजे (एक पूर्वेस व एक पश्चिमेस) आहेत. किल्ल्यांत पूर्वी बरींच घरें होतीं. १८६२ पर्यंत तेथें रक्षणार्थ २०० शिपाई व दोन अधिकारी होते.

१५ व्या शतकापूर्वी अंजनवेल येथें किल्ला नव्हता. पण मौजे गुटें तर्फ वळणें येथें पवार उपनामक कोणी मराठा पुरुष गढी बांधून या भागावर अमल चालवीत होता. इ. स. १५०२ च्या सुमारास विजापूरच्या मुस्तफाखान नामक सरदारानें सदरहू पवाराच्या गढ्या उध्वस्त करून दाभोळ (दाभोळ) अंजनवेल येथें सुभा स्थापन केला. इ. स. १६५१ च्या सुमारास शिवाजीनें दाभोळ सुभा काबीज केला तेव्हां त्याबरोबरच अंजनवेल हा तालुका शिवाजीकडे आला. शिवाजीनें तेथील किल्ला पुन्हां बांधून काढून त्याची मजबुती केली व त्या ठिकाणीं आपली एक गोदीहि स्थापन केली. इ. स. १६९८ च्या सुमारास सिद्दी अंबर हबशी यानें मराठ्यांपासून अंजनवेल किल्ला काबीज केला व तो पुढें ४६ वर्षें म्हणजे इ. स. १७४४ पर्यंत त्याच्याकडे होता. इ. स. १७४५ मध्यें तो तुळाजी आंग्र्यानें शिद्यांपासून काबीज केला. पुढें ११ वर्षांनंतर म्हणजे इ. स. १७५६ त तो पेशव्यांनीं रामाजी महादेव चिवलकर यास पाठवून आंग्र्यापासून जिंकून घेतला. यानंतर हा किल्ला ५३ वर्षें म्हणजे पेशवाईच्या अखेरपर्यंत पेशव्यांकडेच होता.

**अंजनेरी**—मुंबई, नाशिक जिल्हा. त्रिंबकेश्वराच्या डोंगरापासून अलग अशी ही दक्षिणोत्तर टेंकड्यांची रांग आहे. ही नाशिक तालुक्यामध्यें त्रिंबकेश्वर गांवापासून ४ मैल व नाशिक शहरापासून १४ मैलांवर आहे. टेंकडीच्या पायथ्याशीं अंजनेरी याच नांवाचें खेडें आहे. अंजनेरी टेकडीच्या तिन्ही बाजूस कडे असून दक्षिणेकडील बाजूस थोडासा उतार आहे. त्या बाजूनें गुरें व क्वचित् घोडेहि वर चढूं शकतात. या टेंकडीस किल्ला असें म्हणतात. माथ्यावर एक देवीचें देऊळ आहे. टेंकडीवर जाण्यास अंजनेरी गांवाजवळून रस्ता आहे. हा भाग समुद्रसपाटीपासून ३७०० फूट उंच असून सर्वांत जास्त उंची ४३०० फूट आहे. येथें उन्हाळ्यांत राहण्याकरितां नाशिकचे पुष्कळ लोक येतात. अंजनेरीच्या पायथ्याशीं मोठ्या सुंदर देवळाचे अवशेष आहेत. हीं देवळें गवळी राजे, देवगिरीचे यादव (११५०-१३०८) यांच्या वेळचीं आहेत, असें म्हणतात. प्रत्येक देवळाच्या दरवाजाच्या वरच्या बाजूवर एक तीर्थंकराची मूर्ति आहे. पुष्कळ मूर्ति खालीं पडल्या आहेत व फुटल्या आहेत. येथें एक गणपतीची मूर्ति व एक लिंगहि आढळतें. एका जैन देवालयांत शके १०६३ (इ. स. ११४०) सालांतील एक संस्कृत शिलालेख आहे. त्यांत सेउण (तिसरा) या यादव राजाच्या एका वाणी प्रधानानें कांहीं दुकानांचें उत्पन्न या देवालयास दिल्याचा उल्लेख आहे.

**अजमशहा**—अज्जम. हा औरंगजेबाचा दुसरा मुलगा. त्याला मुसलमान राणीपासून झालेला होता. तेव्हां औरंगजेबाच्यामागें यालाच गादी मिळावी अशी खटपट औरंगजेबाची बहीण रोपनारा एकदां औरंगजेब आजारी असतांना करीत होती. पण ती फसली. औरंगजेबाच्या पश्चात् भावाशीं लढतांना हा मारला गेला (१७०७). सातारच्या किल्ल्याला याचेंच नांव आहे.

**अजमीढ**—१. पुरुवंशांतील सुहोत्रास ऐक्ष्वाकीपासून झालेल्या तीन मुलांपैकीं थोरला. यास धूमिनीपासून ऋक्ष, नीलीपासून दुष्यंत व परमेष्ठी, व केशिनीपासून गंगाप्राशन करणारा जह्नु असे मुलगे झाले.

२. सोमवंशांतील हस्तिनापूर वसविण्याच्या हस्ति राजाचा नातू. याचा मुलगा संवरण वंशस्थापक होय.

३. अजमीढ, द्विमीढ व पुरुमीढ हे हस्तिनराचे तीन मुलगे. अजमीढपासून कण्व व मेधातिथि व कण्वांपासून काण्वायन ब्राह्मण झाले. त्याचा २ रा मुलगा बृहदिपु ऋक्ष यापासून संवरण व त्याचा कुरुक्षेत्र धर्मक्षेत्र करणारा कुरु मुलगा. (विष्णुपुराण ४।१९.)

भरद्वाज—मन्यु—बृहत्क्षत्र—हस्ती—अजमीढ अशी परंपरा भागवत पुराणांत आढळते. (भागवत ९।२१।३०). इतरत्र निराळी आहे.

अजमीढ वंशजांनाहि अजमीढ संबोधतात.

**अजमीर**—अजमीर-मेरवाडांतील एक शहर. लोकसंख्या १४७०००(१९४१). १८७९ सालीं रेल्वे झाल्यापासून लोकसंख्या वाढत आहे. हें शहर तारागड डोंगराच्या पायथ्याशीं असून रस्ते रुंद, इमारती सुंदर व शहराभोंवतीं तट आहे. त्यास पांच दरवाजे आहेत. तारागड डोंगरावर किल्ला असून त्याच्या टप्प्यांत शहर आहे. पायथ्यापासून उंची १३।१४ शें फूट आहे. १८३८ त किल्ला निकामी करण्यांत आला व १८६० पासून नसिराबाद व महू येथील सैन्य येथें उन्हाळीं राहतें. किल्ल्यांत मुसलमान फकीर सय्यद हुसेन याची कबर आहे. अढाइ-दिनका झोंपडा ही जुन्या वेधशाळेची मशीद झालेली इमारत व इतर इमारती प्रसिद्ध आहेत. जवळच पुष्कर सरोवर तीर्थ आहे. अनासागर तलावावरील क्रीडागृहें व दरगा ख्वाजासाहेब या प्रसिद्ध इमारती आहेत. अजमीरचा किल्ला अकबरानें बांधला. किल्ला चौकोनी असून प्रत्येक कोपऱ्यावर अष्टकोनी बुरूज आहेत. मूळ इमारतींत पुष्कळ फरक झाले असून हल्लीं येथें तहशिलीची कचेरी आहे. अनासागर तलावाजवळ दौलत बाग हें फिरण्याचें रम्य ठिकाण आहे.

अजमीर हें रेल्वे स्टेशन असून येथें मुख्य मुख्य शहरांतून शाखा असलेल्या नामांकित पेढ्या आहेत. १८६९ पासून म्युनिसिपालिटी आहे. दुष्काळी कामांत (१८९१-९२) बांधलेल्या फॉय सागर तलावाचें पाणी शहरास आहे. मेयो कॉलेजांत संस्थानिकांचीं मुलें शिकतात. याशिवाय एक सरकारी कॉलेज आहे.

अजमीर येथें तुरुंग व मोठें हॉस्पिटल आहे. राजपुतान्यांतील नऊ प्रसिद्ध शहरांपैकीं दोन नंबरचें हें आहे. हें शहर सारखें वाढत असून बाहेरून येणाऱ्यांपैकीं ¾ संयुक्त प्रांतांतून येतात. येथें सर्व जातींची वस्ती आहे. येथें तीन दवाखाने व एक नार्सिंग असोसिएशन आहे. शाळा-कॉलेजें भरपूर आहेत व हिंदु, मुसलमान व युरोपियन यांच्या इतर संस्था आहेत. सातआठ वृत्तपत्रें आहेत, व मोठ्या व्यापारी पेढ्या आहेत. तुरुंगांत कांहीं सुबक व टिकाऊ माल तयार होतो. कापूस दाबण्याचे कारखाने, बर्फाचे कारखाने व लोखंडी ओतकामाचे असे कारखाने आहेत.

अजमीर शहर केव्हां वसलें व हें नांव कां पडलें याबद्दल निरनिराळ्या विद्वानांचीं निरनिराळीं मतें आहेत: टॉड—पुष्कराचा अजपाल नांवाचा गुराखी, चोहान राजाचा पूर्वज यानें वसविलें. कनिंगहॅम—चोहान अथवा चाहमान राजा अजयपाल यानें स्थापना केली (इ. स. ८१). राजपुताना गॅझेटीअर—अज राजानें इ. स. १४५ त स्थापिलें. प्रो. लॅसेन—मूळ अजमीढपासून अजमीर झालें असावें. हम्मीर काव्य—चोहान वंशीय तिसरा अजय-

पाल यानें अजयमेरु किल्ला स्थापिला. प्रबन्ध चिंतामणि—चोहान वंशीय ४ था राजा अजय यानें किल्ला बांधला, यावरून या शहराचें प्राचीनत्व सिद्ध होतें. तर डॉ. जे. मॉरिसन् यांच्या मतें अजय राजानें (इ.स. ११००-११२५) हें शहर वसवून किल्ला बांधला. अजमीरशीं मराठयांचा त्यांतल्या त्यांत मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदे यांचा अनेक वेळां संबंध आला होता. १७६४ त तो सुभा होळकरास दिल्लीच्या पातशहानें दिला होता (रा. खं. ६).

**अजमीर मेरवाडा**—हिंदुस्थान, राजपुताना, एक प्रान्त. हा प्रान्त अजमीर व मेरवाड यांचा बनलेला असून; राजपुतान्यांतील जवळचा हिंदी मुलूख यांत आहे. राजपुतान्यांतील पोलिटिकल एजंट येथें कमिशनर असे.

अजमीरच्या उत्तरेस जोधपूर, दक्षिणेस उदेपूर, पूर्वेस जयपूर आणि पश्चिमेस जोधपूर आहे. मेरवाड्याच्या उत्तरेस जोधपूर व अजमीर, दक्षिणेस उदेपूर, पूर्वेस अजमीर व उदेपूर व पश्चिमेस जोधपूर आहे. क्षेत्रफळ २४०० चौ. मै. व लोकसंख्या ५८४००० (१९४१). अजमीर बराच वाळुकामय व कोठें कोठें डोंगराळ, तर मेरवाडा पूर्ण डोंगराळ आहे. अजमीर डोंगरपठारावर असून तारागडचा डोंगर २८५६ फूट उंच आहे. नद्या फारशा नाहींत. अनासागर तलावांतून साबरमती निघते. पुष्कर सरोवर प्रसिद्ध व चिरउल्लेखनीय आहे. अजमीर प्रांत सृष्टिशोभेसाठीं प्रसिद्ध नसला तरी वर्षाकालीं हिरवागार होतो. सर्व प्रकारच्या वनस्पति येथें आढळतात. वाघ क्वचित् व इतर हिंस्र पशु आढळतात व त्यांची शिकार केली जाते. हवा आरोग्यदायी असून उन्हाळीं कोरडी व हिंवाळ्यांत उत्साहवर्धक असते. पाऊस सरासरी २२ इंच पडतो.

अजमीरचा तारागड चव्हाण घराण्यांतील अज राजानें इ. स. १४५ मध्यें बांधला. पण इतिहासतज्ज्ञांच्या मतें अज व अजय हे ११०० त होऊन गेले. प्रथम अज मग अजय व त्यांच्यामागून आर्णो राजा गादीवर आला. त्यामागून विग्रहराज उर्फ विशालदेव राज्यावर आला. ११९२ त पृथ्वीराज गादीवर आला. याचा महंमद घोरीनें पराभव केला. यानंतर हरिराज गादीवर आला. पुष्कळ रक्तपातानंतर हा प्रान्त मालदेव राजाच्या ताब्यांत गेला. व मग अकबरानें त्याचा एक प्रांत केला. १७२१ त मोंगलांच्या ऱ्हासानंतर अजमीर अजितसिंहानें (जसवंतसिंहपुत्र) घेतलें. पुढें हा प्रान्त मराठयांच्या ताब्यांत आला व शेवटीं इंग्रजांनीं १८१८ त आपणाकडे घेतला. अजमीर येथें जुन्या वस्तू व पुष्करखेरीजकरून जुन्या ऐतिहासिक इमारती क्वचितच आहेत.

भाषा राजस्थानी व हिंदी. लोक उद्योगी व शरीरानें धष्टपुष्ट. धंदा शेती, विणकाम व कातडीं कमाविणें. हिंदु वैष्णव, शैव व शाक्त पंथीय असून मुसलमानहि येथें वस्तीस आहेत. घरें दगडाचीं व खेड्यांत मातीचीं, पण आरोग्यदृष्ट्या चांगलीं नसतात. पाऊस अनियमित, जमीन खडकाळ त्यामुळें शेती निकृष्ट. ज्वारी, मका, कापूस, गळिताचीं धान्यें व गहूं हीं पिकें. पुष्करच्या आसपास ऊंस व तोडगड तहशिलांत अफू होते. लोकांची स्थिति बरी आहे. १९०१ च्या दुष्काळापासून सुधारली. आसपासच्या डोंगरांत लोखंड, तांबें व शिसें सांपडतें. कलाकुसरीचें काम विशेष नाहीं. तुरुंगांत गालिचे व सतरंज्या होतात. कापड व हस्तिदंती व लाखेच्या बांगड्या होतात. राज्यव्यवस्था एका कमिशनरकडे असते व तो अजमिरास राहतो. मदतीस दोन दु: कमिशनर असतात. राजपुतान्यावरचा गव्हर्नर-जनरलचा एजंट चीफ कमिशनर असतो. जमीनधाऱ्याची पद्धत राजपुतान्यांतील संस्थानांप्रमाणें. जमिनीचे दोन भाग—खालसा व इस्तिमरारी-आहेत. इस्तिमरारी पद्धति मराठयांनीं बंद केली, पण १८७३ त इंग्रजांनीं त्यांना सनदा दिल्या. तिसरी पद्धत म्हणजे भूम. या जमिनीच्या मालकांना भूमिया म्हणतात व तो मान समजला जातो. त्यांचें काम पांथस्थ व मालमत्ता यांचें रक्षण करणें आहे. हल्लीं सरकारास दंग्याधोप्याच्या वेळीं मदत करतात. १८५१ पासून झालेला जमीनधारा व अफू हे उत्पन्नाचे मार्ग आहेत. १९३९-४० सालीं २ कॉलेजें व ३५१ शाळा होत्या.

**अजमोदल**—(थायमोल). एक औषध. हें ओंव्यापासून काढतात. बाह्योपचारांत परोपजीवी कीटकांच्या नाशाकरितां तसेंच इसब व विसर्पिका (प्सोरीआसिस) यांच्या विवक्षित स्थितींत याचा उपयोग करतात. गजकर्ण व दद्रू यांवर याचा अल्कोहल द्रव व क्षतांत्र व सन्निपात ज्वरांत याचा आंत्रकोथघ्न या दृष्टीनें उपयोग करतात. परंतु याचा मुख्य उपयोग अंकुशकृमी (ॲंकिलोस्तोमा ड्युओडिनेल) चा नाश करण्याकरितां कृमिघ्न म्हणून होतो. याच्यामुळें मूत्र हिरवें होतें. निरनिराळ्या औषधांशीं मिश्रण करून निरनिराळ्या रोगांवर उपयोजितात.

हें सुगंधी असून ओंव्याच्या तेलांत व दुसऱ्या तेलांत असतें. तेलांतून याचें निष्कासन करण्याकरितां एक विशिष्ट प्रकारची क्रिया करावी लागते.

हें मेन्थोनपासून कृत्रिम रीतीनें तयार करतां येतें. याचे स्फटिक मोठे, चपटे व निर्वर्ण असतात व याचा रसांक ४४° श. व उत्क्वथनांक २३०° श. असतो.

यास ओंव्याचा तिखट वास येतो व रुचि तीक्ष्ण असते. थंड पाण्यांत विरघळत नाहीं, पण अल्कहोल, इथ्र, हरपुत्तिक व ऑलिव्ह तेल यांत विरघळतें. हें कर्बाम्लापेक्षां शक्तिमान्, पूतिनाशक आहे. पण अविद्राव्यतेमुळें या कामीं उपयोग करणें अडचणीचें आहे. याची पट्टी व मलम यांचा औषधी कामांत उपयोग होतो.

**अजमोदा**—एक ओंव्याची जात. हें झाड वार्षिक असून, हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं, विशेषतः बंगाल्यांत याची लाग-

फार आहे. झाडाची उंची १½ हात असून पांढरीं बारीक फुलें येतात. भाजीपाल्याच्या मसाल्यांत घालतात व अजीर्णावर देतात.

**अजयगड संस्थान**— मध्य हिंदुस्थानांतील एक सनदी संस्थान. क्षेत्रफळ ८०२ चौ. मै.. विंध्याद्रींतील दऱ्याखोऱ्यांमुळें तुटक झालें आहे. केन व बेर्मा ( बेटवाची शाखा ) या नद्या आहेत. हें संस्थान आतां विंध्य प्रदेश संघांत सामील झालें आहे.

अजयगडचे संस्थानिक राजा छत्रसालचे वंशज असून बुंदेले रजपूत आहेत. इ. स. १७३१ त छत्रसालनें राज्याचे भाग पाडले. त्यांतील अजयगड व ३१ लाखांचा मुलूख त्याचा तिसरा मुलगा जगत्‌राज यास मिळाला. पुढें चुलतभावांत तंटे होऊन समेटांत गुमानसिंगाला ( जगत्‌चा पुतण्या ) बांडा प्रांत व अजयगड किल्ला मिळाला. १७९२ त अलीबहादुरनें बख्तसिंगास हांकललें. पुढें १८०३ सालीं बुंदेलखंड इंग्लिशांच्या ताब्यांत आल्यावर त्यांनीं बख्तसिंगास ३०,००० रु. पेन्शन दिलें व पुढें १८०७ त कोट्रा व पवई परगण्यांची सनद दिली. अजयगड व भोंवतालचा प्रांत त्या वेळीं लक्ष्मण दौवा या लुटारूच्या ताब्यांत होता. शांततास्थापनेसाठीं इंग्रजांनीं त्यास शरण यावयास लावून त्याकडे तो प्रांत ठेविला. परंतु दौवाकडून मित्रत्वाच्या अटी न पाळल्या गेल्यामुळें १८०९ मध्यें क. मार्टिननें तो मुलूख जिंकला व त्यांतील बराच मोठा भाग बख्तसिंगास १८१२ च्या सनदेनें देण्यांत आला. १८३७ त बख्तसिंग मरण पावल्यावर १८५५ पर्यंत राज्य चालू होतें. पण १८५५ त विजयसिंग निपुत्रिक वारल्यामुळें राज्य खालसा झालें. परंतु १८५७ च्या बंडांत विजयसिंगाची राणी इंग्रजांशीं मित्रत्वानें वागली म्हणून विजयसिंगाच्या भावास-रणजोरसिंगास-१८५९ त गादी मिळाली. यास निरनिराळे किताब व ११ तोफांची सलामी मिळाली. अजयगड किल्ल्याखेरीज यांत दोन पुराणसंशोधनदृष्ट्या महत्त्वाचीं ठिकाणें आहेत. एक अजयगडच्या ईशान्येकडील १५ मैलांवर एक खेडें व दुसरें गंजपासून २ मैलांवरील नाचना गांव.

संस्थानची लोकसंख्या ९६५९६ असून त्यांत अजयगड राजधानी व ४८८ खेडीं आहेत. शें. ४० लोक शेती व शें. १७ मजुरी करतात. चणे, गहूं, बाजरी, कापूस हीं पिकें होतात. पूर्वी लोखंडाच्या खाणी होत्या. पण त्या सध्यां बंद आहेत. हिरे सांपडत असत. संस्थान डोंगराळ असल्यामुळें व्यापार बहुतेक नाहींच. उत्पन्न ३॥ लाख रु. आहे. संस्थानांत थोडेंसें सैन्य आहे. शाळा थोड्या असून त्यांत तीनचारशें विद्यार्थी शिकतात.

अजयगड शहर—अजयगड संस्थानची राजधानी. लोकसंख्या ४७४६ ( १९४१ ). हल्लींच्या राजधानीस 'नौशहर' म्हणतात व तें किल्ल्याच्या डोंगराच्या उत्तर टोंकास वसलें आहे. किल्ल्यास तट असून किल्ला प्रख्यात आहे. किल्ला 'केदार पर्वता' वर असून उंची १७४४ फूट आहे. हा ९ व्या शतकांत बांधला गेला असावा. किल्ला तिकोनी असून पूर्वीं पांच पण हल्लीं दोन दरवाजे आहेत. तट तीन यार्ड रुंदीचा असून आंत पाण्याची टांकी, जैन मंदिर व जुने शिलालेख आढळतात. डोंगरावर सागवान व तेंडूचीं झाडें आढळतात.

हें जी. आय्. पी. रेल्वेचें स्टेशन आहे. तेथून महोब्याला जाण्यास चांगली सडक आहे. नरैनी येथें डाक बंगला आहे.

**अजयपाल** ( इ. स. ११७३-११७७ ) — गुजरातच्या चालुक्य वंशांतील कुमारपालानंतरचा राजा. कुमारपाल निपुत्रिक वारल्यावर ( वि. सं. १२२९ ) त्याचा भाऊ महीपाल याचा मुलगा अजयपाल हा गादीवर आला. ( द्वयाश्रय काव्य व वेरावळ येथील पाटणचा अंकित लेख यांवरून ). कुमारपालप्रबंधांत कुमारपालाच्या मनांत आपला नातू प्रतापमल्ल यास राज्य द्यावयाचें होतें, पण त्यानें कुमारपालाचा खून केला असा उल्लेख आहे. अजयपाल हा निर्दय व गर्विष्ठ स्वभावाचा असून जैन अमात्यांशीं त्याचें जमत नसे. त्यानें पुष्कळ जैन देवालयें उध्वस्त केलीं. उकळत्या तेलाच्या कढईंत टाकणें, तापलेल्या लाल पत्र्यावर उभें करणें वगैरे क्रूर शिक्षा हा देत असे. सं. १२३३ त त्याचा विज्जलदेव नामक द्वारपालानें खंजीर खुपसून वध केला. अजयपाल मुसलमान झाला होता हें टॉडचें विधान ( 'वेस्टर्न इंडिया' ) खरें मानण्यास सबळ पुरावा पाहिजे. त्याच्यामागून त्याचा लहान मुलगा मूळराज गादीवर आला. राणी नैका देवी—कादंब राजा परमादि ( ११४७-११७५ ) याची मुलगी—ही कारभार पाहूं लागली. तिचा भाऊ भीमदेव हा सेनापति झाला. परंतु दोन वर्षांतच बाळराजा ( मूळराजा ) मरण पावला.

**अजयसिंह** ( इ. स. १२९०-१३०१ )—चितोडचा राणा लखमसी याच्या पश्चात् खरा वारस अजयसिंह हा मेवाडच्या पश्चिम सीमेवर अरवली पर्वतांत केळवाडा या स्थळीं जाऊन राहिला. लखमसीनें जोहारास जाते वेळीं यास 'तूं वृद्ध झाल्यावर तुझ्या पश्चात् तूं तुझ्या पुतण्यास—हमीरास (अरसिंहाचा मुलगा)—गादीवर बसव' असें सांगितलें होतें. अल्लाउद्दिनानें चितोड घेतल्यावर तेथें बरीच उध्वस्तता करून मग तें झालोरच्या मालदेवास दिलें. मेवाडांत मुसलमान शिपाई व डोंगरांत पंजामील व त्याचे अनुयायी यांशीं यास तोंड द्यावें लागलें. यास सज्जनसिंह व अजमसिंह असे दोन मुलगे होते, पण त्यांचा उपयोग न झाल्यानें यानें आपल्या पुतण्यास—हमीरास—आजोळून बोलाविलें व मुंजाचा सूड घेण्याची आज्ञा केली. थोड्याच दिवसांत हमीरानें मुंजाचें शीर कापून चुलत्यापुढें ठेवल्यावर तो खुष झाला व त्यानें त्या रक्ताचा टिळा हमीराच्या कपाळीं लावून तुझ्या नशिबीं साम्राज्योपभोग आहे असें सांगितलें. अजमसिंह लवकरच वारला. सज्जन-

सिंहानें हमीरास राज्यार्ध मागूं नये म्हणून अजयसिंहानें त्यास देशाबाहेर पाठविलें. तो मेवाड सोडून निघाला तों दक्षिणेंत आला व पुढें त्याच्याच कुळांत गोब्राह्मणप्रतिपालक व महाराष्ट्र देश मुसलमानांपासून स्वतंत्र करणारे शिवाजीमहाराज जन्मले. ( टॉडचें 'राजस्थान' ).

**अजशृंगी**—( मेंढशिंगी ) एक औषधी वेल. रस दुधासारखा असून फळें मेंढयाच्या शिंगासारखीं असतात व वेलास कांटेहि असतात. विशेष नेत्रविकारावर उपयोग. वांतीच्या योगें कफ काढण्यासहि उपयुक्त. खंडाळ्याचा घाट व इतर डोंगरांवर ही वेल आढळते. हा शब्द वेदांत आहे व राक्षसघ्न अशी याची प्रसिद्धि आहे. याचें दुसरें वैदिक नांव अराटकी असें आहे.

**अजातशत्रु** ( अजमासें ख्रि. पू. ५५४–५२७ ) — शिशुनाग वंशांतील सहावा राजा व बिंबिसाराचा मुलगा. ख्रि. पू. ५५४ त गादीवर आला. हा गादीवर कसा आला याबद्दल निरनिराळ्या विद्वानांचें निरनिराळें मत आहे. पण अजातशत्रूच्या पितृवधाची हकीकत बनावट असावी असें ऱ्ही. स्मिथचें मत आहे (ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया ). बिंबिसारच्या वेळीं महावीर व गौतम बुद्ध हे दोघे मगधांत स्वमतप्रचार करीत होते. महावीर अजातशत्रूचा आईकडून आप्त होता. हे दोघेहि धर्मसंस्थापक अजातशत्रूच्या वेळीं वारले. गौतम बुद्ध व अजातशत्रु यांची मुलाखत होऊन पितृघाताबद्दलचा पश्चात्ताप त्यानें दर्शविला व बुद्धानें क्षमा केली असा उल्लेख कांहीं ठिकाणीं आहे. (बुद्धोत्तर जग, पान १७).

अजातशत्रूची सावत्र आई कोसल राजाची बहीण भर्तृवधानें मरण पावली, म्हणून कोसल राजानें मगधावर स्वारी केली. त्यांत कोसल राजाचा पराभव होऊन त्यास आपली मुलगी अजातशत्रूस देऊन तह करावा लागला.

या जयानें अजातशत्रूची आकांक्षा वृद्धिंगत होऊन त्यानें वैशालीच्या लिच्छवी राज्यावर–आपल्या आजोळावर–स्वारी करून तो मुलूख घेतला. पुढें त्यानें हिमालयाच्या पायथ्यापर्यंतचा सर्व भाग आपल्या अंकित केला व लिच्छवींना अटकावण्याकरितां पाटलि नांवाचा किल्ला बांधला. हेंच पुढें पाटलिपुत्र शहर बनून मगधाचें व अखिल भारताचें केंद्र झालें.

**अजापर्णवर्ग**—[ लॅ. ॲग्रिफोलियासी ] हा एक वनस्पतींचा वर्ग आहे. या वर्गांतील झाडांच्या फुलांच्या पाकळ्या संयुक्त झालेल्या असतात व त्यांत ( द्विदल ) दोन गर्भपर्णें असतात. या जातीच्या झाडांपैकीं कांहीं उभीं वाढतात व कांहीं वेलीसारखीं असतात. या वर्गांत हलीसकल, स्नोबेरी वगैरे झाडें येतात. यांचीं पानें समोरासमोर असतात. त्यांस उपपर्णें ( स्टिप्यूल्स ) नसतात. त्यांस परागकोश नसतात. पुष्पमुकुटस्थ पुंकेसर असतात. यांचीं फळें बोरासारखीं असून तीं शुष्क असतात, पण पिकलीं म्हणजे उकलत नाहींत.

**अजामिल**—पूर्वी कान्यकुब्ज देशांत राहणारा एक ब्राह्मण होता. त्यानें आई, बाप, बायको यांचा त्याग केला व एक शूद्र स्त्री बाळगून तिच्यासह आपलें अमूल्य आयुष्य वायां घालविलें. त्यानें एकदां आपल्या नारायण नांवाच्या मुलास हांक मारली. त्या वेळीं विष्णुदूत व यमदूत यांचा संवाद त्याच्या कानीं पडला. तो आपल्याचविषयीं आहे हें पाहून तो अनुतप्त झाला. तेव्हां त्यानें ती शूद्र स्त्री व तिची संतति यांना सोडून उरलेलें आयुष्य गंगाद्वारीं भगवद्भजनांत घालविलें व त्यामुळें त्यास मोक्षप्राप्ति झाली.

**अंजार**—मुंबई इलाखा, कच्छ संस्थानांतील एक गांव. गांवाबाहेर अजमीरच्या चव्हाण वंशाच्या संस्थानिकाचा भाऊ अजयपाल याचें घोड्यावर बसलेल्या मूर्तीचें एक देऊळ आहे. या अजयपालास नवव्या शतकांत अजमीरच्या हद्दीबाहेर हांकून दिलें होतें, म्हणून त्यानें आपलें राहण्याचें हें ठिकाण केलें होतें. या देवळास कांहीं जमीन इनाम असून येथें पुष्कळ साधु येऊन राहतात. इ. स. १८१६ सालीं कच्छच्या रावानें अंजार गांव व जिल्हा कंपनी सरकारास दिला होता. परंतु इ. स. १८२२ सालीं नवीन तह होऊन त्याअन्वयें हा भाग पुनः कच्छच्या रावाच्या ताब्यांत आला. १८१९ मध्यें येथें एक धरणीकंपाचा धक्का बसून बरेंच नुकसान झालें. येथें बरींच देवळें आहेत.

ऑक्टोबर १९२२ मध्यें येथें 'कच्छ केळवणी फंड' म्हणून ३ लाख रुपयांचा शिक्षणाकरितां एक निधि जमा करण्यांत आला. यांतून शाळा, तालीमखाना वगैरे इमारती बांधून शेतकी, बागाईत, फळझाडांची लागवड करणें वगैरे गोष्टी शिकवावयाचे उद्देश होते.

**अजाहूत सरदेशमुख**—शाहूनें आपल्या मंत्र्यांच्या नातलगांकरितां निर्माण केलेली जागा. त्याकडे कुल सरदेशमुखी वाचवसुलाचें काम होतें. शाहूनिधनानंतर बाळाजी बाजीरावानें ही जागा नाममात्र ठेविली. त्यानें अजाहूत सरदेशमुखास कांहीं जहागीर दिली व दक्षिणच्या सहा सुभ्यांतील सरदेशमुखी वसुलींतील त्याची ढवळाढवळ बंद केली.

**अजित**— जैनांतील २४ तीर्थकरांपैकीं दुसरा. यास दुसरा अर्हत असेंहि मानतात. जैनांनीं उत्सर्पिणी-चांगला काळ-व अवसर्पिणी-निकृष्टकाळ असे दोन काळ कल्पिले आहेत. त्यांपैकीं दुसऱ्या काळांतील ५ व्या फेऱ्यांत हा जन्मला होता असें मत आहे. सद्धर्मालंकारांत उल्लेखिलेला अजित केशकंबल व हा अजित एकच कीं काय हें निश्चित नाहीं.

**अजितसिंग** (१६७८–१७३१)— मारवाडचा एक पराक्रमी राजा. यानें फर्रुखसेयर बादशहा व सैय्यद बंधु या दोघांशीं

सख्य जोडून आपला मतलब साधला होता. आपल्या मुलीला बादशहाच्या जनान्यांत घालून एका मुलास बादशहाची तैनात सांगितली! पण याच्या मध्यस्थीमुळें जिझियाकर मात्र बंद झाला. याच्या मुलानेंच अभयसिंग याचा खून केला; तसाच पिलाजी गायकवाडाचा पण केला.

**अजितसिंग** ( मृ. १९४७ )— एक हिंदी क्रांतिवीर. पंजाबमध्यें यांनीं लाला लजपतरायांबरोबर किसानांमध्यें सरकारविरुद्ध उठावणी केली. 'पगडी संभाल ओ फट्टा!' हें क्रांतिकारक गीत त्या वेळीं सर्वांच्या तोंडीं होतें व सरकारी अधिकारी त्यामुळें चिडत. १९०६ च्या सुमारास जहाल आणि मवाळ असे दोन पक्ष राजकारणांत होते. अर्थात् सरदार अजितसिंग लाल-बाल-पाल-बरोबर जहाल पक्षांतील कार्यकर्ते होते. पंजाबमध्यें त्यांनीं भारतमाता सोसायटी काढली व लाला हरदयाळ, रामभुज चौधरी, जसवंतराय, बक्षी टेकचंद वगैरे साहाय्यक जमविले. पंजाबांत सरकारनें जमिनीसंबंधीं केलेल्या दोन कायद्यांमुळें बहुजनसमाज खवळला होता. अजितसिंगांनीं या चळवळीचें नेतृत्व पत्करून पोलिस आणि लष्कर यांतील लोकांनीं बाहेर पडण्याविषयीं प्रचार चालविला. तसेंच कायदेभंग करण्याविषयीं लोकांना प्रोत्साहन दिलें. तेव्हां सरकारनें लजपतराय आणि अजितसिंग यांना मंडाले येथें हद्दपार केलें. पण लवकरच त्यांना सोडावें लागलें. सुरत काँग्रेसनंतर अजितसिंगांनीं आपल्या 'पेशवा' पत्रांतून जोरानें क्रांतीच्या सूचना दिल्या, तेव्हां सरकारनें त्यांना सहकाऱ्यांसह अटक करण्याचें ठरविलें. तेव्हां ते गुपचुप इराणमार्गे पुढें युरोप-अमेरिकेंत गेले. ब्राझीलमध्यें ते १६ वर्षें होते. पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांत त्यांनीं जर्मनी, इटली या राष्ट्रांशीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्यासंबंधीं गुप्त करारमदारहि केले होते. सुभाषबाबूंना ते भेटले होते व आझाद हिंदी फौजा तयार करण्यांत त्यांचा बराच हात होता. रोमच्या हिमालय रेडिओवरून ते बोलतहि असत. दुसऱ्या महायुद्धानंतर हिंदुस्थानांत परत ४० वर्षांनंतर येण्याची त्यांनीं खटपट चालविली. अनेक अडचणींनंतर ते एकदांचे १९४७ सालीं कराचीस पोंचले. त्यांची प्रकृति अगदीं ढासळली होती. तेव्हां ते फार दिवस स्वतंत्र झालेल्या मातृभूमींत जगूं शकले नाहींत.

**अंजिदिव**—( अंजनी द्वीप ). पश्चिम हिंदुस्थानांतील पोर्तुगीज वसाहतींपैकीं एक बेट. उत्तर कानडा जिल्ह्यांतील कारवारच्या नैर्ऋत्येस पांच मैलांवर हें बेट असून क्षेत्रफळ अर्धा चौ. मैल आहे. हवा रोगट असल्यामुळें बेट जवळजवळ ओसाडच पडलें आहे.

इ. स. १५० च्या सुमारास आइजीदिओई म्हणून टॉलेमीनें ज्याचा उल्लेख केला आहे तें हेंच बेट असावें. १४९८ पासून पोर्तुगीज लोकांचा या बेटाशीं संबंध आहे. या सालीं वास्को-दी-गामा या बेटावर आला होता. इ. स. १५०६ सालीं पोर्तुगीज लोकांनीं कांहीं काळ या बेटाचा ताबा सोडला होता. पण पुनः तो त्यांनीं लवकरच घेतला व त्या वेळेपासून आजतागायत तें बेट त्यांजकडेच आहे.

इ. स. १६८२ सालीं येथील किल्ला बांधण्यांत आला. मराठ्यांच्या स्वाऱ्या यावर झाल्या असतां पोर्तुगीजांनीं हा किल्ला लढविला होता. हल्लीं या बेटाचा उपयोग गोव्याचें 'काळें पाणी' म्हणून करण्यांत येतो.

**अजीगर्त**—भृगुकुलोत्पन्न एक ब्राह्मण. यास शुनःपुच्छ, शुनःशेप व शुनोलांगूल हे तीन मुलगे. पैकीं मधल्यास यानें वरुणाला बळी देण्यास हरिश्चंद्र राजास विकलें. ( शुनःशेप व हरिश्चंद्र पहा ).

**अंजीर**—[वर्ग-मोरासी ; फिकस कॅरिका] दरवर्षी पानें गळून पडणारें एक झाड आहे. हें तुतीच्या वर्गांतील आहे. याचें मूलस्थान आशिया मायनर आहे. परंतु हें भूमध्य समुद्राच्या आसपासच्या देशांत वाढतें. हें १५, २० किंवा ३० फूट उंचीपर्यंत वाढतें. योग्य हवामानांत यास दोनदां फळें येतात. एकदां उन्हाळ्यांत मागील वर्षांतील कळ्यांपासून व दुसऱ्यांदां वर्षाकाळांत; हाच मुख्य हंगाम असतो. अंजीर हें फळ ताजें खाण्यांत येतेंच, पण वाळलेले अंजीर पुष्कळ मोठ्या प्रमाणांत भूमध्य समुद्राच्या पूर्व भागांत खाण्यांत येतात. उत्तम अंजीर तुर्कस्तानांतून येतात.

**अजीर्ण**—हा स्वतंत्र व परतंत्र असा रोग आहे. तेव्हां नीट परीक्षा करून उपचार करावे. परतंत्र असल्यास नीट परीक्षा करवावी व स्वतंत्र असल्यास लंघन करावें. तेवढ्यानें न भागल्यास पाचक औषधें व कठिण प्रसंगीं ओकारीचीं व रेचक औषधें घ्यावीं.

अजीर्णामुळें मूर्च्छा, उन्मत्तवात, वांति, मळमळ, आळस, भोंवळ, पोटांत आग, आंतड्यांत आवाज, मलावरोध, तृषा, अन्तःक्षोभ, विपूचिका ( कॉलरा ) व अलसक ( जाड्य ) हे विकार होतात. खाल्लेलें अन्न पचत नाहीं व पोटांत गुबारा धरतो.

**अजीव संयुक्तें**—( ॲझो कॉंपाउंड्स ). बेंझिन वर्गांतील हे पदार्थ असून यांच्या घटकांत कर्ब ( कार्बन ), उज्ज ( हायड्रोजन )

आणि नत्र (नायट्रोजन) हेच प्रामुख्यानें असतात. नत्राचे कमींत कमी दोन अणु असून ते— N : N —ह्या पद्धतीनें एकमेकांस जोडलेले असतात. त्या अणुद्वयाला 'अझो ग्रुप किंवा अजीव समूह' ही संज्ञा असून यावरूनच या वर्गांतील पदार्थांना अजीव संयुक्तें हें नांव मिळालें आहे. या वर्गातील पहिलें संयुक्त ॲझोबेंझिन असून तें स्फटिकमय आणि रंगयुक्त असतें व यापासूनच पुढें अनेक ॲझो रंग तयार करतात.

या वर्गांत हल्लीं परदेशांतून येणारे कृत्रिम रंग येतात. हे रंग रासायनिक रीत्या केलेले असतात. त्यांतील प्रमुख म्हणजे क्रिसोइडाइन नांवाचा नारिंगी रंग, बिस्मार्क ब्राऊन, फेनिलिन ब्राऊन, मँचेस्टर ब्राऊन इत्यादि पिंगट रंग, गोल्ड ऑरेंज, मंदारिन ऑरेंज, इत्यादि नारिंगी रंग येतात. यांत कांहीं तांबडे व पिवळेहि रंग येतात.

**अंजू**—हा फ्रेंचांच्या ताब्यांतील एक जुना परगणा होय. या परगण्याची हद्द उत्तरेस मेन परगण्यापर्यंत, पूर्वेस टूरेन परगण्यापर्यंत, दक्षिणेस पॉइटीयर्सच्या व पश्चिमेस नँटिसच्या परगण्यांपर्यंत पसरलेली होती. हल्लीं या परगण्याचें स्वतंत्र अस्तित्व नाहींसें होऊन 'मेन एत् ल्वॉर' या फ्रान्सच्या विभागांत त्याचा समावेश केला गेला आहे.

**अँजेलिको फ्रा** (१३८७–१४५५)—हा प्रसिद्ध साधु व चित्रकार टस्कनी संस्थानांतील मग्गेलो प्रांतांतील व्हिशियो नामक गांवीं जन्मला. त्याचें पूर्ण नांव वीएटो फ्रा गिओवन्नी अँजेलिको फीसोले असें होतें. त्याला फ्रा गिओवन्नी अगर फ्रायर जॉन या नांवानें तत्कालीन लोक ओळखीत असत. अँजेलिको हें नांव तो वारल्यानंतर त्याच्या गुणवर्णनपर म्हणून देण्यांत आलें.

इ. स. १४०७ मध्यें फीसोले येथील डोमेनिक पंथाच्या मठांत तो साधक या नात्यानें राहिला. १४०८ मध्यें त्यानें डोमेनिक पंथाची दीक्षा घेतली. दीक्षा घेण्यापूर्वी त्यानें चित्रकलेचा अभ्यास केला असावा असें दिसतें. लॉरेंझे मोनॅको नांवाच्या चित्रकारानें त्याला ही कला शिकविली असावी. कोरोना येथें साधक या नात्यानें राहिला असतां त्यानें काढलेलीं चित्रें अद्याप पहावयास मिळतात. १४१८–३६ या अवधींत तो फोसोले येथें राहत असे. पुढें फ्लॉरेन्समधील डोमेनिक पंथाच्या मार्कोच्या मठांत त्याची रवानगी झाली. तेथें त्यानें मार्कोच्या मठांतील वेदीवर चित्रें काढलीं. १४४७ मध्यें पोपच्या आमंत्रणावरून तो रोम येथें आला व व्हॅटिकन येथील कॅपेला डेल सॅक्रॅमेंटोमध्यें बरींच चित्रें काढलीं. पांचव्या निकोलसच्या उपासनामंदिरांतहि त्यानें चित्रें काढलीं. तो १४५५ मध्यें रोम येथें मरण पावला. त्याचें शव मिनर्व्हा येथील प्रार्थनामंदिरांत पुरण्यांत आलें.

अँजेलिकोचा स्वभाव फार संयमी व निरलस होता. गरिबांना तो सढळ हातानें मदत करीत असे. तो फार कोंवळ्या मनाचा होता. राग हा त्याला कधीं शिवला नाहीं. धार्मिक चित्रांशिवाय त्यानें इतर चित्रें काढण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्याची वर्तणूक निर्दोष व निष्पाप असे. त्याला मरणोत्तर 'मुक्त' ही पदवी मिळून त्याची ख्रिस्ती संतमालिकेंत गणना होऊं लागली.

**अझटेक**—चवदाव्या शतकामध्यें मेक्सिको देशांत या लोकांनीं वसति केली व तेथून ते बऱ्याच दूरवरच्या प्रदेशांत पसरले. या लोकांना स्पॅनिश लोकांनीं जिंकलें. यांच्या राज्यपद्धतीमध्यें राजास सर्व सत्ता असे, तथापि त्यास सल्ला देण्याकरितां एक मंत्रिमंडळ असे. या लोकांतील मांटेझुमा हा राजा प्रसिद्ध होऊन गेला. यांच्यामध्यें समाईक शेतीपद्धति व समाईक राहणी प्रचलित होती. त्या वेळीं जरी लोखंड अज्ञात होतें तरी खाणी खोदण्याचा धंदा हा या लोकांत विशेष वाढला होता. या लोकांत कांसें आणि अग्निकांच (ऑब्सिडियन) धातूंचीं हत्यारें वापरीत. धातूचीं नाणीं प्रचारांत नव्हतीं. त्यांस धातुकाम, विणकाम, पिसांचें काम व भांडीकाम उत्कृष्ट करतां येत असे. त्या लोकांत लेखनाच्या कामीं चित्रलिपि वापरण्यांत येत असे. ते चांद्रवर्षीय पण बिनचूक पंचांग वापरीत. त्यांचीं देवळें असून त्यांवर पुरोहित असत व ते शिक्षणाचेंहि कार्य करीत. ही एक स्वतंत्रपणें विकास पावलेली संस्कृति असून त्या दृष्टीनें तिचें महत्त्व फार आहे. अद्यापि नहुआ भाषा बोलणारे सुमारें दहा लाख अझटेक आहेत.

**अझमगड**—संयुक्त प्रांतांत गोरखपूर विभागाचा दक्षिणेकडील जिल्हा. क्षेत्रफळ २२०७ चौ. मै.. घोग्रा, तमसा व छोटी शरयू ह्या नद्या असून २० तळीं आहेत. जमीन नदीच्या गाळाची असून हवा पावसाळ्याखेरीज निरोगी असते. पाऊस सरासरी ४१ इंच. भार, सोएरी व चेरू हे येथील मूळचे रहिवासी. मुसलमानी अमलांत हा प्रदेश प्रथम कनोजच्या व नंतर दिल्लीच्या राज्यांत सामील झाला. सतराव्या शतकांत बाटलेल्या गौतम रजपुतांकडे व पुढें मोहबतखानानें खंडणी नाकारल्यावर अयोध्येच्या नबाबाकडे गेला. १८५७ सालीं देशी शिपायांनीं बंड करून येथील अधिकाऱ्यास ठार केलें व खजिना फैजाबादेस नेला. पण सर ई. ल्युगार्डनें बंडवाल्यांचा पुढारी कुंवरसिंग याचा पराभव केला व जिल्ह्यांत शांतता स्थापन केली.

या जिल्ह्यांतील मुख्य धंदे शेती, साखर, कापड विणणें हे होत. विदेशी कापड व कृत्रिम नीळ येऊं लागल्यानें हे धंदे बसले. कापड, कापूस, तंबाखू, मीठ व भांडीं हीं आयात असून

साखर, अफू, गळिताचीं धान्यें, नीळ व सोरा हीं निर्यात आहे. आगगाडीचे लहान फांटे या जिल्ह्यांतून गेले आहेत. लोकसंख्या १८२२८९३. लोकवस्ती दाट आहे. शें. ६० लोक शेतीवर अवलंबून आहेत. जमिनींतून पाण्याचा निचरा नीट होत नाहीं. त्यामुळें नीरस तांदूळ व जव हीं मुख्य पिकें. शिवाय ऊंस, गहूं, वाटाणा, मका वगैरे उत्पन्न. जमिनीची वर्गवारी ठरवून आकार ठरविला आहे. जिल्ह्यांत निळीचे कारखाने पुष्कळ आहेत. लोक भांडखोर असून हिंदु-मुसलमानांत वारंवार तंटे होतात.

अझमगड— जिल्ह्याचें गांव. तमसा नदीवर असून बंगाल नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचें स्टेशन. लोकसंख्या सु. पंधरा हजार. १६६५ त अझमखानानें (गौतम राजाच्या मुलानें) स्थापलें. गांवास तट असून म्युनिसिपालिटी आहे. साखर व कापड कारखाने, हायस्कुलें, दवाखाना व कांहीं प्राथमिक शाळा आहेत.

**अझरबैजन**— सोव्हिएट रशिया, एक लोकसत्ताक राज्य. अझरबैजनच्या लोकराज्याला १९१७ पर्यंत अस्तित्व नव्हतें. रशियन बादशाही नष्ट झाल्यावर इतर प्रांतांप्रमाणें हाहि प्रांत स्वतंत्र झाला. यास पूर्वीचा राष्ट्रीय इतिहास नसून लोकांस आपला मानववंशहि माहीत नाहीं. बाकू व एलिझाव्हेटोपाल हे दोन प्रांत मिळून १९१७ मध्यें हें लोकराज्य बनलें. रशियन अमलाखालीं हें नांव लुप्त झालें होतें, पण स्वतंत्र राज्यस्थापनेनंतर तें पुन्हां धारण करण्यांत आलें. हा प्रदेश कुरु व आरास या नद्यांमध्यें असून सुपीक आहे. येथें तेलाच्या खाणी आहेत. लोकसंख्या ३२ लाख असून त्यांपैकीं २० लाख मुसलमान आहेत. क्षेत्रफळ सु. ३२ हजार चौ. मैल. मुख्य धंदा तेल (पेट्रोलियम) काढून, तयार करून परदेशीं पाठविणें. बाकू शहराच्या-अझरबैजनची राजधानी-आसपास तेलाच्या खाणी सांपडल्यामुळें यास व्यापारी व राजकीय महत्त्व आलें आहे. तुर्कांच्या सार्वमहंमदीय संघटनेचा व रशियाच्या बोल्शेविझमचा या राज्यावर बराच परिणाम झाला.

२० सप्टेंबर १९१७ रोजीं अझरबैजनचें स्वतंत्र लोकराज्य सुरू झालें. १९१७ सालीं रशियाचा झार पदच्युत झाला व हंगामी सरकारनें स्वयंनिर्णयाचें तत्त्व पुकारलें. पण लगेंच बोल्शेविझम सुरू झाला. याचा फायदा घेऊन ट्रॅन्सकॉकेशियन लोकांनीं टिफ्लीस येथें सभा भरवून आपलें संयुक्त लोकराज्य सुरु केलें. परंतु जॉर्जियन व आर्मेनियन खिस्ती व अझरबैजनचे तार्तर यांचें जमेना; म्हणून अझरबैजनच्या लोकांनीं तुर्काशीं संबंध ठेवून स्वतंत्र राज्य स्थापलें. अंतस्थ फूट व तुर्की लोकांचें आक्रमण यांमुळें नष्ट होऊं पाहणारें स्वातंत्र्य या लोकांनीं ब्रिटिशांच्या मदतीनें टिकविलें (१९१८). ब्रिटिशांनीं तेथील लोकांना आधुनिक राज्याची कल्पना देऊन १९१९ मध्यें प्रयाण केलें. १९१९ च्या तहांत राष्ट्रसंघाचें या प्रदेशाकडे लक्ष गेलें होतें व येथील लोकराज्यांनीं तंटा आपसांत मिटवावा व लढाई होऊं नये म्हणून एक हायकमिशनर नेमण्यांत आला. परंतु पुढें रशियानें १९२० सालीं स्वारी करून यांचें स्वातंत्र्य नष्ट केलें व हा प्रांत रशियास जोडला. १९३६ सालीं रशियन संघराज्यांतील एक राज्य हा दर्जा मिळाला.

**अझीमगंज**—बंगाल्यांतील मुर्शिदाबाद जिल्ह्यांतील भागीरथीच्या उजव्या तीरावरील एक गांव. जिआगंजसह लोकसंख्या सु. वीस हजार. नलहटीपासून येथपर्यंत रेल्वेफांटा असून व्यापार बराच चालतो. अझीमपूरपासून बऱ्हामपूर (बंगाल) पर्यंत लहान बोटी चालतात.

**अझोटस**—पॅलेस्टाईनमधील अशदाद या जुन्या शहरास ग्रीक व रोमन लेखकांनीं दिलेलें नांव. हें पांच फिलिस्टाईन शहरांपैकीं एक असून सीरिया व ईजिप्त यांमधील लष्करी मार्गावर व भूमध्य समुद्रापासून आंत तीन मैल होतें. येथें राक्षस (ड्रॅगन) पूजा संप्रदाय होता. येथील लोकांनीं स्वातंत्र्यासाठीं इस्रायल, असुरियन व ईजिप्तचा राजा यांशीं टक्कर दिली. खिस्ती शकाच्या सुमारास येथें एक बिशप होता, पण या शहराची विशेष सुधारणा झाली नाहीं. येथील प्राचीन अवशेष म्हणजे सारासेन पद्धतीचा खान (धर्मशाळा) होय.

**अझोर्स बेटें**— अटलांटिक महासागरांतील पोर्तुगालच्या ताब्यांतील द्वीपसमूह. लोकसंख्या ४८४२७८ (१९४०). क्षेत्रफळ ९२२ चौ. मैल. हीं बेटें अमेरिकेस जवळ आहेत, पण हवामान युरोपप्रमाणें आहे. बेटें ज्वालामुखीयुक्त आहेत, व कांहीं ज्वालामुखी जागे आहेत. (१) सेंट मायकेल्स, सेंट मेरी व फोर्मिगस; (२) फायल, पायको, सेंटजॉर्ज, टर्सेइरा व ग्राशिओसा; (३) फ्लोर्स व कार्व्हो; असे तीन द्वीपसमूह आहेत. समुद्रकिनारा बहुतेक सुळकेवजा आहे. हवामान समशीतोष्ण असून उष्णमान जानेवारी ४८° व जुलै ८२° असतें. तुफानें वारंवार होतात. पाळीव पशूंशिवाय स्तन प्राणी थोडेच आहेत. पक्षी मात्र फार आहेत व त्यामुळें पिकास त्रास होतो. वनस्पति युरोपप्रमाणेंच असून फळांची लागवड बरीच होते. ऊंस व तीळ यांची लागवड मात्र फसली आहे. बेटांतील लोक बहुतेक पोर्तुगीजसंभूत आहेत. नीग्रो, इंग्लिश, स्कॉच व आयरिश हेहि येऊन राहिले आहेत. राज्यकारभाराच्या सोयीकरितां पाँटाडेलगाडा, सेंट मायकेल्स, आंग्रा (टर्सेइरा) व हार्टा (फायल) असे विभाग पाडले आहेत. लिस्बनच्या लोकप्रतिनिधि सभेस प्रतिनिधि पाठवितां येतात. हीं शहरें लिस्बन व आयर्लंडशीं तारायंत्रानें जोडलीं आहेत. आंग्रा व पाँटाडेलगाडा येथें वेधशाळा आहेत. कापड, कोळसा, साखर, स्टेशनरी, लोखंडी सामान, रसायनें, रंग व तेलें ही आयात असून फळफळावळ, मध व खाद्य पदार्थ ही निर्गत आहे. व्यापार ग्रेटब्रिटन, पोर्तुगाल,

अजमीर — पुष्कर सरोवर (पान २६)

अजमीर — शहर (पान २६)

अझ्टेक — एक यज्ञीय शिला (पान ३१)

अमेरिका वगैरे देशांशीं चालतो. १४३२ त हीं बेटें युरोपीय राष्ट्रांस सांपडलीं व तेथें पोर्तुगीज व फ्लेमिश लोकांनीं वसाहत केली. १५८०–१६८० पर्यंत स्पेनच्या ताब्यांत होतीं. पुढें पोर्तुगालच्या ताब्यांत गेलीं.

**अटक**—पाकिस्तान, पश्चिम पंजाब प्रांतांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ४०२२ चौ. मै.. तलगंगच्या पठारावर हवा थंड असते, पण अटकचे डोंगर व त्यांचे आसपास उन्हाळा कडक असून उष्ण वारे वाहतात व सूर्यकिरण प्रखर असतात. पाऊस सरासरी १७–२४ इंच. लोकसंख्या ६७५८७५ असून बहुसंख्य मुसल्मान आहेत. भाषा पुस्तु. उत्तरेकडील चांचचें मैदान व नदीकांठ सुपीक. वस्ती विरळ; त्यामुळें अवर्षण व दुष्काळ भासत नाहीं. मुख्य पिकें गहूं, हरभरा, गळिताचीं धान्यें, बाजरी, जोंधळा होत. घोड्यांची पैदास चांगली होते. गरकवला दगडी खलवत्ते, काळाचित्त डोंगरांत दगडी कोळसा व फत्तेहजंग-जवळ पेट्रोलियम सांपडतें. कारखाने नाहींत. कशिद्याचें व लांकडी कांतकाम, कुलपें, चटया वगैरे किरकोळ जिन्नस होतात. कापड, तांदूळ, मीठ, भांडीं हीं आयात. रेल्वे व पक्के रस्ते हे दळणवळणाचे मार्ग असून रावळपिंडी व अॅबटाबाद यांशीं जोडले आहेत. कँबलपूर ही राजधानी असून तेथें डेप्युटी कमिशनर असतो. तालुक्यावर तहसीलदार असतात.

अटक गांव—अटक जिल्ह्यांतील तालुक्याचें गांव व नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचें जंक्शन स्टेशन. सिंधूच्या कांठीं, काबूल–सिंधूच्या संगमा-जवळ किल्ला आहे. तेथें शिबंदी असते. १६ मैलांवर अलेक्झांडर जेथून पार झाला तो पूल असून १५८१ त अकबरानें मिरझाच्या स्वाऱ्यांपासून बचावाकरितां बांधलेला खैराबाद किल्ला आहे. अटक नेदा दुस्तर म्हणून पलीकडे खैराबाद म्हणजे सुरक्षित-पणाचें माहेरघर स्थापिलें. पहिल्या शीख युद्धापासून हा किल्ला इंग्रजांकडे होता. १८७३ त सिंधूवर रेल्वेपूल व रस्ता झाला. बेगमकी सराई ही धर्मशाळा आहे.

अटक नदी—नदीच्या दुस्तरतेमुळें अकबरानें हें नांव दिलें, पण पुढें ही नदी हिंदुस्थानची सरहद्द ठरली व जी नदी ओलांडली असतां प्रायश्चित्त घ्यावें लागतें ती अटक असा अर्थ बनला. त्याप्रमाणें धर्मानें अटक ही सरहद्द ठरली त्याचप्रमाणें हिंदु राज्य-कर्त्यांच्या विचारांचीहि ती मर्यादा ठरली. मराठे अटकेपार गेले होते यांत शंका नाहीं; पण यावर आक्षेप कांहीं इतिहासकार असा घेतात कीं, बाळाजी बाजीरावानें गंगाधर यशवंत यास अबदालीस अटकेपार करण्यास सांगितलें, पण पुढें काबूलपर्यंत जाऊन पारिपत्य करण्यास कांहीं सांगितलें नाहीं. (राजवाडे खं. १, १५६, २४५).

सु. वि. १–५

'आसेतुहिमाचल' प्रमाणें अटकेपासून रामेश्वरपर्यंत असाहि प्रयोग करण्यांत येतो.

**अँटनान रिव्हो**—हें मादागास्करच्या राजधानीचें शहर आहे. टमाटेव्ह बंदराच्या नैर्ऋत्येस १३५ मैलांवर हें शहर आहे. एका लांबच लांब पण अरुंद अशा टेंकडीवर हें वसलेलें असल्या-कारणानें, आसपासच्या बऱ्याच अंतरावरचा मुलूख येथून न्याहाळतां येतो. अशा रीतीनें हें नाकेबंदीचें ठिकाण बनलेलें आहे. पुष्कळ काळपर्यंत हें होना जातीच्या लोकांच्या वस्तीचें ठिकाण असून त्याची विशेष प्रसिद्धि नव्हती. पण या जातीच्या मुख्यांनीं ज्या वेळीं मादागास्करचा बराचसा मुलूख जिंकून ताब्यांत आणला त्या वेळीं या शहराला विशेष महत्त्व प्राप्त झालें. धातुकाम, चाकू-कात्र्या वगैरे बनविणें, रेशीम इ. चे कारखाने येथें आहेत. लो. सं. (१९३६) १२६५१५. १८६९ पर्यंत या शहरांतील घरें साध्या लाकडाचीं अगर गवताचीं असत. पण त्यानंतर विटांचीं व दगडी घरें बांधण्यास सुरुवात झाली. व त्यामुळें लवकरच शहरामध्यें मोठमोठे राजवाडे, प्रधानांचे वाडे, शाळा, दवाखाने वगैरे इमारती झाल्या. १८९५ मध्यें फ्रेंचांनीं हें शहर जिंकून घेतलें. फ्रेंचांच्या अमदानींत या शहराचें वैभव वाढलें व त्याला रमणीय स्वरूप प्राप्त झालें. या शहराच्या पूर्वेस व आग्नेयीस दोन किल्ले असून त्यामुळें या शहराचें रक्षण चांगल्या प्रकारें होतें. या शहरांत पांच ख्रिस्ती देवळें असून एक मशीद आहे.

**अॅटलांटा**—उत्तर अमेरिकेच्या सं. संस्थानांतील जॉर्जिया संस्थानची राजधानी. हें रेल्वेचें प्रमुख केंद्र आहे. मोठमोठे कारखाने व ऑफिसें यांनीं शहर गजबजलेलें असून येथून पॅसि-फिक व अटलांटिक किनारे जोडणारे सात प्रमुख लोहमार्ग निघतात. शहराची उंची समुद्रसपाटीपासून १०५० फूट आहे. त्यामुळें हवा सौम्य व समशीतोष्ण आहे. अमेरिकेंतील या शहरीं शिक्षणाचें फार मोठें केंद्र आहे. येथें एक विद्यापीठ आहे व त्यांत नीग्रोंना उच्च शिक्षण देण्याची सोय केलेली आहे. लो. सं. (१९४०) ३०२२८८.

**अॅटलांटा**—ग्रीक पौराणिक कथेंतील शिकारीण. ही अर्के-डियाची राहाणारी असून जो कोणी हिला पळण्याच्या शर्यतींत मागें टाकील त्याच्याशीं लग्न करावयाचें असा हिचा पण होता. व हरणाऱ्यास मृत्यूची शिक्षा असे. पण जिंकूं पाहणाऱ्या एकानें ॲफ्रोडाईटी (व्हीनस) कडून तीन सोन्याचीं फळें मिळवून पळतांना तीं मागें टाकीत गेला. साहजिकच तीं उचलण्यास ॲटलांटा थांबली व पराभव पावली.

**अटलांटिक महासागर**—युरोप व आफ्रिका यांचा पश्चिम किनारा व उत्तर आणि दक्षिण अमेरिकेचा पूर्व किनारा यां-

मधील इंग्रजी S या आकाराचा पाण्याचा पट्टा. उत्तरेस आर्क्टिक महासागरापासून दक्षिणेस दक्षिण महासागरापर्यंत पसरल्यानें त्याचे उत्तर व दक्षिण अटलांटिक असे भाग झाले आहेत. यांपैकीं उत्तर अटलांटिक महत्त्वाचा असून त्याच्या पश्चिमेस कॅरीबियन समुद्र, मेक्सिको व सेंट लॉरेन्सचे आखात व हडसन उपसागर असून पूर्वेस भूमध्य, बिस्केचा उपसागर, उत्तर व बाल्टिक समुद्र आहेत. उत्तर अटलांटिकाची रुंदी १६०० पासून कांहीं ठिकाणीं ४५०० मैल आहे. दक्षिण अटलांटिक उत्तरपेक्षां पुष्कळ भिन्न. दक्षिणेकडील किनारा सरळ असून समुद्र वगैरे नाहींत. रुंदी ३७०० मैल असून दक्षिणेकडे वाढत जाते. क्षेत्रफळ दक्षिण भागाचें जास्त आहे. दक्षिण १,२६,२७,००० चौ. मै., उत्तर १,०५,८८,००० चौ. मै.. पृथ्वीवरील बऱ्याच मोठ्या नद्या या महासागराला मिळतात. ५०° उत्तर ते ४०° दक्षिण यामधील पट्टा खडकाळ असून खोली १७०० पुरुष आहे. ५०° उत्तरेस आईसलंड ते स्कॉटलंड खडक असून खोली २६० पुरुष आहे. त्यामुळें हा भाग आर्क्टिक व अटलांटिकमधील बांधासारखा आहे. बाकीचा भाग सुमारें ३००० पुरुष खोल आहे. एच्. एम्. एस्. 'चॅलेंजर', जर्मन जहाज 'गॅझेल', 'ट्राव्हेल्यिर' जहाज आणि संयुक्त संस्थानांचें 'ब्लेक' जहाज यांनीं या महासागराचें बरेंच संशोधन केलें. 'व्हायडीव्हिया' या जहाजांतील प्रो. च्यून व अंटार्क्टिक प्रदेशाच्या संशोधनार्थ गेलेली मंडळी यांनीं यांत बरीच भर घातली. इतर महासागरांप्रमाणें यांत बेटें नाहींत. बहुतेक बेटें खंडास जोडलेलीं आहेत. उत्तरेकडची सरासरी खोली २०४७ व दक्षिणेकडची २०६७ पुरुष आहे. तळ ग्लोबीजेरिना जातीच्या चिखलाचा बनलेला आहे. १०००–३००० पुरुषांवर हा चिखल असून पुढें तांबड्या चिकण मातीचा आहे. कित्येक ठिकाणीं ज्वालामुखी पर्वतांतल्यासारखें व पोंवळ्याच्या जातीचें द्रव्य सांपडतें.

अटलांटिक महासागर कसा झाला हा अनिर्णित प्रश्न आहे. कांहीं भूस्तरशास्त्रज्ञांच्या मते हा महासागर जुना आहे तर कांहीं यास द्वितीयावस्थाक युगांतला मानतात. तर कांहीं दक्षिण अमेरिका व आफ्रिका यांमध्यें एक खंड होतें असें मानतात. ५०° उत्तरेच्या सुमारास ८० फा. उष्णतामान असून ४५° उत्तर पर्यंत तें ६०° फा. पर्यंत जातें. पुढें अमेरिकेपेक्षां युरोपकडे उष्णतामान अधिक असतें. दक्षिणेकडे उष्णतेचें मान आफ्रिकेच्या बाजूपेक्षां अमेरिकेकडे अधिक असतें. सर्व महासागरांपेक्षां हा महासागर खारट आहे. पण जास्त खारट २० उ. ते ३० उ. हा भाग आहे. अगदीं उत्तर अगर दक्षिण येथें गोडें पाणी असून हा खारटपणा ऋतूंवर अवलंबून असतो. या महासागरावर वाऱ्यांचें प्रमाण नियमित स्वरूपाचें आहे. दक्षिण अटलांटिकावर वारे नेहमीं प्रमाणांत वाहतात. कारण आफ्रिका व दक्षिण अमेरिका यांचा आकुंचित पृष्ठभाग. परंतु उत्तरेकडे हवेच्या कमीजास्त दाबामुळें वाराहि कमीजास्त वाहण्याचा संभव असतो. तरी यांत तीनहि बाजूंनीं बर्फाच्छादित प्रदेश असल्यामुळें नियंत्रण पडतें. 'उत्तर अटलांटिक प्रत्यावर्त' मोठा असून हिंवाळ्यापेक्षां उन्हाळ्यांत याची गति जास्त असते. वरील वातावरणीय हालचालींत व्यापारी वारे धिमे असून ते पाण्याला गति देण्याचें कार्य करतात. यांतील प्रमुख प्रवाह 'गल्फ स्ट्रीम' आखात प्रवाह असून याची रुंदी १०० मैल, खोली ६००–१५०० फूट, उष्णतामान ७९° व वेग ४–६ मैल ताशीं असतो. याप्रमाणेंच कांहीं शीतप्रवाहहि बरेच खालून वाहतात.

**अटलांटिक शहर**— अमेरिका, संयुक्त संस्थानांतील न्यू जर्सी संस्थांनांतील अटलांटिक काउंटीचें व हवा खाण्याचें ठिकाण. येथें उपाहारगृहें, रुग्णालयें, उत्तम रस्ते वगैरे सर्व सोयी आहेत. लो. सं. (१९४०).६४,०९४. हें विमानाचेंहि एक मुख्य ठिकाण आहे.

**ॲटलास पर्वत**—या नांवाच्या पर्वताची फार मोठी रांग उत्तर आफ्रिकेंतील मोरोक्को, अल्जीर्स व ट्युनीस या देशांत पसरली आहे. लहान व मोठा ॲटलास असे या पर्वताचे २ भाग असून त्यांत रुपें, शिसें, तांबें, लोखंड, सुरमा वगैरे धातु सांपडतात.

**ॲटली, क्लेमेंट** (जन्म १८८३–)—ग्रेटब्रिटनचे पंतप्रधान. शिक्षण ऑक्सफर्ड येथें झालें. नंतर वकिली करूं लागले. पहिल्या महायुद्धांत यांची कामगिरी झाली असून १९२२ मध्यें ते पार्लमेंटमध्यें मजूर पक्षातर्फे निवडून आले. १९२४ त मजूर-मंत्रिमंडळांत ते युद्धखात्याचे दुय्यम चिटणीस होते. १९२९–३० सालांत हिंदुस्थानांत जें रॉयल कमिशन आलें होतें त्यांत ते एक सभासद होते. १९३५ सालापासून ते मजूर पक्षाचे पुढारी आहेत. चर्चिलच्या प्रधानगिरीच्या कारकीर्दींत ते दुय्यम प्रधान म्हणून जे होते ते नवीन निवडणुकींत चर्चिल पक्षाचा पराभव होऊन मजूर पक्ष अधिकारारूढ झाल्यावेळीं पंतप्रधान झाले (जून १९४५). यांच्या प्रधानगिरीच्या कारकीर्दींत युद्धोत्तर तहपरिषदांचीं बिकट कामें चाललीं व जागतिक दुष्काळ आणि दंगे यांच्या परिस्थितीला त्यांच्या मंत्रिमंडळाला तोंड द्यावें लागत आहे. हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्यांत ॲटलींचा मोठाच भाग आहे.

**ॲंटवर्प**— बेल्जममधील शेल्ड नदीच्या मुखापासून ५० मैलांवर असलेलें युरोप खंडांतील मोठ्यांपैकीं एक नैसर्गिक बंदर. या बंदरापासून जगांतील सर्व ठिकाणीं जहाजें जातात; असे २४० मार्ग आहेत. व्यापाराव्यतिरिक्त या शहरांत हिऱ्यांना पैलू पाडणें, दारू तयार करणें, सिगारेट बनविणें, कापड विणणें

वगैरे कारखाने मोठ्या प्रमाणावर चालतात. या शहराची स्थापना ८ व्या शतकांत झाली. तेथील नोत्रदाम या प्रार्थना मंदिराचा मनोरा ४०० फूट उंच आहे. तेथील जुन्या इमारती याच्या प्राचीनतेची साक्ष देतात. लो. सं. (१९४४) २५४०५७.

**अटाकामा**—दक्षिण अमेरिकेंतील चीलीचा पश्चिम भाग म्हणजे हें अटाकामाचें वाळवंट होय. हें वाळवंट म्हणजे कोपीआपोपासून उत्तरेकडे लोआ नदीचा पठारी प्रदेश होय. या वाळवंटांतील नत्रयुक्त मातीचा उपयोग खतासाठीं फार मोठ्या प्रमाणांत केला जातो. सोनें—रुपें यांचीहि समृद्धि आहे. चिलीच्या अटाकामा या प्रांताचें क्षेत्रफळ ३०८२४ चौ. मैल व लो. सं. (१९४०) ८४३१२ आहे.

**अँटार्क्टिक महासागर**—दक्षिण ध्रुवासभोंवतीं जो बर्फाच्छादित प्रदेश आहे त्याला वेढून हा समुद्र पसरलेला आहे. याचें क्षेत्रफळ सुमारें ७५,००,००० चौ. मै. आहे. याची खोली अद्यापि नक्की मोजलेली नाहीं. ध्रुवप्रदेश पहा.

**अटालिया**—पँफिलियांतील जुनें शहर. परगामम्च्या दुसऱ्या अॅटलस राजावरुन नांव पडलें. आसिय फ्रिजियाचें महत्त्वाचें बंदर व आशियामायनरांतून ईजिप्त-सिरिया मार्गावर होतें. ख्रिस्ती शकाच्या आरंभीं हें पेर्गाचें बंदर असल्यामुळें राजधानी झालें. हेड्रियनची वेस व महाराणी जुलियानें बांधलेला बुरुज हे अवशेष आहेत.

**अँटिओक**— १. अँटिओक या नांवाचीं सोळा शहरें हेलेनिस्टिक राजांनीं स्थापिलीं. या सर्वांत प्रसिद्ध शहर सिरियामध्यें आरॉंटेस नदीच्या पश्चिम तीरावर आहे. इ. स. पूर्वी ३०० सेल्युकस निकेटरनें हें शहर स्थापलें. अलेक्झांडरनें येथें तळ दिला होता. सेल्युकसनें हें शहर अलेक्झांड्रियाच्या पद्धतीवर बांधलें होतें. याच ठिकाणीं जीझसच्या अनुयायांना ख्रिश्चन असें नांव प्रथम मिळालें. ह्याची लोकसंख्या ४ थ्या शतकांत २,००,००० असावी. आज नवें शहर होऊन लो. सं. सुमारें ३०,००० आहे.

२. (पिसिडियांतील शहर)—हें एक प्राचीन शहर आहे. या शहराचे विशेषतः देवळांचे, नाटकग्रहाचे वगैरे अवशेष आधुनिक यलोव्हाक शहरानजीक अॅरंडेल यास १८३३ त सांपडले. हें आशियामायनरमधील कोनिया जिल्ह्यांतल्या सुलतान दाघ पर्वताच्या दक्षिण उतारावर होतें. इ. स. पूर्वा २८० त सेल्युकस निकेटरनें हें शहर एका फ्रिजियन देवस्थानाच्या जागेवर वसविलें असावें. रोमन लोकांनीं इ. स. पूर्वा १८९ त याला स्वतंत्र शहर केलें असावें. इ. स. पूर्वी ६ त ऑगस्टसनें सीझरिया या नांवानें येथें एक वसाहत केली, आणि मुल्की व लष्करी कारभाराचें हें एक केन्द्र झालें. १०९७ त धर्मयोध्यांना या शहरांत आश्रय मिळाला होता. येथील अवशेष मजेदार असून ग्रीक व रोमन शिवंदीची मजबुती त्यांवरून कळते.

**अँटिका**—प्राचीन ग्रीस देशांतील एक संस्थान असून त्याची राजधानी अथेन्स. हा प्रदेश त्रिकोनी आकाराचा असून याचे उंचवट्याचा प्रदेश, मध्यभाग आणि समुद्रकिनारा असे तीन भाग आहेत. येथील जमीन हल्लीं बरीच निकस झाली आहे. तथापि येथें ऑलिव्ह व अंजीर हीं फळें चांगलीं होतात. तसेंच द्राक्षें आणि खावयाचीं धान्यें होतात. तथापि अॅटिका हा प्रांत शेतीपेक्षां गुरचरण होण्यालाच अधिक योग्य आहे. पूर्वी अॅटिकांतील लोकांची अत्युच्च संस्कृति आणि बुद्धिमत्ता यांविषयीं फार ख्याति होती.

**अॅटिला** (मृ. इ. स. ४५३)—हूण लोकांचा एक पुढारी. त्यानें आपली राजसत्ता जर्मनींतील सर्व लोकांवर स्थापिली आणि पूर्व युरोप आणि पश्चिम युरोप या भागांतल्या अनेक बादशहांवर खंडणी बसविली. काळ्या समुद्रापासून अॅड्रियाटिक समुद्रापर्यंतचा सर्व प्रदेश त्यानें बेचिराख केला. थ्रेस, मासिडोनिआ व ग्रीस या सर्वांनीं त्याचें आधिपत्य मान्य केलें. त्यानें सत्तर चांगलीं भरभराटींतलीं शहरें नष्ट केलीं आणि त्यामुळें थिओडोशिअसला त्याचेबरोबर मोठी किंमत देऊन तह करणें भाग पडलें. ज्यांचा त्यानें पराभव केला ते सर्व शत्रु त्याला दैवी आपत्ति असें म्हणत असत. पूर्वेकडील देश जिंकल्यावर तो पश्चिमेकडे फ्रान्स देशावर चाल करुन गेला आणि त्यानें ऑर्लिअन्स शहराला वेढा दिला. या शहरांतील लोकांनीं त्याचा पहिला हल्ला परतवला आणि नंतर एटिअस याच्या आधिपत्याखालचें रोमन सैन्य आणि थिओडोरिक राजाचें व्हिसीगॉथ लोकांचें सैन्य यांनीं संयुक्त हल्ला करुन अँटिलाला या शहराचा वेढा उठवणें भाग पाडलें. यामुळें तो मागें फिरला, पण नंतर त्यानें अॅक्विलिया, पदुआ, व्हेनिस, व्हेरोना आणि बर्गामो हीं शहरें उध्वस्त केलीं. लाँबर्डीचा प्रदेश बेचिराख केला, आणि खुद्द रोम शहरावर त्यानें चाल केली, त्यामुळें पोप १ ला लिओ कांहीं रोमन वकिलांसह अॅटिलाच्या छावणींत गेला आणि अॅटिलाबरोबर तह करण्यांत या पोपनें यश मिळविलें. या तहानंतर अॅटिला हंगेरी देशांत परत गेला आणि त्यानें तेथें हिल्डाबरोबर लग्न केलें (सन ४५३). पण त्या विवाहाच्या रात्रींच त्याची एक रक्तवाहिनी शीर तुटल्यामुळें किंवा हिल्डा हिनेंच खून केल्यामुळें तो मृत्युमुखीं पडला.

**अँटिलीस**— अँटिलीस हें नांव कांहीं युरोपीय लेखक वेस्टइंडीज बेटांना योजतात. कॅनरी व ईस्ट इंडिया बेटें यांमधील द्वीपसमूहास अथवा अज्ञात प्रदेशास अँटिलिआ असें मध्ययुगीन नकाशांत नांव दिलेलें आढळतें. पुढें कोलंबसानें शोधून काढलेल्या

प्रदेशास हें नांव मिळालें. हा प्रदेश म्हणजे एक मोठा द्वीपसमूह असल्यामुळें त्यासच अँटिलीस नांव मिळालें.

त्यांतहि मोठा व छोटा अँटिलीस असा भेद करण्यांत येतो. पहिल्यांत क्यूबा, जमेका, हैती व पोर्टोरिको हीं बेटें येतात. दुसऱ्यांत लीवर्ड विंडवर्ड बेटें व बार्बडोज या बेटांचा समावेश होतो.

**अँटोकोस्टी**— हें बेट कॅनडाच्या क्वेबेक प्रांतांत सेंट लॉरेन्सच्या मुखाजवळ असून त्याची लांबी १२५ मैल व रुंदी ३० मैल आहे. उन्हाळ्यामध्यें येथें मच्छीमारी जोरांत चालते.

**अँटीगुआ**— ब्रिटिश वेस्ट इंडीज, लीवर्ड द्वीपसमूहापैकीं हें महत्त्वाचें बेट असून त्याचें क्षेत्रफळ १०८ चौ. मैल आहे. या बेटाच्या किनाऱ्यावर पर्वत असून जरी तो खडकाळ आहे तरी दंतुर असल्यानें त्यावर उत्तम बंदरें आहेत. बेटाचा बराच भाग सुपीक असून हवा निरोगी आहे. या बेटांत एकहि नदी नाहीं. उत्पन्न मुख्यतः साखर, कापूस, आणि अननस यांचें होतें. बार्बुडा आणि रेडांडा हीं बेटें ॲन्टीगुआच्या गव्हर्नरच्या ताब्यांत असून याची राजधानी सेंट जॉन येथें लीवर्ड द्वीपसमूहाचा गव्हर्नर राहतो. दक्षिणेकडे फॉल्माऊथ हें उत्तम बंदर असून तेथें जहाजें बांधण्याचा कारखाना आहे.

**अँटीगोनस गोनाटस** (खि. पू. २३९)—हा मॅसेडोनियाचा राजा अन्टीगोनस सायक्लॉप्सचा नातू व डेमेट्रियसचा मुलगा होता. थेसलीमधील गोन्नी येथें त्याचा जन्म झाल्यामुळें त्याला गोनाटस असें; आडनांव प्राप्त झालें असें कांहींचें मत आहे. खि. पू. २८३ मध्यें डेमेट्रियस मरण पावल्यानंतर अन्टीगोनसनें 'मॅसेडोनियाचा राजा' ही पदवी घेतली. पण याच्या ताब्यांत तें राज्य आलें नव्हतें. खि. पू. २७६ सालीं तें राज्य त्याच्या ताब्यांत आलें. राज्यारूढ होतांच त्यानें गॉल लोकांची स्वारी परतविली व एकदोन वर्षें मॅसेडोनियावर अमल गाजविला. पण पिऱ्हस हा इटलींतून परत येतांच त्यानें अन्टीगोनसच्या ताब्यांतील बहुतेक सर्व मुलूख बळकावून घेतला. पुढें पिऱ्हस हा पिलोपोनेसस प्रांतांत स्वारी करण्यासाठीं गेला असतां, ती संधि साधून अन्टीगोनसनें पुनः मॅसेडोनियाचें राज्य बळकावलें, पण पिऱ्हसचा मुलगा अलेक्झांडर यानें अन्टीगोनसपासून पुनः तें राज्य हिरावून घेतलें. अन्टीगोनसनें धीर न सोडतां पुनः एकदां निर्वाणीचा प्रयत्न करून, अलेक्झांडरपासून मॅसेडोनियाचें राज्य परत मिळविलें. त्यानंतर मात्र त्याची कारकीर्द शांततेंत गेली. अन्टीगोनस हा सज्जन व विद्यासंपन्न असल्यामुळें तो फार लोकप्रिय राजा झाला. त्याच्या दरबारीं नामांकित इतिहासकार, उत्कृष्ट कवि व प्रसिद्ध तत्त्वज्ञ होते व त्यांना त्यानें शक्य तें उत्तेजन दिलें. तो आपल्या वयाच्या ८० व्या वर्षी मरण पावला.

**अँटीगोनस सायक्लॉप्स** (खि. पू. ३८२ ते ३०१)—हा मॅसिडोनियाचा राजा फिलिप याचा मुलगा व अलेक्झांडरचा भाऊ. अलेक्झांडरच्या स्वारींत याला एका तुकडीचें आधिपत्य दिलें गेलें होतें. खि. पू. ३३३ मध्यें अलेक्झांडरनें त्याला फ्रिजियाचा गव्हर्नर नेमलें. त्याच्या मरणानंतर त्याच्याकडे पॅफीलिया व लीशिया या प्रांतांचें स्वामित्व आलें. बाबिलोनियाचा गव्हर्नर सेल्युकस हा ॲन्टीगोनसच्या भयानें टॉलेमीच्या राज्यांत पळून गेला. नंतर सेल्यूकस, टॉलेमी, कॅसॅन्डर या सर्वांनीं मिळून ॲन्टीगोनसचा पाडाव करण्यासाठीं कंबर बांधली. खि. पू. ३१५-४११ याच्या दरम्यान पुष्कळ ठिकाणीं उभयपक्षांत झटापटी होऊन शेवटीं तात्पुरता समेट झाला. या समेटान्वयें आशिया मायनर व सीरिया हे प्रांत ॲन्टीगोनसच्या ताब्यांत राहिले. पण थोडयाच दिवसांत या समेटाची इतिश्री झाली. टॉलेमी, कॅसॅन्डर प्रभृतींनीं ॲन्टीगोनसविरुद्ध युद्धाचें निशाण उभारलें. ॲन्टीगोनसचा मुलगा डेमेट्रिसस यानें कॅसॅन्डरचा पराभव करून ग्रीसचा कांहीं मुलूख जिंकून घेतला. अशा रीतीनें युद्धांत विजयी झाल्यामुळें ॲन्टीगोनसनें आपल्यास राजा ही पदवी लावून घेतली. इकडे सेल्यूकस, लिसिमॅकस, कॅसॅन्डर यांनीं ॲन्टीगोनसचा नक्षा उतरविण्याची पुनः तयारी चालविली. इप्सस येथें उभय सैन्याची गांठ पडून लढाई झाली. तींत ॲन्टीगोनस मारला गेला. मरणसमयीं त्याचें वय ८१ वर्षांचें होतें.

**अँटीपोड बेटें**—हा बेटांचा समूह दक्षिण पॅसिफिक महासागरांत असून तेथें मनुष्यवस्ती नाहीं. न्यूझीलंड बेटापासून सुमारें ४६० मैल अंतरावर हीं बेटें आहेत. ग्रीनिचच्या अगदीं विरुद्ध टोंकाला ही बेटें असल्यामुळें त्यांना हें नांव पडलें आहे. येथील एक बेट १३०० फूट उंचीचें आहे आणि गवतानें आच्छादलेलें आहे. वादळांत सांपडून कोणी प्रवासी या प्रदेशाकडे गेल्यास त्यांना राहण्याकरतां येथें झोपड्या बांधून ठेवलेल्या आहेत.

**अँटोनिनस पायस** (इ. स. ८६-१६१)—एक रोमचा बादशहा. हा रोमचा कॉन्सल ऑरेलियस फुल्वसचा मुलगा असून तो लॅनुव्हियमनजीक एका शहरांत जन्मास आला. बापाच्या मरणानंतर त्याचा आजा ॲरिथिस अँटोनिनस यानें त्याचें संगोपन केलें. पुढें मोठा झाल्यावर त्याला क्वेस्टॉर (एक अधिकाराची जागा) करण्यांत आलें. कांहीं काळानंतर तो प्रीटरच्या हुद्यापर्यंत चढला. या दोन्ही जागांवर असतांना त्यानें आपलें काम चोख बजावल्यामुळें त्याला १२० सालीं कॉन्सलची जागा देण्यांत आली. येथेंहि त्यानें आपलें काम उत्कृष्ट रीतीनें पार पाडल्यामुळें त्याला आशियाचा गव्हर्नर नेमण्यांत आलें. हॅड्रियन बादशहाची त्याच्यावर बहाल मर्जी असे. त्यामुळें

आपल्या एकुलत्या एका मुलाच्या मरणानंतर त्यानें १३८ मध्यें अँटोनिनस याला आपल्या मांडीवर घेऊन आपल्या पश्चात् त्याला राज्यपद देण्याचें ठरविलें. अँटोनिनसनें त्याच्या पश्चात् आपल्या मेहुण्याचा मुलगा व आपला नातू यांना दत्तक घ्यावें अशी अट मात्र हॅड्रियननें घातली होती. हॅड्रियनच्या मरणानंतर अँटोनिनस हा गादीवर आला. त्यानें रोमचा कारभार फार चांगल्या तऱ्हेनें चालविला. आपल्या खाजगी खर्चांत शक्य तों काटकसर करून गरीब, गांजलेल्या लोकांना तो मदत करीत असे. ख्रिश्चन लोकांचा छळ न करतां उलट त्यांचें त्यानें संरक्षण केलें. त्याच्या कारकीर्दीत त्याच्याविरुद्ध बारीकसारीक कट झाले. पण कटवाल्यांना जबर शिक्षा न करतां त्यांना त्यानें सोडून दिलें. त्यानें मोठमोठ्या कायदेपंडितांना राजाश्रय दिला. त्यामुळें कायदेशास्त्रावर चांगलीं चांगलीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं. मोठमोठीं देवळें, नाटकगृहें, थडगीं बांधवून त्यानें कलाकौशल्याला चांगलें उत्तेजन दिलें. आपल्या बापाला—हॅड्रियनला—देवत्वाचा मान देण्याबद्दल त्यानें 'सीनेट' मधील लोकांचीं मनें वळविलीं व हॅड्रियनला देवत्वाचा मान देण्यांत आला. या त्याच्या पितृभक्तीबद्दल त्याला 'पायस' ही पदवी प्राप्त झाली.

कौटुंबिक बाबतींत मात्र तो विशेष सुखी नव्हता. त्याची बायको फॉस्टीन ही जहांबाज होती व ती याला फार त्रास देत असे. पण त्याची मात्र तिच्यावर फार प्रीति होती. तिच्या मरणोत्तर तिच्या स्मरणार्थ त्यानें 'अनाथबालिका-गृह' स्थापिलें. त्याला फॉस्टिनापासून ४ अपत्यें झालीं; पण एका मुलीखेरीज सर्व लहानपणींच वारलीं. तो १६१ मध्यें लोरियम येथें मरण पावला.

**अँटोनियस (मार्कस)–मार्क अँटनी** (ख्रि. पू. ८३–३०)—हा प्रसिद्ध वक्ता अँटोनियस याचा नातू असून अँटोनियस क्रेटीकस याचा मुलगा होय. याचें ज्यूलियस सीझरशीं आईच्या बाजूनें जवळचें नातें होतें. ख्रि. पू. ५४ मध्यें तो सीझरबरोबर गॉलच्या स्वारींत होता. सीझरची त्याच्यावर मर्जी असल्यामुळें त्याला क्वेस्टार, ऑगर, ट्रायब्यून, इ. अधिकाराच्या जागा मिळाल्या. या जागांवर काम करीत असतांना त्यानें सीझरची इमानेंइतबारें सेवा केली. स्पेनवर स्वारी करण्याकरितां सीझर गेला असतां त्याच्या गैरहजेरींत अँटनी हा इटलीचा नायब सुभेदार होता. सीझरच्या खालोखाल इटलीवर त्याचीच सत्ता होती व ह्या सत्तेच्या जोरावर त्यानें अनन्वित कृत्यें केलीं. ख्रि. पू. ४४ मध्यें लुपरकॅलियाच्या उत्सवाच्या दिवशीं सीझरच्या डोक्यावर त्यानें स्वतःच्या हातानें राजमुकुट ठेवला. पुढें सीझरच्या वधानंतर त्यानें सीझरचा खून करणाऱ्या लोकांविरुद्ध वक्तृत्वपूर्ण भाषण केलें. त्यामुळें लोक याच्या पक्षाचे झाल्यामुळें बंडखोरांना पळ काढावा लागला. पुढें सीझरच्या शरीररक्षकांच्या साहाय्यानें त्यानें सीनेटमध्यें जाऊन गॉल प्रांत आपल्या ताब्यांत देण्याविषयीं सीनेटच्या सभासदांना धमक्या दिल्या; पण त्या प्रांताचा सुभेदार डेसीमस ब्रूटस यानें तो प्रांत ताब्यांत देण्याचें नाकारलें; त्यामुळें चिडून तो ब्रूटसवर स्वारी करण्याकरितां निघाला. इतक्यांत सीझरचा मानलेला मुलगा ऑक्टेव्हियन हा रोममध्यें आला. त्याचा हक्क सीनेट व सिसरो यांनीं मान्य केल्यामुळें त्याच्या पक्षास पुष्कळ मिळाले. इकडे ब्रूटसच्या सैन्याला अँटनीनें वेढा दिला होता. त्या जागीं ऑक्टेव्हियन हा अँटनीवर चाल करून गेला. म्युटिना येथें त्यानें अँटनीचा पूर्णपणें पराभव केला. तेव्हां अँटनी गॉलमध्यें पळून गेला. तेथें त्यानें लेपीडसच्या साहाय्यानें मोठें सैन्य जमविलें व तो रोमवर चाल करून निघाला. ही बातमी ऑक्टेव्हियनला समजतांच त्यानें अँटनी व लेपीडस यांजबरोबर सामोपचाराचें बोलणें सुरू केलें. त्या तिघांमध्यें वाटाघाटी होऊन तिघांनीं मिळून इटलीचा राज्यकारभार करावयाचा असें ठरविलें. त्याप्रमाणें गॉलची व्यवस्था पाहण्याचें काम अँटनीकडे आलें. या त्रिकूटांच्या अमदानींत जुलूमजबरदस्ती यांना ऊत येऊन सुलतानशाही नांदूं लागली. सिसरोसारखा कसलेला मुत्सद्दी व सुप्रसिद्ध वक्ता अँटनीच्या रोषाला बळी पडला. ख्रि. पू. ४२ व्या वर्षीं अँटनी व ऑक्टेव्हियन यांनीं बंडवाल्यांवर स्वारी केली व फिलिपी येथील दोन लढायांत ब्रूटस व कॅशस यांचा पराभव केला. नंतर अँटनी हा आशियामायनरकडे पूर्वेकडील प्रांत जिंकण्यासाठीं निघाला. सायलेशिया येथें क्लिओपाट्रा नांवाच्या एका सुंदर तरुणीनें त्याचें मन आकर्षण करून घेतलें. पर्शियन लोकांचा पराभव करण्याचा त्यानें पुष्कळदां प्रयत्न केला; पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. ख्रि. पू. ३९ मध्यें तो अथेन्स येथें आला. तेथें असतांना त्यानें 'आपण देव आहों' असें लोकांना भासविण्यास सुरवात केली. सीरियामध्यें असतांना त्यानें क्लिओपाट्राशीं आपला संबंध चालू ठेवला. अँटनीचें हें वर्तन पसंत न पडून सीनेटनें त्याला पदभ्रष्ट केलें, व त्याच्या व क्लिओपाट्राविरुद्ध युद्ध पुकारलें. ॲक्टियम येथें जी लढाई झाली तींत अँटनीचा पराभव झाला. त्याच्या अगोदरच क्लिओपाट्रा ही ईजिप्तमध्यें पळून गेली होती. तिच्याकडेच जाण्याकरितां अँटनी हा निघाला. त्याच्यामागून शत्रुसैन्य पाठलाग करीतच होतें. आपल्याप्रमाणेंच क्लिओपाट्राच्या पाठीस सैन्य लागलें असेल व क्लिओपाट्रानें जीव दिला असेल अशा समजुतीनें त्यानेंहि वाटेंत आत्महत्या करून घेतली. अँटनीला तीन-चार बायका असून त्यांच्यापासून त्याला पुष्कळ मुलें झालीं होतीं.

**अँटोफागास्टा**—द. अमेरिका, चिली देश, मोरेना उपसागरावर हें बंदर आहे. प्रांताचें क्षेत्रफळ ४७५०२ चौ. मै.

लो. सं. १४५१४७ आहे. या बंदरांतून मुख्यतः खनिज द्रव्यांची निर्यात होते. चांदी, तांबें आणि खत हीं येथून मुख्यत्वें निर्यात होतात. हें बंदर बोलिव्हिया आणि चिली यांच्या आंतरभागाशीं लोहमार्गांनीं जोडलेलें आहे. लो. सं. ५११०७ (१९४७).

**अठरा आखाडे**—आखाडा म्हणजे पंथ. गोसाव्यांचे अठरा आखाडे: अघोरी, अरण्य, अवधूत, आनंद, आश्रम, इंद्र, उदासी, कानफाट्या, कालवेला, गोदंड, गोरखनाथी किंवा पंथी, डवरा, नंगागिरी, निरंजनी, निर्वाणी, पुरी, भारती, राऊळ, वन, सरभंगी, पर्वत, सागर, तीर्थ, भराडी इ. आणखीहि नांवें आहेत.

**अठरा कारखाने**—कारखाना म्हणजे मोठें खातें. यांचे तीन प्रकार आहेत ते असे ( मोल्स्वर्थ व कँडी ): (१) उष्टर, कबुतर, जनान, जवाहीर, जामदार, जिकीर, तालीम, तोफ, थट्टी, दप्तर, दारू, दिवाण, नगार, पील, फरास, बंदी, मोदी, शिकार. (२) तोफ, पील, उष्टर, फरास, शिकार, रथ, जामदार, जवाहीर, जिराईत, नगार, दारू, वैद्य, लकड, इमारती, मुदबख, कुणबिणी, खाजगत, थट्टी. (३) खजिना, दफ्तर, जामदार, पील, जिराईत, अंबर, फरास, मुदबख, नगार, सरबत, आबदार, शिकार, तालीम, दारू, उष्टर, बकरे, तोप, तराफ.

शिवाजी महाराजांनीं अठरा शाळा स्थापल्या त्या:— गजशाला, मल्लशाला, धान्यसंग्रह, भेरिदुंदुभी, यंत्रशाला, वैद्यशाला, पानीयशाला, उष्ट्रशाला, शिबिरशाला, खटकशाला, रत्नशाला, पाकशाला, शस्त्रशाला, तांबूलशाला, रथशाला, लेखनशाला, नाटकशाला, (वस्तुशाला) जिनसखाना.

पेशवे सरकारचे अठरा कारखाने व त्यावरील अधिकारी:— १ तोफखाना–सखारामपंत पानशे, २ पीलखाना–रामचंद्रपंत गाडगीळ, ३ उष्टरखाना–गणपत मोरेश्वर, ४ शिलेखाना–सदाशिवपंत वाकणकर, ५ फरासखाना–राघोपंत अंबीकर, ६ कोठी, ७ लकडखाना, ८ इमारत, ९ बागा, १० कुरणें, ११ वहीतकोठी, १२ रथखाना, १३ पुणें पेठा–नारो शिवराम खाजगीवाले, १४ थट्टी–नारायण रामचंद्र, १५ पोतें व जामदारखाना–शामराव कृष्ण पोतनीस, १६ जिन्नसशाळा व वैद्यशाळा–शामराव बापूराव करमरकर, १७ पुस्तकशाळा–गोविंदपंत आपटे, १८ खासगी–नारो शिवराम खासगीवाले.

**अठरा टोपकर**— फिरंगी (पोर्तुगाल), वलंदेज (हॉलंड), सुवेस (स्विस), निविशयान (नॉर्वे ?), यप्रदोर (?), ग्रेग (ग्रीक), रवतार (?), लतियान (लॅटीन), यहुदीन (ज्यू), इंगरेज (इंग्लिश), फरासीस (फ्रेंच), कसनत्यान (शेटलँडियन ? सेल्टिक ?), विनेज (व्हेनेशियन्स), दिनमार्क (डेन्मार्क), उरुस (आयरिश अगर रशियन), रुमियान (रोमन अगर रुमानियन), तलियान (इटली), प्रेमरयान (पोमरॅनियन्स). [भा. इ. सं. मं. इतिवृत्त, १८३५].

**अठरा धान्यें व उपधान्यें**—(अ) धान्यें–गहूं, साळ, तूर, जव, जोंधळा, वाटाणा, लाख चणा, जवस, मसूर, मूग, राळा, तीळ, हरीक, कुळीथ, सावा, उडीद, व चवळी. (आ) उपधान्यें–१ सजगुरा, २ वरी, ३ नाचणी, ४ मका, ५ राजगिरा, ६ मटकी, ७ देवभात, ८ अंबाडी, ९ भादली, १० वरग, ११ कांग, १२ खपले गहूं, १३ करडई, १४ पावटा, १५ मूग, १६ वाल, १७ कारळा, १८ सातू. दुसरी यादी ९ ते १८ बद्दल अशी: ९ शिरस, १० पांढरफळी, ११ जिरें, १२ मेथी, १३ वेणुबीज, १४ कमळबीज, १५ पाकंड, १६ भेंडीबीज, १७ गोवारी, १८ कुड्याचें बीं.

**अठरापगड जात**—तांबट, पाथरवट, लोहार, सुतार, सोनार, कासार, कुंभार, गुरव, धनगर, गवळी, वाणी, जैन, कोष्टी, साळी, चितारी, माळी, तेली, व रंगारी.

**अठरा पर्वें**—आदि, सभा, वन, विराट, उद्योग, भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य, सौप्तिक, स्त्री, शांति, अनुशासन, अश्वमेध, आश्रमवासी, मौसल, महाप्रस्थानक व स्वर्गारोहण. हीं महाभारताचीं अठरा पर्वें आहेत.

**अठरा पुराणें**— १ ब्राह्म, २ पाद्म, ३ वैष्णव, ४ शैव किंवा वायु, ५ भागवत, ६ भविष्य, ७ नारद, ८ मार्कंडेय, ९ अग्नि, १० ब्रह्मवैवर्त, ११ लिंग, १२ वराह, १३ स्कंद, १४ वामन, १५ कूर्म, १६ मत्स्य, १७ गरुड, १८ ब्रह्मांड. उपपुराणें– १ सनत्कुमार, २ नृसिंह, ३ नंदी, ४ दुर्वास, ५ नारद, ६ कपिल, ७ मानव, ८ उशनस्, ९ वारुण, १० काली, ११ वासिष्ठलिंग, १२ माहेश्वर, १३ सांब, १४ सौर, १५ पाराशर, १६ शिव (धर्म) १७ मारिच, १८ भागवत (भार्गव).

**अडगांव**—वऱ्हाड, जिल्हा अकोला, तालुका अकोटमधील गांव. लोकसंख्या ३०००. येथील विस्तीर्ण मैदानावर १८०३ सालीं जनरल वेल्स्ली यानें भोसल्यांवर जय संपादून गाविलगड किल्ला घेतला.

**अडगांवची लढाई**— ही लढाई २९ नोव्हेंबर १८०३ रोजीं एका बाजूस इंग्रज आणि दुसऱ्या बाजूस नागपूरकर भोसले व शिंदे यांच्या फौजा यांच्या दरम्यान झाली. अडगांवची लढाई होण्यापूर्वी रघूजी भोसल्याच्या सैन्याची छावणी गाविलगडानजीक अडगांव येथें पडली असून शिंद्यांची फौज त्यांच्या छावणीपासून पांच मैलांच्या आंत सिरसोली येथें होती. रघूजीच्या सैन्याचें आधिपत्य त्याचा भाऊ वेंकाजी याजकडे असून त्याजवळ रघूजीचें सर्व पायदळ कांहीं फौज व चऱ्याचशा तोफा होत्या. स्टीव्हन्सन यास जनरल वेल्स्लीचा गाविलगडास वेढा देण्याचा

हुकूम झाला असल्यामुळें तो तेथून जवळच येऊन पोहोंचला असून वेल्स्ली हा त्याला मदत करण्याकरितां दक्षिणेकडून येत होता. ता. २३ नोव्हेंबर रोजीं शिंद्याच्या वकिलानें वेल्स्लीशीं युद्धतहकुबीचा तह केला. परंतु भोसल्यानें अद्याप इंग्रजांकडे आपला वकील पाठविला नसल्यामुळें स्टीव्हन्सन हा भोसल्यांशीं लढाई देण्याच्या तयारींत होता. शिंद्यांच्या वकिलानें इंग्रजांनीं भोसल्यांशीं लढाई करूं नये म्हणून वेल्स्लीपाशीं पुष्कळ रदबदली केली, पण वेल्स्लीनें सांगितलें कीं, युद्धतहकुबीचा ठराव भोसल्यांशीं झाला नसून तो तुमच्याशीं झाला आहे, एवढेंच नव्हे तर तुम्हीं कबूल केलेल्या सर्व अटी पूर्ण केल्याशिवाय तुमच्याशीं चाललेलें युद्ध देखील तहकूब झालें असें समजण्यांत येणार नाहीं. स्टीव्हन्सनच्या अपेक्षेप्रमाणें त्याला वेल्स्ली येऊन मिळाल्यावर ते दोघेहि मराठ्यांच्या पाठलागास निघाले. दिवसभर प्रवास करून वेल्स्ली हा आपल्या मुक्कामाच्या ठिकाणीं आला. तेव्हां शत्रुपक्षाची थोडीशी चिनीची फौज पुढें आलेली त्याच्या दृष्टीस पडली. त्या दिवशीं त्यानें बरीच मजल केली असल्यानें तिचा पाठलाग करण्याच्या भानगडींत न पडतां त्यानें म्हैसूरच्या फौजेस तिच्या तोंडावर पाठवून तो छावणी देण्याच्या तयारीस लागला. परंतु मराठयांची आणखी बरीच फौज मागून आल्यामुळें म्हैसूरच्या फौजेच्या मदतीस जाणें अवश्य झालें. वेल्स्ली थोडी फौज घेऊन पुढें जातो तोंच त्याच्या दृष्टीस पडलें कीं, अडगांवच्या पुढील विस्तीर्ण मैदानांत मराठ्यांचें सैन्य फरा धरून उभें राहिलें आहे. हें पाहून तो लागलीच आपलें सैन्य घेऊन शत्रूवर हल्ला करण्याकरितां निघाला. शत्रूच्या जवळ येऊन पोंहचतांच त्यानें आपल्या सैन्याच्या दोन रांगा करून पुढें पायदळ व मागें फौज अशी मांडणी केली. रांगा बनवीत असतां इंग्रजांच्या सैन्यांत जरा घोंटाळा उडाला तो पाहून मराठ्यांनीं त्यांच्यावर तोफा रोखून त्यांना सरबत्ती दिली; परंतु रांगा तयार होतांच इंग्रजांचें सैन्य व्यवस्थित रीतीनें व धीमेपणानें पुढें जाऊं लागलें. तें पाहून मराठ्यांच्या सैन्यांतून एक पांचशें पायदळाची तुकडी इंग्रजांच्या ७४ व्या व ७८ व्या पलटणीवर मोठ्या त्वेषानें चालून आली, व इकडे शिंद्याच्या फौजेनेंहि याच वेळीं त्यांच्या पहिल्या पलटणीवर व मद्रासी शिपायांच्या सहाव्या रेजिमेंटावर हल्ला केला. शत्रूवर चालून आलेल्या मराठ्यांच्या पायदळाच्या तुकडींतील तर ५०० च्या ५०० लोक ठार झाले. शिंद्यांच्या फौजेनें केलेला हल्ला परतवून लावण्यांत आला. व तिजवरील अमलदार गोपाळराव भाऊ हा जखमी झाला. त्यामुळें मराठ्यांच्या सैन्यांत गोंधळ उडून तें मागें परतलें, व इंग्रजांची म्हैसूरकरांची व निजामाची फौज त्यांचा पाठलाग करीत त्यांच्यामागें गेली. या लढाईंत ब्रिटिश सैन्यांतील ठार, जखमी व चुकलेल्या माणसांची संख्या ३४६ होती. मराठ्यांच्या सैन्यांत किती प्राणहानि झाली याचा कोठें उल्लेख नाहीं, पण ती बरीच असावी असा ग्रांट डफ अंदाज करतो.

**अडत्या**—कोणत्याहि व्यापारांत, देवघेवीचीं कामें, तयार माल किंवा कोठारांत सांठविलेला माल खपविणें, किंवा इतर व्यवहारांत आपल्यातर्फे अगर वतीनें तिऱ्हाइताशीं व्यवहार करणें, याकरितां जो मध्यस्थ माणूस असतो त्यास अडत्या, गुमास्ता किंवा दलाल म्हणतात. कायद्याच्या भाषेंत गुमास्ता म्हणजे दुसऱ्या मनुष्याकरितां कांहींतरी कृत्य करण्याला अथवा तिसऱ्या मनुष्याशीं असलेल्या देवघेवींत दुसऱ्या माणसाऐवजीं प्रतिनिधीदाखल वागण्याला नेमलेला जो मनुष्य तो होय. करारांत गुमास्त्याचें नांव असतें, पण तो ज्याच्याकरितां काम करतो त्यास मुख्य किंवा मालक म्हणून समजावें.

व्यापारी दलालांचे अनेक प्रकार असतात. पाठविलेला किंवा ताब्यांत दिलेला माल दलाली घेऊन विकणें हें अडत्याचें काम. तो मालकाकरितां माल विकत घेऊन मालकाकडे पोंचवताहि करतो. अडत्या एका कामाकरितां किंवा अनेक कामांकरितां मुखत्यारपत्र देऊन नेमतां येतो व त्याची नेमणूक कांहीं विवक्षित कालापर्यंत किंवा मालक मुखत्यारनामा रद्द करीपर्यंत असते. अडत्या दलाल नव्हे.

मुंबईस बाहेरच्या गांवच्या लोकांची पत अपरिचित असल्यामुळें तेथें अडत्यांमार्फत व्यवहार चालतो. हे अडते पेढीवाले आहेत. हे आपल्या जबाबदारीवर माल खरीदतात व बाहेरगांवीं पाठवितात, व शेंकडा १ रु. कमिशन घेतात. शिवाय रकमेवर व्याज, धर्मादाय शेंकडा चार ते आठ आणे घेतात. धर्मादायावर कोणतीहि देखरेख नाहीं. मुंबईस महाराष्ट्रीय अडत्यांची असोसिएशन आहे, पण त्यांत सर्व पेढ्या नाहींत. परदेशाशीं व्यापार करणारे अडते निराळे असतात.

**ॲडमिरल**—हा शब्द मूळ अरबी 'अल् अमीर'पासून बनला आहे. याचा अर्थ (१) आरमाराच्या एका पथकाचा मुख्य, (२) सर्व आरमाराचा प्रमुख, किंवा (३) एक उच्च दर्जाचा नाविक अधिकारी, असा कोणताहि लागतो. ब्रिटिश आरमारी दलांत ॲडमिरल ऑफ दि फ्लीट, ॲडमिरल, व्हाइस ॲडमिरल आणि रिअर ॲडमिरल असे चार दर्जे ॲडमिरलचे केले आहेत व हल्लीं सर्व जहाजांवर एकच सेंट जॉर्जचें चिन्हांकित निशाण लावलेलें असतें.

**ॲडमिरॅल्टी बेटें**—न्यूगिनीचे उत्तरेस सुमारें ४० बेटांचा समूह. यांपैकीं मॅनस हें मोठें बेट ६० मैल लांब असून अत्युच्च शिखर ३००० फूट आहे. १६१६ त हीं डचांनीं शोधलीं. रहिवासी पाप्युअन वळणाचे, परंतु मिश्र असून नरमांसभक्षक

आहेत. यांची संख्या १९४० त १३४५० होती. या बेटांत नारळीचीं पुष्कळ झाडें आहेत. मच्छीमारीला उत्कृष्ट ठिकाण आहे. मोत्यांचे शिंपलेहि सांपडतात. १९१४ पर्यंत हीं बेटें जर्मनीचीं होतीं. नंतर ब्रिटिशांकडे आलीं.

**अँडलम**— हें कानानिंदिश शहर असून ज्युडाच्या जातीनें व्यापलेल्या भागांत आहे. हेंच कदाचित् ऐ. डेकल्मा शहर असावें येथें एक किल्ला आहे. दुःखानें गांजलेले, कर्जबाजारी व जीवितास कंटाळलेले अशा लोकांचें आश्रयस्थान असें अँडलमचें वर्णन सर वॉल्टर स्कॉट करतो.

**अँडलर फेलीक्स** ( १८५१–१९३३ )—एक अमेरिकन शिक्षणशास्त्रज्ञ. जन्म १८५१ त अलझे ( जर्मनी ) गांवीं. प्राच्य वाङ्मयाचा अध्यापक कार्नेल विश्वविद्यालयांत ( १८७४ ). न्यूयॉर्क येथें नीतिशिक्षण संस्थेकरितां बरेच श्रम केले ( १८७६ ). कोलंबिया विश्वविद्यालयांत राजकीय व सामाजिक नीतिशास्त्राचा प्रमुख अध्यापक ( १९०२ ). यानें लोकोपयोगी व सामाजिक सुधारणेसाठीं मोठी चळवळ केली. धर्म व कर्म, मुलांचें नीतिशिक्षण, आयुष्य व संचित, विवाह व घटस्फोट, कर्तव्य, धर्म. इ. विषयांवर त्यानें पुस्तकें लिहिलीं.

**अडस**— मध्यप्रांत, जिल्हा नागपूर. लोकसंख्या ३००. खेडें असून येथें ५ देवळें आहेत. ब्राह्मणवस्ती बरीच. गणपतीची मूर्ति एकाच दगडाची असून टेंकडीवर महादेवाचीं तीन स्वयंभू लिंगें आहेत. नोव्हेंबर व जानेवारी महिन्यांत जत्रा भरते. देवळास इनाम जमिनी असून त्या एका पुजारी गोसाव्याचे ताब्यांत आहेत.

**अडाणा**— हा राग आसावरी थाटांतून उत्पन्न होतो. ह्याच्या आरोहांत गांधार व अवरोहांत धैवत वर्ज्य आहे. ह्यामुळें ह्याची जाति षाडव–षाडव आहे. ह्याचा वादी स्वर तार षड्ज व संवादी पंचम आहे. ह्याचा गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर मानितात. अवरोहांत गांधार वक्र होतो. कानडा व मेघ ह्या रागांचें मिश्रण ह्यांत दृष्टीस पडतें. ह्याचें चलन सारंगांगाचें आहे. हा कानड्याचा एक प्रकार आहे.

**अँडाम्स जॉन** ( १७३५–१८२६ ) — अमेरिकेचा दुसरा अध्यक्ष. १७५५ त हार्वर्ड कॉलेजमधून पदवीधर झाला. १७६८ सालीं इंग्लंडांत पास झालेला 'स्टँप अॅक्ट' तेथील पार्लमेंटांत आपले प्रतिनिधि नसल्यामुळें गैरलागू आहे, असें प्रतिपादन केलें. अमेरिकेचें स्वातंत्र्य जाहीर करणाऱ्यांपैकीं एक. तिसऱ्या जॉर्जच्या दरबारीं अमेरिकेचा वकील असून ब्रिटिशांशीं व्यापारी तह करण्याची यानें बरीच खटपट केली. १७९६ त अध्यक्ष निवडला गेला. स्वभाव तापट, साहसी व आवेशी. स्वतःच्या मताबद्दल फाजील अभिमान, हेकेखोरपणा व भांडखोरपणा यामुळें पुढें अप्रिय झाला.

**अँडाम्स, जॉन क्विन्सी** ( १७६७–१८४८ ) — अमेरिकन संयुक्त संस्थानांचा सहावा अध्यक्ष. अध्यक्ष जॉन अॅडाम्सचा हा वडील मुलगा. १७८७ त हार्वर्ड विद्यालयाचा पदवीधर. थॉमस पेनच्या 'मनुष्याचे हक्क' या पुस्तकाचें खंडन यानें केलें. पोर्तुगाल, बर्लिन व रशिया येथें अमेरिकेचा वकील म्हणून होता. १८०३ मध्यें काँग्रेसचा सभासद असून प्रथम फेडरेलिस्ट व मग रिपब्लिकन झाला. १८०६–०९ हार्वर्ड कॉलेजांत अध्यापक. १८१८ त मनरोचा चिटणीस असून मनरो तत्त्वाचा जनक. १८२६ त अमेरिकेचा अध्यक्ष. गुलामगिरी व लेखनस्वातंत्र्यावरील निर्बंध नाहींसे केले. बुद्धि विशाल असून लोकांविषयीं खरी कळकळ याच्यामध्यें होती.

**अँडाम्स, हेनरी कार्टर** (१८५२–)— एक अमेरिकन अर्थशास्त्रज्ञ. उच्च शिक्षणानंतर जॉन हापकीन्स विश्वविद्यालयांत फेलो व लेक्चरर. कार्नेल विश्वविद्यालयांत लेक्चरर व मिचिगान विश्वविद्यालयांत अर्थशास्त्र व आयशास्त्र या विषयांचा अध्यापक. यानें अर्थशास्त्रासंबंधीं पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत.

**अडावद**— मुंबई, खानदेश, चोपड्याच्या पूर्वेस १२ मैलांवरील गांव. लोकसंख्या ५०००. पूर्वीं हें महत्त्वाचें व महालाचें ठाणें होतें. पडकी गढी असून कचेरींत शाळा भरते. लालबागेंत गुजराथ्यानें बांधलेली जुनी विहीर असून फारसी लेख असलेली जुनी मशीद आहे. वायव्येस तीन मैलांवर उनबदेव नांवाचें उन्हाळें आहे.

**अंडाशय**— स्त्रीजातीच्या प्राण्याच्या जननेंद्रियामध्यें ज्या ठिकाणीं गर्भ किंवा अंडीं यांची स्थापना होते त्या अत्यंत महत्त्वाच्या भागास अंडाशय असें म्हणतात. हे अंडाशय गर्भाशयाच्या दोन्ही बाजूंस एकेक असे असतात, व ते त्याच्या मागील बाजूस दोन बारीक रज्जूंनीं बद्ध केलेले असतात. प्रत्येक अंडाशय दीड इंच लांब असतो. या अंडाशयाचें कार्य म्हणजे गर्भांड तयार करून त्यांचें पोषण करणें व योग्य कालीं त्यांचा स्राव करणें हें आहे. तसेंच याचें कांहीं विशिष्ट स्राव करण्याचें दुय्यम कार्यहि असतें. अंडाशयांत व्रण, गळू वगैरे रोग होण्याचा संभव असतो.

**अँडिस अबाबा**— अबिसिनियाची राजधानी. ८,००० फूट उंचीवर आहे. भोंवतालचा प्रदेश गवताळ. हें शहर म्हणजे एक छावणीच. मोठ्या इमारती नाहींत. व्यापार हिंदु व आर्मेनियन लोकांच्या हातांत. १८९२ त दुसऱ्या मेनेलेकनें हें शहर स्थापलें. जिबुटी बंदरापासून येथें आगगाडीचा फांटा गेला आहे. लो. सं. दीड लाख आहे.

**ॲडिसन, जोसेफ** (१६७२-१७१९)—प्रसिद्ध इंग्रज कवि व निबंधकार. क्वीन्स कॉलेज, ऑक्सफर्ड येथें शिक्षण. लॅटिन काव्याबद्दल 'डेमि' शिष्यवृत्ति मिळविली होती. पहिले सर्व लेख लॅटिनमध्यें व कवितावद्ध होते. मँटेग्यू व सॉमर्स यांच्या परिचयानें ४५०० रु. पगारावर नेमणूक. परंतु १७०२ मध्यें व्हिग पक्षाची सत्ता गेल्यावर नोकरी गेली. युरोप खंडांत असतांना 'केटो', 'पदकांविपयीं संवाद' व 'इटलीमधील कांहीं भागावर विचार' हे लेख लिहिले. त्यांत चैतन्य व विनोद आहे. पण चिकित्सकबुद्धि व पुरातनवस्तुज्ञान दिसत नाहीं.

१७०४-१० पर्यंत सरकारी नोकरी. आपल्या लेखांनीं विद्वत्ता व सामर्थ्य लोकांच्या निदर्शनास आणल्यावर लोकांत राजदरबारीं हा मान्यता पावला. १७०४ मध्यें ड्यूक ऑफ मार्लबरोवर केलेली कविता लोकांस फार पसंत पडली. १७०६ त अंडर सेक्रेटरी व १७०७ त सेक्रेटरी झाला. १७०८ मध्यें पार्लमेंटांत प्रवेश. हीं सर्व कामें त्यानें नीट बजाविलीं व या अवधींत कांहीं राजकीय लेख लिहिले. स्वभावानें लाजाळू तरी सरळ वर्तन व उपकारक बुद्धि यांमुळें लोक याची कींव करीत.

१७१० त 'टॅटलर', १७११ त 'स्पेक्टेटर' व १७१३ त 'गार्डियन' या मासिकांत त्यानें विनोदपर, बोधपर व ज्ञानदायी लेख लिहिले. स्पेक्टेटरमधील लेख समाजाच्या वेडगळ चाली, मानवस्वभाववैचित्र व लोकांची बिघडलेली अभिरुचि यांवर असून त्यांत गोड शब्दांत टीका केलेली असे. त्यांत गहन तत्त्वज्ञानापेक्षां समाजसुधारणेकडेच जास्त लक्ष दिलें आहे.

'पीअरेज बिल' वर टीका केल्यामुळें त्याचा बाळमित्र स्टील, 'स्पेक्टेटर'चा संपादक याशीं व टिकेलचें इलियड पोपच्या इलियडपेक्षां चांगलें असें प्रतिपादल्यामुळें पोपशीं बेचनाव झाला. त्याची भाषा व लेखनशैली पुढील ग्रंथकारांस आदर्शभूत झाली.

**ॲडिसन रोग**—हा रोग सामान्यतः मध्यम वयाच्या माणसास होतो. हा मूत्राशयाच्या वरील बाजूस असलेल्या दोन ग्रंथीमध्यें उत्पन्न होतो. हा रोग झाला असतां अशक्तता येऊन पोटांत गुबारा धरतो, आणि शरिराचा व त्वचेचा रंग बदलतो. यावर दीर्घकाल उपचार केले तरी त्यांचा फारसा उपयोग होत नाहीं.

**अंडें**—मूलतः ही स्त्री-उत्पादक बीजपेशी आहे व पुरुष बीजपेशीशीं संभोग झाला असतां तीपासून गर्भ तयार होतो. तथापि व्यापक अर्थीं अंड (ओव्हम्) व त्याचे इतर भाग मिळून बनणाऱ्या उत्पादक वस्तूला ही संज्ञा लावतात. बलक (पांढरा व पिवळा), संरक्षक पटल आणि कवटी असे पक्ष्याच्या अंड्याचे भाग पडतात. चांगलें मोठें कोंबडीचें अंडें वजनाला सुमारें १००० ग्रेन भरतें. यांपैकीं पांढरा बलक ६००, पिवळा ३०० व कवटी १०० ग्रेन वजनाची असते. ब्रिटनसारख्या राष्ट्राचा अंड्यांचा व्यापार फार मोठा असून मुख्यतः डेन्मार्क, ऑस्ट्रिया, फ्रान्स, ईजिप्त, चीन वगैरे देशांतून ब्रिटनमध्यें आयात होतात.

**ॲंडीज**—हा दक्षिण अमेरिकेंतील मोठा पर्वत असून या पर्वताची रांग दक्षिण अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्याच्या बाजूनें उत्तर टोंकापासून दक्षिण टोंकापर्यंत पसरली आहे. स्थूलमानानें या पर्वताची लांबी ४४०० मैल असून कांहीं ठिकाणीं याची रुंदी १०० मैल आहे व उंची सर्वसाधारण १३,००० फूट आहे. एवढी लांब रांग जगांत दुसरी नाहीं. या पर्वताच्या रांगेमध्यें बरींच मोठमोठालीं शिखरें आहेत. या शिखरांची उंची सर्वांत कमी म्हणजे ६,५०० फूट आहे. माउंट गीकी व माउंट स्टोक्स यांची उंची अनुक्रमें ७५०० व ७१०० फूट आहे. या पर्वताचा अगदीं दक्षिण भाग बर्फाच्छादित असून या भागांत बरींच सरोवरें आहेत. या रांगेंतील शिखरें, विशेषतः उंच शिखरें, ज्वालामुखी आहेत.

ॲंडीज पर्वतामध्यें खनिज संपत्ति विपुल आहे. ३३°-३६° यांमधील रांगेंत, ज्युरासीक दगडाचे व खडूचे थर सांपडतात. अर्जेंटिनाच्या उत्तरेकडील पर्वताच्या रांगेंत स्फटिकाचे दगड असून त्याबरोबर रेताड दगड व वनस्पत्यवशेषांपासून झालेले दगड यांचीहि समृद्धि आहे. ॲंडीज पर्वताच्या मध्यभागांत ज्या ठिकाणीं टिटिकाकाचें सरोवर आहे त्याच्या आसपास आर्कियन व पॅलीओझोइक पाषाणांचे थर आढळतात. तसेंच या सरोवराच्या पश्चिम भागांत, तृतीय युगांतील ज्वालामुखी, दगडांचें व मेसोझोइक पाषाणांच्या थरांचें मिश्रण आढळून येतें. इक्वाडोर प्रांतांत कांहीं ठिकाणीं जेंबूर दगड आढळतात तर कांहीं ठिकाणीं मेसोझोइक पाषाणाचे थर आढळून येतात.

**ॲडीरॉनडॅक पर्वत**—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील ईशान्य न्यूयॉर्कमधील पर्वतसमूह. हा 'आपालाकियन' व्यूहांतील नसून 'लारेनशियन' डोंगरांतील आहे. शिखरें २०० असून त्यांची उंची २,००० ते ५,००० फूट आहे. हडसन आदिकरून नद्यांचें उगमस्थान असून 'कारन्याक' व 'प्लॅसिड' सारखीं मोठीं सरोवरें आहेत. देवदार व स्प्रूस झाडांचीं दाट जंगलें असून लोखंड व ग्रफाईट सांपडतें.

**ॲडीलेड**—दक्षिण ऑस्ट्रेलियाची राजधानी. शहरापासून सहा मैलांवर पूर्वेला सेंट व्हिन्सेंट आखातांवर हें बंदर आहे. टॅरेन्स नदीच्या दोन्ही तीरांवर हें शहर असल्यानें उत्तर व दक्षिण असे त्याचे दोन भाग पडतात. दक्षिण ऑस्ट्रेलियानें हें शहर व्यापारी केंद्र असून तेथून गहूं, कणीक, लोकर आणि तांबें यांची निर्यात होते. तसेंच येथें लोकरीच्या कापडाच्या,

गिरण्या आहेत. मेलबोर्न या शहराला हें शहर लोहमार्गानें जोडलें आहे. या ठिकाणीं विविध शिक्षणसंस्था व एक विद्यापीठ आहे. लो. सं. (१९४४) ३६६०००.

**अडुर**—मुंबई, धारवाड जिल्हा, हनगलच्या पूर्वेस दहा मैलांवरील खेडें. पूर्वेस कालेश्वर महादेवाचें देऊळ आहे. आसपास ४० शिलालेख असून कांहीं चालुक्य व कांहीं राष्ट्रकूट घराण्याच्या वेळचे आहेत.

**अडुळसा**—हिंदुस्थानांत सर्वत्र आढळणारी एक औषधी वनस्पति. संस्कृत नांव—वासक, वासा, अटरुष. उष्ण प्रदेशांत ४००० फूट उंचीपर्यंत होत असून याचीं बनें असतात व कुंपणाकरितांहि उपयोजितात.

औषधें, रंग व खतें यांकरितां उपयोगी आहे. कृमिनाशकहि आहे. जुना कफविकार, दमा, क्षय, श्वास यांवर याचा फार उपयोग होतो. लसूण, सतापाचा पाला व अडुळशाचीं बोंडें गळयांत बांधलीं असतां मुलास थंडीवारा बाधत नाहीं. कफदोषनाशक, कफसंस्रावी व वातशामक असल्यामुळें आर्यवैद्यकांत यास महत्त्वाचें स्थान आहे. यापासून पिवळा रंग तयार होतो व यापासून खतहि करतात. मौक्तिक भस्मास या वनस्पतीचा उपयोग होत असून बंदुकीच्या दारूसहि उपयोग होतो. अडुळशाचा अर्क व लेहहि करतात.

**अडेसर**—कच्छमधील वागडमध्यें रणावरील ३–४ हजार लोकसंख्येचें ठिकाण. धान्य व गूळ यांचा व्यापार चालतो. १८१६ त राव भारमलजीनें उडविलेल्या सरबत्तीची आठवण पडक्या भिंती देतात.

**अॅडोनीस**—याचा ग्रीक दंतकथेंत उल्लेख असून हा 'अफ्रोडीटी'चा फार आवडता होता. याच्या जन्मासंबंधानें निरनिराळ्या दंतकथा आहेत. सीरियाचा राजा थेईस यास त्याच्या मुलीपासून अफ्रोडीटीनें उद्भूत केलेल्या प्रेमानें पुत्र झाला हें समजतांच त्यानें तीस मारण्याचा हुकूम केला. पण देवाच्या मर्जीमुळें तिचें झाडांत रूपांतर होऊन १० महिन्यांनीं एक मूल झालें. अफ्रोडिटीच्या सांगण्यावरून पर्सिफोनीनें त्याचें जतन केलें. 'झ्यूस' नें वर्षाचा ⅓ भाग अॅडोनीसला देऊन ⅔ भाग त्यानें निमा अफ्रोडिटी व निमा पर्सिफोनीबरोबर काढावा असें ठरविलें. यास रानडुकरानें मारलें. पूर्वी अथेन्स वगैरे शहरीं या देवाच्या जत्रा भरत.

अॅडोनीस म्हणजे वनस्पतिचैतन्य. त्याचें जन्म–मरण हें हिंवाळा व वसंतऋतु यांवर रूपक होय.

'व्हीनस अँड अॅडोनीस' हें शेक्सपिअरचें काव्य व कीट्स कवि–निधनाबद्दल 'अॅडोनीस' हें शेलेचें शोकगीत आहे.

**अॅडोरा**—फ्रान्स आणि स्पेन यांच्या सरहद्दीवर आणि पूर्व पिरीनीज पर्वताच्या द्वीपकल्पाकडील भागांत हें एक लहानसें, तटस्थ, स्वयंशासित आणि अर्धस्वतंत्र असें राज्य आहे. याचें क्षेत्रफळ १९१ चौ. मैल आहे. याच्या सभोंवार डोंगर आहेत व मध्यें एक खोरें आहे.

येथील हवा थंड आहे. पण थंडीच्या दिवसांत ती अतिशय कडक असते. बहुतेक जमीन कुरणांनीं व्यापलेली आहे. कांहीं भागांत धान्य, बटाटे, फळें आणि तंबाखू यांची लागवड होते. स्थानिक धंदे फार जुन्या पद्धतीचे आहेत. डोंगरांत लोखंडाच्या आणि शिशाच्या खाणी आहेत. पण द्रव्य, कोळसा आणि नेआण करण्यास चांगले रस्ते नसल्यामुळें लोक खाणी खणण्याच्या भरीस पडत नाहींत.

येथील लोक सशक्त आणि बांधेसूद असून स्वतंत्र बाण्याचे, साधे पण वागणुकींत फार कडक असे आहेत. हे सर्व रोमन कॅथॉलिक पंथाचे आहेत. बहुतेक लोक स्पॅनिश भाषेची कॅटालन पोटभाषा बोलतात. सर्व कारभार चालविणारी २४ सभासदांची एक कौन्सिल जनरल नांवाची सभा आहे. तींतील सभासदांची निवडणूक सर्व कुटुंबांतील मुख्य पुरुष करतात. फ्रान्सनें नेमलेला एक आणि उरगेल येथील बिशपनें नेमलेला एक असे दोन अर्धवट लष्करी अधिकारी सरंजामी फौजेची व्यवस्था पाहतात. यांच्याकडेच फौजदारी न्यायाचें काम असतें. दिवाणी खटले चालविण्याचें काम यांनीं नेमलेल्या लवादाकडे असतें. या राज्यांतील लोकसंख्या सुमारें पांच हजार आहे.

**अड्वा**—अबिसीनियांतील टायग्रे प्रान्ताची राजधानी. धनधान्यादिकांनीं समृद्ध अशा प्रान्तांत असून मसावा ते मध्य अबिसीनिया या मार्गावर असल्यामुळें अरबी व सुदानी व्यापाऱ्यांचें स्थान. १८८७–९६ च्या इटली–अबिसीनिया लढाईंत या शहराचें फार नुकसान झालें, तथापि धर्मस्थानें बचावलीं. १८९६ त अबिसीनियानें इटलीचा अड्वाच्या लढाईंत पूर्ण मोड केला. लो. सं. ५०००.

**अड्यार**— मद्रास शहराजवळ सात मैलांवर हें थिऑसाफिकल सोसायटीचें जागतिक पीठ आहे. या ठिकाणीं अड्यार नदी बंगालच्या उपसागरास मिळते. या ठिकाणीं सुमारें ३०० एकराइतकें रमणीय उद्यान आहे. एक अत्यंत प्रचंड वृक्ष आहे. त्याच्याखालीं मोठाल्या सभा भरतात. कर्नल अल्काट या सोसायटीच्या पहिल्या अध्यक्षांनीं १८८२ त हें स्थान पसंत केलें. त्या वेळेपासून थिऑसफिस्ट लोकांचें हें तीर्थस्थान बनलें. संस्थेच्या अनेक इमारती व मोठें ग्रंथालय येथें आहे.

**अड्याळ**—मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. भंडाऱ्याच्या दक्षिणेस १४ मैलांवरील एक खेडेगांव. क्षेत्रफळ १३०० एकर.

लोकसंख्या ३ हजार. येथें एक स्वयंभू हनुमानाचें देऊळ असून जैनांच्या पारसनाथाची मूर्ति सांपडली आहे. ५१६ तलाव असून गोंड लोकांची वस्ती आहे.

**अॅड्रा बंदर**—स्पेनच्या दक्षिणेकडील अलमेरिया प्रांतांतील भूमध्य समुद्रावरील बंदर. शिसें, द्राक्षें वगैरे निर्गत. लोकसंख्या दहा हजार. युनायटेड किंग्डममधून कोळसा येतो. या ठिकाणीं संगमरवरी दगडांच्या खाणी आहेत.

**अॅड्रार**—आफ्रिका, पश्चिम सहारामधील सेनिगालच्या उत्तरेस ३०० मैलांवर असणारा प्रदेश. येथें फ्रेंचांचें प्रस्थ असून प्रदेश बहुतेक रुक्ष आहे. मधून ओलाव्याच्या जागा आहेत. लोकसंख्या १०,००० आहे. शिंगेटी, वादान व उजेफ्ट येथें दाट वस्ती असून शिंगेटी व्यापाराचें ठिकाण आहे. येथून सुवर्णरज, शहामृगाचीं पिसें आणि खजूर, हीं सेंट लुई बेटास जातात व मिठाचाहि व्यापार चालतो.

**ॲड्रिअन**—अमेरिका, संयुक्त संस्थानें, मिचिगानमधील लेनावी परगण्यांतील रायसीन नदीवरील शहर. लोकसंख्या ११ हजार. अॅड्रियन कॉलेज व मुलींकरितां औद्योगिक शाळा (स्था.१८५९) आहे. तारांचीं कुंपणें, कृषिविषयक हत्यारें व खेळणीं यांचे कारखाने असून व्यापार मोठा आहे. हेड्रियन या रोमन बादशहावरून नांव पडलें, असें म्हणतात.

**ॲड्रिआटिक समुद्र**—भूमध्य समुद्राचा एक भाग. इटली, ऑस्ट्रिया-हंगेरी, मांटेनिग्रो व आल्बेनिया यांच्या किनाऱ्यालगतचा प्रदेश यांत येतो. अॅड्रिआ गांवावरून हें नांव पडलें. याची लांबी ५०० मैल व रुंदी १०० मैल असून कांठीं व्हेनिस हें प्रसिद्ध शहर आहे. इटलीचा किनारा सखल व बाकीचा खडकाळ असून समुद्राची सरासरी खोली १३३ पुरुष आहे.

व्हेनिसखेरीज ब्रिंडिसी, ट्रीस्ट हीं प्रसिद्ध व्यापारी बंदरें आहेत.

**ॲड्रिआनोपल**—युरोपांतील तुर्कस्तानांतल्या ॲड्रिआनोपल प्रान्ताची राजधानी. लोकसंख्या ६८२७९. पैकीं निम्मे तुर्क व बाकीचे इतर. कॉन्स्टॅन्टिनोपल व सॅलोनिका यांच्या जोडीचें शहर. शहरास तटबंदी असून भोंवतीं आधुनिक पद्धतीचे किल्ले आहेत. हे तुंग नदीच्या तीरावर असून कॉन्स्टॅन्टिनोपल व सॅलोनिका यांस रेल्वेनें जोडलें आहे. शाळा, राजवाडे, अग्निबुरुज वगैरे आधुनिक व प्राचीन इमारती आहेत. मशीद फार मोठी आहे. यास ५ उपनगरें असून त्यांतील कॅरॅगॅच हें पाश्चात्य पद्धतीवर वसलेलें व सर्व सुखसोयींनीं समृद्ध आहे. इ. स. १८७७-७८ च्या युद्धानें या शहराचें आर्थिक नुकसान झालें व १८८५ पासून ३/४ व्यापार फिलिप्पोपोलिस शहरानें बळकावला. येथें रेशीम, कमावलेलीं कांतडीं, लोंकरीचें, तागाचें व सुताचें कापड होत असून, फळें, कच्चें रेशीम, कापूस, अफू, गुलाबपाणी, अत्तर हीं निर्गत होतात. हें शहर जुनें असून त्याचें मूळ नांव उस्कादम, उस्कूदाम अथवा उस्कोदाम होतें. हल्लीं तें तुर्कांच्या ताब्यांत आहे. या शहराचें राजकीय महत्त्व फार आहे. कॉकेशस आणि काळा समुद्र यांच्या आसमंतांत जाण्याचा इकडून मार्ग आहे.

**अँड्र्यूज, चार्लस फ्रिअर** (१८७१-१९४०)— यांचें शिक्षण बार्मिंगहॅम येथील किंग एडवर्ड स्कूल व केंब्रिज येथील पेंब्रोक कॉलेजमध्यें झालें व त्याच कॉलेजमध्यें ते १८९९ मध्यें प्राध्यापक झाले व पुढें तेथीलच वेस्कॉट हाउस कॉलेजचे ते व्हा. प्रिन्सिपॉल झाले (१९००–०४). तेथून ते दिल्ली येथील सेंट स्टीफन कॉलेजांत प्रोफेसर म्हणून आले. ते

पंजाब युनिव्हर्सिटीमध्यें १९०४–१३ पर्यंत फेलो व कांहीं काळ सिंडिक होते. यांनीं दक्षिण आफ्रिकेमध्यें महात्मा गांधींबरोबर सत्याग्रहामध्यें प्रत्यक्ष भाग घेतला होता. यांचें हिंदी लोकांवर फार प्रेम असून त्याबद्दल लोकांनीं त्यांस 'दीनबंधु' ही पदवी दिली आहे. हे बोलपुरास शांतिनिकेतनामध्यें प्रोफेसर होते. यांनीं कामगार व मजूर यांचा प्रश्न, ख्रिस्ती संप्रदाय व धर्म, वगैरे विषयांवर अनेक ग्रंथ रचले आहेत.

**अँड्रोमेडा**—एक तारकापुंज ( देवयानी, उत्तरा भाद्रपदा ). या नक्षत्राला लॅटिनमध्यें 'पर्सीया' ( शृंखलाबद्ध स्त्री ) असें नांव आहे.

अँड्रोमेडाच्या तारकापुंजामध्यें टॉलेमी व टायकोब्राहे यांच्या मतें २३ तारका आहेत तर हेवेलियसच्या मतें ४७ आहेत. त्यांतल्या त्यांत 'आल्फा अँड्रोमेडा' व 'बीटा अँड्रोमेडा' या तारका मोठ्या व तेजःपुंज आहेत. शास्त्रीयदृष्ट्या या तारकापुंजासंबंधीं पुढील गोष्टी महत्त्वाच्या आहेत. या तारकापुंजामधील तेजोमेघ फारच सुंदर आहे. 'गॅमा अँड्रोमेडा' हा तारा चकाकणारा तारा व नीलवर्ण तारा या दोहोंच्या संयोगामुळें बनलेलें तारकायुग्म ( बायनरी स्टार ) आहे. 'गॅमा अँड्रोमेडा' हा नियमानें परिवर्तन करणारा तारा आहे. हार्टविग यानें आणखी एक नवीन तारा या तारकापुंजामध्यें शोधून काढून त्याला 'नोव्हा अँड्रोमेडा' असें नांव दिलें आहे. अँड्रोमेडिड्स नांवाच्या उल्कासमूहाचा उल्कासंपातबिंदु ( रेडिअंट ) या तारकापुंजांत आहे. ग्रीक पुराणांत, अँड्रोमेडा ही एक राजकन्या असून वरुणदेवतेला संतुष्ट करण्यासाठीं तिला एका खडकाशीं बांधून ...

टाकलें होतें व पर्सीअसनें तिची सुटका केली व मृत्यूनंतर ती तारका झाली अशी कथा आहे.

**आणिमांडव्य**—मांडव्य ऋषीचें नामांतर. पूर्वीं मांडव्य नांवाचा महानिश्चयी व सर्वधर्मज्ञ असा ऋषि होता. तो तपश्चर्येनें आपला काल व्यतीत करीत असतां एकदां चोर चोरी करून द्रव्यासह याच्या आश्रमांत शिरले. राजसेवकांना शंका येऊन त्यांनीं चोरांसह या ऋषीस पकडलें व राजानें याला सुळीं देण्याचा हुकूम केला. मांडव्यास सुळावर चढविल्यावर त्यानें वेदपठनास सुरुवात केली, पण ही स्थिति इतर ऋषींना कळतांच ते पक्षिरूपानें तेथें जमा झाले व त्यांनीं राजाकडून मांडव्याची शिक्षा माफ करविली. पोटांत शिरलेला शूळ निघेना म्हणून तोडला, पण शूलाग्र तसेंच राहिलें म्हणून अणिमांडव्य हें नामाभिधान. या ऋषीनें लहानपणीं गमतीखातर पतंगाच्या पुच्छाला काडी रोंवली म्हणून यमानें ही शिक्षा दिली. अल्प अपराधाबद्दल असह्य दंड केल्यामुळें यमधर्मास यानें शूद्रवर्णी मिळेल असा शाप दिला व वयाच्या चौदा वर्षेपर्यंत घडलेल्या दुष्कृत्याबद्दल कोणा जिवास दंड असूं नये असा नियम बांधून दिला. (म. भा. आदिपर्व १०७–८).

**अणु**— पदार्थाच्या ज्या अत्यंत सूक्ष्म भागास स्वतंत्र रीतीनें अस्तित्व असतें त्यास अणु ( Molecule ) अशी संज्ञा पदार्थविज्ञानशास्त्रांत व रसायनशास्त्रांत दिली आहे. अणु हा शब्द तत्त्वज्ञानांत आढळतो, पण भौतिकशास्त्रांत त्यास निश्चित स्थान नाहीं. ॲटम (Atom) हा शब्द युरोपांत १७ व्या शतकांत उत्पन्न झाला त्या वेळीं अणु व परमाणु यांत भेद समजत नसत. हे शब्द एकाच अर्थानें वापरले जात; पण पुढें रसायनशास्त्रांत अणूपेक्षां सूक्ष्म पदार्थकणास परमाणु ही संज्ञा दिली गेली. पदार्थाचा अणूंत विभाग होतो किंवा पदार्थकणांच्या समुदायाच्या योगानें पदार्थाची रचना झाली आहे, ही समजूत पूर्वीपासून अतींद्रियशास्त्र व सृष्टिशास्त्र यांची आहे. पण आधुनिक शास्त्रीमंडळींत याविषयीं कसा मतभेद आहे तो जेम्स क्लार्क मॅक्सवेल यानें दिला आहे.

पदार्थाची रचना अणुसमुच्चयाच्या योगानें झाली आहे असं 'अण्वात्मक सिद्धांत' गृहीत धरतो. याविरुद्ध 'अनंत विभाग सिद्धान्त' असें सांगतो कीं, पदार्थ सर्वत्र सम आणि सारखे व्यापलेले म्हणजे अविच्छिन्न आहेत. उदाहरणार्थ, पाणी. अणुसिद्धान्तवादी म्हणतात कीं, पदार्थाचे विभाग कांहीं मर्यादेपर्यंत होतात, पुढें होत नाहींत व असा जो अत्यंत लहान विभाग तो अणु होय. तर विरुद्ध पक्ष म्हणतो कीं, अणु कितीहि लहान असला तरी त्याला अंगें ( Parts ) असतात व म्हणून त्याचे विभाग झालेच पाहिजेत. डिमॉक्रिटसनें अणुसिद्धान्त व अॅनॅक्झॅगोरस यानें 'अनन्त विभाग सिद्धान्त' स्थापिला.

पदार्थाच्या सूक्ष्म कणांच्या आकारावर व गतीवर अनेक गुणधर्म अवलंबून आहेत, हें समजल्यावर या प्रकारच्या शास्त्रीय शोधामुळें अणुसिद्धान्ताच्या प्रश्नाविषयीं जारीनें विचार सुरू आहेत. त्याकरितां या व विरुद्ध मतांचा विचार केला पाहिजे. प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञान्यांनीं संख्या, अविच्छिन्न महत्त्वमापन, दिक्, काल, जडपदार्थ आणि गति यांविषयीं स्वयंस्फूर्तीनें विचार केला. त्यांच्या जोमदार विचारांत प्रत्यक्ष ज्ञान व शास्त्रीय अनुभव थोडा असला, तरी तो परंपरागत सांठा पुढील पिढीस उद्युक्त करण्यास उपयोगी पडला. त्यांस संख्येचें यथायोग्य ज्ञान होतें. संख्येनें आपण जड वस्तूचें मापन व गणना करतों. पण संख्या ही विच्छिन्न आहे, पण भूमितींत जें आपणांस महत्त्वमापन आढळतें तें अविच्छिन्न असतें. त्यामुळें अपरिमेय संख्या आणि अवकाशाची अनंत विभागणी करण्याची शक्यता या दोन कल्पनांचा उदय झाला. परंतु कालाला या कल्पना न लावल्यानें झेनोच्या काळीं गणना करतां येईल इतके काळाचे क्षण आहेत, परंतु अवकाशाचे अगणित बिंदु आहेत असें समजण्यांत येई. परंतु आरिस्टॉटलनें कालाचे अवकाशाप्रमाणें अनंत विभाग होतात हें दाखविलें. यावरून अणुवाद हा संख्येची कल्पना जडपदार्थास लावण्याचा प्रयत्न व अनन्त–विभाग सिद्धांतवाद हा अविच्छिन्न महत्त्वमापनाची कल्पना जडपदार्थास लावण्याचा यत्न आहे.

अणुसिद्धान्तवाद्यांचें म्हणणें अणु आणि अवकाश मिळून पदार्थ झालेला आहे व त्यामुळें त्यास गति मिळते. तर अनन्तविभागवाद्यांचें म्हणणें असें कीं, प्रत्येक स्थल द्रव्यानें भरलें असून तें द्रव्य म्हणजेच आकाश होय. आधुनिक कालांत डेकार्टेचें असें मत आहे कीं, जडपदार्थ व अवकाश यांना जाडी, लांबी, रुंदी समान आहेत. म्हणून सारे जडपदार्थ अणूंच्या संयोगानें झाले आहेत. असा त्यानें अणुवाद मान्य केला.

असे दोन निरनिराळ्या कल्पनांपासून हे दोन वाद निघाले. जडपदार्थांच्या ठिकाणीं असलेल्या सर्व गुणधर्मांचा उलगडा अनंतविभागकल्पनेच्या योगें करणें शक्य नसलें तरी शास्त्रांत कित्येक वेळां या कल्पनेचा उपयोग करून घेतां येतो. जलस्थितिशास्त्रांत जलाची त्याच्या एका महत्त्वाच्या गुणावरून व्याख्या केली व त्यावरून अनुमानानें पुष्कळ गोष्टी सिद्ध केल्या गेल्या व तें शास्त्र तयार झालें. याप्रमाणें नुसत्या अनुभवावरून जलस्थितिशास्त्राची रचना करतां येते, त्यामुळें जल हें अणूंच्या योगें झालें आहे कीं त्याचे अनंत विभाग करण्यासारखे आहेत, हा विचारच करण्याचें कारण पडत नाहीं. याप्रमाणें फ्रेंच गणितशास्त्रवेत्त्यांनीं स्थितिस्थापक पदार्थाविषयीं सिद्धान्त बसविले; यावर स्टोक आदिकरून आक्षेपकांनीं असें दाखवून दिलें कीं, स्थितिस्थापकाचा कितीहि

लहान खंड घेतला तरी तो समजातीय असतो, म्हणजे एक प्रकारें हें अणुवाद नाकारण्यासारखें आहे. ही समजातीयत्वाची कल्पना वहनसिद्धान्ताची जननी असून यापासूनच आधुनिक गणितशास्त्र निघालें आहे. व त्यायोगें जडपदार्थाविषयीं अनेक गोष्टी सिद्ध करतां येतात.

जडपदार्थ समजातीय गुणयुक्त नसून त्याची रचना कणांनीं झाली असावी यांबद्दल प्रयोगसिद्ध पुष्कळ पुरावा आहे. पदार्थ-विज्ञानशास्त्रदृष्ट्या या सर्वांत लहान खंडास अणु म्हणतात. रासायनिक क्रियांचा विचार करतांना अणूचा विभाग परमाणूंत व विद्युत्चमत्कारांत अतिपरमाणूंत करण्यांत येतो. अर्थात् अणुसमुच्चयानें जडपदार्थ व अणुकल्पनेच्या योगें विद्युदितर व रसायनेतर कार्यकारणांचा खुलासा झाला पाहिजे. या प्रकारें वायुमय पदार्थांविषयींहि सुलभतेनें खुलासा करतां येतो व वायूचा गतिसिद्धांत व विद्युत् आणि प्रकाश यांच्या योगें पदार्थांची अण्वात्मक रचना सिद्ध करतां येते.

लॉर्ड रॅले यानें पाण्यावरील तेलाच्या तवंगावर प्रयोग करून अणूचें आकारमान $\frac{१}{१०^{८}}$ सेंटिमीटर असावें असें दाखविलें. व यंगनें अणूंचें एकमेकांवर घडणारें आकर्षण एका इंचाच्या $\frac{१}{२००००००००}$ अंशाइतक्या इयत्तेचें आहे असें दाखविलें. तसेंच गणितानें असें सिद्ध केलें कीं, पाण्यांतील अणूचा व्यास व त्यांतील अंतर $\frac{१}{२०००००००००}$ ते $\frac{१}{१००००००००००}$ इंचा-इतकें असलें पाहिजे. अणूंचा निरनिराळ्या मार्गांनीं व्यास काढला असतां तो जवळजवळ सारखाच येतो. थोडा फरक येतो तो सूक्ष्म वस्तूंतील मोजमापांतील फरक व अणु गोल धरल्यामुळें येतो. सर्वच अणु गोलाकारच असतील असें नाहीं.

पदार्थांत असणारे अणु गतिमान असतात. हे अणु जरी फार वेगानें फिरत असले तरी पदार्थ स्थिर असतो. अणूंची घन, प्रवाही आणि वायु या तीन प्रकारच्या पदार्थाप्रमाणें तीन प्रकारची गति असते. घनपदार्थांतील अणु अत्यंत सूक्ष्म प्रमाणांत हालतात तर वायुपदार्थांतील अणु बरेच वेगवान् असतात. घनस्थितींतील पदार्थाचे अणु स्थिर नसतात हें त्या पदार्थांचें आकुंचन व प्रसरण यांवरून दिसून येईल. उष्णतेनें पदार्थ प्रसरण पावतो म्हणजे अणु गतिमान होतात व थंडीनें आकुंचन पावूं लागला कीं अणु एकमेकांवर घर्षण पावून पूर्वस्थितीवर येतात व ते स्तब्ध होतात त्या वेळीं –२७३° उष्णमान असतें.–२७३° उष्णतामानांत हे दोन पदार्थ एकमेकांवर घासले असतां उष्णता उत्पन्न होऊन प्रथम पृष्ठभागावरील व मग आंतील अणु गतिमान होऊन सर्व पदार्थांत उष्णता प्रसृत होते. उष्णतामान वाढविल्यास अणूंच्या आंदोलनास जास्त जागा लागते व पदार्थ प्रसरण पावून ती मिळते. उलट पदार्थ दाब वगैरे देऊन आकुंचित केला असतांहि त्याचें उष्णतामान वाढतें. पदार्थास प्रमाणाबाहेर उष्णता दिल्यास त्यांतील अणु आंदोलन पावूं लागतात व तो आपली मध्य स्थिति सोडून दुसरीकडे जाईल. व तेथें तो दुसऱ्या अणुसंबंधांनीं आकर्षणबंधनांनीं बांधला गेल्यास ठीक. परंतु पदार्थाच्या पृष्ठभागावरील अणूला पदार्थांतून बाहेर पडण्याच्या दिशेची गति मिळाली तर भोंवतालच्या अणु–बंधांतून सुटून पदार्थापासून फुटून निघेल. या पदार्थांतील अणु बाहेर पडणाऱ्या क्रियेस बाष्पीभवन म्हणतात. गणितानें हें सिद्ध झालें आहे कीं, घनस्थितींत जडपदार्थांतील अणूंत जें अंतर असतें त्याच्या दसपट अंतर वायुरूपस्थितींत असतें. त्याचप्रमाणें गणितानें असें सिद्ध झालें आहे कीं, $\frac{१}{१०^{१२}}$ ग्रॅम वजनाच्या अणूची सरासरीनें शून्य शतांश उष्णतामानावर २ मिलिमीटर गति किंवा वेग असतो.

डाल्टन सिद्धांत—एखाद्या पात्रांत निरनिराळ्या वायूंचें मिश्रण असेल तर त्या प्रत्येक वायूच्या दाबाच्या बेरजेइतका त्या मिश्रणाचा दाब असतो. बॉइल आणि चार्लसचा सिद्धान्त–कोणत्याहि वायूचें उष्णतामान कायम असतांना त्या वायूचा दाब त्या वायूच्या आकारमानाच्या व्युत्क्रम प्रमाणांत बदलतो आणि घनफळ कायम ठेवल्यास दाब उष्णतामानाच्या सम-प्रमाणांत बदलतो. अव्हागड्रोचा सिद्धान्त — सारख्या आकाराच्या घनफळांत असणारे असे निरनिराळ्या जातीचे वायु जर एकाच उष्णतामानावर आणि एकाच दाबांत असणार असे घेतले तर त्या निरनिराळ्या वायूंच्या अणूंची संख्या एकच असते.

वर दिलेला बॉइल व चार्लस यांचा नियम अगदीं बरोबर नाहीं. त्यांत फरक होण्याचीं कांहीं निराळीं कारणें असलीं पाहिजेत, त्याबद्दल फान डर वॉल या शास्त्रज्ञानें दिलेल्या दोन कारणांपैकीं अणूंमधील आकर्षण हें एक होय. वरील शास्त्रज्ञांचे नियम व विचारसरणी यावरून अणुसिद्धानास पुष्टिच मिळते.

**अणु बाँब**—परमाणु बाँब पहा.

**अणे, माधव श्रीहरि**—एक हिंदी राजकारणी मुत्सद्दी व प्रांताधिपति (गव्हर्नर). यांचा जन्म २९ ऑगस्ट १८८० रोजीं झाला. यांचें शिक्षण नागपूर येथील मॉरिस कॉलेजमध्यें झालें. पदवी घेतल्यावर यांनीं कांहीं दिवस अमरावती येथें १९०४ ते १९०६ पर्यंत काशीबाई प्रायव्हेट हायस्कूलमध्यें शिक्षकाचें काम केलें.

पुढें कायद्याची पदवी घेतल्यावर १९०८ मध्यें यवतमाळ येथें वकिली सुरू केली. हे लोकमान्य टिळक यांचे कट्टे अनुयायी होते. यांचेवर क्रिमिनल प्रोसिजर कोडाच्या १०८ कलमाखालीं खटला होऊन त्यांजकडून एक वर्षाचा चांगल्या वर्तणुकीचा जामीन घेण्यांत आला होता व यामुळें ज्युडीशिअल कमिशनरकडून यांची सनद एक वर्षाकरितां रद्द करण्यांत आली होती. १९१६ मध्यें यांनीं यवतमाळ जिल्हा सभा स्थापन केली व तिचे हे अनेक वर्षें अध्यक्ष होते. लो. टिळक यांनीं स्थापन केलेल्या होमरूल लीगचे हे उपाध्यक्ष होते; तसेंच १९२१ पर्यंत वऱ्हाड प्रांतिक काँग्रेस कमिटीचे उपाध्यक्ष होते व १९२१ पासून १९३० पर्यंत तिचे अध्यक्ष होते. मध्यवर्ती कायदे मंडळाचे हे वऱ्हाडतर्फे तीन वेळां (१९२४ ते २६, १९२७ ते ३० व १९३५) लोकनियुक्त सभासद होते. हे प्रतिसहकार पक्षाचे उपाध्यक्ष होते व असेंब्लीमधील राष्ट्रीय पक्षाचे मंत्री होते. १९३० मध्यें हे सत्याग्रहाच्या चळवळींत पडले व यांस तीन वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली. मार्च १९३३ मध्यें कलकत्ता येथें भरणाऱ्या राष्ट्रीय सभेस सरकारनें बंदी केली असतांना यांनीं सभा भरविली व हे तिचे अध्यक्ष झाले. म्हणून यांस विनाचौकशी मिदनापूर तुरुंगांत अटकेंत ठेवण्यांत आलें. १९२० ते १९३४ पर्यंत हे अ. भा. काँग्रेस कमिटीचे सभासद होते. तसेंच १९२४ व १९३१ मध्यें वर्किंग कमिटींत निवडून आले होते. सत्याग्रहाच्या चळवळींत १९३३ मध्यें राष्ट्रीय सभेचे ८ महिने अध्यक्ष होते. १९३४ मध्यें यांनीं वर्किंग कमिटीच्या सभासदत्वाचा त्याग केला आणि पंडित मदनमोहन मालवीय यांच्याबरोबर राष्ट्रीय पक्ष स्थापन केला. जातीय निवाड्याविरुद्ध यांनीं खूप चळवळ केली. १९२८ मध्यें स्थापन झालेल्या नेहरू-समितीचे हे सभासद होते व त्या समितीच्या रिपोर्टावर त्यांची सही होती. वऱ्हाड व मध्यप्रांतांत अकोला व नागपूर येथें भरलेल्या सर्वपक्षीय परिषदांचे हे अध्यक्ष असून त्या परिषदांतून त्या रिपोर्टास मान्यता देण्यांत आली होती. १९३२ मध्यें पनवेल येथें भरलेल्या महाराष्ट्र प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते. यांची नेमणूक मध्यवर्ती सरकारच्या कार्यकारी मंडळाचे सभासद म्हणून झाली होती व त्या वेळीं काँग्रेस गोटांत बरीच खळबळ उडाली होती. त्या जागेचा त्यांनीं महात्मा गांधी यांनीं उपोषण सुरू केल्यामुळें त्याग केला. हे नागपूर युनि. कोर्टाचे व बनारस युनिव्हर्सिटी कोर्टाचे सभासद होते.

यांनीं वऱ्हाड मराठी मध्यप्रांताचा एक महाविदर्भ नांवाचा प्रांत व्हावा म्हणून चळवळ केली व महाविदर्भ परिषद् भरविली. तिचे ते अध्यक्ष होते. त्यांची हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि म्हणून सिलोनमध्यें नेमणूक झाली होती. ते घटनापरिषदेचे सभासद होते. आतां त्यांना बिहारचे गव्हर्नर नेमलें आहे.

**अण्णाजी दत्तो** (प्रभुणीकर)—शिवाजीच्या अष्टप्रधानांतील एक अधिकारी. शिवाजीमहाराजांस हिंदुपदपातशाही स्थापन करण्यास जीं स्वामिनिष्ठ व कळकळीचीं माणसें मिळालीं त्यांत अण्णाजी दत्तो प्रभुणीकर याचा वर क्रम लागतो. हा देशस्थ ब्राह्मण असून १६४७ त शिवाजीमहाराजांस मिळाला. कोंकणांतील संगमेश्वर तालुक्याचें देशकुलकर्णपण याजकडे असल्यामुळें यास कोंकणांतील खडान् खडा माहिती होती. अफझुलखान-वध, दिल्लीश्वराची भेट, सुरतेची लूट, विजापूरकरांवरील अनेक मोहिमा या प्रसंगीं शिवाजीमहाराजांस अण्णाजी दत्तो याची चांगली मदत झाली. व त्यामुळें महाराजांनींहि वेळोवेळीं अण्णाजी दत्तो याचा मानसन्मान केला. युरोपियन वसाहतवाले यास किनाऱ्याचा सुभेदार म्हणत. दादाजी कोंडदेव यानें घालून दिलेल्या पद्धतीप्रमाणें जमीनमहसूल वसूल करण्याची पद्धत अण्णाजी दत्तो यानें चालविली होती. व शिवाजीमहाराजांना हिशोब व जमीनमहसूल व दफ्तर या कामीं अण्णाजी दत्तो याचा फार उपयोग झाला. यानें विशेष कोठें लढाई जिंकल्याचा उल्लेख नाहीं. पुढें शिवाजीमहाराजांनीं आपल्या प्रधानमंडळांतहि याचा समावेश केला होता. व त्याकडे जमीनमहसूल व दप्तर हीं खातीं दिलीं होतीं. परंतु पेशवे मोरोपंत पिंगळे व याचें पटत नसे व जमीनमहसुलाच्या बाबतींत अण्णाजी दत्तो याला पुष्कळ सरदारांना दुखवावें लागे. त्यामुळें पेशवे व इतर सरदार व याचें पटत नसे. शिवाजीमहाराजांच्या आजारांत त्यांचे घरांत गृहकलह सुरू झाला तेव्हां अण्णाजी दत्तो यानें सोयराबाईचा पक्ष घेतला व संभाजीस पन्हाळगडावर कैदेंत ठेविला. एकदां महाराजांनीं त्याला सोडवून आणलें, परंतु त्या वेळीं अण्णाजी दत्तो प्रमुख असल्यामुळें व महाराजांचा आजार वाढल्यामुळें त्यास पुनः कैदेंत टाकलें व महाराजांच्या आजाराची व पुढें मृत्यूनंतर १८ दिवसपर्यंत त्याची बातमीहि त्याला मिळूं दिली नाहीं. शिवाजीमहाराजांसारखा प्रतापसूर्य अस्तास जात असल्यामुळें सर्व जण भांबावून गेले होते, त्यामुळें सोयराबाई व अण्णाजी यांच्याविरुद्ध कोणास जातां येईना. महाराजांनंतर अण्णाजीनें राजारामास गादीवर बसविलें व सर्वाधिकार आपणाकडे घेतला. व संभाजीला पकडण्यासाठीं मोरोपंताशीं विचार ठरवून तो निघाला. जनार्दनपंत हणमंते व मोरोपंत यांना हें पसंत नव्हतें. परंतु अण्णाजीनें आपल्या दराऱ्यावर व सामर्थ्यावर फाजील विश्वास ठेवून सोयराबाईस हातीं धरलें व सर्वाधिकार आपणाकडे घेऊन सेनापति हंबीरराव याला आज्ञापत्रें लिहविलीं. परंतु स्वामिनिष्ठ हंबीररावास हें रुचलें नाहीं. जिकडे प्रजा तिकडे हंबीरराव अशी स्थिति असल्यामुळें त्यानें संभाजीशीं कारस्थान करून अण्णाजी,

मोरोपंत व प्रल्हादपंत यांना कऱ्हाडजवळ पकडलें. पुढें संभाजी रायगडीं येऊन राज्य करूं लागला व त्यानें सोयराबाईस ठार मारून राजारामास कैद केलें. अशा रीतीनें अण्णाजीचा डाव फसला. अण्णाजीस संभाजीनें सोडून त्यांस मजमूहि दिली. पण केलेल्या चुकीबद्दल अण्णाजीस पश्चात्ताप न होतां त्याच्या ठिकाणीं सूडाची भावना उद्‌भूत झाली. त्यामुळें त्यानें संभाजी-विरुद्ध शिर्के व अकबर यांना चिथविलें. अकबरानें संभाजीस ही गोष्ट कळविल्यावर त्यानें अण्णाजी व इतर मातबर सरदार यांना हत्तीच्या पायांखालीं तुडविलें. अशा रीतीनें एके काळीं शिवाजीमहाराजांना उपयोगी पडणाऱ्या सरदाराचा अंत झाला (१६८१).

**आण्णिगेरी**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. धारवाड-गदग रस्त्यावर नवलगुंदच्या आग्नेयीस १० मैलांवर. लोकसंख्या ८ हजार. अमृतेश्वराचें जखनाचार्यांनीं बांधलेलें देऊळ असून भिंतीवर पौराणिक चित्रें आहेत. इ. स. ११५७-१२०८ पर्यंतचे सहा शिलालेख सांपडले आहेत. कलचुरी, चालुक्य, महामंडलेश्वर बाचिराज व वीरबल्लाळ होयसळ यांची राजधानी होती. १८०० त धोंड्या वाघ डंबलहून पळून येथें आला होता व ऑक्टोबर १८०० त वेल्स्लीचा मुक्काम येथें होता. हें गांव निपाणी संस्थानांत मोडत असून १८३९ सालीं वारस नसल्यामुळें हें संस्थान खालसा झालें. हुबळी-धारवाडप्रमाणें हें लुगड्यांविषयीं प्रसिद्ध होतें.

**अंतरमापक**—एखाद्या ठिकाणाहून इष्ट वस्तूचें अंतर निश्चित करण्याकरितां हें यंत्र वापरतात. गेल्या महायुद्धांत ध्वनि-अंतरमापक यंत्रामध्यें बरीच सुधारणा करण्यांत आली. जेव्हां लक्ष्य दृष्टिपथांत असतें तेव्हां प्रकाश-अंतरमापकाचा उपयोग करतात. प्रत्यक्ष अंतर एका ज्ञात असलेल्या अंतराचा पाया धरून त्यावर उभारलेल्या दोन बाजूंच्या त्रिकोणाचें गणित करून काढ-ण्यांत येतें. एकेरी अंतरमापकामध्यें हा पाया सामान्यतः लहान असतो. या पायाच्या दोन्ही टोंकांपासून निरीक्षक प्रकाशापासून पडणाऱ्या प्रतिमांचें एका दुर्बिणींतून निरीक्षण करतो. हें निरी-क्षण करतांना एकनेत्री किंवा द्विनेत्री दुर्बिणीचा उपयोग कर-ण्यांत येतो. एकनेत्री दुर्बिण वापरली असतां पायाच्या दोन्ही टोंकांपासून दृश्य होणाऱ्या प्रकाशप्रतिमा पूर्णपणें केंद्रित न होतां त्यांत थोडें अंतर पडलेलें दिसतें. व या दोहोंमध्यें एक अंतर दाखविणारी आडवी रेषा असते. जेव्हां हे किरण थोडेफार फिरवून दोन्ही प्रतिमा समकेंद्र करण्यांत येतात तेव्हां ज्या मानानें हे किरण फिरवावे लागतात त्या मानावरून ठराविक कोष्टका-वरून अंतर निश्चित करण्यांत येतें. द्विनेत्री दुर्बिणीमध्यें दोन्ही डोळ्यांनीं पाहण्याकरितां दोन स्वतंत्र कांचा असतात, आणि त्यांतून पाहणाऱ्यास निरनिराळ्या वस्तु जशा असतील तशा निरनिराळ्या अंतरांवर दिसतात. त्यावरून त्यांतील अंतर गणितानें काढतां येतें. वैमानिक तोफखान्यामध्यें उंचीमापक यंत्रें ठेवलेलीं असतात. त्यांवरून लक्ष्याची उंची, अंतर व तोफेशीं होणारा कोनहि मोजतां येतो.

**अतरसुंबा**—बडोदे संस्थानांतील एक पोटविभाग. प्रदेश डोंगराळ, अरण्यमय व रमणीय असून २५ इंच पाऊस पडतो. जमीन रेताड व क्वचित् काळी असून कोळ्यांची वस्ती आहे. पोटविभागांतील ठाण्याचें गांव अतरसुंबा आहे. तेथें पडीत किल्ला आहे. लोकवस्ती ३ हजार. लोखंडी काम व सुरे याबद्दल प्रसिद्ध.

**अंतर्गळ**—(हर्निआ) शस्त्रवैद्यकामध्यें शरीरांतील कोणताहि भाग आपल्या स्थानावरून सरकून दुसऱ्या जागीं गेला असतां जो ग्रंथि उत्पन्न होतो, त्यास अंतर्गळ म्हणतात. परंतु सामान्यतः हा शब्द उदरांतील आंतडीं खालीं सरकलीं असतां त्यास लावतात. शरीरांतील मल बाहेर पडतांना अंत्रावरणास आपल्यापुढें लोटीत असतो. त्यामुळें अशा अंतस्त्वचेची एक पिशवी बनून तींत अंतर्गळ तयार होतो व तिला अंतर्गळाची पिशवी म्हणतात. सामान्यतः अंतर्गळ हा लघ्वन्त्राची एक दुमड असते. आणि जरी ती जठरांतून बाहेर पडून तिची कातडीच्या खालीं ग्रंथि तयार झाली तरी तीमधून मलवाहनाचें कार्य सुरू असतें. जर अशी अंतर्गळाची ग्रंथि पुन्हा उदरामध्यें परत लोटतां आली तर तिला दबणारा अंतर्गळ म्हणतात. असा दबणारा अंतर्गळ पट्ट्याच्या योगानें किंवा घडीच्या योगानें पुन्हां बाहेर पडणार नाहीं असा करतां येतो. न दबणारा ग्रंथि मात्र फार जपून आवरून धरावा लागतो. जेव्हां असा न दबणारा अंतर्गळ वरचेवर संकोच किंवा वृद्धि पावतो तेव्हां त्यास सपाश अंतर्गळ म्हणतात. याच्या योगानें रुधिराभिसरणास व मलवाहनास अडथळा होतो.

**अन्तर्ज्वलन यंत्र**—ज्या एंजिनामध्यें शक्ति उत्पन्न करण्या-करितां लागणारें जळण त्या एंजिनांतच असतें त्याला 'इंटर्नल कांबश्चन एंजिन' असें म्हणतात. सर्व तैलयंत्रें, पेट्रोल-मोटरचें एंजिन व अगदीं अलीकडे निघालेलीं गॅस टर्बाईन हीं सर्व अन्तर्ज्वलन यंत्रें होत. यामध्यें एंजिनला लागणारें जळण दट्ट्याच्या (पिस्टनच्या) मागें जळून त्याच्या योगानें जे अतिशय दाबाचे वायु उत्पन्न होतात त्यामुळें तें एंजिन चालतें. एंजिन चालण्यासाठीं त्यामध्यें चार मुख्य क्रिया व्हाव्या लागतात. त्या अशा: (१) एंजिनमध्यें जळण जळण्यासाठीं लागणारी हवा आंत घेणें. (२) हवा आंत घेतल्यानंतर तिच्याशीं जळण मिसळणें व तें दबलें जाणें. (३) तें मिश्रण पेटणें व शेवटीं हे जळलेले वायु पंचपात्रांतून (सिलिंडर)

बाहेर काढून टाकून नवीन हवा येण्यासाठीं तें पंचपात्र रिकामें करणें. या क्रियांना ( १ ) Suction हवा आंत घेणें. ( २ ) Compression हवा किंवा मिश्रण दबणें. ( ३ ) Ignition पेटणें व त्यायोगें शक्ति उत्पन्न होणें व ( ४ ) Exhaust जळलेले वायु बाहेर निघून जाणें, अशीं नांवें आहेत. एंजिन चालू असतां या चार क्रिया एका बाजूनें सारख्या व्हाव्या लागतात. याचें शास्त्रीय नांव चक्र किंवा फेरा असें आहे. हा ऑटो या माणसानें शोधून काढला म्हणून त्याला ऑटोफेरा ( सायकल ) असें नांव पडलें.

साधारणपणें या प्रत्येक क्रियेला एंजिनची एक धाव (स्ट्रोक) लागते. एंजिनचे पुढून मागें किंवा मागून पुढें जाणें याला स्ट्रोक–धाव असें म्हणतात. या सर्व क्रियांना ज्या एंजिनमध्यें चार धावा लागतात त्यांना चार धावांचें एंजिन असें म्हणतात. कांहीं एंजिनांतून या क्रिया दोनच धावांमुळें होतात. त्या एंजिनला दोन धावांचें एंजिन किंवा दोन फेऱ्यांचें एंजिन म्हणतात. अगदीं सुरुवातीस असलीं एंजिनें दगडी कोळशाच्या धुरानें चालणारीं निघालीं. या एंजिनमध्यें धूर ( कोल गॅस ) व त्याला जळण्यासाठीं लागणारी हवा तिच्या-सुद्धां पहिल्या धावेमध्यें आंत घेतली जात असे. या वेळेस दट्ट्या पुढून मागें येत असे. दुसऱ्या धावेच्या वेळेस दट्ट्या मागें जात असतांना हें मिश्रण दाबलें जाऊन तें चांगलें मिसळलें जात असे व धाव पुरी होण्याच्या सुमारास हें मिश्रण पेट घेई व त्यामुळें जोराचे वायु आंतील लहान जागेंत तयार होत असत. या जोराच्या वायूंनीं दट्ट्या पुनः मागें ओढला जात असे ही तिसरी धाव; ही शक्तिधाव ( पावर स्ट्रोक ) किंवा शक्ति उत्पन्न करणारी धाव होय. धावेच्या वेळेस ( दट्ट्या परत मागें जाण्याचे वेळेस ) जळलेले सर्व वायु दट्ट्याबरोबर मागें जाऊन नवी हवा घेण्यास पंचपात्र पुनः रिकामें होतें. या क्रियेला रेचन ( एक्झॉस्ट ) असें म्हणतात.

ज्या वेळीं हीं पहिलीं एंजिनें निघालीं त्या वेळीं जळण जाळ-ण्यासाठीं लागणारी जी ज्योत—पेटवण ( इग्निशन )—लागते. तीसाठीं वीज वापरावी ही कल्पना नव्हती म्हणून अनेक तऱ्हेच्या ज्योतींनीं पेटविण्याची क्रिया करावी लागत असे. धुराचीं ( गॅस ) एंजिनें चालू झाल्यानंतर तेलांनीं चालणारीं एंजिनें सुरू करण्याचा प्रयत्न झाला. त्यामध्यें गॅस एंजिनपेक्षां तेलाची वाफ करण्याचा एक भाग लागत असे त्याला वाष्पक ( व्हेपरायझर ) असें नांव आहे. या वाष्पकामध्यें एंजिनला लागणारें तेल येतें व तेथें त्याची वाफ होते. आणि पुढील सर्व क्रिया धुराच्या एंजिनप्रमाणें होते. बहुतेक सर्व एंजिनमध्यें त्यांत येणारी हवा ही एकटीच आंत न येतां तिच्याचबरोबर लागणारा धूर किंवा वाफ झालेलें तेल हीं दोन्ही मिसळून येत असतात व हें मिश्रण दाबलें जात असतें. धुराच्या मिश्रणापेक्षां तेलाच्या वाफेचें मिश्रण अधिक दाबावें लागतें. तेल जसें जाड असेल त्या मानानें त्या मिश्रणाचा दाब अधिक असावा लागतो; कारण त्या तेलाची वाफ चांगली होत नसते; तसेंच जितकें तें मिश्रण अधिक जोरानें दाबलें जात असतें तितक्या अधिक जोरानें त्याचा स्फोटहि होत असतो. तैलयंत्रामध्यें हें मिश्रण जळण्यासाठीं प्रथम एक बाष्पकाला जोडलेला गोळा किंवा नळी असे व ती स्टोव्हनें सारखी लाल ठेवावी लागत असे. परंतु पुढें बाष्पकामागील भागालाच गोळ्यासारखा आकार दिल्यामुळें आणि तो एंजिनमध्यें होणाऱ्या स्फोटामुळेंच गरम राहावा अशी योजना झाली. त्यामुळें स्टोव्हची जरूरी राहिली नाहीं. या एंजिनाला ततगोलयंत्र ( हॉट बल्ब एंजिन ) असें म्हणतात.

हवा खूप जोरानें दाबली असतां तिचें उष्णतामान फार वाढतें, म्हणून तैलयंत्रामध्यें येणारी हवाच इतकी दाबावी कीं, तिचें उष्णमान आंत येणाऱ्या तेलाला तावडतोब जळायला लावील अशी योजना करण्याची कल्पना डॉ. डिझेल या जर्मन एंजिनिअरला सुचली; म्हणून अशा तऱ्हेच्या सर्व एंजिनांना ‘ डिझेल एंजिन ’ असें म्हणतात. या एंजिनमध्यें तेलाची वाफ व्हावी लागत नाहीं. तेल थोडथोडें आंत जाऊन तें आपोआपच जळूं लागतें. अशा एंजिनांतून हवा २५० ते ५०० पौंडांपर्यंत दाबली जात असते. या वेळीं हवेचें उष्णतामान इतक्या प्रमाणांत वाढतें कीं, कसलेंहि जाड तेल आंत जातांच एकदम जळूं लागतें. एंजिनमधील हवेचा दाब जसजसा वाढत जातो त्या मानानें त्याला योग्य अशी जड ( हेवी ) एंजिनें बनवावीं लागतात. प्रथम डिझेल एंजिनें वीज उत्पन्न करण्यासाठींच वापरीत असत, परंतु जसजसे निरनिराळे धातु तयार करतां येऊं लागले तसतसें त्या एंजिनचें वजन कमी होऊन त्याची गतिहि वाढूं लागली. मोठ्यांत मोठीं डिझेल एंजिनें २०,००० अश्वशक्तीचीं आहेत. अलीकडे बोटीवरसुद्धां हीं एंजिनें वापरण्यांत येत आहेत. मोटर व बस यांमधून बसविण्याजोगीं हलकीं दर मिनिटास १८०० फेरे फिरणारीं एंजिनेंहि तयार होत आहेत.

**अंतर्ज्ञान**—प्रत्यक्ष किंवा चट्कन् होणारा जो बोध किंवा ज्ञान त्याला ही संज्ञा तत्त्ववेत्त्यांकडून दिली जाते. भूमितींत एखाद्या सिद्धांताची सत्यता अनेक पुरावे देऊन प्रस्थापित करावी लागते; पण अंतर्ज्ञानवाद्यांच्या मतें सार्वत्रिक तत्त्वांचा बोध करून देण्यास अशा खटपटीची जरूरीच नसते; कारण तीं जातीचींच सत्यें असतात. सर्व प्रकारचें ज्ञान, बौद्धिक क्रियांवर किंवा वैचारिक निर्णयांवर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष

अवलंबून असतें हें म्हणणें अंतर्ज्ञान मानणारांना क़बूल नाहीं. १५ व्या, १६ व्या शतकापासून जेव्हां भौतिक शास्त्राचा उगम होऊन ईश्वराची मध्यस्थी एखाद्या गोष्टीची उपपत्ति लावण्याच्या कामीं न मानण्याचा प्रघात पडला तेव्हां अर्थातच अंतर्ज्ञान सिद्धांतावर पुष्कळांचा विश्वास बसेनासा झाला. पण मुळींच अंतर्ज्ञान नाहीं असें मात्र कोणीहि तत्त्वज्ञानी म्हणत नाहीं. ज्ञानाचे उगम अनेक असतात, त्यांपैकीं हा एक होय. आयुष्याला चांगली ठाकठिकी आणण्याला अंतर्ज्ञान हें नेहमीं कमी-अधिक प्रमाणांत उपयोगी पडतें. अंतर्ज्ञानाचें अस्तित्व पुष्कळ गोष्टींवरून सिद्ध करतां येतें. गर्भशास्त्र, तौलनिक-शारीर विच्छेदन आणि जन्मविषयक मनोविज्ञान यांवरून पाहतां असें स्पष्ट होतें कीं, बौद्धिक क्रियांना जीवविकासांत आद्य स्थान नाहीं तर तो 'मागाहूनचा विचार' असून मुख्य जी हालचाल ती एका विशिष्ट पद्धतीनें करविण्याकरितां या क्रिया असतात. प्राण्यांची हालचाल बारकाईनें पाहतां त्यांचें शहाणपण बुद्धीपेक्षां अंतर्ज्ञानाधिष्ठत असावें असें वाटतें; नवीन शोध कसे लागतात याचें नीट विवरण करीत गेल्यास अंतर्ज्ञानाकडे यशाचा बराचसा वांटा जातो. अंतर्ज्ञानवाद्यांचे प्रतिपक्षी असें म्हणतात कीं, ज्यांना आपण तात्काळ व सहजोत्पन्न निर्णय असें समजतों ते तसे नसून सदसद्विवेकबुद्धीच्या स्मृतींतून गेलेल्या क्रियांवरून निघालेले असतात, म्हणजे अनुभवजन्य असतात. तसेंच कांहीं रानटी जातींत बरेंवाईट ओळखण्याचें अंतर्ज्ञान आढळून येत नाहीं. शिवाय अंतर्ज्ञानाचें अस्तित्व असतें तर निरनिराळ्या देशांत व निरनिराळ्या काळांत नैतिक पद्धतींमध्यें जे मोठमोठे भेद दृष्टीस पडतात ते पडले नसते. हे विरोधी पुरावे मननीय आहेत हें कोणासहि कबूल करावें लागेल.

**अंतःस्फूर्ति**—(इन्टयुइशन). डोळ्यांनीं बाह्यवस्तु पाहिल्या-वर त्या वस्तूची मनावर जी प्रतिमा उमटते, तिला 'इन्टयुइशन'—'साक्षात् ज्ञान' म्हणतात. व्यापक अर्थानें, पंचज्ञानेंद्रियद्वारां (चक्षु, कर्ण, जिव्हा, त्वक्, घ्राण) जें जें ज्ञान प्राप्त होतें, त्या सर्व ज्ञानाला साक्षात् ज्ञान म्हणतात. पण तत्त्वज्ञानांत या शब्दाचा उपयोग इंग्रज तत्त्ववेत्त्यांनीं निराळ्या अर्थानें केला आहे. बरोबर आणि चूक (राइट अँड रॉंग) यांमधील फरक जाणण्याची मनुष्यामध्यें जी उपजत बुद्धि असते, तिला 'अन्तःस्फूर्ति' म्हणतात. या अन्तःस्फूर्तीनें मनुष्याला आद्य तत्त्वें ज्ञात होतात.

**अंताजी (बाबूराव) मल्हारराव बर्वे**—एक मराठे-शाहींतील मुत्सद्दी. याची आत्या ही बाळाजी विश्वनाथ पेशवे याची बायको (राधाबाई) होती. कोटूरचा राहणार. याची बायको पिंगळे (पेशवे) घराण्यांतील होती; म्हणजे देशस्थ-कोंकणस्थ विवाह या वेळीं सुरू झाले. हा निजामाकडे व दिल्लीस मोंगलाकडे पेशव्यांचा वकील होता. हा मुत्सद्दी म्हणून नांवाजला होता. नादिरशहाच्या स्वारीच्या वेळीं हा दिल्लीसच होता. याला पेशव्यांनीं रांजणगांव इनाम दिलें होतें. नादिरशहाच्या स्वारीच्या वेळीं हिंगणे व दीक्षित यांच्या मदतीनें यानें उत्तर हिंदुस्थानांत जाट, बुंदेले, वगैरे लहानमोठे हिंदु संस्थानिक एकत्र करून मुसलमानांविरुद्ध एक जंगी कारस्थान उभारलें होतें; परंतु तें शेवटास गेलें नाहीं. सदाशिवराव भाऊचें व याचें पुढें न पटल्यानें दिल्लीहून हा परत आला. हा कोटूर येथें १७४९ त मरण पावला.

**अंताजी माणकेश्वर**—उत्तर हिंदुस्थानांतील पेशव्यांचा एक सरदार. ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. आडनांव गंधे. नगर जिल्ह्यांतील कामरगांवचा जोशी कुलकर्णी, जावळी प्रकरणांतील राघो बल्लाळ अत्रे याचा नातु त्रिंबकपंत अत्रे हा अंताजीपंताचा मावसभाऊ असल्यानें त्याच्या आश्रयास अंताजीपंत कऱ्हेपठार प्रांतीं आला. अंताजी हा शाहूच्या पदरीं प्रथम उदयास आला. नंतर तिकडून पेशव्यांकडे बदलला. अंताजी पेशव्यांच्या तर्फे दिल्लीस फौज घेऊन होता. त्याचें व हिंगणे यांचें पटत नव्हतें. कारण, अंताजी थोडा आत्मप्रौढी मिरवणारा असून तो परभारें वजिरांशीं वगैरे उलाढाली करूं लागला. हा प्रकार हिंगण्यास सहन होईना. इ. स. १७५२–५३ त शिंदे–होळकर दक्षिणेंत असल्यामुळें एकटा अंताजी पांच हजार फौज घेऊन पातशहाच्या संरक्षणासाठीं दिल्लीस होता. अंताजीनें फौज वाढविली तिला आगाऊ परवा-नगी घेतलेली नव्हती आणि तिच्या खर्चास पैसा न मिळाल्यानें त्याची तारांबळ उडाली होती. पेशव्यानें अंताजीचा बंदोबस्त २०–१०–१७५३ रोजीं करून दिला.

इ. स. १७५५ च्या एप्रिलांत रघुनाथराव हिंदुस्थानांत असतां पेशवा व अंताजी माणकेश्वर यांची भेट नाशिक येथें झाली. त्या वेळेस पेशव्यानें अंताजीस हिंदुस्थानांत रवाना केलें आणि रघुनाथराव सांगेल ती कामगिरी करण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें अंताजी तिकडे जात असतां फौज न ठेवतां खोगीर गणती दाखवून अंताजी पैसे उपटतो असा संशय येऊन रस्त्यांत पेशव्यांच्या हुकुमानें दोन वेळां फौजेची झडती मुद्दाम खात्रीच्या माणसांकडून करविली. ती कमी न भरतां बरोबर सात हजार भरली असें अंताजी लिहितो. जुलै–ऑगस्टांत अंताजीचा मुक्काम काल्पीजवळ यमुनातीरीं होता. त्यापूर्वींच जून महिन्यांत जयाप्पाचा खून झाला होता. सप्टेंबरांत मारवाडांत जाण्या-विषयीं पेशव्यांचा निकडीचा हुकूम अंताजीस आला. तेव्हां गोविंदपंत बुंदेल्याकडून वीस लाख कर्ज घेऊन विजयादशमीच्या मुहूर्तानें (१४–१०–१७५५) अंताजी फौजेची जमवाजमव

करीत मारवाडांत गेला. जयनगरचा माधोसिंग बिजेसिंगाचें साह्य करीत होता. सबब अंताजीनें जयपूरचा मुलूख लुटून त्यास तंबी पोंचविली. जयपूरचा अनिरुद्धसिंग याची व शिंद्यांच्या फौजेची लढाई होत होती त्यांत ऐन वेळीं अंताजीची मदत आल्यामुळें शिंद्याच्या फौजेस धीर आला. मोठ्या शिकस्तीनें लढाई करून अनिरुद्धसिंगास मराठ्यांनीं अडविलें, तेव्हां माधोसिंगानें त्याला परत बोलाविलें व अनिरुद्धसिंग अंताजीच्या छावणींत तहासाठीं गेला. जयपूरची फौज परत पाठवून अंताजी व अनिरुद्धसिंग शिंद्याच्या भेटीस आले. भेट झाल्यावर सर्व फौजांनीं नागोरावर मारा सुरू करतांच बिजेसिंग मोठ्या हिमतीनें पुनः चालून गेला. त्यांत त्याचा पूर्ण पराभव होऊन त्यानें तहाची बोलणीं लाविलीं; परंतु बिजेसिंगास काढून रामसिंगास संपूर्ण राज्य दिल्याशिवाय दत्ताजी तह करीना. ह्याबरोबर जरब बसून बिजेसिंग मराठे सांगतील त्याप्रमाणें तह करण्यास कबूल झाला. अंताजीपंताच्या मार्फत तह ठरला.

इ. स. १७५९ च्या अखेरीस अंताजी पुण्यांत असून सदाशिवराव त्याचे हिशेब तपासीत होता. मेरट वगैरे महाल अंताजीकडे होते. ते दूर करून सात लक्ष रुपये सरकारांत देण्याच्या करारावर ते बापूजी महादेवाकडे देण्यांत आले. एकंदरींत अव्यवस्थेची कमाल झाली होती, ती सर्व सदाशिवरावानें तोडली आणि लगेच स. १७६० च्या आरंभीं अंताजीपंत आपल्या कामावर रुजू झाला.

पानपतच्या लढाईनंतर अंताजी माणकेश्वर, बाजी हरि, नाना पुरंदरे व मल्हारराव होळकर असे रात्रौ दिल्लीचे सुमारें चालले असतां दांडग्यांच्या हुल्लडींत फरुखाबादच्या जमीनदाराच्या हातून अंताजी माणकेश्वर व बाजी हरि ठार झाले. अंताजीचे वंशज भेलशाकडे मांडके आडनांवानें विद्यमान आहेत.

**अंताजी रघुनाथ**—एक हिंदुधर्माभिमानी मुत्सद्दी वीर. आडनांव कावळे. मालाड (ठाणें जिल्हा) चा सरदेसाई व इनामदार. हा मोठा शूर व हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी होता. साष्टी प्रांतांत हिंदूंनीं आपलीं धर्मकृत्यें प्रसिद्धपणें करूं नयेत असा फिरंग्यांनीं हुकूम काढला होता. अंताजीपंतानें आपल्या प्रांतांत हा हुकूम अमलांत आणला नाहीं आणि इतरांनाहि तो तोडण्यास उत्तेजन दिलें व पेशव्याकडे याबद्दल फिर्याद केली. तेव्हां फिरंग्यांनीं पंताचें इनाम जप्त केलें व त्याला पकडण्याचा प्रयत्न केला. परंतु पंत पळून पुण्यास गेला. त्याच्या सांगण्यावरून पेशव्यांनीं साष्टीवर हल्ला केला (१७३१); अर्नाळा किल्ला घेतला, आणि ठाणें किल्ला व बहुतेक साष्टी प्रांतहि (१७३७ पर्यंत) काबीज केला. याला मराठ्यांच्या पदरीं पुढें तैनात मिळाली. कावळे आडनांवाची मंडळी पुढें आपणांस जावळे म्हणवून घेऊं लागली.

**अतारी**—पंजाब, मुलतान जिल्हा, कबीरवाला तहसिलींतील एक खेडेंगांव. अलेक्झांडरनें हिंदुस्थानावरील स्वारींत घेतलेलें तिसरें गांव असून हेंच ब्राह्मणाबाद असावें असें कनिंगहॅमचें मत आहे. ७५० चौरस फूट व ३५ फूट उंच असा पडका पण पूर्वीं अभेद्य असा किल्ला आहे. गांवाचे दोन्ही बाजूंस लोकांस माहीत नसलेले ऐतिहासिक अवशेष आहेत. हल्लीं या गांवास महत्त्व नाहीं.

**अतिकाय**— धान्यमालिनी व रावण यांचा मुलगा. शरीर अति स्थूल म्हणून हें नांव. यानें ब्रह्मदेवापासून अस्त्रें, कवचें, दिव्यरथ व सुरासुरांपासून अवध्यत्व हे वर मिळविले व इंद्र आणि वरुण यांचा पराभव केला. वरुणास जिंकून त्याचा पाश यानें आणला व रावणास साह्य केलें. कुंभकर्णानंतर रामासमोर युद्धास आला असतां लक्ष्मणानें यास मारिलें. (वा. रा. युद्ध० स. ७१).

**अतिक्रमण**—(इं. ट्रेसपास). कायद्यांत दुसऱ्याच्या मालकीच्या जागेंत बेकायदेशीर पण अनत्याचारी रीतीनें प्रवेश करणें, याला अतिक्रमण म्हणतात. इंग्लंडच्या कायद्यांत हा फौजदारी गुन्हा नसून या अपकृत्याबद्दल दिवाणी कोर्टांत नुकसानभरपाईचा दावा लावतां येतो. दुसऱ्याच्या जमिनींत किंवा घरांत कायदेशीर हक्कानें शिरणें किंवा वहिवाटीच्या हक्कानें (ईजमेंट) शिरणें हें अतिक्रमण होत नाहीं. अतिक्रमण करणाऱ्या इसमाला जरूर तितका प्रतिकार करून बाहेर घालविण्याचा हक्क मालकाला असतो. शिकारीचा पाठलाग करण्याकरितां दुसऱ्याच्या जमिनींत शिरणें हा गुन्हा आहे. हिंदुस्थानांत अशाच स्वरूपाचा कायदा आहे. (इंडियन पिनल कोड पहा).

**अतिनील किरण**—(अल्ट्रा व्हायोलेट रेज). हे किरण आपल्या डोळ्यांस दिसून येत नाहींत. किरणाच्या वर्णपटामध्यें ते नील-लोहित किरणांच्या पलीकडे असतात आणि दृश्य किरणांपेक्षां त्यांची लहरींची लांबी कमी असते. दृश्य वर्णपटाच्या नीललोहित किरणांच्या अगदीं टोंकाकडील किरणांची लहरीची लांबी ४००० अँग्स्ट्रॉम (कोट्यांश मिलिमीटर) मापाएवढी असते. अतिनील किरणांच्या लहरींची लांबी १००० अँग्स्ट्रॉमपर्यंत आढळून आली आहे. अतिनील किरण सूर्यप्रकाशामध्यें असतात. परंतु त्यांतील कमी लांबीच्या लहरी वातावरणामध्यें शोपल्या जातात. या किरणांचा व प्रकाशाचा उपयोग वैद्यकामध्यें विशेषतः त्वग्रोगामध्यें व क्षतें आणि गळवें बरीं करण्याकरितां करण्यांत येतो. हे किरण बहुधा कर्बाच्या (कार्बन) वत्त्यांतील विद्युत्प्रकाशाच्या कमानीच्या साहाय्यानें पाऱ्याच्या वाफेनें भरलेल्या गारेच्या दिव्यामध्यें उत्पन्न करण्यांत येतात. पाऱ्याच्या वाफेच्या दिव्यांतून

निघणारे किरण पुष्कळ असतात. परंतु त्यांची लहरींची लांबी अधिक आखूड असते. आणि त्यांची भेदक शक्तिहि कमी असते.

**अतिपरमाणु (ऋण) विद्युत्कण**—(इलेक्ट्रॉन). पदार्थांचा अत्यंत लहान असा ऋणविद्युत्कण. प्रथम याचा शोध डॉ. जॉनस्टोन स्टोनींनें केला असला तरी सर जे. जे. थॉमसननें याचा सिद्धांत प्रस्थापित केला. एका उज्ज (हायड्रोजन) च्या परमाणूबरोबर वजनांत १८०० च्या वर इलेक्ट्रॉन लागतात. या अतिपरमाणूंच्या अधिक शोधामुळें भौतिक शास्त्रांत मोठी क्रांति घडून आलेली आहे. एका परमाणूमध्यें यांचा मोठा पुंजच असून तो धनविद्युद्युक्त केंद्राभोंवतीं फिरत असतो. या ऋणविद्युत्कणांच्या फेऱ्यांचें एक पुन्हां शास्त्रच आहे. ते ग्रहाप्रमाणें स्वतः-भोंवतींहि फिरतात. त्यांची शक्तिहि केंद्राच्या अंतराप्रमाणें कमीजास्त होते.

**अतिपरवलय**—(हायपरबोला). शंकूचा त्याच्या अक्षाला समांतर छेद घेतला असतां हें वक्र येतें. या आकृतींत क हें एक केंद्र (फोकस) व नय ही एक नियंत्रक रेषा (डायरेक्ट्रिक्स). वक्रावरील ब बिंदूपासून बल, नय नियंत्रक रेषेवर लंब काढा.

ब क = ई (e) × बल ई. (e) > १. ई ही अतिपर-

वलयाची (एक्सेंट्रिसिटी) मध्यच्युति. कसारखेंच ख हें दुसरें केंद्र व नयसारखी णव दुसरी नियंत्रक रेषा अतिपरवलयास असते. स मध्यापासून दोन स्पर्शरेषा काढतां येतात. मध्यापासून वक्र जसें दूर जातें तसें तें ह्या स्पर्शरेषांजवळ वक्र येतें. ह्या स्पर्शरेषांस (ॲसिम्टोट) अनंत स्पर्शरेषा म्हणतात.

**अतियथार्थवाद**—(सुररिॲलिझम्). ग्विलोम आपोलिनेर या फ्रेंच कवीनें १९१९ सालीं ही संज्ञा रूढ केली. मनुष्याच्या मनावर जीं नियंत्रणें असतात तीं नाहींशीं करून सत्याचा साक्षात्कार अनुभविणें व तर्कशक्ति आणि सुधारणा (सिव्हिलिझेशन) यांच्यापासून चैतन्य शक्तीला मुक्त करणें हा या वादाचा हेतु असतो. "जेव्हां मनुष्य आपली तर्कशक्ति व आपल्या ऐकल्या-वाचलेल्या सौंदर्यनीतिविषयक कल्पना यांच्यापासून आपली सुटका करून घेतो, तेव्हां शब्द, चित्र किंवा अशाच एखाद्या माध्यमाच्या द्वारें आत्माविष्कार करण्याची जी अंतःप्रेरणा त्याला होते तीच सुररिॲलिझम," असें या संप्रदायाचा एक प्रमुख आंद्रे ब्रेतन म्हणतो.

साहित्य-चित्रकलादि क्षेत्रांत या संप्रदायिकांनीं नवीन प्रकार सुरु केले आहेत व नवा दृष्टिकोण पुरस्कारला आहे. जगांतील दृश्य संकटें अदृश्य मानसिक रोगांपासून उत्पन्न झालेलीं असतात तेव्हां मनाला स्वतंत्र आणि शुद्ध ठेवा असें सुर्-रिॲलिस्ट बजावतात.

**अतिरिक्तलाभ कर**—(एक्सेस प्रॉफिट ड्यूटी). पहिल्या महायुद्धांत जेव्हां राष्ट्राला फार खर्च लागूं लागला, तेव्हां इंग्लंडमध्यें हा बसविण्यांत आला. युद्धापूर्वी जेवढा फायदा होत होता त्यापेक्षां अधिक कांहीं व्यापारांत होत असेल तर हा कर भरावा लागे. १९१५ सालीं हा ५० टक्के होता तो पुढील सालीं ६० टक्के व १९१७ सालीं ८० टक्के करण्यांत आला. शेतकरी व धंदेवाईक यांना या करांतून वगळण्यांत आलें होतें. १९२१ सालीं हा कर रद्द करण्यांत आला. पण गेल्या महायुद्धांत पुन्हां बसविण्यांत आला. हिंदुस्थानांत १९४० सालीं ५० टक्के इतका हा कर बसविण्यांत आला व पुढील सालीं ६६⅔ इतका वाढविण्यांत आला. पण युद्धानंतर १९४६-४७ च्या अंदाजपत्रकांत हा कर बंद करण्याची योजना केली.

**अतिविष**— एक औषधि वनस्पति. सं. अतिविष, शुगप्रिया; इंग्रजींत ॲकोनायटम हेटरोफिल्लम हें नांव. पांढरें, काळें व पिवळें या तीन जाती. नांवावरून ही एक बचनागाची विषारी जात असावी असें वाटतें, पण विषारी नाहीं. आकारमानावरून ही व बचनाग एकाच वर्गांत येतात. ही वनस्पति हिमालयांत व इतर डोंगरपठारांत आढळते.

अतिविष म्हणजे गांठी गांठी असलेल्या बारीक मुळ्या. ह्या मुळ्या टोंकें बारीक होत गेलेलीं, लांबी दीड-दोन इंच, जाडी

½ ते ¾ इंच, रंग करडा व वर सुरकुत्या, मोडली असतां आंत पांढरी, वास मुळींच नाहीं, पिठूळ व निवळ कडू, अशा असतात.

ज्वरघ्न, शक्तिवर्धक, पाचक व स्तंभक हे गुण. हिंवज्वर, ज्वरानंतरची अशक्तता, अपचन व उलटी, हगवण व खोकला यांवर उपयोजितात. साल वस्त्राला रंग देण्यास उपयोगी पडते.

ज्वरांत २०--३० ग्रेन पूड ताप नसतांना ३ ते ४ तासांनीं घ्यावी. हिंवाच्या पाळीच्या अगोदर व घामानंतर घ्यावी. शक्तीसाठीं व इतर विकारांत ५--१० ग्रेन पूड घ्यावी. मुलांस वयोमानाप्रमाणें प्रमाण.

ज्वरांत अतिविष व इतर औषधें घालून काढाहि देतात. व लहान मुलांच्या आजारावर चूर्णहि देतात. यास कीड फार लवकर लागते म्हणून घुणप्रिया हें नांव.

**अतिसार**—मनुष्यास वरचेवर मलविसर्जन होऊं लागलें म्हणजे अतिसार होतो. याचे अनेक प्रकार आहेत: (१) विषूचिकायुक्त अतिसार–हा फार तीव्र असून त्यामध्यें वरचेवर रेच होतात व त्यांत रक्त जाऊं लागतें; तसेंच ओकाऱ्या होतात व ग्लानि येते. (२) अंतस्त्वचायुक्त अतिसार–यामध्यें मलाबरोबर अंतरत्वचा बाहेर पडूं लागते. (३) उन्हाळ्यांतील अतिसार–हा लहान मुलांस होतो. यांत मुलें अगदीं निपचित पडतात. याची सांथ असल्यास मृत्यूचें प्रमाण फार मोठें असतें. (४) मज्जातंतुविषयक अतिसार–हा बहुधा एखाद्या भावनातिशयितेपासून होतो. वरील सर्व प्रकारांमध्यें रेचक औषधें देण्यांत येतात व कोणतेंहि घनस्थितींतील अन्न देण्याचें बंद करण्यांत येतें. यानंतर आंतड्यास मृदुता येईल अशा तऱ्हेचीं औषधें देण्यांत येऊन हळूहळू नेहमींचा आहार देण्यांत येतो.

**अतिसूक्ष्मदर्शक**—(अल्ट्रामायक्रोस्कोप). या उपकरणानें द्रव्याचे अत्यंत सूक्ष्म कण पाहतां येतात. एका बाजूनें दृश्य पदार्थावर प्रखर उजेड पाडण्यांत येतो. त्या पदार्थांतील कण प्रकाशाचें विकिरण केल्यामुळें चकाकूं लागतात व त्यांवर अतिशय तीव्र शक्तीचा सूक्ष्मदर्शक केंद्रित केला म्हणजे त्या कणांमुळें जे विकिरणाचे परिणाम घडून येतात त्यांवरून ते कण दृश्य होतात. मात्र त्यांचा आकार स्पष्टपणें दृष्टीस पडत नाहीं.

**अतीत**—सातारा जिल्ह्यांतील हें गांव. १७३० त रामचंद्र पंडित अमात्य यास सरंजाम दिल्याचा उल्लेख आहे (रा. खं. ८.१२२,२६१). शके १६१८ कार्तिकामध्यें धनाजी जाधव यानें येथील देशमुखीहक्काबद्दलच्या तंट्याचा निकाल करून महादजी जगदाळे याजकडे तो हक्क असल्याचें कळविलें. (रा. खं. १५.४८,९३).

**अतीत जात**—कच्छमधील एक जात. पोटजातीचें नांव नांवापुढें लावतात. हे शैव आहेत. या लोकांस ब्रह्मचर्य किंवा गृहस्थाश्रम कोणताहि स्वीकारतां येतो. पहिल्यांस मठधारी व दुसऱ्यांस घरबारी म्हणतात; मद्य–मांस खातात. उदरनिर्वाहार्थ भिक्षा किंवा इतर धंदेहि करतात. यांना गोसावीहि म्हणतात. जानवें घालीत नाहींत. पुनर्विवाह संमत असून मरणोत्तर समाधि बांधून त्यावर लिंग बसवितात. वस्ती भुजमधील कल्याणेश्वर अंजार येथील अजेपाल व पश्चिमेकडील कोटेश्वर. आसामांतहि थोडी वस्ती आहे.

**अतीतानंद**—एक मराठी ग्रंथकार. याचे गुरु शिवानंद असावेत. ग्रंथ–योगवासिष्ठ.

**अतीश**—अतीश किंवा दीपंकर हा बौद्धधर्मीय साधु हिंदुस्थानचा रहिवासी. यानें पाल राजाच्या उत्तेजनावरून तिबेटांत जाऊन तेथें ऱ्हास पावत असलेल्या बौद्धधर्मास नवीन स्वरूप दिलें. तेथील बौद्धधर्म अनीतिमान् भिक्षूंच्या ताब्यांत गेल्यानें व पिशाचभक्तीमुळें अवनतीस पोंचला होता. अतीशनें शुद्धतम बौद्धधर्माचा नमुना पुढें ठेवून कादम नांवाचा नवीन पंथ काढला. हाच तिबेटच्या गेलुग राष्ट्रधर्माचा पाया होय. ब्रह्मचर्यपालन व पिशाचभक्तिउच्चाटण ह्या धार्मिक सुधारणा त्यानें केल्या व 'बोधिपंथप्रदीप' हा प्रख्यात ग्रंथ व बौद्ध भाष्यांचीं तिबेटी भाषांतरें केलीं. याच्या उपदेशानें सस्क्य व कर्ग्यु हे अर्धवट पंथ सुधारले व सस्क्य पंथ बळावला. इ. स. १०५२ त अतीश ल्हासाजवळ ने-टंग येथें मरण पावला. तेथें उभारलेला एक मोठा स्तूप दिसतो.

**अतूर**—मद्रास इलाखा, सालेम जिल्हा, अतूर तालुक्याचें ठिकाण. लोकसंख्या १० हजार. उत्तरेस जुना किल्ला आहे. घेटी मुदलियार या सरदाराचें राहण्याचें ठिकाण. सालेम त्यागद्रुगच्या घाटावर असल्यामुळें हैदरअल्लीच्या युद्धांत यास महत्त्व होतें. १७६८ त इंग्रजांनीं टिपूपासून हा किल्ला घेतला. येथें नीळ व बैलगाड्या चांगल्या होतात.

**अंतोबा गोसावी**—समर्थ रामदासस्वामींचा शिष्य. सातारा भागांत मेथवड म्हणून जो गांव आहे तेथील हा रहिवासी. समर्थांनीं यास पंढरी येथें आषाढी–कार्तिकीस जात जावें म्हणून आज्ञा करून त्यास तेथें एक मठ बांधून देवविला होता. असें सांगतात कीं, समर्थच या दोन्ही वाऱ्यांस कित्येक वर्षें जात असत. परंतु पुढें आपणांस न जमल्यास यानें जात जावें असें सांगितल्यावरून हा जाऊं लागला.

**अत्तर**—मनुष्यास शब्द, स्पर्श, रूप, रस हे जसे प्रिय आहेत तसेंच घ्राणेंद्रियास प्रिय असलेलीं अत्तरें किंवा सुवासिक तेलें व पदार्थ यांचा उपयोग मनुष्यजातींत फार पूर्वीपासून प्रचलित आहे. फुलांचा मधुर वास, कस्तुरी मृग, जवादी मांजर वगैरे प्राण्यांपासून निघणारीं सुगंधी द्रव्यें व वनस्पतिजन्य निर्यास

यांपासून निरनिराळीं अत्तरें व तेलें तयार होतात. त्यायोगें मनुष्याचें मन आल्हादित व सुप्रसन्न होतें. पूर्वी सुधारलेल्या सर्व देशांत व हिंदुस्थानांत याचा खप होत असे व त्यामुळें हें तयार करण्याची कला पूर्णत्वास पोंचली होती. यांत विपुल सुगंधी द्रव्यें असल्यामुळें हिंदुस्थान अग्रेसर होता. याचा उपयोग शोकी व विलासी लोकच करीत नसून, धार्मिक संस्कार व शुभ कृत्यें यांतहि वापरतात. देवपूजा, साधुसंतांचा सत्कार, व अभ्यंगस्नान याकरितांहि याचा सर्वत्र उपयोग फार पूर्वींपासून प्रचलित आहे. मिसर देशांत प्रेतसंस्काराच्या वेळीं याचा उपयोग करीत. व ग्रीस व रोममध्यें तर यांचा शोक वाढून किंमती बेसुमार चढल्यामुळें त्यास आळा घालण्याकरितां वेळोवेळीं कायदे करावे लागले. जंगली जातींतहि अत्तरें व सुगंधी द्रव्यें वापरतात व गृहशुद्धीकरितां चंदन, ऊद, अबीर जाळण्याचा प्रघात आहे. सुगंधी द्रव्यें वर सांगितलेल्या पदार्थांखेरीज रासायनिक मिश्रणानेंहि तयार होतात. त्यांना रासायनिक सुगंध म्हणतात. रासायनिक अर्क जर्मनी वगैरे देशांहून येत असल्यामुळें व ते स्वस्त असल्यामुळें आपल्याकडील अत्तरांचे कारखाने बहुतेक नामशेष झाले आहेत. अर्कांच्या मिश्रणानें सुगंधी तेल करणें सोपें आहे. त्यामुळें येथील सुगंधी द्रव्यें परदेशीं पाठविणें हाच धंदा शिल्लक आहे.

कोट्यवधि रुपयांचा सुगंधी माल परदेशीं जातो व निरनिराळे अर्क व अत्तरें यांच्या रूपांत परत येतो.

दिल्ली, अमृतसर व लाहोर येथून या अत्तरांचा व्यापार चालतो व मुंबई बंदरांतून कच्चा माल बाहेर जातो. नुसतीं सुगंधी द्रव्यें बाहेर जातीं तर त्यामुळें नुकसान झालें नसतें, परंतु त्यांचीं अर्क व अत्तरें परत आल्यानें कनोजच्या अत्तराचे कारखाने बंद पडले आहेत. हे अर्क साध्या तेलांत मिसळून तेलें व अत्तरें करणें सोपें आहे, पण अस्सल अत्तरापेक्षां कमी दर्जाचे असूनहि स्वस्तपणामुळें त्यांचा खप अतोनात होतो. जर्मनीशीं लढाई सुरू होती तेव्हां अर्क येणें बंद झालें व त्यामुळें देशी कारखान्यांची थोडी चलती झाली. कनोज, गाझीपूर व जौनपूर हीं शहरें अत्तराविषयीं प्रसिद्ध आहेत. आपल्याकडील तेलें व अत्तरें काढण्याच्या कृति गांवठी असल्यानें परकीय मालापुढें त्यांचा टिकाव लागत नाहीं.

अत्तरें व सुगंधी तेलें, गुलाबपाणी, ऑरेंज वॉटर, कोलन वॉटर, लव्हेंडर वॉटर, उदबत्त्या, अगरबत्त्या, केशराच्या गोळ्या, कृत्रिम कस्तुरी, अरगजा, दशांगाच्या गोळ्या व उटणीं ३०. करण्याच्या निरनिराळ्या कृति आहेत. या कृतींमुळ शुद्ध अत्तरें, सुगंधी माल, व तेलें निघतात खरीं; पण अलीकडे रसायनशास्त्राच्या प्रगतीनें या कृतींची जरुरी राहिली नाहीं. रासायनिक रीतीनें सुवासिक द्रव्याचें पृथक्करण करून मूलद्रव्यें कोणतीं व कोठें मिळतात तीं शोधून काढतात. व त्यामुळें निघालेले अर्क तेलांत मिसळून स्वस्त दरांत विकतां येतात. पण अस्सल अत्तरांत असलेला मृदुपणा व सुवास मात्र यांत नसतो. कारण सुगंधी फुलांतील सूक्ष्म मृदुपणा आणणाऱ्या पदार्थांचा रसायनशास्त्रज्ञांस अद्याप शोध लागलेला नाहीं. व त्यामुळें कृत्रिम सुगंधाची क्रिया पूर्णत्वास गेलेली नाहीं.

युरोपमध्यें अत्तर (ओटो) फक्त गुलाबाच्या फुलांचेंच माहीत आहे. एक लाख फुलांपासून १८० ग्रेन अत्तर निघतें. बाजारांतील विलायती अत्तर बहुधा बाल्कन्स प्रदेशांतून आलेलें असतें. तेथें वीस हजारांवर बल्गेरियन लोक गुलाबाचे लहान बाफे यासाठींच तयार करतात.

**अत्तार फरिदुद्दिन** (१११९–१२२९)— एक इराणी कवि व गूढतत्त्ववादी. मूळ नांव अबू तालिब महमद बिन इब्राहिम. फरिदुद्दिन (धर्मांतील मोतीं) हा किताब. आपल्या बापाचा गंध्याचा धंदा करी. एकदां एका फकिरानें त्यास सांगितलें कीं, 'हा सर्व माल येथेंच सोडून तुला मृत्यूला कवटाळावें लागेल, याबद्दल मला वाईट वाटतें!' त्या वेळेपासून तो गूढ व अज्ञेय आत्म्याबद्दल विचार करूं लागला. धंदा सोडून देऊन तो पारमार्थिक गोष्टींकडे वळला व त्यानें निरनिराळ्या देशीं व क्षेत्रीं पर्यटन केलें. चेंगिझखानाच्या सैनिकानें गुलाम म्हणून त्यास पकडलें व विकीत असतां थोडा वेळ थांबल्यास जास्त रक्कम येईल असें त्यास सांगण्यांत आलें. पण तशी रक्कम न आल्यानें त्या सैनिकानें याला ठार मारलें. असा याचा अंत झाला. याच्यावर एक भव्य थडगें उभारलें असून त्यास धार्मिक महत्त्व आहे. यानें १,२०,००० द्विपाद कविता केल्या असून त्यांत 'मंतिक आतर' हें प्रसिद्ध आहे. त्यांत ब्रह्मपदीं लीन होण्यास जीवास काय धडपड करावी लागते व त्यास काय मिळतें हें दाखविलें आहे.

**अत्माकुर**— अमरचिंत. हैद्राबाद संस्थान, रायचूर जिल्ह्यांतील एक मांडलिक संस्थान. यांत खेडीं ६९. क्षेत्रफळ १९० चौ. मै. लोकवस्ती ३५ हजार. उत्पन्न २४ लाख. निजामास खंडणी ६३६३ रुपये. संस्थान जुनें, पण कागदोपत्रीं उल्लेख नाहीं. अत्माकुर किल्ला सुस्थितींत असून राजाचें राहण्याचें ठिकाण आहे. हें व गढवाल संस्थान यांत कृष्णा नदी. उत्तम मलमल, धोतरें व पागोटीं येथें होतात.

**अत्याग्निष्टोम**— सप्त सोमसंस्थांपैकीं एक याग. अग्निष्टोम यागानंतर करतात. यांतील कर्म अग्निष्टोमाप्रमाणेंच असतें. अग्निष्टोमांत सुत्येच्या (शेवटच्या) दिवशीं बारा शस्त्रांचें शंसन व बारा स्तोत्रांचें गायन होतें तर यांत ही संख्या तेरा असते. हल्लीं सप्तसोमसंस्था (याग) वेगळाल्या करीत नाहींत. तर

अग्निष्टोमानंतर शेवटची सोमसंस्था जो सर्वपृष्ठनामक याग त्यांतच या सर्वांचा समावेश केला जातो. संहिता ग्रंथांत याचा उल्लेख नाहीं.

**अत्युष्णता योजना**— ( सुपर हीटर ). या यंत्राचे तीन भाग असतात. १ विभाजक, २ उष्णतादायक नळ्या, ३ संचायक. विभाजकामध्यें एका नियामक पड्यांतून गरम वाफ येत असते. ती उष्णता देणाऱ्या नळ्यांत वांटली जाते, आणि त्यापासून अत्युष्णता उत्पन्न होते. अनेक यंत्रांतून विभाजक आणि संचायक एकाच ठिकाणीं जोडून ओतलेले असतात. विशेषतः आगगाड्यांमध्यें अशी रचना असते. यास शीर्षक ( हेडर ) म्हणतात. हें यंत्र तापकास जोडलेलें असतें किंवा स्वतंत्रपणें जोडण्यांत येतें.

**अत्राफ बल्दा**—हैद्राबाद संस्थानांतील सरफखास इलाखा, एक जिल्हा. क्षे. फ. ३३९९ चौ. मै.. बहुतेक भाग डोंगराळ असून मुशी व मांजरा या नद्या वाहतात. संरक्षित व इतर जंगलांत श्वापदें आढळतात. तळीं व पाण्याचे प्रवाह यांमुळें हवा सर्द व पावसाळ्यांत मलेरिया होतो. ऑक्टोबर ते मार्च निरोगी. पाऊस ३३ इंच. हा जिल्हा इतिहासप्रसिद्ध आहे. १३२६ पूर्वी वरंगळच्या काकतीय राजांच्या ताब्यांत व नंतर मुसलमान व हैद्राबाद संस्थान स्थापन झाल्यावर त्या संस्थानांत आहे. हैद्राबादच्या पश्चिमेकडील गोवळकोंड्याचा किल्ला कुतुबशाहीची राजधानी होती. हैद्राबाद शहर सोडून लोकसंख्या ९ लक्ष व भाषा तेलगू. जमिनींत वाळूचें प्रमाण जास्त असून ज्वारी, बाजरी व तांदूळ हीं पिकें, कंकर, बासाल्ट व ग्रनाइट, अशुद्ध सोडा व शहाबादी दगड ही खनिज संपत्ति. चांदूरला साड्या व हातरुमाल व असफनगरला तांब्यापितळेचीं भांडीं होतात. ज्वारी, तांदूळ, इतर धान्यें, कापूस, गूळ, तंबाखू, कातडीं, हाडें ही निर्यात; व मीठ, अफू, रेशम व सुती कापड, केरोसीन ही आयात. हैद्राबाद हें व्यापारी ठाणें व इतर ठिकाणीं आठवडा बाजार. निजाम स्टेट रेल्वे या जिल्ह्यांतून पूर्वपश्चिम गेली असून इतर सडकाहि मुख्य शहरास जाणाऱ्या आहेत. या निजामाच्या खाजगी इलाख्याचें उत्पन्न बेचाळीस लाख आहे.

**अत्रि**— १. मूळ शब्दार्थ 'खाणारा' असा आहे. हा अग्नि, इन्द्र, अश्विन् व विश्वेदेवता यांच्या सूत्रांचा कर्ता म्हणून उल्लेख वेदांत आहे. स्वायंभुव मन्वन्तरांत ब्रह्मदेवाच्या दहा मानसपुत्रांपैकीं त्याच्या नेत्रापासून झालेला मुलगा. यास कर्दम प्रजापतीच्या अनसूया नामक मुलीपासून दत्त, दुर्वास, आणि सोम असे तीन मुलगे झाले. महादेवाच्या शापानें अत्रीसह सर्व ब्रह्मदेवाचे मुलगे मरण पावले.

पूर्वीचे मुलगे मरण पावल्यावर वैवस्वत मन्वंतरांत ब्रह्मदेवानें यास पुनः उत्पन्न केलें. ब्रह्मदेवानें केलेल्या अग्नीच्या ज्वालेपासून हा उत्पन्न झाला व अनसूयेपासून यास दत्त, दुर्वास, सोम, अर्यमा हे चार मुलगे व अमला मुलगी झाली. हा प्रस्तुत ज्येष्ठ मासांतील द्वादशादित्यांतील एका आदित्याबरोबर संचार करतो.

दाशरथि राम दंडकारण्यांतून चालला असतां याच्या आश्रमांत आल्यावर यानें रामाचें व अनसूयेनें सीतेचें आदरातिथ्य केलें व सीतेला पातिव्रत्यविषयक नीति सांगितली व मार्गांत श्रम व राक्षस यांपासून त्रास होऊं नये म्हणून अंगरागादिक उत्तम वस्तू दिल्या व अत्रीनें राम-लक्ष्मणांना मार्ग दाखवून मार्गस्थ केलें. ( वा. रा. अयो. स. ११७-११९ ).

याच्या कुलांत याच्यासह सहा मंत्रद्रष्टे ऋषि होते.

२. गौतम ऋषीचा मित्र, एक ऋषि, व असुरगुरु शुक्र याचा हा दुसरा मुलगा. हा वेनकुलोत्पन्न राजाच्या यज्ञांत द्रव्ययाचनेकरितां गेला असतां यानें राजाची ईश्वर म्हणून स्तुति केली. तिचा बाह्यात्कारीं तिरस्कार करून राजानें राजाची ईश्वराशीं तुलना करणें योग्य नाहीं असें सांगितलें. असा दोघांत वाद पडला असतां यथार्थ निर्णयाकरितां सनत्कुमारांकडे गेले. सनत्कुमारांनीं अत्रीचें म्हणणें बरोबर सांगतांच राजा संतुष्ट होऊन त्यानें अत्रीस प्रभूत धन दिलें व मग तो आश्रमास आला. ( भार. वन. अ. १८५. )

**अथगड संस्थान**— ओरिसांतील एक देशी संस्थान. लोकसंख्या ५५, ४९८. जमीन सपाट व सुपीक असून मुख्य पीक भात. संस्थानचा मूळ पुरुष श्री. करणनीलाद्रि बवार्ता. हा पुरीच्या राजाचा प्रधान होता. त्या राजानें हें करणनीलाद्रीस बक्षीस दिलें. १९४७ सालीं हें संस्थान इतर संस्थानांबरोबर ओरिसा प्रांतांत विलीन झालें.

**अथणी**—मुंबई इलाखा, बेळगांव जिल्ह्यांतील ईशान्येकडील तालुका. यांत अथणी व कुडची हीं मोठीं गांवें. जमीन बहुतेक ओसाड व वृक्षरहित. हवा कोरडी व निरोगी. दक्षिण भागांतून कृष्णा वाहते. लो. सं. १६४१०४.

अथणी गांव—लोकसंख्या सुमारें १८ हजार. जुना गांव पडका असून उत्तर व दक्षिणेकडील दरवाजे अजूनहि पाहण्यास मिळतात. रविवारीं व सोमवारीं गुरांचा व इतर बाजार भरतो. १८५३ पासून म्युनिसिपालिटीहि आहे. कांहीं जिनिंगचे कारखाने असून एक कापडाची गिरणी आहे. कापूस, जोंधळा वगैरे धान्यें मुख्य पिकें आहेत. येथून विजापूरला मोटार जाते. मातीच्या पडक्या गढींत दोन वाडे असून सिद्धेश्वर, अमृतेश्वर हीं देवळें व जुनी मशीद आहे. सन १८३९ पासून हें इतिहास-

प्रसिद्ध शहर आहे. १८३९ त निपाणीचा संस्थानिक निपुत्रिक मरण पावल्यामुळें हा गांव ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत गेला.

**अँथनी** ( पदुआ येथील )—हा एक साधु असून याचा जन्म ११९५ मध्यें लिस्बन येथें झाला. यानें सेंट आगस्टाइन याच्या पंथांत प्रवेश केला. परंतु आपलें सर्व जीवन ख्रिस्ताकरितां समर्पण करण्याच्या कल्पनेनें त्यानें फ्रान्सिस्कन पंथांत प्रवेश केला. यानें प्रमाद व दुष्टपणा यांच्याविरुद्ध फार यशस्वी रीतीनें फ्रान्स व इटली या देशांत प्रचार केला. याचीं प्रवचनें ऐकण्याकरितां लोक आपलीं दुकानें बंद करून जात असें ऐकण्यांत येतें. याचा मृत्यु पदुआजवळ १३ जून १२३१ रोजीं झाला. सेंट अँथनी हा गरिबांचा कनवाळू म्हणून पंथांतील साधूंमध्यें फार लोकप्रिय साधु मानण्यांत येतो. विशेषतः हिंदुस्थानामध्यें ज्या लोकांच्या वस्तू निष्काळजीपणामुळें हरवतात ते याची प्रार्थना करतात म्हणजे त्या त्यांस मिळतात, अशी समजूत आहे.

**अँथनी, सुसान ब्रौनेल** (१८२०–१९०६ )— एक सुधारकाग्रणी अमेरिकन स्त्री. १८५२ सालीं मद्यपानप्रतिबंधक चळवळींत मन घालून त्यासाठीं सुसाननें बायकांची एक मद्यपानप्रतिबंधक संस्था काढली. त्याचप्रमाणें गुलामगिरीच्या विरुद्ध चळवळ करण्याकरितां तिनें अमेरिकन अँटीस्लेव्हरी सोसायटीच्या न्यूयॉर्क येथील शाखेचें धुरीणत्व पत्करिलें. १८५४ नंतर तिनें स्त्रियांच्या हक्कांसाठीं चळवळ करण्यास सुरुवात केली. या चळवळींत उत्तम व्याख्यात्री व लेखिका या नात्यानें तिची प्रसिद्धि झाली. १८६८ ते १८७० या अवधींत ' रेव्होल्यूशन ' (क्रांति) नांवाच्या एका साताहिकाचें संपादकत्व तिनें पत्करलें. ' नॅशनल वीमेन्स सफ्रेज अॅसोसिएशन ' नांवाच्या संस्थेची ती १८९२ मध्यें अध्यक्ष झाली. तिनें कांहीं विद्वान् बायांच्या साहाय्यानें, ' दि हिस्टरी ऑफ वुमन सफ्रेज ' हा मोठा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाचे चार खंड आहेत. १९१८ सालीं अमेरिकन स्त्री–मताधिकाराचा कायदा झाला.

**अथमलिक**—ओरिसांतील एक मांडलिक संस्थान. मूळ पुरुष प्रतापदेव. १८९४ त इंग्रजांनीं इतर ओरिसा संस्थानांप्रमाणें यास सनद दिली. क्षे. फ. ७११ चौ. मै.. उत्पन्न अडीच लाख. पाऊस ५१°. लोकसंख्या ७२,७५५. इमारती लांकूड, तांदूळ, गळिताचीं धान्यें यांचा व्यापार बैलगाड्यांनीं होतो. बी. एन. रेल्वेवर स्टेशन असून कटकवरूनहि जातां येतें. हें संस्थान १९४७ सालीं ओरिसा प्रांतांत विलीन झालें.

सध्यां राजे श्रीकिशोर चंद्रदेव गादीवर आहेत.

**अथर्वण** ( ब्राह्मण )—प्राचीन अग्निउपासक पुरोहितास अथर्वन् म्हणत. पुढें हें नांव सरसकट सर्व भिक्षुकांस पडलें. ' अथर्वन् ' शब्द पर्शुभारतीय काळाचा असून अवेस्तांतील अथ्रवन् याशीं संबद्ध दिसतो. ब्राह्मण जातीचा उदय होऊन तीकडे पौरोहित्य येण्यापूर्वी अथर्वण वर्गाकडे भारतीयांचें पौरोहित्य असावें असा समज आहे. अथर्वणांचा वेद अथर्ववेद असून त्याच्या पुढें शाखा, उपशाखा पडत गेल्या. सध्यां हिंदुस्थानांत या वर्गाचें अस्तित्व बहुतेक नष्ट झालें असून क्वचित् कोठें अवशेष दिसतात.

महाराष्ट्रांत कांहीं अथर्वण शाखेची मंडळी आहेत. रा. अंताजी काशीनाथ कुलकर्णी ( काळे ), रा. चिंधवली यांचें घराणें तेथें २–३ शें वर्षांपासून असून यांचें गोत्र भालंदन व प्रवर काश्यप, अवत्सार, नैध्रुव असे आहेत. यांचे कुलगुरु माहुलीकर नागेशभट बिन बाळंभट जोशी कौशिक गोत्री होते. चिंधवलीस तीन व मालवडीस कांहीं अथर्वणांचीं घरें आहेत. ४०–५० वर्षें यांचे विधि यांच्या शाखेप्रमाणें होत नाहींत. हे विधि करणारे ब्राह्मण सांगली व ग्वाल्हेर संस्थान त आढळतात. कुलकर्णी यांच्या शाखेचीं घराणीं सातारा जिल्हा, सांगली संस्थान, पुणें जिल्हा, व उत्तर हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं तुरळक आढळतात. या शाखेचे शरीरसंबंध देशस्थ, कऱ्हाडे यांच्याशीं होतात. आपला वेद सर्वांत वडील असल्याचें हे मानतात. आधिदैवत भार्गवराम आहे.

**अथर्ववेद** —चार वेदांपैकीं एक. हा अथर्वन् म्हणजे अग्निउपासक पुरोहितांचा वेद आहे. यांत मुख्यतः अभिचार मंत्र आहेत. या वेदाच्या नऊ शाखा आहेत; त्यांपैकीं शौनकी आणि पैप्पल या दोन शाखांचेच ग्रंथ उपलब्ध आहेत. या वेदाचीं वीस कांडें असून ऋचा सुमारें सहा हजार आहेत. या ऋचांपैकीं कित्येक ऋग्वेदांतीलच आहेत. यांतील रोगनिवारक मंत्र आयुर्वेदाचा पाया म्हणतां येईल. या वेदाचा ' गोपथ ' म्हणून एक ' ब्राह्मण ' ग्रंथ आहे. उपनिषदें पुष्कळच आहेत. आज अथर्ववेदी ब्राह्मणवर्ग बहुतेक नष्ट झाला आहे.

**अॅथॉस**— १. ग्रीस, एक पर्वत. हा ६७००. फूट उंचीचा पर्वत दक्षिण युरोपांतील मॅसिडोनिआ देशांत आहे.

२. ग्रीस, एक द्वीपकल्प. ३० मैल लांब व ५ मैल रुंद अशा या द्वीपकल्पांत २० मठसंस्था आणि पुष्कळ आश्रम आहेत. येथें सुमारें ६००० मठवासी उर्फ ख्रिस्ती भिक्षू राहतात. प्रत्येक मठसंस्था स्वतंत्र रीतीनें आपला कारभार चालवते व त्याकरितां वीस निवडक भिक्षूंचें मंडळ व त्याचे ४ अध्यक्ष नेमलेले असत. १९१२ पर्यंत या संस्था तुर्कांना सुमारें ४००० पौंड वार्षिक खंडणी देत असत. या द्वीपकल्पाचा राज्यकारभार अनेक शतकांपासून स्वयंशासित असून १९२६ सालीं ग्रीस सरकारानेंहि त्यास मान्यता दिली.

**अथीना**—ही प्राचीन ग्रीक लोकांची देवता, बुद्धिदात्री म्हणून प्रसिद्ध आहे. रोमन लोकांची याच गुणांची देवता मिनर्व्हा ही होय. ही देवता झ्यूस (ज्यूपिटर) आणि मेटिओ यांची कन्या असून शांततामय जीवनांतील कलांची आश्रयदात्री असा हिचा लौकिक आहे; त्यामुळें शिल्पकला, खोदकला, चित्रकला, वगैरे कलांचे उपासक आणि तत्त्ववेत्ते, वक्ते, आणि कवि हेहि हिला आपली अधिष्ठात्री देवता मानतात. या देवतेचीं आयुधें भाला, ऑलिव्ह वृक्षाची फांदी, साप, कोंबडा, घुबड हीं आहेत.

**अथेन्स**—ग्रीसची राजधानी. सुपीक व सुसंपन्न आटिका मैदानाच्या दक्षिणेस आहे. खाद्योपयोगी वस्तूंस तोटा नाहीं. जमिनीवरुन व समुद्रावरुनहि शत्रूंच्या टप्प्यांत नाहीं, त्यामुळें काळजी नाहीं. हवामान समशीतोष्ण पण लहरी. उत्तरेकडील वारे व समुद्रलहरी यामुळें उन्हाळा भासत नाहीं. स्वच्छ व उत्तेजक हवेमुळें लोक बुद्धिमान् व उत्साही.

पार्थेनान् देवालय

अगोरा ही अथेन्समधील व्यापारी पेठ होय. जेथें प्लेटो व आरिस्टॉटल शिकवीत ती अकेडमी, निसर्गदेवता व अपोलो यांचें वास्तव्य असलेल्या गुहा व ऑलिंपियन देऊळ हीं महत्त्वाचीं ठिकाणें. लोकसंख्या अथेन्स, पिरिअस व फेलेरॉन मिळून ४ लक्ष. दोन विश्वविद्यालयें व पुष्कळ शिक्षणसंस्था आहेत. हल्लीं व्यापारधंदा मोठ्या प्रमाणावर असून पिरिअसमध्यें कापडाच्या गिरण्या, वाफेनें चालणाऱ्या चक्क्या, साबणाचे व बोटी बांधण्याचे कारखाने आहेत.

अथेन्सच्या प्राचीन इतिहासाविषयीं खात्रीशीर माहिती मिळत नाहीं. पण दंतकथेवरून आयोनियन लोक येथें आले व त्यांनीं ज्ञातींचें एकीकरण करून राजसत्ता स्थापिली. परंतु ही राजसत्ता लवकरच जाऊन तेथें महाजनसत्ता आली, व लोकांचे हक्क हिरावून घेतले जाऊं लागले. पुढें पेसीट्रेटस याच्या स्वामित्वाखालीं एकतंत्री राज्यपद्धति सुरू झाली तिला क्लीस्थिनीझ यानें आळा घालून प्रजासत्ताक राज्याची मुहूर्तमेढ रोविली. थेमिस्टोक्लीझ यानें इ. स. पूर्वी ४५० त इराणवर जय मिळविला व आरिस्टिडीझ व सायमन या मुत्सद्यांनीं कर्तबगारीनें व कर्तव्यपरायणतेनें अथेन्सचें साम्राज्य स्थापलें व पेरिक्लीझनें व्यापार, वाङ्मय व संस्कृति या बाबतींत अथेन्सला शिखरावर पोहोंचविलें. इ. स. पूर्वी ४४३–४२९ हा काल अथेन्सच्या वैभवाचा उज्ज्वल काल होता. पेरिक्लीझनंतरचें मंत्रिमंडळ स्वार्थपरायण व नालायक असल्यामुळें अथेन्सच्या वैभवाचा नाश होऊन त्यास मासिडोनच्या फिलीपपुढें मान वांकवावी लागली. हा परकीय अमल इ. स. २२९ त दूर झाला व अथेन्स स्वतंत्र झालें. या वेळीं अथेन्स लष्करी राष्ट्र नसून लोकसत्ताक राज्यपद्धतीचें पुरस्कर्ते राष्ट्र होतें. यापुढील अथेन्स रोमन साम्राज्याखालील होय. त्या वेळीं हें राष्ट्र पंडितांचें राष्ट्र व 'ज्ञानाचें माहेरघर' असें कीर्तिवान् होतें. परंतु हें वैभवहि फार दिवस टिकलें नाहीं. जस्टिनीअनच्या तत्त्वज्ञान–अभ्यास–प्रतिबंधक कायद्यानें याचा अवतार संपला. यापुढील इतिहास बिझान्शिअमच्या अमलाचा काळ, लॅटिन अमलाचा काळ व तुर्क अमलाचा काळ होय! १४५८ ते १८३३ पर्यंत तुर्की अमल असून १८३३ त हें नव्या ग्रीसच्या राजधानीचें शहर झालें.

**अंदमान**— बंगालच्या उपसागरांत अंदमान ही एक सुमारें २१० बेटांची रांग असून उत्तर अंदमान, मध्य अंदमान, दक्षिण अंदमान व लघु अंदमान असे चार विभाग पाडले आहेत. एकूण क्षेत्रफळ २५०८ चौरस मैल आहे. मूळची रानटी लोकांची वस्ती सुमारें १५०० असून दक्षिण अंदमान ही काळ्या पाण्यावरच्या गुन्हेगारांची वसाहत म्हणून १८५८–१९४५ पर्यंत ब्रिटिश सरकारनें ठेविली होती. लो. सं. २१४८३ (१९४१). या बेटांत तांदूळ, कॉफी, अननस, जायफळ यांची लागवड होते. डोंगरावर झाडी बरीच आहे. नारळ आणि रबर यांचीं झाडें मुद्दाम लावण्यांत आलीं आहेत. मुख्य बंदर व राजधानी पोर्टब्लेअर आहे. हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलच्या हाताखालीं येथें एक चीफ कमिशनर असतो. दुसऱ्या महायुद्धांत १९४२ सालीं जपाननें हीं बेटें जिंकून घेतलीं. नंतर १९४५ सालीं जपानचा पराभव होऊन पूर्ववत् हीं हिंदुस्थानाकडे आलीं.

**अदवानी**—मद्रास इलाखा, बल्लारी जिल्ह्यांतील एक ताल्लुका. पूर्वी निजामचें पोट-संस्थान होतें. क्षेत्रफळ ८३९ चौ. मै.. लोकसंख्या सु. दोन लक्ष. अदवानी, योमिगनुर व कोसिगी हीं तीन शहरें व १९१ खेडीं. प्रदेश सपाट व जमीन काळीभोर. कांहीं उंचवटे आहेत. कापूस, चोलम, कोरा हीं पिकें. पिकें पावसावर अवलंबून त्यामुळें अवर्षणांत फार हाल होतात. जमिनीचा मगदूर चांगला आहे.

अदवानी हें ताल्लुक्याचें गांव. मद्रासपासून ३०७ मैलांवर. बल्लारीच्या खालोखाल मोठें शहर. लोकवस्ती सु. चाळीस हजार. कापसाच्या व्यापाराचें केन्द्र. कापसाचे गठ्ठे बांधण्याचे व सरकी काढण्याचे अनेक कारखाने असून सुती व रेशमी कापड हातमागावर होतें. टिकाऊ सतरंज्या होतात. १८६७ पासून म्युनिसिपालिटी असून पाण्यासाठीं मोठा तलाव आहे.

अदवानीचा किल्ला फार बळकट असून उंच गिरिशिखरावर आहे. कृष्णा व तुंगभद्रा नद्यांमधील सुपीक प्रदेशाचें नाकें आहे. त्यामुळें विजयानगरचें हिंदुराज्य व मुसलमानी राज्यें यांत व पुढें हैद्राबादचा नवाब, हैदरअल्ली, मराठे व इंग्रज यांचीं या प्रदेशाकरितां अनेक युद्धें झालीं. असा हा इतिहासप्रसिद्ध प्रांत आहे. १७८६ त हरिपंत फडक्यानें अदवानी घेतली नाहीं हें परशुरामभाऊस पटलें नाहीं. या वेळीं टिपूनें मराठ्यांकडून हा प्रांत घेतला, पण तो निजामकडे गेला. व १८०० त इंग्रजांस मिळाला.

**अंदाजपत्रक**—(बजेट). दरसालच्या जमाखर्चाचें अंदाजपत्रक आगाऊ, चालू साल संपण्यापूर्वी बहुधा तयार करून तें मंजूर करून घेण्यांत येत असतें. सरकारी अंदाजपत्रकांत पुढील सालीं जमेची खातीं कोणतीं, नवे कर कोणते, खर्चाची बाजू कशी, जास्त खर्च कोणत्या बाबींत होणार, वगैरे गोष्टी आंकड्यांसह मांडलेल्या असतात. इंग्लंडमध्यें १७६० पासून अंदाजपत्रकाची प्रथा सुरू झाली. आज सर्वत्र खासगी व सार्वजनिक संस्थांतूनहि अंदाजपत्रक जमाखर्चाच्या हिशेबाबरोबरच सभासदांना सादर करण्यांत येत असतें.

**अदाना**—तुर्कस्तान, आशिया मायनरच्या आग्नेयीकडील एक विलायत. यांतच प्राचीन सायलेशिया मोडतो. खनिज संपत्ति विपुल आहे. अदाना इतिहासप्रसिद्ध व महत्त्वाचें लष्करी ठाणें आहे. खलीफ हरुन अल् रशिद यानें बांधलेल्या इमारती असून रोमन लोकांचें लष्करी ठाणें होतें. लो. सं. १००३६७ (१९४५).

**अदिकल**— मद्रास, अंबलवासी जातिसमूहापैकीं एक वर्ग. हे मूळचे ब्राह्मण पण भद्रकालीच्या देवळांत उपाध्येपण व मद्यमांस यांचे नैवेद्य दाखविल्यामुळें हे भ्रष्ट झाले म्हणतात. यज्ञोपवीत धारण करतात व क्षुद्र देवतांच्या देवळांत उपाध्येपण व इतर कामें करतात. लग्न आणि वारसा मक्कतयम नियमांप्रमाणें असून वृद्धि व सुतक दहा दिवस पाळतात. दहा गायत्री जपतात व याच जातीचे लोक यांची भिक्षुकी करतात. बायकांस आदियम्मा म्हणतात व त्या नम्बुद्रि बायकांसारखे फक्त दागिने घालतात.



**आदिचनल्लूर**—मद्रास इलाखा, तिनिवेल्ली जिल्हा, श्रीवैकुंठम् ताल्लुक्यांतील एक खेडें. श्रीवैकुंठम्‌पासून ३ मैलांवर व पालमकोट्टापासून १५ मैलांवर आहे. ताम्रपर्णी नदीच्या उजव्या तीरावर असून पुराणवस्तुसंशोधन खात्याचें मुख्य ठिकाण आहे. ही दक्षिण हिंदुस्थानांतील मोठी प्राचीन स्मशानभूमि असून तत्कालीन भांडीं व इतर वस्तू पुरलेल्या आढळतात. त्याकरितां सरकारनें १०० एकर जमीन राखून ठेविली आहे. पाण्डव राजांच्या वेळीं हें एक मोठें शहर असावें असें वाटतें. येथील संशोधित वस्तू मद्रास येथें पदार्थसंग्रहालयांत ठेविल्या आहेत.

**अदिति** (देवता)—कश्यप ऋषीच्या तेरा स्त्रियांतील ज्येष्ठ. प्रचेतस् दक्षाची कन्या व आदित्यसंज्ञक बारा देवांची आई. मैनाक पर्वतावरील विनशननामक तीर्थाच्या ठिकाणीं अदितीनें चरु शिजविला होता. प्राग्ज्योतिष नामक अगम्य व अभेद्य असुरांच्या नगरांतील महाबली भूमिपुत्र नरकासुरानें आदितीचीं नेलेलीं रत्नमय कुंडलें श्रीकृष्णानें परत आणलीं (महा. उद्यो. ४८). या प्रसंगावर कदंब कवीनें आदिति–कुंडलहरण हें नाटक लिहिलें आहे. श्रीकृष्णांनीं अदितीच्या उदरांत सात वेळां गर्भरूपानें प्रवेश केला. अदितीच्या पृश्निप्रभृति रूपांतरांत तिच्या गर्भरूपानें निर्माण झालेला असा श्रीकृष्ण एकच आहे (महा. शांति. ४३). पूर्वी देवयुगांत हिनें पुत्रप्राप्तीसाठीं एका पायावर उभें राहून तपश्चर्या केली व श्रीविष्णूनें तिचे पोटीं जन्म घेतला. (महा. अनु. ८३).

**अदिलाबाद**—हैद्राबाद संस्थान, वरंगळच्या उत्तरेकडील एक जिल्हा. १९०५ च्या फेरबदलापूर्वी हा शिरपूर व तांडूर यांचा बनलेला एक पोटभाग होता. पैनगंगा नदीमुळें हा वऱ्हाडापासून निराळा झाला आहे. तसेंच वर्धा व प्राणहिता या नद्यांमुळें चांदापासून निराळा झाला आहे. क्षेत्रफळ ७४०३ चौ. मै.. सह्याद्रि किंवा सातमाळ डोंगर वायव्य ते आग्नेयीस १८५ मैल आहे. गोदावरी दक्षिण भागास पाणी पुरवीत असून पैनगंगा ही दुसरी नदी. मोठालीं अरण्यें असून त्यांत सागवान, आंबा, चिंच, वगैरे मोठीं झाडें आहेत. डोंगराळ प्रदेशांत हिंस्र पशु व मैदानांत नीलगाय, सांबर, भेकर हीं आढळतात. मो॰ अरण्यांमुळें हा भाग रोगट असून ४१ इंच पाऊस प

लोकसंख्या सु. सहा लक्ष. जिल्ह्याचे दहा तालुके असून राज्यव्यवस्था तीन तालुकदारांच्या हातीं आहे.

अदिलाबाद शहर— यासच एदलाबाद म्हणत असून तालुक्याचें व जिल्ह्याचें ठिकाण. लोकसंख्या सु. दहा हजार. येथें सर्व कचेऱ्या, शाळा व पोस्ट ऑफिस असून एक हिंदु देवालय आहे. तेथें प्रतिवर्षी यात्रा भरते. ही एक धान्याची पेठ आहे. गुरांचा मोठा बाजार भरतो. तेलगूंत एदला म्हणजे जनावर.

**अदृश्य सृष्टीचें संशोधन**—आपल्यासभोंवतीं जी सृष्टि आहे ती अंशतः आपणाला दिसते व बाकीची इंद्रियांस अगोचर असते. माणसाचा जीव, धर्मांत सांगितलेले भुवर्लोक, स्वर्लोक वगैरे लोक, मरणोत्तर स्थिति, देवदेवता, वगैरे गोष्टी माणसाला दिसत नाहींत. जगांतील निरनिराळ्या धर्मांत या व दुसऱ्या अनेक अदृश्य गोष्टींच्या प्रक्रियांचें वर्णन आहे. माणसाच्या इंद्रिय-शक्ति जर कुशाग्र करतां आल्या तर ह्या साऱ्या अदृश्य गोष्टी त्याच्या इंद्रियांच्या टप्प्यांत येतील व शास्त्रज्ञ जसे दृश्य सृष्टीचें अवलोकन करून निरनिराळीं शास्त्रें बनवितात, तद्वत् त्या कुशाग्र इंद्रियशक्तींनीं अदृश्य गोष्टींचें पद्धतशीरपणानें व तपशील-वार अवलोकन करून एक अदृश्य सृष्टीचें शास्त्र तयार करतां येईल, असें कांहीं शास्त्रज्ञांचें मत आहे. राजयोगांतील क्रियांनीं माणसाला आपल्या इंद्रियशक्ति अधिक तीव्र करतां येतात. या तीव्रतर इंद्रियशक्तींना 'सिद्धि' असें नांव आहे. या सिद्धींनीं अदृश्य सृष्टीचें अवलोकन करून जी अनुभवसिद्ध माहिती मिळते तिच्या शास्त्राला इंग्रजींत ऑकल्टिझम म्हणतात. मराठींत 'अदृश्य सृष्टीचें शास्त्र' असें नांव दिल्यास चालेल. जगांतील सर्व धर्मसंस्थापकांना व संतांना सिद्धि प्राप्त झालेल्या होत्या व त्या सिद्धींच्या द्वारां मिळविलेल्या ज्ञानावर त्यांनीं जगांतील सर्व धर्म मूलतः उभारलेले आहेत. म्हणूनच सर्व धर्म ज्ञानमूलक आहेत, असें थिऑसफीचें म्हणणें आहे. अनेक थिऑसफीय पुढाऱ्यांनीं अलीकडच्या काळीं स्वतः सिद्धि प्राप्त करून घेऊन धर्मांत आलेल्या अदृश्य गोष्टींचें पुनः निरीक्षण केलें आहे, आणि त्या आधारावर धर्माची नवीन मांडणी करून ती जगासमोर ठेविली आहे, असें थिऑसफिस्ट समजतात.

**अदेयमिळकत**—(मॉर्टमेन). ज्याला जीव नाहीं म्हणजे ज्याला मिळकतीची देवघेव करतां येत नाहीं, अशाच्या म्हणजे संस्थेच्या ताब्यांतील जी मिळकत तिला कायद्यांत 'मॉर्ट-मेन' म्हणजे मृताच्या ताब्यांतील मिळकत, असें म्हणतात. चर्च वगैरे धार्मिक संस्थांच्या ताब्यांतील मिळकत ही मृतांच्या ताब्यांतील मिळकत आहे व तिची देवघेव, गहाणविक्री, वगैरे करतां येत नाहीं, असा कायदा ('स्टॅट्यूट ऑफ मॉर्टमेन') इंग्लंडांत आहे. जुन्या हिंदुकायद्यांतहि देवस्थानच्या, मठांच्या वगैरे धार्मिक संस्थांच्या मिळकतीला हाच नियम लागू आहे. त्यांना सामान्यतः 'देवस्थान–इनाम' म्हणतात. तसेंच अशा देवस्थानांत किंवा मठांत झाडलोट, देवपूजा, आरती, नैवेद्य, वगैरे कामें करणाऱ्या देवस्थानच्या नोकरांना ज्या इनाम जमिनी दिलेल्या असतात, त्यांची गहाण, खरेदी, वगैरे कोणत्याहि प्रकारची तबदिली करण्याचा हक्क अशा नोकरांना नसतो. अशीं इनामें त्या देवस्थानकडे कायमचीं चालतात.

**अद्भुतवाङ्मय**— (रोमॅन्टिसिझम). युरोपमधील अभिजात वाङ्मयाचा काल म्हणजे फ्रान्सच्या १४ व्या लुईची कारकीर्द. याच काळांत ब्रिटनमध्यें ड्रायडन, पोप व जॉन्सन हे वाङ्मयांतील स्वतंत्र शिलेदार होऊन गेले. ब्रिटिश वाङ्मयाच्या या सुवर्ण-युगांत कौले, मार्वेल, सॅम्युएल बटलर, स्विफ्ट, ॲडिसन, स्टील, डेफो, थॉमसन, ग्रे यांसारखे लेखक प्रसिद्धीस आले आहेत. फ्रान्सच्या अभिजात वाङ्मययुगांत बायले, बोसुए, फेनेलॉं, लॅब्रुएर, ला फॉन्तेन, ब्वालो, कॉर्नेय्ये, रासीन आणि मोलिए हे थोर साहित्यिक चमकले. १८ व्या शतकाच्या मध्यावर पश्चिम युरोपांत अभिजात कलेविरुद्ध हाकाटी सुरू झाली. याचे प्रतिध्वनि ब्रिटन-मध्यें साहजिक उठून अद्भुतरम्य काव्याचा उदय झाला. या अद्भुतरम्य संप्रदायाचा अध्वर्यु वर्डस्वर्थ असून स्कॉट, कॉलेरिज, बायरन, शेले, कीट्स यांनीं तर त्याला पूर्णता आणली. ही अद्भुतरम्यतेची लाट इतर राष्ट्रांतून पसरली. फ्रान्समध्यें रूसोचें वाङ्मय, तसेंच शातोब्रिआन्द, लामातीन, दम्युसे व व्हिक्टर ह्यूगो यांचें लेखन यांतून याचीं प्रत्यंतरें पाहण्यास मिळतील. जर्मनींत लेसिंगपासून या चळवळीची सुरुवात झाली व हर्डर, शिलर, गॉएटे, स्लेजेल, वगैरे साहित्यवीरांनीं ती उचलून धरली. मान्झोनी आणि लिओ पर्डी हे इटलींतील व पुष्किन, गोगोल, आणि लेरमान्टोव्ह हे रशियांतील अति प्रसिद्ध लेखक याचे पुरस्कर्ते म्हणतां येतील.

युरोपांत ग्रीक आणि रोमन वाङ्मयतंत्राच्या कचाटींतून सुटण्या-साठीं व स्वतंत्र विचार आणि भावना यांना वाव देण्यासाठीं हा वाङ्मयप्रकार निघाला. याचेंच अनुकरण आपल्याकडे साहित्यि-कांनीं करून संस्कृतचा पगडा उडवून दिला. मात्र संस्कृतऐवजीं इंग्रजी वाङ्मयाची गुलामी सुरू झाली. इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें आणि रूपांतरें बहुतेक देशी भाषांतून अर्वाचीन साहित्य म्हणून पुढें आलीं. विसाव्या शतकाच्या आरंभापासून इंग्रजीचा पांगुळगाडा बाजूला ठेवून आपलें स्वतंत्र साहित्य सर्वच वाङ्मय-क्षेत्रांतून निर्माण करण्याचे स्तुत्य प्रयत्न चालले आहेत.

संस्कृतांत अद्भुतरम्यकथांमध्यें बृहत्कथा, दशकुमारचरित, कादंबरी, वासवदत्ता, इ. येतात. पाश्चात्य वाङ्मयाची उसनवारी यांत दिसत नाहीं. मराठींत मुक्तामाला, मंजुघोषा, विचित्रपुरी,

वगैरेंचीं नांवें घेतां येतील. लहान मुलांसाठीं अद्भुतकथा सर्वत्र वाङ्मयांतून आढळतात व त्यांची एकसारखी निपज चालू आहेच. प्रौढांसाठीं मात्र आतां अद्भुतकथा लिहिण्याचें बंद झालें आहे. आधुनिक कादंबरीकार आतां जास्त वास्तववादी झाले आहेत हें खरें.

**अद्वैतमत**—अद्वैत मताचे पहिले पुरस्कर्ते श्रीमत् शंकराचार्य हे होत. यांचा जन्म इ. स. च्या आठव्या शतकांत झाला. त्यांच्या वेळीं या देशांत बौद्ध व जैन हीं मतें चोहोंकडे माजलीं होतीं. त्या मतांचें खंडण करून अद्वैतमताचें प्रस्थापन करण्याचें महत्कार्य शंकराचार्यांनीं केलें. श्रौत, स्मार्त, वैदिक धर्मांच्या संरक्षणार्थ या देशाच्या चारहि दिशांस चार मठ उभारून त्यांनीं निवृत्तिपर वैदिक संप्रदाय सुरू केला.

अद्वैतमतानुसार या विश्वांत ब्रह्म काय तें एकच सत्य आहे आणि इतर सर्व वस्तुजात मिथ्या आहे. आमच्या दृष्टीस दिसणारें जगत् खरें नसून त्यांत एक नित्य व शुद्ध परब्रह्म भरलेलें आहे. यासच मायेमुळें आकार, रूप इत्यादिकांच्या नानात्वाचा भास होतो. मनुष्याचा आत्मा मुळांत परब्रह्मरूपीच असतो. जीव आणि ब्रह्म यांच्यांत भिन्नता दिसते, ती तात्त्विकदृष्ट्या खरी नाहीं. उपाधीमुळें अशा प्रकारची भिन्नता दिसते. जीवाला अविद्येनें घेरिलें असल्यामुळें तो शुद्ध, बुद्ध आणि मुक्त असूनहि उपाधींत सांपडल्याप्रमाणें भास होतो. सुखदुःख, कामक्रोध, रोगशोक, वगैरे हे सर्व मन आणि देह यांचे धर्म आहेत. आत्म्याचे किंवा जीवाचे नाहींत. देहाचा संबंध ठेवल्यामुळें मात्र जीव आपणांस सुखी, दुःखी, रोगी, वगैरे मानतो. ईश्वरी मायेच्या योगानें जीव मोहांत पडून देहाशीं आपलें नातें जोडतो. या भ्रमाची निवृत्ति झाली म्हणजे जीव आणि ब्रह्म यांच्यांतील अंतर दूर होऊन आनंदमय ब्रह्मभावांत जीव स्थित होतो. भ्रमाची जननी माया ती गेली म्हणजे जीव व ब्रह्म यांच्यांत भिन्नता नाहीं हें ज्ञान होतें. याप्रमाणें जीव आणि ब्रह्म यांच्यांत ऐक्यज्ञान झालें म्हणजे मुक्ति प्राप्त होते. अनादि मायेच्यामुळें निजलेला जीव जेव्हां जागा होतो तेव्हां त्याला समजतें कीं, मी जन्महीन, निद्राहीन, स्वप्नहीन, अद्वैत ब्रह्मवस्तु आहे. आत्म्याच्या व परब्रह्माच्या ऐक्याचें पूर्ण ज्ञान, म्हणजे अनुभवात्मक ओळख झाल्यावांचून कोणासहि मोक्षप्राप्ति होत नाहीं. असें जें मत त्यास अद्वैतमत असें म्हणतात.

श्रीशंकराचार्यांनीं द्वारकेंत शारदा मठ, जगन्नाथपुरींत गोवर्धन मठ, हरिद्वार येथें ज्योतिर्मठ, म्हैसूर संस्थानांत शृंगेरी मठ आणि काशींत सुमेरु मठ याप्रमाणें पांच मठ स्थापन केले व त्यांत मठांच्या शिष्याचार्यांनीं लोकांस अद्वैतमताचा बोध करावा अशी योजना केली. कालांतरानें शारदा मठासंबंधानें तंटा उपस्थित होऊन द्वारकेंत निरनिराळ्या संन्याशांनीं डाकोर, प्रभासपट्टण आणि द्वारका येथें निराळे मठ स्थापन केले. शृंगेरी मठाचे विभाग होऊन संकेश्वर, नाशिक आणि करवीर (कोल्हापूर) हे तीन मठ अस्तित्वांत आले. ज्योतिर्मठाची परंपरा चालली आहेसें दिसत नाहीं. याशिवाय धोलका, पाटण, देसर व अन्य ठिकाणीं आद्य शंकराचार्यांची परंपरा चालविणारे म्हणून 'शंकराचार्य' हेंच उपनाम धारण केलेले कित्येक मठाधिपति संन्यासी आहेत. [श्रोत्रीयकृत 'हिंदुधर्मदीपिका'].

**अद्वैतानंद** (मृ. शके १६८७)—हे नामांकित पुरुष मूळचे महाराष्ट्रीय विद्वान् असून संन्यासानंतर श्रीक्षेत्र काशींत राहत. यांजवळ अध्ययनास पुष्कळ विद्यार्थी असत म्हणून यांस गुरुस्वामी म्हणत. शांकर वेदान्तावर ब्रह्मविद्याभरण व सदानंदकृत वेदान्तसार नामक ग्रंथावर यांची संस्कृत टीका आहे. मध्वमुनीश्वर व कटिबंधात्मक कविता करणारे अमृतराय हे यांचे शिष्य. यांचा जन्मकाळ माहीत नाहीं; शके १६८७ त काशींत समाधिस्थ झाले. मध्वमुनींनीं आपले गुरु अद्वैतानंद यांजकडून अमृतरायास उपदेश देवविला, अशी दंतकथा आहे.

**अंध, अंधत्व**— कांहीं दृष्टिदोष किंवा दृष्टि मुळींच नसणें. याचे अनेक प्रकार आहेत. कांहीं दृष्टिविकार तात्पुरते तर कांहीं कायमचे असतात. सर्वच देशांत अंधळेपणा असतो, पण विशेषतः प्राच्य देशांत व त्यांतूनहि उष्ण प्रदेशांत हा रोग फार आढळतो. हिंदुस्थान हा तर अंधळ्यांचाच देश आहे, असें परदेशांत साधारणपणें मानलें जातें! येथें सुमारें पंधरा लक्ष लोक अजीबात अंधळे आहेत, तर त्याच्या तिप्पट लोक अर्धवट अंधळे आहेत. इतकी स्थिति असून १९१९ सालीं हेंडरसन नांवाच्या आय्. सी. एस्. माणसानें रत्नागिरीस 'ब्लाइंड रिलीफ असोसिएशन' काढीपर्यंत कांहींहि सरकारी प्रयत्न झाले नव्हते. या संस्थेच्या ठिकठिकाणीं शाखा निघाल्या. १९२९ सालीं अखिल भारतीय स्वरूपाची संस्था सुरू करण्यांत आली. या संस्थेनें फिरते दवाखाने सुरू करून खेडोंपाडींहि अंधळ्यांना औषधोपचारांची सोय करून दिली व अंधत्व किंवा दृष्टिदोष येऊं नये म्हणूनहि इलाज होऊं लागले. तथापि एवढी तरतूद लोकसंख्येच्या मानानें फार कमी पडते.

अलीकडे प्रत्येक राष्ट्रांत अंध लोकांची काळजी घेण्याचे प्रयत्न सुरू आहेत व त्याकरितां निरनिराळ्या संस्था स्थापन झाल्या आहेत. अंधळ्यांस वाचावयास शिकविण्याकरितां निरनिराळ्या पद्धति उपयोगांत आणल्या जात असत. परंतु १८३४ मध्यें लुई ब्रेल यानें पूर्णतेस आणलेली पद्धति हल्लीं सर्व जगांत वापरली जाते. या पद्धतींत अक्षरें एका

उठावदार रीतीनें लिहिलीं जातात. ही पद्धति इंग्लंडमध्यें डॉक्टर टी. आर्. आर्मिटेज यानें १८६८ मध्यें प्रथम सुरू केली. अशाच तऱ्हेची विल्यम मून यानें बसविलेली एक पद्धति १८४० मध्यें प्रचारांत आली. या पद्धतींचा निरनिराळ्या भाषा व बोली लिहिण्याच्या कामीं उपयोग करण्यांत येतो. सामान्य पद्धतीनें छापलेला मजकूर वाचण्याचें यंत्र १९१४ मध्यें डॉक्टर फोर्नियर दि आल्बे यानें शोधून काढलें व तें ग्लासगो येथील बार आणि स्ट्राउड या कंपनीनें सुधारून तयार केलें. या यंत्रानें वाचण्याचें काम डोळ्यांच्या साहाय्यानें न होतां कानांच्या साहाय्यानें होतें म्हणून त्यास आप्टोफोन म्हणतात. या यंत्रामध्यें छापलेल्या मजकुरावरून एक प्रकाशाचा कवडसा फिरत असतो, व त्याचें परावर्तन एका सेलेनियमच्या तबकडीवर करण्यांत येतें व त्या तबकडीवरून एक विद्युत्-प्रवाह जात असतो. सेलेनियमची विद्युद्रोधकता त्यावर पडणाऱ्या प्रकाशाप्रमाणें बदलत असते. व हा बदल प्रकाशाचा कवडसा ज्या अक्षरावर पडेल त्या अक्षराच्या आकाराप्रमाणें घडून येतो. या विद्युत्प्रवाह चक्रामध्यें बसविलेल्या एका टेलेफोनवरून या प्रकाशास अनुसरून निरनिराळ्या अक्षरांचे निरनिराळे ध्वनी ऐकूं येतात व त्यावरून निरनिराळे वर्ण बनतात व ते संवयीनें कळूं लागतात.

**अंधक**—एक असुर. कश्यप व दितीच्या या पुत्राला हजार डोकीं, दोन हजार हात व डोळे आणि पाय होते. दृष्टि असूनहि हा अंधळ्याप्रमाणें चाले, म्हणून याला अंधक नांव पडलें. स्वर्गांतून पारिजातक वृक्ष नेण्याचा प्रयत्न करीत असतां शिवानें याला मारिलें. म्हणून शिवाला अंधकरिपु असें संबोधितात. एके काळीं, महादेव, पार्वतीसहित क्रीडा करीत असतां, हा तिचें हरण करण्यास उद्युक्त झाला. ह्यावरून महादेवाचें व याचें अवंती देशांतील महाकाल वनांत घोर युद्ध झालें. ह्यांत याच्या रक्तापासून अनेक अंधक उत्पन्न होऊं लागले, असें पाहून महादेवानें याचें रक्त वरच्यावरच नाहींसें करण्यासाठीं, मातृगण उत्पन्न केला, तथापि तें निःशेष होईना. म्हणून विष्णूनें शुष्करेवती नामक देवता उत्पन्न करून, तिजकडून तें रक्त अगदीं निःशेष करविलें, तेणेंकरून इतर अंधक नाश पावून, एकच मूळचा अवशेष राहिला व नंतर त्यास मारावें इतक्यांत त्यानें महादेवाचें अतिशय करुण स्वरानें स्तवन केलें. यावरून महादेव प्रसन्न होऊन त्यांनें त्यास आपलें गणत्व दिलें. (मत्स्य. अ. १७८).

**अंधकृमि**—(ब्लाइंड वर्म). हा एक सापासारखा पालीच्या जातीचा प्राणी आहे. याला बाह्य अवयव नसतात तरी खांद्याचीं व कटिराचीं हाडें प्राथमिक अवस्थेतील असतात. याची लांबी सुमारें एक फूट असते. याची जाडी सर्व शरीरभर

सारखीच असते. याचे डोळे चकचकीत पण लहान असतात. म्हणून त्यास अंधळा म्हणतात. हा पूर्णपणें निरुपद्रवी असून किडे, गोगलगायी वगैरेंवर उपजीविका करतो. हिंवाळ्यांत हा सुस्त पडून राहतो.

**अधिकमास**—अधिकमास यास धोंडा, मलमास व पुरुषोत्तम-मास असें म्हणतात. चांद्रमास आणि सौरमास यांत मेळ घालण्यासाठीं दर तीन वर्षांनीं ज्या महिन्यांत संक्रांति येणार नाहीं तो अधिकमास धरतात. १२ वर्षांत आषाढ, चैत्र, ज्येष्ठ व श्रावण हे अधिक होतात. १८ वर्षांनीं आषाढ अधिक येतो. २४ वर्षांनीं भाद्रपद अधिक येतो. १४१ वर्षांनीं अधिक आश्विनमास येतो व ७०० वर्षांनीं कार्तिक मास येतो. आश्विन व कार्तिक हे दोन महिने अधिक आले तरी त्यांस अधिक म्हणत नसून भाद्रपदापर्यंत मात्र अधिक म्हणतात. ज्या वर्षी आश्विन अधिक पडतो त्या वर्षी पौषक्षय होतो व त्या वेळीं दोन प्रहरपर्यंत मार्गशीर्ष व दोन प्रहरानंतर पौष होतो. आणि याप्रमाणें त्या दोन्ही महिन्यांचीं धर्मकर्मेंहि एकाच महिन्यांत करितात. या जोडमासाचें नांव संसर्प आहे. कार्तिकापुढील चार महिने अधिक होत नाहींत व आश्विनाच्या पूर्वी क्षयमास होत नाहीं.

**अधिरथ (सूत)**—चंपाच्या आसमंतांत राहणारा हा सूत धृतराष्ट्राचा मित्र होता. यानें व याची स्त्री राधा हिनें कर्णाचें संगोपन केलें. हा अंग देशाचा राजा होता असेंहि म्हणतात; कारण कर्णाला वारस म्हणून अंग देशाचें राज्य मिळालें. यानें कर्णाचें वसुषेण नांव ठेवून त्याला अस्त्रविद्येकरितां द्रोणाचार्यांकडे पाठविलें (म. भा. ३. ३०८). महाविख्यात कर्ण. राधेय, सूतपुत्र, सूत असा संबोधिला जाई.

**अधिवृक्करस**—(अॅड्रेनॅलिन). मेंढीच्या किंवा इतर प्राण्यांच्या मूत्राशयाच्या वरील बाजूस असलेल्या ग्रंथीच्या एका पदार्थापासून याचे स्फटिक बनविलेले असतात. या औषधाचा उपयोग बहुधा शरीरामध्यें विशिष्ट ठिकाणीं बधिरता किंवा गुंगी आणण्याकरितां करतात. त्यामुळें शस्त्रक्रिया करतांना रक्तस्राव कमी होतो व शोषणक्रियाहि कमी होते.

**अधेवाड**—भावनगरच्या दक्षिणेस तीन मैलांवर मालेश्वरी नदीच्या उत्तर तीरावरील गांव. लोकसंख्या ५००. जाजदिया

हनुमानाचें देऊळ व गुरुचेलानी पादुका यांमुळें महत्त्व. सोमनाथ यालेंतील एक क्षेत्र. ठाकोर रामदासजींनीं आपला पुत्र साधुलजी यास हें दिलेलें असून त्याच्याच वंशाकडे आहे.

**अधःस्वस्तिक** — माणूस उभा असतो त्याच्या बरोबर डोक्यावर खस्वस्तिक (झेनिथ) बिंदु असतो व बरोबर त्याच्या उलट पायाखालील आकाशांत जो बिंदु असतो तो अधःखस्तिक (नादिर) होय. खस्वस्तिक आणि अधःस्वस्तिक हीं क्षितिजाच्या ध्रुवांचीं टोकें म्हणतां येतील.

**अध्यात्मविद्या**—(मेटॅफिजिक्स). ही तत्त्वज्ञानाची एक शाखा आहे. सत् (अविनाशी) तत्त्व (अस्तित्व = बीइंग) काय आहे, त्याचें, सत् तत्त्वाचें आणि तत्संबंधींच्या प्रमुख कल्पनांचें विवेचन करणें हा या शास्त्राचा विषय होय. इतर प्रत्येक शास्त्र एका प्रकारच्या वर्गातील वस्तूंची किंवा त्यांपैकीं एखादा विशेष गुण असलेल्या वस्तूंची माहिती देतें. उदाहरणार्थ, वनस्पतिशास्त्र हें फक्त वनस्पति या वर्गांत पडणाऱ्या वस्तूंचें ज्ञान देतें; 'प्राचीनवास्तुशास्त्र' हें प्राचीन वास्तु असतील तेवढ्यांची माहिती देतें; पण अशा सर्व भौतिक म्हणजे इंद्रियगोचर वस्तूंचा परस्परांशीं सर्वसामान्य प्रकारचा संबंध आहे कीं काय, हा प्रश्न अध्यात्मविद्या किंवा अतींद्रियविज्ञान या शास्त्रांचा विषय होय. या शास्त्राचे दोन मुख्य विभाग 'सत् तत्त्व' विद्या (ऑन्टोलॉजी) आणि 'ज्ञान' विद्या (एपिस्टेमॉलॉजी) हे आहेत. आरिस्टॉटलचा 'अध्यात्मविद्या' (Metaphysics) हा ग्रंथ वास्तविक 'सत् तत्त्व' विज्ञान आहे, कारण आरिस्टॉटलनें आपल्या विषयाला 'सत् मय सत्' (बीइंग ॲज बीइंग) असें नांव दिलें आहे. आरिस्टॉटलनंतरचे ग्रीक तत्त्ववेत्ते जगांतील नानाविध घडामोडींना एकत्र जोडणारें 'सत् तत्त्व' शोधून काढण्यांतच गुंतलेले दिसतात. पुढील काळांत 'ज्ञानविद्या अभ्यासी पंथ' म्हणजे मनुष्याला ज्ञान कसें प्राप्त होतें, या विषयाचा अभ्यासी पंथ निघाला. आधुनिक काळांत, प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्ते ज्या 'सत् तत्त्व' विज्ञानाची चिकित्सा करीत होते, त्या विषयाकडे तत्त्ववेत्ते वळले आहेत; तथापि ऑन्टोलॉजी व एपिस्टेमॉलॉजी हे दोन्ही विषय फार निगडित आहेत, असें आधुनिक तत्त्ववेत्ते मानतात.

अतींद्रियविज्ञानशास्त्रांतला मुख्य प्रश्न हा आहे कीं, या जगांत कांहीं एकसूत्रीपणा आहे काय? आणि या प्रश्नाचें उत्तर देणारे तीन निरनिराळे पंथ आहेत. ते—एकतत्त्ववादी (मोनिस्ट), द्वितत्त्ववादी (ड्युॲलिस्ट) आणि नानात्ववादी उर्फ अनेककारणवादी (प्लुरॅलिस्ट). उदाहरणार्थ, जे तत्त्ववेत्ते फक्त मन हेंच एक अंतिम सत्य मानतात, किंवा जे शरीर उर्फ जडद्रव्य हेंच एक अंतिम सत्य मानतात, ते 'मोनिस्ट' होत; आणि जे तत्त्ववेत्ते मन आणि जडद्रव्य (मॅटर) दोन्ही सत् तत्त्वें मानतात, ते द्वितत्त्ववादी - ड्युॲलिस्ट - होत.

अलीकडे अतींद्रियविज्ञानशास्त्रांत तीन प्रमुख पंथ आहेतः— जडवादी (मटीरिॲलिस्ट), वास्तववादी (रिॲलिस्ट) आणि कल्पनावादी उर्फ आदर्शवादी (आयडिॲलिस्ट). जडवादाला १९ व्या शतकांतील शास्त्रीय शोधांमुळें फार जोराची चालना मिळाली. या जडवादाचें म्हणणें असें कीं, आपल्याला शरीराचेंच (जडद्रव्याचें) फक्त ज्ञान होणें शक्य आहे; आणि मन हा शरीराचाच एक गुणधर्म आहे. या जडवादाचे पुरस्कर्ते मोलेस्कॉट व्हॉग आणि कांहीं अंशीं हेकेल व कोम्ट हे असून त्यांचीं मतें संशयवाद व निरीश्वरवाद यांच्याकडे झुकणारीं आहेत. अतींद्रियवादी सत् तत्त्वाला मन व जडद्रव्य या दोहोंचें अस्तित्व मान्य आहे, व या पंथाचे पुरस्कर्ते डेकार्ट, लॉक (हे दोघे वास्तविक मानसशास्त्रानुसारी आदर्शवादी आहेत), कूझिन, मार्टिनो, स्टुअर्ट, रीड आणि ए. जे. बाल्फोर हे आहेत. अतींद्रियविज्ञानपंथी कल्पनावादी उर्फ आदर्शवादी तत्त्ववेत्ते म्हणतात कीं, जडद्रव्याला अस्तित्वच नाहीं, ज्यांचें ज्ञान होतें त्या सर्व वस्तु मनःकल्पित असतात. या कल्पनावादी पंथाचे प्रमुख पुरस्कर्ते स्पिनोझा, लाइबनिझ, बर्कले, कँट, फिश्ट, हेगेल, लॉत्झ, ह्यूम, मिल, स्पेन्सर, केअर्ड, ग्रीन आणि ब्राडले हे होत. अलीकडील अतींद्रियविज्ञानशास्त्रांत या अप्रतिबंध, अनादि व अनंत सत् तत्त्वाला ॲब्सोल्यूट हा पारिभाषिक शब्द योजतात.

**अध्यापनशास्त्र**—मुलांना शिक्षण कसें द्यावें, हें सांगणारें व मानसशास्त्रावर बहुंशीं आधारलेलें हें शास्त्र आहे. या शास्त्राचा अभ्यासांत येणाऱ्या बहुतेक सर्व शास्त्रांशीं संबंध येतो; उदा. शारीरिक शिक्षणांत जीवशास्त्र आणि शारीरशास्त्र; बौद्धिक शिक्षणांत तर्कशास्त्र, गणित आणि सृष्टिशास्त्रें; व नैतिक शिक्षणांत इतिहास, वाङ्मय आणि नीतिशास्त्र. अध्यापनशास्त्रांत कांहीं महत्त्वाचे मूलभूत सिद्धांत आतां सर्वमान्य झाले आहेत. ते असे :—

(१) मन आणि शरीर यांचा संबंध—इंद्रियांच्याद्वारें मनोव्यापार चालत असल्यामुळें शरीर निरामय असेल तेव्हांच मनोव्यापार चांगला चालेल. इंद्रियांत व्यंग असलें किंवा शरीर थकलें म्हणजे मनोव्यापार मंदावतो.

(२) मानसिक सामर्थ्याची वाढ—मनोव्यापाराचे विविध प्रकार शरीराच्या वाढीबरोबर वाढत असतात.

(३) अवधान—सर्व ज्ञानाच्या मुळाशीं अवधान आहे. हें अवधान इच्छेनें होणारें कर्म असून आवडीवर अवलंबून असतें.

(४) स्वयंकर्म—सर्व ज्ञान शिकणाऱ्याच्या स्वयंकर्मानें स्वतःच्या हालचालीनें मिळत असतें. मुलानें स्वतःच शिकलें

किंवा स्वतःलाच शिकविलें पाहिजे. शिक्षक आणि पालक अशाकरितां पाहिजेत कीं, त्यांनीं मुलांना शिक्षणाचा मार्ग दाखवून देऊन मुलांना दुर्लंघ्य असे त्या मार्गांतील अडथळे दूर केले पाहिजेत.

(५) अध्यापनक्रम—मानसिक सामर्थ्याच्या वाढीला अनुसरून शिकविण्याचा क्रम ठेवला पाहिजे. उदा.- (अ) विचारापूर्वी निरीक्षण; (आ) अमूर्तांपूर्वी मूर्त; (इ) भानगडीच्यापूर्वी साधी गोष्ट; (ई) अज्ञातापूर्वी ज्ञात; (उ) व्याख्या आणि सिद्धांत यांपूर्वी सिद्ध घटना. (ऊ) नियमांपूर्वी क्रिया.

अध्यापकानें शिक्षणाचे उद्देश प्रथम समजावून घेऊन मग त्या अनुरोधानें शिक्षण दिलें पाहिजे. चांगल्या गुणांचा समुच्चय मुलांच्या अंगीं आणणें, त्यांना व्यसनांपासून परावृत्त करणें, त्यांचें शरीरसामर्थ्य आणि बुद्धिमत्ता वाढविणें व त्यांना स्वतःच्या प्रयत्नानें ज्ञान मिळविण्यास शिकविणें हे शिक्षणाचे कांहीं मुख्य उद्देश होत. वरील उद्देश साध्य होण्यासाठीं शिक्षकानें मुलांना शारीरिक, बौद्धिक आणि नैतिक या तीन प्रकारांनीं शिक्षण दिलें पाहिजे.

विद्यार्थ्यांमध्यें जे बौद्धिक, नैतिक आणि शारीरिक गुण उत्पन्न करावयाचे ते प्रथम शिक्षकांत पाहिजेत. त्याला शिकवावयाच्या विषयाचें पूर्ण ज्ञान आणि शिकविण्याची कला आली पाहिजे. विद्यार्थ्यांविषयीं प्रेम पाहिजे. त्यांच्याशीं एकरूप होतां आलें पाहिजे. शांत वृत्ति, सारासारविचार व धोरण पाहिजे. त्यानें पालकांची सहानुभूतिहि मिळविली पाहिजे. शिकवावें कसें यासंबंधींचे नियम आज सुपरिचित आहेत व अध्यापनविद्यालयांत ते शिकविलेहि जातात. अध्यापनशास्त्राची शिकवण शिक्षकांना सुलभ रीतीनें मिळण्याच्या सरकारी सोयीहि पुष्कळ आहेत. तथापि शिकविण्याची अंगची आवड आणि कळकळ हीं मुख्यतः चांगला शिक्षक बनवीत असतात. नुसतें तंत्र आणि पुस्तकी ज्ञान सर्वांनाच उपयोगी पडतें असें नाहीं.

**ॲन राणी** (१६६५–१७१४)–ग्रेट ब्रिटन व आयर्लंड यांची ही राणी २ रा जेम्स याची मुलगी असून ३ ऱ्या विल्यम राजानंतर १७०२ मध्यें इंग्लंडच्या सिंहासनावर आरूढ झाली. हिच्या कारकीर्दींतील स्पॅनिश वारसा-युद्ध ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट असून या युद्धांत इंग्लंडला जिब्राल्टर हें फार महत्त्वाचें ठाणें मिळालें. याच कारकीर्दींतील २ री महत्त्वाची गोष्ट म्हणजे इंग्लंड व स्कॉटलंड यांचें संयुक्तीकरण १७०७ मध्यें होऊन त्याला ग्रेट ब्रिटन हें नांव देण्यांत आलें. ॲन राणीला पुष्कळ मुलें झालीं पण तीं सर्व अल्पवयांत मरण पावलीं.

**अनकापल्ली**—मद्रास इलाखा, विजगापट्टण जिल्ह्याची नैर्ऋत्येकडील तहशील. क्षेत्रफळ २९७ चौ. मै. लोकसंख्या सु. २ लाख. अनकापल्ली शहर व १४३ खेडीं आहेत. उत्तरेचा प्रदेश सुपीक असून तांदूळ व ऊंस हीं पिकें होतात. या तहशिलींत फक्त जमीनदाऱ्या आहेत. इ. स. १७९४ ते १८०२ कासीमकोट हें जिल्ह्याचें ठिकाण होतें पण पुढें विजगापट्टण जिल्ह्यांत समावेश केला गेला.

अनकापल्ली हें तहशिलीचें ठिकाण शारदा नदीतीरीं असून विजगापट्टणच्या पश्चिमेस २० मैलांवर आहे. भाग सुपीक. येथून धान्य व गूळ बाहेर जातो. लोकसंख्या सु. तीस हजार. इ. स. १८७८ पासून म्युनिसिपालिटी आहे. सदर्न मराठा रेल्वेचें मद्रास–वाल्टेर लाइनवरील स्टेशन. पाऊस ३५ इंच.

**ॲनॅक्झॅगोरस** (खि. पू. ५००–४२८)—आयोनियन तत्त्वज्ञानपंथांतील तत्त्ववेत्ता. आशिया मायनरमधील क्लॅझोमनी येथें इ. स. पूर्वी ५०० च्या सुमारास जन्म. इ. स. ४६४ चे सुमारास अथेन्सला गेला. ज्योतिष व गणितशास्त्रांतील प्रावीण्यामुळें व संन्यस्त वृत्तीमुळें यास मोठें वजन प्राप्त झालें. पेरिक्लीझच्या संगतींत यानें बरेच दिवस घालवले. नाटककार युरीपीडीझचा शिष्य झाला व अथेन्समधील लोकांना तत्त्वज्ञान व संशोधन यांची गोडी लावली. यावर अधर्माचरणाचा आरोप आला असतां पेरिक्लीझच्या भाषणानें निर्दोषी ठरला पण अथेन्स सोडून स्वदेशीं जावें लागलें. तेथें मान्यता पावून इ. स. पूर्वी ४२८ त मरण पावला. याच्या वेळीं अथेन्स तत्त्वज्ञानविषयक विचारांचें केन्द्रस्थान असून यानें या विचारांस निराळें वळण लावलें. भौतिक शास्त्रांतील परमाणुवादाचा पाया यानें घातला. जगांतील चमत्कारांचा कार्यकारणभाव यानें बुद्धिप्रामाण्यवादाच्या तत्त्वानुसार लावण्याचा प्रयत्न केला. हा वाद पुढें आरिस्टॉटलनें उचलून धरला, व तो अनेक टीकोपटीकाकारांनीं पुढें चालू ठेवला.

**अनॅक्झिमँडर** (खि. पू. ६१०)—ग्रीक तत्त्ववेत्त्यांपैकीं अनुक्रमें दुसरा. याच्या पंथास 'आयोनियन तत्त्वज्ञान पंथ' असें नांव देतात. कोणी यास थेलीसचा शिष्य तर कोणी स्नेही समजतात. परंतु याच्या मतावरून तसें दिसत नाहीं. थेलीसप्रमाणें यानेंहि विविध चमत्कारांच्या मागील अमर्याद एक तत्त्व शोधून काढण्याचा प्रयत्न केला. थेलीसनें 'जल' हें मूलतत्त्व मानलें तर याहून भिन्न म्हणजे जल, अग्नि, व वायु यांच्या विनाशित्वामुळें हीं सोडून फक्त एकच सर्वव्यापी 'अनंत' तत्त्व आहे असें यानें ठरविलें. 'अविनाशी, अगम्य आणि स्वयंभु' असें व जहाजाच्या सुकाणूप्रमाणें विश्वाचा कारभार चालविणारें असें या अनंताचें स्वरूप आहे. विंडेल्बँड म्हणतो, या 'अनंता' पासूनच युरोपांत ईश्वरविषयीं कल्पना निघाली. पृथ्वी गोलाकार आहे, हें याचें मत असून तारे, पृथ्वी, समुद्र, प्राणी, मासे,

सुसरी व मनुष्य अशा अनुक्रमें विश्वाची उभारणी आहे असें याचें मत-अनुमान--आहे. आपल्याकडील दशावतारांशीं हें अनुमान बरेंच जुळतें आहे.

**अनंगपाळ**—१. आनंदपाल. महंमद गझनीनें अनेक वेळां पराभव केलेला लाहोरचा राजा. १००१ त जयपाळानें महंमुदास तोंड दिलें. पण पराभवामुळें त्यानें अग्निकाष्ठें भक्षण केलीं. याचा मुलगा अनंगपाळ महंमदाशीं सलोख्यानें कांहीं काळ वागला, पण पुढें महंमदाचा सरदार आपल्याकडे वळवून तो महंमदास विचारीनासा झाला. १००५ त महंमदानें स्वारी करून यास काश्मिरकडे पिटाळलें. पुढें यानें उज्जैन, ग्वाल्हेर, दिल्ली व अजमीर, इत्यादि ठिकाणच्यां राजांचा संघ करून महंमदास पिटाळण्याचें ठरविलें. ४० दिवसपर्यंत उभय सैन्यें तटस्थ होतीं. लढाईला सुरवात होऊन हिंदूंची सरशी दिसत होती; पण ऐन वेळीं अनंगपाळाच्या हत्तीस तीर लागला, व सैन्यांत फाटाफूट होऊन महंमद विजयी झाला व त्यानें पंजाब खालसा केला. अनंगपाळ केव्हां वारला हें समजत नाहीं. एके ठिकाणीं १०१३ त निवर्तल्याचें लिहिलें आहे. तर १०२१-२३ च्या महंमदाच्या स्वारीच्या वेळीं तो होता असें दुसरा इतिहास म्हणतो.

२. दिल्लीच्या तोमर वंशांतील राजे. तोमर घराण्याचा संस्थापक अनंगपाल इ.स.७३६ त दिल्लीस गादीवर बसला. पुढें कनोजला राजधानी नेल्यावर व राठोडांनीं तेथून हालविल्यावर दुसऱ्या अनंगपाळानें पुनः दिल्ली राजधानी केली. तिसऱ्या अनंगपाळापासून अजमीरच्या विशालदेव चव्हाणानें दिल्ली जिंकली व अनंगपाळास दुसरें राज्य दिलें. पुढें या दोन घराण्यांचा शरीरसंबंध होऊन पृथ्वीराज जन्मास आला व दिल्लीपति झाला.

**अनंगभीम**—कलिंग देशचा राजा; लाङ्गदेव हें दुसरें नांव. शके १०९४ त जगन्नाथाचें देऊळ बांधल्याविषयीं तेथील खांबावर उल्लेख आहे. 'अनंगरंग' ग्रंथकर्ता कल्याणमल्ल याच्या पदरीं होता.

**अनंगरंग ग्रंथ**—कलिंगराज अनंगभीमाचा आश्रित कल्याणमल्ल याचा 'अनंगरंग' हा ग्रंथ कामशास्त्रावर लिहिलेला आहे. याचें मराठींत भाषांतर झालें आहे.

**अनंगहर्ष मात्रराज**—नरेन्द्रवर्धनाचा मुलगा व 'तापसवत्सराजचरित' या नाटकाचा कर्ता. आनंदवर्धन व त्याचा टीकाकार अभिनवगुप्त यांच्या ग्रंथांत या नाटकाचें नांव आहे.

आनंदवर्धनाचा काल ९ व्या शतकाचा उत्तरार्ध. त्यावरून अनंगहर्ष त्यापूर्वी झाला असावा. त्यानें रत्नावलीचा आधार घेतल्यावरून हें नाटक ७-९ शतकांच्या दरम्यान रचलें असावें.

भासाच्या स्वप्नवासवदत्ताप्रमाणेंच तापसवत्सचरितांतील कथानक आहे. फक्त त्यांत वासवदत्ता व उदयन यांचा संभाषणप्रसंग नसून दोघेहि मरणोत्सुक होऊन प्रयाग येथें भेटतात. नंतर एकमेकांचें निवेदन होतें व रुमण्वताच्या विलयाचें वर्तमान कळतें.

**अनंत**—१. परमेश्वरनाम. विष्णु. २. एक कद्रुपुत्र. ३. शेषासहि हें नांव लावतात. ४. चौदा गांठींचा अनन्तचतुर्दशीस पूजा करावयाचा रेशमी दोरा. यासारखाच दुसरा अनन्ती नांवाचा दोरा बायकांच्या डाव्या दंडाला बांधतात. अनंतव्रत पाहा. ५. कात्यायन श्रौतसूत्रावरील टीकाकार व 'प्रतिज्ञा परिशिष्ट भाष्य' या ग्रंथांचा कर्ता. ६. अनंत सुधारस या पंचांग-गणितग्रंथाचा कर्ता. शककाल १४४७. पित्याचें नांव हरि. ग्रंथ सूर्यसिद्धांतानुसारी आहे. ७. महादेवकृत कामधेनूचा टीकाकार व जातकपद्धति या जातक ग्रंथाचा कर्ता. गोत्र गार्ग्य. राहण्याचें ठिकाण विदर्भातील धर्मपुरी उर्फ मातृपुर. वडील चिंतामणि विद्वान् ज्योतिषी असून मुलगा नीलकंठ यानें तोडरानंद व ताजिक नीलकंठी हे ग्रंथ लिहिले. याचा मुलगा गोविंद याचें जहांगिराच्या दरबारीं वजन असून मुहूर्तचिंतामणीवर पीयूषधारा व ताजिक नीलकंठीवर रसाला या टीका लिहिल्या. ८. जयरामस्वामी वडगांवकर यांचे शिष्य दोन: एक अनंत व दुसरा गोपाळ. गोपाळाचा समाधिशक १६१२. दोघांनीं मिळून काव्य केलें. ९. एक समर्थशिष्य. सातारा प्रांतीं मथवड येथील. १०. रंगनाथस्वामी-शिष्य. ग्रंथ-ब्रह्मस्तुति, माधवगुण, द्रौपदीस्वयंवर, रुक्मिणीस्वयंवर, गरुडगर्वपरिहार, रुद्रयामल. ११. एक समर्थशिष्य. ग्रंथ-रामचरित्र, सीतास्वयंवर, रामदासस्तुति, गजगौरीव्रत, इत्यादि. १२. एक रंगनाथ-शिष्य. ग्रंथ-पदें. १३. एक अनंत. ग्रंथ-गरुडाख्यान, निर्वाणषट्क, पाळणे, भूपाळ्या, लहुकुशाख्यान, चक्रव्यूह. १४. मंडनाचा मुलगा. 'कामसमूहा'चा कर्ता (इ. स. १४५७). १५. अंतु सोनार. ग्रंथ-कोल्हाटखेळ.

**अनंत**—(इन्फिनिट, इन्फिनिटेसिमल). गणितशास्त्रामध्यें जी वाढणारी संख्या अमर्याद प्रमाणांत वाढत राहते व जिच्या वाढीला अंतिम मर्यादा नसते तीस अनंत (इन्फिनिट) असें म्हणतात. ज्या वाढणाऱ्या संख्यांची अंतिम मर्यादा ही असते तीस अनंत सूक्ष्म (इन्फिनिटेसिमल) असें म्हणतात. अनंतसूक्ष्म या शब्दाचा प्रयोग कधीं कधीं अतिसूक्ष्म म्हणजे अत्यंत सूक्ष्माच्याहि पलीकडे म्हणजे इतकें सूक्ष्म कीं, ज्या संख्येचा वगैरे गणनामध्यें लक्षांत घेण्याइतका नसतो ती दाखविण्यासाठीं करतात.

**अनंततनय** (१८७९-१९२९)—(दत्तात्रेय अनंत आपटे) एक मराठी कवि. यांची स्फुट कविता 'हृदयतरंग' या नांवानें प्रसिद्ध झाली आहे. 'महाराष्ट्रगीत', 'शृंगारदादूतिका', 'महाराष्ट्र-शृंगार तिलक', 'तिलकविजय' इ.

त्यांचीं काव्यें वरीच असून 'ऋतुसंहार' आणि 'भामिनी-विलास,' या संस्कृत काव्यांचें त्यांनीं चांगलें मराठी रूपांतर केलेलें आहे. यांची कविता जुन्या वळणाची आहे.

**अनंतदेव**—१. (सु. १०८५–११२५) ठाण्याचा एक शिलाहार राजा. खारेपाटण येथें याचा एक लेख जहाजावरील जकात-माफीबद्दल सांपडला आहे. उत्तर कोंकणांत याच्या कारकीर्दींत देवब्राह्मणांचा अनन्वित छळ होत असल्याचें दिसतें. पण यानें त्याचा पुरा बंदोबस्त केल्याचे पुरावे सांपडतात (एपि. इं. ९).

२. स्मृतिकौस्तुभ या प्रख्यात ग्रंथाचा कर्ता. याचा काल साधारण १७ वें शतक धरतां येईल. राजधर्मकौस्तुभ हाहि याचा ग्रंथ राज्यशास्त्रावर महत्त्वाचा गणला जातो.

**अनंतपाद**—(मिरिआपोडा). गोमवर्गांतील सर्वांत खालच्या जातीच्या प्राण्यांचा वर्ग. यांना स्वतंत्र डोकें असतें. परंतु शरीराचे वक्षस्थळ आणि उदर असे कीटकाप्रमाणें स्वतंत्र भाग नसतात. यांस पंख नसतात. यांच्या शरीरावर फार सूक्ष्म छिद्रें असतात. त्यांतून ते श्वासोच्छ्वास करतात. यांचे युगुलपद (चिलोमाटा किंवा डिप्लोपोडा), आणि शतपद (चिलोपाडा) असे दोन पोटवर्ग करण्यांत येतात.

**अनंतपूर**— मद्रास इलाख्यांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ६७२२ चौरस मैल. हा जिल्हा म्हैसूरपठाराचा भाग असून दक्षिणेस हा भाग २२०० फूट व उत्तरेच्या बाजूस गुत्तीकडे १००० फूट उंचीवर आहे. पूर्वेकडील प्रदेश डोंगराळ असून ईशान्येकडील सपाट आहे. बराचसा भाग ओसाड, जंगल-विरहित असून जमीन तांबूस रंगाची व उंचसखल आहे. पेनुकोंडा तालुका लागवडीस निकामी असून सपाट प्रदेशांतील जमीन काळी, कापसास योग्य, आहे. मदकशीर तालुका पाण्याच्या सोयीमुळें सुपीक आहे. येथील खडक किंचलें (आफ्रिका) येथील खडकासारखा असून वज्रकरूरच्या आसपास हिरे व पुष्कळ खेड्यांत कुरुंद नांवाचा खनिज पदार्थ सांपडतो. निवडुंग, बाभूळ व तरवड ह्या ओसाड जमिनीवरील वनस्पति सांपडतात. हवा कोरडी असून निरोगी आहे. उन्हाळा मार्च ते जून असून दोनहि पावसांपासून पुरेसा पाऊस पडत नाहीं. पाऊस सरासरी २३ इंच व तोहि बराचसा ऑक्टोबरांत पडतो. पेनुकोंडा व गुत्ती हे इतिहासप्रसिद्ध किल्ले आहेत. हा किल्ला विजयनगर राज्यामुळें प्रसिद्ध असून हिंदु, मुसलमान, हैदर, इंग्रज, मराठे व निजाम यांचे वारंवार सामने झाले आहेत. १८०० त इंग्रजी अमलाखालीं आला. १८८२ त बल्लारी जिल्हा मोठा होता, त्याचे अनंतपूर व बल्लारी असे दोन केले. पेनुकोंडा व गुत्ती हे किल्ले व ताडपत्री येथील देवळांतील खोदकाम व लेपाक्षी व हेमावती येथील देवळें पाहण्यालायक आहेत. लोकसंख्या ११७१४१९. जमीन कनिष्ठ प्रतीची म्हणून ज्वारी, कोरा, नाचणी व एरंडी हीं पिकें. गुरांची अवलाद हलकी असून मेंढ्यांची पैदास फार होते. जंगलांत बांबू व सागवान मिळतें. वज्रकरूर येथील हिऱ्याच्या खाणी बंद असून कुरुंद देशी पद्धतीनें काढतात. सुती व रेशमी वस्त्रें विणणें हा धंदा. कापूस, गूळ, तरवडाच्या साली ही निर्यात. एम्. एस्. एम्. रेल्वे या जिल्ह्यांतून जाते. या जिल्ह्यांत अवर्षणामुळें वारंवार दुष्काळ पडलेले आहेत.

तालुका—अनंतपूर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ९२५ चौ. मै. लोकसंख्या दीड लाख. यांत १०९ खेडीं आहेत. प्रदेश ओसाड असून पेन्नार आणि चित्रावती नद्या उत्तर व पूर्व बाजूस आहेत; पण शेतीच्या उपयोगी नाहींत.

*गांव*—जिल्ह्याचें, विभागाचें, व तालुक्याचें ठिकाण. एम्. एस्. एम्. रेल्वेचें स्टेशन. लोकसंख्या सु. पंधरा हजार. विजयानगरचा दिवाण चिक्कण्णा उडियार यानें इ. स. १३६४ त हा गांव वसविला व आपल्या पत्नीचें नांव दिलें. जवळच पंदामेरू नदी आडवून तलाव बांधला. हा गांव पुढें हैदर, टिपू व मराठे यांचे वेळींहि प्रसिद्ध होता. १८६९ त येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. गांवाभोंवतीं बागाईत असल्यामुळें हवा रोगट. चांगल्या ठिकाणीं युरोपियन वस्ती आहे. पाऊस २१ इंच. एक कॉलेज, तीन हायस्कुलें, सरकारी ट्रेनिंग शाळा, व इतर शाळा आहेत. जिनिंगचा कारखाना असून लोखंड व किरकोळ माल यांचा व्यापार चालतो.

**अनंतपूर**—म्हैसूर संस्थान, शिमोगा जिल्हा. सागर तालुक्यांतील एक खेडें. लोकसंख्या ४००. पूर्वीचें नांव अंधासुर असून त्याच नांवाच्या राजानें वसविलें. १०४२ त हा १२०० ब्राह्मणांचा अग्रहार होता व १०७९ त राजधानी होती. केलडी राजा वेंकटप्पा नाईक यानें शिवाचार मठ व चंपकसरस तलाव बांधला व अनंदपूर हें नांव दिलें. त्याचेंच अनंतपूर झालें. हैदर–टिपूच्या वेळीं हें गांव प्रसिद्ध होतें.

**अनंतफंदी** (*१७४४–१८१९*) — *एक मराठी शाहीर.* नगर जिल्ह्यांतील संगमनेर येथील राहणारा. कौंडिण्य गोत्री वाजसनेयी ब्राह्मण. बापाचें नांव कवानी बावा व आईचें नांव राजूबाई. आडनांव घोलप. मलीक फंदी या फकिराच्या स्नेहामुळें फंदी हे उपपद जोडलें गेलें. अनंतफंदी पूर्वी तमाशे करी व स्वतः लावण्या रची. अहिल्याबाई होळकर यांनीं ब्राह्मणांस असें करणें उचित नाहीं असें सांगितल्यावर यानें तमाशे करणें सोडून दिलें व कीर्तन करूं लागला. याची कविता कटाव, फटके, लावण्या व क्वचित् श्लोक, आर्या, व ओव्या अशी आहे. सर्व कविता मराठींत असून ओवीबद्ध एकच 'माधवनिधन' ग्रंथ आहे.

श्रीपत फंदी अथवा सवाई फंदी व बापू फंदी असे दोन मुलगे. पहिला कवि असून त्याचे वंशज हल्लीं संगमनेरास आहेत. अनंत फंदीची वाणी राम जोश्यासारखी सुसंस्कृत नसली तरी प्रसादयुक्त व जोरकस आहे. होनाजी बाळासारख्या तत्कालीन शाहीरांचें याच्याविषयीं चांगलें मत होतें. माधवनिधन ग्रंथांत सवाई माधवरावाच्या मृत्यूची कथा असून याचे ६ अध्याय, व ३६० ओव्या आहेत. लावण्या व फटके आहेत. इतर ऐतिहासिक काव्यावरुन यास ऐतिहासिक कवि म्हणतां येईल. यानें हिंदुस्थानींतहि लावण्या केल्या आहेत. याचा मुलगा सवाई फंदी हाहि चांगला कवि असून गायकवाड सरकारकडून वर्षासन होतें. या 'कवनाच्या सागरा'ची फारच थोडी कविता उपलब्ध आहे.

**अनंत वडवे** —अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांतील एक मराठी कवि. आजा प्रल्हादबुवा यांपासून कवित्वशक्ति उचलली. गुरुवर गोपाळाष्टक नांवाचें केलेलें कवन फार मधुर आहे. ग्रंथ–(१) मल्हारी-माहात्म्य, (२) भागवतांतील पंचमस्कंधांतील भरताख्यान, (३) शिवरात्रि-माहात्म्य, (४) प्रदोष-माहात्म्य, कांहीं स्फुट काव्यें.

**अनंतमूळ** – अनंतमूळ (अनंत वेल), सुगंधी पाला, सारिवा (संस्कृत), उपळसरी, श्यामा, इत्यादि नांवें या वनस्पतीस असून बंगाल्यांत व त्रावणकोर ते सिलोनपर्यंत सांपडतें. रक्तशुद्धि करण्याचा गुण सार्सापरिल्यासारखा असून याचा काढा किंवा पाक देतात. सूज कमी करणें, मूत्ररेचक, अग्निमांद्य, ज्वर, रक्तदोष व उपदंशादि विकार यांवर देतात. वेलीची पूडहि कण्हेरींत देतात. एक किंवा अधिक झाडांच्या मुळ्यांच्या जुड्या बाजारांत मिळतात.

**अनंतवर्मा** (१०७६–११४६)— गंग आणि चोल या दोन विख्यात राजघराण्यांना सांधणारा हा महान् पराक्रमी राजा 'चोलगंग' या नांवानें ओळखला जातो. यानें उत्कल देश आपल्या राज्यास जोडून जगन्नाथाचें मंदिर उभें केलें. हा स्वतःस 'परमवैष्णव' म्हणवितो.

२. हा मौखरी राजा (४५०–४७५) आपला पिता शार्दूलवर्मा याप्रमाणेंच मोठा पराक्रमी होता. हा अत्यंत लोकप्रिय होता, इतकेंच नव्हे तर पशुप्रियहि होता. कारण याच्या हातून मृत्यु यावा म्हणून हरणें याच्यापुढें पळून जात नसत.

**अनंतव्रत**—हें एक प्रमुख भारतीय व्रत प्रतिवर्षी भाद्रपद शुद्ध १४ स आचरितात. हें व्रत प्रत्येक कुटुंबांत नसून कोणी सांगितल्यास, अनंत दोरक सहज सांपडल्यास, अगर वंशक्रमागत करावें लागतें. हें शेषशायी नारायणाचें अगम्य स्वरूप असून याची कल्पना सर्परूपांत दाखविली जाते. पूजेसाठीं अनंताची दर्भाची प्रतिमा, चौदा प्रकारचीं फलपुष्पें, नैवेद्यास चौदा निरनिराळीं पक्वान्नें लागतात. यजमानानें भाद्रपद शुद्ध १४ स शुचिर्भूत राहून सायंकाळीं पत्नीसह अनंताचें पूजन करावें व आप्तेष्टांसह प्रसाद घ्यावा. वरील दर्भाच्या प्रतिमेबरोबरच बाजारांतून आणलेल्या रेशमाचा व जरीनें सर्पाकृति केलेला अनंतदोरक आणून त्याची पूजा करावी लागते व पुढें तो दोरक पुढील वर्षापर्यंत अगर कांहीं काल हातांत बांधावा लागतो. हें व्रत अनंत कल्याणाची प्राप्ति देणारें असून नष्ट ऐश्वर्य, संपत्ति, किंवा राज्यें परत मिळवून देणारें आहे, एतदर्थ पांडव, सुमंतु व कौंडिण्य यांच्या कथा व्रतांच्या पोथींत आहेत.

**अनंतशयन**—त्रावणकोरांतील १४ हात लांबीची विष्णूची शेषावर निजलेली मूर्ति, असलेलें स्थान. श्रीमच्छंकराचार्य दिग्विजय करीत फिरत आले असतां येथें देवदर्शन करून एक महिना होते; त्या वेळीं त्यांना उपनयनादि संस्कारहीन असे विष्णुशर्मादिक सहा वैष्णव आढळले. त्यांना बोध करून पुनः ब्राह्मण्यांत आणण्यांत आलें. पेशवाईंतहि या देवस्थानाचा उल्लेख सांपडतो.

**अनंतसिंह** — एक भारतीय क्रांतिकारक. हा चितागांग शस्त्रागारावर हल्ला करण्याकरितां रचण्यांत आलेल्या कटाचा मुख्य सूत्रधार होता व तो बंगालमधील आधुनिक शस्त्रास्त्रयुक्त चळवळीचा नेता होता. याची शरीरप्रकृति उत्तम असून हा फार धाडसी असे. यानें लोकनाथ बाल याच्या सहकार्यानें तालिमखाने व आखाडे चालविले असून हे दोघेहि प्रख्यात तालिमबाज होते. यानें स्वयंसेवक दल उभारून त्यास कवाईत, लाठीकाठी फिरविण्याचें शिक्षण देण्याचें कार्य सुरू केलें होतें. स्वयंसेवकांपुढें जहाल भाषणें करणें, मारामारी करणें, राजद्रोहविषयक कायद्यांचा भंग करण्याबद्दल आग्रह धरणें, व सरकारच्या मनांत दहशत बसेल असा सशस्त्र हल्ला करण्यास लोक तयार करणें, असे त्याच्यावरील खटल्यांत त्याच्यावर आरोप होते. १९२३ सालीं चितागांग येथें भरदिवसां आगगाडी लुटण्याच्या कामांत याचें अंग होतें असें म्हणतात; पण त्या खटल्यांत तो निर्दोषी सुटला. पुढें बंगाल सरकारनें अनिष्ट म्हणून गणेश घोष वगैरेंबरोबर यासहि स्थानबद्ध करून ठेवलें होतें. १९२७ सालीं याची मुक्तता झाली व त्यानें पुन्हां शारीरिक शिक्षणाचा प्रचार सुरू केला व घोड्यावर बसणें, लाठीकाठी फिरविणें, मोटार चालविणें, रिव्हॉल्व्हरनें नेम मारणें, वगैरे गोष्टींचें शिक्षण तो देऊं लागला. या सर्वांत तो स्वतः पटाईत होता. यानें सूर्यसेन, मास्तरदा व अंबिका चक्रवर्ती यांच्या साहाय्यानें कांहीं तरुण मुलांस क्रांतिकार्य करण्यासाठीं तयार केलें व चितागांग येथील शस्त्रागाराची लूट केली. तो बरेच दिवस फरारी होता

पण पुढें तो एके दिवशीं स्वतः होऊनच पोलिसांच्या स्वाधीन झाला. अखेरीस त्यास जन्मठेपेची शिक्षा झाली.

**अनंतसुत विठ्ठल**—१. एक मराठी कवि. हा ७० वर्षांपूर्वी बडोदें येथें होऊन गेला. हांगा नदीच्या कांठीं पिंपळगांव येथें वडील राहत असून तेथील जोशी व कुलकर्णीपण त्याकडे होतें. विठ्ठलाची आई राधाबाई वारल्यावर अनंतांनीं संन्यास घेतला. विठ्ठलानें वडिलांनाच गुरु केलें. याचा 'दत्तप्रबोध' हा एकच ग्रंथ असून पहिल्या ३७ अध्यायांत शिवपुराण, नारदपुराण व पद्मपुराण यांच्या आधारें दत्तात्रेयांच्या कथा वर्णिल्या असून पुढील २४ अध्यायांत दत्तसंप्रदायांतील संतांच्या कथा दिल्या आहेत. तसेंच वडिलांची भगवद्भक्ति व दत्तभक्तांची गुरुपरंपरा दिली आहे. याचा एक पीत वस्त्र परिधान करणारा व उघड्यानें कीर्तन करणारा निंबराज संप्रदाय हल्लीं आहे. याचे ग्रंथ—वस्त्रहरण, गजगौरीव्रत, सुधन्वाख्यान, ताटकावध, गरुड-हनुमान भेट.

**ॲनन्झिओ गेब्रिएल** (१८६३–)—हा इटालियन कवि, कादंबरीकार आणि नाटककार शाळेंत विद्यार्थी असतांनाच 'प्रिमो व्हेरे' या नांवाच्या काव्यसंग्रहानें प्रसिद्धीस आला. त्याच्या कित्येक कादंबऱ्या इंग्रजी भाषेंत प्रसिद्ध झाल्या आहेत. उदा० ; 'सुखाची संतति' (दि चाइल्ड ऑफ प्लेझर), 'शिलाकुमारी' (दि व्हर्जिन ऑफ दि रॉक्स), 'जीवनाग्निरस' (दि फायर ऑफ लाईफ). त्यानें नाटकें लिहिण्यास उत्तर वयांत सुरवात केली. त्यांपैकीं 'गिओकोंडा' व 'फ्रान्सेस्का' या दोन नाटकांचे प्रयोग इंग्लिश नाट्यगृहांत होऊं लागले. त्याचे अगदीं अलीकडील ग्रंथ 'ल शेन्हरेफ्युले', 'ला बेफा द बुकारी', 'नोक्त्युर्नो' हे असून विद्यमान इटालियन ग्रंथकारांत भाषासमृद्धि आणि लेखनशैली या दोन बाबतींत इतर लेखकांपेक्षां हा फार उच्च दर्जाचा ग्रंथकार आहे. १ल्या महायुद्धांत १९१५ ते १९१८ पर्यंत त्यानें लष्करांत नोकरी केली आणि १९१९च्या सप्टेंबर महिन्यांत यान फ्यूम बंदरावर सैन्यानिशीं हल्ला करून तें हस्तगत केलें.

**अननस**—हें फळ मूळचें दक्षिण अमेरिकेंतील उष्ण प्रदेशांतलें असून तेथून पूर्वेकडे पसरलें. पानें जाड व तंतुमय असून त्यांच्यामधून लहान देंठावर फळ वर येतें. फळावर जाड खवले असतात. फळ गोड असतें; त्याचा मोरंबा करतात. रसाचा अर्क तयार करतात. तो औषधी असतो. सिंगापूर, फिजी, हवाई आणि नाताळ या देशांत अननसांचा मोठा व्यापार चालतो. पानांच्या धाग्यापासून कापड तयार करतात.

**अनयमलय**—मद्रास इलाखा, कोईमतूर जिल्ह्याच्या दक्षिणेकडील सह्याद्रीचा भाग. यास हत्तीचा डोंगर हें नांव असून नीलगिरीप्रमाणें हवा आहे. डोंगराच्या दोन ओळी असून खालची ३ ते ४½ हजार फूट व वरची ८ हजार फूट उंच आहे. उतरणीवर १८५०० एकर जमीन कॉफीचे मळ्याकरितां आहे. जंगलांत नामांकित सागवान असून बाहेर काढण्याचें काम हत्ती करितात व माल तळावरून तारेनें खालीं आणण्याची व्यवस्था केली आहे. डोंगरांतील वनस्पति, लांकूड व तंतु यांचे नमुने कोईमतूर येथील जंगलपदार्थ संग्रहालयांत ठेविले आहेत. जंगलांत गवे, सांबर, वाघ व अस्वलें हे प्राणी असून कादन, मुदुवन, पुलैयन, मलसर, इत्यादि जंगली लोक येथें राहतात.

**अनरण्य**— १. सूर्यवंशी इक्ष्वाकु वंशांतील पुरुकुत्स राजाचा धाकटा मुलगा त्रसदस्यु याचा दुसरा मुलगा. यास हर्यश्व व वृहदश्व हे दोन मुलगे. हा अयोध्येस राज्य करीत असतां रावणानें यास जिंकल्यावर यानें 'माझा वंशज तुझा नाश करील' असा रावणास शाप दिला. (वा. रामायण उत्तर. स. १९)

२. सूर्यवंशी ऋतुपर्णाचा नातू व सर्वकर्माचा मुलगा.

३. कार्तिक महिन्यांत मांसाशन वर्ज्य केलेला एक प्राचीन राजा (महाभारत १३. ११५, ५५६१).

४. सूर्योदय व सूर्यास्त या कालीं ज्याचें नामस्मरण करावें असा राजा. (महाभारत–१३. १६६, ७६८४).

**अनवरी, आषदुद्दिन**—एक इराणचा कवि. जन्म खोरासानमध्यें १२ व्या शतकाच्या प्रारंभीं. सुलतान संजरच्या मर्जीतला. सुलतानानें ख्वारिझमवर स्वारी केली असतां अनवरी व त्याचा प्रतिस्पर्धी राशिदी यांच्यांत काव्यविषयक रणकंदन सुरू झालें. १२ व्या शतकांत बल्ख येथें अंत. दिवान अनवरी या ग्रंथांत मोठ्या कविता व वीणागीतें होतीं. खोरासानचे अश्रु हा सर्वांत मोठा ग्रंथ. यांतील कांहीं कविता सादीनें गुलिस्तानांत घेतल्या असून हा त्या वेळचा प्रसिद्ध ज्योतिषी होता.

**अनवरुद्दीन**—कर्नाटकचा एक नवाब, प्रथम दिल्लीच्या बादशहाच्या पदरीं नोकरी. पुढें कडा जहानाबादची सुभेदारी. परंतु गैरव्यवस्थेमुळें नोकरी सोडून अहमदाबादेस आला. गाझीउद्दीन–निजामउल्मुल्काचा बाप–यानें सुरतेस मोठ्या प्रातीच्या जागीं नेमलें. निजामउल्मुल्क दक्षिणेकडे सुभेदार झाल्यावर कर्नाटक व राजमहेंद्री यांवर देखरेखीसाठीं याची नेमणूक झाली. येथील कारभार १७२५–१७४१ पर्यंत केल्यावर, बालराजाच्या खुनानंतर कर्नाटकची गादी बळकावली. निजामाचा नातू मुजफरजंग याशीं झालेल्या लढाईत (१७४९) मारला गेला. त्या

वेळीं १०७ वर्षांचें वय होतें म्हणतात. अवदी कवीनें अनवरनामा नांवाचें वीररसप्रधान स्तुतिपर काव्य लिहिलें आहे. हैदराबादचा नबाब नासिरजंग यानें याचा मुलगा महमंदअली यास कर्नाटकचा नबाब कायम केलें.

**अनवलोभन**—हिंदूंच्या १६ संस्कारांपैकीं एक. हा सर्व गृह्यसूत्रांत आहे. आश्वलायन गृह्यसूत्रांत पुंसवनानंतर हा सांगितला असून गर्भिणी स्त्रीच्या तिसऱ्या महिन्यांत गर्भाचा नाश न व्हावा म्हणून करावयाचा असतो. बहुतेक हा संस्कार पुंसवनाबरोबरच केला जातो. अश्वगंधा वनस्पतीच्या रससेवनानें गर्भाचा नाश होत नाहीं अशी भावना आहे, म्हणून पतीनें गर्भिणीच्या उजव्या नाकपुडींत हा रस पिळणें हा विधि मुख्य आहे. त्या वेळचा 'माहं पौत्रमघं नियां' हा मंत्रहि अर्थदृष्ट्या यथार्थ आहे.

**अनवळ** (अनंतहळ्ळी)—विजापूर जिल्हा, कलादगीच्या आग्नेयीस पांच मैलांवरील खेडें. लोकसंख्या एक हजार. अनंत, मारुति व रामलिंग हीं देवळें असून अनंताच्या देवळांत शेषशायी विष्णु, पायाशीं लक्ष्मी व नाभींतून निघालेला ब्रह्मा यांसहित विष्णूची मूर्ति आहे. देवळावर दशावतार काढलेले असून घुमजली आहे.

**अनसिंग**—वऱ्हाड, जिल्हा अकोला, वाशिम तालुका. वाशिमच्या आग्नेयीस १५ मैलांवर; लोकवस्ती तीन हजार. पूर्वी परगण्याचें ठाणें होतें. शृंगऋषीवरून हें नांव पडलें असें मानीत असून ओसाड गांवठाणांत एक हेमाडपंती देऊळ आहे. जवळच एक पायऱ्यांची विहीर व नाला आहे. पाणी नेहमीं असतें. विहिरीच्या एका बाजूस सतीचा हात खोदलेला आहे. गांवची जमीन हलकी आहे. उंन्हाळा तलावास नेहमीं पाणी असतें. तरीपण पाणीपुरवठा अपुरा आहे.

**अनसूया**—कर्दमऋषि व देवहुती यांच्या नऊ मुलींपैकीं एक व स्वायंभुव मन्वन्तरांतील ब्रह्ममानसपुत्र अत्रि ऋषीची स्त्री. वैवस्वत मन्वन्तरांत पुनः अत्रीची स्त्री.

अनसूया ही परम पतिव्रता व महातपस्विनी होती. दहा वर्षे अनावृष्टि झाली असतां हिनें आपल्या तपश्चर्येनें फळें, मुळें व पाणी उत्पन्न करून जीव जगविले. मांडव्य ऋषीस शूलावर चढविलें असतां अंधारांत त्यास एका ऋषिपत्नीचा—अनसूयेच्या सखीचा—धक्का लागला. मांडव्यांनीं सूर्योदयापूर्वी विधवा होशील असा शाप दिला असतां अनसूयेनें सूर्योदयच होऊं दिला नाहीं. शेवटीं सर्व देव व ऋषि शरण आल्यावर आपल्या सखीस वैधव्य न येतां सूर्यास उदयास आणलें. राम, लक्ष्मण व सीता वनवासांत असतां अनसूयेनें त्यांना आश्रमीं आणून सीतेस ममतेनें वागवून व पातिव्रताधर्म शिकवून तिला दिव्य वस्त्र व अंगराग अर्पण केला. (वा. रा. अयोध्याकांड, सर्ग ११७).

अत्रिसुत दत्तात्रेयाची माता. ब्रह्मा, विष्णु व महेश हिचें पातिव्रत्य परीक्षण्यास भिक्षावेषानें आले असतां हिनें तपःसामर्थ्यानें त्यांस बालकरूप केलें, तेच पुढें दत्तात्रेयरूपानें अवतरले अशी कथा.

**अनहिलवाड-पूर-पट्टण**—गुजरातेंतील एक प्राचीन शहर व चावडावंशी रजपूत राजांची राजधानी. ही गज्नीच्या महंमदानें जिंकून घेतली. अल्लाउद्दिनाच्या वेळीं येथें कर्णदेव राज्य करीत होता. त्याला अल्लाउद्दिनानें हांकून लाविलें. त्या वेळीं अनहिलवाडांत सुंदर देवालयें, राजमंदिरें जीं होतीं त्या जागीं मशिदी आणि रोजे उभे राहिले. येथें एक किल्लाहि होता. पंधराव्या शतकांत अनहिलवाडचें राज्य मुसलमानांनीं बुडवून अहमदाबाद राजधानी केली.

**अना**—युफ्रेटीस नदीवरील अति प्राचीन शहर. पूर्वीचीं नांवें हनाट (इ. स. पूर्वी २२०० वर्षे पत्रांत), अनाट (असुर नझिरपालचा लेखक), अनाथा (ग्रीक व लॅटिन लेखक), अना (अरब). हें शहर बेटावर होतें याबद्दल मात्र एकमत आहे.

बाबिलोनियन साम्राज्यांतील या शहराची स्थिति कळत नाहीं. जूलियन बादशहास इराणच्या स्वारींत येथें पहिला अडथळा झाला व एक खलीप हद्दपारीनंतर येथें राहिला. बऱ्याच प्रवाशांनीं व लेखकांनीं या शहरासंबंधीं माहिती लिहून ठेविली आहे. अरब कवींनीं येथील दारूचें वर्णन केलें आहे.

**अनागतवंश**—एक बौद्ध काव्यग्रंथ. (भविष्यकाळची नोंद). मेत्तेय या भावी बुद्धावर १४२ पद्यखंडाचें हें काव्य पालींत कस्सपानें लिहिलें आहे, असें गंधववंशांत आढळतें. सासन वंशदीपामध्यें तो चोल साम्राज्यांत राहत असावा असें सांगितलें आहे. कांचिपूर येथें तो राहत नसावा. कारण राहत असता तर चोलरथ्याऐवजीं कांचीपूर हें नांव त्यानें वापरलें असतें. कस्सपाचा काल व इतर ग्रंथ यांविषयीं माहिती उपलब्ध नाहीं. महाबोधिवंशाचा कर्ता उपतिस्स यानें अनागतवंशावर टीका लिहिली आहे. मेत्तेय या भावी बुद्धाच्या ठिकाणीं पुढील बौद्ध लोकांचा विश्वास वाढल्यानें अनागतवंशास बरेंच महत्त्व आहे. एक सोडून कोणत्याहि निकायांत किंवा पीटकांत मेत्तेयाचा उल्लेख नाहीं, फक्त दीघनिकायाच्या २६ व्या संवादांत बुद्धाच्या तोंडीं 'मेत्तेयाला हजारों अनुयायी मिळतील, पण मला सारे शेंकडोंच आहेत' हें वाक्य घातलें आहे. महावस्तूमध्यें ही कथा प्रचलित असून त्यांत अकरा वेळां मेत्तेयाचा उल्लेख आहे व दोनतीन उताऱ्यांत सविस्तर माहिती आहे. केतुमति शहराच्या विस्ताराविषयींची माहिती अनागतवंशाशीं जुळते, पण इतर गोष्टी जुळत नाहींत.

**अनागोंदी**—तुंगभद्रा नदीच्या उत्तर तीरावरील व विजयनगरच्या समोरील शहर. जुनीं देवळें येथें बरींच असून वालीची किष्किंधा नगरी येथेंच होती असें म्हणतात. हें छोटेंसें तटबंदिस्त शहर होतें. येथें एक राजवंश राज्य करीत होता. त्यानें अनागोंदीचा किल्ला मजबूत केला. हा राजवंश होयसळ बल्लाळाचा मांडलिक होता. हरिहर व बुक्क हे दोघे भाऊ वारंगळच्या राजाच्या पदरीं होते. वारंगळ पडल्यावर ते अनागोंदीस आले. तेव्हां एकास दिवाणगिरी व दुसऱ्यास खजिनदारी मिळाली. त्यांनीं अनागोंदीस बरेंच महत्त्व आणलें. सन १३३४ त सुलतान महंमुदानें हें शहर काबीज करून मलीक नांवाचा कारभारी नेमला. हरिहर व बुक्क यांनीं समोरच तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर विजयनगर स्थापिल्यावर अनागोंदीचें महत्त्व गेलें.

येथें रंगनाथस्वामी, व लक्ष्मीदेवी यांचीं देवळें असून लक्ष्मीदेवीच्या देवळांत मारुति व गरुड यांच्या लांकडी सुबक मूर्ति आहेत, त्या उत्सवांत मिरवतात. जवळच दोन मैलांवर पंपा सरोवर आहे. अनागोंदीच्या राजानें नेलेली पंढरपूरची विठोबाची मूर्ति भानुदासानें परत आणली, अशी आख्यायिका आहे.

येथील एक राजा आपणास सार्वभौम म्हणवी. सर्व पृथ्वीचा वसूल आपल्या खातीं जमा करून व निरनिराळ्या देशांच्या नांवें लिहून आपली करमणूक करी. यावरून फाजील हिशेब म्हणजे अनागोंदीचा जमाखर्च व अनागोंदी कारभार म्हणजे अंदाधुंदी.

**अनाझरवस**—हें प्राचीन सिलिशियन शहर, पिरेमस नदीच्या पश्चिमेस १० मैलांवर अलैन मैदानांत आहे. रोमन साम्राज्याच्या वेळीं यास सेसेरिया म्हणत. भूकंपानें नाश झाल्यावर जस्टिनिअन बादशहानें बांधलें म्हणून जस्टिनोपोलिस हें नांव (इ. स. ५२५). १२ व्या शतकांत लेसर आर्मेनियाचा राजा पहिला थोरोस याची राजधानी व त्याच वेळीं अनाझर्वो असें नांव होतें. नैसर्गिक मजबुतीमुळें साम्राज्य व त्यावर चाल करणारे मुसलमान यांमधील लढ्यांत या शहरानें बराच पुढाकार घेतला. हरुन-अल-रशीदनें (इ. स. ७९६) पुनः बांधलें व सैफउद्दौला हमुदानीद (१० वें शतक) व सैकेत यांनीं डागडुजी केली, व धर्मयोध्यांनीं नाश केला. खालच्या भागाची भिंत अलीकडील असून, मल्लभूमि, विजयाची कमान, रंगभूमि हे जुने अवशेष अजून सांपडतात.

**अनातोलिया**— आशिया मायनरचें अर्वाचीन नांव. आशिया मायनर पहा.

**अनॉप्लोथेरियम**—ही एक सखुर चतुष्पाद नष्ट प्राण्यांची जात आहे. या प्राण्यांचें एक स्वतंत्र कुल असून तें डुकरें आणि रवंथ करणारे प्राणी यांच्यामधील अवस्थेंत मोडतें. या जातीचे कांहीं प्राणी गिनिपिगपेक्षां लहान असून कांहीं गाढवापेक्षांहि मोठे असत.

**अनाबाप्टिस्ट**—हा एक ख्रिस्ती धर्मपंथ असून ख्रिस्ती धर्मांतील अगदीं लहान अर्भकांना बाप्तिस्म्याचा संस्कार करण्याला या पंथाचा विरोध आहे, म्हणून इतर ख्रिस्ती धर्मपंथांनीं या पंथाला बाप्तिस्माविरोधी हें नांव दिलें आहे. या पंथाचा आद्यसंस्थापक मार्टिन ल्यूथरचा शिष्य निकोलस स्टॉर्श हा असून सामाजिक व राजकीय समतेच्या तत्त्वावर ख्रिस्ती समाजाची पुनर्रचना करणें हाहि त्याचा हेतु होतासें दिसतें. त्यामुळें त्याच्याभोंवतीं अनेक जहाल लोक जमले, त्यांतील थॉमस मुंझेर या नांवाच्या पुढाऱ्यानें स्वाबिया आणि फ्रॅंकोनिया येथील शेतकऱ्यांना बंड करण्यास प्रवृत्त केलें. हें बंड १५२५ मध्यें मोडण्यांत येऊन मुंझेरला हाल हाल करून ठार मारण्यांत आलें. त्याच्या मृत्यूनंतर त्याचे अनुयायी त्याच्या जहाल मतांचा प्रसार दशदिशां करीत सुटले. या लोकांनीं १५३४ मध्यें वेस्ट फालियामधील मुन्स्टर शहरांत आपल्या कार्याचें मुख्य केंद्र स्थापलें. तेथें बॉकहोल्ड व मॅट्थिअस या दोन जहाल पुढाऱ्यांमुळें मुन्स्टर शहरांत अनेक अतिरेक व अत्याचार घडले. हें शहर १५३५ मध्यें हस्तगत करून बॉकहोल्ड व त्याचे अनेक अनुयायी यांना मरणाची शिक्षा देण्यांत आली. तरीहि पुढें या पंथांत मेल्शिअर हॉफमन, गॅलेनिअस अब्राहामसन आणि मेनोसायमन्स हे तीन अत्यंत प्रसिद्ध प्रचारक उदयास आले आणि त्या प्रत्येकानें आपापला एक उपपंथ स्थापन केला.

**अनारकली**—(अनारकलीचा अर्थ डाळिंबाची कळी). अकबरकालीन एक रूपवती स्त्री. नादिरा बेगम हें दुसरें नांव. जहांगिर बादशहाच्या वेळीं होऊन गेली. हिची कबर लाहोरजवळ अनारकली नांवाच्या ठिकाणीं आहे. हिच्यासंबंधानें पुष्कळ निरनिराळ्या गोष्टी सांगण्यांत येतात. कोणी हीस राजकन्या व तर कोणी दासी म्हणत असून तीवर जहांगिरचें प्रेम जडलें, सबब अकबरानें जिवंत पुरली. या गोष्टींत तथ्य नसलें तरी अकबर किंवा जहांगिर यांच्या वेळीं ही होती व हिच्यावर कोणी राजपुत्र आपक्त झाला म्हणून हिचा शेवट वाईट झाला हें तिच्या थडग्यावरील लेखावरून दिसतें.

विल्यम फिंच म्हणतो, ही अकबराची बायको व दानियालची आई असून सलीमशीं असलेल्या अनैतिक संबंधामुळें अकबरानें हिला भिंतींत चिणून ठार मारली व पुढें सलीमनें तिच्या स्मरणार्थ ही कबर बांधली, तर अनारकली ही अकबराची आवडती स्त्री असून तिच्याशीं असलेल्या सलीमच्या अनैतिक वर्तनामुळें त्यास अकबर बेवारस ठरविणार होता, असें एडवर्ड टेरी म्हणतो.

**अनार्द्रायित**—(अन्हायड्राइट). एक खनिज पदार्थ. रासायनिक घटना : जलहीन खटगंधकित (कॅल्शियम सल्फेट).

ह्याचा रंग पिंगट आणि निळा असतो. निसर्गांत हा अनेक रूपांत आणि अनेक रंगांत सांपडतो.

**अनावल**—गुजराती खेडवळ ब्राह्मणांचा एक वर्ग. यास भथेला देसाई व मस्तान अशीं नांवें आहेत. बडोदें, नवसरी जिल्ह्यांतील अनावल गांवावरून हें नांव पडलें असून, दक्षिण गुजरातेंतील हे पहिले वसाहतवाले. नवसरी प्रांतीं यांची वस्ती आहे. बडोदें संस्थानांत १९३१ सालीं ११८१८ अनावल होते व सर्व शेतकरी जमिनदार होते. यांतील श्रेष्ठ वर्गाला देसाई व कनिष्ठाला भथेला म्हणतात. देसाई भथेल्यांशीं बेटीव्यवहार करीत नाहींत, पण भथेला देसायांस मुली देतात. यामुळें कांहीं विचित्र प्रकार आढळतात. बहुपत्नीत्व मान्य असून एखादा देसाई पैशासाठीं हुंडा घेऊन दुसरी बायको करतो. हुंडापद्धती-मुळें कांहीं देसाई कुळें कर्जबाजारी झालेलीं दिसतात. गेल्या २५-३० वर्षांत कांहीं सुधारणा झाली आहे.

रावणवधानंतर राम अगस्ति ऋषीच्या आश्रमीं आले असतां त्यांच्याच आज्ञेनें रावणवधार्थ प्रायश्चित्तविधि केलेलें अनावल हें स्थान. येथें एका भिल्लाखेरीज कोणी नसल्यानें त्यानें गंगा-कुलगिरीहून १२००० निरनिराळ्या १२ गोत्रांचे ब्राह्मण आणविले. त्यांनीं १२००० शेपाच्या मुलींशीं लग्नें केलीं. रामानें दिलेली दक्षणा न घेतल्यानें तुम्हांला वेद शिकण्याचा, याज्ञिकीचा व दक्षिणा घेण्याचा अधिकार नाहीं असा शाप दिला. अशी अनावल किंवा भथेला यांची उत्पत्ति सांगतात. दुसरी कथा, रामानें ब्राह्मणांभावीं भिल्लांना ब्राह्मण करून घेऊन यज्ञ केला. यावरून ही जात् शुद्ध नसावी व धर्मांतरानें हींत कांहीं समावेश झाला असावा अशी समजूत आढळते.

**अनाहगड**-पंजाब, पतिआळा संस्थानांतील एक निझामत. क्षेत्रफळ १८३६ चौ. मै.. लोकसंख्या सुमारें पांच लक्ष. हींत ४ गांवें व ४'९४ खेडीं आहेत. मधूनमधून ब्रिटिश मुलूख आहे.

अनाहगड तहसिलीचें क्षेत्रफळ ३४६ चौ. मै.. लोकसंख्या दीड लक्षावर. हींत ३ गांवें व ८६ खेडीं आहेत.

**अनाहित**—मझ्द संप्रदायांतील एक प्रमुख देवता. यश्त, व अवेस्ता व इतर अनेक ठिकाणीं हिची बरीच माहिती मिळते. 'आर्द्वीसुरा अनाहित' म्हणजे श्रेष्ठ, बलिष्ठ आणि पवित्र अशी पर्जन्य व वसंत यांची अधिष्ठात्री, नक्षत्रमंडळांत वास करणारी देवता असून हिच्यापासून नद्या उगम पावतात व सर्व प्राणि-क्षेत्रांतहि हिचा प्रभाव चालतो, असा मझ्दानुयायांचा विश्वास आहे. अवेस्ताप्रमाणें पाहतां अनाहित पुरुषबीज शुद्ध करणारी, स्त्रियांचे गर्भ व दुग्ध पवित्र ठेवणारी, उपवर मुली व प्रसूति-समयीं बायका जिची आराधना करतात अशी, वारा, पाऊस, ढग आणि गारा असे चार पांढरे घोडे जुंपलेल्या रथांत बसून संग्रामास जाणारी व योद्ध्यांना जय व युद्धसामुग्री मिळवून देणारी देवता. अवेस्तांत हिचें वर्णन आपल्याकडील संक्रांती-सारखें दिलें आहे.

अनाहित ही अनत या सेमेटिक देवीसारखी आहे. अर्टाक्स-र्क्सिज् नेमोननें इ. स. पूर्वी ३-४ थ्या शतकांत इराणी लोकांना सगुण मूर्तीची उपासना करण्यास शिकविलें. अनाहित-पूजा सबंध इराणी साम्राज्यावर पसरलेली आढळते. इराणाबाहेर आर्मेनिया, रोमन अमलाखालीं इरेक्ष, पॉंटस आणि कॅपेडोशिया येथें ही देवता दिसते. ग्रीक लोक अथीना या युयुत्सु व समृद्धिदायक ॲफ्रोडिटीशीं हिला एकरूप समजतात.

**अनियंत्रित शासनपद्धति**—(ॲब्सोल्यूटिझम). राज्य-कारभार अनियंत्रितपणें चालविण्याची पद्धति. अशा राज्यांत प्रजेला प्रतिनिधि निवडण्याचा हक्क किंवा मताधिकार नसतो, किंवा राज्यकारभारांत कोणताहि भाग घेण्याचा हक्क नसतो. १६ व्या आणि १७ व्या शतकांत युरोप खंडांत असले अनियंत्रित राजे राज्य करीत होते. पण हल्लींप्रमाणें लोकमताला मान न देणारे ते राजे नव्हते; उलट सरदारांशीं विरोध करून लोकमत अनुकूल ठेवून आपली सत्ता त्या राजांनीं बळकट बनविली होती, व ते राजे स्वतःला 'बेनेव्होलंट' किंवा 'एन्लायटन्ड' म्हणजे लोक-कल्याणेच्छू किंवा थोर राजकारणी म्हणवीत असत. त्यानंतर पुढें लोकसत्ताक राज्यपद्धति आणि राजांचे ईश्वरदत्त हक्क यांचा झगडा सुरू झाला; त्या वेळीं 'ॲब्सोल्यूटिझम' या शब्दाला हल्लींचा वाईट अर्थ प्राप्त झाला. चालू काळांत ज्या देशांत हुकूमशाही (डिक्टेटोरियल) राज्यपद्धति उर्फ लीडर स्टेटस् आहेत, त्यांना वाईट अर्थानें 'ॲब्सोल्यूटिझम' हा शब्द वापरतात.

**अनिरुद्ध**— १. श्रीकृष्णाचा नातू, प्रद्युम्नाचा मुलगा. रुक्मि राजाची मुलगी रोचना ही याची स्त्री असून वज नांवाचा मुलगा होता. विवाहप्रसंगीं मोठा कलह झाला होता. बाणा-सुराची मुलगी उषा ही दुसरी स्त्री. या विवाहांत यादवांशीं बाणासुराचें मोठें युद्ध झालें होतें. हें उपाख्यान नाटक-सिनेमांत व चित्ररूपानें दाखवितात.

२. (इ. स. १४६४) — शतानंदाच्या 'भास्वतीकरण' ग्रंथावरील टीकेचा कर्ता व भावशर्मन्चा मुलगा.

**अनोलिन**—नीलिन पहा.

**अनु**— १. सोमवंशी ययाति-शर्मिष्ठा पुत्र. ययातीची जरा ग्रहण न केल्यानें यास राज्याधिकार न मिळून हा म्लेच्छा-धिपत्य पावला. सभानर, चक्षु व परोक्ष असे याचे तीन मुलगे (मत्स्य पु. ३४).

२. सोमवंशी यदुपुत्र क्रोष्टाच्या ज्यामघ वंशांतील क्रथ-कुलांतील कुरुवंश राजाचा पुत्र. याचा पुत्र पुरुहोत्र.

३. क्रथवंशांतील सात्वतपुत्र, अंधक कुलांतील कपोतरोमा राजाचा पुत्र. याचा पुत्र अंधक.

४. ऋग्वेदांत अनु व अनव यांचा राष्ट्र म्हणून उल्लेख आहे. यदु वगैरे इतर लोकांबरोबर हेहि परुष्णीच्या तीरीं होते.

**अनुजीवनावस्था**—( लॉ ऑफ रिकॅपिच्युलेशन ). जीवशास्त्रामध्यें असा एक सिद्धांत आहे कीं, प्रत्येक व्यक्तीच्या जीवनाचा इतिहास (पॉन्टोजेनी), विशेषतः त्याच्या गर्भावस्थेतील निरनिराळ्या अवस्थांचा इतिहास पाहिला असतां तो त्या जातीच्या इतिहासाचीच पुनरावृत्ति ( फायलोजेनी ) आहे, असें दिसून येतें.

**अनुनय**—अनुनय हा शब्द स्त्री–पुरुषांच्या परस्परांच्या प्रेमयाचनेसंबंधीं वापरला जातो. तेव्हां या विषयाचे साधारणतः तीन भाग पडतातः ( १ ) विवाहपूर्व अनुनय, ( २ ) विवाहोत्तर दंपतींतील अनुनय, व ( ३ ) विवाहापेक्षेशिवाय किंवा वैवाहिक नियमांविरुद्ध अनुनय. पहिला प्रकार सर्वत्र दृष्टीस पडतो असेंच नाहीं, पण दुसरा व तिसरा प्रकार सर्वत्र दृष्टीस पडतो. पशु–पक्ष्यांतसुद्धां संभोगापेक्ष अनुनय आढळतो, तर मनुष्य जातींत असेल तर काय नवल? अनुनयाचें पर्यवसान विवाहांत व्हावें ही अलीकडील पद्धत असून वैदिक व पौराणिक काळीं ह्या पद्धतीचा विकास दिसत नाहीं. प्रौढ विवाह रूढ असला म्हणजे अनुनयपद्धतिच असते असें नाहीं. पूर्वी फक्त गांधर्व विवाहांत अनुनयाची कल्पना असून बाकीच्या विवाहप्रकारांत नाहीं. सीता, द्रौपदी, सावित्री यांच्या चरित्रांत विवाहोत्तर अनुनय–पतिव्रताधर्म–दाखविला आहे. यावरून प्राचीन कालींहि अनुनयपद्धति नव्हती. दमयंती किंवा अन्य राजकन्या यांच्या कथांत एखाद्या दूरस्थ पुरुषाची किंवा स्त्रीची माहिती करून घेऊन किंवा वर्णनावरून झुरणें किंवा मला पळवून न्या म्हणून कळविणें यापेक्षां जास्त मजल नाहीं.

इंग्लंड व युनायटेड स्टेट्सचा उत्तर भाग यांत व त्यांतल्या त्यांत खेड्यापेक्षां शहरांत ही पद्धति विशेष दृष्टीस पडते. जसा पैतृक अधिकार किंवा मदत कमीजास्त असेल तसें स्त्री–पुरुषांच्या मोकळ्या व्यवहारास क्षेत्र असणार.

अनुनयपद्धतीचें प्रमुख अंग म्हणजे परिचय. पुष्कळशीं लग्नें विवाह्य तरुण–तरुणींचा बऱ्याच दिवसांच्या किंवा लहानपणापासूनचा परिचय असतांना होतात. परंतु कित्येक विवाह, निदाघकालीं मजा मारण्यास गेले असतां, नौकाविहार व नाटक वगैरे प्रसंगीं तरुण–तरुणी एकत्र येऊन व परिचय होऊन, होतात. तेव्हां ह्या विवाहपूर्व परिचय–कालाची मर्यादा अमुकच असते असें नाहीं. घरंदाज घराण्यांत विवाहयोग्य तरुण–तरुणींची गांठ मित्र किंवा हितचिंतक यांनीं घालावी हें शिष्टमत आहे. परंतु यापेक्षां आपली आपण ओळख करून घ्यावी हें तरुण–तरुणींस रुचतें. व यामुळें शहरांत नाटक–सिनेमा अगर दुकानें येथें तरुणी तरुणांचें मन आकर्षून घेतात.

अनुनयपद्धतींत एकमेकांनीं आपण एकमेकांची फिकीर बाळगतों हें दाखवावयाचें नसून आपलें प्रेम गुप्त ठेवावयाचें असतें.

पाश्चिमात्य राष्ट्रांत या पद्धतीस अनुकूल परिस्थिति आहे. कारण तेथें स्त्री–स्वातंत्र्य असल्यामुळें व सहशिक्षण व सहव्यवसाय असल्यामुळें स्त्री–पुरुषांची ओळख लवकर होते. तेथील कांहीं मातापितरांना वाटेल त्या स्त्रीशीं अगर पुरुषाशीं आपल्या पाल्यानें मैत्री करावी हें पटत नाहीं, पण त्यांस कांहीं करतांहि येत नाहीं. आपण नियोजिलेला वर किंवा वधू आपल्या पाल्यास पटेलच असें नसल्यामुळें पुष्कळ मातापितरें लग्न–भानगडींत पडत नाहींत. तेव्हां विवाह्य तरुण–तरुणींचा कल पाहूनच हितचिंतकांनीं वागावें लागतें. घरंदाज घराण्यांत मात्र इच्छित वधूवरांची गांठ घरीं आणून अगर अन्य मार्गे घालण्याचा प्रयत्न हितचिंतक व आप्त करतात. औद्योगिक परिस्थितीमुळें तरुण व तरुणी मिळवितीं होतात व त्यामुळें पालकांचा त्यांचेवर विशेष अधिकार चालत नाहीं. याशिवाय या पद्धतीस चालना देणाऱ्या संस्था म्हणजे सार्वजनिक उपवनें, नाटकें, सिनेमा, मजा मारण्याचीं स्थळें. मजेंत कोणी तरी सहभागी असावा अशी तीव्र इच्छा असल्यामुळें पोहणें, समुद्रस्नानास जाणें, कृत्रिम वर–खालीं करणाऱ्या रेल्वेंत बसणें, इत्यादि ठिकाणीं तरुण–तरुणी विशेष जमतात व अशा ठिकाणीं अनुनयास अनुरूप क्षेत्र मिळतें.

**अनुनाद**—( रिझोनन्स ). जेव्हां एखाद्या बाह्य पदार्थामध्यें उत्पन्न होणाऱ्या विशिष्ट कंपनसंख्येच्या लहरी एखाद्या पदार्थावर येऊन आदळतात, तेव्हां त्या लहरीशक्तीचें शोषण झाल्यामुळें त्या पदार्थामध्यें स्वाभाविकपणेंच त्याच कंपनसंख्येच्या ज्या लहरी उत्पन्न होतात त्यांस अनुनाद असें म्हणतात. जेव्हां एखाद्या दिवाणखान्यांत नाच चाललेला असतो किंवा एखाद्या पुलावरून सैनिक लष्करी गतीनें जात असतात तेव्हां त्या दिवाणखान्याच्या किंवा पुलाच्या जमिनीमध्यें एक प्रकारचा अनुनाद उत्पन्न होत असतो. तसेंच समुद्रामध्यें एखादें गलबत जात असतांहि त्याच्या हेलकाव्यामुळें एक प्रकारचा अनुनाद उत्पन्न होतो. बिनतारी संदेशवाहक यंत्रांची कार्यशक्ति त्यामध्यें असलेल्या वैद्युतिक अनुनादशक्तीवर अवलंबून असते. एखाद्या कंप पावणाऱ्या वस्तूवर आदळणाऱ्या लहरींची कंपनसंख्या वाढत गेली तर अनुनाद पावणाऱ्या पदार्थांतील लहरींची कंपनसंख्याहि त्या प्रमाणांत वाढत जात असते. ही वाढ त्या दोन्ही लहरींची कंपनसंख्या बरोबर होईपर्यंत चालू असते व

त्या ठिकाणीं ती थांबते. त्यापेक्षां ती अधिक वाढत गेल्यास अनुनादन बंद पडतें. एखादा शंख किंवा एखादें पोकळ मांडें किंवा हेल्महोल्टझच अनुनादक आपल्या कानांशीं लावला असतां आजूबाजूला होणारे आवाज आपल्याला अधिक मोठ्यानें ऐकूं येतात. परंतु त्यांतील एका विशिष्ट स्वराशीं या अनुनादाचा मिलाफ होतो. पियान्याच्या भोपाळ्यामध्यें जर अनुनाद उत्पन्न झाला नाहीं तर पियान्याच्या तारांचा आवाज आपणास ऐकूं येणार नाहीं.

**अनुनादनविद्या**—(सोनिक्स). हें नांव प्रथम जॉर्ज कॉंस्टंटिनेस्को यानें इ. स. १९१४ मध्यें चालू विमानांच्या पंख्याच्या पात्यांच्यामधून यांत्रिक बंदुकीनें (मशिनगन) मारा करतां यावा याकरितां त्या बंदुकीस जी चेतना द्यावयाची ती लहरीगतीनें देण्यांत यावी असें प्रतिपादन करून, या गतिदर्शक पद्धतीस अनुनादनविद्या असें नांव दिलें. या उपकरणामध्यें अशी तजवीज केलेली असते कीं, एका वाटोळ्या पंचपात्रामध्यें एक लहान दट्ट्या बसविलेला असून त्याच्या साहाय्यानें त्या पंचपात्रांतील पाण्यामध्यें लहरी उत्पन्न करण्यांत येतात. या लहरी नळ्यांच्या साहाय्यानें अशाच तऱ्हेच्या दुसऱ्या टोंकाशीं जोडलेल्या दुसऱ्या पंचपात्रांत नेण्यांत येतात. या दोन्ही पंचपात्रांस जोडलेल्या यंत्रांची गति व या पंचपात्रांतील दट्ट्यांची गति या एकाच कालांत किंवा अनुनादनपद्धतींत असल्या तरच तें उपकरण कार्यक्षम होतें.

**अनुपस्थिति**—(अलिबी). फौजदारी खटल्यांत आरोपीला आपल्या बचावाकरितां म्हणजे त्याच्यावर गुन्हा शाबीत होऊं नये म्हणून जीं अनेक कारणें कोर्टापुढें सांगतां येतात त्यांपैकीं हें एक कारण आहे. अनुपस्थिति या कारणाचा अर्थ असा कीं, ज्या ठिकाणीं गुन्हा घडला त्या ठिकाणीं, त्या गुन्ह्याच्या वेळीं सदर आरोपी हजर नव्हता, तो इतर ठिकाणीं हजर होता, या प्रकारचा खात्रीलायक पुरावा आरोपीनें सादर केल्यास आरोपी त्या गुन्ह्यांतून दोषमुक्त होऊं शकतो.

**अनुभवजन्य ज्ञानवाद**—सर्व ज्ञान इंद्रियदत्त निर्दिष्टापासून होतें असें मत. या मतानें प्रारंभीं मन कोरें असून त्यावर इंद्रियदत्त संवेदना यांत्रिक पद्धतीनें नोंदल्या जातात. यांत मनाच्या मानसिक कार्याचा भाग नसून तें ज्ञान पूर्ण होण्याच्या क्रियेंत असंख्य वैयक्तिक संवेदना असतात. सारख्या गोष्टींच्या वारंवार व न बदलणाऱ्या परत येण्यानें नियम उत्पन्न होतात. हे नियम म्हणजे साहचर्यानें मिळालेल्या अनुभवाचीं लेखी विधानें. या विधानांत 'पाहिजेच' हा शब्द न येतां 'आढळतें' हा शब्द येतो व त्यामुळें कार्यकारणभावाचें उच्चाटन होतें. या संबंधांतील 'आवश्यकतेची' कल्पना सर्वस्वीं अनुभवपूर्व असते. अनुभवजन्यवादामुळें नैतिक नियमांची निरपेक्षसत्ता नाहींशी झाली. समाज अथवा राज्यकर्ते यांच्या सोयीप्रमाणें व्यक्तीचे कल वळविण्यास नैतिक नियमांचा उपयोग होतो. यानें अनुभवाचा खुलासा होत नाहीं असा यावर आक्षेप आहे. वैयक्तिक संवेदना क्षणिक असल्यामुळें ज्ञानप्राप्तीस्तव ग्रहणशक्तीहून भिन्न मानसिक क्रियांची जरूर असते. प्राचीन ग्रीसमधील हें मत बेकननें पुनः पुढें आणलें व लॉक, ह्यूम, मिल्ल, बेंथॅम व इतर साहचर्यवादी यांनीं तें व्यवस्थित केलें.

**अनुमति**—१. कर्दमकन्या श्रद्धेस अंगिरा ऋषीपासून झालेल्या चार कन्यांपैकीं कनिठ.

२. पौर्णिमेच्या अलीकडील एक दिवस. या दिवशीं देवपितरांना पिंड देतात. राजसूय यज्ञांत हिची देवता म्हणून पूजा करतात.

**अनुमानपद्धति**—विगमन पहा.

**अनुराधपुर, अनुराजपुर**—हें शहर सुमारें १५०० वर्षें सिलोनची राजधानी होतें. हें कदंबा नदीचे कांठीं असून अनुराध नांवाच्या राजानें इ. स. पूर्व ६ व्या शतकांत वसविलें. इ. स. पूर्व सातवें शतक ते इ. सनाचें आठवें शतक व पुढें ११ व्या शतकांत ही सिलोनची राजधानी होती. सिलोनी शेतकरी यास अनुराजपुर म्हणतात. एक मैल घेराचा प्राचीन तलाव या शहराजवळ असून त्यास व्हिक्टोरिया लेक, जयवापी व अभयवापी अशीं नांवें आहेत. याच्या दक्षिण कांठावर एक मैलावर बोधिवृक्ष व भोंवतीं भिक्षूंना राहण्यास जागा असून उत्तरेस गामिनी उर्फ बिलान तलाव आहे. हे दोन तलाव चांगल्या स्थितींत असून बाजूच्या इमारती नष्ट झाल्या आहेत. बौद्धसम्राट् अशोककालीन बौद्ध राजा तिस्स यानें या शहराचें सौंदर्य व कीर्ति वाढविली व थूपाराम ही बुद्धाचे अवशेष असलेली ७० फूट उंचीची एक सुंदर इमारत व इस्सारा मुनिविहार ही दगडी इमारत बांधली. यांतील बराच भाग नष्ट झाला आहे. येथील २२०० वर्षांचा जुना बोधिवृक्ष अद्याप आहे. सम्राट् अशोकानें गया येथील बोधिवृक्षाच्या तिस्स राजास दिलेल्या फांदीचा हा वृक्ष आहे अशी समजूत आहे. तिस्स राजानंतर हें शहर तामीळ लोकांनीं घेतलें, परंतु दुत्थगामिनि अभय या प्रख्यात राजानें तें परत घेऊन तेथें कांस्य धातूचा सुंदर १५० फूट उंचीचा राजवाडा व सोनेरी वाळूची १८९ फूट उंचीची दागबा उर्फ महाथूप नांवाची पूज्य इमारत बांधली. वरील गोष्टीनंतर अनुराधपुर येथें शांतता होती. परंतु इ. स. पूर्व १८९ त तामीळ लोकांनीं तें शहर पुनः घेतलें. पळून गेलेले सिंहली लोक पुनः वट्टगामिनीच्या नेतृत्वाखालीं जमून त्यांनीं इ. स. पूर्व ८९ त तामीळांना हांकललें. याचें स्मारक म्हणून ४०० फूट उंची

अभयगिरी दागबा बांधला. तो हल्लीं बराच पडला आहे. याच्या-आसपास मुनिविहार असून यानंतरहि अनेक इमारती बांधण्यांत आल्या. त्यांत चौथ्या शतकांतील जेतवन आराम ही अद्याप अस्तित्वांत आहे.

फाहिआन या चिनी यात्रेकरूनें आपल्या ग्रंथांत या शहराचें सुंदर वर्णन केलें आहे. येथें सुंदर व भव्य इमारती असून राजा व प्रजाजन पवित्राचरणी होते. हें नालन्दा ह्या जुन्या विद्यापीठा-इतकें मोठें विद्यापीठ असून येथें वैद्यक, ज्योतिष, काव्य वाङ्मय, व्याकरणग्रंथ, शब्दकोश, नीतिशास्त्र, मानसशास्त्र, धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान यांच्या अध्ययनार्थ लांबून विद्यार्थी येत असत. पाली ग्रंथांचें विशेष अध्ययन होई. बुद्धघोष हा प्रसिद्ध भाष्यकार येथें बिहारांतूनच आला होता. या वेळच्या धातुसेन नांवाच्या राजानें पाणीपुरवठ्यासाठीं ५० मैल परिघाचा तलाव बांधला व कालव्यानें पाणी आणलें. याचा सध्यां शेतीस उपयोग होत असून हें अनुराधपुर येथील जुनें शेवटचें काम होय.

११ व्या शतकानंतर येथील राजघराण्यांच्या आपसांतील युद्धामुळें व तामीळ लोकांच्या लुटीमुळें या शहराचें बरेंच नुकसान झालें. इ. स. १३०० नंतर येथील वस्ती उठली व जंगल माजलें. फक्त बोधिवृक्षाजवळ झोंपड्यांत बुद्ध भिक्षु राहत. ब्रिटिश सरकारनें जुने अवशेष कायम ठेवण्याचें काम चालू ठेविलें होतें. १९०६ सालीं मटलेपासून येथपर्यंत आगगाडीचा फांटा वाढविण्यांत आला. लोकसंख्या ९२२० (१९४१).

**अनुविंद**—१. दुर्योधनाकडील एक वीर. यास अर्जुनानें मारलें. वसुदेवभगिनी राजाधिदेवी व जयसेन यांचा धाकटा मुलगा.

२. केकेय राजाचे दोन मुलगे विंद व अनुविंद. भारतीय युद्धांत अनुविंद पांडवांकडे असून त्याला सात्यकीनें मारला.

३. धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**अनुशाल्व**—सौभपति शाल्वराजाचा भाऊ. शाल्वास कृष्णानें मारिलें म्हणून कृष्णाचा द्वेष करी व म्हणून पांडवांच्या अश्वमेध काळीं ससैन्य गुप्तरूपें आला व अश्वाचें हरण केलें. भीम ससैन्य पाठीस लागला. प्रद्युम्न व वृषकेतु यांनीं यास पकडण्याचे विडे उचलले, पण वृषकेतूनेंच पकडलें. मृत्यूच्या भीतीनें अश्व परत केला, सख्य केलें व साह्याचें अभिवचन दिलें. (जै. अश्वमेध, अ. १२–१४). याचा महाभारतांत उल्लेख नाहीं.

**अनूप**—१. संयुक्त प्रांत, अनूपशहर तहशिलींत अनूप शहर, अहार व दिवई हे परगणे. क्षेत्रफळ ४४४ चौरस मैल. लोकसंख्या सु. तीन लाख. चार गांवें व ३७८ खेडीं आहेत. गंगेच्या कालव्यानें जमीन भिजली जाते.

अनूपशहर—तहशिलीचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या बारा हजार. जहांगिराच्या वेळीं राजा अनूप यानें वसविलें. दिल्ली ते रोहिलखंड रस्त्यावर गंगाकांठीं असल्यामुळें अठराव्या शतकांतील मुसलमान–मराठे व पुढें इंग्रज यांच्या हालचाली येथें बऱ्याच होत. १८०६ पर्यंत येथें इंग्रजी छावणी होती ती पुढें मीरतला नेण्यांत आली. १८६६ पासून म्युनिसिपालिटी आहे. १४ मैलांवरील डिबई हें रेल्वे स्टेशन. कापड, ब्लँकेटें व जोडे तयार होत असून निळीचा कारखाना आहे. पाऊस २९".

२. अनूपदेश—राजधानी माहिष्मती. पूर्वीं सहस्रार्जुन राज्य करी. भारतीय युद्धकाळीं येथील नील राजा पांडवांकडे होता. (महा. भीष्म ९).

**अनूपगड**—राजपुताना, बिकानेर संस्थान, सूरतगड निझामतींतील अनूपगडविभागाचें ठिकाण. लोकवस्ती एक दोन हजार. १६७८ त किल्ला बांधला व बिकानेराधिपति अनूपसिंहाचें नांव दिलें. विभागांत ७५ खेडीं व आठ हजार वस्ती आहे. पाण्याचा दुष्काळ असतो. शेती यथातथा असून गुरचरण बरें आहे. सज्जी आणि लाणा ह्या झाडांपासून सोडा तयार करतात.

**अनूपगीर गोसावी**—हिंमत बहादूर गोसावी पाहा.

**अनूपवायु** (मथुन)—(मार्शगॅस, मेथेन). उज्जकर्व वर्गांतील अगदीं सामान्य असा हा वायु आहे. हा अनेक कर्बमय पदार्थांच्या नष्टभागापासून उत्पन्न होत असतो. याला पूर्वीं हलका कर्बयुक्त उज्ज म्हणत. दलदल वायु, मथिल, मथुन, उदिद अशींहि नांवें आहेत. दलदलीच्या जागेंत कुजलेल्या पदार्थांतून हा निघतो म्हणून याला दलदल वायु (मार्शगॅस) असें सार्थ नांव आहे. याच्यामुळें खाणींत भयंकर स्फोट होत, तेव्हां त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं सर हंफ्रे डेव्हीनें 'सेफ्टी लँप' (चिनधोक दिवा) तयार केला.

**अनूबाई घोरपडे**—(१७१४–१७८३) बाळाजी विश्वनाथ पेशवे याची धाकटी मुलगी. ही इचलकरंजीकरांकडे दिली होती. नवरा वारल्यानंतर हिनें मरेपावेतों इचलकरंजी संस्थान सांभाळलें. हिला नारायणराव म्हणून एक मुलगा होता. पण वयांत आल्यावर नीट वागेना व पुढें लवकरच वारला. हिची मुलगी त्रिंबकराव मामा पेठे यांस दिली होती. हिनें साठ वर्षांची पेशवाईची हयात पाहिली, इतकेंच नव्हे तर त्यांत प्रतिष्ठेनें राहिली. तोतया सदाशिवराव याच्या बाजूस ही मिळाल्यानें हिच्यावर सरकारचा रोष झाला होता. ही कधीं कधीं मोहिमांवरहि जात असे. ही मोठी कर्तबगार असे. ही १७८३ सालीं तुळापुरास वारली.

**अनेकहस्तपाद**—(पॉलिप). ही संज्ञा अनेक निरनिराळ्या प्राण्यांस आतांपर्यंत देण्यांत येत असे, परंतु आतां सीॲनिमोन, प्रवालकीटक, वगैरेसारख्या प्राण्यांस किंवा त्यासारखी संयुक्त

अनुराधपूर — स्तूप (पान ७१)

अंबर — किल्ला (पान ९०)

रचना असलेल्या प्राण्यांस देण्यांत येत. या प्राण्यांच्या गात्रास ताऱ्यासारख्या अनेक शाखा असतात.

**अनेकुलं**—म्हैसूर संस्थान, बंगलोर जिल्ह्याच्या आग्नेयीकडील तालुका. क्षेत्रफळ १९९ चौरस मैल. लोकसंख्या ६०००. तीन गांवें व २०२ खेडीं आहेत.

अनेकुल गांव—तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ७ हजार. किल्ला व तलाव सुगतूरच्या संस्थानिकानें १७ व्या शतकांत बांधला. पुढें अनेकुल म्हैसूरचें मांडलिक होतें. १७६० त हैदरानें आपल्या राज्यास जोडलें. डोमिनिकन लोकांचें इ. स. १४०० सालचें जुनें प्रार्थनामंदिर आहे. १८७० पासून म्युनिसिपालिटी आहे.

**अनेमॉनी**—हीं एका जातीचीं फुलें असून तीं वसंतऋतूचें आगमन ग्रेअरीच्या कुरणांतून दर्शवितात; कारण तीं मार्च महिन्यांत फुलतात. फेब्रुवारी महिन्यांत बर्फ असतांनाच कळ्या बर्फांतूनच वर डोकावूं लागतात व त्यांचीं फुलें बनतात, परंतु पानें मात्र फुलें कोमेजल्याशिवाय बाहेर पडत नाहींत. अमेरिका, पश्चिम युरोप, जपान व चीन यांमध्यें हीं फुलें दिसतात. आपल्याकडील पांढऱ्या धोतऱ्यासारखें सुमारें एक इंच लांबीचें हें फूल असून ४–५ पानांचे झुपके मधील बारीक देंठाला एकाखालीं एक थोड्या अंतरावर काटकोनांत येतात.

**अनेवाडी**—सातारा जिल्ह्यांतील एक गांव. मराठशाहींतील कागदोपत्रीं याचा उल्लेख बऱ्याच ठिकाणीं आहे. निंबच्या गोसाव्यास सनद करून दिली त्यांत अनेवाडीचा उल्लेख आहे. कांहीं पत्रांवरून येथून दरवर्षी अन्नदानासाठीं गहूं व तुरी येत असत असें दिसतें.

**अनौरस संतति**—ज्या स्त्री–पुरुषांचा कायदेशीर विवाह झालेला नाहीं, त्यांच्या त्या बेकायदेशीर संततीला अनौरस संतति म्हणतात. हल्लीं दिवाणी कायदा आणि धार्मिक कायदा असा आहे कीं, अशी अनौरस संतति झाल्यानंतर त्या स्त्री–पुरुषांनीं विवाह केला तर ती पूर्वीची संतति कायदेशीर उर्फ औरस संतति मानण्यांत येते. १९२६ पूर्वी इंग्लंडांत असा कायदा होता कीं, मूल जन्मण्यापूर्वी विवाह झालेला असेल तरच त्या पुरुषाला त्या मुलाचा कायदेशीर बाप मानीत असत, आणि मुलाचा जन्म होण्यापूर्वी अगदीं थोडे दिवस विवाह झालेला असला तरी ती संतति कायदेशीर मानण्यांत येत असे. पण १९२६ च्या 'लेजीटीमसी ॲक्ट' या कायद्यानें अनौरस संततीच्या जन्मानंतर आई–बापांनीं विवाह लावला तरी ती संतति कायदेशीर मानण्यांत येऊं लागली. अनौरस संततीला कोणचाहि वारसाहक्क प्राप्त होत नाहीं. स्कॉटलंडांत अनौरस संततीच्या पोटगीची जबाबदारी आई व बाप या दोघांवर असते. इंग्लंडांत असा कायदा आहे कीं, अनौरस संततीचा जन्म झाल्यानंतर एक वर्षाच्या आंत आईला त्या मुलाच्या बापाकडून प्रसूतीच्या खर्चाची रक्कम आणि तें अनौरस मूल १६ वर्षांचें होईपर्यंत त्याच्या पोटगीचा खर्च दर आठवड्यास मिळण्याबद्दल कोर्टांत दावा लावतां येतो.

हिंदुधर्मशास्त्रांतील मिताक्षरा कायद्याप्रमाणें हिंदु स्त्रीपासून झालेल्या अनौरस पुत्रास पोसण्यास पिता कायदेशीर जबाबदार आहे. पण अनौरस कन्येला पोसण्यास पिता जबाबदार नाहीं; कारण शास्त्रांत 'दासीपुत्र' असा शब्द आहे. त्यांत कन्येचा अन्तर्भाव होत नाहीं, असा निर्णय मुंबई हायकोर्टानें दिला आहे (१८ मुं. १७७). अहिंदु स्त्रीपासून झालेल्या संततीस पोसण्यास हिंदु पिता जबाबदार नाहीं. पारशी व ख्रिस्ती कायद्यांत अनौरस संततीच्या पोषणाबद्दल मुळींच कलम नाहीं. मात्र हिंदुस्थानांत सर्व धर्मीयांना लागू असलेल्या क्रिमिनल प्रोसीजर कोडमधील कलम ४८८ प्रमाणें हिंदु अनौरस मुलीला आणि हिंदु पित्याच्या अहिंदु अनौरस संततीला, तसेंच पारशी, ख्रिस्ती, मुसलमान पित्यांच्या अनौरस संततीला पोषणखर्च मागतां येतो. हा हक्क पित्याच्या हयातीपर्यंतच चालतो. पित्याच्या मरणानंतर पित्याच्या मिळकतींतून हा अन्नवस्त्राचा खर्च मिळत नाहीं.

हिंदुस्थानांत पाश्चात्य राष्ट्रांतल्याप्रमाणें जनन आणि विवाह यांसंबंधीं प्रमाणशीर नोंद किंवा बहुधा कसलीच नोंद नाहीं. तेव्हां आंकड्यावारी कांहीं निष्कर्ष काढणें कठिण आहे. हिंदुसमाज जातिबद्ध असल्यानें अधर्मसंततीस कोणत्याहि जातींत उच्च स्थान नाहीं. ती प्रजा निराळी राहते. जुन्या धर्मशास्त्रांतून मागध, सैरंध्र, चांडाल यांसारख्या राष्ट्रजातींचा संकरजाति म्हणून उल्लेख आहे. गोलक, विदुर, अकरमाशे यांसारखी धर्मविवाहबाह्य संतति निराळी ओळखली जाते. मराठ्यांत कडूवर्ग असतो, पण तो कालांतरानें आणि परिस्थितीनें उच्च वर्णांत जातो. कांहीं अधर्मसंतति आर्यसमाजी किंवा ब्राह्मो बनते.

**अन्न**—प्राणिमात्राला शरीरपोषणाला अन्न लागतेंच. अन्नापासून मुख्यतः शरिरांत उष्णता उत्पन्न होते. साधारणपणें अन्नाचे तीन प्रकार पडतात: प्रोतें (प्रोटीन्स), मेदें (फॅट्स) आणि कर्बोज्जितें (कॉर्बो हायड्रेट्स). प्रोतांमध्यें मांस आणि कांहीं शाकान्न, मेदांमध्यें तूप-तेलें व कर्बोज्जितांत साखर आणि पिठें येतात. तेव्हां एखाद्या अन्नपदार्थाचें महत्त्व ओळखावयाचें असल्यास त्यांत उष्णता किती आहे हें पाहावें लागतें. उष्णता मापण्याचें जें एक विशिष्ट वजन आहे, त्याला कॅलॉरी किंवा उष्णांश म्हणतात. एक किलोग्राम किंवा २¼ पौंड पाणी एक सेंटिग्रेट करण्यासाठीं लागणारी जी उष्णता ती १ उष्णांश होय.

प्रोतें किंवा मैदा आपलें मांस तयार करतात. त्यामध्यें ४·१० इतका उष्णांश असतो. शरीराची झीज भरून काढण्यासाठीं व त्याची वाढ करण्यासाठीं प्रोतांची जरूरी आहे. प्रोतयुक्त पदार्थ फार भाजले किंवा उकळविले तर घट्ट होतात व त्यामुळें पचण्यास जड बनतात. यासाठीं दूध फार उकळवूं नये. दुधांतील मैदा म्हणजे केसीन. हा खाल्ल्यापासून शरीरांत मैदा तयार होतो. दहीं, अंडीं, मांस, मासे यांमध्येंहि असाच मैदा असतो. कांहीं वनस्पतींतहि प्रोतें असतात. आपल्या शरीरांतील रोजची झीज भरून निघण्यास खालीं दिलेल्यापैकीं एखाद्या प्रकारचा मैदा त्या प्रमाणांत खाल्ला जावा.

| पदार्थ | | नुसता त्या प्रकारचा मैदा |
|---|---|---|
| दूध | ७५ तोळे | ३ तोळे |
| तांदूळ | ५० ,, | ३॥ ,, |
| गहूं | ७५ ,, | ७॥ ,, |
| मका | १०० ,, | १० ,, |
| बटाटे | ७० ,, | ३॥ ,, |

मांसाहारी लोकांनीं मांस, मटन, मासे इ. मैद्यासाठीं खावें. कर्बोज्जितांत पीठ आणि साखर येते. हीं खाण्यामुळें शरीरांतील उष्णता कायम राहते, कामाला उत्साह वाटतो, व शरीरांत चरबी तयार होते. पिठांत ४·१० उष्णांश असतो व साखरेंत ४ असतो. मेदयुक्त पदार्थांत म्हणजे तूप, तेलें, चरबी या सारख्यांत पिठापेक्षां २॥। पट जास्त उष्णता असते. यांचा गुण कर्बोज्जितांप्रमाणेंच असतो. वरील पदार्थांप्रमाणेंच मिठासारखे क्षारहि आवश्यक आहेत. त्यामुळें प्रोतें रक्तांत मिसळण्यास मदत होते, हाडें टणक राहतात. स्वयंपाकाचीं भांडीं व अन्न करण्याचीं साधनें यांपासूनहि शरीराला क्षार मिळतात. लोहक्षारामुळें रक्तगोलकांना तेज चढतें. हा लोह अंड्याचा पिवळा बल्क, हिरव्या भाज्या ( माठाच्या जातीच्या ) व कांहीं मांस यांपासून मिळतो.

पौष्टिक अन्नाप्रमाणेंच कांहीं चोथ्याचे अन्नपदार्थ खावे लागतात. त्यामुळें शरीर आणि इंद्रियें यांना आकार राहतो. नुसते बदाम खाऊन राहणें बरें नव्हे तर त्याबरोबर भात–भाकरी वगैरे कमी प्रतीचें अन्न पाहिजे. अन्नांतील आणखी एक महत्त्वाचा घटक म्हणजे जीवनसत्त्वें होत. हीं जीवनसत्त्वें अन्नपदार्थांत नसतील तर अन्न निरुपयोगी ठरेल. जास्त उष्णता देण्यानें हीं सत्त्वें आपण नाहींशीं करीत असतों. हीं जीवनसत्त्वें भरपूर प्रमाणांत कशीं मिळतील व आपल्या आरोग्याला कोणतीं सत्त्वें पाहिजेत याची काळजी प्रत्येकानें घेणें आवश्यक असतें. ताज्या भाज्या, कढधान्यें, ताक, दहीं यांच्या द्वारें आपण नकळत हीं सत्त्वें शरीरांत घेतच असतों. तथापि त्यांची उणीव नाहीं हें नित्य पाहिलें पाहिजे.

**अन्नंभट्ट**—एक प्रसिद्ध नैय्यायिक. जातीचा तेलंगी ब्राह्मण. जन्म तैलंगणांतील गरिकपाद या खेडेगांवीं. १५ व्या शतकांत चालुक्य काळीं उदय. कौंडिण्यपूर येथें १२ वर्षें संस्कृताध्ययन. येथेंच न्यायशास्त्र पढला व पारंगतता मिळविली. नवीन अभ्यासूसाठीं तर्कसंग्रह नांवाचा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ प्रख्यात असून हल्लींहि न्यायशास्त्राचे प्रथमाभ्यासी तो पढतात. पुढें स्वतांचें विद्यालय स्थापून त्यांत विद्यार्थ्यांस तर्कसंग्रह, तर्कदीपिका, मुक्तावली व गादाधरी असे क्रमानें पाठ देत असे. हा क्रम बरेच दिवस चालत होता व बरेच विद्यार्थी प्रवीण झाले. ५५ वे वर्षीं मल्लिकार्जुनाच्या दर्शनास गेला; याशिवाय प्रवास नाहीं व राजाश्रयाचीहि खटपट केली नाहीं. वृत्ति संतोषी. त्यामुळें असेल तेवढ्यांतच समाधान. देवदर्शनानंतर सकाळ, संध्याकाळ दोन तास स्नानसंध्या व इतर वेळीं अध्यापन. मुलें पुष्कळ झालीं, पण अंतकाळीं एकहि जिवंत नव्हतें, असें सांगतात.

**अन्नमार्ग**—(ईसोफेगस). तोंडाच्या मागील भागापासून जठरापर्यंत जी स्नायुमय नलिका जाते तिला अन्नमार्ग अथवा अन्ननलिका असें म्हणतात. मनुष्यप्राण्यामध्यें हिची लांबी ९ ते १० इंच असते. ही मानेमध्यें श्वासनलिकेच्या मागें असते, व वक्षस्थळामध्यें ही उजव्या बाजूस वळून नंतर डाव्या बाजूकडे वळते व ही छाती व पोट यांमधील पडद्यामधून जठरापर्यंत गेलेली असते. हिच्यायोगें तोंडांतून गिळलेलें अन्न आमाशयांत पोंचतें.

**अन्नय्याचारी**—एक तेलगू ग्रंथकार. यानें तेलंगी भाषेंत दोन भागांत रचलेलें पितामहचरित्र प्रसिद्ध असून त्यांत सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचें वर्णन केलें आहे.

**अन्नविप**—(टोमेन). या जातीचें विष हें क्षारासारख्या कांहीं पदार्थांच्या स्वरूपाचें असून तें कुजत असलेल्या प्राणिज पदार्थांमध्यें उत्पन्न होतें. अशा तऱ्हेचे कांहीं विषमय पदार्थ म्हटले म्हणजे कॅडोव्हेरिन् पुट्रेसिन, कोलिन, न्यूरिन हे होत. कॅडोव्हेरिन हें साखरेच्या पाकासारखें निर्वर्ण द्रव्य असून त्यास व्हेल माशाच्या चरबीसारखा वास येतो. वनस्पतींमध्येंहि कांहीं विषारी द्रव्यें आढळतात. मस्कारिन हें एक अतिशय विषारी द्रव्य असून तें अळंबें किंवा छत्री यांमध्यें आढळतें. डब्यामध्यें बंद करून ठेवलेल्या पदार्थांमध्यें अन्नविप तयार होतें व ते पदार्थ खाल्ले असतां मनुष्यास विषार होतो.

**ॲनोबॉन**—आफ्रिका, गिनीच्या आखातांतील स्पेनच्या ताब्यांतील बेट. याची लांबी ४ मैल, रुंदी २ मैल व क्षेत्रफळ ६ चौ. मै. उंची ३००० फूट असून सुंदर दऱ्या व भिंतीसारखे पर्वत यांमुळें सुंदर देखावा दिसतो. वस्ती निग्रो लोकांची.

धर्म रोमन कॅथोलिक. सेंट अँटीनी हें मुख्य शहर व गव्हर्नराचें ठाणें. नांगरवाडा सुरक्षित असून येणारीं-जाणारीं गलबतें पाणी व अन्नसामुग्री यांकरितां थांबतात. हें पोर्तुगिजांनीं शोधून काढलें व स्पेनला दिलें, पण येथील लोकांनीं बंड केल्यामुळें तडजोड म्हणून एतद्देशियांनीं कारभार पहावा असें ठरलें. १९ व्या शतकाच्या उत्तर भागांत पुनः स्पेनची सत्ता स्थापित झाली. लो. सं. २०००.

**अन्सारी, फरिदुलहक्** ( १९००-        )—एक भारतीय समाजवादी पुढारी. बॅरिस्टर. यांचें शिक्षण दिल्ली येथील सेंट स्टीफन हायस्कूलमध्यें, अलीगड येथील एम्. ए. ओ. कॉलेजमध्यें, ऑक्सफर्ड येथील सेंट कॅथरीन कॉलेज व मिडलटेंपल ( लंडन ) मध्यें झालें. यांनीं १९२६ मध्यें दिल्लीस वकिली सुरू केली व १९२८ मध्यें सायमन कमिशनवरील बहिष्कारामध्यें भाग घेऊन काँग्रेसला मिळाले. हे दिल्ली येथील प्रांतिक काँग्रेस कमिटीचे मुख्य चिटणीस होते ( १९२९-३१ ). यांची १९२८ मध्यें ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे सभासद म्हणून निवड झाली व १९३४ पर्यंत ते सभासद होते. यांनीं १९३२ व १९३४ मधील सत्याग्रहाच्या चळवळींत विशेष भाग घेतला व त्यांस दोन वेळां शिक्षा झाली. हे १९३४ मध्यें अखिल भारतीय काँग्रेस सोशालिस्ट पक्षास जाऊन मिळाले व त्या पक्षाच्या अखिल भारतीय सोशालिस्ट परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते.

**अन्सारी, डॉ. मुख्तारअहमद्** ( १८८०-१९३६ )—एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण अलाहाबाद येथील म्यूर सेंट्रल कॉलेज व निझाम कॉलेजमध्यें ( हैदराबाद ) झालें. पुढें ते एडिंबरो युनिव्हर्सिटींतून एम्. बी. सीएच्. बी. झाले ( १९०५ ). हे लंडनमधील चेरिंगक्रॉस हॉस्पिटलमध्यें कांहीं दिवस हाउस सर्जन होते. तुर्कस्तानमध्यें १९१२-१३ सालीं गेलेल्या ऑल इंडिया मेडिकल मिशनमध्यें यांचा समावेश करण्यांत आला होता. यांनीं होमरूल चळवळींत विशेष भाग घेतला होता. १९२० मध्यें हे अखिल भारतीय मुस्लिम लीगचे अध्यक्ष होते. १९२७ मध्यें हिंदी राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. १९२८ मध्यें भरलेल्या सर्व पक्षीय परिषदेचे हे अध्यक्ष होते. हे राष्ट्रीय वृत्तीचे मुसलमान गृहस्थ होते. यांच्याच घरीं १९२४ मध्यें महात्मा गांधींनीं हिंदु-मुसलमान ऐक्याकरितां पहिलें २१ दिवसांचें उपोषण केलें होतें.

**अन्होनी**—हुशंगाबाद जिल्ह्यांतील ऊन पाण्याचा झरा असलेलें गांव. महादेव पहाडाच्या उत्तरेस. या पहाडापासून धेनवा व नर्मदा नद्या वेगळ्या होतात. या ऊन पाण्यानें त्वचारोग बरे होतात म्हणून येथें लोक जमतात. याच्या आग्नेयीस १६ मैलांवर महालझीर नांवाचा ऊन पाण्याचा झरा आहे. येथील पाणी हात न घालण्याइतकें ऊन असतें.

**अपकृत्य**—ज्या गुन्ह्याकरितां एखाद्या व्यक्तीस नुकसान-भरपाईकरितां फिर्याद दाखल करतां येते अशा अपराधास अपकृत्य ( टॉर्ट ) म्हणतात. सर्व सुसंस्कृत देशांत प्रत्येक व्यक्तीस स्वतःचें शरीर, संपत्ति व अब्रू यांचें परक्यापासून संरक्षण करण्याचा हक्क असतो; तसेंच दुसऱ्यास उपसर्ग न होईल अशी काळजी घेण्याची जबाबदारी असते. तसेंच प्रत्येक धनी आपल्या चाकराच्या अपकृत्याबद्दल जबाबदार असतो. तसेंच एका चाकरानें दुसऱ्या चाकरास इजा केली तरीहि मालक जबाबदार असतो. तसेंच प्रत्येक घरमालक हा घराच्या सुरक्षिततेबद्दल जबाबदार असतो. परंतु अशा तऱ्हेची जबाबदारी फक्त मनुष्याच्या स्वाभाविक व संभवनीय परिणामांबद्दल मात्र असते. एखादा मनुष्य आपले कायदेशीर हक्क बजावीत असेल किंवा एखादें न्याय्य कृत्य करीत असेल, किंवा अतिशय उपयुक्त कृत्य करीत असेल, किंवा सार्वजनिक हक्काची बजावणी करीत असेल तर त्यास या बाबतींत होणाऱ्या अपकृत्यांबद्दलहि जबाबदार धरण्यांत येणार नाहीं. अपघाताची जबाबदारी ठरविणें बरेंच कठिण असतें. कांहीं अपकृत्यें वैयक्तिक असतात. उदा., एखाद्याच्या अब्रूस धक्का पोहोंचविणें, एखाद्यावर चाल करून जाणें, एखाद्यास बेकायदा अटक करणें, एखाद्यास फूस लावून नेणें, किंवा लालूच लावून पळविणें, एखाद्याच्या जमीनजुमल्यांत जाणें, एखाद्याच्या वहिवाटीस हरकत घेणें, इत्यादि गोष्टी अपकृत्यें होत. अर्थात् अशा प्रकारचे गुन्हे म्हणजे अब्रूनुकसानी, कपट, अदावतीचा खटला, उपद्रव, स्वास्थ्यभंग वगैरे होत. स्वास्थ्यांत शारीरिक व मालमत्तेसंबंधींहि स्वास्थ्याचा अंतर्भाव होतो. अयोग्य चढाओढीसहि अपकृत्य मानण्यांत येतें. अपकृत्य हें फौजदारी गुन्ह्याच्या स्वरूपाचेंहि असूं शकतें व त्याकरितां फौजदारी व दिवाणी या दोन्ही कोर्टांतहि न्याय मागतां येतो; मात्र दिवाणी कोर्टांत फक्त नुकसानभरपाई मिळते. वादीस कोणत्याहि कोर्टांत न्याय मागतां येतो. प्रथम फौजदारींत खटला करणें आवश्यक नाहीं.

**अपदान** ( अवदान )—पाली भाषेंतील एक बौद्ध वाङ्मयाचा ग्रंथ. अपदान म्हणजे शुद्धाचरण. या ग्रंथांत ५९० बौद्ध अर्हतांचीं चरित्रें दिलीं आहेत. जातकग्रंथाप्रमाणेंच वर्तमान-भूतकाळचा पुराणग्रंथ असें अपदानाला म्हणतां येईल. ‘ विसुद्धजनविलासिनी ’ या नांवाची बुद्धघोषाची अपदानावरची टीका उपलब्ध आहे.

**अपराजित**—कोंकणच्या शिलाहारांपैकीं पहिला स्वतंत्र राजा. हा दहाव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. हा राष्ट्रकूटांचा मांडलिक होता. तो तें घराणें नष्ट झाल्यावर स्वतंत्र बनला. याचें राज्य कुलाबा, रत्नागिरी, ठाणें व मावळ या भागांवर होतें. हा ९९० ते १०१० पर्यंत राज्यावर असावा.

मेवाडांतील उदेपूरच्या गादीवर सातव्या शतकांत एक अपराजित राजा होऊन गेला.

**अपराजिता**—एक वनस्पति. संस्कृत नांव विष्णुक्रांता. हें झुडुप लहान व जमिनीवर वेलीप्रमाणें पसरतें. विस्तार फार होत नसून पानें बारीक, लांबट, पांढुरकीं व फुलें निळसर तांबुस रंगाचीं व फळें बारीक येतात. औषधी कामाकडे उपयोग होतो. याची मुळी काविळीवर ताकाबरोबर प्यावयास देतात व मूळव्याधीवर याच्या मुळांचा अंगरस तूप घालून देतात.

**अपरांत, अपरांतक**—एका प्राचीन देशाचें नांव. याचा उल्लेख महाभारतांत (भीष्म अ. ९) व बृहत्संहितेंत आला आहे. आजच्या उत्तर कोंकणास म्हणजे ठाणें-कुलाबा यांच्या आसमंतांतील प्रदेशास अपरांत म्हणत असावेत. आभीर लोक या प्रदेशांत राहत. असा विष्णुपुराणांत उल्लेख आहे. अशोकानें या ठिकाणीं बौद्धधर्मप्रचारक पाठविले होते.

अपरांतक किंवा अपरंतक म्हणजे 'पश्चिमेकडील सरहद्दीच्या प्रदेशांतील लोक.' पश्चिम विभागांतील एक जात (बृ. सं. १४.२०). यास अपरांत्य असेंहि नांव आहे. नाशिक व जुनागड येथील शिलालेखांतहि अपरांत लोक अथवा देश असा उल्लेख आहे. अशोकाच्या एका शासनांत यवन, कंबोज, व गंधार यांचा अपरांत असा वर्ग असून पंडित भगवानलाल इंद्रजी यांच्या मतें ठाणें जिल्ह्यांतील सोपारा हें अपरांत देशाचें मुख्य ठाणें होय.

**अपरादित्य**—१. अपरादित्य पहिला-कोंकणचा शिलाहारवंशी राजा. इ. स. ११३८ च्या उरणनजीकच्या शिलालेखांत उल्लेख सांपडतो. डॉ. बुहलर यास काश्मीरांत सांपडलेल्या मंखरचित श्रीकंठचरित्रांत उल्लेख असलेला अपरादित्य हाच असून या पुस्तकाचा काल ११३५-४५ हा त्यांनीं ठरविला आहे. या अपरादित्यानें तेजकंठ नामक पंडितांस शूर्पारिका (सोपारा) हून काश्मीरांत भरलेल्या पंडित सभेस प्रतिनिधि म्हणून पाठविलें होतें. ही गोष्ट काश्मीरच्या जयसिंह (११२९-५०) राजाच्या कारकीर्दीत घडली.

२. अपरादित्य दुसरा—कोंकणचा शिलाहारवंशी राजा. यानें जमिनी दान केल्याचे भिवंडी, परळ व वसई तालुक्यांत तीन शिलालेख सांपडले आहेत. १२०३ च्या मांडवीजवळच्या केशिदेवाच्या शिलालेखांत याचा उल्लेख असून हा केशिदेव यांचा पुत्र होय. यानें याज्ञवल्क्यस्मृतीवर मिताक्षरा ही टीका केली आहे. ११८७ च्या परळ शिलालेखांत हा आपणांस महाराजाधिराज व कोंकण चक्रवर्ती म्हणवितो. चालुक्य घराण्याच्या नाशानंतर स्वतंत्र सामंत राजाप्रमाणें यानें स्वतंत्र राज्य स्थापलें असावें.

**अपरिमेय संख्या**—(इन्कॉमेनशुरल). चौरसाची बाजू एक असेल तर कर्ण $\sqrt{२}$ होतो. आपल्या जवळ असलेल्या मोजण्याच्या एकम् (unit) मूल्मानानें कर्ण बरोबर मोजतां येणार नाहीं. $\sqrt{२}$ ची किंमत सुमारें १·४ मांडतां येईल. त्याप्रमाणें वर्तुळाचा परिघ व व्यास यांचें गुणोत्तर सुमारें $\frac{२२}{७}$ लिहितात तरी ही संख्या आपणाला अगदीं बरोबर लिहितां येणार नाहीं. $\sqrt{२}$ $\pi$, 'पाय्' अशा संख्यांस अपरिमेय संख्या म्हणतात. नेहमींच्या पूर्ण अंकांनीं त्या दर्शवितां येत नाहींत.

**ॲपलमद्य**—(सायडर). ॲपल फळांच्या रसापासून आंबवून हें तयार करतात. याचा रंग अंबरमण्यासारखा पिवळसर असतो. इंग्लंड देशांत वोरसेस्टर, हीयरफोर्ड, ग्लुसेस्टर व डेव्हन या ठिकाणीं फार मोठ्या प्रमाणावर सायडर तयार होतें. उत्तर आयर्लंड, फ्रान्स, जर्मनी, उत्तर अमेरिका यांसारख्या देशांतहि कारखाने आहेत. या मद्यांत पांच ते दहा टक्के साखर व दोन ते सात टक्के मद्यार्क (अल्कोहल) असतो.

**ॲपलेशियन पर्वत**—उत्तर अमेरिकेंतील सुमारें १५०० मैल लांबीच्या या पर्वताचीं शिखरें व उतार जंगलांनीं भरलेला असून ऊन, पाऊस, वारा व वर्फ यांना सारखी टक्कर देत हा पर्वत वर्षानुवर्षे झिजत असल्यानें त्याची उंची व शिखरें रॉकी पर्वतासारखीं उंच नाहींत. उत्तर अमेरिकेंत प्रथमच आलेल्या रहिवाशांनीं याच पर्वताशीं झगडून तेथील निसर्गावर विजय मिळविला व याच पर्वताच्या दक्षिण बाजूला पायथ्याकडील मैदानावर प्रथम पिकें काढून जमिनी लागवडीस आणल्या. सुरुवातीला 'शुभ्र' व 'हिरवा' या पर्वतानंतर ही पर्वताची रांग चॅंपलेन या सरोवरी भागानें व हडसन नदीमुळें सखल बनते व नंतर सुमारें २५ मैल अंतर मध्यें सोडून (त्याची दरी बनवून) हे पर्वत सुमारें १००० मैल दक्षिणेला सेंट लॉरेन्सच्या खोऱ्यापासून आल्बामाच्या मध्यभागापर्यंत येतात. माउंट मिचेल ६६८४ फूट हें या रांगेंतील सर्वांत उंच शिखर होय. या पर्वताच्या रांगा तयार होत असतांना त्यांत जंगलें गाडलीं गेलीं व त्यामुळें आतां त्यांच्यापासून बनलेल्या दगडी कोळसा, पेट्रोल वगैरेंच्या खाणी या पर्वतांत सांपडल्या आहेत. पाण्याच्या धांवत्या प्रवाहावर वीज उत्पन्न करतात व तिचा उपयोग खाणकामांत आणि इतर ठिकाणीं करतात. वसंत ऋतूंत डोंगरउतार फुलांनीं भरून जातो. उत्तरेकडील बाजूला पाईन, ॲश, मॅपल, बर्च, व बीच यांच्या उंचच उंच वृक्षांनीं भरलेलीं जंगलें असून दक्षिणेकडे ओक, चेरी, पॉपलर यांचीं जंगलें आहेत. जंगलांव्यतिरिक्त इतर

भागांत सर्वत्र काळसर हिरवटसर झुडपें दृष्टीस पडतात. अस्वलें, प्युमा ( सिंहाची एक जात ), कोल्हे, रानमांजरें, हरीण, वगैरे प्राणी या जंगलांतून भटकतांना आढळतात.

**अपसरण**—( डिफ्यूझन ). वायुरूप, द्रवरूप किंवा घनरूप पदार्थांच्या हळूहळू एकमेकांत मिसळण्याच्या क्रियेस अपसरण ( डिफ्यूझन ) म्हणतात. सोन्याच्या विटेवर शिशाची वीट ठेवली तर कांहीं आठवड्यांनीं सोनें शिशांत शिरलेलें आणि शिसें सोन्यांत शिरलेलें आढळून आलेलें आहे. दोन वायुरूप पदार्थांचीं पात्रें नळीनें जोडल्यास दोन वायु कांहीं वेळानें एकमेकांत मिसळल्याचें आढळून येतें. वायूंच्या त्या एकमेकांत मिसळण्याला गुरुत्वाकर्षणाची आडकाठी होत नाहीं. प्राणवायु ( ऑक्सिजन ) खालीं आणि उज्ज ( हॉयड्रोजन ) वर असें असलें तरी उज्ज खालच्या प्राणवायूमध्यें आणि खालचा प्राणवायु वरच्या उज्जामध्यें मिसळल्याशिवाय राहत नाहीं. अपसरणाचा वेग मात्र निरनिराळ्या वायूंचा निरनिराळा असतो. हा त्यांच्या विशिष्ट गुरुत्वाच्या वर्गमुळाच्या उलट असतो. हें वर्गमूळ जितकें जास्त तितका वेग कमी, जितकें वर्गमूळ कमी तितका वेग जास्त. द्रवरूप पदार्थांचें अपसरणहि अशाच पद्धतीनें होतें.

**अपस्मार**—( कॅटॅलेप्सी ). हा एक मज्जातंतुरोग आहे. यामध्यें एकदम शुद्धि व इच्छाशक्ति नष्ट होते आणि मनुष्य या रोगाचा झटका येण्यापूर्वी ज्या स्थितींत असेल त्याच स्थितींत पुतळ्यासारखा राहतो. कांहीं वेळानें त्याचीं गात्रें थोडीं ढिलीं होतात आणि तीं ज्या स्थितींत ठेवावीं त्या स्थितींत राहतात. परंतु त्या मनुष्यास स्वतः हालचाल करतां येत नाहीं. फेंफरें ( एपिलेप्सी ) पहा.

**अपहरण**—कायद्यामध्यें ' अॅब्डक्शन ' या इंग्रजी शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या स्त्रीला बळजबरीनें किंवा फसवून दूर पळवून नेणें. अशाच प्रकारचें कृत्य पुरुषाच्या बाबतींत केलें, तर त्याला पळविणें ( किड्नॅपिंग ) म्हणतात. इंडियन पीनल कोडमध्यें या दोन्ही प्रकारच्या गुन्ह्यांना शिक्षा सांगितली आहे. ( इंडियन पीनल कोड–३५९ ते ३६६ कलमें पाहा ).

**अपाटाइट**—एक अर्धपारदर्शक खनिज. याचे एकसारखे षट्पार्श्व स्फटिक पडतात. वि. गु. ३·२. याचे अनेक रंग असतात. खटस्फुरित ( कॅल्शिअम फॉस्फेट ) आणि खटफ्लुरिद ( कॅल्शिअम फ्लुओराईड ) यांच्या संयोगानें हा बनलेला असतो. वनस्पतिजीवनाला आवश्यक अशा सर्व स्फुरितांत हा घालतात. नॉर्वे आणि ओन्टारिओ या देशांत अग्निजन्य खडकांत हा सांपडतो.

**अपामिया**—पश्चिम आशियांतील पांच-सहा शहरांचें नांव अपामिया असें आहे. सेल्युकस निकेटरनें आपल्या अपामा बायकोचें नांव ज्या शहरास ठेविलें तें ओरोन्टेस नदीच्या खोऱ्यांत आहे. ख्रिस्ती धर्मयुद्धांत याला महत्त्व होतें. या नांवाचें फ्रिजियांतील शहर अँटिओकस सोटरनें स्थापिलें. हें ग्रीकोरोमन आणि ग्रीकोहिब्रू संस्कृतीचें मुख्य ठिकाण झालें होतें. बिथिनिया आणि पार्थिया देशांतहि या नांवाचें शहर होतें. प्लिनीनें एकाचा उल्लेख केला आहे.

**ॲपियन**—हा ग्रीक इतिहासकार इ. स. २ ऱ्या शतकांत होऊन गेला. त्यानें ग्रीक भाषेंत रोमन साम्राज्याच्या प्रारंभापासून ऑगस्टस बादशहापर्यंतचा समग्र इतिहास लिहिला होता. त्याचे २४ ग्रंथ होते. पण त्यांपैकीं अकराच उपलब्ध आहेत. त्याची लेखनशैली कंटाळवाणी असली तरी त्याच्या लिखाणांत भरपूर महत्त्वाची माहिती आहे यांत शंका नाहीं.

**ॲपिस**—प्राचीन मिसरी लोकांत या नांवाचा एक बैल असून त्याला लोक फार भजत. त्याच्यासाठीं मेंफिस येथें राजवाडा बांधला होता. त्याच्या प्रत्येक हालचालीवरून कांहीं शकुनगांठ बांधीत. पण या दैवी बैलाला पंचवीस वर्षांवर कांहीं आयुष्य लाभत नसे, व पुजारी त्याला गुप्तपणें मारून विहिरींत फेंकून देत.

प्रसिद्ध इराणी बादशहा कंबायसिस यानें ईजिप्त देश जिंकल्यानंतर या ॲपिस बैलाच्या पूजेच्या दिवशीं त्यास ठार केलें.

**ॲंपीअर**—विजेच्या प्रवाहाचें एक मूलमान ( युनिट ). विद्युत्प्रवाहशक्ति परिमाण रजत नत्रिताच्या विशिष्ट प्रमाणाच्या द्रावणापासून दर सेकंदास ०·००१११८ ग्राम रजत शुद्ध स्वरूपांत विद्युत्ध्रुवाशीं संचित होण्यास स्थिर विद्युत्प्रवाहाची जी शक्ति लागते तीस म्हणतात. हें मूलमापन प्रथम आन्द्रे मारी ॲंपीअर ( १७७५–१८३६ ) यानें शोधून काढलें.

**ॲपीऑन** ( इ. स. १ लें शतक )—हा ग्रीक व्याकरणकार असून त्याच्या ग्रंथांपैकीं फक्त १ किंवा २ अर्धवट भाग आज उपलब्ध आहेत. त्यांपैकीं एका भागांत ज्यू लोकांविरुद्ध मजकूर आहे व त्याला जोसेफस यानें उत्तर दिलें आहे.

**अपील**—( पुनर्विचार, विनंतिअर्ज ). कायद्यांत या इंग्रजी शब्दाचा अर्थ असा आहे कीं, खालच्या दर्जाच्या फौजदारी किंवा दिवाणी कोर्टानें केलेला निकाल वरच्या कोर्टानें फिरवावा, किंवा त्यांत दुरुस्ती करावी म्हणून तो खटला किंवा दावा वरच्या कोर्टांत दाखल करणें. इंग्लंडांतलें सर्वांत वरिष्ठ न्यायकोर्ट हाउस ऑफ लॉर्ड्स हें होय; व तेथें इंग्लंड, स्कॉटलंड व उत्तर आयर्लंडमधील फौजदारी व दिवाणी कामांतलें शेवटचें अपील करतां येतें. ब्रिटिश साम्राज्यांतील हिंदुस्थान, आयरिश फ्री स्टेट, कानडा वगैरे सर्व देशांतून व वसाहतींतून शेवटचें अपील प्रिव्हि कौन्सिलच्या ज्युडिशियल कमिटीपुढें चालतें. आतां हिंदुस्थान पूर्ण स्वतंत्र झाल्यावर खुद्द हिंदुस्थानांत फेड-

**अपराजित**—कोंकणच्या शिलाहारांपैकीं पहिला स्वतंत्र राजा. हा दहाव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. हा राष्ट्रकूटांचा मांडलिक होता. तो तें घराणें नष्ट झाल्यावर स्वतंत्र बनला. याचें राज्य कुलाबा, रत्नागिरी, ठाणें व मावळ या भागांवर होतें. हा ९९० ते १०१० पर्यंत राज्यावर असावा.

मेवाडांतील उदेपूरच्या गादीवर सातव्या शतकांत एक अपराजित राजा होऊन गेला.

**अपराजिता**—एक वनस्पति. संस्कृत नांव विष्णुक्रांता. हें झुडुप लहान व जमिनीवर वेलीप्रमाणें पसरतें. विस्तार फार होत नसून पानें बारीक, लांबट, पांढुरकीं व फुलें निळसर तांबुस रंगाचीं व फळें बारीक येतात. औषधी कामाकडे उपयोग होतो. याची मुळी काविळीवर ताकाबरोबर प्यावयास देतात व मूळव्याधीवर याच्या मुळांचा अंगरस तूप घालून देतात.

**अपरांत, अपरांतक**—एका प्राचीन देशाचें नांव. याचा उल्लेख महाभारतांत (भीष्म अ. ९) व बृहत्संहितेंत आला आहे. आजच्या उत्तर कोंकणास म्हणजे ठाणें–कुलाबा यांच्या आसमंतांतील प्रदेशास अपरांत म्हणत असावेत. आभीर लोक या प्रदेशांत राहत. असा विष्णुपुराणांत उल्लेख आहे. अशोकानें या ठिकाणीं बौद्धधर्मप्रचारक पाठविले होते.

अपरांतक किंवा अपरंतक म्हणजे 'पश्चिमेकडील सरहद्दीच्या प्रदेशांतील लोक.' पश्चिम विभागांतील एक जात (बृ. सं. १४.२०). यास अपरांत्य असेंहि नांव आहे. नाशिक व जुनागड येथील शिलालेखांतहि अपरांत लोक अथवा देश असा उल्लेख आहे. अशोकाच्या एका शासनांत यवन, कंबोज, व गंधार यांचा अपरांत असा वर्ग असून पंडित भगवानलाल इंद्रजी यांच्या मतें ठाणें जिल्ह्यांतील सोपारा हें अपरांत देशाचें मुख्य ठाणें होय.

**अपरादित्य**—१. अपरादित्य पहिला–कोंकणचा शिलाहारवंशी राजा. इ. स. ११३८ च्या उरणनजीकच्या शिलालेखांत उल्लेख सांपडतो. डॉ. बुह्लर यास काश्मीरांत सांपडलेल्या मंखरचित श्रीकंठचरित्रांत उल्लेख असलेला अपरादित्य हाच असून या पुस्तकाचा काल ११३५–४५ हा त्यांनीं ठरविला आहे. या अपरादित्यानें तेजकंठ नामक पंडितास शूर्परिका (सोपारा) हून काश्मीरांत भरलेल्या पंडित सभेस प्रतिनिधि हणून पाठविलें होतें. ही गोष्ट काश्मीरच्या जयसिंह (११२९–५०) राजाच्या कारकीर्दींत घडली.

२. अपरादित्य दुसरा—कोंकणचा शिलाहारवंशी राजा. यानें जमिनी दान केल्याचे भिवंडी, परळ व वसई तालुक्यांत तीन शिलालेख सांपडले आहेत. १२०३ च्या मांडवीजवळच्या केशिदेवाच्या शिलालेखांत याचा उल्लेख असून हा केशिदेव यांचा पुत्र होय. यानें याज्ञवल्क्यस्मृतीवर मिताक्षरा ही टीका केली आहे. ११८७ च्या परळ शिलालेखांत हा आपणांस महाराजाधिराज व कोंकण चक्रवर्ती म्हणवितो. चालुक्य घराण्याच्या नाशानंतर स्वतंत्र सामंत राजाप्रमाणें यानें स्वतंत्र राज्य स्थापलें असावें.

**अपरिमेय संख्या**—(इन्कॉमेनशुरल). चौरसाची बाजू एक असेल तर कर्ण $\sqrt{2}$ होतो. आपल्या जवळ असलेल्या मोजण्याच्या एकम् (unit) मूलमानानें कर्ण बरोबर मोजतां येणार नाहीं. $\sqrt{2}$ ची किंमत सुमारें १·४ मांडतां येईल. त्याप्रमाणें वर्तुळाचा परिघ व व्यास यांचें गुणोत्तर सुमारें $\frac{22}{7}$ लिहितात तरी ही संख्या आपणाला अगदीं बरोबर लिहितां येणार नाहीं. $\sqrt{2}$ $\pi$, 'पाय्' अशा संख्यांस अपरिमेय संख्या म्हणतात. नेहमींच्या पूर्ण अंकांनीं त्या दर्शवितां येत नाहींत.

**ॲपलमद्य**—(सायडर). ॲपल फळांच्या रसापासून आंबवून हें तयार करतात. याचा रंग अंबरमण्यासारखा पिवळसर असतो. इंग्लंड देशांत वोरसेस्टर, हीयरफोर्ड, ग्लुसेस्टर व डेव्हन या ठिकाणीं फार मोठ्या प्रमाणावर सायडर तयार होतें. उत्तर आयर्लंड, फ्रान्स, जर्मनी, उत्तर अमेरिका यांसारख्या देशांतहि कारखाने आहेत. या मद्यांत पांच ते दहा टक्के साखर व दोन ते सात टक्के मद्यार्क (अल्कोहल) असतो.

**ॲपलेशियन पर्वत**—उत्तर अमेरिकेंतील सुमारें १५०० मैल लांबीच्या या पर्वताचीं शिखरें व उतार जंगलांनीं भरलेला असून ऊन, पाऊस, वारा व बर्फ यांना सारखी टक्कर देत हा पर्वत वर्षानुवर्षें झिजत असल्यानें त्याची उंची व शिखरें रॉकी पर्वतासारखीं उंच नाहींत. उत्तर अमेरिकेंत प्रथमच आलेल्या रहिवाशांनीं याच पर्वताशीं झगडून तेथील निसर्गावर विजय मिळविला व याच पर्वताच्या दक्षिण बाजूला पायथ्याकडील मैदानावर प्रथम पिकें काढून जमिनी लागवडीस आणल्या. सुरुवातीला 'शुभ्र' व 'हिरवा' या पर्वतानंतर ही पर्वताची रांग चॅंपलेन या सरोवरी भागानें व हडसन नदीमुळें सखल बनते व नंतर सुमारें २५ मैल अंतर मध्यें सोडून (त्याची दरी बनवून) हे पर्वत सुमारें १००० मैल दक्षिणेला सेंट लॉरेन्सच्या खोऱ्यापासून आल्बामाच्या मध्यभागापर्यंत येतात. माउंट मिचेल ६६८४ फूट हें या रांगेंतील सर्वांत उंच शिखर होय. या पर्वताच्या रांगा तयार होत असतांना त्यांत जंगलें गाडलीं गेलीं व त्यामुळें आतां त्यांच्यापासून बनलेल्या दगडी कोळसा, पेट्रोल वगैरेंच्या खाणी या पर्वतांत सांपडल्या आहेत. पाण्याच्या धांवत्या प्रवाहावर वीज उत्पन्न करतात व तिचा उपयोग खाणकामांत आणि इतर ठिकाणीं करतात. वसंत ऋतूंत डोंगरउतार फुलांनीं भरून जातो. उत्तरेकडील बाजूला पाईन, ॲश, मॅपल, बर्च, व बीच यांच्या उंचच उंच वृक्षांनीं भरलेलीं जंगलें असून दक्षिणेकडे ओक, चेरी, पॉपलर यांचीं जंगलें आहेत. जंगलांव्यतिरिक्त इतर

भागांत सर्वत्र काळसर हिरवटसर झुडपें दृष्टीस पडतात. अस्वलें, प्युमा ( सिंहाची एक जात ), कोल्हे, रानमांजरें, हरीण, वगैरे प्राणी या जंगलांतून भटकतांना आढळतात.

**अपसरण**—( डिफ्यूझन ). वायुरूप, द्रवरूप किंवा घनरूप पदार्थांच्या हळूहळू एकमेकांत मिसळण्याच्या क्रियेस अपसरण ( डिफ्यूझन ) म्हणतात. सोन्याच्या विटेवर शिशाची वीट ठेवली तर कांहीं आठवड्यांनीं सोनें शिशांत शिरलेलें आणि शिसें सोन्यांत शिरलेलें आढळून आलेलें आहे. दोन वायुरूप पदार्थांचीं पात्रें नळीनें जोडल्यास दोन वायु कांहीं वेळानें एकमेकांत मिसळल्याचें आढळून येतें. वायूंच्या त्या एकमेकांत मिसळण्याला गुरुत्वाकर्षणाची आडकाठी होत नाहीं. प्राणवायु ( ऑक्सिजन ) खालीं आणि उज्ज ( हॉयड्रोजन ) वर असें असलें तरी उज्ज खालच्या प्राणवायूमध्यें आणि खालचा प्राणवायु वरच्या उज्जामध्यें मिसळल्याशिवाय राहत नाहीं. अपसरणाचा वेग मात्र निरनिराळ्या वायूंचा निरनिराळा असतो. हा त्यांच्या विशिष्ट गुरुत्वाच्या वर्गमुळाच्या उलट असतो. हें वर्गमूळ जितकें जास्त तितका वेग कमी, जितकें वर्गमूळ कमी तितका वेग जास्त. द्रवरूप पदार्थांचें अपसरणहि अशाच पद्धतीनें होतें.

**अपस्मार**—( कॅटॅलेप्सी ). हा एक मज्जातंतुरोग आहे. यामध्यें एकदम शुद्धि व इच्छाशक्ति नष्ट होते आणि मनुष्य या रोगाचा झटका येण्यापूर्वी ज्या स्थितींत असेल त्याच स्थितींत पुतळ्यासारखा राहतो. कांहीं वेळानें त्याचीं गात्रें थोडीं ढिलीं होतात आणि तीं ज्या स्थितींत ठेवावीं त्या स्थितींत राहतात. परंतु त्या मनुष्यास स्वतः हालचाल करतां येत नाहीं. फेंफरें ( एपिलेप्सी ) पहा.

**अपहरण**—कायद्यामध्यें 'ॲब्डक्शन' या इंग्रजी शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या स्त्रीला बळजबरीनें किंवा फसवून दूर पळवून नेणें. अशाच प्रकारचें कृत्य पुरुषाच्या बाबतींत केलें, तर त्याला पळविणें ( किड्नॅपिंग ) म्हणतात. इंडियन पीनल कोडमध्यें या दोन्ही प्रकारच्या गुन्ह्यांना शिक्षा सांगितली आहे. ( इंडियन पीनल कोड-३५९ ते ३६६ कलमें पाहा ).

**अपाटाइट**—एक अर्धपारदर्शक खनिज. याचे एकसारखे षट्पार्श्व स्फटिक पडतात. वि. गु. ३·२. याचे अनेक रंग असतात. खटस्फुरित ( कॅल्शिअम फॉस्फेट ) आणि खटफ्लुरिद ( कॅल्शिअम फ्लुओराइड ) यांच्या संयोगानें हा बनलेला असतो. वनस्पतिजीवनाला आवश्यक अशा सर्व स्फुरितांत हा घालतात. नॉर्वे आणि ओन्टारिओ या देशांत अग्निजन्य खडकांत हा सांपडतो.

**अपामिया**—पश्चिम आशियांतील पांच-सहा शहरांचें नांव अपामिया असें आहे. सेल्युकस निकेटरनें आपल्या अपामा बायकोचें नांव ज्या शहरास ठेविलें तें ओरोन्टेस नदीच्या खोऱ्यांत आहे. ख्रिस्ती धर्मयुद्धांत याला महत्त्व होतें. या नांवाचें फ्रिजियांतील शहर ॲंटिओकस सोटरनें स्थापिलें. हें ग्रीकोरोमन आणि ग्रीकोहिब्रू संस्कृतींचें मुख्य ठिकाण झालें होतें. बिथिनिया आणि पार्थिया देशांतहि या नांवाचें शहर होतें. प्लिनीनें एकाचा उल्लेख केला आहे.

**ॲपियन**—हा ग्रीक इतिहासकार इ. स. २ च्या शतकांत होऊन गेला. त्यानें ग्रीक भाषेंत रोमन साम्राज्याच्या प्रारंभापासून ऑगस्टस बादशहापर्यंतचा समग्र इतिहास लिहिला होता. त्याचे २४ ग्रंथ होते. पण त्यांपैकीं अकराच उपलब्ध आहेत. त्याची लेखनशैली कंटाळवाणी असली तरी त्याच्या लिखाणांत भरपूर महत्त्वाची माहिती आहे यांत शंका नाहीं.

**ॲपिस**—प्राचीन मिसरी लोकांत या नांवाचा एक बैल असून त्याला लोक फार भजत. त्याच्यासाठीं मेंफिस येथें राजवाडा बांधला होता. त्याच्या प्रत्येक हालचालीवरून कांहीं शकुनगांठ बांधीत. पण या दैवी बैलाला पंचवीस वर्षांवर कांहीं आयुष्य लाभत नसे, व पुजारी त्याला गुप्तपणें मारून विहिरींत फेंकून देत.

प्रसिद्ध इराणी बादशहा कंबायसिस यानें ईजिप्त देश जिंकल्यानंतर या ॲपिस बैलाच्या पूजेच्या दिवशीं त्यास ठार केलें.

**ॲंपीअर**—विजेच्या प्रवाहाचें एक मूलमान ( युनिट ). विद्युत्प्रवाहशक्ति परिमाण रजत नत्रिताच्या विशिष्ट प्रमाणाच्या द्रावणापासून दर सेकंदास ०·००१११८ ग्राम रजत शुद्ध स्वरूपांत विद्युत्ध्रुवाशीं संचित होण्यास स्थिर विद्युत्प्रवाहाची जी शक्ति लागते तीस म्हणतात. हें मूलमापन प्रथम आन्द्रे मारी ॲंपीअर ( १७७५–१८३६ ) यानें शोधून काढलें.

**ॲपीऑन** ( इ. स. १ लें शतक )—हा ग्रीक व्याकरणकार असून त्याच्या ग्रंथांपैकीं फक्त १ किंवा २ अर्धवट भाग आज उपलब्ध आहेत. त्यांपैकीं एका भागांत ज्यू लोकांविरुद्ध मजकूर आहे व त्याला जोसेफस यानें उत्तर दिलें आहे.

**अपील**—( पुनर्विचार, विनंतिअर्ज ). कायद्यांत या इंग्रजी शब्दाचा अर्थ असा आहे कीं, खालच्या दर्जाच्या फौजदारी किंवा दिवाणी कोर्टानें केलेला निकाल वरच्या कोर्टानें फिरवावा, किंवा त्यांत दुरुस्ती करावी म्हणून तो खटला किंवा दावा वरच्या कोर्टांत दाखल करणें. इंग्लंडांतलें सर्वांत वरिष्ठ न्यायकोर्ट हाउस ऑफ लॉर्ड्स हें होय; व तेथें इंग्लंड, स्कॉटलंड व उत्तर आयर्लंड मधील फौजदारी व दिवाणी कामांतले शेवटचें अपील करतां येतें. ब्रिटिश साम्राज्यांतील हिंदुस्थान, आयरिश फ्री स्टेट, कानडा वगैरे सर्व देशांतून व वसाहतींतून शेवटचें अपील प्रिव्हि कौन्सिलच्या ज्युडिशियल कमिटीपुढें चालतें. आतां हिंदुस्थान पूर्ण स्वतंत्र झाल्यावर खुद्द हिंदुस्थानांत फेड-

रल कोर्टाकडे शेवटचें अपील चालवण्याचा अधिकार जावयाचा आहे. त्याच्याखालीं प्रांतिक हायकोर्टें, डिस्ट्रिक्ट कोर्टें, वगैरे अपील कोर्टें आहेत.

**अपुष्प वनस्पतिवर्ग**—( क्रिप्टोगॅमस प्लँट्स ). या वर्गांतील वनस्पतींस दृश्य फुलें नसतात. ( १ ) थॅलोफायटस—यांत अळंबीं, बुरशी, वगैरे संघ येतात; ( २ ) ब्रायोफायटस—यांत शैवालसदृश संघ येतात ( लिव्हरवोर्ट व मॉसेस ); व ( ३ ) प्टेरोफायटस—अश्वपुच्छ, गदाशेवाळ, वगैरे संघ, असे मुख्यतः यांचे तीन वर्ग पाडण्यांत येतात. वास्तविक आतां या वनस्पतींस अपुष्प म्हणणें शास्त्रीयदृष्ट्या बरोबर नाहीं, कारण त्यांच्या पुनर्जननपद्धतीचा आतां चांगला अभ्यास झाला असून इतर सपुष्प वनस्पतींप्रमाणेंच या पद्धतीचें ज्ञान झालें आहे.

**अपृष्ठवंश**—( इन्व्हर्टेब्राटा ). प्राणिशास्त्रामध्यें ज्या प्राण्यांस पृष्ठवंश नसतो त्या सर्वांस अपृष्ठवंशप्राणी ह्या शाखेंत घालतात. या शाखेचे ऑर्थोपोडा, ॲनिलोडा, मोलस्का वगैरे अनेक वर्ग आहेत. त्या त्या नांवाखालीं त्यांची माहिती दिली आहे. एकपेशी अमीबापासून गोगलगाई, शिंपा, वगैरे मृदुकाय प्राण्यापर्यंतचे अनेक जातींचे प्राणी या वंशांत मोडतात. तथापि या अपृष्ठवंशीय प्राण्यांतील सामान्य गुण म्हणजे कणा नसणें, कल्ल्यासाठीं माशाप्रमाणें बाह्यछिद्रें नसणें, व हृदयाची ठेवण पाठीकडच्या बाजूस असणें हे होत.

**अपेनाइन्स ( पर्वत )**—ही पर्वतांची रांग इटलीच्या मधोमध आहे. पूर्वीं हें नांव उत्तरेच्या ओळीसच होतें, परंतु अलीकडे एकंदर रांगेचाच या नांवानें बोध होतो. याचे उत्तर, दक्षिण व मध्य असे तीन भाग करतात.

लासिसा घाटापर्यंत लिग्युरिअन, पुढें टायबरच्या उगमापर्यंत टस्कन व पुढें काग्ली घाटापर्यंत ॲंब्रियन असे उत्तर अपेनाइन्सचे तीन भाग आहेत. ही पर्वताची ओळ इटलींत आडवी पसरली असून उत्तरेच्या लिग्युरियन ओळीपासून बऱ्याचशा नद्या पो नदीस मिळतात. दक्षिणेकडील नद्या महत्त्वाच्या नसून टायबर नदी ॲंब्रियन ओळींत उगम पावते. लिग्युरियनचें मॉंट ब्यु ( ५९१५ फूट ), टस्कनचें मॉंट सिमोन ( ७१०३ फूट ) व ॲंब्रियनचें मॉंट नीरोन ( ५०१० फूट ) हीं शिखरें असून या ओळींतून बरेच आगगाडीचे फांटे गेले आहेत. जिनोआ—हॅान्को फांट्यावर ५ मैलांचा बोगदा असून टस्कन ओळींत सांपडणारे खनिज व रासायनिक पदार्थ इतरत्र आढळत नाहींत. मध्य अपेनाइन्स ही प्रमुख व लांब ओळ असून यांत मॉ. व्हेटोर ( ८१२८ फूट ), मॉ. व्हेलीनी ( ८१६० फूट ) व मॉ. ॲमरो ( ९१७० फूट ) हीं शिखरें आणि पश्चिमवाहिनी नीरा प्रमुख नदी आहे. रोमजवळील ज्वालामुखी टायबर नदीमुळें तोडले गेले आहेत. दक्षिण भागांत पर्वतांचे धरे मिळून तीन ओळी समांतर झाल्या असून पूर्वेकडील मॉ. गॅर्गानो भूशिर व नेयडसच्या बौजूचे ज्वालामुखी हे मुख्य रांगेपासून अलिप्त आहेत. कॅलेब्रिया हें पर्वताचें नांव असून मॉ. बोलिनो ( ७३२५ फू. ) हें शिखर आहे. सिवारी मैदानावर चुनखडीचा भाग संपून ग्रनाइटच्या भागास सुरवात होते.

या पर्वतावर जंगल आहे. पूर्वी पाइन, ओक, बीचवुड वगैरेंची त्यांत समृद्धि असे. जंगलांत लांडगे आढळतात. अत्युच्च शिखरें बर्फमय असून द्रवरूपांत खनिज पदार्थ व गरम पाण्याचे झरे आढळतात. अपेनाइन्स व आल्प्स् हे पर्वत संलग्न असले तरी आल्प्सच्या कक्षेचा अपेनाइन्सशीं कांहींच संबंध दिसत नाहीं. ग्रेन कॉनिची कक्षा जिनोआचे आखातापर्यंत दिसते. या पर्वताचें दक्षिण टोंक खेरीजकरून इतर ठिकाणीं आल्प्सप्रमाणें पैलूदार दगड सांपडत नाहींत. मध्ययुगीन किंवा द्वितीयावस्थाक व तृतीयावस्थाक थरांचा भरणा या पर्वतांत आढळतो. थरावर थर चढून या पर्वताची उंची वाढली व तळीं उत्पन्न झालीं. द्वितीयावस्थाक व तृतीयावस्थाक थर समुद्रांत गडप झाले. या पर्वतावर बर्फाचे डोंगर नाहींत.

**अपोलो**—एक ग्रीक देवता. हा झ्यूस ( ज्युपिटर ) आणि लेटो ( लाटोना ) यांचा पुत्र. हा मूळ सूर्यदेव मानलेला आहे, पण होमरच्या महाकाव्यांत हा हेलिअस ( सूर्य ) या देवतेहून भिन्न असल्याचें दिसतें. होमरनंतरच्या काळांत अपोलो आणि हेलिअस हे एकच मानण्यांत येऊं लागले. प्रकाश आणि स्वच्छता यांची ही मूळ देवता असून पुढें हळूहळू नैतिक व आध्यात्मिक तेज आणि शुद्धि यांची देवता, तसेंच सर्व बौद्धिक, सामाजिक आणि राजकीय उन्नतीची अधिष्ठात्री देवता असें याला मानण्यांत येऊं लागलें. संगीतज्ञांची आणि भविष्यवाद्यांची हीच देवता बनली आणि रोग व शारीरिक क्लेश निवारण करणारी सामाजिक आणि राजकीय सुव्यवस्था राखणारीं मोठालीं शहरें स्थापन करणारी अशा अनेक गुणांची ही देवता बनली. या देवतेची आराधना रोम शहरामध्यें बहुधा टार्क्विन राजांच्या काळांत सुरू झाली असावी.

**अपोलोनिअस**— १. हा ग्रीक गणितशास्त्रज्ञ खि. पू. २४० च्या सुमारास महान् भूमितिज्ञ म्हणून प्रसिद्ध होता. त्यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले पण त्यांपैकीं फक्त एक शंकुच्छेद ( कॉनिक सेक्शन्स ) हा अंशतः ग्रीक आणि अंशतः अरबी भाषेंत भाषांतर केलेला त्याचा ग्रंथ आज उपलब्ध आहे.

२. ( खि. पू. २३० )—एक ग्रीक वक्तृत्वकलाभिज्ञ आणि कवि. त्याच्या अनेक ग्रंथांपैकीं फक्त आर्गोनाटिका हें महाकाव्य

आज उपलब्ध आहे, व तें बऱ्याच वरच्या दर्जाचें आहे, पण त्यांत कृत्रिमपणा फार दिसतो.

**अपोलोनिया**— या नांवाचीं तिसांहून जास्त शहरें आहेत. त्यांतील इलीरियामधील महत्त्वाचें आहे. हें ॲसच्या दक्षिण तीरावर कॉरिंथिअनांनीं बांधलें. मॅसिडॉनच्या फिलिपशीं झालेल्या लढाईंत हें लष्करी ठाणें असून वाङ्मय व तत्त्वज्ञान या विषयांतहि याची बरीच ख्याती होती. रोमचा ऑगस्टस येथें शिकत असे.

काळ्या समुद्राच्या तीरीं थ्रेशिया प्रान्तांत या नांवाचें एक शहर असून तेथें अपोलोचा पुतळा आहे.

**अप्पय्या दीक्षित**—एक महान् पंडित. हा द्राविड ब्राह्मण कांची नगराच्या आग्नेयीस आदिमाल्यनामक अग्रहारांत राहत असे. बापाचें नांव नारायण असें कविचरित्रकार देतात. याचा काळ शके १५ वें शतक, विजयानगरच्या कृष्णदेव राजाची कारकीर्द. यानें १२ व्या वर्षी वेदाध्ययन संपवून शास्त्राभ्यासास सुरवात केली व त्यानंतर शांकरवेदान्ताचें मनन केलें. हा खरा वेदशास्त्रसंपन्न, सदाचारशील आणि निर्मत्सरी असल्यामुळें शैव व वैष्णव यांना आदरणीय होता. यास तीन बायका व ११ मुलें होतीं. यानें तारुण्यांत कित्येक सभेंत न्याय वगैरे विषयांत व शिव आणि विष्णु यांच्या साम्यदर्शनांत मोठमोठ्या विद्वानांशीं वाद केला. यावरून चंद्रगिरीच्या व्यंकटपति रायल्लू राजानें प्रसन्न होऊन याचें कुटुंब व विद्यार्थी यांच्या निर्वाहासाठीं यास मोठ्या उत्पन्नाची जमीन इनाम दिली. याचे ग्रंथ-शिवस्कंदचंद्रिका ( ३० अ. ) शिवतत्त्वविवेक ( २० अ ), शिवमणिदीपिका, शिवकर्णामृत, पंचरात्रागममतखंडन, वीरशैव नामक ग्रंथ, शतश्लोकी, आत्मार्पण ग्रंथ, रामायणसारस्वत, आणि नामसंग्रहमाला व शब्दप्रकाश हे दोन कोश. आत्मार्पण ग्रंथ रचण्यापूर्वी हा धोत्र्याच्या बिया खात असे. कारण धर्माविषयीं विचार करण्याकरितां लागणारी अंतःकरणशुद्धि करण्याचें सामर्थ्य या वनस्पतीच्या अंगीं आहे, असा समज आहे. त्यास जें जें स्फुरलें तें त्यानें लेखकांकडून लिहविलें. या ग्रंथास दक्षिण हिंदुस्थानांत फार मान आहे इतका तो उत्कृष्ट आहे. त्रिचनापल्ली, तंजावर व मदुरा येथील राजांनीं याची विद्वत्ता व बुद्धिमत्ता पाहून यास मोठीं बक्षिसें दिलीं. यानें वेदान्त, न्याय व अलंकार यांवर ८४ ग्रंथ लिहिले. त्यांत कुवलयानंद व चित्रमीमांसा हे अलंकारावर असून 'प्रबोध-चंद्रोदय' हा ग्रंथ दीक्षितांचा नसावा असें आधुनिक विद्वानांचें मत आहे. 'नीलकंठविजय' हें चंपूकाव्य याचा नातू नीलकंठ याचें असून वृत्तिवार्तिक, रत्नपरीक्षा व सिद्धान्तलेश हे वेदान्तपर ग्रंथ याचे आहेत. याशिवाय यानें मध्वमुखकपोलचपेटिका, मध्वमतकुठार, रामानुजमतविध्वंस, दशकुमारचरितसंक्षेप हे ग्रंथ व वसुमति-चित्रसेनविलास हें नाटक लिहिलें.

हा मोठा नैष्ठिक व स्वधर्मतत्पर असून यानें कावेरी तीरीं अनेक यज्ञ केले व विद्यार्थ्यांस पढवीत राहिला. जो कोणी त्याच्याकडे येई त्याजवळ हा शिवाचीच स्तुति करी व तद्विषयक पुढील श्लोक उच्चारी—

> मुरारौ च पुरारौ च न भेदः पारमार्थिकः ।
> तथापि मामकी भक्तिश्चंद्रचूडे प्रधावति ॥

याबद्दल एक आख्यायिका अशी सांगतात : एकदां हा विष्णूच्या देवळांत गेला असतां त्यानें 'शांताकारं...लोकैकनाथं॥' हें ध्यान म्हणण्याऐवजीं 'शांतं ... पार्वतीशं नमामि ॥' असें म्हटलें. त्याबरोबर विष्णुमूर्ति अदृश्य होऊन शिवमूर्ति प्रकट झाली. पुढें लोकांनीं ही गोष्ट यास कळविल्यावर यानें पुनः श्रीविष्णूचें ध्यान करून पूर्ववत् विष्णुमूर्ति प्रकट केली. दुसरी आख्यायिका अशी—ताताचार्य नांवाच्या द्वैत वेदान्ती व वैष्णवपंथी व्यंकटपतिरायाच्या दरबारीं असलेल्या गुरूचा यानें वादांत पराजय केला. त्यामुळें ताताचार्यानें याशीं हाडवैर बांधून हा गांवीं परत जात असतां यावर मारेकरी घातले. परंतु त्या मारेकऱ्यांचा नाश कोणा वीरपुरुषानें केला व हा घरीं सुखरुप पोहोंचला. ही गोष्ट राजास कळल्यावर त्यानें दीक्षितांचा अमूल्यवस्त्राभरणांनीं सत्कार केला व ताताचार्यांचा धिक्कार केला. पुढें दीक्षित महायात्रेस गेले असतां त्यांची जगन्नाथराय पंडिताशीं गांठ पडली. त्रिस्थळी यात्रा झाल्यावर परत गांवीं येऊन दीक्षित पारमार्थिक विषयावर लिहूं लागले. या लिखाणावरुन दीक्षितांची श्रीशंकराचार्यांच्या सिद्धांतावरील दृढ श्रद्धा दिसून येते. पुढें दीक्षितांनीं काशीवासाचा विचार केला पण ग्रामस्थांच्या आग्रहावरुन तो विचार सोडून आचार्यांची जन्मभूमि चिदंबरपुर येथें ते राहिले, व त्यांनीं आपला सर्व काळ स्वधर्माचरणांत घालविला. यांच्या जवळ असलेल्या चार स्फटिकाच्या लिंगांपैकीं, २ ब्राह्मणांस, १ पुतण्यास व १ मुलांस देऊन पांचवें चिदंबरम् येथें स्थापिलें. दीक्षित वयाचे ९० व्या वर्षी चिदंबरम् येथें मरण पावले.

**अप्पर** ( ७ वें शतक )—एक तामिळी गूढवादी कवि. मूळ नांव मरुलनीकियर. कडलोर जिल्ह्यांत थिरुअमुर या गांवीं वेल्लाळ जातींत जन्म. थिलथवटियर नांवाची थोरली बहीण. हिचें त्याच्याशीं लग्न ठरलें होतें तो सुभेदार लढाईंत पडल्यामुळें व त्यानंतर लगेच आईबाप वारल्यामुळें हिनें अग्निप्रवेश करण्याचा विचार केला, पण भावास संभाळण्याकरितां शेवटीं ती मागें राहिली. या वेळीं जैनांची चढती कमान होती. मरुलनी मोठा झाल्यावर त्याच्या मनांत अध्यात्मपर वि

घोळूं लागले व त्यानें आपण होऊन किंवा जैन भिक्षूंच्या शिकवणीमुळें जैनधर्म स्वीकारला व त्याचा गहन अभ्यास केला. त्यामुळें पाटलीपुत्रांत जैनांनीं त्याला आपला गुरु केलें. मृत्यूला दूर सारून ज्याच्याकरितां आपण संसारांत पडलों तो आपला भाऊ धर्मभ्रष्ट होऊन परदेशीं गेला हें पाहून थिलथवटियर ही आपला गांव सोडून थिरुअथिकै या क्षेत्रीं गेली. इकडे मरुलनीकियर हा पाटलीपुत्रांत आनंदांत असून त्याला बहिणीची आठवणहि होत नसे. परंतु एकदां प्राणांतिक पोटशूल उठून व तो कोणत्याहि प्रकारें बरा होईना त्या वेळीं यास आपल्या बहिणीची आठवण झाली व तिला त्यानें बोलावणें पाठविलें. परंतु तिनें मी जैनमंदिरांत येणार नाहीं व जैनाचें तोंड पाहणार नाहीं, असा उलट निरोप धाडला. तेव्हां तो जैन परिवार, वस्त्रें व चिन्हें वगैरे फेंकून थिरुअथिकैला धांवत गेला व आपल्या बहिणीचे त्यानें पाय धरले. धर्मांतर केल्यावर त्याची पुढें व्याधि गेली व तो कट्टा शिवभक्त बनला.

याबद्दल जैनधर्मी पल्लव राजानें याचा बराच छळ केला; परंतु हा नेहमीं शिवमहिमा गात राही, त्यामुळें कंटाळून त्या राजानेंच शिवदीक्षा घेतली. पुढें यात्रेंत याला अप्पुथी व संबंदर हे साधु भेटले. त्यांनीं यास समानतेनें वागविलें; संबंदर यास अप्पर ( तामिळी–पिता ) म्हणे त्यावरून अप्पर हें नांव पडलें. हा पुढें पुष्कळ हिंडला व अनेक देवतांवर यानें काव्यें केलीं व शेवटीं पुंपुकलुर येथें राहिला. मरणसमयीं याचें वय बरेंच होतें. हा जवळ पावडें बाळगीत असे. हा तामील शेतकरी असल्यामुळें याच्या काव्यांत गूढवादाबरोबर सामान्य मजुराचें चित्रहि येई. यानें ३०० कविता केल्या असून त्यांत जागजागीं शिवनृत्य-वर्णन आढळतें. याच्या कवितेचा आस्तिक्यवादास उपयोग झाला. रहस्यमय धर्माचे बोल व त्याचीं गाढ व व्यापक तत्त्वें त्यानें लोकांच्या निदर्शनास आणलीं.

**अप्पाशास्त्री**—एक ग्रंथकार. 'लवलीपरिणय' व 'सारस्वतादर्श, हीं नाटकें व ' अप्पाशास्त्रीवादार्थ ' आणि ' चिल्लरवादाः ' हे ग्रंथ यानें लिहिल्याचे उल्लेख आढळतात.

**अप्रत्यक्ष विभजन**—( मिटॉसिस ). पेशींच्या अप्रत्यक्ष विभजनपद्धतीस ही संज्ञा देण्यांत येते. या विभजनामध्यें केंद्र-जिवाणूंत फार महत्त्वाचे फरक होतात. त्या जीवाणूमध्यें असलेलें रंजक द्रव्य सुतासारखें लांब बनून त्याचे वक्राकृति अतिसूक्ष्म असे बारीक बारीक तुकडे होतात. त्यास क्रोमोझोम असें म्हणतात. त्यांचें अनेक अवस्थांतून रूपांतर होत असतें व अखेरीस मूळ गोलकाचे अथवा पेशीचे दोन तुकडे होऊन त्या स्वतंत्र पेशी बनतात. अनेक जीवशास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं, हे क्रोमोझोम म्हणजे अत्यंत सूक्ष्म कणांचीं सूत्रें असून त्यांमध्यें सर्व वांशिक गुणधर्म उतरतात आणि वर सांगितलेल्या रूपांतर-पद्धतीमध्यें पूर्वीच्या जीवाणूच्या सर्व गुणधर्मांचे गुण व परिणाम यांच्या दृष्टीनें सारखें विभजन होतें.

**अप्सरा**—या देवादिकांना व पुण्यवंतांना सुख देणाऱ्या व स्वर्गांत राहाणाऱ्या काल्पनिक भोग्य स्त्रिया असा सर्व धर्मीयांचा पूर्वीपासून समज आहे. या भोगांगना देवांना व पुण्यवान् मानवांना लाभतात ही कल्पना सुखलोलुप मानवी डोक्यांतूनच निघाली असली पाहिजे.

भारतीय—अप्सरा हा शब्द वैदिक वाङ्मयांत गंधर्व या शब्दाशीं जोडून आलेला आढळतो. या स्त्रियांना एक पति नसून या देवांच्या उपभोगासाठीं असत. यजुर्वेदांत यांचें वर्णन असून अथर्ववेदांत यांसंबंधीं जास्त माहिती मिळते. या जलांत क्रीडा करणाऱ्या असत, अशी अप्सरा शब्दाची व्युत्पत्ति सायणाचार्यांनीं दिली असून या कामविकारानें दुसऱ्यांना मोह पाडणाऱ्या, नृत्य करणाऱ्या, नदींत विहार करणाऱ्या, झोंपाळ्यांच्या ठिकाणीं या असोत, असे उल्लेख अथर्ववेदांत सांपडतात. महाभारतांत अप्सरांचा उल्लेख बऱ्याच ठिकाणीं आहे. देवर्षि कश्यपापासून प्राधेला रंभादि अप्सरा झाल्या असें संभवपर्वांत आहे. यांचें काम म्हणजे देवसभेंत नृत्यगायन करणें व एखाद्या तपोनिष्ठास शृंगारचेष्टादिकांनीं मोहित करून त्याला तपाचरणापासून पराङ्मुख करणें. यांचे अनेक गण असून त्यांमध्यें दैविक व लौकिक असे दोन भेद आहेत. दैविकांत १० व लौकिकांत ३४ अप्सरा आहेत, असें एका ठिकाणीं म्हटलें आहे. पुढील अप्सरा मुख्य होतः—

उर्वशी—ऋग्वेदांत हिचेंच नांव आढळत असून दहाव्या मंडळांत पुरूरवा–उर्वशी संवाद आहे. इंद्रसभेंत नारदानें केलेल्या पुरूरव्याच्या वर्णनानें मोहित होऊन तिनें पुरूरव्याशीं समागम केला. परंतु उर्वशी गेल्यानें इंद्रास बरें वाटेना म्हणून त्यानें गंधर्वांकडून उर्वशीनें पुरूरव्याशीं केलेल्या अटी मोडावयास लावून तिला परत आणलें. मैत्रावरुणापासून हिच्या ठिकाणीं वसिष्ठाची उत्पत्ति झाली.

एकदां नरनारायण ऋषि बदरिकाश्रमीं तपश्चर्या करीत असतां इंद्रानें एक अप्सरा विघ्न करण्यासाठीं पाठविली. ही गोष्ट कळतांच ऋषींनीं आंब्याच्या मोहरापासून एक सुस्वरूप अप्सरा उत्पन्न केली. त्यामुळें इतर अप्सरा लाजल्या. ही गोष्ट इंद्रास कळल्यावर त्या अप्सरेस त्यानें स्वर्गांत ठेवून घेऊन तिचें नांव उर्वशी ठेविलें ( पद्मपुराण, अवंतिखंड, अध्याय ८ ).

घृताची—एकदां भरद्वाज ऋषि स्नानार्थ नदीतीरीं गेले असतां स्नान करीत असलेल्या घृताचीला पाहून कामवासनेनें व्याकुळ झाले. त्यांचें रेतस्खलन झालें असतां तें त्यांनीं द्रोणांत धरलें व त्यापासून द्रोणाचार्य जन्मले.

रंभा—समुद्रमंथनांतील चौदा रत्नांपैकीं एक सुंदर अशी अप्सरा. इंद्रानें विश्वामित्राच्या तपाचा भंग करण्यास हिला पाठविलें असतां विश्वामित्रानें एक हजार वर्षेंपर्यंत शिळा होशील असा हिला शाप दिला. रावणानें कैलासीं हिला पाहिल्यावर तो मोहित झाला व मी तुझ्या (कुबेर) भावाच्या मुलाची (नलकुबराची) पत्नी आहें असें सांगत असतांहि त्यानें हिला भ्रष्टविली, अशी रामायणांत गोष्ट आहे.

तिलोत्तमा—शुंभानिशुंभ दैत्यांपासून संरक्षणार्थ ब्रह्मदेवानें विश्वकर्म्यास एक सुंदर स्त्री निर्माण करण्यास सांगितली असतां त्यानें सर्व रत्नांतील तीळ तीळ घेऊन ही स्त्री निर्माण केली. म्हणून ब्रह्मदेवानें तिचें तिलोत्तमा नांव ठेविलें व तिला सुंदोपसुंदाकडे पाठविलें असतां ते आपसांत भांडूं लागले व त्यांत अंत पावले, अशी तिलोत्तमेची कथा महाभारतांत आहे (आदिपर्व १३२).

मेनका—पांचाल राजा पुत्रप्राप्तीस्तव अरण्यांत तप करीत असतांना त्यास स्वरूपसुंदर व यौवनयुक्त अशी मेनका अप्सरा दिसली. त्यामुळें जितेंद्रिय असूनहि तो राजा मोहित झाला व त्याचें रेतस्खलन झालें. त्यामुळें लज्जित होऊन त्यानें तें तसेंच पायानें दाबलें व त्यापासून द्रौपदीचा पिता द्रुपद राजा उत्पन्न झाला. (म. भा. आदि. १५०, १०). एकदां विश्वामित्र ऋषि तप करीत असतां आपलें इंद्रपद नष्ट होईल या भीतीनें विश्वामित्राच्या तपास विघ्न करण्यास इंद्रानें पाठविलें. कामविकारानें मोहित होऊन विश्वामित्र मेनकेसह कालक्रमणा करीत असतां त्यास शकुंतला झाली. (म. भा. आदि. ९३, १५).

कुंडाची—स्कंद पुराणांत कुंडाची नामक अप्सरेचा उल्लेख आहे. ब्रह्मदेवानें निर्माण केलेली ही अप्सरा कैलासीं गेली असतां शंकर तीवर मोहित झाला; परंतु पार्वती जवळ असल्यामुळें शंकरास तिच्याकडे पाहतां येईना. ती प्रदक्षिणा करूं लागली असतां तिच्या मुखावलोकनार्थ शंकरांनीं चारी दिशांस तोंडें उत्पन्न केलीं. ही गोष्ट नारदाकडून कळली असतां पार्वतीनें शंकराचे डोळे झांकले. त्या वेळीं प्रलय झाला असतां शंकरांनीं कपाळीं नेत्र उत्पन्न केला. पार्वतीनें कुंडाचीला 'तूं कुरूप हो' असा शाप दिला असतां तिनें ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून कुंडांत स्नान केलें व पुनः सुस्वरूप बनली.

खेडवळ भाषेंत जलदेवतांना आसरा म्हणतात. हा शब्द अप्सरा शब्दापासून निघाला असून अप्सरांचें आश्रयस्थान जल ही कल्पना जुनी आहे. या आसरा सात असतात अशी समजूत असून नदीकांठीं दगडांस शेंदूर लावून बांगड्या वगैरे वाहून अजूनहि खेडवळ लोक पूजा करतात. नागकन्याप्रमाणें, सुंदर व गोंडस राजपुत्र किंवा तरुण यांस यांनीं ओढून नेल्याबद्दलच्या कथाहि खेडवळ लौकिक वाङ्मयांत आढळतात.

मुसलमानांत अप्सरांना हौरी हें नांव आहे. याचा अर्थ सुंदर कुमारी असून हा शब्द फारशी 'हूरी' व अरबी 'हवरा' या शब्दापासून उत्पन्न झाला आहे.

पाश्चात्य कल्पनाः—ग्रीक पुराणांत यांस निंफ्स् हें नांव आहे. निंफ याचा शब्दशः अर्थ लग्न झालेली किंवा उपवर स्त्री असा आहे. अप्सरांचे जमिनीवरच्या व पाण्यांतल्या असे दोन वर्ग पाडतात. जमिनीवरच्या अप्सरा डोंगर व दऱ्याखोरीं यांच्या स्वामिनी असून पाण्यांतल्या नदीनाले, ओढे व समुद्र, सरोवरें या ठिकाणीं असतात. कांहीं पुराणकार यांना अमर तर कांहीं मर्त्य पण दीर्घायुषी समजतात. या एकंदर ३००० असून यांचें देऊळ नसतें, पण पूजाअर्चा होते. इतर देवांपेक्षां दर्जा कमी. नैवेद्य दूध, तेल, मध व कधीं बकरें यांचा. स्वरूप—तरुण, सुस्वरूप, अविवाहित, मध्यभागापर्यंत वस्त्र व कधीं हातांतील भांड्यांतून पाणी ओतीत आहेत तर कधीं हातांत गवत, पानें व शिंपा आहेत असें. नग्नावस्थेंत पाहणें अनिष्ट समजत, कारण त्यामुळें उन्मादवायु होतो व वेड लागतें. त्यांना स्थलनामावरून संबोधित.

**अफगाणिस्तान**—आशिया खंड, एक मुसलमानी राष्ट्र. जेथें मध्यआशियांतल्या उंचच उंच हिंदुकुश पर्वताची शाखा शिखरयुक्त पण पठारी स्वरूपांत दिसते त्या ठिकाणीं हा देश आहे. या देशाच्या पश्चिमेला इराण, उत्तरेला रशिया, पूर्वेला व दक्षिणेला पाकिस्तान आणि बलुचिस्तान असे देश येतात. म्हणजे साधारणपणें हा देश हिंदुस्थानच्या वायव्येला येतो. बलुचिस्तान व इराण यांपासून ओसाड वाळवंटांनीं, व रशिया आणि पाकिस्तान यांपासून उंच पर्वतांनीं हा देश निराळा बनला आहे. खुद्द देशांत डोंगरांची व टेंकड्यांची उंची कित्येक जागीं २५००० फुटांपर्यंत असून मधूनच सुपीक दऱ्या व डोंगर-उतरणीवर हिरवळ आणि डोंगरांतून जलद गतीनें वाहणाऱ्या पाण्यावर पोसलीं जाणारीं पिकें दृष्टीस पडतात.

अफगाणिस्तानचें क्षेत्रफळ सुमारें दोन लक्ष पन्नास हजार आहे व लोकसंख्या एक कोटीपर्यंत असावी. या सर्व देशाचें क्षेत्रफळ व लोकसंख्या यांची नक्की मोजदाद अद्यापपर्यंत झालेली नाहीं.

देशांत अतिशय कडक उन्हाळा व अतिशय कडक थंडी असें विषम हवामान आढळतें. उन्हाळ्यांत १२० अंशांपर्यंत उष्णतामान जातें. हिवाळ्यांत पर्वतांतून जाणाऱ्या वाटांवर धुकें व सर्वत्र बर्फ पडतें आणि त्या बंद होतात. तसेंच हिवाळ्यांत येथें गार वारे सुसाट वाहतात.

येथें राहणारे लोक या डोंगरासारखेच कणखर व स्वभावानें 'खडबडीत' आहेत. त्यांचें वर्णन खालील तक्त्यावरून लक्षांत येईल.

| नांव | मूळचा वंश | स्वभावधर्म |
|---|---|---|
| दुराणी (प्रमुख) | हिब्रू | कणखर, धाडसी, क्रूर. |
| (उत्तरभागांतले)लोक | तुर्क | शांत; शेतकरी, अमु-नदीच्या खोऱ्यांत लागवड करून राहणारे. |
| गिलझाई (हिंदुस्थानच्या सरहद्दीजवळ). | तुर्क | क्रूर व कडवे. |
| काफीर | ग्रीक (अंदाजीं) | काबूलच्या खोऱ्यांत शेती. |
| वाखान | इराणांतले किरघीज | |
| हजारा | मंगोलिया | शांत व प्रेमळ स्वभावाचे, उंच, डोंगराळ प्रदेशांत राहणारे. |
| आफ्रिडी व मोहमन्द | पठाणी | कणखर, क्रूर, धाडसी. |

या सर्व लोकांची भाषा पुश्तु असून उत्तरेकडील प्रदेशांत तुर्की भाषा चालते. राज्यकारभार व वाङ्मय मात्र फारसी भाषेंत आहे.

हा सर्वच देश म्हणजे एका टोळीचें दुसरीशीं भांडण, खून, मारामाऱ्या, लुटारूपणा; थोडक्यांत अंदाधुंदी. विशेषतः सरहद्दीवर तर लुटारूपणाला ऊतच येतो. डोंगराच्या कडेकपारींत बसून प्रवाशांवर अगर व्यापाऱ्यांच्या तांड्यांवर हल्ले करून लुटालूट करणें हा तर तेथील लोकांचा मुख्य धंदाच होऊन बसला आहे. लोक धर्मानें सुन्नी पंथीय कडवे मुसलमान असून धर्मगुरूंचें वर्चस्व आहे. आधुनिक सुधारणेला या धर्मगुरूंचा विरोध असतो.

पर्वतांवरील अरुंद खिंडींतून एकेक वेळीं लाखापर्यंत जनावरांचे तांडे सामान घेऊन जातांना दृष्टीस पडतात. घोडे, उंट, खेचरें यांवरून ही वाहतुक चालते. जनावरांच्या बरोबर तांड्यांच्या रक्षणाकरितां भरलेल्या बंदुकी हातांत घेऊन लोक प्रवास करतात. अफगाणिस्तानांत जाण्याकरितां पाकिस्तानांतून जरी ७–८ रस्ते आहेत तरी त्यांपैकीं खैबर खिंड याच एकट्या रस्त्यावरून वाहतूक चालते. बाकीचे रस्ते कठिण व वर्षांतील सात-आठ महिने बर्फाच्छादित असतात. या देशाच्या सरहद्दीकडे पेशावरकडून येणारा लोहमार्ग; दक्षिण सरहद्दीकडील चमनपर्यंतचा मार्ग; व रशियामधून कुष्कापर्यंत येणारा लोहमार्ग असे लोहमार्ग आहेत. परंतु खुद्द देशांत अवघा पांच मैल लांबीचा लोहमार्ग काबूल ते दारुलामा (अमानुल्लानें वसवलेली राजधानी) येवढाच आहे. त्याचप्रमाणें सडकाहि नाहींतच.

या देशांत पूर्व व उत्तरेकडील भागांत दोनदां पीक निघतें व मुख्यतः वसंत ऋतूंत गहूं, सातू व मसूर यांचें पीक काढतात. शरदऋतूंत तांदूळ, ज्वारी, तंबाखू, बीट व मका यांचीं पिकें काढतात. युरोपखंडांतील थंड हवेंत होणारी बहुतेक फळफळावळ या देशांत होते. त्यांत मुख्यत्वें डाळिंब, द्राक्षें, सफरचंद, जरदाळू, कलिंगडें, मनुका, बेदाणे, आक्रोड, बदाम, वगैरेंचा भरणा असतो. हीं सर्व फळें खैबर मार्गानें हिंदुस्थानांत येतात. अफगाणिस्तानच्या भूस्तर परिस्थितीवरून येथें विपुल खनिज द्रव्यें सांपडावींत असें दिसतें. परंतु तीं बाहेर काढण्याची कांहीं सोय नाहीं. तांबें, लोखंड, सोनें, चांदी (एके काळीं विपुल प्रमाणांत) व जिप्सम हीं मोठ्या प्रमाणावर आहेत. डोंगरांवरून मेंढ्या चारतात. त्यामुळें लोंकरीचें कापड व गालिचे विणण्याचा धंदा मोठ्या प्रमाणांत चालतो. आयातीचे मुख्य जिन्नस म्हणजे कापसाचें कापड, नीळ, चहा व साखर हे असून निर्यातीचे मुख्य जिन्नस म्हणजे लोंकर, गालिचे, रेशीम, फळें, इमारती लांकूड, व घोडे हे होत.

सुमारें एक-तृतीयांश लोक भटकणारे व पशुपालवृत्तीचे असून ते उंट, चकरीं, घोडीं यांचे तांडे बरोबर घेऊन दऱ्याखोऱ्यांतून चाऱ्याच्या संशोधनार्थ भटकतात. त्यांपैकीं खाण्यासाठीं बकऱ्यांचें मांस आणि चरबी व निवाऱ्यासाठीं व वस्त्रासाठीं त्याचीं कातडीं यांचा उपयोग केला जातो. थोडे लोक डोंगरांवरून बर्फाच्या वितळून आलेल्या पाण्यावर शेती करतात. अर्थात् शेतीला लागणारें पाणी वाळवंटाच्या भागांत डोंगर पोंखरून बोगद्यांतून नेलेल्या कालव्यांतून येतें. यापलीकडील सर्वच प्रदेश म्हणजे रखरखीत ओसाड माळच होत. डोंगरउतारांवर अगदींच मामुली स्वरूपाचें पीक कांहीं ठिकाणीं निघतें पण तें तेथील लोकांनाच पुरत नाहीं.

काबूल ही अफगाणिस्तानची राजधानी असून तेथें मात्र सर्व आधुनिक सोयी आहेत. काबूलशिवाय इतर शहरें म्हणजे हिरात, कंदाहार, मझर-इ-शरीफ हीं होत. राजकीय दृष्टीनें या देशाचे काबूल, अफगाण, तुर्कस्तान, कंदाहार, हिरात, काटाघान, बदकशान व इतर चार लहान असे अकरा भाग असून त्यांवरील राज्य करणारा सुभेदार प्रतिनिधि काबूलहून राजानें नेमलेला असतो. अफगाणिस्तानांत दुसऱ्या राष्ट्रांच्या बऱ्याच वकिलाती आहेत. काबूल येथें रेडिओ स्टेशन व बिनतारी संदेशांचें ठाणें आहे. १९२८ पासून बाहेरच्या टपाल-खात्याशीं व्यवहार सुरू झाला व १९३८ पासून हिंदुस्थानांतून पार्सलें जाऊं लागलीं.

अफगाणिस्तानचें उत्पन्न सुमारें चावीस कोटी (अफगाणी) रुपये असावें. कांहीं थोड्या धंदेशिक्षणाच्या शाळा आहेत. काबूल विद्यापीठ काढण्याचें १९३२ पासून घाटत आहे. राज्यकारभारा-

साठीं एक पार्लमेंट पद्धतीची संस्था आहे; तथापि राजाकडेच बहुतेक सत्ता आहे. सध्याचा राजा महंमद झाहीरशहा १९३३ त गादीवर आला.

**अफजलखान**—एक आदिलशाही सरदार. अबदुल्ला भटारी अफजलखान हा चांगला धिप्पाड पुरुष असून महंमद आदिलशहाच्या कारकीर्दीत उदयास येऊन पहिल्या प्रतीचा सरदार बनला. १६४४ त रणदुल्लाखाँनंतर याच्याकडे वांईची सुभेदारी आली. हा हिंदु देवस्थानासहि मान देत असे हें निंबच्या मठाचीं उत्पन्नें पूर्ववत् चालविलीं यावरून दिसते. १६४९ पासून अफजलखान व शिवाजी वांई प्रान्तांतील देशमूख–देशपांड्यांस आपापल्याकडे वळविण्याचा प्रयत्न करीत होते. शहाजीला विजापूरकरांकडून मिळालेला कनकगिरी किल्ला यानें मुस्ताफ्फा खानाकडून घेवविला व १६५३ त शहाजी कैदेंतून सुटल्यावर त्यानें आपला मुलगा संभाजी यास कनकगिरीचा किल्ला घेण्यास पाठविलें असतां अफजलखानानें मुस्ताफाखानाकडून त्याचा खून करविला. त्यामुळें अफजलखान व शिवाजी यांमधील वैमनस्य वाढलें. हा विजापूर–दरबारीं शूर मुत्सद्दी म्हणून व उत्तम सरदार म्हणून प्रसिद्ध होता. १६५७ मध्यें औरंगजेबानें विजापूरवर केलेल्या स्वारीस तोंड देण्यामध्यें अफजलखान होता. त्यांत त्याचें शौर्य व चतुराई दिसून आली.

तथापि अफजलखानाचें नांव मराठी इतिहासांत त्यानें १६५९ त शिवाजीवर केलेल्या स्वारीनें मशहूर आहे.. याविषयीं माहिती शिवदिग्विजय, शेडगांवकर, सभासद व चिटणीस या बखरींवरून व अफजलखानाच्या पोवाड्यावरून मिळते.

१६५८ च्या नोव्हेंबरच्या सुमारास हा विजापूर दरबारांत डोंगरांतील उंदीर शिवाजी यास जिवंत अगर मेलेला कसा तरी पकडून आणतों, अशी प्रतिज्ञा करून शिवाजीच्या स्वराज्याच्या उद्योगास प्रतिबंध करण्यासाठीं आला. याच्याबरोबर निवडक सैन्य, तोफा वगैरे सरंजाम होता; परंतु मैदानांत शिवाजी तोंड देणार नाहीं, हें तो जाणून होता. हा तुळजापूर व पंढरपूर येथील देवालयें भ्रष्ट करीत माणकेश्वर, शंभु महादेव, मलवडी, रहिमतपूर या मार्गें वांईस आला.

वांईकडील कुलकर्णी कृष्णाजी भास्कर यास खानानें शिवाजीकडे पाठवून भेटीस बोलाविलें. कृष्णाजी भास्करानें शिवाजीस निरोप सांगून खान आपल्या वजनानें विजापूर–दरबारीं माफी मिळवून देईल असेंहि त्यास आमिष लाविलें.

खानास त्याच्याच जाळ्यांत पकडण्याचें ठरवून शिवाजीनें एक पंधरवड्यानंतर भेटीचा दिवस मुक्रर करून पंताजी गोपीनाथाबरोबर रीतसर आमंत्रण खानाकडे पाठविलें. मध्यंतरीं गांवकऱ्यांकडून त्यानें जंगल तोडून रडतोंडीच्या घाटावरून प्रतापगडापर्यंत सैन्यास ऐसपैस जागा व जागजागीं दाण्यागोट्याची व्यवस्था केली, व सर्वत्र रस्त्यापासून खानाच्या हालचालींवर देखरेख करण्यासाठीं माणसें ठेवलीं. स्वसामर्थ्याबद्दल घमेंड असणाऱ्या अफजलखानानें प्रतापगडीं शिवाजीच्या भेटीस जाण्याचें कबूल केलें.

ठरल्याप्रमाणें अफजलखान रडतोंडीच्या घाटानें प्रतापगडाच्या पायथ्याशीं असलेल्या पार या गांवानजीक आला. गडापासून पाव मैलावरील जागीं भेटीसाठीं जागा मुक्रर केली होती. तेथें उंच कनातीचा भव्य शामीयाना उभारला होता, व शृंगारलाहि होता. दुसऱ्या दिवशीं तेथें भेटण्याचें ठरलें.

शिवाजी शामियान्यांत खानास सामोरा झाला. महाराज निःशस्त्र आहेत, असें पाहून खानानें या संधीचा फायदा घेण्याचें ठरविलें. खानानें महाराजांस 'शामियान्यांत दिसत असलेलें वैभव तुझ्यासारख्या भिकारी खेडवळाजवळ कोठून आलें ?' असा प्रश्न केल्यावर शिवाजीनें चिडून 'हें वैभव आम्हीं बाळगावयाचें नाहीं तर काय तुझ्यासारख्या भटाऱ्याच्या पोरानें बाळगावयाचें !' असें मर्मभेदक उत्तर दिलें. त्यामुळें चिडून खानानें महाराजाचें डोकें बगलेंत धरून पोटांत तलवार खुपसण्याचा प्रयत्न केला. पण चिलखतामुळें तो वार फसला व खान दुसरा वार करणार तोंच शिवाजीनें प्रसंगावधान राखून खानाच्या कमरेभोंवतीं विळखा घातला व पोटांत वाघनखें खुपसलीं. या वेदनांनीं खानाची मिठी सैल होतांच त्याच्या पाठींत बिचवा खुपसला. खानानें शिवाजीच्या डोक्यावर वार केला, परंतु शिरस्त्राणामुळें विशेष इजा झाली नाहीं (१० नोव्हेंबर १६५९).

शिवाजीनें खानाचें योग्य दफन केलें व त्याचें मुंडकें गडावर पुरून त्यावर एक बुरूज बांधला व त्यास अफझलबुरूज असें नांव दिलें. खानाची कबर गडाच्या उतरणीवर अजून दिसते. खानाची तलवार छत्रपतीच्या वंशजांजवळ अजून असून शामीयान्याचा सोनेरी खांब शिवाजीनें महाबळेश्वरच्या देवळास अर्पण केला, असें वर्णन आहे.

**अफसर**—बंगाल, गया जिल्हा, नवडासुओ भागांतील एक खेडें. जफ्रपुर हें दुसरें नांव. लोकसंख्या एक हजार. गुप्तकालीन एक विष्णूची उत्तम कारागिरीची धातूची मूर्ति, गुप्त राजांची वंशावळ व जमिनींत गडप झालेलें एक मंदिर सांपडलें आहे. हें गांव पुराणवस्तुसंशोधनदृष्ट्या महत्त्वाचें असून कारागिरीच्या दृष्टीनें बुद्धगयेच्या खालोखाल आहे.

**ॲफिडेव्हिट**—प्रतिज्ञालेख. एखाद्या न्यायाधिशापुढें शपथेवर किंवा प्रतिज्ञेवर लिहून दिलेल्या मजकुराला इंग्रजींत ॲफिडेव्हिट म्हणतात. सदर इसमाला त्या लेखी मजकुराखालीं सही करावी लागते, आणि तो मजकूर खरा असल्या-

बद्दल त्या अधिकाऱ्यासमोर शपथ किंवा प्रतिज्ञा करावी लागते. असा लेख मॅजिस्ट्रेटसमोर किंवा दुसऱ्या कोणत्याहि अधिकृत इसमासमोर पुरा करावा लागतो. परदेशांत ब्रिटिश सरकारी अधिकाऱ्यासमोर म्हणजे कॉन्सल किंवा अशा दर्जाच्या इसमासमोर पुरा करतां येतो. न्यायकोर्टांतील चौकशीच्या वेळीं जाहीरपणें तोंडी जबान्या देण्याचें काम चालतें. त्याशिवाय इतर अनेक सरकारी कामकाजांत वरीलप्रमाणें शपथलेख लिहून द्यावा लागतो.

**अँफीथिएटर**—प्राचीन रोमन लोकांतील एक प्रकारची इमारत. ही अंड्याच्या आकाराची वर छप्पर नसलेली व मध्यभागापासून मागल्या बाजूला उंच उंच होत गेलेल्या बैठकीच्या रांगा असलेली अशी असे. या सभागृहांत बसून लोक ग्लॅडिएटर मल्लांच्या कुस्त्या, रानटी जनावरांच्या झुंजी व इतर शारीरिक खेळांचे सामने पाहात असत. अशा प्रकारचें पहिलें अँफीथिएटर रोम शहरांत ख्रि. पू. ५९ सालीं सी. स्क्रिबोनियस क्यूरिओ यानें बांधलें. रोम येथील कोलोसियम अँफीथिएटरांत पन्नास हजार प्रेक्षकांची सोय असे.

**अफू**—[ पापावेर सोम्निफेरम् ]. अफू हा एका रोपाचा वाळवलेला व घट्ट केलेला रस होय. याची लागवड हिंदुस्थान व आशियांतील तुर्कस्तानांत होते. या रोपाला जीं बोंडें येतात त्यांस चिरा पाडून त्यांतून जो दुधासारखा रस येतो त्यापासून अफू बनविण्यांत येते. हें गुंगी आणणारें औषध आहे. याचा दुःख कमी करण्याकरितां व झोंप आणण्याकरितां म्हणून फार मोठ्या

प्रमाणावर औषधांमध्यें उपयोग करतात. अफूचा रंग पिवळसर पिंगट असून ती जड व घट्ट असते व पूर्णपणें कोरडी नसते. अफूचा मुख्य पुरवठा तुर्कस्तानांतून होतो. अफू खाणें व ओढणें सार्वत्रिक आहे. विशेषतः चीनमध्यें, मलाया द्वीपसमूह वगैरे भागांत तें सामान्य आहे. चीनमध्यें पूर्वी अफूचा खप फार होत असे व ती हिंदुस्थानांतून जात असे. अलीकडे तो कमी करण्यांत आला आहे. १९१७ सालापासून हिंदुस्थानांतून चीनला अफू जात नाहीं व राष्ट्रसंघाच्या सांगणीप्रमाणें अफूची लागवडहि कमी होत आहे. १९४५–४६ सालीं हिंदुस्थानसाठीं ५०२०० बिघे एकर जमिनींत अफूची लागवड केली होती. त्या सालीं सरकारला अफूचें उत्पन्न १२७५०००० रु. आलें.

अफूच्या पिकास सरकारी परवाना लागतो. यांत पांढऱ्या फुलाची व तांबड्या फुलाची अशा दोन जाती असून पहिलींत अफू व दुसरींत बीं जास्त असतें. पीक गोराडू व गांवाजवळील जमिनींत करतात. त्या पिकास मेहनत बरीच करावी लागते. पहिल्या पिकानंतर जमीन नांगरून भुसभुशीत करतात व १०–१५ गाड्या शेणखत घालतात. पेरा साधारणतः ऑक्टोबर–नोव्हेंबरांत करतात. एकरीं बीं ३–४ पौण्ड लागतें. पेरणी झाल्याबरोबर पाणी देऊन पुनः तिसऱ्या दिवशीं दुसरें पाणी देतात. ३–४ खुरपण्या या पिकास लागतात. आठ दिवसांनीं टिचभर अंतरावर असें पातळ करून तिसरें पाणी देतात व एक महिन्यानें एक वीत अंतरावर राखतात व आठ दहा दिवसांनीं सारखें बोंडें येईपर्यंत पाणी देतात. तीन महिन्यांनीं–मार्च महिन्यांत बोंडें चिरा पाडण्यास तयार होतात. सायंकाळीं नाणा नांवाच्या हत्यारानें बोंडास खालून वर अशा तीन चिरा पाडतात. त्यांतून रस येतो तीच अफू होय. सकाळीं हा रस घट्ट होतो तो खरडून काढतात. दिवसां आणि रात्रीं दंव असल्यास रस पुष्कळ येतो. नाहींतर कमी पडतो. हा रस घट्ट होऊं नये म्हणून गोळे तेलांत बुडवून ठेवतात व मग गोळा झाल्यावर मळून गोळे करून विकतात. प्रथम दोन वेळच्या चिरांपासून रस बराच निघतो, पण पुढें कमी पडतो. एका झाडापासून ४ मासे रस निघतो. बोंडें सुकल्यावर खळ्यांत आणतात व पायांनीं तुडवल्यावर खसखस बाहेर पडते. एकरीं अफू २०–२५ पौंड–महायुद्धापूर्वी किंमत १०० रु., व खसखस ४००–५०० पौंड–किंमत ४० रु. अशी मिळतात. पाला भाजीस व बोंडें आणि फुलें अनेक रोगांवर शेकास उपयोगीं पडतात. खसखस पौष्टिक असून पक्वान्नांत व तेल काढण्यास तिचा उपयोग करतात. अफू मादक असून उत्तर हिंदुस्थानांत लोक खातात व महाराष्ट्रांत रडव्या मुलांस अफू देण्याची चाल आहे. अफू औषधीहि आहे.

**अफूचा अर्क**—( मॉर्फिआ ). अफूंतील मादक द्रव्य. हा एक वनस्पतिजन्य क्षार असून त्याची चव कडू असते. हा प्रथम १८०७ सालीं अफूपासून वेगळा काढण्यांत आला. हा सामान्यतः शरीरांत कातडीखालीं टोंचून घालतात. या पद्धतीनें याचें प्रमाण सूक्ष्म व निश्चित राखतां येतें. हा अल्प प्रमाणांत दिल्यास दुःखमुक्तता होण्याच्या कामीं किंवा वेदना शमविण्याच्या कामीं आणि झोंप आणण्याच्या कामीं उपयुक्त असतो व क्वचित तीव्र वेदना असल्या तरी थांबतात. परंतु अधिक प्रमाणांत घेतल्यास हा मादक असून विषारी आहे.

**अफूचा कायदा**—हा कायदा १८७८ सालीं पास झाला. 'अफू' या शब्दांत अफूचीं बोंडें (पॉपी हेड्स) किंवा अफूच्या मिश्रणानें केलेले पदार्थ किंवा अफूच्या झाडापासून तयार केलेलें कोणतेंहि द्रव्य किंवा मादक पदार्थ या सर्वांचा समावेश होतो. परवाना असेल त्या इसमाशिवाय इतर कोणींहि इसमानें (अ) अफूचीं झाडें लावूं नये, (आ) अफू तयार करूं नये, (इ) अफू जवळ बाळगूं नये, (ई) स्वतंत्र ब्रिटिश हिंदुस्थानांतून बाहेर अफूची निर्गत किंवा बाहेरून आंत आयात करूं नये, (उ) हिंदुस्थानांतच एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं ने-आण करूं नये, (ऊ) अफू विकूं नये (कलम ४). वरील ४ कलमांतील कृत्यें करण्याचा परवाना घेण्याचे व परवान्याच्या ड्यूटी किंवा कराराचे दर ठरवण्याचे नियम वरिष्ठ सरकार गॅझेटांत प्रसिद्ध करील. वरील कलमाविरुद्ध किंवा नियमाविरुद्ध गुन्हा करणारास एक वर्ष कैद, किंवा एक हजार रु. दंड, किंवा दोन्ही शिक्षा होतील (कलम ९). गुन्हेगाराजवळची अफू किंवा अफूचीं झाडें सरकारजमा करण्याचा हुकूम कोर्ट करील (कलम ११). पोलिस आणि एक्साईज, कस्टम, सॉल्ट किंवा रेव्हेन्यू खात्यांतील शिपाई यांना बेकायदेशीर अफू लपवून ठेवली असेल त्या घरांत किंवा जागेंत सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत शिरून तेथील अफू किंवा अफू तयार करण्याचें सामान ताब्यांत घेण्याचा आणि तेथील इसमाची झडती घेण्याचा किंवा त्याला पकडण्याचा अधिकार आहे (कलमें १४।१५).

**अफ्रोडीटी**—ग्रीक दंतकथेंत हिचा उल्लेख आहे. ही सिरियाचा राजा थेईस याची मुलगी. या राजास आपल्या मुलीवरील अस्वाभाविक प्रेमामुळें अॅडोनीस नांवाचा मुलगा झाला. राजास हें समजतांच त्यानें अफ्रोडिटीस मारण्याचा हुकूम केला. पण देवकृपेनें तिचें झाडांत रूपांतर झालें व दहा महिन्यांनीं एक सुंदर मूल बाहेर आलें. अफ्रोडीटीच्या सांगण्यावरून पर्सिफोनीनें अॅडोनीसचें पालनपोषण केलें.

**अबकारी खातें** — हिंदुस्थान सरकार आणि प्रांतिक सरकार यांचें एक उत्पन्न खातें. या खात्याच्या वसुलाच्या बाबी (१) दारू गाळणें (ताडी व देशी दारू तयार करणें) व दारू विक्री (देशी व परदेशी); (२) अफू तयार करणें व विकणें; (३) भांग, गांजा, चरस, माजूम इत्यादि अमली पदार्थांची विक्री, या होत.

मादक पदार्थ सेवन करण्याची चाल जुनी असून सर्व देशांत थोड्या फार प्रमाणांत आहे. हिंदुस्थानांत दारूचें व्यसन जुनें असून भांग, गांजा, अफू हींहि ब्रिटिश अंमलपूर्वीपासून लोक घेत असत. या अमली पदार्थांवर कर पूर्वींहि घेत असत. तक्रारी न होतील अशा रीतीनें कर घेणें कठिण असतें. त्यामुळें हा कर बसवितांना देशवैचित्र्य, त्या पदार्थांच्या मूलद्रव्यांची विपुलता किंवा महर्गता, व्यसनी लोकांची सांपत्तिक व सामाजिक स्थिति यांचा विचार करावा लागतो व लबाडीनें कायद्याविरुद्ध जाऊन हे पदार्थ मिळविणारांकरितां बंदोबस्तहि सावधगिरीनें करावा लागतो. यासाठीं सरकारनें (१) मादक पदार्थ व पेयें यांजवर जबर कर, (२) सरकारी बंदोबस्तांत या पदार्थांचा व्यापार, (३) हे पदार्थ विक्रीच्या दुकानांची संख्या गरजेप्रमाणें व (४) या पदार्थांच्या विक्रीसंबंधानें लोकमताचा तपास करून व्यवस्था, या तत्त्वांवर नियम केले आहेत.

मादक पदार्थांवरील कर अनैतिक प्रवृत्ति होईल इतके जबर नसतात. थोडा माल खपून जास्त उत्पन्न व्हावें व व्यसनहि कमी प्रमाणांत असावें असा यांत सरकारचा हेतु आहे. सर्व मादक पदार्थ विकण्याचा हक्क सरकारचा असल्यामुळें सरकार ते तयार करण्याचा व विकण्याचा परवाना फी घेऊन देतें. परदेशी दारू-विक्रीचे परवाने दुकानच्या विक्रीच्या मानानें सालीना कांहीं रक्कम घेऊन दिले जातात. देशी दारू-विक्रीच्या परवान्यांत दोन वर्ग आहेत:—(१) सेंट्रल डिस्टिलरी सिस्टिम-मध्य ठिकाणीं दारू तयार करून विक्रीस नेतांना दस्तुरी घेणें. (२) आऊट डिस्टिलरी सिस्टिम-दारू तयार करणें व विकणें यांचा लिलांवरूपानें कर घेणें. प्रत्येक प्रांतीं तेथील परिस्थितीप्रमाणें या पद्धति उपयोजितात. हिंदुस्थान सरकारास पहिली पद्धत मान्य असून ती शहरांतून चालू आहे. पण खेडेगांवांस दुसरी पद्धतच उपयुक्त आहे.

पहिल्या पद्धतीप्रमाणें सरकारकडून योग्य इसमास सरकारी देखरेखीखालीं दारू तयार करण्याचा परवाना मिळतो. व तयार दारू विकण्यास नेतांना दस्तुरी घेण्यांत येते. ही पद्धत बंगाल, वायव्य प्रांत, अयोध्याप्रांत व पंजाब येथें चालू असून ब्रह्मदेशांतहि हीच पद्धत आहे. फक्त तेथें दस्तुरी तयार मालावर न घेतां कच्च्या मालावर घेतात. दुकानें किती व कोठें घालावीं हें जिल्हाधिकारी ठरवतात व परवाना-फी व मुदत लिलांव करून अगर टेंडर मागवून ठरवितात. मुंबई व मद्रास इलाख्यांत ताड व माड यांपासून ताडी व माडी करीत असून झाडांवर व तयार दारूवर कर घेतात. पहिल्या महायुद्धापासून विलायती दारू हिंदुस्थानांत होऊं लागून तिचे कारखाने पंजाब व बडोदें येथें चालले आहेत.

मादक द्रव्यें—अफू-हिंदुस्थानांतील अफू चीन व स्ट्रेट्स सेटलमेंट्स इकडे जाते. हिंदुस्थान सरकारच्या अफूच्या अनैतिक व्यसनास पाठिंब्याच्या धोरणाबद्दल पुष्कळ आक्षेप घेण्यांत येतात. अफूवरील कराच्या उत्पन्नाचे दोन प्रकार आहेत:—(१)

द्रेशांतील खपावर घेतला जाणारा कर. (२) निर्यात अफूवरील कर. पहिल्यापेक्षां दुसरा ज़ास्त असतो.

गांजा, भांग, चरस — या पदार्थांचा हिंदुस्थानांत खप बराच आहे. यावर सरकारी निर्बंध असा आहे —(१) सरकारी देखरेखीखालीं झाडांची लागवड. (२) किती लागवड करावयाची हें सरकारनें ठरविणें. (३) तयार माल सरकारी गोदामांत ठेवणें. (४) जाणाऱ्या मालावर वजनाप्रमाणें जकात. (५) फुटकळ विक्रीसाठीं परवान्याची जरूरी. (६) खाजगी इसमाच्या सांठ्यावर मर्यादा.

लोकमत — या व्यसनापासून लोकांचें शारीरिक व आर्थिक नुकसान होत आहे. त्यांतल्यात्यांत मद्यपानापासून फार होत आहे. म्हणून तें बंद करावें असें लोकपुढाऱ्यांचें म्हणणें असून त्याकरितां निरोधन, उपदेश वगैरे गोष्टी चालू होत्या. १९३८ सालीं मद्रास व मुंबई इलाख्यांत कँग्रेस मंत्रिमंडळें राज्यकारभार करीत असतां त्यांनीं कांहीं ठिकाणीं संपूर्ण मद्यपानबंदी करण्यासाठीं कायदाहि केला होता, पण त्याचा त्या मंत्रिमंडळांनीं राजिनामा दिल्यावर विशेषसा उपयोग झाला नाहीं. पुन्हां कँग्रेस मंत्रिमंडळें अधिकारारूढ झाल्यावर दारूबंदीचा कायदा सर्वत्र करण्याचें घाटत आहे. मद्रास प्रांतानें ऑक्टोबर १९४८ पासून संपूर्ण दारूबंदी सुरू केली.

महाभारतकालीं दारू वगैरेंवर कर नसून कौटिलीय अर्थशास्त्रावरून मात्र या मादक पदार्थांवर निर्बंध ठेवण्यासाठीं व करवसुलीसाठीं अधिकारी असत असें दिसतें. मुसलमान लोक ख्यालीखुशालींत दंग असल्यामुळें त्यांच्या राजवटींत यांवर विशेष नियंत्रण नसावेसें वाटतें. फक्त औरंगजेबाच्या वेळीं या व्यसनावर बराच निर्बंध होता असें दिसतें.

मराठेशाहींत अबकारी कर विशेष उत्पन्नाची बाब नसून लोक व्यसनी नसावेत अशीच सरकारची खटपट असे. पेशवाईत फक्त विशिष्ट हद्दींत दारू गाळण्याचा व विकण्याचा मक्ता लिलांवानें दिला जाई. सैन्यांतील शिपायांवर दारू न पिण्याबद्दल विशेष करडी नजर नसे, व जनावरांच्या औषधांकरितां दारू लागत असे. सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत दारूबंदीबद्दल विशेष हुकूम सुटले होते. पण फिरंग्यांना दारू मिळावी अशी तरतूद होती. पेशवाईच्या अंतकाळच्या धामधुमींतहि महाराष्ट्रांत दारूचा खप विशेष नव्हता व येथें दारूबंदीचें धोरण ठेवावें असा एल्फिन्स्टन साहेबाचा अभिप्राय होता. पेशवाईत या खात्याचा वसूल रु. १०,००० वर कधींहि नव्हता. पुणें जिल्ह्यांत या व्यापारावर उपजीविका करणारा वर्ग मुळींच नाहीं. १८८१ सालानंतर कलाल, भंडारी व पारशी हे परकीयच या धंद्यासाठीं आले. पेशवाईत हा धंदा यांकडेच होता.

**ॲबट** — युरोपांत मठाध्यक्षास ॲबट म्हणतात. सिरियांतून ॲबट म्हणण्याची चाल युरोपांत पसरली. मठाध्यक्ष नेमण्याचा अधिकार राजास व धर्मगुरूंना असून त्या वेळीं मोठा थाटाचा समारंभ करतात व अध्यक्षांस अधिकारदंड मिळतो. ही जागा मोठ्या मानाची असते. पूर्वी शिक्षणप्रसारास यांची फार मदत झाली. पूर्वी यांची अनियंत्रित सत्ता होती ती आतां कमी झाली आहे. ॲबटांचा पूर्वीचा साधेपणा जाऊन ते ऐषआरामी बनले.

**ॲबट, जास्टिन** (१८५३–१९३२)—एक मराठीचा अभिमानी व थोर दाता असा इंग्रज मिशनरी. वयाच्या ४ थ्या वर्षी हिंदुस्थानांत येऊन व पुढें चाळीस वर्षें महाराष्ट्रांतच राहून यांनीं खिस्ती धर्मसेवेचें व मराठी वाङ्मयाचें कार्य अखंड केलें. 'ज्ञानोदय' पत्राचे कांहीं काळ संपादक होते. यांनीं 'पोएट सेंट्स ऑफ महाराष्ट्र' (महाराष्ट्र संतकविमाला) या संतचरित्रमालेंत ज्ञानेश्वर–रामदास–तुकारामादि दहा ग्रंथ इंग्रजींत प्रसिद्ध करून महाराष्ट्र–संतांची शिकवण पाश्चात्यांना माहीत करून दिली. यांना मराठ्यांच्या इतिहासाचेंहि प्रेम होतें व भारतइतिहाससंशोधनमंडळाच्या कार्याकडे त्यांचें सारखें लक्ष असे. त्यांनीं आपल्या मृत्युपत्रांत तीन लाख डॉलरची मालमत्ता समाजाला दान केली. त्यांत हिंदुस्थानांत, विशेषतः महाराष्ट्रांत निम्मी रक्कम वांटली. भा. इ. सं. मंडळाला तीस हजार डॉलर मिळाले. आपल्या पार्थिव देहावर कांहीं स्मारक होऊं नये या इच्छेनें त्यांनीं आपला देह मृत्यूनंतर जाळून त्याची राख आपल्या बागेंतील झाडांवर पसरून टाकण्याची योजना मृत्युपत्रांत लिहिली होती. १९२१ पासून मृत्यूपर्यंत ते अमेरिकेंतच होते.

**ॲबट, लीमन** (१८३५–१९२२)—एक अमेरिकन धर्मोपदेशक व लेखक. उच्च शिक्षणोत्तर यानें कायद्याचा अभ्यास केला. 'हार्पर्स मॅगझीन,' 'इलस्ट्रेटेड खिश्चन वीक्ली' वगैरे नियतकालिकांचा सहसंपादक व 'दि खिश्चन युनियन', 'दि आऊटलुक' वगैरेंचा संपादक होता. 'खिश्चॅनिटी ॲण्ड सोशल प्रॉब्लेम्स' (१८९७), 'दि राइटस् ऑफ मॅन (१९०५)' हे याचे प्रमुख ग्रंथ असून त्यांतील लिखाणावरून सामाजिक सुधारणा, धर्मशास्त्र, उदारमतवादी खिस्तांचें मनुष्यत्व व एकात्मकेश्वरवाद यासंबंधीं त्याचे विचार दिसून येतात.

**अबट्टाबाद**—पाकिस्तान, वायव्य सरहद्द प्रांत हजारा जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ७१५ चौ. मै. उत्तरेस झेलम नदी व तहशिलींत डोर व हरोह यांच्या खोऱ्यांतील मुलूख येतो. लोकसंख्या ३ लक्ष. अबट्टाबाद हें ठाण्याचें गांव व नौशहर हीं शहरें व ३६९ गांवें आहेत.

अबट्टाबाद हें तहशिलीचें ठाणें. लोकसंख्या १२ हजार. १८४०-५३ पर्यंत हजारा येथें मेजर जोन्स अॅबट कमिशनर होता. त्यावरून ह नांव पडलें. १८६७ पासून म्युनिसिपालिटी आहे. येथें कोणताहि माल तयार होत नाहीं. गांवांत सागवानी लांकडाचे मोठे व्यापारी आहेत.

**अंबत्तन**—दक्षिण त्रावणकोरमधील नापितांच्या जातीला अंबत्तन असें म्हणतात व मध्य व उत्तर त्रावणकोरमध्यें त्यांना क्षौरकर असें म्हणतात.

यांना हजामतीखेरीज वैद्यकी अवगत असते. यांच्या बायका सुईणीचीं कामें करितात. मनुस्मृतींतील अंबष्टांशीं आपला संबंध जोडून हे आपल्या जातीची श्रेष्ठता दर्शवितात. यांच्या लग्नांतून ब्राह्मण पौरोहित्य करितात. यांच्यांत विधवाविवाह मुळींच होत नाहींत. मृतांना जाळण्यांत येतें; फक्त लहान मृत मुलांना पुरतात. और्ध्वदैहिक संस्कारहि ब्राह्मणच करतात.

यांच्यांत शैव व वैष्णव दोन्ही आहेत. वैष्णव मद्यमांस सेवीत नाहींत. एकमेकांत लग्नें होतात. हे कोमट्यांच्या पंक्तीला बसत नाहींत, त्यांच्या हजामती मात्र करितात.

हल्लीं अंबत्तन मद्रास इलख्यांतील सबंध तामिळ प्रदेशांतून दिसतात. दर गांवीं एक पेरिथमक्कारन म्हणून मुख्य असतो. तो तंटे वगैरे तोडतो. लग्नांवर कर बसवून त्या पैशांतून छत्रें चालवितात. दर गांवीं अंबत्तनांना इनामी जमिनी असतात.

**अबदल** (लोक)—हे लोक पंजाबांतील कांग्रा व होशियारपूर जिल्हे व बिलासपूर, चंबा, मंडी, व साकेत हीं संस्थानें यांतून आढळतात. गाणीं गाणें, भिक्षा मागणें हा धंदा. रजपुतांच्या लग्नसमारंभांत व अंत्यविधीच्या वेळीं गाण्याचें काम करतात. याच नांवाचे मुसलमान फकीर आहेत व त्यांचा यांशीं संबंध नाहीं. या मुसलमानांची लोकसंख्या पांचसहा हजार असून पैकीं बहुतेक बंगाल्यांत आहेत.

**अबदुल लतीफ** (११६१-१२२६)— एक प्रख्यात वैद्य, प्रवासी व लेखक. जन्म व वस्ती बगदाद. २८ व्या वर्षी वैद्यकीय ज्ञानासाठीं बगदाद सोडलें. मोसल, दमास्कस येथें राहिल्यावर पुढें इजिप्तला गेला. तेथें मोठमोठे लोक यांशीं स्नेह करण्यास्तव स्पर्धू लागले. नंतर अलेप्पोस गेला. ग्रीसमध्यें बरींच वर्षें काढलीं. एकंदर १५० ग्रंथ लिहिले. पैकीं 'हिस्टरी इजिप्ती कॉंपेन्डियम' हाच शिल्लक आहे. ६५ वे वर्षी बगदाद येथें मृत्यु.

**अबदल्ला**— हा वहाबी चळवळीचा पुरस्कर्ता जो अमीर अझीझ त्याचा नातू व सौदचा मुलगा. १८१४ त यानें इजिप्तच्या पाशाशीं तह केला; परंतु तुर्कस्तानांतून इजिप्तचें सैन्य जातांच तहाच्या अटी नाकबूल केल्या. परंतु १८१८ त इजिप्तच्या पाशानें ससैन्य जाऊन अबदुल्लास शरण यावयास भाग पाडलें व त्याचा कॉन्स्टँटिनोपल येथें वध करण्यांत आला. याचा मुलगा तुर्की यानें १८२४ त इजिप्तचें स्वामित्व कबूल करून व खंडणी देऊन आपल्या राज्यास दहा वर्षांत चळकटी आणली.

**अबदागिरी**—पौरस्त्य देशांत पूर्वीपासून वैभवाचें व सत्तेचें चिन्ह म्हणून अबदागिरी वापरीत असत. पूर्वीच्या इजिप्त वगैरे देशांतील चित्रांत अबदागिरी दिसतात व सयाम-ब्रह्मदेशांत ही चाल अजून चालू आहे. हिंदुस्थानांत देवाच्या मूर्तीवर, राजेरजवाडे व श्रीमंत यांच्या डोक्यावर व लग्नकार्यांत मिरवणुकीच्या वेळीं अबदागिरी वापरतात.

अबदागिरी तयार करण्यास धायपाताची किंवा बांबूची सरळ दांडी घेऊन ती तासून गुळगुळीत करतात व तीवर लाखेचे रंग देऊन वेलबुट्टी काढतात. या दांडीच्या शेंड्यास एक वेताचें अगर लोखंडाचें २½ हात व्यासाचें वर्तुलाकृति कडें बसवितात. या कड्याच्या दोहों बाजूंस एक किंवा दोन रंगी सुती किंवा रेशमी कापड लावून शिवतात व त्यावर जरीची वेलबुट्टी काढतात. कडेस झालर लावतात व शेंड्यावर चांदीचा कळस बसवितात.

पेशवाईंत उष्णतानिवारणासाठीं श्रीमंत लोक अबदागिरी वापरीत. पण हा सरकारी मान असल्यामुळें पराक्रम गाजविणारासच हा मान मिळे व त्याकरितां सरकारांतून एका मनुष्याचा पगार व दोन तीन वर्षांनीं अबदागिरीचें सामान मिळे. नुसत्या श्रीमंत मनुष्यास ही वापरतां येत नसे. लग्नकार्यांत मागून आणून वापरीत.

**अबदुल अझीझ**— १. 'तारिख-इ-हुसैनी' या ग्रंथाचा कर्ता. हा ग्रंथ दुसऱ्या अहमदशहा बहामनीला अर्पण केला होता. यांत गुलबर्गा येथील शहुद्दीन मुहम्मद या प्रसिद्ध पुरुषाचें चरित्र आहे.

२. दिल्लीचा एक मुसलमान पंडित. 'तफशीर फथुल अझीझ' नांवाची कुराणावर टीका करणारा व ग्रंथकर्ता. १८२४ त मृत्यु.

३. अकबरकालीन एक विद्वान्.

४. औरंगजेबकालीन ८०० घोडेस्वारांचा मनसबदार कवि. या कवीचें 'इझ्झत' हें टोपण नांव असून 'साकीनाम' या काव्याचा कर्ता. १६८० त मृत्यु.

५. (१८३०-७६)—दुसऱ्या सुलतान महंमदाचा मुलगा. १८६१ त तुर्कस्तानचा सुलतान झाला. यानें राष्ट्रांतील पैसा निरुपयोगी इमारतींवर खर्चून राष्ट्र कर्जबाजारी केलें. इजिप्तच्या खेदिवापासून खंडणी घेऊन वंशपरंपरा गादी दिली. हा युरोपांत गेला असतां याचा चांगला सत्कार झाला. याच्या राज्यांतहि युरोपियन राजेरजवाडे येऊन गेले. बादशहा सातवे एडवर्ड दोनदां कॉन्स्टॅन्टिनोपल येथें आले होते, पुढें राज्यांत चंदाळी

होऊन यांस राज्यास मुकावें लागलें (१८७६). थोड्यांच दिवसांनीं तो बंदींत असतांनाच मरण पावला.

६. (१८८०-१९०८)—लहानपणींच मोरोक्काचा सुलतान झाला (१८९४). याच्या मनांत युरोपियन धर्तीवर राज्य-व्यवस्था ठेवावी असें होतें, पण लोकांस तें कबूल नसल्यामुळें १९०७ त पदच्युत झाला व याचा भाऊ गादीवर बसला. पुन्हां गादीचा केलेला प्रयत्न व्यर्थ गेला व टँजियर येथें पेन्शनर म्हणून राहात असतांच वारला.

**अबदुल करीम**—१. सिंधचा रहिवासी. १४४१ च्या सुमारास उदयास आला. महमूद गवानच्या पदरीं नोकरी. 'तारीख-इ-महमूदशाही' या नांवाच्या दुसऱ्या महमूदशाह बहामनीचा इतिहासकार.

२. दिल्लीचा राहणारा. नादिरशहाबरोबर इराणला गेला व 'बयान-इ-बाकी' हा नादिरशहाचा इतिहास लिहिला (१७५४).

३. बुखाराचा रहिवासी. अफगाणिस्तानचा व तुर्कस्तानचा इतिहासकार (१७४७). इतिहासाचें भाषांतर पॅरिसमध्यें झालें. याचा १८३० त कॉन्स्टँटिनोपल येथें मृत्यु.

४. 'मनशी तारीख-इ-अहमद' (अहमदशहा दुराणीचा इतिहास), 'मुहारब-इ-काबुल-ओ-कंदाहर' व 'तारीख-इ-पंजाब-तुहफतन-लिल-अहबाब' या ग्रंथांचा कर्ता. गेल्या शतकांत मृत्यु.

**अबदुल कादिर**—१. (१८०७-१८८३)—एक अरब राजा. १८३२ त अमीर झाला. अलजीरियांतून फ्रेंच सत्ता नाहींशी करण्यासाठीं १५ वर्षें यानें युद्ध केलें पण शेवटीं शरण यावें लागलें (१८४७). या वेळीं याच्या अंगचें शौर्य, बुद्धिमत्ता व राष्ट्रधुरीणत्व हे गुण दिसून आले. कट्टा इस्लामधर्मानुयायी. त्यामुळें फ्रेंचांविरुद्ध अरबांशीं सहकार्यास तयार होईना. पुढें त्यामुळें फ्रेंचांशीं सलोखा. फ्रेंच दरबारीं यास मोठा मान होता. यानें १८७९ त अलजेरियन लोकांस फ्रेंचांविरुद्ध न जाण्याचा सल्ला दिला. पुढें ईश्वरज्ञान व तत्त्वज्ञान यांत काळ घालवीत असे व तत्त्वज्ञानविषयक व घोड्यावर एक असे दोन ग्रंथ यानें लिहिले. २६-५-१८८३ रोजीं दमास्कस येथें मृत्यु.

२. एक फारसी लेखक. लखनौ प्रांत, देवी येथील रहिवासी. १८२३ मे मध्यें मेजर हर्बर्टच्या विनंतीवरुन यानें 'जामीउत्-तवारीख' या रशीउद्दीनच्या ग्रंथांतून पतंजलीच्या ग्रंथाचें सोप्या फारसी भाषेंत भाषांतर केलें. यांत सर्व शास्त्रें असून हिंदुस्थानांतील हा एक अमूल्य ग्रंथ आहे.

**अबदुल कायुम**—नबाब सर साहेबजादा—सी. आय. ई.; के. सी. आय. ई., वायव्य सरहद्द प्रांताचे मुख्य मंत्री. जन्म इ. स. १८६६. हे पूर्वी हिं. सरकारच्या परराष्ट्रीय व पोलिटिकल खात्यांत होते. यामुळें त्यांनीं बऱ्याच स्वाऱ्यांत वगैरे भाग घेतला होता. प्रथम हे खैबरखिंडींतील काळ्या पहाडावरील स्वारींत पोलिटिकल एजंट होते. नंतर सामान स्वारींत व झाका-खेल टोळीवरील स्वारींत होते. नंतर त्यांची हिंदुस्थान व अफ-गाणिस्तान यांची सरहद्द ठरविण्याच्या कमिशनवर नेमणूक झाली. हे १९२३ पासून लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे सभासद होते. त्यांनीं पेशावर येथील इस्लाम कॉलेजची स्थापना केली असून त्याचे आजीव निर्वेतन चिटणीस आहेत. हे दुसऱ्या गोलमेज परिषदेस गेले होते. सध्यां वायव्य सरहद्दप्रांताचे मुख्य मंत्री आहेत.

**अबदुल जालिल**—(मीर किंवा सय्यद). अयोध्या, बिल-ग्रामचा रहिवासी. मोठा पंडित व कवि. 'वासिटी' या टोपण नांवाखालीं कविता प्रसिद्ध आहे. १६९९ त विजापुरास मिर्झा अलिबेगतर्फे याची व औरंगजेबाची भेट झाली. तेव्हां बादशहानें त्याला मनसब व जहागीर देऊन बक्षी व गुजरातचा वृत्तलेखक या कामावर नेमिलें. तेथून सिंधला बदली. १७१४ त दरबारी कारस्थानामुळें परत यावें लागलें, परंतु दिलजमाई झाल्यावर मानमरातबासह प्रतिनिधीद्वारें काम पाहण्याची सवलत मिळाली. १७२१ पर्यंत दिल्लीस राहिल्यावर मुलगा मीर सय्यद महमद याच्या नांवें अधिकार करून दिला.

**अबदुल मजीद**—१. (१८२३-१८६१)—तुर्कस्तानचा सुलतान. याच्या बापाच्या वेळीं इजिप्तच्या सर्वाधिकाऱ्यानें तुर्कांचा नेझीब येथें पराभव करून तुर्की आरमार काबीज केलें. परंतु युरोपियन राष्ट्रांच्या मध्यस्थीनें यास राज्यप्राप्ति झाली. १८३९ त हट-इ-शेरिफ हें आज्ञापत्र काढलें. त्याअन्वयें सुलतानच्या सर्व प्रजेस जीव व जिंदगी यांची सुरक्षितता, सर्वांवर सारखे कर व न्याय मिळण्याची व्यवस्था, लष्करी व शिक्षण-खात्याची पुनर्घटना, गुलाम-व्यापार बंद व व्यापाराची सुधारणा, या सुधारणा झाल्या. क्रिमियन युद्ध याच्या वेळीं झालें व दुसऱ्या राष्ट्रांकडून कर्ज घेण्याची पद्धत यानें पाडली.

२. एक फारसी पंडित. शहाजहानच्या वेळीं उदय. 'शहाज-हाननामा' या ग्रंथाचा कर्ता.

**अबदुल मालिक**—प्रख्यात अरबी वैद्य झूर याचा मुलगा. याचे वंशांत वैद्यकी पिढीजात होती. युरोपियन लोक यास अव्हेंझूर म्हणत. पूर्ण नांव 'अबू मारवान अबदुल मलिक इब्न झूर'. ११ व्या शतकाचा शेवट व १२ व्या शतकाचा प्रारंभ या वेळीं उदय. कुलीन घराण्यांत अंदालूशियाची राजधानी सेव्हिल येथें जन्म. यानें २० व्या वर्षी वैद्यकीस प्रारंभ करून ती उत्तम चालविली. याची शरीरप्रकृति उत्तम असून १३५ वर्षे जगला असें म्हणतात. याचा मुलगा इब्न झूर हाहि वैद्यकी करी

व तो मोरोक्कोच्या बादशहाच्या मर्जीतला होता. अब्देह्रूनें 'तयस्सूर फिल मुदावात वत तब्दीर' हा ग्रंथ लिहिला. याचीं अनेक भाषांत भाषांतरें झालीं आहेत. या ग्रंथास यानें जामि अथवा संग्रह ही पुरवणी जोडली व 'फिल अद्वियत वल अघजियत' हा औषधिशास्त्र व अन्न यांसंबंधीं ग्रंथ लिहिला. इब्न झूर हा इब्न रुशीद याचा समकालीन असून दुसरा पहिल्याची प्रख्यात वैद्य व ज्ञानसागर अशी स्तुति करतो.

**अबदुल रहमान**—१. (७५६–७८८)–स्पेन देशांतील कारडोव्हा येथील उमईद घराण्याचा संस्थापक व मूळपुरुष. उमईदांचा जेव्हां आबासी घराण्यांतील पुरुषांनीं पराभव केला तेव्हां जीवितरक्षणार्थ यास वेदुइन अरबांचा आश्रय घ्यावा लागला. वाटेंत भाऊ मारला गेला व सीरिया, इजिप्त वगैरे देशींहि जाऊन धोका आहे असें पाहतांच हा स्पेनमध्यें आला. त्या वेळीं एल्व्हीरा उर्फ ग्रेनेडा येथें यूसफ नांवाचा कमकुवत राजा राज्य करीत होता. त्याचा रहिमाननें पराभव केला व राज्य मिळविलें. सैन्याच्या निकृष्ट स्थितींत माला व पागोटें याचा ध्वज म्हणून उपयोग केल्यानें या घराण्याचें हें ध्वजचिन्ह होऊन बसलें. हा क्रूर असून याचें आयुष्य बरेंचसें बंडखोर बर्बर व अरब यांस अमलाखालीं आणण्यांत गेलें. यानें स्थापलेली राजसत्ता सुमारें तीन शतकें टिकली व त्यांत पांच राजांपैकीं दोन कर्तृत्ववान् होऊन गेले.

२. पेशावरचा ओजस्वी व वीरवृत्तीचा कवि. याची कविता ओजस्वी व सहजतायुक्त असल्यामुळें सर्वांस आवडते. पेशावरजवळ हजरखान येथें याचें थडगें आहे.

३. अफगाणिस्तानच्या अमीर शेरअलीच्या मोठ्या भावाचा मुलगा. शेरअलीविरुद्ध लढल्यामुळें हा दहा वर्षें रशियन कैदेंत होता. पुढें १८८० सालीं अमीर शेरअली वारल्यावर अबदुल रहमान अमीर झाला व लॉर्ड लिटननें युक्तीनें त्याला इंग्रजांकडे वळविलें. इंग्रजांनीं त्यास अमीर होण्याच्या कामीं मदत केली व तो १८८१ सालीं अमीर झाला. १८९५ सालीं व्हिक्टोरिया राणीच्या भेटीस बोलावण्यावरून गेला होता. त्या वेळीं 'स्टार ऑफ इंडिया' ही पदवी त्यास मिळाली. हा १९०१ सालीं वारला व त्यानंतर त्याचा मुलगा हबिबुल्ला अमीर झाला. हा चतुर कारस्थानी, धाडसी, चिकाटीनें काम करणारा व कडक होता. याची वागणूक सभ्य व दूरदर्शी असून तीबद्दल परकीयहि याची स्तुति करीत.

४. सर जॉर्ज बार्लेनें निर्माण केलेला झज्जरचा नबाब. १२½ लाखांची जहागीर व ४०० घोडेस्वारांकरितां बढ्वात व दाद्रि हे दोन इनाम गांव यास होते. पण १८५७ सालच्या बंडांत हा इंग्रजांचा पक्का शत्रु झाल्यामुळें २३ डिसेंबर १८५७ रोजीं फांशीं दिला गेला.

**अबदुल हक्क** (१५५१–१६४२)—एक उर्दू ग्रंथकार. तैमुरलंगाचा एक अनुयायी सादुल्ला तुर्क जो दिल्लीस राहिला त्याचा वंशज. १५९६ त यानें 'तारीख–इ–हक्क' किंवा 'तारीख–इ–अबदुल–हक्की हा' ग्रंथ लिहिला. पुढें मक्का व मदिना येथें प्रवास, धर्म व इतिहास यांवर शंभरांवर ग्रंथ लिहिले. उतारवयांतहि याची प्रतिभा जागृत होती. हिंदुस्थानांत याची साधुपुरुषांत गणना असून याची कबर दिल्लीस हौझ शम्सीच्या तीरावर आहे.

**अबदुल हमिद**— १. (१७२६–८९)— १७७३ सालीं हा तुर्कस्तानचा सुलतान झाला. स्वभाव शांत व देवभीरु. १७७४ त रशियाशीं लढाई करावी लागून तुर्कांस घातक असा तह करणें भाग पडलें. तुर्कस्तानची सांपत्तिक स्थिति बिकट असतांच रशिया व ऑस्ट्रिया यांशीं पुनः युद्ध करावें लागलें. या वेळींच वृद्धावस्थेमुळें याचा अंत झाला.

२. (१८४२–१९१८)—सुलतान अबदुल मजीदचा पुत्र. १८७६ त तुर्कस्तानचा सुलतान झाला. प्रथम पार्लमेंट राज्यव्यवस्थेच्या आश्वासनानें लोकांस उदारमतवादी वाटला. राज्याची सांपत्तिक स्थिति नीट नव्हती व युरोपीयन राष्ट्रांनीं सुचविलेल्या सुधारणा त्याला मान्य नसल्यामुळें त्यांशीं याचें बरें नव्हतें. रशियाशीं कसाबसा तह करून व इंग्रजांना सोडून यानें जर्मनीची मैत्री संपादली. प्रधानांच्या हातची सत्ता यानें आपल्याकडे घेतल्यामुळें, सुलतानाच्या क्रूर वागणुकीनें व सैन्यांत असंतोष असल्यामुळें 'तरुण तुर्कसभे'चे पुढारी निओझी बे व एनव्हर बे यांनीं राज्यक्रांति केली (१९०८) व सुलतानास पदच्युत करून त्याचा भाऊ रशिद एफेंडि यास गादीवर बसविलें (१९०९).

**अबदुल्ला**—१. मुसलमानांचा धर्मगुरु महंमद पैगंबर याचे वडील. बापाचें नांव अबदुल मुत्तलीब. अप्रतिम रूप, साधी राहणी व श्रेष्ठ गुण यांमुळें पुष्कळ स्त्रिया याच्यावर लुब्ध झाल्या होत्या. ज्या दिवशीं याचें अमीनेशीं लग्न झालें त्या वेळीं कित्येकींनीं निराशेनें जीव दिला म्हणतात! लग्नानंतर बऱ्याच दिवसांनीं त्यांना फक्त महंमद हा मुलगा झाला. महंमदाच्या जन्मानंतर आठ दिवसांनीं (कोणाच्या मतें आठ वर्षांनीं) हा मरण पावला व यानें आपली बायको व मुलगा आपल्या वडिलांच्या स्वाधीन केला. त्यानें त्यांचें संगोपन नीट केलें व मरतेसमयीं त्यांना आपल्या वडील मुलाच्या स्वाधीन केलें.

२. महंमदाचा मुलगा अब्बास याचा मुलगा. जन्म सन ६१९. गेब्रिएल या देवदूतापासून स्फूर्ति मिळाल्यानें दहा वर्षांपासूनच उत्तम रीतीनें कुराण शिकवी. कांहीं काळ अलीनें

नेमल्यामुळें बसरा येथें अधिकारी असून पुढें हैजाजला आला. ताईफ ( मक्केपासून पूर्वेस ६० मैल ) येथें ६८७ त मृत्यु. आई अम्मा अल्फज्ल महंमदाच्या एका चायकोची वहीण.

**अबदुल्ला कुतुबशहा** ( १६११–५८ )—गोवळकोंड्याच्या गादीवरील सहावा सुलतान. महंमद कुतुबशहाचा मुलगा. १६३६ त शहाजहाननें अहमदनगर बुडविल्यावर यानें विजापूरकराप्रमाणें खंडणी देऊन त्याशीं तह केला होता, परंतु १६५६ त शहाजहान बादशहास दुखविल्यामुळें यावर आपत्ति आली. याचा वजीर मीर जुम्ला होता. एकदां मीर जुम्लाच्या मुलानें कुतुबशहास राग येण्याजोगें कृत्य केल्यामुळें त्यानें महंमद अमीन यास कैदेंत ठेविलें. मीरजुम्लानें मुलाच्या सुटकेची खूप खटपट केली, पण व्यर्थ. त्यामुळें तो शहाजहानास मिळाला. या वेळीं औरंगजेब दक्षिणच्या सुभ्यावर होता. त्यानें बापाकडून कुतुबशहावर वजन आणलें तरी कुतुबशहा महंमदास सोडीना. तेव्हां कुतुबशहास गैरसावध गांठून औरंगजेबानें हैदराबादवर हल्ला करविला. तेव्हां कुतुबशहानें कशीबशी सुटका करून घेऊन गोवळकोंड्यास जाण्यापूर्वीच महंमद अमीनाची सुटका केली व मीर जुम्लाची जप्त मिळकत परत केली. अबदुल्लास विजापूरकरांचीहि मदत न मिळाल्यानें त्यानें एक कोट रुपये खंडणी, सुलतान महंमदास आपली मुलगी, द्रव्य व कांहीं मुलूख देऊन औरंगजेबाशीं तह केला. यांत पुढें त्यास बरीच सूट मिळाली.

**अबदुल्लाखान सैय्यद**—एक मोगल सुभेदार. बाऱ्ह येथील महंमद पैगंबराच्या वंशांत जन्म. बापाचें नांव सय्यद अबदुल्लाखान उर्फ सय्यदमिया. हा औरंगजेबाच्या वेळीं विजापूर प्रान्तीं सुभेदारीवर होता. याच्या मुलांपैकीं हसन अली व हुसेन अली हे पुढें सय्यद बंधु म्हणून प्रसिद्धीस आले. या हसन अलीचेंच नांव अबदुल्लाखान कुतुब-उलमुल्क. या सय्यद बंधूंनींच दिल्लीच्या तख्तावर फर्रुखसियर या बादशहास व त्यानंतर अनेक बादशहांस बसविलें. १७२० सालीं महंमदशहा यास तख्तावर बसविल्यावर महंमदशहानें सय्यदांच्या अरेरावीस कंटाळून कट केला व हुसेन अलीचा खून करविला. त्या वेळीं अबदुल्लाखान अलाहाबादेच्या सुभेदारीवर होता. पुढें ह्याचाहि ११ ऑक्टोबर १७२२ रोजीं खून झाला.

**अबनूस**—( इं. एबनी ). टेंबुर्णी वर्गांतलि हें झाड असून याचें लांकूड चांगलें जड, टणक व टिकाऊ असतें. हें झाड सिंहलद्वीपांत होतें व याला फार किंमत पडते. याचे बरेच रंग असतात व त्यांत काळे अबनूस उत्कृष्ट मानतात. याच्यावर चांगलें रोगण चढतें. लांकडी नक्षीदार सामान व उपकरणीं यांना हें लांकूड फार वापरतात.

**अंबर**—हा सुगंधी पदार्थ स्पर्म व्हेल नांवाच्या माशाच्या आंतड्यांपासून निघतो व तो समुद्रांत किंवा समुद्रकिनाऱ्यावर तरंगतांना आढळतो. याला फार चांगला सुवास असतो म्हणून तो सुगंधी द्रव्य म्हणून वापरण्यांत येतो.

**अंबर**—हिंदुस्थान, राजपुताना. हें गांव जयपूरनजीक आहे. १८ व्या शतकांत जयसिंहानें जयपूर हें नवीनच शहर वसवून तेथें राजधानी नेण्यापूर्वीं अंबरला राजधानी होती. श्रीरामचंद्राचा मुलगा कुश याच्या धवलराय नांवाच्या वंशजानें अंबरला राज्याची स्थापना केली ( ९५७ ). त्या वेळेपासून अंबरचें राज्य नांवाजलें गेलें. हुमायूननें बिहारीमल्लास अंबरचा महाराजा ही पदवी दिली होती. याच्या मुलीशीं अकबरनें लग्न केलें. येथील जुना राजवाडा १६०० त राजा मानासिंगानें बांधला. येथें श्रीजगत् सरोमानजी व अंबिकेश्वर हीं देवालयें प्रेक्षणीय आहेत.

**अंबरखाना**—मराठी राज्यांत अठरा कारखानें असत; त्यांपैकीं, अंबरखाना हा एक असे. अंबर म्हणजे धान्य; तेव्हां, अंबरखाना म्हणजे धान्यागार किंवा धान्याची कोठी. राजधानींत तर अंबरखाना असेच; परंतु प्रत्येक किल्ल्यावरहि असे. ह्यांत दोन दोन, तीन तीन वर्षांचें धान्य सांठवून ठेवीत. किल्ल्यास वेढा पडला म्हणजे मग या धान्याचा उपयोग करीत. हे वेढे ३।४ वर्षेंहि सतत पडत. उदा., जिंजी, विजापूर व गोवळकोंडा इ.

पुणें येथें शनिवारवाड्याच्या गणेशदरवाजासमोर, हल्लीं जेथें बाग आहे तेथें पेशव्यांचा अंबरखाना होता. पन्हाळा किल्ल्यांत फार मोठा अंबरखाना अद्यापिहि शाबूत आहे.

**ॲबरडीन**—स्कॉटलंडमधील चौथ्या दर्जाचें भरभराटलेलें शहर, बंदर व सनदी गांव. येथें ग्रॅनाइट दगडाच्या बऱ्याच इमारती असल्यामुळें ग्रॅनाइट सिटी असेंहि म्हणतात. येथें मोठमोठ्या इमारती व इतर सर्व सुखसोयी असून स्कॉटलंडमधील निरोगी शहर म्हणून प्रसिद्ध आहे. ॲबरडीन विश्वविद्यालयास किंग व मॅरिसकल हीं विश्वविद्यालयें जोडलेलीं असून त्यांत १४०० हून अधिक विद्यार्थी असतात. अनाथालयें व रुग्णालयें बरींच असून गॉर्डन विद्यालयासमोरील गॉर्डनचा पुतळा व विल्यम वॉलेसचा पुतळा पहाण्यासारखा आहे. शहराचा कारभार नगरसभा पाहते, व पार्लमेंटांत दोन सभासद पाठविले जातात. बंदर उथळ असून तें सुधारण्याचा प्रयत्न चालू आहे. त्याकरितां बंदरांत शिरणारा कालवा काढला आहे. उद्योगधंद्यासाठीं हें शहर प्रसिद्ध असून येथें लोंकर, ताग, कापूस यांचे कारखाने आहेत. पूर्वीपासून येथें ग्रॅनाइट दगडाच्या खाणी आहेत, त्यावर नक्षीकाम उत्तम होतें. जहाजें बांधण्याचे कारखाने मोठे आहेत. १२ व्या शतकांत हें महत्त्वाचें ठाणें होतें. १३३६ त हें तिसऱ्या एडवर्डनें जाळलें. शहरास

तटबंदी आहे; व १७१५ त 'ज्येष्ठ तोतया'च्या नांवानें द्वाही फिरविण्यांत आली होती. लोकसंख्या १८०८०० ( १९४१ ) होती. हेरिंग नांवाचे मासे सांपडत असल्यामुळें हा धंदा मोठ्या प्रमाणावर आहे. शहर सुंदर व स्वच्छ आहे.

**अंबरनाथ**—एक मराठी कवि. कऱ्हाडजवळ कुंभारगांव म्हणून आहे तेथील कायस्थ. पूर्वी बालेघाटीं मामलत करीत असत. अमणापुरीं मठ केला. यांनीं जिवंत समाधि घेतली. हे चैतन्य संप्रदायी होते. ग्रंथ—अर्जुनगर्वपरिहार.

**अंबरनाथ**—मुंबई, ठाणें जिल्हा, कल्याणपासून चार मैलांवर असलेलें एक गांव. आगगाडीचें स्टेशन. स्टेशनापासून पश्चिमेस एक मैलावर एक प्राचीन देवालय आहे. त्याचें शिल्प अप्रतिम व प्रेक्षणीय आहे. हें शंकराचें देवस्थान ११ व्या शतकांतील असावें. देऊळ अगदीं मोडकळीस आलेलें आहे. गेल्या महायुद्धापासून अंबरनाथाचें महत्त्व वाढलें आहे. तेथें बरेच कारखाने व लष्करी उपयोगाच्या संस्था निघाल्या आहेत.

**अंबराम्ल**—( सॅक्सिनिक ॲसिड ). याचीं दोन समरूपें आहेत : १ इथिलिन अंबराम्ल, २ एथिलिडिन अंबराम्ल.

इथिलिन अंबराम्ल अंबराम्लाचें शुष्कपातन केलें म्हणजे तयार होतें. हें पातन लोखंडी बकपात्रांत अथवा ऊर्ध्वपातन यंत्रांत ( रिटॉर्ट ) करून ग्राहकांत जो पात येईल तो थिजल्यावर जें द्रव्य जमेल तें आटवावें आणि जो तांबूस रंगाचा स्फटिकरूप गोळा मागें राहील तो जलमिश्रित नत्राम्लांत विद्रुत करून स्फटिकरूप करावा.

अंबराशिवाय राळेंत, कच्च्या द्राक्षांच्या रसांत आणि कित्येक प्राणिज रसांत हें अम्ल असतें. तसेंच द्राक्षाम्लाची विपाकक्रिया केली म्हणजेहि हें अम्ल तयार होतें.

अंबराम्लाचे चतुरस्र स्फटिक असतात ; त्यांस आंबट व वाईट वास असतो. हे स्फटिक १८५° श. अंशावर वितळतात व २२५° श. वर उकळतात. उकळत असतांना त्यांतून निघणारी वाफ श्वासोच्छ्वासाबरोबर गेल्यास मोठा ठसका लागून फार खोकला येतो व त्यावरून हें अम्ल एकदम ओळखतां येतें. साधारण उष्णमानावर सुमारें वीस पट पाण्यांत हें अम्ल विद्रुत होतें. अल्कोहलांत हें अम्ल किंचित् विद्राव्य असून इथरांत बहुतेक अविद्राव्य असतें.

**अंबरीष**—वैवस्वत मनूच्या वंशांतील नाभाग राजाचा पुत्र. हा परम दानशूर व भगवद्भक्त असून, पराक्रमीहि होता.

एकदां यास कार्तिक मासांतील देवत्रयांचें त्रिदिनात्मक एकादशी व्रत असतां द्वादशीच्या दिवशीं याच्या घरीं दुर्वास ऋषि अतिथि प्राप्त झाला. त्याची यानें पूजा करून त्यास भोजनार्थ राहवून घेतलें. दुर्वासहि तथास्तु म्हणून आन्हिक करण्यास नदीतीरीं गेला ; त्या दिवशीं द्वादशी थोडी होती हें दुर्वासास विदित नसून यानेंहि त्यास सुचविलें नाहीं. त्यामुळें दुर्वास आपलें आन्हिक सावकाशपणें आटपून येत आहे, तों द्वादशी अतिक्रांत होत आहे असें जाणून यानें देवास नैवेद्य समर्पण केला व व्रतभंग होऊं नये म्हणून भोजन न करतां द्वादशींत देवाचें तीर्थ प्राशन करून पारणें केलें. हें पाहून दुर्वासानें आपल्या जटेंतील केंसापासून एक कृत्या निर्माण करून यावर सोडली. इतक्यांत विष्णूच्या सुदर्शनचक्रानें येऊन त्या कृत्येचा नाश केला ; व सुदर्शन दुर्वासावर धांवलें. परंतु त्याच्या तपःप्रभावानें त्याच्या अंगास स्पर्श करण्यास तें समर्थ झालें नाहीं. नंतर दुर्वास तेथून निघाला असतां चक्रहि त्यामागें निघालें. तें पाहून तो विष्णूकडे गेला. तेव्हां विष्णूनें त्यास अंबरीषाकडेसच जाण्यास सांगितलें. या गोष्टीस एक संवत्सर झाला असतांहि अंबरीषानें भोजन केलें नव्हतें. दुर्वासास पाहतांच त्यास हर्ष होऊन त्यानें सुदर्शनाची स्तुति केली. तेणेंकरून तें संतुष्ट होऊन स्वस्थळीं जातांच यानें दुर्वासास सुग्रास भोजन देऊन आपणहि जेवला.

**अंबलवासी ( अंतरल्ल )**—एक जात. यांची वस्ती मद्रास इलाखा, कोचीन व त्रावणकोर संस्थान यांतून आहे. लोकसंख्या सु. ३३०००. या लोकांना देवळांत नोकरी करण्याचा जन्मसिद्ध हक्क असतो. यांच्यांत १२ भेद आहेत. या बारा जातींपैकीं बहुतेक विदुर आहेत. त्यांच्यांत यज्ञोपवीत धारण करणारे व न धारण करणारे असा भेद आहे.

आदिकल पोटजातीचे लोक मूळचे ब्राह्मण होते. पण भद्रकाली देवालयांत पुजाऱ्याचें काम केल्यामुळें समाजांत त्यांचा मान कमी झाला. यांच्यांत उपनयन होतें ; व हे गायत्री पाठ करतात. त्यांच्यांत मातृकन्यापरंपरेचा वारसाचा कायदा चालू आहे.

अंबलवासी जातीचा दुसरा पोटभेद चाक्यार हा आहे. व्यभिचाराबद्दल जातीबाहेर टाकलेल्या नम्बुद्री लोकांच्या पुत्रपौत्रांच्या जातीला हें नांव आहे. एखादी नंबुद्री जातीची स्त्री व्यभिचारी आहे असें जातिसभेनें ठरविलें तर तिच्या उपनयन झालेल्या मुलांना चाक्यार जातींत टाकतात व उपनयन न झालेल्यांना नांबियार जातींत टाकतात. चाक्यार लोक पुराण व इतिहास यांचा अभ्यास करतात, व त्यांवर व्याख्यानें देतात. हे लोक यज्ञोपवीत धारण करतात व गायत्री पठण करतात. रामायण; महाभारत व भागवतपुराण यांतील कथा सांगण्याचा यांचा धंदा आहे.

अंबलवासी जातीमध्यें घटस्फोटाची चाल असून नंबुद्री ब्राह्मणास द्वितीय पति म्हणून वरण्यास कोणत्याहि प्रकारची

नसते. सर्वसाधारण विधींसाठीं ते आपल्यांतूनच भटजी निवडतात. कांहीं विधि ब्राह्मणांकडून करवितात.

**अंबष्ठ**—(आंबष्ठ). एक प्राचीन राष्ट्र. पंजाबच्या मध्यभागीं हें राष्ट्र असून येथील लोक लढवय्ये असत असें दिसतें. ऐतरेय ब्राह्मणांतील आंबष्ठय राजा यांच्यापैकींच असावा असें कांहींचें मत आहे. बृहत्संहितेंत अंबष्ठ लोकांचा उल्लेख आहे. (१४·७; १४·१७; १६·२२). हे पूर्व व नैर्ऋत्य या भागांतील लोक असावेत. महाभारतांत पांडवदिग्विजयांत आलेल्या अनेक देशांत अंबष्ठ हा पश्चिमेकडील देश गणला आहे. मरुद्वृद्ध हें देशाचें मुख्य शहर आहे असें अर्वाचीन कोशांत दिलें आहे. ब्राह्मण पुरुष व वैश्य स्त्री यांच्या संबंधापासून झालेल्या संततीस अंबष्ठ म्हणतात. तेव्हा हे अंबष्ठ लोक संकरापासून झालेले असावेत असा कांहींचा समज आहे.

**अंब संस्थान**—पाकिस्तान, वायव्य सरहद्द प्रांत. क्षे. फ. २२५ चौ. मै. व लो. सं. ४७९१६. या संस्थानांत सिंधु नदीच्या उजव्या तीरावरील कांहीं थोड्या मैलांचा प्रदेश व तनवाल सरंजामीचा सिंधूच्या डाव्या तीरावरचा प्रदेश येतो. संस्थानिक नबाब महंमद फरीदखान या नांवाचे आहेत. राजधानीचें ठिकाण उन्हाळ्यांत शेरगड व थंडींत दरबंद हें आहे.

**अंबाजी इंगळे**— महादजी शिंद्याचा एक सरदार. याच्या बापाचें नांव त्रिंबकजी. इ. स. १७८४ मध्यें महादजी पातशाहीचा बंदोबस्त करण्यासाठीं दिल्लीकडे गेला तेव्हां हा उत्तर हिंदुस्थानांत त्याजबरोबर होता. या प्रसंगीं ह्याच्या हातून कित्येक जबाबदारीचीं कामें घडलीं. अंबाजीकडे केवळ लष्कराचा कारभारच सोंपविण्यांत येत होता असें नाहीं. १७८७ च्या ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यांत महादजीनें खोडी पाटोडीहून गुलाम कादराच्या पारिपत्यास येऊं काय म्हणून पातशहास विचारण्यासाठीं अंबाजीची वकील म्हणून नेमणूक केली होती.

इ. स. १७९१ च्या सुमारास महादजीनें अंबाजीस उदेपूरच्या राण्याच्या विनंतीवरून त्याच्या राज्यांतील चोंडावत सरदारांचें बंड मोडण्यासाठीं कांहीं पलटणी देऊन पाठविलें. अंबाजीनें चोंडावतांचा मुख्य जो साळुंब्रा यास राण्याची माफी मागावयास लावून त्याजकडून राण्यास वीस लक्ष रु. दंड देवविला; तसेंच त्यानें राण्याचीं आणखीहि इतर महत्त्वाचीं कामें केलीं. राण्यास चोंडावत सरदारांचें भय वाटत होतें व आणखीहि कामगिऱ्या करून घ्यावयाच्या होत्या म्हणून त्यानें अंबाजीच्या सैन्याच्या खर्चाकरितां सालिना आठ लाख रुपये उत्पन्नाचा मुलूख तोडून देऊन त्यास मेवाडांत ठेवून घेतलें. अशा रीतीनें मेवाडच्या कारभाराचीं सर्व सूत्रें अंबाजीच्या हातीं येऊन तो आपणांस मेवाडचा सुभेदार म्हणवूं लागला.

इ. स. १७९५ सालच्या सुमारास अंबाजीची शिंद्यांचा प्रतिनिधि म्हणून उत्तर हिंदुस्थानांत नेमणूक झाली तेव्हां अंबाजी गणेशपंत नामक आपल्या एका अधिकाऱ्याकडे मेवाडचें काम सोंपवून उत्तर हिंदुस्थानांत गेला. अंबाजीचा धनी दौलतराव हा यावेळीं वयांत आलेला नसल्यामुळें प्रथम अंबाजीच्या हातीं उत्तर हिंदुस्थानांत 'कर्तुमकर्तुं' सत्ता आली पण लवकरच त्यास लखबादादा हा प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला. इ. स. १८०० च्या सुमारास हिंदुस्थानचा कारभार अंबाजीकडून काढून तो लखबाकडे सोंपविल्याचा शिंद्याचा हुकूम आला. त्यामुळें अंबाजीच्या अधिकाऱ्यास मेवाडमध्यें जे काय किल्ले व शहरें होतीं तीं लखबाच्या स्वाधीन करून निघून यावें लागलें.

इ. स. १८०३ च्या सप्टेंबर महिन्याच्या सुमारास अंबाजीनें आपल्या कारस्थानांनीं पेरॉन यास हुसकून लावून त्याची जहागीर व शिंद्याच्या सैन्याचें आधिपत्य मिळविलें. पुढें याच वर्षी शिंद्याचें इंग्रजांशीं युद्ध झालें. या वेळीं अंबाजी हा गोहद प्रांताचा मामलतदार होता. त्या युद्धांत इंग्रज उत्तर हिंदुस्थानांतील शिंद्याचा मुलूख काबीज करीत चालले आहेत असें पाहून अंबाजी हा शिंद्याविरुद्ध बंड केल्याचें मिष करून इंग्रजांस जाऊन मिळाला व त्यांच्याशीं तह करून त्यानें गोहदच्या राण्याच्या मुलुखांतील कांहीं मुलूख स्वतःकरितां मिळविला. पण शिंदे व इंग्रज यांच्या दरम्यान तह होतांच अंबाजी पुनः शिंद्याकडे गेला.

यानंतर शिंद्याची अंबाजीवर इतराजी झाली; व शिंद्याच्या अर्धवट संमतीनें यशवंतराव होळकरानें अंबाजीस (इ. स. १८०५ सालीं) कैद केलें. पण मागून होळकरानें आपल्या फौजेस देण्याकरितां अंबाजीपासून बराच पैसा घेऊन त्यास बंधमुक्त केलें व सर्जेराव घाटग्यास काढून शिंद्याकडून त्यास दिवाणगिरी देवविली. अंबाजी हा इ. स. १८०९ च्या सुमारास मरण पावला. याची छत्री कोट्यास दाखवितात.

**अंबाजी पुरंदरे**—हा मूळचा सासवडचा कुलकर्णी व देशपांडा होता. बाळाजी विश्वनाथ पेशवा जंजिऱ्याच्या सिद्दीच्या त्रासानें कोंकणांतून देशावर आला तेव्हां साताऱ्याला जाण्यापूर्वी सासवडास या पुरंदऱ्याकडे राहिला होता. बाळाजी विश्वनाथाबरोबर अंबाजीहि धनाजी जाधवाच्या पदरीं राहिला. पुढें दोघेहि शाहूच्या तैनातीस आले. बाळाजी पेशवा झाला तेव्हां त्यानें अंबाजीस आपली मुतालिकी दिली. इ. स. १७१४ त दमाजी थोरातानें या दोघांस कपटानें चंदींत घातलें व त्यांच्या सुटकेसाठीं मोठी खंडणी मागूं लागला. त्या वेळीं अंबाजीनें बाळाजीच्या जिवास जीव देऊन त्याची सुटका केली. अंबाजी साताऱ्यास शाहूजवळ राहून पेशव्यांचें अगत्य ठेवीत असे. बाजीराव पेशवा झाल्यावर अंबाजी त्याच्याबरोबर स्वारींत असे. इ. स.

१७३३ त श्रीनिवास प्रतिनिधीनें कोंकणवर जी मोहिम केली त्या मोहिमेंत अंबाजी असून युद्धाचें वर्तमान बाजीराव यास तो कळवी. इ. स. १७३५ त अंबाजी काशीयात्रेस गेला तेव्हां त्यानें आपला मोठा पुतण्या मल्हार तुकदेव यास शाहूकडून मुतालिकी देवविली. काशीयात्रा करून बाजीरावाच्या हिंदुस्थानच्या स्वारींत तो दाखल झाला. तिकडून परत आल्यावर लवकरच माहुलीस वारला ( १७३५ ). पुरंदरे व पेशवे यांचा संबंध फार जुना व जिव्हाळ्याचा असे. नानासाहेब पेशवा लहानपणीं अंबाजीच्या हाताखालीं कामकाजास होता. अंबाजीचा मुलगा महादोबा व पुतण्या नाना हेहि त्याला बाहेरच्या गोष्टी समजावून देत. शाहूजवळहि अंबाजीचें चांगलें वजन असे. बाजीराव किंवा चिमणाजी यांचा वरचढपणा जेव्हां शाहूच्या दृष्टोत्पत्तीस येई तेव्हां पुरंदऱ्यांकडून त्यांची तो कानउघाडणी करी.

**अबाझइ किल्ला**—पाकिस्तान. पेशावर जिल्ह्यांतील चारसद्दा तहशिलींतील किल्ला व गांव. पेशावरपासून २४ मैलांवर असून हा किल्ला १८५२ त बांधण्यांत आला. यामुळें उत्मान व मोहमंद या लोकांच्या स्वाऱ्यांपासून ब्रिटिशांचें संरक्षण होत असे. हल्लीं या गांवाच्या लगत असलेल्या स्वात नदीच्या कालव्याचें मुख्य ठिकाण आहे.

**अंबाडी**—हें झाड मूळचें आफ्रिकेंतील असून आतां हिंदुस्थानांत वाखाकरितां याची लागवड बऱ्याच मोठ्या प्रमाणांत होते. मुंबई इलाखा, मद्रास इलाखा व मध्यप्रांत यांत याची लागवड मोठ्या प्रमाणांत होते. संयुक्त प्रांत व पंजाब या प्रांतांत अंबाडीची लागवड तुरळक तुरळक होते. खडकाळ कुरुंदाची जमीन अंबाडीच्या लागवडीला चालते.

मुख्यतः अंबाडीच्या तागाचा उपयोग दोर करण्याकारितां व हलक्या प्रतीचीं तरटें करण्याकडे करतात. महाराष्ट्रांतील अंबाडीला लंडनच्या बाजारांत 'बिमलिपट्टण ताग' असें म्हणतात.

अंबाडीच्या बियांपासून शुद्ध व स्वच्छ तेल निघतें; म्हणून अंबाडीचें बीं गळिताच्या धान्याप्रमाणें इंग्लंडला पाठविलें जातें. पुणें प्रांतांत अंबाडी गुरांना खावयास घालतात व पाल्याची भाजी करतात. गुरांस दूध जास्त सुटण्यास अंबाडीचें बीं भरडून व शिजवून त्यांत तेल व गूळ घालून देतात.

**अबानो पिट्रो** ( १२४६–१३१६ )—प्राचीन काळचा एक प्रख्यात वैद्य व तत्त्ववेत्ता. जन्म इटलींत अबानो येथें. याचे दोन ग्रंथ प्रसिद्ध असून त्यांत अरबी वैद्यक व तत्त्वज्ञानाचें समर्थन व विवरण आहे. पैकीं दुसऱ्याचें फ्रेंच भाषेंत भाषांतर झालेलें आहे.

**अबाब्दा(ब्दी)**— नाईल नदीच्या पूर्वेस ईजिप्तच्या दक्षिण भागांतील 'अरबी' म्हणविणारी जात. ब्लेमिज ग्रंथांत उल्लेखिलेली जात हीच असावी. हे शुद्ध अरब वंशज नसून ईजिप्तमधील शेतकऱ्यांची भेसळ आहे. नेहमीं फिरते असून मांस व दूध यांवर उपजीविका करतात. लो. सं. सुमारें एक लाख.

**अंबाभवानी** — मुंबई, महीकांठ्यांतील सरस्वती नदीच्या उगमाजवळील यात्रेचें ठिकाण. येथें देवीचें देऊळ प्रसिद्ध आहे. हें देऊळ फार प्राचीन काळीं म्हणजे ७४६ च्या सुमारास सुद्धां आतांप्रमाणेंच प्रसिद्ध होतें. येथें नेहमीं यात्रेकरू असतात. मोठी जत्रा सप्टेंबरमध्यें भरते. देऊळ संगमरवरी दगडाचें असून खांबावर १६ व्या शतकांतील खाजगी देणग्यांबद्दल कांहीं अंकित लेख आहेत. येथून जवळच ४ मैलांवर कोटेश्वर महादेवाचें देऊळ आहे.

**अंबाला**—हिंदुस्थान, पंजाब, दिल्ली भागाच्या उत्तरेकडील जिल्हा. क्षेत्रफळ १८५१ चौ. मैल. लोकसं. ८४७७४५. उत्तरेस सतलज नदी व पलीकडे होशियारपूर जिल्हा; आग्नेयीस यमुना नदी व पलीकडे संयुक्तप्रांतांतील सहारणपूर जिल्हा; ईशान्येस नालागड, पतिआळा, सिरमूर आणि कलसिया हीं संस्थानें; दक्षिणेस कर्नाळा जिल्हा; पश्चिमेस पतिआळा संस्थान व लुधिआना जिल्हा. या जिल्ह्याचे दोन निरनिराळे भाग करतां येतील. घग्गर आणि यमुना या दोन नद्यांमधील प्रदेश हा पहिला. हा प्रदेश सपाट असून सुपीक आहे. यांत अंबाला, नारायणगड आणि जगाध्री या तहशिली येतात. घग्गर आणि सतलज यांमधील सपाट प्रदेश हा या जिल्ह्याचा दुसरा भाग असून यांत रूपर व खरर या दोन तहशिली आहेत. हा प्रदेश अत्यंत सुपीक आहे. तरी ही जागा पाणथळ असल्यामुळें येथील हवा रोगकारक आहे. त्यामुळ या भागांत कमी वस्ती आहे. डोंगराच्या सान्निध्यामुळें उन्हाळ्यांत व हिंवाळ्यांत थंडी फार पडते. पावसाची सरासरी सपाट प्रदेशावर २८ इंच असून कसौली येथें ( डोंगरावर ) ६१ इंच आहे. या जिल्ह्यांत ७ मोठीं गांवें व १७१८ खेडीं आहेत. या जिल्ह्यांत पांच तहशिली आहेत. जाट लोक बहुतेक जमिनीचे मालक आहेत. पातीदारी आणि भय्याचारी या दोन पद्धतींवर या जिल्ह्याची जमीन वांटली गेली आहे. मुख्य पिकें :— गहूं, हरभरा, मका, भात इ.. अंबाला येथें सुती सतरंज्या उत्तम प्रकारच्या होतात. येथें धान्याचा मोठा व्यापार चालतो. शहर—जिल्हा व तहशिलीचें मुख्य ठिकाण असून मुंबईहून ११०५ मैल, व कलकत्त्याहून १०७७ मैल अंतरावर आहे. हिंदुस्थानांत जीं मोठमोठीं लष्करी ठाणीं आहेत त्यांपैकीं अंबाला हें एक आहे. अंबाला हें शहर नॉर्थ वेस्टर्न रेल्वे व दिल्ली–

अंबाला-काल्का रेल्वे यांचें जंक्शन आहे. लष्करी ठाण्याच्या वायव्येस चार मैलांवर अंबाला शहर असून शहराकरितां नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचें निराळें अंबाला स्टेशन आहे. अंब या पौराणिक व्यक्तीपासून अंबाला हें नांव पडलें असावें. तथापि 'अंबवाला' (अंब्याचें खेडें) याचा अपभ्रंश अंबाला असावें हें जास्त सयुक्तिक दिसतें. इ. स. १८२३ मध्यें सिस–सतलज संस्थानांच्या पोलिटिकल एजंटचें ठाणें झाल्यापासून या शहरास महत्त्व येत चाललें. इ. स. १८४३ सालीं हें लष्करी ठाणें होऊन इ. स. १८४९ सालीं जिल्ह्याचें मुख्य ठाणें झालें. शहराजवळ सिव्हिल लाइन्स असून तेथेंच सर्व कचेऱ्या आहेत. येथें कापूस व धान्य यांचा मोठा व्यापार चालतो. लो. सं. ७६४९७.

**अंबालाल साराभाई** (१८८९– )— एक गुजराथी धनाढ्य व्यापारी. यांनीं मॅट्रिक्युलेशनपर्यंत खासगी रीतीनें अभ्यास करून नंतर गुजराथ कॉलेजमध्यें प्रवेश केला. परंतु यांच्या चुलत्यांच्या अकालीं निधनामुळें धंद्याकडे लक्ष देणें भाग पडलें व यांनीं कॉलेज सोडलें. यांचा कॅलिको व ज्युबिली या गिरण्यांत प्रथमपासून हितसंबंध होता. त्या वाढवून त्यांनीं आणखीहि अनेक कंपन्या काढल्या. हे बँकिंग, इन्शुअरन्स, रेल्वे, सीमेंट, तेल, साखर, कापड, वीज, वगैरे प्रकारच्या अनेक कंपन्यांचे मालक किंवा चालक आहेत. यांस सरकारनें दिलेलें कैसर-इ-हिंद सुवर्ण पदक यांनीं गांधींस अटक केल्याबद्दल १९३० मध्यें परत केलें. यांचा जातिभेदावर विश्वास नसल्यामुळें यांनीं जैनसमाज सोडून दिला आहे. यांनीं सर्व जगांत प्रवास केला आहे. आपल्या गिरण्यांमध्यें व इतरत्र हे अनेक प्रकारचें सामाजिक व सार्वजनिक कार्य करीत असतात.

**अंबालिका**—काशीराजाच्या तीन कन्यांतील कनिष्ठ. विचित्रवीर्य राजा याची कनिष्ठ स्त्री व पांडवांचा पिता जो पंडुराजा याची आई होती.

**अंबासमुद्रम्**—मद्रास, तिनेवेल्ली जिल्ह्यांतील एक तालुका. सह्याद्रीच्या पायथ्याशीं हा वसलेला असून त्याचें क्षेत्रफळ ४९४ चौ. मैल व लोकसंख्या सुमारें अडीच लाख आहे. या तालुक्यांत ताम्रपर्णी नदीच्या आसपासचा प्रदेश असून त्यांत भातशेतीची अति सुपीक जमीन आहे. पापनाशम् नांवाचें यात्रेचें ठिकाण याच तालुक्यांत आहे.

**अंबिका**— काशीराजाच्या तीन कन्यांतील मधली. विचित्रवीर्याची ज्येष्ठ स्त्री व दुर्योधनाचा पिता धृतराष्ट्र, याची आई होती.

**आबिडॉस**— १. नाईल नदीच्या पश्चिमेकडील इजिप्तमधील प्राचीन शहर. इजिप्शियन 'अब्डु', ग्रीक 'अबिडॉस' व अरबी 'आरबेट एल मडफुन्हे' हीं नांवें आहेत. ह्या शहराचा इतिहास इतिहासपूर्वकालचा आहे. मेनाईटच्या आधींच्या राजांनीं हें वसविलें असावें. पहिल्या व दुसऱ्या घराण्यांतील राजांनीं देवस्थानें स्थापन केलीं व वाळवंटांत किल्ले बांधले. १९ व्या व २० घराण्याच्या वेळीं हीं देवस्थानें दुरुस्त केलीं गेलीं व स्मशानभूमि वापरण्यांत येऊं लागली. १९ व्या घराण्यांतील पहिल्या सेतीनें पूर्वजांच्या स्मरणार्थ एक इमारत बांधण्यास सुरुवात केली व रामेसीसनें ती पुरी केली. ३० व्या घराण्यांतील नेख्तानेबचें देऊळ ही शेवटची इमारत होय. १ ते १२ व्या घराण्यांत 'उपुआऊट' ची व पुढें ऑसिरिसची उपासना चाले. अबिडॉसच्या मोठ्या देवळावर राजांची लांबलचक नामावली असून तिला अबिडॉसचा तक्ता म्हणतात.

२. आशिया मायनरमधील मायसिया प्रांतांतील नागारा शिखरावरील शहर. हें थ्रेसियन शहर असून पुढें मिलेसियन लोकांनीं वसाहत केली असावी. क्सर्क्सीझनें ग्रीसवरील स्वारीच्या वेळीं होड्यांच्या पुलानें ही खाडी ओलांडली. मॅसिडोनचा फिलिप ५ वा या राजास विरोध केल्यामुळें हें शहर प्रसिद्धीस आलें. हिरो व लियांडर यांचें प्रणयस्थान व पुढें जकातीचें ठाणें म्हणून प्रसिद्ध असून २ रा सुलतान महंमद यानें जुने किल्ले बांधल्यामुळें ह्या शहराचें महत्त्व दार्दानेलिसला आलें.

**अबिपोन जात**—दक्षिण अमेरिकन इंडियनांची एक जात. लोकसंख्या अजमासें ५००० इ. स. १७८० चे सुमारास होती. आतां कडुवे वगैरे जातींप्रमाणें नामशेष झाली आहे. या जातीसंबंधीं मार्टिन डोब्रिझोफर हा जेसुईट मिशनरी लिहितो:—हे लोक उंच व बांधेसूद असून पेशा परिभ्रमण वृत्ति. अंगभर वस्त्र घेऊन दागिने घालीत व अंगावर पुरुष व स्त्रिया दोघेहि गोंदून घेत व सुंदर आकृति काढीत. ७ वर्षे वयानंतर पुरुष ओष्ठालंकार घालीत व तो पितळी असे. स्त्री–पुरुषांचीं कानांचीं पाळीं खांद्यापर्यंत ताणलेलीं असत. यांची नीतिमत्ता उत्तम असून, पतिपत्नी नातें नांवाजण्याजोगें असून इतर वर्तन विनयी, सभ्य व ममताळू असे. वार्षिक विजयोत्सव खेळून व मद्यपानानें साजरे करीत. मद्यपान हाच यांचा दुर्गुण असून स्वभाव धिमा व शौर्यवान् असला तरी लढाऊ वृत्ति कमी. यांत असगोत्रविवाह पद्धति असून बालविवाह मना होता. पुरुषांचीं ३० व्या वर्षी व स्त्रियांचीं २० व्या वर्षी लग्नें होत. भ्रूणहत्या व गर्भपात फार होत. स्त्री फक्त दोन मुलें ठेवून बाकीचीं मारून टाकी. बहुपत्नीत्वाची चाल नसून लग्न मोडणें पुरुषाच्या मर्जीवर असे. नवऱ्यास मूल पीत असतांना स्त्रीसुखाचा मज्जाव असल्यानें भ्रूणहत्या व पुरुषानें दुसरें लग्न करणें या गोष्टी होत. स्त्री–पुरुषधर्म उत्तम तऱ्हेनें पाळण्यांत येई व मुलीचा हुंडा घेण्याची चाल असल्यामुळें मुलगेच भ्रूणहत्येंत मारले जात. यांना चिंतन व

विवेचन यांची गोडी नसून हे 'अहरै गिची' उर्फ किवेट म्हणजे कृत्तिका नक्षत्र याची पूजा करीत. या देवतेचा उदय झाला असतां तिचा सत्कार करीत व या देवतेनें अमानुष शक्ति दिलेले किचेट उपाध्ये हे धर्मसंप्रदाय चालवीत. या किचेटांना व धूमकेतु व ग्रहणें यांना हे लोक फार भीत. आप्तांच्या मृत्यू-नंतर पुरुष श्मश्रु करवीत व बायका ९ दिवस रडत; यासाठीं भाड्यानें बायका आणीत व त्या फक्त रात्रींच रडत. मृताचें नांव घेत नसत व त्याचें घर उध्वस्त करून आप्तेष्ट आपलीं नांवें बदलीत. गाई-घोडे मृताच्या अंतकाळीं मारले जात व थडग्यावर यांचीं शरीरें व वस्त्रें वगैरे ठेवीत. पूर्वजांच्या समाधींना मान देण्यांत येत असून त्यांच्या अस्थि एका जागेवरून दुसऱ्या जागीं व मग घरच्या स्मशानांत पुरीत.

**अबिला**—१. सिरियामधील प्राचीन शहर व छोट्या अबिलिनें राज्याची राजधानी. यास लिसानि यांचें अबिला असेंहि म्हण-तात. दमास्कसच्या राज मार्गावरील शहर असून पडकीं देवालयें शिलालेख यांवरून मोठें शहर असावें. अबेलला येथें पुरलें म्हणून हें नांव पडलें अशी दंतकथा असून येथें इ. स. ३७ पर्यंत इटु-रियन राज्य होतें. नंतर कलिगुलानें पहिल्या आग्रिपास व इ. स. ५२ त क्लॉडिअसनें दुसऱ्या आग्रिपास दिलें.

२. अबिला उर्फ अबिल-एझ-झैस हें पेरिआमध्यें शहर आहे.

**ॲबिसिनिया**—(एथिओपिआ). आफ्रिकेंतील पूर्व-मध्य भागांतील एक स्वतंत्र देश. ग्रीक लोक आफ्रिकन इसमांस सामान्यतः एथिओपिअन म्हणजे 'दग्धमुद्रेचे लोक' असें त्यांच्या कृष्णवर्णावरून म्हणत. होमर व हिरोडोटस यांच्या लेखनांत त्यांचा उल्लेख आहे. ख्रिस्तपूर्व ११ व्या शतकांत आणि नंतर ख्रिस्त शकाच्या आरंभकाळांत एथिओपिआची दोन काळांत दोन राज्यें असल्याचें आढळून येतें. क्षे. फ. ३,५०,००० चौ. मै. व लो. सं. सुमारें सव्वा कोटी आहे. यांत विशेषतः उत्तरेकडे उंच उंच पर्वत आहेत व हे १५००० फूटपर्यंत उंचीचेहि आहेत. यामुळें उंच भागांत कांहींशी समशीतोष्ण हवा असली तरी सामान्यतः मैदानें व खोल दऱ्या हीं अत्यंत उष्ण आहेत. पावसाळा दीर्घकाळ व जोराचा असतो. त्यामुळें पाणी विपुल होतें. ताना सरोवर फार मोठें आहे व नाईल या विख्यात नदीचें तेंच उगमस्थान आहे. ॲबिसिनियाचें राजधानीचें ठिकाण आदिस अबाबा हें ॲबिसिनियाच्या ऐन मध्यभागीं आहे. तेथून तांबड्या समुद्रापर्यंत आगगाडीचा फाटा गेला आहे. रबर, साखर, कापूस, निरनिराळी फळफळावळ, कॉफी वगैरेंचा मोठा व्यापार चालतो. जंगलें पुष्कळ, निबिड व जुनाट आहेत; त्यांत सिंह, वाघ, हत्ती वगैरे राहतात. अबनूस व महागनी यांसारखें मौल्यवान् इमारती लांकूड विपुल निघतें. कारखाने मात्र कांहींच नाहींत

एथिओपियाविषयीं अगदीं अर्वाचीन काळापर्यंत फारशी कांहींच माहिती नव्हती. टायगर, अमारा व शोका अशीं तीन परस्पर स्वतंत्र राज्यें पूर्वी ॲबिसिनियांत होऊन गेलीं. ॲबिसिनि-यांत हल्लीं ख्रिश्चन, मुसलमान व कांहीं ज्यूहि आहेत.

१८६८ सालीं ॲबिसिनियाचा बादशाहा थिओडोर यानें कांहीं इंग्रज अधिकाऱ्यांना कैद केल्यावरून इंग्लंडला त्यावर स्वारी करावी लागली होती. १८६९ मध्यें मेनेलेक बादशाहानें एथिओपिआला खरें स्वातंत्र्य प्राप्त करून दिलें. १७९६ मध्यें त्याच्या सैन्यानें इटलीचा अदुवा येथें पराभव केला. १९१३ मध्यें मेनेलेक मरण पावला आणि देशामध्यें कांहीं काळ अंदा-धुंदी माजली. १९१६ मध्यें नवीन बादशहाला पदच्युत करण्यांत आलें व मेनेलेक याच्या मुलीलाच गादीवर बसविण्यांत आलें व रास तफारी यास सर्वाधिकारी कारभारी नेमण्यांत आलें. कांहीं दिवसांनीं या दोघांत वितुष्ट उत्पन्न होऊन रास तफारी याला राजपद मिळालें. १९२३ मध्यें ॲबिसिनियाला राष्ट्रसंघाचा सदस्य करून घेण्यांत आलें. १९३५ मध्यें इटलीची वसाहत एरिट्रिआ व इथिओपिआ यांच्या सरहद्दीबाबत कुरापती निघून इटलीनें ॲबिसिनियावर स्वारी केली व १९३६ मध्यें रास तफारीनें देशत्याग केल्यावर सर्व देश इटलीनें आपल्या राज्यास जोडला व आफ्रिकेंतील आपल्या सर्व मुलखाकरितां इटॅलियन अधिकारी नेमून दिले. परंतु दुसऱ्या महायुद्धांत इटलीपासून दोस्तांनीं हा मुलूख जिंकून पुन्हा रास तफारीची गादीवर स्थापना केली. आतां स्वतंत्र हिंदुस्थानाचें एथिओपियाशीं दळण-वळण सुरू आहे.

**अंबीकर घराणें**—सुपेकर देशपांडे घराण्यांतील आपाजी माणकेश्वर हा मूळपुरुष. नांव दामाजी व आडनांव बुचके. मोरगांवजवळील अंबी गांवचे. आपाजीनें बाळाजी विश्वनाथ यास थोरातांच्या कैदेंतून सोडविलें, म्हणून शाहूनें त्यास सव्वा लक्षाचा फौजेचा सरंजाम करून दिला. हा पूर्वी लहान हुद्द्यापासून वर चढत गेला. हा पेशव्यांच्या उत्तरेकडील मोहिमांत होता. हा १७३६ सालीं वारला. त्याचा सरंजाम मुलांकडे चालू राहिला. सासवडचे पुरंदरे आणि अंबीकर यांच्या घराण्यांत सोयरिका पूर्वीपासून चालत आल्या आहेत. शेवटच्या बाजीरावानें होळकरांच्या पक्षाचा म्हणून अंबीकरांचीं वतनें वगैरे खालसा केलीं. अंबी व सुपें येथें अद्यापि वंशज राहत असून मोठाले वाडे आहेत.

**अबीर (बुका)**— हा पदार्थाचा खप हिंदुस्थानांत सर्वत्र व विशेषतः पंढरपूर, आळंदी, देहू, वगैरे वारकरी पंथांतील क्षेत्रांत व हरिकीर्तन व पुराण-प्रसंगीं होतो. बुका करण्याच्या पुढील कृ[illegible] आहेतः—

(१) पांढरा अबीर—(अ) वाळा, चंदन, कापूर काचरी व नागरमोथें पीठ यांचें मिश्रण. (आ) देवदार, लवंगा, दवणा, गवलाकचरा व वेलची यांचें मिश्रण. हा बंगाल्यांत विशेष आढळतो.

(२) काळा अबीर—(अ) चंदन, नागरमोथे, गवलाकचरा, वगैरे जिनसा वाळवून कुटतात अगर दळतात व त्यांत काळ्या रंगाकरितां कोळशाची पूड घालून वस्त्रगाळ करतात. (आ) सफेद चंदन २०, गुलाबकळी २०, पाच २०, बकुळीचीं फुलें १०, कृष्णागरु १०, जटामांसी ३, वाळा ५, लोबान ५, नागरमोथा ५, दवणा ५, मरवा ५ हीं या प्रमाणांत घेऊन वस्त्रगाळ कुटून त्यास केशरी पाण्याचा अगर चंदनी तेलाचा हात देतात. हा अबीर उंची असतो.

(३) चंदन, केशर, कापूर, कस्तुरी यांच्या मिश्रणाचा अबीर फिकट रंगाचा व महाग असून जैन लोक वापरतात.

**अवुल आला उल् माआरी** (९७३–१०५७)—एक प्रसिद्ध अरबी कवि व पत्रलेखक. जन्म सीरियांत. लहानपणींच पितृनिधन व त्यानंतर चार वर्षांचा असतांना देवीमुळें डोळे गेले. तरी पण अलेप्पो, अँटिऑक व ट्रिपोली येथील प्रसिद्ध पंडितांकडून ज्ञान मिळवून १००७ सालीं तो बगदादला आला तेव्हां त्याची पंडितांत गणना होऊं लागली. पुढें दोन वर्षांनीं मारा येथें येऊन मरेपर्यंत लेखन व अध्यापन केलें. 'सक्तउझ्झंद' व 'लुझू मिय्यात' हे काव्यसंग्रह व दोन काव्यसंहिता व पद्यसंहिता हे याचे ग्रंथ होत.

**अवुल फजल** (१५५१–१६०२)—अवुल फजल उर्फ अल्लामी हा शेख मुबारिकचा मुलगा. जन्म आग्र्याजवळ. हा ९ व्या शतकांत अरबस्तानांतून सिंध प्रान्तांत आलेल्या शेख मुसाच्या घराण्यांतील वंशज. मुबारिकचा बाप साधुवृत्तीनें फिरत फिरत अजमीरजवळ नागोर येथें येऊन राहिला. लहानपणीं मुबारिकच्या कुटुंबाची वाताहात झाली, तरी त्यानें अहमदाबाद व आग्रा येथें राहून विद्या संपादन केली. हा विद्वान् व स्वतंत्र विचाराचा असून जुन्या ग्रंथांचा खरेखोटेपणा स्वतंत्र बुद्धीनें पडताळून पाही. मुसलमानांच्या सुनी, शिया व सूफी या तीन पंथांपैकीं हा सुनी होता; पण पुढें शियापंथ स्वीकारून लूथरप्रमाणें हा धर्मसुधारक बनला. आग्रा येथेंच त्यास अवुल फैजी व अवुल फजल हे दोन मुलगे झाले. यांस त्यानें चांगलें शिक्षण देऊन स्वतःचे विचार शिकविले. बादशहानें यांस जमिनीची नेमणूक करून दिली होती; परंतु उलेमांनीं यास पतित ठरवून पकडण्याचा हुकूम मिळविला म्हणून हा पळून गेला. पुढें हीं दोन मुलें योग्यतेस चढलीं. पैकीं फैजी हा उत्तम भक्तिपुरःसर कवनें करी. तीं अकबरास आवडल्यामुळें यांचा छळ कमी झाला व दैव उघडलें (१५६८). अवुल फजल हा बुद्धिमान् व महत्त्वाकांक्षी होता. २०व्या वर्षापासूनच तो अध्यापन करी व निरनिराळ्या धर्मांबद्दल चर्चा करावी, असें त्याच्या मनांत असे; परंतु फैजीचा सत्कार व दरबारी आणि समयोचित वर्तन यांमुळें तो बेत त्यानें पुढें ढकलला. १५७४ त याचा फैजीच्या मध्यस्थीनें बादशहाशीं परिचय झाला. व तो फजल स्तुतिपाठक असून अकबरास दैवत समजत असल्यामुळें कायम टिकला. अकबरास सर्व लोकांस सारख्या तऱ्हेनें वागवावयाचें असल्यामुळें व हें वर्तन उलेमास पसंत नसल्यामुळें अकबर कचाट्यांत सांपडला होता. त्या वेळीं अकबरानें फजलच्या बुद्धिमत्तेचा उपयोग करून घेतला. या भावांनाहि बापाच्या झालेल्या छळाबद्दल सूड घ्यावयाचा होता. तेव्हां उलेमांचा शिरजोरपणा कमी करण्याच्या हेतूनें अकबरानें धार्मिक प्रश्नांचा निकाल आपल्या देखत वादविवाद करून करावा असा हुकूम सोडला. त्याप्रमाणें सन १५७६ पासून दर गुरुवारीं निरनिराळ्या धर्मांतील विद्वानांची सभा भरे. त्यांत वादविवाद होई, फजल प्रश्न विचारी व अभिप्राय मागवी व बादशहा फक्त ऐकून निकाल देई. या सभांत अखेर उलेमांचा पाडाव होऊन कुराणास अनुसरून नवीन फेरफार करण्याचा बादशहाचा अधिकार त्यांनीं मान्य केला. यामुळें तर बादशहास तो अधिकच प्रिय झाला. बादशहाच्या सान्निध्यांत याचा बराच काळ जाऊं लागला व याच्या सल्ल्यानें बादशहानें नवीन धर्म स्थापन केला. हें वर्तन मुसलमानांस पटलें नाहीं. म्हणून त्यांनीं कट करून यास मारण्याचें ठरविलें; त्यांत राजपुत्र सलीमहि होता. एकदां अचानक सलीम याच्या घरीं गेला तेव्हां ४० लेखक मुबारिकच्या कुराणाच्या टीकेच्या प्रती करीत होते. ही गोष्ट सलीमनें फजलचा कुराणावर विश्वास आहे, वगैरे म्हणून अकबरास सांगितली. म्हणून बादशहाची फजलवर इतराजी झाली होती, परंतु पुढें हें कारस्थान आहे असें कळल्यावर पूर्ववत प्रेम जुळलें. बापाविरुद्धच्या बंडांत फजल सामील होत नाहीं म्हणून दुष्ट सलीमनें ओर्च्छाच्या वीरसिंहाकडून १२।८।१६०२ रोजीं याचा खून करविला व त्याचें डोकें अलाहाबादेस आणून गलिच्छ जागीं टाकलें. हें वृत्त बादशहास कळतांच त्यास फार दुःख झालें. या कटांत सलीमच्या संबंधाची पूर्ण कल्पना नसल्यामुळें त्यानें त्यास शिक्षा केली नाहीं; परंतु वीरसिंहाचा मात्र छळ केला. अंत्री येथें फजलचें थडगें आहे. याचें लेखनकार्य मोठें असून त्यांत अपशब्द व खोडसाळपणा मुळींच नाहीं. 'अकबरनामा' हा त्याचा मोठा ग्रंथ असून त्याचे तीन भाग आहेत. तिसरा ऐन–इ–अकबरी याचे पांच पोट भाग असून त्यांत अकबराच्या राज्यव्यवस्थेचें वर्णन आहे. हा ग्रंथ १५९८ त पुरा झाला. याचें गैरट व ब्लाकमन यांनीं भाषांतर केलें असून त्यावर उत्तम अभिप्राय नमूद केला आहे. याशिवाय

इतरहि ग्रंथ फजलनें लिहिले. याचा मुलगा अबदुरहिमान फाजल-खान हा बिहारचा सुभेदार होता; तो १६१३ त मरण पावला.

**अबुल फराज** (८९७–९६७)—स्पेनमधील शेवटचा उमईद खलिफा मरवान याचा वंशज. प्रसिद्ध अरबी विद्वान् व कवि. जन्म इस्पहान येथें; पण वास्तव्य बगदादला. याची अरबी वाङ्मयाबद्दल ख्याति असून यानें आयुष्याचा उत्तरार्ध महंमदी जगांत हिंडण्यांत घालविला. हा शिया पंथी असून 'किताब उल् अघानी' हें याचें काव्य प्रसिद्ध आहे.

**अबुल फिदा** (१२७३–१३३१)—जन्म दमास्कस येथें. लहानपणापासून ख्रिस्ती धर्मयोध्याविरुद्ध लढून शौर्य गाजविलें. १३१० त हाम्हाचा सुभेदार व पुढें राजा झाला. राज्यकारभार व्यवस्थित असून पंडितांची चांगली संभावना करी. 'सुलतान मलिक उल् सय्यद' हा किताब असून याच्या 'मानव जातीचा संक्षिप्त इतिहास' या ग्रंथांत सृष्ट्युत्पत्तीपासून १३२९ पर्यंतची माहिती आहे; व 'भूगोल' या ग्रंथांत प्रमुख स्थळें अक्षांश-रेखांशासह कोष्टकरूपानें दिलीं आहेत. या ग्रंथाचीं लॅटिनमध्यें भाषांतरें झालीं आहेत. असा हा प्रसिद्ध अरबी इतिहास-भूगोलकार होता.

**अबुल फैजी** (१५४७–१५९५)—नागोरच्या शेख मुबारकचा मुलगा व अबुल फजलचा भाऊ. जन्म आग्रा येथें. मुबारकवर बालंट आल्यामुळें तो आपलीं मुलें आग्र्यासच ठेवून पळून गेला. पुढें चित्तोडच्या वेढ्याच्या वेळीं फैजीचीं कवनें वाचून बादशहानें यास भेटीस बोलाविलें. तेव्हां पुष्कळांस यास शिक्षाच होणार असें वाटलें; परंतु बादशहानें याचा सत्कार केला. याच्याकडे मुरादला शिकविण्याचें काम कांहीं काळ होतें व १५८८ त यास कविराज हा किताबहि मिळाला होता. इतिहास, तत्त्वज्ञान, वैद्यकी, पत्रव्यवहार व काव्य यांत याचा हात धरणारा कोणी नव्हता. कवितेंत फैजी म्हणून हा कल्याचें नांव घाली. यानें बादशहाच्या सांगण्यावरून नलदमयंती आख्यानावर फारशींत काव्य केलें होतें. हिंदु वाङ्मयाचा व शास्त्राचा या मुसलमानानेंच फक्त काळजीपूर्वक अभ्यास केला होता. संस्कृत काव्यें, तत्त्वज्ञान, भास्कराचार्यांची लीलावती व बीजगणित यांचींहि भाषांतरें यानें फारशींत केलीं असून कुराणावर 'सवात-उल्-इलहाम' ही टीका लिहिली आहे. याचे एकंदर १०१ ग्रंथ असून हा कांहीं काळ बादशहाचा वकील म्हणूनहि दक्षिणेंत होता. १५९३ च्या ऑगस्टांत मुबारक वारला, त्या वेळीं त्याच्या दोघां मुलांस फार दुःख झालें. मुबारकला शत्रू पुष्कळ असले तरी त्याच्या विद्वत्तेलाहि तितकाच मान होता. बापाच्या मागें फैजी दोनच वर्षांनीं मरण पावला.

**अबुशी**—बारीक पानांची सुईसरपट आपोआप उगवणारी ही एक वनस्पति असून ती बागांतून सर्वत्र उगवते. त्या वनस्पतीच्या अंगीं जे अंबट धर्म आहेत ते तिच्यांत ऑसिड आगझलेट ऑफ पोटॅशियम असल्यामुळेंच आहेत. त्यामुळेंच तिच्या अंगीं कापडावरील शाईचे डाग व लोहाचे डाग काढून टाकण्याचे धर्म आहेत. पानांच्या अंगीं शीतलपणाचे व रक्त शुद्ध करण्याचे धर्म आहेत. घट्टे, चामखीळ, इत्यादिकांवर अंबुशी चोळल्यानें ते बरे होतात. दाहाच्या जागीं पानें वाटून पोटिसाप्रमाणें लाविल्यानें त्या जागेचा ठणका व इतर लक्षणें दूर होतात. स्वर, अमांश, हिरड्यांतून रक्त जाणें ह्यांवर अंबुशी इतर औषधांशीं मिश्र करून देतात.

**अबू** (पहाड)—राजपुताना, सिरोही संस्थानांतील एक डोंगर व हवेचें आणि यात्रेचें ठिकाण. राजपुताना–माळवा आगगाडीच्या रस्त्यावर अबू रोड स्टेशन आहे, तेथून १७ मैल हा पहाड आहे. हा पहाड अरवली पर्वताचाच एक भाग आहे असें दिसतें. याचें सर्वांत उंच शिखर ५६५० फूट उंचावर आहे. यावर मखी तलाव व बरींच जैन देवालयें आहेत. त्यांतील ऋषभनाथाचें सर्वांत मोठें आहे. बहुतेक देवालयें वीरधवल वाघेला राजाच्या पदरच्या वस्तुपाळ आणि तेजपाळ या बंधुद्वयानें बांधलेलीं आहेत. दिलवाडा (देऊळवाडा पहा) फार प्रेक्षणीय आहे. लो. सं. ४६८०.

**अबूकीर**—भूमध्यसमुद्रावर इजिप्तच्या किनाऱ्यावरील एक खेडें व किल्ला. अलेक्झँड्रियाच्या ईशान्येस १४½ मैलांवर आहे. येथें जवळ रोमन, इजिप्त व ग्रीक लोकांच्या इमारतींचे अवशेष व आग्नेयीस २ मैलांवर कॅनोपसच्या भागाचे अवशेष सांपडतात. पूर्वेस नाइलच्या रोझेटामुखापर्यंत पसरलेल्या अफाट उपसागरांत १७९८ च्या ऑगस्ट १ ला नेलसनच्या व नेपोलियनच्या आरमारांची चकमक उडाली. १७९९ च्या जुलै २५ ला तुर्क व फ्रेंच यांमध्यें लढाई झाली. १८०१ च्या मार्च ८ ला सर आर्. ॲबरक्रॉंबीनें फ्रेंचांच्या आरमारास चांगलाच हात दाखवला.

**अबू तालीब कलिम**—हा हमदानचा प्रसिद्ध इराणी कवि. जहांगीर बादशहाच्या वेळीं हिंदुस्थानांत येऊन १६१९ मध्यें इराणला परत गेल्यावर पुनः शहाजहान बादशहाच्या दरबारीं आला. बादशहानें त्याला 'मालिक-उश्-शुआरा' (राजकवि) ही पदवी देऊन, त्याची सुवर्ण रौप्यतुला करून तें द्रव्य त्यास दिलें. १९।११।१६५१ रोजीं हा मृत्यु पावला. याचें 'झफर नामा-इ-शहाजहान' हें काव्य प्रसिद्ध आहे.

**अबू तालीब खान** (१७५२–१८०६)—हाजी महंमद बेगखानाचा मुलगा. यास १७७५ त असफउद्दौलाच्या दिव... इटावा व गंगायमुना यांमधील दुसऱ्या अनेक जि...

जिल्हाधिकारी नेमलें. दोन वर्षांनीं दिवाणाच्या मृत्यूनंतर बढती थांबल्यामुळें ६० हजारांचें वर्षासन घेऊन हा लखनौस परत आला. पुढें गोरखपूरचा कलेक्टर कर्नल अलेक्झांडर हेंने याचा दुय्यम होता. राजा बलभद्रसिंगाच्या वधाच्या भानगडींत रेसिडेंटच्या सांगण्यावरून पडल्यामुळें हा संकटांत सांपडला व युरोपियन अधिकाऱ्याबरोबर १७९९ त युरोपला गेला. यानें प्रवासाची रोजनिशी लिहिली असून ती १८०३ सालीं कलकत्त्यास प्रसिद्ध केली, व त्याचें भाषांतर १८१४ सालीं इंग्रजींत झालें. युरोपांत हा इराणी राजपुत्र म्हणून ओळखला जाई. 'खुलासत-उल्-अफकार' हा याचा ग्रंथ होय.

**अबू तालीब हुसैनी**—तैमूरलंगाच्या पहिल्या ४७ वर्षांच्या कारकीर्दीवरच्या फारशी ग्रंथाचें 'तुझुक-इ-तैमूरी' हें भाषांतर करणारा. हा ग्रंथ यानें शहाजहानला अर्पण केला. याचें इंग्रजींत भाषांतर चार्लस स्टुअर्टनें केलें.

**अबू बकर सिद्दिक** (५७०-६३४)—आयेषेचा बाप व महंमद पैगंबराचा सासरा. जन्म मक्का येथें. हा श्रीमंत असून याचें लोकांत दांडगें वजन होतें. महंमदावर अचल श्रद्धा होती व मुसलमानी धर्मप्रसारास याचा बराच उपयोग झाला. हा महंमदाजवळ हिजऱ्यापासून शेवटपर्यंत होता व इ. स. ६३२ त महंमदानंतर यास खलिफा म्हणून निवडलें. महंमदानंतर त्याचा जांवई अली याला वारसा न मिळतां अबूबकरला मिळाला म्हणून मुसलमानांत तंटे सुरू झाले व शिया आणि सुनी हे पक्ष पडले. यानें ग्रीक सम्राट् हरक्युलिस याचा पराभव करून इराण व सिरिया हे प्रान्त काबीज केले; परंतु लवकरच हा मृत्यु पावला. याची कबर महंमदाच्या कबरीपाशीं असून यानें महंमदाचीं वचनें लिहून काढलीं होतीं.

**अबू रोड**—दुसरें नांव खरारी. राजपुतान्यांतील सिरोही संस्थानांतील अबूला जातांना लागणारें शेवटचें रेल्वे-स्टेशन. हें बनास नदीवर वसलें आहे. लोकसंख्या ७ हजार. व्यापार मोठा असून येथून दतिया, इंदूर व मेवाड या संस्थानांशीं व्यापार चालतो. दवाखाना, शाळा वगैरे सोयी असून, येथून अबूला जाण्यास नागमोडी सडक असून मोटार-सर्व्हिस आहे.

**अबूसिंबेल**—आफ्रिकेंत नाईल नदीवरील न्युबिया देशांतील खडकांतील कोरीव देवालयें. हीं सूर्याचीं असून मूर्ती ६६ फूट उंचीच्या आहेत. दुसऱ्या रामेसीस राजाच्या वेळचे लढाईचे देखावेहि कोरले आहेत.

**अबू हसन कुतुबशाहा** (१६५८-१६८७)—गोवळकोंड्याचा शेवटचा सुलतान व पूर्वीचा सुलतान अबदुल्ला कुतुबशाहा याचा जांवई. हा आळशी व विलासी होता, तरी प्रजाहिततत्पर होता. याचा दिवाण मदनपंत (मादण्णा) हा हिंदु होता. मदनपंतानें महसुलाचा व इतर बाबींचा उत्तम बंदोबस्त ठेविला होता. त्यामुळें इतर दरबारी लोक सेनापतीसुद्धां बादशहाकडे तक्रारी करीत. परंतु बादशहा त्या ऐकत नसे. त्यामुळें १६८३ सालीं औरंगजेबानें केलेल्या स्वारींत याचे लोक त्याला मिळाले. यानें संभाजीची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. शेवटीं तो औरंगजेबाची मनधरणीहि करूं लागला. पण त्यानें तुम्ही परधर्मी लोकांस आश्रय देतां म्हणून याची गय केली नाहीं. १६८७ त औरंगजेबानें हें राज्य खालसा केलें; त्या वेळीं पुष्कळ दरबारी लोक त्यास फितूर होते. पुढें अबूहसनास दौलताबादेस ठेविलें. त्यामुळें प्रजा फार हळहळली. याच्या शौर्याच्या गोष्टी अद्यापहि लोकांच्या तोंडीं या प्रांतीं ऐकूं येतात. यास कवितेचा नाद होता.

**अबू हानिफा** (६९९-७६७)—एक मुसलमानी कायदेपंडित व धर्मशास्त्रलेखक. यानें धर्मशास्त्रावर कुफा येथें व्याख्यानें दिलीं. '*मसनंद*', '*फिक्ह लाम*' व '*मुआलिम-उल्-इस्लाम*' हे याचे प्रमुख ग्रंथ होत.

**अबे ओकुटा**—ब्रिटिश पश्चिम आफ्रिका, नायगेरियांतील एक आधुनिक सुखसोयींनीं सुधारलेलें गांव. वस्ती ७० हजार. गांवांभोंवतीं १८ मैल लांबीचा तट असून हें १८२५ सालीं वसलें असावें. या शब्दाचा अर्थ खडकाखालीं असा होतो. येथें खोबरेल तेलाचा फार मोठा व्यापार आहे.

**अंबेडकर, डॉ. भीमराव रामजी** (१८९३- )—हिंदुस्थान सरकारचे एक मंत्री व अस्पृश्यांचे पुढारी. यांचें शिक्षण सातारा व मुंबई येथें झालें. १९२१ मध्यें हे पदवीधर झाले. यानंतर यांस गायकवाड सरकारची शिष्यवृत्ति मिळाली व हे अमेरिकेमध्यें कोलंबिया युनिव्हर्सिटींत अर्थशास्त्राचा व समाजशास्त्राचा अभ्यास करावयास गेले. तेथें त्यांनीं एम्. ए. व पीएच्. डी. या पदव्या घेतल्या (१९१३-१९१६). यानंतर ते इंग्लंडमध्यें येऊन त्यांनीं इंडिया ऑफिस लायब्ररीमध्यें कांहीं संशोधनकार्य केलें व त्याच वेळीं बॅरिस्टरीच्या टर्म्स भरून बॅरिस्टर झाले. १९१७ मध्यें हे मुंबई येथील सिडनहॅम कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक झाले. नंतर पुन्हा ते जर्मनींत जाऊन बॉन युनिव्हर्सिटींत व कांहीं काल लंडन युनिव्हर्सिटींत अभ्यास करून त्यांनीं अर्थशास्त्र व व्यापार या विषयांत डी. एस्सी. ची पदवी मिळविली (१९२३). यांनीं साऊथबरो कमिटीपुढें मताधिकाराबद्दल १९१८ मध्यें साक्ष दिली. १९२६ मध्यें यांची चलन विषयावर रॉयल

कमिशनपुढें साक्ष झाली; यांनीं 'बहिष्कृत भारत सभा' या नांवाची संस्था स्थापन करून 'बहिष्कृत भारत' नांवाचें वर्तमानपत्र चालविलें. दलित वर्गाचे पुढारी म्हणून त्या वर्गात जागृति करण्याकरितां यांनीं आतांपर्यंत पुष्कळ परिश्रम घेतले आहेत व त्यांच्या अनेक परिषदांचे अध्यक्ष झाले आहेत. १९३० ते १९३२ मध्यें हे गोलमेजपरिषदेचे सभासद होते व जॉइंट पार्लमेंटरी कमिटीचेहि सभासद होते. जातीय निवाड्याबद्दल येरवडा येथें यांची महात्मा गांधींबरोबर पुष्कळदां चर्चा झाली व महात्मा गांधींनीं आरंभलेल्या प्राणांतिक उपोषणाच्या वेळीं या प्रश्नासंबंधीं त्यांच्यामध्यें प्रसिद्ध येरवडा करार झाला व त्यामुळें मूळच्या जातीय निवाड्यामध्यें फरक करावा लागला. मध्यंतरीं यांनीं आपण धर्मांतर करणार अशा केलेल्या घोषणेमुळें पुष्कळच खळबळ उडून गेली. हे एक नामांकित बॅरिस्टर असून यांनीं अनेक सार्वजनिक स्वरूपाच्या खटल्यांत काम केलें आहे. पाकिस्तान या विषयावर यांनीं एक ग्रंथ रचला असून त्यामुळेंहि मध्यंतरीं बरीच गडबड उडाली होती. हे मध्यवर्ती सरकारच्या कार्यकारी मंडळांत होते. मुंबई कायदेमंडळांतहि हे सभासद असून त्यांचें कार्य नांवाजण्यासारखें असे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सध्यां हे मध्यवर्ती सरकारांत कायदेमंत्री आहेत.

**अंबेला**—वायव्येकडील सरहद्द प्रांत, पेशावर जिल्ह्याच्या ईशान्य सरहद्दीच्या थोडी पलीकडे बुनेरमधील एक खिंड. इ. स. १८६३ सालीं ब्रिटिशांनीं जी मोहिम केली तीस अंबेला मोहिम असें नांव असून तें याच खिंडीच्या नांवावरून पडलें आहे.

**अॅबेलार्ड, पीटर** (१०७९–११४२)—स्कोलॅस्टिक पंथाचा एक फ्रेंच तत्त्ववेत्ता. त्यानें प्रथम पॅरीस शहरांत या पंथाच्या तत्त्वज्ञानाची शिक्षणसंस्था सुरू केली ती फार यशस्वी झाली. नंतर १११३ मध्यें नोत्रदाम शहरांतील कॅथेड्रल स्कूलचा हेडमास्तर म्हणून त्याला नेमलें. येथेंहि तो अत्यंत लोकप्रिय झाला. अशा स्थितींत वयाच्या ४० व्या वर्षी पॅरीस येथील १८ वर्षे वयाच्या हेल्वाइझ या नांवाच्या मुलीवर त्याचें प्रेम जडलें. ती मुलगी अॅबेलार्डबरोबर राहूं लागली व तिला एक मुलगा झाला. नंतर त्या दोघांनीं गुप्तपणें आपला विवाह लावला. नंतर हेल्वाइझ पॅरीस शहरीं आपल्या चुलत्याकडे परत आली. पण विवाह झाल्याचें ती कबूल करीना म्हणून तिच्या चुलत्यानें तिचे फार हाल केले. त्यांतून तिला सोडवण्याकरतां अॅबेलार्डनें तिला एका ख्रिस्ती धर्ममठांत नेऊन ठेवलें, त्यामुळें तिचा चुलता अॅबेलार्ड-वर फारच चिडला आणि त्यानें मारेकरी घालून अॅबेलार्डचें शरीर कायमचें जखमी केलें. अशा लज्जास्पद स्थितींत अॅबेलार्डनें मंक (मठवासी) ची दीक्षा घेतली. त्याचें पुढील आयुष्य अनेक हालअपेष्टांत गेलें. त्याच्यावर पाखंडीपणाचा आरोप होता. अखेर अत्यंत दुःखद स्थितींत तो मरण पावला. अलीकडे त्याला एका तत्त्वज्ञानी पंथाचा उत्पादक म्हणून मान देण्यांत आला असून त्याचीं प्रेमपत्रेंहि मूळ भाषेंत व इतर अनेक भाषांत प्रसिद्ध झालीं आहेत. पोप कवीनें त्याच्या चरित्रावर एक काव्य लिहिलें आहे.

**अॅबेस**— ख्रिस्ती स्त्रीमठाची प्रमुख. ही गुप्तमतदान पद्धतीनें निवडतात. ४० वर्षे वय व ८ वर्षांचा अनुभव ही लायकी असते. ही जागा तहहयात असते; व मठनिवासिनींना शिस्त लावणें व त्यांवर देखरेख ठेवणें हीं हिचीं कामें असतात. नेमणुकीच्या वेळीं क्रूस व दंड देण्याचा समारंभ होतो. ही स्त्री असल्यामुळें हिला अॅबटचे अधिकार नसतात. जर्मनींत ही जागा मानाची समजतात व राजकन्याहि अॅबेस होतात.

**अंबेहळद**—हीं झाडें रानांत होतात. तीं हळदीसारखीं दिसतात. फांदीच्या बुडख्याशीं गांठी असून त्यांस दर्प फार असतो. ही हळद बागायती साध्या हळदीप्रमाणें मसाल्याच्या उपयोगी पडत नाहीं. परंतु हिचें लोणचें घालतात. हिचे गुणधर्म साध्या हळदीपेक्षां जास्त महत्त्वाचे आहेत. ही रक्तविकारनाशक व रक्तप्रसारक आहे. उगाळून अंगास लावण्यानें कंडू वगैरे असल्यास ती शमन करणें व रक्त शुद्ध करणें हे मुख्य गुण ह्या हळदीचे आहेत. जंतावर अंबेहळद व सैंधव एकत्र वांटून मुलाच्या वयाच्या मानानें व शक्तीप्रमाणें देतात.

**अबोमे**—पश्चिम आफ्रिका, पुरातन डाहोमे (पश्चिम आफ्रिका) राज्याच्या राजधानीचें शहर. हल्लीं याच नांवाच्या फ्रेंच वसाहतींत आहे. लोकसंख्या ११०००. याच्या भोंवतालीं मातीची सहा वेशी असलेली भिंत होती, व ५ फूट खोल काम-ळीचीं झाडें असलेला खंदक होता व त्यांत कित्येक खिंडी होत्या. १८९२ सालीं हें शहर येथील राजा फ्रेंचांनीं पराभव केल्यामुळें पळून जात असतां जाळलें. तें पुनः १९०५ सालीं बांधण्यांत येऊन समुद्रकिनाऱ्याशीं रेल्वेनें जोडलें आहे व यांत कृत्रिम कारंजी विहिरींच्या योगानें पाणीपुरवठा केला आहे.

**अबोर** (अबोर मिरी)—अबोर म्हणजे 'रानटी' किंवा 'स्वतंत्र' असा आसामी भाषेंत अर्थ असून हा शब्द 'सरहद्दी-वरील टोळ्या' या अर्थानेंच वापरण्यांत येतो. अबोर नांवाची पर्वतश्रेणी आसामांत आहे तेथें हे लोक राहतात. बहुतेक अबोर हिंदुस्थान हद्दीबाहेर तिबेटांत राहतात. १९११ सालच्या शिरगणतींत ८५६ अबोर व ५७७१२ मिरी ब्रिटिश हद्दींत होते. यांपैकीं ३/४ हिंदु व १/४ वन्य आढळले. यांवर हिंदु किंवा बौद्ध धर्माचा परिणाम झालेला नसून वनदेवता व प्रत्येक रोगाच्या स्वतंत्र देवता यांच्यामध्यें आहेत. रोग्याला औषध न देतां

देवतांना बळी देतात. या देवता 'रिगम' नांवाच्या अपरिचित पर्वतावर राहतात. जगचालक देव एक असून हिंदूंप्रमाणें मर्त्यांचा न्यायाधीश 'जम' (यम) हा मानितात. 'अपोम' व 'एपोम' या अशुभ देवता असून त्यांचीहि भक्ति करतात. देवतांना वृद्ध व अशक्त बळी देत नाहींत व संस्कार चालविणारे 'देवदार' हे शकुन सांगणारे असतात.

हे लोक रानवट व आळशी असून बायका चिनी बायकांप्रमाणें दिसतात. पुरुष कमरेला धोतर, डोक्यास टोपी, कातडी किंवा लोंकरी कोट व गळ्यांत नीलमण्यांच्या माळा घालतात. स्त्रिया कमर व वक्षस्थळ निरनिराळ्या फडक्यांनीं झांकतात, व गळ्यांत मोठ्या माळा व कानांत कुंडलें व पायांत घट्ट नूपुरें घालतात. तरुण स्त्रिया कमरेस गोंडेदार काशाच्या तबकड्यांची सांखळी वापरतात. पुरुष व स्त्रिया दोघेहि गोंदतात व डोक्याबरोबर केंस कापतात. भाले, तलवारी, धनुष्य-बाण व खंजीर हीं हत्यारें असून अधिपतीस वंदनाच्या वेळीं कोंबड्या-सारखा आवाज करतात. स्वभाव क्रूर असल्यामुळें वस्ती एकत्र नाहीं. धंदा शेतीचा व त्यांत बायकांचा उपयोग होतो. बहुभर्तृकता व बहुपत्नीत्व क्वचित् दिसून येतें. लग्नसंबंधांत तरुणतरुणींना मोकळीक आहे. बायका बऱ्याच धीट असून पातिव्रत्य हा सद्गुण समजत नाहींत.

**अब्जदी**—मीर महंमद इस्माइलखान या कवीचें टोपण नांव. हा कर्नाटकचा नबाब उमदत-उल्-उमरा याचा शिक्षक असून याच्याकडून नबाबानें आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ १७६० सालीं 'अनवरनामा' हा ग्रंथ लिहून घेतला. त्याबद्दल नबाबानें यास 'मलिक उप-शूअरा' हा किताब व ६७०० रु. दिले. या ग्रंथांत पहिल्या इंग्रज-फ्रेंच युद्धाचें वर्णन आहे.

**अब्बास**—अबदुल मुत्तालिबचा पुत्र व महंमद पैगंबरचा चुलता. प्रथम हा आपल्या पुतण्याच्या महत्त्वाकांक्षी विचारांविरुद्ध होता, पण बदरच्या लढाईंत पराभव पावल्यावर त्यानें महंमदाचा धर्म स्वीकारला व मुसलमान बनल्यामुळें त्याचा जो उत्कर्ष झाला त्याबद्दल त्यानें ईश्वराचे फार आभार मानले. हुनैनच्या लढाईत यानें महंमदाला अतिशय मदत केली व त्याचा जीव वांचविला. अब्बास २१ फेब्रुवारी ६५३ त वारला. अब्बासचें थडगें मदिना येथें आहे.

**अब्बास** (दि ग्रेट) (१५५७-१६२८)— हा इराण देशचा राजा १५८६ मध्यें राज्यावर आला. त्या वेळीं तुर्क व उस्बेक तार्तर या लोकांनीं इराणवर मोठालीं अतिक्रमणें केलीं होतीं. उस्बेक लोकांचा पराभव करून त्यांनीं व्यापलेले प्रांत अब्बासनें परत मिळविले आणि अफगाणिस्तानचा बराच भाग आपल्या अमलाखालीं आणला. नंतर त्यानें तुर्क लोकांबरोबर युद्ध करून १६०५ मध्यें त्यांचा पराभव करून त्यांनीं जिंकलेले सर्व प्रांत परत आपल्या ताब्यांत घेतले. इराण देशाच्याबाहेर त्यानें आपलें साम्राज्य बरेंच वाढवलें व तें त्याच्या मृत्यूसमयीं तैग्रिस नदीपासून सिंधु नदीपर्यंत पसरलेलें होतें. इराणी लोक याला आपला सर्वश्रेष्ठ राजा मानतात.

**अब्बासीद**—मुसलमानी साम्राज्यांतील दोन मोठ्या घराण्यांपैकीं दुसऱ्या म्हणजे बगदादच्या घराण्यांतील खलीफांना सामान्यतः हें नांव दिलें जातें. आपण पैगंबराचा वडील चुलता अब्बास (इ. स. ५६६-६५३) याचे वंशज असल्यानें महंमदाच्या गादीवर उमईद वंशापेक्षां आपला हक्क जास्त आहे असे अब्बासी खलीफ मानीत. उमईद घराण्याच्या अमदानींत अब्बासी घराण्यांतील पुरुषांनीं त्या वेळच्या राज्यकर्त्यांचा लोकांत पाणउतारा करून त्यांची पत नाहींशी व्हावी म्हणून बरीच खटपट केली. दुसऱ्या मरवानच्या कारकीर्दींत या दोन घराण्यांतील वितुष्ट अगदीं विकोपास जाऊन त्यांचा शेवट अब्बासच्या चवथ्या पिढींतील पुरुष इब्राहिम इमाम याच्या बंडांत झाला. खोरासान प्रांतानें इब्राहिमला मदत दिली, पण त्याचा पराभव होऊन तो बंदिवासांत मरण पावला. याचा भाऊ अबुल-अब्बास यानें हा झगडा कायम ठेवून शेवटीं उमईद घराण्याचा पाडाव केला (इ. स. ७५०). व आपण खलीफ झाला.

या नवीन घराण्याच्या अमदानींत चैन व कलाकौशल्य बरेंच वाढून देशांत अशांतताहि वाढली. दुसरा खलीफ मनसूर यानें आपली राजधानी बगदादला नेली व आशियामायनर पादाक्रांत केला. हरून अलरशिद (७८६-८०९) आणि मामुन (८१३-८३३) यांची अमदानी पराकाष्ठेच्या उत्कर्षाची म्हणतां येईल; पण एकंदर साम्राज्य खालावलेलें दिसत होतें. आफ्रिका व खोरासान येथें स्वतंत्र राज्यें स्थापन झालीं. अब्बासी घराण्याचा शेवट मोकतासीम (८३३-८४२) यानें स्वसंरक्षणार्थ पदरीं ठेवलेल्या तुर्की गुलामांकडून झाला. या घराण्यांतील शेवटचा खलीफा मुतनवक्कील (तिसरा) ह्याला पहिल्या सलीमनें कैद करून कॉन्स्टांटिनोपलला नेलें तेव्हां हें घराणें बुडालें.

**अब्बासी बंदर**—इराणी आखाताच्या उत्तर किनाऱ्या-वरील बंदर व शहर. लोकसंख्या सुमारें १०,००० असून हवा रोगट व पाणी खराब आहे. पूर्वीचें नांव गोम्ब्रुन असून पहिल्या अब्बास शहानें हें १६१४ त पोर्तुगिजांपासून घेतलें म्हणून हें नांव पडलें. इंग्लिशांना येथें वखार घालण्याची परवानगी होती, व १६२० त डचांनाहि मिळाली. १६२२ त इंग्लिश व इराणी यांनीं होरमझचें बेट घेतल्यापासून त्यांचा बराचसा व्यापार येथून चालू लागला. १७ व्या शतकांत येथील व्यापार बराच वाढला होता,

पण १८ व्या शतकांत बुशायर येथून व्यापार सुरू झाल्यामुळें येथील भरभराट कमी झाली. १७५९ त फ्रेंचांनीं ब्रिटिशांच्या वखारीचा नाश केल्यावर ती पुनः बांधण्यांत आली तरी बराच काळ ती टाकून देण्यांत आली होती. १७४० त नादिरशहानें हें बंदर व बेट एका अरबी टोळीस खंडानें दिलें. पुढें बराच काळ हें बंदर व शहर मस्कतच्या राजाच्या ताब्यांत होतें व तो त्याबद्दल खंड देई. १८५६ त इराण व मस्कत यांमध्यें तह होऊन हें बेट व बंदर इराणचें समजून मस्कतकडे २० वर्षें १४,००० तोमानांस खंडानें असावें असें ठरलें. परंतु १८६६ त मस्कतचा राजा वारल्यावर इराणी लोकांनीं दुसऱ्यास २०,००० तोमानांस हें खंडानें दिलें. शेवटीं इराणी लोक व मस्कतचा सुलतान यांत तंटा होऊन ब्रिटिशांच्या मध्यस्थीनें ३०,००० तोमानांस खंडानें पुन्हां मस्कतकडे राहिलें. १८६८ त इराणी बंडखोरांनीं मस्कतच्या सुलतानाला पळवून लावून आतां यावर आपला गव्हर्नर नेमला आहे. येथें बराच मोठा व्यापार चालत असून येथून बाहेर देशीं माल जातो, व इराणला व खोरासानला लागणारा माल देशांत येतो. येथें टपाल व तारऑफिस असून ब्रिटिश इंडिया स्टीम नॅव्हिगेशन कंपनीच्या टपाल बोटी थांबतात. ब्रिटिश व रशियन वकील येथें आहेत.

**अब्बिगेरी**—धारवाड जिल्ह्यांतील रोणच्या दक्षिणेकडील तीन हजार वस्तीचा गांव. ईश्वरदेव व ज्योतिर्लिंग यांचीं देवळें असून त्यांत शिलालेख आहेत.

**अँब्युलन्स**—(रुग्णपथक). रणांगणांत सैन्याबरोबर असलेलें एक लष्करी वैद्यपथक. लढाईमध्यें जखमी झालेल्या व आजारी पडलेल्या इसमांना तात्कालिक औषधोपचार व शस्त्रक्रिया करणें हें या पथकाचें काम असतें. आणि म्हणून जेथें प्रत्यक्ष लढाई चालू असते तेथून अगदीं नजीक या पथकाचा मुक्काम असतो. प्रथम फ्रेंचांनीं ही सोय काढली; नंतर ब्रिटिश लष्करांत या नांवाचें पथक प्रथम १९०५–६ सालीं ठेवण्यांत आलें. प्रत्येक लष्करी पलटणी (डिव्हिजन) बरोबर तीन लष्करी रुग्णपथकें असतात व ब्रिगेडबरोबर असलें एक पथक असतें. या पथकांत कांहीं लोक रोग्यांची शुश्रूषा करण्याचें काम करतात व कांहीं रोग्यांना वाहून नेण्याचें काम करतात. या वाहतुकीकरितां घोडे, खेचरें व मोटारी यांचा उपयोग करतात.

लढायांखेरीजहि या पथकाचा उपयोग मोठाल्या शहरांतून रोगी किंवा जखमी यांना इस्पितळांत पोंचविण्यासाठीं करण्यांत येतो.

**अब्राकॅडब्रा**—या संज्ञेची उत्पत्ति प्राच्य देशांत झाल्याचें सांगतात. पण नक्की उगम माहीत नाहीं. दुसऱ्या शतकांतील सेव्हेरस सामोनिकसच्या कवितेंत प्रथम हा शब्द आढळतो. याचा मंत्र म्हणून उपयोग करितात. एका कागदावर हा शब्द पहिल्या ओळींत लिहून नंतर खालच्या ओळींतून एकेक शेवटचें अक्षर गाळण्यांत येतें व शेवटीं एकाच अक्षराची शेवटची ओळ होते व या लेखनाची आकृति त्रिकोण बनते. हा कागद ताईतांत घालून कांहीं थंडीतापासारख्या रोगांवर उपाय म्हणून गळ्यांत बांधतात.

**अब्राहाम**—इस्राएलांचा पूर्वज व बायबलमध्यें उल्लेखिलेल्या मूळपुरुषांपैकीं पहिला. याच्यासंबंधानें पुष्कळ दंतकथा व आख्यायिका सांगितल्या आहेत.

हा टेरेहाच्या तीन मुलांपैकीं एक. हा 'उर' शहराहून कॅननकडे आपली बायको सारा व पुतण्या लोट यांसह जात असतां 'तूं राष्ट्र निर्माण करशील' अशी ईश्वराज्ञा झाली. म्हणून हा पुढें इजिप्तला आला व तेथें त्याला एका दासीपासून आयझॅक हा मुलगा झाला. 'तुझी संतति ईजिप्त देशांत राहील' या ईश्वरी साक्षात्काराच्या स्मरणार्थ यानें आपलें व बायकोचें नांव बदललें व मुलाची सुंता केली. ईश्वराची मुलगा बळी देण्याची आज्ञा पाळीत असतां देवदूतानें यास मनाई केली; ईश्वरानें संतुष्ट होऊन 'तुला पुष्कळ मुलें होतील' असा आशिर्वाद दिला. यानें आपली जिंदगी आयझॅकला दिली. हीं नवरा–बायको वृद्धपणीं मरण पावलीं.

अब्राहामच्या चरित्रास ऐतिहासिक महत्त्व नसून धार्मिक आहे. हिब्रू लोक यास ध्येयाचें प्रतीक, राष्ट्रनिर्माणकर्ता, धर्मसंस्थापक, मूळपुरुष व ईश्वर याचा पाठीराखा म्हणून पूज्य मानतात.

**अब्रूनुकसानी**—जर एका इसमानें दुसऱ्या इसमाबद्दल योग्य कारण नसतां खोटे शब्द तिसऱ्या इसमाजवळ बोलून दाखविले, किंवा तशा प्रकारचा लेखी मजकूर त्याला कळविला, आणि त्यामुळें त्या तिसऱ्या इसमाच्या मनांत सदर इसमाबद्दल द्वेष, तिरस्कार, किंवा उपहासाची वृत्ति उत्पन्न होत असेल तर अब्रूनुकसानी झाली असें कायदा मानतो. पण या कायद्याला अनेक अपवाद आहेत. अशा प्रकारचा मजकूर किंवा भाषा वापरणें हें कायद्याप्रमाणें कर्तव्य असेल तर अब्रूनुकसानी होत नाहीं. उदाहरणार्थ—एखाद्या मालकानें त्याच्याकडे पूर्वी असलेल्या नोकराच्या वर्तनाबद्दल त्याच इसमाला नोकर ठेवूं इच्छिणाऱ्या मालकाला खरी माहिती सांगितली तर तो गुन्हा होत नाहीं.

इंडियन पीनल कोडमध्यें बेअब्रूच्या गुन्ह्याची व्याख्या आहे ती अशी—जो कोणी तोंडी किंवा लेखी शब्दांनीं, किंवा खुणांनीं, किंवा इतर दृश्य साधनांनीं दुसऱ्या इसमाच्या नांवलौकिकाला कमीपणा येईल असें कृत्य जाहीरपणें करील किंवा तसा मजकूर किंवा चित्र लिहून किंवा छापून प्रसिद्ध करील

कृत्याला बेअब्रूचा गुन्हा म्हणतात. मृत माणसांबद्दल असें कृत्य केल्यानें त्याच्या कुटुंबियांचीं किंवा नजीकच्या नातलगांचीं मनें दुखवतील, तर तोहि गुन्हा आहे. एखाद्या संस्थेची किंवा कंपनीची बेअब्रू करणें हाहि गुन्हा आहे. या गुन्ह्याला दहा अपवाद सांगितले आहेत ते—(१) सार्वजनिक हित साधण्याकरितां, (२) सरकारी नोकरांचे सरकारी कामकाजाबद्दल टीकात्मक, (३) कोणाहि इसमाच्या सार्वजनिक प्रश्नाबाबतच्या वर्तनाबद्दल, (४) न्यायकोर्टांतील कामकाज, कोर्टांचे निकालाबाबत बातमी, (५) दिवाणी किंवा फौजदारी खटल्याच्या निकालाबाबत सद्हेतूनें केलेली टीका, किंवा त्या खटल्यांतील पक्षकार, साक्षीदार यांच्या त्या खटल्याबाबतच्या वर्तनाबद्दल टीका, (६) एखाद्याचें सार्वजनिक भाषण, लेख, नाटक-सिनेमांतील पार्ट, वगैरेंबाबत टीका, (७) आपल्या अधिकाराखालीं असलेल्या इसमाबद्दल, उदाहरणार्थ न्यायाधिशानें साक्षीदाराबद्दल किंवा हाताखालील नोकराबद्दल, आईबापांनीं आपल्या मुलांबद्दल, शिक्षकानें विद्यार्थ्यांबद्दल सद्हेतूनें केलेली टीका, (८) कायदेशीर अधिकाऱ्याकडे नोकराबद्दल तक्रार, (९) एखाद्याच्या वर्तनाबद्दल त्या इसमाच्याच हिताकरितां किंवा सार्वजनिक हिताकरितां टीका, (१०) सावधगिरीची सूचना, असा मजकूर प्रसिद्ध करणें, हा गुन्हा नाहीं (कलम ४९९).

तोंडी अब्रूनुकसानी—इंग्लिश कायद्यांत तोंडानें शब्द बोलून एखाद्या इसमाची बेअब्रू करणें या कृत्याला 'स्लँडर' म्हणतात. स्लँडर (तोंडी बेअब्रू) आणि 'लायबेल' (लेखी बेअब्रू) या दोहोंमध्यें फरक आहे. (१) लायबेल म्हणजे तसा मजकूर लिहून केलेली बेअब्रू, (२) स्लँडर उर्फ तोंडी बेअब्रू हा सामान्यतः फौजदारी गुन्हा होत नाहीं. तोंडी बेअब्रूबद्दल दिवाणी कोर्टांत नुकसानभरपाई मागण्याचा दावा लावतां येतो, पण अशा दाव्यांत वादीला सदर बेअब्रूमुळें प्रत्यक्ष नुकसानी सोसावी लागली आहे असें शाबीत करावें लागतें. पुढील बाबतींत मात्र स्लँडर हा फौजदारी गुन्हा मानला जातो. तो प्रकार असा—असे बेअब्रूकारक शब्द राजद्रोहांचा किंवा भयंकर अनैतिक वर्तनाचा आरोप करणारें असतील, किंवा असले शब्द मॅजिस्ट्रेटनें आपल्या हुद्याचें काम करीत असतांना उचारले असतील, किंवा द्वंद्व युद्धाला आव्हान देणारे ते शब्द असतील तर सदर शब्द फौजदारी गुन्हा होतो. हिंदुस्थानांत पिनल कोडांतील अब्रूनुकसानीच्या कलमांत तोंडी व लेखी असा फरक केलेला नाहीं (इंडियन पिनल कोड कलम ४९९ पहा).

**अब्लुर**—धारवाड जिल्ह्यांतील कोडच्या पश्चिमेस दोन मैलांवरील ८०० वस्तीचें खेडें. येथें बसप्पा व सोमनाथ यांचीं देवालयें असून त्यांवर १२ व्या शतकांतील शिलालेख आहेत.

**अभंग**—मराठींतील एक जुनें वृत्त. हें चार चरणी ओळींचें असून अशा ओळी दोनपासून दोनशें देखील सांपडतात. या चरणांच्या अक्षरांचा, मात्रांचा, किंवा गणांचा एक निश्चित नियम असा नाहीं. मोठ्या अभंगास चार चरण तर लहान दोन चरणी अभंगहि असतात. (उदा.-जरी व्हावा तुज देव। तरी सुलभ उपाव॥). पण अभंगाचें रचनासौकर्यच त्याच्या असंख्य निर्मितीला कारण झालें आहे. भक्तिमार्गाचा महाराष्ट्रांत मोठा प्रसार या अभंगवाणीनेंच झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुकुंदराज, ज्ञानेश्वर, चांगदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, निळोबो, रामदास, इत्यादि गाढे संतकवि तर आहेतच, पण स्टिफेन्ससारखा खिस्ती, शेख महंमदसारखा मुसलमान व मुक्ताबाई-जनाबाई-बेणाबाईसारख्या स्त्रिया या वृत्तांत आपलें रसाळ काव्य ओततात. अर्वाचीन कवि या वृत्ताला जवळ करीत नाहींत. तथापि भक्तिरसाची तंद्री याच्याद्वारेंच कांहीं आधुनिक प्रसिद्ध कवि प्रकट करतांना पाहिले म्हणजे अभंगाची छाप अद्यापि किती आहे हें पटतें. या वृत्ताला एक प्रकारचें परंपरागत पावित्र्य आलें आहे.

**अभयगिरि**—सिंहलद्वीपची प्राचीन राजधानी अनुराधपूर येथील एक प्रख्यात मठ. अभय नांव असलेल्या वट्टगामिनी राजानें हा मठ स्तूपाशेजारीं बांधला म्हणून अभयगिरि म्हणतात. या मठवाशांत व महाविहार मठांतील भिक्षूंत प्रथम वैयक्तिक व पुढें धर्ममतांत स्पर्धा सुरू झाली. महासेन (इ. स. २७५-३०२) राजानें महाविहार मोडून अभयगिरीस दिला, परंतु महाविहार पुढें श्रेष्ठ पदास चढला.

**अभयदेवसूरि**—या नांवाचे पांच प्रमुख जैन सूरि होऊन गेले. एक बृहत् खरतरगच्छाचा संस्थापक असून यानें कित्येक ग्रंथ लिहिले आहेत. याचा मृत्युकाल सं. ११३९ असावा. दुसरा गुजराथच्या कर्णराजाचा गुरु होता. यानें गिरनारच्या यात्रेकरूंवरील कर माफ करविले. यानें बरेच ब्राह्मण जैन केले. तिसरा एक रुद्रपल्लीयगच्छाचा मोठा पुरस्कर्ता होता.

**अभयसिंह** (१७२९-५०)—हा जोधपूर राजा संवत् १७८१ त बाप अजितसिंह याचा खून करून गादीवर आला. पुढें यानें मंदोडच्या रावइंद्राकडून नागोर घेऊन बखतसिंह या भावास दिलें. पश्चिम सरहद्दीवरील भूम्या लोकांचीं बंडें मोडीत असतां दिल्लीहून बादशहाचें पाचारण आलें. बादशहानें शहाजादा जुंगली याचें बंड मोडण्यास पाठविलें असतां, गुजराथच्या सखुलंदखानाचा पराभव केला व गुजराथची सुभेदारी मिळविली (टॉड). इ. स. १७३० सालीं अजमीरच्या सुभेदारीवर आला. मेढत्यावरून जोधपूरला येऊन सखुलंदखानावर चाल केली. सिरोहीवर चाल केली असतां तेथील राजानें लढाई न

करतां आपली पुतणी यास दिली. हिच्याच पोटीं गादीचा वारस रामसिंह जन्मास आला. इ. स. १७३१ सालीं पालनपूर-सिद्धपूर-मार्गें अहमदाबादेवर चाल केली व सरबुलंदखानास शरण यावयास लावलें. याचें पिलाजी गायकवाडाशीं वांकडें होतें. यानें त्याचा खून करविला. पिलाजीचा मुलगा दमाजी यानें अभयसिंहाला जेरीस आणलें.

**अभिजित्**—ज्योतिषांत हें एका नक्षत्राचें नांव असून इंग्रजींत या तारकापुंजास लायरा म्हणतात; परंतु या नक्षत्राचा क्रांतिवृत्ताशीं संबंध नाहीं. वैदिक वाङ्मयांत या नक्षत्राचा उल्लेख आहे, त्यांत अभिजित् शब्द एकवचनांत योजिला आहे. त्यावरून एकच तारा होता असें वाटतें. परंतु उत्तरकालीन ग्रंथांत या नक्षत्रांतील तारकांची संख्या तीन दिलेली आढळते.

लायरा याचा अर्थ स्वरमंडल किंवा सारंगी असा आहे. पाश्चात्य ज्योतिर्विदांनीं यांत १० ते १७ तारकांची नोंद केली आहे. यांतील लायरी उर्फ व्हीगा ही तारका सर्व उत्तर गोलार्धांत तेजस्वीपणांत दुसऱ्या क्रमांकाची आहे.

पंचांगांत २१ व्या नक्षत्राचा चतुर्थपाद व २२ व्या नक्षत्राचा १६ वा भाग मिळून होणाऱ्या १९ दंडांइतक्या काळास अभिजित् म्हणतात. हें २८ वें नक्षत्र असून मध्यान्हपूर्व एक घटका व मध्यान्होत्तर एक घटका या कालाचें अभिजिन्मुहूर्त हें नांव आहे.

**अभिधम्म**— तिपिटक या पाली धर्मग्रंथसमूहांतील एक पिटक. याचा अर्थ श्रेष्ठ धर्म किंवा धर्मतत्त्वें म्हणजे अध्यात्म अथवा इंग्रजींतील मेटॅफिजिक्स. परंतु हा विषय यांत विशेषेकरून नसून यांत मानसशास्त्रदृष्ट्या नीतितत्त्वज्ञान प्रतिपादिलें आहे. अभिधम्मांत सात ग्रंथ येतात. या पिटकाचा काल इ. स. पू. ४००–२५० यांच्या दरम्यान असावा. यापैकीं धम्मसंगणि हा जुना व कथावत्थु हा नवा ग्रंथ असावा. याचीं संस्कृत भाषांतरें नामशेष असून चिनी भाषांतरें आढळतात. पुढील कालीं हे ग्रंथ अध्यात्मांत मागें पडले व महायानपंथाच्या अध्यात्मशाखेंत याचा उल्लेखहि नाहीं, तथापि यास मान असून त्याच्या अभ्यासकांना अभिधाम्मिक म्हणत व यांचा दर्जा बौद्ध भिक्षुंमध्यें मोठा होता, असें सिंहिलच्या शिलालेखावरून दिसतें.

**अभिधम्मत्थ**— बौद्ध लोकांच्या मानसशास्त्रावरील व नीतिशास्त्रावरील अभिधम्मत्थसंग्रह हें छोटें पण अत्यंत महत्त्वाचें पुस्तक आहे. याचा कर्ता अनुरुद्ध. हा १२ व्या शतकांत होऊन गेला. अभिधम्म-अध्ययनाचें केंद्र असणाऱ्या ब्रह्मदेश व सिलोन यांमध्यें हें पुस्तक आधारभूत असून यावर भाष्यें व अनेक भाषांत भाषांतरें झालीं आहेत. अभिधम्मांतील सात प्रकरणांतील पदार्थांचा ऊहापोह करून त्यांचा संग्रह अनुरुद्धाचार्यांनीं यांत केला आहे. एकंदर नऊ प्रकरणें आहेत. शेवटचें नववें प्रकरण सिलोन व ब्रह्मदेश यांत फारच लोकप्रिय आहे.

**अभिधर्मकोश**—नीतिशास्त्र, मानसशास्त्र व अध्यात्मशास्त्र यांची चर्चा करणारा सूत्रकारिकाबद्ध ग्रंथ. कर्ता बौद्ध पंडित वसुबंधु. हा सर्वास्तिवादी पंथीय असून याचा काल ५ व्या शतकाचा शेवट. या ग्रंथांत ६०२ कारिका व त्यांवर वृत्ती आहेत. ग्रंथाच्या संस्कृत प्रती नामशेष असून चिनी व जपानी प्रती उपलब्ध आहेत; पैकीं चिनी प्रती जुन्या आहेत. पहिली प्रत परमार्थ या हिंदु साधूची असून दुसरी भाषांतरित आवृत्ति ह्युएनत्संग यानें इ. स. ६५१–५४ त रचिली. यावर 'अभिधर्मकोशव्याख्या' हा टीकाग्रंथ आहे. ही टीका यशोमित्राची असून यापूर्वीहि दोनतीन टीका झाल्या आहेत; त्यांच्या प्रती तिबेटांत आढळतात. वसुबंधूनें सर्व पंथांतील गहन तत्त्वांच्या केलेल्या विशदीकरणावरून त्याचे अलौकिक गुण दिसून येतात.

**अभिनंद**—याला गौडाभिनंद असेंहि म्हणत. जन्म काशींत परंतु वस्ती बंगाल्यांत. याचा काल इ. स. ८४० हा असावा. हा कवि असून याचे योगवासिष्ठ-कथासार व कादंबरी-कथासार इत्यादि ग्रंथ आहेत. रामचरित-महाकाव्याचा कर्ता व हा निराळा असावा असें ऑफ्रेक्ट सूचीवरून दिसतें.

**अभिनय**—वेष, भाषण, चेष्टा, मनोविकार इत्यादि गोष्टींनीं एखाद्याचें अनुकरण करणें. नाट्य, नृत्य, नकला, हरदासकथा, इ. त अभिनयाची अत्यंत आवश्यकता असते. संस्कृत वाङ्मयांत विशेषतः भरताचें नाट्यशास्त्र आणि नंदिकेश्वराचें 'अभिनयदर्पण' यांत अभिनयशास्त्र विस्तारानें वर्णिलेलें आढळेल. अभिनयाचे मुख्य चार प्रकार : आंगिक, वाचिक, आहार्य आणि सात्त्विक. आहार्यांत पोषाखाचें अनुकरण तर सात्त्विकांत विविध भावना आणि विकार व्यक्त करण्याच्या पद्धती येतात. निरनिराळ्या अंगविक्षेपांनीं आणि हातापायांच्या मुद्रांनीं पाहिजे तें रस आणि भावना प्रेक्षकांच्या मनांत उत्पन्न करतां येतात. मूकनाटकें आणि नृत्यें यांतून अभिनयाला फार मोठा वाव असतो. अंगाभिनयांत अंग, प्रत्यंग व उपांग असे तीन प्रकार पडतात. भिन्नभिन्न शरीरावयवांच्या विशिष्ट हालचालीवरून विशिष्ट अवस्था आणि प्रसंग दर्शविले जातात. दक्षिण हिंदुस्थानांतील नर्तन या अभिनयांनीं होत असतें. आज पुन्हा नृत्यकलेला प्रतिष्ठा लाभत चालली असल्यानें आतां अभिनयाचें पद्धतशीर शिक्षण मिळण्याची व्यवस्था चांगली होईल अशी आशा वाटते.

पाश्चात्य देशांत ग्रीक लोकांमध्यें ही कला विशेषत्वानें होती अभिनयपटु नटांसाठीं मुद्दाम एस्किलस, सोफोक्लीज, [illegible]

नाटकें लिहिलीं. रोमनकाळांत या कलेला चांगलें उत्तेजन मिळालें व मध्ययुगांत धर्मसंस्थेच्या पुरस्कारानें अभिनयाला ज्यांत पुष्कळ वाव आहे अशीं अद्भुत पौराणिक नाटकें (मिरॅकल प्ले) होऊं लागलीं; इंग्लंडच्या एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीनंतर अठराव्या शतकांत स्त्रियांचीं कामें स्त्रियाच करूं लागल्या. गॅरिकची जोडीदार सान्हा सिडॉन्स प्रसिद्ध अभिनेत्री होती. १९ व्या शतकांत अभिनय जे वाढले ते वाढले. पुढील शतकांत इतर नाट्यसाधनांची भर पडली पण अभिनयाची मर्यादा संपली होती. आधुनिक काळांत हेनरी आयर्व्हिंग आणि एलेन टेरी हे दोन अभिनयपटू इंग्लंडांत गाजले. महाराष्ट्रांत सुप्रसिद्ध शाहूनगरवासी नाटक मंडळींतील गणपतराव जोशी व महाराष्ट्र नाटक मंडळींतील श्री. भागवत हे प्रसिद्ध अभिनयपटू म्हणून पुढें आले.

**अभिनयदर्पण**— या ग्रंथाचा कर्ता नंदिकेश्वर. यांत नृत्यकलेंत उपयोगी पडण्याच्या अभिनयाचे नियम विस्तारतः दिले आहेत.

**अभिनवकालिदास**— १. हा काश्यपगोत्री, 'शृंगारकोश भाण' या ग्रंथाचा कर्ता.

२. 'अभिनवभारतचंपू' व 'भागवतचंपू' या काव्यांचा कर्ता.

**अभिनवगुप्त** — एक काश्मीरी शैव पंडित. काल अजमास इ. स. दहावें शतक. याचा बाप चुखल. हा क्षेमेंद्र–मम्मट यांच्या पूर्वींचा व भट्टनारायण वगैरेंच्या नंतरचा. यानें ईश्वरप्रत्यभिज्ञानविमर्शिनी, ध्वन्यालोकालोचन व परमार्थसार आदिकरून १५–१६ ग्रंथ लिहिले; व ही ग्रंथरचना इ. स. ९९३–१०१५ पर्यंत झाली असावी.

**अभिनवगुप्ताचार्य**— माधवाचार्यांच्या शांकरदिग्विजयांतील ऐतिहासिक किंवा काल्पनिक व्यक्ति. आचार्यांनीं याचा पराभव केल्यावर, याच्या मांत्रिक करणीनें आचार्यांस झालेला भगंदर रोग पद्मपादानें मांत्रिक सामर्थ्यानें घालविला, व अभिनवगुप्त मेला असें या काव्यांत वर्णन आहे.

**अभिनवबाण** (सु. १३७५–१४२५) —(वामनभट्ट बाण). कोंडवीडूच्या रड्डीवंशीय वेम राजाच्या पदरचा राजकवि. 'वीरनारायणचरित', 'पार्वती–परिणय', 'शृंगारभूषणभाण' व 'शर्वचरित' हीं याचीं नाटकें होत.

**अभिमन्यु**—पांडवांपैकीं अर्जुन व कृष्णाची बहीण सुभद्रा यांचा मुलगा. हा दीर्घबाहु होता. यानें दशविध धनुर्वेद, तशीच मानुप आणि दिव्य अस्त्रविद्या अर्जुनापासून संपादन केली होती; व त्यांतील याचें कौशल्य व हस्तचापल्य पाहून बलरामानें यास रौद्रनामक उत्तम धनुष्य दिलें होतें. हा अर्जुनाप्रमाणें पराक्रमी होता. कुरुयुद्धांत द्रोणाचार्यांनीं चक्रव्यूहाची रचना केली. त्या वेळीं अर्जुन 'संशप्तकां'कडे गुंतला होता. व त्याच्याशिवाय चक्रव्यूह भेदणारा कोणी नव्हता. त्या वेळीं धर्माच्या अनुमतीनें अभिमन्यु व्यूहभेदनकार्यास तयार झाला. द्रोण, कर्ण यांसारख्या योद्धयांस तोंड देऊन हा व्यूहांत शिरला, व त्यानें शौर्य गाजविलें; परंतु एकटा असल्यामुळें युद्ध चालू असतां बेशुद्ध पडला. या वेळीं दुःशासनपुत्रानें याच्या डोक्यांत गदा मारली. त्यामुळें मस्तक चूर्ण होऊन हा मेला व जयद्रथानें यास लाथ दिली. बलरामाची मुलगी वत्सला ही याची एक बायको व विराटकन्या उत्तरा ही दुसरी. या वेळीं उत्तरा गर्भवती असून तीस जो मुलगा झाला तोच परीक्षित् राजा होय.

**अभिरी**—हा राग आसावरी थाटांतील जन्य रागांपैकीं एक आहे. ह्याच्या आरोहांत ऋषभ व धैवत हे वर्ज्य असून अवरोह सात स्वरांनीं होतो. म्हणून याची जाति औडुव–संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी निषाद आहे. ह्याचा गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर मानतात. याचें स्वरूप भीमपलास रागासारखें भासतें. परंतु भीमपलास रागांत धैवत तीव्र आहे व यांत तो कोमल आहे.

**अभिषेक**—राज्यारूढ होतांना करावयाचा विधि. हा प्रथम ऐतरेय ब्राह्मणांत शेवटच्या पंचिकेंत विस्तारानें आढळतो पण अभिषिक्त व्यक्ति सार्वभौम असली पाहिजे, असें दिसतें. महाभारतांत युधिष्ठिराचे दोन अभिषेक वर्णिले आहेत. अशोकानें राज्यावर आल्याबरोबर अभिषेक करवून न घेतां पुढें चार वर्षांनीं दिग्विजय केल्यानंतर करवून घेतला. सार्वभौम नसणारे राजे देखील अभिषेक करवून घेत. युवराज्याभिषेक प्रथम व नंतर राज्याभिषेक असा क्रम असे. राजमंत्र्यांनाहि अभिषेक होता असें हर्षचरितावरून वाटतें. महाराष्ट्रांत शिवाजीचा राज्याभिषेक प्रसिद्ध आहे. त्याचीं वर्णनें बखरी आणि इंग्रज वकील यांनीं मोठीं रसाळ केलीं आहेत.

पाश्चात्य राष्ट्रांत पहिलें रोमनसाम्राज्य लयाला गेल्यावर ख्रिस्ती राजे पोपकडून राज्याभिषेक करवून घेऊं लागले. इंग्लिश राजे वेस्टमिनिस्टर ॲबेमध्यें व स्कॉटिश राजे स्कोन येथें अभिषेक करवून घेत. आज इंग्लंडचा राजा राज्यावर आल्यानंतर एका वर्षानें हा विधि करतो.

**अभिसरण**— (सर्क्युलेशन). प्राण्याच्या शरीरामध्यें हृदयापासून रक्तवाहिनींच्या साहाय्यानें शरीराच्या निरनिराळ्या भागांत रक्त वाहत जाऊन ते शिरांच्या द्वारां पुन्हा हृदयामध्यें परत येणें, या क्रियेस रुधिराभिसरण असें म्हणतात. या क्रियेमुळें शरीरांतील सर्व पेशींस जीवनास आवश्यक असलेलीं पोषणद्रव्यें व प्राणवायु यांचा पुरवठा होतो, व त्यामुळें त्या आपापलें

कार्य करीत राहतात. तसेंच शरीरांत उपयोग होऊन उरलेलीं निरुपयोगी द्रव्यें अथवा वाण हीं शरीराच्या वाहेर नेऊन टाकण्या-सहि या क्रियेचा उपयोग होतो. गालेन या वैद्यानें जरी रक्त-वाहिन्यांतून व शिरांतून रक्ताचा प्रवाह परस्परविरुद्ध दिशेनें वाहत असतो या गोष्टीचा शोध लावला होता, तरी प्रत्यक्ष रुधिराभिसरणक्रियेचें ज्ञान पूर्णतः प्रथम विल्यम हार्वे यानें १६२८ मध्यें निदर्शनास आणलें. यानें रक्तवाहिन्यांतून रक्त कसें वाहत जातें व त्यांत असलेल्या पडद्यांमुळें तें नेहमीं एकाच दिशेनें कसें वाहतें व हृदयांतून निघालेलें रक्त योग्य पुरवठा होण्याकरितां पुन्हां हृदयांत परत येणें कसें अवश्य आहे, ही गोष्ट स्पष्ट केली. प्राण्यांच्या शरीरांतील रुधिराभिसरणाची क्रिया १६६१ पर्यंत पूर्णपणें माहीत झाली नव्हती. त्या वर्षी माल्पिधी यानें सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें बेडकाच्या पायांतील रक्ताचें अभिसरण शुद्ध रक्तवाहिन्यांपासून अशुद्ध रक्तवाहिन्या अथवा शिरांमधील केसासारख्या सूक्ष्म नलिका यांच्याद्वारां आणि रक्तपेशीद्वारां कसें होतें तें दाखवून दिलें. मृदुकाय जातीच्या प्राण्यांत गोगलगाईप्रमाणेंच दक्षिण व वाम रक्ताशय हृदयामध्यें असतात. कांहीं प्राण्यांत व गोड्या पाण्यांतील माशांच्या हृदयामध्यें दोन शुद्ध रक्ताशय अशुद्ध रक्ताशयाच्या दोन्ही बाजूंस असतात. दुसऱ्या एका माशांत (आर्कशेल) दोन शुद्ध रक्ताशय व दोन अशुद्ध रक्ताशय असतात. ॲसिडियन प्राण्यांमध्यें रुधिरप्रवाह कांहीं कांहीं वेळाच्या अंतरानें उलट-सुलट वाहत असतो. हे प्राणी सपृष्ठवंश प्राण्यांचेच निकृष्ट अवस्थें-तील अवशेष होत. पाण्यांत राहणारे (ॲम्फी ऑक्सस) प्राणी सोडल्यास बहुतेक सर्व सपृष्ठवंश प्राण्यांच्या शरीरांत हृदययंत्रें असतें. माशांच्या हृदयामध्यें दक्षिण व वाम असे दोन रक्ताशय-भाग असतात, परंतु चिखलांत राहणाऱ्या माशामध्यें दोन अशुद्ध रक्त येणारे रक्ताशय व एक शुद्ध रक्ताशय असतो व असे तीन रक्ताशय बहुतेक जलचर प्राण्यांत व सरपटणाऱ्या प्राण्यांत (मगर सोडून) असतात. मगरामध्यें व पक्ष्यांमध्यें सस्तन प्राण्या-प्रमाणें दोन अशुद्ध रक्ताशय आणि दोन शुद्ध रक्ताशय असतात. या प्राण्यांत शिरांतून येणारें रक्त व शुद्ध रक्तवाहिन्यांतून जाणारें रक्त निराळें ठेवलें जातें. तीन रक्ताशय असलेल्या प्राण्यांमध्यें शुद्ध रक्ताशयामध्यें या सर्वांचें मिश्रण केलें जातें. हृदय पहा.

**अभिसार**—काश्मीरच्या दक्षिणेस व पश्चिमेस लागून अस-लेला काश्मीर संस्थानांतील जुना ऐतिहासिक व पौराणिक देश. पौराणिक कालीं येथील राजा भारतीय युद्धांत दुर्योधनाच्या बाजूनें होता. ऐतिहासिक कालीं अलेक्झांडरला विरोध करणारा हा एक होता, पण पोरस शरण गेल्यामुळें याचा नाइलाज झाला. अलेक्झांडरनें याला जातांना आपला अभिसाराचा सुभे-दार नेमिलें होतें. ह्युएनत्संगाच्या वेळीं हा देश राजपुरी किंवा राजोरी या नांवानें काश्मीरच्या साम्राज्यपदांत होता.

**अभेदानंद, स्वामी** (१८६६–१९३९)— रामकृष्ण परम-हंसांचे एक शिष्य व स्वामी विवेकानंदांचे गुरुबंधु. यांनी विवेकानंदांप्रमाणेंच हिंदुतत्त्वज्ञानाची माहिती युरोप, अमेरिका इ. भूभागांत करून दिली. हे हिमालयाच्या पायीं प्रवास करीत व तिबेटांत जाऊन त्यांनीं बौद्धधर्म आणि लामापंथ यांचाहि अभ्यास केला. न्यूयॉर्कच्या वेदान्त सोसायटीचें नेतृत्व यांच्याकडे कांहीं काळ होतें. कलकत्त्यास त्यांनीं 'रामकृष्ण वेदान्त सोसा-यटी' काढून रामकृष्ण परमहंसांचा संदेश अखंड सर्वश्रुत होण्याची तजवीज केली (१९२३). तेथेंच एक मठ स्थापिला. १९३४ त दार्जिलिंग येथेंहि दुसरा मठ व वेदान्त सोसायटीची शाखा चालू केली. १९३७ सालीं स्वामी विवेकानंदांच्या शत-सांवत्सरिकोत्सवाच्या प्रसंगीं जी धर्मपरिषद् कलकत्त्यास भरली तिचे ते अध्यक्ष होते. स्वामींनीं वेदान्तावर पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत.

**अभ्यंग** — तेलानें शरीर किंवा शरीरावयव चोळून काढणें. स्नानापूर्वीचा हा एक आरोग्यकारक व शुद्धीचा प्रकार आहेच, पण याला धार्मिक व इतर महत्त्व आहे. ईजिप्त देशांत पाहुणा घरीं आला म्हणजे प्रथम त्याच्या डोक्याला तेल लावीत. ज्यू लोकांत राजे आणि धर्माधिकारी यांना अधिकार देतांना अभिषेकप्रसंगीं तेल लावीत. आपल्याकडेहि अभ्यंगस्नान घालतात. 'मशीहा' (मेसिआ) याचा अर्थ अभ्यंग–तैला-भिषिक्त असाच आहे. रोमन कॅथॉलिक देवळांतून अद्यापहि अभ्यंगविधि होत असतो. आज आपण अभ्यंगस्नान सणावारीं करतों.

**अभ्रक**—पृथ्वीवर पुष्कळ ठिकाणीं आढळणारें निरनिराळ्या खडकांतील खनिज द्रव्य. याच्या (१) बायोटिट्, (२) मास्कोविट, (३) फ्लोगोपिट, व (४) लेपिडोलिट् या चार जाती आहेत. याचे स्फटिक चौकोनी असून पातळ व लवचीक असतात, परंतु त्यांचे ताठ पत्रे करतां येतात. या स्फटिकांवर सुईच्या चोथट अग्रानें आघात केला असतां ताऱ्याच्या आकाराची भेग पडते, व रेषाहि उमटतात. अभ्रकानें प्रकाशवक्रीभवन फार होत नाहीं, पण द्विवक्रीभवन होतें. दुसरी जात रंगरहित व पारदर्शक असून चौथी काळी व अपारदर्शक आहे. याशिवाय पिंवळा, हिरवा, तांबडा व पिंगट रंगांचे स्फटिक असून अभ्रकाच्या विद्युद्रोधक व उष्णतारोधक गुणामुळें त्याचा यंत्रकलेंत फार उपयोग होतो. अभ्रक हें मिश्रण असून यांत र्मॉलिन, व कुरुंद सांपडतात. याची रासायनिक घटना फार घोटाळ्याची असते. हिंदुस्थानांत मस्कोविट् आणि कानडा व सीलोनमध्यें फ्लोगोपिट अभ्रक सांपडतो;

शिवाय संयुक्त संस्थानें व ब्राझिल यांतहि खाणी आहेत. हिंदुस्थानांत १७ खाणी असून त्या बंगाल १, मद्रास २ व बिहार-ओरिसा १४ अशा विभागल्या आहेत. बंगाल्यांतील तांबडा व मद्रासेंतील हिरवा अभ्रक असून, नेलोर खाणींतून १०×१५चे तुकडे सांपडले आहेत. हिंदी खाणींतून पुष्कळ अभ्रक काढतात. परंतु रीत जुनी असल्यामुळें नासाडी फार होते. खाणींतून काढल्यावर कात्रीनें कापून चांगले अभ्रक बाजूला काढतात व मग आकार व रंगरूप पाहून गठ्ठे बांधतात. चुन्याची पूड करून विकतात. भट्ट्यांतून आंत पाहण्याकरितां भोंकावर अभ्रक बसवितात. पूर्वी खिडक्यांस तावदानें म्हणून व देवघरांत यांचा उपयोग करीत. शोभिवंत कागद व नाटकी सामान यांत अभ्रक असून फिल्मा व चित्रें यांवर कांचेप्रमाणें लावतात. हल्लीं पदार्थविज्ञानशास्त्रांतील उपकरणांत व विजेच्या कारखान्यांत याचा फार उपयोग करतात. अभ्रकभस्म क्षयासारख्या असाध्य रोगावर देतात.

हिंदुस्थानांत १९३८ सालीं तयार अभ्रक १२३००० हंड्रेडवेट निघाला व त्याची किंमत सुमारें ४२ लक्ष रुपये होती. पहिल्या महायुद्धापूर्वी जगांतील शें. ६० अभ्रक हिंदुस्थानांतला असे. पण नंतर ब्राझीलमध्यें अभ्रक निघूं लागून हिंदुस्थानांतील हा धंदा कमी होऊं लागला. पण १९४४ सालीं २ कोटी ७३ लक्ष किंमतीचा अभ्रक निर्यात झाला.

**अभ्रकभस्म**—क्षयरोगावरील हें एक प्रमुख औषध आहे. सहस्रपुटी, पांचशेंपुटी, शतपुटी व निश्चन्द्र असे त्याचे प्रकार आहेत. फुप्फुसांचा अशक्तपणा, जुनाट खोकला, बारीक ज्वर, हृदयाचा अशक्तपणा, दम लागणें, छातींत व बरगड्यांतून कळा येणें, इत्यादि विकारांवर हें भस्म उत्तम आहे. हें भस्म वृष्य, मेधाजनक, योगवाही, वीर्यवर्धक, व्रणनाशक असें आहे. हें ।· ते १ गुंज मध, दूधसाखर, लोणी–खडीसाखर इत्यादींबरोबर घेतात.

**अमझेर**—मध्य हिंदुस्थान, ग्वाल्हेर संस्थानांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १३०१ चौ. मै.. वस्ती प्रमुख्यानें भिल्लांची असून भाग जंगलमय बराच आहे. शेतजमीन थोडी आहे. यांत अमझेर व बाकानेर परगणे आहेत.

अमझेर धारच्या पश्चिमेस १२ मैलांवर आहे. लोकवस्ती २ हजार. हें गांव जोधपूरच्या रामसिंग राठोडानें वसविलें असून ग्वालेरचें मांडलिक संस्थान होतें. १८५७ त बखतावरसिंगानें बंड केल्यावरून त्याचा शिरच्छेद झाला व हें गांव व संस्थान शिंद्यास मिळालें.

**अमडापूर**—वऱ्हाड-मध्यप्रांत, बुलढाणा जिल्हा, चिखली तालुक्यांतील दोनतीन हजार वस्तीचें भराभराटीचें खेडें. बुधवारी आठवडी बाजार भरतो. दक्षिणेकडील टेंकडीवर एक भवानीचें देऊळ आहे. तेथें यादवकालीन एक महत्त्वाचा शिलालेख आहे. पूर्वीचें देऊळ पदुमन शेटी यानें बांधलें असून हल्लींचें देऊळ पेशव्यांचा अमडापूर येथील कमाविसदार खंडो बल्लाळ यानें बांधलें म्हणून या देवीस 'बल्लाळी' असें म्हणतात. या गांवचें जुनें नांव अन्वरापूर आहे.

**अमनेर**—१. वऱ्हांड, उमरावती जिल्हा, मेळघाट तालुक्यांतील याच परगण्याचें जुनें ठिकाण. हल्लीं ओसाड आहे. येथें एक जिल्हि अमनेर नांवाचा थोडासा महत्त्वाचा किल्ला आहे. ही गाडगा–तापीच्या संगमावरील उंचवट्यावर चौकोनी विटांची इमारत आहे. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धांत तात्या टोपे येथून परत फिरला व तंट्या भिल्लाच्या बंदोबस्तासाठीं पोलिसहि पण राजे कुमारसिंग यांनीं येथेंच ठेविले होते.

२. मध्यप्रांत, नागपूर जिल्हा, मोर्सी तालुका, जलालखेड समोरील वर्धाकांठचें एक खेडें. हल्लीं यास महत्त्व नसून जुन्या व पडक्या इमारतींवरून हें गांव मोठें व व्यापाराचें असावें असें वाटतें. हल्लीं नदीतीरावर एक जागृत शिवालय असून जवळ तळें आहे. येथें लालखान पठाणाचा २०० वर्षांचा जुना मखबरा असून त्यावर लेख आहे.

**अमरकंटक**—मध्य हिंदुस्थान, रेवा संस्थानांतील मैकल डोंगरावरील खेडें. नर्मदा नदीचा उगम म्हणून हें खेडें क्षेत्र आहे. यात्रेकरू नर्मदेचा उगम, कपिलधारा, धबधबा, शोण नदीचा उगम, इत्यादि ११ स्थानांचें दर्शन घेतात. नर्मदाबाईचें देऊळ जुनें असून वारंवार डागडुजीनें जुनें स्वरूप कळत नाहीं. उंची ३५०० फूट असून हवापाणी चांगलें आहे.

**अमरकोश**—अमरसिंहाचा अत्यंत प्राचीन असा कोशग्रंथ. याचा कर्ता बौद्धानुयायी असूनहि ब्राह्मण व जैन लोकांना आदरणीय झाला होता, हें त्याच्या टीकाग्रंथांवरून दिसून येतें. सुभूतिचंद्र — बौद्ध, आशाधर पंडित आणि नाचिराज–जैन व अप्पय्या दीक्षित–ब्राह्मण हे प्रसिद्ध अमरकोशटीकाकार आहेत. यावरून सर्व वर्गीय संस्कृत अभ्यासकांना या कोशाचें वाटत असलेलें महत्त्व दिसून येतें. याचीं चिनी, तिबेटी, तामिळी व फ्रेंच भाषांतरें झालीं आहेत. याच्या अतिप्रसिद्ध टीका माहेश्वरी व भानुजी दीक्षितांची व्याख्यासुधा या होत. पण हल्लीं उपलब्ध अशी क्षीरस्वामींची अमरकोशोद्घाटन ही होय. अमरकोशाचीं तीन कांडें असून त्यांत १०००० शब्द आहेत. यास त्रिकांड व नामलिंगानुशासन अशींहि नांवें आहेत.

**अमरगोळ**—मुंबई, धारवाड जिल्हा, एक खेडें, लोकसंख्या २०००. गांवांत जुनें शंकरलिंगाचें देऊळ आहे. हें जखनाचार्य या क्षत्रियानें ब्रह्महत्या–पापक्षालनार्थ बांधलें, ही एक व विश्वकर्मा-शिष्य पांचाल यानें कसब दर्शविण्यासाठीं हें बांधलें अशी दुसरी

आख्यायिका आहे. येथें जुने शिलालेख असून जवळच वनशंकरी देवीचें देऊळ आहे. हें रेल्वे–स्टेशन आहे.

**अमरचंद्र** (सु. १३ वें शतक)— जिनेन्द्रचरित्र उर्फ पद्मानंदकाव्य या ग्रंथाचा कर्ता व जिनदत्तसूरीचा शिष्य. याचा मित्र अरिसिंह याचा काव्यकल्पलता हा अर्धा ग्रंथ पुरा करून त्यावर कविशिक्षावृत्ति ही टीका लिहिली. शिवाय छन्दोरत्नावली, कलाकलाप व बालभारत या पुस्तकांचा कर्ता.

**अमरचिंत**—हैद्राबाद संस्थान, रायचूर जिल्ह्यांतील एक मांडलिक संस्थान. यांत ६९ खेडीं, १९० चौ. मै. क्षेत्रफळ. लोकसंख्या ३५ हजार, उत्पन्न तीन लक्ष आहे. निजामास खंडणी ६३६३ रु.. संस्थान जुनें असून यांत व गढवाल संस्थानांत कृष्णा नदी वाहते. येथें मलमल, धोतरें व पागोटीं तयार होतात.

**अमरत्व**— मनुष्याचा आत्मा किंवा व्यक्तिता मनुष्याचें शरीर मृत झाल्यावरहि अस्तित्वांत असते असें मानतात. आत्मा अमर असतो, हें मत कमीजास्त मोघम स्वरूपांत प्राथमिक अवस्थांतील सर्व समाजांत मान्य झालेलें दिसतें आणि ख्रिस्ती संप्रदायांत हा अमरत्वाचा सिद्धान्त मान्य होण्याचीं प्रमुख कारणें ग्रीक तत्त्वज्ञान आणि ज्यू धर्म हीं आहेत. प्लेटो या ग्रीक तत्त्ववेत्त्याला आत्म्याच्या अमरत्वाच्या सिद्धान्ताचें अतिशय व्यावहारिक महत्त्व वाटत असे. तथापि या सिद्धान्ताचें समर्थन त्यानें आधिभौतिक पुरावा देऊन केलें आहे. प्लेटो कल्पनावादी (आयडिॲलिस्ट) असल्यामुळें त्याचें म्हणणें असें कीं, मनुष्यांतील चेतनशक्ति (कॉन्शसनेस) ही इतकी मौल्यवान् आहे कीं, ती शक्ति केवळ जडावस्थांतून उत्पन्न होणें शक्य नाहीं; म्हणून प्लेटोचें मत असें कीं, शरीराला मरण आल्यानें आत्म्याचे व्यापार बंद पडत नाहींत. ज्यू लोकांमध्यें, मरणोत्तर जीवन असतें, हें मत बरेंच उशीरां प्रसृत झालें. इजिप्शियन लोकांचा 'दुसऱ्या जगा' वर पूर्ण विश्वास होता, पण त्याचा परिणाम प्राचीन हिब्रू लोकांवर झाला नव्हता. इजिप्शियन लोक जें अमरत्व मानीत असत, तें अमरत्व 'आत्मा जडदेहाशीं संबद्ध असतो' असें होतें. इजिप्शियन लोकांत 'ममी' करून ठेवण्याची जी प्रथा होती, तिचें कारण हेंच कीं, देह मृत झाल्यावरहि आत्मा राहण्याला देहाची जरूरी असते, म्हणून तें मृत शरीर शक्य तितक्या सुस्थितींत ठेवणें आवश्यक आहे, हें मत हिब्रू लोकांत असल्याचें मुळींच दिसत नाहीं; आणि ज्यू धर्म, 'आत्मा अमर असतो,' हा सिद्धान्त निश्चित मान्य न करतांहि भरभराट पावत गेला. पुढें मात्र ज्यू लोकांना हें मत पटत गेलें; आणि हुतात्म्यांना आणि धर्मनिष्ठांना बक्षिस देण्याकरितां आणि दुष्ट लोकांचें पारिपत्य करण्याकरितां परमेश्वराला अखेरीस न्यायनिवाडा करावा लागतो, या सिद्धान्तावर ज्यू लोकांची श्रद्धा बसली.

आद्य ख्रिस्ती समाजांत वरील ज्यू लोकांच्या मतानुसार अमरत्वाच्या सिद्धान्ताचा विकास झाला. आत्मा शरीराव्यतिरिक्त स्वतंत्र राहणें शक्य नाहीं, हेंच मत ग्राह्य झालें; आणि म्हणून शेवटीं परमेश्वराच्या न्यायनिवाड्याच्या दिवशीं सर्व आत्मे सदेह पुनरुज्जीवित झाले पाहिजेत, याकरितां सर्व ख्रिस्ती जीवांना थडग्यांत देह पुरून कायम ठेवण्याची प्रथा रूढ झाली. अलीकडे मात्र युरोपियन नीतिशास्त्रज्ञ व धर्मशास्त्रज्ञ आत्म्याचें अमरत्व नीतिशास्त्रदृष्ट्या समर्थनीय मानतात. त्यांचें म्हणणें असें कीं, या जडदेहांत मनुष्याच्या मानसिक व नैतिक उन्नतीची सुरवात होऊन ती उन्नति परिपूर्ण होण्यास मनुष्याचा जन्म व मृत्यु या दरम्यान ५०–७५ वर्षांचा अवधि पुरेसा नाहीं; म्हणून प्रेम, सत्य, सौंदर्य आणि साधुत्व या मनुष्यमात्रांतील गुणांचा पूर्ण विकास होण्यास जडदेहपातानंतरहि संधि व अवसर मिळाला पाहिजे; म्हणजेच आत्मा अमर असला पाहिजे, या सिद्धान्तावर अचल श्रद्धा ठेवणें भाग आहे. ख्रिस्ती धर्मावर ज्यांची पूर्ण श्रद्धा आहे अशा इसमांचा बायबल ग्रंथांतील येशू ख्रिस्ताच्या मरणोत्तर पुनरुत्थानाच्या हकीकतीमुळें 'आत्मा अमर असतो' या सिद्धान्तावर पूर्ण विश्वास बसतो.

अलीकडील मानसशास्त्रीय संशोधन मंडळाच्या शोधांनीं (सायकिकल रीसर्च) मृतात्मे आणि आपण जिवंत माणसें यांच्यामध्यें विचारविनिमय करतां येतो, आणि त्यावरुन मरणोत्तर मनुष्याचा आत्मा अस्तित्वांत असतो, या गोष्टी सिद्ध होऊं शकतात कीं नाहीं, याबद्दल सांप्रत युरोपीय विद्वानांमध्यें मोठा मतभेद आहे.

अमरत्वाच्या सिद्धान्ताचीं अलीकडील आणखी दोन स्वरूपें येथें नमूद करणें आवश्यक आहे.—(१) आत्मा अमर आहे, याचा अर्थ आद्य मानवापासून आतांपर्यंत मानववंश अस्तित्वांत राहिला आहे, म्हणजेच आद्य मानवाचा आत्मा आतांपर्यंत अमर राहिला आहे व पुढेंहि अमर राहील हा युक्तिवाद असमाधानकारक अतएव अग्राह्य होय. (२) दुसऱ्या पक्षीं, 'सशर्त अमरत्व' हा सिद्धान्त पुष्कळांना अद्यापहि आकर्षक वाटतो; तो सिद्धांत हा कीं, धर्मश्रद्धावान् जे इसम असतात त्यांना त्या धर्मश्रद्धेबद्दल बक्षीस म्हणून अमरत्व प्राप्त होतें; पण जे इसम नालायक, दुर्गुणी असतात, त्यांना नरकांत कायम पिचत राहण्याची शिक्षा न देतां परमेश्वर ते दुष्टात्मे नष्ट करून टाकतो. आत्मा पहा.

**अमरदास** ( १५०९-७४ )— तिसरा शीख गुरु. दुसरा शीख गुरु अंगद उर्फ अंगदशहा यानें नानकाप्रमाणेंच आपल्या मुलास गादी न देतां शिष्य अमरदास यास दिली ( १५५२ ). अमरदास क्षमेचा व सहनशीलतेचा उपदेश करी व नानकाप्रमाणें जातिभेद न पाळण्यासाठीं आलेल्या सर्व जातींच्या पाहुण्यांस एकत्र जेवण्यास लावी व उपदेश करी. जात्यभिमान हें पाप आहे हें तो लोकांस सांगे. सतीची चाल बंद पाडण्याचाहि त्यानें प्रयत्न केला. याच्या मनांत स्वतंत्र राज्य स्थापावें असें होतें. परंतु राज्याच्या नादीं लागल्यास धर्म बुडतो म्हणून पुष्कळ अनुयायांनीं यास सोडलें व ते नानकाचा नातू धर्मचंद यास भजूं लागले. या नवीन शीख संप्रदायांस उदासी व निर्मल अशीं नांवें आहेत.

**अमरपूर**—ब्रह्मदेश, मंडाले जिल्हा, इरावती नदी व तुंगथमन तलाव यांमधील प्रदेशावर हा गांव वसला आहे. तलावाच्या उत्तरेस जुनें गांव होतें. हा भाग बराच पडीक आहे. येथें २५० खांबांचें बुद्धाचें देवालय व त्यांतील पंचरसी धातूची बुद्धाची मूर्ति प्रसिद्ध आहे. पूर्वी शहरास तटबंदी असून भोंवतीं खंदक होता. १७८३ सालीं बोडवण राजानें हें वसविलें. चिंच व आंबा यांचे वृक्ष विपुल असून बौद्धांचीं देवळें आजूबाजूस आहेत. रेशमी व सुती कापड करण्याचा धंदा चालतो.

ही जुन्या ब्रह्मी साम्राज्याची राजधानी असून १८१० सालीं यांची वस्ती पावणेदोन लाख होती. आज जेमतेम सात हजार असेल.

**अमरसिंह**—या नांवाच्या अनेक व्यक्ती होऊन गेल्या. कांहीं प्रमुख पुढें दिल्या आहेतः—

१. अमरकोशाचा कर्ता. हा इ. स. ६ व्या शतकांत होऊन गेला असावा. याला विक्रमादित्याच्या दरबारचा एक पंडित म्हणून मानण्यांत येतें. अमरकोश पहा.

२. उदेपूरचा महाराणा ( १५९७-१६२० )—यानें मोंगलांशीं बऱ्याच वेळां लढाया देऊन विजय मिळविला होता; पण शेवटीं पराभव पावून त्यांचा अंकित बनला. तथापि या मानी पुरुषानें मोंगल दरबारीं पाऊल टाकलें नाहीं कीं वाड्याबाहेर पडला नाहीं.

३. उदेपूरचा महाराणा. हा जयसिंगाचा पुत्र १७०० त गादीवर आला. हा पहिल्या अमरसिंहाप्रमाणेंच शूर व मानी होता. यानें रजपूत संस्थानांचें एक स्वतंत्र राष्ट्र करण्याचा प्रयत्न केला; पण तो फारसा यशस्वी झाला नाहीं. जिझिया कर यानें उठवून घेतला.

४. तंजावरचा राजा—हा तुळाजीनंतर ( १७८७ ) कांहीं काळ गादीवर होता. पण तुळाजीचा दत्तकपुत्र सरफोजी याचा गादीवरचा हक्क कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांनीं मान्य केल्यावर याला नुसती नेमणूक मिळाली. हा १८०२ मध्यें मृत्यु पावला.

**अमरापूर**—१. मुंबई, रेवाकांठांतील मेहवाच्या बारीया वर्गांतील संस्थान. गोमा व महानदी यांच्या संगमाच्या कोनावर वसलें असून क्षेत्रफळ २ चौ. मै.. लो. सं. ४४१. उत्पन्न १००० रु.

२. एक लहान काठेवाडी संस्थान. लोकसंख्या १$\frac{३}{४}$ हजार. येथील रजपूत मुसलमान झालेल्या तालुकदारांना शेट व मालिक म्हणतात. जवळील अमरापूर टेकडी ७७५ फूट उंच आहे.

**अमरावती**—१. इंद्राची स्वर्गांतील नगरी. अर्जुन या अमरावतीला गेला होता. येथें सिद्ध व चारण यांची वस्ती असून सर्व ऋतूंत फुलणारे वृक्ष आहेत. तेथील नंदनवनांत अप्सरा विहरत व विमानें इच्छेनुरूप संचरत. धर्मानें सांगितलेलें कर्तव्य पार न पाडणारास ह्या नगरीचें दर्शन होत नाहीं असें म्हटलें आहे.

२. मद्रास इलाखा, गुंटूर जिल्हा, सत्तनपल्ली तालुक्यांतील २००० वस्तीचें खेडें. जवळच उत्तरेस धरणीकोट नांवाची आंध्रकालीन नगरी होती. तेथील बौद्ध स्तूप फार प्राचीन व प्रेक्षणीय आहे, त्यामुळें या खेड्यास महत्त्व. मॅकेन्झी ( १७९८-१८०७ ) व सर वॉल्टर इलियट ( १८४० ) यांनीं हा स्तूप शोधला. १८८० सालीं सरकारनें उत्खनन केलें. हा स्तूप जुना व उत्तम असून यावर ब्राह्मी लिपींत शिलालेख आहेत. याची नासधूस मात्र बरीच झाली आहे. स्तूपाभोंवतीं दोन कठडे असून बाहेरच्या कठड्याची उंची १३।१४ फूट आहे. स्तूपाचा व्यास १३८ फूट व आंतील परिघ ५२१ फूट असून बाहेरील ८०३ फूट आहे. स्तूपावरील शिल्पकाम उत्तम असून तें सांची आणि गांधार यांच्यामधील कालांतील असावें असें वाटतें.

**ॲमरी, लिओपोल्ड** ( १८७३- )—ब्रिटिश मंत्रिमंडळांतील हिंदुस्थानचा एक माजी मंत्री. जन्म हिंदुस्थानांत गोरखपूर येथें. हा पूर्वी 'दि टाइम्स'च्या संपादकवर्गांत होता (१८९९-१९०९). १९११ मध्यें पार्लमेंटांत आला. तेव्हांपासून वर चढत मंत्रिमंडळांत गेला. निरनिराळ्या जागांवर कामें करून १९४० च्या मे महिन्यांत हिंदुस्थान आणि ब्रह्मदेश यांचा चिटणीस मंत्री (सेक्रेटरी ऑफ स्टेट) बनला. १९४५ सालीं मजूरपक्ष अधिकारारूढ झाल्यावर यास ती जागा सोडावी लागली.

**अमरुशतक**—श्रीशंकराचार्यांनीं परकायाप्रवेशकालीं ज्या राजाच्या देहांत प्रवेश केला तो राजा अमरु होय ( शांकर दिग्विजय, ५८ वें प्रकरण ). अमरु राजाच्या देहांत शंकराचार्यांनीं प्रवेश केल्यावर वात्स्यायन-सूत्राधारावर लिहिलेला कामशास्त्रावरील ग्रंथ अमरुशतक होय. यांत १०० पद्यखंडें असून यास

शृंगार-शतक म्हणतात. याचें जर्मन व फ्रेंच भाषांतर रुकर्ट व अपुडी यांनीं केलें आहे.

**अमरेळी**—बडोदें संस्थानांतील एक प्रांत. क्षेत्रफळ १०७६ चौ. मै., या प्रांताचे १७ भाग असून मुख्य ओखामंडळ व अमरेळी आहेत. अमरेळी भागांत ६ तालुके आहेत. ओखा-मंडळ रेताड प्रदेश असून धारी तालुका डोंगराळ आहे.

काठेवाडांत पेशव्यांचे सेनापति खंडेराव दाभाडे व दमाजी गायकवाड यांनीं मुलूखगिरीस सुरुवात केली. १७३२ त दुसऱ्या दमाजीनें काठेवाडवर खंडणी बसविली. १८ व्या शतकांत पेशवे व गायकवाड दोघेहि खंडणी वसूल करीत. पण १७९९–१८१४ पर्यंत गायकवाड खंडणी वसूल करुन पेशव्यांना त्यांचा भाग देई. ही व्यवस्था १८२० पर्यंत चालली; परंतु १८२० च्या इंग्रजांशीं झालेल्या तहानें गायकवाडाची सत्ता संपुष्टांत आली. १८६१ त मल्हारराव गायकवाडानें महालांच्या राज्य-व्यवस्थेत सुधारणा घडवून आणली. १८६३ त पोस्ट सुरु झालें. मल्हाररावानंतरच्या राज्यकारभारांत तर या प्रांतांत पुष्कळ सुधारणा झाली. येथील ९६% लोक गुजराथी बोलतात.

येथील पिकें ज्वारी, बाजरी, गहूं, तांदूळ, ऊंस, इ. असून गीर गाई व म्हशी प्रसिद्ध आहेत. व्यापार कमी. कोडिनार, द्वारका व बेट हीं बंदरें आहेत. सक्तीचें शिक्षण असून ६ गांवीं म्युनिसिपालिट्या आहेत. लो. सं. १७३९४८ ( १९३१ ).

अमरेळी हें प्रांताचें मुख्य गांव, भावनगर-पोरबंदर रेल्वेवरील लोकसंख्या २० हजार. १९०५ पासून म्युनिसिपालिटी आहे. हातमागावरील कापडाचा धंदा चालतो. गांव थेबा नदीकांठीं असून समोंवर्ती तट आहे. जुनें नांव अमरवल्ली असावें. पश्चिम व दक्षिणेकडील जुनी वस्ती असून १९ व्या शतकांतच हें शहर वाढलें.

**अमरोहा**—हिंदुस्थान, संयुक्त प्रांतांतील एक तहशील व तिचें मुख्य ठिकाण. तहसिलीचें क्षे. फ. ३८३ चौ. मै. असून लोकसंख्या सुमारें अडीच लाख आहे. अमरोहा शहर औध-रोहिलखंड रेल्वेवर आहे. हा गांव पृथ्वीराजाच्या वेळेपासून प्रसिद्ध आहे. चवदाव्या शतकाच्या प्रारंभीं शरफुद्दिन नांवाचा फकीर येथें येऊन राहिला व त्याच्यापासून पुढें बरीच वस्ती सय्यदांची झाली. येथें कापड व नक्षीदार भांडीं होतात. येथील जामा मशीद प्रथम हिंदु देवस्थान होतें. तेराव्या शतकांत मशीद बनली. १८७० त येथें नगरपालिका स्थापन झाली. लो. सं. ५५९५७.

**अमलानंद**—१. अमलानंद ( व्यासाश्रम ) अनुभवानन्दाचा शिष्य असून कृष्ण यादवाच्या दरबारीं उदयास आला (१२५०). वाचस्पति मिश्राच्या भामती ग्रंथावर वेदान्तकल्पतरु ही टीका व शास्त्रदर्पण या ग्रंथांचा कर्ता.

२. पंचपादिकादर्पण या वेदान्तग्रंथाचा कर्ता.

**ॲमस्टरडॅम**—युरोप, हॉलंड. युरोप खंडांत प्रसिद्ध अशीं जीं व्यापारी शहरें आहेत त्यांपैकीं हें एक होय. हें शहर हॉलंडची राजधानी आहे. शहराचा बहुतेक सर्व भाग उंचवटे तयार करुन त्यावर बांधला आहे. कारण बहुतेक सर्वच हॉलंड देश समुद्रसपाटीपासून खालीं आहे. ॲमस्टरडॅम शहर म्हणजे लहान लहान सुमारें ९० बेटें असून तीं एकमेकांस सुमारें साडे-तीनशें पुलांनीं जोडलेलीं आहेत. बहुतेक सर्व रहदारी बेटांमधील कालव्यांतून चालते. या कालव्यांच्या कडेला दुतर्फा झाडें लावलेलीं असून त्यांच्या शेजारुन विटांनीं बांधलेला रस्ता जातो. शहरांत सर्वत्र कारखाने दिसतात. या कारखान्यांतून लोंकर, कापूस, रेशीम, तंबाकू, कातडीं, यंत्रें आणि निरनिराळें धातुकाम, कांच, लाख वगैरे तयार होतात. शहराच्या उत्तर भागांत बंदर असून तेथें मोठमोठ्या गोद्या आहेत. उत्तर हॉलंड कालवा आणि वाय नदीवरील कालवा हे कालवे व्यापारवाह-तुकीला फार उपयुक्त आहेत. झुइडरजी हा बंधारा आणि वाय नदी यांमध्यें धरण बांधलेलें असून त्यायोगानें उत्तर समुद्र कालव्यांतील जहाजांची वाहतूक व्यवस्थित रीतीनें होते. ॲम-स्टरडॅमचें वैशिष्ट्य म्हणजे हिऱ्यांना पैलू पाडणें व चकाकी आणणें हें होय. डच ईस्ट इंडिया कंपनीमुळें या गांवाचा सांपत्तिक दर्जा वाढला. येथें एक विद्यापीठ आहे. लो. सं. (१९३९) ७९३५२६.

**ॲमहर्स्ट** — खालचा ब्रह्मदेश, तेनासरीम भागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ७०६२ चौ. मै., यांतील दावाना हा डोंगर ५५०० फूट उंच असून भाग डोंगराळच आहे. टांमिओ डोंगरांत शिशाची खाण आहे. जंगलांत सागवान, ताड व बांबू हे विपुल असून वन्य प्राणी फार आहेत. पाऊस फार असून अतिवृष्टीमुळें नुकसानहि होतें. हा प्रान्त इतिहासप्रसिद्ध असून मॉन व सयामी यांत नेहमीं भांडणें होत. इ. स. १८२६ च्या यंदाबोच्या तहानें हा प्रान्त इंग्रजांस मिळाला. पूर्वी ॲमहर्स्ट हेंच जिल्ह्याचें ठाणें होतें; परंतु पुढें तें मोल्मेन येथें नेण्यांत आलें. आसपास बौद्ध देवळें बरींच आहेत. लोकसंख्या सु. पांच लाख असून ⅘ बौद्धधर्मी आहेत. ६३% लोक शेती करतात. भात, ऊंस, सुपारी व नारळ हीं येथील उत्पन्नें होत. मोल्मेन येथें सोनें, चांदी व हस्तिदंताचें काम होत असून याच बंदरांतून सयामशीं व्यापार चालतो.

**ॲमहर्स्ट, लॉर्ड विल्यम** ( इ. स. १७७३–१८५७ )— हिंदुस्थानचा एक गव्हर्नर-जनरल. ॲमहर्स्ट परगणा इंग्लंडच्या उत्तरेकडील रम्य प्रदेश असून हें घराणें जुनें व प्रसिद्ध आहे. या

घराण्यांतील रिव्हरहेड येथें राहणाऱ्या पुरुषाला जेफ्रे व विल्यम असे दोन मुलगे होते. पैकीं जेफ्रेचा सैन्यांत शिरकाव झाला व युरोप आणि अमेरिका येथील लढायांत शौर्य गाजविल्यामुळें त्यास उत्तर अमेरिकेचा गव्हर्नर-जनरल व लॉर्ड करण्यांत आलें. या दोघां भावांस वनस्पतिशास्त्राची आवड होती. लॉर्ड ॲमहर्स्ट हा ले. जनरल विल्यम ॲमहर्स्ट व एलिझाबेथ पॅटर्सन यांचा मुलगा. आईबाप लवकरच वारल्यामुळें चुलत्यानेंच याचें संगोपन केलें; व १७९७ सालीं चुलता जेफ्रे वारल्यावर सर्व इस्टेट यास मिळाली व लॉर्ड झाला.

उत्तरोत्तर जबाबदारीचीं कामें प्रामाणिकपणें केल्यामुळें ग्रेट-ब्रिटन व चीन यांचे व्यापारी संबंध जुळविण्यासाठीं चीन दरबारीं पाठविण्यांत आलें, परंतु प्रतिकूल परिस्थितीमुळें त्याला १८१७ त हात हालवीत परत यावें लागलें.

इ. स. १८२३ त लॉर्ड हेस्टिंग्जनें हिंदुस्थानच्या गव्हर्नर-जनरलपदाचा राजीनामा दिल्यामुळें त्या जागीं याची नेमणूक झाली.

लॉर्ड हेस्टिंग्जनें दिलेलें मुद्रणस्वातंत्र्य यानें चालू ठेविलें. हा शांतताप्रिय होता, म्हणून ब्रह्मी प्रश्न कमिशन नेमून तोडावा असें यानें सुचविलें. परंतु त्याचा उपयोग न होतां ब्रह्मदेशाशीं युद्ध करावें लागलें. या युद्धासाठीं १३ कोट रुपये खर्च झाला असला तरी तह झाला तो कंपनी सरकारास फायद्याचा असून आसाम व आराकान हे अनुक्रमें चहा व तांदुळाचे प्रदेश कंपनी सरकारास मिळाले. ॲमहर्स्टच्या कारकीर्दीतील दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे भरतपूरचा वेढा होय. याच्या लष्करी सेनापतीच्या शौर्यानें हा किल्ला सर झाला. बराकपूर येथील बंगाली शिपायांच्या बंडानें याच्या कारकीर्दीस काळा डाग लागला. लष्करी धोरणांत हा तरबेज असता तर यानें एतद्देशीय शिपायांची कत्तल करविली नसती. यानंतर सिमला आदिकरून ठिकाणीं दौरा काढून यानें १८२८ मध्यें राजीनामा दिला.

**अमळनेर**—मुंबई इलाखा, पूर्व खानदेश जिल्ह्यांतील एक तालुका. पारोळा पेट्यासह क्षेत्रफळ ५२८ चौ. मै.. अमळनेर व पारोळा हीं मोठीं गांवें व २२८ खेडीं. लोकसंख्या १$\frac{3}{4}$ लक्ष. जमीन सपाट, हवा निरोगी, पाऊस सुमारें २३ इंच.

अमळनेर हा तालुक्याचा गांव, आग्रारोडच्या पूर्वेस एक मैल बोरी नदीकांठीं. वस्ती ३५०००. धान्याचा मोठा व्यापार चालतो. मे महिन्यांत सखारामबुवा साधूंच्या पुण्यतिथीनिमित्त जत्रा भरते. येथें एक १०० फूट उंचीचा किल्ला आहे. हें शहर जी. आय्. पी. व ताप्तीव्हॅली या रेल्वेचें जंक्शन आहे. येथें एक गिरणी असून खा. ए. सो. चें हायस्कूल व कॉलेज आहे. येथें तत्त्वज्ञानमंदिर संस्था आहे. खानदेशांत शिक्षणासाठीं अमळनेर प्रसिद्ध आहे.

**अमात्य** — शिवाजीच्या अष्टप्रधानांतील एक अधिकारी. हुद्दा पंतप्रधानाच्या खालोखाल असून शिवाजीच्या वेळीं १२००० होन वेतन असे. यास फारशी नांव मुजुमदार हें होय. याचें काम म्हणजे राज्याचा हिशोब नीट ठेवणें व मिळविलेल्या प्रान्ताची नीट व्यवस्था करणें हें होय. प्रारंभीं बाळकृष्णपंत हणमंते हा अमात्य होता. १६४७ पासून निळो सोनदेव अमात्य. शिवाजीच्या राज्याची व्यवस्था याच्या हातची आहे. १६७२ त नारोपंत यास अमात्यगिरी मिळाली; परंतु रामचंद्रपंत सर्व कारभार पाही. राजारामाच्या वेळीं एकंदर कामगिरीवरून यास 'हुकमतपन्हा' हा किताब मिळाला होता. रामचंद्रपंत कोल्हापुरीं राहिल्यावर, शाहूनें अंबूराव हणमंते यास ही जागा दिली, तरी बाळाजी विश्वनाथच हें काम पाही. पेशवेकालीं अष्टप्रधानांचें महत्त्व कमी होऊन हें पद नामधारी होऊन बसलें.

**अमॉय** —चीन, फूहकीन प्रांतांतील एक बंदर व शहर. हें ९ मैल परिघाचें मोठें पण घाणेरडें आहे. डोंगरामुळें विभागलें गेलें आहे व डोंगरावर मजबूत किल्ला आहे. शहराच्या वरील भागीं बोटी येण्यासाठीं प्रशस्त गोद्या बांधल्या आहेत. चंगचौ या शहराचें हें बंदर असून चहा, चिनी मातीचीं भांडीं व कागद हा निर्यात माल असून आयात माल, तांदूळ, कापूस, अफू, कापड, व युरोपांतील इतर वस्तु, इ. असतो. येथील व्यापारी सधन व उद्योगी असून येथील चहाला मागणी चांगली असते. येथून फोर्मोसा या जपानी बेटाशींहि व्यापार चालतो. १८४१ सालीं ब्रिटिशांनीं हें बंदर जिंकून घेतलें. १८४२ पासून ब्रिटिशांना खुल्या व्यापारास मोकळें असून हल्लीं वाटेल त्या देशाच्या बोटी येथें येतात. लो. सं. २३४१५९ (१९३१).

**अमाल संस्थान** — मुंबई इलाखा, डांगमधील एक छोटें संस्थान. क्षेत्रफळ २०० चौ. मै.. येथील संस्थानिक भिल्ल आहे. हें आतां विलीन झालें आहे.

**अमावसु**—पितरांपैकीं एक. हा इंद्रियनिग्रही होता. कोणी एका पितराची मानसकन्या अच्छोदा हिला याच्याविषयीं कामवासना उत्पन्न झाली, त्या वेळीं हा ब्रह्मचर्यापासून ढळला नाहीं. ही हकीकत सर्व पितरांस कळल्यावर त्यांनीं याची स्तुति केली व ही तिथि सर्व पितरांस प्रिय होईल असा आशीर्वाद दिला. म्हणून तिला अमावास्या म्हणतात. अच्छोदा शापानें पतन पावून मृत्युलोकीं मत्स्यगंधा (सत्यवती) नांवानें जन्म पावली. ती सांप्रत स्वर्गांत अष्टका नांवाच्या देवतेच्या स्थानीं मानतात (मत्स्य. १४).

**अमितगति**—जैन धर्माच्या दिगंबर पंथांतील माथुर संघातील प्रसिद्ध साधु, नामांकित कवि व धर्मग्रंथकार. अकराव्या शतकांतील मुंजराजाच्या सभेंतील एक प्रसिद्ध विद्वान्. याचे पुढील तीनच ग्रंथ उपलब्ध आहेत :-( १ ) श्रावकाचार, ( २ ) सुभाषितरत्नसंदोह व ( ३ ) धर्मपरीक्षा. नुसत्या धर्मपरीक्षा या ग्रंथानेंच जैन वाङ्मयांत त्याचें नांव अजरामर झालें आहे.

श्रावकाचार हा ग्रंथ विक्रम संवत् १०५० त लिहिला असून त्याचे १० परिच्छेद आहेत. व श्रावकानें ( जैनानें ) पाळावयाचे आचार अथपासून इतिपर्यंत दिले आहेत. सुभाषितरत्नसंदोह हा ग्रंथहि विक्रम संवत् १०५० तलाच असून तो नांवाप्रमाणें सुभाषितांनीं ओतप्रोत भरला आहे. धर्मपरीक्षा हा ग्रंथ विक्रम संवत् १०७० मध्यें संपविला असून त्यांत १९४१ श्लोक आहेत.

**अमितायु**—अमितायु किंवा अपरिमितायु हें हिंदुस्थानांतील बौद्ध संप्रदायाच्या उत्तरकालीन बुद्धाचें सगुणोपासनेंतील रूप. मध्ययुगांत ही उपासना बरीच वाढली असूनहि अलीकडे तिकडे दुर्लक्ष होतें. तिबेटांतहि अशाच एका दीर्घायु मुनीची आयुर्वर्धनफलप्रदतेमुळें उपासना चालू होती. मंततंत्रांत व प्रार्थनाध्वजावर याच्या प्रतिमा असून स्वर्गांतील ध्यानस्थ सुखावती बुद्धाचा हा अवतार मानतात. याची प्रतिमा जोगी वृत्तीची नसून १३ अलंकारांनीं भूषविलेली असते व हातांत अमृतपात्र देतात. हें पात्र अष्टमांगल्यापैकीं आहे.

**अमिद व अमिन**—( Amide & Amine ). या संज्ञा $NH_2$ ह्या अणुसमूहाच्या दर्शक असून त्या नेहमीं शब्दाच्या शेवटीं येतात. शब्दाच्या पूर्वी या आमिडो किंवा आमिनो म्हणून येतात. अम्लाच्या अम्लाणुसमूहांत $NH_2$ आल्यास अमिद म्हणतात व इतरत्र आल्यास अमिन म्हणतात.

उदा०—

| | |
|---|---|
| $CH_3$ COOH | ॲसेटिक ॲसिड |
| $CH_3$ $CONH_2$ | ॲसेट्-अमिद |
| $NH_2$ $CH_2$ COOH | आमिनो ॲसेटिक ॲसिड |
| $C_6H_6$ | बेन्झेन |
| $C_6H_5$ | फेनिल |
| $C_6H_5$ $NH_2$ | फेनिल आमिन<br>आमिनो बेंझेन |

**अमिनदिवी बेटें**— लखदीव बेटांच्या उत्तरेकडील पांच बेटांचा समुदाय. हीं दक्षिण कानडा जिल्ह्यास जोडलीं असून क्षेत्रफळ ३ चौ. मै. व उंची १०-१५ फूट आहे. पूर्वी हीं बेटें कुन्नानोरच्या जमीनदाराच्या ताब्यांत होतीं; पण १७८६ त म्हैसूरच्या व १७९९ त ब्रिटिशांच्या ताब्यांत गेलीं. ब्रिटिशांनीं कुन्नानोरच्या बिबीस ५२६० रु. नुकसानभरपाई दिली. येथें पंचायत असून अधिकाऱ्यास मोनेगार म्हणतात. लोकवस्ती ४०००. वस्ती बाटलेल्या मुसलमानांची असून भाषा मल्याळी आहे. नारळाची लागवड व दोर करणें हे धंदे आहेत.

**अमिल नायट्राइट**—( केलिल नत्रायित ). हें द्रव पिवळें असून याला एक विशिष्ट वास असतो. रक्ताचा दाब कमी करण्यासाठीं तसेंच आकस्मिक संकटप्रसंगीं हृदयाला चालना देण्यासाठीं हें वापरतात.

**अमीन**—१. पंजाब, स्थानेश्वरच्या आग्नेयीस ५ मैलांवरील २००० फूट उ. द. लांब, ८०० फूट रुंद व २५-३० फूट उंच असा उंचवटा. हा अभिमन्यु या नांवाचा संक्षेप असून येथें जयद्रथानें अभिमन्यूस लाथ मारली असें सांगतात. आदितीनें पुत्राकरितां तपश्चर्या केल्यावर तिला सूर्य हा मुलगा झाला म्हणून येथें अदितीचें देवालय आहे. पुत्राची इच्छा असणाऱ्या स्त्रिया रविवारीं येथें कुंडांत स्नान करतात व दर्शन घेतात.

२. एक अधिकाराचा हुद्दा. ( १ ) कज्जाचा निवाडा करण्याकरितां सरकारांतून नेमलेला अधिकारी, ( २ ) हल्लींच्या मुनसफांच्या तोडीचा न्यायखात्यांतील अधिकारी, ( ३ ) सामान्यतः देखरेख ठेवणारा कोणताहि अधिकारी, ( ४ ) शेतकऱ्यापासून प्रत्यक्ष कर वसूल करणारा अधिकारी, अशीं अमिनाचीं निरनिराळीं कामें आहेत. मोंगल अमदानींत अमीन हा सुभ्याचा दिवाणी अधिकारी होता व पेशवाईतील अधिकारी कज्जा तोडणारा असे. त्यास मुलकी अधिकार नसत. इंदूरांत अद्यापहि मामलेदारास अमीन म्हणतात.

**अमीनभावी**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. हें गांव धारवाडच्या ईशान्येस ७ मैलांवर असून लोकवस्ती ३½ हजार. गांवच्या उत्तरेस नेमिनाथाचें जैन देवालय असून कल्मेश्वर व मल्लिकार्जुन अशीं आणखी दोन देवालयें आहेत. येथें ६ शिलालेख सांपडले आहेत.

**अमीना**—अब्दुल्लाची पत्नी व महंमद पैगंबराची आई. सौंदर्य, शहाणपण व सद्वर्तन याबद्दल हिची ख्याति होती. इ. स. ५७७ त वारली. तिची कबर अबाचा येथें आहे.

**अमीरखान**— एक मुसलमान सरदार. हा प्रथम भोपाळ व राघवगड संस्थानिकांकडे नोकरीस राहिला. याची मर्दुमकी पाहून याला ५०० स्वारांचें आधिपत्य व पालखीचा मान देण्यांत आला. नंतर तो पेंढाऱ्यांचा पुढारी बनला. यशवंतराव होळकराशीं त्याची मैत्री जमली व त्याचा बडेजाव वाढला. हा होळकरांच्या वतीनें इंग्रजांशीं लढला, पण यशवंतरावाचा इंग्रजांशीं तह झाला ( १८०५ ), तेव्हां हा स्वतंत्रपणें ज्याला लागेल त्याला मदत देऊं लागला. कृष्णाकुमारीच्या लग्नासाठीं जयपूर आणि उदेपूर या दोन राज्यांत बिनुष्ट आलें, तेव्हां हा

पडला व कृष्णाकुमारीला विष देऊन जगांतून नाहींसें करण्याचा यानें सल्ला दिला. त्याप्रमाणें झालेंहि. इंग्रजांनीं जेव्हां पेंढाऱ्यांचा नायनाट करण्याचा चंग बांधला तेव्हां यानें इंग्रजांशीं नाइलाजानें तह करून एक जहागिरी मिळविली. हीच टोंक संस्थान म्हणून बनलें. अमीरखान याप्रमाणें नबाब बनून १८३४ त वारला.

**अमुंडसेन, रोनाल्ड** (१८७२-१९२८)—हा नॉर्वे देशांतील रहिवासी असून ध्रुव प्रदेशांचा संशोधक आहे. ता. १७ जून १९०३ रोजीं हा आणखी ६ इसम बरोबर घेऊन एका लहान जहाजांत बसून उत्तर ध्रुवाकडे निघाला आणि किंग विल्यम लॅन्ड येथें जाऊन पोहोंचला व तेथें त्यानें २ वर्षें मुक्काम केला. तेथून आजूबाजूच्या प्रदेशांत अनेक सफरी करून त्यानें असा शोध लावला कीं, नॉर्थ मॅग्नेटिक पोल (उत्तर चुंबकीय ध्रुव) हा एक स्थिर बिंदु नसून चलन पावणारा आहे. पुढें यानें ता. ९ ऑगस्ट १९१० रोजीं नॉर्वेमधून एका जहाजांतून दक्षिण ध्रुवाकडे प्रवास केला आणि ता. ७ मार्च १९१२ रोजीं तो दक्षिण ध्रुव प्रदेशाला पोंचला. पुढें १९१८ सालीं त्यानें उत्तरध्रुवाकडे २ री सफर केली. १९२२ सालीं त्यानें ध्रुवप्रदेशाकडे विमानांतून जाण्याचा प्रयत्न केला, पण तो सफल झाला नाहीं, म्हणून १९२५ मध्यें त्यानें तसाच दुसरा प्रयत्न केला; पण तोहि फसला. तथापि १९२६ सालीं तो विमानानें ध्रुवप्रदेश ओलांडून जाण्यांत यशस्वी झाला. पण १९२८ सालीं इटालियन संशोधक नोबिली याच्या मोहिमेला मदत देण्यासाठीं गेला असतां आर्क्टिक महासागरांत नाश पावला. यानें आपल्या संशोधन कार्यासंबंधीं बरेच ग्रंथ लिहिले आहेत.

**अमूदर्या नदी**—(ऑक्सस्). मध्य आशियांतील एक मोठी नदी. संस्कृत व बौद्ध ग्रंथांतील नांव वंक्षु. १८८५ च्या अफगाणिस्तान–रशिया सरहद्द ठरविण्यासाठीं नेमलेल्या कमिशनपूर्वी ही नदी व उत्तर ऑक्सस् प्रदेश यांविषयीं फारशी माहिती नव्हती. रशियन संशोधक व हिंदी लोक यांनीं परिश्रम करून ही व हिला मिळणाऱ्या नद्या शोधून काढल्या. पामीरमधील व्हिक्टोरिया सरोवरापासून अधुंकी जिल्ह्याच्या कांठावरील खामिआबपर्यंत सुमारें ६८० मैल प्रदेशाची ही ऑक्सस नदी अफगाणिस्तान व तुर्कस्तानची सरहद्द आहे. याच्यापुढें ५५० मैल हिचा प्रवाह स्वैर व शिथिल होऊन शेवटीं आरल समुद्रांत गडप होतो. चर्जुयी (खामिआबखालीं १५० मैल) येथें या नदीस लांकडी पूल असून मर्व्ह–समरकंद ही रशियन रेल्वे यावरून गेली आहे. वरीच वर्षेंपर्यंत ऑक्सस नदीच्या उगमाबद्दल भौगोलिक वाद माजून राहिला होता; कारण यास राजकीय महत्त्व असून रशिया-अफगाणिस्तान सरहद्दीवरील हिचें स्थान प्रत्येकास मान्य होतें.

**अमृत**—सर्व जागतिक सुखाची राखरांगोळी करणाऱ्या मृत्यूपासून सुटका करण्यासाठीं जगदारंभापासून मनुष्य कांहीं किमया शोधीत आहे. देव मानवापेक्षां श्रेष्ठ व अजर तेव्हां त्यांच्याजवळ अमरत्वकारक पदार्थ आहे अशी जुनी कल्पना. वैदिक वाङ्मयांत अमृत हा शब्द अनेक ठिकाणीं असून तेथें त्याचा अर्थ अ+मृत=मरणरहित व उदक असा आहे. गोड पेय हा अर्थ या वाङ्मयांत नाहीं.

भागवतांत (स्कंध ८ अ. ६–११) अमृताची माहिती अशी आहे: एकदां ऐरावतारूढ इंद्रास पाहून दुर्वास ऋषींनीं संतुष्ट होऊन आपल्या गळ्यांतील माळ इंद्रास दिली. परंतु इंद्रानें तिचा स्वीकार न केल्यानें ती खालीं पडून ऐरावताच्या पायाखालीं तुडवली गेली. हें पाहून दुर्वासांनीं 'तुझें ऐश्वर्य व इंद्रपद नष्ट होईल' असा इंद्रास शाप दिला. त्यायोगें इंद्र व सर्व देव यांचें ऐश्वर्य नष्ट होऊन ते हतवीर्य झाले व दानवांकडून पराजय पावले. नंतर ब्रह्मदेवासह सर्व देव विष्णूस शरण गेले असतां त्यानें दैत्यांशीं समेट करून समुद्रमंथन करा व अमृत काढा असा सल्ला दिला. देवांना हा सल्ला पसंत पडून त्यांनीं दैत्यांना अर्धें अमृत देण्याचें कबूल करून तयार केलें. पुढें मंदार पर्वताची रवी व वासुकी सर्पाची दोरी करून देवांनीं व दैत्यांनीं क्षीर समुद्र घुसळला. तेव्हां अमृताच्या कलशासह एक मनुष्य वर आला. तेव्हां दैत्यांनीं तो कलश घेऊन पलायन केलें. ही हकीकत देवांनीं विष्णूला सांगतांच विष्णूनें त्यांना धीर दिला व आपण मोहिनीचें रूप घेऊन दैत्यांकडे गेला. दैत्य मोहिनीस मोहून अमृत जपण्यास विसरले व तिलाच त्यांनीं अमृत वांटण्यास सांगितलें. मोहिनीनें देव आणि दानव यांना ओळींत बसवून देव अधीर म्हणून त्यांना अगोदर अमृत वाढलें; मग तुम्हांस वाढीन असें सांगितलें. देवांना अमृत वाढल्यावर आपणांस मिळेल कीं नाहीं अशी शंका आल्यामुळें राहु नांवाचा दैत्य देवांत येऊन बसला. ही गोष्ट चंद्रसूर्यांच्या लक्षांत येऊन त्यांनीं चहाडी केल्यामुळें विष्णूनें राहूचें डोकें उडविलें. पण तत्पूर्वीच अमृतप्राशनामुळें ज्याचें डोकें अमर व धड निर्जीव झालें, तोच केतु हा असुर होय. पण या चहाडीबद्दल हे दोन दैत्य चंद्रसूर्यांना पीडा देऊं लागले. पुढें वाढतां वाढतां अमृत संपल्यामुळें दैत्यांना अमृत मिळालें नाहीं व देव–दानव युद्ध सुरु झालें, आणि मोहिनी गुप्त झाली.

चंद्र अमृतमय असून त्यांतील अमृत कृष्णपक्षीं देव पितात व शेवटीं दोन कला राहिलेला अवशिष्ट भाग पितर पृष्ठभागाकडून जाऊन पितात व महिनाभर समाधान पावतात (विष्णुपुराण अं. २ अ. १२).

पाश्चात्यांमध्यें 'अँब्रोशिया' हें खाद्य व 'नेक्टर' हें पेय

अमरत्वकारक मानतात, पण पुष्कळदां खाद्यपेयासहि हीं नांवें देतात. कोणी यास मधासारखें आरोग्यकारक व शरीरशुद्धिकारक मानतात. ग्रीक पुराण व होमरचें इलियड ग्रांवरून हे सुवासिक पदार्थ असत असें दिसतें. अँब्रोशिया खाऊन अमर झाल्याच्या कथा पुष्कळ आहेत; व याच्या अंगीं जखमा बऱ्या करण्याचा गुण असल्याचाहि उल्लेख आहे.

**अमृतकुंवर, राजकुमारी** (१८८७- ) – एक हिंदी महिला मंत्री. कपूरथळ्याचे महाराज हरनामसिंग यांच्या या कन्या. यांचें शिक्षण इंग्लंडमध्यें शेरबोर्न शाळेंत झालें. अखिल भारतीय महिला परिषदेच्या सामाजिक शाखेच्या त्या अध्यक्ष आहेत. यांनीं १९३२ मध्यें फ्रँचाइझ कमिटीपुढें व १९३३ मध्यें जाइंट पार्लमेंटरी कमिटीपुढें साक्ष दिली होती.

पंजाबमधील जालंदर येथील कैद्यांस मदत करणाऱ्या संस्थेच्या त्या अध्यक्ष होत्या. दिल्ली येथील गृहजीवनशास्त्राच्या लेडी इर्विन कॉलेज या संस्थेच्या नियामक मंडळाच्या व कार्यकारी मंडळाच्या सभासद आहेत. त्या टेनिस चांगलें खेळतात व हिंदी स्त्रियांमध्यें त्यांनींच प्रथम टूर्नामेंटमध्यें भाग घेण्यास सुरुवात केली. १९४७ सालीं स्वतंत्र हिंदुस्थान सरकारच्या मंत्रिमंडळांत त्यांना स्थान देण्यांत आलें. त्या आरोग्यमंत्री आहेत.

**अमृतचंद्रसूरि**—कुंदकुंदाचार्यांच्या समयसार या ग्रंथावरील 'आत्मख्याति' टीकेचा कर्ता. हा संवत् ९६२ त हयात होता. याचे ग्रंथ: (१) समयसार टीका, (२) प्रवचनसार टीका, (३) पंचास्तिकाय टीका, (४) तत्त्वार्थसार, (५) पुरुषार्थसिद्धयुपाय आणि (६) तत्त्वदीपिका.

**अमृतबझार**—बंगाल, जेसोर जिल्ह्यांतील एक खेडें. लोकसंख्या सु. १२००. येथेंच इ. स. १८६७ त शिशिरकुमार व मोतीलाल घोष या तरुणांनीं अमृतबझार–पत्रिका हें वर्तमानपत्र सुरू केलें. हल्लीं तें कलकत्त्यास छापलें जातें. या दोन तरुणांनीं आपली आई अमृतमयी हिच्या स्मरणार्थ स्वतः खपून हें पत्र निस्पृहतेनें चालविलें. लॉर्ड लिटनच्या एतद्देशीय वर्तमानपत्रांच्या कायद्यानंतर हें इंग्रजींत निघूं लागलें. खोंचदार, सत्य व स्पष्ट भाषेमुळें व अचूक आणि गुप्त भानगडींच्या बातम्यांमुळें हें लोकादरास पात्र झालें व तसेंच सरकार आणि संस्थानिक यांना शत्रुसमान भासलें. शिशिरकुमारनंतर हें मोतीलालजींनीं उत्तम प्रकारें चालविलें. हल्लीं तुषारकांति घोष संपादक आहेत.

**अमृतराय** (१६९८–१७५३)—एक मराठी कवि व शाहीर. औरंगाबादचे मुत्सद्दी बिसा मोरो याचे आश्रित. आई उमा व पिता शंकर. अमृतराय मध्वमुनीश्वरांच्या उपदेशानें ईश्वरभक्तीकडे वळला अशी आख्यायिका आहे. अमृतरायाचे शिष्य बरेच असून त्यांतील माधव व ब्रह्मगिरी हे कवी होते. दामाजीची रसद हें ब्रह्मगिरीचें काव्य आहे.

अमृतरायाची वर्णनशैली अप्रतिम आहे. याचें प्रत्यंतर सुदामचरित्र, द्रौपदीवस्त्रहरण वगैरेवरून सहज येतें. याची कविता कटावबद्ध असल्यामुळें वर्णनास सुलभ व साजेशी आहे. हे कटाव म्हणजे कीर्तनकारांस एक मोठा ठेवाच वाटतो. 'कीर्तनसुखार्थ झाला अवताराचि अमृतराय जीवाचा।' असें मोरोपंतांनीं सन्मणिमालेंत म्हटलें आहे. अमृतरायाची भाषा साधी, सरस व प्रौढ आहे; व काव्यांत भक्तिरस व वैराग्य अथांग असून प्रसंगविशेषीं शृंगारवीरादि रसहि दिसून येतात. याची मराठीप्रमाणें हिन्दींतहि काव्यें आहेत.

अमृतरायाचीं काव्यें — १ गणपतिवर्णन, २ जगदंबावर्णन, ३ ध्रुवचरित्र, ४ शुकचरित्र, ५ सुदामचरित्र, ६ नारदी, ७ कृष्णचरित्र, ८ द्रौपदीवस्त्रहरण, ९ रामचंद्रवर्णन, १० कृष्णवर्णन, ११ राधावर्णन, १२ कृष्णध्यान, १३ मृत्तिकाभक्षण, १४ वत्सलाहरण, १५ रासक्रीडा, १६ कुंजवनविहार, १७ कृष्णलीला, १८ चंद्रावळी, १९ दुर्वासयात्रा, २० पारिजातकाख्यान, २१ जीवदशावर्णन, २२ उपदेश, २३ पूतनावध, इ.. यांशिवाय ३४ प्रकरणें व १५० पदें.

**अमृतराव पेशवे**—गोपाळराव भुस्कुटे याचा औरस पुत्र. यास इ. स. १७६८ त राघोबादादा पेशव्यानें दत्तक घेतला. परंतु पुढें राघोबास बाजीराव व चिमणाजी आपा हे दोन मुलगे झाल्यानें यास पेशवाई मिळाली नाहीं. हा नेहमीं राघोबादादाबरोबर असे. याचें लग्न राघोबानें इ. स. १७७१ त टोंकें मुक्कामीं थाटानें केलें. इ. स. १७९४ पर्यंत हा नाशिकाजवळ आनंदवल्ली येथें राहत असे. पुढें बाजीराव व चिमणाजी आपा यांच्याबरोबर हा नाना फडणविसाच्या प्रतिबंधांत शिवनेरी किल्ल्यांत होता.

इ. स. १७९५ सालीं सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर बाजीराव गादीवर आला. व त्याचा कारभार कांहीं दिवस अमृतराव पाहत होता; पण कपटी बाजीरावाचें याच्याशीं जमलें नाहीं. तेव्हां हा इंग्रजांच्या मध्यस्थीनें आपला तनखा तोडून घेऊन काशीस जाऊन राहिला. तेथें त्यानें चांगल्या प्रकारें राहून बराच दानधर्म करून नांव मिळविलें. याचा मुलगा विनायकराव पुढें चित्रकूटास जाऊन राहिला. १८५७ च्या क्रांतियुद्धानंतर याच्या वंशजांना बरेलीला पेन्शन देऊन ठेविलें. अमृतराव स्वभावानें चांगला होता; पण त्याला कोठें वाव न मिळाल्यानें तो पुढें आला नाहीं. १८२४ सालीं काशीस मृत्यु पावला.

**अमृतसर**— हिंदुस्थान, पंजाब, लाहोर भागांतील एक जिल्हा व त्याचें मुख्य ठिकाण. शीख गुरु रामदास यानें अमृतसर शहराचा पाया घातला व अमृतसर तलाव खोदून गुरुद्वार बांधण्याचें काम सुरू केलें. अकरावा शीख गुरु बंदा याच्या वेळेपासून अमृतसर हें शीख धर्माचें केंद्रस्थान बनलें. शीख आणि मुसलमान यांच्या लढाया अमृतसरच्या आसपास कितीकदां झाल्या आहेत व त्यांची झळ अमृतसरला पुष्कळच लागलेली आहे. रणजितसिंगानें आपल्या अमदानींत या भागावर पूर्ण स्वामित्व गाजवलें होतें. शीख-इंग्रज युद्धानंतर १८४९ सालीं अमृतसर जिल्हा ब्रिटिश सत्तेखालीं गेला. या जिल्ह्यांत अमृतसर सोडून चार मोठीं गांवें आहेत. लो. सं. १४१३८७६.

अमृतसर ३१°३८' उ. अ. व ७४° ५३' पू. रे. वर आहे. हें नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर असून लाहोरच्या पूर्वेस ३३ मैल आहे. लो. सं. ३९१०१० (१९४१). रणजितसिंगाच्या वेळेपासून शहराला महत्त्व चढलें. १९३३ पासून शालींच्या धंद्यास उत्तेजन मिळून विणकरांची वस्ती वाढली. त्याच्या जोडीला गालिचाचा धंदा भरभराटींत आहे. येथील सुवर्णमंदिर म्हणजे एक संस्थानच आहे. शीखांची ही काशी आहे. १९१९ सालीं जालियनवाला बागेंत ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं मोठा गोळीबार करून शेंकडों लोक ठार केले. त्याची स्मृति अद्यापि ठेविली आहे.

**अमृतसिद्धियोग**—आदितवारापासून दर वारीं क्रमानें हस्त, श्रवण, अश्विनी, अनुराधा, पुष्य, रेवती व रोहिणी या नक्षत्रांचा योग. हा योग फार शुभ मानतात.

**अमेझॉन**—द. अमेरिकेंतील इंडियन जातींतील लढवय्या स्त्रिया. भूगोलशास्त्रज्ञांना जगाच्या पाठीवर या स्त्रियांइतक्या शूर व लढवय्या स्त्रिया कोठेंच आढळल्या नाहींत. सर्वसाधारणतः जगांत सर्वत्र जीं कार्यें (लढाई, कष्टाचीं कामें, राज्यकारभार वगैरे) पुरुषवर्ग करतो तीं सर्व या स्त्रिया करीत असत. अमेझॉन नदीला अमेझॉन नांव मिळण्याचें कारण म्हणजे ज्या वेळीं प्रथमतः संशोधक या भागांत शिरले त्या वेळीं तेथील रानटी पुरुषवर्गाच्या जोडीनें तेथील स्त्रियांनीं या संशोधकांबरोबर जोरदार लढाई दिली. त्यामुळें येथील जंगली स्त्रियांना अमेझॉन म्हटलें व त्यावरून नदीलाहि तेंच नांव देण्यांत आलें. अमेझॉन हा पौराणिक काळचा स्वतंत्र स्त्रियांचा समाज आशिया खंडांत होता, असें प्लिनी वगैरे ग्रीक इतिहासकार सांगतात. तिरंदाजी करतांना उजवा स्तन आड येऊं नये म्हणून तो या स्त्रिया कापून टाकीत. हिरोडोटसनें यांचें वर्णन दिलें आहे.

**अमेझॉन नदी**—अमेरिका, एक मोठी नदी. या नदीचें खोरें सुमारें २,५००,००० चौरस मैलांचें असून दक्षिण अमेरिकेचें सुमारें ⅖ क्षेत्रफळ या खोऱ्यानें व्यापलें आहे. त्याचप्रमाणें पाणीपुरवठ्याच्या दृष्टीनें या नदीचा जगांत पहिला क्रम लागतो. पेरू प्रांतांतल्या अँडिज पर्वतांत या नदीचा मूळ उगम असून उगमाकडे मॅरॅनॉन या नांवानें ही नदी ओळखली जाते. हा उगम पॅसिफिक महासागरापासून अवघ्या ६० मैलांवर आहे. नदीचें मुख अॅटलांटिक महासागरांत असून तें विषुव वृत्तावर आहे आणि नदीची मुखापासून उगमापर्यंतची लांबी सुमारें चार हजार मैल आहे. मुखाजवळ रुंदी ६ मैल असून मुखापासून सुमारें दोन हजार मैल लांब आंत रुंदी दोन मैल आहे. तसेंच मुख्य प्रवाहाची खोली सुमारें ७५० मैलांपर्यंत १७५ फुटांपेक्षां जास्त आहे.

अॅटलांटिक महासागराच्या भरतीचें पाणी सुमारें ४०० मैलांपर्यंत आंत येतें व १० ते १५ फूट उंचीवर (पात्रावर) ६०० मैलांपर्यंत चढतें. शेवटल्या २००० मैलांतील जमिनीचा उतार समुद्रसपाटीपासून अवघा ३५ फूट आहे. या नदीच्या उपनद्या व मूळ नदी मिळून १५ ते २० हजार मैलांचा जलमार्ग होतो. सुमारें २०० बारीक मोठ्या नद्या व त्यांना मिळणारे ओहोळ मिळून मुख्य नदी बनते. या सर्व खोऱ्यांत लागवडीला उपयुक्त अशी जमीन फारच थोडी आहे. बाकीचा सर्व भाग विषुव वृत्तावरील घनदाट अरण्यांनीं व जंगलांनीं व्यापलेला असून त्यांतून जाण्यासुद्धां वाट काढणें मुष्कील आहे. अगदींच क्वचित् ठिकाणीं एखादा लोहमार्ग (सर्वांत मोठा व लांब २०० मैल) व क्वचितच विमानें यांशिवाय होणारी सर्व वाहतूक जलमार्गानेंच चालते. येथील स्थानिक रहिवासी रेड इंडियन असून ते ओंडक्यांच्या होड्यांतून मोठ्या प्रवाहांच्या कांठानें प्रवास करतात. मधूनच क्वचित् राहिलेल्या रिकाम्या जागेंतून तेथील जंगली लोक झोंपड्या बांधून राहतात. परंतु या झोंपड्या रानकिड्यांपासून रक्षण व्हावें म्हणून पाण्यांत अगर नदीच्या प्रवाहांत बांधतात.

**अमेन्स**—फ्रान्स देशांतील सोमे नदीवरील शहर. याच्या मोक्याच्या जागेमुळें या शहराजवळ पुष्कळ लढाया झाल्या आहेत. मध्यकालीन व्यापारयुगापासून या ठिकाणीं विणकामाचा धंदा चालतो. नोत्रदाम हें प्रसिद्ध प्रार्थनामंदिर याच शहरीं आहे. याची बांधणी १३ व्या शतकांत झाली. या प्रार्थनामंदिराचा उंच मनोरा १४० फूट उंच असून आंतील भागावर सुमारें ३५०० पेक्षां जास्त चित्रें व आकृत्या सोळाव्या शतकांत कोरण्यांत आल्या. या शहराचें अस्तित्व रोमन साम्राज्याच्या सीझरच्या वेळेपासून सांपडतें. हें शहर पॅरिसपासून लोहमार्गानें ८१

मैल असून तेथील रेशीम, लोंकर, कापूस यांचें विणकाम आणि गालिचे प्रसिद्ध आहेत. लो. सं. (१९३६) ९३७७६.

**अमेरिकन इंडिअन**—कोलंबसनें अमेरिकेचा शोध लावला त्या वेळीं अमेरिकेंत ज्या जाती राहत होत्या त्या सर्वांना मिळून हें नांव दिलेलें आहे आणि त्यांचे जे वंशज आज आहेत त्यांनाहि हेंच नांव आहे. अमेरिकेंतल्या या मूळच्या लोकांना इंडिअन हें नांव पडण्याचें कारण असें कीं, हें नवीन शोध लावलेलें खंड म्हणजे इंडिआ (हिंदुस्थान) देशाचाच भाग आहे अशी समजूत कोलंबसची होती. हे लोक मूळ ईशान्य आशियाच्या भागांतून बेहरिंग सामुद्रधुनी-च्या मार्गानें अमेरिकेंत आले व ते प्रोटोमोंगोलिअन (आद्यमंगोल) वंशांतले होते. आशियांतून अमेरिकेंत जाण्यापूर्वीच आशियांतील इतर अनेक जातींच्या

लोकांशीं मिश्रण होऊन हा वंश बनला होता. खि. पू. ३०० पासून इ. स. ७०० च्या दरम्यानच्या कालांत आशियाच्या पूर्व किनाऱ्या-वरून या लोकांच्या लहान लहान टोळ्या अमेरिकेमध्यें म्हणजे विशेषतः मध्य अमेरिका आणि पेरू या देशांत जाऊन राहिल्या. अमेरिकन इंडिअन लोकांच्या शरीराचा वर्ण पिंगट रंगापासून बहुतेक गौर वर्णापर्यंत निरनिराळ्या प्रकारचा आहे आणि त्या सर्वांमध्यें तांबड्या रंगाची झांक आहे. मूळचे हे लोक फार काटक आणि शिकार करणें आणि लढाई करणें या कलांत कुशल होते. परंतु अलीकडच्या अमेरिकन इंडिअन लोकांत हे गुण बरेचसे नष्ट झाले आहेत. या इंडिअन लोकांची संख्या कानडा देशांत १०३७७८, सं. संस्थानांत ३४६९६२, मध्य अमेरिकेंत १५०००००० आणि मेक्सिको देशांत ४०,००,००० असून उ. अमेरिकेंतील इतर सर्वत्र ठिकाणची मिळून लोकसंख्या सुमारें ६०,००,००० आहे. द. अमेरिकेंत या लोकांची संख्या सुमारें १०००००००आहे. त्यांपैकीं पुष्कळ लोक सुधारलेले असून त्यांनीं खिस्ती धर्म स्वीकारलेला आहे. विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, अमेरिकन इंडिअन लोकांची संख्या हल्लीं हळूहळू वाढत आहे. यांच्यांत भाषावंश ४१ असून जाती ९६ आहेत.

**अमेरिकन वाङ्मय** — अमेरिकेमध्यें प्रारंभींच्या वसाहत-कालांत जें कांहीं थोडेंफार लिखाण झालें असेल त्याला अमेरि-कन वाङ्मय म्हणून म्हणण्याइतकें फारसें महत्त्व नव्हतें. परंतु बेंजामिन फ्रँक्लिन यानें जें आत्मचरित्र लिहिलें त्याची गद्य भाषा फार उत्कृष्ट असून त्या काळापासून अमेरिकन वाङ्मयास एक प्रकारचें नवजीवन प्राप्त झालें. तथापि एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत फारसें महत्त्वाचें वाङ्मय बाहेर पडलें नाहीं. त्या सुमारास मात्र काव्य, निबंध व कादंबरी या क्षेत्रांत अमेरिकन आयुष्यक्रमाचें चित्र रेखाटणारे असे नवीन व विशिष्ट व स्वतंत्र तऱ्हेचे ग्रंथ बाहेर पडूं लागले. या आरंभींच्या काळांतले प्रसिद्ध लेखक म्हटले म्हणजे आयर्व्हिंग, ब्रायंट, कूपर व पो हे होत. अमेरिकेंतील यादवी युद्धाच्यापूर्वी, तसेंच तें युद्ध चालू असतां व तें युद्ध आटोपल्यानंतरहि या सर्व कालांत उत्कृष्ट निबंधकार, कवी व कादंबरीकार यांचा एक विशेष प्रकारचा मोठा गट होऊन गेला. या कालांतील सर्व क्षेत्रांतील ग्रंथ अमेरिकन वाङ्मयांत अप्रतिम असें म्हणण्यास हरकत नाहीं. या कालांतील बहुतेक ग्रंथकार बोस्टन शहराच्या आसपास राहत होते व धर्मपरिवर्तनविषयक नवीन नवीन कल्पना आणि गुलामगिरीच्या विरुद्ध चाललेली चळवळ यांमुळें त्यांच्या मनावर मोठा परिणाम झालेला दिसून येतो. या कालांतील प्रसिद्ध ग्रंथकार म्हटले म्हणजे इमर्सन, होम्स, लोवेल, लाँगफेलो आणि व्हिटिअर हे होत. यादवी युद्धानंतर अनेक लेखकांनीं गद्य व पद्य यांची रचना केलेली आहे व अमेरिकन वाङ्मयाचा दर्जा उच्च ठेवण्यास मदत केली आहे व त्यांपैकीं अनेकांनीं चांगली कीर्ति मिळविली आहे. असे ग्रंथकार म्हटले म्हणजे हॉवेल्स, मार्क ट्वेन, रायले, फील्ड, ब्रेटहार्ट, ओ. हेन्री, चर्चिल वगैरे होत.

**अमेरिकस, व्हेस्प्युसिअस** (१४५१-१५१२)— अमे-रिका खंडाचा संशोधक. याच्या नांवावरून अमेरिका खंडाला नाव मिळालें. १४९९ सालीं स्पेनच्या वतीनें यानें अमेरिका खंडाच्या बराच किनाऱ्यानें प्रवास केला व १५०३ सालीं पोर्तुगीज सरकारच्या वतीनें यानें दक्षिण अमेरिकेचा शोध लाविला. १५०५ पासून मरेपर्यंत स्पेनचा नावाध्यक्ष या अधिकारावर असतांना त्यानें आणखी बरेच शोध केले. हा कोलंबसचा मित्र होता.

**अमेरिका**—जगामध्यें जमिनीचे जे प्रचंड भाग आहेत त्या-पैकीं अमेरिका खंडाचा क्रमांक दुसरा लागेल. या जमिनीच्या विभागांत उत्तर अमेरिका व दक्षिण अमेरिका अशीं दोन खंडें असून तीं पनामाच्या संयोगी भूमीनें एकत्र जोडलेलीं आहेत. या सर्व विभागाचें क्षेत्रफळ १६०,००००० चौ. मैल असून एकट्या द. अमेरिकेचें क्षेत्रफळ ७५,००,००० इतकें चौ. मै. आहे. सर्वांत जास्त लांबी दहा हजार मैल असून ती उत्तर बुथीया फेलीक्स (७२° उत्तर अक्षांश) ते केप हॉर्न (

दक्षिण अक्षांश ) या भागांत आहे. एकंदर किनारा ४४ हजार मैल लांबीचा आहे.

उत्तर अमेरिका व द. अमेरिका यांचा आकार साधारणतः त्रिकोणी असून द. अमेरिकेचें आकाराच्या बाबतींत आफ्रिका खंडाशीं बरेंचसें साम्य आहे. या खंडाच्या मर्यादा म्हणजे आर्क्टिक, अॅटलांटिक आणि पॅसिफिक महासागर या होत. वायव्य भागांतील आलास्का आशिया खंडापासून अवघ्या ५० मैलांवर आहे आणि ग्रीनलंड आइसलॅंडपासून अवघ्या ३५० मैलांवर आहे. द. अमेरिकेंत मुख्यत्वें अमेझॉन नदीचें मुख, प्लेट नदीचें मुख आणि पनामाचें आखात एवढा भाग साधारण दंतुर आहे. उत्तर अमेरिकेंत किनाऱ्याचा दंतुरपणा जास्त असून मेक्सिकोचें आखात, सेंट लॉरेन्सचें आखात, हडसन उपसागर, पश्चिमेकडील कॅलिफोर्नियाचें आखात आणि आलास्काचें आखात, यांमुळें उत्तर अमेरिकेचा किनारा जास्त दंतुर आहे. द. अमेरिकेजवळील बेटें कुराकवा, ट्रिनिदाद, टेरा डेलफ्युगो, फाकलॅन्डस्, गालापागास् ( द्वीप ) समूह वगैरे बेटें फारशीं मोठीं नाहींत; परंतु उत्तर अमेरिकेजवळील बेटें ग्रीनलॅंड; बफीनलॅन्ड आणि भोंवतालचा समूह (आर्क्टिक महासागरांतील); प्रिन्स एडवर्ड, लॉंग, बरमूडाज, वेस्ट इंडीज, ( अॅटलांटिक महासागरांतील बेटें ); आणि पॅसिफिक किनाऱ्यापासून दूर असलेली क्वीन शारलोटी, आणि व्हॅनकुव्हर हीं बेटें आहेत.

अमेरिकेचें वैशिष्ट्य म्हणजे पश्चिम बाजूला पर्वतांची ओळ, आणि पूर्व व मध्य बाजू सपाट हें होय. उत्तर अमेरिकेंत पश्चिम बाजूला रॉकी पर्वत आणि किनाऱ्याला समांतर जाणारी कॅस्केड पर्वताची ओळ आणि कॅलिफोर्नियांतील सिअेरा नेवाडा हे प्रमुख पर्वत होत. पूर्वेकडे अॅपेलेशिअन पर्वत आहेत, परंतु त्यांना पर्वत न म्हणतां डोंगर म्हणणें जास्त शोभेल. उत्तर अमेरिकेंतील सर्वांत उंच शिखर मॅक किनले होय. याची उंची वीस हजार तीस फूट असून तें आलास्कांत आहे. मध्य अमेरिका व पनामा-विभाग याचा बहुतेक प्रदेश डोंगराळ असून त्यामध्यें सीअेरा माड्रे, कॉरडीलेरा, आणि तिलारान या पर्वतांच्या प्रमुख ओळी आहेत. मध्य अमेरिकेंतील आणि पनामामधील हे पर्वत ज्वालामुखी आहेत. सर्वांत उंच शिखर पोपोकॅटपेटल् १८ हजार फूट उंच आहे.

दक्षिण अमेरिकेंत पर्वताच्या ओळी संबंध खंडभर खंडाच्या पश्चिम बाजूनें पश्चिम किनाऱ्यालगत पसरलेल्या असून त्यांना अॅन्डीज हें नांव आहे. अकॉनकागुआ ( २३०८० फूट ); सोराटा ( २१४८४ फूट ) आणि साहामा ( २१०५४ फूट ) हीं उंच शिखरें होत. याव्यतिरिक्त एखादा दुसरा लहानसा डोंगर सोडल्यास बाकीचा प्रदेश सपाटच आहे.

उत्तर अमेरिकेंत सुपीरिअर, मिचीगान, ह्यूरान, एरी, ओन्टारीओ, ग्रेट बेअर, ग्रेट स्लेव्ह, वीनीपेग आथाबास्का, वगैरे सरोवरें महत्त्वाचीं आहेत. परंतु द. अमेरिकेंत नांव घेण्यासारखें एकच सरोवर आहे. तें म्हणजे टीटीकाका होय. या सरोवरांच्या अस्तित्वामुळें अमेरिका खंडाच्या अंतर्विभागांत जलमार्गानें वाहतुकीची सोय इतकी उत्तम झाली आहे कीं, हा सरोवरांचा विभाग म्हणजे जगांतील सर्वांत मोठें औद्योगिक ठिकाण बनलें आहे.

अमेरिका खंडाचें हवामान निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें आहे. उत्तर अमेरिकेचा पूर्व भाग पश्चिम भागापेक्षां जास्त थंड असून तेथील हिवाळ्यांतील उष्णतामान जरी पुष्कळ खालीं जातें तरी कोरड्या हवेमुळें तेथील थंडी इतकीशी भासत नाहीं. याउलट द. अमेरिकेंतल्या सर्वांत मोठ्या भूप्रदेशावरून विषुववृत्त-रेषा जात असल्यानें त्या भागांत बाराहि महिने दमटसर व उष्ण हवामान आढळतें. उत्तर अमेरिकेंत उत्तरेकडून येणारे थंड वारे कित्येकशें मैलपर्यंत खंडाच्या आंतील भागांत घुसतात. कारण त्यांना प्रतिबंध करण्यासाठीं कांहींहि आडवें नाहीं.

अमेरिकेंत खनिज संपत्ति विपुल आहे. प्रचंड जंगलें आहेत. खनिज तेलाच्या खाणी आहेत, आणि या सर्वांचा उपयोग उत्तर अमेरिकेंतले लोक करीत आहेत. परंतु द. अमेरिका मात्र जरी संपन्न आहे तरी अद्यापि तेथें फारशी प्रगति झालेली नाहीं. अमेरिकेचीं मूळचीं पिकें म्हणजे, मका, बटाटे, तंबाकू हीं होत; परंतु आधुनिक जगांत, गवताऐवजीं गवताळ प्रदेशांत गव्हाची लागवड यशस्वी ठरली असून त्यामुळें गव्हाचें पीक बेसुमार येतें. आणि तें इतकें कीं, भावनियंत्रणासाठीं जास्त झालेला गहूं वेळप्रसंगीं जाळावा लागतो. गहूं, इतर धान्यें, ऊंस, कापूस आणि फळफळावळ उत्तर अमेरिकेंत विपुल पिकतात.

लोकवस्ती—उ. अमेरिका १४ कोटी ३० लक्ष; द. अमेरिका ८ कोटी ८० लक्ष; मध्य अमेरिका ४ कोटी १० लक्ष.

अमेरिकेची लोकवस्ती म्हणजे निरानिराळ्या जाती व त्यांचें मिश्रण यांपासून बनलेली आहे. एस्किमो, रेड्इंडियन आणि अमेरिकेंत वसाहती करण्यासाठीं गेलेले युरोपियन वसाहतवाले ( यामध्यें डच, फ्रेंच, इंग्रज वगैरे लोकांचा समावेश होतो ) व आफ्रिकेंतून गुलाम म्हणून आणलेले निग्रो या सर्वांच्या मिश्रणानें बनलेली आहे.

उत्तर अमेरिकेचे कॅनडा, न्यू फाउन्डलंड, ब्रिटिश हॉंडुरस, हे भाग इंग्रजांचे असून आलास्का हा संयुक्त संस्थानचा प्रदेश आहे. ग्रीनलॅंड डेन्स लोकांचें आहे. याशिवाय मेक्सिको, ग्वाटिमाला, साल्वेडार, हॉंडुरस, निकाराग्वा, कोस्टारिका आणि पनामा हीं स्वतंत्र संस्थानें आहेत. परंतु या सर्वांत

कॅनडा व संयुक्त संस्थानें यांचा इतिहास म्हणजेच नव्या जगाचा इतिहास होय. (वरील सर्व देशांची माहिती त्या, त्या शब्दाखालीं पाहावी).

या नव्या जगाशीं दळणवळण दहाव्या शतकांत आइसलँड, ग्रीनलंड आणि कॅनडा या मार्गानें नॉर्स लोकांनीं सुरू केलें. परंतु १४९२ मध्यें ख्रिस्टोफर कोलंबसानें वेस्ट इंडीज बेटांचा शोध लावला आणि १४९७ मध्यें जॉन कॅबट उत्तर अमेरिकेच्या मध्य प्रदेशांत येऊन धडकला. १४९८ मध्यें कोलंबसानें द. अमेरिकेचा शोध लावला. आणि त्याच्या पाठोपाठ या नव्या जगामध्यें निरनिराळ्या राष्ट्रांतील लोकांची वसाहत सुरू झाली. (कोलंबस व कॅबट पाहा.) नंतर आलेल्या लोकांपैकीं, ज्या ज्या भागांत जे जे प्रथम शिरले त्यांचीं नांवें त्या त्या भागांना दिलीं आहेत.

**अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें**—अमेरिकन संयुक्त संस्थानांचें मिळून झालेलें एक मोठें लोकसत्ताक राज्य. यांत ४८ संस्थानें आहेत. याच्या उत्तरेस कानडाचें संघराज्य (डोमिनिअन), दक्षिणेस मेक्सिको व पूर्व पश्चिम दोन्ही बाजूंस अनुक्रमें अॅटलांटिक व पॅसिफिक महासागर आहेत. क्षेत्रफळ ३०२२३८७ चौरस मैल. या क्षेत्रफळांत आलास्का व हवाई बेटें यांचा समावेश केला नाहीं. शिवाय दूरवर विखुरलेला पोर्टोरिको, ग्वाम, सामोआ, कॅनॉल झोन (पनामाचा), व्हर्जिन लँड यांचें क्षेत्रफळ ७८९९ चौ. मै. आहे तें निराळेंच. १९४० सालच्या खानेसुमारींत लोकसंख्या १३१६६९२७५ होती. अमेरिकेमध्यें स्वाभाविकपणें होणाऱ्या वाढीबरोबरच परराष्ट्रांतून या देशांत स्थाईक होण्यास येणाऱ्या इसमांच्या संख्येनेंहि ही वाढ फुगलेली आहे. पूर्वींहि बाहेरच्या लोकांची वाढ फार होत असे म्हणून व विशेषतः श्वेतवर्णीयेतरांस मज्जाव करण्याच्या दृष्टीनें त्यांजवर निर्बंध घालण्यांत आले आहेत व गौरकाय लोकांचीहि राष्ट्रवारी संख्या नियंत्रित करण्यांत आलेली आहे. केवळ उच्च राहणीचे व श्वेतकाय लोकच देशांत असावेत हें ध्येय या निर्बंधांच्या व नियंत्रणांच्या मुळाशीं आहे. संस्थानांच्या ताब्यांत अॅटलांटिक व पॅसिफिक महासागरांत मिळून १०० हून जास्त बेटें आहेत. त्यांतून फारच थोडी वस्ती झालेली आहे. १९३५–३६ सालीं सागरी विमानमार्गाकरितां लागणाऱ्या विमानतळांसाठीं वरीलपैकीं कांहीं बेटांची निवड होऊन, त्यांवर जरूर तें बांधकाम करण्यांत येऊन वस्तीची सोय करण्यांत आली. वॉशिंग्टन हें मुख्य ठिकाण कोलंबिया जिल्ह्याशीं समव्याप्त म्हणजे सबंध जिल्हाभर वसलेलें आहे. एकाच शहराचा विस्तार फार मोठा झाल्यानें त्यांतील बराच भाग व्हर्जिनिया स्टेटला १८४६ सालीं तोडून देण्यांत आला. शिकागो, फिलाडेल्फिआ वगैरे शहरेंहि फार मोठीं व महत्त्वाचीं आहेत. अति शीत व अति उष्ण सोडून सर्व प्रकारचें हवामान या देशांत आढळून येतें. तसेंच जमिनी सर्व प्रकारच्या आहेत. सपाट, सुपीक जमीन, जंगलें, डोंगराळ प्रदेश, पायऱ्या पायऱ्यांनीं असणारीं गवताळ मैदानें, उंच उंच व प्रदीर्घ लांबीचे डोंगर व पर्वत, दऱ्या–खोरीं, असे भूविषयक नाना प्रकार येथें आढळतात. लहान मोठ्या महत्त्वाच्या नद्या अनेक आहेत. मिसिसिपी, ओहिओ, हडसन, डिलावेर, कोलंबिया वगैरे प्रमुख आहेत. मोठमोठीं सरोवरें आहेत, त्यांत ग्रेट लेक्स म्हणून पांच मोठीं आहेत. पुष्कळ नद्या नौकावाह्य आहेत. जगप्रसिद्ध नायगारा धबधब्यासारखीं प्रेक्षणीय स्थळें आहेत. खनिज बाबतींतहि अमेरिका स्वयंपूर्ण व सर्वसंपन्न आहे. जगांतील एकंदर पुरवठ्यापैकीं $\frac{3}{4}$ पेट्रोल अमेरिका पुरवते. कोळसा $\frac{1}{2}$ अमेरिकाच देते. हेलियमप्राप्तीचें जगांतलें एकमेव स्थान अमेरिकाच (टेक्सस संस्थान) आहे.

शेतकी व उद्योगधंदे, तसेंच कारखाने याबाबतहि अमेरिका अग्रेसर आहे. लागवडीस मिळण्याजोग्या जमिनीपैकीं $\frac{1}{3}$ जमीन शेतीखालीं आहे. पश्चिम व नैर्ऋत्य भागांत कालवे काढून पाण्याची सोय झाल्यानें २०,०००,००० एकर जमीन नवीनच लागवडीखालीं आली. अमेरिकेचें कापसाचें पीक फार मोठें असतें. कापसाच्या जागतिक पुरवठ्यांत अमेरिकेचा क्रम पहिला लागतो. मकाहि त्याचप्रमाणें. गव्हाच्याबाबत मात्र रशियाचा क्रम श्रेष्ठ आहे. सर्व प्रकारचीं धान्यें, फळें व भाजीपाला या देशांत होतात. जनावरांची पैदास मांसाकरितां व दूधदुभत्याकरितां मोठ्या प्रमाणांत होते. कोंबड्यांची जोपासना सर्वत्र होते. घोडे व खेचरें यांच्याहि पैदाशीकडे व जोपासनेकडे लक्ष दिलें जातें. पश्चिम व नैर्ऋत्य भागांतील पशुजोपासनेची व त्या विद्येची ख्याति आहे. लांकूडपुरवठा व मच्छीमारी हेहि महत्त्वाचे उद्योगधंदे, आहेत. शेती व खनिज यांवर अवलंबून असणारे उद्योगधंदे यांत्रिक कारखाने, खाद्यपदार्थांचे कारखाने वगैरे यादी देण्याच्या पलीकडचे म्हणजे असंख्य आहेत.

अमेरिकेचा आंतरदेशीय व बाह्य जगाशीं होणारा व्यापार फारच प्रचंड स्वरूपाचा आहे. हा सर्व व्यापार चालण्यास दोन्ही किनाऱ्यांवरील उत्कृष्ट बंदरें, मेक्सिकोचीं बंदरें, लांब आंतवर बोटी जाऊं देणाऱ्या नद्या, मोठमोठीं सरोवरें यांनीं फारच मोठी मदत केली आहे. १९४४ सालीं अंतर्गत उत्पन्न ४१,६८,४१,८७, ३३० डॉलर व जकातीचें उत्पन्न ४३,१२,९२,१६८ डॉलर इतकें झालें. अमेरिकेचें १९४३ सालचें राष्ट्रीय उत्पन्न १,४७,९२, ७०,००,००० डॉलर होतें. म्हणजे दरमाणशीं १,२१४ डॉलर पडतें.

अमेरिकन राज्यकारभार लोकसत्ताक आहे. सर्व लोकसत्ताक संस्थानांनीं संयुक्त कारभाराच्या सोयीसाठीं एक विशाल मध्यव

सत्ताकेंद्र ( संयुक्त संस्थानांचें मध्यवर्ती सरकार ) निर्माण केलें आहे : १ शासन, २ कायदेनिर्मिति, ३ न्यायदान. संस्थानें व फेडरेशन यांच्या कारभाराचें क्षेत्र व मर्यादा हीं स्वतंत्र व निश्चित आहेत व तीं घटनेमध्येंच नमूद करण्यांत आलीं आहेत. राष्ट्राध्यक्ष ( प्रेसिडेंट ) याच्या मदतीस कार्यकारी मंडळें–अनेक विशिष्ट कारभाराचीं–असतात. या मंडळांच्या प्रमुखांचें मिळून एक स्वतंत्र सल्लागारमंडळ राष्ट्राध्यक्षांच्या मदतीसाठीं असतें. प्रत्येक स्वतंत्र घटक संस्थानचें अंतर्गत सरकार स्वतंत्रच असतें. गव्हर्नरच्या अधिनियंत्रणाखालीं सर्व प्रकारचे कायदे त्या त्या संस्थानाकरितां त्यांचीं त्यांचीं कायदे-मंडळें करतात. शिवाय कॉउंटी कौन्सिलें, म्युनिसिपल व टाउन कौन्सिलेंहि असतातच.

अमेरिकेचा इतिहास, जलपर्यटण करणारे कोलंबसादि संशोधक यांच्या संशोधनानंतर ज्या वसाहती झाल्या तेथूनच सुरू होतो. मुख्य वसाहती इंग्रज व डच यांच्या होत्या. या अॅटलांटिक महासागराच्या बाजूच्या किनाऱ्यानें होत्या. १७ व्या शतकांत डच वसाहती ब्रिटिशांनीं आपल्याकडे घेतल्या. बहुतेक सर्व वसाहतींची वाढ व प्रगति फारच झपाट्यानें होत गेली. त्यांत १३ प्रमुख होत्या. स्थानिक मूळ रहिवासी यांच्याशीं होणारे नेहमींचे झगडे आणि वेळोवेळीं युरोपियन राजकारणांत होणारे फेरबदल, लढाया वगैरेंचे या संस्थानांतून उठणारे पडसाद यांमुळें या संस्थानांतून नेहमीं युद्ध चालूच असे. मूळ मातृदेश व वसाहती यांत–स्थलांतरानें व कालांतरानें स्थानिक परिस्थितींत जसा त्यांचा विकास होत गेला तसा त्यास धरून उभयतांमध्यें अनेक प्रकारचा फरक व भेद पडत गेला. स्थानिक वसाहतींमधले पुढारी हळूहळू आपण मूळ देशापासून स्वतंत्र व्हावें असें बोलूं लागले. अखेर पुष्कळ वसाहतींनीं एक होऊन इंग्लंडपासून आपण पूर्णतया स्वतंत्र आहों असें जाहिर केलें ( १७७६ ). सतत सात वर्षें त्यांचा हा लढा चालूच होता. शेवटीं जॉर्ज वॉशिंग्टनच्या आधिपत्याखालीं अमेरिकन सैन्यानें इंग्रज सेनापति लॉर्ड कॉर्न्-वॉलीसवर मात केली आणि १७८३ मध्यें पॅरिसचा तह निर्णायक स्वरूपाचा होऊन ' युनायटेड स्टेट्स ऑफ् अमेरिका ' हें संयुक्त मध्यवर्ती सरकार स्थापन झालें. पुढें त्यांची घटनादिकांची योजना झाल्यावर १७८८ मध्यें स्वतंत्र अमेरिकेचा पहिला अध्यक्ष ( प्रेसिडेंट ) म्हणून जॉर्ज वॉशिंग्टन यास नेमण्यांत आलें.

पूर्वकिनाऱ्यावरील वसाहती जशा जशा बद्धमूल होत गेल्या व संशोधकांनीं पश्चिमेकडे पूर्व किनाऱ्यापासून दूर दूर जसजसा टापू आपल्या नजरेखालीं घेतला तसतशा आंतील बाजूस नव्या नव्या वसाहती होत गेल्या व क्षेत्रविस्तार वाढत चालला. या नव्या वसाहती नव्या संयुक्त संस्थानांत सामील करून घेण्यांत आल्या. जुन्या वसाहतींनीं आपल्या ताब्यांतला पश्चिमेकडील पुष्कळ प्रदेश मध्यवर्ती सरकारच्या स्वाधीन केला व त्याच्या आणि १८०३ मध्यें फ्रान्सपासून विकत घेतलेल्या सर्व प्रदेशाच्या " टेरिटरीज " बनविण्यांत आल्या व पुढें त्यांचें स्वतंत्र संस्थानांत रूपांतर झालें. १८६७ मध्यें रशियाकडून आलास्का विकत घेण्यांत आला. अमेरिकन सामोआ (पहा.) १९०० मध्यें मिळविण्यांत आला. १९०४ मध्यें कॅनॉल झोन–पनामा कॅनॉलच्या दोहों बाजूंची पट्टी–कायम भाडेपट्ट्यानें घेण्यांत आली. १९१७ मध्यें डेन्मार्कपासून व्हर्जिन आयलंड्स विकत घेतलीं गेलीं.

स्वातंत्र्ययुद्धानंतर अमेरिकेचें आंतरराष्ट्रीय असें युद्ध पुन्हां ग्रेटब्रिटनशींच १८१२ सालीं झालें. युरोपमध्यें नेपोलियनशीं लढाया चालू होत्या त्या वेळीं अमेरिकेनें तटस्थ वृत्ति धारण करण्याचें धोरण ठेवलें होतें. इंग्लंडच्या मनाप्रमाणें अमेरिका हें धोरण सोडण्यास तयार नव्हती आणि स्वतःच्या ताब्यांतील सागरीय भागांत इंग्लंडला वरील धोरणास बाध येईल अशा रीतीनें संचार करूं देण्यासहि तयार नव्हती. तेव्हां त्या भागावरील दर्यावर्दी सत्ता कोणाची हा वाद उत्पन्न होऊन तो निकालांत काढण्याकरितां आणि पर्यायानें आपल्या कष्टार्जित स्वातंत्र्याला मर्यादित करूं पहाणाऱ्या इंग्लंडला आपल्या सत्तेची व बलाची जाणीव करून देणें भाग होतें. इंग्लंड व फ्रान्स यांचें दीर्घकालीन शत्रुत्व व विशेषतः नेपोलिअनशीं वैर यांमुळें त्यांच्या-विरुद्ध म्हणून अमेरिकेच्या सत्तेला न जुमानतां होणाऱ्या इंग्लंडच्या अमेरिकन–सागर–संचारानें अमेरिकेच्या वाढत्या व्यापारासहि धोका उत्पन्न झाला. अखेरीस १८१२ मध्यें इंग्लंडशीं युद्ध जाहीर करणें भाग पडलें. सुमारें तीन वर्षें हें युद्ध चाललें व अखेरीस अमेरिकेला यश आलें. यामुळें अमेरिकन स्वातंत्र्याची जणूं काय पुन्हां नव्यानें स्थापना होऊन तें दृढ झालें आणि पश्चिमेकडील क्षेत्रविस्ताराचें व औद्योगिकसंवर्धनाचें कार्य निर्विघ्पणें चालवणें आतां सुलभ झालें. स्थानिक इंडिअन लोकांबरोबर झगडे व युद्ध हीं नुसतीं नित्याचींच झालीं होतीं. मेक्सिकोबरोबर सर-हद्द–सीमा–निर्णय युद्धानेंच करून घ्यावा लागला. दक्षिण व उत्तर विभाग यांच्यांत देशांतच एक यादवी युद्ध झालें (१८६१–६५). १८९८ मध्यें स्पॅनिश अमेरिकन युद्ध झालें. देशामध्यें सुबत्ता, भरभराट व हलाखी यांची या युद्धविषयक परिस्थितीमुळें जणूं खांदेपालटच चालू होती व व्यक्तीच्या त्याचप्रमाणें देशाच्याहि आयुष्यांत ' सुखस्यानंतरं दुःखं दुःखस्या-नंतरं सुखं ' असें चक्रवत् परिवर्तन घडून येत असतें, हें अनुभवास आलें. १९१४ चें युरोपियन महायुद्ध अखेरीस जागतिक झालें व त्यांत १९१७ मध्यें अमेरिका ओढली गेली. त्यानंतर लगेच

युद्धोत्तरकालीं अमेरिकेंत भरभराटीची लाट आली व ती कांहीं कालानें ओसरून १९३० सालीं अमेरिकाहि जागतिक मंदीच्या हलाखीमध्यें सहभागी झाली व कांहीं काळ असाच गेला. १९४१ सालापर्यंत अमेरिका दुसऱ्या महायुद्धांत पडली नव्हती. पण त्या सालच्या अखेरीस जेव्हां पर्ल बंदरवर आणि फिलिपाइन्स बेटांवर जपाननें हल्ले केले तेव्हां दोस्तांच्या बाजूनें अमेरिकेनें युद्धांत भाग घेतला. १९४५ त सर्व शत्रूंना नामोहरम करून अमेरिकेनें जगांत आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें.

**अमेशस्पेंत**—पारशी धर्मांतील देवदूतांचा वर्ग. अमेशस्पेंत हे अहुरमझ्द या देवाधिदेवाचे सेवक आहेत; व ते सुष्ट देवदूतहि आहेत. विश्वाला मार्ग दाखविण्यासाठीं ईश्वरानें त्यांना उत्पन्न केलें आहे व ते अमर आणि अदृश्यप्रकृति आहेत. प्रत्येक अमेशस्पेंताचा विशिष्ट महिना व दिवस असतो. त्यांना इंद्रादि सहा शत्रू आहेत. याप्रमाणें पारशी धर्मग्रंथांत या देवदूतांचें वर्णन आहे.

**अमोघवर्ष** (८१४–८७८)—राष्ट्रकूट राजघराण्यांतील एक प्रसिद्ध राजा. याच्या माहितीचे बरेच ताम्रपट, शिलालेख महाराष्ट्रांत सांपडतात. याच्या बिरुदावलींत ' लट्टलूर–पुर–परमेश्वर ' अशी पदवी आहे. त्यावरून तो लातूरचा राजा होता हें ठरतें. अमोघवर्षाचें राज्य बरेंच मोठें होतें. त्यानें मान्यखेत (मालखेड) जिंकल्याचा उल्लेख कऱ्हाडदानपत्रांत आहे. हा जैनधर्मी दिसतो. त्याच्या नांवावर 'प्रश्नोत्तररत्नमालिका' हा लहानसा नीतिग्रंथ उल्लेखिला जातो. राष्ट्रकूट घराण्यांत इतर कांहीं अमोघवर्ष नांवाचे राजे होऊन गेले आहेत.

**अमोनिया**—क्षारधर्मी रंगहीन तिखट वासाचा एक वायु. नत्र (नायट्रोजन) आणि उज्ज (हायड्रोजन) यांच्या संयोगानें हा तयार होतो. चुना आणि नवसागर ह्यांपासून प्रिस्टले ह्यानें हा प्रथम तयार केला. अजूनहि हीच पद्धत चालू आहे. दगडी कोळशाचें उत्पातन करतांना जें डांबर मिळतें त्यांत अमोनियाचीं लवणें असतात. त्यांतून अमोनियाचें मोठ्या प्रमाणांत उत्पादन होतें. हाडें, शिंगें, खूर यांच्यापासूनहि अमोनिया मिळूं शकतो.

अमोनिया वायु पाण्यांत चांगला विरघळतो. वैद्यकांत आणि रसायनशास्त्रांत याचा उपयोग करतात. हा क्षारधर्मी वायु असल्यामुळें अम्लांच्या संयोगानें ह्याचीं लवणें तयार होतात. शेतकींत ह्या लवणांचा नेहमीं उपयोग करतात.

**अम्ल**—(ॲसिड). ही संज्ञा अनेक घन, द्रव आणि वायुरूप संयुक्तांना लावण्यांत येते. याचे सामान्य गुणधर्म म्हणजे अंबटपणा, झोंबण्याचा गुण, वानस्पतिक नीलवस्तूंना तांबडें करण्याची शक्ति आणि अल्कांमुळें निरनिराळ्या प्रकारांनीं निर्वापित (न्यूट्रॅलाइज्ड) होणें, हे होत. अम्लामध्यें उज्ज (हायड्रोजन) असतो व या उज्जाच्या जागीं भस्मरूपानें धातूची पूर्ण किंवा अंशतः स्थापना होत असते. उज्जपरमाणू ज्या संख्येनें भस्माकडून निवेशिले जातात त्याप्रमाणें एकभस्मिक, द्विभस्मिक, त्रिभस्मिक, अशीं अम्लाला नांवें मिळतात. जेव्हां उज्जाच्या जागीं एखाद्या धातूची स्थापना होते, तेव्हां त्याचें फल म्हणजे त्या धातूचा क्षार तयार होतो. गंधकाम्ल, नत्राम्ल, उज्जहरिकाम्ल (हायड्रोक्लोरिक ॲसिड) हींच अम्लें बहुधा फार मोठ्या प्रमाणांत तयार करण्यांत येतात. कांहीं बरींच उपयुक्त अम्लें निसर्गजन्य असतात तर त्यांहूनहि कितीतरी अधिक कृत्रिम रीतीनें बनवितात.

**अम्लचित्रलेखन**—(एचिंग). धातूच्या पत्र्यावर अम्लाच्या साहाय्यानें रेघा खोदण्याच्या कलेस अम्ललेखन म्हणतात. या पद्धतीमध्यें प्रथम धातूच्या (बहुतेक तांब्याच्या) पत्र्यावर मेण किंवा राळ वगैरेचा एक सारखा थर देण्यांत येतो. या थरावर कारागीर एका तीक्ष्ण टोंकदार हत्यारानें रेघा ओढून छापावयाची आकृति काढतो. नंतर त्या पत्र्याच्या पाठीला व बाजूंना अम्लाचा परिणाम होणार नाहीं अशा तऱ्हेचें रोगण लावण्यांत येतें व तो पत्रा नत्र किंवा हर अम्लामध्यें (नायिट्रिक किंवा हायड्रोक्लोरिक ॲसिडमध्यें) ठेवण्यांत येतो. ज्या ठिकाणीं रेघा कोरलेल्या असतात तो भाग अम्ल खाऊं लागतें व याप्रमाणें पुरेशा खोल रेघा उठल्या म्हणजे पत्रा काढून घेण्यांत येतो. जर कांहीं रेघा अधिक खोल करावयाच्या असतील तर त्या रेघा उघड्या ठेवून बाकीच्या भागावर रोगणाचा थर देण्यांत येतो व तो पत्रा पुन्हां अम्लामध्यें बुडवून ठेवण्यांत येतो किंवा त्या रेघांवर अम्ल लावण्यांत येतें. दुसऱ्या पद्धतीमध्यें पत्र्यावर पातळ चरबीचा थर देण्यांत येतो व नंतर त्यावर एक पातळ कागद ठेवण्यांत येऊन त्यावर इष्ट आकृति पेन्सिलीनें दाबून काढण्यांत येते. नंतर तो कागद काढून घेण्यांत आला म्हणजे त्या आकृतीच्या रेघा चरबींत उठलेल्या असतात. नंतर हा पत्रा अम्लांत घातला म्हणजे या रेघांचा भाग अम्ल खातें व चरबीचा खात नाहीं. यामुळें रेघांचा भाग खोल जाऊन आकृति उठते. एखाद्या तीक्ष्ण टोंकाच्या शस्त्रानें पत्र्यावर आकृति कोरण्यांत येते, यामुळें त्या पत्र्यावर रेघांच्या बाजूस थोड्या कडा उठून येतात. या सर्व पद्धतींचाहि कांहीं चित्रांत उपयोग करण्यांत येतो. या आकृती छापतांना शाई या रेघांमध्यें भरण्यांत येते व बाकीचा भाग पुसून काढण्यांत येतो. याप्रमाणें छापण्याच्या ठिकाणीं शाई राहते. नंतर हातानें अगर यंत्रानें दाबून छाप घेतां येतात. यंत्रानें छपाई जलद व चांगली होते.

जुन्यांत जुनें अम्ललिखित चित्र सन १५१३ मधील आढळतें. या पद्धतीनें चित्रें कोरणारा पहिला कारागीर आल्बेक्ट ड्यूरर (१४७१–१५२८) हा होय. अशा पद्धतीनें चित्रें कोरणें कि-

छापणें हा कलावंतांचा मुख्य व्यवसाय नसून ते स्वतः चित्रकार किंवा कोरीव काम करणारे होते व त्या व्यवसायास साहाय्यक म्हणून हें काम त्यांस करावें लागे. या कलेची वाढ विशेषतः सतराव्या शतकांत झाली. सर अँथनी फॉन डाइक हा इंग्लंडच्या राजाचा राजचित्रकार होता. तथापि तो अम्ललेखनकलेमध्यें प्रवीण असून या पद्धतीनें चित्रें कोरणारांत अग्रेसर होता. तथापि या कलेंत रेंब्राँ फॉन रिन यास नेहमींच (१६०६–१६६९) पहिलें स्थान देण्यांत येतें. यानंतर या कलेंतील कांहीं कारागीर होऊन गेले, त्यांत होगार्थ व रौलंडसन हे विशेष प्रसिद्ध आहेत. रौलंडसन यानें आपल्या व्यंगचित्रांकरितां या कलेचा उपयोग केला. जॉन क्रोम यानें कांहीं निसर्गदेखावे या पद्धतीनें छापले. टर्नर याचीं या पद्धतीचीं ७१ चित्रें एका संग्रहांत आहेत. यांत अम्ललेखनपद्धतीनें फक्त पृष्ठभूमि तयार करण्यांत आली आहे. यानंतर या कलेची वाढ फ्रान्समध्यें थोडीफार झाली. यांत लेग्रॉस हा प्रसिद्ध आहे. यानंतर कल्पनावादी चित्रकलेंत निष्णात असा कॅमिल पिसारो (१८१०–१९०३) यानें कांहीं सुंदर चित्रें या पद्धतीनें तयार केलीं. तसेंच त्याचा मेहुणा हॅडन यानेंहि या पद्धतीनें कांहीं चित्रें छापलीं. सर फ्रँक शॉर्ट, सर डी. वायू. कॅमेरॉन, म्यूर हेडबॉन, जेम्स चे आणि ऑगस्टस जॉन हीं नांवें या कलेच्या प्रणेत्यांत प्रामुख्यानें आढळतात.

**अम्लपित्त**—हा पित्ताचा एकप्रकार आहे. अग्निमांद्य किंवा दीर्घकालीन अपचन या रोगाच्या लक्षणांपैकीं अम्लपित्त एक आहे. यानें आंबट ढेकरा येतात व आंबट वांति होते. थकवा, छातींत खळबळ, घशाशीं जळजळ, तोंडाला चव नसणें, या गोष्टी रोग्याला जाणवतात. सोडा घेतल्यानें जळजळ कमी होते. शौचास होण्यासाठीं औषध घेतात.

**अयन (बिंदु)**— पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते, परंतु आपणास सूर्य क्रांतिवृत्तावर वर्षांतून एक फेरी करतांना भासतो. अंतरिक्षाच्या मध्यगत रेषेशीं क्रांतिवृत्त कोन करतें. ज्या ठिकाणीं मध्यगत रेषेपासून सूर्याचें जास्तींत जास्त अंतर असतें त्या बिंदूस अयनें असें म्हणतात.

या ठिकाणीं सूर्य आपला मार्ग बदलतो—म्हणजे उन्हाळ्यांत २१ जूनच्या सुमारास उत्तरेस कर्कवृत्ताशीं असतो तो दक्षिणेस माघारा फिरतो व २२ डिसेंबरच्या सुमारास दक्षिणेस मकरवृत्ताशीं असतो तो माघारा उत्तरेकडे वळतो. पहिल्या अयनाला उत्तरायण, ग्रीष्मायण किंवा कर्कसंक्रमण म्हणतात व दुसऱ्या अयनाला दक्षिणायन, हिमायन किंवा मकरसंक्रमण म्हणतात. सूर्याच्या उत्तरेकडील गमनाला व गमनाला लागणाऱ्या कालालाहि उत्तरायण म्हणतात. दक्षिणेकडील गमनाला व कालालाहि दक्षिणायन म्हणतात.

**अयनगति-चलन**—खविषुववृत्त आणि क्रांतिवृत्त यांना छेदणाऱ्या रेषेला जी थोडी गति आहे तिला म्हणतात. या गतीमुळें सूर्याचें संपातबिंदूजवळ पुढें किंवा मागें स्थलांतर होत असतें. व या स्थलांतराचें प्रमाण दरसाल ५०·२६ सेकंदें इतकें असतें. या खविषुवरेषेच्या आकाशांतील वर्तुलगतीवरून पृथ्वीच्या आंसाची गति कळून येते. हा आंस क्रांतिवृत्ताच्या ध्रुवांभोंवतीं २५,७९१ वर्षांत एक फेरी घालतो. या अक्ष-विचलनामुळें ६·८७ सेकंदें संपातबिंदु सरासरीच्या स्थानाच्या मागें किंवा पुढें जातात. आज वसंत संपातबिंदु जो रेवती नक्षत्रपुंजांत आहे तो हळूहळू कुंभ राशीकडे चालला आहे.

**अयुथिया**—(अयोध्या). सयाम. ही सयामची जुनी राजधानी १७६७ पर्यंत होती. पुढें बँकॉकला महत्त्व आलें. या शहराला मेनान नदीनें वेढा दिला असल्यानें याचें स्वरूप बेटाप्रमाणें आहे. शहरांत तरतीं घरें आहेत. येथें प्राचीन हिंदु अवशेष फार आहेत. लोकसंख्या सु. १२०००.

**अयुबखान**—एक अफगाण राजपुत्र. हा शेरअलीचा मुलगा व अमीर अब्दुल रहमान याचा चुलतभाऊ होता. शेरअलीच्या पदच्युतीनंतर यानें राज्य मिळविण्याचा प्रयत्न केला (१९७९–१८८७) पण तो अखेरीस यशस्वी न होतां त्याला ब्रिटिशांच्या स्वाधीन व्हावें लागलें व मरेपर्यंत तो राजकैदी म्हणून हिंदुस्थानांत होता.

**अयोध्या**— हिंदुस्थान, संयुक्तप्रांत. हा प्रांत उत्तरेस नेपाळ व आग्रा, पूर्वेस गोरखपूर व बनारस विभाग, पश्चिमेस बरेली व आग्रा विभाग, व दक्षिणेस अलाहाबाद विभाग अशा सरहद्दी-मध्यें आहे. उत्तरेकडील तीन जिल्हे हिमालयाच्या पायथ्याशीं व उरलेला प्रदेश गंगेच्या सपाटीवर आहे. यांत गंगा, शरयू, गोमती यांसारख्या पवित्र नद्या आहेत. रामायणकालापासून अयोध्येची प्रसिद्धि आहे. हा त्या वेळचा कोसल देश होय. बौद्धकालांतहि उपलब्ध अवशेषांवरून या प्रांताला महत्त्व असल्याचें कळतें. गुप्तकालांत पाटलीपुत्रापेक्षां अयोध्येला राजधानीचा दर्जा प्राप्त झालेला दिसतो. ११९३ मध्यें शहाबुद्दीन घोरी यानें हा प्रांत जिंकला. तेव्हांपासून ब्रिटिशांकडे तो १८५६ त येईपर्यंत मुसलमानांच्या ताब्यांत होता. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर हा प्रांत मोंगलांपासून स्वतंत्र होऊन सादतखाना-कडे आला व तो पुढें त्याच्या वंशजांकडेच ब्रिटिश अमलापर्यंत राहिला. १८५७ च्या हिंदी शिपायांच्या स्वातंत्र्ययुद्धांत या प्रांतांतील कांहीं जमीनदार सामील झाले होते. व लखनौ हें कांहीं काळ ब्रिटिशांच्या ताब्यांतून गेलें होतें.

या प्रांतांत लखनौ, फैजाबाद (अयोध्या), बाहरैच, सीतापूर, शहाबाद यांसारखीं कांहीं मोठीं शहरें आहेत. लोकवस्ती

अमेरिका — वॉशिंग्टन येथील कॅपिटॉल इमारत (पान ११५)

अरबस्तान — एडन येथील गोड्या पाण्याचे तलाव (पान १२३)

असन्शान — लोपेझ राजवाडा (पान १६१)

निमेनीम हिंदू-मुसलमान यांची आहे. औध-रोहिलखंड रेल्वे हा मुख्य लोहमार्ग व इतर कांहीं फांटे आहेत. पूर्वी एक चीफ कमिशनर या प्रांतावर असे. नंतर आग्रा-अयोध्या संयुक्त प्रांत झाल्यावर गव्हर्नरचा अमल चालला. या प्रांतांत २६७२१ खेडीं आहेत. यांपैकीं कांहीं ताल्लुकदारी जहागिरींत येतात. अयोध्या ताल्लुकदारी ही निराळीच जमीनदारी आहे. तिचें क्षे. फ. ७६२ चौ. मै. असून उत्पन्नापैकीं ५·९ लाख खंडणी सरकारांत भरावी लागते.

अयोध्या शहर २६°४८′ उ. अ. व ८२°१२′ पू. रे. वर वसलें असून शरयू नदीच्या कांठीं आहे. हें औध-रोहिलखंड रेल्वेवर स्टेशनहि आहे. लो. सं. सु. पंचवीस हजार. प्राचीन काळीं शहराला फार महत्त्व असलें तरी आज तें अगदीं मोडकळीस आलेलें आहे व फक्त यात्रेचें ठिकाण बनलें आहे. रामाच्या आयुष्यांतील कांहीं प्रसंगांचीं स्थानें दाखवितात. चिनी प्रवासी ह्युएनत्संग याच्या वेळीं बरेच बौद्ध विहार होते. रामकोट, हनुमान गढी, मानसिंगाचें देवालय, वगैरे इमारती लोक पाहण्यास जातात.

**अय्यंगार, कस्तूरीरंग**—( मृ. १९२३ ) एक हिंदी वृत्तपत्र-संपादक. हे प्रथम वकील होते. नंतर 'हिंदु' पत्र त्यांनीं आपल्याकडे घेऊन तें उत्कृष्ट रीतीनें चालविलें. 'हिंदु' हें मद्रास येथील इंग्रजी दैनिक असून फार लोकप्रिय आहे. त्याचा दर्जा इंग्रजी 'टाइम्स ऑफ इंडिया'च्या तोडीचा दक्षिण हिंदुस्थानांत जो आहे त्याला कारण कस्तूरीरंग अय्यंगारांचें कर्तृत्व होय. त्यांना राजकीय पुढारीपणहि प्राप्त झालें होतें. गेल्या महायुद्धांत युद्धक्षेत्राचें निरीक्षण करण्यासाठीं हिंदी पत्रकारांचे एक प्रतिनिधि म्हणून ते युरोपांत जाऊन आले होते.

**अय्यंगार, (सर) एन्. गोपालस्वामी** ( १८८२- )— एक हिंदी मुत्सद्दी. हे प्रथम कॉलेजांत प्राध्यापक होते व नंतर मद्रास सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरले व चढत गेले. कलेक्टर, गव्हर्मेंट सेक्रेटरी, इ. मोठ्या जबाबदारीच्या जागांवर कामें करून निवृत्त झाले. पांच वर्षे ( १९३७-४३ ) ते काश्मीर संस्थानचे दिवाण होते. घटनासमितींत ते सभासद असून जागतिक राष्ट्रसंघ (युनो)च्या सुरक्षासमितीपुढें हिंदुस्थान सरकारतर्फे काश्मीर-प्रकरणाची बाजू मांडण्याची कामगिरी यांच्याकडे होती. हे चांगले कायदेपंडित व मुत्सद्दी आहेत.

**अय्यंगार, एस्. श्रीनिवास** (१८७४-१९४१)—एक हिंदी कायदेपंडित. यांचा जन्म ११ सप्टेंबर १८७४ रोजीं झाला. यांचें शिक्षण मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेजांत झालें. हे मद्रास हायकोर्टाचे ॲडव्होकेट होते. मद्रास युनिव्हर्सिटीच्या सीनेटचे सभासद व सोशल रिफॉर्म असोसिएशनचे अध्यक्ष (१९१२-१६) होते. ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे हे सभासद होते व कांहीं वर्षे मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. १९१६ ते १९२० पर्यंत हे मद्रासचे ॲडव्होकेट जनरल होते. १९२६-२७ सालीं हे राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. १९२९ मध्यें इंडिपेंडन्स ऑफ इंडिया लीगचे अध्यक्ष होते.

**अय्यर, सर अल्लादि कृष्णस्वामी** ( १८८३- )— एक हिंदी कायदेपंडित. यांचें शिक्षण मद्रास ख्रिश्चन कॉलेज व लॉ कॉलेज यांमध्यें झालें. १९०७ मध्यें हे हायकोर्ट वकील म्हणून धंदा करूं लागले. यांचा मद्रास युनिव्हर्सिटीशीं अनेक वर्षे संबंध असून हे कांहीं दिवस सिंडिक होते. हे अनेक सार्वजनिक, सामाजिक व धार्मिक चळवळींत भाग घेत असतात. मद्रासचे ॲडव्होकेट जनरल होते. यांनीं अनेक शैक्षणिक संस्थांस व गरीब विद्यार्थ्यांस देणग्या दिल्या आहेत. हे वरिष्ठ कायदेमंडळाचे सभासद व घटनासमितीचे कायद्याचे सल्लागार आहेत.

**अय्यर, सर पी. एस्. शिवस्वामी** (१८६४-१९४६)— मद्रास प्रांतांतील एक प्रागतिक पुढारी. यांचें शिक्षण तंजावर, कुंभकोणम् व मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेज यांमध्यें झालें. १८८५ मध्यें हे हायकोर्टांत वकिली करूं लागले. हे तेथील लॉ कॉलेजमध्यें १८९३ ते १८९९ पर्यंत असिस्टंट प्रोफेसर होते; व १८९३ ते १९०७ पर्यंत मद्रास 'लॉ जर्नल'चे संपादक होते. मद्रास कायदे कौन्सिलचे ते १९०४ ते १९०७ पर्यंत सभासद असून त्या वर्षी त्यांची ॲडव्होकेट जनरल म्हणून नेमणूक झाली. १९१२ ते १९१७ पर्यंत ते एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे सभासद होते. ते मद्रास युनिव्हर्सिटीचे १९१५ ते १८ पर्यंत व बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचे १९१८-१९ मध्यें व्हाइस चान्सेलर होते. १९२० मध्यें मध्यवर्ती लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत निवडून गेले. नॅशनल लिबरल फेडरेशन या प्रागतिकांच्या परिषदेचे ते १९११ व १९२६ या वर्षी अध्यक्ष होते. १९२२ मध्यें त्यांस जिनिव्हा येथील लीग ऑफ नेशन्सच्या असेंब्लींत प्रतिनिधि म्हणून पाठविण्यांत आलें होतें. १९२४ सालीं त्यांची पुन्हा लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत नेमणूक झाली होती. यांनीं 'हिंदी राज्यघटनेचे प्रश्न' (Indian Constitutional Problems) व 'भारतीय नीतिविचारांचा विकास' (Evolution of Hindu Moral Ideas–Kamla Lectures, 1934) हे ग्रंथ लिहिले आहेत.

**अय्यर, सर शेषाद्रि** ( १८४५-१९०१ )—म्हैसूर संस्थानचे एक दिवाण. १८६८ पासून ते संस्थानच्या नोकरींत होते व त्या वेळचे दिवाण रंगाचार्लू यांचे मदतनीस म्हणून १८८५ त दिवाण होईपावेतों काम करीत होते. दिवाण झाल्यानंतर त्यांनीं संस्थानची सर्व बाजूंनीं सुधारणा केली. आगगाडीचे रस्ते,

कालवे, खाणी, इ. कामें सुरू करून संस्थानची सांपत्तिक स्थिति सुधारली. १९०० मध्यें त्यांनीं दिवाणगिरी सोडली. म्हैसूर संस्थानांत त्यांचें नांव फार आदरानें उच्चारण्यांत येतें.

**अय्यर, सर सी. पी. रामस्वामी** (१८७२- )— एक हिंदी मुत्सद्दी व संस्थानी दिवाण. यांचें शिक्षण वेस्लिअन हायस्कूल, प्रेसिडेन्सी कॉलेज व लॉ कॉलेज यांमध्यें झालें. १९०३ मध्यें यांनीं हायकोर्टांत वकिली करण्यास आरंभ केला व १९२३ मध्यें त्यांस ॲडव्होकेट करण्यांत आलें. मद्रास म्यु. कॉर्पोरेशनचे ते १९११ मध्यें सभासद होते. राष्ट्रीय सभेचे ते १९१७-१८ मध्यें मुख्य चिटणीस होते. साउथ बरो कमिशन व मेस्टन कमिटी यांच्यापुढें त्यांनीं हिंदी सुधारणा-संबंधीं साक्ष दिली होती. युनिव्हर्सिटीतर्फें ते कौन्सिलांत निवडून आले ( १९१९-२० ). त्यांस १९२० मध्यें ॲडव्होकेट जनरल नेमण्यांत आलें. जिनिव्हा येथील लीग ऑफ नेशन्सच्या बैठकीस ( १९२६ व १९२९ ) ते हिंदी प्रतिनिधि म्हणून गेले होते व सार्वजनिक आरोग्याबद्दलचे वार्ताहर होते ( १९२७ ). मद्रास सरकारनें त्यांची कायदेमंत्री म्हणून ( १९२३-२८ ) नेमणूक केली. १९२४ सालीं ते कार्यकारी कौन्सिलाचे उपाध्यक्ष होते. कोचीन संस्थानातर्फें यांनीं बटलर कमिटीचें काम केलें. ब्रिटिश हिंदुस्थान व देशी संस्थानें यांचें एकीकरण करण्याकरितां नेमलेल्या समितींतहि यांनीं काम केलें. हे गोलमेज परिषदेंत व तिच्या घटनासमितींत (स्ट्रक्चरल कमिटी) होते. १९३१ सालीं यांची हिंदुस्थान सरकारमध्यें तात्पुरती कायदेमंत्री म्हणून नेमणूक झाली. तेथून ते त्रावणकोर संस्थानांत कायद्याचे सल्लागार म्हणून गेले व त्यांची गोलमेज परिषदेच्या सल्लागार समितीवर नेमणूक झाली. त्यांनीं दिल्ली युनिव्हर्सिटीच्या पदवीदान-प्रसंगीं ( १९३२ ), म्हैसूर युनिव्हर्सिटींत कृष्ण-राजेन्द्र व्याख्यान-मालेंत ( १९२८ ) व कलकत्ता युनिव्हर्सिटींत टागोर लॉ लेक्चर्समध्यें (१९३२) याप्रमाणें व्याख्यानें दिलीं. त्यांनीं नरेन्द्र मंडळानें नेमलेल्या समितीचे ( १९३३ ) अध्यक्ष म्हणून काम केलें व हिंदुस्थानांतील सुधारणांच्या बाबतींत पार्लमेंटनें नेमलेल्या विशेष संयुक्त समितींत सभासद म्हणून काम केलें (१९३३). हे जागतिक आर्थिक परिषदेस प्रतिनिधि म्हणून उपस्थित होते ( १९३३ ). काश्मीर संस्थानची नवीन घटना यांनीं तयार करून दिली ( १९३४ ). यांची हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी मंडळांत नेमणूक झाली होती; पण तीन महिन्यांतच राजीनामा देऊन ते बाहेर पडले. १९३५ सालापासून त्रावणकोर संस्थानचे दिवाण असतांना त्यांनीं संस्थानांत अनेक सुधारणा केल्या. संस्थान हिंदुस्थान सरकारशीं न जोडतां स्वतंत्र राखावें या मताचे ( ऑगस्ट १९४७ च्या स्वातंत्र्यदाना-नंतरच्या संस्थानी प्रश्नासंबंधांत ) ते होते. पण प्रजा व इतर हिंदी मुत्सद्दी त्यांच्या विरुद्ध मताचे असल्यामुळें ते सेवानिवृत्त झाले.

**अय्यर, सर सुब्रह्मण्यम् एम्.** (१८४२-१९२४)— एक हिंदी कायदेपंडित. वयाच्या १४ व्या वर्षी हे मॅट्रिक पास झाले व त्यांनीं कारकुनाची नोकरी धरली. पुढें डिस्ट्रिक्ट जज्जा-कडे वकिलीची सनद मिळावी म्हणून अर्ज केला असतां तो नाकारण्यांत आल्यामुळें खासगी रीतीनें अभ्यास करून हे बी. एल. झाले. व कांहीं दिवस तहशीलदाराची नोकरी केल्यावर हे मदुरा येथें वकिली करूं लागले. त्यांत यांनीं चांगला लौकिक संपादन केला व दूरदूरच्या ठिकाणांहून त्यांस बोलावणीं येऊं लागलीं. १८८४ सालीं ते मद्रास कायदेमंडळांत निवडून आले व मद्रास येथें वकिली करूं लागले. १८९५ मध्यें यांस न्यायाधीश नेमण्यांत आलें व पुढें हे तीन वेळां हायकोर्टाचे मुख्य न्यायाधीश होते. मद्रास युनिव्हर्सिटीचे हे व्हाइस चान्सेलर होते. यांस युनिव्हर्सिटीनें एलएल्. डी. पदवी व सरकारनें सर हा किताब दिला. १९१४ मध्यें हे मद्रास येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेचे स्वागताध्यक्ष होते. १९१८ मध्यें यांच्याबद्दल त्या वेळचे स्टेट सेक्रेटरी मॉंटेग्यु यांनीं अनुदारपणाचे उद्गार काढले म्हणून यांनीं सर या पदवीचा त्याग केला. हे थिऑसफिस्ट होते.

**अय्याशास्त्री**—पेशवाईतील एक न्यायाधीश. हे द्राविड ब्राह्मण होते. प्रसिद्ध रामशास्त्री यांच्यानंतर हे सवाई माधवरावा-च्या कारकीर्दींत न्यायाधीश होऊन गेले. श्रावणमासाची दक्षणा देण्यासाठीं रमण्यांत एका दरवाजावर बसण्याचा खास मान यांना असे.

**अरख**—हिंदुस्थानांतील एक असंस्कृत जात. हे लोक उत्तर हिंदुस्थान आणि मध्यप्रांत यांतून आहेत. लोकसंख्या सुमारें ८० हजार आहे. अरख सर्व वन्यधर्मीय हिंदू आहेत. उत्तर हिंदुस्थानांत शेतकी करतात व मध्य हिंदुस्थानांत शिकार करून राहतात.

**अरगजा**—एक उटणें. तवकीराला रंगवून पिवळें करून त्यास चमेली, उदाचें फूल, बेलिया, चंदनी अत्तर, वगैरेंचा वास देतात. उंची अरगजांत केशर, कस्तुरी यांसारखे पदार्थ वापरतात. पळसाच्या फुलापासून अत्तरी अरगजा करतात. मजमुआचा अरगजा असतो. अरगजाच्या मसाल्याचे मणी बनवून माळा करतात.

**अरॅगो, डॉमिनिक फ्रान्स्वाझ** ( १७८६-१८५३ )—एक फ्रेंच पदार्थविज्ञानी. यानें पदार्थविज्ञान, ज्योतिषशास्त्र, विद्युच्चुंबक-शास्त्र, दृक्शास्त्र, वगैरे शास्त्रांत संशोधन केलें आहे. त्यामुळें त्याला १८२५ मध्यें लंडनच्या रॉयल सोसायटीनें कोपले पदक अर्पण करून त्याचा मोठा सन्मान केला. आधुनिक पदार्थविज्ञान्यांनीं

प्रकाशाचा तरंगसिद्धांत जो सामान्यतः मान्य केला आहे त्याचें पुष्कळसें श्रेय अरॅगोला द्यावें लागतें. तो 'ॲकेडमी ऑफ सायन्स' या संस्थेचा पुष्कळ वर्षें चिटणीस होता. १८३० च्या क्रांतींत त्यानें प्रमुख भाग घेतला होता व तो १८४८ नंतर कांहीं काळ लष्कर-आरमार खात्याचा मंत्री होता.

**अरण्य**—या शब्दाचा अर्थ गांवाच्या बाहेरची पडित जमीन असा असून नेहमींच जंगल असा त्याचा अर्थ असतोच असें नाहीं. ही अरण्य-जमीन घराजवळील जमीन—वाडी, परसूं, वगैरे आणि शेतीची जमीन ( कृषि ) यांपासून वैदिक वाङ्मयांत पृथक् दाखविली आहे. आणि मनुष्यापासून ती दूर ( तिरः ) असते असेंहि दर्शविलें आहे. ही जागा म्हणजे चोरांचें वसतिस्थान होय. हींत आणि ग्राम यांत भेद दाखविला आहे. ऋग्वेदांतील एका स्तुतिपर सूक्तांत वनदेवतेच्या ( अरण्यानि ) वनाचें वर्णन केलें आहे. वनामध्यें मृतांना मूठमाती देण्याकरितां नेतात आणि भिक्षू अथवा संन्यासी वनांत वास करितात, असें वर्णन छांदोग्य उपनिषदांत ( ८.५,३ ) आहे. जंगलांत वणवे नेहमीं लागतात असेंहि ऋग्वेदांत वर्णन आहे ( १.६५,४;२.१४,२ ).

**ॲरन**—स्कॉटलंड, क्लाइड नदीमध्यें हें एक बेट असून त्याची लांबी सुमारें २० मैल, रुंदी १० मैल आणि क्षेत्रफळ १०५८१४ एकर इतकें आहे. त्यांपैकीं सुमारें १५ हजार एकरांचा प्रदेश लागवडींत आहे. गोठफेल हें उत्तरेकडील बाजूस सर्वांत उंच शिखर असून त्याची उंची २८६६ फूट आहे. या बेटावर दोन द्वीपगृहें त्याचप्रमाणें दर्यावर्दी सूचना देणारीं दोनतीन ठिकाणें आहेत. उन्हाळ्यामध्यें या बेटावर बरेच लोक हवा खाण्यास जातात.

**अरबस्तान**—आशिया खंडाच्या नैॠत्य बाजूकडील हें एक द्वीपकल्प असून त्याच्या पश्चिमेस आकाबाचें आखात आणि तांबडा समुद्र, दक्षिणेला एडनचें आखात आणि अरबी समुद्र, आणि पूर्वेला ओमानचें आखात व इराणचें आखात, आणि उत्तरेला आशियांतील तुर्कस्तान, असा हा प्रदेश आहे. म्हणजे उत्तर बाजूशिवाय अरबस्तानला सर्व बाजूंनीं किनारा आहे. वास्तविक पाहतां अरबस्तान हा एक स्वतंत्र देश नसून त्यामध्यें ट्रान्सजार्डन, पॅलेस्टाइन, सीरिया वगैरे बरेचसे देश येतात. या सर्व प्रदेशांचें मिळून क्षेत्रफळ सुमारें बारा लक्ष चौ. मैल असून बहुतेक सर्व प्रदेश रुक्ष व ओसाड आहे. पश्चिम आणि दक्षिण किनाऱ्यांवर उंच पर्वत असून त्यांचा उतार ईशान्य बाजूकडे झुकला आहे. हे पर्वत आणि समुद्र यांच्यामध्यें असलेली किनारपट्टी सुपीक असून बाकीचा बहुतेक प्रदेश वालुकामय आहे.

तसेंच बराचसा भाग गवताळ प्रदेश आहे. वालुकामय प्रदेशांत लोकवस्ती मुळींच नाहीं. फक्त हिंवाळ्याच्या दिवसांत जो थोडासा पाऊस पडतो त्यावर गवताळ कुरणें सर्वत्र वाढतात. आणि इतर वेळीं हा सर्व भाग म्हणजे ओसाड, रुक्ष प्रदेशच होय. या भागांत एकहि नदी नाहीं. परंतु पावसाच्या वेळीं पाण्यानें भरलेले ओहोळ मात्र सर्वत्र वाहतात. मध्य अरबस्तानांतल्या वाळवंटांतल्या ओलाव्याच्या जागा व किनाऱ्यावरील सुपीक पट्ट्या येथेंच फक्त पीक निघतें. आणि बाकीच्या भागांतून पिकें अजीबात नसतातच. अरबस्तानांत एकंदर आठ स्वतंत्र विभाग असून ते आपापल्यापरीनें स्वातंत्र्य उपभोगतात. हामीराली, मेजूद, हासा, जेबेत, समार, वगैरे शहरें म्हणजे वाळवंटांतील ओलाव्याच्या जागीं असलेल्या अरबांच्या वसाहती होत. नैॠत्यभागीं एडन, कामरान आणि पेरीन हीं तांबड्या समुद्रांतील बेटें अरबी समुद्रांतील कुरीआ, मुरमा बेटें आणि इराणच्या आखातांतील बहारीन बेटें हा सर्व प्रदेश म्हणजे अरबस्तानच्या आसमंतांतील बेटें हा ब्रिटिश मुलूख होय. अरबस्तानचा किनारा फारसा दंतुर नाहीं. त्यामुळें कुठल्याहि लहानशा खबदाडांत बंदरें वसवण्याचा प्रयत्न फार पूर्वीपासून झालेला आहे. अरबस्तानच्या किनाऱ्यावरील नांव घेण्यासारखीं बंदरें म्हणजे जेद्दा, पेरीन आणि मस्कत हीं होत. तांबड्या समुद्रापलीकडील किनाऱ्यावर हामन व मोचा हीं नांव घेण्यासारखीं बंदरें आहेत. हिंदुस्थान व आफ्रिका यांचा या देशाशीं लहान गलबतांतून फार मोठ्या प्रमाणांत व्यापार चालतो. अरबस्तानांत रस्ते व लोहमार्ग मुळींच नाहींत, परंतु उमाण मार्गानें वाहतूक फार मोठ्या प्रमाणांत चालते. कातडीं, कॉफी, डिंक, मेण, आणि मीठ हे निर्यातीचे मुख्य जिन्नस होत. जरी अरबस्तानचें हवामान कोरडें आणि उष्ण आहे तरी तें निरोगी आहे. खजुरीचीं झाडें या देशांत विपुल असल्यानें खजूर हा निर्यातीचा मुख्य पदार्थ होय. मक्का व मदीना हीं मुसलमानांचीं धर्मक्षेत्रें याच भागांत आहेत. अरबस्तानांत एडन, ट्रान्सजार्डन, सीरिया, पॅलेस्टाइन हे प्रांत येतात. या प्रांतांची माहिती त्या त्या ठिकाणीं दिली आहे.

लो. सं. सुमारें एक कोटी आहे. किनाऱ्याच्या बाजूस अरब व आंतल्या बाजूस बदाऊन लोक राहतात.

खि. पू. दुसऱ्या शतकांत अरबस्तानांत शिमी ( सेमाइट ) लोक राहत होते. इ. स.च्या ४ थ्या शतकांत हबशी खिस्त्यांनीं हा प्रदेश जिंकला. ६२२ मध्यें महंमद पैगंबरानें आपला धर्म या प्रदेशांत जारी केला. पुढें ८०० ते ९६९ पर्यंत कामेथिअन लोकांकडे हा देश होता. पूर्वेकडे व्यापारी संबंध १६ व्या शतकापर्यंत नव्हता. १८ व्या शतकांत महंमद इब्न वाहाब यानें मध्य आणि पूर्व आशिया यांवर वर्चस्व स्थापिलें, पण ईजिप्तचा राजप्रतिनिधि

इब्राहिम पाशा यानें १८१८ त त्याचा पराभव केला. पुढील काळांत अनेक बंडें आणि फाटाफुटी झाल्या. शेवटीं १९३२ सालीं सौदी अरबस्तानचें राज्य प्रस्थापित आलें.

**अरब लोक**—सध्यांचे अरब लोक ही एक जात नसून त्यांत ज्यू, तुर्क, निग्रो व अरब यांच्या संमिश्रणानें बनलेली प्रजा असते. त्यांची भाषा जोरदार व डौलदार आहे. कुराण हा अरबांचा मुसलमानी धर्मग्रंथ अरबी भाषेंत लिहिला असून अरबी भाषेंत पुष्कळ शब्द निरनिराळ्या भाषांतून शिरलेले आहेत. मध्ययुगांत अरब लोक गणित, भूगोल, वैद्यक, काव्य, रसायनशास्त्र, ज्योतिष, वगैरे शास्त्रांत फारच पुढारलेले असून पाश्चात्य देशांच्या सुधारणांचे ते आद्यगुरु होत. अरबांचा जीवनक्रम दोन प्रकारचा आहे: एक स्थायिक व दुसरा भटक्या. यांपैकीं स्थायिक राहणारे अरब शेती, पशुपालन व पशुसंवर्धन करून राहतात. आणि भटके अरब वाळवंटावरील ओसाड प्रदेशावरून उंटाच्या पाठीवर माल लादून इकडून तिकडे पोंचवण्याचें काम करतात. स्थायिक राहिलेल्या लोकांचीं घरें मुख्यत्वें मातीचीं असून त्या घरांमुळें सूर्याच्या प्रखर उष्णतेपासून त्यांचें संरक्षण होतें. भटक्या लोकांचा जीवनक्रम म्हणजे वाळवंटामधून ठिकठिकाणीं मुक्काम करीत करीत उंटाच्या पाठीवरून मालाची ने–आण करणें हा होय. अशा एखाद्या उंटाच्या काफिल्याबरोबर आपण प्रवासास निघालों असतां आपणांस असें दिसून येईल कीं, या काफिल्यांत एक वाटाड्या असतो. व त्याला सर्व रुमाणमार्गांची पूर्ण माहिती असते. या वाटाड्याच्या पाठीमागें उंटांचा तांडा चालतो. दिवसभर वाळवंटांतून प्रवास केल्यानंतर रात्रीच्या वेळीं मुक्कामाला एखाद्या ओलाव्याच्या जागीं हा काफिला तळ ठोकतो. नंतर प्रथम जनावरांची व्यवस्था लावल्यानंतर अरबांचें जेवण सुरू होतें. हें अरबांचें जेवण म्हणजे मुख्यतः मका अगर गहूं यांची रोटी, खजूर, उंटाचें दूध यांचें असून क्वचित् प्रसंगीं जेवणांत फळेंहि असतात. हा जेवणाचा कार्यक्रम झाल्यावर विश्रांति घेऊन दुसऱ्या दिवशीं सकाळीं हा काफिला पुन्हां पुढील प्रवासास सज्ज होतो. उंट हें एकच जनावर या प्रदेशांत तग धरूं शकतें आणि त्याचा उपयोग वाहतुकीचें साधन म्हणून होतो. दुधासाठीं, तसेंच क्वचित् प्रसंगीं मांसासाठींहि त्याचा उपयोग करतात. उंट हा चाळीस चाळीस दिवस विनपाण्यानें राहूं शकतो. तसेंच ज्या वेळीं वाळवंटांतील तुफान उसळतें त्या वेळीं त्या कढत वाळूच्या तुफानांत हा प्राणी आपल्या नाकपुड्या खुपसून बसतो आणि आपला बचाव करतो. तशींच माणसें अशा वादळांत जमिनीवर पालथीं पडून आपलें रक्षण करतात. अरबस्तानमध्यें सातव्या शतकांत मुसलमानी धर्माचा उदय झाला. सर्व अरब लोक धर्मानें मुसलमान आहेत. अरब लोकांचें स्वभाववैशिष्ट्य म्हणजे ते बुद्धीनें तल्लख, आदरातिथ्याविषयीं प्रसिद्ध आणि अतिशय शूर आहेत.

**अरबी पाशा** (मु. १८३९—१९११)—ईजिप्तमधील एक राजकीय पुढारी. हा गरिबींत वाढला. लष्करांत शिरून चांगला वर चढला. यानें तुर्की आणि इतर शत्रूंविरुद्ध चळवळी केल्यावर १८८२ मध्यें तो युद्धमंत्री झाला. तेव्हां युरोपियन राष्ट्रांना त्याची भीति वाटूं लागली. ब्रिटिशांनीं त्याचें बंड मोडण्यासाठीं अलेक्झांड्रियावर स्वारी केली व तेलेलकेबीर येथें अरबी पाशाच्या सैन्याचा पुरा मोड केला. त्याला फांशीची दिलेली शिक्षा हद्दपारीची करून सीलोनला पाठवून दिलें. १९०१ मध्यें तो देशास परत आला व दहा वर्षांनीं वारला.

**अरबी भाषा व वाङ्मय**.—अरबी भाषा ही सेमिटिक भाषावंशाची एक दक्षिणेकडील शाखा आहे. हिच्या दोन मुख्य पोटभाषा आहेत: एक उत्तरेकडील व दुसरी दक्षिणेकडील. दक्षिणेकडील पोटभाषेस हिमीअराइट असें नांव होतें. पण ती आतां बहुतेक नष्ट झालेली आहे. उत्तरेकडील भाषा म्हणजे कुराणांत आढळणारी भाषा होय व ती सर्व अरबस्तानांत बोलली व लिहिली जाते. अरबी भाषेचें वैशिष्ट्य तिच्यामध्यें असलेले अनेक धातू, तींत होणारीं अनेकविध शब्दांचीं रूपें व तिची वाक्यरचना यांमध्यें आढळतें. तिच्या अनेक पोटभाषा आहेत व त्या सीरिया, ईजिप्त व बार्बेरी संस्थानें वगैरेमध्यें दृष्टीस पडतात. उच्च दर्जाची अरबी भाषा येमेन प्रांतांतील उच्च वर्गांमध्यें आढळते. महंमदानंतरच्या एक–दोन शतकांपर्यंत या भाषेच्या व्याकरणाची फारशी वाढ झालेली नव्हती. महंमदीयांनीं चालविलेल्या युद्धांमुळें व मिळविलेल्या विजयांमुळें या भाषेचा प्रसार पश्चिम आशिया, पूर्व व उत्तर आफ्रिका, स्पेन व भूमध्य समुद्रांतील कांहीं बेटें यांमध्यें झाला व या सर्व प्रदेशांत तिचे अवशेष आजहि दृष्टीस पडतात. आजहि ही भाषा इराण, तुर्कस्तान, आणि इतर महंमदी प्रदेशांत प्रचलित आहे. या भाषेतील प्राचीन वाङ्मय किंवा संस्कृति यांबद्दल फारशी माहिती नाहीं. या भाषेंत बऱ्याच प्राचीन कालापासून काव्यरचना होत असली पाहिजे यांत शंका नाहीं. कारण या लोकांचा स्वभावधर्मच तसा आहे. ते धीट, शूर, साहसप्रिय, गर्विष्ठ व वैभवप्रिय असे दिसतात व त्यांचा भ्रमणशील आयुष्यक्रम व स्वभाव काव्यरचनेस पोषक असाच होता. महंमदाच्या कालापूर्वींहि अरब कवींनीं आपसांत चाललेल्या युद्धांवर, वीरांच्या पराक्रमावर व स्त्रियांच्या सौंदर्यावर काव्यरचना केलेली दृष्टीस पडते. त्यांच्या जत्रांमधून काव्यस्पर्धा होत असत व यशस्वी

कवींचा गौरव करण्यांत येऊन त्यांचीं काव्यें सुवर्णाक्षरांत काबा मंदिरांत टांगण्यांत येत असत. त्यांस मोदसहबात किंवा मोअल्लाकत म्हणत असत. अशा काव्यांपैकीं सात काव्यें उपलब्ध आहेत.

अरबी वाङ्मयाच्या वैभवाच्या कालास महंमदापासून सुरुवात होते. या वेळीं रचलेल्या कुराणामुळें भाषेस स्थैर्य प्राप्त झालें. त्याच्या मरणानंतर ऐंशीं वर्षांमध्यें त्याच्या अनुयायांनीं आपली सत्ता ईजिप्तपासून हिंदुस्थानापर्यंत स्थापन केली. आबासीद खलिफांच्या कारकीर्दींत वाङ्मय व कला यांस उत्तेजन मिळालें. अल् मनसूर यानें प्रथम वाङ्मयास उत्तेजन दिलें व हरून अल् रशीद (७८६–८०८) याच्या कारकीर्दींत अरबी भाषा, कला व वाङ्मय यांस श्रेष्ठ वैभव प्राप्त झालें. यानें सर्व देशांतून विद्वान् लोकांस पाचारण करून त्यांस भरपूर पारितोषिकें दिलीं व ग्रीक, सीरियॅक, संस्कृत, वगैरे भाषांतील ग्रंथांचीं भाषांतरें करून घेतलीं व त्यांच्या अनेक प्रती करून त्यांचा प्रसार केला. अल् ममून (८१३–८३३) यानें विद्या व कला यांस उत्तेजन देऊन बगदाद, अलेक्झांड्रिया, वगैरे ठिकाणीं ग्रंथालयें स्थापन केलीं. याच सुमारास स्पेनमध्यें कार्डोव्हा येथें असलेल्या उम्मायिद घराण्याकडूनहि वाङ्मय व कला यांचें संवर्धन चालू होतें. या ठिकाणीं फ्रान्समधील व युरोपांतील इतर देशांतील विद्यार्थी शिक्षण घेण्याकरितां येत असत व विशेषतः गणित व वैद्यक यांचा अभ्यास करीत असत. स्पेन देशांत कार्डोव्हाखेरीज इतर चौदा शहरांत विद्यापीठें स्थापन करण्यांत आलीं होतीं व या काळांत अरब लोकांनीं ज्ञानप्रसाराच्या कामीं फार मोठी महत्त्वाची कामगिरी चालविली होती. या कालांत भूगोल, इतिहास, गणित, वैद्यक, पदार्थविज्ञान, वगैरे विषयांत त्यांनीं बरीच प्रगति केली होती. ही गोष्ट अरबी भाषेंतील जे शब्द आज निरनिराळ्या युरोपीय भाषांमधील शास्त्रीय परिभाषेमध्यें रूढ आहेत, त्यांवरून दिसून येते. उदाहरणार्थः—ॲडमिरल, अल्जिब्रा, अल्कोहल, अल्मनाक, ॲझिमथ, झेनिथ, नादिर, झीरो, इत्यादि अनेक शब्द मूळ अरबी भाषेंतून आलेले आहेत. त्यांनीं भूसंशोधनाकरितां सफरी करून अनेक नवीन नवीन भूप्रदेशांचा शोध लावला. या विषयावरील अबुलफिदा, इद्रिसी वगैरेंचे ग्रंथ अद्यापिहि महत्त्वाचे वाटतात. आठव्या शतकानंतर इतिहास या विषयामध्यें अरबी ग्रंथकारांनीं बरीच प्रगति केली. या विषयावरील मसूदी, तबारी, यूटिचिअस, अबुलफरज, अल्मकिन, अबुलफिल, नुवैरी, वगैरेंचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. स्पेन देशांतील अरबी राज्यांच्या इतिहासावरहि बरेच ग्रंथ अरबी भाषेंत लिहिले गेले आहेत. कुराणामधील तत्त्वज्ञानावर बरेच चर्चात्मक ग्रंथ लिहिण्यांत आले आहेत व आरिस्टॉटलच्या तत्त्वज्ञानपद्धतीची अरब लोकांस माहिती झाल्यावर त्यांच्यामध्यें बरेच तत्त्वज्ञानी पंथ निर्माण झाले.

कुराणावर समख्शरी व बैधावी यांच्या टीका महत्त्वाच्या आहेत. यांची टीकापद्धति आपल्या भाष्याप्रमाणें किंवा युरोपांतील मध्ययुगीन स्कोलॅस्टिक लोकांप्रमाणें असे. ही पद्धति त्यांनीं ग्रीक लोकांपासून घेतली. अरबी लोकामध्यें अविसेन्ना आणि अव्हारो हे मोठे तत्त्ववेत्ते होऊन गेले. या दोघांनींहि आरिस्टॉटलच्या ग्रंथावर टीका लिहिल्या आहेत. अरबी तत्त्ववेत्ते वैद्यकाचाहि अभ्यास करीत व त्यामुळें त्यांनीं रसायन, वनस्पति आणि वैद्यक या शास्त्रांतहि बरीच प्रगति केली होती. परंतु शवव्यवच्छेदनास कुराणांत मनाई असल्यामुळें त्यांस शारीरशास्त्रांत प्रगति करतां आली नाहीं. बगदाद, इस्पाहान, अलेक्झांड्रिया, कार्डोव्हा, वगैरे शहरीं तत्त्वज्ञान व वैद्यक यांच्या मोठमोठ्या शाळा होत्या. अविसेन्ना व अव्हारो या दोघांचेहि वैद्यकावर महत्त्वाचे ग्रंथ आहेत. सृष्टिशास्त्रावर डामिरि, इब्न बैतर व कझविनी यांचे ग्रंथ आहेत. गणितशास्त्रांतहि भारतीय गणितशास्त्राच्या आधारें त्यांनीं बरीच प्रगति केली. ज्योतिःशास्त्रांतहि त्यांनीं बरीच प्रगति केली असून अलेक्झांड्रिया व कार्डोव्हा येथें वेधशाळा स्थापन केल्या होत्या. याबरोबरच अरब लोकांनीं काव्यामध्येंहि बरीच प्रगति केली होती. महंमदापूर्वी निदान दोन शतकांपासून तरी आपणांस चांगल्या दर्जाची कविता अरबी भाषेंत आढळते व तींत कला आणि वृत्तबद्धताहि दृष्टीस पडते.

अरबी भाषा उजवीकडून डावीकडे लिहिण्यांत येते. लिपींपैकीं जुनी कुफी लिपि ही कुफा या युफ्रेटिस नदीवरील शहरावरून नामाभिधान पावली आहे व ती सीरियॅकवरून निघालेली आहे. दहाव्या शतकामध्यें नस्तालिक ही नवीन लिपि प्रचारांत आली व तीच सध्यां प्रचलित आहे. जलद लिहिण्याच्या लिपीस शिकस्ता म्हणतात.

**अरबी समुद्र**—(सिंधुसागर). हा समुद्र हिंदी महासागराचा एक भाग आहे. याच्या पूर्वेला हिंदुस्थान, पश्चिमेला अरबस्तान, उत्तरेस बलुचिस्तान व इराणचा दक्षिण भाग, आणि दक्षिणेस कन्याकुमारी व गार्डाफुईचें भूशीर यांमधील रेषा अशा या समुद्राच्या मर्यादा सांगतां येतील. याचे फांटे म्हणजे एडनचें आखात, ओमानचें आखात, खंबायतचें आखात व कच्छचें आखात होत. यांतील बेटें फार लहान आहेत. सोकोत्रा (सुखाधार) व लखदीव हीं त्यांत मोठीं म्हणतां येतील. हिंदुस्थान ते युरोप यांमधील प्रमुख मार्गाचा एक भाग म्हणून या समुद्राला महत्त्व आहे. हिंदुस्थानचा मलबार किनारा या समुद्रावर असल्यानें हिंदुस्थानच्या दृष्टीनें या समुद्रावर कोणाचें वर्चस्व राहतें, याकडे लक्ष देणें भाग आहे.

**अरमिन**—हा सस्तन प्राणी उत्तरेकडे उत्तर गोलार्धांत व

दक्षिणेकडे दक्षिण गोलार्धांत आढळतो. हिंवाळ्यांत हा प्राणी आपला रंग बदलतो. तांबडसर करडा जाऊन त्या जागीं पिंवळसर अगर पांढरा रंग येतो. याच्या मऊ केंसाळ कातड्यांना भारी किंमत येत असल्यानें तीं कातडीं विकण्याचा धंदा स्वीडन, नॉर्वे व रशिया या देशांत जोरानें चालतो.

**अरवली पर्वत**— हिंदुस्थान, राजपुताना, अजमीर-मेरवाड भागांतील एक पर्वतांची रांग. याची रुंदी ६ ते ६० मैलांपावेतों आहे. यावर बरींच शिखरें आहेत. त्यांपैकीं अबूचा पहाड हें एक सर्वांत उंच (५६५३ फूट) शिखर नैऋत्येकडे आहे. या पर्वताच्या उत्तरेकडील व पश्चिमेकडील प्रदेश रेताड आहेत. याच्या पश्चिम भागावर फार जंगल आहे व त्यांत हिंस्र पशु आहेत. भूस्तरशास्त्रीय दृष्टीनें पाहिल्यास या पर्वताचा पाया पूर्वी बराच खोल असला पाहिजे; पण तो भरल्यानें पर्वताची उंची कमी दिसते. या पहाडांत मेर लोक राहतात. त्यांची एक पलटण ब्रिटिश सरकारनें तयार केली.

**अरविंदासव**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें तांबडें अगर पांढरें कमळ, वाळा, शिवणीचीं मुळें, निळें कमळ, मंजिष्ठ, वेलची, चिकणीचीं मुळें, जटामांसी, नागरमोथा, उपळसरी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, वेखंड, कचोरा, काळें निशोत्तर, पित्तपापडा, अर्जुनसादडा, मोहाचीं फुलें व मोरवेल हीं असतात.

हें औषध शीतवीर्य असून बल्य आहे. लहान मुलांच्या आजारावर हें चांगल्यापैकीं औषध आहे. मुडदुस (रिकेट्स) रोगावर हें औषध अप्रतिम आहे, असा त्याचा लौकिक आहे. या औषधाच्या सेवनानें लहान मुलें गुटगुटीत व सशक्त होतात. स्त्रियांना रक्तप्रदराच्या विकारावर व मूत्रमार्गांतील दोषांवर हें एक चांगलें औषध आहे. शरीरांतून कोणत्याहि द्वारावाटे होणारा रक्तस्राव यानें थांबतो.

**अरसीसिंह (अरिसिंह)**—उदेपूरचा एक राणा. हा राजसिंहानंतर १७६१ त गादीवर आला. हा फार शूर असला तरी अविश्वासी आणि अदूरदर्शी असल्यामुळें याला आपल्या लोकांशींच राज्य टिकविण्यासाठीं लढावें लागलें. शिंदे-होळकरहि याच्याविरुद्ध भांडणांत मध्यस्थी करीत असत. याला शिकारीचा मोठा नाद होता व तोच याच्या नाशास कारण झाला (१७७३). हा स्वतः कवि व पंडितांचा पुरस्कर्ता होता.

**अरसुर डोंगर**—हिंदुस्थान, मुंबई इलाखा, महीकांठा, एक डोंगर. दांता गांवच्या उत्तरेस सु. १८ मैल आहे. अंबाजीच्या देवळामुळें ह्या डोंगराला फार महत्त्व चढलें आहे. हें अंबाभवानीचें देवस्थान इ. स. ७४६ पासून उल्लेखिलेलें आहे. कृष्णानें रुक्मिणीचें हरण येथून केलें अशी दंतकथा सांगतात. येथें सरस्वती नदीचा उगम होतो.

**अरिझोना**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतलें एक. फोनिक्स हें राजधानीचें ठिकाण. अरिझोनाच्या उत्तर भागांत शेतीलायक मैदानें आहेत, पण दक्षिण भाग डोंगराळ आहे. मैदानांतील जमीनहि पाण्याच्या अभावीं निरुपयोगीच होती, पण आतां कालव्याची सोय करण्यांत आली आहे. तांबें, सोनें, रुपें, शिसें, जस्त वगैरेंच्या खाणी चांगल्या आहेत. कापूस, गहूं, बटाटे, फळें, वगैरे कृषिपदार्थांचें उत्पादन बरेंच होतें. कोलोराडो नदीवर बांधलेलें धरण हें जगांत सर्वांत मोठें आहे. या विभागांत प्रेक्षणीय स्थळें विपुल आहेत. बोल्डर डॅम, रुझवेल्ट डॅम्, हीं धरणें महत्त्वाचीं आहेत. ट्युकसन येथें विद्यापीठ आहे. १५३८ मध्यें प्रथम दोन ख्रिश्चन धर्मोपदेशकांनीं या भागांत प्रवेश केला. १९१२ मध्यें हें संस्थान संयुक्त संस्थानांत दाखल करून घेण्यांत आलें. लो. सं. ४९९२६१ व क्षे. फ. ११३९०९ चौ. मै.

**अरिसिंह**—सिसोदे घराण्यांतील राणा शाखेपैकीं लक्ष्मीसिंहाचा हा ज्येष्ठ पुत्र. हा एकदां शिकारीस गेला असतां एक डुक्कर एका शेतांत शिरलेला यानें पाहिला. त्याला मारण्यासाठीं हा शेतांत शिरणार इतक्यांत त्या शेताची राखण करण्याऱ्या मुलीनें स्वतः काठी घेऊन शेतांतून डुकरास पळवून लावलें. यानंतर एकदां याच मुलीनें गोफणीनें मारलेल्या दगडानें त्याच्या मित्राच्या घोड्याचा पाय तुटला. वरील प्रसंगांनीं अरिसिंहास तिच्या धैर्याचें व शक्तीचें कौतुक वाटून त्यानें तिच्याशीं लग्न केलें. उनवा गांवीं हा तिच्यासह राही. त्यानें आपल्या मुलाचें नांव हमीर असें ठेविलें. अरिसिंह चितोडच्या लढाईत अल्लाउद्दीन खिलजीच्या लोकांकडून मारला गेला.

**अरुचि**— हें एक रोगाचें लक्षण आहे. तोंडाला चव नसून खाववत नाहीं, अशा वेळीं कांहीं रोगामुळें अशी अवस्था झाली आहे असें समजून तो रोग बरा करण्यासाठीं औषध घ्यावें. वात,

पित्त, कफ व शक्तिपात यांपासून ज्याप्रमाणें अरुचि उत्पन्न होते त्याप्रमाणेंच मनाच्या संतापानेंहि ती उत्पन्न होत असते. वातिक अरोचनावर बस्ती व कफजन्यावर ओकारी हा उपाय करतात. अरुचीवर अनेक चूर्णें, लेह, पेयें, वगैरे वैद्यकांत सांगितलीं आहेत.

**अरुंडेल, डॉ. जॉर्ज सिडने** (१८७८– ) —थिऑसफिकल सोसायटीचे अध्यक्ष. यांचें शिक्षण जर्मनी, इंग्लंड व फ्रान्स यांमध्यें झालें. यांचा विवाह नीलकंठशास्त्री यांची कन्या रुक्मिणीबाई यांच्याशीं झाला. यांचा लहानपणींच थिऑसफीच्या संस्थापकांशीं संबंध आला व त्यांनीं १८९५ मध्यें त्या संप्रदायांत प्रवेश केला. हे या संप्रदायाच्या ब्रिटिश शाखेचे मुख्य चिटणीस होते. त्या पदाचा त्याग करून ते मिसेस बेझंट यांनीं स्थापन

केलेल्या बनारस येथील सेंट्रल हिंदु कॉलेजमध्यें इतिहासाचे प्राध्यापक म्हणून १९०३ सालीं आले. नंतर तेथील शाळेचे निर्वेतनी मुख्य शिक्षक झाले. पुढें ते कॉलेजचे व्हाइस प्रिन्सिपॉल व नंतर प्रिन्सिपॉल झाले. ते अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे फेलो व परीक्षक होते. पुढें मद्रास येथें जें राष्ट्रीय विद्यापीठ स्थापन झालें त्याचे ते प्रिन्सिपॉल होते. कांहीं वर्षे ते इंदूर संस्थानांत शिक्षणमंत्री होते. स्काउट चळवळीमध्येंहि त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला असून त्या संस्थेंताहि मोठमोठ्या पदांवर होते. मिसेस बेझंट यांनीं सुरू केलेल्या होमरूल चळवळींत यांनीं त्यांच्याबरोबर भाग घेतल्यामुळें त्यांच्याबरोबरच यांसहि उटकमंड येथें अटक झाली होती. कामगार लोकांच्या हितासाठींहि यांनीं बरेंच कार्य केलें असून हिंदुस्थानांतील सर्वांत जुनें व मोठें असें ट्रेड युनियन जें मद्रास लेबर युनियन त्याचे ते अध्यक्ष होते. पॅरिस येथील इंटर नॅशनल कोफ्रीमेसनरीच्या कौन्सिलचे सभासद असून ब्रिटिश साम्राज्याचे प्रतिनिधि आहेत. हॉलंडमधील नार्डेन येथील सर्व जगांत थिऑसफीचा प्रसार करणाऱ्या सेंट मायकेल फाउंडेशनच्या ट्रस्टींच्या बोर्डाचे अध्यक्ष आहेत. न्यू साउथवेल्समधील अशाच एका मॅनोर मास्मन संस्थेचे एक मुख्य ट्रस्टी होते. हे कांहीं दिवस मद्रास येथें निघणाऱ्या 'न्यू इंडिया' पत्राचे संपादक होते. ते अनेक वर्षे मिसेस बेझंट यांचे सहकारी होते. त्यांच्या मागून यांस प्रथम थिऑसफिकल सोसायटीचे उपाध्यक्ष व त्यानंतर अध्यक्ष निवडण्यांत आलें (१९३४). यांनीं निर्वाण, माउंट एव्हरेस्ट, 'Your Freedom and Friendship', 'Gods in the Becoming' वगैरे पुस्तकें व अनेक पत्रकें लिहिलीं व प्रसिद्धिलीं आहेत.

**अरुण**—सूर्याचा सारथी. हा कश्यप आणि विनता यांचा पुत्र व गरुडाचा थोरला भाऊ. आईनें अकालीं गर्भ फोडला म्हणून हा पादहीन जन्मला. याला संपाति व जटायु असे दोन पुत्र होते. अरुण म्हणजे प्रभातकाळ किंवा उषा (पहा) असाहि अर्थ आहे.

**अरुंतुद**—(ॲक्रिडाइन). कोळशाच्या डामराचा एक मूलघटक. हा अशुद्ध अंगारिन् (ॲन्थ्रॅसीन) भागांत असतो. याचे रंगहीन व सूचीसारखे स्फटिक असतात. याच्या स्पर्शानें बाह्य त्वचा चुरचुरते. रसायनशास्त्रदृष्ट्या हा अंगारिन् (ॲन्थ्रॅसीन) चा अनुधर्मी संयुक्त आहे असें म्हणतां येईल. याच्यापासून निरनिराळे रंग बनवितात.

**अरुंधती**—वसिष्ठ ऋषीची पत्नी. सप्तर्षि ताऱ्यांमध्यें वसिष्ठाच्या ताऱ्याशेजारीं एक बारीक तारा असतो, तो अरुंधती म्हणून लग्नांत नवरा नवरीस दाखवीत असतो व 'तिच्याप्रमाणें पतिनिष्ठ हो' असा भाव या (अरुंधतीदर्शन) विधीनें दर्शवितो.

**अरेक्विपा**—पेरू देशांतील अरेक्विपा प्रांताची राजधानी. राजधानीजवळच ५५ मैलावरील मोलेंडो या बंदरांतून या शहराचा व्यापार जोरांत चालतो. येथील हवा जरी आरोग्यवर्धक आहे तरी भूकंपाच्या धक्क्याची येथें फार भीति असल्यानें शहरांत दाट वस्ती करून राहणाऱ्यांस धोका आहे. १८६८ च्या भूकंपांत हें शहर फार जमीनदोस्त झालें होतें. राजधानींत मुख्यतः कापूस व लोंकर यांपासून कापड विणण्याचे कारखाने जोरांत चालतात. मोलेंडो बंदर ही देशाच्या आयात-निर्यात व्यापाराची उतार पेठ होय. येथें एक विद्यापीठ आहे. लो. सं. ४६,०००.

**अरेबियन नाइट्स ('एक हजार एक रात्री')**—हा प्राच्य देशांतील कथांचा संग्रह 'हजारा अफसाना' या नांवाच्या जुन्या ग्रंथाच्या आधारावरून तयार केलेला आहे. या कथा मूळ हिंदुस्थानांतून इराणांत व तेथून अरबी लोकांनीं नेल्या, असें मानतात. युरोपांत प्रथम १८ व्या शतकाच्या आरंभीं या कथांची प्रसिद्धि फ्रेंच भाषेंत ऑंटोइन गॅलांड यानें केलेल्या भाषांतरामुळें झाली. मूळ कथांमध्यें सुधारणा होत होत १४७५ ते १५२४ च्या काळांत या कथांना जें स्वरूप होतें तेंच आज दिसत आहे; मूळचें नाहीं. यांतील कथा थोडक्यांत अशी आहे—सुलतान शहारियार यानें असा हुकूम सोडला कीं, यानंतरच्या आपल्या प्रत्येक बायकोचा लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं शिरच्छेद करण्यांत येईल. वझिराची मुलगी शहारजादी हिनें हा हुकूम रद्द

करण्यास लाविला. ती दर रात्रीं त्यास एक गोष्ट अशी मजेदार सांगे कीं, रात्र संपे, पण गोष्ट संपत नसे. त्यामुळे सुलतान तिच्या शिरच्छेदाची अमलबजावणी दुसऱ्या दिवसावर टाकी. असे कित्येक दिवस जाऊन शेवटीं तीच त्याची कायमची प्रियकरीण बनली. याचीं पुष्कळ भाषांतून भाषांतरें झालीं आहेत. मराठींत कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं केलेलें भाषांतर प्रसिद्ध आहे.

**अरेमाईक भाषा**—ही जुनी पॅलेस्टाइनमधील सेमिटिक भाषांची एक उपभाषा होती. ख्रिस्तजन्माच्या काळीं ज्यू लोक या भाषेंत बोलत. हिचें हिब्रू भाषेशीं बरेंच साम्य आहे. आर्मीयन किंवा सीरियन लोकांची ही भाषा इ. स. च्या पहिल्या शतकांत प्रचलित होती. 'डॅनिएल' आणि 'एझ्रा' यांचा कांहीं भाग या भाषेंत लिहिला आहे. हिलाच खाल्डी असें नांव दिलें जातें. सिरिॲक ही या भाषेची उपभाषा असून तिच्यांत ख्रिस्ती वाङ्मय बरेंचसें आहे.

**अरैन**—हिंदुस्थान, पंजाबांतील एक जात. लोकसंख्या दहा लाखांवर असून बहुतेक मुसलमान आहेत. यांचा धंदा शेतकीचा आहे. कांबोज लोक बाटून ही जात तयार झाली असावी, असें म्हणतात. कांहीं थोडे अरैन हिंदु असून ते पतियाळा आणि कर्नाळ या भागांत आहेत.

**अरोरा**—हिंदुस्थान, एक जात. ही बहुतेक पंजाबांत असून एकंदर संख्या सुमारें आठ लाख आहे. यांत सर्व धर्मांचे लोक आहेत; तथापि मुसलमान फार कमी आहेत. अरोरा हे खत्री लोकांप्रमाणें दिसतात. सिंधमध्यें अरोरा म्हणून एक प्राचीन गांव सिंधची राजधानी होतीं. पंजाबांत या अरोरांना किरात किंवा किराड म्हणूं लागलेलें दिसतें. त्यांतहि किराड जात थोडीशी आहे. हे लोक बहुशः सावकारी करतात.

**अर्क**—एखाद्या पदार्थाचा अर्क काढणें झाल्यास तो कषाय किंवा काढा करून काढतात, किंवा इंग्रजी पद्धतीप्रमाणें मद्यार्कांत ठेवून काढतात. पेपरमिंट, कापूर, ओवा, इ. चे अर्क या पद्धतीनेंच आज काढतात. वैद्य लोक औषधांचे अर्क व गंधी लोक अत्तरें कषाय पद्धतीनें काढतात.

**अर्क तेलें**—हीं तेलें व चरबीचीं तेलें यांत फरक आहे. हीं तेलें थोडीं पाण्यांत मिसळणारीं व लगेच उडून जाणारीं (व्होलटाइल) असतात. चरबीच्या तेलाप्रमाणें यांचा साबणाच्या कामीं उपयोग होत नाहीं. ज्या वनस्पतींत तेलें असतात त्यांतून तीं बहुधा पाण्याच्या साहाय्यानें ऊर्ध्वपातनक्रियेनें काढून घेतात; पण जेथें ही कृति लागू पडत नाहीं, तेथें चरबीशीं फुलें एकजीव करून मग त्या चरबींत मुरलेलें तेल मद्यार्काच्या योगानें बाहेर काढतात. कांहीं वेळां पेट्रोलसारख्या द्रावकाच्या मध्यस्थीनें तेल काढून घेतात. अत्तरें व सुगंधी द्रव्यें यांतून हीं तेलें फार वापरतात. साबणांतहि वासासाठीं घालतात. हल्लीं रासायनिक पद्धतीनें अशीं कृत्रिम तेलें तयार करण्यांत येतात.

**अर्काट**—हिंदुस्थान, मद्रास इलाख्यांतील दोन (दक्षिण व उत्तर) जिल्हे व शहर. 'आरू काडू' (म्हणजे सहा अरण्यें) या तामिळ शब्दांचा हा अपभ्रंश आहे. उ. अर्काट क्षे. फ. ४१२० चौरस मैल. व द. अर्काट क्षे. फ. ४२०८ चौरस मैल. लो. सं. अनुक्रमें सुमारें चोवीस लाख व सव्वीस लाख आहे. हा प्रदेश प्रथम पल्लव, नंतर चोल, राष्ट्रकूट व विजयानगर या राजांकडे क्रमानें जाऊन, पुढें मोंगल बादशहांचा दक्षिणेंतील एक सुभा झाला. १७५१ ते १७६० पर्यंत इंग्रज आणि फ्रेंच यांमध्यें अर्काट घेण्यासाठीं लढाया चालल्या होत्या. शेवटीं तें इंग्रजांकडे आलें व पुढें वीस वर्षें कर्नाटकच्या नबाबाकडे होतें. नंतर हैदर-टिपूकडे जाऊन १८०१ सालीं अखेरीस ब्रिटिशांकडे कायमचें आलें. उत्तर अर्काटमध्यें एके काळीं निळीची लागवड होत असे. या जिल्ह्यांत पाटबंधारे बरेच आहेत. भुईमूग फार होतो व तो फ्रान्सला बराच जात असे. सदर्न मराठा व साउथ इंडियन रेल्वे या जिल्ह्यांतून जातात. कुडालोर बंदर व्यापाराला चांगलें आहे. कातडीं कमावण्याचे बरेच कारखाने जिल्ह्यांत आहेत.

अर्काट शहर उत्तर अर्काटमध्यें पालार नदीवर वसलें आहे. लो. सं. सु. १२०००. कर्नाटकच्या नबाबांची राजधानी म्हणून या शहराला ऐतिहासिक महत्त्व आहे. गांवांत जुन्या मशिदी पुष्कळ आहेत. कांहीं थोडे कलाकसुरीचे धंदे जीव धरून आहेत. १७५१ सालीं क्लाइव्हनें शत्रूचें बल मोठें असतांनाहि हें जिंकून घेतलें.

**अर्गनी दिवे**—इंग्रजी 'अर्गंड' लॅंपवरून नांव पडलें. या दिव्याचा संशोधक एमे अर्गंड (१७५५–१८०३) नांवाचा होता. या दिव्यांत प्रकाश जास्त पडण्याची व नळीप्रमाणें वात घालून ज्योत सारखी करण्याची रचना आहे. मराठींत अरगिन दिवा असेंहि म्हणतात.

**अरगॉन**—(अर्ग, अचेष्ट). हा हवेमधील एक अत्यल्प प्रमाणांत आढळणारा वायु असून तो शेंकडा १ या प्रमाणांत असतो. याचा शोध १८९४ मध्यें रॅमसे व रॅले या शास्त्रज्ञांनीं लावला. नत्र (नायट्रोजन) वायुसंबंधीं त्यांचे प्रयोग चालू असतां त्यांनीं जो शुद्ध नत्र तयार केला त्यापेक्षां हवेंत असलेला नत्र त्यांना मिश्रावस्थेंत आढळला; व त्यांतून त्यांनीं या वायूचा शोध लावला. हा वायु हवेंत पूर्णपणें मिसळलेला नसून त्याला रंग, वास व चव नसते. घनरूप, जलरूप अशा रूपांतहि हा वायु तयार करतां येतो. लहान विजेच्या दिव्यांतून हा वायु भरतात व या दिव्यांना ½ (हाफ) वॅटचे दिवे या नांवानें संबोधिलें जातें.

**अर्गास**—ग्रीसमधील एक शहर. एजिना आखात आणि नौप्लिअर यांमध्यें हें प्राचीन शहर वसलेलें आहे. या शहराला चांगली राजसत्ता होती व कॉरिंथ त्याला जोडलेलें होतें. स्पार्टा हें अर्गासचें हाडवैरी नगरराज्य होतें. पुढें हें रोमन साम्राज्याखालीं आलें. नंतर तुर्कांनीं याचा विध्वंस केला. आज जेमतेम दहा हजार वस्ती आहे. येथें हेरॅक्युम नांवाचें देवालय फार प्रसिद्ध व प्रेक्षणीय आहे. लो. सं. सु. १३०००.

**अर्जी**—(पिटिशन). अर्ज, तक्रारी. इंग्लंडच्या इतिहासांत या शब्दाला विशिष्ट राजकीय अर्थ प्राप्त झालेला आहे. इंग्लंडांत स्टुअर्ट राजघराण्याच्या वेळीं स्टुअर्ट राजे आणि इंग्लंडचें पार्लमेंट यांच्यामध्यें प्रजेच्या हक्कांबद्दल सतत झगडा चालू होता. स्टुअर्ट राजे ईश्वरी अधिकार (डिव्हाइन राइट) या तत्त्वानुसार अनियंत्रित राज्यकारभार करूं लागले; आणि त्यामुळें प्रजेनें मिळविलेल्या अनेक राजकीय हक्कांना बाध येऊं लागला. त्यामुळें राजाविरुद्ध प्रजेच्या तक्रारी जाहीर रीतीनें सांगण्याचें काम पार्लमेंटनें चालू केलें आणि अशा तक्रारीबद्दल मूळ हक्कांचा अर्ज (पिटिशन ऑफ राइट) या नांवानें पार्लमेंटांत ठराव पास केले. १६८८ नंतर अशा प्रकारें तक्रारी अर्ज (पिटिशन) करण्याचा प्रजेचा हक्क मान्य करण्यांत आला, आणि राज्यकारभारांत सरकारी अधिकाऱ्यांच्या हातून कर किंवा जकात वसूल करतांना अन्याय झाल्यास किंवा पार्लमेंटच्या सभासद बेकायदा निवडून आल्यास त्याच्याविरुद्ध तक्रारी-अर्ज हायकोर्टाकडे करण्याचा हक्क, वगैरे प्रकारचे तक्रारी अर्ज करण्याचा हक्क प्रजेला प्राप्त झालेला आहे. हिंदुस्थानांतहि ब्रिटिश सरकारनें लोकांना अशा अर्जाचा हक्क दिलेला होता.

**अर्जुन**—तिसरा पांडव. पंडु आणि कुंती यांचा पुत्र व प्रसिद्ध भारतीय योद्धा. यानें द्रौपदी स्वयंवराच्या पणांत जिंकली. द्रौपदीखेरीज याला कृष्णाची बहीण सुभद्रा ही धर्मपत्नी होती. यानें राजसूय यज्ञाच्या वेळीं उत्तर देश पादाक्रांत केला. अज्ञातवासांत विराटाच्या घरीं बृहन्नडा होऊन राहिला. कौरवांशीं अखेरचा युद्धप्रसंग आला असतां आप्तेष्टांचा वध करण्यास याचें मन घेईना, तेव्हां कृष्णानें याला गीता सांगून कर्तव्यकर्मास प्रवृत्त केलें. अश्वमेध यज्ञाचा घोडा सांभाळीत हा सर्व दिशांकडील राजांना जिंकून आला. कृष्णाचा हा परम मित्र. दोघे नरनारायणाची जोडी. कृष्ण निजधामाला गेल्यावर याचा पराक्रम नाहींसा झाला. भरतखंडांतील प्राचीन वीरपुरुष म्हणून याचें नांव अजरामर राहील. याचा मुलगा अभिमन्यु हाहि मोठा शूर होता.

**अर्जुनगड**—मुंबई प्रांत, दमणजवळील एक किल्ला. मराठ्यांच्या इतिहासांत याचे उल्लेख येतात. बारभाईच्या कारकीर्दींत राघोबादादानें हा कांहीं काळ आपल्या ताब्यांत ठेवला होता.



**अर्जुनमल्ल** (१५८१-१६०६)—शीखांचा पांचवा गुरु. हा चवथा गुरु रामदास याचा तिसरा मुलगा. यानें आदिग्रंथाची रचना केली. जहांगीर बादशहानें आपला मुलगा बंडखोर खुश्रू याला मदत केल्याच्या आरोपावरून अर्जुनाला कैदेंत टाकून त्याचे हाल केले. तो कैदेंतच मरण पावला. मरतांना अर्जुनानें आपला मुलगा हरगोविंद याला आपला पंथ स्वतंत्र करण्याचा उपदेश केला. तेव्हांपासून शीखपंथ लढवय्या झाला.

**अर्जुनसादडा**—हा वृक्ष पंजाब, बंगाल, वायव्य प्रांत, दख्खन, सिलोन, इ. भागांत होतो. यास पांढरा डिंक येतो. तो औषधी आहे. साल रंगाच्या व औषधाच्या कामीं उपयोगी पडते. व्रण धुण्यास सालीच्या काढ्याचा उपयोग करतात. तिचें चूर्ण करून व्रणांत भरल्यास जखम भरून येते.

**अर्जुनी जमीनदारी**—हिंदुस्थान, मध्यप्रांत, भंडारा जिल्ह्यांतील एक जमीनदारी. क्षे. फ. १३८९० चौ. मै. जमीनदार राजगोंड आहे. मुख्य गांव अर्जुनी.

**अर्जेंटिना**—दक्षिण अमेरिकेंतील एक स्वतंत्र देश. त्याचे १४ प्रांत, १० उपप्रांत व राजधानी (ब्यूनॉस एरिस) असलेला एक छोटा प्रांत मिळून २५ प्रांतांचा हा देश आहे. १०७९९६५ चौरस मैल इतकें या देशाचें क्षेत्रफळ आहे. या देशाच्या सीमा म्हणजे उत्तरेला बोलिव्हिया, पॅराग्वे, युरुग्वे, ब्राझिल आणि अॅटलांटिक महासागर; पूर्वेला अॅटलांटिक महासागर; दक्षिणेला आणि पश्चिमेला चिली हे देश आहेत. या देशाचे स्वाभाविक विभाग खालीलप्रमाणें पडतात—(१) पॅटगोनियाचा वाळवंटी प्रदेश, (२) अनडाईन पठारी व डोंगराळ प्रदेश (यांतच अकॉनकागुआ हें २३०८० फूट उंचीचें अँडीज पर्वताचें शिखर येतें); (३) ग्रॅन चॅको हा जंगलांनीं भरलेला प्रदेश, आणि (४) पंपास उर्फ गवताळ सपाट मैदानें. यांपैकीं पंपासचा प्रदेश म्हणजे खरा अर्जेंटिना या नांवानें जगभर ओळखला जात असून या गवताळ मैदानावर विपुल गवत असल्यानें लोकांचा मुख्य उद्योग पशुपालन हा आहे. आणि त्याच्याच जोडीला शेती हाहि धंदा असून मुख्य पिकें गहूं, मका, अळशी व सर्व प्रकारची विपुल फळफळावळ हीं होत. डोंगराळ प्रदेश नैसर्गिक अरण्यांनीं व्यापलेला असून खनिज संपत्तिहि विपुल आहे. परंतु वाहतुकीचीं साधनें फारशीं नसल्यानें तेथील नैसर्गिक संपत्ति मानवाला अद्याप लुटतां आलेली नाहीं. या देशांतील मुख्य जलप्रवाह म्हणजे पराना व युरुग्वे या दोन नद्या असून पुढें त्या एकमेकांना मिळतात व ला प्लाटा हें नांव त्यांना संगमानंतर मिळतें. दक्षिण भागांत नांव घेण्यासारख्या नद्या म्हणजे रिओकोलोरॅडो व रिओ-निग्रो या दोन. वाहतुकीचीं साधनें या देशांत फारशीं नाहींत. परंतु उपाल

तारायंत्रें यांची व्यवस्था मात्र उत्तम असून विमानमार्गेंहि वाहतूक चालते. निर्यातमाल मुख्यत्वें गोठवलले मांस, चामडीं व कमावलेलीं कातडीं, लोंकर, जनावरांचे केस, गहूं, मका, जवस, अळशी, आणि जंगलांतील लांकूड व त्यापासून तयार होणारे व्यापारी जिन्नस, वगैरे असून तो सर्व माल सामान्यतः ब्यूनॉस एरिस, ला प्लाटा व बाहिआ ब्लँका या तीन बंदरांतून मुख्यत्वें बाहेर जातो. रोझारिओ सँटा फे आणि पराना हीं नदीकांठावरील बंदरें आहेत. या देशाची अर्धी लोकवस्ती युरोपिअन असून तेथील स्थानिक लोक गौमे या नांवानें ओळखले जात असून त्यांचा मुख्य धंदा बहुधा पशुपालन हा आहे. या देशांत पाऊस फारसा पडत नाहीं आणि हवा निरोगी व थंड आहे. १५१६ साली डॉन जुऑन यानें प्रथम याचा शोध लाविला. नंतर सुमारें ३०० वर्षें हा देश स्पेनच्या अंकित होता. १८४२ मध्यें याला स्वातंत्र्य मिळालें. १८१६ सालापासून त्यासाठीं लोकांना झगडावें लागलें. लो. सं. ७८८५२३७ (१९४५).

**अर्झरूम**—तुर्कस्तान, आर्मेनिया प्रांतांतील एक विलायत व शहर. विलायतचें क्षे. फ. सुमारें १९१८० चौ. मै. व लो. सं. सुमारें सात लक्ष आहे. शहरची लो. सं. ऐंशीं हजारांवर आहे. बऱ्याच सुंदर मशिदी व स्नानगृहें अर्झरूममध्यें असून येथील पितळी काम व गालिचे प्रसिद्ध आहेत. हें फार प्राचीन शहर आहे. अर्झिजन शहर याच विलायतेंत आहे. तेंहि बरेंच जुनें आहे. परशु लोकांची अनाहित किंवा आर्मेनियाची स्त्री-देवता अनैटिस हिचें देऊळ शहराच्या जागेवर होतें.

**ॲर्डव्हर्क**—हा एक वेढव प्राणी असून याची पाठ कमान

असल्यासारखी उंच असते. त्याला गाढवासारखे लांब कान असतात व तोंड डुकरासारखें असतें. त्याच्या अंगावर पिवळ्या रंगाची लव असून शेपटीवर मात्र एकहि केस नसतो. हा प्राणी आफ्रिकेंत असून तो प्रथमतः बोअर लोकांना सतराव्या शतकांत दक्षिण आफ्रिकेंतील व्हेल्डच्या प्रदेशांत मुंग्या-वाळवी खातांना दृष्टीस पडला. तो आपल्या लांब कांटेरी जिभेनें मुंग्या-किडे-वाळवी खातो. त्याचे पाय टणक व मजबूत असतात.

**अर्थर राजा**—इंग्लंडमध्यें ६ व्या शतकांत होऊन गेलेला एक राजा. त्याची राणी ग्विनीव्हीर. राउंडटेबल या नांवाचें त्याचें सल्लागार मंडळ. या ऐश्वर्यांत त्यानें बारा वर्षें शांततेनें राज्य केलें. नंतर त्यानें डेन्मार्क, नॉर्वे व फ्रान्स हे देश जिंकले. स्पेनमधील राक्षस ठार मारले व नंतर रोमकडे गेला. इतक्यांत त्याची राणी भ्रष्ट झाल्याची बातमी त्याच्या कानांवर आली. या राणीला अर्थरचा पुतण्या मॉड्रेड यानें बिघडवलें व अर्थरविरुद्ध बंड करण्यास प्रजेला उत्तेजन दिलें. त्यामुळें अर्थर इंग्लंडांत परत येऊन त्यानें तें बंड मोडलें, परंतु त्या सामन्यांत त्याला जखमा होऊन तो मरण पावला. प्रख्यात इंग्रज कवि टेनिसन यानें या अर्थरच्या कथानकावर 'मॉर्ट डी अर्थर' हें महाकाव्य लिहिलें आहे. पण त्यांत कल्पित भाग फार असून ऐतिहासिक सत्य एवढेंच आहे कीं, या नांवाचा जुन्या केल्टिक लोकांचा शेवटचा पुढारी इंग्लंडांत होऊन गेला व त्यानें इंग्लंडमधील स्वाऱ्या व वसाहत करणाऱ्या सॅक्सन लोकांना मोठा प्रतिकार केला.

**अर्थशास्त्र**—उत्पादन, विनिमय, पुरवठा आणि खप या बाबींसंबंधीं जे मानवांचे व्यवहार व त्या बाबतींत जो मानवांचा परस्परांशीं संबंध येतो, या सर्वांचा विचार या अर्थशास्त्रांत करण्यांत येतो. या शास्त्राचा पद्धतशीर अभ्यास व विचार फ्रान्स देशांतील कांहीं तत्त्वज्ञानी लोकांनीं जे लेख सतराव्या शतकाच्या अखेरीस लिहिण्यास सुरुवात केली तेव्हांपासून झाला. या तत्त्वज्ञानी लोकांत क्वेस्ने (१६९४–१७७४) हा प्रमुख होता. यानें कांहीं सिद्धान्त प्रतिपादन केले होते. या पंथास फिजिओ-क्रॅट्स असें म्हणत. या सिद्धान्तासारखेच सिद्धान्त १६ व्या लुईचा प्रधान टर्गो (१७२७–१७८१) यानेंहि प्रतिपादन केले होते. या पंथाच्या लोकांचें असें म्हणणें असे कीं, कोणत्याहि राष्ट्रांतील संपत्तीचें पूर्ण संवर्धन शासननिर्बंधांनीं होत नसून राष्ट्रांतील आर्थिक व्यवहारांस पूर्ण स्वातंत्र्य दिल्यानेंच अधिक होतें. यांच्यानंतर ॲडॅम स्मिथ हा (१७२३–१७९०) अर्थशास्त्रज्ञ होऊन गेला. यानें १७७६ मध्यें 'राष्ट्रांची संपत्ति' (वेल्थ ऑफ नेशन्स) हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथांत त्यानें आर्थिक व्यवहारां-मध्यें शासनसंस्थेनें ढवळाढवळ करूं नये व त्यांस पूर्ण मोकळीक द्यावी, असें प्रतिपादन केलें. तथापि आर्थिक व्यवहारांकडे लक्ष देणें हें शासनसंस्थेचें एक कार्य आहे, असें तो मानीत असे. याच्या लिखाणामुळें संपत्तीच्या बाबतींत मनुष्य कोणकोणत्या क्रिया करतो याचा अभ्यास करणें हें अर्थशास्त्राचें मुख्य उद्दिष्ट मानण्यांत येऊं लागलें. हीच कल्पना स्पष्टपणें रिकार्डो (१७७२–

१८२३ ) यानें आपल्या 'अर्थशास्त्र व कर' या ग्रंथांत जागाभाडें अथवा सारा यासंबंधीं विवेचन करतांना मांडली आहे व हाच प्रश्न सामान्यतः यापुढील अर्थशास्त्रीय अभ्यासाचा मुख्य विषय झालेला आहे. या ग्रंथांत त्यानें मजुरी या प्रश्नाचाहि विचार केलेला आहे व तिची उपपत्ति मांडली आहे. व याचेंच पुढें कालें मार्क्सनें उपबृंहण करून भांडवलवाले लोक मजूरवर्गास कसे पिळून काढतात याचें वर्णन करतांना विवेचन केलें आहे. याच गोष्टी आपणांस मोठा नॅरसॉ (१७९०-१८६४) याच्या ग्रंथांत व जॉन स्टुअर्ट मिल (१८०६-१८७३) याच्या 'अर्थशास्त्रीय तत्त्वें' या ग्रंथांत मांडलेल्या आढळतात. याचाच विस्तार पुढें जे. ई. केर्न्स (१८२३-७५) यानें केलेला दृष्टीस पडतो.

वरील कल्पना याच आजच्या अर्वाचीन अर्थशास्त्राच्या मुळाशीं असून त्यामध्यें विवेचनपद्धतींत मात्र थोडाफार फरक आढळून येतो. अर्वाचीन दृष्टीनें केलेलें विवेचन आपणास डॉ. आलफ्रेड मार्शल याच्या 'अर्थशास्त्राचीं तत्त्वें' या ग्रंथांत पुढें दिल्याप्रमाणें दृष्टीस पडतें. मनुष्यजातीच्या रोजच्या व्यवहारांचा अभ्यास या शास्त्रांत केलेला असून त्यानें आपणांस सुस्थिति प्राप्त व्हावी याकरितां जी ऐहिक संपत्ति प्राप्त करून घेण्याची व त्याकरितां आवश्यक त्या गोष्टींचें विशिष्ट व्यक्तीकडून व समाजाकडून अर्जन करण्याकरितां जी घडामोड करण्यांत येते तिचें निरीक्षण करणें अवश्य असतें. या शास्त्रामध्यें काय असतें त्याचा अभ्यास केलेला असून काय असावें याचा नसतो व यामुळें नीतिशास्त्रापासून याचें पृथक्त्व स्थापन होतें. आर्थिक तत्त्वांस नीतीचे नियम लावूं पाहण्यामुळें या अभ्यासामध्यें पुष्कळ अभिरुचि उत्पन्न होऊं लागली आहे. या शास्त्रामध्यें जरी मानसशास्त्राच्या कांहीं तत्त्वांचा उपयोग करावा लागतो तरी हें शास्त्र मानसशास्त्राहून भिन्न आहे. अर्थशास्त्राचा मुख्य विषय जो संपत्तीचें उत्पादन, विनिमय आणि विभजन त्याच्याकडेच सामान्यतः प्रमुखपणें लक्ष देण्यांत येतें. परंतु अलीकडे खप या गोष्टीकडेहि विशेष लक्ष देण्यांत येऊं लागलें आहे. विशेषतः डब्ल्यू. एस्. जेव्हान्स (१८३५-१८८२) आणि मार्शल यांनीं या भागावर भर दिला आहे. या बाबतींमध्यें एक गोष्ट विशेषतः लक्षांत घ्यावी लागते ती ही कीं, विशिष्ट मर्यादेपलीकडे एखाद्या पदार्थाची उत्पत्ति झाली म्हणजे त्यापुढील उत्पन्न होणाऱ्या त्या पदार्थाची उपयुक्तता मनुष्यव्यक्ति व समाज यांच्या दृष्टीनें कमी कमी होऊं लागते. अशा वेळीं हा पदार्थ फाजील झाला असें आपण म्हणतों. या आधिक्याची वास्तविक किंमत किती असते हें काढावयाचें असल्यास एखाद्या वस्तूची आपण प्रत्यक्ष किती किंमत देतों व त्या वस्तूखेरीज व्यवहार करावयाचा झाल्यास किती येईल या दोहांमध्यें जो फरक असतो ती होय. अर्थशास्त्राच्या निरनिराळ्या शाखांमध्यें स्पष्टपणें भेद करणें कठीण आहे उदाहरणार्थ, विनिमयाचे सर्व प्रकार हे विभजनाचे किंवा उत्पादनाचे निरनिराळे प्रकार मानतां येतील.

अर्थशास्त्राचा वास्तविक मुख्य विषय म्हटला म्हणजे वस्तूंचें विनिमयमूल्य व श्रमांचें विनिमयमूल्य ठरविणें हा आहे; कारण हें निश्चित करण्यामध्येंच उत्पादन, विभजन, खप, वगैरेचे सर्व नियम केंद्रित होतात व त्यांची परस्परांवर क्रिया व प्रतिक्रिया यांचाहि शोध घ्यावा लागतो. कोणत्याहि वस्तूचें मूल्य कसें ठरवावें या गोष्टीचा आपण अभ्यास करूं लागलों म्हणजे त्या वस्तूला असणारी मागणी व त्या वस्तूचा पुरवठा व त्या वस्तूच्या उत्पादनास लागणारा खर्च या सर्व गोष्टींचा विचार करावा लागतो. उत्पादनाचा अभ्यास करीत असतां उत्पादनांतील निरनिराळ्या तांत्रिक क्रियांचा अभ्यास या शास्त्रांत करण्यांत येत नाहीं; तथापि त्यांचें कांहींसें ज्ञान अवश्य असतें. उत्पादनासंबंधींच्या सर्व नियमांचा, उदाहरणार्थ-उत्पादनाचें वाढतें व घटतें प्रमाण अथवा श्रम, जमीन, भांडवल, वगैरे उत्पादनास आवश्यक असणाऱ्या गोष्टी व उत्पादनाचें प्रमाण यांमधील संबंध, याप्रमाणेंच वाहतूक अथवा दळणवळण, निरनिराळे बाजार, पेढ्या व पेढीव्यवहार, चलन, अर्थव्यवस्था, व्यापारी संघ व संघटना, इत्यादि विषयांचाहि अभ्यास करावा लागतो. विभजनामध्यें मजुरी, व्याज, आणि भाडें व नफा यांच्या दरांचें नियमन कसें होत असतें याचा अभ्यास करावा लागतो व यांपैकीं प्रत्येक बाब ही श्रमाकरितां दिलेलें मूल्य (श्रम, भांडवल व जमीन यांचें) असल्यामुळें मूल्याच्या प्रश्नाचाहि विचार करणें भाग पडतें. विभजनामध्यें कामगारसंघ, सहकार्य, मजुरांचे कलह, वगैरे प्रश्न येतात. अर्थशास्त्रामध्यें राष्ट्राच्या सार्वजनिक आर्थिक व्यवहाराचाहि विचार करण्यांत येतो. यांत करहि येतात. व त्याबरोबर राष्ट्राचें उत्पन्न गोळा करण्याच्या व खर्च करण्याच्या पद्धतींचा अभ्यास करावा लागतो.

अर्थशास्त्राच्या अभ्यासाची पद्धति ही पूर्णपणें शास्त्रीय अभ्यासाची पद्धति आहे. कारण तीमध्यें वस्तूंचें वर्णनात्मक पृथक्करण केलेलें असून कार्यकारणभावाचीहि मीमांसा केलेली असते. अर्थशास्त्राचे नियम हेहि इतर शास्त्रांतील नियमांप्रमाणेंच प्रवृत्तींचे नियम आहेत. पूर्वीच्या अर्थशास्त्रज्ञांची पद्धति केवळ विगमनात्मक (इंडक्टिव्ह) असे. म्हणजे ते कांहीं सामान्य तत्त्वें प्रथम घेत. उदाहरणार्थ, प्रत्येक मनुष्य हा आपलें हित पाहत असतो व त्याला आपलें हित कशांत आहे हें कळतें. तसेंच कांहीं सामान्य तत्त्वें गृहीत धरीत असत. उदाहरणार्थ, सर्वत्र खुली स्पर्धा चालू असते. अशा तत्त्वांवर अथवा

गृहीत गोष्टींवर कांहीं तत्त्वें आधारीत असत. परंतु प्रत्यक्ष व्यवहारामध्यें तसा संबंध आढळून येत नसे. जरी प्रारंभीं या पद्धतीमध्यें कांहीं चांगले गुण होते तरी तीमध्यें कांहीं गोष्टींकडे दुर्लक्ष होत असे व त्यामुळें अशा तऱ्हेचे सिद्धान्त निघत कीं, त्यांचा प्रत्यक्षामध्यें विसंगतपणा आढळून येई. याचें एक उदाहरण म्हणजे मालथस यानें १७९८ मध्यें प्रसिद्ध केलेला 'लोकसंख्येचीं तत्त्वें' हा निबंध होय. या ग्रंथामुळें एक असा अर्थशास्त्रज्ञांचा वर्ग निर्माण झाला कीं, ते आपले सिद्धान्त विगमनात्मक (इंडक्टिव्ह) व ऐतिहासिक दृष्टीवर आधारून मांडूं लागले. अशा प्रकारें ऐतिहासिक दृष्टीनें अभ्यास करणारे इतिहासहि विशेषतः जर्मनीमध्यें रॉश्चर (१८१७–१८९४), लाव्हेलेये (१८२२-१८९२) आणि क्लिफ लेस्ली (१८२५–१८८२) यांचे आढळून येतात व यांचें मत असें होतें कीं, अर्थशास्त्र हें मुख्यतः वर्णनात्मक असावें व त्यानें सर्वसामान्य नियम घालून देण्याचा प्रयत्न करूं नये. जे. एस्. मिल व त्याच्या संप्रदायांतील विगमनात्मक पद्धतीनें अभ्यास करणारे शास्त्रज्ञ आपले ग्रंथ बऱ्याच संशोधनानंतर व आपण काढलेले सिद्धान्त प्रत्यक्षाशीं ताडून पाहून नंतर लिहीत असत. पूर्वीच्या अर्थशास्त्रज्ञांच्या विरुद्ध दुसरी एक गोष्ट घडून आली ती म्हणजे त्यांची तथाभवतु अथवा निर्हस्तक्षेप (लेसे फेर) या तत्त्वाशीं सांगड घालण्यांत आली ही होय.

अलेक्झांडर हॅमिल्टन (१७५७–१८०४) आणि फ्रेडरिक लिस्ट (१७८९–१८४६) यांनीं विशेषतः देशांतील कारखान्यांचें व धंद्यांचें परकीय स्पर्धेपासून रक्षण व्हावें याकरितां सरकारनें प्रत्यक्ष या कामांत हात घालावा असें सुचविलें व याप्रमाणें यांनीं सरकारी मदत धंद्यास मिळणें अवश्य आहे या तत्त्वाचा पाया घातला. सध्यां अर्थशास्त्राची चर्चा करतांना दोन्ही निगमनात्मक व विगमनात्मक तर्कपद्धतींचा उपयोग करण्यांत येतो. अर्थशास्त्रीय प्रश्नांचा विचार करतांना अलीकडे झालेली नवी सुधारणा म्हणजे आंकड्यांचा उपयोग ही होय. हे आंकडेहि आतां निरनिराळ्या विषयांचे निरनिराळ्या प्रकारचे व पद्धतशीर रीतीनें गोळा करण्यांत व मांडण्यांत येऊं लागले आहेत. योग्य काळजी घेतली असतां जीं प्रमेयें साध्या शब्दांमध्यें व्यक्त करणें बरेंच कठिण जातें तीं गणितशास्त्राप्रमाणें पद्धतशीर रीतीनें मांडलीं असतां फारच उद्बोधक, ज्ञानदायक व उपयुक्त ठरतात, ही गोष्ट आतां स्पष्ट होत चालली आहे. या क्षेत्रामध्यें पंटालक्रोनी व पारेटो या दोन इटालियन अर्थशास्त्रज्ञांचे प्रयत्न विशेष महत्त्वाचे आहेत. 'हिंदी अर्थशास्त्र' पाहा.

**अर्देसर १ ला** (इ. स. २२६–२४८.)—ससॅनियन घराण्याचा हा संस्थापक. हा पर्सेपोलिसच्या आग्नेयेस असणाऱ्या खीर (चीर)चा राजा जो पापाक त्याचा पुत्र. गादीवर येतांच यानें इराण व त्या सभोंवतालचीं राज्यें यांवर आपली सत्ता स्थापून पार्थियन सम्राट् अर्तोबान यास ठार केलें. यानंतर दोन वर्षांनीं टेसिफोन राजधानीचा यानें कबजा घेतला. मुळापासूनच याचा ओढा मज्द-यस्न संप्रदायाकडे असल्यानें यानें या संप्रदायाच्या ऊर्जितावस्थेसाठीं आटोकाट प्रयत्न केले. या कामीं यास झरथुष्ट्रपंथी पुरोहित वर्गाचा म्हणजे मगी लोकांचा पाठिंबा मिळाला. अनाहिता देवीवर याची भक्ति असून मगी संस्काराचा हा पुरस्कर्ता होता. अलेक्झांडरच्या काळांत लिहिल्या गेलेल्या 'अवेस्ता' या धर्मग्रंथाच्या मूळ प्रती याच्या वेळीं नामशेष होत चालल्या होत्या. यानें तन्सर नामक आपल्या पुरोहिताकडून या नाममात्र राहिलेल्या जुन्या धर्मग्रंथांचें पुनरुज्जीवन केलें. धर्म व राज्य हीं परस्परांवर अवलंबून आहेत. 'धर्म हा राज्याचें अधिष्ठान असून राज्य हें धर्माच्या रक्षणासाठीं असतें,' अशी याची विचारसरणी होती. तदनुसार यानें धर्मग्रंथ, पुराणें, तत्त्वें, यांचा संग्रह करून सत्यधर्म व सत्यउपासना या मूल धर्मतत्त्वांचा प्रसार केला.

**अर्धजागृति**—(सब् कॉन्शस्‌नेस्). या अवस्थेंत अगद थोडी जागृति, भान किंवा जाणीव असते; नंतर ती नाहींशी होते. सुप्तमनाच्या किंवा अंतर्मनाच्या क्रियांनाहि ही संज्ञा लावतात. या क्रिया कां होतात हें नक्की सांगतां येत नाहीं, आपल्या कांहीं भावनांना कांहीं कारणें देतां येत नाहींत किंवा आपल्या कांहीं हालचाली आपोआपच होत असतात. झोंपेंत जागेपणासारखे व्यवहार करणें, मनानें समोर नसलेल्या गोष्टींची हालचाल पाहणें, दूर असलेल्या दोन व्यक्तींना एकमेकांचें मन समजणें, इ. घटनांना अंतर्मनाचे खेळ असें म्हणावें लागतें.

**अर्धपक्षकीटकवर्ग**—(हेमिप्टेरा). ही एक चार पंख असलेल्या कीटकांची जात आहे. यांना पुढें शोषणाकरितां सोंडेसारखा अवयव असतो. यांचे बाह्यपक्ष अथवा पक्षावरणें शेणकिड्यांप्रमाणें शृंगमय पदार्थांचे बनलेले असतात. आणि मागचे साधे पंख अंतरत्वचामय किंवा चर्ममय बनलेले असून त्यांचीं टोकें पारदर्शक असतात. यांचे समपक्षी (होमोप्टेरा) आणि विभिन्नपक्षी (हेटरोप्टेरा) असे दोन वर्ग पाडण्यांत येतात व त्यांच्या पंखांची रचना भिन्न असते. या वर्गांत वृक्षयूका, होड्माशी, 'नौमक्षिका' (बोटफ्लाय), ढेकूण, वगैरे प्राणी मोडतात.

**अर्धमागधी**—एक प्राकृत भाषा. सध्यांचा अयोध्या प्रांत व त्याच्या दक्षिणेकडील प्रदेश या भागांत ही भाषा पूर्वी प्रचारांत होती. भारतीय वैय्याकरणांनीं या भाषेला 'आर्षभाषा' असें नांव ठेवलें होतें. श्वेतांबर जैन लोकांचे धार्मिक ग्रंथ याच भाषेंत लिहिलेले असून या ग्रंथांबाबत वेबरनें बरेंच संशोधनकार्य

केल्याचें दिसून येतें. भाषाशास्त्राच्या दृष्टीनें अर्धमागधींतील गद्य भाषेसंबंधींचा महत्त्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे प्रथम अंग आयारंग-सुत्त हा होय. या ग्रंथांतील भाषा अगदीं जुनाट वळणाची आढळून येते. सध्यां उपलब्ध झालेल्या ग्रंथांच्या वाचनावरून असें दिसून येतें कीं, अर्धमागधी ही परंपरागत चालत आलेली एक भाषा असून ती इतर प्राकृत भाषांपेक्षां अधिक संपन्न आहे. जैन पंडितांच्या मतें अर्धमागधी ही भाषा इतर सर्व भाषांची जननी आहे. जैनधर्मसंस्थापक जो महावीर त्यानें या भाषेच्या द्वारेंच आपलें धर्मप्रसाराचें कार्य केलें. महावीरानें धर्मनियम याच भाषेंत सांगितल्यामुळें त्या वेळच्या लोकांच्या नेहमींच्या सरावांतहि हीच भाषा आली व तिला प्राकृत (म्हणजे लोकांच्या नेहमींच्या बोलण्यांतील भाषा) म्हणूं लागले. या भाषेचा अभ्यास करण्याची प्रवृत्ति अलीकडे वाढत असून मराठी भाषेची पूर्व-पीठिका लावण्याच्या कामीं या अभ्यासाचा विशेष उपयोग होईल अशी अपेक्षा आहे.

**अर्धशिशी**—अर्धशिशी हा डोकेदुखीचा एक प्रकार आहे. अशी डोकेदुखी ठराविक वेळीं व ठराविक वेळानें उठते व त्यामुळें डोक्याच्या अर्ध्या भागांतच घाव घातल्याप्रमाणें किंवा पोखरल्याप्रमाणें अतीव वेदना सुरु होतात. अर्धशिशी होणें हें पंडुरोग, वातप्रकृति व अशक्तपणा यांचीं चिन्हें होत. शिवाय मनस्ताप, शारीरिक श्रम, जागरण, मैथुनातिरेक, अनियमित आहार व अशुद्ध हवेंत राहणें यांचाहि हा परिणाम असतो. ज्या वेळीं मनुष्याच्या शरीरांतील सहानुभूतिक तंतूंचा मेंदूशीं असलेला संबंध ढिला होतो त्या वेळीं त्यांचें काम अनियंत्रित चालू लागतें व रक्तवाहिन्यांचा संकोच होतो. यानंतर पुढें जेव्हां रक्तवाहिन्या विकास पावतात तेव्हां मेंदूंत येणाऱ्या रक्ताचा जोर वाढतो व अर्धशिशीस सुरुवात होते. पुष्कळदां अर्धशिशीबरोबरच मळमळ व वांति यांचाहि त्रास होतो.

अर्धशिशीस सुरुवात झाल्याबरोबर त्यावर उपचार म्हणून पोटॅशिअम् ब्रोमाइड, नवसागर (आमोनियम क्लोरॉइड), भांग (इंडियन हेंप), इत्यादि पदार्थांचा औषध म्हणून उपयोग करतात. परंतु या पदार्थांपेक्षां ॲन्टीपायरीन व ॲन्टीफेब्रीन यांच्या उपचारानें डोकेदुखी बरीच कमी होते असा अनुभव आहे. यासाठीं घ्यावयाचें ॲन्टीपायरीन किंवा ॲन्टीफेब्रीन अनुक्रमें ८–१० व ३–५ ग्रेन इतकें असावें व तें डोकें दुखण्याच्या सुमारास पाण्याच्या घोटांबरोबर पोटांत घेऊन वर स्निग्ध असें कांहींतरी खावें. ॲन्टीपायरीनबरोबर कांहीं लोक पोटॅशियम ब्रोमाइड व कोयनेलचाहि उपयोग करतात. मेंथॉल व वेलदोड्याच्या तेलाचाहि या विकारावर पोटांतील औषध म्हणून उपयोग होतो. बाह्योपचार म्हणून या विकारावर डोक्यास उष्णता किंवा थंडी लावावी. तसेंच मानेच्या मागच्या अंगावर राईचें पोटीस लावावें. डोकें दुखत असतांना रेचकाचा उपयोग मात्र मुळींच करूं नये.

**अर्धांगवायु**—मेंदूला, पृष्ठवंशाला किंवा मज्जातंतूंना अथवा कांहीं स्नायूंस इजा झाली असतांना चलनवलनाची शक्ति अजीबात नष्ट होते, त्या विकारास पक्षघात अथवा अर्धांगवायु म्हणतात. जेव्हां हा विकार शरीराच्या एकाच अर्धभागास होतो आणि तेवढ्याच भागांतील स्नायूंची चलनवलनशक्ति नाहींशी होते तेव्हां तो मेंदूचा विकार असतो, व त्यास हेमिप्लेजिया म्हणतात. हा सामान्यतः मेंदूंतील रक्तपेशी तुटल्यामुळें उत्पन्न होतो. किंवा रक्तबिंदू घट्ट झाल्यामुळें रक्तपेशींस प्रतिबंध झाल्यामुळेंहि हा रोग होण्याचा संभव असतो. या रोगांतून अर्धवट किंवा पूर्णपणेंहि रोगी बरा होण्याचा संभव असतो. किंवा क्वचित् मृत्युहि येण्याचा संभव असतो. या रोगाचा झटका पुन्हां येण्याचा संभव असतो. जेव्हां शरीराची एक बाजू व चेहऱ्याची दुसरी बाजू अशा विकृत होतात तेव्हां हा विकार मेड्यूला ऑब्लांगेटा या मेंदूच्या भागास झालेला असतो. जेव्हां हा विकार पृष्ठवंशामध्यें असतो तेव्हां त्यास पॅराप्लेजिया असें म्हणतात, व या विकारांत शरीराचा वरचा किंवा खालचा भाग बधिर होतो किंवा शरीराच्या एका भागांतील गति व दुसऱ्या भागांतील संवेदना नाहींशी होते. उन्माद किंवा नससंक्षोभविकार या रोगांत जो अर्धांगवायु होतो त्यांत शरीरास कांहीं इजा नसते; तेव्हां मानसिक विकृतीचा शोध करून, मनो-विश्लेषणाचा उपचार करून रोग्याची दबलेली इच्छा काय आहे हें पाहावें लागतें व ती पुरी करून रोग बरा करावा लागतो. हा क्रियामूलक (फंक्शनल) अर्धांगवायु होय.

**अर्धोदयपर्व**—(अमार्कश्रवणे पाते) रविवारीं सूर्योदयीं अमा-वास्येचा प्रथम भाग, श्रवण नक्षत्राचा मध्यभाग, व्यतिपाताचा अंत्यभाग असा योग असल्यास अर्धोदयपर्व होतें. हाच योग सोमवारीं असल्यास त्याला महोदय म्हणतात.

**अर्ब, अर्ब**—रसायनशास्त्रांतील हा धातु अतिशय दुर्मिळ असून यित्र (Yttrium), टर्ब (terbium) सारख्या द्रव्यां-बरोबर दुर्मिळ खनिजांतून सांपडतो. इ. स. १८४३ मध्यें मोझॅन्डरनें हें धातुद्रव्य शोधून काढलें. यित्राचें बारीक परीक्षण करतांना जीं दोन प्राणिदें सांपडलीं त्यांना त्यानें अर्ब आणि टर्ब अशीं नांवें दिलीं. या द्रव्याचे गुणधर्म अद्यापि फारसे माहीत नाहींत.

**अर्बथनॉट, जॉन** (१६६७–१७३५)—एक इंग्लिश ग्रंथ-कार व वैद्य. सन १६९१ मध्यें याचा बाप मरण पावला, तेव्हां-पासून लंडनमध्यें गणित शिकवून हा आपली उपजीविका करूं

लागला. सन १६९२ सालीं ऑक्सफर्ड विश्वविद्यालयांत पदार्पण करून यानें सन १६९६ मध्यें अॅन्ड्रूज विश्वविद्यालयाची 'एम्. डी.' ही पदवी मिळवली. यानंतर सन १७०४ मध्यें हा 'रॉयल सोसायटी' या संस्थेचा सभासद झाला. सन १७०५ मध्यें यास अॅन राणीचा खास वैद्य नेमण्यांत आलें. आपल्या अलौकिक लिखाणामुळेंहि हा प्रसिद्धीस आला. प्रथम सन १६९२ मध्यें ख्रिश्चन ह्युजेनच्या डच ग्रंथाच्या लॅटिन भाषांतराच्या आधारानें यानें 'संभवनियम' (लॉज ऑफ चॅन्स) हें पुस्तक लिहिलें. यानंतर सन १६९७ मध्यें लिहिलेलें याचें दुसरें पुस्तक म्हणजे 'वुडवर्डच्या प्रलयावरील ग्रंथाची परीक्षा' या ग्रंथांत यानें वुडवर्डच्या मतांचें खंडन केल्याचें दिसून येतें. 'गणितज्ञानाची उपयुक्तता' (एसे ऑन दि यूजफुलनेस ऑफ मॅथेमॅटिकल लर्निंग) हा आपला निबंध यानें सन १७०१ मध्यें लिहिला. या लिखाणांखेरीज 'लॉ इज ए बॉटमलेस् पिट' (कायदा म्हणजे तळ नसलेला खड्डा) यासारखे औपरोधिक असे कांहीं लेख व 'थ्री अवर्स आफ्टर मॅरेज' (लग्नानंतरचे तीन तास) यासारखीं कांहीं विनोदी पुस्तकेंहि यानें लिहिलीं आहेत. 'ए ट्रीटाइज ऑन दि आर्ट ऑफ पोलिटिकल लाइंग' (राजकीय असत्याच्या कलेवरील निबंध) हा याचा लेख औपरोधिक स्वरूपाचा असून यांत यानें राजकारणांत जें असत्य बोलावें लागतें त्यासंबंधीं आपले विचार प्रगट केले आहेत. 'जॉन बुल्'चें यानें रेखाटलेलें चित्र अतिशय मनोरंजक आहे. अॅन् राणीच्या हयातीपर्यंत याचें वर्चस्व दरबारांत राहिलें. समयसूचकता, सभ्य वागणूक, विद्वत्ता या गुणांमुळें टोरी पक्षांत यानें आपलें चांगलें नांव राखलें.

**अर्यमा**— आदित्य नांवाच्या देवता-समूहांतील एक वैदिक देवता. ऋग्वेदांत याचा उल्लेख मित्रावरुणांबरोबर सुमारें १०० वेळां आलेला दिसतो. 'अवेस्तां'तहि या देवतेचा उल्लेख आढळतो. हा द्वादशादित्यांतील एक असून वैशाखांत प्रकाशतो.

**अर्हत्**—वेदोत्तर कालांत ब्राह्मण वर्गाशीं आपल्या आध्यात्मिक ज्ञानाच्या जोरावर स्पर्धा देणारा असा एक वर्ग निर्माण झाला होता. ब्राह्मणांना समाजांत जो एक मानाचा दर्जा दिला जातो त्यावरहि हा वर्ग आपला हक्क सांगूं लागला. या वर्गांतील लोक स्वतःस 'अर्हत्' असें म्हणून घेत. जैन व बौद्ध संप्रदायांतहि हा शब्द आढळतो. बौद्धमतानुसार अष्टांगिक मार्गाचीं अंगें जीं (१) सम्यक् दृष्टि, (२) सम्यक् संकल्प, (३) सम्यक् वाक्, (४) सम्यक् कर्मान्त, (५) सम्यक् आजीव, (६) सम्यक् व्यायाम, (७) सम्यक् स्मृति, व (८) सम्यक् समाधि यांत ज्यानें पूर्णता मिळवली आहे, ज्यानें मनोविकारांना जिंकलें असून इंद्रियांचें दमन केलें आहे असा मनुष्य अर्हत् या पदवीस प्राप्त होतो. बौद्धांच्या समजुतीप्रमाणें अर्हत् मनुष्यास पुनर्जन्म नाहीं. बौद्ध मतानुसार वागणारा संसारी मनुष्यहि अर्हत् पद मिळवीत असे. यानंतर अर्हत् पद मिळविणाऱ्या लोकांबद्दल लोकांच्या मनांत जास्त आदर उत्पन्न होत चालला. ज्या भिक्षूला अर्हत् होण्याची इच्छा असे तो स्वतः तसें जाहीर करी व अशा भिक्षूला अर्हत् पद देण्यापूर्वी सहा प्रश्न विचारण्यांत येत असत. या प्रश्नांचीं उत्तरें बरोबर मिळाल्यासच त्याचा अर्हत् पदावरील हक्क मान्य होई. ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकापर्यंतच अर्हत् ही पदवी प्राप्त करून घेणारे लोक आढळतात. बौद्ध धर्माच्या स्थापनेनंतर कांहीं शतकांनीं कांहीं बौद्ध धर्मीय संस्कृतमध्यें ग्रंथरचना करूं लागले. त्यांनीं आपल्या ग्रंथांत, 'जो मनुष्य अर्हत् पदासाठीं यत्न करीत असतो त्याचें अंतिम ध्येय बोधिसत्त्व हें असतें', असें म्हटलें आहे.

**अलकनंदा**—गंगेला मिळणारी एक नदी. गढवाल हद्दींतील ही नदी 'महानदी' या नांवानें प्रसिद्ध आहे. हिला नंदाकिनी, पिंडर, मंदाकिनी यांसारख्या अनेक नद्या मिळाल्या असून अशा रीतीनें झालेल्या संगम क्षेत्रांना धार्मिक महत्त्वहि आलें आहे. या नदीस नंदाकिनी नदी जेथें मिळते त्या स्थानास नंदप्रयाग, पिंडर जेथें मिळते त्यास कर्णप्रयाग, मंदाकिनी जेथें मिळते तें रुद्रप्रयाग अशीं नांवें आहेत. अलकनंदा नदी शेवटीं गंगेस मिळते तें स्थान देवप्रयाग या नांवानें सुप्रसिद्ध आहे.

**अलका**—संस्कृत काव्यामधून ज्याच्या ऐश्वर्याबद्दल गौरवपूर्ण उल्लेख केला जातो असें एक पौराणिक कालांतील शहर व सरोवर. भूतेशगिरीवर या नगराची स्थापना करण्यांत आली आहे असें भागवतांत म्हटलें आहे. कैलास पर्वतावरील ही नगरी सुखसमृद्ध असून यावर कुबेराची सत्ता आहे. ययातीनें पुरूपासून तारुण्य मिळविल्यानंतर तो याच नगरींत विषयसुखाचा आस्वाद घेत राहिला, असें भारतांत वर्णन आहे. पुरूरवा हाहि उर्वशीसह येथेंच राहिला होता.

**अलंकार**— मनुष्याची सौंदर्याबद्दलची आसक्ति हेंच अलंकाराच्या निर्मितीचें मूळ होय. स्वतःचें शरीर सुंदर दिसावें यासाठीं जरी मनुष्यानें दागिने निर्माण केले असले तरी त्यांतून आणखी कांहीं फायदे माणसानें निर्माण केले आहेत. दागिन्यांमुळें माणसाचा पैसा शिल्लक पडतो व वेळेनुसार त्याला त्याचा उपयोग करतां येतो.

स्वतःचें शरीर जास्त सुंदर दिसावें ही भावना पुरुषांपेक्षां स्त्रियांत जास्त असते. त्यामुळें पुरुषांपेक्षां स्त्रियांचाच दागिन्यांकडे ओढा साहजिकच असतो. पौराणिक कालापासूनचे दागिने जर आपण पाहूं लागलों तर त्यांत अनेक प्रकार आपणांस पाहावयास मिळतात. मनुष्याच्या प्रत्येक अवयवाला शोभा

देणाऱ्या दागिन्यांची निर्मिति झालेली आहे. प्राचीन कालांत शिखापाश, शिखाजाल, चूडामणि, मकरिका, मुक्ताजाल, गवाक्षि, कुंडल, खड्गपत्र, इत्यादि अलंकारांचा वापर देवता व राजस्त्रिया करीत असत. या अलंकारांत हळूहळू कालमानानुसार असंख्य अलंकारांची भर पडत गेली.

प्रत्येक समाजांतील अलंकाराच्या पद्धति वेगवेगळ्या दिसून येतात. पूर्वीचे अवजड अलंकार मागें पडून आतां सुटसुटीत व कमी वजनाचे अलंकार लोकांमध्यें प्रिय होऊं लागले. त्या दृष्टीनें पन्नास वर्षांपूर्वीचे हिंदु स्त्रीचे अलंकार म्हटले म्हणजे चंद्रकोर, गुलाबाचें फूल, नाग, बिजवरा, केतक, मूद, फिरकीचें फूल, हे डोक्यावर वापरण्याचे; कानांत वापरण्यासाठीं कुडुं, बुगड्या, बाळ्या, कुडी हें; नथ, मोरणी हे नाकांतील; चंद्रहार, मंगळसूत्र, एकदाणी, सरी, ठुशी हे गळ्यांतील; कांकणें, पाटल्या, गोठ, तोडे हे हातांतील; व तोडे, तोरड्या, जोडवीं, गेंद, मासोळ्या, इत्यादि पायांतील दागिने होते. आतां सोन्याचे दागिने कमी होऊन एखादा दुसरा मोत्याचा दागिना वापरण्याची सुखवस्तु स्त्रियांत चाल पडली आहे.

मुसलमान स्त्रियांचे दागिने म्हटले म्हणजे लतकान, चांद-तारा, मोर, ठिका, पातबाळिया, बेसर, दानिया, जहांगिरी, कंकण, मकोडा, कामनी, पैंजेच, इत्यादि अनेक होते.

पारशी स्त्रियांमध्यें सोन्याचांदीच्या दागिन्यांपेक्षां हिऱ्या-माणकांचेच दागिने जास्त प्रिय आहेत. या स्त्रिया कान, हात व गळा या तीन ठिकाणींच दागिने घालतात.

सन १८५१ मध्यें लंडनमध्यें एक दागिन्यांचें प्रदर्शन भरवलें होतें. त्यांत प्राच्य, विशेषतः हिंदुस्थानांतील प्राचीन कालांतील निरनिराळे अलंकार ठेवले होते.

जगांतील सर्वांत प्राचीन जवाहीर अथवा अलंकार सर फ्लँडर्स पेट्री या संशोधकानें ईजिप्त देशांतील दुसरा सेन्युसर्ट याच्या मनोऱ्यामध्यें (पिरामिड) शोधून काढले. त्यांत एक मुकुट होता.

प्राथमिक अवस्थेंतील लोक आपल्या अंगावरील वस्त्रें अडकविण्याकरितां बहुधा लहान माशांचीं हाडें, वगैरे वापरीत. पुढें धातूंचा उपयोग माहीत झाल्यावर धातूचे आंकडे किंवा टांचण्या तयार करण्यांत येऊं लागल्या. या टांचण्यांचीं टोकें हळूहळू शोभिवंत करण्याची प्रवृत्ति उत्पन्न झाली. पश्चिमेकडे स्कॅंडिनेव्हिया, आयर्लंड, वगैरेमध्यें अशा बऱ्याच टांचण्या आढळून आल्या आहेत. यानंतर कोणीं तरी या लांब टांचण्या वांकवून त्यांच्या एका टोंकास सुंकलें करण्याची कल्पना काढली असावी. याप्रमाणें आच्छादित अग्राची टांचणी (सेफ्टी पिन्) तयार झाली. अशा तऱ्हेच्या टांचण्या ट्रॅाय शहराच्या अवशेषांत आढळून आल्या आहेत. ग्रीस व रोम यांमध्यें अनेक तऱ्हेचे ब्रूच साडी पिन्प्रमाणें सांपडले आहेत. या ब्रूचची वाढ स्कॉटलंड वगैरे देशांत फार झाली आहे.

प्राथमिक अवस्थेंतील लोकांत अंगठ्या फारशा आढळत नाहींत; याचें कारण त्यांची काम करतांना अडचण होत असावी; परंतु अलीकडे सुधारणेच्या काळांत यांचे उपयोग व प्रकार फारच वाढले आहेत. ईजिप्तमध्यें झुरळासारख्या एका किड्याच्या (स्कॅरब) आकृतीचे खडे अंगठ्यांवर व दंडकड्यांवर व पट्ट्यांवर वापरण्यांत येत असत. या अंगठ्यांचा मुद्रा म्हणून उपयोग करण्यांत येत असे. ग्रीक व रोमन लोकांत सोन्याच्या रत्नजडित अंगठ्या सर्वत्र उपयोगांत असलेल्या आढळतात. इंग्लंडमधील एथेल वुल्फ या राजाची सुंदर अंगठी ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे.

कानांतील बाळ्या, कुड्या, वगैरे कर्णभूषणें व दागिने पौरस्त्य देशांत वापरण्यांत येत असत. हे दागिने बाबिलोनियांत व असुरियामध्येंहि फार प्राचीन काळापासून स्त्री व पुरुष दोघेहि वापरीत असत. ग्रीक व रोमन लोकांत कर्णभूषणें फक्त स्त्रियाच वापरीत असत. इंग्लंडमध्यें रोमन लोकांचें अनुकरण करणारे ब्रिटन लोक तीं वापरूं लागले. परंतु दहाव्या शतकांत तीं मागें पडलीं, पण सोळाव्या शतकांत पुन्हां प्रचारांत आलीं. खलाशी लोक कानांत बाळ्या घालतात व त्यामुळें दृष्टि चांगली राहते अशी त्यांची एक खुळी समजूत आहे. अलीकडे प्रत्येक गोष्ट करण्याकरितां यंत्राचा उपयोग होऊं लागल्यामुळें या कलेंतील हस्तकौशल्य कमी कमी होऊं लागलें आहे. फ्रान्समध्यें रेनेलालिक यानें या कलेस फार मोठी चालना दिली व १८९५ मध्यें एक अलंकारांचें प्रदर्शन भरविलें. या परंपरेंतील अलंकार त्यांची रचना व कौशल्य याकरितां प्रसिद्ध आहेत. या अलंकारांत प्रत्यक्ष रत्नांचा उपयोग फार कमी प्रमाणांत केलेला असतो व त्याऐवजीं शिंगें, शिंपले, पोवळीं, स्फटिक, वगैरेचा उपयोग करण्यांत येतो.

**अलखनामी**—उत्तर हिंदुस्थानांतील दसनामी पंथांतील पुरी वर्गाच्या एका पोटवर्गांतील शैवपंथीय गोसाव्यांना अलखनामी, अलखगीर किंवा अलखिया अशीं नांवें आहेत. अलखिया हा अलखाचा अनुयायी असतो. परमेश्वर अगोचर आहे या मुख्य कल्पनेवर यांचीं धार्मिक मतें आधारलेलीं आहेत. हे गोसावी "अलख" असें ओरडतात. 'अलखको जगानेवाले' म्हणजे हे अलक्ष्याला जागे करणारे होत असें म्हणतात. हे लोक पुनर्जन्म अगर परलोक या कल्पना मानीत नाहींत. मरणोत्तर मनुष्याचें सर्व शरीर व आत्मा दोन्हीहि नाश पावतात व पंचमहाभूतांत विलीन होतात, अशी यांची विचारसरणी आहे. हे फक्त अलखनामाचेंच स्मरण करतात. दानधर्माकरितां यांची

विशेष प्रवृत्ति दिसते. हिंसा व मांसाहार हे लोक निषिद्ध मानतात. आपल्या अंतिम ध्येयाची प्राप्ति याच जन्मीं पावित्र्य, स्थिर समाधि व शांति या साधनांनीं आपणांस करून घेतां येते असें हे मानतात. अलखगीर हा पंथ बिकानेरमध्यें एका चांभारानें स्थापन केला. त्याच्या अनुयायांनीं त्यास लाल-गीर अशी पदवी दिली होती. याच्या पंथांत मूर्तिपूजा नाहीं. अंगांत एक लांब घोंगडीसारखा पायघोळ अंगरखा व डोक्यास एक घाटोळी किंवा उंच निमुळती टोपी असा यांचा पोशाख असतो. हे भिक्षेस गेले असतां 'अलख कहो,' 'अलख को लखो' असें ओरडतात. या वेळीं तावडतोब भिक्षा न मिळाल्यास हे न थांबतां तात्काळ पुढें जातात. भिक्षेबाबत यांची कोणांवरहि सक्ती नसते.

**अलगूज**—हें वाद्य म्हणजे लहानशी सनईच होय; हें बांबूचें असतें. बांबूचा एक पेराचा तुकडा सुमारें दीड वीत लांबीचा घेतात म्हणजे तो आयताच पोकळ सांपडतो. ज्या बाजूस पेराचा कंगोरा असतो, ती बाजू सहजच बंद झालेली असते. तिला बारीक भोंक ठेविलेलें असतें; दुसऱ्या टोंकास तिरकस खाप देऊन पायरी करतात. ही पायरी आडवी चिरून त्यांत एक पातळ पायरीच्या आकाराची गावडी बसवितात; म्हणजे आयतीच पिपाणी बनते. ह्या पिपाणीपासून चार बोटांवर खापाच्या विरुद्ध अंगास एक चौकोनी भोंक करून त्यांत चतुर्थांश भोंक मोकळें राहील अशी एक गावडी बसवितात. ह्या योगानें पिपाणीच्या द्वारें फुंकलेला वारा ह्या चौकोनी भोंकावर आपटतो. चौकोनी भोंकापासून चार बोटांच्या अंतरावर लहानशा वाटाण्याच्या आकाराचीं आठ भोंकें समान अंतरावर पाडतात. सनईप्रमाणें शिंपी तोंडांत धरून फुंकलें म्हणजे नळी वाऱ्यानें भरते व हातांचीं बोटें निरनिराळ्या भोंकांवर ठेवून इच्छित स्वर काढतां येतात. ह्याप्रमाणें हवें तें गीत ह्यांत वाजवितां येतें.

**अलेन, डॉ. एच्. सी.** (१८३६-१९०९)—एक होमिओपाथी ग्रंथकार. अमेरिकेंतील कानडाचे हे रहिवासी होते. कांहीं काळ त्यांनीं लष्करी, वैद्यक खात्यांत सर्जन म्हणून काम केलें. अमेरिकेंतील प्रसिद्ध हेरिंग मेडिकल कॉलेजच्या संस्थापकांपैकीं हे एक होत. या कॉलेजांत औषधि गुणधर्मशास्त्राचे व मिचिगॉन युनिव्हर्सिटीच्या होमिओपाथिक शाखेंत वैद्यकतत्त्वाचे ते प्राध्यापक होते. एके काळीं अतिप्रसिद्ध असलेल्या 'Medical Advance' ह्या मासिकाचे हे कांहीं काळ संपादकहि होते. त्यांचे कांहीं प्रसिद्ध ग्रंथ—

1. Therapeutics of Fevers, 2. Keynotes of Leading Remedies, 3. Materia Medica of the Nosodes, 4. Encyclopaedia of Pure Materia Medica.

**अलंप्रभु**—अलंप्रभु किंवा प्रभुलिंग हा एक आराध्य जातीय तैलंग ब्राह्मण होता असें म्हणतात. वीरशैवाच्या मतानें अलंप्रभु हा पुरुष लिंगायत धर्माचा संस्थापक जो बसव त्याच्याहि पूर्वी होऊन गेला असावा. चामरस कवीनें कानडी भाषेंत जो 'प्रभुलिंग लीले' या नांवाचा पट्पदी वृत्तांत ग्रंथ लिहिला आहे त्यांत याचा उल्लेख आहे. या काव्यांत यास गणपतीचा अवतार मानलें आहे. प्रभुलिंग हा शांत व सुखभावी असून यानें पुष्कळ प्रवास केला होता. हा अनेक चमत्कार करून दाखवीत असल्यामुळें सर्वांना हा माहीत झाला होता. याच्या पवित्र आचरणामुळें लोकांची याजवर श्रद्धा होती.

**अलफॉन्सो**— या नांवाचे अनेक पोर्तुगीझ व स्पॅनिश राजे होऊन गेले. पोर्तुगीझ अलफॉन्सो सहा होऊन गेले.

पोर्तुगीझ राजे—लिऑनचें मांडलिकत्व झुगारून देणारा व मूर लोकांना पराभूत करणारा अलफॉन्सो हा पोर्तुगालचा पहिला अलफॉन्सो होय. पुढें लिऑननें यास कैदेंत टाकलें, परंतु एक स्वराज्यसंस्थापक व साधु म्हणून पोर्तुगीझ लोकांच्या हृदयांत यानें स्थान पटकावलें. याचा काल सन १०९४ ते ११८५ असा आहे.

यानंतर दुसरा पोर्तुगीझ अलफॉन्सो राजा सन ११८५-१२२३ या कालांत होऊन गेला. धर्माधिकाऱ्यांचें अवास्तव वाढलेलें प्रस्थ कमी करून जुन्या रूढ कायद्यांना बदलण्याची कामगिरी यानें केली. याच्यानंतर गादीवर आलेल्या ३ ऱ्या, ४ थ्या व ५ व्या अलफॉन्सो राजांनीं पोर्तुगीझ राज्याच्या उन्नतीचे अनेक प्रयत्न केले. परंतु शेवटचा ६ वा अलफॉन्सो राजा हा दुर्वर्तनी निघाल्यामुळें त्याच्या बायकोनें व भावानें त्यास सन १६६७ मध्यें पदच्युत केलें.

स्पॅनिश राजे—सन ७३९ ते १०२८ या कालांत स्पेनमध्यें अलफॉन्सो या नांवाचे सहा राजे होऊन गेले. या सहापैकीं सहावा अलफॉन्सो राजा हा सन १०६५-११०९ या कालांत होऊन गेला. आपल्या कारकीर्दींत यानें ख्रिस्ती व मुसलमान संप्रदायांच्या एकीकरणाचे अनेक प्रयत्न केले. याच्यानंतर सन ११३५ मध्यें गादीवर येणाऱ्या ७ व्या अलफॉन्सो राजानेंहि याच्याप्रमाणेंच ख्रिस्ती व मुसलमान धर्मांच्या एकीकरणाचे प्रयत्न केले. हा ख्रिस्ती धर्माचा पुरस्कर्ता होता.

८ वा अलफॉन्सो हा सन ११५८-१२१४ या कालांत होऊन गेला. यानें सन १२१२ मध्यें अल्मोहेड लोकांचा पराभव केला. स्पेन देशांत पहिलें विद्यापीठ स्थापन करण्याचा मान यानेंच मिळवला.

१० वा अलफॉन्सो—यानें अनेक उपयुक्त कायदेकानू केले. व फ्युरो रिअल व सायेट पार्टीडास हे दोन कायद्याचे ग्रंथ लिहिले.

१२ वा अलफॉन्सो—सन १८७४ मध्यें " स्पेनची राजसत्ता माझ्यांत एकवटली आहे ", असें ठासून जाहीर करणारा हा दुसऱ्या एसावेलेचा पुत्र. सन १८७६ मध्यें कार्लिस्ट पक्षाचा यानें पराभव केला ( १८५७–१८८५ ).

अरेगॉनमध्येंहि पांच अलफॉन्सो राजे होऊन गेले. त्यांपैकीं पांचवा अलफान्सो हा विद्वान् असून यानें १५ व्या शतकांतील युरोपांतील पुनरुज्जीवनाचें कार्य हातीं घेतलें. याचा काल सन १४१६–१४५८ असा येतो.

**अलफालफा**—हें एक प्रकारचें गवत असून त्यांत प्रोटीन द्रव्यें जास्त असल्यानें तें जनावरांना अतिशय मानवतें. अमेरिकेंतील गवताळ मैदानांत सुमारें एक एकर जमिनीवर २·६२ टन गवत येतें. लागण केल्यापासून वर्षांत त्याला सातआठ वेळां मोहोर येतो व प्रत्येक मोहोराला फुलें पूर्णावस्थेस येण्याच्या जरा अगोदर त्याची कापणी करावी लागते. त्याचप्रमाणें या गवताच्या मुळांवर जे जंतू वाढतात त्यांच्या योगानें जमिनीला खत चांगलें पोंचतें; कारण हे जंतू फक्त हवेंतून शुद्ध नायट्रोजनच ओढून घेतात. या गवताची लागवड कोठल्याहि हवामानाच्या प्रदेशांत होऊं शकते. अगदीं नवीन जमीन तयार केल्यावर प्रथम या गवताची लागण करून नंतर जर पिकें काढलीं तर बरींच वर्षे ती जमीन सकस राहते. कोणत्याहि ठिकाणीं अलफालफा उगवतें याचें कारण त्याचीं मुळें जमिनींत खोलवर जातात. कित्येक ठिकाणीं तर तीं १५–२० फुटांपर्यंतहि जमिनींत शिरून तेथून जमीन सुपीक करण्याचा कार्यभाग करतात. हें गवत मांसासाठीं पोसण्यांत येणाऱ्या डुकरांना फार मानवतें. गवताची साधारण उंची दोन फुटांपर्यंत असून त्याच्यावर झुडपासारखीं पानें, व निळ्या रंगाचीं फुलें येतात; व पुष्कळसें बीं एकाच पुंजक्यांत असतें. त्याचा रंग हिरवट अगर पिवळसर असतो.

**अलबट्रॉस**—हा एक समुद्रावर राहणारा, पोहतां येणारा व फार दूरवर भटकणारा पक्षी आहे. याचा पाठीकडचा रंग हिरवट पिंगट असतो व पोटाकडे पांढरा असतो. समुद्रावरच्या पक्ष्यांत हा सर्वांत मोठा आहे. याची लांबी पंखांच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत साडेसतरा फूट भरते. हे बेहरिंगच्या सामुद्रधुनींत व दक्षिणेकडील समुद्रांत केप ऑफ गुडहोपच्या आसपास आढळतात. याला मारणें खलाशी अशुभ मानतात. हा फार अधाशी आहे व अन्न मिळालें असता इतकें खातो कीं, त्याला



पोहणें अथवा उडणें अशक्य होतें. हा मातीच्या ढिगाऱ्यांत आपलें घरटें करतो. याचीं अंडीं हंसापेक्षां मोठीं असतात.

**अलमपूर**—१. अलमपूर हें काठेवाडांतील एक लहानसें संस्थान असून तें चमार्दि ठाण्याच्या वायव्येस १४ मैलांवर व घेलो नदीच्या दक्षिणेस दोन मैलांवर आहे.

२. अलमपूर या नांवाचें गांव मध्यहिंदुस्थानांत बुंदेलखंड एजन्सींतील इंदूर संस्थानांत येतें. याचें क्षेत्रफळ ३७ चौरस मैल असून या गांवची लोकसंख्या सुमारें वीस हजार आहे. या गांवाची व्यवस्था इंदूर दरबारकडून पाहिली जाते. याच गांवीं होळकरशाहीचे संस्थापक मल्हारराव होळकर यांचा मृत्यु झाला. त्यांच्या स्मरणार्थ या गांवास मल्हारनगर असें म्हणतात. या गांवीं त्यांची छत्री बांधण्यांत आली असून छत्रीच्या खर्चाकरितां निरनिराळ्या जवळच्या संस्थानिकांकडून सत्तावीस खेडीं घेण्यांत आलीं आहेत.

३. हैद्राबाद संस्थानांत रायपूर जिल्ह्याच्या आग्नेयीकडे अलमपूर हा एक तालुका असून त्यांत त्रेचाळीस खेडीं आहेत. अलमपूर हेंच या तालुक्याचें मुख्य ठिकाण. महबूबनगर व हा तालुका यांमधून कृष्णा नदी वाहत जाते. अलमपूर येथील देवळें प्रेक्षणीय आहेत.

**अलमोरा(डा)**—संयुक्त प्रांतांतील या जिल्ह्याचा बराचसा भाग हिमालय पर्वतांत आहे. क्षे. फ. ५४१६ चौ. मै. . या जिल्ह्याच्या दक्षिणेस नैनिताल जिल्हा, उत्तरेस तिबेट, पूर्वेस काली नदी व पलीकडे नेपाळ व वायव्येस गढवाल जिल्हा आहे. हिंदुस्थान व तिबेट यांना जोडणारी सुमारें १८००० फूट उंचीची एक पर्वतांची रांग या जिल्ह्यामधून जाते व याच पर्वतामध्यें उत्तरेकडे सिंधु व सतलज, व दक्षिणेकडे काली या नद्या उगम पावतात. काली नदी ही या जिल्ह्यांतील मुख्य नदी असून गोरीगंगा, धवलगंगा या नद्या हिला येऊन मिळतात. या जिल्ह्यांतील

पर्वताच्या भागांवर बर्फ व पाऊस अमाप असतो. परंतु पर्वताच्या कडेच्या भागांवर सुमारें ८० इंचांपर्यंत पाऊस असतो.

पूर्वीपासून या जिल्ह्यावर कत्युरी, चंद, वगैरे घराण्यांतील राजांनीं स्वामित्व मिळवलें होतें. त्यानंतर मुसलमान व गुरखा या जातींचें राज्य या जिल्ह्यावर सन १८१५ पर्यंत होतें. त्यानंतर हा जिल्हा ब्रिटिश अमलाखालीं गेला.

येथें हिंदू शेंकडा ९९ आहेत. कुमाऊनी पहाडी भाषा येथें बोलली जाते. येथील डोंगराळ भागांत म्हणजे सुमारे ३००० ते ५००० फूट उंचीच्या प्रदेशांत पिकांची लागवड होणें कठिण जातें. भात, गहूं, मका यांसारखीं पिकें होतात. सुमारें २१०० एकर जमिनींत चहा होतो. डोंगराळ भागांमुळें मेंढ्या व बकरींहि येथें बऱ्याच प्रमाणांत पाळलीं जातात.

तांबें, ग्राफाइट, लोखंड, शिसें व गंधक या येथील खनिज धातू होत. डोंगराळ भागामुळें येथें रेल्वे जवळजवळ नाहींतच. वसूल ७०,०००. या जिल्ह्याची लोकसंख्या ६८७२८६ आहे.

शहर— हें अलमोरा जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण. सोळाव्या शतकांत अलमोरा जिल्ह्यावर राज्य करणाऱ्या चंद राजांची अलमोरा ही राजधानी होती. गुरखा फौजेचें हें एक ठाणें आहे. येथून धान्य, कापड, साखर व मीठ, इत्यादि पदार्थांचा व्यापार चालतो. अलमोरा जिल्ह्याच्या सरकारी कचेऱ्या येथेंच आहेत. रुग्णाइतांसाठीं येथें ५–६ रुग्णालयें आहेत. लो. सं. सुमारें दहा हजार.

**अलवार संस्थान**— राजपुतान्यांतील एक संस्थान. या संस्थानांत एकंदर खेडीं व शहरें यांची संख्या १७६२ इतकी आहे. बारा तहाशिली व एक जहागीर असे या संस्थानचे तेरा भाग आहेत. अलवार व राजगड हीं या संस्थानांतील दोन मोठीं शहरें होत. या संस्थानचें क्षेत्रफळ सुमारें ३१२७ चौरस मैल असून यांतील उत्तरेचा व पूर्वेचा भाग वगळल्यास बाकीचा प्रदेश डोंगराळ असलेला दिसून येतो. या भागांत शिस्ट व स्लेट जातीचा दगड, तांबें व शिसें यांच्या खाणी आहेत. संस्थानची हवा कोरडी व निरोगी आहे. पावसाचें प्रमाण वर्षास सरासरी २२ इंच इतकें असतें. येथील जमिनींत बाजरी, ज्वार, हरभरा, कापूस, गहूं, मका, तंबाखू, ऊंस, वगैरे पिकें होतात. येथें हिंदू, मुसलमान, जाट, रजपूत, गुजर, वगैरे अनेक धर्मांचे व जातींचे लोक दिसून येतात. रजपुतांतील कच्छवाह या जातीपैकीं नरूक या पोट-जातीच्या लालावत शाखेपैकीं हें अलवारचें राजघराणें होय. अंबर येथें चवदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत राज्य करणाऱ्या उदयकरण नांवाच्या राजाचा वडील पुत्र जो बारसिंग तो या अलवार घराण्याचा मूळपुरुष. या संस्थानचें उत्पन्न जवळजवळ अडतीस लाखांचें आहे. राजपुतान्यांतील हें बाराव्या क्रमांकाचें संस्थान होय. लो. सं. ८२३०५५. एक कॉलेज, तीन हायस्कुलें, २२१ प्राथमिक शाळा आहेत. तीन मोठीं रुग्णालयें व १८ दवाखाने सरकारी आहेत. हें संस्थान् आतां मत्स्य संघांत सामील झालें आहे.

अलवार शहर—अलवार शहर हें अलवार संस्थानची राजधानी असून दिल्लीच्या नैर्ऋत्येस अठ्याण्णव मैलांवर येतें. राजपुताना–माळवा रेल्वेवरील हें एक स्टेशन आहे. अलपूर, अरवलपूर किंवा अरवली शहर या नांवांनींहि हें शहर प्रसिद्ध आहे. लो. सं. सुमारें ५०,०००. कापड विणणें, पगड्या रंगविणें, बांगड्या व बाटल्या तयार करणें हे येथील मुख्य धंदे होत. येथें प्रेक्षणीय अशीं बरींच स्थळें आढळून येतात. महाराव राजा बन्निसिंग यांनीं बांधलेला राजवाडा व सिलिसेर नामक तलाव, महाराव राजा बखतावरसिंग यांची छत्री, इ. स. १३९३ मध्यें तरंग सुलतानाच्या स्मरणार्थ बांधलेलें जुनें थडगें हीं ठिकाणें जरूर पाहण्याजोगीं आहेत. सध्यांचे महाराज तेजसिंघजी बहादूर हे १९३७ सालीं गादीवर आले. यांचे वडील जयसिंघजी हे चांगले खेळाडू व मुत्सद्दीहि होते. त्यांचें नरेंद्रमंडळांत वजन असे.

**अलसानी पेद्दन्न** ( मृ. १६३५ )—एक तेलगू ग्रंथकार व 'स्वारोचिषमनुचरित्र' या काव्याचा कर्ता. अगदीं लहान वयांतच यानें संस्कृत व तेलगू भाषांवर प्रभुत्व संपादन करून काव्यें लिहिण्यास सुरुवात केली. यानंतर यांस नरसिंह रायलू याच्या दरबारीं आश्रय मिळाला. नरसिंह रायलूच्या पश्चात् त्याचा पुत्र कृष्णदेव रायलू यानेंहि याची अलौकिक काव्यशक्ति जाणून यास शेवटपर्यंत सन्मानानें वागवलें व यास आपल्या दरबारांतील अष्ट दिग्गजांपैकीं एक नेमलें. स्वारोचिषमनुचरित्र या काव्यांत यानें कृष्णदेवरायाच्या पराक्रमाचें वर्णन केलें आहे. या काव्यग्रंथाखेरीज यानें रामस्तुतिपर रामस्त व राजम हा ग्रंथ, तत्त्वज्ञानविषयक अद्वैतसिद्धांतम् हा ग्रंथ, छंदःशास्त्रावर रंगरा छंद हा ग्रंथ व हरिकथासार काव्य इतकें लिखाण केलें आहे असें म्हणतात. मधुर काव्याबद्दल हा कवि अतिशय प्रसिद्ध आहे. यानें आपल्या तेलगू काव्यांत बऱ्याच मुसलमानी शब्दांचा प्रयोग केलेला दिसून येतो. जन्मानें जरी हा स्मार्त होता तरी विचारानें हा अद्वैतमतवादी होता. या कवीइतका मान तेलगू भाषेंतील फारच थोड्या कवींच्या वांट्यास आलेला आहे.

**अलसेस लोरेन**—फ्रान्स व जर्मनी यांच्या सरहद्दीवरील हा प्रांत असून त्यापैकीं लोरेनचा विभाग म्हणजे एक उंच पठार असून त्यांत खनिज मीठ, दगडी कोळसा व लोखंड यांच्या खाणी आहेत. याशिवाय या पठाराच्या उतारावर बटाटे, बीट यांसारखीं पिकें काढतात. विशेषतः पूर्वेकडील भाग जास्त सुपीक असून तो

ऱ्हाइनच्या कांठापर्यंत येतो. पश्चिम अलसेसमधील व्होलजिस पर्वत ही जर्मनी व फ्रान्स यांची नैसर्गिक सरहद्द होय. क्षे. फ. ५६०५ चौ. मै., लो. सं. १९,१५,६२७.

स्ट्रासबुर्ग हें या प्रांतांतील महत्त्वाचें शहर असून तेथील प्रार्थना-मंदिर तेराव्या शतकापासून आहे. या शहरावरून फ्रान्स, जर्मनी व स्वित्झरलंड या देशांत रस्ते जात असल्या-कारणानें त्याला मोक्याची जागा म्हणून फार महत्त्व आहे. इले नदीपासून ऱ्हाइनपर्यंतच्या दोन मैलांच्या दुआबांतील प्रदे-शांत स्ट्रॅसबुर्गचा बंदर भाग असून त्यांतून फार मोठ्या प्रमाणांत जहाजांची वाहतूक चालते. १८७१ सालीं हें जर्मनीनें घेतलें होतें. तें १९१९ सालीं फ्रान्सला परत मिळालें.

**अलाबास्टर**—हें नांव दोन प्रकारच्या खनिज द्रव्यांस दिलें जातें. त्यांपैकीं एक जिप्समची जात असून दुसरें चुन्याचें कर्बित (कार्बोनेट ऑफ लाइम) आहे. हें पांढरें असून इतकें मऊ असतें कीं, त्यावर सहज नखानें ओरखडा काढतां येतो. याचाच एक प्रकार पूर्वेकडील देशांत आढळतो तोहि चुन्याचें कर्बितच आहे. व त्यानेंहि गुणधर्म यासारखेच असतात. याचा उपयोग इमारतीच्या आंतील बाजूस नाजूक नक्षीकाम करण्या-करितां करतात. तसेंच याचीं पात्रें, पुतळे व शोभिवंत वस्तू तयार करतात. याच्याच एका अशुद्ध जातीपासून प्लॅस्टर ऑफ पॅरिस तयार करतात. याची उत्तम जात टस्कनी प्रांतांत आढळते व इतर सर्व युरोपांत सामान्यतः हें आढळतें.

**अलास्का**— उत्तर अमेरिकेच्या वायव्य टोंकाचा विस्तीर्ण प्रदेश. हा रशियापासून अमेरिकेनें १८६७ मध्यें विकत घेतला. यांत आसपासच्या पुष्कळ बेटांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ५,८६,४०० चौरस मैल. लो. सं. ७२,५२४. बहुतेक प्रदेश डोंगराळ व थंड आहे. युकॉन ही मुख्य नदी आहे. ज्यूनो हें राजधानीचें ठिकाण आहे. हा प्रदेश एका गव्हर्नरच्या अमला-खालीं आहे व तो कायदेमंडळाच्या सल्ल्यानें कारभार चालवतो. मच्छीमारी व शिकार हे प्रमुख धंदे आहेत. कांहीं जमीन शेती-खालींहि आहे. पुष्कळ भागांत जंगलें आहेत. सोनें, कोळसा, वगैरेंच्या खाणी आहेत. अलास्का हा कानडाला लागून असलेला प्रदेश असून यांच्या दरम्यान सरहद्दीबद्दल झगडा होता तो १९०३ सालीं एक कमिशन नेमून त्वाद-निर्णयानें मिटवण्यांत आला. फेअरबँक शहराजवळ विद्यापीठ आहे.

**अलाहाबाद**—संयुक्त प्रांत एक विभाग, जिल्हा व शहर. या विभागांत ५१ गांवें व १०९५० खेडीं असून याचें क्षेत्रफळ १७२७० चौरस मैल आहे. फरुकाबाद, इटावा, कानपूर, फत्तेपूर व अलाहाबाद हे या विभागाचे जिल्हे असून अलाहाबाद हें मुख्य ठिकाण आहे. कानपूर, अलाहाबाद, झांशी व बांदा हीं या विभागांतील मुख्य शहरें असून कानपूर या शहरास व्यापारीदृष्ट्या फार महत्त्व आहे.

संयुक्त प्रांतांतील हा जिल्हा, अलाहाबाद, सिराथू, मंझनपूर, सोरान, फुलपूर, हंडिआ, करछना, बार व मेजा अशा नऊ तहशिलींचा बनलेला असून यांत एकूण ३४७३ खेडीं व १३ गांवें आहेत. याचें क्षेत्रफळ २८११ चौरस मैल असून लो. सं. १८१२३८१ आहे. हा प्रदेश गंगा व यमुना या नद्यां-मुळें सुपीक बनलेला आहे. ज्वारी, बाजरी, साळू, गहूं व गळिताचीं धान्यें हीं येथील मुख्य पिकें होत. सँडस्टोन व कंकर हे या जिल्ह्यांतील खनिज पदार्थ होत.

पांडवांनीं वनवासांतील आपलें वास्तव्य याच प्रदेशांत कांहीं दिवस ठेवलें होतें असें म्हणतात. हा प्रदेश त्या वेळीं वारणावत या नांवानें ओळखला जात असे. चवथ्या व पांचव्या शतकांत या प्रदेशावर मगधाच्या गुप्त घराण्यांतील राजांची सत्ता होती. त्यानंतर सातव्या शतकांत कनोजचा राजा हर्षवर्धन हा या राज्याचा अधिपति होता. यानंतर इ. स. ११९४ पासून या प्रांतावर मुसलमानी अमल सुरू झाला तो इंग्रजांची सत्ता या प्रांतावर येईपर्यंत कायम होता.

या जिल्ह्यांत अशोककालीन जुन्या वस्तू, स्तंभ व जुने शिला-लेख बऱ्याच प्रमाणांत उपलब्ध झालेले आहेत.

तहशील— हा अलाहाबाद जिल्ह्यांतील २८६ चौरस मैल क्षेत्रफळाचा तहशील असून यांत ३०८ खेडीं व दोन गांवें आहेत. या तहशिलींतील दोन-तृतीयांश जमिनींतील पिकें विहिरींच्या पाण्यावर होतात.

शहर (प्रयाग)—अलाहाबाद जिल्ह्याचें हें मुख्य शहर यमुने-च्या डाव्या तीरावर वसलें असून येथें गंगा व यमुना या नद्यांचा मनोहर संगम झाला आहे. त्यामुळें या शहराला तीर्थाचें स्वरूप आलें असून हें पवित्र स्थान मानलें जातें. संयुक्त प्रांताच्या सरकारी कचेऱ्या येथेंच असतात. लो. सं. २६०६३० (१९४१).

सन १८०१ सालीं या शहराचा ताबा ब्रिटिशांकडे आला. सन १८५७ मध्यें झालेल्या बंडांत एका मौलवीच्या आधिपत्या-खालीं येथील सैन्यानें बंडांत भाग घेऊन हें शहर लुटलें.

येथें दरवर्षी माघ-मेळा, दर सहा वर्षांनीं अर्धकुंभ-मेळा व बारा वर्षांनीं कुंभ मेळा भरतो. या वेळीं लाखों यात्रेकरू येथें स्नानास येतात.

ईस्ट इंडियन रेल्वेचें हें एक जंक्शन असून येथून धान्य व गळिताचीं धान्यें निर्यात होतात व धान्य, साखर, सूत, वगैरे मालाची आयात होते. येथील यमुनेवरील पूल ३२३५ फूट लांबीचा आहे.

येथील अलाहाबाद विश्वविद्यालय हें सुप्रसिद्ध असून यांखेरीज अनेक शैक्षणिक संस्था येथें कार्य करीत आहेत. हिंदी भाषेचें हें केंद्रस्थान आहे. प्रयाग पाहा.

**अलाहाबाद**—पंजाब. या नांवाची तहशील भावलपूर संस्थान व निझामत यांमध्यें असून तिचें क्षेत्रफळ १३५५ चौरस मैल आहे. हा प्रदेश सुपीक असून यांत खानबेला व जानपूर हीं दोन गांवें व ६५ खेडीं आहेत. अलाहाबाद हें मुख्य ठिकाण भावलपुरचा नबाब सादिक अहमदखान (पहिला) यानें सन १६६० मध्यें वसवलें. भावलपूर गांवाच्या नैॠत्येस ५६ मैलावर असलेला हा गांव तांदूळ व खजूर यांच्या व्यापारां-बद्दल प्रसिद्ध आहे.

**अलिखित कायदा**—न्यायकोर्टांत दोन प्रकारच्या कायद्या-न्वयें दावे चालतात. एक सरकारी कायदा उर्फ लिखित, म्हणजे सरकारनें पास करून कायदेबुकांत नमूद केलेला कायदा (रिटन ऑर स्टॅटयूट लॉ); आणि दुसरा अलिखित कायदा, म्हणजे सरकारनें पास न केलेला कायदा (अन्-रिटन् लॉ). अशा अलिखित कायद्याला इंग्लंडमध्यें 'कॉमन लॉ' म्हणतात. अशा कॉमन लॉमध्यें अनादि कालापासून चालत आलेल्या आणि सामान्यतः सर्वांनीं मान्य केलेल्या रूढींचा समावेश होतो, शिवाय बायबल ग्रंथाच्या जुन्या करारांतील (ओल्ड टेस्टॅमेंट) कायद्यांचा आणि चर्चमधील अधिकाऱ्यांनीं केलेल्या धार्मिक कायद्यांचा त्यांत अंतर्भाव होतो; शिवाय व्यापारी लोकांचे व्यावहारिक नियम व रीतरिवाज तसेंच दर्यावर्दी लोकांचे व्यवहारांतील नियम व रीतिरिवाज यांचीहि गणना कॉमन लॉंतच होते. वरील प्रकारचे नियम, तत्त्वें आणि रूढी कायदे-कोर्टांत मान्य करून त्याप्रमाणें निवाडे देण्यांत येतात. मात्र असा नियम आहे कीं, सरकारनें केलेल्या (स्टॅटयूट लॉ) कायद्याच्या विरुद्ध अलिखित कायदा (कॉमन लॉ) असेल तर कॉमन लॉ न मानतां कोर्टानें सरकारी कायद्याप्रमाणें निर्णय द्यावा. पूर्वी इंग्लडांत कोर्ट ऑफ चॅन्सरी आणि कोर्ट ऑफ कॉमन लॉ हीं दोन पृथक् असत. पण १८५३ सालीं 'हायकोर्ट ऑफ जस्टिस'मध्यें ह्या दोघांचा अंतर्भाव करण्यांत आला. ब्रिटिश अमदानीपूर्वीं हिंदू, मुसलमान, पारशी, यांचे कायदे कोणत्याहि राजानें किंवा सरकारनें पास करून लागू केलेले नसून त्या त्या धर्मांतील पूर्वींच्या थोर विद्वान् धर्मशास्त्रज्ञांनीं केले असून राजे त्यांचा अमल करीत असत. यावरून पाहतां वरील व्याख्येप्रमाणें सदरहू कायदे 'अलिखित कायदा' या सदरांत जातात. ब्रिटिश अमदानींत कायदेमंडळें स्थापन झाल्यापासून पारशी व ख्रिस्ती समाजाकरितां सरकारनें कायदे केले. हिंदु लॉ व महॉमेडन लॉ मात्र पूर्वींचाच चालू ठेवला आहे. मात्र कांहीं विशिष्ट बाबींत-हिंदु गेन्स ऑफ लर्निंग ॲक्ट १९३०, वगैरे कायदे केले असून आतां सर्वच 'हिंदु लॉ' कोड तयार होऊन कायदेमंडळांत मान्य होणार आहे.

**अली** (६०२–६६१)—हा महंमद पैगंबरांचा पुतण्या व जांवई होय. पैगंबराची मुलगी फतिमा हिच्याबरोबर अलीचा विवाह झाला. परंतु महंमद पैगंबर ६३२ मध्यें मरण पावल्यानंतर खलीफा होण्याचा याचा हक्क नाकारण्यांत येऊन अबूबकर, उमर आणि उस्मान यांना एकामागून एक खलीफा नेमण्यांत आलें. ६५६ मध्यें उस्मानचा खून झाल्यावर अली खलीफा झाला; पण त्याला त्याच्या अनेक प्रतिस्पर्ध्यांशीं सारखे झगडे करावे लागले व त्यांतच त्याचा अखेर खून झाला. याच्या मरणानंतर इस्लाम धर्मांत दोन–शिया व सुनी हे–पंथ उत्पन्न झाले.

**अली आदिलशहा**-पहिला (१५५०–१५८०)—विजापूर-च्या आदिलशाही घराण्यांतील हा पांचवा राजा इब्राहिम आदिल-शहाचा पुत्र असून विद्वान्, न्यायी, दयाशील व गुणी लोकांचा चहाता असा होऊन गेला. आपल्या बापाच्या मृत्यूनंतर हा गादीवर आला. शिया पंथाकडे याचा ओढा असल्यानें इब्राहिम आदिलशहाची याजवर गैरमर्जी होती व त्यामुळें कांहीं दिवस यास मिरजेच्या किल्ल्यांत काढावे लागले. गादीवर येतांच यानें शिया पंथाचा जाहीर पुरस्कार केला. याच्या बापाच्या कारकीर्दींत हुसेन निजामशहानें कल्याणी व सोलापूर हे किल्ले काबीज केले होते, ते परत मिळविण्यासाठीं यानें विजयनगरच्या रामराजाशीं सख्य करून हुसेन निजामशहावर स्वारी केली; व कल्याणी व सोलापूर हे किल्ले परत मिळविले. या स्वारींतच विजयनगरच्या हिंदूंनीं मुसलमानांबरोबर मग्रूरीनें वागण्यास सुरवात केली. आदिलशहास आपल्या मदतीमुळेंच विजय मिळाला या भावनेनेंच जणुं रामराजा वागूं लागला. रामराजाच्या या वागण्यामुळें आपल्या सत्तेला धोका निर्माण झाला आहे असें दिसतांच अलीनें इब्राहिम कुतुबशहाशीं व अहमदनगरच्या हुसेन निजामशहाशीं तहाचीं बोलणीं केलीं व या सर्वांनीं मिळून विजयनगरच्या रामराजावर स्वारी केली. मुसलमान सैन्याची व विजयनगरच्या सैन्याची तालिकोट येथें लढाई होऊन तींत रामराजा मारला गेला. यानंतर मुसल-मानांनीं विजयनगरच्या राज्यांत शिरून तेथील सर्व वैभव उध्वस्त करून टाकलें.

आपल्या कारकीर्दींत अलीनें गोव्यावर व कर्नाटकावरहि स्वाऱ्या केल्या.

राज्यवृद्धीबरोबरच यानें लोकहिताच्याहि अनेक गोष्टी केल्या. याच्या कारकीर्दींत झालेल्या चांगल्या इमारतींमध्यें जुम्मा मशीद

ही इमारत चिरस्मरणीय अशी झाली आहे. याखेरीज शहराभोंवतालचा मजबूत तट, रस्तोरस्तीं पाण्याचे नळ आणून पाण्याची व्यवस्था यांसारखीं कामेंहि यानें केलीं. कोणतेंहि दान देतांना हा हिंदु-मुसलमान असा भेदभाव बाळगत नसे.

बेदरच्या दरबारांतून एका खोजास यानें जुलमानें धरून आणलें होतें. त्या खोजानें सन १५८० मध्यें यास ठार केलें. रोझाअली नांवाची याची कबर विजापुरास आहे.

दुसरा ( १६५७-१६७२ ) — हा महंमद आदिलशहाचा मुलगा. याच्या बापानें याला लहानपणींच चांगली विद्या शिकविली होती. त्यामुळें हा चांगला विद्वान् व विद्येचा पुरस्कर्ता निघाला. याला आपल्या अमदानींत शिवाजीशीं व मोंगलांशीं टकरा द्याव्या लागल्या. त्यानें मोंगलांना थोपवून धरलें होतें. पण शिवाजीनें अफझलखान, सलाबतखान, इ. विजापूरच्या सरदारांना दाद दिली नाहीं. याच्या दरबारांत सरदारांमध्यें जीं वैमनस्यें होतीं तीं याच्या दराऱ्यामुळें दबलीं होतीं. हा फार विषयी असे. तथापि राज्यकारभारांत दक्ष होता.

**अली इमाम, सर सय्यद** ( १८६९-१९३२ ) — एक हिंदी राष्ट्रीय पुढारी. १८९० सालीं ते बॅरिस्टर झाले. कलकत्ता हायकोर्टाचे ते स्टँडिंग कौन्सिलर होते. १९०८ सालीं अमृतसर येथें भरलेल्या अ. भा. मुस्लिम लीगचे ते अध्यक्ष होते व १९०९ सालीं इंग्लंडांत गेलेल्या मुस्लिम शिष्टमंडळाचे ते सभासद होते. ते गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलचे १९१० ते १९१६ या काळांत कायद्याचे सभासद होते. नंतर त्यांची १९१७ सालीं पाटणा हायकोर्टाचे न्यायाधीश म्हणून नेमणूक झाली. १९१८ सालीं ते बिहार-ओरिसा प्रांताच्या कार्यकारी कौन्सिलचे सभासद नेमले गेले. तेथून त्यांची १९१९ सालीं निझाम सरकारच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष म्हणून हैदराबाद येथें नेमणूक झाली. १९२० सालीं लीग ऑफ नेशन्सची जी पहिली सभा झाली तिला हे पहिलेच हिंदी प्रतिनिधि म्हणून पाठविले गेले होते. दुसऱ्या राउंडटेबल कॉन्फरन्सला हे गेले होते. राष्ट्रीय मुसलमान पक्षाचे ते अध्वर्यू होते.

**अलीगंज** — संयुक्त प्रांतांतील ही तहशील अझमनगर, बर्ना, पातियाळी व निधपूर या परगण्यांची बनलेली आहे. हिचें क्षेत्रफळ ५२९ चौरस मैल असून हींत ५ शहरें व ४०८ खेडीं आहेत. तहशिलीचें मुख्य ठिकाण अलीगंज हें होय. अतिवृष्टीमुळें येथील जमीनीचें फार नुकसान होतें. तहशिलीच्या उत्तरेस गंगा नदी व दक्षिणेस काळी नदी वाहते.

अलीगंज — तहशिलीचें मुख्य ठिकाण. फरुकाबादच्या नबाबाच्या पदरीं असलेल्या एका खोजानें हा गांव वसवला. या खोजाचें थडगेंहि येथेंच आहे. येथील हा गांव इटा या गांवाच्या पूर्वेस चौतीस मैलांवर येतो. येथील व्यापार दर्यागंज या स्टेशनांतून चालतो.

**अलीगड** — १. राजपुताना, टोंकसंस्थान. अलीगड जिल्ह्याचें हें मुख्य ठिकाण टोंक शहराच्या आग्नेयीस चोवीस मैलांवर आहे. इ. स. १६४४ सालीं या गांवाची स्थापना बसंतराय नामक एका पुरुषानें केली. प्रथम राठोड रजपूत रामसिंग याच्या नांवावरून या गांवास रामपुरा असें म्हणत असत. परंतु पुढें इंग्रजांनीं हा प्रदेश पेंढारी अमीरखान यास बहाल केल्यावर अमीरखान यानें या गांवास अलीगड असें नांव ठेवलें.

२. संयुक्त प्रांतापैकीं आग्रा विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १९४६ चौरस मैल आहे. यांत अत्रौली, अलीगड, इग्लास, हाथ्रस, खैर व सिकंद्रराव अशा सहा तहशिली असून २३ गांवें व १७५३ खेडीं आहेत. लो. सं. १३७२६४१. या जिल्ह्यांतून उत्तर गंगेचा कालवा जातो. त्याच्या पाण्यावर गहूं, सातू, मका, ज्वारी, हरभरा व कापूस, वगैरे पिकें काढलीं जातात. गंगा व यमुना या नद्यांच्या आसपासच्या तीरांवरील जो प्रदेश या जिल्ह्यांत मोडतो तो 'खादर' या नांवानें प्रसिद्ध आहे. गंगा-खादर सुपीक असून यमुना-खादरवर खुरटें जंगल दिसून येतें. येथें सरासरी २६ इंच पाऊस पडतो. काली नदी, नीम नदी, खोइआ नदी या तीन नद्या या जिल्ह्यांतून वाहतात.

चंद्रवंशांतील कोशारव नांवाच्या क्षत्रिय राजानें हें अलीगड वसवलें असें सांगतात. अलीगडचा किल्ला व स्टेशन हा भाग प्राचीन काळीं कोईल नामक शहरांत मोडत असे. बळरामानें कोल नामक राक्षसाचा येथें वध केला म्हणून या शहरास कोईल असें म्हणूं लागले.

यानंतर मुसलमानांच्या स्वाऱ्या या भागावर इ. स. ११९४ पासून सुरू झाल्या. मथुरा आणि आग्रा ते दिल्ली आणि रोहिलखंड या रस्त्यांच्या नाक्यांवरील हें ठिकाण असल्यानें लष्करीदृष्ट्या यास महत्त्व होतें व म्हणून यासाठीं सुरजमल जाट, अफगाण, नजीबखान रोहिला, व होळकर, शिंदे, वगैरे मराठे हे लढले. सन १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाचा वणवा या भागावरहि पसरून त्या वेळीं बंडखोर या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या लोकांचें हें एक ठाणें होऊन राहिलें होतें.

बौद्ध व हिंदु कालांतील प्राचीन अवशेष येथें अजून सांपडतात. या भागांतील सिकंद्रराव तहशिलींत सोरा व कांच तयार केली जाते. या जिल्ह्याचा व्यापार कानपूर, मुंबई व कलकत्ता या शहरांशीं चालतो.

अलीगड तहशिलींत तीन गांवें व ३४२ खेडीं आहेत. क्षेत्रफळ ३५८ चौरस मैल आहे. तहशिलीच्या पूर्व

नदी वाहते. त्यामुळें हा प्रदेश अतिशय सुपीक असा आहे. शहराचें जुनें नांव कोईल किंवा कोल असें असून हें अलीगड जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. औध-रोहिलखंड रेल्वे व ईस्ट इंडियन रेल्वे यांचें हें जंक्शन असून येथून धान्य, नीळ, किरकोळ भांडीं, वाळलेलें मांस, वगैरे पदार्थ निर्यात होतात. जिनिंगचे व कुलुपें करण्याचे कारखानेहि येथें बरेच आहेत. किल्ला गांवापासून दोन मैलांवर आहे.

येथील अलीगड मुस्लिम युनिव्हर्सिटीमुळें हें शहर एक शैक्षणिक केन्द्र म्हणून मान्यता पावलेलें आहे. ब्रह्मदेश, सोमाली लँड, युगांडा, मॉरिशस, वगैरेकडचे विद्यार्थी शिक्षणासाठीं येथें येतात. अलीगड युनिव्हर्सिटीची स्थापना सन १९२० मध्यें झाली. लो. सं. ११२६५५ ( १९४१ ).

**अली पाशा** (१७४१–१८२२) — या पराक्रमी पुरुषानें अल्बेनिआ प्रांताचा बराच भाग हस्तगत केला आणि स्वतःला पाशा ही पदवी मिळविली. स्वतःचें स्वतंत्र राज्य स्थापण्याकरितां त्यानें इंग्लंड, फ्रान्स व रशिया यांच्याबरोबर एकामागून एक कारस्थान केलें, पण तें सिद्धीस न जातां १८२० मध्यें त्याला पदच्युत करण्यांत आलें व त्याच्या जागीं नेमलेले जे दुसरे पाशा एकामागून एक त्याच्यावर चालून गेले, त्यांचा त्यानें यशस्वी प्रतिकार केला. पण अखेर १८२२ मध्यें त्याला शरण जाणें भाग पडलें. त्या वेळच्या पाशानें अलीला जिवंत ठेवण्याचें व त्याची मालमत्ता जप्त न करण्याचें आश्वासन दिलें; पण अली शरण येऊन हस्तगत झाल्यावर त्याला ठार मारण्यांत येऊन त्याचें मुंडकें कापून कॉन्स्टाँटिनोपल येथें नेण्यांत आलें. याप्रमाणें विश्वासघातानें त्याचा अंत झाला.

**अलीपुरा**— मध्य हिंदुस्थानांतील बुंदेलखंड एजन्सींतील एक लहानसें संस्थान. हें जी. आय. पी. रेल्वेच्या झांशी–माणिकपूर शाखेच्या हरपालपूर स्टेशनपासून नऊ मैल अंतरावर आहे. या संस्थानचें क्षेत्रफळ ७३ चौरस मैल असून यांत एकंदर २७ खेडीं आहेत. लो. सं. १७७३५. येथील संस्थानिक रजपूत असून तो अग्निकुलापैकीं परिहार वंशाचा आहे असें सांगतात. यास 'राव' हा वंशपरंपरागत किताब आहे. हें संस्थान आतां विंध्य प्रदेश संघांत सामील झालें आहे.

**अलीपूर**—बंगालमधील चोवीस परगणे जिल्ह्यांतील हा एक महाल असून यांत दक्षिण उपनगरें ( साउथ सबर्ब्स ) तोलीगंज, राजपूर, बारुइपूर, जयनगर व बजबज अशीं सहा शहरें आहेत. या महालाचें क्षेत्रफळ ११६४ चौरस मैल असून यापैकीं ४५० चौरस मैल सुंदरबनानें व्यापलेला आहे. अलीपूर नांवाचे दोन पोटविभाग असून दुसरा पोटविभाग राजशाही विभागांतील जलपैगुरी जिल्ह्याच्या पूर्वेकडे येतो. हाहि एक महालच असून ११४२ चौरस मैल इतक्या क्षेत्रफळाचा आहे. यांत एक शहर व १८० खेडीं यांचा अंतर्भाव होतो. या महालांत चहाची लागवड मोठी असल्यानें येथील वस्तीहि वाढत आहे.

अलीपूर शहर— चोवीस परगणा जिल्ह्याचें हें मुख्य ठाणें असून येथें सैन्याची एक तुकडी व जिल्ह्याच्या सर्व कचेऱ्या असतात. हा गांव कलकत्त्याच्या दक्षिण भागांत मोडत असल्यानें कलकत्ता म्युनिसिपालिटीच्या कक्षेंत मोडतो. सन १९०८ सालीं इंग्रजांची सत्ता धुळीस मिळवण्यासाठीं येथें एक कट करण्यांत आला होता.

**अलीबहाद्दर** ( १७६०–१८०२ )—पेशवाईतील एक सरदार. अलीबहाद्दर उर्फ कृष्णसिंग हा बाजीरावाचा पुत्र समशेर बहाद्दर यास त्याच्या मेहेरबाई नामक पत्नीपासून झालेला पुत्र असून शौर्य व पराक्रम या गुणांत हा आपल्या बापापेक्षांहि सवाई ठरला. उत्तर हिंदुस्थानांत महादजी शिंद्याचें वर्चस्व फार माजत चाललें असल्याचें दिसून आल्यानें त्यास शह देण्यासाठीं कदाचित् नाना फडणिसानें यास सन १७८८ मध्यें तिकडे महादजीस मदत करण्याच्या मिषानें पाठवलें असेल. यानें आपल्या पराक्रमानें बुंदेलखंडांत पाऊण कोटीचा मुलूख काबीज केला. यानें सन १७८८ सालीं राणेखानास गुलाम कादरच्या छळापासून बादशहाची मुक्तता करण्याच्या कामीं अमोल साहाय्य दिलें. याच वर्षी शिंद्यांच्या अटकेंत असलेला हिंमतबहाद्दर नांवाचा एक गोसावी जातीचा लष्करी अधिकारी शिंद्याकडून पळून अलीबहाद्दराकडे आश्रयार्थ आला. यानें त्यास आश्रय देऊन, नाना फडणविसाकडून त्याजबद्दल पत्र येण्यापूर्वींच त्यास गुप्तपणें सोडून दिलें. हिम्मतबहाद्दराच्या साहाय्यानें पुढें यानें बुंदेलखंडांतील पेशव्यांचा गेलेला मुलूख परत मिळवला व अधिकाचीहि त्यांत भर टाकली. पेशव्यांची सार्वभौम सत्ता यास मान्य होती. नाना फडणविसाच्या परवानगीनें यानें पुण्याहून लोक नेऊन सागरच्या ईशान्येस बांदा येथें आपलें वास्तव्य केलें. सन १७८८ मध्यें या जहागिरीची स्थापना झाली. अलीबहाद्दर हा कलिंजरचा किल्ला घेत असतां १८०२ मध्यें मारला गेला. अलीबहाद्दरास समशेरबहाद्दर व झुल्फिकारअली असे पुत्र होते.

**अलीबाग**—मुंबई, कुलाबा जिल्ह्याच्या वायव्येकडे असलेल्या या तालुक्यांत तीन गांवें व १७७ खेडीं समाविष्ट झालेलीं आहेत. याचें क्षेत्रफळ १९३ चौरस मैल आहे. लो. सं. ९७,६३४. या तालुक्यांत खारी जमीन असून उष्णतामानाच्या बाबतींत इतर तालुक्यांच्या मानानें या तालुक्याचा क्रम बराच वरचा लागतो.

अलीबाग हें तालुक्याचें मुख्य ठिकाण. कुलाबा जिल्ह्याचेंहि मुख्य ठिकाण हेंच आहे. हें मुंबईच्या दक्षिणेस समुद्रकांठीं एकोणीस मैलांवर आहे.

सतराव्या शतकाच्या अखेरीस आंग्र्यांनीं या गांवाची स्थापना केली. त्यापूर्वी अली नांवाच्या एका श्रीमान् मुसलमानाच्या या जागीं विहिरी व बागा होत्या. त्यावरून या गांवास अलीबाग हें नांव पडलें. आंग्रे यांचें मुख्य ठाणें असलेलें हें ठिकाण सन १८४० पासून कुलाबा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बनलें. येथील सुप्रसिद्ध किल्ला किनाऱ्यापासून सुमारें एक फर्लांग आंत समुद्रांत असून त्याची दक्षिणोत्तर लांबी सुमारें ९०० फूट व पूर्वपश्चिम रुंदी ३५० फूट आहे. किल्ल्याच्या आंत गणपतीचें देऊळ, पद्मावतीची समाधि, तळघर व आंग्रे यांचा जुना वाडा आहे. याच किल्ल्यापासून दोन मैल अंतरावर नैऋत्येच्या बाजूस अदमासें साठ फूट उंचीचा दगडी मनोरा समुद्रांत उभारलेला दिसतो. हा मनोरा खडकावर उभारलेला असून गलबतांना दिशा दाखवण्याकडे व या खडकापासून जहाजांना वांचवण्याकडे या मनोऱ्याचा उपयोग होतो. अलीबाग गांवाच्या पूर्वेस सागरगड हा किल्ला असून डोंगरावर कनकेश्वर हें एक देवस्थान आहे. येथें एक हायस्कूल व जिल्ह्याच्या मुख्य सरकारी कचेऱ्या आहेत. मुंबई वेधशाळेची लोहचुंबक शाखाहि या ठिकाणीं आहे. दि रॉयल अलीबाग वॉटर वर्क्स हा येथील एक गोड्या पाण्याचा तलाव असून नदीस धरण बांधून हा तलाव तयार करण्यांत आला आहे.

**अलीमर्दानखान** ( मृ. १६५७ )—एक मुसलमान मुत्सद्दी मनसबदार. हा शहाजहान बादशहाच्या पदरीं होता व त्याला इराण आणि मध्य आशिया या भागांतील राजकारणांत मदत करी. हा काश्मीरचा व पंजाब प्रांताचा सुभेदारहि होता. यानें बरींच लोकोपयोगी कृत्यें केलीं. त्यांपैकीं एक म्हणजे रावी नदीचे कालवे दिल्ली व लाहोर शहरांस नेणें. या कालव्यांस त्याचें नांव अद्यापि आहे. याची कबर लाहोरास आहे.

**अलीराजपूर संस्थान**—मध्य हिंदुस्थानांतील एक संस्थान. याचें क्षेत्रफळ ८२६ चौरस मैल असून यांत ३०७ खेडीं समाविष्ट झालेलीं आहेत. लो. सं. ११२७५४. येथील जमिनींत सुपीकता फारच कमी दिसते. शिवाय येथील भिल्ल लोकांमध्यें शेती करण्याची वृत्ति कमी असल्यानें बरीचशी जमीन पडून आहे. हा प्रदेश डोंगरावर असून उन्हाळा व हिंवाळा हे दोन्ही ऋतू कडक असतात. येथें सुमारें ३५ इंच पाऊस पडत असून जंगल बरेंच आहे.

भाभ्रा, राठ, नानपूर, छकताल व चांदपूर हे संस्थानचे पांच परगणे असून अलीराजपूर हें मुख्य गांव आहे. अली या नांवाचा या संस्थानांत एक किल्ला आहे.

या संस्थानचे अधिपति मूळचे राणा प्रतापसिंहाच्या वंशांतील होत. या वंशांतील रूपदेव यास संतान नसल्यामुळें या संस्थानची गादी सोंडवा ठाकूर वंशांतील विजयसिंग याजकडे गेली. विजयसिंग सन १८९० मध्यें मरण पावल्यावर त्याचा चुलतभाऊ प्रतापसिंग हा या गादीवर आला. यास राणा असा किताब होता. आतां मध्य भारत-संघांत हें संस्थान विलीन झालें आहे.

**अलीवर्दीखान** ( मृ. १७५६ )— बंगालचा नबाब. याचें पहिलें नांव महमदअली असें असून अलीवर्दीखान ही पदवी आहे. हा प्रथम बंगालचा पूर्वीचा नबाब सुजाउद्दिनखान याच्या पदरीं एक लहानसा नोकर होता. याची हुषारी पाहून सुजाउद्दिनखानानें याजकडे बहार प्रांताची व्यवस्था पाहण्याचें काम सोंपवलें. तेव्हां यानें बहार प्रांतांत डोईजड झालेल्या राजांची खोड मोडून व पाटणा व मोंगीर यांच्या दरम्यान राहणाऱ्या शूर अशा चकवार नांवाच्या हिंदू लोकांचा निःपात करून आपलें वर्चस्व तेथें स्थापन केलें. याशिवाय दिल्ली दरबारास लांच भरून सुजाउद्दिनखानास नबाबपदावरून खालीं आणण्याचे प्रयत्नहि यानें सुरू केले होते. याच वेळीं सुजाउद्दिनखान एकाएकीं मरण पावला. त्यास अलीवर्दीखानाचा त्याच्या दरबारीं असलेला भाऊ हाजी महंमद यानें ठार मारलें असें म्हणतात. सुजाउद्दिनखानानंतर त्याच जागीं त्याचा पुत्र सर्फराजखान याची नेमणूक झाली, परंतु आपल्या उद्दाम वागणुकीमुळें तो लोकांच्या रोषास पात्र झाला. या संधीचा फायदा घेऊन अलीवर्दीखानानें बंडाची उठावणी करून सर्फराजखानास ठार केलें, त्याची सर्व मालमत्ता दिल्ली दरबारांतील अमीरउमरावांना वांटून टाकून त्यांना खुष केलें व सन १७४० मध्यें बंगाल, बिहार व ओरिसा या तिन्ही प्रांतांत आपली सत्ता प्रस्थापित केली.

यानंतर अलीवर्दीखानास बंगालवर होणाऱ्या रघूजी भोसल्याच्या स्वाऱ्यांस तोंड द्यावें लागलें. परंतु झालेल्या लढाईंत याची मनुष्यहानी होऊन त्यास माघार घेणें भाग पडलें. अशा तऱ्हेनें सन १७४२–१७५१ पर्यंत यास मराठ्यांच्या स्वाऱ्यांना तोंड द्यावें लागल्यानें शेवटीं हा कंटाळला. एकदां भोसल्याचा सेनापति भास्करराम कोल्हटकर याचा यानें विश्वासघातानें खूनहि केला होता ( १७४५ ). यानें रघूजीस उत्तरेस बालासोरपर्यंत कटक प्रांत व बंगाल व बिहार या दोन प्रांतांच्या चौथाईबद्दल दरसाल बारा लक्ष रुपये देण्यानें कबूल केलें.

वयाच्या सत्तराव्या वर्षानंतर आपल्या सर्वांत धाकट्या मुलीचा मुलगा मिर्झा महमूद उर्फ सिराजउद्दौला यास यानें आपला वारस नेमला व राज्यकारभाराची धुरा त्याजवर सोंपवली. बंगाल, बहार व ओरिसा या तीन प्रांतांवर सोळा

वर्षें सत्ता चालवून ता. १० एप्रिल सन १७५६ रोजीं हा मरण पावला.

**अलुतीं बलुतीं**—अलुतीं बलुतीं हे गांवचे हक्क असून हे हक्क ज्या गांवकामगारांना मिळाले आहेत त्यांना अलुतेदार व बलुतेदार असें म्हणतात. बलुतेदार हा अलुतेदारापेक्षां वरच्या दर्जाचा कामगार असून यांत लोहार, सुतार, महार, मांग, कुंभार, चांभार, परीट, न्हावी, भट, मुलाणा, गुरव व कोळी अशा बारा लोकांचा समावेश होतो. कांहीं ठिकाणीं गांवचा पाटील व कुलकर्णी यांचीहि बलुतेदारांत गणना केली जाते. बलुतेदारांचे त्यांच्या हक्कानुसार तीन वर्ग पाडलेले दिसून येतात. बलुतेदारांप्रमाणेंच गांवांत बारा अलुतेदार असतात. तेली, तांबोळी, साळी, माळी, जंगम, कळवन्त, डवऱ्या, ठाकर, घडशी, तराळ, सोनार व चौगुला हे सर्व अलुतेदार होत. अलुतेदार व बलुतेदार यांना त्यांच्या गांवच्या हक्कांबद्दल कांहीं धान्य देण्याची पद्धत असते.

सर्व गांवांत वरीलप्रमाणेंच अलुतेदार व बलुतेदार असतात असें नव्हे, तर कांहीं गांवांत या अलुतेबलुतेदारांमध्यें गांवांतील आणखी, वाजंत्रे, गारपगारी अशा दुसऱ्या कामगारांचाहि समावेश केलेला असतो.

**अलुबुखार**—पश्चिम हिमालयांत गढवालपासून काश्मीर-पर्यंतच्या प्रदेशांत पांच ते सात हजार फूट उंचीवर वाढणारे हें अदमासें दहा हात उंचीचें झाड आहे. याचें फळ बाहेरून तांबूस, काळसर असून याच्या आंत पिवळा गर असतो. याचा आकार दिर्घवर्तुळाकार असून एका बाजूस फुगीर असतो. या फळांचा खाण्यासाठीं उपयोग होतो. याच्या बियांचें तेल, प्लम तेल या नांवानें प्रसिद्ध आहे. इराण, अरबस्तान, ग्रीस या देशांत हीं फळें होतात.

अलुबुखार झाडापासून पिवळ्या रंगाचा डिंक निघतो. या झाडाचें लांकूड गुळगुळीत असून काश्मीरमध्यें याचा उपयोग कागदाच्या रांध्याच्या पेट्या करण्यासाठीं जो सांचा करावा लागतो त्यासाठीं होतो.

**अलेक्झांडर झार (पहिला) (१७७७-१८२५)**— हा रशियाचा बादशहा सन १८०१ मध्यें आपल्या बापाचा खून करून गादीवर आला. आपल्या राजकीय आकांक्षांना मूर्त स्वरूप देण्याकरितां व नवीन सुधारणा अमलांत आणण्याकरितां यानें आपल्या तरुण मित्रांचें एक अंतरथ मंडळ स्थापून राज्य-कारभार करण्यास सुरवात केली. आपण स्वतः मोठे उदार व लोकहितवादी आहोंत, असें हा म्हणवून घेई. परंतु आपल्या म्हणण्याप्रमाणें सत्तात्याग करण्याची याची तयारी नसे. अरेरावी-पणानेंच हा वागे. स्वतःच्या लोकांवर विश्वास नसल्यानें यानें आपल्या सुधारणा-योजनांचे प्रयोग पोलंड, फिनलंड व बाल्टिक प्रांत यांसारख्या दूरदूरच्या देशांवर केले. सुव्यवस्थेच्या नावा-खालीं यानें शिक्षणक्षेत्राची, धर्माची व शेतकरी लोकांची गळचेपीच केली.

युरोपांतील राजकारणांतहि स्वतःला मोठेपणा मिळवण्यासाठीं यानें प्रयत्न केले. इंग्लंड, ऑस्ट्रिया व प्रशिया या राष्ट्रांशीं याचें सलोख्याचेंच धोरण होतें. नेपोलियनच्या बाबतींत मात्र प्रथम जरी याचें धोरण मित्रत्वाचें होतें तरी शेवटीं नेपोलियननें याला जग जिंकण्याच्या व पूर्वेकडील सर्व देशांचा बादशहा होण्याच्या गप्पा मारून फसविल्यामुळें या दोघांमधील स्नेहसंबंध दुरावले व सन १८१५ मध्यें नेपोलियनचा पुरा मोड झाल्यावर आपल्या मार्गांतील एक धोंडच दूर झाली असें यास वाटलें.

यानंतर याची जग जिंकण्याची भाषा मागें पडून याची वृत्ति धार्मिक बनली. ती इतकी कीं, जगाचा उद्धार करण्यासाठीं ईश्वरानेंच मला पाठवलें आहे असें तो सांगूं लागला. स्वित्सर्लंड-मधील शांतता, जर्मनीचा ऑस्ट्रियापासून बचाव, पोलंडचें राष्ट्रीय स्वातंत्र्य व फ्रान्स अखंडित ठेवून तेथें राजा व प्रजा अशा दोघांच्याहि हिताची राज्यव्यवस्था सुरू करण्याचें श्रेय याजकडेच जातें.

सन १८१८ नंतर रशियांतील क्रांतिकारकांच्या गुप्त कटांची झळ लागूं लागल्यानें यानें त्यांच्याविरुद्ध आपले विचार प्रकृत करण्यास सुरुवात केली. स्वातंत्र्य व राजकीय हक्क कसे वागवावेत हें लोकांना कळत नाहीं, असें तो म्हणे. सन १८२० च्या नोव्हेंबरमध्यें ट्रोपो प्रोटोकोलवर सही करून कोणत्याहि देशाच्या अंतर्गत कारभारांत दुसऱ्या राष्ट्रांना पाडण्याचा हक्क आहे, या तत्त्वास यानें मान्यता दिली. यानंतर हा मरण पावला. हा स्वभावानें मनमिळाऊ, वाणीनें गोड, वागणुकीनें साधा व कलाकौशल्याचा चहाता होता. याच्या मरणसमयीं रशियांत जिकडेतिकडे अंदाधुंदी माजली होती. रशियाच्या गुलामगिरीमुळें राष्ट्रांत दंगेधोपे यासारखे प्रकार होत व गुप्त हेर व पोलिस यांचा सुळसुळाट झाल्यामुळें जनता अगदीं त्रासून गेली होती.

**अलेक्झांडर दि ग्रेट (सिकंदर)** (खि. पू. ३५६ ते ३२३)—जग जिंकण्याची महत्त्वाकांक्षा धरणारा एक अलौकिक शूर वीर. हा मॅसिडोनियाचा राजा दुसरा फिलिफ व एपिरोटची राजकन्या ऑलिंपियस यांचा पुत्र. लहानपणापासूनच याला आपल्या बापाच्या हाताखालीं राज्यकारभाराचें शिक्षण मिळालें होतें. हेलेनिक संस्कृतीचा प्रत्यक्ष पुतळा म्हणून सुप्रसिद्ध असलेला आरिस्टॉटल याची याला शिकवण्याकरितां नेमणूक झालेली होती. याच्या बापानें याच्या आईस टाकून देऊन क्लिओपाट्रा नामक दुसऱ्या स्त्रीशीं लग्न केल्यामुळें हा आपल्या

आईबरोबर बापाच्या घरांतून बाहेर पडला. खि. पू. ३३६ मध्यें फिलिफ मारला गेल्यानंतर लष्कराच्या साहाय्यानें हा गादीवर आला. यानंतर यानें डोंगरी व थिबी लोकांचीं बंडें मोडलीं. त्यामुळें ग्रीसवर याचा दरारा बसला व खि. पू. ३३४ मध्यें यानें आशियावरील मोहीम हातीं घेतली असतां याला ग्रीक, मॅसिडोनियन, इलिरियन, वगैरे लोकांकडून ४०००० सैन्याची मदत झाली. प्रथम यानें इराणवर हल्ला केला असता आशिया मायनरमध्यें इराणच्या राजाच्या सैन्याशीं याला तोंड द्यावें लागलें व या युद्धांत यास जय मिळाला. अशा रीतीनें आशिया मायनर अलेक्झांडरच्या हातांत पडल्यावर यानें उत्तर फ्रिजियांतील गॉर्डियमचें राज्य जिंकून घेतलें. यानंतर अनुक्रमें सीरिया, फिनिशिया, ईजिप्त व इराण हीं साम्राज्यें आपल्या बाहुबलावर जिंकून घेतलीं. व खि. पू. ३२८ च्या वसंत ऋतूंत हिंदुकुश ओलांडून यानें बॅक्ट्रियाचा प्रदेश जिंकला व हिंदुस्थानांत येऊन पंजाबांत अटकेपासून सोळा मैलांवर आपलें ठाणें ठोकलें. तेव्हां चिनाब नदीच्या कांठीं असलेल्या प्रदेशाचा राजा पोरस यानें अलेक्झांडरशीं युद्धाची तयारी केली. सिकंदरनें पोरसचा प्रतिस्पर्धी जो आंभी राजा त्याच्या साहाय्यानें पोरसचा पराभव केला. या वेळीं हातांत सांपडलेल्या पोरस राजाला सिकंदरनें मोठ्या सन्मानानें वागवलें व पुढील प्रदेश जिंकण्याच्या कामीं त्याचें साहाय्य घेतलें. यानंतर यानें रावी व बियास नद्यांपर्यंतचा प्रदेश जिंकला. गंगाकांठचा व पुढील रमणीय प्रदेश जिंकण्याची याची इच्छा याच्या सैनिकांच्या निरुत्साहामुळें सफल होऊं शकली नाहीं व सिंधूच्या मुखाकडे जाण्यासाठीं हा निघाला. वाटेंत याला मुसिकेनस, ऑक्सिकेनस, संबू या लोकांशीं लढाया कराव्या लागल्या. यानंतर बलुचिस्तानमार्गें हा परत जाण्यास निघाला. खि. पू. ३२३ मध्यें हा बाबिलोनला आला असतां पृथ्वीवरील अनेक राजांचे वकील याचा सत्कार करण्याकरितां तेथें आले होते. यानंतर यानें अरबस्तानला वळसा घालून जलमार्गानें ईजिप्तबरोबर दळणवळण सुरू ठेवलें व सैन्याची सुधारणा करून पुढें कूच करण्याचा दिवसहि ठरला. परंतु या वेळीं लागोपाठ दोन दिवस सुरापान आटोक्याबाहेर झाल्यानें हा तापानें आजारी पडला व ता. २८ जून खि. पू. ३२३ रोजीं मरण पावला.

याचें शरीर चांगलें कमावलेलें असून हा मध्यम उंचीचा, गोरा व तांबूस वर्णाचा असा होता. अचाट साहस, विलक्षण कल्पनाशक्ति व उत्साह हे याचे गुणविशेष होत.

**अलेक्झांडर, सहावा पोप** (१४३१–१५०३)—अलेक्झांडर नांवाचे जे आठ पोप झाले त्यांपैकीं हा सहावा होय. हा स्पेनमध्यें जन्मला. प्रथम कायद्याचा अभ्यास केल्यावर यानें सन १४५५ मध्यें आपला मामा कॅलिक्स्टस तिसरा पोप याच्या हाताखालीं बिशप, कार्डिनल, चर्चचा व्हाइस-चॅन्सलर अशा मोठमोठ्या हुद्यांच्या जागांवर काम करून अनुभव व संपत्ति यांची जोड करून ठेवली. यानंतर हा डामडौलांत राहूं लागला. मोहक चेहरा व मनमिळाऊ स्वभाव या गुणांमुळें हा थोड्याच दिवसांत कनक व कांता यांच्या मोहजालांत सांपडला. व्हॅनोझ डी कॅटेनी व ग्युलीया बेला या याच्या प्रीतींतल्या स्त्रियांपैकीं होत. १४९२ सालीं पोप झाल्यावर कांहीं काल यानें न्यायानें कारभार केला. परंतु यानंतर मात्र आर्चबिशप, कार्डिनल, वगैरे जागांवर यानें आपल्या नातेवाइकांच्या नेमणुका करण्याचें धोरण सुरू केलें. आपल्या अधर्मोत्पन्न मुलांचे विवाह मोठमोठ्या घराण्यांत जुळवून आणण्याचा यानें उद्योग आरंभला. स्पेनचा राजा पोपच्या तंत्रानें चालत असे. तेव्हां अमेरिका खंडाची मालकी स्पेनकडे असल्याचें यानें मान्य केलें. स्पेनला पाठिंबा दिल्यामुळें रोममध्यें स्पॅनिश लोकांचा भरणा अधिक वाढला व मारेकरी आणि वेश्या यांचा सुळसुळाट झाल्यानें दुराचरणास ऊत आला. यानंतर फ्रान्स व स्पेन या दोन राष्ट्रांमध्यें नेपल्सबद्दल तंटा निर्माण झाला असतां जिकडून अधिक फायदा होईल त्या बाजूस मदत करून अधिक प्रांत घशांत टाकण्याचें धोरण यानें स्वीकारलें. या धुमश्चक्रींत तारीख १८ ऑगस्ट १५०३ रोजीं हा तापानें एकाएकीं मरण पावला.

यानें जर कोणती चांगली गोष्ट केली असेल तर यानें शिल्पकलेला दिलेला आश्रय ही होय. याच्या आश्रयामुळें शिल्पकलेस ऊर्जितावस्था प्राप्त झाली.

**अलेक्झांड्रियन ग्रंथालय**—प्राचीन काळांतील ग्रंथसंग्रहांपैकीं सर्वांत मोठा व सर्वांत प्रसिद्ध असा हा ग्रंथसंग्रह होता. याची मूळ स्थापना ईजिप्तचा राजा टॉलेमी सॉटर (मृत्यु खि. पू. २८३) यानें केली. आणि तो संग्रह वाढवण्याचें काम पुढें अनेक टॉलेमी राजांनीं केलें. येथील १ ला ग्रंथालयाधिकारी झेनोडोटस (खि. पू. २३४) हा होता. फार भरभराटीच्या काळांत या ग्रंथसंग्रहांत ७,००,००० ग्रंथ होते. आणि ते दोन निरनिराळ्या इमारतींत ठेवले होते. त्यांपैकीं १ इमारत ज्यूपिटर सेरेपिस याचें देवालय ही होती. दुसऱ्या इमारतींतला ग्रंथसंग्रह या शहराला ज्युलिअस सीझरनें वेढा घातला त्या वेळीं जाळण्यांत आला, पण ज्यूपिटर देवालयांतील ग्रंथसंग्रह बादशहा थिओडोशीअस दि ग्रेट (इ. स. ३९१) याच्या कारकीर्दींत अस्तित्वांत असून त्यांत पुढें भर पडत गेली. पण पुढें खलीफ ओमारनें ६४१ मध्यें हें शहर जिंकून घेतलें त्या वेळीं अरब लोकांनीं हाहि ग्रंथसंग्रह जाळून टाकला.

**अलेक्झांड्रियन पंथ किंवा युग**- ईजिप्तमध्यें ३०० वर्षें

टॉलेमी राजे राज्य करीत होते ( ख्रि. पू. ३२३–३० ). त्या काळाला हें नांव आहे. या काळांत अलेक्झांड्रिया शहरांत ग्रीक वाङ्मय आणि त्याचा अभ्यास करणाऱ्या लोकांचा एक पंथ होता. पुढें या शहरावर रोमन लोकांची सत्ता आल्यावरहि हा पंथ चालू राहिला. टॉलेमी सॉटरनें अलेक्झांड्रियाचें सुप्रसिद्ध ग्रंथालय स्थापलें आणि त्याचा पुत्र फिलाडेल्फस यानें शास्त्रें आणि कला यांचें विद्यापीठ स्थापन केलें. त्यामुळें अनेक देशांतले बुद्धिमान लोक व विद्यार्थी येथें येऊं लागले; तथापि हें युग नवकल्पना व नवसंशोधन यांबद्दल प्रसिद्ध नाहीं. या पंथाचा मुख्य भर प्राचीन ग्रंथांवर टीकाग्रंथ लिहिणें, व्याकरण व शास्त्रें तयार करणें यांवर होता. वैय्याकरण व टीकाकार यांमध्यें झेनोडोटस, एरॅटोस्थेनीज, आरिस्टोफेनीज, आरिस्टार्कस आणि क्रेटस हे प्रसिद्ध असून प्राचीन ग्रीक वाङ्मयापैकीं अस्तित्वांत असलेले ग्रंथ एकत्र करणें, त्यांच्या शुद्ध प्रती तयार करणें आणि त्या सुरक्षित ठेवणें हें बहुमोल कार्य या विद्वानांनीं केलें आहे. या काळांतील कवींमध्यें अपोलोनिअस, लायकोफ्रॉन, आरेटस, निकॅन्डर, युफोरिऑन, कलिमाकस, थेओक्रिटस, फायलेटस हे प्रमुख आहेत. गणितशास्त्र, पदार्थविज्ञान आणि ज्योतिषशास्त्र या तीन शास्त्रांमध्यें प्रवीण असे युक्लिड, आर्किमेडीज, अपोलोनिअस (पर्गाचा), निकोमॅकस व टॉलेमी हे होते. अलेक्झांड्रिया तत्त्वज्ञानविषयक मताबद्दलहि प्रसिद्ध होतें आणि येथेंच आमोनिअस यानें तत्त्वज्ञानांतील न्यू प्लेटॉनिक हा पंथ स्थापन केला (अदमासें इ. स. १९३ ).

**अलेक्झांड्रिया**—ईजिप्तमधील नाईल नदीच्या मुखाजवळ अलेक्झांडरनें इ. स. पूर्वी ३३२ मध्यें वसाविलेलें शहर. त्यानें जगाचा बराच इतिहास अवलोकन केला आहे. रोमन, ग्रीक, ख्रिश्चन व मुसलमान या लोकांचीं जहाजें शतकानुशतकें या बंदरांत येत आहेत. भूमध्यसमुद्राच्या तोंडाशीं पूर्व व पश्चिम खंड यांमधील मोक्याच्या जागीं हें बंदर असून ईजिप्तचा सर्व व्यापार या बंदरांतून चालतो. या बंदराच्या मागील पार्श्वभूमि म्हणजे ईजिप्त व सुदान हे प्रदेश होत. येथून आंतील वाहतुकीसाठीं लोहमार्ग व नाईल नदी हाच जलमार्ग म्हणून उपयोग करतात. ईजिप्तच्या जगप्रसिद्ध कापसाची रवानगी या बंदरांतून होते. लो. सं. ८,६५,७३६. येथील विद्यापीठ १९४३ सालीं स्थापन झालें.

**अलेप्पे**—हिंदुस्थान, त्रावणकोर संस्थानांतील एक बंदर. हें त्रिवेंद्रमच्या उत्तरेस क्विलॉनच्याहि वर आहे. येथून इमारती लांकूड, काथ्या, नारळ, इ. माल बाहेर जातो. लो. सं. ५६,२३३.

**अलेप्पो**—उत्तर सीरियांतील हें एक शहर कोईक नदीवर वसलेलें आहे. १८२२ पूर्वी येथें १०० मशिदी होत्या, पण त्या सालीं भूकंपाचा धक्का बसून त्यांचा बराच भाग नष्ट झाला. आणि बहुतेक शहरहि उध्वस्त झालें. या शहरांतील आकर्षक गोष्टींपैकीं बागा फार महत्त्वाच्या आहेत. त्यांत पिस्त्यांचीं झाडें फार मोठ्या प्रमाणावर होतात. पूर्वी हें शहर व्यापाराचें व कारखान्यांचें एक मोठें केंद्र होतें. पण भूकंपामुळें व इतर कारणांमुळें त्याची भरभराट बरीच कमी झाली आहे. तथापि अद्यापहि या देशांत होणाऱ्या कापूस, लोंकर, रेशीम, कातडीं, साबण, तमाखू, मेण, वगैरे पदार्थांचा व्यापार चालतो. युरोपांतून कांहीं पक्का माल येथें येतो. १९१८ सालीं ब्रिटिश सैन्यानें हें शहर व्यापलें होतें. हल्लीं तेथील लोकसंख्या ३,२०,१६७ आहे. येथील सामान्य बोलभाषा अरबी आहे.

**अलैय्या**—हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत मध्यम वर्ज्य असून अवरोह सातहि स्वरांनीं होतो. म्हणून याची जाति षाडव–संपूर्ण आहे. याचा वादी धैवत व संवादी गांधार आहे. याचा गानसमय सकाळचा पहिला प्रहर आहे. याच्या अवरोहांत कोमल निषाद लागतो. या रागांत धैवत व मध्यम या स्वरांची संगति वैचित्र्यदायक आहे. हा एक बिलावल प्रकार आहे

**अल्क**—( अल्कली ). पाण्यांत विरघळणाऱ्या राखेच्या भागासच पूर्वी अल्कली हें नांव होतें. आतां पुढील गुणधर्म असलेल्या पदार्थांना हें नांव मिळालें आहे: ( १ ) पाण्यांत विरघळणें, ( २ ) अम्लांचें अम्लत्व नष्ट करून त्यांचीं लवणें तयार करणें, ( ३ ) प्राणिजन्य आणि वनस्पतिजन्य पदार्थांवर नाशक क्रिया ( Corrode ) करणें, व ( ४ ) कांहीं रंगीत पदार्थांचा रंग बदलणें; उदा., तांबडा लिटमस अल्कलीनें निळा होतो.

पाण्यांतील एका उज्जा( हायड्रोजन )च्या जागीं एखादा धातु घातल्यास त्या धातूचा अल्कली तयार होतो. उदा., सिंधु उज्जित ( सोडियम हायड्रोक्साइड ) आणि पालाश उज्जित ( पोटॅशियम हायड्रोक्साइड ) यांची मनुष्याच्या कातडीवर अतिशय तीव्र स्वरूपाची क्रिया होत असल्यामुळें त्यांना दाहक ( कॉस्टिक ) अल्कली म्हणतात. हीं दोन उज्जितें ( हायड्रोक्साइड ) आणि त्याचप्रमाणें कर्बितें ( कार्बोनेट ) देशाच्या उद्योगधंद्यांत मोठ्या प्रमाणांत लागत असल्यामुळें त्यांचें उत्पादन हें देशाच्या उद्योगाचें प्रमुख अंग असून त्याला अल्कोद्यम ( अल्कली इंडस्ट्री ) अशी संज्ञा आहे. खट ( कॅल्शियम ), स्त्रांत ( स्ट्रॉन्शियम ) आणि भार ( बेरियम ) यांच्या प्राणिदांना ( ऑक्साइड ) अल्कमृत्तिका ( अल्कलाइन अर्थ्स ) म्हणतात.

**अल्ककल्प**—( अल्कलॉइड ). हा क्षारधर्मी पदार्थ असून याच्या घटकांत नत्र( नायट्रोजन ) हा अविकल्पानें असतो. सामान्यतः हा वनस्पतींमध्यें सेंद्रिय( ऑर्ग्यानिक ) अम्लाच्या

संयोगानें उत्पन्न झालेला असतो. त्याची चव कडू असते. ह्या वर्गांतील पुष्कळसे पदार्थ विषारी आहेत, व कांहींचा उत्तम औषध म्हणून उपयोग होतो. ह्या वर्गांतील क्विनीन, ॲकोनिटीन, मॉर्फिन, कॅफीन निकोटीन, स्ट्रिक्नीन सुप्रसिद्ध आहेत.

**अल्कनेट**—एक वनस्पतिजन्य लालभडक रंग. ही रतनज्योत किंवा मॉकर (बॉरॅजिनासिई) या वर्गांतील झाडाच्या मुळाची साल असते. हें झाड दक्षिण फ्रान्समध्यें आणि पूर्व युरोपमध्यें प्रामुख्यानें उगवतें. ह्या रंगाचा उपयोग मुख्यतः तेलांसाठीं व मिठाईसाठीं करतात.

**अल्पजनसत्ताक राज्य**—(ऑलिगार्की). राज्यशास्त्रांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, ज्या राज्यामध्यें राज्यकारभाराची वरिष्ठ सत्ता एका विशिष्ट लहान वर्गाच्या हातीं किंवा कांहीं थोड्या व्यक्तींच्या हातीं असते त्या राज्यपद्धतीला ऑलिगार्की म्हणतात. प्राचीन ग्रीस व रोम येथें अशी अल्पसत्ताक राज्यपद्धति, राजशाही (मॉनर्की) व लोकशाही (डेमॉक्रसी) या दोन राज्यपद्धतींच्या दरम्यानच्या काळांत चालू होती. मध्ययुगीन काळांत (इ. स. ५०० ते १५००) अशीं अल्पसत्ताक राज्यें जिनोवा, फ्लॉरेन्स, व व्हेनिस येथें होतीं.

**अल्पाका**—उंटाच्या जातीचा एक सस्तन रवंथ करणारा प्राणी. हा अँडीज पर्वतावर चिली आणि पेरू देशांत आढळतो. हा लामाप्राण्यासारखाच दिसतो. हा रानटी अवस्थेंतहि आढळतो, पण माणसाळून पाळण्यांतहि येतो. हा आकारानें व आकृतीनें मेंढ्यासारखा दिसतो; पण याची मान लांब असते. याची लोंकर लांब, मऊ व रेशमासारखी असते आणि ती मेंढ्यांच्या लोंकरीपेक्षां सरळ व मजबूत असते. या लोंकरीचें सुंदर कापड बनविण्यांत येतें.

**अल्पायु मत्स्यवर्ग**—(एफेमेरा). अल्पायुमाक्षिकादि वर्गां (Ephemeridæ) पैकीं शिरालपक्षी (Neuropterous) किड्यांमध्यें हा विशेष प्रकारचा माक्षिकवर्ग किंवा मत्स्यवर्ग आहे. आळ्यांच्या अवस्थेंत हे किडे जलसंचारी असून कित्येक वर्षें जगतात. कोषांतून बाहेर पडल्यावर ते पाण्याबाहेर येतात व प्रजोत्पादन करून मरून जातात. बहुधा मे महिन्यांत हे किडे दिसतात; म्हणून त्याना मे-माशा म्हणतात व एका दिवसाइतकें अल्पायु असल्यानें दिन-माशा असेंहि म्हणतात.

**अल्बुकर्क, अलफॉन्सो द (१४५३-१५१५)**— हिंदुस्थानांतील एक पोर्तुगीज सुभेदार. याचा बाप गोन्झाल्हो हा पोर्तुगालच्या राजघराण्यांतील असून पोर्तुगालच्या दरबारांतच एका बहुमानाच्या जागेवर होता. अल्बुकर्कचा जन्म अलेक्झांड्रिया शहरांत झाला. यानंतर याचें सर्व शिक्षण अल्फान्सो राजाच्या दरबारींच झालें. सन १५०३ मध्यें यानें केप ऑफ गुड होपला वळसा घालून हिंदुस्थानांत पदार्पण केलें. हिंदुस्थानांत यानें कोचीनच्या राजास गादीवर बसविण्यास साहाय्य देऊन त्याबद्दल कोचीनला पोर्तुगीजांचा किल्ला बांधण्याची त्याजकडून परवानगी मिळवली. हाच याचा पूर्वेकडील साम्राज्याचा पाया होय. सन १५०४ मध्यें हा परत पोर्तुगालला गेला. याची ही साम्राज्यस्थापनेची यशस्वी कामगिरी पाहून एमॅन्युअल राजानें यास पांच जहाजें दिलीं व परत हा सन १५०६ मध्यें हिंदुस्थानकडे येण्यास निघाला. सन १५०९ मध्यें हा हिंदुस्थानास पोर्तुगालचा सुभेदार झाला. यानंतर यानें कालिकत, मलाक्का, गोवें, इत्यादि शहरें पोर्तुगीज अमलाखालीं आणलीं. इराणच्या आखातांतील ऑर्मझ बेटावर सन १५१५ मध्यें यानें दुसरी मोहीम केली. या वेळीं तेथें कांहींच प्रतिकार न झाल्यानें तें बेट पोर्तुगीजांच्या सहजच हातीं आलें. अल्बुकर्कच्या अखेरच्या काळांत त्याच्या अदूरदर्शी व अरेरावी वर्तनामुळें त्यास पोर्तुगाल दरबारांतील त्याच्या अनेक शत्रूंच्या कारस्थानांस बळी पडावें लागलें. ऑर्मझचा विजय घेऊन परत गोवें बंदरांत आल्यावर आपल्या जागीं आपला खासगी वैरी सुआरेन याची नेमणूक झाल्याचें वृत्त याच्या कानांवर आलें. या बातमीमुळें यास जबरदस्त धक्का बसून हा तारीख १६ डिसेंबर १५१५ रोजीं मरण पावला. हिंदुस्थानांत येणाऱ्या पोर्तुगीज अमलदारांनीं पोर्तुगीजांचा व्यापार हिंदुस्थानांत कसा वाढेल या एकाच बाबीवर आपलें कार्यक्षेत्र मर्यादित ठेवलें होतें. परंतु अल्बुकर्कनें या धोरणाबरोबरच पोर्तुगीजांच्या साम्राज्यविस्ताराचेंहि धोरण इकडे सुरू ठेवलें. यानें हिंदी लोकांच्या धार्मिक भावना न दुखवल्यामुळें याच्याबद्दल त्या लोकांच्या मनांत आदरभाव राहिला. गोवें, चौल व वसई येथें यानें न्यायदानपद्धति सुधारली व लोकांच्या हिताच्या अनेक गोष्टी केल्या. हिंदी संस्थानिकांशींहि याचें सलोख्याचेंच धोरण होतें.

**अल्बेरुनी, अबू रैहान महंमद (९७३-१०४८)**—एक अरबी पंडित व प्रवासी. याचें संस्कृत भाषेवर चांगलें प्रभुत्व असून अनेक शास्त्राचाहि यानें चांगला अभ्यास केला होता. हा गझनीच्या सुलतान महंमदाच्या दरबारीं असून त्याच्याबरोबर हिंदुस्थानांतहि आला होता. त्यानें इ. स. १०३० मध्यें 'तारिख अल्-हिंद' नांवाचा ग्रंथ लिहून त्यांत हिंदुस्थानासंबंधीं त्या वेळची बरीच माहिती दिली. या ग्रंथाला बरेंच ऐतिहासिक महत्त्व आहे. अल्बेरुनीला भगवद्गीतेंतील तत्त्वज्ञान फार आवडे. त्यानें टॉल्मीच्या आल्माजेस्टचेंहि अरबींत भाषांतर केलें आहे. फलज्योतिषज्ञानाबद्दलहि याची फार ख्याति होती.

**अल्बेरुनी, गियुलिओ** ( १६६४–१७५२ )— एक स्पॅनिश-इटालियन मुत्सद्दी व कार्डिनल. हा एक माळ्याचा मुलगा प्रथम एका ख्रिस्ती देवळांत छडीदाराच्या कामावर होता. आपल्या गुणांनीं तेथील बिशपची मर्जी संपादन करून हा धर्मोपदेशक झाला. यानंतर स्पेनच्या गादीच्या वारसांबाबत झालेल्या युद्धांत यानें कामगिरी बजावल्यामुळें हा एक राजकारणी म्हणून प्रसिद्धीस आला. यास सरदारी मिळून पांचव्या फिलिपच्या दरबारांत यास पार्माचें प्रतिनिधित्व मिळालें. यानंतर राजाच्या सल्लागार-मंडळाचा सभासद, मालागाचा धर्मगुरु या जागा यास मिळाल्या व सन १७१५ त हा मुख्य प्रधान व कार्डिनल झाला. इंडीज बेटांवरील व्यापाराचे निर्बंध काढून टाकून तेथें खुला व्यापार सुरू करणें, स्पेन देशांतील अंतस्थ जकातीचीं ठाणीं उठवून त्याचें सांपत्तिक पुनरुज्जीवन करणें, जमाबंदीची पुनर्घटना करणें, इत्यादि सुधारणा करण्याचे याचे बेत होते. या सुधारणांतून निर्माण होणाऱ्या द्रव्याचा विनियोग पांचव्या फिलिपच्या इटली व फ्रान्सविषयक आकांक्षा पूर्ण करण्याकडे व्हावा असें यास वाटत होतें. परंतु राजा व राणी यांच्या वेंधळेपणामुळें याचे सर्व बेत फसले. सन १७३० मध्यें क्लेमंट पोपनें याची रॅव्हेनाचा प्रतिनिधि म्हणून नेमणूक केली. यानें तेथें उपाध्येपणा शिकवणारें असें एक विद्यापीठ स्थापन केलें होतें.

**अल्मानॅक**—आपल्याकडील पंचागाप्रमाणें हें युरोपियनांचें ग्रह-गणितासंबंधीं व सणावारांसंबंधीं माहिती देणारें पुस्तक असतें. सूर्योदय आणि सूर्यास्त यांच्या वेळा, चंद्राच्या कला, ग्रहांचीं स्थानें व त्यांचें वैशिष्ट्य हीं रोजचीं यांत दिलेलीं असतात. यांखेरीज इतरहि पुष्कळ माहिती दिलेली असते. इंग्लंडांतील १४ व्या शतकापासूनचीं अशीं पुस्तकें सांपडतात. आपल्या पंचागावरून ज्याप्रमाणें ग्रहांचीं भविष्यें वर्तवितात व माणसांचीं भविष्यें सांगतात, त्याचप्रमाणें या पाश्चात्य पंचागांचा उपयोग होई व लोकांची दिशाभूल होते म्हणून फ्रान्समध्यें पुष्कळदां याचें प्रकाशन बंद केलें होतें. 'नॉटिकल अल्मानॅक' ( नाविक पंचांग ) हें नौकानयनाला फार उपयोगी आहे व म्हणून प्रत्येक नाविकाचें हें अभ्यासाचें पुस्तक समजलें जातें. पुढच्या तीन वर्षांचीं नक्षत्रभविष्यें यांत असल्यानें बोटीच्या दीर्घ प्रवासांतहि हें वापरलें जातें. व्हिटेकर्स अल्मानॅक हें १८६८ सालीं निघालें; तें अद्यापि फार लोकप्रिय आहे.

**ॲल्युमिनियम**—( स्फट ). एक अणुभारांक २६·९६. शुभ्र, चकाकणारा आणि अतिशय हलका धातु. ओतीव धातूचें विशिष्ट-गुरुत्व २·५६ असून घडविल्यावर थोडेंसें वाढतें ( २·६७ ). हवेंतील प्राणवायूशीं त्याचा सहज संयोग होत नाहीं, त्यामुळें या धातूचा चकाकीतपणा बरेच दिवस कायम असतो. या धातूचे पत्रे आणि तारा करता येतात. हा धातु अतिशय विपुल आहे व क्रियोलाइट, कोरुंडम, बॉक्साइट, आणि अलुनाइट हीं याचीं प्रमुख खनिजें आहेत. केओलीन ( चिनीमाती ), फेल-स्पार आणि अभ्रक यांमध्येंहि सिलिकेट म्हणून हा अस्तित्वांत असतो. शुद्ध धातु तयार करण्यासाठीं बॉक्साइटमधून अल्युमिना काढून घेतात व वितळलेल्या क्रियोलाइटमध्यें तो मिसळून विजेच्या साहाय्यानें त्याचें पृथक्करण करतात. ज्या ठिकाणीं विजेचा पुरवठा विपुल आणि स्वस्त असतो त्या ठिकाणीं अशा प्रकारचे विजेच्या साहाय्यानें अल्युमिनियम तयार करण्याचे कारखाने काढणें शक्यच असतें. हा धातु स्वतः हलका आहेच, पण ह्याचे मिश्रधातूहि ( Alloys ) तसेच हलके असल्यामुळें नित्याच्या घरांतील भांड्यांशिवाय विमानें तयार करण्याच्या कामीं या धातूंचा आणि त्याच्या मिश्रधातूंचा चांगला उपयोग होतो. अल्युमिनियन सोनें, अल्युमिनियम ब्रॉन्झ, व ड्युरॅल्युमिन हे त्याचे व तांब्याचे प्रमुख मिश्रधातु होत.

जगांत अमेरिकन संयुक्त संस्थानें ( ८३५ सहस्र मेट्रिक टन ), कानडा ( ४५० ) व जर्मनी–ऑस्ट्रिया ( ३२५ ) यांत अल्युमिनियमचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर आहे. हिंदुस्थानांत सह्याद्रि पर्वताच्या कांहीं भागांत ही धातु सांपडते, पण तिचें उत्पादन करण्याचा उद्योग अद्यापि झालेला नाहीं.

**ॲल्युमिनी माती**— ( स्फट मृत्तिका ). अल्युमिनियमच्या प्राणिदाला अल्युमिना म्हणतात. स्फटिक आणि अस्फटिक रूपांत हें निसर्गांत सांपडतें. एमरि हें त्याचें अस्फटिक रूप असून स्फटिक रूपांत कुरुविंद ( कोरुंडम ), लाल आणि नीळ ( सॅफायर ) हीं येतात. कठिणपणांत हें हिऱ्याच्या खालोखाल येतें. अल्युमिनाचा गारगोटीशीं ( सिलिकाशीं ) अनेक प्रकारानें संयोग होतो; त्या त्या संयोगानें तयार झालेलीं अनेक संयुक्तें आणि खनिज द्रव्यें ग्रानाइटसारख्या दगडांत आणि चिनीमाती-सारख्या मातींत पुष्कळ सांपडतात.

**अल्लाउद्दिन खिलजी** ( १२९६–१३१६ )— दिल्लीचा एक बादशहा. हा शहाबुद्दिन मसूदचा पुत्र व दिल्लीच्या खिलजी घराण्याचा संस्थापक जो जलालुद्दिन त्याचा पुतण्या. हा आपल्या काकाकडे म्हणजे जलालुद्दिनाकडेच असे. मोगलां-वरील चढाईच्या वेळीं याचें शौर्य दिसून आल्यामुळें जला-लुद्दिनानें यास गंगा व यमुना या नद्यांमधील अंतर्वेदींतील कोऱ्हा प्रांताची सुभेदारी दिली. यानंतर अगदीं थोड्या अव-धींत यानें माळव्यावर स्वारी करून लूट मिळवली व आपल्या पदरीं फौज ठेवली. माळव्यांतील किल्लेहि यानें आपल्या ताब्यांत आणले. त्यानंतर सन १२९३ मध्यें यानें दक्षिणेंतील देवगिरी या धनाढ्य शहरावर ८००० सैनिकांनिशीं स्वारी केली. या

स्वारीच्या वेळीं देवगिरीचा राजा रामदेवराव यास त्याची फौज दुसरीकडे गेली असल्यानें व झालेला हल्ला आकस्मिक असल्यानें अल्लाउद्दिनाशीं नाइलाजानें व पुष्कळ द्रव्य देऊन तह करणें भाग पडलें. या स्वारींत विजयी होऊन परत निघणार तों रामदेवरावाचा पुत्र शंकरदेव हा स्वारी करून आपल्या फौजेनिशीं परत आला व त्यानें झालेला तह झुगारून देऊन अल्लाउद्दिनाच्या फौजेवर हल्ला चढवला. या वेळीं अल्लाउद्दिनाचें बरेंचसें वळ खर्ची पडलें होतें. व त्यास माघार घेऊन परतल्याखेरीज़ गत्यंतर राहिलें नव्हतें. परंतु देवगिरीच्या किल्ल्याच्या रक्षणार्थ ठेवलेला रामदेवरावाचा सरदार याच वेळीं शंकरदेवाच्या साहाय्यार्थ आपल्या फौजेनिशीं येण्यास निघाला. त्याच्या फौजेंतील घोड्यांच्या पायांनीं उडालेली धूळ पाहून हें सैन्य अल्लाउद्दिनाच्या मदतीकरतां दिल्लीहून येत असावें, अशी शंकरदेवाच्या सैन्याची समजूत झाली. या सैन्यापुढें आपल्या सामर्थ्याचा निभाव लागणार नाहीं अशा कल्पनेंत शंकरदेवाच्या सैन्यानें रणांतून पळ काढला. त्यामुळें अल्लाउद्दिनाला आयताच विजय मिळाला. अलोट संपत्ति, एलिचपूर व आसपासचे प्रांत बळकावून हा कोऱ्हा येथें परत आला. याच वेळीं याचा चुलता जलालुद्दिन बादशहा यास भेटण्यास आला असतां याच्या मारेकऱ्यांनीं त्याचा खून केला. यानंतर दिल्लीच्या अमीर-उमरावांना देवगिरीहून लुटून आणलेल्या संपत्तीनें वश करून घेऊन यानें दिल्लीचें तख्त बळकावलें, मुलतानहून आपल्या चुलत भावांना पकडून आणून यानें त्यांचे डोळे काढले व त्यांना बंदींत ठेवलें.

यानंतर यास इ. स. १२९६ मध्यें मध्यतुर्कस्तानचा बादशहा जो चेंगीझखानाचा वंशज अमीर दाऊद याच्या स्वारीस तोंड द्यावें लागलें. त्या वेळीं आपला सरदार आलफखान यास पाठवून यानें अमीर दाऊदच्या सैन्याची कत्तल केली. ही मोंगलांची पहिली स्वारी. यानंतर सन १२९८ मध्यें अमीर दाऊदचा मुलगा कुतलघखान यानें दोन लक्ष मोंगल स्वारांनिशीं हिंदुस्थानवर स्वारी केली. ही स्वारीहि अल्लाउद्दिनानें आपला सरदार आलफखान व वजीर नुस्रतखान यांच्या साहाय्यानें मागें परतवली. मोंगलांची तिसरी स्वारी सन १३०३ मध्यें झाली. त्या वेळींहि कत्तलीसारख्या अघोरी उपायांचा अवलंब करून अल्लाउद्दिनानें ती परतवली. यानंतर बरींच वर्षे मोंगल हिंदुस्थानांत येण्यास धजले नाहींत.

सन १२९७ मध्यें अल्लाउद्दिनानें आलफखान व नुस्रतखान या आपल्या साहाय्यकांना पाठवून गुजरातचा पाडाव केला. गुजरातचें राज्य या वेळीं कर्णरायाकडे होतें. याच्या सैन्यानें खंबायत प्रांत व सोमनाथाचें देवालय पुन्हां लुटून अगणित संपत्ति दिल्लीच्या खजिन्यांत आणून भरली.

यानंतर सन १३०३ मध्यें अल्लाउद्दिनानें चितोडवर स्वारी केली. या स्वारीचा हेतु म्हणजे चितोडच्या राण्याच्या पद्मिनी नामक स्त्रीचा ताबा घेणें हा होता. परंतु पद्मिनी याच्या हातीं लागली नाहीं. तेव्हां चितोडची मालकी आपणाकडे ठेवून हा परतला. या वेळीं चितोडच्या गादीवर यानें आपल्या विश्वासांतल्या मालदेव राजास बसवलें होतें. परंतु अल्लाउद्दिन दिल्लीस परत येतांच हमीर नामक चितोडच्या एका शूर पुरुषानें चितोडचा ताबा घेतला.

सन १३०६ मध्यें यानें मलिक काफूरला दक्षिणेंत पाठवून बरीच लूट जमवली व रामदेवरावास आणवलें. सन १३०९ मध्यें काफूरनें वरंगळच्या नरपति राजास अल्लाउद्दिनाचा मांडलिक बनवलें. सन १३१० मध्यें बल्लाळवंशी राजांची राजधानी द्वारसमुद्र ही अल्लाउद्दिनानें घशांत टाकली. या स्वाऱ्यांत अल्लाउद्दिनास ६१२ हत्ती, २० हजार घोडे, ९५ हजार मण सोनें व अमूल्य असें जडजवाहीर मिळालें. या वेळी याची सत्ता अगदीं कळसास पोहोंचली होती.

यानंतर मात्र अल्लाउद्दिनाच्या कारकीर्दीस उतरती कळा सुरू झाली. याच्या व मलीक काफूरसारख्या याच्या हस्तकांच्या जुलमांस सर्व लोक त्रासून गेले होते. त्यामुळें जिकडे तिकडे बंडांना सुरुवात झाली. गुजरात व चितोड येथें बंडें होऊन अल्लाउद्दिनास हे भाग गमवावे लागले. या वेळीं अल्लाउद्दिनाची तब्येतहि बरीच खालावली होती. इतक्या सर्व आपत्तींना यशस्वीपणें तोंड देणें त्यास शक्य झालें नाहीं. याच धामधुमींत ता. १९ डिसेंबर १३१६ रोजीं हा मरण पावला. काफूरनेंच याला विष देऊन ठार केलें असावें असें म्हणतात.

क्रूर व जुलमी असूनहि आपल्या निश्चयी स्वभावामुळें यानें आपला राज्यकारभार यशस्वी करून दाखवला. स्वतःस लिहितांवाचतां येत नव्हतें तरी त्यामुळें याचें कधीं अडून राहिलें नाहीं. हिंदूसंबंधीं याचें धोरण फार कडक असे. याच्या कारकीर्दींत विद्वान् मंडळीहि बरीच पुढें आली याचें कारण याची विद्येबद्दलची आवड हेंच होय. प्रथम जरी हा अशिक्षित होता तरी ही गोष्ट यास लांछनास्पद वाटून यानें आपणास जरूर तें शिक्षण घेतलें.

**अल्लाउद्दिन शहा** (दुसरा) ( १४३५-१४५७ )—बहामनी राज्यांतील हा आठवा सुलतान वक्ता, विद्येचा चहाता, नकल्या व कावेबाज असा होऊन गेला. अहमदशहा वली बहामनीचा हा पुत्र सन १४३५ च्या फेब्रुवारी महिन्यांत तख्तावर बसला. सन १४३६ मध्यें यानें कोंकणपट्टी जिंकण्यासाठीं दिलावरखान

नामक आपल्या सरदारास पाठवलें असतां त्यानें सोनखेडच्या राजाची रूपवती कन्या शहास नजराणा म्हणून पाठवून दिली. तिच्यावर लवकरच शहाची मर्जी बसली व त्यामुळें शहाची पट्टराणी मलिकाजंहान हिनें "शहा आपल्यास विचारीत नाहीं" म्हणून आपला बाप खानदेशाचा सुलतान नशीरखान याजकडे कागाळी केली. तेव्हां शहास त्रास देण्याच्या हेतूनें नशीरखानानें गुजरातच्या व वऱ्हाड प्रांताच्या कांहीं सरदारांना आपल्या कटांत सामील करून घेऊन वऱ्हाड प्रांत जिंकण्याचा बेत केला. तेव्हां शहानें मलीक-उत्-तुजार नामक आपल्या सरदारास नशीरखानावर पाठवून त्याचा पराभव केला. याच सरदाराच्या साहाय्यानें शहानें विजयनगरचा राजा दुसरा देवराय याच्याशीं लढून पूर्वीची थकलेली खंडणी वसूल केली. विजयनगरच्या युद्धानंतर शहानें मैमून उल्ला दक्षणी यास त्याच्या समुद्र-किनाऱ्यावरील सर्व किल्ले हस्तगत करण्याच्या कामांत मदत करण्यासाठीं मलिक-उत्-तुजार यास मोठ्या सैन्यानिशीं पाठवलें. तुजारनें जुन्नर शहराजवळ किल्ला आपल्या ताब्यांत घेऊन तेथून कोंकणांत अनेक टोळ्या पाठवून पुष्कळ राजांना आपल्या वर्चस्वाखालीं आणलें. या कोंकणच्या स्वारींत अनेक भानगडी निर्माण झाल्यानें दरबारच्या मंडळींत असंतोषाचें बीज पेरलें गेलें व यामुळेंच शेवटीं बहामनी राज्याचा अंत झाला.

सन १४५५ मध्यें शहा हा पायावर एक पुळी उठून मरण पावल्याची बातमी पसरल्यावरून नवलगुंद व तेलंगण या सुभ्यांत बंडें माजलीं. या बंडांत खानदेशच्या व माळव्याच्या सुलतानांचेंहि अंग होतें. शहानें या बंडाचा तात्काळ मोड केला.

शेवटीं पायास झालेला व्रण फार चिघळून शहा मरण पावला. यानें हिंदूंना फार छळलें. मात्र धर्मकृत्यें यानें बरींच केलीं. भिक्षागृहें, औषधपाण्याच्या सोयी यांसारख्या लोकहिताच्या गोष्टीहि यानें केल्या. इतरांना दारू पिण्यास यानें मनाई केली होती. परंतु हा स्वतः मात्र दारू पीत असे.

**अल्स्टर**—आयर्लंडपैकीं उत्तरेकडल्या एका प्रांताला हें नाव आहे. त्याचें क्षेत्रफळ ५३३१६२६ एकर आहे. यापैकीं बराचसा उत्तर भाग आयर्लंड या स्वतंत्र राज्यांत मोडतो. पण अल्स्टरपैकीं ३ परगणे आयरिश फ्री स्टेट या राज्याच्या मालकीचे आहेत. आयरच्या ताब्यांतील अल्स्टरचें क्षेत्रफळ १९७९७२८ एकर असून लो. सं. २६५६५४ (१९४३) आहे.

**अल्ह**—बुंदेलखंडांतील एक वीरपुरुष. अल्ह व उदल हे महोबाचा राजा परमाल याच्या पदरीं असलेले दोन पराक्रमी सरदार होत. कांहीं दरबारी लोकांच्या चहाड्यांमुळें यांच्यावर राजाची अवकृपा झाली व यांना कनोजचा राजा जयचंद्र याच्या दरबारचा आश्रय घ्यावा लागला. याच वेळीं चंदेल प्रांतावर पृथ्वीराजाची स्वारी झाली. झालेल्या लढाईत परमाल राजाचा पराभव झाला. तेव्हां राजानें अल्ह व उदल यांना आपल्या साहाय्यास बोलावलें. अल्ह व उदल हेहि पूर्वीचा आपला अपमान विसरून परमालच्या मदतीस धांवले. या वेळीं मोठी निकराची लढाई होऊन त्यांत उदल हा मरण पावला. अल्ह मात्र शेवटपर्यंत लढला. मोहनास्त्राचा उपयोग करून त्यानें पृथ्वीराजाच्या सैन्यास निद्रावश करून टाकलें. शेवटीं आपला गुरु गोरखनाथ याच्या अनुज्ञेनुसार अल्हानें शस्त्र खालीं ठेवलें, तेव्हां युद्ध थांबलें. पृथ्वीराजरासोमध्यें याचा वृत्तान्त आहे.

**अल्हाजन** (मृ. १०३८)—अकराव्या शतकांतील एक अरबी गणितज्ञ व सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ. बसरा शहरांत याचा जन्म झाला. यानें दृक्शास्त्रामध्यें लावलेले शोध सर्वमान्य झाले आहेत. सूर्यचंद्रादिक क्षितिजावर मोठे कां दिसतात याची कारणमीमांसा यानेंच सांगितली. आपणांस एखादा पदार्थ दिसतो, याचें कारण आपल्या नेत्रांतून निघणारे किरण त्या पदार्थावर पडतात, हें होय, अशी त्या वेळीं समजूत होती. परंतु यानें ही समजूत खोटी ठरवून पदार्थावरून निघणारे किरण आपल्या डोळ्यांत शिरतात व त्यामुळें तो पदार्थ आपणांस दिसतो हें सिद्ध करून दाखवलें. संधिप्रकाश निर्माण होण्याचें कारण प्रकाशकिरण हवेंतून जात असतांना होणारें त्यांचें वक्रीकरण हें होय, हें यानें सर्वांना पटवून दिलें. भूमितीवरहि यानें बरेंच लिखाण केलें आहे.

**अवचितगड**—कुलाबा जिल्ह्यांतील रोहें गांवापासून तीन मैलांवर कुंडलिका नदीच्या उत्तर तीराच्या बाजूला असलेला एक तटबंदी किल्ला. हा शिवाजीनें शेख महंमद नांवाच्या कारागिराकडून बांधवला असें म्हणतात. फेब्रुवारी १८१८ मध्यें कर्नल प्रॉथरनें सुरगड, पालीचा व भोराईचा किल्ला यांचा ताबा घेतला त्याच वेळीं हाहि किल्ला त्याच्या हातीं पडला.

हा किल्ला ९७७ फूट उंचीवर असून याची तटबंदी ६०० यार्ड लांब आहे. ही तटबंदी ८०० ते १००० फूट उंचीवर आहे. किल्ल्याचे बुरुज भरभक्कम असून दक्षिणेकडील एका बुरुजाच्या भिंतींत सन १७९६ मधील एक शिलालेख आहे. किल्ल्याच्या उत्तर बाजूस कांहीं जुन्या तोफा आहेत, तसेंच किल्ल्यावर कांहीं पडक्या इमारती व दक्षिणोत्तर ३०० यार्ड लांबीचा व पूर्वपश्चिम १०० यार्ड रुंदीचा असा एक अंतर्दुर्ग उर्फ बालेकिल्ला आहे. या बालेकिल्ल्यावर बापूजी हवालदारांची समाधि असून या समाधीस सरकारकडून ३२ रुपयांची नेमणूक आहे. या समाधीसमोर असलेल्या दीपमालेच्या पायथ्याशीं बापूराव पाशिलकरांचा खोदीव पुतळा बसवलेला आहे. बालेकिल्ल्याच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांत महादेव, गणपति, पार्वती व व विष्णु यांचें एक देवालय आहे.

**अवचितसुत काशी**— अवचितराव नांवाचा भारमगांवच्या देशमुखाचा हा मुलगा एक महाराष्ट्र संतकवि म्हणून प्रसिद्ध आहे. आपल्या बापाबरोबर हा कांहीं दिवस दिल्लीस औरंगजेबाच्या कैदेंत होता. हा चंद्रवंशी क्षत्रिय जातीचा असून याचें आडनांव सोळंखी असें होतें.

द्रौपदी-स्वयंवरावरील दोन मोठाल्या ग्रंथांमुळें हा प्रसिद्धीस आला. याच्या या ग्रंथांपैकीं पहिला चौदा अध्यायांचा असून श्लोकबद्ध आहे व दुसरा २९ अध्यायांचा असून ओवीबद्ध आहे. द्रौपदी-स्वयंवर हा ग्रंथ यानें शके १६१८, पौष वद्य १०, गुरुवार या दिवशीं लिहून पूर्ण केला. प्रासादिक व रसाळ वाणी, तसेंच बहारीची अलंकारयोजना हे यां कवीचे गुणविशेष होत. या ग्रंथाखेरीज यानें कांहीं पदेंहि केलीं आहेत. त्यांत 'हरिची भगिनी म्हणे सुभद्रा' हें पद विशेष प्रसिद्ध आहे. हा कवि महानुभावपंथाचा होता.

**अवतार**—अवताराची कल्पना केवळ हिंदूंमध्येंच आहे असें नाहीं तर सर्व धर्मांतून आहे. देवानें या पृथ्वीतलावर भौतिक रूप, सगुण रूप धारण करणें म्हणजे अवतार घेणें होय. हा अवतार कांहीं कारणांसाठीं व कांहीं काळच टिकणारा असा असतो. हिंदु धर्मांत मत्स्यकच्छादि विष्णूचे मुख्य दहा अवतार मानले आहेत. इतर देवादिकांचेहि अवतार पुष्कळ आहेत व त्यासंबंधीं पुराणें झालेलीं आहेत. मूर्तिपूजक समाजांत या अवतारांच्या विशिष्ट मूर्ती असतात.

ख्रिस्ती धर्मांत अवतार म्हणून त्रिमूर्तींपैकीं दुसऱ्या मूर्तीच्या मार्फत पूर्णपणें देह व आत्मा यांसुद्धां मनुष्यरूप व स्वभाव धारण करणें होय. येशू ख्रिस्त वास्तविक परमेश्वर व वास्तविक मानव आहे. त्याच्या ठिकाणीं परमेश्वर पूर्णपणें मानवाशीं ऐक्य पावला आहे. आणि तो त्यामार्फत स्वतःला मनुष्यांकरितां प्रकट करतो व मानवाला दैवी जीवित देतो व मनुष्य हा परमेश्वराशीं ऐक्य पावतो आणि दैवी जीवनामध्यें अंशभागी होतो. ख्रिस्ती संप्रदायामध्यें येशू ख्रिस्ताचें पूर्णपणें दैवीरूप आणि मानवत्व या दोन्ही गोष्टी मान्य करण्यांत आल्या आहेत. त्याच्या दैवी अंशामुळेंच त्याला ईश्वरास प्रकट करतां येतें व मानवास दैवी जीवन प्राप्त करून देतां येतें, आणि त्याच्या मानवी अंशामुळेंच त्यास एका नवमानवजातीस प्रारंभ करतां येतो व आपल्या वंशामध्यें नवचैतन्य निर्माण करतां येतें. यावरून अवतार म्हणजे येशू ख्रिस्तामार्फत मोक्ष मिळविणें या तत्त्वाचा मुख्य आधार आहे.

**अवंती**—पौराणिक कालापासून सुप्रसिद्ध असलेली माळव्यांतील एक नगरी व सुविख्यात राजा विक्रमादित्य याची राजधानी. अनेक संस्कृत कवींनीं या नगरीच्या वैभवाचें वर्णन केलेलें दिसून येतें. हें शहर पूर्वी, हल्लीं आहे त्या जागेच्या दक्षिणेस एक मैल अंतरावर होतें. महाकालेश्वर नांवाचें येथील ज्योतिर्लिंग फार पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. येथें असलेला विक्रमादित्याचा संगमरवरी पुतळा मुसलमानांनीं फोडून उध्वस्त करून टाकला.

मोक्षदायक सतपुऱ्यांत अवंतीची गणना आहे. महाभारतकालीं या अवंतीराष्ट्राचा विस्तार दक्षिणेस नर्मदेच्या किनाऱ्यापर्यंत व पश्चिमेस महानदीच्या किनाऱ्यापर्यंत झालेला होता. या राष्ट्राची राजधानी अवंतिका नगरी होती व या राष्ट्रांत राहणाऱ्या लोकांना आवंत्य असें म्हणत. त्या वेळीं एक व्यापारी पेठ म्हणूनहि अवंतीला महत्त्व होतें. बौद्ध धर्माचा उदय झाल्यावर हिंदुस्थानचे जे सोळा विभाग पाडले होते त्यांत अवंती हा एक होता व याची राजधानी उज्जयिनी नगरी ही होती. चंडप्रद्योत नांवाचा राजा त्या वेळीं अवंतीवर राज्य करीत असे. उज्जनी पहा.

**अवंतीवर्मा**—काश्मीरचा एक न्यायी व कर्तृत्ववान् राजा. काश्मीरचें कर्कोटक घराणें नाश पावल्यावर अवंतीवर्म्यानें आपल्या उत्पल घराण्याची काश्मीरच्या सिंहासनावर प्रस्थापना केली. उत्पल हा अवंतीवर्म्याचा आजा असून कर्कोटक घराण्याचा मंत्री होता. त्यानेंहि पूर्वी एकदां कर्कोटकांची गादी बळकवण्याचा प्रयत्न केलेला होता. अवंतीवर्मा गादीवर आल्यावर त्यानें आपल्या बुद्धिमान् व कर्तृत्ववान् मंत्र्यांच्या साहाय्यानें लोकहिताच्या अनेक गोष्टी केल्या. जमीनमहसुलाच्या पद्धतींत सुधारणा, वं कालवे, पाटबंधारे यांसारख्या सोयी करून त्यानें लोकांच्या होणाऱ्या गैरसोयी दूर केल्या.

हा राजा वृत्तीनें धार्मिक, निरिच्छ व अहिंसेचा प्रतिपादक होता. यानें शिवाचीं व विष्णूचीं अनेक मंदिरें बांधलीं. आपलीं छत्रचामरेंखेरीजकरून यानें आपलें सर्वस्व ब्राह्मणांना दान केलें. व राज्यांत प्राण्यांची हिंसा करण्यास बंदी केली. भट्ट कल्लट यासारखे अनेक सिद्ध पुरुष याच्या कारकीर्दींत जन्मास आले. आपलें सर्व आयुष्य अवंतीवर्म्यानें धर्माचरणांत घालवलें. शेवटीं लौकिक शक ५९ त आषाढ शुक्ल ३ स भगवद्गीतेचें पारायण चाललें असतांना याला सुखानें मृत्यु आला.

**अवधूत**— १. याला ज्ञानेंद्रसरस्वती असेंहि म्हणतात. याचें पूर्वीचें नांव भैरव असें असून सातारा जिल्ह्यांतील विटें गांवचें कुलकर्णीपद याच्याकडे होतें. याचे ज्ञानसागर व ज्ञानसागरानंद हे दोन सुप्रसिद्ध ग्रंथ होत. याच्या ग्रंथावरूनच याला ज्ञानसागर हें आडनांव पडलें. हा चैतन्य संप्रदायांतील होता.

२. निरंजन या नांवानें हा प्रसिद्ध आहे. गुरु गोविंदाचा हा शिष्य स्वतःस अवधूतनिरंजन असें म्हणवी. कपिलगीता हा ग्रंथ, मूलस्तंब, अभंग, फटके, वगैरे लिखाण यानें केलें.

३. सर्वसाधारणपणें धर्माच्या नांवाखालीं भिक्षा मागणाऱ्या कोणत्याहि भिकाऱ्याला अतीत किंवा अवधूत म्हणण्याची पद्धत आहे. अवधूतांत शैव व वैष्णव या दोन्ही पंथांचे लोक दिसून येतात. अवधूत म्हणजे जातगोत फेंकून दिलेला व निरिच्छ असें समजतात. शैव अवधूत मोठाल्या जटा वाढवून अंगावर कमी वस्त्रें वापरतात. तसेंच शरीराच्या उघड्या भागास हे माती फांसतात, मौनव्रत पाळून हे भिक्षेवर निर्वाह करतात. दत्त हें यांचें उपास्य दैवत.

जातिभेद धर्मपंथांतून नष्ट करण्याचा प्रयत्न रामानंदानें केला. यानें आपल्या संप्रदायांतून निसर्ग व समाज यांच्या जाचक बंधनांना दूर केलें. याच्या अनुयायांना 'अवधूत' (वैष्णव) असें म्हणत. या रामानुजी वैष्णव अवधूतांचें उपास्य दैवत राम व मारुति असे.

**अवन**—हिंदुस्थानांतील कोणत्याहि जातीशीं आपला कांहींएक संबंध नाहीं असें समजणारी पंजाबांतील एक जात. अवन लोक आपणास अलीचा एक वंशज कुतुबशहा याचे वंशज समजतात. अवन जातीच्या उत्पत्तीबद्दल मध्यंतरीं मोठे वाद माजले होते. हे मूळचे जाट आहेत, असें कांहीं समाजशास्त्रज्ञ समजतात. जाट लोकांत अजूनहि अवन नांवाची एक पोटजात आहे. यांचें वास्तव्य फार प्राचीन काळापासून मिठाच्या पर्वताच्या उत्तरेस असलेल्या पठारावर होतें. अवन हा शब्द संस्कृत भाषेंतील असून त्याचा अर्थ रक्षण असा आहे. अवनांनीं मुसलमानांच्या स्वाऱ्यांस विरोध केला व हिंदूंचें संरक्षण केलें म्हणून संरक्षक या अर्थी या लोकांना अवन हें नांव पडलें असावें असा यांचा एक तर्क आहे. मुसलमानांच्या स्वाऱ्यांनंतर सय्यद कुतुबशहानें अवनांना मुसलमान धर्म स्वीकारण्यास भाग पाडलें असावें. तेव्हांपासून अवन हे मुसलमान झाले व आपणांस कुतुबशहाचे वंशज म्हणवूं लागले, असें म्हणतात. परंतु मूळचे हे जाट अगर रजपूत वंशांतीलच असावेत याबद्दल यांच्या जुन्या चालीरीतीसुद्धां साक्ष देतात. अहीर, भाट, चांद, हरपाळ, पसवल, कलाल, करहत, इत्यादि पोटजाती अवनांमध्यें आहेत.

**अवलोकितेश्वर**—अवलोकितेश्वर ही बौद्ध लोकांची एक दैवत-कल्पना असून याचा अर्थ सर्व जगाचें करुणामय दृष्टीनें निरीक्षण करणारा ईश्वर असा आहे. बौद्ध लोक या शक्तीलाच ब्रह्म समजतात. अवलोकितेश्वराला अनेक रूपें दिल्याचें दिसून येतें. याच्या एका हातांत कमळ असून दुसऱ्या हातानें तो अनुग्रहाची खूण करीत आहे. याच्या हातांतून पडणारें अमृत एक प्रेत पीत आहे असें याचें वर्णन केलेलें आहे; तर कांहीं ठिकाणीं शंकराप्रमाणें यास चार हात असून आपल्या दोन हातांचीं यानें ओंजळ केली आहे. दुसऱ्या दोन हातांत पद्म व रुद्राक्षमाळा आहे असेंहि याचें वर्णन आढळतें. या रूपांखेरीज हा हालाहल, नीलकंठ, पद्मनर्तेश्वर यांचींहि रूपें घेतो असें म्हणतात. हाच जगांचा उत्पादक असून याच्या डोळ्यांतून चंद्र व सूर्य निघाले, त्यांयांतून ब्रह्मदेव प्रकट झाला व महेश्वर हा याच्या कपाळापासून निघाला असें मानतात. हा विद्यासागर असून सर्वशक्तिमान् आहे. गूढविद्या यास अवगत असून त्यायोगें दैत्यांवर याचें वर्चस्व चालतें, अशा याजबद्दलच्या कल्पना आहेत. कांहीं महायान ग्रंथांमध्यें यास सर्व बोधिसत्वांत सर्वश्रेष्ठ असें मानलेलें आहे. अवलोकित हा बौद्धांचा शिव समजतात.

**अवशिष्ट हक्क**— कायद्यांत, जमिनीचा मालकी हक्क किंवा कसणुकीचा हक्क, किंवा इमारतीचें भाडें, किंवा जमिनीचा खंड घेण्याचा हक्क एका इसमाच्या मृत्यूनंतर दुसऱ्या इसमाला मिळण्याची कायदेशीर व्यवस्था करतात त्याला 'रिमेंडर' म्हणतात. उदा., एक इस्टेट 'अ'च्या मालकीची तो 'आ'ला देतो आणि 'आ'च्या हयातीनंतर ती इस्टेट 'ई'ला मिळावी अशी कायदेशीर योजना करतो व त्या योजनेप्रमाणें ती इस्टेट निरनिराळ्या इसमांना मिळत जाते.

**अवसरी**—मुंबई प्रांत. पुणें जिल्ह्यांतील खेडच्या ईशान्येस १५ मैलांवर असलेला एक लहानसा गांव. खुर्द आणि बुद्रुक अशीं दोन गांवें आहेत. सन १८६२ पर्यंत हें पेट्याचें मुख्य ठिकाण होतें. या गांवाच्या पश्चिम शिवेवर जें भैरवाचें देऊळ आहे तें शंभर वर्षांपूर्वीं शंकरशेट नांवाच्या लिंगायत वाण्यानें बांधलेलें आहे. अवसरीची लो. सं. ३४६५ व खुर्दची ४२७६ आहे.

**अवस्थांतर**— १. वनस्पतिविषयक—ही घटना खालच्या जातीच्या वनस्पतींत (थॅलोफायटीस) क्वचित् आढळते. परंतु जरा प्रगत वनस्पतींमध्यें (कॉर्मोफायटीस) वरचेवर दृष्टीस पडते. नेचांमध्यें ही स्पष्टपणें दृष्टीस पडते. या वनस्पतींच्या जीवनामध्यें दोन अवस्था स्पष्टपणें नजरेस पडतात. आपल्या नेहमीं परिचयाचें नेचाचें रोप हें नपुंसक अथवा अलिंगी पिढींतील अथवा अवस्थेंतील असून (स्पोरोफाइट) याचा या अवस्थेंत अंत होतो व तें पुढें दुसऱ्या अवस्थेमध्यें अलिंगी एकपेशीमय वनस्पतींत (स्पोअर्स) रूपांतर पावतें. जेव्हां या एकपेशीमय वनस्पतींची लागवड करण्यांत येते तेव्हां या वनस्पतींपासून नवीन नेचांचें रोप तयार न होतां एकपेशीमय घटना असलेल्या नव्या वनस्पतीस (प्रोथालस अथवा गॅमेटोफाइट) जन्म मिळतो. यापासून ॲन्थेरिडिया आणि आर्केगोनि यांतील अंडपेशीपासून

गॅमेट्स म्हणजे स्पर्मॅटोझॉइड्स निर्माण होतात. याच्या उलट शेवाळामध्यें व लिव्हर वॉर्टसमध्यें वनस्पति ही गॅमोफाइट असते आणि स्पोरोफाइट किंवा स्पोरोगोनिअम हें कधींहि स्वतंत्र होत नाहीं. परंतु एकपेशीमय वनस्पतींचीच वाढ व प्रसार करीत असतें.

२. प्राणिविषयक—जेव्हां एखाद्या प्राण्याच्या जीवनक्रमांत दोन किंवा अधिक अशा भिन्न अवस्था आढळून येतात कीं, त्यांचें पुनर्जनन अगदीं निरनिराळ्या पद्धतीनें होऊं लागतें व त्या अगदीं निरनिराळ्या जाती असाव्यात असें वाटूं लागतें तेव्हा या दोन स्थितींस अवस्थांतर म्हणून संबोधण्यांत येतें. अलिंगी प्राण्याचें सलिंग प्राण्यामध्यें अवस्थांतर होणें यास उत्तरावस्था (मेटाजेनिसिस) म्हणतात. भिन्नावस्था अथवा भिन्नजनन (हेटेरोजेनेसिस) हाहि एक अवस्थांतराचा प्रकार आहे. ज्या ठिकाणीं जीवनक्रमामध्यें अशी एक लैंगिक अवस्था असते कीं, तीमध्यें अंडीं सबीज किंवा सफल होतात एवढेंच नव्हे तर अशा कांहीं माद्या असतात कीं, ज्यांमध्यें अंड्यांची वाढ सबीज झाल्याशिवाय किंवा सफल झाल्याशिवायहि होते म्हणजे असंभोगजनन होतें तोहि एक अवस्थांतराचा प्रकार आहे.

**अवा जहागीर**— संयुक्त प्रांतांतील या जहागिरीचें क्षेत्रफळ २६५ चौरस मैल इतकें आहे. जालंसरच्या सुभेदाराचा वैद्य चतुर्भुज याचा नातू भक्तसिंग यानें मराठ्यांच्या संमतीनें येथें किल्ला बांधला होता. सन १८०३ मध्यें व सन १८५७ च्या क्रांतियुद्धाच्या वेळीं येथील राजाचें इंग्रजांना चांगलेंच साहाय्य झालें.

या जहागिरीचा अधिपति अवा येथें राहतो. जहागिरीचें मुख्य ठिकाण जालसर हें आहे.

**अविधवा नवमी**—भाद्रपद महिन्यांतील (पितृपक्षांतील) वद्य नवमी ही अविधवा नवमी या नांवानें ओळखली जाते. या दिवशीं ज्याचा बाप जिवंत आहे, परंतु आई मृत झाली आहे अशा मुलानें आपल्या मृत सुवासिनी आईचें श्राद्ध करावयाचें असतें.

**अव्वल मसुदा**—(प्रोटोकोल). परराष्ट्रीय राजकारणांत 'प्रोटोकोल' याचा अर्थ तहासारख्या राजकीय घटनेचा मूळचा मसुदा असा आहे. १९२४ सालीं राष्ट्रसंघाच्या असेंब्लीनें 'प्रोटोकोल फॉर दि पॅसिफिक सेटल्मेंट ऑफ इंटरनॅशनल डिस्प्यूट्स' हा तहनामा मान्य केला. परंतु ब्रिटननें तो मान्य करण्याचें नाकारलें. नंतर ब्रिटननें १९२५ सालीं लोकार्नो येथें वेस्टर्न नेशन्स सिक्युरिटी पॅक्ट हा तहनामा पुढें मांडला.

**अव्वैयार**—नीतिशास्त्र, ज्योतिषशास्त्र, वैद्यकशास्त्र, भूगोल, धातुवाद, रसायनविद्या, कल्पविद्या, इत्यादि अनेक शास्त्रें व विद्या यांत पारंगत असलेली द्राविडी वाङ्मयांतील एक नामांकित प्राचीन विदुषी. हिचा जन्म पिरली नांवाचा एक ब्राम्हण व एक अतिशूद्र जातीची स्त्री यांच्यापासून झाला. ही जन्म पावतांच पिरलीनें हिला एका अरण्यांत नेऊन टाकलें. तेथें एका कवीच्या ही दृष्टीस पडली व त्यानें हिला वाढवली. हिची अलौकिक बुद्धि पाहून त्या कवीनें हिला विद्या शिकवली व त्यानंतर आपल्या सद्गुणांमुळें ही प्रसिद्धीस आली. मरेपर्यंत हिनें ब्रह्मचर्यव्रताचें पालन करून आपलें आयुष्य विद्याभ्यासांत खर्ची टाकलें. अत्तिसुदि, कोनिवेंडन मदूरसी, नाद्वाली हे हिचे नीतिशास्त्रावरील ग्रंथ विद्वन्मान्य झाले असून तामिळ प्रांतांतील विद्यालयांतून हे शिकवले जात असत. आपल्या कल्पविद्येच्या साहाय्यानें ही स्त्री २४० वर्षें जगली असें सांगतात.

**ॲव्हरोज** (११२६–११९८)—अरबी वाङ्मयास जागतिक महत्त्व प्राप्त करून देणारा एक पंडित व प्रसिद्ध टीकाकार. याचें पूर्ण नांव अबुल वलीद महंमद इब्न अहमूद इब्न महंमद इब्न रशीद असें असून हा स्पेनमधील कॉर्डोव्हा येथें जन्मला. हा अलफलसिफा पंथाचा असून ग्रीक विद्या मध्ययुगीन युरोपास मिळण्यास याचेच परिश्रम कारणीभूत झाले. अगदीं लहान वयांतच यानें वेदान्त, गणित, कायदा, वैद्यक, तत्त्वज्ञान, इत्यादि विषयांचा चांगला सूक्ष्म अभ्यास केला होता. तो मुख्य काजी असतांना त्यानें आपलें लिखाण सुरू केलें. मोरोक्कोचा अमीर याकुब यूसफ याचा वजीर इब्न टुफेल नांवाचा तत्त्वज्ञ याचा मित्र होता व त्याच्याच प्रोत्साहनामुळें ॲव्हरोजनें आरिस्टॉटलवरील टीकाग्रंथ लिहिले. या टीकाग्रंथांमुळेंच पश्चिमेकडे याची वाहवा झाली. 'तहाफत अल् तहाफत' यासारखे पुरोगामी विचारांचे ग्रंथ लिहिल्यामुळें पुराणमताभिमानी काजींचा विरोध यास सहन करावा लागला. वैद्यक, ज्योतिष व कायदा या विषयांवरील याचे ग्रंथ याच्या विद्वत्तेची जाणीव करून देतात. राजकारणांतील याचीं मतें प्लेटोच्या मताशीं जुळत असत.

**ॲव्हिग्नॉन**—फ्रान्सच्या आग्नेय भागांतील व्होक्ल्यूज विभागाचें मुख्य शहर. हें लिऑंपासून मार्सेलिसला जाणाऱ्या आगगाडीच्या रस्त्यावर आहे व ऱ्होनच्या डाव्या तीरावर वसलेलें आहे. १३०९-१३७७ पर्यंत पोपचें येथें वास्तव्य असे. मुख्य न्यायकचेरी, व्यापारी न्यायकचेरी, वणिक् सभा, फ्रान्सच्या पेढीची शाखा, इत्यादि महत्त्वाच्या संस्थांमुळें या शहराचें महत्त्व वाढलेलें आहे. येथें काल्व्हेट नांवाचें पदार्थसंग्रहालय असून त्यांत भौतिक शास्त्रवेत्ता एफ्. काल्व्हेट याचे संग्रह, शिलालेख व प्राचीन कांचेचे अवशेष पाहावयास मिळतात. येथील पोपचा महाल व जीन आल्थेन या इराणी गृहस्थाचा पुतळा पाहाण्याजोगा आहे. सुप्रसिद्ध जॉन स्टुअर्ट मिल याच शहरांत सन १८७३ मध्यें मरण

पावला. या भागांत रेशमाचा धंदा महत्त्वाचा आहे. लो. सं. सुमारें ६०,००० आहे.

**अव्हिसेन्ना** (९८०-१०३७)— एक अरब तत्त्वज्ञानी व वैद्य. यानें सुमारें शंभर पुस्तकें लिहिलीं असून त्यांपैकीं 'अश-शिफा' व 'इशारात' हीं दोन सुप्रसिद्ध होत.

अव्हिसेन्नाचा जन्म बुखारा येथें झाला. अबू अली अल् हुसेन इब्न अबदल्ला इब्न सीना असें याचें पूर्ण नांव होतें. लहानपणापासूनच याचे सद्‌गुण नजरेस येऊं लागले. वयाच्या दहाव्या वर्षींच याचें सर्व कुराण पाठ झालें होतें. नाटिली नांवाच्या एका साधूपाशीं यानें युक्लिड, तर्कशास्त्र व अल्माजेस्ट यांचें अध्ययन केलें. याच वयांत यास वैद्यकीचें ज्ञानहि झालें होतें. आरिस्टॉटलच्या तत्त्वज्ञानाची मोहिनी याजवर अतिशय असे. पुढें हमदान येथील अमीराला यानें आजारांतून बरें केल्यामुळें त्यानें यास आपला वजीर नेमलें. परंतु लवकरच याजवर कांहीं आळ आल्यानें यास अमीराच्या कैदेंत पडावें लागलें. तेथून फकिराच्या वेषांत यानें आपली सुटका करून घेतली व इस्पाहान येथील अमीराच्या आश्रयास जाऊन राहिला. याच कालांत हा अतिशय चैनी, रंगेल व व्यसनी बनला. किमयाशास्त्र, गूढविद्या यांसारख्या विषयांतहि याला गम्य असे.

**ॲश**— या अमेरिकेंतील वृक्षाच्या लांकडाचा उपयोग खेळणीं, शिड्या, जहाजांचीं वल्हीं यांसाठीं मुख्यत्वें करतात. कारण तें हलकें व चिवट असतें. त्याची उंची सुमारें ६० फुटांपर्यंत असून पानांची लांबी आठ ते बारा इंचांपर्यंत असते. पानें वरून रंगाला काळसर असून त्यांची मागील बाजू फिकट हिरव्या रंगाची असते. हे वृक्ष रस्त्याच्या कडेला अगर सावलीसाठीं म्हणून मैदानावर लावतात. कॅनडा, संयुक्त संस्थानांपैकीं पश्चिम भागांतील संस्थानें, यांत पांढरा ॲश असून त्याच्याच दुसऱ्या जाती म्हणजे काळा ॲश, हिरवा ॲश, खरखुजी ॲश वगैरे प्रकार अमेरिकेंत दिसतात. हिंवाळ्याच्या सुरवातीला ॲशचीं काळसर पानें गळण्यापूर्वी सोनेरी, पिवळीं व नंतर निळीं होतात व शेवटीं गळून पडतात. या बदलणाऱ्या रंगांचा देखावा मनोवेधक असतो.

**अंश**—(इं. डिग्री). भूमिति किंवा त्रिकोणमिति या गणितशास्त्रांतून कोन मोजतांना हें मुख्य व्यावहारिक प्रमाण धरतात. एका काटकोनाचे ९० अंश असतात व $L = ९०°$ अशी लिहिण्याची पद्धत आहे. वर्तुलमापनाचा एकं (युनिट) रेडियन आहे व तात्त्विक (थिऑरेटिकल) कामाला तो एककोण म्हणून वापरतात. अंश आणि रेडियन यांचें प्रमाण $\pi$ रेडियन = १८०° [ $\pi$ = ३.१४१५९ = वर्तुळाच्या परिघाचें त्याच्या व्यासाशीं प्रमाण ] असें पडतें. १ अंश (°) = ६० मिनिटें (′) व १ मिनिट = ६० सेकंदें (″) अशी अंशाची पोटविभागणी आहे.

**अशीरगड**—मध्यप्रांतांतील हा एक मजबूत किल्ला बऱ्हाणपूरच्या ईशान्येस बारा मैलांवर सातपुडा डोंगरांतील एका अलग टेकडीवर, ८० ते १२० फूट उंचीच्या एका कड्यावर बांधलेला आहे. या गडास जी. आय्. पी. रेल्वेवरील चांदणी स्टेशनपासून जातां येतें. चांदणी स्टेशनपासून अशीरगड सहा मैलांवर येतो. या किल्ल्यास एकांत एक असे तीन तट असून प्रत्येक कोपऱ्यावर बुरूज व त्यावर तोफा आहेत. किल्ल्यावरील जमीन सुमारें ६० एकर क्षेत्रफळाची असून वर जाण्यास फक्त दोनच वाटा आहेत. वर सहा टांक्या, शहाजहानच्या वेळची एक मशीद, एक मोठी तोफ व कांहीं शिलालेख दिसून येतात. या गडाच्या पायथ्याच्या पश्चिम बाजूस अशीरगड नांवाचें सुमारें २,००० वस्तीचें एक लहानसें गांव वसलेलें आहे. अशीरगडावरील हवा आरोग्यदायक आहे.

ख्रि. पू. १६०० पासून या गडाची मालकी क्षत्रिय राजांच्याकडे होती. त्यानंतर चौहान राजा तुंतुरपाल, हाडा घराण्याचा संस्थापक इष्टपाल, अल्लाउद्दिन खिलजी, नासिरखान फरूकी, बाळाजी बाजीराव, वगैरेंनीं या किल्ल्यावर स्वामित्व गाजवलें व सन १८१९ मध्यें ब्रिटिशांच्या ताब्यांत हा गड गेला.

**अंशुमान**— इक्ष्वाकु कुळांतील सगर राजाचा पौत्र व असमंजाचा पुत्र. यानें सगराचा अश्वमेधीय अश्व परत आणिला व त्याचे साठ हजार पुत्र कपिलशापानें भस्म झाले होते. त्यांचा उद्धार करण्यासाठीं गंगा पृथ्वीवर आणण्याची खटपट केली. परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं. त्याचा पुत्र दिलीप रघुवंशीय प्रख्यात राजा होऊन गेला. दिलीपपुत्र भगीरथ यानें गंगा पृथ्वीवर आणून अंशुमानाची इच्छा पूर्ण केली.

**अंशुवर्धन**—नेपाळच्या ठाकुरीच्या वंशांतील हा पहिला राजा होय (इ. स. ७ वें शतक). शेवटल्या सूर्यवंशी राजाचा हा जामात फार विद्वान् व शूर होता. हर्षाचा हा मांडलिक होता व त्याच्या पश्चात् स्वतंत्र झाला. याची राजधानी मध्यलखु होती. यानें शब्दविद्याशास्त्र नांवाचा ग्रंथ लिहिला आहे.

**अशोक**—१. पौराणिक कालापासून आजतागायत आपल्या सौंदर्यामुळें व उपयोगामुळें सुप्रसिद्ध असलेला एक वृक्ष. हा वृक्ष दिसावयाला आम्रवृक्षाप्रमाणेंच असतो. याचीं पानें आंब्याच्या पानांपेक्षां थोडीं लांब, कुरळीं व तकतकीत अशीं असतात. याला लाल किंवा भगव्या फुलांचे घाटोळे घोंस येतात. स्त्रियांनीं याला लाथ मारली म्हणजे हें फुलतें असें संस्कृत कवी सांगतात. हा वृक्ष हिंदुस्थानच्या समुद्र-किनाऱ्यालगत आणि उत्तर ब्रह्मदेशांत सहसा आढळतो. हिंदु आणि

बौद्ध धर्माचे लोक अशोक वृक्ष पवित्र मानतात. कारण गौतम बुद्धाचा जन्म अशोक वृक्षाखालीं झाला अशी आख्यायिका आहे. देवळाच्या आवारांत अगर बगिच्यांत बहुधा हीं झाडें असतात. हा वृक्ष औषधी असून याचा स्त्रीरोगांवर विशेष उपयोग होतो.

अनेक प्राचीन कवींच्या काव्यांत या वृक्षानें स्थान मिळवलें आहे.

२. (खि. पू. २७२-२३२)—भरतखंडांतील एक महान् संम्राट्. चंद्रगुप्त मौर्याचा हा नातू व बिंदुसाराचा पुत्र होता. मौर्य वंशांतील हा तिसरा राजा होय. सिलोन येथील बखरी व बौद्ध वाङ्मय यांच्या साहाय्यानें याजविषयीं व यानें अंगीकारलेल्या कार्याविषयीं आपणांस बरीच माहिती मिळूं शकते. प्रथम अशोक हा तक्षशिलेचा व नंतर उज्जनीचा सुभेदार होता. उज्जनीस यानें वेदिस येथील एका वैश्य स्त्रीशीं विवाह केला. याच वैश्य स्त्रीपासून यास महेंद्र व संघमित्रा हीं अपत्यें झालीं असें सिलोनच्या बखरींत म्हटलेलें आहे. खि. पू. २७३ मध्यें आपल्या बापाच्या मरणानंतर तक्षशिलेच्या सुभेदारीवर असलेल्या आपल्या भावास युद्धांत जिंकून यानें बापाची गादी मिळविली व खि. पू. २६९ सालीं स्वतःस राज्याभिषेक करविला. पुढें खि. पू. २६१ मध्यें कलिंग देश जिंकतांना युद्धांत जी अपरिमित मनुष्यहानि झाली तीमुळें हिंसामय युद्धाविषयीं यास अत्यंत वीट येऊन बौद्ध धर्माकडे हा वळला.

अशोकानें स्वतः बसवलेल्या धर्मनियमांस 'धम्म' असें प्राकृत नांव होतें. यज्ञयागादि कर्में व देवतायजनादि कर्में न करतांहि मनुष्यास संसारांत राहून, मनावर संयम ठेवून व सत्य, अहिंसा, सहिष्णुता यांसारख्या तत्त्वांचें अवलंबन करून मोक्ष मिळवतां येतो, अशी याची विचारसरणी होती. अशोकानें आपल्या शिलाशासन-लेखांमध्यें धम्मासंबंधींच्याच आज्ञा कोरलेल्या दिसून येतात. धम्म शब्दाचा अर्थ असा कीं, सामान्य मनुष्याच्या बुद्धीला व भावनेला स्वाभाविक रीतीनें आकलन होणारें असें आचरण. अशोकाच्या या धम्माच्या प्रसाराचें काम बौद्ध भिक्षूंनीं केलें. अगदीं थोडक्या अवधींत धम्माचीं तत्त्वें दक्षिण हिंदुस्थानांतील चोल व पांड्य यांच्या प्रदेशांत, तसेंच काश्मीर, सिंधु नदीच्या तीरावरील प्रदेश, ब्रह्मदेश, सिलोन, सिरिया, ईजिप्त, मॅसिडोनिया, वगैरेसारख्या भागांत पसरलीं. धम्माच्या शीघ्र प्रसाराचें कारण म्हणजे त्यांतील सर्वसामान्य मनुष्याला पटणारीं साधीं तत्त्वें हेंच होय.

अशोकाचे चौदा शिलाशासनलेख असून त्यांत त्यानें आपल्या तत्त्वांची माहिती कोरून ठेवलेली आहे. त्यांत पहिला अहिंसेवर, दुसरा धार्मिक कृत्यांवर, तिसरा अधिकाऱ्यांच्या पंचवार्षिक फिरतीवर, चौथा धार्मिक आचरणांवर, पांचवा धर्मकल्पनांवर, सहावा कार्यप्रवणतेवर, सातवा धार्मिक गुणांवर, आठवा धर्मयात्रांवर, नववा शुभ कार्यावर, दहावा यश आणि कीर्ति यांवर, अकरावा धर्मदानांवर, बारावा सहिष्णुतेवर व तेरावा धर्मविजयांवर असून चौदाव्या शिलालेखांत उपसंहार केलेला आहे.

अशोकाच्या वेळीं शिल्पकलेची किती उन्नति झाली होती हें त्या वेळच्या अनेक अविस्मरणीय कलाकृतींवरून दिसून येतें.

अशोकाचे शिलालेख प्राकृतांत असून ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचे आहेत. अशोकाचें साम्राज्य हिमालयापासून ते दक्षिणेकडे पालार नदीपर्यंत, तसेंच अफगाणिस्तान, उत्तर बलुचिस्तान, काश्मीर व जवळचीं खोरीं यांवर पसरलें होतें. त्यानें अनेक स्तूप आणि विहार बांधले व बौद्ध धर्म हिंदुस्थानाबाहेरहि नेला. तथापि बौद्धेतर धर्मांविषयीं तो सहिष्णुता बाळगी. त्याचा राज्यकारभार फार न्यायी व दक्ष असा असे. कलिंगाच्या मोहिमेनंतर त्यानें आपल्या हयातींत कोठेंहि रक्तपात किंवा अशांतता होऊं दिली नाहीं. त्याच्यानंतर हिंदुस्थानांत एक अकबर राजाच त्याच्या बरोबरीनें येईल. अशोकाचें धर्मचक्र आजच्या स्वतंत्र हिंदी संघराज्याच्या निशाणावरचें चिन्ह आहे.

**अशोधित धातु**—ज्या पदार्थामध्यें एक किंवा अनेक धातू मिश्र असतात अशा नैसर्गिक खनिज पदार्थास अशोधित धातु (इं. ओअर) म्हणतात. याचीं सामान्य उदाहरणें म्हणजे धातूंचीं गंधकिदें (उदा., कच्चें शिसें-गॅलेना, सुवर्ण माक्षिक) हीं होत. धातूंचीं प्राणिदें व कर्बितेंहि अनेक आढळतात. धातु जर शुद्ध स्वरूपांत आढळेल तर तिला नैसर्गिक असें म्हणतात. परंतु सामान्यतः अशोधित धातु गाळून शुद्ध बनविण्यांत येते. अशोधित धातू बहुधा खडकांच्या फटींमध्यें किंवा शिरांमध्यें आढळतात.

**अश्मदेव**—(अस्मोद्युस्). हा ज्यू लोकांच्या कथापुराणांतील दैत्यांचा राजा समजला जातो. वैवाहिक सुखांत अडथळे निर्माण करतो म्हणून हा कुप्रसिद्ध आहे. याबद्दलची जी कथा सांगतात ती अशी—सारा नांवाच्या राग्वेलच्या सुंदर कन्येवर याचें प्रेम बसलें व यानें तिचे सात नवरे लग्नाच्या रात्रींच एकामागोमाग एक असे ठार केले. तेव्हां यहुद्यांच्या धर्मशास्त्रांतील सुप्रसिद्ध टोबियस यानें माशाचें हृदय व यकृत् यांचा धूप घालून याला पळवून लावलें.

रोचक माला धारण करणारा असें याचें वर्णन झेंद अवेस्तांत केल्याचें दिसून येतें. हा क्रोधरूपी राक्षस समजला जातो. अस्मोद्युस्मधील 'द्युस्' हा शब्द आपल्याकडील 'देव' या शब्दाचा अपभ्रंश असावा.

**अश्लील वाङ्मयाचा कायदा**—या गुन्ह्याबद्दलचीं कलमें इंडियन पीनल कोडांत मूळपासून आहेत, परंतु त्या कलमांत दुरुस्ती करण्याची आवश्यकता वाटल्यामुळें या स्वतंत्र कायद्यानें तीं कलमें दुरुस्त करण्यांत आलीं. या कायद्याचें कलम २ यानें पीनल कोडाचें कलम २९२ दुरुस्त करण्यांत आलें. नवें कलम येणेंप्रमाणें— जो कोणी (ए) अश्लील पुस्तक, निबंध, अश्लील मजकूर असलेला कागद, चित्र, मूर्ति, वगैरे विकील किंवा भाड्यानें देईल, किंवा वांटील किंवा जाहीर ठिकाणीं ठेवील किंवा इतर रीतीनें त्याचा प्रसार करील, किंवा सदर उद्देशानें तें तयार करील किंवा जवळ बाळगील; (बी) असें वाङ्मय, चित्रें, वगैरेची आयात-निर्यात करील; (सी) त्याचा धंदा करून फायदा मिळवील; (डी) त्याबद्दलची जाहिरात करील; (इ) वरील प्रकारच्या कामाचा प्रयत्न करील, त्याला तीन महिनेपर्यंत कैद, किंवा दंड, किंवा दोन्ही शिक्षा आहेत. कलम ३ मध्यें (पीनल कोड कलम २९३) वरीलप्रमाणें अश्लील वाङ्मय, चित्रें, वगैरे २० वर्षांच्या आंतील इसमांना विकील, भाड्यानें देईल, वांटील, प्रसार करील तर त्याला सहा महिने कैद, किंवा दंड, किंवा दोन्ही शिक्षा आहेत. तसेंच क्रिमिनल प्रोसीजर कोडचें कलम ९८ यांत दुरुस्ती करून असलें वाङ्मय वगैरे जप्त करण्याचा अधिकार मॅजिस्ट्रेटला दिला आहे. अश्लील वाङ्मयाची व्याख्या कायद्यांत दिली नाहीं; पण इंग्लंडचे चीफ जस्टिस लॉर्ड कॉकबर्न यांनीं एका खटल्याच्या निकालांत पुढील व्याख्या दिली आहे—Whether the matter has a tendency to deprave and corrupt the mind (matter detrimental to public morals)-ज्यानें सार्वजनिक नीतिमत्ता बिघडेल, लोकांचीं मनें कुमार्गी व नीतिभ्रष्ट होतील तें वाङ्मय अश्लील होय.

**अश्वकंचुकी**— (घोडाचोळी). हें आयुर्वेदाचें अतिशय सुप्रसिद्ध औषध आहे. मुख्य औषधें पारा, बचनाग, गंधक, हरताळ, टाकणखार, जयपाळ, त्रिकटु व त्रिफळा. यांचा खल माक्याच्या रसांत करून देतात. कफाची वृद्धि होऊन त्यामुळें पोट फुगणें, तोंडाला पाणी सुटणें, डोळ्यावर झांपड असणें, इत्यादि रोगांवर, कफदोषाचें रक्षण करण्यासाठीं याचा अतिशय चांगला उपयोग होतो. यकृत्वृद्धि व प्लीहावृद्धि या दोन्ही रोगांत रेचक म्हणून हें औषध देण्याचा प्रघात आहे. लहान मुलें व म्हातारीं माणसें यांना हें औषध देत नाहींत.

**अश्वखाद्य**—(हॉर्स चेस्टनट) [वर्ग-सापिंडासी]. हें झाड फार सुंदर असून याला मोठालीं एकासमोर एक अशीं बोटासारखीं दुभागलेलीं पानें असतात. व अग्रभागीं पांढरे, पिंवळे किंवा तांबडे फुलांचे तुरे असतात. यांच्या बिया गुरांस खावयास घालतात. त्या कडू असतात. या झाडाची साल कडू व तुरट असून तापावर दिली असतां ताप उतरतो.

**अश्वगंधा**— आस्कंद, अजगंध, ढोरगुंज या नांवानें प्रसिद्ध असलेलें हें सुमारें दोन फूट उंचीचें झाड औषधी असून खानदेश, नाशिक, वऱ्हाड व बहुधा घाटांवर आढळतें. याचीं पानें कोऱ्हांटीच्या पानांसारखीं असून यास गुंजेसारखीं लाल फळें येतात. या झाडाच्या मुळांस आस्कंद असें म्हणतात. आस्कंद व याचें वाळलेलें फळ औषधी असतें. आस्कंदाचें चूर्ण, तूप व मध यांबरोबर सायंकाळीं घेतल्यानें वीर्यवृद्धि होते. तसेंच गर्भाच्या पुष्टीकरितां आस्कंदाचा काढा करून घेतात. आस्कंदाचे १ तोळा चूर्ण गुळवेलीच्या १ मासा सत्त्वाबरोबर मधांतून घेतल्यानें शरीर निरोगी होतें.

आस्कंदाच्या वाळलेल्या फळांचा उपयोग, सिंध, वायव्य सरहद्द प्रांत, अफगाणिस्तान, बलुचिस्तान, वगैरे प्रदेशांतून दूध घट्ट करण्याकडे करतात. शंभर भाग पाणी व पांच भाग मीठ यांत हीं फळें टाकलीं असतां फळांतील द्रव्य पाण्यांत लवकर उतरतें व या पाण्याचा उपयोग केल्यास दहीं लवकर दाट होतें.

**अश्वगंधारिष्ट**—एक आसव. आस्कंद, सफेतमुसळी, मंजिष्ठ, हिरडेदळ, हळद, दारुहळद, जेष्ठमध, रास्ना, भुईकोहळा, अर्जुनसाल, नागरमोथा, उपळसरी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी निशोत्तर, रक्तचंदन, वेखंड, चित्रक, धायटीफूल, मध, सुंठ, मिरी, पिंपळी, दालचिनी, तमालपत्र, वेलची, गव्हला, नागकेशर, हीं यांत मुख्य औषधें असतात. हें आसव उत्तम प्रतीचें व शक्तिदायक आहे. हें औषध घेण्यानें भूक चांगली लागते. हातापायाला मुंग्या येणें, जुनाट आमवात, स्त्रियांचा उन्माद, अपस्मार, इत्यादि विकारांवर यांचें कार्य चांगलें होतें.

**अश्वघोष** (इ. स. १ लें शतक)—बुद्धचरित व सौंदरनंद या महाकाव्यांचा कर्ता. हा संस्कृत वाङ्मयांतील एक सुविख्यात कवि कालिदासाचा पूर्णकालीन असून महाकाव्य, रसात्मक काव्य व नाट्यकाव्य यांचा उत्पादक म्हणून प्रसिद्ध आहे. मूळचा जरी हा हिंदु ब्राह्मण असला तरी नंतर यानें बौद्ध धर्माचा स्वीकार केला. जरी प्रथम हा सर्वास्तिवादी असला तरी बुद्धावर याची परमभक्ति होती. महायान पंथ तयार करण्याचें श्रेय याच्याकडेच जातें. साकेत (अयोध्या) हें याचें जन्मस्थान असावें. आपल्या विद्वत्तेनें यानें त्या वेळच्या सर्व विद्वानांना भारून टाकलें होतें. हा गाननिपुण असून स्वरचित पद्यें स्वतः गाऊन दाखवीत असे. "आपल्याबरोबर स्त्रीपुरुष गायकांचा एक मोठा तांडाच घेऊन हा प्रवास करीत असे," असें याच्या तिबेटी चरित्रकारांनीं याचें वर्णन केलेलें आहे. आपल्या सुस्वर गीतांच्या साहाय्यानें हा जनसमूहावर छाप बसवून त्यांना

आपल्या धर्माकडे आकर्षित करून घेत असे. इत्सिंग नांवाच्या चिनी प्रवाशानें तर असे उद्‌गार काढले आहेत कीं, अश्वघोष, देव, नागार्जुन व कुमारलब्ध हे जगाला आपल्या ज्ञानानें प्रकाशित करणारे चार सूर्यच आहेत. अश्वघोषाच्या ग्रंथांना धार्मिक महत्त्वाहि आलेलें होतें.

आचार्य अश्वघोष हा सर्वांत प्राचीन नाटककार म्हणून ओळखला जातो. बुद्धशिष्य सारिपुत्र व मौद्गल्यायन यांच्या धर्मप्रवेशाबद्दलच्या कंड्यांवर सडेतोड टीका करणारें, 'सारिपुत्र-प्रकरण' या नांवाचें याचें नाटक सुप्रसिद्ध आहे. अश्वघोष हा कनिष्क राजाच्या दरबारीं असावा. तेथें आपल्या वृद्धावस्थेंत यानें 'सूत्रालंकार' हा ग्रंथ लिहिला. वज्रसूची व शतपंचाशतिक हे दोन ग्रंथहि यानेंच लिहिले असावे असें म्हणतात.

**अश्वमूत्राम्ल**—( हिप्युरिक ॲसिड ). वनस्पत्याहारी जनावरांच्या मूत्रांत असलेलें एक औषधी अम्ल. यास बेंझोअिल ग्लिसाइन किंवा बेंझामिडो ॲसेटिक ॲसिड अशींहि नांवें आहेत. गाई व घोडे यांच्या मूत्रांतून हें अम्ल काढतात. तसेंच कृत्रिम तऱ्हेनेंहि हें अम्ल तयार करतां येतें.

हें अम्ल काढण्याकरितां गाईचें ताजें गोमूल चुन्याच्या पाण्यांत घालून उकळून थंड करतात. व नंतर त्यांत उग्र हरिकाम्ल ( हायड्रोक्लोरिक ॲसिड ) मिसळतात म्हणजे अश्वमूत्राम्ल सुटें होतें. हें अम्ल शुद्ध करण्यासाठीं उकळत्या पाण्यांत याचें मिश्रण करतात व यांत हर ( क्लोरीन ) वायु सोडतात. यानंतर याची दुर्गंधी नाहींशी होते. यानंतर पुन्हां यावर हरिकरण ( क्लोरिनेशन )ची क्रिया करावी लागते व त्यामुळें शुद्ध अश्वमूत्राम्ल तयार होतें.

अश्वमूत्राम्ल व अल्क यांचें एकीकरण केलें म्हणजे निर्गुणक्षार बनतात. पोटांतील मूत्रविकारांवर हे औषधी म्हणून सुप्रसिद्ध आहेत.

**अश्वमेध**—पौराणिक कालांतील एक संवत्सरपर्यंत चालणारा एक यज्ञ. हा यज्ञ सार्वभौम राजानें करावयाचा असतो. परंतु ऐतरेय ब्राह्मणांत सार्वभौम नसलेल्या राजांनींहि हा यज्ञ करून पृथ्वी जिंकल्याचा उल्लेख आहे. तैत्तिरीय संहितेंत या यज्ञाबद्दलची एक आख्यायिका सांगितली आहे ती अशी— कांहीं कारणानें एकदां प्रजापतीच्या डोळ्यांतील बुबुळ जमिनीवर गळून पडलें व त्यापासून अश्व जातीची निर्मिति झाली. यानंतर देवांनीं अश्वमेध यज्ञ करून प्रजापतीचें बुबुळ परत जाग्यावर बसविलें. या वेळेपासून प्रजापतीस संतुष्ट करण्यासाठीं अश्वमेध करावा अशी प्रथा पडली. अश्वमेध यज्ञ केल्यानें ब्रह्महत्या पातकाचाहि नाश होतो असें सांगितलें जातें. यजुर्वेदांतील सत्याषाढ सूत्रांत या यज्ञाचा विधि कसा करावा याबद्दल माहिती दिलेली आहे. हा यज्ञ करणाऱ्यानें चैत्री पौर्णिमेस 'सांग्रहणी' नामक इष्टि करावयाची असते. वैशाखी पौर्णिमेस प्रजापति देवास पशुयाग करून दुसरे दिवशीं ऋत्विजांचें वरण (पूजन) करावयाचें व अश्वमेधाचा संकल्प करावयाचा. यानंतर योग्य असा घोडा, त्याजबरोबर रक्षक देऊन पृथ्वीप्रदक्षिणेस सोडावयाचा. या दिवसांपासून दररोज सकाळीं, मध्यान्हकाळीं व सायंकाळीं सारस्वत्य नामक इष्टि करून परिप्लव नामक आख्यान ऐकावयाचें. हा क्रम पृथ्वीप्रदक्षिणेस सोडलेला घोडा परत येईपर्यंत म्हणजे एक संवत्सरपर्यंत करावयाचा व घोडा परत आल्यावर यजमानानें दीक्षा ग्रहण करावयाची असते.

सुत्येच्या ( यज्ञीय बलिदानाच्या ) मध्यदिवशीं म्हणजे दुसऱ्या दिवशीं अश्वाचें उपाकरण (हवन) करण्यापूर्वीं त्यास अनेक दागदागिन्यांनीं शृंगारून एका सुंदर रथास जोडतात व यज्ञमंडपाभोंवतीं फिरवतात. यानंतर उत्तरवेदीच्या उत्तर बाजूच्या जागेवर घोड्यास उभा करतात. ही जागा त्यानें हुंगली अगर या जागेवर कांहीं वेळ तो फिरला तर तें शुभ समजतात. यानंतर या अश्वाच्या शरीरांतील चंद्रनामक मेदाचा याग केला जातो. यानंतर ब्राह्मणांनीं यजमानाला अभिषेक करावयाचा असतो.

महाभारतांत धर्मराजानें व वाल्मीकि रामायणांत दशरथ राजानें अश्वमेध यज्ञ केल्याचीं वर्णनें आहेत.

नामा पाठक, श्रीधर, कृष्णदास, दासोसुत मुद्गल, नारायण विप्र, रामदासी परंपरेंतील माधवस्वामी वगैरे विद्वान् लेखकांनीं अश्वमेध या विषयावर ग्रंथरचना केलेली आहे.

**अश्ववर्ग**-(एकिडी). हा एक सखुर सस्तन प्राण्यांच्या वर्गांतील पोटवर्ग आहे. पाळीव घोड्यास लांब शेपटी असून तीस पुष्कळ केंस असतात. व त्याच्या शरीरावरहि सर्वत्र केंस असतात. हा आजकाल रानटी अवस्थेमध्यें कोठें असल्याचें आढळत नाहीं. परंतु दक्षिण रशियामध्यें तार्तरी देशांत आढळणारा टार्पन नांवाचा घोडा कदाचित् याचा पूर्वज असावा. गाढव हाहि प्राणी याच वर्गांत मोडतो व त्याच्या कांहीं वन्य जाती अद्यापहि दृष्टीस पडतात. उदा., दक्षिण आशियामध्यें आढळणारे ओनॅगर किंवा तिबेटमध्यें आढळणारे किआंग आणि आफ्रिकेमध्यें-व सोमालिलँडमध्यें आढळणारे वन्य गर्दभ याचेच पूर्वज असावे. अंगावर पट्टे असणारे झीब्रा हे प्राणी फक्त आफ्रिकेंत आढळतात. यांच्या चार निरनिराळ्या जाती दृष्टीस पडतात; त्यांतील एक डोंगरावर आढळते व हीस कागा असें म्हणतात. दुसऱ्या दोन बर्चेल आणि ग्रिव्ही या नांवानें प्रसिद्ध आहेत.

**अश्वशक्ति**—( हॉर्स पॉवर ). एखादें काम करण्यास किंवा एखादें यंत्र चालविण्यास लागणाऱ्या शक्तीचें माप. ज्या यंत्राच्या साहाय्यानें ३३००० फूट पौंड कार्य एका मिनिटांत होतें,

म्हणजे ३३००० पौंड वजन एक फूट गुरुत्वाकर्षणाच्या शक्तीविरुद्ध वर उचललें जातें त्या शक्तीस एक अश्वशक्ति असें म्हणतात. अशा रीतीनें हें यंत्र दर मिनिटास ३३००० पौंड वजन एक फूट उचलीत राहील तर तें एक अश्वशक्तीनें चाललें आहे असें म्हणतां येईल. ही संज्ञा प्रथम जेम्स वॅट यानें प्रचारांत आणली आणि ती मूळ एका घोड्याच्या सामान्यतः कामाच्या प्रमाणावर आधारलेली होती. एखाद्या यंत्राची दर्शनी अश्वशक्ति ही त्या यंत्राच्या दट्टयास मिळालेली शक्ति होय. रोधक (ब्रेक) अश्वशक्ति ही विद्युद्रतियंत्राच्या किंवा वाफेच्या एंजिनाच्या मुख्य अक्षा-(शॅफ्ट) पासून मिळणारी शक्ति होय. अश्वशक्ति–तास म्हणजे एक अश्वशक्तीच्या यंत्रानें एका तासांत केलेलें काम होय. १ अश्वशक्ति = ७४६ वॅट. १ अश्वशक्तितास = ०.७४६ किलोवॅटतास.

**अश्विनी**— आश्विन महिन्यांत संध्याकाळीं पूर्व बिंदूच्या किंचित् उत्तरेस उगवणारें एक नक्षत्र. या नक्षत्रांत ग्यामा, बीटा व अल्फा एरायटीज अशा तीन तारकांचा समावेश असून यांची आकृति घोड्याच्या तोंडासारखी दिसते. या तीन तारकांत उत्तरेच्या बाजूची तारका जास्त तेजस्वी असते. आश्विन महिन्यास आश्विन हें नांव याच नक्षत्रावरून पडलें, याचें कारण या महिन्यांत चंद्र अश्विनी नक्षत्रीं पूर्ण होतो. पूर्वीं शुक्र व गुरु यांनाच अश्विन म्हणत असावेत. ऋग्वेद व इतर संहिता यांत अश्विनी नक्षत्रास 'अश्वयुज' या नांवानें संबोधलेलें आढळून येतें.

**अश्विनीकुमार**—ऋग्वेदांत यांच्यावर अनेक सूक्तें आहेत. व पुराणांतूनहि कथा आहेत. अश्वरूपधर सूर्य व अश्विनीरूपधारी संज्ञा यांच्यापासून अश्विनीकुमार निर्माण झाले. हे अश्विनीच्या नासिका–मार्गानें प्रगट झाल्यामुळें यांस नासत्य असेंहि म्हणतात. देवांचे हे वैद्य असून सप्तविध देवांत यांचा अनुक्रम सहावा आहे. यांपैकीं ज्येष्ठ नासत्य या नांवानें ओळखला जातो व कनिष्ठास दस्र असें म्हणतात. या जोडदेवतांची कल्पना गुरु-शुक्राच्या सान्निध्यावरून आली असावी किंवा उत्तरध्रुवप्रदेशांत पाहिलेल्या नाक्षत्र प्रकाशावरून आली असेल.

**अष्टकुलाचल**— (१) पारियात्र, ऋष्यवान्, ऋक्षवान्, विंध्याद्रि, सह्याद्रि, मलय, महेंद्राचल व शुक्तिमान्, किंवा (२) नील, निषध, विंध्याचल, माल्यवान्, मलय, गंधमादन, हेमकूट व हिमालय, या आठ पर्वतांना भरतखंडांतील अष्टकुलाचल समजण्यांत येतें.

**अष्टगंध**—चंदन, अगरु, देवदार, कोष्टकोलिंजन, कुसुम, शैलज, जटामांसी व सुरगोरोचन या आठ सुगंधी द्रव्यांच्या मिश्रणानें जें गंध तयार होतें त्यास म्हणतात.

**अष्टदिग्गज**—पुराणांतून या आठ गजांचें वर्णन केलेलें दिसून येतें. हे आठ हत्ती म्हणजे ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम व सुप्रतीक हे होत. हे पूर्वादि अष्ट दिशांस असून पृथ्वीचे आधारस्तंभ मानलेले आहेत.

**अष्टदिग्पाल**— प्रथम पूर्वादि आठ दिशांचे क्रमवार ईशान्य दिशेपर्यंत इंद्र, अग्नि, पितर, निर्ऋति, वरुण, वायु, सोम किंवा वैश्रवण व ईशान असे आठ दिग्पाल मानले जात असत. याच दिग्पालांचीं नांवें त्या त्या दिशांना पडलेलीं दिसतात. चालू मन्वंतरांत द्वादशादित्यांतील इंद्र अ. शक्र नांवाचा आदित्य, अनल नामक वसु, सूर्यपुत्र यम, निर्ऋति ना. रुद्र, वरुण ना. आदित्य, अनिल नामक वसु, वैश्रवण अ. कुबेर व ईश्वर नामक रुद्र असे आठ दिग्पाल मानले जातात.

**अष्टनायका**—१. भैष्मी (रुक्मिणी), जांबवती, भामा, याज्ञजिती, भद्रा, लक्ष्मणा, कालिंदी व मित्रवृंदा या श्रीकृष्णाच्या आठ पट्टराण्या असून यांना अष्टनायका असें म्हणतात.

२. वासकसज्जा, विरहोत्कंठिता, स्वाधीनभर्तृका, कलहांतरिता, खंडिता, विप्रलब्धा, प्रोषितभर्तृका व अभिसारिका या साहित्यशास्त्रांतील अष्टनायका होत.

**अष्टपाद**—(ऑक्टोपस्). ही एक दोन कल्ले असणाऱ्या शीर्षपाद प्राण्यांची जात आहे. यास हातासारखे आठ अवयव असून त्या प्रत्येकावर शोषक नळ्यांच्या दोन रांगा असतात व त्या अलग दिसतात. याचें डोकें पुढें आलेलें असून तें एका मानेसारख्या अवयवानें जोडलेलें असतें. याचें शरीर आंखूड असतें. याची लांबी नऊ फुटांपर्यंत असूं शकते.

**अष्टपाद प्राणिवर्ग**—(अरॅकनिडा). अष्टपाद प्राण्यांच्या वर्गामध्यें कोळी, विंचू, गोचिड, अळी, वगैरे प्राणी येतात. यांच्या शरीराचे निरनिराळे भाग असून त्यांतील कांहीं भागास गात्रें असतात. त्यांची उत्पत्ति अंड्यांपासून होते. आणि ते कांहींसे कीटकासारखे दिसतात. परंतु त्यांचें शिर आणि वक्षःस्थळ हीं जोडलेलीं असून कीटकाप्रमाणें त्यांचें रूपांतर होत नाहीं. यांत नर व मादी हा भेद असतो.

**अष्टप्रधान**—राज्यकारभारांतील महत्त्वाच्या कामांची वांटणी होऊन त्यांची जबाबदारी ठरली जावी व राज्यकारभार सुसूत्र चालावा यासाठीं शिवाजीनें अष्टप्रधानांची प्रथा सुरू केली. शिवाजीनें अष्टप्रधानांची ही कल्पना महाभारत किंवा मनुस्मृति

यांतून घेतली असावी असें वाटतें. या अष्टप्रधानांत (१) पंतप्रधान, (२) पंतअमात्य, (३) पंतसचीव, (४) मंत्री, (५) सुमंत, (६) सेनापति, (७) न्यायाधीश, व (८) पंडितराव अशा आठ लोकांचा समावेश केलेला असे. यांतील पंतप्रधानाची हुकमत सर्वांवर चालत असे. यास १५००० होन इतका पगार मिळे. पंतअमात्यांकडे मुलकी हिशेबाचें काम असे व त्यास १२००० होन पगार असे. पंतसचीवाकडे दप्तरांचा सांभाळ करण्याची कामगिरी असे. त्याचा पगार १०००० होन असे. यानंतर मंत्री यांजकडे खासगी कारभार, सुमंताकडे परराज्यव्यवहार, सेनापतीकडे फौजेची व्यवस्था, न्यायाधीश याजकडे न्याय देणें, पंडितराव याजकडे शास्त्रार्थ व दानधर्म पाहणें, अशीं कामें वांटलेलीं असत व यांना प्रत्येकीं १०००० होन पगार असे. पंडितराव व न्यायाधीश या प्रधानांखेरीज बाकीच्यांना लष्करी शिक्षणहि घ्यावें लागे. प्रत्येक मंत्र्यास त्याच्या गैरहजिरींत काम करण्यासाठीं म्हणून सरकारकडून एक मुतालिक दिलेला असे. प्रधानांचे शिक्का-मोर्तब या मुतालिकांच्या जवळच असत.

पंतप्रधानाची दरबारांतील बसण्याची जागा सिंहासनाच्या उजव्या बाजूस असे. प्रधानाच्या खालीं अमात्य, सचीव व मंत्री यांच्या जागा असत. सिंहासनाच्या डाव्या बाजूस प्रथम सेनापति व त्याच्या खालोखाल सुमंत, पंडितराव व न्यायाधीश हे बसत.

अष्टप्रधानांच्या साहाय्यामुळेंच शिवाजीला औरंगजेबासारख्या बलाढ्य शक्तीशीं तोंड देतां आलें. स्वसंरक्षण व स्वराज्यवर्धन करण्यास या संस्थेचा शिवाजीस चांगलाच उपयोग झाला. यानंतर पुढें राजारामाच्या कारकीर्दींत अष्टप्रधानांखेरीज आणखी कांहीं कर्तृत्ववान् माणसें उदयास आल्यामुळें व त्यांचाहि राज्यकारभारास उपयोग व्हावा या दृष्टीनें या अष्टप्रधानांत पंतप्रतिनिधि व हुकमतपन्हा या आणखी दोन जागा वाढवण्यांत आल्या. प्रतिनिधीचा अधिकार सर्व प्रधानांवर चाले, तर हुकुमतपन्हाची आज्ञा स्वतः छत्रपतींनाहि मोडतां येत नसे. राजारामाच्या कारकीर्दीपासूनच स्वराज्यसंरक्षणाच्या कामीं हुरूप यावा म्हणून अष्टप्रधानांना जहागिरी बहाल करण्याची पद्धति सुरू झाली.

यानंतर शाहूच्या कारकीर्दीपर्यंत या अष्टप्रधानांचें महत्त्व कसें तरी टिकलें होतें. शाहूच्या आज्ञापत्रांत जरी अष्टप्रधानांच्या नेमणुका पूर्वीप्रमाणेंच चालवाव्यात असें म्हटलें होतें, तरी या वेळीं सर्व अधिकार पेशव्यांच्याच हातीं असत. इतर प्रधानांना कांहींच महत्त्व राहिलें नव्हतें. यानंतरच्या काळांत हळूहळू पेशव्यांनीं सर्व कारभार आपल्या हातीं घेतला व अष्टप्रधान ही संस्था नामशेष झाली.

**अष्टमांगल्य**—संस्कारकौस्तुभ या ग्रंथांत वर्णन केलेला त्रैवर्णिकांचा एक संस्कार. व्यवहारांत यास आठांगुळें असें म्हणतात. मुख्य सोळा संस्कारांपैकीं गर्भाधान संस्कार यथाकालीं करावयाचा राहून गेल्यास गर्भिणी स्त्रीच्या आठव्या महिन्यांत गर्भाधान संस्कारानंतर जे पुंसवन व सीमंतोन्नयन हे संस्कार करतात त्या संस्कारांस जोडूनच अष्टमांगल्य हाहि संस्कार केला जातो. यांतील सर्व विधि गर्भाधानाप्रमाणेंच असतो.

**अष्टमी**—मुंबई इलाख्यामधील कुलाबा जिल्ह्यांतील रोहा म्युनिसिपल हद्दींतील एक गांव. ऑक्सडन नांवाच्या इंग्रज वकिलानें या गांवाचा 'एस्थेमी' या नांवानें उल्लेख केलेला आहे. या गांवांत बऱ्याच बेने इस्त्राइए (काळे ज्यू) लोकांची वस्ती असून येथें एक सुंदर तळें आहे.

**अष्टविनायक**—विनायक म्हणजे श्रीगजानन-गणपति. या देवतेचीं महाराष्ट्रांत एकूण आठ स्थानें आहेत. त्यांपैकीं एक स्थान नगर जिल्ह्यांत, दोन कुलाबा जिल्ह्यांत व पांच पुणें जिल्ह्यांत आहेत. नगर जिल्ह्यांत दौंडनजीक सिद्धटेक येथें श्रीगजाननाचें स्थान असून तेथें गजाननास 'गजमुख' या नांवानें संबोधलें जातें. कुलाबा जिल्ह्यांत सुधागड तालुक्यांत मुरूड (पाली) येथें व कर्जतनजीक मढ येथें असलेल्या गजाननांस अनुक्रमें बल्लाळेश्वर व विनायक असें म्हणतात. यानंतर पुणें जिल्ह्यांत मोरगांवचा मोरेश्वर गणनाथ, लोणीनजीक थेऊरचा चिंतामणि, जुन्नराजवळील लेण्याद्रीचा गिरिजात्मक, ओझरचा विघ्नेश्वर व पुणें-नगर रस्त्यावरील रांजणगांवचा गणपति हीं पांच स्थानें गजाननाचींच होत.

या आठ स्थानांपैकीं पाली, थेऊर व मोरगांव येथील श्रीगजाननांचीं देवालयें चांगल्या स्थितींत व विशेष प्रसिद्ध अशीं आहेत.

**अष्टागर प्रांत**—हल्लीं कुलाबा जिल्हा आहे त्यांत अष्टागर प्रांत येतो. या प्रांतांत जेथें नारळीचीं झाडें दाट उगवतात अशीं जीं स्थळें आहेत त्यांस आगर असें म्हणतात. अशीं आठ ठिकाणें या प्रांतांत आहेत:— (१) अलीबाग, (२) नागांव, (३) थळ, (४) चौल, (५) सासवणें, (६) साखर, (७) आक्षी, आणि (८) किहीम. यांशिवाय दक्षिण कोंकणांत वसई, अगाशी, वगैरे आगरें आहेत. परंतु आठ एकत्र व जवळ जवळ अशीं याच प्रांतांत आहेत. मीठ पिकविण्याच्या जागा असतात त्यांस मिठागरें म्हणतात. या प्रांतांत आगरी, कोळी, भंडारी, पांचकळशी, वगैरे यांची वस्ती पुष्कळ आहे. या प्रांतांत सागरगड, कुलाबा, उंदेरी, खांदेरी, कोरलई, रेवदंडा, वगैरे किल्ले आहेत. यांपैकीं कांहीं दर्यांत आहेत व कांहीं डोंगरावर आहेत.

यांतील रेवदंडा हा प्रचंड किल्ला, फिरंग्यांनीं कोंकण घेतलें तेव्हां इ. स. १४५० त बांधिला, असा त्याजवर लेख आहे. हा प्रांत आंगरे यांजकडे बहुत दिवस होता. ते कुलाब्यांत राहात असत. तेथें त्यांचे वाडे-देवळें अद्याप आहेत. आंगरे, सावंत, आणि धुळप हे कोंकण किनाऱ्यावर सरदार होते. आंगरे यांचे अखेरचे दिवाण विनायक परशुराम बिवलकर हे होते. यांचे वंशज पुण्यास असतात.

**अष्टाधिकार**–हल्लीं खेडेगांवांतून (१) कोळीपणा, (२) पाटिलकी, (३) देशमुखी, महाजनकी, (४) कुळकरण, (५) वर्तकी, (६) पौरोहित्य, (७) उपाधिक अगर भटपणा व (८) जोशीपणा, हीं जीं आठ खातीं आहेत तींच पूर्वींच्या काळीं अनुक्रमें (१) जलाधिकार, (२) स्थलाधिकार, (३) ग्रामाधिकार, (४) कुललेखन, (५) ब्रह्मासन, (६) दंडविधिनियोग, (७) पौरोहित्य व (८) ज्योतिष या नांवानीं ओळखलीं जात असत. जलाधिकारामध्यें प्रवाश्यांना व सरकारी नोकरांना पाणी पुरवण्याचा अधिकार येतो. स्थलाधिकार म्हणजे निरनिराळ्या वस्तीस योग्य अशा जागा ठरवणें व त्या दाखवून देणें; पाटलाकडे हा अधिकार असे. ग्रामाधिकारांत व्यापार व तत्सम धंदे यांवर देखरेख ठेवण्याची जबाबदारी येते. कुललेखन म्हणजे सरकारी हिशोब ठेवणें व दप्तर संभाळणें ही कामगिरी असे व कुळकर्णी हें काम पाहत असे. ब्रह्मासनांत बोलिफांच्या कामगिरीचा, तर दंडविधिनियोगांत न्यायदानाचा, पौरोहित्यांत ग्रामोपाध्याय व कुलोपाध्याय यांच्या कामाचा व ज्योतिषांत गांवच्या ज्योतिषाच्या कामाचा अंतर्भाव होत असे.

**अष्टावक्र**— महाभारतांत याची कथा सविस्तर दिलेली आहे. हा कहोडऋषीचा पुत्र. गर्भांत असतांना यानें रात्रभर अध्ययन करणाऱ्या आपल्या पित्यास हिणवलें. तेव्हां कहोडानें रागावून यास शाप दिला व त्यामुळें हा आठ ठिकाणीं वांकडा झाला. यानंतर जनक राजाचा आश्रित वरुणपुत्र बंदी यानें कहोडास वादांत जिंकून उदकांत बुडवलें. ही वार्ता समजतांच अष्टावक्रानें बंदीचा पराभव केला व आपल्या बापाची त्याजपासून सोडवणूक केली. तेव्हां खुप होऊन कहोडानें याचें वांकडें असलेलें शरीर सरळ करून दिलें.

**अष्टिफलवर्ग**—(ड्रूप). ज्या फळांत आठोळी असते अशा जातीचीं फळें. या फळांचा वरचा भाग नरम असून त्याचा गर बनतो व आंतील भाग कठिण बनून त्याची आठोळी बनते. या आठोळीचें कवच कठिण असून आंत पुन्हां गर असतो. अशीं फळें म्हटलीं म्हणजे बोरें, जरदाळू, आंबा वगैरे होत. आठोळीच्या वरच्या कठिण भागास कवच (एंडोकार्प) म्हणतात व आंतील भागास गर (मेसोकार्प) म्हणतात. बदाम वगैरे फळांच्या बींतील गर मृदु गरासारखा नसतो, तथापि त्यामध्यें इतर गुण गरासारखेच असल्यामुळें त्यास हेंच नांव देतात.

**अष्टी**—मध्यप्रांतांतील वर्धा जिल्ह्याच्या आर्वी तहशिलींतील सुमारें ५००० लोकवस्तीचें गांव. वर्ध्यापासून हें गांव ५२ मैल वायव्य दिशेस सातपुडा पहाडाच्या दक्षिण भागाच्या पायथ्याशीं वसलेलें दिसून येतें. पुलगांव स्टेशनपासून याचें अंतर सुमारें ३९ मैल व आर्वीपासून सुमारें पंधरा मैल इतकें येतें.

जहांगीरनें अफगाणी सरदार महंमदखान नियाझी यास अष्टी, अमनेर, पवनार, व तळेगांव हे परगणे जहागीर दिले होते. महंमदखान नियाझीच्या पश्चात् अष्टीची मालकी अहंमदखान नियाझीकडे आली. महंमदखान व अहंमदखान नियाझी या दोघांच्याहि कबरा अष्टीस आहेत. अहंमदखान मरण पावल्यावर अष्टीवर मराठ्यांचा अमल सुरू झाला.

अष्टीस देशी कापड, धान्य, गूळ व मसाल्याचे पदार्थ यांचा व्यापार चालतो. तसेंच येथें कापसाचे गठ्ठे बांधण्याचा व सरकी काढण्याचा असे दोन कारखाने आहेत.

**अष्टे**—१. मुंबई इलाख्यामधील सातारा जिल्ह्यांतील अष्टे हें गांव इस्लामपूरच्या आग्नेयीस बारा मैलांवर व साताऱ्यापासून वीस मैल अंतरावर येतें. या गांवाच्या पूर्वेस कृष्णा नदी वाहते. तसेंच पश्चिमेस पेठ-सांगलीस जाण्याचा रस्ता आहे. येथील बहुतेक लोक शेतकरी आहेत. लो. सं. १२११४

२. मध्य हिंदुस्थानांतील भोपाळ संस्थानच्या पश्चिमेकडील हें ठिकाण अकबराच्या वेळीं माळवा सुभ्यांतील सारंगपूर सरकारीमध्यें एका महालाचें मुख्य ठिकाण होतें. सन १७१६ मध्यें दोस्त महंमदनें येथें एक लहानसा किल्ला बांधला तो सध्यां अगदीं मोडकळीस आलेला आहे. सन १७४५ मध्यें जरी मराठ्यांनीं अष्टे आपल्या ताब्यांत घतलं होतें तरी सन १८१७ मध्यें झालेल्या तहानुसार परत तें भोपाळच्या ताब्यांत देण्यांत आलें. येथें अफूचा व्यापार व विणकाम, रंगकाम, चिटें तयार करणें यांसारखे लहानलहान धंदे चालतात.

३. सन १८१८ च्या फेब्रुवारी महिन्यांत जनरल स्मिथ व व बापू गोखले यांमध्यें जी लढाई झाली ती याच अष्टयांत. हें अष्टे गांव सोलापूर जिल्ह्यांतील माढें याच्या नैर्ऋत्येस वीस मैलांवर आहे. सन १८१८ च्या लढाईंत येथें बापू गोखले मरण पावले व बाजीरावाच्या सैन्यास पराभव खावा लागला. इ. स. १८७७ च्या दुष्काळांत येथील तलाव बांधला गेला आहे.

**असई**—हैद्राबाद संस्थान, औरंगाबाद जिल्हा. औरंगाबादपासून ३४ मैलांवर ईशान्येस व अजंठ्याच्या आग्नेय दिशेस वीस मैलांवर असलेला एक गांव. सन १८०३ मध्यें येथें मेजर जनरल वेलस्ली (नंतर ड्यूक ऑफ वेलिंग्टन) याच्या नेतृत्वाखालीं

इंग्रज फौज व शिंदे आणि नागपूरकर भोसले या मराठे सरदारांचें सैन्य यांमध्यें लढाया होऊन त्यांत मराठ्यांचा पराभव झाला.

**असंग** (इ. स. ५ वें शतक)— महायान बौद्ध पंथाचा एक आचार्य. याचा धाकटा भाऊ वसुबंधु होय. योगाचार्यभूमि, महायानसूत्रालंकार, विज्ञप्तिमात्रता, इ. त्याचे ग्रंथ आहेत व त्यांचीं चिनी भाषांतरें जुनींच आहेत. त्यानें बौद्धसंप्रदायांत शैवपंथांतील तंत्र घुसडलें. असंगाचें मूळ गांव पुरुषपूर होतें तरी अयोध्येंत राहून त्यानें कार्य केलें आहे.

**असदखान**—एक मोंगल सरदार. हा प्रख्यात तुर्कोमन घराण्यांतील असून यास नबाब, असफउद्दौला व जुमलत-उल्-मुल्क अशा पदव्या होत्या. प्रथमपासूनच हा जहांगीर बादशहाच्या सहवासांत होता व जहांगीरची पहिल्यापासूनच याजवर मर्जी असे, त्यामुळें याचें लग्न असफखान वजिराच्या मुलीशीं झालें व यास दुय्यम बक्षीची जागा मिळाली. सन १६७१ पर्यंत यानें या जागेवर काम केल्यानंतर यास ४००० ची मनसब मिळाली व यानंतर अगदीं थोडक्या अवधींत यास वजिराचा दर्जा प्राप्त झाला. बहादुरशहाच्या कारकीर्दींत तर यास वकील मुतलक हा वझिराच्या वरचा दर्जा मिळाला. पण यानंतर फरुखसियरच्या अमदानींत मात्र यास बडतर्फ करण्यांत येऊन याची मालमत्ता हिरावून घेण्यांत आली. तसेंच याच्या मुलासहि ठार मारण्यांत आलें. आपला पुढील काल यास अज्ञातवासांत घालवावा लागला. हा सन १७१७ मध्यें मरण पावला.

**असनसोल**—बंगाल प्रांतांतील बरद्वान जिल्ह्याच्या या वायव्येकडील विभागाचें क्षेत्रफळ ६१८ चौरस मैल इतकें आहे. यास सन १९०६ पर्यंत राणीगंज विभाग असें म्हणत असत. असनसोल व राणीगंज हीं या विभागांतील दोन मोठीं गांवें होत. दगडी कोळशाच्या व लोखंडाच्या विपुलतेमुळें हा विभाग चांगलाच भरभराटीस आलेला आहे. या विभागांतील दिग्नागर येथें काशाचीं व पितळेचीं भांडीं, तसेंच लाखेचे रंग तयार केले जातात.

असनसोल हें विभागाचें मुख्य ठिकाण, एक मोठें रेल्वेस्टेशन व जंक्शन असून येथून कोळशाची निर्यात होते. येथें लोखंडी कामाचा एक व दारू गाळण्याचे दोन असे तीन मोठे कारखाने आहेत. कलकत्त्याहून ईस्ट इंडियन रेल्वेनें असनसोल हें शहर १३२ मैलांवर आहे. लो. सं. ५५७९७.

**असन्शान**—दक्षिण अमेरिका. हें पराग्वे प्रजासत्ताक राज्याच्या राजधानीचें शहर व बंदर, असन्शान उपसागराच्या तीरावर सखल वालुकामय मैदानावर वसलेलें आहे. व्हिलारिकाशीं हें शहर रेल्वेनें जोडलेलें असून येथून ब्यूनॉस एरीझ व मॉंटेव्हिडियो येथें बोटीनें जातां येतें. येथें विमानतळहि आहे. येथील हवा जरी बरीचशी उष्ण असली तरी निरोगी आहे. सन १५४७ पासून येथें विद्यापीठ असल्यानें येथें बऱ्याच धार्मिक इमारतीहि दिसून येतात. सध्यांच्या परिस्थितींत हें शहर सर्व प्रकारच्या आधुनिक सुखसोयींनीं सुसज्ज असेंच आहे. लापलाटावरील सर्वांत जुनी अशी स्पॅनिश वसाहत हीच होय. स्पॅनिश सत्तेचा अमल या शहरावर बराच कालपर्यंत राहिला. यानंतर धर्माधिकारी व जेसुइट लोक यांमधील भांडणास सुरुवात झाली. सन १८११ त स्वातंत्र्य जाहीर झालें. सन १८६९ मध्यें ब्राझीलच्या लोकांनीं हें शहर लुटलें व त्यानंतर अनेक राज्यक्रांतिकारक बंडें येथें झालीं. लो. सं. १२००६७.

**असफअली, बॅ.** (१८८८- )— राष्ट्रीय मुसलमान पुढारी व ओरिसाचे गव्हर्नर. यांचें शिक्षण दिल्ली येथें स्टीफन्स कॉलेजमध्यें व लिंकन्स इन (लंडन) मध्यें झालें. यांच्यावर १९१८ मध्यें भारतसंरक्षण कायद्यानुसार प्रथम खटला भरण्यांत आला, पण त्यांत हे निर्दोषी सुटले. काँग्रेसच्या चळवळींत यांना अनेकवार शिक्षा झाल्या. यांनीं युरोपमध्यें पुष्कळ प्रवास केला आहे. हे दिल्ली म्युनिसिपालिटीचे कमिशनर होते. कॉंग्रेस पार्लमेंटरी बोर्डाचे माजी सेक्रेटरी असून राष्ट्रीय मुसलमान पक्षाचे ते एक कार्यकर्ते सभासद आहेत. १९३५ मध्यें ते हिंदूमुसलमानांच्या संयुक्त मतांनीं दिल्ली येथें लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत निवडून आले. यांचा विवाह अरुणा गांगोली यांच्याशीं १९२८ मध्यें झाला. यांनीं 'विधायक असहकार' (Constructive Non-co-operation) नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. हिंदुस्थानचे अमेरिकेंतील वकील म्हणून यांची १९४७ सालीं नेमणूक झाली. नंतर पुढील सालींच यांना ओरिसाचे गव्हर्नर नेमण्यांत आलें.

**असफअली, अरुणा** (१९०९- )—एक राष्ट्रीय समाजवादी हिंदी महिला. यांचें कॉन्व्हेंट स्कूलमध्यें शिक्षण झालें. यांचा विवाह बॅरिस्टर असफअली यांच्याबरोबर १९२८ मध्यें झाला. या नॅशनल कौन्सिल ऑफ वीमेन संस्थेच्या सभासद असून दिल्ली वीमेन्स लीगच्या १९२९ सालीं चिटणीस होत्या. अखिल भारतीय महिला परिषदेच्या त्या दिल्ली येथील स्थायिक सभासद आहेत व वीमेन्स फंड असोसिएशनच्याहि (१९३०) सभासद आहेत. या राष्ट्रीय सभेस मिळाल्यानंतर १९३०-३१ च्या सत्याग्रहांत यांस सहा महिने सक्त मजुरीची शिक्षा झाली. पुन्हां १९३२ मध्यें आणखी सहा महिन्यांची शिक्षा झाली. यांनीं शैक्षणिक, सामाजिक व राजकीय बाबतींत स्त्रियांची बाजू पुढें मांडण्याचें कार्य सतत चालविलें आहे. सध्यां महिला परिषदेच्या स्थायी सभासद असून इतरहि स्त्रियांच्या अनेक शैक्षणिक व राजकीय संस्थेच्या कार्य-

कर्त्या सभासद आहेत. या चांगल्या वक्त्या व लेखक आहेत. १९४२ च्या ऑगस्टनंतरच्या सत्याग्रहांत मुंबई येथें त्यांनीं महत्त्वाचा भाग घेतला होता. आज समाजवादी पक्षाच्या या प्रमुख कार्यकर्त्या आहेत.

**असफउद्दौला** ( १७७५–१७९७ )— अयोध्येचा एक नबाब. हा सुजाउद्दौल्याचा वडील पुत्र. याचें पहिलें नांव मिर्झा अमानी असें होतें. हा गादीवर आल्याची संधि साधून रेसिडेंटनें याच्या बापाच्या वेळचा झालेला तह मोडून यास नवीन तह करण्यास भाग पाडलें व त्यास अनुसरून २३ लक्ष उत्पन्नाचा मुलूख इंग्रजांना तोडून द्यावा लागला. तसेंच इंग्रजांच्या म्हणण्या-प्रमाणें दरमहा २,६०,००० रु. इतका लष्करी खर्च त्यास द्यावा लागला. यानंतर इंग्रज लोकांचाच याच्या फौजेंत भरणा सुरू झाल्यानें एतद्देशीय फौजेनें बंड केलें. असफउद्दौल्याच्या आईनें काशीच्या चेतसिंगास मदत केली असें खोटेंच उठवून हेस्टिंग्जनें तिच्याकडून ७५ लक्ष रुपये उकळले. नबाबाचा खजिना धुऊन काढावयाचा असाच जणुं इंग्रजांनीं निर्धार केला होता. अशा परिस्थितींत अयोध्या प्रांतांत अंधाधुंदी माजली व सन १७८३ मध्यें हा प्रांत अगदीं उध्वस्त झाला. यानंतर कॉर्नवालीसच्या कारकीर्दींत जरी लष्करी खर्च कमी करण्यांत आला होता, तरी सर जॉन शोअरनें पुन्हां आणखी ५॥ लक्षांचें लष्करी खर्चाचें जूं नबाबावर लादलें. याचाच परिणाम नबाबाच्या प्रकृतीवर होऊन हा १७९७ मध्यें मरण पावला. दानशूर म्हणून हा प्रसिद्ध होता.

**असफखान**–१. एक मोंगल सरदार. याची मुलगी अर्जुबंद बानो बेगम उर्फ मुमताझ महाल ही शहाजहानला दिली होती. असफखानाचें मूळ नांव अबुल हसन असें असून यास यत्कादखान, येमीन–उद्दौला, इत्यादि पदव्या होत्या. हा पुढें कांहीं काळ जहांगीरचा वझीर होता. आपल्या कारकीर्दींत यानें अलोट संपत्ति मिळवून ठेवली होती. इ. स. १६४२ मध्यें लाहोरला हा मरण पावला. औरंगजेबाच्या कारकीर्दींत नांवारूपास आलेला शाहिस्तेखान हा याच्या चार मुलांपैकीं एक होय.

२. 'शिरीन व खुश्रो' या काव्याचा कर्ता व अकबर बादशहाचा दिवाण. याचें पहिलें नांव मिर्झा जाफर असें होतें. आपलीं काव्यें हा जाफर या नांवावरच लिहीत असे. सन १५८१ त अकबरानें यास असफखान हा किताब देऊन बक्षीगिरीच्या कामगिरीवर नेमलें. यानंतर सन १५९८ मध्यें तर हा अकबराचा दिवाणच झाला. 'तारीख अल्फी' हा ग्रंथ लिहिण्याची कामगिरी अकबरानें ज्या लेखकांच्याकडे सोंपवली होती त्यांपैकीं हा एक होता व यानेंच हा ग्रंथ पुरा केला.

**असबेस्टॉस**—एक अतिशय उपयुक्त खनिज द्रव्य. हॉर्नब्लेंड जातीच्या अनेक तंतुमय पदार्थांचें हें बनलेलें असून रेशमासारखी याला चमक असते. पूर्वीं युरोप खंडांत प्रेतासाठीं ह्याचें बारीक मऊ वस्त्र तयार करीत. असबेस्टॉस अदाह्य ( इन्काम्बस्टिबल ) असल्यामुळें अदाह्य कापड, कागद, वगैरे पदार्थ करण्याच्या कामीं याचा उपयोग होतो. लांकडी इमारतीस किंवा सामानास द्यावयाच्या रंगांत हा मिसळला असतां आगी-पासून त्यांचें रक्षण होतें. बॉयलरला व वाफेच्या नळ्यांना, बाहेर फ़ार उष्णता जाऊं नये म्हणून असबेस्टॉसचा लहानसा थर देतात. घरकामासाठीं उपयोगी पडणारे पत्रे आणि नळ्याहि आतां असबेस्टॉसच्या होऊं लागल्या आहेत.

याला विस्तवाचें व आग लागण्याचें भय नसल्यानें याचा उपयोग सर्वत्र केला जातो. खडकांत याचे थरावर थर सांपडतात. क्रिसोटाईल जातीचा असबेस्टॉस व्यापारी दृष्टीनें महत्त्वाचा असून प्राणवायु, उज्जवायु ( हायड्रोजन ), गारगोटी व मग्न ( मॅग्नेशिअम ) यांपासून तो बनतो. त्याचे निरनिराळे प्रकार असून त्यांचा उपयोग निरनिराळ्या पद्धतीनें करतात. प्रथम हें खनिज खाणींतून काढून कारखान्यांत आणल्यावर यंत्राच्या साहाय्यानें दगड फोडून फक्त हें खनिज वेगळें करतात व नंतर त्याचा उपयोग करतात. जगांतील सर्वांत मोठा सांठा सध्यां कॅनडांतील क्विबेक प्रांतांत आहे. रशिया, दक्षिण ऱ्होडेशिया, युनि-यन ऑफ साउथ आफ्रिका, सायप्रस, इटली व अमेरिकन संयुक्त संस्थानांतील मेरिलँड, ॲरिझोना व व्हरमान्ट या संस्थानांतून याच्या खाणी आहेत.

**असहकारिता**— सरकार किंवा प्रबलवर्ग याच्याशीं सहकार्य न करणें. राजकारणांत दुर्बल प्रजेनें सरकारास वठणीवर आण-ण्याचें एक अमोघ शस्त्र म्हणून म. गांधींनीं याचा अवलंब केला होता व यशहि मिळविलें होतें. सरकार आणि प्रजा यांमध्यें सहकार्य नसेल तर राज्य चालणेंच अशक्य होईल. रोमन इति-हासांत पॅट्रिशिअन आणि प्लीबियन यांच्या भांडणांत प्लीबियनांनीं पॅट्रिशिअनशीं असहकारिता पुकारून त्यांना हार खाण्यास लाविली. बायकॉट किंवा बहिष्कार हा प्रकार निराळा आहे. त्यांत स्वातंत्र्या-साठीं सनदशीर युद्ध नसतें तर नुसती सामुदायिक नापसंती असते. १९२० सालीं इंग्रजांच्या राज्यकारभारांत जे जुलूम होत होते त्याला पायबंद घालण्यासाठीं कॉंग्रेसनें सरकारी पदव्या, शाळा–कॉलेजें, कोर्टें, कायदेमंडळें व सरकारी नोकऱ्या यांवर बहिष्कार घालून असहकारिता पुकारली व जोराची राजकीय चळवळ केली. सत्याग्रह आणि कायदेभंग यांच्या मदतीनें ही असहहकारिता प्रभावी ठरली. असहकारिता चळवळीशीं म. गांधींचा जनकसंबंध आहे.

**असिक्नी**—या नदीस चंद्रभागा असेंहि म्हणतात. ऋग्वे-दांतील नदीसूक्तांत या नदीचा उल्लेख आला आहे. ख्रि. पू.

३२६ मध्यें वांझिराबाद किंवा जलालाबाद यांपैकीं कोणत्या तरी एका जागीं अलेक्झांडरनें ही नदी ओलांडली. त्या वेळीं या नदीची रुंदी ३००० यार्ड होती व पाण्याला खळखळाटहि फार होता. पुढें या नदीच्या प्रवाहांत बराच फरक झाला. सध्यां या नदीस 'चिनाब' असें नांव आहे.

**ॲसीरिया**—(असुर देश). आशियांतील एक प्राचीन राजसत्ताक देश. टायग्रीस नदीवरील अॅशुर गांवाभोंवतीं हा प्रदेश होता. या देशांतून टायग्रीस नदी वाहते. उत्तरेस आर्मेनियन पर्वत आणि दक्षिणेस बाबिलोनिया देश आहे. क्ष. ५०,००० चौ. मैल. कांहीं भाग डोंगराळ व कांहीं भाग सुपीक मैदान आहे. हल्लीं हा प्रदेश बहुतेक उजाड व ओसाड आहे, पण येथें प्राचीन अवशेष पुष्कळ असून त्यांवरून हा प्रदेश प्राचीन काळीं फार दाट लोकवस्तीचा असावासें दिसतें. लोक सेमाईट वंशाचे असून देवधर्म बाबिलोनी लोकांप्रमाणेंच असे. यज्ञ आणि बलिदान यांचें प्रामुख्य या धर्मांत असे. हा देश खि. पू. २५०० वर्षांइतका तरी प्राचीन आहे. खि. पू. १४०० पर्यंत याला बाबिलोनचें मांडलिकत्व पत्करावें लागलें. नंतर स्वातंत्र्य मिळाल्यावर ८०० वर्षे हिटाईट व इतर लोकांशीं लढा करावा लागला; पण त्यामुळें राज्य वाढलें. पहिला टिग्लथ पिलेसर राजाच्या कारकीर्दीत जगांत हें राज्य बलिष्ठ गणलें जात होतें. खि. पू. ७०० च्या सुमारास आशिया मायनर, ईजिप्त, मेसापोटेमिया, वगैरे देश या साम्राज्यांत समाविष्ट असत. पण पुढें अनेक शकलें होऊन खि. पू. ६०७ मध्यें मेडीज लोकांनीं निनेव्हा राजधानी घेतल्यावर ॲसीरियाचें साम्राज्य बुडालें.

इतिहाससंशोधनानें या साम्राज्यांतील कलाकौशल्यें आणि विद्या यांवर चांगला प्रकाश पाडला आहे. मोठमोठ्या इमारती, देवळें आणि राजवाडे यांचे अवशेष या लोकांची उच्च शिल्पकला आणि राहणी हीं दाखवितात. हें राष्ट्र अत्यंत सुधारलेलें होतें. बाबिलोनिया पहा.

**असुर**– असुर हा शब्द भारतीयांमध्यें दैत्यवाचक आहे. याचा उपयोग ऋग्वेदांत सुमारें १०५ वेळां आलेला असून त्यांपैकीं नव्वद वेळां याचा उपयोग चांगल्या अर्थानें केलेला आहे. मात्र पंधरा वेळेला याचा अर्थ दैत्य म्हणजे देवांचा शत्रु असा केलेला आढळतो. याचा खरा अर्थ वीर्यवान्, शक्तिमान्, पराक्रमी असा होतो. खाल्डियन, इराणी व भारतीय यांचे पूर्वज एके काळीं एकत्र असतांना त्यांच्या कांहीं सामान्य देवता असाव्यात व कांहीं कालानंतर या देवतांबद्दल वाद उत्पन्न होऊन विशिष्ट शाखेंत विशिष्ट देवतेस महत्त्व प्राप्त झाल्यामुळें परस्परांच्या देवतांची हेटाळणी करण्यासाठीं या शब्दाचा उपयोग सुरू झाला असावा, असें वाटतें. शतपथब्राह्मणामध्यें देव व असुर हे सपत्न व भ्रातृव्य असून असुरांची भाषा देवांच्या दृष्टीनें हीन दर्जाची अशी होती असा उल्लेख आहे. असुरविवाह हा अष्टविवाहांतील एक प्रकार असुरांत प्रचलित असावा. तसेंच श्राद्धविधिहि असुरांत चालू होता याला आधार आहेत.

**असुर–बनि–पाल** (मृ. खि. पू. ६२६)—असुर–बनि–पाल व समास–सम–युकिन हे एसर–हडन राजाचे दोन पुत्र होत. एसर–हडन राजानें ॲसीरिया व बाबिलोनिया हे दोन प्रदेश अनुक्रमें समास–सम युकिन व असुर–बनि–पाल यांना वांटून दिले. यानंतर खि. पू. ६६८ मध्यें एसर–हडनच्या पश्चात् असुर-बनि-पाल गादीवर आला. बाबिलोनियन कला व शास्त्रें यांचें शिक्षण असुर-बनि-पाल यास लहानपणापासूनच मिळालें असल्यानें त्यांत तो चांगला वाकबगार झाला होता. हा जसा ऐषआरामी होता तसाच ईश्वरभक्तहि होता. आपल्या सैन्यास राज्याबाहेर गुंतवून हा राजधानींत ऐषआरामांत व शास्त्रीय अभ्यासांत निमग्न राहत असे. आपल्या बापाच्या कारकीर्दीपासून सुरू असलेली ईजिप्तवरील मोहीम खि. पू. ६६७ मध्यें यानें नेटानें पुढें चालवली व त्यांत यश मिळवलें. तसेंच टायरवर स्वारी करून तेथेंहि यानें आपला ताबा ठेवला. खि. पू. ६२६ मध्यें असुर–बनि–पाल वारला त्या वेळीं त्याच्या साम्राज्यास उतरती कळा लागली होती. थोड्याच अवधींत याच्या या साम्राज्याचा लय झाला. असुर–बनि–पालास फलज्योतिष व शकुन यांचा नाद असे. यानें संकलित केलेला पुराणवस्तूंचा संग्रह निनेव्हा येथें होता.

**असेनशन्**—दक्षिण ॲटलांटिक महासागरांत सेंट हेलीना बेटाच्या वायव्येकडे सुमारें ३४ चौ. मै. क्षेत्रफळ असलेलें इंग्लिश आरमाराचें हें एक महत्त्वाचें ठिकाण आहे. तसेंच येथें बोटी कोळसा घेण्यासाठीं थांबतात. या बेटाभोंवतीं सांपडणारीं कासवें अत्यंत सुंदर म्हणून प्रसिद्ध आहेत. जॉर्जटौन हें बेटाचें मुख्य ठिकाण आहे. बेटाची लोकसंख्या फारच थोडी म्हणजे १६१ आहे.

**अस्करी मिर्झा** (मृ. १५५८)—एक मोगल सरदार. बाबरचा हा एक मुलगा होता. हुमायून गादीवर आल्यावर त्यानें अस्करी(मिर्झा)स संबळ प्रांताची जहागीर दिली. यानंतर हुमायूननें गुजरात जिंकला व त्याचा बंदोबस्त ठेवण्याच्या कामगिरीवर अस्करीची नेमणूक केली. परंतु ही कामगिरी अस्करीच्या विलासी व चैनी स्वभावामुळें तडीस गेली नाहीं व बहादूरशहानें परत गुजरातचा कबजा घेतला. शेरखानाशीं झालेल्या लढाईंत पराभव झाल्यामुळें हुमायूनला लाहोरच्या कामरानकडे आश्रयास जावें लागलें. त्या वेळीं अस्करी हाहि हुमायुनाबरोबरच होता. कामराननें यास कंदाहारच्या कारभारावर नेमलें. यानंतर हुमायूननें काबूल–कंदाहार प्रांत आपल्या

ताब्यांत घेतला, तेव्हां अस्करीनें बंद केलें. त्यामुळें त्यास हद्दपार करण्यांत आलें. हा मक्का येथें सन १५५८ मध्यें मरण पावला.

**ॲस्किथ, हर्बर्ट हेनरी** ( १८५२-१९२८ )— हा ब्रिटिश मुत्सद्दी ऑक्सफोर्ड येथील बेलियल कॉलिजमध्यें शिक्षण घेऊन १८९२-९५ मध्यें होम सेक्रेटरी व नंतर कँबेल-बॅनरमन मंत्रिमंडळांत चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर या थोर पदावर चढला. सर हेनरी कँबेल निवृत्त झाल्यावर १९०८ मध्यें मुख्य प्रधान झाला. पहिलें महायुद्ध झाल्यानंतर १९१५ च्या मे महिन्यांत आपसांत मतभेद झाल्यामुळें युनियन पक्षाचे आठ सभासद घेऊन ॲस्किथनें संयुक्त मंत्रिमंडळ बनवलें. १९१६ च्या ता. ५ डिसेंबरला ॲस्किथनें प्रधानपदाचा राजीनामा दिला आणि लॉइड जार्जनें नवें मंत्रिमंडळ बनवलें. १९२५ मध्यें त्याला 'पीअर' चा दर्जा ( अर्ल ऑफ ऑक्सफोर्ड ) देण्यांत आला. १९२६ च्या ऑक्टोबरमध्यें त्यानें लिबरल पक्षाच्या प्रमुखपदाचा राजीनामा दिला. यानें आपल्या कारकीर्दीत वरिष्ठ सभेचा 'व्हेटो' चा हक्क काढून घेतला व आयर्लंडला 'होमरूल' ( स्वराज्य ) दिलें. शांततेच्या काळांत त्याची समतोल बुद्धि व मुत्सद्दीपणा हीं उपयोगी पडलीं; पण युद्धकाळांत त्यांचा उपयोग नव्हता म्हणून लॉइड जार्जला त्या वेळीं प्रधानपद देण्यांत आलें तें ठीकच झालें.

**आस्थि**—हाडें. सस्तन प्राणी, पक्षी, मासे आणि सरपटणारे प्राणी यांच्या शरीरांतील सांपळा ज्या कठिण पदार्थांचा केलेला असतो त्यास अस्थि म्हणतात. या अस्थींच्या सांगाड्यामुळें शरीरांतील हृदय, फुप्फुसें, वगैरे नाजूक इंद्रियांचें बाहेरील आघातापासून रक्षण होतें. गर्भावस्थेमध्यें कूर्चामय पदार्थाची प्रथम अस्थि बनते. त्यानंतर त्यांत स्फुरितें ( फॉस्फेट्स ) आणि खट कर्बितें

( कार्बोनेट्स् ऑफ लाइम ) यांची भर पडून मूल जन्मण्याच्या वेळीं त्याच्या अस्थी बहुतेक तयार झालेल्या असतात. समशीतोष्ण कटिबंधामध्यें मनुष्याच्या अस्थी २०।२५ वयापर्यंत पूर्णावस्थेस पोंचतात. यानंतर ५० वर्षापर्यंत त्यांमध्यें फारच थोडा फरक होतो. त्यानंतर त्या हळूहळू हलक्या व ठिसूळ होऊं लागतात. अस्थि पृष्ठभागाशीं सर्वांत घट्ट असून त्यावर एका पर्यस्थि (पेरीओस्टिअम्) नांवाच्या पडद्याचें पक्कें आवरण असतें. हाडाच्या आंतील भाग अधिक पेशीमय व सच्छिद्र असतो व त्यांत मज्जा भरलेली असते व त्यांत पिवळ्या किंवा तांबड्या चरबीच्या पेशी

**अस्थिभंग**

A, आडवा. B, तिरपा. C, मळसूत्री. D, नक्षत्राकार. E, पाचरी. F, हरित्काष्ठीय. G, संघाती. H, साचा ( कातडें शाबूत ). I, ( संयुक्त कातडें चिरलें आहे असा ).

असून त्यांमध्यें रक्तपेशी असतात. हाडामध्यें ३४ टक्के सेंद्रिय द्रव्य व ६६ टक्के निरिंद्रिय द्रव्य असतें. द्रव्य हें बहुधा स्फुरितें ( फास्फेट्स ), कर्बितें ( कार्बोनेट ), खट प्लविद ( फ्लुओराइड ऑफ लाइम ) आणि मग्नस्फुरित ( मॅग्नेशियम फास्फेट्स ) हीं असतात. हाडांतील सेंद्रिय द्रव्यें उकळलीं असतां त्यांचें जिलेटिन होतें. हाडांतील निरिंद्रिय द्रव्यें उज्जहरिक अम्लामध्यें ( हायड्रोक्लोरिक ॲसिड ) हाडें ठेविलीं असतां विरघळतात.

**अस्थिदोषचिकित्सा**—( ऑस्टिओपथी ). ही पद्धति डॉक्टर के. टी. स्टिल या अमेरिकन वैद्यानें १८७४ मध्यें प्रचारांत आणली. या पद्धतीचें मुख्य तत्त्व हें आहे कीं, कोणताहि विकार मनुष्याच्या शरीररचनेमध्यें विकृति झाल्यामुळेंच उत्पन्न होतो. या पद्धतींत रोगावर औषध देणें अगदीं निरुपयोगी मानण्यांत येतें. शरीराच्या विकृत भागास बोटांनीं दाबून त्यांतील विकृति नाहींशी करणें आणि त्याची पुन्हां स्वस्थानावर स्थापना करून बाकीच्या गोष्टी निसर्गावर सोपविणें हें या उपचारपद्धतींचें मुख्य सूत्र आहे.

**अस्थिमय मत्स्य**—( मालाकोप्टेरा ). कांहीं अस्थिमय माशांच्या जातींस हें नांव देण्यांत येतें. यांमधील बहुतेक प्राण्यांच्या पंखांचा कंगोरा नरम असतो. या वर्गांत रावस ( साल्मन् ), कॉड, वांब ( ईल् ), हेरिंग, वगैरे मासे येतात.

**अस्थिमार्दव**—( रिकेट्स–मुडदूस ). हा रोग लहान मुलांस होतो. यामध्यें अस्थींची वाढ नीट न झाल्यामुळें मुलाचे पाय बाहेरच्या बाजूस वळल्यासारखे दिसूं लागतात. छाती पुढें आल्यासारखी दिसते, पृष्ठवंश वांकल्यासारखा दिसतो आणि सामान्यतः वाढ होत नाहीं. पौष्टिक अन्नाचा अभाव, घरांत पुरेसा उजेड नसणें व सामान्य आरोग्याची काळजी घेतलेली नसणें, इत्यादि गोष्टींमुळें हा रोग उद्‌भवतो. तसेंच चरबीमध्यें 'अ' जीवनसत्त्वाचा (ए व्हिटॅमिन) अभाव व ताजी भाजी, फळें, वगैरे खावयास न मिळणें हेंहि या रोगाचें कारण असतें. हा रोग व क्षयरोग यांमिळून शेंकडा ५० मुलें मृत्युमुखीं पडतात.

**अस्थिव्रण**— ( कॅन्सर–चाळपुळी, नासूर ). अलीकडे सामान्यतः कोणत्याहि व्रणास किंवा शरीरावरील दुष्ट दुश्चिकित्स्य उगवणीस हें नांव देण्यांत येतें. या रोगाचे मुख्यतः दोन वर्ग पाडण्यांत येतात–पहिल्या वर्गांत पुढील सहा प्रकार मोडतात : १. यामध्यें एक मऊ असें गळूं उत्पन्न होऊन त्यामध्यें पुडे असतात आणि तें फार जलद वाढत जातें (मेड्यूलरी). २. यामध्यें गळूं घट्ट व दबलेलें असून हळूहळू वाढत जातें (स्किऱ्हस). ३. हा प्रकार वरील दोहोंच्या मधील असतो (सिंप्लेक्स). ४. यामध्यें शरीराची त्वचा व आंतील श्लेष्मल भाग यांस रोग होऊन प्रथम टणक अशा पुटकुळ्या उत्पन्न होतात व त्यांचीं पुढें गळवें होतात (एपिथेलियल). ५. यामध्यें पचनेंद्रियांस विकार होऊन त्यांतील श्लेष्मल भाग बिघडून जातो (कोलाइड). ६. या प्रकारांत दूषित भागीं एक गळूं होतें व तें सारखें वाढत जातें. वरील प्रकारचा रोग बहुधा ४० वर्षांच्या वयानंतर होतो. दुसरा रोगवर्ग ( कार्कोना ) हा फार तीव्र असून जलद वाढणारा असतो. हा सामान्यतः तरुणपणीं होतो. परंतु उत्तर वयांतहि झालेला आढळतो. याचे अनेक प्रकार आहेत.

**अस्फाल्ट**—काळ्या रंगाचें पातळ आणि घट्ट अशा दोन्ही स्वरूपांत सांपडणारें डांबरासारखें खनिज द्रव्य. घट्ट अस्फाल्ट चकचकीत आणि ठिसूळ असतें. उष्णतेनें तें वितळतें. तें जळल्यावर त्याची मागें राख राहत नाहीं. दगडी कोळशाचा गॅस तयार करतांना अस्फाल्टहि तयार होतें. ट्रिनिदादच्या प्रसिद्ध 'डांबर सरोवरांत' हें मुख्यत्वें सांपडतें. तसेंच व्हेनेझ्युएला आणि क्यूबा या देशांतहि आढळतें. छपरें, टांक्या, लोखंडी नळ, इ. जलरोधक करण्यासाठीं व रंगासाठींहि अस्फाल्ट वापरतात. पक्के रस्ते तयार करण्यासाठीं याचा फार उपयोग होतो.

**अस्वस्थता**— (डिस्टेंपर). हा शैत्य विकारासारखा रोग बहुधा कुत्र्याला जडतो. त्याच्या नाकाडोळ्यांतून प्रथम पाणी गळतें व मग तें चिकट पुवासारखें बनतें. या रोगानें जनावर पुढें पुढें क्षीण होत जाऊन त्याला वात, अपस्मार यांसारख्या व्याधी जडतात.

**अहमद**—अहमद या नांवाचे तीन तुर्की सुलतान होऊन गेले.

पहिला ( सन १५८९–१६१७ )— तिसऱ्या महंमदाचा हा मुलगा सन १६०३ मध्यें सुलतानपदावर आला. याच्याच कारकीर्दींत इराण व हंगेरी या देशांत युद्धें सुरू होऊन त्यांत तुर्कांचा पराभव झाला. याच्या कर्तृत्वाबद्दल लोकांच्या ज्या अपेक्षा होत्या त्या यानें आपल्या गैरवागणुकीनें फोल ठरवल्या.

दुसरा ( सन १६४३–१६९५ )— सुलतान इब्राहिमाचा हा मुलगा. आपला भाऊ दुसरा सुलेमान याच्यानंतर सन १६९१ मध्यें तख्तावर बसला. हा सुलतान असतांना ऑस्ट्रियन लोकांनीं तुर्कांचा पराभव करून हंगेरींतून त्यांची हकालपट्टी केली. या अहमदाच्या मृत्यूस त्याच्या शारीरिक व्याधीबरोबरच तुर्कांचा हा पराभव हेंहि एक कारण होतें.

तिसरा ( सन १६३७–१७३६ )— चौथ्या महंमदाचा हा पुत्र सन १७०३ मध्यें गादीवर आला. आपल्या कारकीर्दींत याला रशियाशीं युद्ध करावें लागलें. या युद्धांत रशियाचा पराभव झाला. तहाच्या प्रसंगीं रशियावर कडक अटी घालाव्यात अशी याच्या प्रजेची इच्छा होती ती यानें मानली नाहीं. त्यामुळें याजविषयीं लोकमत प्रतिकूल झालें. सन १७३० मध्यें जॅनिसेरी या लष्करी गटानें या अहमदास पदच्युत केलें. यानंतर कैदेंतच याचा अंत झाला.

**अहमद, डॉ. सर झियाउद्दीन** ( १८७७– )—एक हिंदी पंडित व शिक्षणतज्ज्ञ. यांचें शिक्षण आलिगड, अलाहाबाद व कलकत्ता येथें झालें. सरकारी शिष्यवृत्ति घेऊन केंब्रिज येथें पुढील शिक्षण केलें. रॉयल अॅस्ट्रॉनॉमिकल सोसायटीचे फेलो व लंडन मॅथेमॅटिकल सोसायटीचे सभासद झाले. नंतर गॉटिंजन युनिव्हर्सिटींतून पीएच्. डी. पदवी घेतली. नंतर पॅरिस, बोलोना व अल् अझर ( ईजिप्त ) युनिव्हर्सिटीमध्यें कांहीं काळ अभ्यास केला. नंतर आलिगड येथील कॉलेजांत गणिताचे प्राध्यापक म्हणून राहिले. औद्योगिक परिषदेचे ते सदस्य होते. आलिगड युनिव्हर्सिटी स्थापन करण्याच्या कामीं त्यांनीं बरीच खटपट केली. ते कलकत्ता युनिव्हर्सिटी कमिशनचे सभासद होते. १९१८ मध्यें ते एम्. ए. ओ. कॉलेजचे प्रिन्सिपॉल झाले व १९२१ मध्यें आलिगड युनिव्हर्सिटीचे पहिले प्रो-व्हाइस चान्सेलर झाले. १९१९ मध्यें ते अलाहाबाद युनिव्हर्सिटी-तर्फे संयुक्त प्रांताच्या कायदेमंडळांत निवडून आले. लष्कराच्या हिंदीकरणासंबंधीं नेमलेल्या स्कीन कमिटीवर ते सभासद होते. वरिष्ठ कायदेमंडळांत निवडून जाण्याकरितां आलिगड युनिव्हर्सिटींतील अधिकारपदाचा त्यांनीं त्याग केला. १९३३ सालीं लाहोर येथें भरलेल्या अखिल भारतीय शिक्षण परिषदेचे ते अध्यक्ष होते. ते रेल्वे स्टॅंडर्ड्स बोर्ड कमिटीचे सभासद होते.—

१९३४ सालीं पुन्हां स्वतंत्रपणें मध्यवर्ती असेंब्लीमध्यें ते निवडून आले. १९३५–३८ व १९४१ मध्यें अलिगड युनिव्हर्सिटीचे व्हॉ. चान्सेलर होते. मध्यवर्ती कायदेमंडळाचे सभासद आहेत. यांनीं शिक्षणाचा इतिहास ( १९४० ); इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स व अमेरिका या देशांतील शिक्षणपद्धति ( १९२९ ); व 'परीक्षापद्धति' हे ग्रंथ लिहिले आहेत.

**अहमद, सर सय्यद सुलतान** ( १८८०– ) एक— हिंदी कायदेपंडित. हे १९०५ सालीं बॅरिस्टर झाले. त्यांची प्रथम बंगाल सरकारनें असिस्टंट लीगल रिमेंब्रन्सर म्हणून नेमणूक केली. त्यानंतर १९१३ मध्यें त्याच पदावर बिहार व ओरिसा सरकारनें त्यांस नेमलें. पाटणा येथें नवीन हायकोर्ट स्थापन झालें त्या वेळीं त्यांची सरकारी ॲडव्होकेट म्हणून नेमणूक करण्यांत आली व १९१९ मध्यें त्यांस हायकोर्ट जज्ज नेमण्यांत आलें. ते १९२३ ते १९३० पर्यंत पाटणा युनिव्हर्सिटीचे व्हाइस चान्सेलर होते. त्यांस १९२९ मध्यें हार्टोग शिक्षण कमिशनवर नेमण्यांत आलें होतें. ते गोलमेज परिषदेचे सभासद होते. पुढें ते कांहीं वर्षें फेडरल कोर्टाचे न्यायाधीश असून १९४१–४५ पर्यंत हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी मंडळांत सभासद होते. यांस पाटणा युनिव्हर्सिटीनें सन्माननीय एल्एल्. डी. ही पदवी दिली आहे.

**अहमदनगर**— मुंबई इलाख्यांतील या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ६५८६ चौ. मैल इतकें असून यांत अहमदनगर, पारनेर, श्रीगोंदें, कर्जत, जामखेड, शेगांव, पाथर्डी (पेटा), नेवासा, राहुरी, कोपरगांव, संगमनेर व अकोला असे बारा तालुके येतात. हा जिल्हा एकूण १३४९ शहरें व खेडीं यांचा बनलेला आहे. याच्या उत्तरेस व वायव्येस नाशिक जिल्हा, ईशान्येस गोदावरी नदी, पूर्वेस निजामचें राज्य, आग्नेयीस व नैर्ऋत्येस सोलापूर व पुणें जिल्हा व पश्चिमेस सह्याद्रि पर्वताचा कांहीं भाग येतो. समुद्रसपाटीपासून ५४२७ फूट उंचीवर असलेला कळसूबाईचा डोंगर याच जिल्ह्यांत येतो. या जिल्ह्यांतील हवा जरी बरीचशी उष्ण असली तरी निरोगी आहे. मे महिन्यांत येथील उष्णतामान १०६ डिग्रीपर्यंत चढतें. या जिल्ह्यांत मुसलमानी अमदानींतील इमारतींचे अवशेष बरेच दिसून येतात. तसेंच डोंगराळ भागांतील कोरीव लेणीं, सिद्धटेक व मिरी येथील मंदिरें, रतनगड नांवाचा किल्ला हीं या जिल्ह्यांतील पाहण्याजोगीं ठिकाणें होत.

चुनखडी, रांगोळीचा दगड, शिवधातु, स्फटिक ही येथील खनिज संपत्ति होय. या जिल्ह्यांतील शेंकडा साठ लोक शेतकी व्यवसाय करणारे आहेत. ज्वारी व बाजरी हीं या जिल्ह्यांतील मोठ्या प्रमाणावर होणारीं पिकें होत.

जिल्ह्याचें मुख्य ठिकाण अहमदनगर हें होय. जिल्ह्याची लो. सं. ११४२२९ आहे.

अहमदनगर तालुका म्हणजे भीमा व गोदावरी या नद्यांमधील डोंगरपठार होय. सहाशें चोवीस चौ. मैलांचें क्षेत्रफळ असलेल्या या तालुक्यांत अहमदनगर व भिंगार हीं शहरें व ११७ खेडीं येतात. येथील हवा निरोगी असून पावसाचें सरासरी मान २२ इंच आहे.

अहमदनगर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण पुण्यापासून ७२ मैलांवर दौंड-मनमाड रेल्वेवर सिना नदीच्या उत्तर तीरावर वसलेलें आहे. इ. स. १४९० च्या सुमारास अहमद निजामशहानें हें शहर वसवून त्यास आपलें नांव दिलें. अहमद निजामशहानंतर बुऱ्हाण निजामशहा, हुसेन निजामशहा, मूर्तिजा निजामशहा, वगैरे मुसलमान राजांनीं येथें आपली सत्ता गाजवली. यानंतर २१ डिसेंबर १७५९ मध्यें अहमदनगरच्या किल्ल्याचा पेशव्यांनीं ताबा मिळवला.

अहमदनगरचा हा किल्ला शहराच्या पूर्वेस अर्धा मैल दूर असून त्याचा परिघ दीड मैलाचा आहे. इ. स. १५५९ मध्यें हुसेन निजामशहानें हा किल्ला बांधला.

अहमदनगर हें एक लष्करी ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे. येथें चांदबिबीचा महाल, अहमद निजामशहाची कबर, अलमगीरचा दर्गा, फरिबाग यांसारखीं प्रेक्षणीय ठिकाणें आहेत.

लुगडीं विणणें, तांब्या-पितळेचीं भांडीं तयार करणें, हे येथील मुख्य धंदे होत. बऱ्याच दुय्यम व प्राथमिक शाळा, एक आयुर्वेद विद्यालय व एक कॉलेज येथें आहे. लो. सं. शहरची ५४१९३ व कॅन्टोन्मेंटची १६२२५ आहे.

**अहमद निजामशहा** ( १४८९–१५०८ )— अहमदनगरच्या निजामशाहीचा संस्थापक. विजयानगरच्या तिमाप्पा बहिरू नामक ब्राह्मणाचा हा नातू. अहमदशहा बहामनीनें विजयानगरवर स्वारी केली त्या वेळीं याचा बाप कैद झाला. नंतर त्यानें मुसलमान धर्म स्वीकारून मलीक नाईक निजाम उलमुल्क बाहिरी असें नांव धारण केलें. अहमद निजामशहा हा पराक्रमी असून यानें स्वपराक्रमावर चंदनवंदन, लोहगड, तोरणा, वगैरे किल्ले व राजापुरापर्यंतचा कोंकण प्रांत आपल्या ताब्यांत आणला बहामनी शहानें याच्यावर केलेल्या स्वारींत त्याचाच पराभव झाला. अहमद निजामशहाला मराठ्यांच्या दक्षिणेंतील पुंडाईसहि तोंड द्यावें लागलें. सन १४९४ मध्यें दौलताबाद व जुन्नर यांच्या दरम्यान बिंकर नांवाच्या खेड्याच्या जागीं यानें अहमदनगर वसवलें. आपला राज्यकारभार चोख ठेवून यानें प्रजेकडून दुवा मिळवला. यानें स्वतः एकपत्नीव्रत पाळलें. तंट्याचा निकाल लावण्यासाठीं द्वंद्वयुद्धाची प्रथा यानेंच पाडली.

**अहमदपूर**— पंजाब, झांग जिल्ह्यापैकीं शोरकोट तहशिलींतील एक शहर. या शहराचा पूर्वी भावलपूरशीं व्यापार चालत असे. पण सध्यां मात्र हा व्यापार थंडावला आहे.

**अहमदपूर (लम्मा)**— भावलपूर संस्थानांतील खानपूर निझामतींतील या तहशिलींत पश्चिम अहमदपूर व ६३ खेडीं यांचा समावेश झालेला आहे. सिंधु नदीच्या सखल प्रदेशांत या तहशिलीचा कांहीं भाग येत असून येथील हवा दमट व रोगट आहे. तहशिलीच्या दक्षिण भागांत माल ओसाड अरण्य आहे.

तहशिलीचें अहमदपूर हें मुख्य ठिकाण सादिकाबाद शहराच्या वायव्येस ४ मैलांवर नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर येतें. दाऊदपुल जातीच्या अहमदखान नामक एका मनुष्यानें हें शहर वसवलें. मुसल्मानी पद्धतीच्या अनेक मोठ्या इमारती येथें दिसून येतात. येथें आंब्याच्या अनेक बागा आहेत.

**अहमदपूर (शरकिया)**— पंजाबमधील भावलपूर व निझामत यांत असलेल्या या तहशिलीचें क्षेत्रफळ २१०७ चौरस मैल असून यांत अहमदपूर हें तहशिलीचें ठिकाण व १०१ खेडीं येतात. या तहशिलींतील हक्रा नांवाच्या सखल प्रदेशांतून पूर्वी सतलजचा प्रवाह वाहत होता असें सांगतात.

तहशिलीचें अहमदपूर हें मुख्य ठिकाण नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेवर भावलपूरच्या नैऋत्येस वीस मैलांवर येतें. सन १७४८ मध्यें हें गांव वसवलें गेलें व त्यानंतर भावलपूरचा नबाब दुसरा भावलखान यास हें त्याच्या सासऱ्याकडून मिळालें या गांवांत सोडा-कार्बोनेटचा व्यापार असून येथून जोडे व मातीचीं भांडीं बाहेर पाठविलीं जातात.

**अहमदशहा**—१. (१४११-१४४३)—गुजरातचा एक पराक्रमी सुलतान. वयाच्या एकविसाव्या वर्षी हा गुजरातच्या गादीवर आला. आपला चुलत भाऊ फिरोजखान यानें भडोच येथें केलेलें बंड मोडून हा परत येत असतां वाटेंत शेख महमंद खत्तु गंजबक्ष याच्या मसलतीनें जें शहर यानें वसवलें तेंच अहमदाबाद होय. यानंतर यानें पट्टण येथील आपली राजधानी हालवून अहमदाबाद येथें आणली. माळवा, सौराष्ट्र यांसारख्या आसपासच्या प्रांतांवर आपला दरारा बसवून यानें त्यांजपासून खंडणी वसूल केली. हिंदुधर्माबद्दल याच्या मनांत चीड होती. सन १४१४ मध्यें यानें ताजुमुल्क नामक कट्टा मुसल्मान अधिकारी नेमून हिंदूंच्या धर्मभावना दुखविण्यास सुरवात केली. हिंदूंचीं देवालयें व मूर्ती यांचा तर यानें नाश केलाच, पण त्याचबरोबर हिंदूंचीं राज्येंहि यानें वळकावण्यास सुरवात केली. महाराष्ट्रांतील बहामनी सुलतानांबरोबर कोंकण प्रांतांत यास लढाया याव्या लागल्या. सन १४४३ मध्यें हा अहमदाबादला मरण पावला. हा न्यायी होता असें सांगतात. रजपुतांशीं यानें शरीरसंबंध केले.

२. (१७४८-१७५४)— दिल्लीचा एक मोंगल बादशहा. बादशहा महम्मदशहा व उधमबाई यांचा हा पुत्र सन १७२५ मध्यें दिल्लीच्या किल्ल्यांत जन्मला. सन १७४८ त हा गादीवर आला. गादीवर येण्यापूर्वीच यानें अहमदशहा अबदालीचा सर हिंद येथें पराभव केला होता. अहमदशहा तख्तावर चढल्यानंतर सन १७५१ मध्यें अबदालीनें पुन्हां पंजाबवर स्वारी केली. तेव्हां यानें त्यास लाहोर व मुलतान हे परगणे देऊन त्यास परतवलें. याच वेळीं याच्या सरदारांत अधिकारलालसा निर्माण होऊन त्यामुळें तंटेबखेड्यांना सुरवात झाली. गाजीउद्दीन नांवाच्या सरदारानें वजिरी मिळवण्याच्या लालसेपायीं मराठ्यांच्या साहाय्यानें यास कैद करून याचे डोळे काढले. यानंतर सन १७७५ पर्यंत म्हणजे २१ वर्षें हा जगला. दिल्लीस मर्यम मकानीमध्यें अहमदशहाचें शव पुरण्यांत आलें.

**अहमदशहा अबदाली** (१७२४-१७७२)—एक दुराणी बादशहा. सदोसाई जातींतील सम्मानखानाचा हा मुलगा. याचें पहिलें नांव अहमदखान असें असून हा अबदाली टोळीचा वंशपरंपरेनें मुख्य होता. सन १७४७ मध्यें नादिरशहाच्या खुनानंतर यानें कंदाहार काबीज करून नादिरशहाची तीस लक्ष रुपयांची ठेव कबजांत घेतली व स्वतंत्रपणें वागण्यास सुरवात केली. सन १७४८ मध्यें यानें हिंदुस्थानवर पहिली स्वारी केली. परंतु दिल्लीचा युवराज अहमद यानें त्याचा पराभव केल्यानें त्यास परतावें लागलें. यानंतर सन १७४८ च्या हिंवाळ्यांत, सन १७५२ मध्यें व सन १७५५-५६ मध्यें अबदालीच्या हिंदुस्थानावर पुन्हां स्वाऱ्या झाल्या. सन १७५५-५६ मध्यें झालेल्या स्वारींत दिल्ली व मथुरा हीं शहरें लुटलीं जाऊन अनेक स्त्रिया भ्रष्टविल्या गेल्या. यानंतर सन १७५८ मध्यें राघोबादादानें अहमदशहा अबदालीच्या लाहोर व मुलतान या प्रांतांवरील सुभेदाराचा पराभव करून त्याच्या जागीं अदिनाबेग नामक आपला सुभेदार नेमला. तेव्हां हे प्रांत परत घेण्याकरितां अबदालीनें पांचव्यांदां हिंदुस्थानवर स्वारी केली. या स्वारीस अबदालीस नजीबउद्दौला रोहिला व अलमगीर बादशहा (दुसरा) यांचाहि पाठिंबा होता. तसेंच अबदालीनें सुजाउद्दौला व उत्तर हिंदुस्थानांतील इतर मुसलमान यांचेंहि या कामीं साहाय्य मिळवलें. या सर्वांच्या साहाय्यामुळेंच अबदालीस पानपतच्या युद्धांत मराठ्यांचा पराभव करणें शक्य झालें. या पानपतच्या लढाईमुळें मराठ्यांच्या इतिहासांत अबदालीला महत्त्व आहे. यानंतर अबदालीनें सन १७८२ मध्यें सहावी, सन १७६४ मध्यें सातवी व सन १७६७ शेवटची म्हणजे आठवी स्वारी हिंदुस्थानावर केली. हा स्वतः सुशिक्षित असून विद्वानांना चहाता होता. दिल्लीबद्दल हा फार कटक असून प्रजेस योग्य

न्याय मिळावा याबद्दल हा जागरूक असे. प्रजेस संतुष्ट राखण्याकडे याचा कल होता. युद्धनिपुण म्हणून याची ख्याति तर आहेच.

**अहमदशहा वली** (१४२२-१४३५)—एक बहामनी बादशहा. आपला भाऊ फिरोजखान यास गादीवरून पदच्युत करून हा गादीवर बसला. हा स्वतः विद्वान् व साधूंचा चहाता असल्यानें लोक यास वली (साधु) म्हणूं लागले. गादीवर येतांच यानें फौजेची सुधारणा केली व रयतेच्या अडचणींत लक्ष घालून तिचा विश्वास संपादन केला. आपल्या कारकीर्दीत यास केरळ व विजयनगरच्या राजांबरोबर युद्ध करावें लागलें. सन १४२७ मध्यें वारंगळच्या राजावर स्वारी करून यानें त्यास ठार मारलें. तेथील हिंदूंना बाटवलें; तसेंच अनेक देवळांची नासधूस करून यानें त्या जागीं मशिदी उभारल्या. सन १४२६ मध्यें माळव्याच्या सुलतानाचाहि यानें पराभव केला. बेदर या पूर्वीच्या हिंदू राजांच्या राजधानीच्या जागीं यानें अहमदाबाद बेदर नांवाचें शहर वसवून तेथें एक किल्ला बांधला. इराण, वगैरे देशांतून अनेक साधूंना यानें आपल्याकडे आणवून त्यांना आश्रय दिला. दानधर्महि यानें बराच केला. अहमदाबाद बेदरें-ला याची कबर आहे.

**अहमदाबाद**— मुंबई इलाख्याच्या उत्तर भागांतील या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ३७१६ चौ. मैल इतकें असून शहर प्रांत, धोलका प्रांत व विरमगांव प्रांत असे तीन विभाग केले आहेत. यांत दस्क्रोई, सानंद, विरमगांव, धोलका, धंधुका, परांतीज असे तालुके व मोडोसा, गोघा हे पेटे येतात. या जिल्ह्याच्या पश्चिमेस व दक्षिणेस काठेवाड द्वीपकल्प, उत्तरेस बडोदें संस्थानच्या उत्तर भाग, ईशान्येस महिकांठा एजन्सी व पूर्वेस बालासिनोर संस्थान व खेडा जिल्हा येतो. साबरमती नदी या प्रदेशांतून वाहते. या जिल्ह्याचें कमाल उष्णतामान ११५ अंशांपर्यंत चढतें. पावसाचें प्रमाण वीस इंचांपर्यंत असतें. गहूं, बाजरी, जोंधळा, कापूस व भात हीं या जिल्ह्यांतील मुख्य पिकें होत.

अहमदाबाद, विरमगांव, धोलका, धंधुका, परांतीज, धोलेरा, मोडस व सानंद हीं या जिल्ह्यांतील मुख्य शहरें होत. अहमदाबाद शहरास व्यापारीदृष्ट्या फार महत्त्व असून तेथें कलेच्या दृष्टीनें उत्तम अशा हिंदु व मुसलमानी पद्धतीच्या इमारती बऱ्याच दिसून येतात. धंधुका तालुक्यांतील गाई दुधाला चांगल्या असतात. याखेरीज या जिल्ह्यांत घोड्यांची पैदासहि चांगली होते.

साखर, धातू, लांकूड, नारळ, हा या जिल्ह्याचा आयात माल असून कापूस व गळिताचीं धान्यें येथून दुसरीकडे रवाना होतात.

अहमदाबाद शहर हें अहमदाबाद जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून हें बाँबे, बरोडा अँड सेंट्रल रेल्वेवर मुंबईपासून ३१० मैलांवर येतें. पूर्वीपासून हें शहर जरतारी, रेशमी व सुती कापड, तसेंच सोन्या-चांदीच्या वस्तू व दागिने यांबद्दल प्रसिद्ध होतें. अनेक (शंभरांवर) कापडाच्या गिरण्यांचें केंद्र म्हणून या शहराचें महत्त्व सध्यां फार आहे.

गुजरातचा सुलतान अहमदशहा याच्या नांवावरून या शहरास अहमदाबाद हें नांव प्राप्त झालें. त्यापूर्वी या शहराच्या जागीं अनहिलवाडचा सोळंकी रजपूत घराण्यांतील राजा कर्ण याचें अशावल हें शहर होतें. सन १७५० ते सन १८१७ पर्यंत या शहरावर मराठ्यांचा अमल असून येथील उत्पन्नाची वांटणी पेशवे व गायकवाड यांमध्यें होत असे.

हें शहर सध्यां संपत्तीचें माहेरघर झालें असून येथील हिंदू व जैन व्यापारी व्यापारावर चांगले लक्षाधीश झाले आहेत.

अहमदशहा, कुतुबशहा, अच्युत बिबी, दस्तुरखान यांच्या कबरी, तीन दरवाजा, काकरिया तलाव, आझिमखानाचा राजवाडा हीं येथील प्रेक्षणीय स्थळें होत. म्यु. हद्दींतील लो. सं. ५९११२६३ व कॅन्टोन्मेंटची ३९४३ आहे.

**अहरिमन**—झरथुष्ट्र संप्रदायांतील दुष्कृत्यांची देवता किंवा दैत्य. याचा ओढा नेहमीं वाईट कृत्यांकडे असतो. हा मोठा कपटी, मत्सरी, अज्ञानी व रोगांचा फैलाव करणारा असा आहे, अशीं वर्णनें झरथुष्ट्र संप्रदायाच्या धार्मिक ग्रंथांत केलेलीं दिसून येतात. अवेस्ता वाङ्मयांत यास 'अंग्रमइन्यू', पहलवींत 'अहरमन्' व अर्वाचीन इराणी भाषेंत 'अहरिमन्' असें म्हटलेलें आहे. अर्वाचीन अवेस्ती पंडित अहरिमन् ही एक व्यक्ति न मानतां तें एक तत्त्व किंवा शक्ति आहे असें समजतात.

**अहर्गण**— सूर्योदय झाल्यापासून पुन्हां सूर्योदय होईपर्यंत जो काल जातो त्यास सौर (सावन) दिवस मानतात. अहर्गण या शब्दांत अहः व गण असे दोन शब्द असून त्यांपैकीं अहः म्हणजे सौर-सावन दिवस व गण म्हणजे समुदाय. अहर्गण याचा अर्थ दिवसांचा समुदाय. ज्योतिषामध्यें मध्यम ग्रहसाधन करण्यासाठीं अहर्गणाचा उपयोग होतो. करणांपासून गेलेल्या वर्षसंख्येस ३६५¼ नें गुणलें असतां मध्यमं साध्य होतें. हा आलेला गुणाकार म्हणजेच अहर्गण. अहर्गणास द्युपिंड अगर दिनगण असेंहि म्हणतात. सिद्धांत ग्रंथांत सृष्ट्यारंभापासून इष्ट दिवसाच्या सूर्योदयापर्यंत सौरसावन दिवस मोजतात, म्हणून त्या अहर्गणास सृष्ट्याद्यहर्गण असें म्हणतात. तंत्र ग्रंथांत युगारंभापासून इष्ट दिवसाच्या सूर्योदयापर्यंत सौरसावन दिवस गणतात. त्या अहर्गणास युगाद्यहर्गण असें म्हणतात. ग्रहलाघवासारख्या करणग्रंथांत एका शकारंभापासून इष्ट दिवसाच्या सूर्योदयापर्यंत सौरसावन दिवस मोजले जातात त्या अहर्गणास शकाद्यहर्गण असें म्हणतात.

ॲसीरिया—टेपेगावरा उत्खननांतील
खि. पू. ४००० मधील एका वाटोळ्या घराचा भाग (पान १६३)

अहमदाबाद—जामामसजिद (पान १६८)

इंका—एक नैसर्गिक पूल (पान २४३)

**अहल्या**—गौतम ऋषीची पत्नी. ही ब्रह्मदेवानें निर्माण केलेली पहिली सुंदर स्त्री असून इंद्रानें हिच्या सौंदर्यावर भुलून हिचें पातिव्रत्य हरण केलें अशी कथा आहे. या कामांत इंद्राचा साहाय्यक असलेल्या चंद्रानें कोंबड्याचें रूप घेतलें व तो मध्यरात्रीं आरवला. तेव्हां पहांट झाली असें समजून अहल्यापति गौतम हा स्नानसंध्येसाठीं बाहेर पडला व त्याच्या गैरहजेरींत इंद्रानें अहल्येचें पातिव्रत्य हरण केलें. गौतमाला जेव्हां ही हकीगत समजली तेव्हां त्यानें अहल्येस शाप देऊन तिचें सौंदर्य नाहींसें केलें. एका ठिकाणीं गौतमाच्या शापानें अहल्या शिला होऊन राहिली व श्रीरामानें तिचा उद्धार करून तिला परत गौतमाकडे पोहोंचवलें, असा उल्लेख आहे. शतानंद नांवाचा अहल्येस एक पुत्र होता. प्रातःस्मरणीय पंचकन्यांत अहल्येचें नांव आहे.

**अहल्याबाई होळकर** (१७२५-१७९५)—मराठेशाहींतील एक सच्छील व धार्मिक राज्यकर्ती स्त्री. औरंगाबाद जिल्ह्याच्या बीड तालुक्यांतील चौंढें गांवच्या पाटलाची ही मुलगी. सन १७३३-३४ मध्यें हिचा विवाह इंदूरचे सरदार मल्हारराव होळकर यांचा पुत्र खंडेराव याजबरोबर झाला. खंडेराव व्यसनी निघाल्यामुळें हिला संसारसुख मिळूं शकलें नाहीं. मालेराव व मुक्ताबाई अशीं हिला दोन मुलें झालीं. यानंतर सन १७५४ मध्यें कुंभेरीच्या किल्ल्यास मराठ्यांच्या सैन्याचा वेढा पडला असतां शत्रूंशीं झालेल्या चकमकींत खंडेराव ठार झाला व अहल्याबाईस वैधव्यदशा प्राप्त झाली. मल्हारराव होळकर हा सन १७६६ पर्यंत हयात होता तोंपर्यंत अहल्याबाईस त्याचा आधार होता. परंतु त्याच्या पश्चात् राज्यकारभाराचा सर्व भार अहल्याबाईवर पडला. कारण तिचा मुलगा मालेराव हा सज्ञान झालेला नव्हता. मालेराव कर्ता होतांच त्याच्या हातांत राज्यसूत्रें आलीं. परंतु अवघ्या दहा महिन्यांत त्यास वेडाचे झटके येऊन तो मरण पावला व अहल्याबाईस राज्याची धुरा पत्करावी लागली.

मालेरावाच्या मृत्यूनंतर होळकर घराण्यांतील एखाद्या मुलास दत्तक घ्यावें अशी गंगाधर यशवंत चंद्रचूड या दिवाणानें इच्छा दर्शविली. परंतु हिनें तें नाकारलें. महादजी शिंदे व पेशवे यांची सहानुभूति मिळवून हिनें आपलें राज्यकारभाराचें धोरण आंखलें. आपल्या सेनेचें आधिपत्य हिनें तुकोजीराव होळकराकडे देऊन त्याला पेशव्यांची मान्यता मिळविली. तुकोजीराव राज्याचें परराष्ट्रीय धोरण पाही व हिनें आपल्याकडे अंतस्थ कारभार ठेवला होता. पुणें, हैद्राबाद, नागपूर, श्रीरंगपट्टण, लखनौ, वगैरे ठिकाणीं हिनें आपले विश्वासू वकील ठेवले होते. प्रजेच्या हितासाठीं ही तत्पर असल्यानें हिला कोणाकडून विशेष असा कधीं त्रास झाला नाहीं. हिच्या कारकीर्दींत चंद्रावतानें बंड उभारलें होतें. परंतु सन १७८८ मध्यें हिनें त्याचा मोड केला. आपल्या राज्यांतील लोक व भिल्ल लोक यांच्यांतील वैमनस्य कमी करून दोघांमध्यें स्नेहसंबंध निर्माण केले.

अहल्याबाईचें नांव तिच्या औदार्य, न्यायप्रियता, भूतदया, सदाचरण, इत्यादि अलौकिक गुणांमुळें सर्वतोमुखीं झालें आहे. संस्थानची दौलत व खासगी पैसा सरकारी कामासाठीं खर्च करून त्यांतून जो पैसा शिल्लक राही त्याचा विनियोग ही राणी लोकोपयोगी सार्वजनिक कामांसाठीं करीत असे. लोकांच्या सोयीसाठीं हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं हिनें अनेक धर्मशाळा, विहिरी, रस्ते, घाट, इ. बांधले व जागोजागीं अन्नछत्रें सुरू केलीं. काशीविश्वेश्वराचें मंदिर, गया येथील विष्णुपदाचें मंदिर व सोरटी सोमनाथाचें मंदिर हीं देवळें हिनें नवीन बांधवलीं. दानशूर म्हणूनहि हिनें कीर्ति मिळवली.

दिसावयास तेजस्वी, वागणुकीनें साधी व शांत वृत्तीची अशी ही थोर बाई होती. अहल्याबाईस शेवटीं अनेक कौटुंबिक दुःखांना तोंड देण्याची पाळी आली तरी तिनें धीर न सोडतां आपली राज्याची जबाबदारी पार पाडली. खर्ड्याची लढाई झाल्यानंतर शके १७१७ च्या श्रावण वद्य १४ स हिनें इहलोकाचा निरोप घेतला.

**अहळींव**—ही एक वनस्पति असून हिच्या कोंवळ्या रोपट्याची भाजी करतात. ती परिणामीं उष्ण असते.

अहळींवाचें बीं तपकिरी रंगाचें, मोहोरीच्या आकाराचें व अणकुचीदार लांबट असें असतें. खानदेशांत पाटाच्या अगर नदीच्या कांठीं हें पेरतात. हें बीं पुष्टिदायक असून वायु व गुल्म यांचा नाश करणारें आहे. वातनाशासाठीं अहळींवाची खीर करून घेतात. बाळंतिणीस शक्तिवृद्धीसाठीं व दूध वाढावें यांसाठीं अहळींवाचे लाडू व खीर देतात.

**अहिच्छत्र**—अर्वाचीन रामनगर. पांडवांच्या कालांतील उत्तर पांचाल देशाची ही राजधानी. सध्यां येथें असलेला जुना किल्ला येथील मूळचा राजा आदिराजा यानें बांधला असावा. या नगरास अहिच्छत्र किंवा अहिक्षेत्र असें म्हणत. ह्युएनत्संगानें केलेल्या वर्णनावरून असें दिसतें कीं, या शहराचा घेर तीन मैल असून त्याच्याभोंवतीं नैसर्गिक तटबंदी होती. तसेंच येथें बारा विहार, नऊ वैदिक देवालयें व पांच स्तूप होते. येथील उत्खननांत गुप्तकालीन अवशेष सांपडले आहेत.

**अहिरी जमीनदारी**—मध्यप्रांत, चांदा जिल्ह्यांतील पंचवीस चौ. मैल क्षेत्रफळ असलेली सर्वांत मोठी जमीनदारी. गडचिरोली तहशिलींत या जमीनदारीचीं आणखी सत्याहत्तर खेडीं असून त्यांचें क्षेत्रफळ ५५ चौरस मैल आहे.

मानसु बापू यास चांदाच्या एका गोंड राजाकडून सुमारें सहा शतकांपूर्वी ही जमीनदारी बक्षीस मिळाली असें सांगतात. परंतु कागदपत्रांवरून असें दिसतें कीं, इ. स. १७०३ ते सन १७६९ या कालांत होऊन गेलेल्या कोकशा या जमीनदारानें साधो व मूला वरिया या बंडखोरांचा मोड केला म्हणून त्यास ही जमीनदारी बहाल करण्यांत आली होती. इ. स. १८९३ मध्यें भुजंगराव नामक वाईट वर्तनाच्या जमीनदाराच्या हातीं या जमीनदारीचीं सूत्रें आलीं. त्याच्या दुर्गुणांमुळें सन १९०२ मध्यें सरकारनें त्यास नालायक ठरवलें व ही सर्व जमीनदारी कोर्ट ऑफ वॉर्डस्च्या ताब्यांत गेली.

तीनशें ऐशीं खेडीं असलेल्या या जमीनदारींत भात हें मुख्य पीक असून याखेरीज ऊंस, ज्वारी, मूंग, उडीद व कुळीथ यांसारखीं पिकेंहि काढलीं जातात. खेड्यांची वहिवाट जमीनदारांकडून व ठेकेदारांकडून होते. जरवंदी व मोलपल्ली या दोन दुय्यम जमीनदाऱ्या असून त्यांत अनुक्रमें सतरा व तेवीस खेडीं आहेत. या भागांत सुपीक जमीन व वक्तशीर पाऊस असल्यानें पिकें चांगलीं येतात. राजगोंड, मारिया, कोया, तेली व मरार, वगैरे जातींचे लोक या भागांत राहतात.

**अहिर्बुध्न्य**—अहिर्बुध्न्य ही देवता अंतरिक्षांत वास करणारी असून इष्ट मनोरथ पूर्ण करण्याविषयीं हिची प्रार्थना केलेली आढळते. या देवतेचें निश्चित स्वरूप काय आहे हें सांगणें कठिण आहे. कित्येकांच्या मतें चंद्रास अहिर्बुध्न्य ही संज्ञा दिलेली असून प्राचीन काळीं जसे सूर्योपासक होते तसेच चंद्रोपासक होते व या उभयतांमध्यें चढाओढ होती असें वेदार्थकारांचें मत आहे. उत्तर वाङ्मयांत हें एक शिवाचें किंवा रुद्राचें रूप कल्पिलें आहे.

**अहिवंत किल्ला**—नाशिक जिल्ह्यांतील चांदोर डोंगरांत दिंडोरीच्या उत्तरेस पंधरा मैलांवर असलेला एक किल्ला. खानदेश व गंगथडी या दोन्ही बाजूंनीं या किल्ल्यावर जाण्यास मार्ग आहेत. या किल्ल्यावर पाणी मुबलक आहे.

**अहिंसा**—कोणत्याहि जीवाला इजा करून दुखवूं नये हें तत्त्व फार प्राचीन कालापासून चालत आलेलें आहे. परंतु हें तत्त्व उच्चतम कोटीला नेण्याचें श्रेय बौद्ध धर्म व विशेषतः जैन-धर्म यांच्याकडेच जातें. जैन धर्मामध्यें या तत्त्वाचा अतिरेक झालेला दिसून येतो. अहिंसाव्रत हें जैन साधूंच्या पंचमहाव्रतांमधील आद्य तत्त्व असून या तत्त्वाचा पूर्णपणें अवलंब करण्यासाठीं जैनांतील स्थानकवासी पंथाचे लोक आपल्याबरोबर नेहमीं वाट झाडण्यासाठीं एक सुतांचा कुंचा बाळगतात व तोंडांत जीवजंतू जाऊन त्यांची हत्या होऊं नये म्हणून तोंडाला फडक्याची पट्टी बांधतात. इतकेंच काय, परंतु अंगावरील कपडे झाडले असतां त्यावरील जीवजंतू मरतील म्हणून हे लोक आपले कपडेहि झाडीत नाहींत. या जीवजंतूंच्या रक्षणासाठीं म्हणून हे लोक मनुष्यहत्या सुद्धां उघड्या डोळ्यांनीं पाहतील. ढुंढये जैन हे लोक तर थंड पाण्यांतील जंतू मरतील म्हणून असें थंड पाणी न पितां भाताची पेज अगर भाजीचें पाणी पिऊन राहतात. जैन धर्मांत अशा रीतीनें अहिंसेचा अतिरेक झालेला दिसून येतो. बौद्ध धर्मांत मात्र हें तत्त्व मानवधर्माला अनुसरून योजलेलें दिसून येतें. अतिथिसत्कारासारख्या प्रसंगीं अनेक बैल व बकरीं मारून अतिथीस संतुष्ट करण्याचा प्रघात त्या वेळीं असे. अशोकानें या अनन्वित हिंसेस बंदी घालून पाकशाळेंत आमटी-भाजीसाठीं दररोज शिजल्या जाणाऱ्या प्राण्यांचे जीव वांचवले.

भूतदयेच्या दृष्टीनें अहिंसा हें तत्त्व जरी दिसावयाला ठीक असलें तरी त्यासाठीं मनुष्यानें आपल्या गरजांना अनिष्ट मुरड घालणें व या तत्त्वाचा विपर्यास करणें हें ठीक होणार नाहीं. सृष्टिनियमानुसार मोठ्या जीवाच्या बचावासाठीं लहान वस्तूंचा बळी पडणारच. जीवहत्येच्या कल्पनेमुळें रोगांचा प्रतिकार करणाऱ्या लसी टोंचून न घेतल्यास अहिंसा या तत्त्वाचा अवलंब न होतां जास्त जीवांची हत्या मात्र होईल व हिंसेचें पापच स्वीकारल्यासारखें होईल.

महाभारतावरून असें दिसतें कीं, हिंदु धर्मांत अहिंसा हें तत्त्व फार प्राचीन कालापासून आहे. परंतु जैन लोकांप्रमाणें त्याचा अतिरेक मात्र झाला नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांत येशू ख्रिस्तानें अहिंसेचें पालन करण्याची शिकवण दिली व पुढें टॉलस्टॉय व रोमा रोलाँ यांनीं तिचें पुन्हां महत्त्व पटवून दिलें. पण म. गांधी यांनीं राजकारणांत अहिंसेचें तत्त्व शिरकविल्यापासून जगाचे डोळे या महान् तत्त्वाकडे वळले. या अहिंसेची अनाक्रमण व अप्रतिकार हीं दोन अंगें आहेत. हिंदुस्थानांत गांधींच्या शिकवणीनें काँग्रेसनें अहिंसामार्गानें स्वराज्य प्राप्त करून घेतलें. अहिंसामय असहकारिता हें आधुनिक युगांत जनतेच्या हातांतील प्रभावी क्रांतीचें शस्त्र बनलें आहे. अहिंसेची साधना करतांना क्लेश भोगावे लागतात व त्यामुळें आत्मिक सामर्थ्य वाढतें व प्रतिपक्षी मनानें कमकुवत होतो.

**अहीर**—शेतकऱ्यांची व गवळ्यांची एक मोठी जात. बहुतेक अहीर हे हिंदूच असून बिहार, ओरिसा व संयुक्त प्रांत या भागांत यांची संख्या मोठी आहे. याशिवाय बंगाल, संयुक्त प्रांत, मध्यप्रांत, मुंबई इलाखा व पंजाब या भागांतहि अहीर लोक

विखुरलेले आहेत व देशमानाप्रमाणें त्यांचीं नांवें, धंदे, चाली-रीती यांतहि फरक दिसून येतो. यांची एकूण संख्या ९५ लक्षांवर भरेल.

मध्य आशियांतून सिंधु खोऱ्यांत आलेले अहीर लोक व इ. स. पूर्वी १ ल्या अगर २ ऱ्या शतकांत हिंदुस्थानात आलेले सिथियन अरब यांचा अहीर लोकांशीं धागादोरा लावण्यांत येतो. सध्यांचे अहीर लोक हे आभीर लोकांचेच वंशज असून ते ज्या प्रांतांत राहतात तेथील हवामानानुसार व चालीरीतींनुसार त्यांचा जीवनक्रम तयार झाला आहे. मथुरावंशी अहीर ( ग्वाल ) हा उंच असून त्याचा रंग गव्हासारखा व चेहरा कोंवळा व रेखीव असतो. मगधांतील अहीर हा काळा असून त्याचे हात-पाय मोठे, चेहरा ओबडधोबड व गांवढळ असतो. रसेल व हिरालाल यांच्या मतें मंडल्यांतील कोंवळा अहीर हे, अहीर आणि गोंड किंवा कवारा या जातींच्या मिश्रणांमुळें तयार झालेले आहेत. दौवा लोक बुंदेले रजपूत व अहीर स्त्रिया यांच्यापासून निर्माण झाले आहेत. अहीर लोकांना बंगालमध्यें गोआला, मध्यप्रांतांत गवळी, ग्वाला, गोलकर, ग्वालन, रावत, कहर व महाकुल, इत्यादि नांवें आहेत.

अहीरांचे स्थानिक देव निरनिराळे असले तरी कृष्णावर त्यांची विशेष भक्ति असते. गाईस ते पवित्र मानतात. नर्मदा खोऱ्यांत राहणारे लोक भिलाट नांवाच्या एका काल्पनिक देवाची उपासना करतात. भिलाट हा एका अहीर स्त्रीस महा-देवापासून झालेला पुत्र होय असें समजतात. हरिदास बाबा हा अहीरांचा साधु होय.

अहीरांचा मुख्य सण दिवाळी हा असून या वेळीं ते ऐकें मातीचा गोवर्धन पर्वत तयार करतात. गुरें पाळणें हा अहीरांचा मुख्य धंदा. कोंबडी–बकऱ्याचें मांस हे लोक निषिद्ध समजतात. जातिबहिष्कार, शुद्धीकरण व प्रायश्चित्त यांसारख्या बाबतींत पंचायतींचा निर्णय हे लोक मान्य करतात.

उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान धर्म स्वीकारलेल्या अहीर लोकांना घोसी किंवा गद्दी असें म्हणतात व हे लोक द्राविडमिश्र मुसलमान धर्माचें आचरण करतात.

**अहीराणी**— खानदेशांत जे अहीर लोक आहेत ते ही भाषा किंवा बोली बोलतात. ही भाषा मराठी, गुजराती, नेमाडी व हिंदुस्थानी या चार भाषा मिळून झालेली आहे, असा विद्वानांचा तर्क आहे. ही विशेषतः मराठी आणि गुजराती भाषांना फार जवळ आहे, म्हणून कोणी मराठीची तर कोणी गुजरातीची ही एक बोली मानतात. ही एक किंवा अधिक प्राकृत भाषांपासूनहि निघालेली असेल. हींत 'ळ' हा वर्ण नाहीं; त्याबद्दल 'य' चा उच्चार होतो. व्याकरणाचीं रूपें साधारणपणें मराठी–गुजराती-प्रमाणें होतात. या बोलींत वाङ्मय म्हणजे म्हणी, गाणीं व गोष्टी फक्त आहेत.

**अहीर भैरव**—हा राग भैरव थाटांतून निघतो. याचे आरोहावरोह सात स्वरांचे असल्यानें याची जाति संपूर्ण आहे. वादी षड्ज व संवादी पंचम आहे. याचा गानसमय प्रातःकाळ आहे. या रागांत तीव्रधैवत व दोनहि निषाद या स्वरांचा प्रयोग दृष्टीस पडतो. पूर्वांगांत भैरव व उत्तरांगांत काफी हे राग या रागांत स्पष्ट असतात. मध्यम स्वर सुटा सोड-ल्यानें याचें वैचित्र्य वाढतें. हा एक भैरव प्रकार असून दुर्मिळ रागांपैकीं एक आहे.

**अहुरमझ्द**—ससॅनियन कालांत उन्नतीस पोहोंचलेल्या मझ्द संप्रदायांतील हा सर्वश्रेष्ठ देव असून यास ओर्मझ्द असेंहि म्हणतात. हा सर्वशक्तिमान्, सर्वसाक्षी सर्वांच्या हिताची काळजी वाहणारा, दयाळू व न्यायी म्हणून मानला जातो. अहरिमन् या दुष्कृत्याच्या देवतेपासून अहुरमझ्द हा असुर आपलें रक्षण करतो, अशी मझ्दसंप्रदायाची कल्पना आहे. पहलवी औह्र्मझ्द हा शब्द अवेस्ती फारसी औरमझ्द शब्दापासून आला व सध्याचें पारशी ओर्मझ्द हें नांव तयार झालें. प्राचीन अवेस्तांत मझ्दा अहुरा, अहुरा मझ्दाए किंवा अहुराद मझ्दाइ अशीं ' औरमझ्द 'चीं रूपें दिसून येतात. अहुरमझ्द हा सतत प्रकाशांत असतो तर त्याच्या उलट अहरिमन् हा नेहमीं काळोखांत राहून मनुष्याला त्रास देतो असें समजतात.

कांहीं भाषापंडितांच्या मतें अहुरमझ्द म्हणजे संस्कृत 'असुरमहत्' किंवा 'असुरमेधस्'. असुरमेधस् हा गुण वेदांत वरुणास लावलेला असून याचा अर्थ सर्वसाक्षी असुर असा आहे.

**अहेरिया**—उत्तर हिंदुस्थानांतील पंजाब व संयुक्त प्रांत यांत राहणारी, शिकारी, पारधी व चोरटे यांची एक वन्यधर्मी जात. लो. सं. २४२४५. या जातींतील अभिजात विचारांचे असे कांहीं संयुक्त प्रांतांतील भैरासूर या देवतेचे उपासक आहेत. प्रसिद्ध साधु गूगा किंवा जाहीर पीर व मुरादाबाद जिल्ह्यांतील अमरोहाचा मियाँ किंवा मिरानसाहेब या मुसलमान साधूंची मुसलमान पुरोहिताच्या हस्तें हे लोक पूजा करतात. देवत्वाप्रत पोहोंचलेल्या जखिया नामक झाडवाल्यास हे देव मानतात. जखियापुढें डुकराचा बळी देतात व या वेळीं हजर असलेला झाडवाला पुरोहित मेलेल्या डुकराचें रक्त मुलांच्या कपाळाला लावतो. यामुळें भूतबाधा होत नाहीं अशी अहेरियांची समजूत आहे. बराई व चामर याहि यांच्याच दोन लहान ग्रामदेवता होत. सुप्रसिद्ध रामायणकार वाल्मीकि ऋषि यांना हे लोक गुरुस्थानीं मानतात. प्रेताचें दहन केल्यावर घरीं परत येतांना हे

लोक चितेवर दगड फेंकतात. मृत मनुष्याच्या भुतानें आपल्या-बरोबर येऊं नये असा असें करण्यांत यांचा उद्देश असतो.

पंजाबमधील हिसार, गुरगांव, कर्नाळ, अंबाला हे जिल्हे व पतियाळा व झिंद हीं संस्थानें यांतून या लोकांची वस्ती असून हे लोक गवताचा व्यापार व मजुरी करतात. यांतील कांहीं लोक शीख व महंमद संप्रदायीहि आहेत.

**अहोवल**—हा 'संगीत पारिजात' नांवाच्या प्रसिद्ध ग्रंथाचा कर्ता. हा दक्षिणेकडील द्राविडी ब्राह्मण होता. इसवी सनाच्या १७ व्या शतकाच्या प्रारंभीं होऊन गेला. बापाचें नांव श्रीकृष्ण पंडित. हा धनवड संस्थानचा आश्रित होता. 'संगीत पारिजात' ग्रंथ संगीताच्या उत्तरपद्धतींत सर्वमान्य समजला जातो.

**अळतें**—मुंबई, कोल्हापूर संस्थान. अळतें तालुक्यांतील कोल्हापूरच्या वायव्येस बारा मैलांवर असलेला सुमारें ८०० वर्षांपासूनचा एक जुना गांव. या गांवांत रमजान दर्गा असून शिदोबा, धुळोबा, अलंप्रभु, रामलिंग व एक लिंगायत साधु यांचीं देवळें आहेत. अलमगीर बादशहानें आपल्या पादुका येथील गांवकर्‍यांना दिल्या व त्याप्रीत्यर्थ अलंप्रभूचें देऊळ बांधण्यांत आलें असें सांगतात. या अलंप्रभूबद्दल दुसरी अशी एक कथा सांगतात कीं, प्रभु नांवाचा एक लिंगायत साधु होऊन गेला. त्याच्या आडलिंग नांवाच्या शिष्यानें हें देऊळ बांधलें. सध्यांचें येथील रामलिंग हें पूर्वीचें एखादें बौद्ध किंवा जैन मंदिर असावें. अठराव्या शतकांत झालेल्या धामधुमींत दोन वेळां हा गांव जाळण्यांत आला होता.

**अळंबी वर्ग**—(इं. फंगी = बुरशी) हा एक अपुष्प वनस्पतींचा फार मोठा वर्ग आहे. यामध्यें अळंबी वगैरे वनस्पती येतातच, पण इतर अनेक बुरशी, यीस्ट, वगैरे जातीच्याहि परोपजीवी वनस्पती याच वर्गांत मोडतात. या परोपजीवी वनस्पतींचें अळंब्यांशीं निरवयवी (थॅलोफाइट) असण्यामध्यें साम्य आहे. परंतु त्यांच्या

पोषणाच्या वगैरे बाबतींत फरक आहे. यांच्यामध्यें रंगीतजीवनपिंड (क्रोमॅटोफोर) नसतात. त्यामुळें त्या मृतजीवी (सॅप्रोफाइट) सारख्या मृत सेंद्रिय पदार्थांवर किंवा इतर जिवंत वनस्पतींवर जगतात. वनस्पतींना होणारे बहुतेक रोग अशा तर्‍हेच्या किंवा परोपजीवी वनस्पतींपासून होतात. परंतु मृतजीवी जातीच्या वनस्पती एका तर्‍हेनें घाण काढून नाहींशी करण्याचें उपयुक्त कार्य करतात. त्यामुळें प्राणिज किंवा वनस्पतिज घाण सांचून राहत नाहीं, व त्यामुळें यांच्यापासून होणार्‍या हानीपेक्षा लाभ अधिक आहे. बरींच अळंबीं खाण्यालायक असतात. तथापि कांहीं भयंकर विषारी असतात. यांचें शरीर बहुतेक एका बहुशाखायुक्त नाजुक तंतुजालाचें (मायसेलियम) बनलेलें असतें. यांचें पुनरुत्पादन बहुतेक कांहीं सूक्ष्म पेशींपासून होतें. या पेशी वातावरणांत नेहमीं तरंगत फिरत असतात व त्यांपासूनच बुरशी उत्पन्न होते.

**अळंबें**—सडलेल्या पदार्थांवर, वाळलेल्या शेणावर व उकिरड्यावर उगवणारी ही वनस्पति छत्रीच्या आकारांत उगवते. विषारी व गोडें असे या अळंब्याचे दोन प्रकार आहेत. विषारी अळंबें पोटांत गेलें असतां त्याचा अंमल चढतो व पोट फुगून वांति होते. चुड्यें, चितळें, गवतें, कुबळें, कुरटी, तेलंगी, भुयफोड व मोग्रळे अशा अळंब्याच्या आठ जाती आहेत. अळंब्याचे कळे देवी व गोवर पोटांत पडूं नये म्हणून ऊन पाण्यांत वांटून घेतात. मुळव्याधीवरहि याचा उपयोग होतो असें सांगतात.

**अळशी**—[ वर्ग - लिनासी; जाति - लिनम ]. वाख. या जातीचीं अनेक झाडें आहेत. त्यांपैकीं सर्वांत महत्त्वाच्या झाडांची (लिनम युसिटाटि ससिमम) लागवड त्याचें बीं व वाख यांकरितां करण्यांत येतें. हें रोप समशीतोष्ण व कमी उष्ण प्रदेशांत वाढतें. याची उंची सुमारें तीन फूट असते व त्याला फिकट निळीं फुलें येतात. याची लागवड केवळ वाखाकरितां करावयाची असेल तर त्याची पेरणी दाट करण्यात येते. परंतु जर त्याचें बीं तेलाकरितां पाहिजे असेल तर पातळ पेरणी करतात. वाख काढावयाचा असला म्हणजे झाडें मुळासकट उपटतात व त्यांच्या पेंड्या बांधून त्या एखाद्या डबक्यांत किंवा नाल्यांत कुजत घालतात. नंतर तीं झाडें सुकत घालतात. नंतर त्यांचीं बोंडें काढण्यांत येऊन त्यांच्यापासून एका दांत्याच्या फणीनें वाख काढून घेण्यांत येतो. याच्या-बियांस अळशी म्हणतात. अळशीचें तेल काढण्यांत येतें; तसेंच अळशीची पेंड गुरांस खावयास घालतात. वाख यानंतर विंचरून वगैरे साफ करण्यांत येतो व त्याची सुतळी किंवा दोर वळण्यांत येतात. या दोरापासून निरनिराळ्या जातीचें कापड विणण्यांत येतें व त्यांचीं शिडें, तंबू, वगैरे करण्यांत येतात. चांगल्या जातीचा वाख किनारी वगैरे करण्याकरितां वापरतात. या दोरांचा व कापडाचा मोठा व्यापार चालतो.

**अळसुंदें**—दुसर्‍या झाडाच्या आधारानें वाढणारी चवळीच्या जातीची एक वेल. बेळगांवकडील प्रदेश व कोंकण या भागांत या वेली जास्त असतात. अळसुंदें ही एक मोठी शेंग असून त्यांतील दाणेहि मोठे असतात. यास वालाच्या शेंगा असेंहि म्हणतात. कोंवळ्या शेंगांची भाजी व जून शेंगांतील दाण्यांची उसळ करतात. अळसुंद्याचें बीं चवळीच्या बींच्या

दुप्पट मोठें असून लांबट व तपकिरी रंगाचें असतें. अळसुंद्याचें पीक बागाईत व ओल राहणाऱ्या शेतांत काढतात.

**अळू**—(तेरें). बंगाल, आसाम, मद्रास, राजपुताना, दक्षिण हिमालयानजीकचा प्रदेश व सिलोन प्रांत हीं अळूचीं मुख्य उत्पत्तिस्थानें होत. अळूचीं पानें कमळाच्या पानासारखीं असून त्यांचे देंठ लांब असतात. याच्या कांद्यांत पुष्कळ पिष्टसत्त्व असून न्यू गिनीमध्यें या कांद्यांच्या पिठाचीं बिस्किटेंहि करतात. याखेरीज त्रावणकोर, वगैरेसारख्या ठिकाणीं याचे खाण्याचे निरनिराळे पदार्थ तयार करतात. अळूच्या पानांची भाजी चांगली होते.

या झाडांत रानटी व लागवड केलेली अशा दोन जाती आहेत. रानटी अळूचीं फक्त पानेंच खाण्याजोगीं असतात. गुरीकाचू व असूकाचू हे लागवड केलेल्या अळूचे दोन प्रकार आहेत.

या झाडाचा रस आंबट असतो व त्याचा रक्तस्तंभक म्हणून उपयोग होतो. अळूचीं पानें व देंठ गुरांना घातल्यास तीं चांगलीं पुष्ट होतात.

**अळें**—मुंबई, पुणें जिल्ह्यांतील जुन्नरच्या पूर्वेस १६ मैलांवर असलेला एक लहानसा गांव. होळकरांच्याकडून हा ब्रिटिश सत्तेखालीं गेला. ज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्या रेड्याकडून वेद वदवले असें म्हणतात त्यास या गांवीं पुरलें आहे असें सांगतात. येथें त्याची समाधि व देऊळ दाखवितात. येथील कोळवाडींत दरसाल चैत्र शुद्ध एकादशीस म्हसोबाची यात्रा भरते. या ठिकाणीं घोंगड्या होतात. लो. सं. ५०१४.

**अक्षराष्ट्रें**—(रोम-बर्लिन). जर्मनी व इटली या दोन राष्ट्रांनीं केलेल्या राजकीय सहकार्याच्या करारामुळें त्या दोन राष्ट्रांना हें नांव देण्यांत आलें. हा करार १९३५ सालीं अॅबीसीनियावरील इटलीनें केलेल्या मोहिमेच्या वेळीं प्रथम झाला, १९३७ सालीं अॅन्टी-कोमिन्टर्न पॅक्टनें बळकटी आली, आणि १९३९ सालीं या कराराचा संपूर्ण लष्करी व राजकीय मित्र-संघ बनला. पूर्वी इटलीनें युरोपच्या पश्चिम भागांतील इंग्लंड-फ्रान्स, आदि राष्ट्रांशीं सहकारिता करून जर्मनीनें डॅन्यूब नदीच्या खोऱ्यांत चालविलेल्या अतिक्रमणाला विरोध केला होता, आणि १९३४ सालीं जर्मनींतील नाझी पक्षानें ऑस्ट्रियांत बंड उभारलें, त्या वेळीं जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारण्याची धमकी इटलीनें दिली होती. परंतु अॅबीसीनियावर इटलीनें हल्ला केल्यानंतर वरील पश्चिम भागीय राष्ट्रें इटलीविरोधी बनलीं. त्यामुळें इटलीनें जर्मनीबरोबर राजकीय सहकार्याचा करार केला. त्यामुळें इटलीला अॅबीसीनिया जिंकण्याचें कार्य पुरें करतां आलें, आणि जर्मनीला र्‍हाइनलँडचा ताबा पुन्हां घेतां आला. नंतर या दोन अॅक्सिस राष्ट्रांनीं स्पॅनिश यादवी युद्धांत जनरल फ्रँकोला मदत दिली, आणि परस्परांना आपले राजकीय हेतु साध्य करण्यांत मदत केली. १९३८ सालीं जर्मनीनें ऑस्ट्रिया जर्मन राज्याला जोडला त्या वेळीं इटलीनें त्या कृत्याला मान्यता दिली. तसेंच डॅन्यूब नदीच्या खोऱ्यांत जर्मनीनें आपली सत्ता स्थापली, तेव्हांहि इटलीनें जर्मनीला विरोध केला नाहीं. हंगेरी व युगोस्लाव्हिया या देशांत इटलीचे व जर्मनीचे हितसंबंध विरोधाचे होते. तरीहि हिटलर व मुसोलिनी यांनीं परस्परांना भेटी दिल्या, आणि १९३८ च्या सप्टेंबरांत झेकोस्लोव्हाकिया देशाचा प्रश्न निकरावर आला त्या वेळीं इटलीनें जर्मनीच्या कृत्याला पाठिंबा दिला. या अॅक्सिस राष्ट्रांपैकीं जर्मनी उत्तरोत्तर अधिक सामर्थ्यवान् होत गेला. त्यामुळें इटली-जर्मनीचें सहकार्य अधिकच वाढलें. जर्मनीला खुष ठेवण्याकरितां इटलीनें जर्मनीची ज्यू-विरोधी मोहीमहि स्वतः स्वीकारली. १९३९ सालीं जर्मनीनें झेकोस्लोव्हाकियाचा उरलेला प्रदेशहि ताब्यांत घेतला, त्या वेळीं इटलीनें आल्बेनियावर अतिक्रमण केलें; जर्मनीचें धोरण असें होतें कीं, इटलीनें भूमध्यसमुद्राकडील प्रदेशांत आपली सत्ता वाढवावी; आणि जर्मनीनें मध्य युरोप, आणि युरोपचा पूर्वेकडील व आग्नेयेकडील प्रदेश यांमध्यें आपला राज्यविस्तार करावा. प्रथम हीं अॅक्सिस राष्ट्रें ब्रिटन, फ्रान्स व रशिया यांना विरोधी बनलीं. पण नंतर जपानबरोबर संगनमत करून बर्लिन-रोम-टोकीयो असा जागतिक त्रिराष्ट्र-संघ त्यांनीं निर्माण केला. स्पेन व हंगेरी या अॅक्सिस राष्ट्रसंघाला चिकटून राहिले; व या संघानें बाल्कन प्रदेशांत आपली सत्ता स्थापली. १९३९ च्या मे महिन्याच्या २२ व्या तारखेस जर्मनी-इटलीनें सहकार्याच्या तहावर बर्लिनमध्यें सह्या केल्या. त्या तहनाम्यांत इटली-जर्मनीच्या सरहद्दी निश्चित नोंदल्या, आणि नॅशनल सोशॅलिस्ट पक्ष आणि फॅसिस्ट यांच्या कार्यपद्धतीमध्यें एकवाक्यता निर्माण करून असें नमूद करण्यांत आलें कीं, जर्मनी आणि इटली यांनीं "आपापल्याकरितां जिवंत राहण्यास जरूर तेवढा आपल्या राज्याचा विस्तार करण्याकरितां आणि शांतता राखण्याकरितां एकमेकांचें लष्करी सामर्थ्य एकत्र करावें." आणि त्या योगानें "जगांत पसरलेली अशांतता, परस्पर-विरोध यांच्यापासून युरोपियन संस्कृतीचें संरक्षण करावें."

जेव्हां दुसरें महायुद्ध सुरू झालें तेव्हां इटलीनें प्रथम तटस्थ राष्ट्र राहण्याचें जाहीर केलें; परंतु महायुद्ध लांबत चालल्यावर जर्मनीला असलेला इटलीचा अंतस्थ पाठिंबा अधिकाधिक उघड होऊं लागला, आणि इटलीनें भूमध्यसमुद्रांत आरमार लष्कर व आरमार सुसंघटित करून जर्मनीला मदत करण्याची तयारी केली.

१९४० च्या जूनच्या १० व्या तारखेस इटलीनें दोस्त राष्ट्रांविरुद्ध युद्ध पुकारलें.

**अक्षविचलन**—(न्युटेशन). पृथ्वीच्या आंसाची एक लहानशी सर्पिलगति. यामुळें ध्रुवाच्या मोठ्या गतींत किंवा अयनगतींत थोडा फरक पडतो. पृथ्वीच्या विषुववृत्तीय फुगवट्यावर सूर्यचंद्राचे जे परिणाम होतात त्यांतून या गती उत्पन्न होतात.

**अक्षय्य तृतीया**—वैशाख महिन्यांतील शुद्ध तृतीयेस अक्षय्य तृतीया असें म्हणात. कृतयुगाचा व कांहींच्या मतें त्रेतायुगाचा हा दिवस आरंभ समजला जातो. कालविभागाचा प्रारंभ म्हणून हा दिवस पवित्र व मंगलकारक मानलेला आहे. मदनरत्न या ग्रंथांत श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरास या दिवसाचें माहात्म्य सविस्तर सांगितलेलें आहे. या पवित्र दिवशीं गंगेच्या पवित्र अशा जलांत स्नान करावें व विष्णु, वगैरे देवांची पूजा करावी; युगादि श्राद्ध अपिंडक करावें; श्राद्ध न केल्यास तिलतर्पण करावें; उन्हापासून प्राणिमात्रांचें संरक्षण करणाऱ्या वस्तू म्हणजे जोडा, छत्री यांचीं दानें करावींत; गाय, जमीन, सुवर्ण, वस्त्रें यांचेंहि दान करावें, असें सांगितलें आहे. जमदग्नि ऋषीचा पुत्र परशुराम याचाहि जन्म रात्रीच्या प्रथम प्रहरांत याच दिवशीं झाला. त्यामुळें याच दिवशीं परशुरामजयंतीहि येते. चैत्र महिन्यांत वसंतोत्सवाप्रीत्यर्थ होणारे स्त्रियांचे हळदीकुंकवांचे समारंभ याच दिवसापर्यंत करतात. हळदीकुंकवासाठीं हाच शेवटचा दिवस असल्यानें या दिवशीं गांवांत हळदीकुंकवाच्या समारंभांची बरीच गर्दी असते.

**अक्षांश**— दोन स्थाननिर्णायक वृत्तांपैकीं एक. दुसरें वृत्त रेखांश होय. या दोहोंच्या योगानें गोलावरील एखादें स्थान निश्चित करतां येतें. खस्थ अक्षांश हें क्रांतिवृत्तापासून खस्थपदार्थाचें कोणीय अंतर होय. भूगोलीय अक्षांश म्हणजे पृथ्वीवरील एखाद्या स्थलाचें विषुववृत्तापासूनचें कोणीय अंतर. हें स्थलाच्या याम्योत्तर वृत्तावर अंश, कला (मिनिटें) आणि विकला ( सेकंदें ) या मापांत मोजतात. यावरून अक्षांश हीच त्या स्थलावरील ध्रुवताऱ्याची उंची होय, हें स्पष्ट आहे. विषुववृत्ताला समांतर अशीं अक्षांशसमांतरें काढतात. पृथ्वी अगदीं गोल नसल्यानें अक्षांशांची लांबी सारखी नसते. विषुववृत्ताजवळ ती ६८·७ मैल असेल तर ध्रुवाजवळ ६९·४ मैल असेल.

**अज्ञान**— इंग्लिश व अमेरिकन कायद्यांत ज्या मुलांचें वय २१ वर्षें पूर्ण झालें नाहीं, आणि जीं पालकाच्या ताब्यांत आहेत त्यांना 'इन्फंट' किंवा अज्ञान म्हणतात. सामान्यतः अशा अज्ञानानें केलेले करार बंधनकारक नसतात. परंतु त्यांना निर्वाहाकरितां जरूर लागणाऱ्या वस्तूंबद्दलचे करार आणि इतर त्यांच्या फायद्याचे करार बंधनकारक असतात. अज्ञानाला व्यवस्थापत्र करतां येत नाहीं. मात्र नोकरींत असलेला सैनिक, किंवा समुद्रावर असलेला खलाशी यांनीं केलेलें अज्ञानपणांतलें व्यवस्थापत्र कायदेशीर असतें.

इंग्लंडांतील कायद्यांत २१ वर्षें होईपर्यंत मुलाला किंवा मुलीला 'मायनॉर' असें म्हणतात. या अज्ञान-दशेंत कोणताहि कायद्याचा व्यवहार अज्ञानाला करतां येत नाहीं, किंवा अज्ञानाला स्वतःला कोर्टांत दावा लावतां येत नाहीं, किंवा अज्ञानावर दावा लावतां येत नाहीं. याचा अर्थ असा कीं, अज्ञानातर्फे इतर कोणी नातेवाईक किंवा तिऱ्हाईत वयांत आलेला इसम पालक म्हणून योजावा लागतो; व अज्ञानातर्फे कायदेशीर दस्तऐवज करार, वगैरे करणें आणि अज्ञानातर्फे कोर्टांत दावे चालविणें हीं कामें त्याला करावीं लागतात. हिंदुस्थानांत अशाच प्रकारचा कायदा आहे. पण त्यांत सज्ञानपणाची वयोमर्यादा १८ वर्षें पुरी होणें ही ठेवली आहे. याला अपवाद असा आहे कीं, एखाद्या अज्ञानाचा पालक कोर्टाच्या हुकुमानें नेमलेला असेल तर अज्ञानपणाची वयोमर्यादा २१ वर्षें पुरी होणें अशी कायद्यानें ठरविली आहे. ( इंडियन मेजॉरिटी ॲक्ट, कलमें ३-४ पहा ). फौजदारी गुन्ह्यांना हा कायदा लागू नाहीं, म्हणजे अज्ञान मुलावर गुन्ह्याबद्दल खटला चालतो.

**अज्ञानदास**—अफजलखानाचा वध या ऐतिहासिक प्रसंगावर पोवाडा लिहून प्रसिद्धीस आलेला असा एक शिवकालीन शाहीर. अफजलखानाच्या वधावर जिजाबाईच्या सांगण्यावरून या शाहिरानें दोन पोवाडे रचले आहेत. या पोवाड्यांच्या रचनाचातुर्यावर खुष होऊन शिवाजीनें यास एक घोडा व एक शेर सोन्याचा तोडा बक्षीस दिला. सर्व पोवाड्यांत हा पोवाडा जुना म्हणून प्रसिद्ध असून याची रचना एकतारीवर म्हणतां येईल इतकी सुलभ आहे. अज्ञानदासाच्या पोवाड्यांत अफजलखानाच्या वधाच्या प्रसंगाच्या अनुरोधानें त्या वेळची महाराष्ट्राची परिस्थिति, खानाचा सरंजाम, शिवाजीचें वैभव या गोष्टींवरहि प्रकाश पडतो.

**अज्ञानसिद्ध नागेश**—एक मराठी कवि. हा सुमारें इ. स. १४०० या वेळीं होऊन गेला. याच्या गुरूचें नांव नागेश होतें. कालज्ञान व पंचीकरणप्रमेय हे यानें केलेले ग्रंथ दिसतात. पंचीकरणप्रमेय हें ओंविंबद्ध भाषेत आहे.

**अज्ञेयवाद**—( ॲग्नॉस्टिसिझम ). या वादाचा जनक हक्सले आहे. त्यानें १८६९ सालीं जे देव, विश्व, अमरत्व, इ. संबंधीं आपणाला कांहीं माहिती नाहीं असें म्हणत, त्यांना 'अज्ञेयवादी' असें नांव दिलें. शास्त्रीय पुरावा ज्याच्या संबंधांत देतां येत नाहीं ती प्रत्येक गोष्ट अज्ञेय होय असें अज्ञेयवादी मानतात. यावरून त्यांना नास्तिकवादी तर म्हणतां येत नाहीं, संशयवादी फार तर म्हणतां येईल. परमेश्वरशक्तीचें अस्तित्व ते अमान्य करीत नाहींत,

तर तिची शास्त्रीय निश्चिति नसल्यानें आपला तीवर विश्वास नाहीं व गैरविश्वासहि पण नाहीं असें ते सांगतील.

---

# आ

**आ**—या स्वराचा अक्षरविकासक्रम अ सारखाच आहे, फक्त याला काना जोडला आहे. या कान्याचें चिन्ह प्रारंभीं मुरडलेलें असे.

**आइलांटो**—चीनमधील हें एक झाड असून युरोप आणि उत्तर अमेरिका यांतून याची लागवड मोठ्या प्रमाणावर केली गेली आहे. या झाडांच्या पानांवर जगणारे रेशमी किडे तुतीच्या झाडावर जगणाऱ्या रेशमी किड्यांपेक्षां जास्त टिकाऊ रेशमाचा धागा देतात. परंतु तो तुतीच्या झाडावर जगणाऱ्या किड्यांपासून होणाऱ्या रेशमी धाग्याइतका चांगला असत नाहीं.

**आइल्सक्रेग**—या नदीवर आयरच्या किनाऱ्यापासून दहा मैलांवर सुमारें २ मैल घेर आणि १०९७ फूट उंची असलेला एक खडक. येथें हजारों पाणकोंबड्या येतात. येथें उत्तम प्रतीचा दगड मिळतो. खडकावर एक दीपगृह बांधलें आहे.

**आइसलँड**—अँटलांटिक महासागरांत ध्रुव प्रदेशानजीक हें बेट ग्रीनलंडपासून २५० मैलांवर आणि नॉर्वेपासून ६०० मैलांवर आहे. क्षेत्रफळ ३९७५८ चौ. मैल व लोकसंख्या (१९४४) १२७७७० आहे. आणि बहुतेक वस्ती आइसलँडिक लोकांची आहे. राजधानीचें शहर रेकजाविक असून दुसरीं शहरें अकुरेयरी, वेस्ट मान्नियर आणि हाफनेफजार्डुर हीं आहेत. येथील बहुतेक प्रदेश उंच, डोंगराळ असून तो ज्वालामुखीच्या स्फोटानें तयार झालेला आहे. येथें अनेक ज्वालामुखी आहेत. त्यांपैकीं मौंट हेक्ला हा सर्वांत अधिक प्रसिद्ध, सुमारें ५००० फूट उंचीचा आहे. उष्णोदकाचे झरे पुष्कळ व सर्वत्र पसरलेले आहेत. नद्या व सरोवरेंहि पुष्कळ आहेत. येथें सांपडणारें सर्वांत महत्त्वाचें खनिज द्रव्य गंधक हें आहे. शिवाय गार (चॅल्सिडोनी) स्फटिक आणि द्विवक्रीभवनकार खनिज दगड व पिंगट रंगाचा दगडी कोळसा हीं खनिज द्रव्यें सांपडतात. येथील हवा फार थंड व दमट असल्यामुळें शेती चांगली होऊं शकत नाहीं, त्यामुळें येथील ६ प्रदेश नापीक आहे. वर्च हें झाड येथें होतें, पण तेंहि फार खुरटें असतें. कित्येक प्रकारचीं फुलझाडें येथें होतात. कांहीं भागांत शेती होते. तेथें बटाटे आणि सलगम (टर्निप) हीं पिकें होतात. घोडे, गुरें आणि मेंढ्या यांची संख्या बरीच आहे. सांबर, बदकें, यांचे मोठे कळप आहेत. साल्मॉन, कॉड, हेरिंग आणि शार्क या जातीचे मासे येथें पुष्कळ सांपडतात. येथून जनावरें, कातडीं, गंधक, मासे, तेलें, पिसें, लोंकर हीं परदेशीं जातात.

येथील वस्ती मूळ स्कँडिनेव्हिअन असून त्यांचा धर्म प्रॉटेस्टंट आहे. येथें १० ते १४ वर्षेपर्यंत वयाच्या मुलांना शिक्षण सक्तीचें आहे. कित्येक हायस्कुलें, दोन शेतकी कॉलेजें, एक नाविक विद्यालय आणि इतर अनेक विशिष्ट प्रकारचें शिक्षण देणाऱ्या शाळा, आणि एक विद्यापीठहि आहे. येथें लष्कर देशसंरक्षणाकरितां मुळींच ठेवलेलें नाहीं. कारण १९१८ सालीं हा प्रदेश कायमचा तटस्थ प्रदेश म्हणून जाहीर करण्यांत आलेला आहे. १९१८ पर्यंत या बेटावर डेन्मार्कची सत्ता होती. पण त्या सालीं डेन्मार्कनें या बेटाला पूर्ण स्वातंत्र्य दिलें. येथें एक कायदेमंडळ असून त्याचीं वरिष्ठ व कनिष्ठ अशीं दोन सभागृहें आहेत व कायदेमंडळाला जबाबदार असलेलें मंत्रिमंडळ तेथील राज्यकारभार करतें. डेन्मार्कच्या राजाची सत्ता नाममात्र आहे.

पहिली वसाहत ८७४ सालीं झाली, व ९३० ते १२६४ पर्यंत येथें स्वतंत्र लोकसत्ताक राज्य होतें. १८७० मध्यें हॅरल्ड हारफागर यानें नॉर्वेमध्यें आपलें सर्वाधिकारित्व स्थापलें आणि तेथील जमीनदारवर्गाचा छळ सुरू केला. त्यामुळें बरेच लोक आइसलँडमध्यें राहावयास गेले. तेथें त्यांनीं आपलें स्वतंत्र सरकार स्थापलें. तें कित्येक शतकें टिकलें. या आइसलँडर लोकांनीं ग्रीनलंडचा शोध लावला (९८३) आणि अमेरिकेचा बराच भाग शोधून काढला. युरोपकडे आणि पूर्वेकडे त्यांनीं मोठाल्या सफरी केल्या. येथील लोकांची राजकीय आणि धार्मिक स्थिति ११५० पासून १३०० पर्यंत अतिशय उत्कर्षाची होती. १२६३ मध्यें आइसलँडनें नॉर्वेच्या राजाचें आधिपत्य मान्य केलें. नंतर १३८१ मध्यें हें बेट डॅनिश अमलाखालीं गेलें. पुढें नॉर्वे व स्वीडन हे देश १८१४ मध्यें एकत्र झाले, पण हें बेट डेन्मार्कच्या वर्चस्वाखालींच राहिलें. डेन्मार्कचा राजा यावर ठेवूनहि १९१८ पासून हें सर्वसत्ताधीश राष्ट्र करण्यांत आलें. १९४४ मार्लीं सार्वत्रिक मतदानानें हें स्वतंत्र लोकसत्तात्मक राज्य बनलें व सर्व राष्ट्रांनीं त्याला मान्यता दिली.

येथील भाषा मूळ स्कँडिनेव्हिअन भाषेपासून झालेली आहे. येथील वाङ्मयाचे प्राचीन व अर्वाचीन असे दोन कालखंड पडतात. अगदीं प्राचीन काळीं पद्यवाङ्मय तयार झालेलें असून त्याच्या संग्रहास एल्डर अथवा एड्डाकाव्य असें म्हणतात. ऐतिहासिक ग्रंथ आणि अद्‌भुत कथात्मक ग्रंथ पुष्कळ आहेत. त्यांना सागा म्हणतात.

**ऑइस्टर**—कालव. हा एक प्रकारचा मासा आहे. त्याच्या बाजूला शिंपासारखे कडक खवले असून या माशांचा खाण्यासाठीं मुख्यत्वें उपयोग केला जातो. या माशांचा अंडीं घालण्याचा मोसम मे अगर जूनपासून सप्टेंबरपर्यंत असतो. अमे. सं. संस्थानें व फ्रान्स या देशांत या माशांची जोपासना व्यापारी दृष्टीनें करतात. अमे. सं. संस्थानांतील ऑइस्टर मुख्यतः युरोप खंडांत पाठविले जातात. इंग्लंडमध्यें थेम्सच्या पात्रांत यांची वाढ जोरांत होत असून ते फार चवदार असतात. उत्तम जातीचा प्राणी म्हणजे खवल्याची जाडी कमी व रंग पिंगट-हिरवट असा असून त्यांत दोन तीन प्रकारच्या जाती आहेत.

**आंकडी**—या रोगांत शरीराच्या स्नायूंस जोराचे आचके येऊं लागतात. यास सामान्यतः झटका आला असें म्हणतात. लहान मुलांस विशेषतः तीं भितरीं असलीं तर किंवा त्यांस दांत येतांना त्यांचीं आंतडीं बिघडलीं असतां, जंत झाले असतां किंवा फुफ्फुसदाहासारखा एखादा रोग झाला असतां त्यांस झटके येऊं लागतात. क्वचित् झटके येणें हें एखाद्या मेंदूच्या विकाराचेंहि लक्षण असूं शकतें; असा प्रकार मेंदूस गळूं झालें असतां, डोक्याची कवटी भंग पावली असतां किंवा अपस्मार रोगामध्यें किंवा एखाद्या दुसऱ्या रोगामध्येंहि (उदा.-मूत्राशयाचे किंवा इतर आंत्ररोग) झटके येण्याचा संभव असतो.

**आंकडेशास्त्र**—सामान्यतः मोठाल्या आंकड्यांचें विशेषतः अर्थशास्त्र, राज्यशास्त्र आणि समाजशास्त्र यांसंबंधीं हें शास्त्र म्हणतां येईल. लोकांची सामाजिक, नैतिक आणि आर्थिक स्थिति या आंकड्यांवरून अजमावतां येते. १७ व्या आणि १८ व्या शतकांत या शास्त्राचा अभ्यास सुरू झाला व आतां तर हें शास्त्र परिणतावस्थेस पोंचलें आहे. आंकडेशास्त्रीय संस्था निघाल्या आहेत. सरकार खानेसुमारी करून आंकडे गोळा करतें व राज्यव्यवस्थेची बरोबर कल्पना येण्यासाठीं आयात निर्गत माल, खाणी, आगगाड्या इ. यांचें उत्पन्न, बेकारसंख्या, औद्योगिक तंटे, जिन्नसांचे दर, मजुरी, इ. अनेक प्रकारचे आंकडे जमवून प्रसिध्द करतें. पेढ्या, समाईक भांडवलाच्या संस्था, व्यापारी संघ, गिरण्या, कारखाने, वगैरेंकडून त्यांच्या उत्पन्नांचे आंकडे मागवून देशाच्या सांपत्तिक स्थितीची सप्रमाण कल्पना सरकार आणून देतें. सरकारप्रमाणें शास्त्रज्ञ आणि संशोधकहि आपआपल्या अभ्यास क्षेत्रांतील आंकडे गोळा करून निष्कर्ष काढीत असतात.

**आकरा**—आफ्रिका खंडांतील गोल्डकोस्ट या ब्रिटिश वसाहतीची राजधानी. येथून बाहेर मुख्यतः सुवर्ण कण, हस्तिदंत, डिंक आणि तांडाचें तेल रवाना होतें. लो. सं. ७२९७७ (१९३१).

**ऑकलंड**—न्यूझीलंडच्या बेटांपैकीं उत्तरेकडील बेटावर हें शहर वसलेलें असून तें एक उत्तम बंदर आहे. तेथील कॅलीपो या नांवाच्या गोदीसारखी गोदी दक्षिणेकडील कोठल्याहि भागांत नाहीं. हें बंदर बेटाच्या आंतील प्रदेशाशीं लोहमार्गानें जोडलेलें आहे. ऑकलंड जिल्ह्याचें क्षेत्रफळ २५७०० चौ. मैल व लो. सं. ४८७७५ आहे. हा जिल्हा ज्वालामुखींनीं भरलेला आहे. तसेंच उन्हाळी, उंच उडणारे उष्ण पाण्याचे प्रवाह, सरोवरें व पुष्कळशा लहान लहान नद्या यांनीं समृद्ध आहे. डोंगराळ प्रदेशांत जंगलें विपुल आहेत. तसेंच गवताळ प्रदेशांत जनावरें पोसलीं जातात. आणि त्यांत विशेषतः मेंढ्यांची संख्या जास्त आहे. अर्थात् तेथील लोंकर बाहेर निर्यात केली जाते हें सांगणें नकोच. ऑकलंड शहराची लो. सं. २६३५७५ इतकी आहे. येथें एक कॉलेज, अंधळ्या-बहिऱ्यांची शाळा व इतर नेहमींच्या शाळा पुष्कळ आहेत.

**ऑकलंड, लॉर्ड** (१८३६-४६)—हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. याच्या कारकीर्दीत रशियाच्या भीतीनें इंग्रजांनीं अफगाणिस्तानांत ढवळाढवळ आरंभिली व आपल्या वतीचा एक अमीर गादीवर बसविला. पण अफगाण लोकांनीं याला हांकून लावून इंग्रज सैन्याची कत्तल केली. या सर्व प्रकरणांत ब्रिटिशांना मोठी नामुष्की पत्करावी लागली व ऑकलंडवर ठपका आला. याच्या कारकीर्दीत अनेक वाईट गोष्टी घडल्या. मोठा दुष्काळ पडला. अयोध्या, सातारा, कर्नूल वगैरे संस्थानांत इंग्रज सरकारनें अन्यायानें हात घातला. साताऱ्याच्या प्रतापसिंहाला पदच्युत केलें; सिंधच्या अमीरांकडून पैसा लुबाडला व त्यांचें स्वातंत्र्य हरण केलें. ऑकलंडनें देशांत शैक्षणिक आणि वैद्यक खात्यांत चांगल्या सुधारणा केल्या; तथापि परदेशी राजकारणामुळें तो सर्वांच्या मनांतून उतरला.

**आकॉनकागुआ**—चिलीमध्यें या नांवाचा एक पर्वत, नदी आणि प्रांत आहे. पैकीं प्रांताचें क्षेत्रफळ ३९३९ चौरस मैल असून लोकसंख्या (१९४०) ११८०४९ आहे. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे याच नांवानें जो पर्वत आहे त्याचें शिखर दक्षिण गोलार्धांत सर्वांत उंच असून त्याची उंची २३०८० फूट आहे. जरी बहुतेक प्रदेश चिलीच्या हद्दींत असला तरी हें उंच शिखर मात्र अर्जेंटाईन राज्यामध्यें आहे.

**आकारविज्ञान**—(मॉर्फालाजी). ही एक जीवशास्त्राची शाखा असून तीमध्यें वनस्पति व प्राणी यांचा आकार व त्यांची रचना व त्यांच्या निरनिराळ्या इंद्रियांची रचना यांचा विचार केलेला असतो. या शाखेमध्यें बाह्यरूपविचार, शारीर व पिंडरचनाशास्त्र यांचा अंतर्भाव होतो. वनस्पतिशास्त्र आणि शारीरशास्त्र

यांतील सर्व वनस्पती आणि प्राणिप्रकार यांचें पद्धतशीर वर्गीकरण या शास्त्रीय शाखेमुळें होत असतें.

**आकाश**— आकाश हें काय आहे हें मनुष्यप्राण्यास समजण्यास फार दिवस लागले. खाल्डियन किंवा इजिप्शियन कल्पना तर अगदीं अडाणी म्हणून टाकाव्या लागतात; पण वैदिक आर्यांना सुद्धां याची स्पष्ट कल्पना होती कीं नाहीं याविषयीं शंका आहे. अमानुष, दैवी शक्तीचे प्राणी, ज्यांना देवदेवता म्हणून मानण्यांत येई ते आकाशांत राहतात ही समजूत सर्वत्र लहानमोठ्या धर्मांतून दिसेल. आकाशाच्या पोकळींत सूर्यादि नक्षत्रें, ग्रह, धूमकेतु, उल्का, तेजोमेघ, इ. गोष्टी आहेत. यासंबंधीं ज्ञान हळूहळू मनुष्यास होऊन ज्योतिषशास्त्राचा पद्धतशीर अभ्यास सुरू झाला. आकाशाचे निरनिराळे विभाग नक्षत्रांची माहिती करून घेण्यासाठीं करण्यांत आले. आकाशाचा खि. पू. ३ ऱ्या शतकांतील असा नकाशा उपलब्ध आहे. दुर्बिणीचा शोध लागल्यावर तर बरोबर आकाशाची मांडणी समजली.

आकाशाचा निळा रंग हा अत्यंत प्राचीन कालापासून कुतूहलाचा विषय आहे. कवींना तर हा रंग फार प्रिय आहे. या रंगाच्या उत्पत्तीविषयीं शास्त्रज्ञांनीं अनेक तर्क केले आहेत. हवेंतील कणांमुळें प्रकाशाचें ध्रुवीभवन होतें व निळा रंग दिसतो, असें एक बहुमान्य मत आहे.

**आकाशगंगा**—आकाशांत रात्रीच्या वेळीं या क्षितिजापासून त्या क्षितिजापर्यंत पांढऱ्या धुरासारखे अनेक लहान-मोठे पट्टे दिसतात त्यांना आकाशगंगा म्हणतात. असंख्य दूरचे तारे चिकटून बसल्याप्रमाणें दिसल्यामुळें शुभ्रगंगा वाहते कीं काय असा भास होतो. यांत मुख्यतः दोन पट्टे एकत्र मिळून वर्तुळ झालें आहे. यांत दुर्बिणींतून दिसणाऱ्या दोन कोटी ताऱ्यांपैकीं सुमारें १ कोटी ८० लक्ष तारे आहेत. अशा आकाशगंगेंतूनच आपली सूर्यमाला निघाली असें कांहीं ज्योतिर्विद मानतात.

**आकाशरज्जुमार्ग**— जमिनीपासून उंच जागेवर पक्क्या केलेल्या आधारांवर दोरखंड घट्ट बसवून त्याच्या साहाय्यानें माल इकडून तिकडे नेण्याच्या योजनेस रज्जुमार्ग म्हणतात. अशा तऱ्हेचा सर्वांत मोठा रज्जुमार्ग अर्जेंटाइन रिपब्लिकमध्यें तेथील खाणींच्या प्रदेशांत असून अँडीज पर्वतावरील एका १५,००० फूट उंचीच्या जागेवरुन २२ मैलांवर ११॥ हजार फूट खालीं असलेल्या जागीं माल पाठविण्याकरितां बांधण्यांत आलेला आहे. या मार्गांत मध्यंतरीं फार खोल अशा दऱ्या व घळी आहेत. अशा ठिकाणीं दोरास आधार देण्याकरितां १३० फूटपर्यंत उंचीचे लोखंडी मनेरे बांधण्यांत आले आहेत. या तारेच्या दोरखंडाची लांबी ८७ मैल आहे. नेपाळमध्यें असा एक रज्जुमार्ग आहे. अशा तऱ्हेचा एक दोरखंडाचा मार्ग जुन्नरजवळ नाणेघाटांत बांधण्याचें काम चालू आहे.



**आकृतिलेखक** —(पँटोग्राफ). एक आकृति काढण्याचें साधन आहे. यामध्यें चार पट्ट्या एकमेकींशीं अशा रीतीनें जोडलेल्या असतात कीं, त्यांचे सांधे सैल असून ते फिरवतां येतात. या साधनाच्या साह्यानें दिलेल्या नकाशाच्या किंवा आकृतीच्या त्याच प्रमाणांत किंवा कमीजास्त प्रमाणांत प्रतिकृति काढतां येतात.

**आक्का**— आफ्रिकेंतील आलबर्ट सरोवराच्या वायव्य बाजूला राहणारी पिग्मी लोकांच्या जातीपैकीं एक जात. यांची उंची सरासरी ४॥ फूट असून ते तपकिरी रंगाचे आहेत. हे लोक अतिशय भित्रे व संशयखोर असे असून ते मुख्यतः शिकारीवर जगतात. धनुष्य व बाण हीं शिकारीचीं मुख्य आयुधें होत.

**ऑक्टरलोनी, सर डेव्हिड** (१७५८-१८२५)—एक ब्रिटिश सेनापति. कॅडेट म्हणून १७७७ त हिंदुस्थानांत आला. यानें कोईल, अलीगड आणि दिल्ली येथील लढायांतून लॉर्ड लेकच्या हाताखालीं काम केलें. पुढें स. १८०३ मध्यें दिल्ली येथें याला रेसिडेंट नेमण्यांत आलें. १८१४ मध्यें मेजर जनरल असतांना होळकराच्या हल्ल्यापासून यानें त्या शहराचा मोठ्या शौर्यानें बचाव केला.

पुढें काटमांडूवर जाणाऱ्या सैन्याचें आधिपत्य याला देण्यांत आलें. तेथेंहि यानें मोठ्या हुषारीनें गुरखे लोकांचा पराभव केला व स. १८१६ मध्यें सेगवली येथें तह घडवून आणला. यानें अमीरखानाशीं स्वतंत्र करार करून त्याला इतर पेंढाऱ्यांपासून विभक्त केलें. १८१८ मध्यें राजपुतान्यांत याला रेसिडेंट नेमलें. दुर्जनसालनें भरतपूरचा बालराजा बलवंतसिंग याच्याविरुद्ध चंडाळी माजविली (१८२५). तेव्हां ऑक्टरलोनीनें स्वतःच्या जबाबदारीवर राजाला मदत करण्याचा जाहीरनामा काढून तसा आपल्या सैन्याला हुकूम दिला. त्या वेळचा गव्हर्नर जनरल लॉर्ड ॲम्हर्स्ट याला ऑक्टरलोनीचें करणें पसंत पडलें नाहीं. तेव्हां ऑक्टरलोनीला अतिशय अपमान वाटून त्यानें राजीनामा दिला. अपमानाच्या दुःखानें त्याला लवकर मृत्यु आला असें म्हणतात. कलकत्ता येथें ऑक्टरलोनीचें स्मारक म्हणून एक स्तंभ उभारलेला आहे.

**ऑक्टोपस**— हा एक खेकड्यासारखा प्राणी आहे. त्याला आठ पाय असून तो त्यांनीं पोहतो. त्याच्या शरीराचा आकार पायांच्या मानानें लहान असून मान शरीराच्या भागाला जुटीच असते. त्याची लांबी व रुंदी ९ फुटांपर्यंत असून ब्रिटिश किनाऱ्यावर हा प्राणी समुद्रांत राहतो. अष्टपाद पाहा.

**ऑक्सफोर्ड**—इंग्लंडच्या ऑक्सफोर्ड परगण्यांतील हें मुख्य शहर असून येथील विश्वविद्यालय जगांत प्रसिद्ध आहे. या शहरांत बरींच ख्रिस्ती देवळें असून कांहींमध्यें विश्वविद्यालयाच्या कक्षेंतील महाविद्यालयें आहेत. या शहरामध्यें शिक्षणाशिवाय दुसरा कोणताहि उद्योग नाहीं. इ. स. ९१२ पासूनचा या शहराचा इतिहास मिळतो. सर्वांत जुनें कॉलेज इ. स. १२५३ मध्यें स्थापन केलें गेलें.

ऑक्सफोर्ड परगण्यांत साधारणपणें दुभत्याचा धंदा जोरांत चालतो. या परगण्यांत दक्षिणेकडे चिल्टर्न टेंकड्या आहेत. लो. सं. (१९४५) ९४४९०. ऑक्सफोर्ड विद्यापीठाला जोडलेलीं इ. स. १२५३ ते १८७४ पर्यंत स्थापन झालेलीं २१ कॉलेजें आहेत. नंतर तीन स्त्रियांसाठीं कॉलेजें निघालीं. १९२० पर्यंत स्त्रियांना पदव्या देण्यांत येत नव्हत्या. १९४५–४६ सालीं ऑक्सफोर्ड विद्यापीठांत ४७५ प्राध्यापक व ३४५३ विद्यार्थी होते.

**ऑक्झस नदी**—(अमूदर्या). ही मध्य आशियांत मोठी नदी आहे. ही पामीर पठारांतून उगम पावते आणि पश्चिम तुर्कस्तानांतून वाहत जाऊन आरल समुद्राला मिळते. हिची लांबी १३०० मैल आहे.

**आखो**—हा गुजराती कवि, जातीचा सोनार असून लहानपणींच जगाला विटलेला होता. याचा पहिला गुरु वल्लभपंथी होता. पण त्याच्याबद्दल संशय उत्पन्न होऊन त्यानें दुसऱ्या गुरूजवळ वेदाध्ययन केलें. यानें चित्तविचार-संवाद, आखोगीता, गुरुशिष्यसंवाद हे ग्रंथ लिहिले. हा स्वतःला कवि मानीत नसे, पण लोकांनीं आपणांस ज्ञानी म्हणावें असें याला वाटे. यानें योजलेल्या उपमा व रूपकें योग्य व समर्पक वाटतात.

**आगकाडया**—पूर्वी गारेच्या चकमकीपासून विस्तव पाडीत असत. गंधकाच्या आगकाड्या प्रथम १८०५ मध्यें प्रचारांत आल्या. या आगकाड्या रासायनिक क्रियेनें पेट घेतात. सध्यांच्या सेफ्टी आगकाड्यांत ५० टक्के पालाशहरित (पोट्याशियम क्लोरेट), ५ टक्के पालाश क्रुमित (पोट्याशिअम क्रोमेट), ५ टक्के गंधकाची पूड, १५ टक्के गोंद व २५ टक्के रंग, वगैरेंची भर असते. पेटीच्या बाजूला जो पृष्ठभाग असतो त्यावर ही काडी ओढली म्हणजे पेटते. तो पृष्ठभाग ५० भाग तांबडा स्फुर (फॉस्फरस), १० भाग अंज गंधकिद (ॲंटिमनी सल्फाइड), २५ भाग गोंद व १५ भाग काजळी यांच्या मिश्रणानें सारवलेला असतो.

हा नॉर्वे आणि स्वीडन या देशांतील मोठा धंदा आहे, कारण तेथें लांकूड मुबलक मिळतें. काड्या करण्याकरितां बहुधा देवदार व आस्पेन हीं लांकडें वापरतात. अंबरनाथ येथें एक स्वीडिश कंपनीचा कारखाना आहे, त्यांत शेवरीचीं लांकडें वापरण्यांत येतात.

हिंदुस्थानांत आगकाड्यांचे कारखाने मध्यंतरीं बरेच निघाले होते. परंतु त्यांवर कर बसविल्यामुळें त्यांतील बरेच बंद पडले. पण सध्यां देशांत लागणाऱ्या आगकाड्या बहुतेक देशांतच तयार होत आहेत. १९४०–४१ सालीं दोन कोटी तीस लक्ष ग्रोस इतक्या काड्यांच्या पेट्या तयार झाल्या.

**आगगाडी**—वाफेनें चालणारें एक यांत्रिक वाहन. यांतील यांत्रिक माहिती एंजिन, ब्रेक, वगैरे स्वतंत्र लेखांत येईल. इंग्रजी 'रेल्वे' याचा अर्थ आगगाडीचा लोखंडी रस्ता असा होतो. असे रस्ते पूर्वी कोळशाच्या गाड्यां (घोड्यांनीं वाहून नेणाऱ्या) साठीं तयार केले. नंतर जनावरांच्या जागीं वाफेचें एंजिन आलें (१८०४). पुढें कोळशाखेरीज इतर मालाची वाहतूक करण्यासाठीं योजना निघाल्या. पहिला आगगाडीचा फांटा १८२५ सालीं स्टॉक्टन आणि डार्लिंगटन यांच्या दरम्यान टाकण्यांत आला. पुढें ५० वर्षांत जगांत बहुतेक भागांतून अशा गाड्या सुरू झाल्या. त्यांत अनेक सुधारणा होऊन प्रवाशांना सुखसाधनें उपलब्ध होऊं लागलीं. बोगदे, पूल, इ. च्या स्थापत्यशास्त्रीय घडणींनीं मोठे मोठे डोंगर, नद्या, दलदलीचे प्रदेश यांवरहि सुलभ रीतीनें आक्रमण करतां येऊं लागलें. खंडाच्या एका भागांतून दुसऱ्या भागाकडे हजारो मैलांचे आगगाडी-रस्ते नेण्यांत आले. लंडनसारख्या मोठ्या वस्तीच्या शहरांत जमिनीवरून गाड्या नेतां येणें अवघड म्हणून जमिनीखालून व हवेंतून आगगाड्या चालू करण्यांत आल्या. कोळशाचा त्रास नको म्हणून विजेचा उपयोग करून विनधुरी व वायुवेगानें चालणाऱ्या गाड्या (यांना आगगाड्या म्हणतां येणार नाहीं!) निघाल्या. उंच डोंगरावर नेणाऱ्याहि गाड्या आहेत.

गेल्या शतकांत आगगाड्या चालविणाऱ्या अनेक कंपन्या पाश्चात्य राष्ट्रांत निघाल्या. पुढें सरकारनें हळूहळू त्यांच्यावर नियंत्रणें घातलीं व एक स्वतंत्र खातेंच आगगाड्यांवर देखरेख करण्यासाठीं काढलें. रेल्वे कामगारांचें हित पाहण्यासाठीं कामगार संघ निघाले, तसेंच प्रवाशांचें हित पाहाण्यासाठींहि संस्था निर्माण झाल्या.

इंग्लंडमध्यें आगगाड्या सुरू झाल्यानंतर ब्रिटिश साम्राज्यांत त्या सुरु करण्याचें राज्यकर्त्यांनीं मनांत आणलें. प्रथम प्रयोगवजा कलकत्ता, मुंबई व मद्रास या ठिकाणीं तीन रस्ते बांधण्याचें ठरलें. मुंबई ते कल्याण हा ३३ मैलांचा रस्ता १८५४ त पुरा होऊन गाड्या सुरू झाल्या. पुढें इंग्लंडांत भांडवल उभारून १८५९ सालीं दि ईस्ट इंडियन, दि ग्रेट इंडियन, इत्यादि आठ कंपन्यांनीं ५००० मैलांचा लोखंडी रस्ता बांधण्याचें काम सुरु

केलें, सरकारनें या कंपन्यांना बऱ्याच सवलती दिल्या व नियंत्रणेंहि घातलीं. सरकारला या आगगाड्यांपासून प्रत्यक्ष फायदा होण्याला १९०० पासून सुरुवात झाली. आतां हिंदुस्थान सरकारनें सर्व आगगाड्यांचे रस्ते, वगैरे कंपन्यांकडून विकत घेऊन त्यांचा कारभार स्वतःकडे ठेविला आहे. हिंदुस्थान सरकारचें एक स्वतंत्र रेल्वे बोर्ड आहे. तें सर्व कारभार पाहतें. १९४४–४५ सालीं सरकारला सुमारें ५० कोटी रुपयांचा नफा आगगाड्यांपासून झाला.

जगांतील आगगाड्यांत वाढ— १९३७–३८ सालीं जगांतील मोठमोठ्या राष्ट्रांतून आगगाड्यांची वाढ कशी झाली होती हें खालील कोष्टकावरून कळेल :—

| राष्ट्राचें नांव | मैल | किती प्रवासी नेले | किती डबे ओझें |
| --- | --- | --- | --- |
| अमेरिका–(संयुक्त-संस्थानें) | २,३६,८४२ | ४५,४५,०८,००० | ८१,९७,३३,००० |
| रशिया | ५३,१६३ | ११,४२,००० | ५७,०२,२५,००० |
| हिंदुस्थान | ४१,०७६ | ५२,१२,८५,००० | ९,७७,६४,००० |
| जर्मनी (ऑस्ट्रिया धरून) | ३८,१०७ | २,०४,१७,००,००० | ५४,३३,०६,००० |
| फ्रान्स | २६,५२८ | ६२,७४,७३,००० | २७,२०,९०,००० |
| ग्रेट ब्रिटन | २०,०८० | १,२९,५४,०४,००० | ३५,५८,३२,००० |
| जपान | १०,७८४ | १०,५८,६३१ | ९,८४,८३,००० |
| इटली | १०,१७३ | १०,३०,४६,००० | ५,५४,३०,००० |

**आगरकर, गोपाळ गणेश** ( १८५६–१८९५ )— एक महाराष्ट्रीय समाजसुधारक. घरची गरिबी असल्यामुळें यांनीं आपल्या आतांच्या आश्रयानें रत्नागिरीस व वऱ्हाडांत आपलें शिक्षण करून पुढें डेक्कन कॉलेजांतून बी. ए. झाले. १८८० सालीं एम्. ए. होऊन ते न्यू इंग्लिश स्कूलच्या मंडळीस येऊन मिळाले. त्याच वर्षी 'केसरी' व 'मराठा' हीं पत्रें काढण्याचें ठरून 'केसरी'चे हे संपादक झाले. पुढें १८८८ सालीं संस्थेंतील इतर मंडळींशीं झालेल्या मतभेदामुळें 'सुधारक' हें नवें पत्र काढून त्याचे ते संपादक बनले. शाळा व कॉलेज यांचें काम संभाळून त्यांनीं १५ वर्षें वर्तमानपत्राचें संपादन-कार्य केलें. त्यांस दम्याची विकृति पहिल्यापासून होतीच. अखेरीस त्यांचा हा आजार वाढत जाऊन उदराच्या व्यथेनें ते १७ जून १८९५ रोजीं मृत्यु पावले. 'सुधारकां'तील लेखांखेरीज त्यांनीं दोनतीन ग्रंथ लिहिले आहेत : डोंगरींतील १०१ दिवस, हॅम्लेटचें भाषांतर विकारविलसित व वाक्यमीमांसा 'केसरी'तील निवडक निबंधांत त्यांचे बरेच लेख आहेत. ते आपलीं मतें अत्यंत निर्भीडपणें मांडीत असत. त्यांस नवीन राहणीचे व नवीन मताचे लोक आपला तत्त्ववेत्ता पुढारी मानीत.

**आगरवाल**—एक जात. यांची विशेष वस्ती पंजाब आणि संयुक्तप्रांत यांत आहे. ती सुमारें दहा लाखांवर भरते. या जातींत हिंदू, शीख, बौद्ध, जैन व मुसलमानहि आहेत. पण तीन–चतुर्थांशाच्यावर हिंदू आगरवाल आहेत व त्या खालोखाल जैन येतात. यांचें वहीपूजन दिवाळींत न होतां दसऱ्यास होतें. मुंबई प्रांतांतील आगरवालांत सतरा गोत्रें आढळतात. यांची भाषा हिंदुस्थानी आणि गुजराती यांच्या मिश्रणाची असते. बहुतेक लोक व्यापार–उदीमांत असतात.

यांचें मूलस्थान पंजाब जिल्ह्यामध्यें असलेलें फत्तेबाद तहशिलींतील अग्रोहा हें शहर होय असें म्हणतात. हें पूर्वी फार महत्त्वाचें ठिकाण होतें. येथें जे किल्ल्याचे अवशेष व इमारतींचे चौथरे दृष्टीस पडतात त्यांवरून या गोष्टीची प्रतीति येते. इ. स. ११९४ मध्यें महमद घोरीनें तें शहर जिंकून घेतलें, त्या वेळीं तेथील बानिये तें सोडून दक्षिणेंत पळाले. यामुळें तेथील वस्ती नाहींशी झाली.

**आगरी**—आगळे कुणबी. यांची बहुतेक वस्ती ठाणें आणि कुलाबा या जिल्ह्यांतून आहे. लोकसंख्या दोन–अडीच लाख भरेल. शुद्ध आगरी, दास आगरी व वरप आगरी असे यांचे तीन पोटवर्ग आहेत. मीठ आगरी हा शुद्ध आगरींचा आणखी पोटवर्ग आहे. मिठाचा धंदा बिंबराजानें यांना मिराशीचा करून दिला असें सांगतात. यांच्या ज्ञातिसभा आहेत व त्यांतून निवाडे होतात.

आगरी भाषा देशावरील कुणबी भाषेहून जरा निराळी आहे. ग बद्दल ज (जेला); घ बद्दल झ (झेतलें); ट बद्दल र (उराला); म्यां ऐवजीं मिनीं, मला ऐवजीं मना; दुसरा ऐवजीं बिसरा; सांगितलें–सांगलें; प्याला–पिला; पेक्षां–पासून, इ. विशेष सांगतां येतील.

**आंगरे**—मराठशाहींत नौकानयनांत व आरमारांत जे मराठे सरदार नामांकित झाले त्यांमध्यें कुलाब्याच्या आंगऱ्यांचें नांव प्रमुख आहे. ज्या समुद्रकांठच्या प्रदेशांत आंगऱ्यांनीं आपलें

नांव गाजविलें त्यास पूर्वी अष्टागर (पहा) म्हणजे आठ गांवांचा समुदाय असें म्हणत.

आंगऱ्यांचा पहिला प्रसिद्ध पुरुष तुकोजी संकपाळ हा असून त्यानें शहाजी भोसले याला मोंगलांविरुद्ध कोंकणांत युद्ध करण्यास मदत केली होती. तो आपला मुलगा कान्होजी यासह आरंभीं शिवाजीच्या आरमारांत नोकर होता. हे दोघेहि आपल्या कामांत प्रवीण व नेकीनें वर्तत असून शिवाजीच्या वेळेसच ते विशेष प्रसिद्धीस आले. संभाजीच्या कारकीर्दीत कुलाब्यावर भीवजी गुजर नांवाचा सरदार असून कान्होजी 'आंगरे संकपाळ हा दर्यावर्दी व फिरती आरमारें यांजवर मुख्य नेमलेला होता. कान्होजी हा हर्णेजवळ आंगरवाडी म्हणून गांव आहे तेथील राहणारा असल्यामुळें यास व याच्या वंशजांस आंगरे हें उपनांव प्राप्त झालें.

आंगऱ्यांचें घराणें दर्यावर्दीपणांत विलक्षण धाडसी होतें. लहानपणापासून समुद्राच्या लाटांवर हेलखावे खाऊन त्यांच्या अंगीं काटकपणा व धाडस हे गुण उपजत पैदा झाले होते. तेव्हां व्यापारी जहाजांवर हात मारून संपन्न होण्याकडे ह्या गुणांचा उपयोग त्यांनीं केला. त्या वेळच्या व्यापाराच्या मानानें चांचेपणाचा धंदा किफायतशीर होता. प्रत्यक्ष इंग्रज व्यापाऱ्यांनीं सुद्धां चांचेपणांत अग्रगण्यता संपादिली होती. डग्लस म्हणतो, 'मराठे चांचे दुष्ट तर खरेच, पण इंग्रज चांचे त्यांहीपेक्षां दुष्ट होते; कारण इंग्रजांचें ज्ञान जास्त असून त्यांची भूक शमलेली नव्हती.'

आंगऱ्यांचा व इंग्रजांचा समुद्रावर पुष्कळ वर्षें झगडा चालू होता. शेंकडों वर्षें त्यांनीं इंग्रजांची डाळ शिजूं दिली नाहीं व ह्या पाश्चात्य कलेंत त्यांची बरोबरी करूं शकले. आंगऱ्यांचा दरारा इतका होता कीं, अरबी समुद्रांतून येणारीं इंग्रजांचीं जहाजें किनाऱ्यावर सुखरूप आणण्याबद्दल आंगऱ्यांच्या वाटाड्यास ५००० रुपये बक्षीस देण्याचा ई. इं. कंपनीचा रिवाज पुष्कळ दिवस चालू होता. शिद्द्याच्या शेजारानें व शिद्द्याचा प्रतिकार करावा लागल्यामुळें आंगऱ्यांच्या अंगांत क्रूरपणाहि बराच उत्पन्न झाला होता. निदान आंगऱ्यांच्या वाटेस जाऊन त्यांच्या अनियंत्रित जलधिसत्तेस जो कोणी अडथळा करी त्यास विलक्षण हाल भोगावे लागत. पोत्यांत घालून सागरगडाच्या टोकावरून खालीं समुद्रांत कडेलोट करणें ही नेहमींची ठरलेली शिक्षा होती. जमिनीवरहि आंगऱ्यांचा अमल बराच होता. शाहू छत्रपतीच्या वेळेला आंगऱ्यांचें प्रस्थ फारच मोठें होतें. लोहगडचा मजबूत किल्ला त्यांच्या ताब्यांत होता. तथापि आंगऱ्यांनीं राजचिन्हें कधींहि धारण केलीं नाहींत. शिवाजीच्या पश्चात् मराठशाहीवरील बिकट प्रसंगांत शिद्दी, मोंगल व पोर्तुगीज ह्या तीन सत्तांशीं शौर्यानें व हिकमतीनें टक्कर देऊन, मराठे लोकांचा अमल समुद्रकिनाऱ्यावर कायम राखिल्यामुळें आंगऱ्यांचें घराणें राष्ट्रेतिहासांत प्रमुख समजलें जातें.

स. १६९० च्या सुमारास कान्होजी काम पाहूं लागला. तेव्हांपासून सुमारें १५० वर्षेंपावेतों म्हणजे स. १८४० पर्यंत आंगऱ्यांची सत्ता अरबी समुद्रावर चालू होती. इंग्रजांच्या मुंबईस खेटा देऊन, त्यांचें राज्य सुमारें १५० मैल लांब, व ३० पासून ६० मैल रुंद इतक्या जमिनीच्या टापूवर पसरलेलें होतें.

ह्या १५० वर्षांच्या अवधींत एकापेक्षां एक वरचढ असे पुढील पराक्रमी पुरुष होऊन गेले. कान्होजी, सेखोजी, संभाजी, तुळाजी, मानाजी, रघूजी, मानाजी दुसरा व बाबुराव, रघूजी दुसरा. कान्होजी, संभाजी, तुकोजी, वगैरेंचीं चरित्रें स्वतंत्र दिलीं आहेत. सन १८४० त वारसाच्या अभावीं त्यांचें राज्य इंग्रजांकडे खालसा झालें. त्या वेळीं त्याचें उत्पन्न तीन लाख होतें.

**ऑगस्टस**—गायस ज्यूलिअस सीझर ऑक्टेव्हिॲनस (खि. पू. ६३–इ. स. १४)—एक रोमन बादशहा. ज्यूलियस सीझरच्या बहिणीचा हा नातू असून खि. पू ४३ सालीं कॉन्सल झाला. यानें ज्यूलियस सीझरच्या खुनाचा सूड उगवला. खि. पू. ३१ मध्यें अँटनीचा पराभव करून तो जगाचा मालक बनला, व ऑगस्टस ही पदवी त्यानें धारण केली. त्यानें लोकमताला अनुसरून चांगल्या रीतीनें राज्यकारभार केला. वाङ्मयाला प्रोत्साहन दिल्यामुळें त्या काळच्या वाङ्मयाला ऑगस्टस युगाचें वाङ्मय म्हणतात. त्यानें रोम शहर 'विटांचें होतें तें संगमवरी केलें' असें यथार्थ वचन आहे.

**ऑगस्टाइन (सेंट)** (३५४–४३०)—लॅटिन–खिस्ती धर्मसंस्थेच्या चार थोर धर्माध्यक्षां (फादर) पैकीं एक. त्यानें प्रथम तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला, पण त्यानें त्याचें समाधान झालें नाहीं, म्हणून तो खिस्ती धर्माकडे वळला व मिलानच्या बिशपनें त्याला खिस्ती धर्माची दीक्षा दिली. सेंट पॉलचीं पत्रें वाचल्यावर त्याच्या स्वभावांत व जीवनांत पूर्ण क्रांति घडून आली. कांहीं काळ एकांतवासांत राहून नंतर त्यानें बाप्तिस्मा घेतला. नंतर आफ्रिकेंत परत जाऊन त्यानें केवळ पोटापुरती मिळकत शिल्लक ठेवून बाकी सर्व इस्टेट विकून टाकली, व तो सर्व पैसा गरिबांना दानधर्म करण्यांत खर्च केला. हिप्पो शहरच्या लोकांच्या इच्छेवरून तो त्या शहराच्या बिशपचा मदतनीस झाला, आणि त्याचीं धार्मिक प्रवचनें इतकीं लोकप्रिय झालीं कीं, ३९५ मध्यें त्याला बिशप नेमण्यांत आलें. इच्छा–स्वातंत्र्य, ईश्वरकृपा (Grace) आणि प्रारब्धवाद (Predestination) या तत्त्वांबद्दल त्याचा पेलाजिअसबरोबर मोठा वादविवाद झाला, व या विषयांवर त्यानें प्रबंध लिहिले. तथापि त्याच्या सर्व

लिखाणापैकीं पातकोचार ( Confessions ) हा ग्रंथ अजरामर होण्याची अतिशय खात्री आहे.

**आंगस्ट्राम, अन्डर्स जोनास** ( १८१४—१८७४ )—एक स्वीडिश शास्त्रज्ञ. उप्साला विश्वविद्यालयांत त्याचें शिक्षण झालें. खगोलशास्त्राची प्रत्यक्ष माहिती मिळविण्याकरितां हा सन १८४२ सालीं स्टॉकहोम येथील वेधशाळेंत गेला. पुढें त्याला भूचुंबक शास्त्राची आवड उत्पन्न झाली. त्यामुळें त्यानें स्वीडन देशांतील निरनिराळ्या भागांची पाहणी करून त्या देशांतील भिन्नभिन्न भागांचा ( चुंबकीय ) कल आणि बल हीं निश्चित केलीं. युजन नांवाच्या स्वीडिश जहाजानें १८५१ ते १८५३ सालापर्यंत पृथ्वीप्रदक्षिणा करून पृथ्वीवरच्या निरनिराळ्या भागांचें भूचुंबकत्व निश्चित करितां येईल अशी माहिती मिळविली, तिचा उपयोग करून घेण्याचें काम स्टॉकहोम येथील शास्त्रीय अकॅडेमीनें याजकडे सोंपविलें. हें काम त्याच्या मृत्यूच्या अगोदर कांहीं दिवसपर्यंत चालून संपलें. सन १८५८ मध्यें त्याला उप्साला येथें पदार्थविज्ञानशास्त्राचा अध्यापक नेमण्यांत आलें.

त्याच्या एकंदर लेखनांत उष्णतेच्या वहनाविषयीं जें लिहिलें आहे तें पुष्कळ महत्त्वाचें आहे. विच्छिन्नकिरणशाखेवर त्यानें उपयुक्त माहिती मिळविली. त्याचा दुसरा शोध म्हणजे त्यानें यूलरच्या सिद्धान्ताचा उपयोग करून असें दाखवून दिलें कीं, एखाद्या तसवायूंतून ज्या प्रकारचे प्रकाशकिरण निघतात त्याच प्रकारचे किरण त्या वायूकडून शोषिले जातात. १८६१ सालापासून सूर्याच्या विच्छिन्न किरणपटाकडे ह्यानें विशेष लक्ष पुरविलें व सन १८६२ मध्यें ह्यानें असें सिद्ध केलें कीं, सूर्यावर उज्ज ( हायड्रोजन ) मूलद्रव्य आहे. सन १८६२ मध्यें ह्यानें सूर्याच्या विच्छिन्न किरणपटाचा एक नकाशा तयार केला. शास्त्रज्ञांनीं पुष्कळ वर्षेपर्यंत या नकाशाचा प्रमाणग्रंथाप्रमाणें उपयोग केला आहे.

**आगाशी**—मुंबई, ठाणें जिल्ह्याच्या वसई तालुक्यांतील एक बंदर. हें वसईच्या उत्तरेस १० मैलांवर असून बी. बी. सी. आय्. रेल्वेच्या विरार स्टेशनापासून ३॥ मैलांच्या रस्त्यावर आहे. १६ व्या शतकाच्या आरंभीं या बंदरास बरेंच महत्त्व होतें. या ठिकाणीं लांकडाचा मोठा व्यापार व जहाजें बांधण्याचें काम चालत असे. पोर्तुगीज लोकांनीं हें बंदर दोन वेळां लुटलें. मुंबई बंदराशीं येथून सुक्या केळ्यांचा मोठा व्यापार चालतो. इ. स. १६९१ मध्यें शंकराजी केशव फडके यांनीं बांधलेलें एक भवानी शंकराचें देवालय येथें आहे. तेथील कुंडांत स्नान केलें असतां त्वचेचे रोग बरे होतात असें म्हणतात. येथें एक जुना किल्ला आहे. लो. सं. ११११८.

**आगुआ ज्वालामुखी**—हा मध्य अमेरिकेंतला जिवंत ज्वालामुखी ग्वाटीमाला देशांत १५,००० फूट उंचीवर आहे. या ज्वालामुखीच्या उद्रेकांत दोन वेळां जवळच असलेलें जुनें ग्वाटीमाला शहर उध्वस्त झालेलें आहे.

**आग्रा**—हिंदुस्थान, संयुक्त प्रांत, आग्रा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें यमुना नदीच्या उजव्या तीरावर वसलें आहे. लो. सं. २८४१४९.

पूर्वीचें आग्रा शहर यमुनेच्या डाव्या तीरावर होतें. मुसलमान अमलापासून उजव्या तीरावर वसाहतीस सुरवात झाली. बाबरनें येथें आपलें वसतिस्थान करून याच्या भावी महत्त्वाचा पाया घातला व अकबर बादशहानें पुष्कळच

आग्रा ताजमहाल

नवीन इमारती बांधून त्यास बळकटी आणली. शहाजहाननें तर आग्र्याचें नांव त्रिखंडांत गाजेल अशीं कलाकुसरीचीं कामें या शहरांत करविलीं. मोती मशीद, दिवाणी-इ-खास महाल व 'जगांतील अद्भुत आश्चर्यांपैकीं एक' असा ताजमहाल ( पहा ) या सर्व सुंदर इमारती शहाजहानच्या कलावृत्तीचीं जिवंत स्मारकें आहेत. सध्यां या शहराचें महत्त्व उद्योगधंद्याचें ठिकाण म्हणून आहे. शिक्षणाच्या बाबतींतहि हें शहर मागें नाहीं. संयुक्त प्रांतांत हें विद्येचें माहेरघर आहे. येथें एक विद्यापीठहि आहे.

तथापि प्रवाशाच्या नजरेंत आग्र्याचा किल्ला, ताजमहाल,

चिनीका रोझा, अकबराची कबर (सिकंदरा), जहांगिराचा वाडा, दिवाणी-इ-खास, शहाजहानाची कबर, जाईचा घुमट, मोती मशीद, मदिना मशीद, इतिमद्दुद्दौलाची कबर, वगैरे कलाकुसरींचीं कामेंच भरतात. अकबर बादशहानें या किल्ल्याचा पाया घातला. किल्ला पूर्ण बांधून होण्यास ८० वर्षे लागलीं असें म्हणतात. यांत जहांगीर, शहाजहान, वगैरे पुढील बादशहांनीं सुधारणा करून त्याच्या बळकटीबरोबर रचनाचारुत्वहि आणलें. ताजमहालाशिवाय आग्र्यांत मोती मशीद, जाईचा घुमट, वगैरे बऱ्याच इमारती प्रेक्षणीय आहेत. मोती मशिदीचा अंतर्भाग कलाकुसरीचा एक उत्कृष्ट नमुना आहे. जाईचा घुमट हा पांढऱ्याशुभ्र संगमरवरी दगडाचा असून त्यांत रंगी-बेरंगी खडे बसविलेले आहेत. या ठिकाणावरून शहाजहान आपल्या मृत पत्नीच्या थडग्याकडे अश्रुपूर्ण नेत्रांनीं तासन् तास पाहत राहत असे, असें म्हणतात.

हें मोठें व्यापारी शहर आहे. गालिचे, नकसकाम, दगडीकाम, सुबक कातडीं, इ. विषयीं प्रसिद्ध आहे.

आग्रा-कॅन्टोन्मेंट आग्रा किल्ल्याच्या दक्षिणेस आहे.

**आघाडा**—यास संस्कृतांत अपामार्ग म्हणतात. वैदिक वाङ्मयांत अभिचारासाठीं याचा उपयोग सांगितला आहे. हें वर्षायु क्षुद्रप तणासारखें जंगलांत उत्पन्न होतें. याची उंची ४ पासून ६ फुटांपर्यंत असते. पावसाळ्यांत हीं झाडें फार होतात. आघाड्याच्या तुऱ्यांत अतिशय बारीक, नरम व कांटेदार बीं सांपडतें. हें झाड औषधी कामांत उपयोगी पडतें. ह्याच्या तीन जाती आहेत; पांढरा, तांबडा व पाण आघाडा. तीनहि जातींत औषधी गुणांनीं पांढरा आघाडा श्रेष्ठ समजला जातो. जुन्या वैद्यकाच्या दृष्टीनें ह्याच्या क्षारांत अपमार्गत्व म्हणजे स्वच्छ करण्याचा गुण आहे. ह्या झाडाचीं (मूळ, देठ, पानें, बीं व फुलें हीं सर्व) अंगें निरनिराळ्या अनुपानानें देऊन नाना तऱ्हेच्या व्याधींवर हें झाड उपयोजिलें जातें.

**आचार्य, चिंतामणि रघुनाथ** (१८२८-१८८०)—एक भारतीय ज्योतिर्विद्. हे मद्रास येथील ज्योतिष शाळेंत १७ वर्षें पहिले असिस्टंट होते. महाराष्ट्रांत जसे केरूनाना व काशीकडे बापूदेव तसेच मद्रासकडे चिंतामणि रघुनाथ आचार्य होते. यांची जन्मभाषा व मूलवस्ती द्राविड असून यांस संस्कृत भाषा येत नव्हती तरी युरोपीय गणिताचें आणि ज्योतिषाचें ज्ञान यांस उत्तम होतें व त्यामुळें भारतीय ज्योतिषशास्त्राचें ज्ञान साहजिक झालें होतें. पुष्कळ वर्षे ते स्वतः वेध घेत असत. सन १८४७ त त्यांनीं मद्रास वेधशाळेंत नोकरी पत्करली. शेवटपर्यंत ते तेथेंच होते.

**आचीन**—सुमात्रा बेटावरील एक देशी संस्थान. याचें क्षेत्रफळ वीस हजार चारशें एकाहत्तर चौरस मैल आहे. हा सर्व प्रदेश डोंगराळ असून त्यामधील सुपीक मैदानावर तांदूळ व मिरीं यांचें पीक मुख्यत्वें होतें. या प्रदेशाची राजधानी आचीन ही असून संस्थानची लो. सं. ७,८९,६६४ व शहराची ११,००० आहे.

**आंजणा (चौधरी)**— बडोदें राज्यांतील एक जात. ही मुख्यतः मेहसाणा जिल्ह्यांत आढळते. हे लोक मूळ रजपूत असावेत. यांच्यांत २३ गोत्रें आहेत. हे रामानुजी, शैव व स्वामीनारायणपंथी आहेत. विधवाविवाह व घटस्फोट रूढ आहे. लग्नें केडवा कुणब्यांतल्याप्रमाणें बहुधा होतात. आंजणा हे शेतकीचा धंदा करतात. लो. सं. सुमारें ४०,०००.

**आजीवक पंथ**—हा पंथ बौद्ध आणि जैन धर्मांच्या उदयाच्या वेळेस अस्तित्वांत होता व जैन धर्माचें, विशेषतः त्यांतील दिगंबर पंथाचें, याच्याशीं बरेंच साम्य आहे व इ. स. च्या सहाव्या शतकापासून दिगंबर पंथालाच हें नांव लावल्याचें लेखांतून आढळतें. या पंथाचा संस्थापक मंखली गोशाल नांवाचा साधु होता. विश्वामध्यें कसल्याहि प्रकारचा कार्यकारणभाव नसून सर्व घटना स्वभावतःच होतात व कोणतीहि गोष्ट कोणाच्या प्रयत्नावर अवलंबून नाहीं अशा तऱ्हेचें मत या पंथाचें आहे.

**आझाद, मौलाना अबुल कलाम** (१८८८- )—एक हिंदी पुढारी. यांचें नांव मोहिउद्दीन अहमद असें असून अबुल कलाम म्हणजे वाचस्पति ही त्यांस पदवी आहे व आझाद म्हणजे स्वतंत्र हें त्यांनीं टोपण नांव घेतलें आहे.

यांचा जन्म मक्का येथें १८८८ सालीं झाला. यांच्या वडिलांचें नांव मौलाना मोहिउद्दीन खैरुद्दीन असें असून ते एक मुसलमान पंडित व धर्मगुरु होते. यांचें बालपण अरबस्तानांत गेलें. यांचें शिक्षण कैरो येथील अल् अझर विद्यापीठांत झालें व तेथें त्यांनीं धर्मशास्त्राचा अभ्यास केला. हिंदुस्थानांत आल्यानंतर त्यांनीं कलकत्ता येथें स्थायिक होऊन प्रसिद्ध 'अल्हिलाल' नांवाचें उर्दू साप्ताहिक सुरू केलें व त्यांत तुर्कस्तान, वगैरे देशांतील मुसलमान राष्ट्रांपुढें असलेल्या प्रश्नांची चर्चा चालू केली. हें पत्र सरकारनें बंद केल्यावर त्यांनीं 'अल्बालघ' नांवाचें दुसरें एक पत्र तावडतोब सुरू केलें. त्यामुळें त्यांस अली बंधूंबरोबर अटक करण्यांत आली. याच सुमारास जागतिक युद्ध सुरू झालें होतें. सुटका झाल्यावर त्यांनीं राष्ट्रीय चळवळींत भाग घेण्यास सुरुवात करून ते महात्मा गांधी यांचे अनुयायी बनून राष्ट्रीय सभेस येऊन मिळाले. त्यांनीं खिलाफत चळवळींत जोराचा भाग घेतल्यामुळें असहकारितेच्या चळवळींत त्यांस (१९२१-२२) तुरुंगवासाची शिक्षा झाली. त्या वेळीं त्यांचेबरोबर

देशबंधु दास व अलीबंधु यांसहि शिक्षा झाल्या. या कालापासून ते कांग्रेस वर्किंग कमिटीमध्यें एक कट्टर राष्ट्रीय मुसलमान पुढारी म्हणून भाग घेऊं लागले. १९३१–३२ च्या सत्याग्रहाच्या चळवळीमध्यें भाग घेतल्यामुळें त्यांस अनेकवार शिक्षा झाल्या आहेत. ते १९२३ सालच्या दिल्ली येथील विशेष राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते व १९३० मध्यें पुन्हां तात्पुरते अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली होती. हे ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सभासद असून पार्लमेंटरी बोर्डाचे सभासद होते. हे राजकारण-कुशल असून उत्तम वक्ते व जोरदार लेखक आहेत. हे प्रसिद्ध ग्रंथकारहि आहेत. त्यांनीं अनेक विषयांवर, विशेषतः धर्मशास्त्रावर, ग्रंथरचना केली असून कुराणावर तीन भागांत टीका लिहिली आहे.

८ ऑगस्ट १९४२ च्या मुंबई येथील कॉंग्रेस-कमिटीच्या सभेचे ते (कॉंग्रेसचे अध्यक्ष असल्यामुळें) अध्यक्ष होते व त्या सभेनंतर लागलीच त्यांस अटक झाली. त्यानंतर दुसरें महायुद्ध संपेपर्यंत ते अटकेंत होते. हें युद्ध संपल्यानंतर सर्व पुढाऱ्यांबरोबर त्यांचीहि सुटका झाली. त्यानंतर हिंदू-मुसलमान यांचें ऐक्य करण्याच्या बाबतींत व ब्रिटिश सरकारकडून सत्ता-संक्रमणाच्या बाबतींत जी व्हाइसरॉय, वगैरेंबरोबर चर्चा झाली तींत सिमला बैठक व त्यानंतरच्या सर्व बैठकांत यांनीं प्रामुख्यानें व महत्त्वाचा भाग घेतला. पुढें त्यांनीं राष्ट्रसभाध्यक्षत्व पं. जवाहरलाल नेहरू यांच्याकडे दिलें व स्वतः राष्ट्रीय सभेस योग्य सल्ला देण्याचें काम करूं लागले. दिल्ली येथें हंगामी सरकार स्थापन झालें तेव्हां ते प्रथम बाहेर राहिले. परंतु आतां त्यांनीं शिक्षणमंत्र्याचें काम पत्करलें आहे. सर्व शिक्षण मातृभाषेंतून झालें पाहिजे असा त्यांचा कटाक्ष आहे व ते मध्यवर्ती कायदेमंडळांत उर्दूमध्येंच भाषण करतात व देशी भाषेंत भाषणें करण्याची प्रथा प्रथम त्यांनींच पाडली आहे. तथापि प्रत्येक मनुष्यास मातृभाषेप्रमाणेंच राष्ट्रभाषा व एक युरोपीय भाषा आली पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. सर्व शिक्षणाची पुनर्घटना करण्याच्या विचारांत ते सध्यां आहेत.

**आझाद, चंद्रशेखर** (१९०७–१९३१)— एक हिंदी क्रांतिकारक. हा १९२१ सालापासूनच क्रांतिकारक चळवळींत सामील झाला. त्या वर्षी बनारस संस्कृत कॉलेजवर पिकेटिंग केल्याबद्दल त्यास १५ फटक्यांची शिक्षा झाली. काशी विद्यापीठांत संस्कृतचें अध्ययन करीत असतांनाच तो क्रांतिकारक बनला व त्यानें आपल्या पक्षाची जोराची संघटना केली. ९ ऑगस्ट १९२५ रोजीं झालेल्या प्रसिद्ध काकोरी कटांत तो सामील होता; पण त्यांतून तो निसटला. त्यानें यापुढें अनेक कटांत भाग घेतला, पण तो प्रत्यक्ष सांपडला नाहीं व मी जिवंतपणीं कधीं सांपडणार नाहीं असें तो नेहमीं म्हणे. लाहोर कटाचे दोन खटले, व्हाइसरॉय यांची गाडी उलथण्याचा कट, सॉंडर्स खुनाचा कट, वगैरेंमध्यें त्यास आरोपींत दाखल केलें होतें; परंतु त्याचे इतर सहकारी फांशीं गेले तरी तो प्रत्यक्ष पोलिसांस सांपडला नाहीं. त्यास पकडण्यास पांच हजारांचें बक्षीस लावलें होतें. अखेरीस २७ फेब्रुवारी १९३१ रोजीं त्याच्या एका विश्वासघातकी मित्रानें अलाहाबादमधील आल्फ्रेड पार्कमध्यें त्यास दगा दिला. तथापि तो पोलिसांच्या हातीं लागला नाहीं. त्यानें पोलिसांवर गोळीबार सुरू केला; तेव्हां उलट पोलिसांनीं केलेल्या गोळीबारास तो बळी पडला. हा आदर्श क्रांतिकारक होता. याचें शरीर धिप्पाड व मजबूत असून नेमबाजी अचूक होती. याचें संघटना-कौशल्य वाखाणण्यासारखें असून अनेक कट रचण्यास लागणारी बुद्धिमत्ता त्याच्या अंगीं होती. यामुळें सर्व क्रांतिकारकांत त्याची कीर्ति फार मोठी होती.

**आटपाडी महाल**— मुंबई. औंध संस्थानचा हा सर्वांत मोठा महाल सातारा जिल्ह्यांत आहे. याचें क्षेत्रफळ सुमारें ३३७ चौ. मैल असून लोकसंख्या ३६२३७ आहे. पाऊस सरासरी १५ इंच पडतो. मुख्य पिकें बाजरी, मटकी, गहूं, हरबरा, रताळीं, मका हीं होत. या महालांत घोंगड्या, पासोड्या, खादी, लुगडीं, वगैरे कापडी माल विशेष निघतो. आटपाडी येथील खिल्लारी बैल प्रसिद्ध आहेत. येथून १२ मैलांवर खरसुंडी येथें नाथाचें प्रख्यात देवालय आहे. आतां हा महाल औंध संस्थानाबरोबर हिंदी मुलखांत सामील झाला आहे.

**आट्यापाट्या**—एक महाराष्ट्रीय खेळ. यांत पाट्या पाडलेल्या असतात. आरंभींच्या पाटीस (आकृति क्र. १ मधील 'अ' ही पाटी) चांभारपाटी अगर कपाळपाटी म्हणतात. सर्व पाट्यांना दुभागून जाणाऱ्या आडव्या पाटीस (आकृति क्र. १ मधील 'क ख') मृदुंगपाटी अगर सूरपाटी असें म्हणतात. शेवटच्या पाटीस (आकृति 'खओ') लोणपाटी म्हणतात. सूरपाटी व इतर पाट्या ह्यांमधील छेदास (आकृति २ मधील 'ट' 'ठ' वगैरे छोट्या चौरसांस) कांडेछेद म्हणतात. सूरपाटीच्या योगानें झालेल्या पाटीच्या प्रत्येक विभागास पाटीचें कांडें असें म्हणतात (उ०, आ. २ मधील 'य' हा विभाग) व दोन पाट्यांमधील सूरपाटीच्या भागास सूरपाटीचें कांडें म्हणतात. (उ०, आकृति २ मधील 'क्ष' विभाग.) चांभारपाटी व सूरपाटी ह्या पाट्या धरणाऱ्या इसमास मृदुंग अगर सूर म्हणतात. पाट्यांवर उभे राहून विरुद्ध पक्षास अडविण्याचा प्रयत्न करणाऱ्या पक्षास धरणारे व तद्विरुद्ध पक्षास खेळणारे असें म्हणतात. (लोण आणतांना) खेळणारानें पाटी धरणाऱ्यास चांभारपाटीच्या विरुद्ध दिशेस तोंड करावयास सांगणें ह्यास तोंड मागणें असें

म्हणतात. धरणाऱ्यांच्या शरीराचा कोणताहि भाग पाटीच्या मर्यादेच्या बाहेर मागील अगर पुढील बाजूस जमिनीवर लागला तर त्याचा पाय चुकला असें म्हणतात. धरणाऱ्याचीं पावलें व गुडघे यांशिवाय इतर कोणताहि भाग जमिनीवर टेकला तर त्यानें हात टेकले असें म्हणतात. धरणारा इसम एक पाऊल जमिनीपासून उचलून जर दुसऱ्या पायावर भार देऊन उभा राहील तर त्यानें पाय उचलला असें म्हणावें. खेळणाराचें पाऊल जर मर्यादेच्या बाहेर गेलें तर त्याचा तो पाय बाहेर गेला असें म्हणतात. शरीराचा कमरेपासून वरील भाग मर्यादेंत असून पाय बाहेर असेल तर पाय बाहेर गेलासें होत नाहीं. विरुद्ध पक्षाच्या खेळगड्यास नियमांचें उल्लंघन न करतां हातानें स्पर्श करणें यास गडी मारणें असें म्हणतात. चांभारपाटीकडून

### आट्यापाट्या

खेळण्याची जागा खालीं दर्शविल्याप्रमाणें आंखावी.

आकृति क्र. १

लोणपाटीकडे खेळत जाणें यास वरून खालीं जाणें व लोणपाटीकडून उलटून चांभारपाटीकडे खेळत येणें यास खालून वर येणें असें म्हणतात. खेळणाऱ्यांपैकीं खालून वर येणारा व वरून खालीं जाणारा यांची गांठ पडणें ह्यास लोण मिळणें असें म्हणतात व तें पहिल्यानें दुसऱ्यास पोहोंचविलें असें म्हणतात. चांभारपाटींतील कांडेछेदांत निदान एक पाऊल ठेवून निघून पुढल्या पाटींतील कांडेछेदांत निदान एक पाऊल टाकून पुनः चांभारपाटींतील कांडेछेदांत एक पाऊल टाकणें ह्या सर्व क्रियेस कांडें चिरणें असें म्हणतात. (आकृति १ मध्यें क पासून आ पाटीपर्यंत व उलट तेथून क पर्यंत जाणें). [ डेक्कन जिमखान्याची नियमावली पहा ].

### आकृति क्र. २ कोंडी

सुरुवातीच्या वेळीं खेळणारांनीं चांभारपाटीच्या बाहेर असावयास पाहिजे; व पाटीवाल्यांनीं चांभारपाटीकडे तोंड करून पाटीवर राहावें. सूचना झाल्याबरोबर सुरानें कांडें चिरावें व नंतर गडी मारण्यास लागावें. कांडें चिरतांना सुरानें मृदंगावरच असलें पाहिजे. इतर पाटी धरणाऱ्यांनीं डावाच्या सुरुवातीची सूचना झाल्याबरोबर लगेच गडी मारण्यास सुरुवात करावी. खेळणारानें

दोन्ही पाय बाहेर जाऊं देतां कामा नये. एक पाय बाहेर गेल्यास चालेल. खेळणाऱ्या पक्षापैकीं सर्वांत पुढच्या इसमानें लोणपाटी ओलांडल्याबरोबर लोणपाटी धरणाऱ्याजवळ तोंड असा शब्द स्पष्ट उच्चारून तोंड मागावें. ह्या वेळीं त्या पाटींत असणाऱ्या सर्व खेळणाऱ्यांनीं अगोदर खालीं यावें व नंतर ती पाटी पुन्हां ओलांडण्यास लागावें. प्रत्येक पाटींत ह्याप्रमाणें करीत चांभारपाटीकडे यावें. चांभारपाटी ओलांडल्यास लोण झालें असें म्हणतात. प्रतिपक्षावर किती लोण किंवा त्याचे गुण लागले यावरून जयपराजय ठरवितात. या खेळाबाबत नवीन बरेच नियम झाले आहेत.

**आठल्ये, कृष्णाजी नारायण** (१८५२–१९२७)—एक महाराष्ट्रीय लेखक. प्रथम शिक्षक व नंतर चित्रकार झाले. बडोद्यास सर टी. माधवराव यांच्या प्रोत्साहनानें चित्रें तयार करण्याचें काम मिळालें. पुढें कोचीनला वीस वर्षें होते. तेथें 'केरळ कोकीळ' मासिक सुरु केलें. तें फार लोकप्रिय झालें. आठल्यांची भाषा फार अलंकारिक असे. त्यांना शृंगेरीच्या पीठाकडून 'महाराष्ट्र भाषा चित्रमयूर' ही पदवी मिळाली होती. यांनीं २५ वर लहानमोठे ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं सुलभ वेदान्त, सार्थ दासबोध, ज्ञानेश्वरी, समर्थांचें सामर्थ्य, गीतापद्यमुक्ताहार हे प्रसिद्ध आहेत. ते चांगले कविहि होते. त्यांची 'सासरची पाठवणी' मुलींच्या तोंडीं असे.

**आथाबास्का**— कानडांतील एक नदी व सरोवर. रॉकी पर्वतांच्या पूर्व उतारावर उगम पावून आल्बर्टा प्रांतांतून वाहत जाणारी ही नदी सुमारें ६०० मैल वाहत जाऊन आथाबास्का सरोवराला मिळते. हें सरोवर पूर्व–पश्चिम २०० मैल लांबीचें असून आल्बर्टा व सस्काचीव्हॉन या दोन प्रांतांच्या हद्दींत आहे.

**आडनांव**—समाजांत एकाच नांवाच्या अनेक व्यक्ति सांपडतात त्या अर्थीं व्यक्तीचा निर्देश अधिक निश्चितपणें करतां यावा म्हणून जे कांहीं उपाय योजण्यांत येतात, त्यांपैकीं आडनांव हा एक आहे. जेव्हां एकाच नांवाच्या व्यक्ती भिन्न वंशांतील किंवा कुळांतील असतील तेव्हां त्यांना कुलनामासहित संबोधिल्यास कोण कोणता हें ओळखण्यास सोपें जातें. या दृष्टीनें आडनांवें प्रचारांत आलीं असावींत. तीं बहुतेक सर्व समाजांतून दृष्टीस पडतात. आडनांवांचें महत्त्व इंग्रजी अमदानींत फार वाढलें. पेशवाईंत व त्यापूर्वींहि व्यक्तीचें नांव व बापाचें नांव एवढाच नामनिर्देशाचा प्रकार असे. आडनांवें जीं पडतात तीं कांहीं कारणामुळें टोपण नांवाप्रमाणें पडत असतात. तसेंच आडनांवें अनेक कारणांनीं बदलतात.

एका आडनांवाच्या जागीं दुसरें आडनांव जें येतें त्याचाहि कांहीं इतिहास असतोच. उदाहरणार्थ, इचलकरंजीकर ब्राह्मण-वंशाला घोरपडे हें मराठे जातीचें नांव पडणें. मद्रासप्रांतासारख्या कांहीं प्रांतांतून कुलवाचक जुनीं आडनांवें नसतात, पण आडनांवांचें महत्त्व तर पटतें, तेव्हां आडनांवाप्रमाणेंच राहण्याच्या ठिकाणच्या कांहीं विशिष्ट आळींचीं, गांवांचीं किंवा दुसरीं नांवें, वैयक्तिक नांवाच्या पुढें किंवा मागें जोडून देऊन आडनांवांचें कार्य भागवतात. कांहीं कृतीमुळें आडनांवें बदललीं अशा उदाहरणांत रास्ते, ढमढेरे हीं नांवें येतील.

सामान्यतः महाराष्ट्रांतील आडनांवांची उत्पत्ति पुढील कारणमालिकेंत बसेल :—(१) गांवांवरून–कडेगांवकर, हातकणंगलेकर. (२) प्राण्यांवरून–राजहंस, ढोल, ढेंकणे, इ. (३) प्राचीन ऋषींवरून–व्यास, जमदग्नि, इ. (४) नात्यांवरून–नवरे, नातू, पोरे, इ. (५) धंद्यावरून अगर हुद्यांवरून–जोशी, पाटील, वैद्य, इ. (६) रंगांवरून–करडे, काळे, गोरे, इ. (७) पदार्थांवरून–पर्वते, मुसळे, तेले, इ. (८) वृक्षादिकांवरून–मुळे, पळशे, मोगरे, इ. (९) गुणांवरून–पंडित, कोटिभास्कर, सहस्रबुद्धे, इ. (१०) निंदाव्यंजक–आगलावे, चोटचाटे, पादरे, इ.

आपल्याकडे ज्याप्रमाणें पूर्वीं आडनांवें नव्हतीं त्याप्रमाणेंच हिब्रू, मिसरी, असुरी, बाबिलोनी, इराणी किंवा ग्रीक लोकांतहि नव्हतीं. रोमन लोकांत देखील पुढील काळांत तीं आलीं. प्रत्येक रोमन माणसाला तीन नांवें असत : (१) स्वतःचें नांव, (२) गोत्राचें किंवा कुळाचें नांव, व (३) कुटुंबाचें नांव. इंग्लंडमध्यें नॉर्मन लोकांनीं आडनांवें रूढ केलीं, पण तीं वरच्या वर्गांतील लोकांतच राहिलीं; पण स्कॉटलंडमध्यें मात्र १२ व्या शतकाच्या सुमारास सरसकट सर्व लोकांना आडनांवें मिळालीं होतीं. अद्यापिहि वेल्समधील कांहीं जंगली भागांतून आडनांवें दिसत नाहींत.

**आडाम स्मिथ** (१७२३–१७९०)—हा ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञ प्रथम ग्लासगो युनिव्हर्सिटींत तर्कशास्त्र (लॉजिक) विषयाचा प्राध्यापक व नंतर आचारशास्त्र (मॉरल फिलॉसफी) विषयाचा प्राध्यापक नेमला गेला. त्याचा पहिला ग्रंथ 'दि थिअरी ऑफ मॉरल सेंटिमेंट्स' (नैतिक भावना सिद्धांत) १७५९ सालीं प्रसिद्ध झाला; नंतर या ग्रंथाला एक पुरवणी 'ॲन् एसे ऑन दि ऑरिजिन ऑफ लँग्वेजेस' (भाषा-उत्पत्तीवर निबंध) ही जोडली. त्याचा सर्वोत्कृष्ट ग्रंथ 'दि एन्क्वायरी इन्टु दि नेचर ॲंड कॉजिस ऑफ दि वेल्थ ऑफ नेशन्स' (राष्ट्रीय संपत्तीचा प्रकार आणि कारणें यांची मीमांसा) हा १७७६ मध्यें प्रसिद्ध झाला. आधुनिक अर्थशास्त्राच्या प्रस्तावनावजा हा ग्रंथ आहे असें मानण्यास हरकत नाहीं.

**आडालिया**— आशिया मायनरचें दक्षिण किनाऱ्यावरील लांकूड आणि धान्य यांच्या निर्यातीचें मुख्य बंदर. हें बंदर

वर्षांतील आठ महिने बोटींना चांगलें असून फक्त हिंवाळ्यांत त्रासदायक असतें. लो. सं. २८,०००.

**आंडोरा**—फ्रान्स, पीरिनीज पर्वतांमध्यें असलेलें एक अगदीं डोंगराळ पण स्वतंत्र संस्थान. क्षे. फ. १९१ चौ. मै. व लो. सं. ५२३१. चोवीस सभासदांचें एक विधिमंडळ आहे. स्पेन आणि फ्रान्स या दोन देशांतून येथील मुख्य दोन न्यायाधीश निवडले जातात. आणि तेथील लोकांनीं केलेल्या कायद्यांची अमलबजावणी हे दोन न्यायाधीश करतात. या संस्थानांतील उद्योगधंदे म्हणजे गुरें-ढोरें व मेंढ्या पाळणें म्हणजे थोडक्यांत पशुपालन व पशु संवर्धन हे होत. आंडोरा हीच या प्रांताची राजधानी होय.

**आंतडें**—जठराच्या उजव्या हाताच्या तोंडापासून गुदद्वारापर्यंत जो अन्नमार्ग असतो त्यास अंत्र असें म्हणतात. याची लांबी सुमारें ३० फूट असते. मनुष्यामध्यें याचे लघु अंत्र व बृहदंत्र किंवा स्थूलांत्र असे दोन भाग असतात. लघ्वंत्रास तीन आवरणें असतात. त्यांत बाहेरचें लसिकामय, मधलें स्नायुमय आणि आंतील श्लेश्मल असतें. बृहदंत्राच्या शेवटीं मलद्वार असतें. सर्व आंतड्यांत स्नायुतंतू असतात; त्यांच्या आंकुचनानें हालचाल होत राहून अन्नपचनास मदत होते.

**आतपमूर्च्छा**—( इं. सन् स्ट्रोक ). अतिशय कडक ऊन पडलें असतां त्याचा डोक्यावर परिणाम होऊन हा विकार होतो. याचीं मुख्य लक्षणें म्हणजे डोक्यामध्यें वेदना होणें; ताप येणें; आळस वाटणें; निद्रानाश होणें व मेंदू व इतर मज्जातंतूकेंद्रें दाटल्यासारखीं वाटणें; किंवा मेंदूची आग होणें वगैरे होत. यापासून कधीं कधीं मृत्यु येण्याचा संभव असतो. कधीं कधीं अशा तऱ्हेनें कडक ऊन लागल्यानंतर केवळ मनुष्याची शक्ति कमी होणें व मानसिक उत्साह कमी होणें एवढ्याच लक्षणांनीं हा रोग कांहीं कालानें जाणवतो.

**आंतरराष्ट्र-स्नेह**— आंतरराष्ट्रीय राजकारणांत 'आंतान्त कार्दिआल' या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, दोन स्वतंत्र देशांमध्यें व त्यांतील मुत्सद्यांमध्यें असलेले स्नेहसंबंध. हा प्रत्यक्ष मैत्रीचा तह नसतो. परंतु सदर दोन देशांमध्यें स्नेहभाव आणि समान हितसंबंध आहेत असें दर्शविलें जातें. हा शब्दप्रयोग इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें सातव्या एडवर्डच्या कारकीर्दीपासून पहिलें महायुद्ध सुरू होईपर्यंत जे मैत्रीचे संबंध होते त्यांना विशेषतः लावण्यांत आला.

**आंतरराष्ट्रीय कायदा**—याची व्याख्या अशी आहे कीं, सुधारलेल्या स्वतंत्र राष्ट्रांच्या साधारण सभेनें राष्ट्रांच्या आपसांतील संबंधांविषयीं जे नियम तयार केले, व जे नियम आपणांवर बंधनकारक आहेत असें हीं राष्ट्रें मानतात, त्यांना आंतरराष्ट्रीय कायदा असें म्हणतात. या कायद्यांत ज्या बाबी येतात त्या—(१) राष्ट्रांराष्ट्रांमधील तहांचें स्वरूप व क्षेत्र व त्यांचा अमल निश्चित करणें, (२) प्रत्येक राष्ट्राचे आणि त्याच्या ताब्यांतील संरक्षित प्रदेशांचे हक्क ठरविणें, (३) समुद्रावर आणि आकाशांत प्रत्येक राष्ट्राचे हक्क कोणते तें ठरविणें, (४) युद्ध चालू असतां युद्धयमान राष्ट्रांनीं एकमेकांशीं लढतांना करण्यांत येणाऱ्या अत्याचारासंबंधीं निर्बंधात्मक नियम करणें, (५) युद्ध चालू असतां युद्धयमान राष्ट्रें, आणि तटस्थ राष्ट्रें यांचे परस्परांमधील हक्क निश्चित करणें, (६) परराष्ट्रांतील वकीलांशीं आपलें कामकाज कसें चालवावें यासंबंधीं नियम करणें. याप्रमाणें आंतरराष्ट्रीय कायद्याचें स्वरूप व्यापक आहे. ज्या काळांत राज्यांना राष्ट्रांचें स्वरूप आलें नव्हतें, त्या काळांत आंतरराष्ट्रीय कायदा निर्माण होणें अशक्य होतें. मध्ययुगीन कालांत ( इ. स. ५०० ते १५०० ) ज्यांना आपण हल्लीं राष्ट्रें म्हणतों तसें स्वरूप त्या वेळच्या राज्यांना नव्हतें. १६ व्या शतकांत युरोपीय देशांत प्राचीन ग्रीक व लॅटिन विद्यांचें पुनरुज्जीवन ( Renaissance ) झाल्यावर अलीकडील राष्ट्रें उदयास येऊं लागलीं, आणि त्यांनीं एकमेकांशीं जरूरीचे व्यवहार कोणत्या पद्धतीनें चालवावे याबद्दल विचार सुरू झाला, त्या काळांत ह्यूगो ग्रोटियस ( १५८३–१६४५ ) या विद्वानाला आंतरराष्ट्रीय कायद्याचा जनक अशी पदवी मिळाली. त्यानंतर या कायद्याच्या इतिहासाचे तीन काल–विभाग पडतात :—पहिल्या विभागाला स्पर्धेचें युग ( पीरियड ऑफ कॉंपिटिशन ) असें म्हणतां येईल. हा काळ म्हणजे १६ वें, १७ वें व १८ वें शतक हा होय. या कालविभागांत निरनिराळया राज्यांतील परस्पर संबंध बलसमतेच्या ( बॅलन्स ऑफ पॉवर ) तत्त्वानुसार जोडण्यांत येत असत. या काळांत राष्ट्रांराष्ट्रांमध्यें अनेक प्रकारचे तह झाले; आणि तशा प्रकारच्या तहांना विरोध करण्यांत आला नाहीं. या तीन शतकांत समुद्रावर अनेक लढाया झाल्या. त्यांमुळें वादविवादाचे अनेक प्रश्न उद्भवले आणि त्यासंबंधीं आंतरराष्ट्रीय कायद्याला अनुसरून न्याय देणाऱ्या 'प्राईझ कोर्ट' नांवाच्या न्याय–कोर्टांत लॉर्ड स्टोवेल वगैरे राष्ट्रीय वृत्तीच्या न्यायाधिशांनीं न्याय देण्याचें काम केलें.

दुसरा काल–विभाग नेपोलियन बोनापार्टचा पाडाव झाल्यावर सुरू झाला. या कालविभागाला सहकारितेचें युग ( को-ऑपरेटिव्ह पीरियड ) हें नांव देतां येईल. या विभागाचें मुख्य लक्षण असें कीं, अनेक राष्ट्रांच्या प्रतिनिधींच्या कॉंग्रेससभा आपल्या बैठकी भरवूं लागल्या, आणि प्रत्येक देशांत अन्तर्गत व्यवस्थेसंबंधीं कायदे करतात त्या पद्धतीनें आंतरराष्ट्रीय कायद्याची वाढ होऊं लागली. व्हिएन्नाची कॉंग्रेस ( १८१५ ),

पॅरिसची कॅाँग्रेस ( १८९६ ), बर्लिनची कॅाँग्रेस ( १८७८ ), हेग तह-परिषद् ( १८९९ व १९०७ ) व लंडनची परिषद् ( १९०९ ) या अनेक कॅाँग्रेस सभा भरल्या, व त्यांनीं 'आंतरराष्ट्रीय कायदे' इतक्या अगदीं निरनिराळया स्वरूपाचे केले कीं, त्यामुळें सामान्य अभ्यासू इसम गोंधळून जातो. लीग ऑफ नेशन्स अथवा राष्ट्रसंघ आणि यूनो अथवा संयुक्त राष्ट्रपरिषद् या अशा तऱ्हेचे आंतरराष्ट्रीय कायदे करणाऱ्या व ते पाळावयास लावणाऱ्या संस्थाच होत.

**आंतरराष्ट्रीय मजूर कायदे**— प्रत्येक राष्ट्रांतील मजूर वर्गाची स्थिति सुधारली पाहिजे हा प्रश्न आंतरराष्ट्रीय बनला. आणि ट्रेड युनियन्स या संस्था आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या बनल्यामुळें या प्रश्नाला विशेष महत्त्व प्राप्त झालें. या बाबतींत अगदीं प्रथम प्रयत्न स्विस फेडरल गव्हर्नमेंटनें १८८१ सालीं केला. १८९० सालीं पहिली इंटरनॅशनल कॉन्फरन्स भरली. १९०० सालीं पॅरिस कॅाँग्रेसनें मजूरविषयक कायदे करण्याकरितां इंटर नॅशनल अॅसोसिएशन या नांवाची संस्था स्थापिली, व त्यांनीं प्रथम उद्योगधंद्यांत रात्रीं स्त्रियांना कामावर घेत असत या प्रश्नाकडे आणि धोक्याचे उद्योगधंदे-विशेषतः शिसें आणि पांढरा फॉस्फरस वापरणारे उद्योगधंदे यांकडे अगोदर लक्ष पुरविलें व माहिती मिळविली. १९०५ सालीं बर्न येथें भरलेल्या इंटरनॅशनल कॉन्फरन्समध्यें बर्न कन्व्हेंशन्स या नांवाचे नियम करण्यांत आले. व त्या नियमांत रात्रीं स्त्रियांना कामावर लावण्यास बंदी करावी, आणि आगपेट्याच्या कारखान्यांत पांढरा फॉस्फरस वापरूं नये हे नियम होते. हे नियम पुष्कळ देशांनीं तावडतोब मान्य केले, आणि हल्लीं सर्व सुधारलेल्या राष्ट्रांनीं अमलांत आणले आहेत.

व्हर्सायच्या तहानें इंटरनॅशनल लेबर ऑर्गनायझेशन ही संस्था राष्ट्रसंघाचा एक भाग बनविण्यांत आली. या संस्थेचा उद्देश: ( १ ) मजुरांच्या कामाचे तास ठरविणें, ( २ ) बेकारीला आळा घालणें, ( ३ ) प्रत्येक मजुराला किमान म्हणजे जीवितवेतन मिळवून देणें, ( ४ ) आजारीपणांत आणि अपघात झाल्यास संरक्षण देणें, ( ५ ) स्त्रिया व मुलें यांना विशेष संरक्षण देणें, आणि ( ६ ) सर्वसाधारण मजूरवर्गाला संरक्षण देणारे आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे नियम सुचविणें, हा होता. या संस्थेची घटना, जनरल कॉन्फरन्स, गव्हर्निंग बॉडी आणि इंटरनॅशनल लेबर ऑफिस अशी आहे. जनरल कॉन्फरन्सच्या सभा वेळोवेळीं भरतात. आणि त्यांनीं सुचविलेले नियम प्रत्येक देशांतील सरकारनें अमलांत आणावे असा प्रयत्न राष्ट्रसंघ ही संस्था करते.

हिंदुस्थान— हिंदुस्थान राष्ट्रसंघाचा सभासद असल्यामुळें १९१९ सालच्या वॅाशिंग्टन येथें भरलेल्या आन्तरराष्ट्रीय मजूरपरिषदेला हिंदुस्थान सरकारचे सर लुई केरशॉ व सर अतुल चतर्जी, हिंदी कारखानदार-मालकांतर्फे सर अलेक्झांडर मरे आणि मजूरवर्गातर्फे श्री. ना. म. जोशी हे प्रतिनिधी हजर होते. परिषदेचा ८ तासांचा दिवस या नियमाला हिंदुस्थानतर्फे हरकत घेण्यांत आल्यामुळें ६० तासांचा आठवडा हा नियम हिंदुस्थानपुरता मान्य करण्यांत आला. पुढें वेळोवेळीं भरलेल्या या आन्तरराष्ट्रीय मजूर-परिषदांना हिंदुस्थानचे प्रतिनिधी हजर असत; त्यामुळें हिंदी मजुरांच्या चळवळीस जोर येऊन ब्रिटिश सरकार व प्रांतिक सरकारें यांना मजूरविषयक कायदे करावे लागले.

**आतार**— सुगंधी द्रव्यें विकणारांची एक जात. ही बहुधा मुंबई इलाख्यांतच असून बहुसंख्य आतारी सुन्नी मुसलमान आहेत. यांच्यांत बऱ्याचशा हिंदु चालीरीती आढळतात. वारसाचा हिंदु कायदाच मानतात.

**आतीव्र**— (यिटर्बिअम किंवा निओ यिटर्बिअम). आतीव्र किंवा यितर्ब हें रासायनिक धातु मूलद्रव्य असून दुर्मिळ मृत्तिकाधातुवर्गातील आहे. याचा शोध १८७८ सालीं मेरिग्नाक यानें लावला. हें मूलद्रव्य प्रथम स्कंदयुक्त असें यानें काढलें होतें. आतीव्राचा प्राणिद हा पांढरा असून त्याचे वर्णहीन स्फटिक होतात. हरिद वर्णहीन व आर्द्रताशोषक असतो. निर्जल हरिद उष्ण केल्यावर त्याचा ऊर्ध्वपात होतो. १९०७ सालीं अर्बन यानें आतीव्रांतून दोन नवीं मूलद्रव्यें निरनिराळीं केलीं. त्यांचीं नांवें नव आतीव्र उर्फ निओ-यिटर्बिअम व ल्युटेसिअम अशीं आहेत. १९०८ सालीं एव्हॉन वेल्स बॉश यानें आपलें हेंच मत प्रसिद्ध केलें. परंतु त्यानें या मूलद्रव्यास ऑल्डेबरोनियम आणि कॅसिओपियम अशीं नांवें दिलीं.

**आत्मचरित्र**— हा एक वाङ्मयप्रकार आहे. निव्वळ आत्मचरित्र म्हणून लिहिण्याची प्राचीन काळीं वहिवाट दिसत नाहीं. पाश्चात्य वाङ्मयांत सिसेरो आणि प्लिनी यांच्या पत्रांतून आत्मचरित्रपर उल्लेख सांपडतात. पुढें गिबन, ह्यूम, वाल्टर स्कॉट वगैरे कांहीं साहित्यिकांचीं छोटीं आत्मचरित्रें उपलब्ध आहेत. ली हंट, ह्यूज मिलर, जॉन स्टुअर्ट मिल, कार्लाइल, रस्किन यांचीं आत्मचरित्रें चांगलींच प्रसिद्ध आहेत. मोठ्या कर्त्या वीर पुरुषांत मुसोलिनी, हिटलर सारख्यांचीं आत्मचरित्रें मोठीं उद्बोधक वाटतील.

नाना फडणविसाचें आत्मचरित्र सुंदर पण अपुरें आहे. अलीकडे म. गांधी, प्रो. के. कर्वे, ना. गो. चापेकर, वि. रा. शिंदे, न. चिं. केळकर, औंधचे राजे बाळासाहेब पंत, जवाहरलाल नेहरू इ. चीं आत्मचरित्रें प्रसिद्ध झालीं असून त्यांतून सामाजिक, धार्मिक व राजकीय इतिहास पाहावयास मिळतो.

**आत्मवाद**—याला व्यक्तिसुखवाद, अहंता, अहंकार अशीं नांवें आहेत. इंग्रजी ' इगोइझम् ' हा तत्त्वज्ञानांतील एक सिद्धान्त आहे. तो सिद्धान्त हा कीं, मनुष्याचा वैयक्तिक आत्मा (इगो) याचें अस्तित्व मनुष्याला तर्कशास्त्रानुसार प्रतिपादन करतां येणें शक्य आहे, आणि सर्व ज्ञानाचे मूलघटक आणि ज्ञात वस्तूंचें सत्यत्व या गोष्टी ज्ञात्याच्या अस्तित्वावर अवलंबून असतात. व्यक्तिसुखवाद किंवा आत्मैकवृत्तिवाद (इगोटिझम्) हीं आत्मवादाहून भिन्न अशी कल्पना असून याचा अर्थ, स्वतःविषयींच अतिशय विचार व स्वतःचा अतिशय उल्लेख करण्याची प्रवृत्ति. परहितवाद (अल्ट्रुइझम्) या नैतिक उपपत्तीच्या विरुद्ध अशी ही नीतिशास्त्रांतील एक उपपत्ति आहे.

**आत्महत्या**— आत्महत्या म्हणजे हेतुपूर्वक स्वतःचा प्राण स्वतः घेणें. आत्महत्या करण्यास व्यक्ति कां प्रवृत्त होतात या कारणांची मीमांसा करण्याकडे नीतिशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ यांनीं नेहमीं लक्ष दिल्याचें आढळतें. पाश्चात्य देशांत आत्महत्येची जबाबदारी राजकीय परिस्थितींतील दोषांवर टाकण्याची प्रवृत्ति झाली आहे. प्राच्य देशांत कांहीं विशिष्ट परिस्थितींत आत्महत्या करणें हें नैतिक व धार्मिक कर्तव्य समजतात. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतील सतीची चाल. सती जाणें हा केवळ एक आत्महत्येचा प्रकार असूनहि तें एक मोठें उच्च धार्मिक कृत्य आहे असें हिंदू लोक मानतात. उलटपक्षीं ख्रिस्ती दृष्टीनें आत्महत्या करणें हें पाप गणलें असून, सर्व ख्रिस्तधर्मी देशांत तो गुन्हा मानलेला आहे.

[ ] शिक्षितांपेक्षां अशिक्षितांत आत्महत्येचें मान कमी असतें; तसेंच आत्महत्या शहरांपेक्षां खेडेगांवांत कमी होतात. पांच वर्षांच्या वयाच्या आंत आत्महत्या मुळींच कोठें होत नाहींत. पांच ते दहा वर्षांच्या वयांत फार क्वचित् होते. दहा वर्षांच्या वयापासून मात्र हें प्रमाण सारखें वाढत जाऊन त्याची ५५ ते ६५ या वयाच्या दरम्यान कमाल मर्यादा होते. पृथ्वीच्या पाठीवरील कित्येक धर्म आत्महत्या करावी असें म्हणणारे आहेत, तर कित्येक त्यांचा पूर्णपणें निषेध करणारे आहेत.

हिंदुस्थान—आत्महत्येबद्दल ऋग्वेदांत मुळींच उल्लेख नाहीं. सतीसंबंधानेंहि त्या वेळीं प्रतिकूल मत होतें. इतर वेदांच्या संहितांत व ब्राह्मणग्रंथांतहि यासंबंधानें उल्लेख नाहींत. महाभारतकालांत प्रायोपवेशन करून प्राणत्याग करण्याचा विधि मात्र संमत होता असें दिसतें. अशा विधीनें प्राणत्याग केला असतां ती आत्महत्या होत नाहीं अशी समजूत त्या काळीं होती. रोगानें किंवा मोठ्या संकटानें ग्रस्त झालेल्या इसमानें ईशान्य दिशेस प्रवासाला जावें व फक्त पाणी व वायु भक्षण करून देह वाळवावा व मरून जावें, अशी मनूनें परवानगी दिली आहे. शिवाय जलसमाधि, अग्निकाष्ठभक्षण वगैरे जुन्या ऋषींच्या पद्धतीहि मनूनें ग्राह्य मानल्या आहेत. जीवात्मा परमात्म्यांत विलीन करणें हें जुनें पारमार्थिक स्वरूप बदलून उपास्य सगुण दैवतांशीं एकरूप होणें असा अर्थ धार्मिक आत्महत्येस अलीकडे प्राप्त झाला होता. बुद्धानें देहदंडाच्या सर्व प्रकारांचा व त्याबरोबरच आत्महत्येचा निषेध केलेला आहे. जैन धर्मांत आत्महत्येस संमति दिली आहे, इतकेंच नव्हे तर तसें करण्याबद्दल त्या धर्माचा उपदेश आहे. तथापि वाटेल त्यास आत्महत्या करण्याची परवानगी नसून फक्त परमावस्थेप्रत पोहोंचलेल्या संन्याशासच तसें करण्याची आज्ञा आहे. ११७२ मध्यें हेमचंद्र या विद्वान् मुत्सद्यानें कुमारपाल राजाच्या मृत्यूनंतर प्रायोपवेशनानें देह ठेविला. १९२२ मध्यें अहमदाबादेमध्यें एका संन्याशानें ४१ दिवस अन्नपाणी वर्ज्य करून प्राण सोडला.

चीन—चीनच्या इतिहासांत व वाङ्मयांत आलेल्या उताऱ्यांवरून पाहतां आत्महत्येचा प्रचार चीनमध्यें बराच होता असें दिसतें. युद्धांत पराजय पावल्यामुळें सेनापतींनीं, प्रजेच्या कोपामुळें ओढवणारा अनर्थ टाळण्याकरितां जुलमी राजांनीं, पदच्युत केलेल्या राजांनीं, लज्जास्पद विवाहबंधन टाळण्याकरितां स्त्रियांनीं, फांशीची शिक्षा सुनावण्याचा वारंवार प्रसंग आलेल्या न्यायाधिशांनीं वगैरे अनेक प्रकारच्या परिस्थितींतील इसमांनीं आत्महत्या केल्याचीं उदाहरणें चरित्रात्मक ग्रंथांत आहेत.

जपान—जपान देश आत्महत्येच्या संख्यातिशयाबद्दल सर्व जगांत प्रसिद्ध आहे. हाराकिरी (पोटकटारी) हा प्रकार वरिष्ठ दर्जाच्या, दरबारी व राजघराण्यांतील माणसांमध्यें प्रचलित असून जपानच्या फौजदारी कायद्यानें याला संमति दिलेली आहे. हाराकिरीचा प्रघात १२ व्या शतकापासून प्रचलित असून तो एक मोठा धार्मिक विधि आहे असें मानतात.

मुसलमानी देश—आत्महत्येचा निषेध करणारीं अशीं प्रत्यक्ष वाक्यें कुराणांत नाहींत. तथापि महंमद पैगंबराच्या उपदेशाचा एकंदर रोख आत्महत्येच्या विरुद्ध आहे यांत संशय नाहीं. आत्महत्या करणें हें पाप आहे अशी समजूत मुसलमानी समाजांत पुष्कळ शतकें चालत आलेली असून हल्लींहि ती कायम आहे. इतकेंच नव्हे तर आत्महत्या करणाऱ्याच्या देहाचे और्ध्वदेहिक विधीहि करूं नयेत असें महंमदानें सांगितल्याची दंतकथा आहे.

ख्रिस्ती धर्माच्या 'जुना करार' या पवित्र ग्रंथांत स्पष्ट निषेधपर असें एकहि वाक्य नाहीं. त्याचप्रमाणें 'नवा करार' नामक ख्रिस्ती धर्मग्रंथांतहि तशीं वाक्यें नाहींत. ख्रिस्ताच्या सुप्रसिद्ध दहा आज्ञांपैकीं सहाव्या आज्ञेचा अर्थ मात्र आत्महत्यानिषेधपर करतात. उत्तरकालीन ख्रिस्ती धर्मांत हें निषेधाचें तत्त्व हळूहळू पूर्णपणें प्रस्थापित झालेलें असून प्रॉटेस्टंट धर्मपंथांतहि आत्महत्येचा जोरानें निषेध केलेला आहे.

स्वतःचा स्वतः घात करून घेणें हें कृत्य कांहीं विशेष प्रकारच्या परिस्थितीमध्येंच समर्थनीय आहे; असें हल्लीं बहुतेकांचें मत आहे. अर्थात् ती विशिष्ट परिस्थिति अशाच असामान्य प्रकारची असली पाहिजे कीं, सदरहू आत्महत्येचें कृत्य भ्याडपणाचें किंवा अनीतिमूलक आहे असें म्हणण्यास यत्किंचितहि जागा असतां कामा नये.

**आत्मा**—शरीर व शरीराला चालना देणारी चिच्छक्ति किंवा आत्मा ह्याबद्दलचें विवेचन भौतिकशास्त्रें, नीतिशास्त्र, आणि धर्मशास्त्र यांमध्यें चालू असून अद्याप भारतीय तत्त्वज्ञान आणि पाश्चात्य तत्त्वज्ञान यांच्यामध्यें 'आत्मा' याच्या स्वरूपाबद्दल एकवाक्यता झालेली नाहीं. आत्मा हा शब्द कित्येकदां मन, अन्तःकरण या अर्थी वापरला जातो, तरी त्याचा मुख्य अर्थ शरीराचा मालक असा आहे. मन व बुद्धि हींसुद्धां इंद्रियें आहेत; मन चिंतन करतें, बुद्धि निश्चय व निर्णय करते. पण हीं कामें मन व बुद्धि कोणासाठीं करतात, अगर निरनिराळ्या वेळीं मन व बुद्धि यांचे जे पृथक् पृथक् व्यापार घडतात त्यांचें एकत्वानें ज्ञान होण्यास जें एकीकरण करावें लागतें, तें एकीकरण कोण करतो ? मनुष्याचा जडदेहच हें काम करतो, असें म्हणतां येत नाहीं. कारण शरीरांतून चेतना म्हणजे हालचालीचे व्यापार नष्ट झाले म्हणजे जडदेह शिल्लक असूनहि तो या गोष्टी करूं शकत नाहीं. म्हणून हस्तपादादि कर्मेंद्रियें, चक्षुरादि ज्ञानेंद्रियें, आणि मनबुद्ध्यादि अन्तरिंद्रियें यांच्यापलीकडचें जें तत्त्व शरीरांत असतें, तो 'आत्मा' असें भगवद्गीतेंत सांगितलें आहे—

इंद्रियाणि पराण्याहुः इंद्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु पराबुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥

(गीता अ. ३-४२)

जर्मन तत्त्वज्ञ कान्ट यानें बुद्धीच्या व्यापारांचें सूक्ष्म परीक्षण करून हेंच तत्त्व निष्पन्न होतें, असें दाखविलें आहे. 'मी आहें' अशी जी आत्म्याची प्रत्येकास होणारी साक्षात् प्रतीति तीच आत्म्याच्या अस्तित्वाचा उत्कृष्ट पुरावा होय. देहांतील मूलतत्त्व 'आत्मा' आणि बाह्य सृष्टींतील मूलतत्त्व 'ब्रह्म' (ब्रह्म पहा) हीं दोन्हीं एकरूपी म्हणजे एकच आहेत—जें पिंडीं तें ब्रह्मांडीं —असा भारतीय तत्त्वज्ञानाचा अखेरचा सिद्धान्त आहे. अलीकडील पाश्चात्य तत्त्ववेत्ता ग्रीन यानें आपल्या 'प्रोलेगोमेना टु एथिक्स' यांत अध्यात्माचें जें विवेचन केलें आहे त्यांत Spiritual Principal in Nature आणि Spiritual Principal in Man यांचें ऐक्य दाखविलें आहे.

प्राचीन इजिप्शियन लोकांनीं आत्म्याच्या अस्तित्वाबद्दलच्या स्पष्ट कल्पना विकसित केल्या, पण आत्म्याचें अस्तित्व शरीराच्या आश्रयानें राहूं शकतें असा निर्णय दिला आणि म्हणून मृतदेह जसेच्या तसे सुरक्षित ठेवण्याचे प्रयत्न केले. बायबलच्या 'जुना करार' (ओल्ड टेस्टामेंट), नामक पूर्वभागांत आत्मा शरीरापासून अगदीं पृथक् स्वतंत्र असूं शकतो, असतो, असें स्पष्ट विधान कोठेंहि नाहीं. प्राचीन ग्रीक लोकांत होमरनें, आत्मा व शरीर यांत भिन्नत्व आहे, आणि शरीर मृत झाल्यावर आत्मा निराळा होऊन छायारूपांत अस्तित्वांत असतो, असें म्हटलें आहे.

प्लेटोचें मत असें कीं, आत्मा जडद्रव्य नाहीं (Immaterial) व तो अमर आहे. आरिस्टॉटलनें, आत्मा हें शरीराचें वास्तवरूप (Entelechy) आहे, असें वर्णन केलें आहे. स्टोइकपंथी तत्त्ववेत्त्यांचें मत असें कीं, ज्या वस्तूंना खरें अस्तित्व आहे त्या सर्व जडद्रव्यरूप असतात, आणि आत्मा हा ईश्वराचें स्वरूप आहे, आणि आपल्या शरीरांत जो उष्ण श्वास असतो, तो आत्मा होय. ख्रिस्ती धर्मानें, शरीर व आत्मा हीं दोन निरनिराळीं तत्त्वें (Dualism) आहेत, असें मानलें आहे. आधुनिक तत्त्वज्ञानांत हाच द्वितत्त्ववादी सिद्धान्त डेकार्ट या तत्त्ववेत्त्यानें विशेष विस्तृत स्वरूपांत मांडला आहे. लीबनीझ या तत्त्ववेत्त्यानें, आत्मा हा मोनॅड म्हणजे ज्याला परिमाण नाहीं असें जडद्रव्य असून त्याला चलनवलनात्मक शक्ति आहे, असें वर्णन केलें आहे. ह्यूम या तत्त्ववेत्त्यानें आत्मा हें अविनाशी सत्तत्त्व आहे, हें अमान्य केलें आहे. आधुनिक मानसशास्त्रज्ञ असें म्हणतात कीं, आत्मा ही आपल्याला ज्ञात होणारी एक अन्तश्चलनशक्ति (इन्नर ॲक्टिव्हिटी) आहे.

**आत्मारामस्वामी** (समाधि शके १६२६)— एक मराठी संतकवि. हे रंगनाथस्वामींचे धाकटे बंधु. हे निजाम हैद्राबादेस नोकर होते. यांचें मूळ नांव विठ्ठल. यांनीं केलेल्या पदांच्या शेवटीं यांचे बंधु रंगनाथ यांचेंच नांव यांनीं घातल्यानें यांचीं पदें कोणतीं हें ओळखणें अशक्य झालें आहे. आत्माराम नांवाचे तीन संतकवी संतकविसूचींत दिले आहेत. ग्रंथ—नारदचरित्र, नारदाची लावणी, रामदासस्वामी—चरित्र, पदें, ३००.

**आत्मारामस्वामी शिंदखेडकर** (सुमारें शके १६००)— पूर्वाश्रमीं चाळीस गांवचा रहिवासी; वृद्धावस्थेंत श्रीनिर्मलानंद परमहंसस्वामींपासून यानें संन्यासदीक्षा घेऊन आपल्या मठाची स्थापना सिद्धपूर-हल्लीं शिरपूर (वाशीम तालुका)- येथें केली.

यानें आपल्या अलौकिक सामर्थ्यानें आनंद-संप्रदाय प्रसिद्ध करून जनतेंत धार्मिक वृत्ति चरीच निर्माण केली आणि आपल्या योगबळानें व भक्तिबळानें हिंदुमुसलमानांत ऐक्यभाव उत्पन्न केला आणि जातिभेद नष्ट करून श्रीप्रल्हादरावांच्या चरणाची भक्तजनांना गोडी लावली. यानेंच आपल्या शिष्याकडून

औरंगजेब बादशहाला अला व आलम एकरूप आहेत हें दाखविलें. हजारों हिंदू यवनधर्माच्या दीक्षेपासून वांचविले असें सांगतात.

यानें श्रीमाहूर येथें घोर तपश्चर्या केली. त्या उग्र तपश्चर्येनें श्रीदत्तप्रभु प्रसन्न झाले व त्याच्यावर अनुग्रह केला, अशी कथा आहे. यानें अनेक लोकोत्तर चमत्कार केले व लोकांना भक्तिमार्गास व योगमार्गास लाविलें. याचे बरेच ग्रंथ आहेत.

**आंत्रपुच्छदाह**—( अपेंडिसायटिस ). मनुष्याच्या पोटांतील मोठ्या आंतड्याच्या शेवटाशीं असलेल्या एका दोन ते चार इंच लांबीच्या वांकड्या पिशवीसारख्या अरुंद व पोकळ अवयवास आंत्रपुच्छ असें म्हणतात. या भागांत एखादा पचण्यास कठिण व टणक असा अन्नाचा अंश अर्धवट पचलेल्या स्थितींत अडकून राहिल्यास हा रोग होतो. या रोगाचीं पूर्वचिन्हें पुढें दिल्याप्रमाणें असतात :—पोटांत खालच्या बाजूस उजव्या कुशींत दुखणें, ताप येणें, मळमळ सुटणें, ओकारी येणें, बद्धकोष्ठ होणें. हीं लक्षणें रोगाच्या वाढीप्रमाणें कमीजास्त प्रमाणावर होतात. याचे तीन प्रकार असतात : ( १ ) मृदुप्रकार—यामध्यें वर सांगितलेलीं लक्षणें होऊन कांहीं दिवसांनीं पुन्हां बंद पडतात व रोगी पूर्वीसारखाच निरोगी दिसूं लागतो. ( २ ) तीव्र प्रकार—यामध्यें जर रोगावर उपचार केला नाहीं तर आंत्रपुच्छ फुटून सर्व उदरामध्यें रोगाचा प्रसार होऊन आंत्रावरणदाह उत्पन्न होऊन मनुष्य मृत्यु पावतो. ( ३ ) या प्रकारांत आंत्रपुच्छास आलेली सूज वाढून कोठें तरी एक गळूं तयार होतें. वरील शेवटच्या दोन प्रकारांत शस्त्रक्रिया करणें हाच उपाय आहे. पहिल्या प्रकारामध्यें ताबडतोब शस्त्रक्रिया करण्यांत यावी किंवा रोगाचा पहिला झटका येऊन गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं केली तरी चालते.

**आंत्रवेष्टनदाह**—( पेरिटोनिटिस ). हृदयांतील आंतड्यावरील जें आवरण ( पेरिटोनियम् ) असतें त्याचा दाह झाल्यास त्या विकारास ही संज्ञा देतात. याचें स्वरूप तीव्र किंवा जीर्ण असतें. जीर्ण स्वरूपामध्यें हा विकार साधा किंवा क्षयजन्य असतो. याचें सर्वसामान्य कारण आंत्रपुच्छदाह हें असतें. या रोगाचीं लक्षणें म्हणजे पोटांत तीव्र वेदना होतात व पोट दाबलें असतां त्या अधिक होतात आणि ताप चढतो. हा रोग सामान्यतः असाध्य असून शस्त्रक्रियेनेंच बरा होण्याचा संभव असतो.

**आंत्रशोथ**—(एन्टरिटिस). या रोगांत आतड्यांचा दाह होतो. याचा उद्भव प्रथम केवळ आंतड्यांमध्यें सर्दी होण्यापासून होतो, व कांहीं दिवस उपचार केले असतां तो बरा होतो. परंतु कित्येकदां यापासून वांति व रेच होऊं लागून अतिशय ग्लानि येते. अशा तऱ्हेचा तीव्र विकार मुलांमध्यें विशेषतः उन्हाळ्यांत दृष्टीस पडतो व त्यापासून मृत्युहि येण्याचा संभव असतो. आंतड्यांस इजा होण्याच्या कारणाचा नाश केला असतां व पूर्ण विश्रांति दिली असतां हा रोग बरा होण्याचा बराच संभव असतो.

**आत्रेय**—आत्रेय किंवा यित्र ( यिट्रिअम ) हें रासायनिक धातुमूलद्रव्य आहे. यानें आणि श्रीक ( सिरियम ), निभृत ( लाथाल्म ), द्वंद्वक ( डायाडिमियम ) आणि अर्ब ( अर्बिअम ) या मूलतत्त्वांशीं पुष्कळ साधर्म्य असून सृष्टींत याच्या साहचर्यांत हें आढळतें. आत्रेय क्षार तयार करण्यास उत्तम मूलद्रव्य म्हटलें म्हणजे 'गादोलिनायित' हें खनिज होय.

सर्व दुर्मिळ मृत्तिकाधातूंप्रमाणें याचें निष्कासन करणें फार कठिण आहे. कृष्णवर्ण, करड्या रंगाचा रजोरूप आत्रेय धातु असतो तो हरिदाचें पालाशधातूनें सोज्जीकरण केलें असतां निघतो किंवा आत्रेय व सिंधु यांच्या द्वित्त हरिदाचें विद्युत् पृथक्करण करावें. आत्रेय धातु थंड पाण्याचें सावकाश पृथक्करण करतो, पण उष्ण पाण्याचें मात्र तात्काळ करतो. आत्रेय प्राणिद पिंवळसर पांढऱ्या रंगाच्या चूर्णरूपांत असतो. अत्युष्णमानावर याच्यापासून पांढरा शुभ्र अति तेजस्वी प्रकाश निघतो. आत्रेय सावकाश पण पूर्णपणें खनिजाम्लांत विद्राव्य असतो. विद्युत्स्फुलिंगाच्या योगानें याच्या विच्छिन्न किरणांवरून हा ओळखतां येतो.

**आदमखान** ( मृ. १५६२ )—एक मोंगल सरदार. हा हुमायूनचा रखीपुत्र असावा असें म्हणतात. अकबराची दाई माहुम ही हुशार व खटपटी होती. आपला मुलगा आदमखान यास योग्यतेस चढविण्यासाठीं तिनें नाहीं नाहीं त्या खटपटी केल्या. बाझबहादुर ( प्रख्यात हिंदी कवियित्री राणी रूपमती हिचा पति ) म्हणून एक पठाण सरदार माळवा प्रांतांतील कांहीं भाग बळकावून तेथील बादशहा बनला होता. त्याजवर अकबरानें ह्या आदमखानास पाठविलें. आदमखानानें बाझबहादुराचा पराजय करून त्याचा सर्व मुलूख काबीज केला. बाझबहादुर बऱ्हाणपुराकडे पळून गेला. पुढें आदमखानानें बहादुरच्या राज्यांत अधमपणाचें वर्तन चालविलें. सर्व लूट त्यानें स्वतःकडे ठेविली आणि बाझबहादुराचा जनानखानाहि आपल्याजवळ अडकवून ठेवला. त्यांत बहादुराची एक सुंदर स्त्री होती. ( ही रूपमतीच असावी ). तिचा अभिलाप धरून खानानें तिच्या भेटीची वेळ ठरविली. तिला नाहीं म्हणतां येईना. ती सुंदर पोशाख करून आदमखान येण्याच्या वेळेस पलंगावर निजून राहिली. खान येऊन पाहतो तों ती मेलेली. खानाकडून अप्रतिष्ठा होऊं नये म्हणून त्या पतिव्रतेनें विष खाऊन आत्महत्या केली होती. खानानें हें अधिकाराबाहेर जें काम केलें तें अकबरास खपलें नाहीं. त्यानें खानास कामावरून कमी केलें व

त्याच्यापासून सर्व लूट परत घेतली. आणि त्याच्या जागीं आपला गुरु पीर महंमदखान यास नेमिलें. पुढें आदमखानानें अकबराच्या वजिराला मारविलें तेव्हां बादशहा रागावला व खानास गच्चीवरून खालीं लोटून देण्याचा हुकूम केला. याप्रमाणें त्याचा अंत झाला.

**आदाम**—ॲडॅम. ख्रिस्ती धर्माप्रमाणें जगांतील आदिपुरुषाचें हें नांव आहे. या धर्माप्रमाणें देवास अखिल विश्व निर्माण करण्यास एकंदर सहा दिवस लागले. सर्व जातींचे प्राणी निर्माण करून त्यांवर सत्ता चालविण्यासाठीं एक पुरुष ( ॲडॅम ) व स्त्री ( ईव्ह ) यांचें जोडपें उत्पन्न केलें. या पुरुषाच्या करमणुकीसाठीं एक सुंदर बाग निर्माण केली. तिचें नांव एडन. या बागेंत एक लोभनीय वृक्ष होता त्याचें नांव ज्ञानवृक्ष. "या वृक्षाचें फळ खाऊं नका", असा उपदेश देवानें या दांपत्याला केला. पण एके दिवशीं त्या झाडावर एक सर्प ( सर्परूपधारी देवाचा वैरी सेटन ) आला व त्यानें ईव्हला त्या फळासंबंधीं मोह उत्पन्न करून तिच्याकरवीं ॲडॅममध्येंहि त्यासंबंधीं आतुरता वाढविली. त्यांनीं तें फळ खाल्लें. त्यावद्दल परमेश्वरानें त्या दोघांना शाप देऊन बागेंतून घालवून दिलें. तेव्हांपासून मनुष्यप्राणी मर्त्य व पतित झाला आहे, असें ख्रिस्ती मानतात.

**आदामचा पूल**—(रामाचा सेतू). सिलोन आणि कन्याकुमारी यांमध्यें असलेलीं बेटें, वाळूचे बंधारे आणि मधूनच समुद्रांतून वर आलेले खडक या सर्वांची मालिका. सीता रावणानें लंकेंत पळवून नेल्यानंतर लंकेस जावयास हा रस्ता रामानें बांधला असा समज आहे. मुसलमान लोक असें समजतात कीं, आदामला परमेश्वरानें स्वर्गांतून ढकलून दिल्यानंतर तो या रस्त्यानें चालत सिलोनला गेला.

**आदामचें शिखर**— सिलोनमधील एक अत्युच्च पर्वत. हा कोलंबोच्या आग्नेयीस ४५ मैलांवर असून त्याची उंची ७४२० फूट आहे. या सुळक्यावर खडकांत ५ फूट लांब असें पाऊल उमटलें आहे. ते हिंदू लोक शिवाचें, बौद्ध बुद्धाचें व मुसलमान लोक आदामचें समजून त्याची पूजा करतात. याच्या दर्शनासाठीं पुष्कळ लोक येतात.

**आदिग्रंथ**—हा शिखांचा अत्यंत पवित्र असा धर्मग्रंथ आहे. मोठ्या भक्तीनें ते त्यास ग्रंथसाहेब, व त्याचें अध्ययन करणाऱ्यास ग्रंथी असें म्हणतात. या ग्रंथाची भाषा हिंदी असून लिपि गुरुमुखी आहे. याचे दोन भाग पडतात. पहिल्यांत अर्जुनानें ( शिखांचा पांचवा गुरु ) आपल्या पूर्वीच्या चार गुरूंचीं बोधवचनें एकत्र मांडणी करून दिलीं आहेत तीं वाचावयास मिळतात व दुसऱ्यांत प्रामुख्यानें गुरु गोविंदसिंगाचे विचारमणि पाहावयास मिळतात. शिखांत, दुसऱ्या भागापेक्षां पहिल्यालाच महत्त्व देणाऱ्यांची संख्या जास्त आहे. या ग्रंथात कित्येक विषयहि गोंवले गेले आहेत. तथापि यांत अनेक भक्तिरसानें ओथंबलेलीं वचनें आढळून येतील.

**आदिजीव वर्ग**—( आमीबा ). हे अत्यंत सूक्ष्म असे केवळ सूक्ष्मदर्शक यंत्रानें दृष्टीस पडणारे व ज्यांस मुळींच दृश्य अवयव नसतात असे एकपेशीमय प्राणी आहेत. यांची एक जात संथ पाण्यांत आढळते. हे प्राणी केवळ जीवनरसमय असून आपलें शरीर इकडे तिकडे हालवून आपलें भक्ष्य मिळवितात. यांचें पुनरुत्पादन

जीवनरसाचा एक कण अथवा पेशी विभक्त होऊन स्वतंत्रपणें वाढूं लागल्यानें होतें. यांचा आकार ठराविक नसतो. चलनवलनाप्रमाणें तो बदलतो. शरीराच्या साधारण मध्यावर एक लहान काळसर ठिपका असतो तो सूक्ष्मजीव ( न्यूक्लिअस ) होय. बाकी सर्व शरीर कणमय द्रवाचें बनलेलें असतें. शेवाळाचे सूक्ष्म कण खाऊन हे जगतात.

**आदिपुराण**—जैनांचा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे महापुराण हा होय. त्याचाच आदिपुराण हा पूर्वार्ध होय. जैन साहित्यांत या ग्रंथास अमरपद मिळालें आहे. आदिपुराणांत एकंदर ४८ पर्वें असून त्यांपैकीं ४२ पर्वें व ४३ व्यांतील ३ श्लोक जिनसेन या महात्म्यानें रचले व पुढील ( पूर्वार्ध व उत्तरार्ध यांतील ) सर्व लिखाण जिनसेनचा शिष्य गुणभद्राचार्य याचें आहे. या ग्रंथावरून जैन धर्माचीं महत्त्वाचीं तत्त्वें उत्तम तऱ्हेनें समजतात. मनोवेधक कथासूत्र, ओघवती व प्रासादिक अशी भाषासरणी, उत्कृष्ट दृष्टान्त, इतस्ततः विखुरणारी शृंगारिक वर्णनें, इत्यादि गुणांमुळें आदिपुराण हा एक सुंदर काव्यग्रंथ झाला आहे.

**आदिबुद्धपंथ**—नेपाळांतील हा एक बौद्धपंथ आहे. आदिबुद्ध हा स्वयंभू असून त्या नांवानेंच काठमांडू येथील एका देवाल्यांत एका मूर्तीची पूजाअर्चा होते. आदिबुद्धदर्शन नांवाचें एक दर्शनहि आहे. या दर्शनाचा तांत्रिक बौद्धमताशीं कांहीं सारखेपणा आहे. या पंथाचा विशेष असा कीं, त्यामध्यें सहाहि बुद्धांच्या वरच्या दर्जाची 'स्वमंतभद्र' नांवाची देवता मानली आहे. तिच्या ठिकाणीं वरील गुणांचा अध्यारोप केला आहे. या स्वमंतभद्रापासून सर्व जगाची उत्पत्ति आहे.

**आदिलशाही** ( १४८९-१६८६ )—विजापूरचें एक मुसलमानी राजघराणें. या घराण्याचा संस्थापक युसुफ आदिलखान

हा बहामनी राज्याचा कारभारी खाजेजहान गवानचा परममित्र असून याची त्यानें दौलताबादच्या सुभ्यावर नेमणूक केली होती; परंतु खाजेजहानच्या मरणानंतर युसफ आदिलखानाची नेमणूक विजापुरास झाली. तेव्हां तेथें हा स्वतंत्र होऊन यानें इ. स. १४८९ त राजचिन्हें धारण केलीं.

विजापूरचें आदिलशाही घराणें जवळ जवळ २ शतकें टिकलें. या दोनशें वर्षांतील विजापूरच्या राजांच्या परराष्ट्रीय व्यवहारांची अमीर बेरिदाचा पाडाव, निजामशाहीशीं स्पर्धा, मोंगलांविरुद्ध निजामशाहीस मदत, मराठ्यांचा उदय आणि औरंगजेबाविरुद्ध लढा या पांच भागांत वांटणी करतां येते. विजापूरचीं पहिलीं ४२ वर्षें म्हणजे इ. स. १५३१ पर्यंतचा काळ स्वातंत्र्यप्रस्थापनार्थ बहामनी राजास बाहुलें करून बसलेल्या अमीर बेरिदाशीं झगडून त्याचा पाडाव करण्यांत गेला. यापुढील ६३ वर्षांतील युद्धें अहमदनगरची निजामशाही व विजापूरची आदिलशाही ह्यांमध्यें राज्यवृद्धीसाठीं चाललेल्या स्पर्धेमुळें उत्पन्न झालीं, परंतु इ. स. १५९४ त दुसरा बुऱ्हाण निजामशहा मरण पावल्यावर अहमदनगरच्या राज्यांत घोटाळे माजून तें राज्य जिंकण्याकरितां उत्तरेकडून मोंगलांनीं स्वारी केली, तेव्हां विजापूरच्या आदिलशहानें आपसांतील भांडणें बाजूस ठेवून इ. स. १६३६ त निजामशाहीचा अंत होईपर्यंत तीस व तिच्याप्रीत्यर्थ लढणाऱ्या शहाजीस यथाशक्ति मदत केली. निजामशाही बुडाली तेव्हां आदिलशहाच्या वांट्यास तिचा बराचसा भाग आला. पुढें निजामशाहीच्या अंतकालाबरोबरच मराठ्यांच्या उदयास सुरवात झाली व अफजलखानाच्या वधापासून त्यांच्याशीं प्रत्यक्ष तोंड लागून इ. स. १६७५ पर्यंत म्हणजे दुसऱ्या अली आदिलशहाच्या मृत्यूनंतर तीन वर्षेंपर्यंत लढाई चालली. अली आदिलशहाच्या मृत्यूनंतर तख्तनशीन राजा अल्पवयी असल्यामुळें दरबारच्या मंडळींत सत्तेकरितां झगडे लागून औरंगजेबास विजापूर दरबारीं आपलें कारस्थानाचें जाळें पसरविण्यास फावलें व त्यानें आदिलशाही जिंकून घेण्याकरितां एकावर एक सरदार पाठवून व स्वतः जातीनें येऊन इ. स. १६८६ मध्यें तें राज्य खालसा केलें.

आदिलशाही घराण्यांत पुढील बादशहा होऊन गेले : १ युसफ आदिलशहा (१४८९–१५१०), २ इस्मायलशहा (१५१०–१५३४), ३ मल्लू (१५३४), ४ इब्राहिम (१५३४–१५५७), ५ अली (१५५७–१५८०), ६ इब्राहिम दुसरा (१५८०–१६२६), ७ महंमद आदिलशहा (१६२६–१६५६), ८ अली आदिलशहा दुसरा (१६५६–१६७२), ९ सिकंदर (१६७२–१६८६).

आदिलशाही इतिहासाचें समालोचन केलें तर असें दिसून येतें कीं, आदिलशाही राजांचा सर्व काळ सत्तावर्धनांतच गेला होता. आरंभीं बेदरप्रभृति सरदारांशीं लढावें लागलें तें मूळ स्वतंत्र राज्य स्थापन करण्यासाठींच होय. त्यानंतर निजामशाहीशीं झगडा सुरू झाला, पण तो झगडा स्वतःच्या राज्याची मर्यादा वाढविण्याकरितांच असून त्या वेळेस आदिलशहांना दक्षिणेंतील विजयनगरच्या मुलुखावर चांगलाच हात मारावयास मिळाला. यानंतर मराठ्यांच्या उदयाचा काळ आला पण त्यांतहि आरंभीं आरंभीं शहाजीसारख्या बलिष्ठ मराठे सरदारांकडून विजापूरच्या राजांस दक्षिणेंत राज्यविस्तार करण्यास मदतच होत गेली. येणेंप्रमाणें आदिलशाहीची पावणेदोन शतकें वर्धिष्णु स्थितींत गेल्यामुळें व या अवधींत तीस जे राजे लाभले तेहि बहुतेक गुणग्राहक निघाल्यामुळें तिचें वैभव अपरंपार वाढलें. आदिलशाहीचा संस्थापक युसफ यानें विजापूर शहराची स्थापना करून, कित्येक बाजारी व व्यापारी पेठा वसवून व अनेक अजस्र तट बांधून शहरास शोभा आणली. सोलापूर, परांडा, मिरज, इ. किल्ल्यांचीं विशाल व मजबूत कामें याच्या कारकीर्दीतच झालीं. याच्यामागून इस्मायल आदिलशहा गादीवर आला. यानें चंपामहाल व मुझल हे किल्ले बांधले. त्याचा पुत्र इब्राहिम याच्या कारकीर्दीत अर्क किल्ल्यास उत्तम दगडी कोट बांधून इब्राहिमपूर शहर वसविण्यांत आलें. पुढें अली आदिलशहानें गगनमहाल, जुम्मामशीद, शहाबुरुज, महाबुरुज यांसारखीं सुंदर कामें उठविलीं. नंतर इब्राहिम आदिलशहा तख्तनशीन झाला. त्यानें नवरसपूर, नवरसमहाल, सातमजली माडी, आनंदमहाल, आसारमहाल अशीं सुंदर व रम्य स्थळें बांधून आपल्या पूर्वजांवर ताण केली. याचा अनुगामी महंमद यानें गोलघुमटासारख्या उत्तम इमारती तयार करविल्या. याची औदार्याबद्दलहि बरीच ख्याति होती. वारंवार द्रव्याची तुळा करून तें तो गरीब व फकीर यांस वांटी. याचा पुत्र दुसरा अली याच्या कारकीर्दीतहि विजापूर प्रांतांतून सोन्याचा धूर निघत होता. तथापि याच्याच कारकीर्दीत आदिलशाहीच्या अवनतीस सुरुवात झाली व लागलीच पुढच्या शहाच्या अमदानींत ती रसातळास गेली.

**आदिवार, हालिद एदिव**—एक तुर्की विदुषी. प्रथम राष्ट्रसेविका म्हणून ती पुढें आली. आज तिची कीर्ति प्रथम श्रेणीची कादंबरीलेखिका म्हणून सर्वत्र पसरली आहे. 'दि क्राउन अँड हिज डॉटर' ही तिची कादंबरी (लंडन १९३५) प्रथम इंग्रजींतच प्रसिद्ध झाली. 'मेमॉयर्स', 'टर्किश ऑर्डियल' व 'टर्की फेसेस वेस्ट' या ग्रंथांमुळें तिचें नांव सर्वत्र झालें. आज ती इस्तंबूलच्या विद्यापीठांत इंग्रजीची प्राध्यापिका आहे.

**आंदोलनलेखक**—(ऑसिलोग्राफ). जेथें विजेचा उलटसुलट चालणारा प्रवाह असेल तेथें तो एकसारखा दिशा बदलीत

असतो. त्या प्रवाहाचें व त्याच्या दाबाचें मापन करण्याकरितां आंदोलनलेखक नांवाचें यंत्र ए. ई. ब्लॉंडेल व डब्ल्यू. डुडेल यांनीं शोधून काढलें आहे. यामध्यें मुख्यतः एका चुंबकीय क्षेत्रामध्यें एक फॉस्फर ब्राँझच्या पट्यांची जोडी त्यांत एक आरसा जोडून सोडलेली असते. विद्युत्प्रवाहाच्यामुळें हा आरसा एका लहानशा कोनांत फिरतो. या आरशावर एका विद्युद्दीपाचा एक तीव्र किरण सोडलेला असतो. तो किरण परावर्तन पावत असतो व आरसा फिरला म्हणजे हा परावर्तित किरणहि फिरतो व त्याच्या कवडशापासून एका फोटोग्राफच्या कांचेवर एक लहरीची आकृति उठते.

**आंध**—ही वऱ्हाडांत शेतकी करणारी एक हलकी जात आहे. ही यवतमाळ जिल्ह्यांत आढळते. ही आंध्रांची एक पोटजात असावी. यांत्त वरतातीं व खालतातीं असे दोन भेद आहेत. पहिल्या वर्गांत लग्न झालेल्या स्त्रियांच्या औरस संततीचा समावेश होतो व दुसऱ्यांत अनौरस संततीची प्रजा येत असावी. यांचीं अनेक गोत्रें आहेत. त्यांपैकीं पुष्कळांचीं मराठी आडनांवें आहेत.

**आंधळी कोशिंबीर**—लपंडाव. एक लहान मुलांचा खेळ. यांत एक जण ( मोग्या ) जो शिवणारा गडी असेल त्याचे डोळे बांधतो व इतर गड्यांना या 'आंधळ्या' गड्यानें शिवावयाचें असतें. मोग्यास शिवण्याच्या आधीं या आंधळ्यानें गडी मारला पाहिजे. मारलेला गडी पहिल्याप्रमाणें 'आंधळा' होऊन शिवूं लागतो. कांहीं जण मोग्याशिवायच हा खेळ एका गड्याचे डोळे बांधून खेळतात.

**आंध्र**—ख्रि. पू. तिसऱ्या शतकांत दक्षिण देश किंवा दख्खन हा मौर्य साम्राज्याचा एक भाग म्हणून होता व त्या काळीं राष्ट्रकूट आणि आंध्र या राजवंशांचा उल्लेख प्रामुख्यानें येतो. आंध्र हे द्राविडी असून त्यांची भाषा तेलगू होती. या आंध्रांची सत्ता मगधराज्याच्या खालोखाल असून अशोकानंतर ते दक्षिणेंत स्वतंत्रपणें राज्य करूं लागले. शातवाहन घराण्यांतले हे आंध्र राजे असल्यानें आपल्या नांवापुढें शातकर्णी असें बिरुद जोडीत. ख्रि. पू. २३० ते इ. स. २२६ म्हणजे सुमारें साडेचारशें वर्षे त्यांचा अमल होता. बंगालच्या उपसागरापासून अरबी समुद्रापर्यंत यांचें राज्य पसरलें होतें. ख्रि. पू. २७ मध्यें मगधाच्या काण्व घराण्यांतील राजाला दूर सारून त्याच्या सिंहासनावर आंध्रराजा बसला. इ. स. दुसऱ्या शतकाच्या सुरवातीपासून मात्र गुजरात आणि माळवा यांवर राज्य करणाऱ्या क्षत्रपांचीं आंध्रांच्या लढाया सुरू झाल्या. यांच्यांत गोतमीपुत्र यज्ञश्री हा मोठा पराक्रमी होऊन गेला.

यांच्या काळीं बौद्धधर्म आणि ब्राह्मणीधर्म हे दोन्ही सारखेच भरभराटींत होते. त्यांच्यांत वितुष्ट नव्हतें म्हटलें तरी चालेल. तथापि बौद्धधर्माकडे सामान्य लोकांचा फार ओढा असे व बौद्ध भिक्षूंची सेवा करण्याविषयीं मोठी तत्परता दिसून येई. यात्र काळांत पश्चिम हिंदुस्थानांत अनेक बौद्ध लेणीं तयार झालीं. त्यांचें शिल्प आणि त्यांना लागलेले श्रम पाहून मन थक्क होतें. त्या वेळचे रस्तेहि चांगले व सुरक्षित असत. उद्योगधंदे आणि व्यापार यांची दक्षिणेंत मोठी चलती होती; व्यापारी संघांची त्यांवर देखरेख असून धर्मादाय ठेवींवर हे संघ पांच ते सात टक्के व्याज देत. भडोच, वसई यांसारखीं भरभराटलेलीं बंदरें होतीं व पैठण, कल्याण, धनकटक, इ. आंतलीं शहरें मोठ्या व्यापारी पेठा म्हणून प्रसिद्ध होतीं. या शहरांच्या व्यवस्थेसाठीं नगरपालिकेप्रमाणें निगमसभाहि होती. आंध्र नाण्यांवर दुशिडांचीं जीं जहाजें काढलेलीं आहेत तीं त्यांचा समुद्रावरील व्यापार व सत्ता दर्शवितात.

**आनंद**—बुद्धाच्या प्रमुख शिष्यांपैकीं एक. हा शाक्यवंशीय क्षत्रिय असून बुद्धाचा जवळचा भाऊबंद होता. याची बुद्धाच्या ठिकाणीं लहान मुलाप्रमाणें भक्ति असून 'उपठाक' किंवा पट्टशिष्याचा मान याजकडे असे. बुद्ध आपलें मनोगत आनंदाला सांगत असे. यावरून बुद्धानंतर धर्मविषयक वादांत आनंदाचा सल्ला घेऊन वादाचा निकाल लावण्यांत येई. बौद्ध भिक्षु स्त्रियांस कधींहि बरें म्हणत नसत. पण आनंद त्यांची तरफदारी करी. त्याच्याच मध्यस्थीमुळें बुद्धानें मोठ्या नाखुषीनें भिक्षुणीसंघ स्थापन करण्याची परवानगी दिली; तरी बुद्धां राजगृह येथें भरलेल्या संगीतीमध्यें त्याला या स्त्रीपक्षपाताबद्दल जाब द्यावा लागलाच ( विनयपिटक ११, १, १० ).

**आनंदगिरि** ( ११९१-११९१ )—एक संस्कृत ग्रंथकार. आनंदतीर्थ, अनंतानंदगिरि, आनंदज्ञान, आनंदज्ञानगिरि, ज्ञानानंदगिरि व माधव हीं याचीं दुसरीं नांवें आहेत. याचें पूर्वाश्रमींचें नांव वासुदेवाचार्य होतें. यानें शंकरविजयग्रंथ केला व जो जो वृत्तांत याच्यासमोर घडून आला तो तो यानें जशाचा तसाच यथास्थित लिहिला अशी समजूत आहे. हा बृहस्पतीच्या अंशानें जन्मला होता म्हणून माधवाचार्यांनीं आपल्या शंकरविजयांत लिहिलें आहे. शंकराचार्यांनीं जें गीताभाष्य लिहिलें त्यावर जी याची व्याख्या आहे, तिला 'आनंदगिरि' असें म्हणण्याचा लोकांत प्रचार आहे. आनंदगिरीनें ३७ पेक्षां अधिक ग्रंथ लिहिले आहेत.

**आनंदतनय**—एक महाराष्ट्र कवि. हा कवि अकोट येथील कुलकर्णी होय. याचें मूळनांव गोपाळदेव असून बापानें नांव आनंदराव होतें. सुप्रसिद्ध म्हणून जे एक नामांकित साधु होते त्यांचा हा शिष्य व शिवाजी राजाचा पिता जो शहाजी त्याच

गुरु होता. अरणी म्हणून कर्नाटकांत जो परगणा आहे तेथील मामलत याजकडेस होती. याचें आडनांव वेदोभास्कर होतें.

हा कवि १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत प्रसिद्धीस आला असावा. रघुनाथपंडित व आनंदतनय समकालीन असून त्यांचें एकमेकांशीं व्याह्याव्याह्यांचें नातें होतें, अशी सामान्य समजूत आहे. आनंदतनयाची वर्णनशैली बरीच मोहक असून चित्र-काव्याकडे त्याचा विशेष ओढा होता. त्याची भाषा प्रौढ, सरस आणि स्थलविशेषीं अलंकृत अशी आहे. मराठींत अक्षरगणवृत्तात्मक काव्यरचना प्रथम यानेंच सुरू केली असें कोणी म्हणतात. त्याचप्रमाणें दिंडी वृत्ताचा मराठींत प्रथम प्रचार यानेंच केला असें दिसतें. याचीं कवनें महाराष्ट्रीय हरिदास नेहमीं वापरतात. तंजावरांत याचे वंशज राहतात.

ग्रंथ—शबरी आख्यान, शिबिकथा, विश्वामित्राभिगमन, उमारमासंवाद, कंदुकाख्यान, कृष्णचरित्र, गणिकोद्धार, चेंडूफळी, विठ्ठलस्तुति, गोरसक्रीडा, ताटकावध, नवरसचरित, बाळचरित्र, मृगीचरित्र, महाबळचरित्र, मार्कंडेयाख्यान, मखरक्षण, विषयपंचक, सीतास्वयंवर, सुदामचरित्र, सेतुबंध, श्रियाळचरित्र, राधाविलास, नौकानयन, गर्गगीता, आरति, पूतनावध, सवाया, कुंटणीचरित्र, रामायण ( श्लोक ), इ.

**आनंदभैरव**—एक आयुर्वेदीय औषध. यांतील मुख्य औषधें हिंगूळ, बचनाग, त्रिकटु, टंकणलाही व गंधक हीं असून त्यांचा खल लिंबाच्या रसांत करतात. पडसें, खोकला, बारीक ज्वर, अंग दुखणें, बेडके पडणें, इत्यादि रोगांवर हें औषध देतात. लहान मुलांच्या कफप्रधान खोकल्यांतहि याचा चांगला उपयोग होतो. १ ते २ गुंजा, गरम पाणी, आल्याचा रस किंवा मध यांबरोबर हें देतात.

**आनंदभैरव**—हा राग भैरवथाटाच्या जन्यरागांपैकीं एक आहे. याचे आरोहावरोह सातहि स्वरांनीं होत असल्यामुळें याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी षड्ज व संवादी मध्यम आहे. याचा गानसमय प्रातःकाळ मानितात. या रागांत धैवत स्वर कोमल नसून तीव्र आहे. पूर्वांगांत भैरव व उत्तरांगांत बिलावल, हे राग या रागांत दृष्टीस पडतात. हा एक भैरवप्रकार आहे.

**आनंदमूर्ति** ( ब्रह्मनाळकर ) ( मृ. शके १६१८ )—एक महाराष्ट्र संतकवि. याचें मूळचें नांव अनंत, आडनांव जोशी होतें. याच्या आनंदी वृत्तीवरून याचें आनंदमूर्ति असें नांव पडलें. हा नाशिकच्या रघुनाथस्वामींचा शिष्य. त्यांनीं याला स्वतः ब्रह्मनाळ येथें ठेवला व लोकहि यास मान देऊं लागले. परशुराम त्रिंबक प्रतिनिधींची याच्यावर श्रद्धा होती. समर्थ रामदासस्वामी यांच्या पंचायतनांत याची गणना होते. याचे ग्रंथ प्रसिद्ध नाहींत; पण पदें रूढ आहेत. याची वाणी रसाळ असून हा फार प्रेमळ कीर्तन करी. याचा पुत्र कृष्णमूर्ति याचीं पदें प्रसिद्ध आहेत.

**आनंदरंग तिरुवेंगड पिल्ले** ( १७०९-१७६१ )—एक मद्रासी दुभाष्या. याचे वडील व्यापारी होते; पण पुढें त्यांना फ्रेंच गव्हर्नरजवळ एतद्देशीय वकिलाची जागा मिळाली. आपल्या अंगच्या कर्तबगारीनें त्यानें बापाचेंच काम चोख बजावलें व मुख्य अमलदारीची जागाहि मिळविली. फ्रेंच कंपनीकरितां व खाजगी व्यापाराकरितां निळ्या रंगाचें कापड तयार करण्याचे कारखाने सुरू करून, फ्रेंच कंपनीचा व्यापार वाढविण्याच्या हेतूनें लालपेठ व अर्काट येथें नवीन पेठा स्थापिल्या. सर्व फ्रेंच गव्हर्नरांची याच्यावर चांगली मर्जी असल्यामुळें व स्वतःहि कर्तृत्ववान् असल्यामुळें त्याचा उत्तरोत्तर उत्कर्ष होत गेला व प्रामाणिकपणा व दूरदृष्टि या सद्गुणांमुळें त्याचें फ्रेंच दरबारीं विशेषतः डुप्लेजवळ वजन होतें. यानें आपली रोजनिशी लिहून ठेवली असून ती ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाची आहे. याच्या रोजनिशीचा पत्ता ह्याच्या मृत्यूनंतर एक शतकानें निरनिराळ्या फ्रेंच विद्वानांनीं लावला व त्याच्या नकला व भाषांतरें करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. मूळ रोजनिशी तामीळ भाषेंत असून मद्रास सरकारनें तिचें इंग्रजी भाषांतर आतां सात भागांत केलें आहे.

**आनंदराव काशी**—पेशवाईतील एक कोतवाल. याची नेमणूक १७७६ सालीं झाली. आडनांव वाचासुंदर, घाशीराम कोतवालाच्या पूर्वी व नंतर हा पुण्याचा कोतवाल होता. निजामाचा पुण्यास ओलीस असलेला दिवाण मशीरुन्मुल्क याजवर देखरेख ठेवण्याचेंहि याच्याकडे काम होतें. याची वर्तणूक चांगली नसून तीबद्दल पेशव्यांच्याकडे अनेक तक्रारी गेल्या होत्या.

**आनंदराव गायकवाड** ( मृ. १८१९ )—हा गोविंदराव गायकवाडानंतर बडोद्याच्या गादीवर आला ( १८०० ). गोविंदरावाच्या औरस मुलांमध्यें हा सर्वांत वडील होय. हा स्वतः मंदबुद्धीचा असल्यामुळें संस्थानांत निरनिराळे पक्ष उद्भवून ते आपल्या तंत्रानें कारभार चालविण्यासाठीं धडपड करीत होते. कान्होजी नांवाचा गोविंदरावाचा एक दासीपुत्र होता. त्यानें आपल्या हातीं कारभाराचीं सूत्रें येण्याकरितां बरीच खटपट केली. पण त्याच्या जुलमी कृत्यांमुळें त्याला दिवाणाच्या जागेवरून कमी व्हावें लागलें. कान्होजीनंतर पूर्वीचा दिवाण रावजीअप्पा यास पुनः दिवाणगिरीचा अधिकार प्राप्त झाला. त्यानें अंतस्थ शत्रूविरुद्ध इंग्रजांची मदत घेतली व तेव्हांपासून बडोदें राज्यांत इंग्रजांचें वर्चस्व आलें.

इंग्रजांनीं बडोद्याचें लष्कर कमी करण्याचें काम हातीं घेतलें. तेव्हां अरब शिपायांनीं बंड केलें व आनंदरावास कैद केलें. पण

इंग्रजांनीं हें मोडलें. पण याचा परिणाम असा झाला कीं, अतःपर राज्यांतील महत्त्वाच्या सर्व गोष्टी ब्रिटिश रेसिडेंट याच्या तंत्रानें होऊं लागल्या.

पुढें स. १८०३ मध्यें रावजी अप्पाजी मरण पावल्यावर गायकवाडाचा भाऊ व त्याच्या जहागिरीचा वारस फत्तेसिंह यास १८०६ पासून राजप्रतिनिधि म्हणून नेमण्यांत आलें. फत्तेसिंहानें गंगाधरशास्त्रीनामक एका इसमाची आपल्या चिटणिसाच्या जागीं नेमणूक केली. पुढें लौकरच सर्व मुख्य कारभाऱ्याचे अधिकार गंगाधरशास्त्र्याच्या हातीं आले. यानंतर इंग्रजांनीं पुन्हां तह करून तैनाती फौजेची पद्धत (सब्सिडियरी सिस्टिम) सुरू केली. या उलाढालींत पेशव्यांच्या, देण्याघेण्यासंबंधीं कांहींच हिशेब केला नव्हता. या गंगाधर शास्त्र्याचा खून पंढरपुरास झाला (स. १८१५ ) तेव्हां इंग्रजांनीं त्याबद्दल त्रिंबकजीस कैद केलें.

पुढें इ. १८१८ त फत्तेसिंग वारला तेव्हां आनंदरावाचा धाकटा भाऊ सयाजी ( वय १९ ) यास राजप्रतिनिधि नेमलें. स. १८१९ मध्यें आनंदराव मरण पावला. मरणसमयीं त्याचें वय ५५ वर्षांचें होतें.

**आनंदराव धुळप** (मृ. १७९५)— याच्या घराण्याचें मूळचें नांव मोरे असून शिवाजीनें जावळी येथें ज्या मोरे घराण्याची धूळधाण केली ते मोरे हेच होत. जावळीच्या झटापटींत ज्या त्रिवर्गांचा शेवट झाला त्यांपैकीं हणमंतराव हा आनंदरावाचा पूर्वज होय. जावळीहून हाकालपट्टी झाल्यावर याचे पूर्वज स्वसंरक्षणार्थ विजापूरदरबारीं येऊन राहिले, व तेथें त्यांनीं समशेर गाजविल्यामुळें त्यांस धुळप हा बहुमानाचा किताब मिळाला.

स. १७६४ मध्यें आनंदराव ह्या दर्यायुद्धांत नाणावलेल्या गृहस्थाकडे मराठ्यांच्या आरमाराचें आधिपत्य आलें. नारायणरावाच्या वधानंतर पेशव्यांचें इंग्रजांशीं जें युद्ध झालें त्यांत याची कर्तबगारी दिसून आली. आनंदरावाला आपली पुरी कर्तबगारी दाखविण्यास १७८१ नंतर संधि मिळाली. १७८३ सालीं यानें इंग्रजांवर एक मोठा जय मिळविला. त्या वेळीं इंग्रजांचीं पांच गलबतें, सरंजाम, दारुगोळा, वगैरे भरून जात असतां यानें सर्व गलबतांचा पाडाव केला. या बहादुरीबद्दल पेशव्यांनीं आनंरावास 'बहुमान खासगीचा पोपास व कंठी' देऊन शाबासकीचें पत्र पाठविलें. हा शक १७१७ त मृत्यु पावला.

**आनंदराव पवार** (मृ. १७३६)— धार संस्थानचा मूळ उत्पादक जो उदाजी पवार त्याचा धाकटा भाऊ. इ. स. १७२८ च्या सुमारास बाजीरावाचें व उदाजीचें वांकडें आल्यामुळें बाजीरावानें उदाजीस कैदेंत ठेवून आनंदरावास धारेस नेमलें. तथापि पुढें तीन वर्षांनीं बाजीराव व त्रिंबकराव दाभाडे यांच्यांत वैमनस्य आलें तेव्हां आनंदराव दाभाड्याच्या पक्षास मिळाला व ता. १ एप्रिल १७३१ रोजीं डभईनजीक झालेल्या लढाईत दाभाड्याच्या बाजूनें लढत असतां जखमी झाला.

आनंदरावास यशवंतराव व रायाजी असे दोन पुत्र असून त्यांपैकीं यशवंतराव हा आनंदरावामागून धारचा अधिकारी झाला. आनंदरावास मैनाबाई नांवाची स्त्री असून ती त्याच्या मागून बरींच वर्षे राजकारणांत वावरत होती.

**आनंदराव रास्ते** (मृ. १७९९)—पेशवाईंतील एक सरदार. याच्या वडिलांचें नांव भिकाजी शामजी गोखले असें असून शाहूनें भिकाजीपंतास त्याची सचोटी पाहून त्याचे पूर्वींचें 'रसदे' हें पद मोडून रास्ते म्हणजे रास्त वागणारे हें नांव दिलें. तेव्हांपासून हें घराणें नवीन नांवानें प्रसिद्धीस आलें. नानासाहेब पेशवे यांची स्त्री गोपिकाबाई ही याची सख्खी बहीण होती. नारायणरावाचा वध झाला तेव्हां हा पेशव्यातर्फे कर्नाटक प्रांतांत अधिकारी होता. पुण्यास असलेली रास्त्यांची पेठ या आनंदरावानेंच वसविली ( १७८५ ).

**आनंदराव सुमंत** (मृ. १७४८)—मराठेशाहींतील एक सरदार. याचें नांव आनंदराव रघुनाथ भोपळे असून यास औरंगाबादकर असें म्हणत असत. थोरल्या शाहूमहाराजांना राज्यावर आणण्याची खटपट केली म्हणून त्याला सुमंताचें पद मिळालें होतें. परराष्ट्रीय राजकारण करण्याचें काम याचेकडे होतें; हा मोंगलाईतील माहितगार असून शाहूकडील बरींच कारस्थानें चालवीत होता. हा शाहूतर्फे निजामाजवळ राही.

**आनंदवल्ली**—मुंबई, नाशिक जिल्ह्यांतील एक खेडें. यानें पूर्वींचें नांव चावंडस असें होतें; आनंदीबाई पेशवे हीस या ठिकाणीं पुत्ररत्न झालें; त्या आनंदाप्रीत्यर्थ त्याचें नांव बदलून आनंदवल्ली असें ठेवण्यांत आलें. थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दींत या खेड्यास फार महत्त्व आलें होतें. त्या वेळीं या ठिकाणीं एक भव्य राजवाडा व बळकट किल्ला बांधण्यांत आला होता. आनंदीबाई व राघोबा दादा यांचें येथें वरचेवर वास्तव्य असे. त्यांच्या मृत्यूनंतर या ठिकाणचें महत्त्व गेलें तें कायमचेंच. आनंदीबाईच्या मृत्यूनंतर बाजीराव, चिमाजीआपा व अमृतराव यांना येथेंच कांहीं दिवस ठेवलें होतें. आनंदवल्लीचें सर्व वैभव व महत्त्व नष्ट झालें असून, पक्क्या भिंती व तोफांचा मारा सहन केलेला एक प्रचंड दरवाजा मात्र अद्याप अस्तित्वांत आहे.

**आनंदसभा**— जामनगर येथील एका मुक्ताश्रमी आनंददेव नांवाच्या ब्राह्मण साधूनें ही सभा स्थापिली. त्यानें रचलेले रामायण, आनंदविलास, वगैरे ग्रंथ या सभेस पूज्य वाटतात. सभेच्या उद्देशांत सामाजिक सुधारणा देखील येते. [ हिंदुधर्मदीपिका ].

**आनंदा चार्लू** (मृ. १९०८)—हिंदी राष्ट्रीयसभेच्या मूळ संस्थापकांपैकीं एक. १८९१ मध्यें नागपूर येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे हे अध्यक्ष होते. हे एक नामांकित वक्ते होते. त्या वेळीं हिंदी लोकांस लष्करी स्वयंसेवकदलांत घेत नसत याबद्दल यांनीं आपल्या भाषणांत अंतःकरण थरारून सोडणाऱ्या भाषेंत निषेध केला व आर्मिनियन, निग्रो, पश्चिम आफ्रिकेंतील मुलाटो वगैरे समाजांत स्थान नसणाऱ्या कलकत्त्याच्या गल्लयाकुचांतून भटकत फिरणाऱ्या लोकांसहि जेथें प्रवेश मिळतो तेथें हिंदी लोकांस मज्जाव करण्यांत ब्रिटिश कायद्याच्या तत्त्वाच्या विरुद्ध वर्णभेद केले आहेत असें त्यांनीं प्रतिपादन केलें. वीस वर्षांपेक्षां अधिक काल त्यांनीं देशसेवा केली. आपल्या काळांत दक्षिण हिंदुस्थानांत नांव घेण्यासारखे ते एक पुढारी होते.

**आनंदीबाई पेशवे** (मृ. १७९४)—राघोबादादा पेशवे याची ही दुसरी बायको. ही मलठणकर ओक घराण्यांतील होती. लग्न १७५५ त झालें. लग्नानंतर हिनें नवऱ्यावर चांगलीच छाप बसविली होती. माधवराव आणि नारायणराव यांच्या अमदानींत राघोबाबरोबर हीहि नजरकैदेंत होती. हिचा खरा प्रभाव माधवरावाच्या मृत्यूनंतर दिसूं लागला व नारायणरावाच्या वधांत हिचें प्रत्यक्ष अंग असावें. तथापि हिनेंच मारण्याचा हुकूम देवविला याबद्दल अद्यापि प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध नाहीं. नारायणरावाच्या खुनानंतर जो बारभाईचा कारभार सुरू झाला व राघोबा आणि इंग्रज यांच्याशीं पेशव्यांचें युद्ध सुरू झालें तेव्हां हिलाच खरा वनवास सोसावा लागला. धारच्या किल्ल्यांत हिचें बाळंतपण झालें व दुसरा बाजीराव जन्मला. नंतर राघोबा इंग्रजांकडे असतांना ही माळव्यांत कैदेंत होती. हिला नवऱ्याची व्यसनी व भित्री वागणूक आणि परधार्जिणेपणा आवडत नसे. बाई फार अभिमानी व मुत्सद्दी असे. तिनें नाना फडणीस, सखारामबापू, होळकर, इ. ना राज्यावर ओढवलेल्या संकटाची कल्पना देऊन राघोबाशीं मिटतें घेण्याचा सल्ला दिली होती. नवऱ्यालाहि ही मुलाच्या नांवानें लिहून उपदेश करी. कोपरगांवीं येऊन राहण्यापूर्वी प्रायश्चित्त घेऊन गोपिकाबाईला भेटण्याचा हिनें राघोबाला योग्य सल्ला दिला होता. नवऱ्याच्या मृत्यूनंतरहि ही मुलांसह नजरकैदेंत असल्याप्रमाणेंच होती. हिनें बाजीरावाचे दुर्गुण लहानपणींच पाहिले होते. आनंदीबाई ही मोठी हुशार आणि धोरणी स्त्री होती, पण नवऱ्यामुळे हिच्या गुणांची माती होऊन बदलौकिक मात्र कायम राहिला. हिला बाजीराव, चिमणाजी व दुर्गाबाई अशीं तीन अपत्यें होतीं.

**आनर्त**—एक प्राचीन भारतवर्षीय देश. हा उत्तर आणि पश्चिम अशा दिशाभेदानें दोन प्रकारचा आढळतो. वैवस्वतमनूचा पौत्रव शर्याति राजाचा पुत्र जो आनर्त त्याच्या नांवावरून आनर्त देश प्रसिद्धीस आला अशी कथा आहे. महाभारत, भागवत, बृहत्संहिता यांसारख्या प्राचीन ग्रंथांतून याचे उल्लेख सांपडतात. आनर्त हा गुजरातचा एक भाग असे. तो उत्तरेकडे असून त्याची राजधानी आनंदपुर किंवा आनर्तपुर (हल्लींचें वडनगर) होती. सत्य, त्रेता, द्वापार आणि कलि या चार युगांत या शहराचीं नांवें अनुक्रमें चमत्कारपुर, आनर्तपुर, आनंदपुर व वृद्धनगर (वडनगर) अशीं पडत गेलीं, अशी एक दंतकथा आहे. क्षत्रप रुद्रदामन् (इ. स. १५०) चा गिरनार येथें जो शिलालेख उपलब्ध आहे, त्यांत जुनागडच्या पहलव सुभेदाराच्या ताब्यांत आनर्त व सुराष्ट्र हे दोन निरनिराळे भाग असल्याचा उल्लेख सांपडतो. कांहीं पुराणांतून आनर्तांत सुराष्ट्राचा समावेश केलेला असून त्याची राजधानी द्वारका असें म्हटलें आहे. भागवतांत तर द्वारकेलाच आनर्त म्हटलें आहे.

**आनाम**—(व्हिएँतनाम). आशियाच्या आग्नेयेकडे टांगकिंग आणि कोचीनचीन यांमधील ५६९७३ चौ. मैलांचा प्रदेश. लो. सं. ५९८९३०२. या प्रदेशाला ७५० चौ. मैलांचा किनारा आहे. शेती हा मुख्य धंदा असून ही शेती फक्त सुपीक प्रदेशांतच केली जाते. एवढया सुपीक प्रदेशाच्या जागा सोडल्यास बाकीचा प्रदेश नापीक आहे. या सुपीक प्रदेशांत दालचिनी, ऊंस आणि धान्य यांची लागवड करतात. जरी शेतकी हा लोकांचा मुख्य धंदा असला तरी बरेच लोक कापसाचें आणि रेशमाचें कापड विणतात; तसेंच होड्या बांधणें, आणि वारनिश तयार करणें या धंद्यांत पुष्कळच लोक आहेत. लोक अतिशय कुरूप असून ते चिनीसारखी भाषा बोलतात आणि बहुतेक लोकांचा धर्म बौद्ध आहे. साखर, तांदूळ, कापूस, रेशीम, दालचिनी आणि मिरीं हा माल येथून निर्यात केला जातो. तांबें, जस्त आणि सोनें यांच्या कांहीं ठिकाणीं खाणी आहेत. सर्वांत मोठें शहर बिन्हदिन्ह हें असून मुख्य बंदर टुरेन आणि राजधानी ह्युए ही होय. चिनी लोकांनीं खि. पू. २१४ त आनाम जिंकून घेतलें, पण इ. स. १४२८ त तें स्वतंत्र झालें; पण १८४७ पासून फ्रेंचांची ढवळाढवळ सुरू होऊन त्यांनीं पंचवीस-तीस वर्षांत कोचीनचीन आणि टांगकिंग यांवर आपली सत्ता प्रस्थापित केली. १८८४ सालीं आनाम हें फ्रेंचसंरक्षित राज्य बनलें. दुसऱ्या महायुद्धांत जपानच्या ताब्यांत हा प्रदेश होता. १९४६ सालीं फ्रेंच साम्राज्यांतील स्वयंशासित देश बनला. येथील पूर्वीचा राजा बाओदाई यानें जपानच्या आक्रमणाच्या वेळींच राज्यत्याग केला होता.

**आनुवंशिकता**—याचा अर्थ मातापित्यांपासून अपत्यांना लाभणारे पितरांचे आणि त्यांच्याहि पूर्वजांचे शारीरिक गुणधर्म, स्वरूप आणि बौद्धिक प्रवृत्ति ह्या विषयांकडे जीवशास्त्रज्ञांचें फार

लक्ष वेधलें असून या विषयांसंबंधीं फार तीव्र स्वरूपाचे मतभेद उत्पन्न झाले आहेत.

मनुष्यांत व त्यासारख्याच ज्या इतर प्राण्यांमध्यें लैंगिक संयोगानें पुनरुत्पादन होतें त्यांच्यामध्यें एक पुरुषपेशी व एक स्त्रीपेशी यांचा संयोग होऊन एक नवीन प्राणी उत्पन्न होतो. या प्रत्येक पेशीमध्यें रंगकाय ( क्रोमोझोम ) नांवाचे सूक्ष्म पिंड असतात. जेव्हां गर्भधारणा होते तेव्हां पैत्रक क्रोमोझोम हे मातृक क्रोमोझोमबरोबर संयोग पावतात. यामुळें जें नवीन प्राण्याचें शरीर तयार होतें, त्यामध्यें या दोन्ही प्रकारच्या सूक्ष्म कणांचें मिश्रण असतें आणि त्यामुळें त्या शरीरामध्यें दोन्ही पितरांचे गुण असतात. या दोन्ही मातृ-पितृगुणांचें मिश्रण कसें होतें, यासंबंधींचे नियम ॲबे मेंडेल यानें १८८६ सालींच प्रसिद्ध केले होते. परंतु १९०० सालापर्यंत त्यांचेकडे दुर्लक्ष करण्यांत आलें होतें. त्यानंतर त्या नियमांचें महत्त्व लक्षांत आलें. यानंतर अनेक वनस्पती व प्राणी यांच्या उत्पत्तीसंबंधींचे प्रयोग जीविशास्त्रज्ञांनीं करून मेंडेल यानें प्रस्थापित केलेल्या तत्त्वांस बळकटी आणली व त्यांची वाढ करून आनुवंशिक शास्त्राची रचना स्पष्ट केली. विशेषतः अशा तऱ्हेचे उत्पत्तिविषयक प्रयोग करून जे सिद्धान्त शोधून काढण्यांत आले त्यांची संगति क्रोमोझोम व आनुवंशिक शास्त्र यांच्या संबंधाचे जे सिद्धांत होते त्यांच्याशीं पडताळून पाहण्यांत आली. मेंडेल याचे सिद्धान्त एकाच जातीच्या निरनिराळ्या वनस्पती आणि प्राणी कीं, ज्यांच्यामध्यें सहज ओळखण्यासारखे कांहीं भेद असतील अशांचा संकर करून त्या संकराचे पुढील प्रजेच्या निरनिराळ्या पिढ्यांमध्यें काय फरक होतात तें पाहून ठरविण्यांत आले आहेत.

गर्भाची वाढ होत असतांना त्यांतील कांहीं पेशींची रचना विशिष्ट तऱ्हेनें होऊन तीपासून कातडी, स्नायु, अस्थि, मज्जातंतु, ग्रंथि, वगैरे नवीन जन्मास येणाऱ्या प्राण्याचे अवयव व विभाग बनत असतात. परंतु त्यांतील कांहीं पेशी आपले प्राथमिक गुणधर्म न बदलतां कायम ठेवून नवीन तयार होणाऱ्या शरीरांत आगंतुक म्हणून वास्तव्य करून राहतात. हेंच नव्या पिढीचें बीज होय, व यावरूनच यापुढील पिढीचेंहि बीज तयार होत असतें. आणि म्हणूनच मूल हें आपल्या आजापणजाच्याहिपासून उत्पत्ति पावत असतें; म्हणजे हें मुलाचें बीज त्याच्या प्रत्यक्ष पितरांपासून त्यास प्राप्त न होतां, त्याच्या शरीरामध्येंच तसेंच वास्तव्य करीत असतें व त्यापासून पुढील प्रजा निर्माण होते. ही शरीरपेशी आणि बीजपेशी यांमधील विरोधकता वीसमन यानें विशेष आग्रहानें प्रतिपादन केली होती व त्यानें या विरोधावरच आपला बीजजीवन रसाच्या सातत्याचा नियम आधारला होता. अलीकडच्या विचारपद्धतीमध्यें व संशोधनामध्यें वीसमन याचें जें म्हणणें कीं, मनुष्याच्या प्रवृत्तीमध्यें परिस्थितीचा कांहीं परिणाम होत नाहीं, ही गोष्ट अमान्य करण्यांत येते व लामार्क याचा जो सिद्धान्त कीं, परिस्थितीचाच मनुष्याच्या प्रवृत्तीवर परिणाम होतो, तोहि पूर्णपणें ग्राह्य धरण्यात येत नाहीं. मनुष्याच्या शरीराच्या रचनेमध्यें आणि त्याच्या प्रवृत्तीमध्यें परिस्थितीचा किंवा शरीराच्या वाढीचा कांहीं तरी विशेष परिणाम घडत असतो; आणि मनुष्याचा विशिष्ट स्वभाव किंवा स्वरूप बनविण्याच्या कामीं जीवनरससातत्याशिवाय इतरहि कांहीं गोष्टींचा परिणाम होऊं शकतो, ही गोष्ट एकदां मान्य केल्यावर मग इतरहि अनेक गोष्टींचे परिणाम मान्य करण्यास कमीजास्त प्रमाणानें अवसर मिळतो. वीसमन याचें म्हणणें असें होतें कीं, सर्वच गोष्टी आनुवंशिकतेनें प्राप्त होतात. याचा परिणाम असा होऊं लागला कीं, मनुष्याच्या शारीरिक व मानसिक क्रियांमध्यें कोणताहि बिघाड झाला— उदा., त्यास क्षय झाला किंवा वेड लागलें— तरी ती गोष्ट त्याच्या आनुवंशिकतेवरच अवलंबून आहे असें मानावें लागे व त्यामुळें या गोष्टीस भलतेंच गैरवाजवी महत्त्व प्राप्त होत असे. परंतु अशा रोगांच्या बाबतींत रोग्याची वैयक्तिक परिस्थिति, त्याच्या सभोंवतालचें वातावरण आणि त्याचे वैयक्तिक अनुभव या सर्व गोष्टी विचारांत घेणें अवश्य असतें.

गेल्या कांहीं वर्षांत आनुवंशिकतेवर नवीनच एका दिशेनें आक्षेप घेण्यांत येऊं लागला आहे. प्रो. कार्ल पिअरसन यानें श्वेतत्वग्रोगाच्या बाबतींत तो आनुवंशिक आहे काय या दृष्टीनें आंकडेशास्त्राच्या साहाय्यानें पुष्कळच अभ्यास केलेला आहे व त्यावरून आनुवंशिक गुणधर्मांवर बराच आक्षेप घेण्यासारखा आहे. वेड हा रोग आनुवंशिक असतो काय, तसेंच क्षयाची प्रवृत्ति आनुवंशिक असते काय, तसेंच मद्यासक्ति ही आनुवंशिकतेनेंच मुलास प्राप्त होते काय, या गोष्टींसंबंधीं अद्याप बरेंच संशोधन चालू आहे.

**आन्वीक्षिकी**—प्राचीनकाळीं विद्येचें वर्गीकरण त्रयी (वेद), आन्वीक्षिकी, वार्ता (वैश्याचें शास्त्र) व दंडनीति, असें करण्यांत येत असे. आन्वीक्षिकी ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांनींहि अभ्यासावी असें होतें. आन्वीक्षिकीमध्यें तर्कशास्त्र व अध्यात्मशास्त्र या दोहोंचाहि अंतर्भाव होई. हिचें व्यापक स्वरूप कौटिल्यनीतींत दिलें आहे. आन्वीक्षिकी हें शास्त्र संदेहनिर्णयास, दूरदृष्टि राखण्यास, वाणी व कृति यांमध्यें समतोलपणा ठेवण्यास उपयोगी पडतें. इतर सर्व प्रकारच्या ज्ञानास हें शास्त्र मार्गदर्शक आहे आणि सर्व प्रकारचीं कार्यें करण्यास सौकर्य उत्पन्न करणारें हें शास्त्र आहे. मालतीमाधवांतील उल्लेखावरून (अं. १)

भवभूतीच्या काळींदेखील आन्वीक्षिकीचा अभ्यास करावा, अशी सुशिक्षितांत कल्पना असावी.

**आपटा** —( सं. अश्मंतक ? ) हें जंगली झाड आहे. याचीं पानें कांचनाच्या पानासारखींच परंतु त्यांपेक्षां जाड व मोठीं असतात व तीं पानें तंबाखूच्या विड्या करण्याकडे उपयोगी पडतात. ह्या झाडाच्या अंतरसालीचीं मजबूत व टिकाऊ दोरखंडें होतात. विजयादशमी किंवा दसरा या दिवशीं शमीवृक्ष नसेल तर अश्मंतक वृक्षाची पूजा करावी असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. त्या दिवशीं एकमेकांस आपट्याचीं पानें स्नेहवृद्धीकरितां वाटावीं असा हिंदू लोकांत रिवाज आहे. यामुळें आपट्याच्या पानांचा खप त्या दिवशींच फार होतो. आपट्याचीं झाडें औषधी कामाकरितां सुद्धां फार उपयुक्त आहेत. वातगुल्म व पोटशूळ यांवर आपट्याच्या पाल्याच्या रसांत मिऱ्याची पूड व तिळाचें तेल सात थेंब टाकून पितात.

**आपटे, गोविंद सदाशिव** ( १८७०-१९३७ ).—महाराष्ट्रीय ज्योतिषशास्त्रज्ञ. हे मूळचे सातारचे राहणारे. यांचें मॅट्रिकपर्यंत शिक्षण पुण्यास झालें व पुढचें उज्जयिनी येथें माधव कॉलेजांत झालें. ग्वाल्हेर व उज्जयिनी येथें शास्त्रें, गणित व विशेषतः रसायनशास्त्र यांचे हे प्राध्यापक होते व १० वर्षें माधव कॉलेजचे प्रिन्सिपॉल होते. कॉलेजांत काम करीत असतांना यांचा ज्योतिषशास्त्राचा फार व्यासंग असे. १९२५ सालीं पुणें येथें झालेल्या पंचांगसभेंत शुद्ध पंचांग पक्षातर्फे हे पंच होते. यांनीं 'ज्योतिर्गणितवार्तिक' व 'सर्वानंदकरणम्' इत्यादि संस्कृत व मराठी ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले आहेत.

यांचे ग्रंथ ग्रहलाघवाच्या धर्तीवर आहेत. उज्जयिनीच्या वेधशाळेंत स्वतः वेध घेऊन यांनीं हे ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले असल्यानें यांना विशेष महत्त्व आहे.

तसेंच यांनीं पंचांग जलद तयार करण्यास उपयुक्त असणाऱ्या 'पंचांगचिंतामणि' व 'ग्रहचिंतामणि' या दोन सारण्या केल्या आहेत. शिवाय यांचें ' The Initial Point of Our Zodiac " या नांवाचें इंग्रजी पुस्तकहि आहे.

**आपटे, दत्तात्रय विष्णु** ( १८८०-१९४३ ) —एक इतिहाससंशोधक व ज्योतिर्विद. यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण जमखंडी येथें झालें व फर्ग्युसन कॉलेजमधून हे बी. ए. झाले (१९०२).

वंगभंगाचे चळवळींत हे यवतमाळ येथें राष्ट्रीय शाळेंत काम करीत व 'हरिकिशोर' या साप्ताहिकांत लिहीत. पण दडपशाहींत हें सर्व बंद पडून दत्तोपंत मुंबईस 'राष्ट्रमत' दैनिकाच्या संपादकवर्गांत शिरले. पण तेंहि बंद पडल्यावर हे गोव्यांत शिक्षक म्हणून गेले. पण पहिल्या महायुद्धास सुरवात झाल्यावर तेथें राहणेंहि यांना अशक्य झाल्यानें ते पुण्यास आले.

पुण्यास आल्यावर हे कांहीं दिवस 'चित्रमयजगत्' व 'शालापत्रक' या मासिकांचें संपादकीय काम पाहत. पुढें त्यांनां आनंदाश्रमांत व्यवस्थापक म्हणून नेमण्यांत आलें. याच वेळीं मुधोळच्या महाराजांनीं यांच्याकडून 'मुधोळच्या राजघराण्याचा इतिहास' लिहून घेतला.

हे तत्त्वज्ञ राष्ट्रभक्त होते. यांच्या राष्ट्रभक्तीला ऐतिहासिक तत्त्वज्ञानाचा पाठिंबा होता. शास्त्रशुद्ध व्यासंग ही राष्ट्राची खरी संपत्ति होय, असा यांचा विश्वास असे. या धोरणानें सतत निरपेक्ष व्यासंग करणें आणि व्यासंगी लोकांना व्यासंग करण्यास उत्तेजन देणें ही यांची भूमिका होती. यांनीं मराठ्यांच्या इतिहासाचें सूक्ष्म अध्ययन केलें होतें.

यांचे ग्रंथ–१ इतिहासमंजरी, २ श्रीरंगपट्टणची मोहीम, ३ शिवचरित्रप्रदीप, ४ शिवभारताची प्रस्तावना, ५ घोरपडे घराण्याचा इतिहास, ६ शिवचरित्र–निबंधावली, ७ पत्रसारसंग्रह. इतिहास विषयाप्रमाणेंच गणित–ज्योतिषाचाहि यांना नाद असे. त्या दिशेनें यांनीं शिवाजीच्या वेळच्या ज्योतिष–संशोधनाच्या प्रयत्नाचा उलगडा केला. तसेंच करणकौस्तुभ, बीजगणित, लीलावती, इ. ग्रंथांचें विवरण केलें. केरोपंती ग्रहसाधनाला हे फार मानीत.

**आपटे, महादेव चिमणाजी** ( १८४५-१८९४ ) —आनंदाश्रमाचे संस्थापक. प्रथमपासून बुद्धिमान् व अभ्यासु वृत्ति असल्यामुळें घरची अत्यंत गरिबी असतांहि १८६८ सालीं ते बी. ए. झाले. व पुढें एल्एल्. बी. च्या परीक्षेंत पहिले आले. पुढें मुंबईच्या नाना शंकरशेटच्या शाळेंत हेडमास्तराचें काम करून उत्कृष्ट शिक्षक म्हणून यांनीं लौकिक संपादिला. यांच्या योग्यतेनुरूप सरकारकडून यांना युनिव्हर्सिटीचे फेलो नेमण्यांत आलें. पुढें वकिली सुरू केल्यावरहि मुंबईचे प्रख्यात कायदेपंडित म्हणून हे समजले जाऊं लागले.

देशाच्या कलाकौशल्याच्या वृद्धीबद्दल यांना फार कळकळ वाटत असे. ह्या कलाकौशल्याच्या शिक्षणासाठीं यांनीं एका गृहस्थास स्वखर्चानें विलायतेस व अमेरिकेंत पाठविलें होतें. त्याचप्रमाणें पुण्यांत चाकू–कात्र्यांचा कारखाना काढण्याची यांची खटपट चालली होती. परंतु ह्या दोन्ही कार्यांत बराच द्रव्यनिधि खर्च होऊनहि फायदा झाला नाहीं. पुणें येथील 'आनंदाश्रम' ही संस्कृत ग्रंथांच्या जीर्णोद्धारार्थ काढलेली संस्था यांनींच प्रस्थापित केलेली आहे. त्याचप्रमाणें या संस्थेंत अभ्यास करणाऱ्या १०–१२ विद्यार्थ्यांची जेवणाची व राहण्याची आणि प्रत्यहीं पांच संन्याशांच्या पुडीची व्यवस्थाहि यांनीं कायम करून ठेवलेली आहे.

यांचें मराठी लेखनहि चांगलें असे. "मंजिच्या चार घटका" हें शाकुंतल नाटकाचें यांनीं केलेलें भाषांतर प्रसिद्ध आहे.

**आपटे, वामन शिवराम** (१८५८-१८९२)—एक संस्कृत पंडित. घरची गरिबी असल्यामुळें वामनराव माधुकरी मागून निर्वाह करीत होते. १८७९ त ते एम्. ए. झाले. त्यांनीं कॉलेजांतील शिष्यवृत्ति व सर्व बक्षिसें मिळवून युनिव्हर्सिटींतून भाऊदाजीचें २०० रुपयांचें व भगवानदासाचें ४०० रुपयांचें अशीं बक्षिसेंहि मिळविलीं. हे उत्तमपैकीं शिक्षक असल्याची ख्याति आहे. १८८० सालीं न्यू इंग्लिश स्कूलमध्यें हे शिक्षक झाले. पुढें इ. स. १८८१ पासून 'केसरी' व 'मराठा' हीं पत्रें चालू झालीं. तीं पत्रें आणि 'न्यू इंग्लिश स्कूल' चालविण्याच्या कामीं कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आपटे, आगरकर व नामजोशी हें पंचक एकचित्तानें झटूं लागलें. फर्ग्युसन कॉलेजसंबंधीं यशाचा ज्यास्त वांटा वामनरावजींकडे आहे. वामनराव संस्कृतांत मोठे पंडित होते. 'स्टूडंट्स गाइड', 'स्टूडंट्स प्रोग्रेसिव्ह एक्झरसाइजेस', 'इंग्लिश-संस्कृत कोश', 'संस्कृत-इंग्लिश कोश' आणि 'कुसुममाला' हीं पुस्तकें यांनीं केलीं आहेत. यांच्या संस्कृत कोशाच्या तोडीचा कोश अद्यापि झाला नाहीं.

**आपटे, वासुदेव गोविंद** (१८७१-१९३०)—एक मराठी टीकाकार, कोशकार, ग्रंथकार, संपादक व बालवाङ्मयकार. मॅट्रिक-पर्यंतचें शिक्षण धुळें येथें व पुढील उच्च शिक्षण इंदूर व नागपूर येथें झालें. स. १८९३ त कलकत्ता विश्वविद्यालयाचे हे बी. ए. झाले. या परीक्षेचा अभ्यास करीत असतां यांनीं बंगाली भाषेचा अभ्यास केला. पुणें नूतन मराठी विद्यालयांत चार वर्षें शिक्षक होते. नंतर हे इंदूरच्या राजकन्येस शिकविण्याकरितां अलाहाबादेस गेले. तेथें 'मॉडर्न रिव्ह्यू'चे संपादक रामानंद चतर्जी यांच्याशीं त्यांचा परिचय झाला व त्यांच्या मासिकांत हे अखेरपर्यंत मराठी पुस्तकांचें परीक्षण करीत होते. अलाहाबादेस असतां मिसेस हेन्री वुडच्या 'ईस्ट लिन' व 'मिसेस हॅलिबर्टन्स ट्रबल्स' या कादंबऱ्यांचीं 'माणिकबाग' व 'दुःखाअंतीं सुख' या नांवानें मराठींत रूपान्तरें केलीं. कांहीं दिवस पुण्याच्या 'ज्ञानप्रकाशा'चे व इंदूरच्या 'मल्हारीमार्तंडा'चे ते संपादक होते. १९०६ सालीं लहान मुलांसाठीं यांनीं 'आनंद' मासिक काढलें व तें चांगलें नांवारूपास आणलें. 'शब्दरत्नाकर' या नांवाचा एक लहानसा मराठी शब्दकोशहि यांनीं तयार केला.

यांनीं १९२० सालीं विलायतेंतील मुलांच्या साप्ताहिकाच्या धर्तीवर 'विचारसाधन' नामक एक वर्तमानपत्र काढलें होतें. पण तें फार दिवस चालू शकलें नाहीं. हे महाराष्ट्र परिषदेचे दहा वर्षें चिटणीस होते. यांचें लेखन विपुल, विविध आणि परिश्रमपूर्वक केलेलें आहे. भाषान्तर, रूपान्तर आणि स्वतंत्र असे सर्व प्रकार यांच्या लेखनांत आहेत.

**आपटे, हरि नारायण** (१८६४-१९१९)— मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध कादंबरीकार, लघुकथालेखक, नाटककार, व समाजसुधारक. हे महादेव चिमणाजी आपटे ह्यांचे पुतणे. हे इंग्रजी चौथींत असतां (वय वर्षें १४) यांनीं मेडोज् टेलरच्या एका कादंबरीचें मराठींत भाषांतर करून वाङ्मयक्षेत्रांत पदार्पण केलें.

हे न्यू इंग्लिश स्कूलमधील आरंभींच्या विद्यार्थ्यांपैकीं एक होते. प्रथम रेनॉल्ड्सच्या कादंबऱ्या वाचण्याचा क्रम यांनीं सतत ठेविला होता, त्यामुळें यांचे डोळे कायमचे अधू झाले. गोपाळराव आगरकरांच्या 'विकारविलसित'–हॅम्लेटचें भाषांतर–यावर यांनीं विद्यार्थीदशेंत असतांनाच ७२ पानी टीकात्मक लेख लिहिला होता. शेक्सपिअरचीं नाटकें व त्यावरील विद्वानांचीं परीक्षणें यांचा अभ्यास यांनीं आजन्म चालू ठेविला होता. यांचा संस्कृताचा व्यासंगहि चांगला असे.

स. १८८३ त हे प्रवेशपरीक्षा पास झाले. त्यानंतर पी. ई. परीक्षेतील अपयशामुळें यांनीं शिक्षणाचा नाद सोडून देऊन कादंबऱ्या लिहिण्यास सुरवात केली. 'मधली स्थिति' (१८८५) ही यांची पहिली कादंबरी. ह्यानंतर 'गणपतराव', 'पण लक्षांत कोण घेतो' (१८९०-९३), 'यशवंतराव खरे' (१८९२-९५), 'मी' (१८९३-९५), 'भयंकर दिव्य', 'मायेचा बाजार', 'जग हें असें आहे' (१८९७-९९), 'आजच' (१९०४-०६), 'कर्मयोग' (१९१३-१७), वगैरे सामाजिक कादंबऱ्या यांनीं क्रमानें लिहिल्या; त्याचप्रमाणें 'म्हैसूरचा वाघ' (१८९०-९१), 'उषःकाल' (१८९५-९७), 'सूर्योदय' (१९०५-०६), 'सूर्यग्रहण' (१९०८-०९), 'केवळ स्वराज्यासाठीं' (१८९८-९९), 'रूपनगरची राजकन्या' (१९००-०२), 'चंद्रगुप्त' (१९०२-०४) 'गड आला पण सिंह गेला' (१९०३), 'मध्यान्ह' (१९०६-०८), 'कालकूट' (१९०९-११) व 'वज्राघात' (१९१३-१५), वगैरे ऐतिहासिक कादंबऱ्या यांनीं लिहिल्या आहेत. कथानकाची सुसंगत रचना, प्रसंगानुरूप उठाव, हुबेहूब वर्णन, यथार्थ स्वभावदिग्दर्शन, वगैरे गुणांमुळें यांच्या कादंबऱ्या पहिल्या प्रतीच्या ठरतात.

हे पुणें म्युनिसिपालिटीचे २० वर्षें सभासद व १ वर्षें

अध्यक्ष होते. हे सुधारक व प्रागतिक म्हणून गणले जात. कादंबऱ्यांखेरीज यांनीं इतर बरेंच वाङ्मय निर्माण केलें आहे.

यांनीं 'करमणूक' हें साप्ताहिक २८ वर्षें चालविलें व 'सुधारक' पत्रहि कांहीं दिवस चालविलें. यांचे चुलते महादेव चिमणाजी आपटे यांनीं स्थापन केलेल्या आनंदाश्रम या संस्थेचे हे पहिले व्यवस्थापक होते.

**आपस्तंब**—कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेंत आपस्तंब ही एक उपशाखा आहे. इतर उपशाखा वैखानस, बौधायन, भारद्वाज, वाधूल व हिरण्यकेशी या होत. तैत्तिरीय शाखेच्या या सर्व उपशाखा सूत्रभेदावरून पडल्या आहेत. आपस्तंब ही उपशाखा आपस्तंब सूत्रावरून पडली आहे. या सूत्राचे जनक आपस्तंब नामक एक महर्षि होऊन गेले. आपस्तंब श्रौतसूत्र, आपस्तंब गृह्यसूत्र, आपस्तंब धर्मसूत्र, वगैरे १४ महत्त्वाचे ग्रंथ यांनीं लिहिले. या ग्रंथांवरून आपस्तंब शाखेचें वैशिष्ट्य समजून येतें. आपस्तंबशाखी लोक बहुधा देशस्थ असतात. तथापि हिरण्यकेशी शाखीय कोंकणस्थांसहि आपस्तंब म्हणण्याचा प्रघात आहे. हिंदुस्थानांत त्यांची वस्ती बहुतेक ठिकाणीं आहे. आपस्तंब व ऋग्वेदी यांचा बेटीव्यवहारहि होतो.

**आपुलिअस, लुसीअस** (जन्म सु. इ. स. १२५)—हा लॅटीन भाषेचा वक्तृत्वकलाभिज्ञ, तत्त्ववेत्ता, आणि कल्पित-कथालेखक, न्यू मिडीया प्रांताचा रहिवासी असून त्याचें शिक्षण अथेन्स व कार्थेज येथें झालें, आणि कांहीं काळ त्यानें रोम शहरांत वकिलीचा धंदा केला. नंतर आफ्रिकेंत परत येऊन त्यानें ट्रिपोली शहरांत एका धनाढ्य विधवेशीं विवाह केला. परंतु नंतर त्याच्यावर त्या स्त्रीचें प्रेम जादूटोण्यानें संपादन केलें असा आरोप ठेवण्यांत आला. त्यानें या आरोपाबद्दल आपली लांबलचक पण जोरदार कैफियत लिहिली ती अद्याप उपलब्ध आहे. तो तत्त्वज्ञान आणि वक्तृत्वकला या विषयांवर व्याख्यानें देत असे, आणि प्लेटोचें तत्त्वज्ञान या विषयावर त्यानें कित्येक ग्रंथ लिहिले. परंतु त्याची मुख्य कीर्ति मेटामॉर्फोसिस किंवा 'दि गोल्डन ॲस' (सुवर्ण गर्दभ) या अद्भुतरम्य कादंबरीमुळें झालेली आहे. एका लहानशा ग्रीक विनोदी गोष्टीच्या आधारें ही कादंबरी लिहिलेली आहे. ही कादंबरी अत्यंत मनोवेधक असून त्यांत दिलेली क्यूपीड आणि सायकी यांची रूपकात्मक कथा उत्कृष्ट वठलेली आहे.

**ऑपेरा**—'संगीत नाटक' असा ऑपेराला प्रतिशब्द योजतात. युरोपांत अभिजात नाट्यांतून याचा उगम झाला. तेथील पहिलीं संगीत नाटकें 'युरिडाइस' (१६००), 'ॲरिआना' (१६०७) हीं इटलींतील असून तेथून इतर देशांत या नाट्यप्रकाराचा प्रसार झाला. प्रत्येक देशाचें कांहीं वैशिष्ट्य त्या त्या देशांतील ऑपेरांत दिसें. उदाहरणार्थ बॅलेटच प्रतिबिंब फ्रान्समधील ऑपेरांत वठलें, तर इंग्लंडमध्यें ती मास्क (सोंगा) ची परिणतिच धरली जाईल. इंग्लिश ऑपेराचा विख्यात लेखक हेनरी परसेल असून त्याचें 'डिडो आणि एनिअस' वरील संगीत नाटक पहिला इंग्रजी ऑपेरा म्हणतां येईल. जर्मनींतील पहिलीं संगीत नाटकें इटलींतून आलीं असलीं तरी त्यांचा तेथें पुढें बराच उत्कर्ष झाला. १८५० पर्यंत ऑपेराची जन्मभूमि जी इटली तेथेंच तिला अवनत दशा प्राप्त झाली होती. व्हर्डी यानें मात्र इटलीचें नांव गाजविलें. त्याची 'ओटेलो' व 'फाल्स्टाफ' हीं नाटकें अत्युत्कृष्ट गणलीं जातात. त्याचा समकालीन जर्मन लेखक वॅगनेर यानें तर त्याच्यापुढें जाऊन पहिलें स्थान पटकावलें व सर्व कलांचें ऐक्य करण्यांत यश मिळविलें.

**ऑप्पर्ट, ज्युलिअस** (१८२५–१९०५)—प्राचीन असुरी संस्कृतीचा जर्मन अभ्यासक. हायडेलबर्ग येथें अभ्यास करून तो कील येथें १८४४ मध्यें पदवीधर झाला. पुढील सालीं तो फ्रान्समध्यें गेला व तेथें जर्मन भाषेचा शिक्षक बनला व फावल्या वेळांत प्राच्य विद्यांचा अभ्यास करूं लागला. १८५२ मध्यें फ्रेसनेलबरोबर मेसापोटेमियांत पुराणवस्तुसंशोधनाच्या कार्यार्थ तो गेला. १८५४ मध्यें स्वदेशीं परत आल्यावर तिकडून आणलेल्या कीलाकृतिलेखांचा त्यानें स्वतः चांगला अभ्यास केला व १८६१ मध्यें तत्संबंधीं एक महत्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. १८५७ मध्यें पॅरिसमधील नॅशनल लायब्ररीला जोडून असलेल्या भाषा शिकविण्याच्या शाळेंत संस्कृत भाषेचा प्रोफेसर म्हणून याची नेमणूक झाली व त्या वेळीं त्यानें संस्कृत भाषेचें व्याकरणविषयक एक पुस्तक लिहिलें. तथापि त्याचें विशेष लक्ष ॲसिरियाच्या प्राचीन अभ्यासाकडे होतें. ॲसिरियांतील मूळ भाषा तुराणी भाषावंशांतील आहे हा त्याचा महत्त्वाचा शोध होय. स. १८६९ मध्यें ऑप्पर्टला कोलेज दी फ्रान्स या संस्थेंत तौलनिक भाषाशास्त्र व पुराणवस्तुशास्त्र यांचा प्रोफेसर नेमण्यांत आलें. १८६५ मध्यें त्यानें ॲसिरिया व खाल्डिया या देशांसंबंधीं एक इतिहास लिहिला.

**आप्पा देसाई निपाणकर**—मराठेशाहींतील एक सरदार. याचें मूळ नांव सिधोजीराव निंबाळकर. हा प्रथम दौलतराव शिंद्याच्या पदरीं नोकर होता. इ. स. १८०० सालीं दौलतराव शिंद्यानें आप्पा देसायाच्या हाताखालीं आपल्या पलटणी देऊन यास परशुरामभाऊ पटवर्धनाची जहागीर काबीज करण्याकरितां रवाना केलें. यानें कोल्हापूरकरांचे कांहीं मुलूख जिंकून घेतले.

बाजीरावाच्या गुप्त उत्तेजनामुळें यानें कोल्हापूरकरांचा कांहीं

मुलूख सोडण्याचें नाकबूल केल्यावरून इंग्रजांनीं त्याजकडून त्याची चतुर्थांश जहागीर बाजीरावास देवविली.

तथापि यापुढेंहि कांहीं वर्षें आप्पा देसाई हा बाजीरावाच्या पक्षास चिकटून होता. ता. १ जानेवारी १८१८ रोजीं कोरेगांवची लढाई झाली, तींत हा पेशव्याच्याच बाजूनें लढत होता. तथापि त्याच्या फितुरी कृत्यामुळें इंग्रजांनीं त्याची जहागिरी सरंध खालसा केली नाहीं.

**आप्पा बळवंत (मेहेंदळे)** (१७४८–१७९८)—पेशवाईतील एक सरदार. पानपतच्या युद्धप्रसंगीं कामीं आलेल्या बळवंतरावाचा हा मुलगा होय. हा राघोबादादाच्या पक्षाचा होता; परंतु बारभाईची सरशी पाहून तो त्या पक्षास येऊन मिळाला.

हा बहुतेक नाना फडणविसाच्या सहवासांत असे. पुढें दौलतरावानें नानाला कैद केल्यावर, बाजीरावानें याला इतरांसह अटकेंत ठेवलें व सर्वस्वीं बुडविलें. पुढें यानें आत्महत्या केली. पुण्यास 'आप्पा बळवंताचें गेट (चौक)' प्रसिद्ध असून त्या ठिकाणीं मेहेंदळ्यांचा वाडा आहे.

**आफ्रिका**— भूगोलाच्या पाठीवर सुमारें चार हजार वर्षांपूर्वी ज्या खंडांतल्या लोकांनीं पश्चिमेकडील राष्ट्रांना सुधारणा शिकवली त्या खंडाला आतां काळाच्या ओघांत 'काळें खंड' असें नांव पडून आधुनिक राष्ट्रें त्याला सुधारणेचे धडे देत आहेत! उत्तरेकडील थोड्याशा भागावर जरी ग्रीक, रोमन, व्हांडाल, अरब वगैरे लोकांनीं आपापली सुधारणा आणली तरी त्या भागाशिवाय बाकीचा सर्व प्रदेश अद्याप तसाच होता. परंतु गेल्या पन्नास वर्षांत या काळ्या खंडाची माहिती एकदम जगासमोर आली. हा प्रदेश इतके दिवस अज्ञात राहण्याचीं कारणें म्हणजे—भूमध्य समुद्रांतल्या ब्लँक या भूशिरापासून ते दक्षिणेकडील अगुल्हास भूशिरापर्यंतचा ५००० मैलांचा किनारा, तसेंच पश्चिमेकडील व्हर्डे भूशिरापासून ते थेट पूर्वेकडील गार्डाफुई भूशिरापर्यंतचा ४६०० मैल रुंदीचा हा सर्व प्रदेश म्हणजे एक अखंड भूविभाग असून तो कोठेंहि फारसा दंतुर नाहीं. त्यामुळें या खंडाला फारशीं बंदरें नाहींत. दुसरें कारण म्हणजे—भूरचना. बहुतेक सर्व किनाऱ्यांपासून थोड्याशा अंतरावर एकदम उंचीवर पठारी प्रदेशच आहे. आणि बऱ्याच ठिकाणची किनारपट्टी वालुकामय व दलदलीची आहे. प्रथम या खंडाच्या अंतरभागांत गेलेल्या प्रवाशांना असें आढळलें कीं, या खंडांत मोठाल्या नद्या अगदींच थोड्या असून त्या प्रवाहांतलि धबधब्यांमुळें व मुखांजवळ गाळ सांचल्यानें जलमार्ग म्हणून निरुपयोगी आहेत. त्यामुळें हा सर्व भाग अंधारांतच राहिला. तिसरें कारण म्हणजे—उत्तर भागांतील सहाराचें प्रचंड वाळवंट (पट्टा). या वाळवंटांतून सुधारणा पलीकडे पोंचूं शकली नाहीं. हा नीग्रोंचा प्रदेश असल्यानेंहि याला 'काळें खंड' म्हणतात.

पश्चिमेकडून या खंडांत यावयाचें म्हणजे गिनीचा किनारा, आयव्हरी किनारा, गोल्ड कोस्ट अगर कांगोच्या मुखाजवळपासचा किनारा येथें यावें लागेल. या ठिकाणचा संशोधनाचा इतिहास—रोमहर्षक प्रसंग, आत्मत्याग, कठोर निसर्गपरिस्थितीशीं मानवाचा झगडा, क्षणाक्षणाला प्रत्यक्ष काळाला आव्हान, रोगट हवामान, हिंस्र व क्रूर श्वापदें यांच्या तडाख्यांतून सुटका, रानटी लोकांशीं सारखा प्रसंग—अशा हकिकतींनीं भरलेला आहे. सुरवातीला या ठिकाणीं श्वेतवर्णीय लोकांचे रोगट हवामानामुळें इतके हाल झाले कीं, हा सर्व पश्चिम किनारा म्हणजे गोऱ्या माणसांचें थडगेंच बनलें होतें.

या प्रदेशांत महत्त्वाच्या व मोठ्या नद्या म्हणजे नायगर व कांगो या होत. पैकीं कांगो नदी विषुववृत्तावरून दोन वेळां वाहते. कांगोच्या कांठावर सतत पाऊस व विषुववृत्तावरील उष्णता यांमुळें समोंवार घनदाट अरण्यें माजलेलीं आहेत. मानवाला उपयुक्त अशीं—नारळ, बांबू, आंबा, रबर, कोको, सिंकोना, केळीं, मसाल्याचीं झाडें, गटापर्चा, मोहोगनी—हीं झाडें लागवड करण्याचें काम सुरू आहे. या नदीच्या कांठीं जंगलें सोडून जी रिकामी जागा सांपडते त्यावर बुटके (पिग्मी) लोक टोळ्यांनीं राहतात. येथील जंगलांची वाढ इतकी झालेली आहे कीं, जर एका ठिकाणीं जंगल तोडून आंत जाऊं लागलें तर पंधरा दिवसांच्या आंत तयार केलेला रस्ता पार बुजून जातो.

पूर्व किनारा या पश्चिम किनाऱ्यापेक्षां पूर्णपणें निराळाच आहे. किनाऱ्यापासून सुमारें दोनशें मैल आंत उत्तरेकडील तांबड्या समुद्रापासून ते दक्षिणेकडे केप ऑफ गुडहोपपर्यंत एक डोंगरांची ओळच आहे. हे डोंगर विषुववृत्तावरून जरी जातात तरी त्यांच्या उंचीमुळें डोंगरमाथ्यावर विषुववृत्तादृतकें उष्णतामान नाहीं. विषुववृत्ताच्या दक्षिणेस २०० मैलांवर व किनाऱ्यापासून सुमारें २०० मैल आंत आफ्रिकेंतलें सर्वांत उंच शिखर किलीमांजारो हें असून त्याची उंची १९,७१० फूट आहे. या शिखराच्या पायथ्याला सुमारें २०० जातींच्या निरनिराळ्या रानटी लोकांच्या टोळ्या वस्ती करून राहतात.

आफ्रिकेंत विषुववृत्तावर एकदमच पर्वतांचीं शिखरें सुळक्यासारखीं वर आलेलीं असून त्या पर्वतांच्या लांब लांब ओळी बनलेल्या नाहींत. या पर्वतांच्या शिखरांमध्यें पठारी गवताळ प्रदेश असून त्याला 'सॅव्हाना' असें नांव आहे. दक्षिणेकडील अशाच पठारी गवताळ प्रदेशाला 'व्हेल्ड्' असें नांव आहे. पैकीं सॅव्हाना हा सर्व प्रदेश शिकारी लोकांचा आवडता प्रदेश होय. कारण गवतावर जगणारीं जनावरें हा ज्या श्वापदां

आहार आहे असे जंगली प्राणी सॅव्हानांत खूप आहेत. हा सॅव्हानाचा प्रदेश साधारणपणें पूर्वेकडे नाईलपासून (सुडान-सहित) पश्चिमेकडे सेनिगॉल नदीपर्यंत व उत्तरेला सहारापासून ते दक्षिणेला विषुववृत्तावरील घनदाट अरण्यापर्यंत पसरलेला आहे. त्याचप्रमाणें दक्षिणेकडेहि सरोवरांच्या प्रदेशांतून हा पट्टा असाच विषुववृत्तावरील जंगलांना वळसा घालून नैऋत्येकडे किनाऱ्यापर्यंत येतो. या सर्व भागांत सिंह, चित्ते, तरस, लांडगे, पाणघोडे, रेडे, झिब्रा, अस्वलें, शहामृग व हरणें हजारोंनीं आहेत.

झुलू स्त्रिया

या भागात राहणारे लोक त्यांच्या विषुववृत्तावरील घनदाट अरण्यांत राहणाऱ्या पिग्मी लोकांपेक्षां सुधारलेले आहेत. त्यांत निग्रो, झुलू वगैरे जाती असून त्यांची संख्याहि मोठी आहे. हे सर्व लोक लढाऊ वृत्तीचे आहेत.

येथून दक्षिणेकडे जाण्यापूर्वी या भागांतलीं सरोवरें पाहणें मनोरंजक आहे. या भागांतील सरोवरांपैकीं चाड सरोवर एकाच बाजूला वसलें आहे व त्यांतील पाणी सहारा वाळवंटाच्या दक्षिणेकडील भागांत सुरतें. ज्या वेळीं पाणीपुरवठा भरपूर असतो त्या वेळीं शारी व यो नद्यांमुळें सरोवराची लांबी १५० मैलांपर्यंत पसरते. परंतु खोली मात्र त्या मानानें २५ ते ३० फुटांपेक्षां जास्त नसते. या सरोवरांत मासे, पाणकोंबड्या, सुसरी पुष्कळ असून सभोंवारच्या जंगलांत शिकारी सावजें विपुल आहेत.

दुसरें महत्त्वाचें सरोवर म्हणजे व्हिक्टोरिया नियांझा हें होय. याच सरोवरांतून प्रसिद्ध नाईल नदीचा उगम होतो. त्याची जास्तींत जास्त लांबी २५० मैल असून जगांतील सर्वांत मोठें गोड्या पाण्याचें हेंच सरोवर आहे. यापासून निघणारा एक फांटा वायव्येकडे ऑल्बर्ट सरोवरांत जातो. त्याचप्रमाणें शंभर मैलांवर चाळीस मैल रुंदीच्या दक्षिणेकडील एडवर्ड सरोवरांतूनहि ऑल्बर्टला पाणीपुरवठा होतो. या तीन सरोवरांच्या व पूर्वेकडील सेमिलीकी नदी यांमधील प्रदेशांत रुवेनझोरी हें प्रसिद्ध शिखर आहे. एडवर्ड सरोवराच्या दक्षिण बाजूला निद्रिस्त ज्वालामुखी असलेल्या पर्वतांनीं जीं सरोवरें बनविलीं आहेत त्यांचा फायदा काँगो व झांबेझी या नद्यांना मिळतो. या सरोवरांपैकीं टांगानिका सरोवर सर्व जगांत मोठें असून त्याची लांबी ४०० मैल आहे. याच प्रचंड सरोवरांतून लकूगा नदींतून काँगोला प्रचंड पाणी पुरवठा होतो. त्याचप्रमाणें न्यासा सरोवर लांबीला ३४० मैल असून त्याची सर्वांत जास्त खोली २६०० फूट आहे. झांबेझी नदीचा जगप्रसिद्ध व्हिक्टोरिया नांवाचा धबधबा ४०० फूट उंचीवरून कोसळतो. या ठिकाणीं नदी सुमारें एक मैल रुंद आहे. धबधबाहि याच भागांत आहे.

दक्षिणेकडून म्हणजे केप ऑफ गुड होपकडून उत्तरेकडे येतांना या सर्व भागांत भूमध्य सामुद्रिक हवामान लागतें. तसेंच न्यूव्हेल्ड पर्वत, ग्रेटकारू डोंगर, आणि पूर्वेकडील ड्रेकन्सबर्ग पर्वत हे किनाऱ्यापासून थोड्या अंतरावर लागतात. त्यांची उंची दोन ते दहा हजार फुटांपर्यंत आहे. या पर्वतांना ओलांडून आपण पठारावरील व्हेल्डच्या गवताळ प्रदेशांत ऑरेंज नदीपर्यंत येतों. दक्षिण आफ्रिकेंतली हीच सर्वांत मोठी नदी होय. ऑरेंज नदीपासून झांबेजी नदीपर्यंतच्या अंतरापैकीं सुमारें अर्धा भाग कलहारी वाळवंट आहे. खरें पाहतां हें वाळवंट असें नाहीं; कारण हा सर्वच प्रदेश गवताळ आहे. परंतु येथील जमीन मात्र वालुकामिश्रित आहे. कलहारीचा प्रदेश सुमारें ६०० मैलांचा असून त्यांत गवत, झुडपें, व कांहीं ठिकाणीं लोकवस्ती आहे. पावसाळ्यांत या ठिकाणीं छोटीं सरोवरें व बरींच डबकीं तयार होतात.

दक्षिण आफ्रिकेंत सॅव्हानामधीलच प्राणी असून त्यांत मुख्यत्वें शहामृग हा व्यापारी दृष्टीनें महत्त्वाचा आहे. कारण त्याच्या पिसांना किंमत चांगली येते. त्याचप्रमाणें या भागांत हिऱ्यांच्या खाणी असून किंबर्ले शहर त्यासाठीं प्रसिद्ध आहे. ऱ्होडेशिया व जोहान्सबर्ग जिल्हा येथें सोन्याच्या खाणी आहेत. या सर्व भागांत वायव्य किनाऱ्यावरील हॉटेन्टॉट या तेथील रानटी लोकांपासून वसाहतीसाठीं गेलेल्या लोकांना फारसा त्रास झाला नाहीं. परंतु डोंगरापलीकडील झुडपाच्या प्रदेशांतील लोक मात्र अतिशय तापदायक ठरले; कारण त्यांच्या विषारी बाणांची व अचूक तिरंदाजीची जबरदस्त दहशत वाटते. याच भागांत झुलु काफीर यांची वस्ती आहे. झुलू लोक हुषार, बुद्धिमान् व चपळ आहेत.

सुदानी शिपाई

मादागास्कर हें बेट आफ्रिकेच्या पूर्वेस २४० मैलांवर जवळच असून त्याची लांबी सुमारें ९८० मैल व

रुंदी ३६० मैल आहे. हें बेट आफ्रिकेच्या जवळ आहे इतकेंच. बाकी या बेटाचें आफ्रिकेशीं कोणत्याहि प्रकारचें साम्य नाहीं.

आफ्रिकेची लोकसंख्या अद्याप बरोबर सांगतां येत नाहीं; कारण जंगलांतल्या टोळ्यांची संख्या बरोबर मिळत नाहीं. परंतु तज्ज्ञांच्या मतें ती सुमारें १५,५०,००,००० असावी. आणि त्यापैकीं १२,५०,००,००० ही संख्या येथील मूळ रहिवाशांची असून बाकीचे बाहेरून येऊन स्थायिक झाले आहेत. या येथील रहिवाशांमध्यें-बुशमन, नीग्रो, हेमिटिक व सेमिटिक असे चार प्रकार दिसतात. त्यांपैकीं बुशमन हे दक्षिण आफ्रिकेच्या आंतल्या भागांत राहतात. हे लोक पिवळसर रंगाचे, बुटके असे आहेत. हॉटेन्टाट हे बुशमन व इतर मूळ आफ्रिकेंतले लोक यांची संमिश्र प्रजा असावी. मध्य व दक्षिण पठारावर आणि जंगलांतून राहणारे नीग्रो हे आफ्रिकेच्या मूळ खऱ्या रहिवाशांचा नमुना आहे. त्यांच्यांत दोन विभाग स्पष्ट दिसतात. सुडानमध्यें राहणारे नीग्रो लोक गिनीचा किनारा (अगर सेनिगांबिया) व नाईल नदी यांमधील प्रदेशांत राहतात. हे लोक शेतकरी असून ते पिकें काढतात, जमिनीची लागवड करतात आणि पशुपालन करतात. त्यांना कापड विणण्याची कला माहीत आहे. तसेंच धातू वापरण्याचाहि त्यांना सराव आहे. त्यांच्या झोपड्या चौकोनी असतात. पंचवीस-तीस वर्षांपूर्वी त्यांच्यांत नरमांस भक्षणाची चाल होती. अद्यापहि त्यांच्यांत जखमेच्या खुणा हें सौंदर्यवर्धनाचें प्रमाण मानतात व त्यासाठीं अंगावर जखमा करून घेतात. धनुष्यबाण, लांकडांच्या ढाली, वगैरे हत्यारांचा ते उपयोग करतात. मांत्रिक वगैरेंस ते फार मान देतात. दुसरा विभाग म्हणजे विषुववृत्तावरील घनदाट अरण्यापासून पार दक्षिणेकडे केप भुशिरापर्यंत राहणारे बंटू लोक. हे लोकहि शेती करतात. गुरें बाळगतात. व गवताच्या छपरांच्या वाटोळ्या झोपड्यांतून राहतात. जनावरांचा दुभत्यासाठीं उपयोग केला जातो. त्यांना लोखंडाचा हत्यारासाठीं उपयोग कसा करावा हें पूर्ण माहीत आहे. भाला व कातडी ढाल हीं त्यांचीं मुख्य हत्यारें होत. त्यांचा धर्म रूढींवर अवलंबून असून वंशपरंपरा चालीरीति ते पाळतात.

बुशमन

हेमिटिक हे बऱ्याच लोकांची मिश्र प्रजा असून त्यांत जुने नीग्रो गुलाम, ॲटलॉस पर्वताशेजारील बर्बर लोक ही वर्णसंकर प्रजा आहे. सेमिटिकमध्यें नीग्रो, उत्तर व वायव्येकडील अरब व इथिओपियांतले रहिवासी यांचा वर्णसंकर आहे. जरी हा सर्व प्रकार असला तरी हे सर्व लोक मुसल्मानी धर्म पाळतात, त्यामुळें त्यांत फारसा फरक नाहीं.

ईजिप्त व उत्तर किनारा आणि त्या जवळचे देश त्या त्या नांवाखालीं दिलेले आहेत.

मंगोपार्क, जेम्स ब्रूस, लिव्हींग्स्टन, स्पेक, पॉल-डु-चैलू, सेलस, स्टन्ले या संशोधकांचीं नांवें आफ्रिका खंडाच्या इतिहासाशीं निगडित आहेत.

सॅव्हानाच्या प्रदेशांत पिकांची लागवड; त्सेत्से माशीचा नायनाट करून गवताळ जमिनीवर युरोपांतल्या प्रसिद्ध दुभत्या जनावरांचें संवर्धन; डोंगरउतारावरून इमारती; लांकडांची पैदास; कॉंगोच्या खोऱ्यांत रबराची लागवड; सोनें, हिरे, तांबें; [जगांतील सोन्यापैकीं निम्में सोनें आफ्रिकेंतून बाहेर पडतें. हिऱ्यांपैकीं शेकडा ८० टक्के आफ्रिकेंतल्या खाणींतून काढतात. लोखंड व कोळसा भरपूर आहे. कॉंगोच्या दक्षिण बाजूस प्रचंड तांब्याचा सांठा भूगर्भांत आहे] कोळसा, लोखंड, मँगेनीज वगैरे खनिज संपत्ति; जनावरांचीं कातडीं, हस्तिदंत, शहामृगाचीं पिसें, वगैरे निसर्गाच्या संपत्तीनें या खंडाचें कोठार भरलेलें आहे. परंतु हें कोठार सहजासहजीं मानवाला हालवतां येणार नाहीं. कारण अद्याप पुष्कळ ठिकाणीं सोईस्कर मार्ग नाहींत, त्यामुळें वाहतुकीला अडचण येते.

या खंडांत जलमार्ग जवळजवळ नाहींतच. समुद्राला मिळणाऱ्या नद्यांपैकीं चार मोठ्या नद्या म्हणजे नायगर, कॉंगो, नाईल व झांबेझी. यांवरुन मात्र रहदारी चालते व त्यांचा जलमार्ग म्हणून उपयोग होतो. त्याचप्रमाणें मोठमोठ्या सरोवरांतून छोटया छोटया बोटी चालतात.

फ्रेंच उत्तर आफ्रिका व ब्रिटिश दक्षिण आफ्रिका या प्रदेशांत लोहमार्गांचें जाळें आहे. त्यामुळें प्रवासाची व वाहतुकीची सोय चांगली आहे. नाईल नदीच्या खोऱ्यांतून खार्टुमपर्यंत लोहमार्ग येतो. व तेथून एक मार्ग पश्चिमेकडे सूदानमध्यें जातो व दुसरा पूर्वेकडे तांबड्या समुद्रापर्यंत जातो. पूर्व आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील सर्व ब्रिटिश बंदरें व्हिक्टोरिया व टांगानिका सरोवराला लोहमार्गानें जोडलेलीं आहेत. दक्षिण आफ्रिकेंतल्या लोहमार्गांपैकीं एक मार्ग बेल्जियन कॉंगोमध्यें जातो व तेथून पूर्वकिनाऱ्यानें पोर्तुगीजांची मोझांबिक ही वसाहत ओलांडून पोर्तुगीज ॲंगोलापर्यंत येतो. फ्रेंचांच्या प्रदेशांत ओरानपासून टायरपर्यंत लोहमार्ग आहे. या मार्गाला लष्करी हालचालींच्या दृष्टीनें

फार महत्त्व आहे. याशिवाय किरकोळ मार्ग आहेत. परंतु सर्वांत महत्त्वाचा मार्ग म्हणजे केप-कैरो मार्ग होय.

या मार्गाची मूळ कल्पना म्हणजे आफ्रिकेचें उत्तर व दक्षिण टोंक जोडलें जावें. परंतु हा मार्ग काँगोच्या खोऱ्यांतील घनदाट अरण्यामुळें पूर्णावस्थेस गेलेला नाहीं. जर हा रस्ता पूर्ण झाला तर आफ्रिकेचा उत्तर किनारा व दक्षिण टोंक एकत्र जोडलें जाईल. विषुववृत्तावरील जंगलांचा व्यापारी दृष्टीनें उपयोग होईल व दक्षिण आफ्रिकेंतला कच्चा माल युरोप खंडांत त्वरित रवाना होऊं शकेल.

लमाण मार्गांना नीट स्वरूप देऊन त्यांचे मोटारसाठीं रस्ते बनवण्याचें कार्य चालू आहे. गेल्या महायुद्धांत अमेरिकन सैन्याच्या मोटार वाहतुकीसाठीं गिनीच्या आखातापासून फ्रेंच मुलुखांतून बेल्जियम काँगोमधून म्हणजे दक्षिण सूडानमधून असे रस्ते बनविले आहेत. हे रस्ते ईजिप्तकडे व पूर्वेकडे येतात. लढाईनंतर आतां त्यांचा उपयोग वाहतुकीसाठीं होईल. विमानमार्गेहि मोठमोठीं शहरें एकत्र जोडीत आहेत. सारांश, या खंडाचें अंतर्भागाचें संशोधन संपलेलें असून आतां सुधारणांचा काल उजाडला आहे. या खंडाचें आणखी एक वैशिष्टय असें आहे कीं, त्याच्या मधील भागांतून विषुववृत्त व कर्कवृत्त आणि मकरवृत्त हीं आडवीं गेल्यानें उष्णकटिबंधाचा खूपच मोठा प्रदेश या खंडांत येतो. उत्तर भागांतून कर्कवृत्त जातें व दक्षिण भागांतून मकरवृत्त जातें. उत्तर भागांत जगांतला सर्वांत मोठा ओसाड प्रदेश, विषुववृत्तावर घनदाट अरण्यांचा प्रदेश व बाकी सर्वत्र गवताळ प्रदेश आहे.

या प्रचंड खंडाची प्रगति भूरचना, अतिशय उष्ण व रोगट हवामान यांमुळेंच मुख्यत्वें झाली नाहीं. तसेंच तेथील स्थानिक रहिवाशांबरोबर चाललेला झगडा व त्यांतच युरोपिअन राष्ट्रांची आपापसांत चाललेली चुरस यांची भर पडून या खंडांतील निसर्गाच्या संपत्तीचा उपभोग घेणें मानवाला अद्याप साध्य झालें नाहीं. या सर्व खंडापैकीं सुमारें ३/४ जमीन फ्रान्स व ब्रिटन यांच्या मालकीची असून सहाराचें वाळवंट मात्र फ्रान्सच्या मालकीचें आहे. ईजिप्त ते पूर्व किनाऱ्यानें केपटाउनपर्यंतचा सरळ मुलूख ब्रिटनचा आहे. या खंडाच्या राजकीय विभागांची माहिती निराळी त्या त्या नांवाखालीं सांपडेल.

**आफ्रिडी**—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरची खैबर खिंडीनजीक राहणारी एक तुर्की जमात. वंशानें हे पठाण असून पुश्तु भाषा बोलतात. धर्म अर्थात् इस्लामी आहे. या लोकांनीं ब्रिटिश सरकारला फार उपद्रव (विशेषतः १८९७-९८ सालीं) दिलेला आहे. १९२२ सालीं नव्या लष्करी खासदार (Irregulars) योजनेंत त्यांचा समावेश केला आहे.

**आंब**—हरभऱ्याच्या झाडापासून एक प्रकारचें जें अम्ल तयार होतें त्यास म्हणतात. ही अतिशय आंबट असते. ही औषधी असून थोडी घेतली तर जठराग्नि प्रदीप्त होऊन मोडशी वगैरे अपचनाचे विकार नाहींसे होतात. व्हिनीगर ज्या कामांस उपयोगी पडतें त्या ठिकाणीं देशी आंबेची योजना करतां येईल.

**आबई**—ही एक घेवड्याची जात आहे. याची विशेष लागवड केलेली कोठें आढळत नाहीं. पण सर्व हिंदुस्थानांत हिमालयापासून सिलोन व सयाम यांपर्यंत साधारणतः बागेंत, शेताच्या कांठावर अथवा झोंपड्याच्या छपरांवर दृष्टीस पडते. ह्याच्या शेंगांची भाजी करतात व बिया विशेषेंकरून आमटींत घालतात.

**आंबगांव जमीनदारी**—मध्यप्रांत, भंडारा जिल्हा. बाग नदीच्या आसपासचा प्रदेश, या जमिनदारींत येतो. क्षे. फ. ७९ चौ. मै.. यांत ३८ गांवें आहेत. आंबगांव हें मुख्य ठिकाण बंगाल-नागपूर रेल्वेवरचें एक स्टेशन आहे. १७९६ पासून ही जमीनदारी अस्तित्वांत आहे. लो. सं. सु. २५०००

**आबदारखाना**—अठरा कारखान्यांपैकीं एक. आबदारखान्याला शिवाजीच्या वेळेस पानीयशाला असें नांव दिलें होतें. सातारच्या छत्रपतींच्या खाजगी खात्याकडील शके १७४१ मधील यासंबंधीं नियम इतिहाससंग्रहांत (पु. ६ अं. ७-९) प्रसिद्ध झाले आहेत.

**आंबा**—[ वर्ग–आनाकार्डिआसी–मांगिफेरा इंडिका ]. उष्ण कीटबंधांत आंब्याचीं झाडें सर्वत्र लावण्यांत येतात. याच्या कांहीं फार उत्तम जाती आहेत. त्यांचीं फळें दळदार, किंचित् आंबट असून तीं भोजनोत्तर खाण्याचा फार प्रघात आहे. आंब्याच्या फळांचें लोणचें, चटणी, मुरंबा, वगैरे करतात. आंब्याच्या फोडी वाळवूनहि विकण्यांत येतात. आंब्याच्या कांहीं जातींचीं कलमें करून त्यांचा प्रसार अनेक ठिकाणीं करण्यांत येत आहे. व अशा कांहीं उत्कृष्ट जाती तयार करण्यांत आल्या आहेत. गोवा प्रांतांत नामांकित कलमी आंबे–आपूस, पायरी, मलगोवा, मांकूर, फर्नांडीस, सेंट झेविअर वगैरे प्रसिद्ध आहेत. मद्रासकडे नीलम आंबा प्रख्यात आहे व उत्तर हिंदुस्थानांत लंगडा आपूस प्रसिद्ध आहे.

**आबाजी कृष्ण शेल्लूकर**—पेशवाईतील एक सरदार.

सातारा जिल्ह्यांत कोरेगांव ताल्लुक्यांत फत्यापूर म्हणून एक गांव आहे तेथचा हा कुलकर्णी. प्रथम ह्यानें फडांत कारकुनीची जागा मिळविली. ह्याचें अक्षर फार उत्तम होतें व लिहिण्याची शैली इतकी उत्कृष्ट होती कीं, त्यामुळें पुढें नाना फडणविसानें आपल्या खाजगी कारकून मंडळींत त्याची नेमणूक केली. लवकरच आपला कागदपत्रांचा रुमालहि त्याच्या ताब्यांत ठेविला. नानाच्या कृपेनेंच पुढें ह्याला गुजरातची सुभेदारी मिळाली. नाना फडणविसाला शिंद्यानें कैदेंत टाकिलें तेव्हां आबाचीहि तीच वाट केली. दहा लाख रुपये देण्याच्या कबुलीवर त्याची सुटका होऊन तो सुभेदारीच्या कामावर रुजू झाला. शेलूकर नानांच्या पक्षाचा असल्यानें बाजीरावानें गोविंदराव गायकवाडाला त्याच्याविरुद्ध उठविलें. शिंद्याची १० लाख खंडणी आबाला निकडीनें द्यावयाची होती, तेव्हां त्यानें गुजरातेंत मोठा जुलूम करून जादा वसूल केला व कांहीं गायकवाडी गांवांपासूनहि कर जमा केला. तेव्हां गोविंदराव व आबा शेलूकर यांमध्यें लढा सुरू झाला. गायकवाडानें इंग्रजांना वश करून घेऊन आबास कैद केलें व अहमदाबाद ताल्लुक्यांतील पेशव्यांचीं ठाणीं आपल्या ताब्यांत घेतलीं. तेव्हां पुणें दरबारनें तडजोड करून आबा शेलूकरास हुजूरकडे धाडून देण्यास गायकवाडास लिहिलें. शेलूकर कधीं वारला हें कळत नाहीं. पुण्यास शालूकराचा बोळ प्रसिद्ध आहे.

**आबाजी विश्वनाथ प्रभू** (१६३१—१६९४)—एक मराठेशाहींतील सरदार. बाजी पासलकराबरोबर नेहमीं राहून तो राज्याचें काम करीत असे. त्याची हुशारी पाहून शिवाजीनें त्यास स. १६४९ त आपल्या सरदारांत दाखल केलें, तेव्हांपासून किल्ले वगैरे काबीज करण्यांत व शिवाजीच्या इतर मोहिमांत आबाजी प्रभू नेहमीं हजर असे. जावळी काबीज करतांना मोऱ्यांशीं लढून यानें जय मिळविला. पुढें वासोटा किल्ला काबीज करण्यांतहि आबाजीनें बहुत पराक्रम केला. तसेंच रोहिडा किल्ला घेण्यांत त्याचाच हात होता.

शिवाजी वारल्यानंतर संभाजीनें पुष्कळ सरदारांचीं वतनें खालसा केलीं; तेव्हां हे मावळे सरदार फार हवालदिल झाले. या प्रसंगीं आबाजीनें त्यांना दिलदिलासा देऊन औरंगजेबाच्या फौजेविरुद्ध प्रांताचें रक्षण केलें. सेनापति खंडेराव पानसंबळ याच्या हाताखालीं राहून, त्यानें जो पराक्रम गाजविला त्याबद्दल राजारामानें सेनापतीच्या सांगण्यावरून त्यास नवीन इनाम करून दिलें.

औरंगजेबाच्या फौजेनें स. १६९४ त तोरणा उर्फ प्रचंडगड किल्ल्यास वेढा घातला असतां आबाजीनें त्या किल्ल्याचें संरक्षण मोठ्या मर्दुमकीनें केलें. पण मोंगलांशीं लढून किल्ल्यांतून निघून जात असतां सन १६९४ त हा शूर वीर धारातीर्थीं पतन पावला.

**आबाजी सोनदेव** (बहुतकर)—मराठेशाहींतील एक सरदार. शहाजीच्या पदरीं असलेल्या सोनोपंत डबिराचा हा मुलगा. हा दादोजी कोंडदेवाच्या तालमींत तयार झाला होता. याचा भाऊ निळो सोनदेव याला १६४७ त शिवाजीनें अमात्य केलें. इ. स. १६४८ त आबाजीनें कल्याणवर अचानक हल्ला करून तेथील मुल्ला अहमद नांवाच्या सुभेदारास कैद केलें, व कल्याण आणि कल्याणच्या आसपासचे सर्व किल्ले हस्तगत केले. तेव्हां शिवाजीनें खुष होऊन त्यास त्यानें जिंकलेल्या मुलुखाचा सुभेदार नेमिलें.

इ. स. १६६६ त ज्या तीन गृहस्थांकडे राज्याचा कुल अखत्यार देऊन शिवाजी अवरंगजेबाच्या दरबारीं आग्र्यास गेला त्यांत आबाजी सोनदेव होता. १६७० त मोरोपंत पिंगळे याजबरोबर आबाजी माहुली किल्ला व कल्याण प्रांत सर करून आला. राजारामानें १६९२ त आबाजीस रायगड घेण्यास पाठविल्याचा उल्लेख सांपडतो.

**आंबोयना**—इंडोनेशिया, मलाक्का द्वीपसमूहापैकीं ३६० चौरस मैल क्षेत्रफळ असलेलें बेट. लो. सं. ४००००. या बेटांची मसाल्याचीं बेटें म्हणून प्रसिद्धि आहे. लवंगा व जायफळें यांची लागवड फार मोठ्या प्रमाणावर येथें होते. बहुतेक सर्व वस्ती मलयु लोकांची असून आसपासच्या बांडा सीरम्, बुरु आणि इतर बेटें या आंबोयानाच्या डच रेसिडेन्सीमधूनहि बहुतेक मलयु लोकांचीच वस्ती आहे. मुख्य ठिकाण आंबोयना असून तें चांगलें संरक्षित आहे. हें 'खुलें' बंदर आहे. लो. सं. १००००. येथील डच लोकांनीं एकदां तेथील इंग्रजांची केलेली कत्तल इतिहासप्रसिद्ध आहे.

**आंभी**—तक्षशिलेचा राजा. सिकंदरनें जेव्हां हिंदुस्थानावर स्वारी केली त्या वेळीं तो त्याच्या एकदम अधीन झाला व पौरव (पोरस) राजावर स्वारी करण्यास त्यानें त्याला उत्तेजन दिलें. त्यामुळें सिकंदरनें परत जातांना त्याला एका जिंकलेल्या प्रदेशावरचा सुभेदार नेमिलें.

**आभीर**—या नांवाचें राजघराणें आंध्रानंतर खानदेश आणि गुजरात या भागांत होऊन गेलें. अहीर लोक या आभीर समाजांतीलच होत. आठव्या शतकांत गुजरातेंत जेव्हां काठी लोक आले तेव्हां त्यांवर आभीरांची सत्ता चालत होती. आभीर-अहीर हे परद्वीपस्थ असून हिंदुचातुर्वर्ण्यांत शिरले असें कांहीं समाजशास्त्रज्ञ व इतिहासकार मानतात. पुराणांत भविष्यकालीन राजे सांगतांना आंध्रानंतर दहा आभीर राजांचा उल्लेख आहे. रुद्रभूमि, ईश्वरसेन यांसारखीं आभीरांचीं नांवें शिलालेखांतून आढळतात. तथापि यांचा सुसंगत इतिहास लागलेला नाहीं.

**आमटी अम्ल**—( ऑक्सॅलिक ॲसिड ). हें द्विक्षाराम्ल ( डायबेसिक ॲसिड ) असून कांहीं झाडांत हें स्वतंत्रपणानें सांपडतें. पण सामान्यतः पालाशाचें ( पोटॅशियम ) लवण ( उदा., वुड-सोरेल, ऱ्हुबार्ब वगैरेंमध्यें ) किंवा खटाचें ( कॅल्शियमचें ) लवण ( शेवाळामध्यें ) म्हणून सांपडतें. साखरेवर नत्राम्लाची क्रिया करून हें तयार करतां येतें. हें अम्ल आणि त्यांचीं लवणें दोन्ही विषारी आहेत.

**आमलीयार**—मुंबई, महीकाठांतील एक छोटें संस्थान. वात्रककाठामध्यें माजम नदीच्या तीरीं ३३ खेडीं मिळून ही जहागीर बनली आहे. वार्षिक उत्पन्न अर्धा लाख. आमलीयारचे ठाकूर चवथ्या वर्गांतील संस्थानिक आहेत. ते खातकोळी जातीचे हिंदू आहेत. अजमीरच्या चव्हाण रजपुतांचे आपण वंशज आहोंत असें ते मानतात. औरंगजेब बादशहाच्या अमदानींत आमलीयारची जहागीर त्यांना मिळाली, असें म्हणतात. हल्लीं हे गायकवाडांना खंडणी ( घासदाणा ) पोंचवितात.

राजधानी आमलीयार हा दीड हजार लोकवस्तीचा गांव अहमदाबादच्या ईशान्येस ३४ मैलांवर आहे. येथें एक शंकराचें देऊळ, एक मशीद व जुन्या गांवाचे अवशेष आहेत.

**आमांश**—हा एका सूक्ष्म जंतूपासून होणारा तीव्र प्रकारचा रोग आहे. हा उष्ण प्रदेशांत विशेष आढळतो. या रोगामध्यें पोटांत कळ येते, आणि रक्त व श्लेष्मा बाहेर पडूं लागतात. हा रोग संसर्गजन्य असून संसर्ग मुखद्वार होतो. हा रोग झाला असतां ताप येतो, पोटांत दुखूं लागतें आणि वरचेवर रेच होतात. हा फार जलद वाढतो. प्रथम मलामध्यें केवळ आम अथवा श्लेष्मा असतो. परंतु नंतर रक्त जाऊं लागतें. या रोगाची तीव्रता कांहीं प्रसंगीं ४८ तासांत अतिशय वाढते आणि ३ ऱ्या किंवा ४ थ्या दिवशीं रोगी दगावतो. रोग तीव्र स्वरूपाचा नसल्यास तो कांहीं आठवडे टिकतो व पूर्ण बरें होण्यास आणखी कांहीं दिवस लागतात. कांहीं रोग्यांमध्यें हा रोग अनेक वर्षेंहि ठाणें धरून बसतो. यावर बिस्मथ हें औषध देण्यांत येतें. तसेंच कळा थांबण्यास मॉर्फिया उपयोगी पडतो. रोगाची तीव्रता कमी झाल्यानंतर गुदद्वारा मिठाचें पाणीहि देण्यांत येतें. दीर्घकालीन रोगामध्यें पथ्य पाळणें अवश्य असतें.

आयुर्वेदीयदृष्ट्या यांत बहुतकरून वायूचाच जोर असतो, म्हणून या विकारांत मुरडा व कुंथून शौचाला होणें हीं मुख्य लक्षणें असतात. यांवर अंतर्बाह्य तेलाचा उपयोग करणें हितावह होय. दशमुळांच्या काढ्यानें अगर कचोरा, बडिशेप, कोष्ठ यांनीं तयार केलेल्या काढ्यांत तूप अगर तेल घालून त्याची बस्ति दिल्यानें मुरडा व आंव दोन्हीहि लवकर थांबतात.

**आमीन्स**—फ्रान्स, उत्तर भागांतील सोमे विभागाचें मुख्य शहर. १८०२ सालच्या नेपोलियन-युद्धांतील तहासंबंधीं हें शहर प्रसिद्ध आहे. लो. सं. ९३,७७३.

येथील पिकाडी नांवाच्या पदार्थ-संग्रहालयांत बऱ्याच तसबिरी, पुतळे व जुन्या अवशिष्ट वस्तूंचा भरणा आहे. येथें एक मोठें ग्रंथसंग्रहालय आहे. हें धर्माधिकारी, प्रिफेक्ट यांचें राहण्याचें स्थान आहे. येथें लोंकर, रेशीम, ताग, वगैरेंचे कारखाने आहेत. येथें धान्य, साखर, लोंकर, गळिताचीं धान्यें, वगैरेंचा व्यापार चालतो.

**आमूर नदी**—पूर्व आशियांतील मोठ्या नद्यांपैकीं एक. ही नदी १५०० मैल लांब असून ओखोटस्क समुद्राला मिळते. ती रशिया व चीन यांच्या सरहद्दीवर असून या नदींतून जहाजांची वाहतूक दरसाल चार महिने चालते.

**आमूर प्रांत**— हा रशिया, सायबेरिया, आमूर नदी आणि स्टानोव्हाय पर्वत यांच्यामध्यें असून तो १८५८ सालीं चीनकडून रशियाला मिळाला. क्षे. फ. १५४,७९५ चौ. मै. व लो. सं. २६१,५०० आहे. सोनें व थोडा दगडी कोळसा येथें सांपडतो. सर्व प्रदेश गुरचरणमय आहे. येथील हवामान शेतीला अनुकूल नाहीं.

**आमोद**—मुंबई, भडोच जिल्ह्याच्या ईशान्येकडील जुना तालुका व शहर. १७५७ सालीं आमोद महाल मुधोजी भोसले याजकडे होता. नारायणराव पेशव्याच्या खुनानंतर राघोबादादासंबंधीं जें इंग्रज-मराठे युद्ध झालें त्यांत आपटणच्या तहाप्रमाणें आमोद वगैरे भडोचभोंवतालचा तीन लाखांचा मुलूख इंग्रजांकडे राहूं द्यावा असें ठरलें ( १७७६ ). सालबाईच्या तहान्वयें पुन्हा हा तालुका मराठ्यांकडेच आला. १८०३ मध्यें इंग्रजांनीं भडोच जेव्हां शिंद्यापासून जिंकून घेतलें तेव्हां आमोदच्या संस्थानिकापासून खंडणीहि घेण्यास त्यांनीं सुरवात केली. १८१७ त झालेल्या पुण्याच्या तहाप्रमाणें जंबुसर, आमोद व देहेज भडोचला जोडण्यांत आलीं.

आमोद गांव—भडोच शहराचे उत्तरेस २४ मैलांवर हा ७०८८ लोकवस्ती ( इ. स. १९४१ ) चा गांव आहे. इ. स. १८८७ पासून येथें म्युनिसिपालिटीची शाळा व एक दवाखाना आहे. पाऊस सरासरी ३६ इंच पडतो. पूर्वी या गांवाला तट होता व एक किल्ला होता व त्याभोंवतीं जुन्या मशिदी होत्या. व्यापार मुख्यतः कापसाचा आहे. चाकू, वस्तरे यांसारखीं हत्यारें करणारे कारागीर आहेत.

**आयझिंग्लास**—हा शब्द हुझेन ग्लास ह्या मूळ डच शब्दापासून निघालेला असावा, असा कित्येकांचा समज आहे. स्टर्जन माशांच्या पोटांतील वायूच्या पिशव्यांपासून केलेला हा एक

चिकट पदार्थ आहे. दुसऱ्याहि कित्येक इतर जातींच्या माशां-पासून हा पदार्थ तयार होऊं शकतो. परंतु त्या सर्वांत स्टर्जन माशांचें आयझिंग्लासच उत्तम दर्जाचें असें मानलें जातें.

रशियन, ब्राझिलियन, आणि पीनांगमधील माशांच्या पोटांतून आंतडीं काढून चांगलीं स्वच्छ धुवून काढतात. व नंतर तीं वाळवितात. मद्यें, बीर नांवाची दारू व इतर प्रवाही पदार्थ ह्यांची मळी काढून त्यांस पारदर्शक व शुद्ध करण्याकडे या पदार्थाचा उपयोग करितात. साध्या जिलेटिनमध्यें हा गुण नसून तो फक्त आयझिंग्लासमध्येंच आढळतो. हा पदार्थ खाण्याच्या पदार्थांत व विशेषेंकरून मिठाईत व मुरंबे वगैरेंमध्यें घालतात. गोंदाबरोबर मिश्रण करून रेशमी कपड्यास लावल्यानें कपड्यास जास्त चकाकी येते. ज्येष्ठमधाच्या शिऱ्याच्या कांड्या काजळांत घोटल्यास उत्तम काळा रंग तयार होतो. वितळलेल्या सरसांत थोडें असेटिक ॲसिड व गुलाबा अत्तर मिसळल्यास उत्तम सीमेंट होतें. मद्यार्क २ भाग घेऊन त्यांत आयझिंग्लास मिश्रण केल्यास एक पक्कें सीमेंट तयार होतें. तें फुटलेल्या कांचेच्या किंवा चिनी मातीच्या भांड्याची दुरुस्ती करण्यास फार उपयोगी पडतें.

**आयडर वदक**— ही एक वदकांची जात आहे. हे पक्षी

४५ अक्षांशांचे वरील प्रदेशांत आढळतात. त्यांची ग्रीनलंड व आईस्लंडमध्यें फार मोठ्या प्रमाणांवर उत्पत्ति होते. हे सामान्य वदकाच्या दुप्पट मोठे असतात. हे एकांतांत राहतात व कालवां-वर वगैरे उपजीविका करतात. हे आपलीं घरटीं वाळलेल्या समुद्र-ल्व्हाळ्यांचीं करतात व आंतील बाजूस आपल्या अंगा-वरील पर घालतात. हे पर उबदार, हलके व लवचिक असल्यामुळें त्यांस फार मोठी मागणी असते.

**आयडोफॉर्म**— हा एक क्लोरोफॉर्मसारखाच पदार्थ आहे. यामध्यें हर (क्लोरिन) च्या ऐवजीं अद (आयोडिन) असतें. याचा उपयोग जंतुघ्न म्हणून कोरड्या चूर्णाच्या रुपानें किंवा मलमामध्यें करतात.

**आयनीभवन-करण**—( आयॉनायझेशन ). आयनीभवन ही संज्ञा प्रथम फॅरेडे यानें विद्युद्विश्लेष्य म्हणून माहीत असलेले कांहीं पदार्थ पाण्यांत विद्रुत केले असतां त्यांच्या ठिकाणीं जो विद्युद्वाहक धर्म उत्पन्न होतो व त्यामध्यें जी क्रिया दिसून येते त्या क्रियेस दिली होती. विद्युद्विश्लेषणाच्या नियमांचें स्पष्टीकरण करण्याकरितां त्यानें असें गृहीत धरलें होतें कीं, एखादा पदार्थ विद्रुत केला असतां त्या पदार्थाचें त्याच्या घटक मूलद्रव्यांमध्यें किंवा मूलकामध्यें विघटन होतें व या प्रत्येक मूलकावर कांहीं विद्युच्छक्तीचा भार असतो. या विद्युद्भारयुक्त मूलकास अथवा परमाणूस त्यानें विद्युत् अणु (आयन) असें नांव दिलें आणि या विद्युदणुभवनाच्या क्रियेस अण्वीभवन अशी संज्ञा त्यान दिली. रासायनिक विश्लेषणापासून ही क्रिया अगदीं भिन्न आहे. व विद्युदणूमध्यें विशिष्ट मूलद्रव्याचे जे विद्युद्-भाररहित परमाणू किंवा मूलक असतात त्यांचे रासायनिक गुणधर्म या विद्युदणूंमध्यें नसतात. या क्रियेचें वर्णन पुढें दिल्याप्रमाणें करतां येईल. उदा.—सिंधुहरिद किंवा साधें मीठ आपण घेतलें तर आपण अशी कल्पना करतों कीं, मीठ हें संयुक्तद्रव्य सोडियम किंवा सिंधूच्या एका ऋण विद्युत्कणाच्या हर अथवा क्लोरिनच्या परमाणूकडे होणाऱ्या गतीमुळें व त्यांतील विद्युत्कण शोषून घेण्याच्या तीव्र प्रवृत्तीमुळें तयार होतें. या प्रवृत्तीचें स्पष्टीकरण परमाणूमध्यें विद्युत्कण असतात, या उप-पत्तीमुळें सुलभ रीतीनें करतां येतें. या उपपत्तीप्रमाणें मिठांतील हर (क्लोरिन)च्या परमाणूवर ऋणविद्युद्भार असतो आणि सिंधु (सोडियम)च्या परमाणूवर धनविद्युद्भार असतो व या दोहोंमधील परस्परांस आकर्षण करून घेण्याच्या शक्तीस रासायनिकबंधन असें म्हणतां येतें व या बंधनामुळेंच मिठांतलि प्रत्येक अणु (मॉलीक्यूल) एकत्र बांधलेला असतो. जेव्हां मीठ आपण पाण्यांत विरघळवितों तेव्हां त्यांतील हें बंधन नाहींसें होतें. आणि सिंधू व हर यांचे परमाणू विभक्त होतात, व त्या प्रत्येक परमाणूवर त्यांचा स्वतंत्र विद्युद्भार असतो. या द्रावणामध्यें विद्युत्क्षेत्र निर्माण केलें असतां या विद्युत्क्षेत्राची क्रिया विद्युद्भार-युक्त विद्युदणूवर पडते, व ते द्रावणांत हलूं लागतात, आणि धन विद्युद्भार असलेले विद्युदणू ऋण ध्रुवाकडे आणि ऋण विद्युद्भार असलेले अणू धन ध्रुवाकडे आकर्षिले जातात. या विद्युदणूंची चलनशक्ति फार अल्प असते व विद्युद्विश्लेषणामध्यें जी आपणास मोठमोठ्या शक्तींचे प्रवाह पाठविण्याची क्रिया आढळून येते तिचें कारण या विद्युदणूं-च्या चलनाची गति नसून त्यांची अमर्याद संख्या हें असतें

अण्वीभवन ही संज्ञा जेव्हां एखाद्या वायूस विद्युद्वाहक बनविण्यांत येते तेव्हां त्या क्रियेसहि लावण्यांत येते. सामान्य स्थितींतील वायू हे बहुतेक विद्युद्रोधक असतात. परंतु त्यांच्यावर कांहीं अण्वीभवनकारक पदार्थांची क्रिया केली असतां ते कांहीं प्रमाणांत विद्युद्वाहक बनतात. अशा तऱ्हेचे अत्यंत महत्त्वाचे अण्वीभवनकारक म्हटले म्हणजे क्ष–किरण, अतिनील किरण आणि किरणविसर्जक पदार्थांपासून विसर्जन पावणारे किरण हे होत. हें वायूंतील अण्वीभवन होण्याचें कारण त्या वायूमध्यें धन व ऋण विद्युत्भार असलेले अणु ( मॉलिक्यूल्स ) तयार होतात हें होय. व अशा अणूंस म्हणजे विद्युद्विश्लेषण क्रियेंतील अणूंस वायुवीय विद्युदणु असें म्हणतात. अशा तऱ्हेच्या वायुवीय विद्युदणूंचें महत्त्व आपणांस बाष्पयुक्त हवेमधून अण्वीभवनकारक किरण विसर्जन करून आणि अकस्मात् त्या हवेचें त्वरित प्रसरण करून तिच्यामध्यें शीतता उत्पन्न केली असतां दिग्दर्शित करतां येतें. ज्या विद्युदणूंवर विद्युद्भार असतो ते विद्युदणु अधिक असलेलें बाष्प ग्रहण करणारीं केंद्रें बनतात. आणि अशा तऱ्हेचा प्रत्येक विद्युदणु चकाकणाऱ्या पाण्याच्या थेंबानें युक्त असा दिसूं लागतो. जर ही अण्वीभवनाची क्रिया अतिशय संकेंद्रीत नसेल तर वायूंतील विद्युद् अणूंची संख्या प्रत्यक्ष मोजतां येते. सी. टी. आर. विल्सन यानें वायूंतील अण्वीभवनकारक विसर्जनांतील विद्युदणूंच्या मार्गांचे फार सुंदर असे प्रत्यक्ष छायालेख ( फोटोग्राफ ) घेतले आहेत.

वायूंतील अण्वीभवनकारक प्रवाह इतके दुर्बल असतात कीं, त्यांचा अतिशय संवेदनाक्षम अशा विद्युन्मापकावरहि परिणाम होत नाहीं. यांचें मापन विद्युन्मापक अथवा दर्शक याचा संबंध अण्वीभवनकारक पात्राच्या एका ध्रुवाशीं जोडून त्या ध्रुवावरील विद्युत्भार कोणत्या गतीनें वाढत जातो यावरून करण्यांत येतें. अशा रीतीनें $१०^{-१६}$ इतके सूक्ष्म ॲम्पीयर शक्तीचे विद्युत्प्रवाहहि मोजतां येतात. एखाद्या वायूंतील अण्वीभवनकारक प्रवाहामुळे त्याचें रासायनिक पृथक्करण होत नाहीं. कांहीं रासायनिक क्रियांमध्येंहि त्यांशीं संबंध असलेल्या वायूमध्यें अण्वीभवनक्रिया होते. उदा.–स्फुरचें प्राणिदीकरण हळूहळू केलें असतां ही क्रिया घडून येते. तसेंच कांहीं प्रकारच्या द्रवामध्यें हवेचे बुडबुडे उत्पन्न केल्यानेंहि ही क्रिया घडून आल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें.

**आयर्लंड**— ब्रिटिश बेटांतलें दुसरें मोठें बेट. याचें क्षेत्रफळ ३२,८२९ चौरस मैल. १९२२ पासून आयर्लंडचे दोन भाग पडले, एक आयरिश फ्री स्टेट व दुसरा नॉर्दर्न् आयर्लंड. आयरिश फ्री स्टेट मध्यें ४ प्रांत पाडलेले आहेत व त्यांचे ३२ परगणे आहेत. नॉर्दर्न् आयर्लंडमध्यें एकच प्रांत व ६ परगणे (काउन्टीज) आहेत. शॅनॉन ही एकच महत्त्वाची नदी आहे. तळीं व सरोवरें बरींच आहेत. आयर्लंडच्याभोंवतीं विशेषतः पश्चिम बाजूला कांहीं लहान लहान बेटेंहि आहेत. मध्यभागीं दलदलीचा बराच प्रदेश आहे. बाकीची जमीन सामान्यतः पिकाऊ आहे. डब्लिन, बेलफास्ट, कॉर्क, गालवे, लिमरिक, लंडनडेरी व वॉटरफर्ड हीं मुख्य व प्रसिद्ध शहरें आहेत.

**ग्रामीण आयरिश कुटुंब**

सुरवातीसच आयर्लंडमध्यें ख्रिस्ती धर्माचें बरेंच प्रस्थान बसलें. देशांत लहान लहान राजे व सरदार यांचा अमल होता. परंतु ते सर्व तारा येथील राजाच्या तंत्रानें वागत. ८ ते १० या शतकांत स्कॅंडिनेव्हियन यांचे लोकांच्या टोळ्यांचे वरचेवर हल्ले होत. शेवट १०१४ मध्यें ब्रायन बोरू यानें त्यांचा परभव करून कायमचा बंदोबस्त करून टाकला. इंग्लंडचा राजा दुसरा हेन्री, याच्या कारकीर्दीत आयर्लंड इंग्लंडला पूर्ण निगडीत करण्यांत आलें. हेन्री हा स्वतःला आयर्लंडचा लॉर्ड असें म्हणवून घेत असे व इंग्लंडचा राजा सातवा हेन्री यानें स्वतःला 'आयर्लंडचा राजा' अशी पदवी घेतली. तोंपावेतों आयर्लंडचा लॉर्ड असेंच इंग्लंडच्या राजांस म्हणत. स्थानिक आयरिश लोकांकडून जमिनी घेऊन त्या इंग्लंडच्या वसाहतवाल्यांस देण्यांत येऊं लागल्या व त्यामुळें देशामध्यें जमीनदार आणि बिगर जमीनदार असे लोकांचे दोन गट निर्माण झाले. पुढें सुधारणांच्या काळांत या दोन गटांना धार्मिक स्वरूप येऊन प्रॉटेस्टंट व कॅथॉलिक असे दोन तट परस्परांचे तीव्र विरोधक बनले. इंग्लंडमधून वसाहतीस येऊन जमीनदार झालेले लोक प्रॉटेस्टंट होते व बाकीचे मूळचे रोमन कॅथॉलिक होते. या दोन तटांमध्यें नेहमीं लढाया होत, एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीत ही यादवी परमावधीस पोंचली. व शेवटीं इंग्रज वसाहतवाल्यांचा वरचष्मा कायम झाला. १७ व्या शतकांत पहिला जेम्स यानें अल्स्टर परगण्यांत स्कॉच लोकांस आणून त्यांची वसाहत करविली; त्यामुळें पुन्हां वैमनस्य व दुफळी यांना ऊत येऊन उत्तर आयर्लंडमध्यें बंडें होऊन कत्तल व मालमत्तेची नुकसानी झाली. अखेरीस ही सर्व बंडाळी व दंगल मोडून ऑलिव्हर क्रॉमवेल यानें आयर्लंडमध्यें दहशतीचा अमल बसविला. तिसरा विल्यम व दुसरा जेम्स यांच्या दरम्यानचा लढा बहुतेक आयर्लंडबाहेरच लढला गेला व त्यामुळें पुन्हां प्रॉटेस्टंट लोकांची वरचढ बराच काळ राहिली. परंतु १७९० मध्यें रोमन कॅथॉलिक लोकांविरुद्ध असलेले कायदे व निर्बंध यांची तीव्रता

कमी करण्यांत आली. १७८२ मध्यें आयर्लंडला कायदे करण्याचा अधिकार मिळाला परंतु पार्लमेंटमध्यें सभासद होण्याचा अधिकार फक्त प्रॉटेस्टंट पंथीयांसच होता. १८ व्या शतकाचा उत्तरार्ध हा आयर्लंडच्या इतिहासांत बौद्धिक व कलाविषयक श्रेष्ठत्वाचा व नैपुण्याचा काळ होऊन गेला. इंग्लंड फ्रान्सबरोबर लढाईत गुंतलेलें पाहून आयरिश लोकांनीं पुन्हां एक उठावणी केली. परंतु ती यशस्वी झाली नाहीं. व्हिनेगर हिल येथें बंडखारांचा पूर्ण मोड करण्यांत आला. १८०० मध्यें आयर्लंडला दिलेलें पार्लमेंट रद्द करण्यांत आलें व ग्रेट-ब्रिटन व आयर्लंड यांचें संयुक्त पार्लमेंट करण्यांत आलें. १८२९ पर्यंत कॅथॉलिक लोकांची विशिष्ट निर्बंधातून मुक्तता होऊं शकली नाहीं. १८४५ मध्यें बटाट्यांचा दुष्काळ पडला व मध्यंतरीं भरारीनें वाढलेली लोकसंख्या उपासमारी व बहिर्गमन यांमुळें रोडावून देशांत पूर्वीच्या निम्म्यानेंहि लोक राहिले नाहींत. सुमारें शतकभर आयर्लंडमध्यें इंग्रजांविरुद्ध चळवळ चालूच होती व राजकारणांत पक्षभेद होते. अल्स्टरमधले लोक या सर्व प्रकारापासून अलिप्त राहिले. नॅशनॅलिस्ट पक्षानें पार्लमेंटमध्यें जाऊन देशाचे हक्क प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. ग्लॅडस्टन यानेंहि ३ वेळां आयर्लंडला होमरूल देऊं केलें. परंतु १९१४ पर्यंत कांहीं घडलें नाहीं. १९१४ मध्यें आयर्लंडला होमरूल देणारा कायदा इंग्लंडनें केला. परंतु त्याची अमलबारी होण्याच्या पूर्वींच पहिलें महायुद्ध सुरू झालें व त्यामुळें या कायद्याचें अमलबारीचें काम तसेंच राहिलें. महायुद्धानंतर आयर्लंडमधील स्वातंत्र्यप्राप्तीच्या चळवळीस पुन्हा सुरवात झाली व सिनफेन चळवळीचा उदय झाला. या पुरोगामी गटानें इंग्लंडचा व आयर्लंडचा कांहींच संबंध नाहीं असें धोरण आंखलें व जाहीर केलें आणि आयरिश ( रिपब्लिक ) लोकराज्याची स्थापना केली. पुढें उभय पक्षांत तह होऊन आयरिश फ्री स्टेटची स्थापना करण्यांत आली व उत्तरेकडील अल्स्टर प्रांतांतले सहा परगणे इंग्लंडला सोडण्यास व आयरिश फ्री स्टेटमध्यें सामील होण्यास तयार नसल्यानें त्यांचें नॉर्दर्न आयर्लंड म्हणून एक स्वतंत्र राज्य बनविण्यांत आलें व तें ग्रेट-ब्रिटनच्या अधिराज्यांत आणि पार्लमेंटमध्यें संयुक्त म्हणून राहिलें. १९३८ सालीं आयरिश फ्री स्टेट स्वतंत्र झालें. पहिल्या महायुद्धांतल्याप्रमाणें त्यानें ब्रिटिशांना जर्मनांशीं लढण्याला मदत न करतां तें तटस्थ राहिलें. आतां इंग्लंडशीं असलेला सर्व संबंध सोडून देण्याचा व इंग्लंडच्या राजास न मानण्याचा कायदा आयरिश लोकांच्या कायदेमंडळांत मान्य झालेला असून ते पूर्णपणें स्वतंत्र झाले आहेत.

१. आयर — हा आयर्लंडमधील दोन राजकीय विभागांपैकीं मोठा विभाग आहे. क्षेत्रफळ १,७०,२४,४८५ एकर व लोकसंख्या २९,४९,७१३ ( १९४३ चे खानेसुमारीप्रमाणें ) आहे. १९२१ सालीं इंग्लंडबरोबर तह होऊन आयरिश फ्री स्टेट या राज्याची स्थापना झाली असून ब्रिटिश साम्राज्यांतील स्वायत्त वसाहतींचा दर्जा या राज्याला देण्यांत आला. राज्याचा अध्यक्ष सर्व लोकांकडून निवडला जातो. येथें स्वतंत्र कायदेमंडळ स्थापन झालें असून त्याची डायल व सेनेट अशीं दोन सभागृहें आहेत. पंतप्रधान हा वरिष्ठ अधिकारी असतो. अर्स ही राष्ट्रीय भाषा आहे. पण सरकारी कामकाजांत इंग्रजी भाषा वापरतात. या देशांत सुमारें २८,००,००० लोक रोमन कॅथॉलीक, २,५०,००० एपिस्कोपेलिअन, आणि ४५,००० इतर प्रॉटेस्टंट आहेत. येथें पूर्ण धार्मिक स्वातंत्र्य आहे. प्राथमिक शिक्षण मोफत आहे. आणि बहुतेक जिल्ह्यांत सक्तीचें आहे. दुय्यम शिक्षणसंस्था धर्माधिकारी लोकांच्या ताब्यांत आहेत. डब्लिन विद्यापीठ व राष्ट्रीय (नॅशनल) विद्यापीठ अशीं दोन विद्यापीठें आहेत. देशसंरक्षक लष्कर आहे, व किनाऱ्याचें संरक्षण करण्याचें काम या लष्कराकडे आहे. समुद्रावर संरक्षण करण्याचें काम ब्रिटिश साम्राज्य सरकारकडे आहे. डब्लिन ही राजधानी असून कॉर्क, वॉटरफोर्ड, वेक्सफोर्ड, लिमरिक, गालवे, स्लिगो, डनडाल्क, ब्रीम्सटाऊन आणि आर्कलो हीं मोठीं शहरें आहेत. येथील मुख्य पीक ओट, बटाटे, टर्निप व बार्ली हें आहे. येथील जमीन चांगली सुपीक आहे; पण शेतीचा धंदा मागासलेल्या स्थितींत आहे. जनावरें पाळणें आणि दूधदुभतें हे दोन बरेच महत्त्वाचे धंदे आहेत. घोड्यांची निपजहि मोठ्या प्रमाणांत चालते. समुद्रावर मच्छिमारीच्या धंद्यांत सुमारें १३,००० लोक आहेत. मुख्य कारखाने पॉपलिन कापड, लोंकरीचें कापड, दारू, सिगारेट, कलावतू तयार करणें, डुकराचें मांस खारावणें इत्यादि आहेत.

२. उत्तर आयर्लंड— आयर्लंडचा ईशान्य भाग. हा १९२२ सालीं आयरपासून विभक्त होऊन इंग्लंड, स्कॉटलंड व वेल्स यांच्याबरोबर ग्रेट-ब्रिटनचा एक भाग म्हणून राहिला. लंडनडेरी व बेलफास्ट हीं दोन मुख्य शहरें आहेत. या भागांत ६ परगणे आहेत. पार्लमेंटांत दोन सभागृहें ( विधिमंडळें ) आहेत. गव्हर्नरच्या हातीं कार्यकारी सत्ता असते. बेलफास्ट ही राजधानी आहे. तागाचें कापड विणणें, जहाजें बांधणें व शेती हे मुख्य उद्योगधंदे आहेत. साधारणपणें एकूण जमीनीच्या ३/४ म्हणजे अंदाजें ३,३५,१४४ एकर जमीन लागवडीखालीं आहे. ओट, बटाटे, ताग व गवत हीं मुख्य पिकें आहेत. क्षेत्रफळ ५२३७ चौ. मैल. लोकसंख्या १२७९७८५. या भागांत रोमन कॅथॉलिक लोकांचा भरणा जास्त आहे. बेलफास्ट येथें एक विद्यापीठ आहे.

**आयर्विंग, वॉशिंग्टन** ( १७८३–१८५९ )—एक अमेरिकन साहित्यिक. सामान्य शिक्षण आटोपल्यावर त्या

कायद्याच्या अभ्यासास सुरवात केली; पण प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्याला आपलें शिक्षण मध्येंच सोडून युरोपमध्यें जावें लागलें. युरोपमधून परत आल्यावर त्यानें कायद्याचा अभ्यास पूर्ण केला; पण त्या धंद्याची त्यास गोडी नसल्यामुळें त्यानें वाङ्मयव्यवसाय सुरू केला. वॉशिंग्टनचा वडिलोपार्जित धंदा बुडाल्यामुळें त्यावर आपल्या लेखणीच्या मदतीनें उदरनिर्वाह करण्याची पाळी आली. तेव्हां त्यानें इंग्लंडमध्यें जावयाचें ठरविलें. इंग्लंडमध्यें गेल्यावर त्याचा अनेक प्रसिद्ध लेखकांशीं परिचय झाला. तेथें असतांना त्यानें पुष्कळ पुस्तकें प्रसिद्ध केलीं. १८६२ सालीं तो अमेरिकेस परत आला तेव्हां त्याची सर्वत्र प्रसिद्धि झाली होती. इतर राष्ट्रांतील वाङ्मयसेवकांच्या बरोबरीचा मान मिळवून राष्ट्राचें नांव राखल्याबद्दल त्याचा सर्वत्र सन्मान झाला. 'दि स्केच बुक', ऑलिव्हर गोल्डस्मिथचें चरित्र, वॉशिंग्टनचें चरित्र इ. त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**आयर्व्हिंग, सर हेनरी** (१८३८–१९०५)—एक इंग्रज नट. ह्याचें मूळचें नांव जॉन ब्रॉड्रिब हें होतें. १८५६ मध्यें रंगभूमीवर त्यानें प्रथम जें काम केलें तें 'रिशेल्यु' या नांवाच्या नाटकांत गेस्टॉन ड्यूक ऑर्लिन्स या पात्राचें होय. पुढील दहा वर्षांत ह्यानें अनेक नाटक-कंपन्यांत मिळून सुमारें पांचशें निरनिराळ्या पात्रांचीं कामें केलीं व नाट्यकलेचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला; व त्यामुळें त्याची प्रसिद्धि बरीच झाली. त्यानें हॅम्लेट, अथेल्लो, मॅकबेथ, मर्चेंट ऑफ व्हेनिस या खेळांत महत्त्वाचीं कामें केलीं. शेक्सपियरचीं बहुतेक नाटकें, गटेचें फॉस्ट, वगैरे पुष्कळ नाटकें तो करीत असे. तो वारला तेव्हां त्याला वेस्टमिन्स्टर ॲबेमध्यें पुरलें जाण्याचा मान मिळाला. त्याला सरदार (नाइटहूड) हा किताबहि मिळाला होता. शिवाय डब्लिन, केंब्रिज व ग्लासगो या विश्वविद्यालयांनीं त्याला बहुमानाच्या पदव्या दिल्या होत्या.

**आयर्व्हिन, विल्यम** (१८४०–१९११)—एक इंग्रज संशोधक. हा बंगाल प्रांतांत नोकरीवर असून त्याला फारशीची आवड व हिंदी लोकांविषयीं सहानुभूति विशेष होती. शिवाय फारशी कागद जमविण्याचा नाद असून, उत्तर मोगलशाहीचे अनेक कागद व बखरी त्यानें जमविल्या. स. १७०७–१८०३ पर्यंतचा मोगल बादशाहीचा संगतवार इतिहास अस्सल कागदांच्या आधारें लिहिण्याचा विचार आयर्व्हिन याचा होता. संशोधनाचें काम करण्यांत तो निष्णात असून वृद्धवेतन घेऊन स्वदेशीं गेल्यावर त्यानें हा उद्योग जोरानें सुरू केला. प्रो. जदुनाथ सरकार यांना औरंगजेबाचे कागद इंडिया ऑफिस लॉयब्ररींतून तोच पुरवीत असे. १७१२ ते १७२१ पर्यंतच्या दहा वर्षांचा इतिहास लिहिल्यावर तो मरण पावला.

**आयर्व्हिन, लॉर्ड** (१८८१– )—हिंदुस्थानचा एक ग. जनरल व व्हाइसरॉय. १९१० सालीं पार्लमेंटचे प्रथम सभासद झाले. १९२२–२५ या काळांत ब्रिटिश मंत्रिमंडळांत शिक्षण–शेतकी खात्याकडे होते. १९२६ मध्यें 'लॉर्ड' करून हिंदुस्थानांत व्हाइसरॉय म्हणून पाठविण्यांत आलें. कारकीर्दीच्या आरंभीं स्त्रियांना मतदानाचा हक्क व दक्षिण आफ्रिकेशीं तडजोड या गोष्टी महत्त्वाच्या झाल्यानंतर हिंदुस्थानांत राजकीय वातावरण प्रक्षुब्ध होतें; तें सायमन कमिशन येऊन गेल्यानंतर 'वसाहतीचें स्वराज्य' हळूहळू देऊं केलें असतांहि शमलें नाहीं. १९३० सालीं कायदेभंगाची मोहिम सुरू झाली. आयर्व्हिन यांना म. गांधींशीं तडजोड करावी लागून त्यांना इंग्लंडांत गोलमेज परिषदेसाठीं पाठवावें लागलें. आयर्व्हिन मुदत संपून परत गेल्यावर वरिष्ठ सभागृहाचे नेते झाले. १९४०–४६ पर्यंत अमेरिकेंत इंग्लंडचे वकील म्हणून होते. अर्ल ऑफ हॅलिफॅक्स या नांवानें ते आज ओळखले जातात. यांचा स्वभाव फार उमदा असून त्यांच्या मित्रपरिवारांत ते 'ख्रिस्ती साधु' म्हणून नांवाजले जातात.

**आयव्हरी कोस्ट**—आफ्रिकेंतील एक फ्रेंच वसाहत. गिनीचें आखात, गोल्ड कोस्ट, नायगर, सेनिगॉल, सिएरा लिओन आणि लायबेरिया यांनीं हा आफ्रिकेचा पश्चिम बाजूचा प्रांत वेढलेला आहे. या प्रांताचें क्षेत्रफळ १,८४,१७४ चौरस मैलांचें असून लो. सं. सुमारें चाळीस लक्ष आहे. त्यांत अवघी ९ हजार युरोपियन वस्ती आहे; व बाकीची येथील स्थानिक लोकांची आहे. प्रांताचा मध्यभाग डोंगराळ असून त्यावर मोहोगनी वृक्षांचीं घनदाट अरण्यें आहेत. तेथील स्थानिक लोक मका, तांदूळ, अननस यांची लागवड करतात व युरोपियन लोकांच्या कॉफी, कोको, रबर, व. नारळ यांच्या मळ्यांतून मजुरी करतात. या प्रांतांत सुमारें ६०० मैलांचा लोहमार्ग असून ११,१३० मैलांचा मोटारमार्ग आहे. मुख्य राजधानीचें ठिकाण अबिड्जान आहे.

**आयव्ही**—[वर्ग–अरालिआसी]. ही एक चढणारी वेल आहे. ही सर्व युरोपांत आढळते. तसेंच आशिया व आफ्रिका यांमध्येंहि दृष्टीस पडते. ही दीर्घायु असून बऱ्याच वर्षांनीं हिचा देठ बळकट होऊन तो आधाराशिवाय उभा राहूं शकतो. याचें लांकूड मऊ व सच्छिद्र असतें. ही घरांवर वगैरे लावतात. ग्रीस व ईजिप्तमध्यें या वेलीस पवित्र मानीत असत.

**आय्. सी. एस्.**—(इंडियन सिव्हिल सर्व्हिस). ब्रिटिशांचें राज्य हिंदुस्थानावर असतांना राज्यकारभारासाठीं जे वरिष्ठ अधिकारी नेमले जात त्यांना नांव. ईस्ट इंडिया कंपनींत १६७४ सालीं प्रथम नोकरांचे १ अप्रेंटिस, २ रायटर, ३ ज्यूनियर, व

४ सीनियर असे चार वर्ग असत. १६००–१७४० पर्यंत कंपनी व्यापारी असल्यानें नोकरांना व्यापाराचेंच मुख्यतः काम असे. पुढें कंपनीच्या ताब्यांत मुलूख येऊं लागले तेव्हां या नोकरांना राज्यशासनाचीं कामें करणें प्राप्त झालें. हे नोकर लष्करांत देखील जाऊन लढाईस सज्ज होत. या कंपनीच्या नोकरांना चांगलें वेतन व बक्षीस मिळे. ते अगदीं नबाबाप्रमाणें ऐषआरामांत राहात. यामुळें नोकर ठेवण्यांत वशिलेबाजी सुरू झाली व कांहीं नियम करावे लागले. १८३३ च्या चार्टर कायद्यानें परीक्षा घेऊन निवड करण्याची प्रथा पडली. खुली परीक्षा होऊन योग्य निवड व्हावी म्हणून लॉर्ड मेकाले यांनीं खटपट केली व १८५५ त अशी पहिली आय्. सी. एस्. परीक्षा घेतली गेली. तथापि परदेशगमन व विलायतेचा खर्च यांमुळें १८६४ पर्यंत कोणी हिंदी आय्. सी. एस्. नव्हता. हिंदुस्थानांत ही परीक्षा घेण्यासंबंधीं चळवळ १८९३ पासून सुरू होती, पण १९२२ पर्यंत तिला यश आलें नाहीं. १९१५ सालीं हिंदी आय्. सी. एस्. ची संख्या ५ टक्के होती, ती १९३५ सालीं ३२ टक्क्यांपर्यंत पोंचली. पुढें चार वर्षांनीं ५० टक्के झाली. १९४७ सालीं राष्ट्रीय सरकारनें ही परीक्षा बंद करून तिच्या जागीं इंडियन ॲडमिनिस्ट्रेशन सर्व्हिस नांवाची नवीन परीक्षा ठेवली व जुन्या आय्. सी. एस्. ना नुकसानभरपाई देऊन कमी केलें. अशा रीतीनें गेलीं तीनशें वर्षें हिंदुस्थानांत अप्रतिहत अधिकार गाजविणारा हा 'अराष्ट्रीय' समजला जाणारा वर्ग नष्ट झाला.

**आयुर्वेद**—एक उपवेद. आयुर्वेदाचीं आठ अंगें आहेत: १ कायचिकित्सा (ज्वरादिकांची चि.), २ बालचिकित्सा, ३ ग्रहचिकित्सा किंवा भूतविद्या (भूतबाधा चि.), ४ उर्ध्वांग किंवा शालाक्य चिकित्सा (मुख, नेत्र, नासिका, कर्ण, मस्तक इ. च्या रोगांची), ५ शल्यचिकित्सा (शरीरांतले व बाहेरून आंत आलेले पदार्थ यांविषयीं), ६ दंष्ट्राचिकित्सा (विषारी पदार्थ चि.), ७ जराचिकित्सा (वार्धक्यासंबंधीं), ८ वृषचिकित्सा किंवा वाजीकरण (शरीरांत वीर्य, सामर्थ्य उत्पन्न करण्यासंबंधीं). चरक, सुश्रुत, वाग्भट, इ. चे यावर ग्रंथ आहेत. आर्यवैद्यक पहा.

**आयेषा**—ही अबूबकरची कन्या आणि महंमद पैगंबराची अत्यंत लाडकी बायको होती. ही त्याची तिसरी बायको असून तींच एक काय ती पैगंबराच्या नायकांत लग्नाच्या वेळीं कुमारी होती. लग्नांत तिचें वय केवळ ७ वर्षांचें होतें. महंमद पैगंबर जिवंत असेतोंपर्यंत त्याच्यावर तिचें फार वजन होतें.

महंमदाच्या मृत्यूनंतर आयेषेनें अल्लीला गादीवर येऊं न देण्याविषयीं कसून विरोध केला व त्याबरोबर अनेक लढाया केल्या. ती महत्त्वाकांक्षी व उद्धट होती, तरी तिच्याविषयीं लोकांत आदर असे. ती हातीं लागली असतांहि अल्लीनें तिला न दुखवितां सोडून दिलें. तिला मुसलमान लोक पैगंबरी व धर्मनिष्ठांची माता (उम्महातुल–मोमिनीन) असें संबोधीत. ती इ. स. ६७८ त ६७ वर्षांची होऊन वारली.

**आयोडिन**—अद. याचें चिन्ह (आय्) अ व परमाणुभारांक १२६·९ असून हें एक क्षारज (हॅलोजन) वर्गांतील अधातु मूलद्रव्य आहे. हें समुद्राच्या पाण्यांत अदिद (आयोडाइड) स्वरूपांत आढळतें. त्यांतून तें कांहीं ल्हाळ्यांनीं उचललेलें सांपडतें. चिली देशांत आढळणाऱ्या सोऱ्यामध्येंहि तें सिंधु अदेत (सोडियम आयोडेट) या स्वरूपांत आढळतें. सामान्य उष्णतामानामध्यें याचे करड्या रंगाचे काळे घन स्फटिक असतात, व त्यांस धातूसारखी चकाकी असते. हे स्फटिक उष्ण केले असतां त्यांपासून एक प्रकारची दाट–तिखट वासाची व निळसर रंगाची वाफ बाहेर पडते. *याचे रासायनिक गुणधर्म हर व ब्रुम (क्लोरिन आणि ब्रोमिन)* यांसारखेच आहेत. याचें पिष्ठ सत्त्वाबरोबर मिश्रण केलें असतां याचा रंग निळा होतो, यावरून हा ओळखतां येतो. पोटांत घेतलें असतां यापासून आग होते व तें विषारीहि आहे; परंतु अल्प प्रमाणांत घेतलें असतां कंठग्रंथींमध्यें याच्या अल्पतेमुळें उत्पन्न होणारा गलग्रंथि रोग बरा होतो. मद्यार्कामध्यें हें विरघळून जंतुघ्न बनतें व परोपजीवी जंतूंचा नाश करण्याकरितां म्हणून बाहेरून लावण्यांत येतें.

**आयोनिक पंथ**—ग्रीक तत्त्वज्ञानांतील एक प्राचीन पंथ. या पंथाचा उत्पादक थेली होय. जीव आणि प्रकृति (मॅटर) यांचें ऐक्य असून प्रकृति ही स्वभावतःच जीवयुक्त आहे असा या पंथाचा सिद्धान्त आहे. ॲनाक्सिमँडर, ॲनाक्सिमेनीज, हेरॅक्लिटस व ॲनाक्सागोरस हे प्रमुख तत्त्वज्ञानी याच पंथांतले होत.

**आयोनियन लोक**—प्राचीन काळीं ग्रीक साम्राज्यांत असणारी ही महत्त्वाची जात आहे. खि. पू. ११ व्या शतकाच्या सुमारास आशिया मायनरच्या किनाऱ्यावर कांहींनीं वस्ती केली. त्यामुळें त्या भागाला आयोनिया हें नांव मिळालें. आयोनिया प्रांत सामोस आणि चिओस या बेटांसमोर आहे. या प्रांतांत या लोकांनीं बारा शहरें वसवून त्यांचा एक संघ बनविला. पुढें हा प्रांत सॅरासेन लोकांनीं जिंकून घेतला. आयोनियन लोक चांगले सुधारलेले असून मिनोन आणि हिटाइट संस्कृतींतून त्यांनीं आपली विशिष्ट संस्कृति बनविली होती. होमरनें आपलें काव्य आयोनियन भाषेंतच लिहिलें आहे.

भरतखंडांत जुन्या काळीं यवन लोक जे आढळतात ते बहुधा हे आयोनियनच असावेत, असा इंटरसारख्या प्राच्यविद्याविशारदांचा तर्क आहे. जलालाबाद आणि मथुरा या ठिकाणीं यवनी कलेचे अवशेष पाहावयास मिळतात. यवन पहा.

**आयोनियन समुद्र व बेटें**— भूमध्य समुद्राच्या ग्रीस, दक्षिण इटली, व सिसिली या भागाला आयोनियन समुद्र असें नांव असून ग्रीसचीं बेटें या समुद्रांत पसरलेलीं आहेत. त्या सर्व बेटांचें क्षेत्रफळ सुमारें ७५२ चौरस मैल असून त्यांत मोठीं अशीं बेटें म्हणजे कॉर्फु, सेफॉलोनिया व झांटे, हीं होत. लो. सं. २,३१,५१०.

**आयोवा**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतलें उत्तर-मध्य भागांतलें एक संस्थान. क्षेत्रफळ ५६,२८० चौरस मैल. लो. सं. २५,३८,२६८. मिसिसिपी आणि ओहिओ या दोन्ही मोठ्या नद्या अनुक्रमें पूर्व व दक्षिण सरहद्दींवरून वाहतात. बहुतेक प्रदेश सपाट आहे. झाडीहि विशेष नाहीं. जमीन शेतीलायक आहे. समशीतोष्ण प्रदेशांतील सर्व पिकें, फळफळावळ, वगैरे होतात. खनिज पदार्थांत कोळशाच्या खाणी बऱ्याच मोठ्या क्षेत्रांत ( १९,००० चौ. मैल ) पसरल्या आहेत. शेतकीचीं अवजारें व यांत्रिक सामुग्री तयार करण्याचे कारखाने आहेत. लांकूड, कापड, मांस यांची निर्यात मोठी आहे. हवा समशीतोष्ण असून हिंवाळा कडक असतो. १६७३ मध्यें जोलिएट व मार्केट हे संशोधक प्रथम या प्रदेशांत आले. १७६३ मध्यें स्पेनला देण्यांत आलेल्या प्रदेशांत याचा समावेश झाला होता. १८०१ मध्यें स्पेनकडून फ्रान्सकडे परत आला व १८०३ मध्यें युनायटेड स्टेट्सनें खरेदी केलेल्या प्रदेशाबरोबर अमेरिकेकडे आला. १८४६ त सं. संस्थानी संघांत समावेश झाला. राजधानी डेसमॉनिस.

**आरणी**— मद्रास, उत्तर अर्काट जिल्ह्यांतील एक शहर. मुख्य महत्त्वाची इमारत किल्ल्याची असून तिचा बहुतेक भाग मोडकळीस आलेला आहे. ७५ वर्षांपूर्वी आरणी हें एक मोठें लष्करी ठाणें होतें. कवायतीच्या मैदानाच्या एका बाजूस एक द्वंद्वयुद्धाचा स्मारकस्तंभ आहे. वायव्येच्या कोंपऱ्यांत एक जुनें सुंदर देवालय आहे. रेशीम व कापूस यांच्या विणकामाचा मोठा धंदा या शहरांत चालतो.

प्रसिद्ध मराठी कवि आनंदतनय आरणीचाच होता. कर्नाटक जिंकल्या वेळीं शहाजीनें आरणी प्रांत याच वेदोभास्कर ब्राह्मण सरदारास जहागीर म्हणून दिला होता. इ. स. १७८० मध्यें हैदरअलीनें हा आरणीचा किल्ला घेतला. अर्काट इंग्रजांच्या ताब्यांत आल्या वेळीं आरणीहि साहजिकच त्यांच्याकडे गेली.

**आरणे-हले**— आरणे-हले हे हिंदुस्थानांत आढळतात. गौ वर्गांतील हा सर्वांत मोठा प्राणी आहे. हा हिमालयांतील पायथ्याजवळच्या अरण्यांत विशेष आढळतो. सवाई माधवरावानें आरणे-हले पाठविण्याबद्दल एका पत्रांत लिहिलें आहे.

**आरण्यक**— वेदाचे संहिता, ब्राह्मण, आरण्यक व उपनिषद् असे ४ भाग आहेत; त्यांपैकीं आरण्यकांत व उपनिषदांत अध्यात्मविषयक चर्चा करून कांहीं सिद्धान्तहि प्रस्थापित केले आहेत. ऋग्वेदाचीं आरण्यकें दोन: ऐतरेय व कौषीतकी; कृष्णयजुर्वेदाचें एक: तैत्तिरीय; शुक्ल यजुर्वेदाचीं दोन: बृहदारण्यक व शतपथ ब्राह्मणाचा कांहीं भाग; सामवेदाचीं दोन: छांदोग्य व तलवकार; व अथर्ववेदाचें एक: मुंडक. यांपैकीं सामवेद व अथर्ववेद यांच्या आरण्यकांस उपनिषदें असेंहि म्हणतात. या वेदांना निराळीं आरण्यकें नाहींत. गृहस्थाश्रमाचीं सुखदुःखें अनुभवल्यानंतर वानप्रस्थाश्रमांत प्रवेश केल्यावर आरण्यकांचें अध्ययनपूर्वक आचरण करावयाचें, असा या वाङ्मयनिर्मितीचा हेतु प्रामुख्यानें दिसतो.

**आरमार**—युद्धासाठीं राष्ट्रानें सज्ज ठेवलेला सशस्त्र जहाजांचा तांडा. प्रथम जहाजें हीं युद्धकारणापेक्षां व्यापारासाठींच असत. तथापि फोनेशिअन, अथेनियन, कार्थेजियन, रोमन, नॉर्समेन, इ. लोकांनीं आपलीं जहाजें युद्धोपयोगीहि केलीं होतीं. पहिलें इंग्लिश आरमार आल्फ्रेड दि ग्रेट राजानें डेन्स लोकांशीं टक्कर देण्यासाठीं सज्ज केलें. पुढें नॉर्मन राजांनीं तें वाढविलें. हॅनोव्हर आणि स्टुअर्ट राजांच्या अमदानींत इंग्लिश आरमार फारच बलिष्ठ झालें. गेल्या महायुद्धापर्यंत ब्रिटिश आरमाराला दुसरी जोड नव्हती.

जहाजें बांधण्यांत ज्या सुधारणा झाल्या त्यांचा फायदा आरमारी जहाजांनाहि मिळाला. जहाजें पोलादानें मढविलीं गेलीं व बाष्पशक्तीनें चालूं लागलीं; पुढें जलशक्ति आणि विद्युच्छक्ति यांची जोड मिळाली. बिनतारी, शीतकयंत्र, अंतरमापक, इ. यंत्रें शास्त्रीय शोधांमुळें आलीं. जलमत्स्य, जलसंचारी विमान यांचा उपयोग आरमारांना फार होतो.

हिंदुस्थान— हिंदुस्थानांत शिवाजीच्या काळापूर्वी आरमार ज्याला म्हणतां येईल असें नव्हतें. पूर्व आणि पश्चिम किनारा ताब्यांत असलेल्या राष्ट्रांनीं दर्याव्यापार ताब्यांत ठेवला होता, तथापि लढाऊ जहाजें सिद्ध केलीं नव्हतीं. मुसलमान राजांनीं इकडे फारसें लक्ष दिलें नव्हतें. शिवाजीनें परदेशी व्यापाऱ्यांशीं टक्कर देण्यासाठीं १६५९ सालापासून आपलें आरमार ठेवण्याची तयारी चालविली. कल्याण ते चौलपर्यंतचा कोंकणकिनारा त्याच्या ताब्यांत होता. मराठे हे स्वतः दर्यावर्दी लोक नसल्यानें कोळी, भंडारी जातीचीं माणसें त्यांनीं आरमारावर ठेविलीं. दर्यासारंग आणि मायनाक भंडारी यांच्या हाताखालीं प्रत्येकीं २५० जहाजांचा काफिला मराठ्यांच्या आरमारांत होता. आरमाराचा उपयोग मालाच्या वाहतुकीला होई. शिवाजीच्या कालानंतर आंगऱ्यांनीं आरमारी बल पुष्कळच वाढविलें; त्यामुळें युरोपियन व्यापारी कंपन्यांना मोठी दहशत बसली. सुभा आरमार नांवानें एक निराळें खातेंच राज्यांत असे. विजयदुर्ग येथें त्याची मुख्य कचेरी असे. बाळाजी बाजीराव पेशवे यानें

जेव्हां वरचढ झालेल्या आंगऱ्यांचा पाडाव करून आरमार युरोपियनांकडे दिलें तेव्हांपासून त्याचें फारसें महत्त्व राहिलें नाहीं; तथापि कोंकणकिनाऱ्यावर चांगलें संरक्षण असे. यानंतर ईस्ट इंडिया कंपनीचें आरमार आलें.

इंग्रज अमदानी —'रॉयल इंडियन नेव्ही' या संस्थेचा इतिहास मागें १६१२ पर्यंत नेतां येतो. त्या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीला आपला व्यापार आणि वसाहती यांचें संरक्षण करण्यासाठीं दोन सशस्त्र जहाजें ठेवावीं लागलीं. १८७७ पर्यंत हें आरमार मुंबई सरकारच्या ताब्यांत असे. पुढें जरी हिंदुस्थान सरकारची त्यावर प्रत्यक्ष सत्ता आली तरी मुंबई हेंच मुख्य केंद्र होतें. १९४०-४१ सालीं आरमारी मुख्य ठाणें दिल्लीस हालविण्यांत आलें. पहिल्या महायुद्धानंतर हिंदुस्थानचें स्वतंत्र आरमार असावें अशी चळवळ सुरू झाली व तिला १९३४ सालीं मूर्त स्वरूप मिळून रॉयल इंडियन नेव्ही असें नवें नामाभिधान मिळालें. त्यापूर्वीचें नांव रॉयल इंडियन मरीन असें होतें. रॉ. इं. नेव्ही ब्रि. साम्राज्य नौदलाचा एक भाग म्हणून असे व त्यावर एक फ्लॅग ऑफिसर नेमलेला असे. १९३९ त दुसरें महायुद्ध सुरू झालें तेव्हां या आरमाराची वीस पटीनें वाढ केली व नाविक शिक्षण देण्याची सरकारी व्यवस्था झाली.

गेल्या दुसऱ्या महायुद्धांत आर. आय्. एन्. ची कामगिरी उत्कृष्ट झाली. १९४७ सालीं हिंदुस्थानला वसाहतींचें स्वराज्य मिळालें. तेव्हां आरमार देशाच्या ताब्यांत आलें. पण त्याचे दोन भाग, हिंदुस्थानी आणि पाकिस्तानी असे पडले. आतां हिंदी संवराज्यानें आपल्या आरमाराची वाढ करण्यासाठीं योजना आंखल्या आहेत.

**आरमारी अधिकारी**—आरमारावरच्या अधिकाऱ्यांचे दोन वर्ग असतात: कार्यकारी व व्यवस्थापक. पहिल्या अधिकाऱ्याकडे प्रत्यक्ष नौकानयनाचें व हल्ला किंवा संरक्षण करण्याचें काम असतें. दुसऱ्या वर्गांत पगार वाटणारे, डॉक्टर व इंजिनिअर हे येतात. पहिल्या युरोपीय युद्धानंतर या अधिकाऱ्यांतील पोषाखाचा फरक काढून टाकण्यांत आला. फक्त एक रंगीत पट्टी ठेवण्यांत आली आहे. ही पट्टी तांबडसर असली म्हणजे तो सर्जन, पांढरी पगार वाटणारा व जांभळी इंजिनिअर याची असते. प्रत्यक्ष कार्यकारी अधिकारी होण्याकरितां प्रथम कॅडेटनें एखाद्या कॉलेजमध्यें बाराव्या किंवा तेराव्या वर्षी प्रवेश करावयाचा असतो. नंतर तो मिडशिपमन होतो; त्यानंतर मेट व सबलेफ्टनंट, नंतर लेफ्टनंट, लेफ्टनंट कमांडर, कमांडर, कॅप्टन, कॉमोडोर, रिअर ॲडमिरल व कॉमोडोर, व्हाइस ॲडमिरल, ॲडमिरल, ॲडमिरल ऑफ दि फ्लीट असे एकावरचे एक अधिकारी असतात.

**आरल सरोवर**—कॅस्पिअन समुद्रानंतर त्याच्याच दक्षिणेला सुमारें १५० मैलांवर आशियांतलि सर्वांत मोठें सरोवर म्हणजे आरल सरोवर हेंच असून त्याचें क्षेत्रफळ सुमारें २४ हजार चौरस मैल आहे. भूगोलशास्त्रज्ञांच्या मतें हें सरोवर म्हणजे कॅस्पिअनचाच एक भाग असावा. या सरोवराचें पाणी किंचित् खारट असून त्यांत मासे आहेत. या सरोवराला जाक्सार्टीस (सीर दऱ्या) व आक्सस (आमूदऱ्या) या नद्या मिळतात. सरोवराच्या कांठावर वस्ती नाहीं; कारण सभोंवतीं दलदलीचा प्रदेश, पठारें व माळरानाचे प्रदेश आहेत. या सरोवरावर नेहमीं वादळें होतात.

**आरसा**— आदर्श व कांच हे दोन्हींहि शब्द संस्कृत भाषेंत फार प्राचीन काळापासून रूढ असल्यामुळें आरसा तयार करण्याची कृति भारतीय लोकांस पुरातन काळीं माहीत असावी असें वाटतें. परंतु कांचेचे आरसे केव्हांपासून प्रचारांत आले, यासंबंधीं विश्वसनीय ऐतिहासिक माहिती सांपडत नाहीं.

एट्रुस्कन, ग्रीक व रोमन लोकहि प्राचीनकाळीं धातूचेच आरसे वापरीत. प्लिनीनें सिडॉन येथें कांचेचे आरसे तयार करीत असल्याचा उल्लेख केला आहे.

युरोपमध्यें सोळाव्या शतकाच्या प्रारंभापासून कांचेचे आरसे प्रचारांत येऊं लागले. यापूर्वी म्हणजे बारा ते पंधराव्या शतकांच्या दरम्यान धातूचे केलेले खिशांत ठेवण्यासारखे लहान आरसे वापरण्यांत येत असत. चांदी, पोलाद किंवा ब्राँझ या धातूंचा तुकडा झांकण असलेल्या तबकडींत किंवा दांडा असलेल्या लांकडाच्या चौकटींत वट्ट बसवून त्याचा आरशाप्रमाणें उपयोग करीत असत. त्या वेळच्या स्त्रियांच्या पोशाखांत अशा तऱ्हेचा दांडा लावलेला आरसा ही एक शोभेची वस्तु म्हणून गणली जात असे. तो आरसा कंबरपट्ट्यांत लटकावून देत असत.

सोळाव्या शतकाच्या आरंभीं जर्मनीमध्यें कांचेचे लहान चाखगोल आरसे तयार करीत असत व त्यांना 'बुल्स आय' (गवाक्ष) असें म्हणत. व्यापारी धोरणावर कांचेचे आरसे तयार करण्याची कला प्रथम व्हेनिस शहरांत निघाली.

हिंदुस्थानांत प्रथम आरशांचा प्रचार केव्हांपासून सुरू झाला तें नक्की सांगतां येत नाहीं. कौषीतकी उपनिषदांत ('एष आदर्शे पुरुषस्तमेवाहमुपासे'—आरशांतल्या पुरुषाची मी उपासना करितों—४,११) आदर्श असा उल्लेख आलेला आढळतो. ख्रिस्ती शकाच्या प्रारंभीं उत्तर हिंदुस्थानांत धातूचे आरसे असत, असा मिलिंदपन्हावरून (४.१,६०) तर्क होतो. यापुढील वाङ्मयांत तर आरशांचा उल्लेख जागजागीं सांपडतो.

एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत कांचेच्या पाठीमागें कथलाचें मिश्रण लावून आरसे तयार करण्यांत येत असत. परंतु

१८३५ मध्यें फॉन लीबिग यानें रजतनत्रिताचा अम्लयुक्त द्रव ( Ammoniacal solution of Silver Nitrate ) घेऊन त्यापासून चांदीचा पातळ थर कांचेवर चढविण्याची युक्ति शोधून काढली. हा चांदीचा पातळ थर त्याच्यामागें लाखेचें किंवा कोपल रोगण लावल्यानें सुरक्षित राहूं शकतो किंवा त्यावर विद्युत्साहाय्यानें तांबें चढवितां येतें. परावर्तन पहा.

**आराकान**—ब्रह्मदेश, दक्षिण ब्रह्मदेशांतील एक विभाग. क्षे. फ. सुमारें १६५०० चौ. मै.. अकियाब हें मुख्य शहर व बंदर आहे. १९३० सालीं आराकान डोंगरी प्रदेश स्वतंत्र करून त्यावर एक सुपरिंटेंडेंट नेमला. आराकान विभागावर एक कमिशनर असतो. येथें 'मग' नांवाचे लोक असून त्यांची संख्या नऊ लाखांवर आहे. यांचा मुख्य धंदा शेतीचा आहे. मुख्य पीक तांदूळ आहे. यानंतर मीठ बरेंच पिकतें. पहिल्या इंग्रज-ब्रह्मी युद्धांत ( १८२६ ) आराकान इंग्रजांकडे आलें.

**आराखडा**—( नकाशा ). स्थापत्यशास्त्रांत कोणत्याहि इमारतीचें कागदावर एका समपातळींत जें चित्र काढण्यांत येतें त्यास 'प्लॅन' किंवा आराखडा असें म्हणतात. या आराखड्यांत इमारतीच्या भिंती कोठें बांधावयाच्या, दरवाजे, खिडक्या, जिने वगैरे कोठें ठेवावयाचे हें दाखविलेलें असतें. प्रत्येक मजल्याचा स्वतंत्र आराखडा काढलेला असतो. इमारतीचें उभ्या पातळींत जें चित्र किंवा आकृति दिसते तिला दर्शनी चित्र असें म्हणतात.

**आराध्य ब्राह्मण**—तेलंग जातींतील एका शाखेचे ब्राह्मण. निजाम हैदराबादेकडे व मद्रास इलाख्यांत यांचा मोठा भरणा आहे. यांचा वेषाचा प्रकार असा आहे कीं, यांच्या गळ्यांत यज्ञोपवीत तर असतेंच व त्याशिवाय लिंगाईत लोकांप्रमाणें लिंगाकृति प्रतिमाहि असते. हे आपणांस स्मार्त म्हणवितात. व भस्म व रुद्राक्ष धारण करतात. लिंगाईत धर्माचा संस्थापक बसव याच जातीचा होता. या जातींत कित्येक वैष्णवहि असतात, पण ते गळ्यांत लिंग बांधीत नाहींत. आराध्य ब्राह्मणांत पूर्वीं त्रिशूलादिकांच्या तप्तमुद्रा घेण्याची चाल होती. परंतु ती हल्लीं बंद आहे. वीरशैवांचे पंचाचार्य मूलतः याच ब्राह्मणांतील असावेत असें मत डॉ. भांडारकरांनीं आपल्या शैव आणि वैष्णव संप्रदायांच्या इतिहासांत प्रतिपादलें आहे.

**आराफात**— ( जेबेल एर्. रहमे ). अरबस्तानांत मक्का शहरानजीक १५ मैलांवर सुमारें २०० फूट उंचीची ही टेकडी आहे. मुसलमान यात्रेकरू हें महत्त्वाचें यात्रेचें एक ठिकाण मानतात; कारण याच टेकडीवर आद्य मानव आदाम यानें आपली बायको ईव्ह हिचा स्वीकार, त्या दोघांना नंदनवना-(पॅराडाइस) मधून हाकून दिल्यानंतर १२० वर्षांच्या विरहावस्थेनंतर केला, अशी त्यांची समजूत आहे. मक्केच्या यात्रेंत या टेकडीवर धर्मप्रवचन ऐकणें हाहि या यात्रेंतील एक आवश्यक विधि मानतात.

**आराराट** ( पर्वत )— समुद्रसपाटीपासून १७,००० फूट उंचीवर असलेल्या आर्मेनिया पठाराच्या सर्वांत उंच शिखराला हें नांव दिलें आहे. पर्वताच्या ओळींच्या मुख्य भागावर ८,८०० फूट उंचीवर दोन मोठीं शिखरें आहेत. या दोन शिखरांमध्यें अंतर सात मैलांचें आहे. त्यांपैकीं उंच शिखराला "मोठा आराराट" व दुसऱ्याला "लहान आराराट" असें म्हणतात. हा सर्व भाग ज्वालामुखोद्भव खडकाचा बनलेला आहे.

**आरारूट**—[ वर्ग-मारांटासी. जाती-मारांटा ]. मारांटा जातीच्या निरनिराळ्या अनेक प्रकारच्या वनस्पतींच्या कंदापासुन काढलेल्या सत्त्वास आरारूट म्हणण्यांत येतें. निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या वनस्पतींपासून हें तयार करण्यांत येतें. मक्यापासूनहि आरारूट तयार करतां येतें. याची

लापशी वगैरे करतात. हें साबूदाण्याप्रमाणें रोग्यास देतात. दूध, अंडीं वगैरे मिसळून याचे खाण्याचे पदार्थ करतात. यांत पौष्टिक धर्म फारसा नाहीं.

**आरास**—फ्रान्समधील एक शहर. हें शहर कॅलेपासून ५० मैलांवर आग्नेयेकडे असून लढाईच्या काळांत या शहराची नेहमींच धुळधाण उडते; व नंतर पुनर्रचना होते. इ. स. ४०७ पासून या शहराची बरीच उलथापालथ होत आलेली आहे. सध्यां येथें निरनिराळे कारखाने व औद्योगिक केंद्रें आहेत. मध्ययुगांत बुट्टीदार कापडासाठीं हें प्रसिद्ध असे. लो. सं. सुमारें ३०,०००.

**आरिओस्टो, लुडोव्हिको** ( १४७४-१५३३ )— एक इटालियन कवि. 'ऑरलॅन्डो फ्युरिओसो' हें त्याचें अमरकाव्य १५१५ त प्रसिद्ध झालें. हें महाकाव्य अद्भुतरम्यता आणि वीरवृत्ति यांचें उत्कृष्ट द्योतक आहे. रोजनें याचें इंग्रजींत अप्रतिम भाषांतर केलें आहे ( १८२३ ).

**ऑरिनोको**— ही नदी दक्षिण अमेरिकेंतील व्हेनिझुएला देशांतील पर्वतांत उगम पावून त्रिनिदादनजीक ॲटलांटिक

महासागरास मिळते. त्या ठिकाणीं तिचें मुख २० मैल रुंद आहे. सुमारें १,६०० मैलपर्यंत हिच्यांतून जहाजांची वाहतूक होते.

**आरिस्टॉटल** (खि. पू. ३८४-३२२)—एक ग्रीक तत्त्वज्ञानी. वयाच्या १७ व्या वर्षी अथेन्स येथें प्लेटोजवळ शिकण्यास जो राहिला तो वीस वर्षें होता व प्लेटोचा पट्टशिष्य म्हणून ओळखला जात असे. नंतर तो अलेक्झांडर दि ग्रेट याचा गुरु बनला व अलेक्झांडर आशियाच्या मोहिमेवर निघेपर्यंत त्याचा सुहृद् आणि सल्लागार म्हणून असे. नंतर त्यानें लायस्युममध्यें (अथेन्स येथें) आपलें विद्यापीठ उघडलें. या त्याच्या गुरुकुलाला पेरिपॅटेटिक विद्यापीठ असें नांव पडलें. हें त्याचें विद्यापीठ फार लौकिकास चढून सर्व ग्रीसच्या भागांतून विद्यार्थी येऊं लागले. या अध्ययनाच्या काळांतच त्यानें बरीच ग्रंथरचना केली. अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर अथेन्समध्यें क्रांति घडून आली व आरिस्टॉटल चालसिस येथें जाऊन राहिला व तेथेंच वारला. सृष्टिशास्त्र, गणित, भौतिकशास्त्रें, तत्त्वज्ञान इ. विषयांवर त्याचे ग्रंथ तार्किक, सैद्धांतिक व प्रायोगिक अशा तीन वर्गांत विभागण्यांत येत असतात. 'ऑरगॅनॉन' नांवाच्या एका ग्रंथांत त्याचें बरेंचसें लिखाण एकत्रित केलें आहे. 'ज्ञान्यांचा गुरु' असें आरिस्टॉटलला म्हणतात. जगांतील अतिशय प्रमुख तत्त्वज्ञान्यांत व पंडितांत त्याची गणना होते.

**आरिस्टॉटल मत**—आरिस्टॉटल पंथीय तत्त्वज्ञानाला 'पेरिपॅटेटिक' तत्त्वज्ञान असें नांव पडलें; कारण 'पेरिपॅटेटिक' याचा व्युत्पत्ति-अर्थ भोंवतालीं फिरणें असा असून आरिस्टॉटलनें तत्त्वज्ञानविषयक प्रवचनें इकडे तिकडे फिरत असतांना दिलीं, म्हणून त्याच्या तत्त्वज्ञानाला हें चमत्कारिक नांव मिळालें. आरिस्टॉटलचें तत्त्वज्ञान अनुभवप्रमाणवादी वास्तववादाचा (एंपिरिकल रिॲलिझम्) पुरस्कार करणारें आहे, म्हणजे इंद्रियगोचर वस्तूंना व व्यक्तींना मात्र अस्तित्व आहे. सामान्य व जातिवाचक शब्द या केवळ अमूर्त कल्पना आहेत. तथापि केवळ इंद्रियांनीं सर्व प्रकारचें ज्ञान होणें शक्य नाहीं. विश्वांतील मूर्त वस्तूंचें ज्ञान होतें, व त्या सत्य आहेत. पण सर्वव्यापक तत्त्व हेंहि ज्ञानाचा विषय आहे. जगदुत्पत्तीचीं कारणें व तद्विषयक नियम यांचें संशोधन झालें पाहिजे; व त्यांचा शोध मूर्त जगाच्या पलीकडे जाऊन केला पाहिजे; कारण विश्वामध्यें जी कार्यकारी-शक्ति (मोशन) दिसते, ती शक्ति उत्पन्न करणारा आद्य प्रवर्तक आणि इंद्रियातीत असा ईश्वर असला पाहिजे. हा पेरिपॅटेटिक पंथ ऑगस्टसच्या काळापर्यंत अथेन्समध्यें विनविरोध अखंड चालू होता. या पंथाचा जनक आरिस्टॉटल याच्यानंतर या पंथाचे तत्त्ववेत्ते थिओफ्रेस्टस, यूडेमस, क्रिटोलॉस, डायडोरस, आणि क्रॅटिपस हे होऊन गेले. या तत्त्ववेत्त्यांनीं या पंथांतील अतींद्रियविज्ञानविषयक मताचा त्याग करून फक्त नैतिक तत्त्वांचा विकास केला, परंतु नंतर पुन्हां आरिस्टॉटल पंथीयांनीं आरिस्टॉटलच्या अतींद्रियविज्ञानविषयक मतांचा पुरस्कार सुरू केला, व त्यांपैकीं पुष्कळांनीं आरिस्टॉटलच्या ग्रंथांवर भाष्यें लिहिलीं. हे भाष्यकार अँड्रोनिकस, निकोलस डमास्केनस, आस्पासियस, अलेक्झांडर, आणि बोएथिएस हे होत. बोएथिएसनें आरिस्टॉटलच्या ग्रंथांचें लॅटिन भाषेंत भाषान्तर केलें. प्राचीन तत्त्वज्ञान पंथांपैकीं पेरिपॅटेटिक पंथाइतकें दीर्घकाल महत्त्व दुसऱ्या कोणत्याहि पंथाचें टिकलें नव्हतें.

**आरिस्टिडीज** (खि. पू. ५३०-४६८)—हा अथेन्स शहरांतला मुत्सद्दी 'दि जस्ट' (न्यायी) या नांवानें प्रसिद्ध होता. मॅरेथॉनच्या लढाईंत इराणी फौजेविरुद्ध लढलेल्या दहा अथीनियन सेनापतींपैकीं हा एक होता (खि. पू. ४९०). पुढील वर्षी त्याला अथेन्स शहरांतील एक मुख्य मॅजिस्ट्रेट (Archon) नेमण्यांत आलें. पण या जागेवर त्यानें इतकी लोकप्रियता संपादन केली कीं, थेमिस्टोक्लीसला त्याचा मत्सर उत्पन्न होऊन त्यानें आरिस्टिडीजला हद्दपारीची शिक्षा देवविली (४८३). नंतर तीन वर्षांनीं क्सर्सेसनें मोठ्या सैन्यानिशीं ग्रीसवर स्वारी केली तेव्हां अथीनियन लोकांनीं त्याला परत बोलावलें, व थेमिस्टोक्लीजनें त्याला आपला एक सल्लागार केला. प्लेटीआच्या लढाईंत (४७९) तो अथीनियन सैन्याचा सेनापति होता; व त्या लढाईंत विजय मिळण्यास तो बराच कारणीभूत झाला. तो मरण पावला तेव्हां त्याची इतकी दारिद्र्यावस्था होती कीं, त्याचें दफन सार्वजनिक पैशानें करावें लागलें.

**आरिस्टिपस** (खि. पू. ४२५-३६६)—हा ग्रीक तत्त्ववेत्ता, तत्त्वज्ञानांतील सीरिनाईक या नांवाच्या पंथाचा संस्थापक होय. या पंथालाहि हें नांव त्याचें आफ्रिकेंतील मूळ गांव सिरीन या नांवावरून पडलें. याचीं मुख्य तत्त्वें अशीं होतीं कीं, सर्व मानवी संवेदनांचें अंतिम स्वरूप मुख्यतः सुख व दुःख या दोन संवेदना हें असून सुख ही सौम्य संवेदना व दुःख ही तीव्र संवेदना आहे. सर्व प्राणी दुःख टाळून सुखप्राप्तीच्या मार्गें लागतात. अनेक प्रकारच्या इच्छा तृप्त होत गेल्या म्हणजे सतत सुख लाभतें व तेंच सुख होय. सुख मिळवणें हाच मानवी प्रयत्नांचा हेतु असल्यामुळें आपण कोणत्याहि प्रकारचें सुख वर्ज्य मानण्याचें कारण नाहीं. तरी पण रसिकता व विवेक यांचें नियंत्रण आपल्या सुखोपभोगांवर नेहमीं असणें हितप्रद होय.

**आरिस्टोफेनीज** (मु. खि. पू. ४४८-३८५)—एक ग्रीक नाटककार आणि कवि. जगांतील हास्यरसप्रधान नाटका-

अग्रणी असें याला समजण्यांत येतें. याच्या ५४ नाटकांपैकीं फक्त ११ च उपलब्ध आहेत. 'दि नाइट्स', 'दि क्लाउड्स', 'दि वॅस्प्स', 'दि बर्ड्स्', 'दि फ्रॉग्स' हीं अतिशय प्रसिद्ध आहेत व या सर्वांचीं इंग्रजींत भाषांतरें झालेलीं आहेत.

**आरुवा**—व्हेनेझुएलाच्या उत्तरेकडे हें बेट हॉलंडच्या मालकीचें आहे. त्याची लांबी सुमारें तीस मैल व रुंदी सात मैल आहे. या बेटाची हवा आरोग्यकारक आहे. येथें सोन्याच्या खाणी आहेत. लो. सं. सुमारें ४०,०००.

**आरू बेटें**-पश्चिम न्यू गिनीच्या दक्षिणेकडे असलेला हा द्वीपसमूह हॉलंडच्या ताब्यांत आहे. हीं बेटें सुपीक आणि जंगलांनीं समृद्ध अशीं आहेत. मोतीं, कासवाच्या पाठी, पक्ष्यांचीं घरटीं इ. ची निर्यात होते. लोक पापुअन वंशाचे आहेत.

**ऑरेगॉन**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील पॅसिफिक महासागराच्या किनाऱ्याला हें संस्थान आहे. याचा बहुतेक भाग डोंगराळ आहे. क्षेत्रफळ ९६,९८१ चौ. मैल आणि लोकसंख्या १०,८९,६८४ आहे. याची राजधानी सालेम असून पोर्टलंड आणि यूजीन हीं मोठीं शहरें आहेत. ३,८५५ मैल रेल्वेलाइन आहे व शिवाय ७२२ मैल छोटी विजेची गाडी आहे. कोलंबिया आणि स्नेक या दोन मोठाल्या नद्यांतून ५७० मैल जहाजांची वाहतूक चालते. इंडिअन लोकांची वस्ती स्वतंत्र ५१४ चौ. मैल क्षेत्रांत असून त्यांची लोकसंख्या ६,६०८ आहे. सं. संस्थानांतील एकंदर इमारती-लांकडांपैकीं $\frac{1}{5}$ लांकूड या संस्थानांत सांपडतें. २,००,००,००० एकर इतकें क्षेत्र जंगलांनीं व्यापलेलें आहे. मासेहि विपुल सांपडतात. सोनें, रुपें, तांबें आणि दगडी कोळसा हीं खनिज द्रव्यें सांपडतात. येथें शिक्षण सक्तीचें आहे. यूजेन शहरांत एक विद्यापीठ आहे. (स्थापना १८७६). येथील राज्यकारभार गव्हर्नर आणि त्याचें कायदेमंडळ चालवतात. सीनेट आणि प्रतिनिधि सभा असे कायदेमंडळाचे दोन भाग आहेत.

या प्रदेशांत येणारा (१५४३) पहिला शोधक बहुधा फेरो (स्पॅनियर्ड) हाच होता. त्याच्यानंतर येणारा ब्रिटिश दर्यावर्दी सर फ्रान्सिस ड्रेक (१५७९). १७९२ मध्यें कोलंबिया नदीचा शोध रॉबर्ट ग्रे यानें लावला. १८०५–६ मध्यें लेविस व क्लार्क या दुकलीच्या टोळीनें या भागास भेट दिली. १८३९ पासून न्यू इंग्लंड व जवळचीं संस्थानें यांतून या भागांत वसाहतीकरितां लोक येऊं लागले. १८४९ मध्यें ऑरेगॉन टेरिटरी विभाग स्थापन झाला व १८५९ मध्यें हें एक संस्थान म्हणून युनियनमध्यें दाखल झालें.

**ऑरेंज नदी**—दक्षिण आफ्रिकेंतली ही सर्वांत मोठी नदी ड्रेकन्सबर्ग पर्वतांत उगम पावून ऑरेंज फ्री स्टेट व केप प्रांतांच्या सरहद्दीवरून वाहत जाऊन ॲटलांटिक महासागराला मिळते. हिचा प्रवाह ६५० मैलांचा असून व्हाल ही तिची उपनदी ट्रान्सव्हालच्या दक्षिणेकडील सरहद्दीवरून वाहत येऊन तिला मिळते.

**ऑरेंज फ्री स्टेट**—हा दक्षिण आफ्रिकेंतला प्रांत असून याचें क्षेत्रफळ ४९,६४७ चौ. मैलांचें आहे. येथील प्रदेश (म्हणजे दक्षिण आफ्रिकेंतील पठारी प्रदेश) सपाट असून त्यावर मुबलक गवत उगवतें. व्हॉल नदीच्या उपनद्या (ऑरेंज, क्लिप वगैरे) या प्रांतांतून वाहतात. ब्लूम्‌ फाउंटन ही राजधानी असून व्हॅरिस्मिथ आणि क्रूनस्टाड हीं दुसरीं महत्त्वाचीं शहरें आहेत. येथील हवा आल्हादकारक व आरोग्यदायक असून शेती हा मुख्य धंदा होय. पण पाण्याच्या अभावीं बऱ्याच ठिकाणीं गवताळ भागांतून पशुपालन व पशुसंवर्धनाचा धंदा जोरांत चालतो. दक्षिणेकडील भागांत हिरे व दगडी कोळसा यांच्या खाणी आहेत. या प्रांतांत सुमारें १५०० मैलांचा लोहमार्ग आहे. किंबर्ले हिऱ्याच्या खाणी पूर्वी या संस्थानाच्या मालकीच्या असून त्या डचांच्या ताब्यांत होत्या. परंतु बोअर युद्धानंतर त्या इंग्रजांच्या मालकीच्या झालेल्या असून इंग्लिशांनीं ऑरेंज रिव्हर कॉलनी या नांवाची वसाहत या प्रदेशांतून काढून तो भाग युनियन ऑफ साउथ आफ्रिकेला जोडून टाकला.

लोकसंख्या सुमारें आठ लक्ष. पैकीं युरोपिअन दोन लक्ष आहेत. ग्रेट-ब्रिटनबरोबर झालेल्या युद्धांत ट्रान्सव्हालबरोबर हेंहि सामील होतें (१८९९). १९०० मध्यें तें ब्रिटिशांनीं घेतलें व त्याचें नांव ऑरेंज रिव्हर कॉलनी असें ठेविलें. १९१० मध्यें तें साउथ आफ्रिकन युनियनमध्यें सामील झालें व ऑरेंज फ्री स्टेट हें १८५४ पासून चालत आलेलें नांव पुन्हां धारण केलें आणि याच वेळीं मध्यंतरीं १० वर्षें असलेली ब्रिटिश अधिसत्ताहि नष्ट झाली.

**आरोग्यवर्धिनी**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें-पारा, गंधक, कज्जली, लोहभस्म, अभ्रकभस्म, ताम्रभस्म, त्रिफळा, शिलाजित, गुग्गूळ, चित्रकमूळ व कुटकी हीं असून कडु निम्बाच्या पाल्याच्या रसांत खल करतात. कुष्ट रोगांवरचें हें एक अतिशय प्रभावी औषध आहे. अंगावर चट्टे उठणें, पुळ्या उठणें, सुया टोंचल्याप्रमाणें वेदना होणें, तोंडाला कोरड पडणें, इत्यादि लक्षणांवर या औषधाचा उपयोग होतो. हृदयाच्या अशक्ततेमुळें सूज आली असल्यास त्यावरहि याचा उपयोग होतो. रोग जुनाट असल्यास विशेष उपयोग होतो. सर्वांग शोफ (सूज) रोगावर हें औषध देण्याची जुनी परंपरा आहे. त्या वेळीं रोगी दुग्धाहारावर राहिल्यास त्वरित गुण येतो. घेण्याचें प्रमाण २ ते ६ गुंजा असून दूध व पुनर्नवासव यांबरोबर घेतात.

**आरोग्यविज्ञान**— हें शास्त्र वैयक्तिक आणि सार्वजनिक आरोग्य कसें राखावें हें शिकवितें. खाणें, पिणें, व्यायाम, व इतर आरोग्यकारी साधनें या शास्त्रांत येतात. योग्य पाणीपुरवठा, सांडपाण्याचा निकाल, स्वच्छता, चांगलीं घरें, सांसर्गिक रोगांचा प्रतिबंध, अन्नाची तपासणी, इ. समाजाच्या आरोग्याला उपयुक्त गोष्टी सार्वजनिक आरोग्यशास्त्रांत येतात. दुय्यम शाळांतून हा विषय शिकविण्यांत येतो व उच्च परीक्षा घेणाऱ्या मोठ्या शैक्षणिक संस्थाहि आहेत. नगरपालिकांनीं नागरिकांच्या आरोग्याचें पालन करावयाचें असल्यानें या शास्त्राकडे त्यांनीं लक्ष पूर्णपणें दिलें पाहिजे.

आरोग्यासाठीं निरनिराळ्या व्यवसायांतील लोकांना दररोज लागणारे उष्मांश ( Calories ) खालीलप्रमाणें आहेत—

| | |
|---|---|
| शिक्षक किंवा कारकून | २६०० |
| शिंपी | २७५० |
| वैद्य | २७६० |
| गृहिणी किंवा टंकयंत्रावर काम करणारे | २८०० |
| सैनिक ( शांतताकाळांत ) | ३१५० |
| चांभार | ३१६० |
| सुतार | ३१९० |
| धातुकाम करणारे | ३५०० |
| रंगारी | ३६०० |
| मजूर ( साधारण कामाचे ) | ३६१० |
| विद्यापीठांतील वल्हेकरी | ४०८० |
| घिसाडी | ४१२० |
| विटा पाडणारे | ४६४० |
| पाथरवट | ४८५० |
| लांकूडतोडे | ५५०० |

या धंद्यांतील स्त्रियांना पुरुषांच्या ⅘ उष्मांश लागतात. माणसाला जगण्यासाठीं रोज साधारणपणें २४०० उष्मांश लागतात.

निरोगी माणसांची उंची व वजन यांमध्यें ठराविक प्रमाण असतें व निरनिराळ्या देशांत तें निरनिराळें आहे.

साधारण हिंदी माणसाचें उंची–वजनाचें कोष्टक

| उंची | किमान वजन (पौंड) | साधारण वजन (पौंड) | कमाल वजन (पौंड) |
|---|---|---|---|
| ५ फूट १ इंच | ९५ | १२५ | १५५ |
| ,, ,, २ ,, | ९७ | १२८ | १५८ |
| ,, ,, ३ ,, | १०० | १३१ | १६१ |
| ,, ,, ४ ,, | १०२ | १३४ | १६४ |
| ५ फूट ५ इंच | १०५ | १३७ | १६७ |
| ,, ,, ६ ,, | १०८ | १४१ | १७१ |
| ,, ,, ७ ,, | १११ | १४६ | १७६ |
| ,, ,, ८ ,, | ११५ | १५१ | १८१ |
| ,, ,, ९ ,, | ११९ | १५६ | १८६ |
| ,, ,, १० ,, | १२३ | १६१ | १९१ |
| ,, ,, ११ ,, | १२८ | १६७ | १९७ |
| ६ ,, ० ,, | १३१ | १७३ | २०३ |



उंची आणि वजन यांप्रमाणेंच शरीरावयवांचीं मापें ठराविक असलीं पाहिजेत. साधारणपणें त्यांचें कोष्टक असें—

शरीरावयवांचीं मापें—

| उंची | | छाती | छाती | कंबर | दंड | हाताची पोटरी | मांडी | पेंढरी | मान |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| फू. | इं. | इंच | इंच | इंच | इंच | इंच | इंच | इंच | इंच |
| ५ | ० | ३१ | ३४ | २५¼ | ११¾ | ११ | १८ | १२ | १२½ |
| ५ | १ | ३१½ | ३५ | २५¾ | १२ | ११¼ | १८½ | १२¼ | १२¾ |
| ५ | २ | ३२ | ३६ | २६½ | १२¼ | ११½ | १९ | १२½ | १३ |
| ५ | ३ | ३३ | ३७ | २७¼ | १२½ | ११¾ | १९½ | १२¾ | १३¼ |
| ५ | ४ | ३४ | ३८ | २८ | १२¾ | १२ | २० | १३ | १३½ |
| ५ | ५ | ३४½ | ३८½ | २८¾ | १३ | १२ | २०½ | १३¼ | १३¾ |
| ५ | ६ | ३५ | ३९ | २९¼ | १३¼ | १२¼ | २१ | १३½ | १४ |
| ५ | ७ | ३५½ | ३९½ | ३०¼ | १३½ | १२¼ | २१½ | १३¾ | १४¼ |
| ५ | ८ | ३६ | ४० | ३०¾ | १३¾ | १२½ | २२ | १४ | १४½ |
| ५ | ९ | ३६½ | ४०½ | ३१½ | १४ | १२¾ | २२½ | १४¼ | १४¾ |
| ५ | १० | ३७ | ४१ | ३२¼ | १४¼ | १२¾ | २३ | १४½ | १५ |
| ५ | ११ | ३७½ | ४१½ | ३२¾ | १४½ | १३ | २३½ | १४¾ | १५¼ |
| ६ | ० | ३८ | ४२ | ३३¼ | १४¾ | १३ | २४ | १५ | १५½ |

मनुष्याच्या शरीरांतील रक्ताचा दाब वयाप्रमाणें जो असला पाहिजे त्याचें प्रमाण—

| | रक्ताचा दाब | | |
|---|---|---|---|
| १५ ते २४ | १०६ ते १३६ | m. m. | Hg. |
| २५ ते ३४ | १०९ ते १३९ | ,, | ,, |
| ३५ ते ४४ | १११ ते १४१ | ,, | ,, |
| ४५ ते ५४ | ११५ ते १४५ | ,, | ,, |
| ५५ ते ६४ | १२० ते १५० | ,, | ,, |
| ६५ ते पुढें | १२४ ते १५४ | ,, | ,, |

तसेंच श्वासोच्छ्वासाचेंहि प्रमाण आहे—

| | श्वासोच्छ्वास |
|---|---|
| २ महिने ते २ वर्षें | ३५ |
| २ वर्षें ते ६ वर्षें | २३ |
| ६ वर्षें ते १२ वर्षें | २० |
| १२ वर्षें ते १५ वर्षें | १८ |
| १५ वर्षें ते २१ वर्षें | १६ ते १८ |
| प्रौढ वय | १६ ते १८ |

नाडीचे ठोके.

| | दर मिनिटास |
|---|---|
| गर्भांत | १४०–१५० |
| अगदीं लहानपणांत | १००–१४० |
| बालपणांत | ८०–१०० |
| प्रौढपणांत | ७२ |
| म्हातारपणांत | ७५—८० |

वैयक्तिक आरोग्यासंबंधीं या गोष्टी होत. रोग आणि औषधें यांसंबंधीं विवेचन निरनिराळ्या ठिकाणीं दिलेलें आहे. सार्वजनिक आरोग्य संभाळण्यासाठीं कायदे केलेले असतात.

**आरकन्सास**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील दक्षिण भागांतलें एक संस्थान. क्षेत्रफळ ५३,१०२ चौरस मैल. लो. सं. १९,४९,३८७. यांतील पुष्कळ नद्यांतून लहानमोठ्या बोटी चालतात. पर्वत बरेच आहेत. सर्वांत उंच मॅगझीन पर्वताचें शिखर २,७८५ फूट आहे. शिसें, जस्त, पेट्रोलिअम, सॉफ्ट कोल बॉक्साइट वगैरेंच्या खाणी आहेत. कापूस हें शेतीचें मोठें पीक आहे. या संस्थानांत ४७ गरम पाण्याचे झरे आहेत. ते पाहण्यास पुष्कळ लोक येतात. आरकन्सास याच नांवाची मोठी नदी यांतून वाहते व मिसिसिपीला मिळते. १८३६ मध्यें हें संयुक्त संस्थानांत दाखल झालें. राजधानी लिटल् रॉक येथें असून फायेट व्हिले येथें विद्यापीठ आहे.

**ऑर्कने बेटें**—स्कॉटलंडच्या उत्तर किनाऱ्यानजीक हा बेटांचा समूह असून त्याचें एकंदर क्षेत्रफळ ३७५ चौ. मैल आहे. या समूहांत सुमारें ९० लहान मोठीं बेटें आहेत. पण त्यांपैकीं २९ बेटांवर वस्ती आहे. स्कापा फ्लो येथें ब्रिटिश साम्राज्याचा मोठा आरमारी तळ आहे. या बेटांत पुष्कळ सरोवरें आणि पाण्याचे झरे आहेत. वृक्ष मात्र क्वचित् आहेत. येथील लोक शेती, गुरें पाळणें आणि मच्छीमारी हे धंदे करतात. येथील मुख्य शहर कर्कवॉल हें आहे. ९ व्या शतकांत हीं बेटें नॉर्वे देशाच्या ताब्यांत होतीं. पुढें १४६८ सालीं स्कॉटलंडचा राजा ३ रा जेम्स याला विवाहदेणगी म्हणून मिळालीं. लोकसंख्या २१,७०० आहे.

**आर्कराइट, सर रिचर्ड** (१७३२–१७९२)—हा ब्रिटिश यांत्रिक संशोधक प्रथम न्हाव्याच्या धंद्यांत शिरला होता. पुढें ३५ व्या वर्षी त्यानें आपलें सर्व लक्ष कापसाच्या कापडाच्या विणकामांत नवीन शोध लावण्याकडे सर्वस्वीं लावलें. त्यानें प्रथम सूत कांतण्याचा साचा याचा नवा शोध लावला. नंतर १७६९ मध्यें त्यानें रुळाची कांतणी (Spinning by Rollers) याचें पेटंट घेतलें. त्यानें आपली पहिली कापडाची गिरणी नॉटिंगहॅम येथें सुरू केली व ती चालवण्याच्या कामाला त्यानें घोड्यांचा उपयोग केला. पण ही व्यवस्था त्याला अत्यंत खर्चाची म्हणून सोडून द्यावी लागली. नंतर त्यानें १७७१ मध्यें डर्बीशायर परगण्यांत क्रोमफर्ड येथें पहिल्यापेक्षां फार अधिक मोठी गिरणी उभारली आणि ती पाणचक्कीनें चालवण्याची योजना केली. या गिरणींत त्यानें पुढें कापूस पिंजणें, पेळू करणें आणि सूत काढणें या बाबतींत कित्येक नवीन शोध लावून नवीन सुधारणा केल्या, आणि त्या सुधारणांचें नवें पेटंट १७७५ मध्यें मिळविलें. त्याच्या पेटंटच्या हक्कांबद्दल कोर्टांत अनेक दावे झाले आणि लोकांनीं दंगल करून त्याच्या कारखान्याची नासधूस केली. तरी देखील त्यानें या धंद्यांत पुष्कळ संपत्ति मिळवली. १७८६ मध्यें ३ ऱ्या जॉर्ज राजानें त्याला नाइट ही पदवी दिली.

**आर्कीटास** (खि. पू. ४००) — हा ग्रीक गणितज्ञ, मुत्सद्दी व सेनापति असून भूमितिशास्त्रांत त्यानें नवी भर घातली आहे. तसेंच त्यानें कित्येक जीं नवीं यंत्रें बनवलीं त्यांत कांहीं स्वयंगति-प्रेरित यंत्रें आहेत. 'उडतें कबूतर' हें त्याचें फार सुप्रसिद्ध यंत्र होय. प्लेटो व आरिस्टॉटल याचे फार ऋणी आहेत, असें म्हणतात. पण त्याच्या ग्रंथांपैकीं फारच अल्प भाग आज उपलब्ध आहे.

**ऑर्किड**—हा एक एकदल वनस्पतींचा मोठा वर्ग आहे. याच्या सुमारें २००० जाती आतांपर्यंत माहीत आहेत. या वनस्पती झुडपें किंवा वानस्पतिक उगवण असून त्यांस तंतुयुक्त मुळें असतात. देंठ आंखूड असतो व एक कांद्यासारखा दिसणारा भाग असतो. यांचीं फुलें फार शोभिवंत असतात. या वनस्पतींचीं महत्त्वाचीं सर्व

इन्द्रियें एका मध्यवर्ती स्तम्भा (कॉलम) मध्यें असतात. यांना फक्त एक पुं-केसर रेतधारक असतो (सिप्रिपेडियम जातींत दोन

असतात) व पराग-कण दोन मुद्गलाच्या आकाराच्या परागाशयांमध्यें (पोलिनिया) जमतात. यांच्या उत्पादनाची क्रिया फार विलक्षण आहे. हीं झुडुपें सर्व देशांत आढळतात. विशेषतः उष्ण प्रदेशांत यांच्या फार सुंदर जाती आहेत. यांच्या विलक्षण आकारामुळें व यांच्या फुलांच्या शोभेकरितां यांची लागवड सर्वत्र फार मोठ्या प्रमाणांत करण्यांत येते. यांच्यापासून सालेप नांवाचा यांच्या सत्त्वापासून तयार केलेला खाद्य पदार्थ होतो व व्हॅनिला नांवाचा सुगंध तयार कराण्यांत येतो.

**आर्किमेडीज** (खि. पू. २८७-२१२)— हा ग्रीक पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ आणि भूमितिशास्त्रज्ञ असून प्राचीन काळांतील शास्त्रज्ञांमध्यें हा सर्वश्रेष्ठ आहे. त्यानें आपल्या नवीन शोधांनीं गणितशास्त्रांत जी बहुमोल भर घातली ती अत्यंत महत्त्वाची आहे. यंत्रशास्त्र आणि जलस्थितिशास्त्र या शास्त्रांमध्यें शाश्वत, टिकाऊ महत्त्वाची भर ज्या शास्त्रज्ञांनीं घातली त्यांच्यापैकीं आर्किमिडीज हा एक आहे. व्यावहारिक यंत्रशास्त्रांत त्यानें अनेक शोध लावले. कॉंपाउंड पुली, एंडलेस स्क्रू, आर्किमिडिअन स्क्रू वगैरे यंत्रशास्त्रीय शोध त्याचेच आहेत. 'मला जर एखादा आधारबिंदु किंवा स्थिरबिंदु सांपडता तर मीं जगाला हालविलें असतें', अशी तो फुशारकी मारी.

**आर्किमेडी मळसूत्र**—हें एक पाण्यावर चढविण्याचें यंत्र

आहे. याचा शोध आर्किमेडीज यानें लाविला असें म्हणतात. याची रचना पुढें दिल्याप्रमाणें असते. एका जलाभेद्य अशा मोठ्या पंचपात्रांत एका वाटोळ्या दांड्याभोंवतीं मळसूत्रासारखी एक नळी वाटोळी बसविलेली असते. हें यंत्र तिरपें ठेवून पाण्यामध्यें बुडविलें व आंतील गोल दांडा फिरवला म्हणजे मळसूत्र फिरून पाणी वर चढूं लागतें. अर्थात् मर्यादित उंचीवर व मर्यादित प्रमाणांत पाणी चढवावयाचें असल्यास या यंत्राचा उपयोग करतां येतो.

**आर्कोनम्**—मद्रास, उत्तर अर्काट जिल्हा, वालाजापेट तालुक्यांतील एक शहर. साउथ इंडियन व मद्रास सदर्न मराठा या रेल्वेचें हें जंक्शन असल्यामुळें फार महत्त्वास चढलें आहे. प्राचीन देवळांविषयीं प्रसिद्ध असलेलें कांजीवरम् शहर येथून १७ मैल दूर आहे. पाऊसमान सरासरी ३८ इंच असतें. दर वर्षी मे महिन्यांत श्रीदेवराजस्वामीच्या देवळांत मोठा उत्सव असतो. गांवांत बरींच छत्रें व खाणावळी आहेत.

**ऑर्गन वाद्य**— हें एक वायुवाद्य आहे. अर्वाचीन पद्धतीच्या या वाद्यास चार पट्ट्यांचे संच असतात व कित्येकांस पांच असतात व वाजविणाऱ्या पायाशीं चाव्या असतात. या चाव्या अडीच सप्तकांपर्यंत असतात व पट्ट्या पांच सप्तकांपर्यंत असतात. यांखेरीज ६० ते ७० खुंट्या (स्टॉप्स) असतात. याखेरीज निरनिराळे पट्ट्यांचे संच किंवा चाव्या एकमेकांशीं जोडण्याकरितां वगैरे बऱ्याच भानगडीच्या रचना असतात. ऑर्गनच्या नळ्या लांकडाच्या किंवा धातूच्या केलेल्या असतात व त्यांचे दोन वर्ग असतात; ते म्हणजे (फ्ल्यू) नलिकाकार किंवा (रीड) जिव्हाकार हे होत. बहुतेक पहिल्या प्रकारच्या असतात. आणि त्यांचा आवाज त्या नळींतील हवेच्या कंपामुळें व स्वरवादनामुळें निघतो. हा कंप त्या नळींत बुडाशीं पट्टी दाबून हवा सोडल्यामुळें उत्पन्न होतो. दुसऱ्या प्रकारामध्यें जिभेसारखी एक धातूची पट्टी असते. ती नळीच्या बुडाशीं अशा रीतीनें बसविलेली असते कीं, दाबलेली हवा तींत सोडल्याबरोबर ती कंप पावूं लागते. पहिल्या प्रकारच्या नळ्यांचीं तोंडें बंद केलेलीं किंवा उघडीं असतात. तोंडें बंद असल्यास त्यांतून निघणारा स्वर एक सप्तक खालचा असतो व उघडीं असल्यावर त्याच्यावरील सप्तकाचा असतो. कॉयरचें ऑर्गन साथ देण्याच्या सोईचें केलेलें असतें व स्वतंत्र (सोलो) ऑर्गनमध्यें निरनिराळे कौशल्ययुक्त स्वर काढण्याची सोय असते.

**आर्गस**— १. हा एक मोठा, सुंदर व चमत्कारिक पक्षी आहे. हा आग्नेय आशियामध्यें विशेषतः सुमात्रा व इतर बेटांत आढळतो.

२. ग्रीक पुराणांतील एक राक्षस. याला शंभर डोळे होते. ज्यूनो देवतेनें मत्सरबुद्धीनें याच्या प्रतिबंधांत इयो या आपल्या नवऱ्याच्या प्रियकरणीला ठेविलें होतें. अतिशय दक्ष माणसाला 'आर्गसदर्शना' (ऑर्गस-आइड) म्हणतात.

**ऑर्चर्डसन, सर विल्यम क्विलर** (१८३५–१९१०)—हा ब्रिटिश चित्रकार असून याचीं विशेष प्रसिद्ध चित्रें आव्हान (दि चॅलेंज), ख्रिस्तोफर स्लाय, समशेर राज्ञी, नेपोलियन, प्रथम मेघ, वगैरे आहेत.

**आर्चेंजल**—सोव्हिएट रशिया, श्वेत समुद्रावरील उत्तर ड्वीना नदीच्या मुखाजवळील बंदर. आर्चेंजल या नांवाच्या प्रांताचें हें मुख्य शहर होय. या प्रांताचें क्षेत्रफळ ३८२६० चौरस मैल असून या प्रांतांतून जवसाचें तेल, अंबाडी, मेण, चटया, इमारती लांकूड, डांबर व रोगण, वगैरे माल निर्यात होतो. वर्षांतले सहा महिने हें बंदर गोठलेलें असतें. लो. सं. २,८१,००० (१९३९).

**आर्टा क्सर्क्सीझ**—या नांवाचे अनेक राजे इराण देशांत होऊन गेले. १ ला क्सर्क्सीझ याचा मुलगा आर्टाक्सर्क्सीझ नांवाचा खि. पू. ४१५ मध्यें इराणच्या गादीवर आला. त्यानें इजिप्शियन लोकांनीं केलेलें बंड मोडलें. अथेन्सबरोबरचें युद्ध थांबवलें व आपल्या प्रजेवर शांततेनें राज्य करून खि. पू. ४२५ सालीं तो मरण पावला. याच नांवाचा २ रा राजा २ रा डरायस याचा पुत्र खि. पू. ४०५ सालीं राज्यावर आला. त्यानें आपला भाऊ सायरस याचा पूर्ण पराभव करून नंतर स्पार्टन लोकांबरोबर युद्ध सुरू केलें, आणि अनेक ग्रीक शहरें व आशियांतील बेटें सोडून इराणी लोकांच्या ताब्यांत देण्यास स्पार्टन लोकांना भाग पाडलें. याच्या मृत्यूनंतर खि. पू. ३५९ सालीं त्याचा मुलगा आर्टाक्सर्क्सीझ ओकस हा सिंहासनारूढ झाला. त्यानें फिनिशियन लोकांचा आणि मिसरी लोकांचा पराभव केला आणि त्या दोन्ही देशांत मोठीं क्रूर कृत्यें केलीं. या राजाला त्याचा सेनापति बागोआस यानें खि. पू. ३३९ सालीं विषप्रयोग केला.

**आर्क्टिक महासागर**—उत्तर ध्रुवाभोंवतालच्या समुद्राला हें नांव असून या समुद्राचा किनारा युरोप, आशिया व अमेरिका या तीन खंडांना लागलेला आहे. या समुद्रांत पुष्कळ मोठालीं बेटें व मोठाले उपसागर व आखातें आहेत. ओबी, येनिसी आणि लेना या आशियांतील व मॅकेन्झी ही कानडांतील नदी या सागराला मिळते. कॉड, शार्क, व्हेल, सील, वालरस यांसारख्या माशांच्या जाती विपुल आहेत. जमिनीवर आस्वल, कुत्रे, सांबरें, यांसारखे मोठे सस्तन प्राणीहि दिसतात. या प्रदेशासंबंधीं माहिती उत्तर-दक्षिण ध्रुवप्रदेशावरील लेखांत आढळेल.

**आर्टेझियन विहिरी**—फ्रान्समधील आर्तेझ या प्रांतांत प्रथम या प्रकारच्या विहिरी करण्यांत आल्या म्हणून अशा विहिरींना हें नांव पडलें. जमिनीमध्यें खोल सरळ उभीं भोंकें (Borings) पाडल्यानंतर तळभागांतून पाणी वर येतें, अशा विहिरींना हें नांव आहे. खोल भूमिभागांतून अशा रीतीनें होणारा पाण्याचा पुरवठा कांहीं ठिकाणीं इतका विपुल असतो कीं, तेथील नापीक जमीनींतूनहि कालवे वाहूं लागतात. या प्रकारच्या पुष्कळ विहिरी आफ्रिकेंतील आल्जीरिया सहारा भागांत खोदलेल्या आहेत. व त्यामुळें त्या प्रांतांत पाण्याची समृद्धि झाली आहे. लंडन व पॅरिस या शहरांच्या विस्तृत प्रदेशांतहि पुष्कळ ठिकाणीं अशा प्रकारच्या विहिरी खोदल्या आहेत. भूपृष्ठाखालील फार खोल ठिकाणांतून हें पाणी येत असल्यामुळें तें भूपृष्ठावरील पाण्यापेक्षां अधिक उष्ण असतें. म्हणून अशा उष्ण पाण्याचा उपयोग दवाखान्यांत, मत्स्यकुंडांमध्यें आणि उद्यानमंडपांमध्यें, वगैरे ठिकाणीं अनेक कामांकडे करतात. ऑस्ट्रेलिया आणि अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें या देशांत अशा प्रकारच्या पुष्कळ विहिरी असून त्यांचे कालवेहि काढलेले आहेत. पेट्रोलियमच्या विहिरी बहुधा याच प्रकारच्या असतात.

**आर्द्रतामापक**—(हायग्रोमीटर). हवेंतील बाष्पांश मोजण्याचें साधन अथवा उपकरण.

आंत्ररज्जु, केंस वगैरेंसारख्या वस्तूंची हवेंतील आर्द्रांश शोषल्यामुळें लांबी वाढते. या गुणधर्माचा आश्रय करून आर्द्रतामापक बनविण्यांत येतात. स्वित्झर्लंडमध्यें एक खेळणें असतें. त्यामध्यें हवा दमट किंवा ओलसर असली म्हणजे एक मनुष्याची आकृति बाहेर येते आणि हवा कोरडी असली म्हणजे एका स्त्रीची आकृति बाहेर येते. या खेळण्यांत एका आंत्ररज्जूचा उपयोग केलेला असतो व हवा दमट असली म्हणजे तिचा पीळ उलगडतो व वरील चमत्कार दृष्टीस पडतो. एका तऱ्हेच्या आर्द्रतामापकामध्यें विशिष्ट प्रमाणाची हवा एखाद्या खटहरिद (कॅल्शम क्लोराइड), स्फुरपंचप्राणिद (फॉस्फरस पेंटॉक्साइड) किंवा गंधकाम्लांत बुडविलेला प्यूमिस दगड यासारखा पदार्थ ठेवलेल्या नळींतून घालविण्यांत येते व तो पदार्थ त्या हवेंतील आर्द्रतांश शोपून घेतो व त्याचें तितक्या प्रमाणांत वजन वाढतें. या वाढलेल्या वजनावरून हवेंतील बाष्पांशाचें प्रमाण काढण्यांत येतें. दुसऱ्या एका उपकरणामध्यें हवेंतील आर्द्रतेच्या अंशाचें त्या उपकरणावर जलांत रूपांतर होईल इतकी हवेस कृत्रिम रीतीनें थंड करण्यांत येते. ज्या उष्णमानावर असें या आर्द्रांशाचें पाण्यांत रूपांतर होतें, त्या उष्णमानास द्रव-

बिंदु म्हणतात. नंतर कोष्टकावरून या दवबिंदूच्या वेळचा हवेंतील बाष्पाचा अधिकतम दाब काढण्यांत येतो व त्याची हवेच्या उष्णमानाबरोबर तुलना करण्यांत येते. आणि या दोहोंच्या प्रमाणावरून आर्द्रतेचें प्रमाण काढण्यांत येतें. या तऱ्हेचे आर्द्रतामापक डॅनिएल, रेनो व डाइन्स यांनीं बनविले आहेत. डाइन्स याच्या आर्द्रतामापकास ओल्या-सुक्या गोळ्याचा आर्द्रतामापक म्हणतात. यामध्यें दोन एकासारखे एक उष्णमानमापक असतात. यांपैकीं एकाच्या गोळ्यास मलमलीचें आवरण घातलेलें असतें व त्या मलमलीच्या फडक्याचें एक टोंक एका भांड्यांत नेऊन सोडलेलें असतें व तें भांडें पाण्यानें भरलेलें असतें; त्यामुळें हा गोळा नेहमीं ओला ठेवण्यांत येतो. या पाण्याच्या बाष्पीभवनामुळें हा गोळा थंड पडतो व त्या उष्णमानमापकांतील पारा खालीं येतो व याचें प्रमाण त्या पाण्याच्या बाष्पीभवनावर म्हणजे हवेच्या कोरडेपणावर अवलंबून असतें व याप्रमाणें आर्द्रता मोजण्यांत येते.

**ऑर्थोक्लेस**— हें एक स्फट ( अॅल्युमिनम ) आणि पालाश ( पोटॅशिम ) यांचा सिकितेन ( सिलिकेट ) आहे. यामध्यें फेलस्पार, ग्रानाइट, ऱ्हायोलाइट आणि ट्राकाइट हे येतात. याचे स्फटिक बहुधा एकपृष्ठीय असून जुळे असतात. याचा रंग पांढऱ्यापासून पिवळट तांबडसर असतो. हा अपारदर्शक, पारदर्शक किंवा अर्धपारदर्शक असतो. याचें विशिष्टगुरुत्व २५.६ असतें व काठिण्य ६ असतें. याच्यावर चाकूनें ओरखडा काढतां येत नाहीं. परंतु हवेचा परिणाम होऊन याची केओलीन नांवाची माती होते.

**ऑर्निथोरिंग्कस**—बदकासारख्या चोंचीचा व चपट्या

पायाचा हा प्राणी पूर्व ऑस्ट्रेलिया आणि टॅस्मानिया या भागांत आढळतो. हा एकोपस्थी ( मोनोट्रेमाटा ) वर्गांतला असून आकारांत लहान ओट्टरसारखा दिसतो. याच्या अंगावर बारीकशी पिंगट लव असते. शेंपूट आंखूड व चपटें असून डोळे बारीक असतात. हे अंडीं घालतात व पोरांना पाजतात. हे पोहत जाऊन भक्ष्य शोधतात.

**आर्नोल्ड, मॅथ्यू** ( १८२२–८८ )—इंग्रजी कवि, टीकाकार व शिक्षणशास्त्रज्ञ. १८४७–५१ पर्यंत हा लॉर्ड लॅन्सडौनचा खाजगी चिटणीस असल्यानें त्याला शाळांचा तपासनीस ही जागा मिळाली. या जागेवर तो तीस वर्षांवर होता. दहा वर्षें ऑक्सफोर्ड येथें काव्याचा प्राध्यापक म्हणून होता. त्यानें आपल्या कवितांचे संग्रह प्रसिद्ध करून कीर्ति मिळविली असली तरी टेनिसन किंवा ब्राउनिंग यांच्या बरोबरीला तो येत नाहीं. तथापि वाङ्मयीन टीकाकार म्हणून त्याचा दर्जा मोठा आहे. 'एसेज इन् क्रिटिसिझम्' हा त्याचा टीकाग्रंथ प्रसिद्धच आहे. त्यानें कांहीं धार्मिक ग्रंथहि केले होते. त्याचे शिक्षणविषयक ग्रंथ उपयुक्त आहेत. त्याची गद्य लेखनशैली भारदस्त असून कंटाळवाणी मुळींच नाहीं.

**आर्नोल्ड, सर एडविन्** ( १८३२–१९०४ )—एक इंग्रज कवि. यानें अनेक वर्णनपर कविता व भावगीतें लिहिलीं आहेत. ग्रीक व संस्कृत ग्रंथांचीं कांहीं भाषांतरें केलीं आहेत. गौतम बुद्धाच्या चरित्रावर 'दि लाइट ऑफ एशिया' हें काव्य व 'दि लाइट ऑफ दि वर्ल्ड', 'पर्ल्स ऑफ फेथ', 'लोटस अँड ज्युएल' इत्यादि काव्यांचा तो कर्ता आहे.

**ऑर्म, रॉबर्ट**— एक इंग्रज इतिहासकार. हा कॅ. अलेक्झांडर हॅमिल्टन याच्याबरोबर हिंदुस्थानांत व्यापार करण्याकरितां आला. यानें बंगाल प्रांताचा व मराठ्यांचाहि इतिहास लिहिला आहे. याचा 'हिस्टॉरिकल फ्रॅग्मेन्ट्स' हा ग्रंथ इतिहाससाधनग्रंथ म्हणून प्रसिद्ध आहे. त्याशिवाय यानें अनेक ठिकाणचे अस्सल ऐतिहासिक उतारे जमा केले, ते इंडिया ऑफिसांत ठेवले आहेत. त्यांचा इतिहासाच्या कामीं फार उपयोग होतो.

**आर्मगांव**—मद्रास, नेलोर जिल्हा, गुडूर तालुक्यांतील एक गांव. मद्रास सदर्न मराठा रेल्वेच्या गुडूर स्टेशनपासून हें २६ मैल दूर आहे. १६२५ त कारोमंडल किनाऱ्यावर ज्याच्या मदतीनें इंग्रजांनीं प्रथम वसाहत केली त्या आरुमुग मुदालियार गृहस्थाचें नांव या गांवाला दिलें गेलें असेंहि कोणी म्हणतात. शेजारच्या मोनापालेम गांवीं जें दीपगृह बांधलें आहे, त्याचा १४ मैलांवरून दिसणारा उजेड आर्मगांवाजवळील उथळ भागाची जहाजांना आठवण देतो. आर्मगांव दीपगृहाच्या उत्तरेस सात मैलांवर असलेलें दुगराजुपट्टण पूर्वीं आर्मगांवचें बंदर असे. येथून जवळच ईस्ट इंडिया कंपनीनें बांधलेल्या किल्ल्याचे अवशेष दिसतात.

**आर्मस्ट्रॉंग, विल्यम जॉर्ज, लॉर्ड** (१८१०–१९००)—एक यांत्रिक संशोधक व स्थापत्यविशारद. याच्या नवीन बनविलेल्या यंत्रांत जलविद्युत् यंत्र, जलउच्चालक यंत्र ( हायड्रॉलिक क्रेन ) हीं प्रमुख्यानें सांगतां येतील. याच्या संशोधित यंत्रांसाठीं न्यूकॅसलजवळ 'एल्सविक वर्क्स' नांवाचा कारखाना १८४८

सालीं उभारण्यांत आला. याच्याच नांवानें प्रसिद्ध असणारी रायफल तोफ प्रथम येथें बनविण्यांत आली.

**आर्माडिलो**—(नखमृग, घुण). दक्षिण अमेरिकेमध्यें आढळणारा हा एक दंतहीन सस्तन प्राणी आहे. याच्या अनेक

जाती आहेत. हा स्लॉथ (आस्वल) व पिपीलिकाभक्षक यांच्या दरम्यानच्या अवस्थेतील प्राणी आहे. याच्या अंगावर कठिण अस्थिमय कवच असतें. तें चिलखतासारखें पट्टयापट्टयांचें बनलेलें असतें. हे प्राणी जमिनींत बिळें करून राहतात व दिवसाचे बिळांत पडून राहून रात्रीचे बाहेर पडतात.

**आर्मेनियन पंथ**—आर्मेनिया प्रांतांतील जे खिस्ती आर्मेनियन विधींचें पालन करतात त्यांस आर्मेनियन म्हणतात. ते अलीकडे जगांतील सर्व महत्त्वाच्या शहरांत आढळतात. आर्मेनियन पंथाची स्थापना सेंट ग्रेगरी 'प्रकाशदाता' ('इल्युमिनेटर') यानें केली असें म्हणतात. हा खिस्ती सनाच्या तिसऱ्या शतकांत होऊन गेला. प्रथम ते पश्चिम सीरिया प्रांतांत प्रचलित असे विधी पाळीत असत. नंतर त्यांनीं चौथ्या किंवा पांचव्या शतकांत आर्मेनियन विधी पाळण्यास सुरुवात केली. हे विधी आर्मेनियन भाषेंत आहेत. यांच्यापैकीं कांहीं 'मोनोफिसाइट' आहेत व यामुळें त्यांचा घरादारांपासून संबंध सुटलेला आहे. बाकीचे कॅथॉलिक पंथी आहेत. त्यांचा मुख्य धर्मोपदेशक (पेट्रिआर्च) प्रत्येकीं भिन्न आहे. यांच्यामध्यें 'मोनोफिसाइट' मतांचा प्रवेश सहाव्या शतकांत झाला.

**आर्मेनिया**—हल्लीं सोव्हिएट रशियांत समाविष्ट झालेलें आशिया खंडांतलें एक जुनें लोकसत्ताक राज्य. तें काळ्या समुद्राच्या दक्षिणेस असून तुर्की व इराणी हद्दींस लागून आहे. क्षेत्रफळ ११,९४५ चौरस मैल. लो. सं., १२,८१,६०० (१९३९). एरिव्हान हें मुख्य ठिकाण. हा देश डोंगरमाथ्यावरील पठार असून यांतील डोंगर बरेच उंच आहेत. यांत कापूस, तंबाखू व फळफळावळ यांची पैदास होते. खनिज संपत्तिहि बरीच आहे. परंतु एकंदरींत देश कृषिप्रधानच आहे; मूळचा आर्मेनिया हल्लींच्या चौपट मोठा होता. परंतु त्यांतलि बहुतेक भाग तुर्कस्तान अगर सोव्हिएट रशियांतील इतर कांहीं संस्थानें यांत सामील झाला. हल्लींचा आर्मेनिया १९१८ मध्यें स्वतंत्र झाला व १९२१ मध्यें रशियन सोव्हिएट युनियनमध्यें स्वतंत्र संस्थान म्हणून दाखल झाला.

**आर्य**—आर्य हा शब्द विशिष्ट मानववंशाचा वाचक नाहीं. वेदांतील 'अर्य' किंवा 'आर्य' शब्द विशिष्ट वंशाचे बोधक नाहींत. तथापि जेव्हां युरोपियांत संस्कृत भाषेचा आणि तुलनात्मक भाषाशास्त्राचा अभ्यास होऊं लागला आणि प्राचीन भारतीय आणि प्राचीन युरोपीय यांचें एक वंशसंभवत्वाचें नातें पाश्चात्यांस दिसूं लागलें तेव्हां या सर्व मोठ्या मानववंशांस लागू पडेल असा कोणता तरी शब्द योजला पाहिजे असें वाटून संस्कृत वाङ्मयांत दिसून येणारा "आर्य" शब्द निवडला गेला आणि त्याचें "आर्यन" असें रूपांतर होऊन तो शब्द विशिष्ट मानववंशवाचक किंवा भाषासंघवाचक अर्थानें योजला गेला.

आर्य लोक प्रथम कोठें राहात असावेत याविषयीं एकमत नाहीं. लो. टिळकांच्या मतें ते उत्तरध्रुवाजवळ असावेत; तर इतर कांहीं संशोधक समजतात कीं, ते मध्य आशियांत राहत असावेत. आर्यांच्या कांहीं शाखा पश्चिमेकडे तर कांहीं पूर्वेकडे पसरल्या. ही गोष्ट सुमारें वीस हजार वर्षांपूर्वींची असावी. हे आर्य लोक ज्या ज्या प्रदेशांत वास्तव्य करून राहिले त्या प्रदेशांतील प्राचीन इतिहासांत त्यांचा इतिहास समाविष्ट आहे.

**आर्य असंग**—एक बौद्ध तत्त्वज्ञानी. ह्याचा गांधार येथें जन्म झाला. हा प्रथम महिशासक पंथाचा अनुयायी होता व हीनयान पंथाचें वैभाषिक तत्त्वज्ञान त्याला मान्य असे. नंतर मैत्रेयाचा शिष्य बनून महायान पंथाच्या योगाचार्य तत्त्वज्ञानाचा अनुयायी बनला. नालंद येथें हा पंडित म्हणून कांहीं दिवस होता. हा कांहीं वर्षें कौशंबी व अयोध्या येथेंहि राहत असे. स. ५३१ मध्यें याच्या "महायानसमपरिग्रहशास्त्र" या ग्रंथाचें चिनी भाषेंत भाषांतर करण्यांत आलें.

यानें एकूण १२ ग्रंथ लिहिले, त्यांपैकीं बऱ्याच ग्रंथांच्या चिनी व तिबेटी प्रती उपलब्ध आहेत.

**आर्यक**—कद्रपुत्र एक नाग. कुंती ही आर्यकाची पौत्री असल्यामुळें भीमास जेव्हां कौरवांनीं विषयुक्त अन्न चारून, प्रमाणकोटीतीर्थांत बुडविलें, तेव्हां आर्यकानेंच त्याला वांचविलें.

**आर्यक** (घनश्याम)— एक नाटककार. तंजावरच्या तुकोजी राजाचा हा प्रधान होता. यानें राजशेखर कवीचा उल्लेख आपल्या ग्रंथांत केलेला आहे. यानें कुमारविजय नांवाचें पंचांकी नाटक लिहिलें. तसेंच यानें डमरुक, मदनसंजीवन, नवग्रहचरित्, प्रचंड राहूदय अशीं आणखी नाटकें लिहिलेलीं आढळतात.

**आर्यभट** (जन्म सु. ४७६)—भरतवर्षांतील इतिहासकालीन पहिला ज्योतिःशास्त्रज्ञ. हा केरळ प्रांताचा राहणारा. याचा 'आर्यसिद्धान्त' हा ज्योतिषविषयक ग्रंथ सर्वमान्य व सुप्रसिद्ध आहे. आज रूढ झालेले अनेक सिद्धान्त आर्यभटानें इतक्या जुन्या काळांत प्रतिपादिले आहेत. हा वेध घेण्यांतहि कुशल होता. गणित शास्त्रांतहि याचा हातखंडा होता. याच्या ग्रंथाचें आरबी भाषांतरहि झालें होतें. डॉ. कर्न यानें १८७५ त हॉलंडमध्यें आर्यसिद्धान्त सटीक प्रसिद्ध केला.

**आर्यवैद्यक**—वेद ज्याप्रमाणें अनादि मानतात त्याचप्रमाणें आर्यवैद्यकहि अनादि समजण्यांत येतें. अथर्ववेद हाच आद्य आयुर्वेद म्हटल्यास हरकत नाहीं. आयुर्वेदाला या वेदाचें उपांग समजण्यांत येतें. तर त्याला ऋग्वेदाचा उपवेदहि म्हटलें आहे.

आयुर्वेदाचे शल्य, शालाक्य, कायचिकित्सा, भूतविद्या, कौमारभृत्य, अगदतंत्र व वाजीकरण असे आठ भाग पाडले आहेत. आयुर्वेदावर चरक, सुश्रुत, वाग्भट, धन्वंतरी, माधव, भावमिश्र, वगैरे पंडितांनीं लिहिलेले ग्रंथ सुप्रसिद्ध असून अतिशय प्रमाणभूत मानिले जातात.

प्राचीन भारतीय प्रथम रोग हे राक्षसांनीं आणलेले म्हणून समजून त्यांवर मंत्रतंत्रांचा इलाज करीत. हें अथर्ववेदांतील औषधी मंत्रांवरून दिसून येईल. चरक–सुश्रुतादि शास्त्रीय ग्रंथांतून सुद्धां भुतानें पछाडल्यामुळें मनोदौर्बल्य येतें अशा तऱ्हेचे उल्लेख आहेत.

पूर्वजन्माची कल्पना भारतीयांत जेव्हां शिरली तेव्हां रोग का होतात, याची नवीन उपपत्ति देण्यांत येऊं लागली. ती म्हणजे पूर्वजन्मींचीं पापें, या जन्मीं रोग, व्यंग घडवून आणितात ही होय. या पूर्वजन्मींच्या पापांबद्दल प्रायश्चित्तेंहि देण्यांत येतात.

यापुढील जास्त सयुक्त व प्रौढ सिद्धान्त म्हणजे जंतूंचा. डोकें, कान, डोळे, आंतडीं, इत्यादिकांचीं दुखणीं जंतुजन्य असतात. आधुनिक सूक्ष्मजंतुशास्त्राचें बीज या सिद्धान्तांत सांपडेल.

प्राचीन काळीं रोगांवर उपाय म्हणून जादुटोणे करीत. पुष्कळदां रोगांवरील उपाय होमिओपाथी किंवा ॲलोपाथी तत्त्वांप्रमाणें असत.

आर्यवैद्यकाचा दुसरा काळ म्हणजे जीवक कौमारभच्चा–(कुमारभृत्या) पासूनचा. जीवक हा बुद्धाचा समकालीन असून नांवाप्रमाणें बालरोगवैद्य होता. यापुढील काळ चरक-सुश्रुतादिकांचा होय.

या काळांतील ग्रंथांचा बौद्ध ग्रंथांशीं विरोध नसे. सुश्रुत–वाग्भटांतील भारतीय शस्त्रक्रिया आधुनिक युरोपीय शस्त्रक्रियापद्धतीची जननी होय हें युरोपीय पंडितांनाहि कबूल आहे. भारतीय वैद्य व वैद्यकग्रंथ यांना परदेशीं मागणी असे. पुढें शास्त्रविकास झाला तरी पूर्वीच्या कोणत्याहि कल्पना सुटल्या नव्हत्या. विंचू–सापांवर मंत्र, देवी-गोवरांकरितां शीतला-देवीची पूजा, भूतबाधेवर उपाय, सटवीची पूजा या गोष्टी असतच व अद्यापिहि आहेतच. चरक–कालानंतर टीकोपटीका, नाडीपरीक्षा व रसायन वगैरे शाखांखेरीज शास्त्रीय उपपत्तींत व संशोधनांत मुळींच भर पडली नाहीं म्हटलें तरी चालेल; व त्यामुळें हें वैद्यक सध्यां मागसलेलें असून सुशिक्षितांकडून आज त्याची चहा होत नाहीं. कॉंग्रेस सरकार आल्यापासून आयुर्वेदीय औषधांना आणि शिक्षणसंस्थांना प्रोत्साहन मिळालें आहे खरें; पण खरा चिकित्सक अभ्यास व संशोधन–साधनें दिसत नाहींत.

**आर्यशूर**— शूर किंवा आर्यशूर हा बराच प्रसिद्ध कवि असून हा जरी बराच उत्तरकालीन दिसतो तरी बहुधा अश्वघोषाच्या संप्रदायांतील असावा. याच्या जातकमालेची भाषा व रचनापद्धति अगदीं सूत्रालंकाराच्या पद्धतीसारखीच आहे. ज्याप्रमाणें धर्मोपदेश करिते वेळीं भिक्षूंना प्रवचनाच्या उपयोगासाठीं जातकांची योजना झालेली आहे, त्याचप्रमाणें धर्मप्रचारकांसाठीं जातकमालेची योजना झालेली असावी. जातकमाला या ग्रंथांत चौतीस जातकें असून तीं चरियापिटकांतील पस्तीस जातकांप्रमाणेंच बोधिसत्त्वाच्या पारमितांचें ज्ञान करून देण्यासाठीं लिहिलेलीं आहेत.

अजिंठ्याच्या लेण्यांतील चित्रांमध्यें जातकमालेंतील कथांसंबंधीं चित्रें असून समर्पणलेखामध्यें आर्यशूरानें केलेले श्लोक आहेत. प्राचीन लिपिविद्येप्रमाणें, हे खोदीव लेख इसवी सनाच्या सहाव्या शतकांतील असावेत. ज्या अर्थी आर्यशूराच्या दुसऱ्या एका ग्रंथाचें इ. स. ४३४ त चिनी भाषेंत भाषांतर झालें होतें त्या अर्थी हा कवि बहुधा इसवी सनाच्या चौथ्या शतकांत होऊन गेला असावा.

**आर्यसमाज**—हिंदुस्थानांतील एक अर्वाचीन धर्मपंथ. स्वामी दयानंद नांवाच्या औदीच्य ब्राह्मणानें या पंथाची स्थापना केली. मुंबईत या समाजाचें पीठ १८७५ सालीं स्थापिलें गेलें. दयानंद यांनीं लिहिलेला 'सत्यार्थप्रकाश' हा ग्रंथ पंथाचा प्रमाणग्रंथ मानला जातो. वेदांचें पुनरुज्जीवन करून वेदकालीन धार्मिक, विद्याविषयक, व धर्मसंबंधीं पद्धति

प्रचलित करणें हा स्वामींचा मुख्य हेतु असे. यज्ञ, मंत्र, नियोगपद्धति, वगैरे वेदकालीन आचार-विचारांविषयीं हा समाज आदर बाळगतो. त्यास सर्व वेद पूर्णपणें मान्य आहेत. परंतु वेदाचा अर्थ लावण्याची पद्धति भिन्न आहे. स्वामींचा वेदार्थ 'वेदभाष्य' नांवाच्या ग्रंथांत सांपडतो. आर्यसमाजाच्या शाखा हिंदुस्थानांतील मुख्य शहरांत व या देशाबाहेरहि असून त्या समाजाकडून विद्याविषयक व धर्मप्रचाराचें कार्य मोठ्या प्रमाणावर चालतें. आर्यसमाजीयांस मूर्तिपूजा मान्य नाहीं. ते जातिभेद पाळीत नाहींत. अन्यधर्मीय लोकांस आर्यसमाजांत शुद्धीच्या द्वारें दाखल करून घेण्यांत येतें. गोरक्षण, अनाथ बालिकाश्रम, बालविवाहप्रतिबंध, विधवाविवाह, पतितपरावर्तन, शास्त्राभ्यास, वगैरे दिशांनीं या समाजाचें कार्य चालतें. सध्यां या पंथाचे अनुयायी अजमासें पांच लक्ष लोक असावेत असा अंदाज आहे. आर्यसमाजाची सत्यशोधक नांवाची एक शाखा गुजरातेंत आहे. [ हिंदुधर्मदीपिका ]

**आर्यावर्त**— उत्तर हिंदुस्थानाचें प्राचीन नांव. आर्यावर्ताचा उल्लेख बृहत्संहितेंत आला आहे (५·६७). आर्यावर्ताचा अर्थ आर्य अथवा उत्कृष्ट अथवा उदार लोकांचें घर असा आहे. समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथील शिलालेखांत याचा उपयोग उत्तर हिंदुस्थान दर्शविण्याकडे केला आहे. मानवधर्मशास्त्रांत (२·२२) पूर्व व पश्चिम समुद्रापर्यंत पसरलेला हिमालय व विंध्य पर्वत यांच्यामधील देश अशी आर्यावर्ताची मर्यादा दिली आहे. रामायणांत (बालकांड सर्ग ३९) अशाच तऱ्हेचा मजकूर आहे. परंतु उत्तर व दक्षिण हिंदुस्थान यांच्यामधील स्पष्ट विभागणी राजशेखर कवीनें दिली आहे. हा कवि बालरामायणाच्या सहाव्या अंकांत "विंध्य पर्वतांत उगम पावून त्याच्या दक्षिणेलगत वाहणाऱ्या नर्मदानदीला आर्यावर्त व दक्षिणापथ यांच्यामधील मर्यादा ( विभागणी रेषा ) म्हणतो."

**ऑर्लिन्स**— हें फ्रान्समधील एक प्रमुख शहर असून तेथें विणकामाचे कारखाने (कापूस व ताग), धातुकाम, साखरेचे व दारूचे कारखाने मुख्यत्वें असून या शहराला ऐतिहासिक महत्त्वहि आहे. जोन ऑफ आर्क ही जी फ्रान्सच्या इतिहासांतील 'झांशीची लक्ष्मीबाई' तिचा या शहराशीं बराच संबंध होता. लो. सं. (१९३६) ७३,१५५.

**आर्वी**— वऱ्हाड, वर्धा जिल्ह्यांतील याच नांवाच्या तहशिलीचें एक शहर. हें गांव सुमारें तीनशे वर्षांपूर्वी तेलंगराव वलीनें वसविलें म्हणतात. हिंदू लोक तेलगराव हा हिंदू होता असें समजतात व मुसलमान तो मुसलमान समजतात दोन्ही धर्मांचे लोक त्याच्या समाधीची पूजा करीत असतात. या ठिकाणीं व्यापारी लोक पुष्कळ असून व्यापारहि चांगला आहे. इ. स. १८६७ मध्यें येथें म्युनिसिपल कमिटी स्थापन झाली. हें शहर भरभराटींत असून या ठिकाणीं कापसाचा मोठा व्यापार आहे. सरकी काढण्याचे कारखाने व कापसाचे गठ्ठे बांधण्याचें कारखाने बरेच आहेत.

**आर्ष्टिषेण**— कृतयुगांतील एक राजर्षि. हा तपश्चर्येनें ब्राह्मण झाल्याची कथा आहे. हा भृगुकुलांतील मंत्रकार होता.

**आर्सीकेरे**— म्हैसूर, हसन जिल्ह्यांतील उत्तरेकडचा तालुका. क्षेत्रफळ ४८६ चौ. मै., लो. सं. ८६२५१. आर्सीकेरे, बाणावर व हरिणहळ्ळी हीं तीन शहरें व ३५४ खेडीं या तालुक्यांत आहेत. तालुक्यांत गुरांची चांगली निपज होते. नाचणी सर्वत्र पिकते तर पश्चिम आणि दक्षिण भागीं विशेषतः मिरच्यांची चांगली लागवड दृष्टीस पडते. येथून बाहेर बंगलोर व बल्लारी बाजारांत उत्तम खोबरें रवाना होतें.

शहर—जंक्शन-स्टेशन आहे. लो. सं. सुमारें ४० हजार. शहराबाहेर उत्तरेकडे कांहीं जुनाट देवळें आहेत. येथून जवळच डोंगरावर विष्णूचें देवालय आहे. म्हैसूर हरिणहळ्ळी ही सोन्याची खाण येथून ७ मैलांवर आहे.

**आलकरी**—आळत्याचा रंग करणारी एक जात. ही मुख्यतः खानदेशांत आढळते. नाशिक, नगर, सातारा या जिल्ह्यांतहि कांहीं आलकरी आहेत. आपण राजपुतान्यांतून दक्षिणेंत आलों असें हे सांगतात. चितोडची भवानी ही यांची कुलदेवता आहे. पूर्वी हे आल झाडाच्या मुळ्यांपासून तांबडा रंग काढीत. कृत्रिम रंग निघाल्यापासून यांचा धंदा बसला व हे आतां शेतकरी व मजूर बनले आहेत.

**आलंड बेटें**—युरोप, बाल्टिक समुद्रांत फिनलंडच्या आखाताजवळ असलेल्या बेटांचा समुदाय. यांतील ८० बेटांवर वस्ती आहे. स्वीडिश वंशाचे या बेटांवरील लोक मच्छीमारी करून उपजीविका करतात. स्वीडननें हीं रशियाला १८०९ सालीं दिलीं व १९१८ मध्यें फिनलंडच्या ताब्यांत आलीं. या बेटांचें क्षेत्रफळ ५७२ चौ. मैल असून लोकसंख्या २७६७६ आहे.

**ऑलिंपस**—हें नांव अनेक पर्वतराजींना प्राचीन काळीं दिलेलें आढळतें. त्यांपैकीं प्रसिद्ध म्हणजे ग्रीक देशांतील कांबूनियन पर्वताचा अगदीं पूर्वेकडचा भाग. हा थीसलीमध्यें आहे. त्याची सर्वांत जास्त उंची ९,७०० फूट असून ग्रीक लोक ह्या पर्वताला देव म्हणून मान देतात.

**ऑलिंपिक सामने**—प्राचीन काळीं ग्रीसमध्यें ऑलिंपिया येथें हे शक्तीचे सामने होत. दर चार वर्षांनीं एकदां राष्ट्रांत सर्वत्र शांतता पुकारून या खेळांना आरंभ होई; त्या वेळीं कुस्त्या

मुष्टियुद्धें, शर्यती, पळणें, फेंकणें, उड्या मारणें, इ. खेळांच्या चढाओढी होऊन बक्षिसें दिलीं जात. खि. पू. ७७६ इतक्या मागें याचा उल्लेख सांपडतो. पुढें खि. पू. ३९३ च्या सुमारास हे सामने बंद पडले. नंतर १७९४ सालीं पॅरिसमध्यें निरनिराळ्या राष्ट्रांच्या प्रतिनिधींची बैठक होऊन पुन्हा १८९६ सालीं अथेन्स येथें असे सामने घेण्यांत आले. त्यानंतर दर चार वर्षांनीं महायुद्धांचीं वर्षे सोडून सामने होत आलेले आहेत. १९३६ त बर्लिन येथें सामने झाले. नुकते फ्रान्समध्यें हे सामने घेण्यांत आले. अलीकडच्या सामन्यांतून अमेरिका सारखी यशस्वी होत आली आहे.

**आलिंपिया**— ग्रीस देशांतील मोरिआ प्रांताच्या पश्चिमबाजूकडील जुन्या एलिस या जिल्ह्यांत हें गांव एका सुंदर दरींत वसलेलें असून जगप्रसिद्ध खेळांच्या सामन्यांची सुरुवात येथूनच झालेली आहे. ग्रीक काळांतील झ्यूसचें मंदिर, तसेंच हीरा या देवतेचें मंदिर प्रसिद्ध असून ऑलिम्पिकच्या पहिल्या जेत्या वीरांनीं विजय मिळवल्यावर हीराच्या देवालयांत एकत्र बसून भोजन केल्याची आख्यायिका आहे.

**ऑलिव्ह**—[वर्ग-ओलिआसी. ओलिया युरोपिआ]. हें एक फळझाड आहे. याच्या अनेक जाती आहेत. याची उंची २० ते ३७ फूट असते. याला दडस, अरुंद, मळकट, हिरव्या किंवा निळ्या रंगाचीं पानें येतात. फुलें लहान व पांढरीं असतात. आणि तीं जून, जुलै किंवा ऑगस्ट महिन्यांत येतात. फळ लांबट

वाटोळसर असून त्यांत मऊ गर असतो. त्याचा रंग हिरवट असतो. हा गर एका फार टणक आठोळीला चिकटून असतो. आठोळींत बी असते. हें फळ कडू व दर्पयुक्त असतें. परंतु यापासून पुष्कळ तेल निघतें. याचें मूलस्थान सीरिया प्रांत आहे. इतर आशियांतील देशांतहि हीं झाडें होतात. याची वाढ हळूहळू होते व तें फार वर्षे जगतें. याचें लांकूड वरगुती सामान–पेट्या, वगैरे करणारे लोक वापरतात. या झाडाची लागवड बहुतेक त्याच्या तेलाकरितां करण्यांत येते. हें तेल याच्या फळाच्या सालींत व गरांत असतें. याचीं फळें खाण्यांत येतात.

**ऑलिव्ह तेल**— ऑलिव्ह झाडाच्या फळाच्या गरापासून व सालीपासून हें तेल काढण्यांत येतें. हें बेचव, फिकट रंगाचें, निर्गंध व चिकट असतें. हें पाण्यांत विरघळत नाहीं व तें पेट घेतें. हें खाण्यामध्यें वापरतात. औषधामध्येंहि याचा उपयोग करण्यांत येतो. उत्तम ऑलिव्ह तेल फ्रान्समध्यें एक्स गांवाच्या आसपास तयार होतें.

**ऑलिव्हाइन**— हा खनिज पदार्थ अग्न्युत्पन्न खडकांत सांपडतो. याचा रंग तपकिरी, हिरवा असतो. हा शुद्ध लोहसिकित व मग्नसिकित असून याच्या काठिण्यामुळें रत्न म्हणून याचा उपयोग करतात. याला कोणी पुष्पराग किंवा लसण्या म्हणतात.

**आलुप**—( आलुव किंवा आलुक ). वनवासीच्या ईशान्येस असलेल्या इ. स. च्या सहाव्या–सातव्या शतकांतील, एक जुनें राज्य. बदामीजवळील महाकूट येथील अंकित लेखांत डॉ. भांडारकर यांनीं आपल्या 'अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन' पुस्तकांत मलबार किनाऱ्यावरील अलुपे नांवाच्या गांवाचा वरील नांवाशीं संबंध दिसतो असें सुचविलें होतें, व डॉ. बुहलरनेंहि आलुव हें समुद्र किनाऱ्यावरीलच गांव आहे असें म्हटलें होतें. परंतु फ्लीटला हा शोध मान्य नव्हता.

बदामीजवळील महाकूट येथील स्तंभ-लेखावरून हा देश कीर्तिवर्मा चालुक्यानें इ. स. ५६५–५९७ त जिंकला होता असें कळतें. पुढें ऐहोळच्या अंकित लेखांत दुसऱ्या पुलिकेशीनें आलुपांना पादाक्रांत केल्याचा उल्लेख आहे. ही गोष्ट ६०८–९ च्या सुमारास घडली. पुढें गोव्याच्या कदंबांच्या लेखांत जयकेशीनें इ. स. १०५२–५३ च्या सुमारास आलुपांना जिंकून घेतलें असें म्हटलें आहे; त्यावरून ते पश्चिम चालुक्यांच्या शत्रुपक्षास सामील होते असें दिसतें. या आलुपांचा बिल्हणाच्या विक्रमांकदेवचरितांतहि उल्लेख आला आहे.

**आलें ( सुंठ )**— या झाडास संस्कृतमध्यें आर्द्रक, इंग्रजींत जिंजर म्हणतात. हें वाळविल्यावर शुंठी, सुंठ वगैरे नांवांनीं ओळखिलें जातें. ही वनस्पति पूर्वेकडील बेटांत, आशिया, दक्षिण अमेरिका व पश्चिम आफ्रिका या प्रदेशांत होते. या झाडाची लागवड हिंदुस्थानांतील सर्व उष्ण व सर्द अशा प्रदेशांत होते. या पिकाला जास्त परिश्रम व काळजी घ्यावी लागते. जमीन चांगली असून ती विशेष भुसभुशीत अथवा कठिण नसावी. पाणी नियमित लागतें. खत चांगलें द्यावें लागतें.

निरनिराळ्या व्याधींच्या निवारणार्थ आर्य व युनानी वैद्यकांत आल्याचा व सुंठीचा उपयोग फार प्राचीन काळापासून होत आहे. इंग्रजी पद्धतींतहि सुंठीची योजना केली जाते. कांहीं पेय पदार्थ व मद्यें तयार करण्यांतहि सुंठीचा उपयोग करतात. सुंठीचें तेल निघतें. हेंहि औषधी कामाकडे लावतात. आलें हें पाचक, सारक, अग्निदीपक, तोंडास रुचि देणारें व कंठास हितकर आहे.

**आलेंबर्ट, जीन ल रॉंद ( १७१७–१७८३ )**—फ्रेंच गणितशास्त्रज्ञ व तत्त्ववेत्ता. त्यानें चलनशीकलनशास्त्र ( इन्टीग्रल कॅल्क्युलस) या विषयावर आणि द्रव पदार्थांत घन पदार्थांची गति

या विषयावर लिहिलेल्या निबंधामुळें १७४१ सालीं याला सायन्स ॲकेडमीचा सभासद करण्यांत आलें. १७४३ मध्यें त्यानें गतिशास्त्रावरचा ( डायनॉमिक्स ) आपला सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला. द्रवपदार्थविषयींचा त्यानें दुसरा एक ग्रंथ लिहिला. यानें प्रतिपादिलेल्या एका महत्त्वाच्या सिद्धांतामुळें घनगतिशास्त्रांतील ( रिजिड डायनॉमिक्स ) प्रश्नांना स्थितिशास्त्रांतील ( स्टॅटिक्स ) प्रश्नांचें स्वरूप प्राप्त झालें. पहिला फ्रेंच एनसायक्लोपिडिआ ३३ भागांत प्रसिद्ध झाला त्याचे दिदेरो आणि इतर संपादक यांच्या-बरोबर हाहि एक संपादक होता व त्यांतील तत्त्वज्ञान व गणित-शास्त्र या दोन विषयांवरील बहुतेक लेख यानें लिहिले आहेत.

**आलेम टेजो**—पोर्तुगालचा हा सर्वांत मोठा प्रांत असून त्याचें क्षेत्रफळ ९२१९ चौरस मैल आहे. लो. सं. सुमारें पांच लाख. इव्हो ही या प्रांताची राजधानी होय. बहुतेक सर्व प्रदेश गवताळ असून पूर्वेकडील खोऱ्यांचा भाग सुपीक आहे. त्यामधून धान्य व फळफळावळ यांची लागवड होते. बुचांचीं झाडें याच भागांत आहेत. उत्कृष्ट घोड्यांची येथें पैदास होते. खाणींतून तांबें आणि लोखंड निघतें.

**आल्किबिडीज** ( खि. पू. ४५०–४०४ )—हा ग्रीक ॲथिनिअन सेनापति व मुत्सद्दी असून त्यानें ॲथिनिअन लोकां-करितां अनेक प्रकारचे करमणुकीचे कार्यक्रम उदारपणानें सुरू केल्यामुळें फार लोकप्रिय बनला आणि क्लिॲनच्या मरणानंतर याच्या हातांत मुख्य राजकीय सत्ता आली. त्या वेळीं त्याला निसिअस या पुढाऱ्याखेरीज दुसरा कोणीहि प्रतिस्पर्धी नव्हता. त्यानें दीर्घकाल चाललेल्या पेलोपोनेशियन युद्धामध्यें फार महत्त्वाची कामगिरी केली. ४१५ मध्यें त्यानें सिसिलीवर हल्ला करण्याची योजना सुचविली व त्यालाच या योजनेचा पुढारी नेमण्यांत आलें. पण हा हल्ला चढविण्यास जाणारीं लढाऊ जहाजें हाकारण्यापूर्वींच त्याच्यावर देव-धर्मनिंदक असा आरोप ठेवण्यांत आला. या आरोपाच्या चौकशीला तोंड देण्याऐवजीं तो अथेन्सहून स्पार्टा व तेथून इराणांतील टिसाफेर-नीज या क्षत्रपाच्या आश्रयास गेला. तथापि लवकरच याच्या-वरील हद्दपारीची शिक्षा रद्द करण्यांत आली आणि त्याला अथेन्समध्यें परत बोलावून सेनापति करण्यांत आलें. त्यानें कित्येक विजय मिळवले, पण एका आरमारी लढाईंत त्याचा पराभव झाला म्हणून त्याचें सेनापतिपद रद्द करण्यांत आलें. तेव्हां तो पुन्हां इराणांतील क्षत्रपाच्या आश्रयास गेला असतां, तेथें त्याचा खून करण्यांत आला.

**आल्जीर्स**—हें आल्जेरियाचें राजधानीचें व सर्वांत मोठें शहर असून भूमध्य समुद्रांतील कोळसा घेण्याचें एक मुख्य बंदर आहे. याशिवाय गव्हर्नर जनरल व आर्चबिशप यांचे प्रासाद, 'ग्रँड' व 'न्यू' मशिदा, सरकारी कचेऱ्या, विश्व-विद्यालय, पदार्थसंग्रहालय, अपील कोर्ट, यांमुळें या शहराचें महत्त्व वाढलेलें दिसून येतें. नव्या पद्धतीवर वसवलेलें नवीन शहर व पूर्वींचें जुनें शहर असे या शहराचे दोन भाग पडतात युरोपियन व मुसलमान हे येथील रहिवासी होत. युरोपियनांत रोमन कॅथॉलिकांचाच भरणा जास्ती दिसून येतो. मूर, अरब, बर्बर व तुर्क हे मुसलमान आहेत. लो. सं. २,५२,३२१ ( १९३६ ).

सन १५३० मध्यें आल्जीर्समधून स्पॅनीअर्ड लोकांची हकालपट्टी झाली व हें चाच्यांचें एक मुख्य ठिकाण झालें. सन १५४१ मध्यें पांचव्या चार्ल्स बादशहानें हें ठिकाण काबीज करण्याचा केलेला प्रयत्न फसला. यानंतर सन १८३० मध्यें फ्रेंच सैन्यानें या शहरावर हल्ला केला. त्यांत चांचे लोकांचा पराभव झाला व आल्जीर्स फ्रेंचांच्या ताब्यांत आलें.

**आल्जेरिया**—आफ्रिका, एक फ्रेंच वसाहत. आफ्रिका खंडा-च्या वायव्य बाजूला हा देश असून याची राजधानी आल्जीर्स आहे. या वालुकामय देशांत पांढऱ्या झुली घेतलेले पुरुष व ओढण्या घेतलेल्या स्त्रिया दिसतात. शहरांतील अरुंद रस्त्यांवरूनच सर्व व्यापार व व्यवहार होत असून शिंपी, न्हावी, भिकारी, गोष्टी सांगून मनोरंजन करणारे लोक यांची एकच गर्दी असून अर्धवट सुधारलेल्या या आफ्रिकेंतील लोकांची रस्त्यावरच नाचरंगाची करमणूक चालते. लो. सं. ७२,३४,६८४.

काबिली महिला

लोकांचा मुख्य धर्म मुसलमानी असून लोक अद्यापि साक्षरसुद्धां झालेले नाहींत. परंतु या देशाचा व्यापार मात्र जोरांत आहे. एकंदर क्षेत्रफळ ८,४७,५०० चौरस मैल असून त्यांतून ट्युनिशिया व मोरोक्को या प्रांतांतून जोरांत दळणवळण चालतें. तसेंच सहारा वाळवंटांतहि टिम्बक्टूपर्यंत हजारों मैल जाणारे लांबीचे रस्ते व पुष्कळ लोहमार्ग या देशांत आहेत. त्याचप्रमाणें 'आर्टेझियन विहिरी' मुळें हा वाळवंटाचा भाग वृक्षवनस्पतींनीं फुललेला आहे. निर्यात माल मुख्यत्वें दारू, मेंढ्या, लोंकर, धान्य, फळें, बुचांचें लांकूड हा असून आयात माल मुख्यत्वें कापसाचें व इतर कापड, कॉफी, साखर, दगडी कोळसा व यंत्रें हा होय. हा सर्व व्यापार आल्जीर्स व ओरान या बंदरांतून चालतो. अरब लोकांचा मच्छीमारीचा धंदाहि मोठा आहे. या वसाहतीवर फ्रान्सनें नेमलेला एक गव्हर्नर जनरल असतो.

**आलडर**— [ वर्ग–अमेंटासी; उपवर्ग–चेटुलासी ]. भूर्ज वृक्षाच्या जातीचीं हीं झाडें मध्य व पश्चिम युरोपांत आढळतात. यांच्या सुमारें १४ जाती आढळल्या आहेत. यांची एक जात ब्रिटनमध्यें आढळते. या झाडाच्या लांकडाचा व्यापार चालतो व तें नेहमीं पाण्यांत ठेवाव्या लागतात अशा वस्तू करण्याकरितां वापरतात. या झाडाची साल कातडीं कमावण्याकरितां वापरतात.

**आल्डर्नें बेट**—हें इंग्लंडच्या मालकीचें इंग्लिश खाडीमधील अगदीं उत्तरेकडील सुमारें ३–४ मैल लांबीचें व १½ मैल रुंदीचें बेट आहे. याचा किनारा खडकाळ पण अन्तःप्रदेश सुपीक आहे. सुमारें एक–तृतीयांश प्रदेश गवताळ असून येथल्या आल्डर्नें जातीच्या गाई लहान बांध्याच्या, देखण्या व फार दुधाळ म्हणून प्रसिद्ध आहेत. येथील लोक अद्यापहि फ्रेंच भाषा बोलतात. लो. सं. १,५२१ आहे. गेल्या महायुद्धांत १९४० सालीं जर्मनीनें हें जिंकून घेतलें होतें; पण १९४५ त जर्मनी शरण गेल्यावर ब्रिटिशांना परत मिळालें.

**आल्ताई पर्वत**— आशिया खंडांत सैबेरिया व मंगोलीया या दोन देशांच्या सरहद्दीवर हा पर्वत आहे. या पर्वतावरून उगम पावणाऱ्या ओब आणि इरतीश या मोठ्या नद्या होत. ब्येलुका हें या पर्वताचें सर्वांत उंच शिखर असून त्याची उंची अकरा हजार फूट आहे. पर्वतावर बर्च, आल्डर, आस्पेन, फर, लार्च, स्टोनपाईन, वगैरे वृक्षांची दाटी आहे. तसेंच सोनें, चांदी, तांबें आणि लोखंड या खनिज संपत्तीनें पर्वत समृद्ध आहे.

**आल्प्स पर्वत**—युरोप खंडांत सर्वांत उंच आणि फार विस्तृत अशी ही पर्वतांची रांग उत्तर इटली, फ्रान्स, स्वित्झर्लंड आणि ऑस्ट्रिया या देशांच्या सरहद्दीवर आहे आणि युरोपांतील इतर बहुतेक सर्व पर्वतांशीं ती जोडली गेली आहे. सर्वांत उंच शिखर माऊंट ब्लँक १५,७८१ फूट उंच आहे. या पर्वतांतून जाणारे मुख्य घाट ग्रेट सेंटबर्नार्ड, माँट केनिस, सिंप्लॉन व सेंट गॉडर्ड हे होत. यांपैकीं शेवटल्या तीन घाटांत आगगाडीचे बोगदे पाडलेले आहेत. ते फ्रान्सकडून इटलीकडे एक ( ८ मैल लांबीचा ), स्वित्झर्लंडकडून इटलीकडे एक १२ मै. लांबीचा व दुसरा ९ मै. लांबीचा असे मोठाले बोगदे आहेत. कित्येक शिखरांच्या टोकांवर जाण्याकरितांहि प्रवासी आगगाड्या आहेत. आल्प्स पर्वतावर सरोवरें व पाणलोट तर पुष्कळच आहेत.

उत्तर भागांत जिनेव्हा, कॉन्स्टन्स, झ्यूरिच, आणि दक्षिण भागांत मागिओर, कोमो, गार्डा हीं प्रमुख सरोवरें आहेत. येथून उत्तर समुद्राकडे -ऱ्हाईन नदी, भूमध्य समुद्राकडे ऱ्होन नदी, आड्रीआटीक समुद्राकडे पो नदी, आणि काळ्या समुद्राकडे डॅन्यूब नदी वाहते. वनस्पतिशास्त्राच्या दृष्टीनें आल्प्स पर्वताचे ६ निरनिराळे विभाग पडतात. ऑलिव्ह, ऱ्हाइन, अन्नधान्याचा, देवदारू वृक्षाचा व गुरचरणाचा अशीं नांवें असून ६ वा सर्वांत उंच प्रदेश सतत बर्फानें आच्छादलेला असतो. या सर्वांत उंच प्रदेशांत रानटी बकरी आणि शामॉय हे प्राणी असतात. खार आणि पांढरा ससा हे याच वरच्या भागांत राहतात. खालच्या भागांत रानमांजर, कोल्हा, अस्वल व लांडगे हे प्राणी असून शिवाय गिधाड, गरुड व इतर आकाशांत उंच भरारी मारणारे पक्षी, उत्तम ट्राऊट आणि इतर जातीचे मासे येथील सरोवरांत सांपडतात. भूगर्भ शास्त्रदृष्ट्या या पर्वताचे ३ विभाग पडतात. त्यांपैकीं मध्यभागांत स्फटिकमय खडक आणि वरच्या व खालच्या भागांत गाळाचे ( सेडिमेंटरी ) खडक आहेत. लोखंड, शिसें, सोनें, रुपें, तांबें, जस्त, तुरटी व दगडी कोळसा हीं खनिज द्रव्यें येथें सांपडतात.

या पर्वतानें युरोप खंडाचे उत्तर व दक्षिण असे विभाग पडून या दोन्ही विभागांतील लोकांची राहणी, भाषा व मानवी जीवन यांत संपूर्ण बदल झालेला आहे. या पर्वतांत निसर्गसौंदर्यानें भरलेल्या दऱ्या व खोरीं असून त्यांतील लोक स्वातंत्र्याचे भोक्ते, स्वभावानें चिकाटीचे व कौशल्यपूर्ण वस्तू तयार करण्यांत हातखंडा आहेत. येथील सृष्टिसौंदर्य व उत्तम हवामान यांमुळें हा पर्वत म्हणजे जगाचें एक मानवासाठीं क्रीडांगणच होय. उतारावर भरपूर पाऊस पडत असल्यानें सर्वत्र कुरणें व शेतें आहेत. पर्वताच्या शिखरावर बाराहि महिने बर्फ पडत असून त्यामुळें तेथून सुमारें एक हजार हिमप्रवाह निवतात व ते शिखरावरून खालीं उतरूं लागले कीं वितळून त्याचे प्रवाह बनतात. या डोंगरावरून पडणाऱ्या प्रवाहावर वीज उत्पन्न केली जाते.

या पर्वतावर स्वित्झर्लंड हा देश मधोमध वसलेला असून पर्वताच्या वाटोळ्या शाखा दक्षिण फ्रान्स, उत्तर इटाली, आणि जर्मनी यांत पसरलेल्या आहेत. या पर्वतांतून बोगदे पाडून सर्वत्र मार्ग नेलेले आहेत. ऑस्ट्रियन टिरोल व स्वित्झर्लंड या भागाकडे अनेक प्रवासी सारखे येत असतात. कारण येथील बर्फाच्छादित शिखरावर सहज रीतीनें जाऊन विनासायास निसर्गसौंदर्य लुटतां येतें. हिरव्यागार जंगलांच्या पार्श्वभूमीवर असलेल्या पाचूसारख्या रमणीय तलावांच्या कांठावरून हजारों प्रवाशांसाठीं मोठमोठीं वसतिगृहें दिसतात. स्थापत्य शास्त्राच्या कौशल्याचे नमुने मोटारखाटेवर ठिकठिकाणीं दिसतात. रस्त्याच्या खालून झरे व ओहाळ वाहत जाण्यासाठीं खडकांच्या पुलावरील रस्ते, हिमप्रवाह व सुसाट वाऱ्यापासून रक्षण करण्यासाठीं बांधलेल्या उंच उंच भिंती, विचित्र प्रकारचे पूल हा सर्व नमुना मोटार–रस्त्यानें पहावयाला सांपडतो. हिवाळ्याच्या दिवसांत अति उंच ठिकाणीं बर्फांत रूतून अडकलेल्या प्रवाशांना मदत

करण्याचें काम सेंट बर्नार्ड खिंडीतील मिशनरी लोक व त्यांचे कुत्रे करतात.

**आल्फ्रेड दि ग्रेट** (८४८–९००) — इंग्लंडचा एक राजा. हा ८७२ मध्यें गादीवर बसला, तेव्हां इंग्लंडमध्यें डेन्स लोकांनीं धुमाकूळ माजवून बराचसा प्रदेश काबीज केला होता. त्यांच्याशीं लढतांना एकदां पराभव पावून त्याला पळून जावें लागलें व अज्ञातवासांत दिवस काढावे लागले. पण हळूहळू सैन्य जमवून त्यानें ८७८ मध्यें डेन्स लोकांना बाहेर घालवून दिलें व खरा राजा बनला. यानें इंग्लंडमध्यें सर्व प्रकारच्या सुधारणा केल्या. शहरें (लंडन विशेषतः) सुधारलीं व शेतकी, कायदे, आरमार, राज्यव्यवस्था वगैरे सर्व गोष्टींकडे व विद्योत्तेजनाकडेहि चांगलें लक्ष पुरविलें. त्यानें स्वतः कांहीं ग्रंथरचना केली. पुन्हां ८९४ मध्यें डेन्स लोकांचा हल्ला आला असतां तो परत लावला. याप्रमाणें या राजाला 'दि ग्रेट' ही पदवी शोभते.

**आलबर्ट सरोवर**—आफ्रिका. नाईल नदीला यांतून एक फांटा गेला आहे. क्षेत्रफळ २०६४ चौ. मै.. या सरोवरांत मासे पुष्कळ असून सरोवराभोंवतीं मगरी व हिपोपोटेमसहि पुष्कळ आढळतात. व्हिक्टोरिया सरोवरापासून निघणारी व्हिक्टोरिया नाईल नदी हिला मिळते व हिच्यापासून श्वेत नाईल नदी वाहात जाते.

**आलबर्टा**—अमेरिका, कानडांतील एक प्रांत. रॉकी पर्वताच्या उताराचा पायथा व प्रेअरीचा पश्चिम कॅनडाचा प्रदेश यांचा संगम आलबर्टा या निसर्गवैभवानें नटलेल्या प्रांतांत होत असून त्याचें क्षेत्रफळ २५५,२८५ चौरस मैल इतकें आहे. संयुक्त संस्थानापासून उत्तरेकडे सुमारें ७५० मैल लांबी या प्रांताची असून रुंदी ३०० ते ४०० मैल आहे.

एकंदर क्षेत्रफळापैकीं सुमारें $\frac{1}{4}$ म्हणजे ९७,०००,००० एकर जमीन शेतीसाठीं उपयोगांत आणली जात असून शेतीव्यतिरिक्त दगडी कोळसा, नैसर्गिक ज्वलनोपयोगी वगैरे खनिजें सांपडतात. या वायूचा उपयोग जळण म्हणून करतात व त्याच्यावर औद्योगिक कारखाने चालवतात. पेट्रोलहि मोठ्या प्रमाणावर टर्नर दरींत सांपडतें. नैसर्गिकरीत्या या देशाचे तीन विभाग पडत असून दक्षिण भाग गवताळ मैदानाचा आहे. पूर्वी या भागांत गुरांचीं चराऊ कुरणें होतीं पण आतां त्या ठिकाणीं सर्वत्र धान्य पेरतात. वास्तविक या प्रदेशांत बर्फच पडतें. परंतु कोरडे चिनूक वारे आपल्या उदारपणामुळें बर्फ वितळवून टाकतात आणि सर्व भागाला वसंतऋतूची शोभा येते. त्या वाऱ्यांचा आणखी एक फायदा म्हणजे कांहीं भागाला बाष्पपुरवठा होतो व वितळलेल्या बर्फाच्या पाण्याचा कालव्यांतून कांहीं ठिकाणीं शेतीसाठीं उपयोग केला जातो.

मध्य आलबर्टामध्यें एडमंटन हें राजधानीचें ठिकाण असून या भागांत दाट लोकवस्ती आहे. याचा उत्तरेकडील भाग मऊ लांकडांच्या जंगलांनीं भरलेला असून त्यांत मुख्यत्वें पॉपलरचे वृक्ष फार आहेत. याच मध्यभागांत मुख्यत्वें हल्लीं गुरेंढोरें चरत असून दूधदुभतें वगैरे धंदे या भागांत जोरदार रीतीनें चालतात. सूचिपर्णी वृक्षांच्या जंगलांतून केसाळ प्राणी राहातात व त्यांच्या कातड्यांना चांगली किंमत येते; त्यामुळें शिकार करणें व लांकूड तोडणें व जोरदार धंदे आहेत. शिकार केलेल्या जनावरांची मौल्यवान कातडीं एडमंटन येथें आणून नंतर तीं बाजारांत रवाना होतात. याच भागांत कॅनडाचीं प्रसिद्ध राखीव जंगलें आहेत. या जंगलांतील उद्यानांना लोक हिवाळ्यांत व उन्हाळ्यांत निसर्गशोभा पाहण्यासाठीं भेटी देतात. या प्रांतांत एक विद्यापीठ आहे. आलबर्टाची लोकसंख्या (१९४१) ७९६१६९ आहे.

**आलबानिया**— युरोप, बाल्कन द्वीपकल्पाच्या पश्चिमेकडील एक प्रजासत्ताक राज्य. आड्रियॅटिक समुद्राकडे या देशाचा पूर्व किनारा येतो. या देशाचें स्थान युगोस्लाव्हिया व ग्रीस यांच्यामध्यें असून क्षेत्रफळ सुमारें १०,६२९ मैल आहे. एकंदर क्षेत्रफळापैकीं सुमारें $\frac{1}{10}$ भाग पिकाला व लागवडीला योग्य असा आहे. शेती जुन्याच पद्धतीनें केली जाते. पिकांत तंबाखू, धान्य, फळफळावळ व ऑलिव्ह यांचें पीक मुख्यत्वें काढतात. डोंगरावरील प्रदेशांत गवत मुबलक असल्यानें पशुपालनाचा उद्योग हाच महत्त्वाचा धंदा आहे. या पशूंत गुरेंढोरें, मेंढ्या व बकरीं यांचा मुख्यत्वें भरणा आहे. पर्वतांतून खनिज संपत्ति विपुल आहे परंतु वाहतुकीच्या साधनांच्या अभावीं अद्याप म्हणावी तशी तीं बाहेर आलेली नाहीं. दगडी कोळसा, पेट्रोल, तांबें व मीठ हीं मुख्य खनिजें होत. मोठमोठे कारखाने अगर उद्योगधंदे येथें नाहींत.

मध्ययुगांतील जमिनदारी पद्धति येथें अमलांत असून जमिनदाराचीं कुळें लहान लहान खेड्यांतून राहतात. टिराना ही राजधानी व सर्वांत मोठें शहर आहे. कोरित्सा, स्कुटारी हीं दुसरीं महत्त्वाचीं बंदरें आहेत. मुख्य वस्ती मुसलमान व ख्रिश्चन यांची आहे. डोंगराळ प्रदेशांत राहणाऱ्या टोळ्या कुरापती काढून सारख्या पिढ्यान् पिढ्या भांडत आलेल्या असल्यानें मध्ययुगीन कल्पनाच अद्याप तेथें वावरत असून देशाची प्रगति झालेली नाहीं. परंतु स्वातंत्र्य असल्यानें त्यांनीं आपली जुनी संस्कृति अद्याप जशीच्या तशी टिकवली आहे. लो. सं. सुमारें दहा लाख आहे.

या देशाचा बहुतेक भाग डोंगराळ असून लोकवस्ती निरनिराळ्या खोऱ्यांतून विखुरलेली आहे. त्यामुळें लोक सर्वत्र

एकमेकांपासून दूर दूर राहतात. या देशांतील वाहतूक बैलगाड्या व घोड्यांचे खटारे यांतून खडबडीत रस्त्यांवरून चालते. या देशांत म्हणण्यासारखे सोईस्कर रस्ते नाहींत व ह्या खोऱ्यांतून वाहणाऱ्या छोट्या नद्यांवरून पूल सुद्धां नाहींत. जरी अशी परिस्थिति आहे तरी विमानवाहतूक मात्र फारच सुंदर तऱ्हेनें चालते. लोक स्वतःला 'गरुडाचे पुत्र' मानतात.

आल्बानिया गेल्या महायुद्धापर्यंत परतंत्रच होतें. १९२४ त लोकसत्ताक राज्य व १९२८ त यावर राजाची सत्ता आली. १९३९ त दुसऱ्या महायुद्धांत इटलीनें हें जिंकून घेतलें होतें. १९४४ सालीं याची सुटका होऊन १९४६ त घटनासमितीनें हें लोकराज्य ठरविलें.

**आल्बामा**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतलें दक्षिण विभागांतील मेक्सिकोच्या आखातापाशीं असलेलें एक संस्थान. याची जास्तींत जास्त लांबी ३३६ मैल व जास्तींत जास्त रुंदी २०० मैल. समुद्रसपाटीपासून यांतील प्रदेशाची सामान्य उंची ६०० फूट. समुद्र-किनारा १२० मैल लांबीचा असून एकंदर संस्थानचें क्षेत्रफळ ५१,६०९ चौरस मैल व लोकसंख्या २८,३२,९६१ आहे. याचें मुख्य ठिकाण मॉंटगॉमेरी. बर्मिंगहॅम, बेसिमीर व मोबाईल (बंदर) हीं दुसरीं महत्त्वाचीं ठिकाणें आहेत. हवामान समशीतोष्ण आहे. मुख्य नद्या टेनेसी व आल्बामा ह्या आहेत. मुख्य उद्योग शेतीचा असून कापूस हें सर्वांत महत्त्वाचें पीक आहे. मका, बटाटा, ओट, तंबाखु, साखर, फळफळावळ वगैरेहि इतर महत्त्वाचीं पिकें आहेत. खनिज उत्पादनहि दिवसेंदिवस वाढतें आहे. कोळसा, लोखंड, चुनखडी व ग्राफाईट हे महत्त्वाचे खनिज पदार्थ आहेत. लोखंड, पोलाद, सीमेंट, कापड, कोक वगैरेंचे कारखानेहि पुष्कळ आहेत. या विभागांत १५३९ मध्यें अगदीं पहिल्यानें डी सोटो या गौरकाय गृहस्थानें प्रवेश केला. १७०२ मध्यें फ्रेंच कॅनेडिअनांच्या एका टोळीनें प्रथम वसाहत केली व पुढें इंग्रजांनींहि आपलीं व्यापारी ठाणीं उघडलीं. १८१९ मध्यें आल्बामा अमेरिकन संयुक्त संस्थानांत दाखल झालें. येथें एक विद्यापीठ आहे.

**आल्बिजेन्स पंथ**—१२ व्या शतकांत निघालेला एक ख्रिस्ती पंथ. याचा प्रसार दक्षिण फ्रान्स व इतरत्र झाला. रोमन कॅथलिक पंथाचीं तत्त्वें व धार्मिक विधी या पंथाला मान्य नव्हते. पण विशेषतः कॅथॉलिक धर्मोपदेशक (क्लर्जी) वर्गाचें जें निंदास्पद वर्तन चालू होतें, त्याला त्यांचा फार विरोध होता. या पंथाला कॅथॅरिस्ट असेंहि नांव होतें. व या पंथाचीं तत्त्वें होयनाद, मणिसंप्रदाय आणि बोगोमिली पंथ यांच्यासारखींच होतीं. १२०९ मध्यें या पंथाविरुद्ध कॅथॉलिक लोकांनीं मोहीम सुरु करून त्यांचा अत्यंत क्रूरपणें छळ केला. या लढ्यांत दोन्ही पंथांचे हजारों लोक मृत्युमुखीं पडले. पुढें १२२९ मध्यें या दोन पंथांत समेट झाला; पण पुढें इन्क्विझिशन कोर्ट स्थापन झाल्यावर या पाखंडी पंथीयांचा उच्छेद सुरू होऊन १३ व्या शतकाच्या उत्तरार्धात हा पंथ अजीबात नामशेष झाला.

**आलमीडा**—हिंदुस्थानांतील पहिला पोर्तुगीज व्हाइसरॉय. पोर्तुगीज राजानें हिंदुस्थानांतील आरमार व सर्व व्यापार यांच्यावर देखरेख ठेवण्याकरितां फ्रान्सिस्को व आल्मीडा यांची नेमणूक केली. हे दोघेहि वजनदार होते. कनानोर येथें दाखल होतांच (१५०५ सप्टेंबर) आल्मीडानें कोचीन, कनानोर व सीलोन या ठिकाणचा पोर्तुगीज व्हाइसरॉय अशी पदवी धारण केली. हा अधिकार त्याच्याकडे तीन वर्षें होता.

आल्मीडाचें मुख्य काम म्हणजे किल्ले, तट वगैरे बांधून, आपल्या वसाहती भक्कम करून मुसलमानांचा नायनाट करावयाचा व दुसऱ्या कोणाचा शह अरबी समुद्र व एकंदर हिंदी महासागर यांवर चालूं द्यावयाचा नाहीं हें होतें. इ. स. १५०९ च्या नव्हेंबरमध्यें परत जातांना वाटेंत मारामारी होऊन तींत हा मारला गेला.

**आल्युसियन बेटें**—उत्तर पॅसिफिक महासागर व कामच्छाटका समुद्र यांच्या दरम्यान् अमेरिकेंतील सं. संस्थानांच्या मालकीची ही एक सुमारें ८० लहान बेटांची रांग आहे. त्यांचा विस्तार सुमारें १,००० मैल लांबीचा पूर्व पश्चिम पसरलेला आहे. क्षेत्रफळ ६,३९१ चौ. मैल व लोकसंख्या १,२२० आहे. ज्वालामुखीच्या उद्रेकांतून हीं बेटें निर्माण झालेलीं आहेत, आणि बऱ्याच बेटांवर अद्यापहि ज्वालामुखी उद्रेक होतात. यामुळें हा प्रदेश उजाड दिसतो. तरी कांहीं भागांत शेती व गुरचरण यांचे योग्य जमिनी आहेत. येथें लोकर विपुल तयार होते. मच्छीमारीचा धंदाहि फार मोठा चालण्यासारखा आहे.

**आल्हाम्ब्रा**—स्पेनमध्यें मूर लोकांच्या साम्राज्याच्या काळीं

ग्रानाडा हें राजधानीचें शहर असतांना तेथें हा एका टेकडीवर

बांधलेला बालेकिल्ला आहे. त्याचा परिघ २¾ मैल असून सभोंवार भक्कम भिंत व जागोजाग बुरूज आहेत. आंत मध्यें दोन देवळें, ५ व्या चार्लसचा राजवाडा व मूर लोकांचा राजवाडा हीं असून मूरांच्या वाड्यांनाहि हेंच नांव आहे. हा राजवाडा १४ व्या शतकाच्या पूर्वार्धांत बांधलेला असून त्यावरील आकृति व कोरलेले लेख हें या राजवाड्याचें एक वैशिष्ट्य आहे.

**आवजी कवडे**—हा थोरल्या बाजीरावाचा एक सरदार होता. डभई येथें दमाजी गायकवाड यानें याचा पराजय केला. बाजीरावानें भोपाळच्या स्वारीच्या वेळीं रघूजी भोसले यास मदतीस बोलावलें होतें; पण तो आला नाहीं म्हणून उभयतांचें वांकडें आलें व बाजीरावानें त्याचें शासन करण्याचें योजिलें.

निजामाच्या भानगडींतून सुटका झाल्यावर बाजीरावानें आवजी कवड्यास रघूजीवर पाठवून त्याच्या मदतीस अंताजी माणकेश्वर यास पाठविलें.

आवजीनें रघूजीच्या मुलखांत लुटालूट सुरू केल्यावर रघूजीनें बाजीरावाविरुद्ध शाहूकडे तक्रार केली; तेव्हां शाहूनें बाजीरावास लिहून आपले सरदार वऱ्हाडांत पाठविण्यास मनाई केली.

या आवजीचा वाडा पुण्यांत कसबा पेठेंत होता.

**आवजी हरि चित्रे (मुजुमदार)**—हा जंजिऱ्याच्या सिद्दीचा दिवाण होता. याजवर सिद्दीची इतराजी होऊन त्यास ठार करण्यांत आलें, व त्याच्या बायकामुलांस मस्कतला विकण्याचा हुकूम झाला. परंतु त्याची बायको गुलबाई युक्तिप्रयुक्तीनें राजापुरीं आपल्या भावाच्या आश्रयास गेली. व तेथें तिनें आपल्या मुलांचें शिक्षण केलें. तिच्या मुलांपैकीं वडील मुलगा बाळाजी (पहा) हा पुढें शिवाजीच्या आश्रयास गेला व त्यानें आपल्या कर्तबगारीनें शिवाजीची चिटणीशी मिळविली.

**आवण**—(बॉल अँड रोलर बेअरिंग). कोणत्याहि दोन वस्तू एकमेकांवरून घसरत असल्यास तेथें घर्षण उत्पन्न होत असतें; त्यामुळें त्या सरकण्यास घर्षण कमी अधिक असेल त्याप्रमाणें कमीअधिक शक्ति लागते. तेलाचा उपयोग याचसाठीं केला जातो.

दोनहि पृष्ठभागांना तेल लावल्यामुळें घर्षण कमी होऊन दोनहि भागांची हालचाल सुलभ होण्यास मदत होते. याचप्रमाणें जर भाग फिरते असतील तरीहि घर्षणांत शक्ति कमी जाऊन ते हालविणें सोपें जातें. जमीनीवरून एखादी वस्तु ओढण्यास जितकी शक्ति लागते तितकीच ओढण्यास गाडीला फार कमी लागते, याचें कारण त्या गाडीचें चाक फिरत असतें. दोनहि वस्तू जेवढ्या गुळगुळीत असतील त्या मानानें घर्षण कमी होतें व अर्थात् शक्तिहि कमी लागते. याच तत्त्वाचा उपयोग आवणामध्यें केलेला आहे. 'बॉलबेअरिंग' मध्यें अतिशय घट्ट व गुळगुळीत अशा दोन कड्यांत गुळगुळीत गोळ्या बसविलेल्या असतात. त्या दोनहि वस्तू गुळगुळीत असतात. त्यांना तेलहि लावलेलें असतें. यामुळें या दोनहि पृष्ठभागांमधील घर्षण जवळ जवळ नाहींसें झालेलें असतें. अशा दोन कड्यांमध्यें गोळीच्या ऐवजीं रूळ बसवितात. ज्यामध्यें गोळ्या बसविलेल्या असतात त्यांना बॉल बेअरिंग व ज्यामध्यें रूळ असतात त्यास रोलर बेअरिंग असें म्हणतात.

**आवंती भाषा**—एक प्राकृत उपभाषा. ही अवंती देशाची भाषा होती. भारतीय नाट्यशास्त्रांत आवंतीस महत्त्वाचें स्थान आहे. ही शौरसेनीची उपभाषा असून शौरसेनी आणि महाराष्ट्री या प्राकृतांच्या संकरापासून बनली आहे. संस्कृत नाटकांतून स्त्रीपात्रें या भाषेचा उपयोग करतात. [डॉ. प. ल. वैद्य, विक्रमस्मृतिग्रंथ]

**आवळी**—एक झाड. हिचीं पानें शमीच्या पानासारखीं असतात व फळ साधारण सुपारीच्या आकाराचें असतें. आंवळ्याच्या दोन जाती आहेत. एक रान आंवळा व दुसरा पांढरा आंवळा; यांसच कृष्णआंवळा व रायआंवळा असें म्हणतात. हें झाड साधारण उंचीचें असून हिंदुस्थान व ब्रह्मदेश येथें सर्वत्र आढळतें. ४,००० फूट उंचीवर सुद्धां मुख्यत्वें रुक्ष जंगलांत हीं झाडें होतात.

या झाडांपासून डिंक निघतो. यांचीं फळें, साल व पानें याचा उपयोग रंगविणें, कातडीं कमावणें यांच्याकडे करितात.

ह्या व इतर जातीच्या आंवळ्यांच्या ताज्या रसाचा उपयोग थंड व दाहोपशामक सरबत म्हणून करतात. चव येण्यासाठीं याचा रस शिरस्यांत घालतात. पिकलेलीं फळें स्तम्भक व रेचक म्हणून वापरतात. आंवळे खातात व त्यांच्या गिराचा रांधा करून त्याचीं भांडीं तयार करतात.

आंवळीच्या लांकडाचे चांगले वासे होतात. त्याचप्रमाणें याचा शेतकीचीं आउतें व इमारती सामान करण्याकडे उपयोग होतो. पाण्यांत हें लांकूड टिकाऊ असल्यामुळें विहिरीच्या कामीं याचा उपयोग करतात.

भुई आंवळी—हिचीं पानें लाजाळूच्या पानासारखीं बारीक असतात. व उंची वीत दोन वीत असते. पावसाळ्यांत हीं झाडें उगवतात. ह्या झाडांच्या डाहळीस नाचण्याएवढीं बारीक फळें येतात. ही लहान वनस्पति पंजाबापासून पूर्वेस आसामपर्यंत व दक्षिणेस त्रावणकोर, मलाका व सिलोन यांपर्यंत हिंदुस्थानांतील सर्व उष्ण भागांत आढळते. ३,००० फूट उंचीवरसुद्धां ही वनस्पति सांपडते. मूत्रवर्धक म्हणून या वनस्पतीचा फार उपयोग होतो.

**आवाळू**— ( सं. अर्बुद., म. वेंड ). शरीराच्या कोणत्याहि भागीं व स्थिर असा जो मांसाचा उंचवटा उत्पन्न होतो, त्यास आवाळू असें म्हणतात. वातानें, पित्तानें, कफानें, रक्तानें, मांसानें व मेदानें होणारा हा विकार ६ प्रकारचा आहे. व त्यांतून रक्तदोषामुळें झालेला आवाळूचा विकार असाध्य होतो.

ज्या अर्बुदांतून स्राव फार झाला आहे किंवा जें हृदय, बस्ति, इ. मर्मावर झालें आहे, तें बरें होत नाहीं. केव्हां केव्हां पूर्वी झालेल्या आवाळूवर दुसरें आवाळू येतें, त्यास अध्यर्बुद व जे जोडीनें एकास एक चिटकून दोन उंचवटे येतात, त्यास द्व्यर्बुद म्हणतात. हें असाध्य आहे.

कोणतेंहि अर्बुद फार मोठें झालें आणि तें मर्मावर नसलें तर शस्त्रानें कापून काढणें हाच मुख्य उपाय आहे. दुधाचे पदार्थ अनूपमांस, पिष्टान्न, जड पदार्थ, गोड पदार्थ व अभिष्यंदी पदार्थ आवाळू झालेल्या मनुष्यानें वर्ज्य करावेत.

**आविक्षित**—मरुत्ताचें दुसरें नांव. हा दिष्टकुलोत्पन्न सार्वभौम राजा होता. हा शौर्यानें इंद्राच्या तोडीचा, यज्ञशील, धर्मावर श्रद्धा ठेवणारा, धैर्यशाली व जितेंद्रिय असा, तेजानें सूर्यासारखा, क्षमेनें पृथ्वीसारखा, बुद्धीनें बृहस्पतीसमान आणि धैर्यानें हिमालयासारखा होता, असें वर्णन आहे. कर्म, वाणी दम व प्रशम यांच्या योगानें या राजानें प्रजा संतुष्ट ठेविली होती. त्यानें १०० अश्वमेध यज्ञ यथासांग केले, व स्वतः बृहस्पतीनें त्याचें याजन केलें ( महाभारत, आश्वमेधिक पर्व—अ. ४).

**आव्हा**— ब्रह्मदेशाची जुनी राजधानी. जुन्या शहराचा अवशेष भाग मितंगी ( दोक्तावदी ) व इरावती या नद्यांच्या संगमावर आहे. प्राचीन पेगू येथील घराणें मोडकळीस आल्यानंतर, थाडोमिनपया ह्या राजानें १३६४ मध्यें ह्या शहराची स्थापना केली. इ. स. १६३६ पर्यंत आव्हाच्या राजांची सत्ता खालावत गेली. परंतु या वर्षी, पेगू व हल्लींच्या ब्रह्मदेशाचा बहुतेक भाग त्यांच्या ताब्यांत आला. अठराव्या शतकाच्या मध्यांत पेगूच्या लोकांनीं बंड करून ब्रह्मी सत्ता झुगारुन दिली. इ. स. १७५२ त तलैंग सैन्यानें आव्हा काबीज करून जाळून टाकिलें. ब्रह्मदेशाशीं इंग्रजांचें पहिलें युद्ध झालें त्या वेळीं इंग्रजांचा रोख आव्हावर होता. सरते शेवटीं बग्यदेवाचा मुलगा थरवादी यानें आव्हा येथील राजधानी कायमची सोडून अमरपूर येथें नेली.

**आशांटी**—पश्चिम आफ्रिकेंत गोल्डकोस्ट वसाहतीचा हा एक भाग असून याचें क्षेत्रफळ २४,३७९ चौ. मैल आहे. या प्रदेशाचा बराचसा भाग डोंगराळ असून तेथें पाऊस पडत असल्यानें या सर्व भागांत उष्ण प्रदेशांतील जंगलें आहेत. तांदूळ, मका, कडधान्यें, ऊंस, कोको, गोराडू हीं पिकें मुख्यत्वें येथें होत असून रबराची लागवड मोठ्या प्रमाणावर करतात. येथें सोन्याच्या खाणी आहेत. कुमासी हें मुख्य शहर असून तेथपर्यंत किनाऱ्यापासून लोहमार्ग जातो. आशांटी लोक कापसाचे व रेशमाचे कपडे विणणें, सोनें आणि इतर धातुकाम करणें, कातडी काम, वगैरे कामांत प्रवीण आहेत. १८९६ सालीं आशांटीवर ब्रिटिश सत्ता आली. गोल्डकोस्ट वसाहतीचा गव्हर्नर याच्या हाताखालीं एक चीफ कमिशनर आशांटीसाठीं नेमलेला असतो. लो. सं. ५,७८,७०२ आहे.

**आशावाद**—आशावाद हा नैराश्यवादाच्या अगदीं विरुद्ध आहे. आशावाद म्हणजे प्रत्येक गोष्टीकडे अतिशय अनुकूल दृष्टीनें पाहण्याची वृत्ति. तत्त्वज्ञानांत आशावाद म्हणजे आपलें जग, त्यांत अपुरेपणा आणि अनिष्ट घटना असल्या तरीसुद्धां, तें उत्तमच आहे, आणि तें आहे त्याहून निराळें असूं शकलें नसतें असें मत. लीबनीझ या तत्त्ववेत्त्यानें आपल्या 'थिओडिसी' या ग्रंथांत असें प्रतिपादन केलें आहे कीं, ईश्वरानें त्याला सर्वोत्तम वाटलें तशा प्रकारचें हें जग निर्माण केलें आहे. या लीबनीझच्या सिद्धान्ताचा विकास व अतिशयोक्ति पुढें पोप नामक इंग्रज कवीनें आपल्या ' एसे ऑन मॅन ' ( माणसाविषयीं निबंध ) या काव्यांत केली आहे; आणि पुढें व्हॉल्टेअरनें आपल्या ' कँडिड ' या नांवाच्या कादंबरींत या सिद्धान्तावर कडक टीका करून तो सिद्धान्त उपहासास्पद ठरविला आहे.

**आशिया**—हें खंड जगांतील सर्व खंडांमध्यें मोठें खंड म्हणून प्रसिद्ध आहे. त्याची सर्वांत जास्त लांबी बाबेल मँडेबपासून सैबेरियांतील ईस्टकेपपर्यंत सहा हजार नऊशें मैल असून रुंदी केप चेल युवचीनपासून केप रोमानीया ( मलायाचें शेवटचें टोंक ) पर्यंत ५,३०० मैल आहे. या खंडाचें क्षेत्रफळ १,७२,५०,००० चौ. मैल आहे. हें खंड तीनहि बाजूंनीं समुद्रांनीं वेष्टिलें असून पश्चिम बाजूला उरल पर्वत, उरल नदी, कॅस्पियन समुद्र, कॉकेशस पर्वत, काळा समुद्र, भूमध्य समुद्र आणि तांबडा समुद्र आहे. या खंडाच्या दक्षिणेकडील बाजूला तीन प्रचंड द्वीपकल्पें असून तीं अनुक्रमें अरबस्तान, हिंदुस्थान, व मलाया हीं होत. आणि पूर्वेला कोरियाचें व कामश्चाटकाचें द्वीपकल्प आहे. अरबी समुद्र, इराणचें आखात, बंगालचा उपसागर, सयामचें आखात टांगकिंगचें आखात, पीतसमुद्र आणि ओखोट्स्क, हीं या खंडाभोंवतीं असलेलीं आखातें व समुद्र होत.

या खंडासभोंवार पुष्कळशीं बेटें आहेत. त्यांपैकीं मलायाच्या समूहांत सुमात्रा, जावा, बोर्निओ, सेलीबीस, व मोलक्का हीं होत. यांच्या उत्तरेला फिलीपाइन बेटें आहेत. पूर्व बाजूला हांगकांग, फोर्मोसा व जपानी बेटें आहेत. आणि पॅसिफिक

साघलीन, कुराइल्स, वगैरे महत्त्वाचीं बेटें आहेत. उत्तरेकडील बाजूस उत्तर महासागरांत रँगले व न्यू सैबेरिया हीं बेटें असून भूमध्य समुद्रांत सायप्रस बेट आहे. तसेंच हिंदी महासागरांत लखदीव, मालदीव, सिलोन, अंदमान व निकोबार हे द्वीपसमूह आहेत.

हिमालय पर्वत हा या खंडांतील सर्वांत मोठा पर्वत असून त्यांतील मधली रांग सुमारें १,५०० मैल लांबीची आहे. या पर्वताचें सर्वांत उंच शिखर एवरेस्ट ( २९,०४५ फूट ) आहे. हें शिखर जगांतील सर्वांत उंच शिखर म्हणून प्रसिद्ध आहे. तसेंच दुसरें शिखर कांचनगंगा २८,१५६ फूट उंच आहे. वायव्येकडील हिमालय पर्वताला जोडूनच पामीरचें पठार असून यासभोंवतीं असणाऱ्या पर्वतांना टी येन शान असें नांव असून ही ओळ ईशान्येकडे तुर्कस्तानमधून जाते. याच ओळीचे निघालेले फांटे मंगोलियांतील आलताई आणि मंगोलिया व सैबेरिया यांमधील झायान हे होत. हिमालयाच्या वायव्येकडून हिंदुकुश पर्वताची ओळ निघते आणि ही ओळ कॅस्पियन समुद्राच्या दक्षिणेकडील हालबर ओळीला जवळजवळ मिळते. तिबेट हा आशिया खंडांतील सर्वांत उंच व पठारी प्रदेश असून त्याची उत्तर सीमा कुलून पर्वत आणि दक्षिण सीमा हिमालय ही होय. अफगाणिस्तान, बलुचिस्तान व इराण हा पठारी प्रदेश असून तो आशिया मायनर या पठारी प्रदेशाशीं जोडला आहे. आशिया खंडांतील सपाट प्रदेश म्हणजे सैबेरियाचें मैदान असून त्याच्या ईशान्येस स्टॅनोहॉई पर्वत आहे. कॅस्पियन समुद्रापासून पूर्वेकडे असलेला प्रदेश वाळवंटें आणि गवताळ मैदानांनीं भरलेला आहे; परंतु अरबस्तान व इराण यांच्यामधील मेसापोटेमियाचा प्रदेश जगांतल्या सुपीक प्रदेशांपैकीं एक म्हणून समजला जातो. चीनच्या पूर्वेस सुमारें वीस हजार चौ. मैल क्षेत्रफळ असलेला गाळाचा मैदानी प्रदेश आहे.

आशियांतील वाळवंटाचा प्रदेश म्हणजे गोबीचें वाळवंट होय. अरबस्तान आणि इराण यांमध्यें असलेले वाळवंटाचे प्रदेश, हे उत्तर आफ्रिकेंतील सहारा वाळवंटाच्या प्रदेशाला जोडून आहेत.

या खंडांत गंगा, सिंधु, ब्रह्मपुत्रा, इरावती, यांगत्सिकँग, होअँग हो, सीकँग, लेना, येनीसी, आणि ओबी या महत्त्वाच्या नद्या होत. युफ्रेटीस आणि टैग्रीस या नद्या इराणच्या आखाताला मिळतात.

आशियामध्यें सरोवरें अशीं फार थोडीं असून कॅस्पियन समुद्र, आरल समुद्र, बालखश सरोवर, बैकल सरोवर, आणि तिबेटांतील मानससरोवर हीं प्रसिद्ध आहेत.

खनिज संपत्तीच्या दृष्टीनें आशिया खंडांत खाणकाम फार पूर्वीपासून चालू आहे. उरल पर्वतांत सोनें, लोखंड, शिसें, पॅलियम; सैबेरिया, सिलोन व हिंदुस्थान यांमध्यें रत्नें; मध्य आशियांत खाणींतलें मीठ; हिंदुस्थान, जपान, चीन, आणि मध्य आशिया यामध्यें दगडी कोळसा; इराण, ब्रह्मदेश, सीरिया यांमध्यें पेट्रोल; यांव्यतिरिक्त चांदी, तांबें, गंधक, शिसें, कथिल (मलाया), वगैरे धातूंच्या खाणी आशिया खंडांत आहेत.

आशिया खंडाचा विस्तार फार मोठा असल्यानें तेथें हवामानहि निरनिराळ्या प्रकारचें दिसून येतें. उत्तरेकडील बाजूस विषम हवामान असून अगदीं थोडा कडक उन्हाळा व बाकीचा सर्व हिंवाळा असतो. चीनच्या उत्तरेस सौम्य हवामानाचा प्रदेश असून आपण जसजसें दक्षिणेकडे येत जातों, तसतसें हवामान जास्त जास्त सम होत जातें. दक्षिण आशियाच्या कांहीं भागांत जगांतल्या कोठल्याहि ठिकाणापेक्षां जास्त पाऊस पडतो. हिंदुस्थानांत 'मान्सून' (हंगामी वारे) हे मुख्य वारे येतात आणि त्यांमुळें या पावसावर हिंदुस्थानांतील जीवनसर्वस्व अवलंबून आहे. या निरनिराळ्या प्रकारच्या हवामानामुळें हजारों प्रकारांचें वनस्पतिजीवन आशिया खंडांत आढळतें. सागवान, देवदार, चंदन, ओक, वगैरे झाडें या खंडांत नैसर्गिक रीतीनें उगवतात आणि त्यांची निर्यात दुसऱ्या खंडांत फार मोठ्या प्रमाणावर केली जाते. तसेंच कळक, तैलबियां, कापूर (फार्मोसा बेट), मध्य आशियांतील सुपीक बागांतील फळफळावळ, चहा, रबर, ऊंस, गहूं, तांदूळ, कापूस, नीळ, रेशीम, मिरीं, मसाल्याचीं द्रव्यें, वगैरे मानवाला उपयोगी पडणारे पदार्थ या खंडांत विपुल प्रमाणावर पिकतात.

पाळीव पशूंव्यतिरिक्त या खंडांतील दुसरीं जनावरें म्हणजे चित्ते, सिंह, हत्ती, उंट, याक, रेडे, आणि हरणें हीं होत. सैबेरियामध्यें मऊ केंस असलेलीं सेबल, अर्मिन, मारटेन, आणि निरनिराळ्या प्रकारचे कोल्हे हीं जनावरें आहेत.

आशिया खंडांत जगांतलि प्रमुख धर्मांचीं जन्मस्थानें आहेत. हिंदुस्थानांतील वैदिक धर्म; हिंदुस्थानांतच उत्पन्न झालेला परंतु चीन, ब्रह्मदेश व जपानमध्यें जोरांत फैलावला बौद्ध धर्म; चीनमधील कानफ्यूशीयन धर्म; जपानांतील शिंतो धर्म; अरबस्तान, इराण, तुर्कस्तान यांचा मुसलमान धर्म; त्याचप्रमाणें पॅलेस्टाइनमधून जगाच्या पाठीवर बराचशा ठिकाणीं पसरलेला ख्रिस्ती धर्म, या सर्व धर्मांची जन्मभूमि आशिया खंड होय.

जर आशिया खंडांत प्रवास करावयाचा म्हटलें तर हिंदुस्थान, मलाया, जपान, आणि चीनचा कांहीं भाग याच ठिकाणीं लोहमार्गाची सोय आहे. बाकीच्या सर्व प्रदेशांत दळणवळणाचीं साधनें म्हणजे जनावरांच्या पाठीवरून वाहतुक होय. आशियांतील

सर्वांत मोठा लोहमार्ग म्हणजे व्लाडीओस्टाकपासून मॉस्कोपर्यंत जाणारी सैबेरियांतील ट्रान्स सैबेरियन रेल्वे हा होय.

लोकसंख्या ९५,००,००,००० चेवर आहे. लोक बहुधा बुद्ध, हिंदू व मुसलमान आहेत. कित्येक युरोपिअन राष्ट्रांनीं या खंडांत आपला शिरकाव करून घेतला आहे. हिंदुस्थान, ब्रह्मदेश, मलाया संस्थानें यांवर ब्रिटनचें प्रभुत्व कालपर्यंत होतें. पॅलेस्टाइन, अरबस्तान, इराक यांच्यावर त्यांचें वर्चस्व आहे. इंडोचायना व सीरिया येथें फ्रेंचांची हुकमत चालते. सैबेरियासह सुमारें ⅓ इतका खंडाचा भाग रशियाच्या वर्चस्वाखालीं आहे. जपान व जपानी साम्राज्यांतलि प्रदेश यांजवर सध्यां अमेरिकेचें दृढ नियंत्रण बसलें आहे. चीन, इराण, अफगाणिस्तान, वगैरे स्वतंत्र देश फारच थोडे आहेत. पण तेथेंहि गौरकाय राष्ट्रांचे कारस्थानी संबंध आहेतच. हिंदुस्थान व चीन यांतील संस्कृती फार जुन्या आहेत. सर्व पुरातन संस्कृतींचा उगम आशिया खंडांतच कास्पियन समुद्राच्या आसपास असावा असें सर्व विख्यात विद्वानांचें मत आहे. मेसापोटेमिया येथेंहि पुरातन साम्राज्यें व संस्कृति यांचे अवशेष आहेत.

**आशिया मायनर**—आशिया, युरोप व आफ्रिका या खंडांना जेथून रस्ता जमिनीवरून जातो अशा मोक्याच्या जागीं हा छोटासा देश आहे. काळा समुद्र व भूमध्य समुद्र यांच्यामध्यें डार्डानेल्सची सामुद्रधुनी व मार्माराचा छोटासा समुद्र असल्यामुळे युरोपच्या अगदीं जवळ हा देश येतो. जगाचा इतिहास सुरू झाला त्या वेळेपासून हा देश 'एक नैसर्गिक रणभूमि' बनली असें समजण्यास हरकत नाहीं. यालाच आनाटोलिया असें नांव असून त्यांत मुख्यत्वें तुर्कस्तानच्या साम्राज्यापासून स्वतंत्र बनलेल्या लोकांचें राज्य आहे.

या प्रदेशाचा बहुतेक सर्व मधला भाग म्हणजे पठारी प्रदेश असून त्यावर गवताळ मैदानें आहेत. तसेंच आसमंतात् खाऱ्या पाण्यानें भरलेला दलदलीचा प्रदेश व तळीं या पठारी प्रदेशांत आहेत. पश्चिमेकडील खोरीं मात्र सुपीक असून पश्चिम व उत्तर भागांतील हवा सौम्य आणि आरोग्यवर्धक आहे. पठारी प्रदेशांत विषम हवामान आहे. उत्तरेकडील डोंगराळ भाग जंगलांनीं भरलेला असून त्यांत वालनट, ओक, ॲश यांचे वृक्ष आहेत. पश्चिम व दक्षिण बाजूला भूमध्य सामुद्रिक हवामान असून तेथें होणारी फळफळावळ बाहेर निर्यात करतात. तंबाखूचें पीक या प्रांतांत फार मोठ्या प्रमाणावर काढतात. या सर्व प्रांताचें क्षेत्रफळ ४,८४,५३८ चौरस मैल असून लोकवस्ती मुख्यतः तुर्क, ज्यू, अरब व ग्रीक यांची आहे. बास्फोरसची सामुद्रधुनी व हेलेस्पांट हा या देशाचा भाग तटस्थ म्हणून ठरविला आहे. स्मर्ना हें व्यापाराचें मुख्य बंदर आहे. या देशांत वाहतुकीचीं साधनें फारशीं नाहींत. त्यामुळें बराच व्यापार लमाणमार्गानें चालतो. स्मर्नापासून इराणी आखातावरील वसऱ्यापर्यंत लोहमार्ग आहे.

**आशेन (एक्स-ला-शापेल)**— कोलोनच्या पश्चिमेस ४४ मैलांवर बेल्जिअन व डच यांच्या सरहद्दीजवळ एका रमणीय खिंडींत वसलेलें प्रशियाच्या राज्यांतील जर्मनीचें एक शहर. या शहराच्या स्थानिक स्वराज्याची सीमा दोन्ही देशांच्या सरहद्दींना जाऊन भिडली आहे. शहराच्या आसमंताद्भागीं खनिजोदकाचे झरे आहेत. लोकसंख्या १६५,७२० (१९३९). या ठिकाणचा व्यापार फार भरभराटींत आहे. मध्यभागीं कसबा असून त्याच्यासभोंवतीं असलेला जुना कोट पाडून त्या ठिकाणीं आतां सहल करण्याकरितां मार्ग केले आहेत. या रस्त्याच्या पलीकडे नवें शहर व उपनगरें वसलीं आहेत.

येथें जर्मन, डच व फ्लेमिश चित्रकारांच्या उत्तम उत्तम कामांचा संग्रह असलेला अजबखाना, सार्वजनिक ग्रंथसंग्रहालय, खाणीचें व विद्युच्छास्त्राचें काम शिकविण्याची पाठशाळा, वगैरे पाहण्यालायक गोष्टी आहेत.

येथील गंधकयुक्त ऊन पाण्याचे झरे रोमन लोकांस माहीत होते. त्यांचें पाणी कित्येक शतकांपासून संधिवात, वातरक्त व गंडमाळा या विकारांवर रामबाण औषध समजलें जात आहे.

व्यापारांत व उद्योगधंद्यांत या शहराचा दर्जा बराच वर लागतो. येथें सुती व रेशमी वस्त्रें करण्याचे मोठमोठे कारखाने आहेत. आसपास कोळशाच्या बऱ्याच चांगल्या खाणी निघाल्यामुळें या ठिकाणीं बहुतेक प्रकारच्या लोखंडी कामाचे कारखाने आहेत. याशिवाय मद्य व रासायनिक द्रव्येंहि येथें तयार होतात. धान्य, कमावलेलें कातडें, मद्य व इमारतीचें लांकूड हे येथील व्यापाराचे जिन्नस आहेत. येथें नामांकित विमाकंपन्या आहेत व शहरांत मोठ्या प्रमाणावर सावकारी चालते.

आठव्या शतकांत शार्लेमान्यनें आपल्या साम्राज्यांत याला दुसऱ्या प्रतीचें शहर केलें. त्या वेळीं कांहीं काळपर्यंत हें शहर पाश्चात्य ज्ञान व सुधारणा यांचें केंद्रस्थान होतें. ८१३ पासून १५३१ पर्यंत येथें जर्मन राजांचे व बादशहांचे राज्याभिषेकसमारंभ होत असत.

**आश्रम**—'निवासस्थान' या अर्थाचा हा शब्द बुद्धकालाच्या पूर्वीचें असें ज्याला खात्रीनें म्हणतां येईल अशा कोणत्याहि उपनिषदांत नाहीं. भारतीयांच्या आयुष्यांतील एक अवस्था अशा अर्थी याचा श्वेताश्वतर उपनिषदांत प्रथमच उपयोग केलेला आढळतो. छांदोग्य उपनिषदांतील एका वचनांत ब्रह्मचारी आणि गृहस्थ या दोन आश्रमांना उद्देश आहे. गृहस्थाला अध्ययनाचें फल म्हणून प्रजोत्पादन, [illegible] अहिंसा, यज्ञ, मोक्षसाधन हीं मिळतात असें सांगि[illegible]

दुसऱ्या स्थळीं तीन आश्रमांचा उल्लेख आहे परंतु अनुक्रमानें नाहीं. बृहदारण्यक उपनिषदांत आत्मवेत्त्याची योग्यता अधीत, यज्ञकर्ता आणि दाता अथवा यति ह्यांच्यापेक्षां जास्त मानली आहे; आणि दुसऱ्या स्थळीं यज्ञकर्ता, दाता, आणि यति अथवा योगी यांच्यांत भेद दाखविला आहे. हें श्रेष्ठपद आणि आश्रमांतील भेद यामुळें एक चौथा आश्रम निघाला.

आश्रमधर्म—हिंदु धर्मशास्त्रांत प्रत्येकानें ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास या चार आश्रमांतून क्रमाक्रमानें गेलें पाहिजे असें सांगितलें आहे. ही चार आश्रमांची कल्पना मोठी उदात्त व जीविताला वयाप्रमाणें वळण लावणारी आहे. वानप्रस्थ ही गृहस्थाश्रमाची पुढची पायरी व संन्यासधर्माच्या अगोदरची म्हणतां येईल. शेवटच्या दोन आश्रमांत फारसा फरक नाहीं.

**आश्वलायन**—एक ऋषि व त्याच्या नांवावरून पडलेली ऋग्वेदाची शाखा. आश्वलायन सूत्र हें ऋग्वेदसूत्र म्हणून प्रसिद्धीस आलें. आश्वलायनानें तीन ग्रंथ लिहिले. एक बारा अध्यायांचें श्रौतसूत्र, चार अध्यायांचें गृह्यसूत्र व (ऐतरेयारण्यकांतील) चौथें आरण्यक. आश्वलायनाचें कल्पसूत्र, शाकल व बाष्कल या दोनहि शाखांकरितां असून इतर संहितांतील ऋचांचाहि त्यांत कोठें कोठें उल्लेख आढळतो (उदा. श्रौ. सू. ६–१२). ऋग्संहितेच्या प्रस्तावनेंत सायण म्हणतो कीं, शाकल संहितेंत न येणाऱ्या ऋचांचा विनियोग आश्वलायन आपल्या सूत्रांत देतो, आणि तें खरें आहे.

**आसनें**— बसण्याची वस्तु किंवा प्रकार. उदाहरणार्थ-खुर्ची, कांबळें, तक्त, हत्ती, घोडा, इत्यादि. स्त्रीपुरुषसंयोगाच्या प्रकारासहि आसनें असें म्हणतात. त्याच प्रकारचीं योगासनेंहि आहेत. युद्धकाळीं जो तळ देतात, त्याला आसनच म्हणतात. जमाखर्चांत सुलभ रीतीनें प्रकरणाचें ज्ञान व्हावें म्हणून जी सदर घडणी लिहितात, तिच्यांतील प्रत्येक सदरास आसन म्हणतात. कंबलासन, कुशासन, मृगासन आणि व्याघ्रासन हीं नित्य उपयोगाचीं आसनें पूर्वीपासून परिचित आहेत.

बसण्याची पद्धत या दृष्टीनें आसन याचा अर्थ घेतां नित्य परिचित आसनें म्हटलीं म्हणजे वीरासन, कुक्कुटासन, पद्मासन, सिंहासन हीं होत. वीरासन म्हणजे वीराचें आसन. उजवें पाऊल जमिनीवर ठेवून डाव्या पायाचीं बोटें व गुडघा जमिनीवर टेंकून त्यावर सर्व शरीर तोलवें आणि छाती पुढें काढून केवळ शौर्याचा आविर्भाव दाखविणें. कुक्कुटासन याचा अर्थ कोंबड्यासारखें आसन. दोनहि पावलें जमिनीवर ठेवून गुडघे उभे करावे आणि सर्व शरिराचा तोल पायावर ठेवून उकिडवें बसावें. असें आसन भोजन करते समयीं असावें अशी शास्त्राज्ञा आहे. भोजनसमयीं असें बसलें असतां मितभोजन होतें म्हणून किंवा पाट नसतील म्हणून हा नियम घातला असावा.

पद्मासन म्हणजे कमलाकार बसणें. प्रथम डावें पाऊल उजव्या मांडीवर ठेवून उजवें पाऊल डाव्या मांडीवर ठेवावें. तें असें कीं, डाव्या पायाच्या पोटरीवर उजव्या पायाची पोटरी येईल अशा रीतीनें मांडी घालून बसणें. सिंहासन (सिंहासारखें बसणें)-खुरमांड्या करून दोनहि बाजूस दोनहि तळहात टेंकून बसणें.

**आसाम**—हिंदुस्थान, ईशान्येकडील प्रांत. याचें क्षेत्रफळ ५४,९५१ चौ. मै. व लोकसंख्या १०,२०५,००० आहे. याच्या उत्तरेस भूतान, पश्चिमेस बंगाल व आग्नेय दिशेस ब्रह्मदेश आहे. १९१२ सालीं पूर्व बंगालमधून काढून हा स्वतंत्र प्रांत बनविला. १९१९ च्या कायद्यानें यावर गव्हर्नर नेमला गेला. व १९३७ सालीं याला दोन कायदेमंडळें इतर प्रांतांप्रमाणें मिळालीं. कौन्सिलमध्यें २२ व असेंब्लीमध्यें १०८ जागा ठेवल्या आहेत. १९४७ सालीं हिंदुस्थानचे हिंदी संघ व पाकिस्तान हे दोन भाग झाले तेव्हां आसाम हिंदी संघांत राहिला. या भागांत पाऊस अतिशय पडतो. सर्व जगांत जास्त पाऊस या प्रांतांतील चेरापुंजी येथें पडतो (५०० इंच). हा प्रांत डोंगराळ असून जंगलें पुष्कळ आहेत. सागवान, साल, सिसू, खजूर व कापूर, सुपारी, अंजीर, इ. झाडें होतात. सुरमा व काचार हीं दोन खोरीं फार सुपीक आहेत. आसामांत चहा पुष्कळ पिकतो. त्याखालोखाल तांदूळ, गहूं होतो. रबर रेशीम, कापूस, पेट्रोल, केरोसीन, कोळसा या व्यापारी जिनसा होतात. १९३७–३८ सालीं ७३४ कारखाने आसामांत चालत होते. जमिनीच्या उंचसखलपणामुळें आगगाडीचे रस्ते फारसे नाहींत; तथापि १३०० मैलांचा आगगाडी रस्ता आहे. ब्रह्मपुत्रा नद व त्याचे फांटे यांतून बोटी चालतात. येथील लोक तिबेटी-ब्रह्मी वंशाचे आहेत. १९४१ च्या खानेसुमारीवरून पाहतां ४,५४०,४९७ हिंदू व ३,४७४,१४१ मुसलमान होते. शेंकडा ४५ लोक बंगाली भाषा, शें. २१ आसामी भाषा बोलतात. डोंगरी लोक तिबेटी-ब्रह्मी भाषा बोलतात. गोहत्ती आणि शिलांग हींच काय तीं दोन मोठीं शहरें आहेत. शिलांग येथें सरकारी ठाणें असतें. या प्रांतांत ११ कॉलेजें व ८,७९६ शाळा आहेत. विद्यापीठ काढण्याचा विचार चालू आहे. १९४३–४४ सालीं आसामचें उत्पन्न ५ कोटी १६ लक्ष होतें.

आसामचा इतिहास पुराणकालीन आहे. याला कामरूप म्हणत. प्राग्ज्योतिषपुर म्हणजे आधुनिक गोहत्ती होय. प्रथम या प्रांतावर दोन शतकें ब्राह्मणी राज्य होतें. नंतर सेन व पाल राजांचीं घराणीं आलीं. १५ व्या शतकांत सेन घराणें

नांदत होतें. पण मुसलमानांचें वर्चस्व हळूहळू वसत चाललें. तसेंच आहोम लोक राज्यांत शिरले व त्या लोकांचा धर्म सुरु झाला. पण नंतर हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन आसामांत होऊन अठराव्या शतकाच्या अखेरीस आहोमांचें प्राबल्य पार गेलें व काचरी राजघराणें चांगल्या रीतीनें नांदूं लागलें. तथापि ब्रह्मी लोक राज्यांत ढवळाढवळ करूं लागल्यामुळें इंग्रजांचें साहाय्य घ्यावें लागलें व याचा शेवट आसाम हळूहळू इंग्रजांकडे जाण्यांत झाला.

आसामांत अनेक वैष्णव पंथ निघून त्यांनीं जुना शाक्त पंथ नाहींसा केला. आसामी वाङ्मयांत इतिहास, नाटकें, शास्त्रीय ग्रंथ व कोश असल्यानें ती भाषा आज स्वतंत्र मानण्यांत येते.

आसामी वाङ्मय—आसामचें प्राचीन नांव कामरूप. आसामांत पुष्कळ परकीय लोकांनीं राज्य केलें. परंतु आसामी संस्कृति, भाषा आणि वाङ्मय यांनीं सर्व परकीय लोकांवर छाप बसविली आहे. आसामांत आर्य व आर्येतर लोक यांचें मिश्रण झालें आहे. परंतु आसामी भाषेनें त्या सर्वांस एकरूप केलें आहे. सोळाव्या शतकांत आसामी गद्य वाङ्मय अत्यंत उच्च प्रतीचें झालें. आसामी 'कथा–गीत' ग्रंथ सोळाव्या शतकांत लिहिला. त्याच्यासारखी सुंदर ग्रंथरचना बंगालींत एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत ईश्वरचंद्र व बंकिमचंद्र हेच करूं शकले. सातव्या शतकांत हुएनत्संग याला कामरूपाची (आसामची) भाषा मगधांतील प्राकृत भाषेपेक्षां थोडीशीच वेगळी दिसली. परंतु पुढें आसामी भाषेचें स्वरूप पुष्कळ बदललें. सातव्या शतकांतील आसामी ग्रामगीतें व प्रेमगीतें फारच मधुर व करुणरसपूर्ण आहेत. तेराव्या शतकांतील हेमसरस्वतीसारख्या कवींच्या काव्याच्या सौंदर्यावरून असें अनुमान करण्यास हरकत नाहीं कीं, आसामी काव्य दहाव्या शतकामध्यें पुष्कळ उन्नत स्वरूपास पोंचलें असलें पाहिजे. सोळाव्या शतकांत शंकरदेव व त्याचा शिष्य माधवदेव हे सुप्रसिद्ध वैष्णव पंथीय पंडित होऊन गेले. त्यांनीं आसामी वैष्णव वाङ्मय व कला हीं अतिशय उच्च पदाला नेलीं. कोच महाराजा नरनारायण याच्या आश्रयामुळें हा वैष्णव पंथ फारच भरभराटीस आला. शंकरदेव व माधवदेव यांच्या स्फूर्तीनें पुष्कळच संस्कृत ग्रंथांचीं फार सुंदर आसामी रूपांतरें झालीं व तीं अद्याप आपलें उच्च स्थान टिकवून आहेत. कोच राजांच्या कालांत वैष्णव वाङ्मय मुख्यतः आसामांत लिहिण्यांत आलें. तसेंच आहोम घराण्याच्या काळांत तांत्रिक व पौराणिक वाङ्मय प्रसार पावलें. त्या वेळीं पुष्कळ ऐतिहासिक बखरी लिहिण्यांत आल्या व त्यांचा सुपरिणाम अर्वाचीन गद्य वाङ्मय समृद्ध करण्यांत झाला. अलीकडील आसामी भाषेंतील नाटकें, कादंबऱ्या, चरित्रें व टीकात्मक वाङ्मय यांचा उगम या ऐतिहासिक बखरींमध्यें आहे.

सतराव्या–अठराव्या शतकांत आसाम मुस्लिम नबाबांच्या ताब्यांत गेल्यावर आसामांत बंगाली भाषेचें वर्चस्व झालें व आसामी भाषा मागें पडली. अठराव्या शतकांत आहोम राजांची सत्ता क्षीण होत गेली. मायामरिया बंडामुळें ब्रह्मी लोकांचा आसामांत प्रवेश झाला व अखेर १८२६ मध्यें ब्रिटिश राज्य सुरु झालें. कोर्टें व शाळा या बंगाली भाषेनें व्यापल्या. सोळाव्या शतकांतील आसामी भाषा प्राथमिक शाळांमध्येंहि सुरू होण्यास १८७३ साल उजाडलें. १८८९ मध्यें 'जोनकी' (चंद्रिका) नांवाचें मासिक सुरु झाल्यापासून अर्वाचीन आसामी वाङ्मय अस्तित्वांत आलें. मिशनरी लोकांनीं 'अरुणोदय' नांवाचें वृत्तपत्र सुरु केलें, इंग्लिश–आसामी कोश प्रसिद्ध केला, आसामी बायबल छापलें व इतर धार्मिक वाङ्मय प्रसिद्ध केलें. त्यामुळें आसामी वाङ्मयाच्या पुनरुज्जीवनास फार मदत झाली. आनंदराम फूकन हा नवीन आसामी वाङ्मयाचा जनक होय. इंग्रजी भाषा व शिक्षण यांमुळें आसाममध्येंहि नवीन ध्येयवादी विचारांची लाट उसळली व त्यामुळें 'जोनकी' मासिक व 'आसामी वाङ्मय–सुधारणा मंडळा'ची स्थापना झाली. जुनें वैष्णव तत्त्वज्ञान व नवीन इंग्रजी वाङ्मय यांच्या मिश्रणानें एक नवें स्वातंत्र्यवादी तत्त्वज्ञान तयार झालें. नवें वाङ्मय धार्मिक विचारांपासून मुक्त होऊन त्यावर निवळ ऐहिक सुखाची छाप पडली. नीतिबोधाच्या ऐवजीं काव्य प्रेमगीतांनीं व्यापिलें. रघुनाथ चौधरी (जन्म १८७९) याच्या काव्यांत निसर्गशोभा, मानवी भावना व आकांक्षा यांचें दर्शन होतें. लक्ष्मीनाथ (१८६८–१९३८) यांनीं आसामी वाङ्मयांत नवजीवन ओतलें. त्यानें लेखनांत कोणताहि विषय सोडला नाहीं. त्यानें बाल, तरुण, वृद्ध, सुसंस्कृत, अडाणी, नागरी, ग्रामीण, वगैरे सर्व लोकांस आनंद देईल असें वाङ्मय लिहिलें. सुनीतें, कविता, पवाडे, ऐतिहासिक कादंबऱ्या, लघुकथा, नाटकें, टीकालेख, विनोदी गोष्टी, इत्यादि सर्व प्रकारचें वाङ्मय लिहून त्यांनीं अर्वाचीन आसामी वाङ्मयाचा भक्कम पाया रचला. जुन्या वैष्णव वाङ्मयाचाहि त्यानें आवडीनें अभ्यास केला होता. चंद्रकुमार आगरवाल (जन्म १८६७) हा 'जोनकी' संप्रदायाचा आत्मा होता. त्याचें काव्य अद्भुतरम्यकथात्मक आहे. त्याचे विचार खोल व गूढ असत. भाषा सोपी पण प्रभावी. मानवी भावना व निसर्ग यांचा तो पूजक होता. त्याच्या कल्पनांच्या भराऱ्या अंतरिक्षांत फार उंच जात असत. मनाच्या हळवेपणामुळें तो समाजांत केव्हांहि येत नसे. हेमचंद्र गोस्वामी (१८७२–१९२८) यानें आसामी वाङ्मय फार वाढविलें. त्याचें काव्य वाचणाऱ्या

अंतरंगांत खोल जातें. हेमचंद्र बोस यांनीं तयार केलेला 'हेम-कोश' नांवाचा व्युत्पत्तिकोश यांनीं शोधून छापला. 'आसामी साहित्यांतील वेंचे' नांवाचा यांचा एक प्रचंड ग्रंथ कलकत्ता युनिव्हर्सिटीनें छापला आहे. पुढें यानें आसामी पोथ्यांचा एक मोठा संग्रह जमवून 'कामरूप अनुसाधन समिती'ला दिला. लक्ष्मीनाथ, चंद्रकुमार व हेमचंद्र हे आसामी वाङ्मयाचे त्रिमूर्ति गणले जातात. कमलाकांत व अंबिकागिरि यांचें देशाभिमानी काव्य स्वदेशप्रेमानें प्रज्वलित झालेलें आहे. बंगाल्यांतील बंकिमचंद्रांप्रमाणें रजनीकांत यांनीं सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. पद्मनाथ यांनींहि उत्कृष्ट सामाजिक कथा लिहिल्या आहेत. पद्मनाथ बारूआ, हितेश्वर बारूआ (जन्म १८८७), दुर्गाप्रसाद मुजुमदार, हार-चंद्र गोस्वामी, अतुलचंद्र हजारिका, पाझिरुद्दिन अहमद, इ. प्रसिद्ध नाट्यलेखक आहेत. वह्नि, आलोचनी, आसामिया, दैनिक बटोरी, आवाहन, इ. प्रसिद्ध वृत्तपत्रें आहेत.

मुस्लिम विद्यार्थी परिषदेनें चालविलेलें 'साधना' नांवाचें मासिक मुस्लिम विद्यार्थ्यांत आसामी वाङ्मयाची अभिरुचि उत्पन्न करीत आहे. कामरूप अनुसाधन (संशोधन) समिति, इतिहास मंडळ, आसाम साहित्य सभा, गौहत्ती म्यूझियम, इ. संस्था संशोधनकार्य करीत आहेत. विद्वानांचें राजकीय चळवळींत फार लक्ष गुंतल्यामुळें वाङ्मयाकडे अजून बरेंच दुर्लक्ष होत आहे.

**आसामा**—जपानमधील टोकीयोच्या वायव्येकडे ८० मैलांवर असलेला जिवंत ज्वालामुखी पर्वत. याची उंची ८२६० फूट आहे.

**आसावरी**—हा एक आश्रयराग आहे. याच्या आरोहांत गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य असून आरोह सातहि स्वरांनीं होतो म्हणून याची जाति औडुव–संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. याचें स्वरूप जौनपुरी रागासारखें भासतें. उत्तरेकडे हा राग तीव्र ऋषभाऐवजीं कोमल ऋषभ स्वरानें गाण्याचा प्रचार आहे.

**आसेन आयव्हर** (१९१३–९६)—नॉर्वेचा एक भाषा-शास्त्रज्ञ आणि कवि. नॉर्वे देशांत पूर्वी डॅनिश ही भाषा सर्वमान्य होती ती त्यानें काढून एक निराळीच वाङ्मयीन भाषा तयार करून दिली. त्याची ही भाषा लवकरच मान्यता पावून तींतून काव्यें आणि कथा निर्माण होऊं लागल्या. आज नॉर्वेंतील शाळांतून आसेननें काढलेल्या भाषेच्या धर्तीवरच भाषा शिकवितात. त्यानें नॉर्वेजियन लोकांच्या भाषेचा एक कोश रचला (१८४८).

**ऑस्टरलिट्झ**—हें शहर ऑस्ट्रियांतील मोरोव्हिया प्रांतांत आहे. याची लोकसंख्या सुमारें चार हजार असून येथील बहुतेक लोक झेक आहेत. येथें कॅनिट्झ राइटबर्ग राजपुत्राचा एक भव्य राजवाडा व एक सुंदर ख्रिस्ती देवालय आहे. या शहरीं पहिल्या नेपोलियननें ऑस्ट्रियनांचा व रशियनांचा ता. २ डिसेंबर १८०५ रोजीं पराभव केला. ही लढाई नेपोलियनच्या युद्धनैपुण्याचें उत्कृष्ट उदाहरण होय.

**ऑस्टिन, जॉन** (१७९०–१८५९)—एक इंग्रज कायदेशास्त्रा-वरील लेखक. यानें लंडन येथें कायद्याचा अभ्यास केला व १८१८ मध्यें यास वकिलीची सनद मिळाली. याचा जेरेमी बेन्थॅम, जेम्स मिल्ल व जॉन स्टुअर्ट मिल्ल यांच्याशीं निकट संबंध होता. इ. स. १८२६ मध्यें लंडन युनिव्हर्सिटीनें याला कायदेशास्त्राचा प्राध्यापक नेमलें. त्यानें राजसत्ता यासंबंधानें प्रतिपादिलेला सिद्धान्त विशेष प्रसिद्ध आहे. 'प्रॉव्हिन्स ऑफ ज्यूरिसप्रुडन्स डिटरमिन्ड' हा त्याचा ग्रंथ १८३२ मध्यें प्रसिद्ध झाला. ऑस्टिन हा उपयुक्ततावादाचा चहाता होता. पुष्कळांचें पुष्कळ सुख ही कसोटी त्यानें कायदेशास्त्रांत ग्राह्य धरली होती. धर्मशास्त्र, नीति-नियम व कायदे उर्फ राज्यसत्तेचे नियम यांचें क्षेत्र शास्त्रीय पृथक्करणपद्धतीनें निश्चित करण्याचा प्रयत्न त्यानें केला आहे.

**ऑस्टिन, जेन** (१७७५–१८१७)—एक इंग्रज लेखिका. हिचें सर्व शिक्षण घरींच चांगल्या सुसंस्कृत वातावरणांत झालें असून हिनें बरेंच वाचनहि केलें होतें. हिनें सहा कादंबऱ्या लिहिल्या असून त्या इंग्रजी वाङ्मयांत प्रसिद्ध आहेत. या कादंबऱ्यांत भावना उचंबळून सोडणारे प्रसंग किंवा चमत्कार नाहींत. गोष्टी अगदीं साध्या घरगुती आहेत. पात्रांची सजावट चांगली वास्तववादी आहे व मधून मधून विनोदाचीहि पेरणी केली आहे 'प्राइड अँड प्रेज्युडिस' ही तिची कादंबरी सर्वोत्कृष्ट मानली जाते. जेन अविवाहित होती.

**ऑस्टेंड**—बेल्जियम देशांतलें उत्तर समुद्राकांठचें एक बंदर व प्रसिद्ध समुद्रस्नानस्थल. या बंदरांत शिरण्याचा मार्ग अरुंद आहे पण आंतला भाग फार विस्तृत २६ फूट खोलीचा आहे. कॉड व हेरिंग जातीचे मासे पकडणें, व शिंपल्यांतले मोती तयार करणें, हे महत्त्वाचे धंदे आहेत. येथून लोणी, अंडीं, कोंबड्या, बदकें, व ससे हा माल मोठ्या प्रमाणांत परदेशीं पाठवला जातो. लंडन व डोव्हरकडे जाणाऱ्या बोटींचें हें ठाणें आहे. पहिल्या महायुद्धांत ऑस्टेंडचें नांव चिरस्मरणीय झालें. लो. सं. ४४३०३ आहे.

**आस्ट्राखान**—सोव्हिएट रशिया, स्टालिनग्राड विभागांतील एक शहर. व्होल्गा नदीच्या डाव्या तीरावर असून कास्पियन समुद्रापासून ५० मैल आंत आहे. बाकूच्या पेट्रोलियमच्या धंद्याच्या वाढीपासून व ट्रॅन्स कास्पियन रेल्वे सुरू झाल्यापासून आस्ट्राखान हें व्यापाराचें महत्त्वाचें ठिकाण झालें. येथून मासे, साखर,

धातूंची भांडीं, व लोंकरीचें कापड, वगैरे माल परदेशीं जातो. धान्य, कापूस, फळें व इमारतीचें लांकूड हा माल या देशांत येतो. आस्ट्राखान हें कास्पियन समुद्रावरील रशियाच्या आरमाराचें मुख्य ठिकाण आहे. सन १९३९ मध्यें येथील लोकसंख्या २,५४,००० होती.

**ऑस्ट्रिया**— युरोपमधील एक मध्यवर्ती देश. क्षेत्रफळ ३२,३६९ चौ. मै., लो. सं. ६७,६०,२३३. राजधानी व्हिएन्ना. हा कृषिविषयक व्यवसायाचा देश असून गहूं, राय, बार्ली, ओट, बटाटा, वगैरे पिकें निघतात. साखर व तंबाखूहि होतात. कित्येक धंद्यांचे कारखानेहि आहेत. इमारती लांकूड पुष्कळ निघतें. कोळसा व लोखंड यांच्या खाणी आहेत. ऑस्ट्रिया पूर्वी स्वतंत्र होता व पहिल्या जागतिक युद्धाच्या वेळीं ऑस्ट्रियन साम्राज्याचा विस्तार बराच मोठा होता; १९१८ पर्यंत ऑस्ट्रिया आणि हंगेरी हीं दोन राष्ट्रें एकत्र जोडलेलीं असत. (हंगेरी पहा). परंतु पुढें अंतस्थ यादवी व मतभेद यांनीं त्यास पोखरलें व १९३८ मध्यें हिटलरनें आक्रमण करून बृहज्जर्मनीमध्यें हा देश सामील केला. दुसरें महायुद्ध संपण्यापूर्वी (१९४३) दोस्तराष्ट्रांनीं यांचें स्वातंत्र्य परत देण्याचें जाहीर केलें. युद्धानंतर १९३७ मध्यें जेवढा देश होता तेवढा धरून त्याचे चार विभाग केले व अमेरिका, रशिया, फ्रान्स आणि ब्रिटन यांच्या ताब्यांत ते दिले. नंतर एक हंगामी सरकार या राष्ट्रांच्या देखरेखीखालीं स्थापन झालें. शें. ९० लोक कॅथॉलिक ख्रिस्ती धर्मपंथाचे आहेत. देशांत तीन विद्यापीठें आहेत.

ऑस्ट्रियन वाङ्मय — ऑस्ट्रियन वाङ्मय सगळें जर्मन भाषेंत लिहिलें आहे. परंतु अंतरंगांत तें जर्मन वाङ्मयाहून वेगळें आहे. सन १८०४ पासून स्वतंत्र ऑस्ट्रियन वाङ्मयाचा आरंभ झाला. जर्मन वाङ्मयाप्रमाणें तें निवळ स्वदेशप्रेमी नाहीं. युरोपांतील अनेक देशांच्या विचारांचें व भावनांचें त्यांत प्रतिबिंब आहे. या वाङ्मयाचीं दोन केंद्रें होतीं. एक व्हिएन्ना व दुसरें प्राग. जर्मन कवि गटे याची विचारपरंपरा चालविणारे दोन लेखक ऑस्ट्रियांत होऊन गेले. एक ग्रिलपार्झर (१७९१–१८७२) व दुसरा स्टिफ्टर (१८०५–१८६८). ग्रिलपार्झरनें अनेक नाटकें लिहिलीं व स्टिफ्टरनें मानवी मनाचा विकास सूक्ष्म तऱ्हेनें आपल्या कादंबऱ्यांत व लघुकथांत चित्रित केला. श्निट्झ्लर (१८६२–१९३१) याच्या नाटकांवर फ्रेंच वाङ्मयाची दाट छाया आहे व त्यांत मानवी हृदयाचें सूक्ष्म निरीक्षण आहे, बीर-हॉफमन (१८६६–१९४५) याचीं नाटकें फार भव्य प्रमाणांत रचलेलीं आहेत. हॉफमनस्थाल (१८७४–१९२९) याचें काव्य व नाटक यांमध्यें त्याचें व्यक्तिमत्त्व व गाढ विचार व्यक्त होतात. क्रॉस (१८७४–१९३६) याची झोंबणारी लेखणी फार तीव्र होती. प्राग येथील रिल्क (१८७५–१९२६) हा भावकवि व गद्यलेखक या दोन्ही दृष्टींनीं फार मोठा लेखक होता. काफ्का (१८८३–१९२४) हा आपले खोल विचार व सूक्ष्म निरीक्षण यांमुळें आधुनिक कादंबरी-लेखनाच्या तंत्रांत फार परिणामकारक लेखक ठरला आहे. वरफेल (१८९०–१९४५) यानें अनेक काव्यें, कादंबऱ्या व नाटकें लिहिलीं असून त्याचें लेखन तीव्र भावना, मानवतेवरील प्रेम व युद्ध व अन्याय यांविषयीं द्वेष यांनीं भरलेलें आहे.

**ऑस्ट्रेलिया**—हें खंड दक्षिण गोलार्धातील एकुलतें एक खंड असून त्याची जास्तींत जास्त लांबी २,००० मैल व रुंदी १९०० मैल असून, किनारा सुमारें ८,००० मैलांचा आहे. क्षे. फ. २९,७४,५८१ चौ. मै. व लो. सं. ७३,६८,८४१ आहे. कर्कवृत्तानें या खंडाचे दोन विभाग पडत असून उत्तरेकडील भाग उष्ण कटिबंधांत येतो व दक्षिणेकडील भाग शीत कटिबंधांत येतो. इ. स. १९०१ मध्यें टास्मानिया, न्यू साउथ वेल्स, व्हिक्टोरिया, क्वीन्सलँड, दक्षिण व पश्चिम ऑस्ट्रेलिया या सर्व निरनिराळ्या संस्थानांचें एकत्रीकरण करून या सर्व खंडाची राजधानी कॅनबेरा ही ठरविण्यांत आली. या संस्थानांच्या राजधान्या अनुक्रमें सिडनी, मेलबोर्न, ॲडिलेड, ब्रिस्बेन, पर्थ व होबर्ट या असून मुख्य राजशासनसंस्था कॅनबेरा येथें आहे.

आदिवासी

या खंडाचा किनारा फारसा तुटक व दंतुर नाहीं. कार्पेंटेरीयन, व्हॉन डिमेन हीं उत्तरेकडील आखातें असून दक्षिणेला स्पेन्सर व पोर्टफिलीप हे उपसागर आहेत. केप यॉर्कचें भूशीर व आर्न्हेम लँड हा प्रदेश समुद्रांत घुसलेला आहे. ईशान्येकडे किनाऱ्यापासून थोड्या अंतरावर सुमारें १२०० मैल लांबीचा एक वाळूचा बंधारा आहे. या खंडाजवळ नांव घेण्यासारखें असें टास्मानिया हें एकच बेट असून त्याशिवाय मेलव्हिले, बाथर्स्ट, कांगारू, व फ्लिंडर्स आणि इतर अगदीं चिमकुलीं बेटें आहेत. ऑस्ट्रेलियाच्या किनाऱ्यावर कांहीं उत्तम बंदरें असून सिडनी हें एक जगप्रसिद्ध बंदर आहे.

या खंडाचे स्वाभाविक विभाग म्हणजे सर्व खंड सपाट

असून तें मध्यभागीं खोलगट व पूर्वेकडे उंच होत गेलेलें आहे, पर्वत फक्त आग्नेय बाजूला असून ते ज्वालामुखी होते. त्यांचीं तोंडें थंड होऊन अवघीं ५० वर्षेंच झालीं आहेत. सर्वांत उंच पर्वतमय प्रदेश सुमारें १५० मैल रुंदीचा असून तो पूर्व व आग्नेय किनाऱ्यांशीं जवळजवळ समांतरच आहे. या पर्वताचें नांव ग्रेट डिव्हायडिंग रेंज आहे. दक्षिण बाजूकडील पर्वतांना ऑस्ट्रेलियन आल्प्स्, ब्ल्यू माउंटन व न्यू इंग्लंड रेंज अशीं नांवें आहेत. सर्वांत उंच शिखर कोसिअस्को (उंची ७११५ फूट) हें ऑस्ट्रेलियन आल्प्समध्यें आहे. त्याव्यतिरिक्त क्लेर्क (७२५६ फूट) व टाउन्सहेंड (७३५३) हीं उंच शिखरें होत.

ग्रेट डिव्हायडिंग रेंज या पर्वताच्या पश्चिम बाजूला गवताळ प्रदेश असून त्यावरून हजारों जनावरें व लाखों मेंढ्या चरतात, आणि पुढील भाग म्हणजे कांटेरी माळरान अगर ओसाड वाळवंटी प्रदेश आहे. हाच भाग म्हणजे ऑस्ट्रेलियाचा मध्यभाग होय. मरे व डार्लिंग या दोन नद्या सर्वांत मोठ्या असून त्यांचा संगम झाल्यावर नंतर बनलेली मरेडार्लिंग नदी ॲडिलेडजवळ समुद्राला मिळते. ही नदी ग्रेट डिव्हायडिंग रेंजच्या पश्चिम भागांतून वाहात जाते. पूर्व किनाऱ्यावर हेटर, क्लेरेन्स, ब्रिस्बेन आणि ब्रडेकिन या नद्या; उत्तर बाजूला फिट्झरॉय, व्हिक्टोरिया, फ्लिंडरस, आणि मिचेल; आणि पश्चिमेला मर्चिसन, ग्यासकॉयने, आणि ग्यास बर्टन या नद्या मिळतात. या खंडांतील मोठीं सरोवरें म्हणजे आयर, टोरेन्स गैरडनर, आणि आमाडेयूस हीं असून तीं सर्वच खाऱ्या पाण्याचीं आहेत. किनारपट्टी, व कर्कवृत्ताचा उत्तरेकडील भाग यांत पाऊस भरपूर पडतो. परंतु मध्य ऑस्ट्रेलियांत तो मुळींच पडत नाहीं. जो पडतो तो जमिनींत झिरपतो. परंतु लोकांनीं आर्टिझियन विहिरींच्या साहाय्यानें जनावरांना लागणारी पाण्याची गैरसोय भागविली आहे.

खनिज संपत्तींत सोन्याच्या खाणीचा क्रम पहिला असून सुमारें ६० कोटी पौंड किंमतीचें सोनें १८५१–१९११ या वर्षांत खाणींतून काढण्यांत आलें असून त्यांत सर्वांत मोठा भाग व्हिक्टोरियाचा आहे. परंतु आतां सोन्याच्या बाबतींत पश्चिम ऑस्ट्रेलियाचा क्रमांक पहिला लागतो. या शिवाय चांदी, तांबें, शिसें, जस्त, पारा, अँटिमनी यांच्या खाणी असून पुष्कळ ठिकाणीं खाणींतून हिरे, माणकें, रत्नेंहि सांपडतात. न्यू साउथ वेल्समध्यें दगडी कोळशाच्या खाणी फार मोठ्या प्रमाणावर आहेत.

या खंडांतलें नैसर्गिक वनस्पतिजीवन म्हणजे मान्सूनचा पाऊस उत्तर किनाऱ्यावर जेथें जेथें पडतो तेथें मान्सूनचीं जंगलें आढळतात. या प्रदेशाशिवाय ऑस्ट्रेलियाचा फार मोठा भाग जवळजवळ ओसाड असल्यानें तेथें गवताळ प्रदेश असून वाळवंटाजवळील भागांत मॅली माळरानचा प्रदेश आहे. येथील वनस्पतींचें वैशिष्ट्य म्हणजे त्यांचीं पानें जाड व मांसल आहेत. तसेंच झाडांचा आकार डमरूसारखा आहे. सर्वांत महत्त्वाचें झाड म्हणजे युकॅलिप्टस हें असून त्याच्या सुमारें १५० पेक्षां जास्त जाती येथें सांपडतात. तसेंच जारा व स्लीपर हीं दोन झाडें व्यापारी दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत. रेड ट्रीपासून लोहमार्ग तयार करण्यासाठीं रुळाखालीं घालण्याचें लांकूड मिळतें. ऊन, पाऊस, व वाळवी यांचा त्रास त्या लांकडाला होत नाहीं. तसेंच बाभळीच्या सुमारें ३०० जाती असून त्या झाडांच्या सालींचा उपयोग कातडीं कमावण्याकडे होतो. उत्तर किनारा व पश्चिम किनारा माडांनीं भरलेला आहे. आग्नेय भागांत व नैऋत्य कोपऱ्यावर भूमध्य सामुद्रिक हवामान असून तेथें द्राक्षें, सफरचंद, तुतीचीं पिकें. झाडें, अननस, वगैरे निरनिराळें फळफळावळ विपुल प्रमाणांत

कांगारू, वुमबॅट, एमू, प्लॅटिपस, डिंगो हे या खंडांतले विशिष्ट प्राणी असून त्याशिवाय घोडे व मेंढ्या हे इतर प्राणी आहेत. मेंढ्या व मेंढ्यांचें पालन हा ऑस्ट्रेलियाचा सर्वांत मोठा धंदा आहे. पक्ष्यांच्या सुमारें ६५० जाती या खंडांत दिसून येतात. त्यांमध्यें ब्लॅकस्वान, स्नीसकर, ब्रशटर्की हे प्रमुख होत. सशांची वाढ मेंढ्यांच्या गवताळ प्रदेशांत इतकी आहे कीं, गवताचें रक्षण करण्यासाठीं ससे मारण्याची मोहीमच काढावी लागते.

ऑस्ट्रेलियांतील मूळचे रहिवासी काळसर असून ते अद्याप रानटी अवस्थेंतच आहेत. त्यांची संख्या दिवसेंदिवस कमी कमी होत आहे.

सर्वांत मोठा लोहमार्ग ॲडिलेड ते पोर्टडार्विनपर्यंत असून एकंदर लोहमार्गांची लांबी सुमारें ३०,००० मैल आहे.

या खंडाचा प्रथम उल्लेख १५३१–४२ या सालांत पोर्तुगीजांनीं केला व १६०१ मध्यें मानोएल गोडिन्हो दएरेडिआ यानें प्रथम या किनाऱ्यावर संशोधन केलें. यानंतर स्पॅनियर्ड व डच खलाशांनीं बरेंच संशोधन केलें. १६६४ मध्यें त्यांनीं या खंडाला न्यू हॉलंड हें नांव दिलें. १७७० मध्यें कुकनें पूर्व किनाऱ्यावर बऱ्याच ठिकाणांना नांवें दिलीं व तो सर्व भाग ब्रिटनच्या ताब्यांत आहे असें जाहीर केलें. त्यानंतर १५ वर्षांनीं विल्घनें आग्नेय किनारा शोधला. सुमारें १८०० च्या सुमारास हें खंड गुन्हेगारांची वसाहत म्हणून ठरून त्यांत नवीन वस्ती होऊं लागली. १८५१ सालीं या खंडांत सोन्याचा शोध लागला आणि सोन्यासाठीं खंडांत जोरानें संशोधन सुरू झालें. या संशोधकांत मॅकेरी ह्यूम (व्हिक्टोरियाचा संशोधक), स्टर्ट (मरे नदीच्या खोऱ्याचा संशोधक), लीचहार्ड (ब्रिस्बेन ते पोर्ट एसिंग्टन यांमधील भागाचा संशोधक), उत्तरेकडून दक्षिणकडे

पूर्णपणें जाणारा स्टुअर्ट मॅक्डुआल, मेलबोर्न ते कारपेंटेरिया-च्या आखातापर्यंत जाणारे ब्र्क व विल्स, उंटाच्या पाठीवरून वाळुकामय प्रदेशांत जाणारा वारबर्टन, सुमारें चाळीस हजार मैल अज्ञात प्रदेशाचा नकाशा तयार करणारा विनिके, या सर्वांचा इतिहास म्हणजेच ऑस्ट्रेलियाच्या भू-भागांच्या संशोधनाचा इतिहास होय.

खालील पदार्थ ऑस्ट्रेलियाच्या त्या त्या भागांत तयार होतात—

लोंकर :— ऑस्ट्रेलियाच्या सर्व संस्थानांत.

गहूं व कणीक :— किनाऱ्याजवळील भागांत सर्व संस्थांना-तून, पण क्विन्सलंडमध्यें कमी प्रमाणांत.

सर्व प्रकारचें मांस :—विपुल जनावरांमुळें सर्व संस्थानांतून.

लोणी व दुधाचे पदार्थ :— केपयॉर्क ते ॲडिलेडपर्यंतची रुंद किनारपट्टी व आलबानी ते पर्थ यांना जोडणाऱ्या रेषेचा पश्चिम भाग यांतून.

फळफळावळ व सुकामेवा :—वरील विभागांत.

कातडीं व चामडीं :— सर्व संस्थानांत.

खनिज संपत्ति :—सर्व संस्थानांत.

लांकूड :—क्वीन्सलँड, न्यू साउथ वेल्स, व्हिक्टोरिया व पश्चिम आस्ट्रेलियाचा नैर्ऋत्य कोपरा यांतून.

कापूस :— क्वीन्सलंड व न्यू साउथ वेल्स यांत.

या खंडाचें वैशिष्टय म्हणजे हें खंड जगांतील सर्वांत मोठें बेट व सर्वांत लहान खंड आहे. येथें चतुष्पाद प्राणी अंडीं घालतात. पक्षी हंसतात, राजहंस काळे आहेत. झाडाच्या साली गळून पडतात. फळांच्या बाहेरील बाजूस बिया असतात. गवतांत असंख्य प्रकार आहेत. झाडें डमरूच्या आकाराचीं आहेत. सारांश हें दक्षिण गोलार्धांतील खंड उत्तर गोलार्धांतील खंडांपेक्षां सर्वच बाजूंनीं निराळ्या प्रकारचें आहे.

ऑस्ट्रेलियन वाङ्मय— ऑस्ट्रेलिया युरोपियन लोकांस प्रथम १६०६ मध्यें सांपडला. पण कॅ. कुकनें १७७० मध्यें या देशाच्या समुद्राकांठच्या प्रदेशाची पाहणी केली. तोंपर्यंत तेथें गोऱ्या लोकांची वसाहत फारच थोडी होती. सन १७८८ पासून १८६८ पर्यंत ब्रिटिश सरकार आपले काळ्या पाण्याचे कैदी या वसाहतींत पाठवीत असे. त्यामुळें वाङ्मयनिर्मितीस येथें वावच नव्हता. परंतु या काळांत गोऱ्यांच्या वसाहती या ओसाड पण सुपीक देशांत कशा होत गेल्या, याचें वर्णन कॅ. टेंच यानें 'बॉटनी बे' व 'पोर्ट जॅक्सन' या दोन पुस्तकांत (सन १७८९ व १७९३) रसभरित भाषेंत दिलें आहे. सन १८२३ मध्यें वेंटवर्थ यानें 'ऑस्ट्रेलेशिया' नांवाचें एक काव्य लिहून केंब्रिज येथें चॅन्सेलरचें पदक मिळविलें. हार्पूर यानें १८४५ मध्यें 'काव्यविचार' लिहून खऱ्या काव्यनिर्मितीला आरंभ केला. हेन्री किंग्स्ले (१८५९) व कॅथेराइन स्पेन्स (१८५४) यांनीं गद्य कादंबरी-वाङ्मयास आरंभ केला. इंग्लंडमधील प्रसिद्ध कादंबरीकार ट्रोलोप, हॅव्हेलॉक एलिस, डी. एच्. लॉरेन्स यांनीं ऑस्ट्रेलियांत थोडे दिवस वास किंवा प्रवास करून ऑस्ट्रेलियांतील शेतकरी जीवनावर पुष्कळ कादंबऱ्या लिहिल्या. सन १८६० पासून १८९० पर्यंत हेनरी केंडॉल व ॲडम गॉर्डन हे चांगले कवि काव्यसंपदा प्रसिद्ध करीत होते. रॉल्फ वॉल्डरवुड (१८२६–१९१५) यानें आपल्या दीर्घ जीवनांत पुष्कळच चांगल्या कादंबऱ्या लिहिल्या. सन १८९० नंतर खऱ्या ऑस्ट्रेलियन वाङ्मयास सुरवात झाली. यापुढें इंग्लिश वाङ्मयाचें दडपण संपूर्णपणें नष्ट झालें. हेन्री लॅसन यानें ऑस्ट्रेलियन जीवनाचें *यथार्थ वर्णन करणाऱ्या* अनेक कथा व कादंबऱ्या लिहून चिरकालीन कीर्ति मिळविली. टॅमीकॉलिन्स यानें १९०३ मध्यें "जीवन हें असें आहे" हें एकच पुस्तक लिहून ऑस्ट्रेलियांतील सर्व थरांतील जनतेचे सर्व विषयांवरील विचार उत्तम रीतीनें व्यक्त केले.

या एकाच पुस्तकाच्या वाचनानें खऱ्या ऑस्ट्रेलियन जीवनाची स्पष्ट कल्पना येते. ए. जी. स्टीफन्स यानें १८९६ ते १९०६ पर्यंत 'सिडने बुलेटिन' चा संपादक या नात्यानें वाङ्मय-टीकाकार म्हणून उत्तम लेखन करून या प्रांतांत आपलें अग्रस्थान कायम केलें. याच सुमारास ओडाउड या थोर कवीनें ऑस्ट्रेलियन समाज जगांत सद्गुणांनीं वरिष्ठ कसा होईल या-विषयीं आपली तळमळ ओजस्वी वाणीनें प्रकट केली. स्टील रुट यानें १८९९ मध्यें "आमची निवड" हें पुस्तक लिहून विनोदी वाङ्मयांत मोठी लोकप्रियता मिळविली.

ऑस्ट्रेलियांत जन्म घेऊन इंग्लंडमध्यें लेखक म्हणून महत् यश मिळविलेल्या ग्रंथकारांत मिस् रिचर्डसन हिचें नांव प्रामुख्यानें सांगणें जरूर आहे. 'रिचर्ड महॉना याचें जीवन' हें विस्तृत कादंबरीमय पुस्तक लिहून अतिशय ओजस्वी व मानसशास्त्रनिपुण लेखक म्हणून चिरस्थायी कीर्ति मिळविली. कॅथेराइन प्रिचर्ड या लेखिकेनें १९२० ते १९३५ पर्यंत अनेक वाचनीय कादंबऱ्या लिहिल्या. व्हान्स पामर व बर्नार्ड एल्टर शॉ हे सध्यां नांवाजलेले अनेक विषयांवर (काव्य, नाटकें, लघुकथा, इतिहास, चरित्रें, वाङ्मयचर्चा, लघुनिबंध) सारख्याच कौशल्यानें लिहिणारे लेखक आहेत. निबंध-लेखकांत प्रो. मॅडीक यांनीं अग्रस्थान मिळविलें आहे. क्रिस्तोफर ब्रेनन हा उत्कृष्ट कवि सर्व इंग्रजी जाणणाऱ्या देशांत मानला जाण्यास योग्य आहे; पण ऑस्ट्रेलियांत राहिल्यामुळें त्याचें नांव फारसें प्रसिद्ध नाहीं. ऑस्ट्रेलियांत बहुतेक प्रत्येक सुशिक्षित मनुष्य

आपल्या तारुण्यांत काव्य लिहून छापीत असतो. त्यांतल्या पुष्कळ स्फुट कविता सुंदर असतात. आयन इड्रीस याच्या धाडसाच्या कथा कानाकोपऱ्यांतील प्रदेशाबद्दल शहरवासीयांना उत्कृष्ट माहिती देतात व त्या फारच लोकप्रिय आहेत. आतां महायुद्ध संपल्यावर तरुण व प्रौढ कवी, इतिहासकार व इतर लेखक ऑस्ट्रेलियांत नवीन उज्ज्वल वाङ्मयाचा पाऊस पाडतील असा स्पष्ट रंग दिसत आहे.

**ऑस्ट्रेलेशिया**—आतांपर्यंत पृथ्वीची आशिया, युरोप अमेरिका, आफ्रिका व ऑस्ट्रेलिया अशी विभागणी करीत असत. परंतु ऑस्ट्रेलिया खंडाच्या आसमंतांतील सर्व प्रदेश ऑस्ट्रेलेशिया या नांवानें एक नवीन खंडच म्हणून संबोधला जातो. या सर्व प्रदेशाचें क्षेत्रफळ ३४,००,००० चौ. मैल असून त्यामध्यें ऑस्ट्रेलियाजवळील बेटें, टास्मानीया, न्यूझीलंड, न्यू कॅलेडोनीया, न्यू हेब्राइड्स, सालोमन बेटें, न्यू आयर्लंड, न्यू ब्रिटन, ॲडमिऱ्यालिटी बेटें, न्यू गिनिया व आरु बेटें आणि या व्यतिरिक्त असलेलीं पुष्कळशीं बेटें – या सर्व विभागाला ऑस्ट्रेलेशिया खंड म्हणून संबोधलें जातें. याला ओशियाना असेंहि म्हणतात.

**आस्तिक्यवाद**—(थीइझम). याचा अर्थ व्युत्पत्तिदृष्ट्या असा कीं, ईश्वराचें अस्तित्व आहे असें मानणें. या ईश्वराचें स्वरूप कांहींहि असो, पण ईश्वर हा सिद्धान्त मान्य करणें, याला 'आस्तिकपणा' म्हणतात. याच्या विरुद्ध नास्तिकवाद–'नास्तिकांचें मत' म्हणजे 'ईश्वर नाहीं' असें निःसंदिग्ध प्रतिपादन करणें. याशिवाय तिसरा एक पंथ आहे, तो 'संशयवाद्यांचा'. त्यांचें मत असें कीं, ईश्वर असेल किंवा नसेल तें सांगतां येत नाहीं, कारण ईश्वराचें ज्ञान होणें ही गोष्ट अशक्य आहे. आस्तिक्यवादामध्यें एकेश्वरी मत, द्वितत्त्ववादी, सर्वेश्वरवादी, आणि अनेकेश्वरवादी या सर्वांचा समावेश होतो. तत्त्वज्ञानाच्या भाषेत 'थीइझम' याचा अर्थ जग उत्पन्न करणारा व जगाचा सुबुद्ध मालक असा आहे, आणि तो जगाचें नियमन करणारी शक्ति आहे.

धार्मिकदृष्ट्या 'आस्तिक्यवाद' म्हणजे ईश्वर ही अतिमानवी व्यक्ति असून त्या व्यक्तीची पूजा-अर्चा आराधना केली पाहिजे; कारण ईश्वर हा जगाची उत्पत्ति, व जगाचें नियंत्रण करणारा आणि जगाचें भवितव्य ठरविणारा आहे. ईश्वर जगांत प्रकट होतो, आणि ईश्वर आणि त्यानें निर्माण केलेले प्राणी यांचा परस्पर कायमचा संबंध आहे.

**आस्पार्टो**—स्पेन व उत्तर आफ्रिकेंत उगवणारी गवताची एक जात. त्याची उंची २ ते ४ फुटांपर्यंत असते. या गवताचा उपयोग चटया, टोप्या करण्याकडे करतात. स्पेनमध्यें व्यापारी दृष्टीनें या गवताची लागवड प्रचंड प्रमाणांत करतात.

**आस्वल**—आस्वल हा ऋक्ष वर्गांतील मांसाहारी, सस्तन प्राणी असून याच्या मुख्य दहा जाती आहेत. आस्वलें थंडीच्या दिवसांत गुहेमध्यें सुस्त पडून राहतात. पिंगट किंवा काळ्या अंगाचीं आस्वलें बहुतेक युरोप व आशियामध्यें सर्वत्र आढळतात. हीं फळें, मुळें, मध, मुंग्या वगैरे खाऊन राहातात. व क्वचित् प्रसंगीं इतर प्राण्यांसहि खातात. उत्तरेकडील प्रदेशांत हीं सात फुटांपर्यंत लांब आढळतात. हीं एकाकीं राहातात. अमेरिकेमध्यें काळीं आस्वलें असून तीं लहान असतात. व तीं कमी हिंस्र असतात. त्यांस झाडावर चढतां येतें. त्यांच्या लोंकरीकरितां त्यांची शिकार होते. करड्या आस्वलाची ग्रिझाली जात रॉकी पर्वतावर आढळते. हीं आस्वलें भयंकर असून ९ फुटांपर्यंत लांब असतात. सायबेरियांत एका जातीचीं पिंगट आस्वलें आढळतात. उत्तर ध्रुव प्रदेशांतील आस्वलें पांढरीं असून फार भयंकर व चळकट असतात. हीं सील, मासे वगैरेंवर निर्वाह करतात व ७ फुटांपर्यंत लांब असतात.

'स्लॉथ' ही एक सस्तन प्राण्यांची आस्वली जात असून यांस पुढले दांत नसतात. हे दक्षिण-मध्य अमेरिकेंत आढळतात. यांचें डोकें आंखूड व सपाट असतें व पाय लांब असतात व मजबूत बांकदार पंजे असतात. यांची विशेष प्रसिद्ध जात पिंगट-करड्या रंगाची असून यांचे केंस राठ असतात. यांना शेंपटी नसते. मनुष्यप्राणी उत्पन्न होण्याच्या काळापर्यंत यांचे अजस्र पूर्वज दक्षिण अमेरिकेमध्यें राहत होते.

संस्कृतांत ऋक्ष या शब्दाचा अर्थ 'आस्वल' असा आहे. ऋग्वेदांत हा शब्द फक्त एकच वेळ आला असून तदनंतरच्या वैदिक वाङ्मयांत हा शब्द क्वचितच आढळतो. कारण वेदकालीन आर्य लोक ज्या देशांत राहत असत तेथें आस्वलें दुर्मिळ असत. 'सप्त ऋषि' या नांवाचा जो तारकापुंज आहे त्याला 'सात आस्वल' हें पाश्चात्य नांव आहे.

**आस्वान**—ईजिप्त, नाईलच्या किनाऱ्यावरील एक शहर. लो. सं. २२,१९२. येथील दगडाच्या खाणी प्रसिद्ध आहेत. याच्याजवळ धबधब्याच्या खालीं नाईल नदीला सव्वा मैल लांब आणि ११२ फूट उंचीचें धरण बांधलें असून हें धरण आस्वानचें धरण म्हणून प्रसिद्ध आहे. या धरणापाठीमागें पाण्याचा सांठा म्हणजे सुमारें १३० मैल लांबीचें एक सरोवर होय. या धरणांतील पाण्यावर आस्वानच्या खालील भागांतील शेती केली जाते.

**आहवमल्ल**—कल्याणीच्या कलचुरी घराण्यांतील एक राजा. आहवमल्ल हें त्याचें बिरुदांतील नांव होय. याला वीर नारायण

असेंहि दुसरें एक बिरुद होतें. हा बिज्जलाचा तिसरा मुलगा असून त्याचे वडील भाऊ सोमेश्वर अथवा सोनिदेव आणि संकम यांच्यानंतर इ. स. ११८१ मध्यें गादीवर आला. हा आपणाला कळचुर्य चक्रवर्ती आणि कळचुर्य भुजबल चक्रवर्ती, परमभट्टारक, इत्यादि विशेषणें लावीत असे. हा संकमाबरोबर राज्यकारभार पहात असावा व कदाचित् या दोघा भावांत राज्याची विभागणी होऊन उत्तर व पूर्वेकडील भाग संकमाकडे असून दक्षिणेकडील भाग आहवमल्लाकडे असावा. त्याची राजधानी कोणती होती याबद्दल उल्लेख आढळत नाहीं. तथापि संकमानंतर कल्याणी शहर त्याच्या ताब्यांत असणें शक्य आहे. आहवमल्लाचा सर्वांत उत्तरकालीन उल्लेख भाद्रपद व॥ त्रयोदशी शोभकृत् संवत्सर शक १९०६ या मितीचा आढळतो. याच्यानंतर याचा धाकटा भाऊ सिंघण गादीवर आला.

**आहिताग्नि**—एकदां स्वीकार केल्यापासून आमरणान्त अग्नीचे संरक्षण करणाऱ्या अग्निहोत्र्यास आहिताग्नि म्हटल्याचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत (१·५,९; १·७, १; ३·४, १०) आला आहे. या आहिताग्नीनें धारण केलेल्या अग्नीच्या संरक्षणाची मुख्य जबाबदारी त्याच्या पत्नीवर असते. आहिताग्नीस नित्य प्रातःकालीं व सायंकालीं अग्नीला होम द्यावयाचा असतो. त्या होमाच्या वेळीं पत्नी त्याच्याजवळ असावी लागते. आहिताग्नि कोठें प्रवासास गेल्यास होम देण्याचें काम अध्वर्यु करतो. आहिताग्नीनें स्वतः रोज होमाच्या वेळीं पठण करावयाचे जे मंत्र असतात ते त्यास प्रवासांतहि नित्य पठण करावे लागतात. आहिताग्नीच्या पत्नीला कोठें परगांवीं जावयाचें असल्यास मात्र अग्नि बरोबर घेतल्यावांचून जातां येत नाहीं. अशा वेळीं धातूचीं कुंडें करून त्यांत अग्नि नेतात. अशा वेळीं नित्याचा होम कांहीं दिवसांचा एकदमच देऊन ठेवतात. त्यास पक्षहोम म्हणतात. हा पक्षहोम पंधरा दिवसांपेक्षां जास्त दिवसांचा देतां येत नाहीं. आहिताग्नीनें प्रवासास जातांना अग्नीचें उपस्थान करून जावयाचें असतें.

आहिताग्नि अथवा त्याची पत्नी यांपैकीं कोणी मृत झाल्यास अग्निहोत्र तेथेंच थांबतें. आहिताग्नि अथवा त्याची पत्नी यांपैकीं कोणी मृत झाल्यास त्यांचें शव नेण्याच्या प्रसंगीं इष्टि केली जाते व अग्निहोत्रासंबंधीं सर्व पात्रें त्या प्रेताबरोबर दहन केलीं जातात.

**आहेर**—हा शब्द आहार्य ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा. आहृ ह्या धातूचा अर्थ वस्त्र धारण करणें असा होतो. आहार्य म्हणजे धारण करण्याला योग्य. अभ्युदयकर्माच्या प्रसंगानें आहेर करण्याची चाल आहे. परंतु हा लौकिक आचार आहे. शास्त्रविहित नाहीं. आहेर करतांना भिक्षुक "युवं वस्त्राणि···" (ऋ. १. १५२, १) हा मन्त्र म्हणतात. ह्याचें कारण ह्या ऋचेंत वस्त्र शब्द आहे हेंच होय.



आहेर म्हणजे वस्त्रदान. मुंज, लग्न, गडगनेर, ओटभरण, गर्भाधान, डोहाळे जेवण, देवदर्शन, सती जाणें, दुखवटा, मेजवानी, प्रथम भेट, शुभ वार्ताहरण हे वस्त्रदानाचे प्रसंग आहेत. आपण ज्याला दुखवटा म्हणतों तो वस्तुतः दुखवटा नाहीं. तें एक मंगलकार्यच आहे. सती जातांना तर उत्सव करतात.

कोणत्याहि मोठ्या माणसांच्या प्रथम भेटीच्या वेळीं वस्त्रें देण्याची चाल होती. प्रथम भेटीप्रमाणें शुभवार्ता–निवेदन आहेर देण्यास कारण समजलें जात असे. मुंज, लग्न, गर्भाधान, गडगनेर, डोहाळे जेवण, हे आहेराचे नेहमींचे प्रसंग होत. मेजवानीस कोणास बोलाविलें तर वस्त्र देण्याची वहिवाट फार होती. कोणी नमस्कार करावयास आला तर त्याला वस्त्रांचा आहेर करण्याची पूर्वी चाल होती.

**आहोम**—आसाम दरींतील ही एक शान जात असून, १९ व्या शतकाच्या आरंभीं त्या देशांत ब्रह्मी लोक येईपावेतों इहिंचेंच वर्चस्व तेथें होतें. हे आहोम लोक व त्याप्रमाणें ब्रह्मदेश व पूर्व चीन येथील शान लोक आणि सयामी लोक थाई वंशांतील होत. आहोम हें नांव 'आसाम' या शब्दापासून बनलें आहे असें मानतात, व 'शान' (शाम) आणि 'सियाम' हे शब्द आसामांतील 'साम' याशीं जुळतात. इ. स. १२२८ मध्यें सु–का–फा राजाच्या नेतृत्वाखालीं पूर्वेकडून येऊन त्यांनीं आसामावर चाल केली व त्या देशाला आपलें नांव दिलें. यानंतर दीड शतकपर्यंत सु–का–फाच्या वंशजांनीं लक्मिपुर व सिबसागर या लहान जिल्ह्यांवर निर्वेधपणें राज्य केलेलें दिसतें. पश्चिमेकडे ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यांत त्यांची सत्ता थोडथोडी वाढत होती तरी त्यांना नेहमींच विजय प्राप्त होत असे असें नाहीं. औरंगजेबाच्या काळीं सदियापासून गोलपारापर्यंत आणि दक्षिणेकडील डोंगराच्या पायथ्यापासून उत्तरेकडील भुतिया सरहद्दीपर्यंत, म्हणजे सबंध ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यांत आहोम राजांची सत्ता असे. या घराण्याच्या सत्तेचा कळस रुद्रसिंहाच्या कारकीर्दींत झाला (तो १६९५ त गादीवर बसला). यानंतरच्या शतकांत अंतःकलहामुळें व बाहेरून होणाऱ्या शत्रूंच्या स्वाऱ्यांमुळें आहोमांच्या सत्तेला उतरती कळा लागली. त्यांच्यांतीलच एका भांडखोर पक्षानें इ. स. १८१० त ब्रह्मी लोकांना साहाय्यार्थ बोलविलें. त्यांनीं सर्व खोरें आपल्या हस्तगत केलें व १८२४–२५ त ब्रिटिश त्यांना बाहेर पिटाळून लावीपर्यंत ब्रह्मी लोकांनीं तेथें फार अमानुषपणें राज्य केलें. १९११ च्या खानेसुमारींत यांची लोकसंख्या १,९७,४४८ भरली. तर १९४१ त सुमारें तीन लाख भरली!

आहोमांनीं आसामामध्येंहि शान जातींतील गन्धारभागाची पद्धत कायम ठेविली. ही पद्धत म्हणजे कर देण्याऐवजीं

वैयक्तिक चाकरी घेणें ही होय. त्यांचा बौद्ध धर्म नसून एक निराळाच मूर्तिपूजाविशिष्ट धर्म होता; पण असाममध्यें आल्यावर त्यांनीं हळूहळू हिंदुधर्म स्वीकारला व त्यांच्या राजांनींहि आपणांला हिंदु नांवें व पदव्या घेतल्या.

आहोम धर्म व भाषा नष्ट झालेली आहे व कोठेतरी थोड्याशा जुन्या भिक्षुकांच्या घरीं फक्त हीं आढळून येतील. आहोम भाषा सयामी—चिनी भाषाकुळाच्या 'थई' शाखेंतील एक अतिशय जुनी भाषा आहे. अर्वाचीन सयामी भाषेशीं अर्वाचीन शान भाषेपेक्षां हिचा निकट संबंध आहे. या भाषेला स्वतःची वर्णमाला होती.

**आळंदी**—मुंबई, पुणें जिल्हा, खेडच्या दक्षिणेस बारा मैलांवर पुणें–नाशिक रस्त्यावर इंद्रायणी नदीच्या वामतीरावर हा एक लहानसा गांव आहे. येथें ज्ञानेश्वर महाराजांची (तेरावें शतक) समाधि व देऊळ असल्यामुळें हें गांव प्रसिद्धीस आलें आहे.

ज्ञानेश्वराच्या वडिलांच्या वेळीं व पेशवाईंतहि कधीं आळंदीस अलकापूर असें म्हणत असें दिसतें. आळंदी येथें इंद्रायणीवर इ. स. १८२० मध्यें पुण्याचे श्रीमंत पेढीवाले ठाकुरदास मोहनलाल आगरवाला यांनीं ऐंशीं हजार रुपये खर्चून एक दगडी पूल बांधलेला आहे. पुलावरून गांव, देवळें, भिंती, बागा, वगैरेंचा देखावा चांगला दिसतो. गांवांत सुमारें तीनशें घरें आहेत. ज्ञानेश्वरमहाराजांच्या देवळास तीन दरवाजे आहेत. ज्ञानोबाच्या समाधीवर एक तीन फूट उंचीचा चांदीचा मुखवटा असतो. मागें विठोबा-रखमाईच्या मूर्ती आहेत. हें देऊळ सुमारें तीनशें वर्षांपूर्वीं कोणी आंबेकर देशपांडे यांनी बांधलें असून मंडप सन १७६० च्या सुमारास शिंद्यांचा दिवाण रामचंद्र मल्हार यानें बांधलेला आहे. पश्चिमेकडील भिंत व ओऱ्या हीं इ. स. १७५० च्या सुमारास बाळाजी बाजीराव पेशवा यानें बांधलीं आहेत.

देवळाची सर्व व्यवस्था पंचकमिटीकडे आहे. दर महिन्याच्या एकादशीस यात्रेकरू येथें दर्शनास येतात, परंतु कार्तिक वद्य एकादशीस येथें फार मोठी यात्रा भरते.

इ. स. १८६७ मध्यें येथे म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. हिचें मुख्य उत्पन्न म्हटलें म्हणजे येथें यात्रेकरूंवर कर घेतात तेंच होय.

**आळवार**—दक्षिण हिंदुस्थानांतील वैष्णव संतकवि. दक्षिण हिंदुस्थानांतील वैष्णव संप्रदायाचे दोन कालविभाग पडतात. एक आळवारांचा व दुसरा आचार्यांचा. 'दैवी प्रेमसागरात बुडून गेलेले' हे आळवार योगी बारा असून ते निरनिराळया काळीं जन्मलेले, व निरनिराळ्या ठिकाणीं राहणारे असे होते. वैष्णव पंथांत गीतेप्रमाणें ज्याला महत्त्व आलें आहे, त्या 'प्रबंधम्' नांवाच्या ग्रंथांत आळवारांचीं गीतें गोंविलीं आहेत.

इ. स. ४ थ्या किंवा ५ व्या शतकापासून ८ व्या शतकापर्यंत हे आळवार होऊन गेले असावेत. नंतर दोन शतकांनीं नाथमुनीपासून आचार्यांचा काळ सुरू झाला. आळवार हे खरेखुरे प्रवक्ते असून गूढ अंतर्ज्ञानांत निमग्न होऊन शांततेनें काळ कंठीत असत. त्यांच्यानंतर झालेले आचार्य हे स्वभावतःच अध्यापक व पंडित असून त्यांनीं वैष्णव संप्रदायाचें रहस्य विद्वानांनाहि पटेल अशा तऱ्हेनें प्रतिपादन केलें. रामानुजासारख्या आचार्योंनींहि आळवारांना गुरुस्थानीं मानून त्यांचें कार्य नवीन जोमानें चालविलें. या आळवारांत स्त्री–शूद्रहि होते.

---

# इ

इ—या अक्षराला सध्यांचें स्वरूप प्राप्त होण्यापूर्वीं चार अवस्थांतून जावें लागलें. पहिली गिरनार शिलालेखांत, दुसरी इ. स. ४९३ च्या एका दानपत्रांत, तिसरी हैहयवंशी जाजल्लदेवाच्या वेळच्या एका लेखांत व शेवटची १३ व्या शतकांतील एका लेखांत दिसून येते.

**इकॅटेरिनबर्ग**—उरल पर्वतांतील रशियाचें एक औद्योगिक केंद्र. येथें खाणकामाचा धंदा जोरांत चालत असून मुख्यतः यंत्रें तयार करण्याचे कारखाने आहेत.

**इकॅटेरिनोडॉर**—कॉकेशसमधील कुबान नदीवरील शहर. या शहराच्या आसमंतात् पशुपालनाचा धंदा जोरांत चालतो.

**इकॅटेरिनोस्लाव्ह**—नीपर नदीवरील यूक्राइनमधील महत्त्वाचें शहर. यूक्राइन हा रशियाचा भाग विपुल खनिज संपत्तीनें भरलेला असून तेथें यंत्रें व इतर धातूंचें सामान तयार करतात. कारण या भागांत लोखंड, दगडी कोळसा, मँगेनीज, यांच्या खाणी आहेत. यूक्राइन प्रांतांतील जमीन काळी असून फार सुपीक आहे. अर्थात् शेतीबरोबर पशुपालनाचा धंदाहि जोरांत चालतो.

**इकबाल, सर मुहम्मद** (१८७३–१९३८)—एक प्रमुख मुसलमान कवि, पुढारी व पंडित. यांचें घराणें पूर्वीं काश्मिरी ब्राह्मणाचें असल्यानें उच्च अभिजात संस्कृति यांच्या अंगीं आनुवंशिकच होती. लहानपणापासून तत्त्वज्ञानाची आवड व युरोपियन गुरूजवळ शिक्षण व पुढें युरोपांत शिक्षणासाठीं वास या कारणांनीं त्यांचें उच्च शिक्षण व विचार यांचा लाभ प्राप्य

आणि पाश्चात्य या दोन्ही खंडांतील जनतेस झाला. लाहोरला वकिली पेशा पत्करला असूनहि त्यांचें सर्व लक्ष तात्त्विक व गूढ वाङ्मयाकडे असे. प्रथम उर्दू कवि व नंतर फारसी कवि म्हणून त्यांनीं रवींद्रनाथ टागोरप्रमाणेंच लौकिक मिळविला. असरार-इ-खुदी, पयाम-इ-मश्रिक, जबूर-इ-अजम, जवीदनामा, बाल-इ-जिब्रिल, जर्ब इ-कलीम, अर्मगान-इ-हिजाज, वगैरे त्यांचे फारसी-उर्दू कवितांचे संग्रह प्रसिद्ध आहेत. प्रथम साऱ्या हिंदुस्थानवर त्यांची प्रीति होती. 'हिंदोस्ताँ हमारा' हें त्यांचें राष्ट्रगीत प्रसिद्ध व सर्वश्रुत आहे. पण पुढें ते पाकिस्तानवादी झाले व मुस्लिम लीगचे एक पुढारी म्हणून वागूं लागले. ते चांगले शिक्षणतज्ज्ञहि होते. 'सर' ही पदवी त्यांना काव्यगुणावरून सरकारनें दिली होती. हिंदुस्थानांतील एक महाकवि म्हणून त्यांचें स्थान अढळ आहे.

**इकबालखान**—तुघलख घराण्यांतील एक बादशहा. फिरोजशहाच्या मृत्यूनंतर राज्यांत अंदाधुंदी झाली व चार सुलतान दहा वर्षांच्या आंत होऊन गेले. फिरोजशहाचा नातू जेव्हां सुलतान झाला तेव्हां त्याचा चुलत भाऊ इकबालखान बादशहाच्या तर्फेनें त्याच्या प्रतिस्पर्ध्यांशीं लढला व त्यानें राज्यांत थोडाबहुत बंदोबस्त केला. इतक्यांत हिंदुस्थानावर तयमूर-लंगाची धाड आली. तिला तोंड देण्याची बादशहा व इकबाल यांनीं शिकस्त केली, पण त्यांत त्यांचा पराभव झाला. तयमूर गेल्यानंतर इकबाल दिल्लीस आला. महंमद बादशहा गुजरातेंत पळून गेला होता. इकबालनें दिल्ली व त्या भोंवतालचा प्रदेश काबीज करून बादशाहीपद बळकावण्याचा यत्न केला.

पुढें इकबालखानानें दुसऱ्या महंमूदशहाला कनोज येथें वेढलें. परंतु त्याला इटावा घेतां न आल्यामुळें तो दिल्लीला परत गेला. १४०५ मध्यें इकबाल सामानच्या बहरामखानावर स्वारी करून गेला; बहरामला त्यानें ठार मारलें, असें 'तारिख-इ-मुबारकशाही' नांवाच्या ग्रंथांत लिहिलें आहे. अजोधन येथें त्याची मुलतानचा सुभेदार खिझ्रखान यान्याशीं गांठ पडली तेव्हां त्यांच्यामध्यें लढाई होऊन तिच्यांत इकबाल मारला गेला (१४०५).

**इंका लोक**—पेरू देशांतील एक इंडियन जात. इंका हें अमेरिकेंतील पेरू नांवाच्या देशांतील राजघराण्याचें नांव आहे. मंको कापाक (सूर्याचा पुत्र) या नांवाच्या पुढाऱ्यानें पेरू देशांतल्या अनेक लढवय्या टोळ्यांमध्यें एकी करून ईश्वरसत्ताक राज्य स्थापलें. या इंका राजघराण्यानें सुमारें ४ शतकें (११०० ते १५३३) पर्यंत राज्य केलें. अँडीज पर्वताच्या विस्तृत पठारावर राहणाऱ्या या रणशूर इंका लोकांच्या समाजानें आसपासचा प्रदेश जिंकून क्विटोपासून चिली देशापर्यंतचा आणि पॅसिफिक महासागराच्या किनाऱ्यापासून अँडीज पर्वतापर्यंतचा व त्याच्या पलीकडे मोठ्या प्रदेशावर आपलें साम्राज्य स्थापलें. येथें ईश्वरसत्ताक राज्यपद्धति असल्यामुळें या इंका घराण्यांतल्या सम्राटांच्या हातीं सर्व धार्मिक व इतर मुलकी-दिवाणी सर्व प्रकारची सत्ता केंद्रित झालेली होती. कायदा करणारा व त्याची अमलबजावणी करणारा, तसेंच ईश्वराचें प्रतिनिधित्व व परमार्थ-ज्ञान हे सर्व अधिकार या इंका राजेलोकांकडे असत. हुयेना-कापाक या नांवाच्या सम्राटाच्या कारकीर्दींत या इंका साम्राज्याची सत्ता अगदीं शिखरास पोंचली होती (सन १४७५ ते १५२५). त्याचा वंशज आता हुलापा याच्या कार-कीर्दींत १५३३ मध्यें स्पॅनिश लोकांनीं स्वाऱ्या केल्या त्या वेळीं हें साम्राज्य नष्ट झालें. आज कांहीं इंका लोक बरेच सुधारलेले व समाजांत मान मिळविलेले असे पेरूमध्यें दिसून येतात.

**इक्वेडॉर**—दक्षिण अमेरिकेंतील या प्रजासत्ताक संस्थानाचा आकार त्रिकोणी असून कोलंबिया, पेरू व पॅसिफिक महासागर यांमध्यें पाचरीसारखें हें संस्थान आहे. यांत एकंदर १७ प्रांत असून सर्व देशांचें क्षेत्रफळ २,७५,९३६ चौरस मैल आहे, व लगतचीं गॅलापागॉस बेटें ३०२८ चौरस मैलांचीं आहेत. लो. सं. (१९४२) ३०,८९,०७८. क्विटो ही राजधानी असून इस-मरालडास व गायाकिल हीं दोन महत्त्वाचीं बंदरें आहेत. या देशाचे स्वाभाविक असे ३ विभाग पडत असून त्यांपैकीं किनारपट्टी सखल व अरुंद आहे. पूर्वेकडील भाग म्हणजे सपाट मैदान आहे व डोंगराळ विभाग म्हणजे अँडीज पर्वताचा भाग होय. या डोंगराळ भागांत पर्वतांच्या दोन रांगा असून त्यांची उंची आठ ते तेरा हजार फुटांपर्यंत आहे आणि या दोन रांगां-मध्यें सुमारें वीस ते चाळीस मैल रुंदीची एक दरी आहे. या रांगा बाराहि महिने वर्फाच्छादित असून त्या ज्वालामुखी पर्वतांच्या आहेत. पश्चिम बाजूकडील रांगेंत चिंबोरॅझो हें उंच शिखर असून त्याची उंची २०,७०३ फूट आहे आणि पूर्व रांगेंतील शिखर कोटापाक्सी हें असून त्याची उंची १८,५०० फूट आहे. या दोन रांगांमधील पठारी प्रदेशांत मुख्यत्वें शेती केली जाते. टिग्रे, नापो, पास्टाझा वगैरे नद्या ॲमेझानला मिळतात. या देशाचा बराचसा भाग जंगलांनीं व्यापलेला असून त्यांत मनुष्याला उपयुक्त असे सिंकोना, सारसापरिला, वगैरे वृक्ष आहेत. मैदानी प्रदेश उष्ण व आरोग्याला विघातक अशा हवामानाचा असून या प्रदेशांत कापूस, कोको, ऊंस, कॉफी यांची लागवड करतात. डोंगराळ भागांत व मैदानांच्यामधील प्रदेशांतील हवामान बरेंच सौम्य व आरोग्यकारक असून, तेथें फळफळावळ, धान्य यांची लागवड करतात. गवताळ जमिनीवर मुख्यत्वें पशुपालन चालतें. या देशांत गवत विपुल असल्यानें गवती टोप्या करणें हा

एक लोकांचा मुख्य धंदा आहे. त्याचप्रमाणें साखरेचे कारखाने (ऊंस विपुल असल्यामुळें), चाकोलेट तयार करण्याचे कारखाने ( दूध व कोकोचीं झाडें असल्यामुळें ) वगैरे कारखाने आहेत. पूर्वी रबराचा धंदा अतिशय जोरांत होता; परंतु आतां तो कमी कमी होत चाललेला असून लोकांना धंद्यासाठीं फळांची लागवड व जंगलें यांवरच अवलंबून राहावें लागणार आहे. या देशांत चांदी, दगडी कोळसा, लोखंड व तांबें यांच्या समृद्ध खाणी असून, तेथील खनिज संपत्ति अद्याप म्हणावी तशी बाहेर काढली गेली नाहीं. तसेंच खनिज तेलाचा सांठाहि कांहीं ठिकाणीं असून चिंबोराझोच्या आसमंतांतील भागांत गंधक सांपडतें. कोको व कॉफी हे निर्यातीचे मुख्य जिन्नस होत. या देशांत सुमारें ४५० मैल लांबीचा लोहमार्ग असून मध्य भागांतील व पश्चिम भागांतील वाहतूक जलमार्गानेंच चालते. या देशांत रस्ते फारसे नाहींत व जे आहेत ते अतिशय खराब आहेत. लोकवस्ती मुख्यतः रेड इंडियन लोकांची आहे. तसेंच बाहेरून आलेल्या लोकांशीं येथील लोकांचा वर्णसंकर होऊन बनलेली प्रजा सुमारें पाच लाखांपर्यंत आहे.

१५३२ सालीं स्पॅनियर्ड लोकांनीं स्थानिक राजाचा पराभव करून हा प्रदेश जिंकला. १८०९ पर्यंत स्पॅनिश सत्ता अबाधित राहिली. पुढें लोकसत्ता हळूहळू येत जाऊन १८३० मध्यें पूर्णपणें हें प्रजासत्ताक राज्य बनलें. पेरू देश आणि इक्वेडॉर यांमध्यें सारखीं भांडणें चालू असतात. नुकतेंच १९४२ सालीं मोठ्या राष्ट्रांच्या मध्यस्थीनें कॉफी-लागवडीच्या प्रदेशावरून उपस्थित झालेलें भांडण मिटलें.

**इगतपुरी**—मुंबई. हा तालुका नाशिक जिल्ह्यांत आहे व त्याचें क्षेत्रफळ ३९३ चौ. मै. आहे. ह्या तालुक्यांत इगतपुरी मुख्य शहर व इतर १२८ खेडीं आहेत. लो. सं. ७६,४६६. दक्षिणेकडील व वायव्येकडील भाग डोंगराळ मुलुख आहे. ईशान्य व दक्षिण ह्या भागांत झाडी बरीच कमी आहे व एकंदरींत जमीन नापीक व पोकळ आहे. ह्या जिल्ह्यांतील हवा थंड व निरोगी आहे व सगळ्या वर्षांत पाऊस १३३ इंच पडतो. शहर नाशिकपासून ३५ मैलांवर व मुंबईपासून ८५ मैलांवर आहे. हें शहर समुद्र-सपाटीपासून १,९९२ फूट उंच आहे. ह्या शहराजवळ पिंप्री येथें साद्रुद्दिन बोवाचें थडगें आहे. तीन मैलांवर असलेल्या त्रिंगलवाडी येथें एक किल्ला, लेणीं, व श्रीब्रह्मदेवाचें मोडकें देऊळ आहे. ह्या शहराला म्युनिसिपालिटी आहे. लो. सं. ८,१७३.

**इंगरसॉल, रॉबर्ट ग्रीन** ( १८३३–१८९९ )—अमेरिकन कायदेपंडित व वक्ता. सामान्य शिक्षण झाल्यावर इंगरसॉलनें कायद्याचा अभ्यास केला व तो यशस्वीपणें आपला धंदा करूं लागला. नंतर कांहीं काल त्यानें लष्करी नोकरींत घालविला. पुढें तो इलिनॉईस येथील ॲटर्नी-जनरल झाला. १८७६ सालीं जेम्स जी. ब्लेन याचें नांव अध्यक्षपदाकरितां सुचवितांना त्यानें लोकसत्ताक राष्ट्रीय परिषदेपुढें जें भाषण केलें त्या भाषणानें उत्कृष्ट वक्ता म्हणून त्याची सर्वत्र ख्याति झाली. कायदेपंडित म्हणूनहि इंगरसॉलची प्रसिद्धि होती. त्याचीं मतें ख्रिस्ती धर्माच्या विरुद्ध असल्यामुळें तो राजकारणांत यावा तितका पुढें आला नाहीं. त्याच्या भाषणांत तर्कशुद्ध विचारसरणी नसून वक्तृत्वपूर्ण भाषासौंदर्य मात्र भरपूर आढळतें. ' दि गॉड्स अँड अदर लेक्चर्स ', ' ग्रेट स्पीचेस ' वगैरे पुस्तकांत त्याचीं भाषणें संकलित केलीं आहेत.

**इंग्रजी भाषा**—ब्रिटिश बेटें, अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें व इंग्रज लोकांच्या वसाहती व सर्व ब्रिटिश साम्राज्यांतील देश या प्रदेशांत ही भाषा प्रचारांत आहे. ख्रिस्ती शतकाच्या पांचव्या व सहाव्या शतकांत जे लोक ट्यूटन लोकांपासून वेगळे होऊन अँगल्स व सॅक्सन या नांवांनीं पुढें ओळखले जाऊं लागले त्यांच्या भाषेमध्यें या भाषेचा उगम आढळतो. हे लोक उत्तर युरोपमधून वरील काळांत इंग्लंडमध्यें आले. इंग्लंडमध्यें त्या वेळीं ब्रिटन नांवाचे एक केल्टिक बोली बोलणारे लोक होते. त्या लोकांस यांनीं दक्षिण आणि पश्चिम दिशेकडील प्रदेशांत हांकून देऊन आपली वसाहत स्थापन केली. या दोन जातींच्या लोकांत सुमारें दीडशें वर्षांहूनहि अधिक काळपर्यंत झगडा चालू होता आणि आज या लोकांच्या केल्टिक भाषेस जरी विशेष महत्त्व राहिलें नसलें तरी ही भाषा बोलणारे लोक अद्यापिहि आपणांस वेल्समध्यें आढळतात.

इंग्रजी भाषेमध्यें आढळणारे बहुतेक साधे, जोरदार व ठसकेबाज शब्द या अँग्लो-सॅक्सन भाषेमधील असतात. ही अँग्लो-सॅक्सन भाषा विशेषतः प्रत्ययी भाषा असून तिचें स्वरूप नॉर्मन विजयापर्यंत फारसें बदललें नव्हतें. परंतु नॉर्मन विजयानंतर फ्रेंच ही राजदरबारची भाषा बनली व कायदेकानूहि त्याच भाषेंत तयार होऊं लागले. इंग्रज लोकांनीं या भाषेचा स्वीकार बरेच दिवस केला नाहीं. त्यामुळें सुमारें दोनशें वर्षेंपर्यंत इंग्लंडमध्यें या दोन्ही भाषा व त्यांच्या अनेक पोटभाषा प्रचलित होत्या. सुमारें इ. स. १२५० च्या सुमारास या दोन भाषांचें एकीकरण होऊं लागलें. त्या वेळीं अँग्लो-सॅक्सन भाषेंतील मानगडीचे प्रत्यय हळूहळू गळूं लागले. यानंतर सुमारें दोनशें वर्षांनीं एक नवीनच बनलेली भाषा शाळांतून शिकविली जाऊं लागली व कोर्ट दरबारांत रूढ झाली. ही भाषा म्हणजेच हल्लींच्या इंग्रजीचें मूळ स्वरूप होय. या नवीन बनलेल्या भाषेमध्यें घरदार,

शेती व नेहमींचा आयुष्यक्रम यां बाबतींतले बहुतेक शब्द अँग्लो-सॅक्सन भाषेंतील रूढ झाले; वे राजदरबार, सरकारी कामकाज, सामाजिक व्यवहार व समारंभ, खेळ व क्रीडांगण, कायदे वगैरे बाबतींतील शब्द नॉर्मन लोकांच्या भाषेंतील रूढ झाले. याच वेळीं इंग्लंडवर धार्मिक वर्चस्व रोमचें होतें, त्यामुळें इटली देशाशीं संबंध आला व त्याचा परिणाम म्हणजे १४०० ते १६६० या वर्षांच्या दरम्यानच्या काळांत लॅटिन भाषेपासून उगम पावलेले अनेक शब्द इंग्रजी भाषेंत घुसले. यानंतर शास्त्रीय ज्ञानांत जी वाढ होत गेली तीमुळें अनेक लॅटिन व ग्रीक भाषांपासून बनलेल्या शब्दांचा प्रवेश इंग्रजी भाषेंत होत गेला. यामुळें इ. स. १३०० च्या सुमारास ज्या इंग्रजी भाषेंत केवळ ३०,००० अँग्लो-सॅक्सन शब्द होते तिच्याच आजच्या स्वरूपांतील इंग्रजी भाषेंत जवळजवळ ५,००,००० शब्दांपर्यंत वाढ झाली आहे व त्यांतील बहुतांश शब्द परकी भाषांतून आलेले आहेत. तथापि इंग्रजी भाषेचें व्याकरण व घरगुती व सामान्य व्यवहारांतील शब्द अद्यापिहि अँग्लो-सॅक्सनच राहिले आहेत. आज जगांत सुमारें २७ कोटी लोक इंग्रजी भाषा बोलतात. भाषा पहा.

**इंग्रजी वाङ्मय**—इंग्रजी वाङ्मयाचा प्रारंभ पाहूं गेल्यास आपणांस तो इंग्लंडमध्यें प्रथम वसाहत केलेल्या सॅक्सन लोकांमध्यें जीं वीर काव्यें त्यांच्या युद्धास जाणाऱ्या वीरांस प्रोत्साहन देण्याकरितां व युद्धाच्या वेळीं म्हणण्याकरितां गाण्यांत येत असत व युद्धामुळें जय पावणाऱ्या वीरांचा सन्मान करण्याकरितां रचण्यांत येत असत त्या गीतांमध्यें आढळून येतो. अशा तऱ्हेच्या काव्याचा आज उपलब्ध असलेला नमुना म्हणजे 'ब्योवूल्फ' काव्य हें होय. याच्या पूर्वीचा येथील प्रथम वस्ती करून राहिलेल्या केल्ट लोकांतील गीतांचा संग्रहहि उपलब्ध आहे. हीं गीतें काव्यमय व वीणागीतांच्या स्वरूपाचीं असून त्यांमध्यें भावना व विनोद भरपूर भरलेला आढळून येतो. हा प्रकार सॅक्सन काव्यांत आढळत नाहीं. अशा प्रकारच्या जुन्या गीतांपैकीं फारच थोडीं आज उपलब्ध आहेत. परंतु त्या गीतांचा त्या वेळच्या अँग्लो-सॅक्सन वाङ्मयावर फार महत्त्वाचा परिणाम घडलेला दिसून येतो. इंग्लंडमध्यें अगदीं प्रथम तयार झालेलें काव्य म्हणजे 'पॅरेफ्रेज' (रूपांतर) हें होय. हें सीड्मन नांवाच्या एका कवीनें बायबलमधील कांहीं कथांचें इ. स. ६७० मध्यें केलेलें पद्यमय रूपांतर आहे. ऑल्फ्रेड या प्रसिद्ध राजानें लॅटिन भाषेंतील अनेक ग्रंथांचीं भाषांतरें इंग्रजी भाषेंत केल्यामुळें त्यास 'इंग्रजी गद्याचा जनक' असें म्हणण्यांत येतें. तथापि या राजाच्या कारकीर्दीपूर्वींहि कांहीं गद्य-ग्रंथ इंग्रजी भाषेंत तयार झाले होते. या वेळीं इंग्रजी वाङ्मयाची वाढ फार मंदगतीनें होत होती. त्यानंतर सुमारें चवदाव्या शतकाच्या अखेरीस इंग्रजी भाषेंतील पहिलें मोठें काव्य 'व्हिजन ऑफ पिअर्स प्लौमन' (पिअर्स प्लौमन याचें स्वप्न) हें लिहिलें गेलें. याच वेळीं जॉन विक्लिफ हा बायबलाचें इंग्रजी भाषेंत भाषांतर करीत होता. 'इंग्रजी काव्याचा जनक' म्हणून ज्याला संबोधलें जातें तो जॉफ्रे चॉसर हा कवि सुमारें इ. स. १३४० या वर्षी जन्मास आला. यानें लिहिलेल्या 'कँटरबरी कथा' या गोष्टी कांहीं यात्रेकरू टॅबर्न खाणावळीपासून निघून कँटरबरी या गांवीं यात्रेकरितां प्रवास करीत असतां त्यांनीं सांगितलेल्या कथा आहेत. ज्याला तत्कालीन इंग्रजी भाषा समजत असेल त्याला त्या आजहि मोठ्या मनोरंजक व सौंदर्ययुक्त वाटल्याशिवाय राहणार नाहींत. चॉसरच्या काळाच्या सुमारास इंग्रजी वाङ्मयाचें हें पूर्वयुग संपलें असें म्हणावयास हरकत नाहीं. यानंतर या वाङ्मयाची प्रगति झपाट्यानें व सतत होत गेलेली आढळून येते. पंधराव्या शतकांत मुद्रणकलेचा शोध लागल्यानंतर पुस्तकें फार त्वरेनें प्रकाशित होऊं लागलीं. तथापि सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें एलिझाबेथ राणीची कारकीर्द भरभराटीस येईपर्यंत इंग्रजी वाङ्मयाची विशेष वाढ झाली नाहीं. पण या राणीच्या कारकीर्दींत मात्र इंग्रजी वाङ्मयाला जगांतील वाङ्मयांत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें. त्या वेळीं इंग्रज राष्ट्रामध्यें फार मोठी जागृतीची लाट उत्पन्न झाली होती. त्याच वेळीं अमेरिका खंडाचा शोध लागून तेथें नवीन नवीन शोध लागत होते, व नवीन नवीन भूभागांवर वसाहती स्थापन होत होत्या; त्याच वेळीं अनेक नवीन शास्त्रीय शोध लागून भौतिक शास्त्रांमध्यें झपाट्यानें प्रगति होत होती. याच वेळीं इंग्लंड देशास समुद्रावर मोठमोठे विजय प्राप्त होत होते. या सर्व गोष्टींचा परिणाम घडून येऊन त्या वेळीं इंग्लंडमध्यें उच्च प्रतीचे बरेच मोठमोठे ग्रंथकार उदयास आले. या काळांत विचारप्रवर्तक व नवीन शास्त्रीय ज्ञानानें भरलेले आणि विनोद व चातुर्ययुक्त असे अनेक निबंध प्रकाशांत आले. निसर्गसौंदर्याच्या वर्णनानें भरलेलीं व सुंदर भाषेनें सजविलेलीं काव्यें आणि चमत्कृतिपूर्ण नाटकें बाहेर पडलीं. यांची बरोबरी त्यानंतरच्या काळांत केव्हांच झाली नाहीं. हा वाङ्मयाचा प्रवाह इ. स. १६०३ मध्यें पहिला जेम्स राजा गादीवर येईपर्यंत सतत चालला होता. तो त्यानंतर मात्र बंद पडला. तथापि शेक्सपिअर हा नाटककार १६१६ पर्यंत हयात होता.

यानंतरच्या काळांत धार्मिक सुधारणेची व पावित्र्याची लाट इंग्लंड देशावर आली. ती १६६० पर्यंत टिकली. या काळांत प्रेम व सौंदर्य या वाङ्मयाच्या विषयांचें स्थान सत्याच्या शोधानें घेतलें. या कालांतील वाङ्मयामध्यें जो मोठा फरक दिसून येतो, त्याचें प्रतीक आपणांस मिल्टन या तत्कालीन श्रेष्ठ कवीच्या काव्यामध्यें दृग्गोचर होतें. यानें आपल्या वाङ्मयरचनेस प्रारंभ

पहिल्या चार्लस राजाच्या कारकीर्दीमध्यें केला व मोठ्या दीर्घ कालानंतर वृद्धपणीं अंधावस्थेमध्यें राज्यक्रांतीनंतरच्या कालांत आपली लेखणी खालीं ठेवली. दुसरा चार्लस बादशहा पुन्हां गादीवर आल्यानंतर इंग्रजी वाङ्मयानें फ्रेंच वाङ्मयाचें अनुकरण करण्यास सुरवात केली. या वाङ्मय-प्रकाराची वाढ फार झपाट्यानें व सर्व बाजूंनीं ॲन राणीच्या कारकीर्दीपर्यंत ( १७०२ ते १७१४ ) अनिरुद्ध गतीनें चालू होती. याच कालांत डिफो, स्विफ्ट, ॲडिसन, पोप इत्यादि ग्रंथकार होऊन गेले. याच कालांत ॲडिसन याचें निबंधात्मक ' स्पेक्टेटर ' हें पत्र निघत होतें. यानंतर नवलकथा अथवा कादंबरी या वाङ्मय-प्रकाराची वाढ होऊं लागली व तत्कालीन प्रसिद्ध लेखक गोल्डस्मिथ, रिचर्डसन, फील्डिंग वगैरेंच्या ग्रंथांत आपणांस त्याचें स्वरूप चांगलें निदर्शनास येतें. याच कालांतील काव्यामध्येंहि एक प्रकारचें नवचैतन्य निर्माण झाल्याचें आढळून येतें.

एकोणीसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत सामान्यतः कल्पनारम्य ( रोमँटिक ) वाङ्मयाकडे ग्रंथकारांचा ओढा दिसूं लागतो. तसेंच या वेळच्या काव्यामध्येंहि बरेंच नावीन्य दृष्टीस पडतें. विशेषतः या कालांतील काव्यामध्यें कल्पनेच्या फार उच्च भराऱ्या आपणांस दृग्गोचर होतात. या कालांतील प्रसिद्ध कवी म्हटले म्हणजे बर्न्स, कोलेरिज, वर्डस्वर्थ, शेली, कीट्स, बायरन, आणि सौदे हे होत. या वेळीं लँब व स्कॉट हे प्रसिद्ध गद्य-ग्रंथकार होऊन गेले. यानंतर व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दींत पुन्हां वाङ्मयास बहर आल्याचें दृष्टीस पडतें. या युगांत कार्लाइल, मेकॉले, ब्रौनिंग्ज, टेनिसन, डिकन्स, थॅकरे, जॉर्ज इलियट वगैरे अतिशय प्रसिद्ध असे कवी व ग्रंथकार निर्माण झाले.

व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दींत जो वाङ्मय-प्रवाह सुरू झाला त्याला अद्यापपर्यंतहि खळ पडली नाहीं. या कालापासून इंग्रजी वाङ्मयाची सारखी भरभराटच चालू आहे. त्यामध्यें आपणांस अनेक कादंबरीकार, कवी, नाट्यलेखक, निबंधकार वगैरे थोर थोर ग्रंथकार दृष्टीस पडतात. विसाव्या शतकाच्या पहिल्या पादामध्यें हे सर्व ग्रंथकार प्रसिद्धीस आले. या सर्वांचीं नांवें येथें देणें शक्य नाहीं, पण महत्त्वाचीं नांवें द्यावयाचीं तर पुढील कांहीं सांगतां येतील : अर्नोल्ड बेनेट, एच्. जी. वेल्स, मिसेस हंफ्रे वॉर्ड, एॅ-कॉनन डॉइल, जोसेफ कॉनरॅड, विल्यम डी मॉर्गन, रुडयार्ड किप्लिंग, जी. के. चेस्टरटन, बर्नार्ड शॉ, जेम्स बॅरी, हेन्री ए. जोन्स, जॉन गाल्सवर्दी, रूपर्ट ब्रूक, ऑल्फ्रेड नॉइस, जॉन मॅसफील्ड, विल्यम बी. यीट्स, इत्यादि.

**इग्रेट**— हेरॉन पक्ष्यासारखी ही एक जात असून याचीं पिसें खालच्या भागीं शरीराला चिकटलेलीं असतात व पंख शेपटाकडे मोकळे असतात. अमेरिकेंतील इग्रेटची लांबी ३७ इंच असून त्याचीं पिसें मऊ, शेंपटी आंखूड व लहानशी असते. एकावर एक बारा थर असलेले पंख त्याला असतात. युरोपांतील हा पक्षी सुमारें ४० इंच लांब असून त्याचा रंग पूर्ण पांढरा असतो

व चोंच तांबडी अगर किरमिजी असते. तसेंच त्याचे पाय काळे असतात. गारझेट या नांवाची जात फारच लहान असून ती सुमारें २२ इंच लांबीची असते व तिचाहि रंग पांढराच असतो. या पक्ष्याच्या पिसांना फार किंमत येते व तीं पूर्णपणें व चांगल्या स्थितींत हातीं लागण्यासाठीं पक्ष्याला ठार मारावें लागतें.

**इंग्लंड**—ग्रेट-ब्रिटनचा मुख्य भाग. एका काळीं हें स्वतंत्र विभाग म्हणून ( एकटेंच ) होतें. पुढें तें व स्कॉटलंड आणि आयर्लंड मिळून होणाऱ्या ग्रेट-ब्रिटनचा प्रमुख भाग झालें; इंग्लंडच्या सर्व साम्राज्याचें हेंच केंद्रस्थान आहे. जगांतील अत्यंत मोठ्या विस्तीर्ण प्रदेशावर येथील राजाची अधिसत्ता चालते. आतांपर्यंत हिंदुस्थानच्या अफाट भूमीचा तो बादशाह होता. परंतु आतां नुकतेंच हिंदुस्थानला इतर वसाहतींच्या बरोबरीनें स्वायत्त स्वराज्य देण्यांत आलें आहे.

इंग्लंडचें क्षेत्रफळ ५०८७४ चौ. मै. व लोकसंख्या सुमारें ३,८०,००,०००; म्हणजे दर चौरस मैलास सुमारें ७५० प्रमाण पडतें. हें स्कॉटलंडशीं संलग्न आहे. बाकी-वेल्स यांतच धरून-तिन्ही बाजूंस पाणी आहे. याची कमाल लांबी-रुंदी ४३० व ३७० मैल असून एकूण समुद्र-किनारा १,८०० मैलांच्या वर आहे. बहुतेक सर्व देश साधारणपणें सपाट असून जमिनीची समुद्रसपाटीपासून उंची कोठेंहि १०० फुटांच्या वर नाहीं. उत्तर-पश्चिम भागांत मात्र डोंगराळ मुलूख आहे.

थेम्स, सेव्हर्न, ट्रेन्ट, टाइन, टीज या प्रमुख नद्या आहेत. लंडन, लिव्हरपूल, हल, ब्रिस्टल, साउथॅम्प्टन, प्लायमाउथ, वगैरे बंदरें आहेत. देशाच्या सभोंवार समुद्र किनाऱ्यानें व नद्यांच्या मुखापाशीं आंत कित्येक बंदरें आहेत. समुद्रकिनाऱ्यापासून दूर अशीं कित्येक बेटें आहेत. त्यांत ' आइल ऑफ वाइट ' हें मोठें बेट आहे.

इंग्लंडचे ४० परगणे ( काउंटी ) पाडलेले आहेत. ते बरेच लहानमोठे आहेत. तसेंच त्यांतील वस्तीचें मानहि अगदींच विषम आहे. याचें कारण विशेषतः गेल्या २०० वर्षांत एकंदर देशाचें औद्योगीकरण जास्त होत आलें आहे व शेतीचें मान कमी पडत चाललें आहे. लंडन व मँचेस्टर यांचे जवळपास

साधारणतः २५ । ३० मैलांच्या अंतरांत वस्तीची वाढ व दाटी झाली असून तेवढ्यांत जवळजवळ देशांतील निम्मी लोकसंख्या येते. १८ व्या व १९ व्या शतकांत वस्तीची वाढ उत्तरेकडे होत होती तर या २० व्यां शतकांत देशांतील वस्तीची सर्व धांव दक्षिणेकडे आहे व याचें कारण त्या भागांत उद्योगधंद्यांची झालेली वाढ होय.

या देशांत आरंभीं केल्ट लोक राहत. त्यांना खि. पू. ५५ मध्यें ज्यूलियस सीझरनें जिंकलें, तेव्हांपासून इ. स. पांचव्या शतकापर्यंत रोमन साम्राज्याच्या अंकित इंग्लंड होतें. नंतर आल्फ्रेड हा अँग्लो-सॅक्सन राजा आला. १०१७ त डेन्मार्कनें हा प्रदेश जिंकून तीस वर्षें ताब्यांत ठेवला. १०४२ त एडवर्ड दि कन्फेसर हा इंग्लंडचा राजा झाला पण लवकरच नॉर्मंडीच्या विल्यमनें यावर स्वारी करून देश आपल्या अनुयायांना वांटून दिला. दुसऱ्या हेन्रीच्या कारकीर्दींत आयर्लंडचा व फ्रान्सचा बराच भाग इंग्लंडला जोडण्यांत आला ; पण जॉनच्या अमदानींत फ्रेंच मुलूख ताब्यांतून गेला व त्याला मॅग्नाचार्टा ही स्वातंत्र्याची सनद लोकांना करून द्यावी लागली ( १२१५ ). पहिल्या एडवर्ड राजानें वेल्स जिंकून राज्याला जोडलें. शतवार्षिक युद्धांत इंग्लंडला शेवटीं फ्रेंच मुलूख सोडावा लागला ( १४२८ ), पण एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत बऱ्याच वसाहती इंग्लंडला मिळाल्या. या वेळीं प्रॉटेस्टंट पंथाची कायमची पकड इंग्लंडवर बसली. १७०७ मध्यें इंग्लंड आणि स्कॉटलंड हीं दोन राज्यें एकत्र करण्यांत आलीं. १७६० मध्यें कानडा फ्रेंचांकडून घेतला पण १७७६ त अमेरिकन वसाहती स्वतंत्र झाल्या. १९ व्या शतकांत दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया व हिंदुस्थान हीं ब्रिटिश साम्राज्यांत समाविष्ट झालीं. २० व्या शतकांत जर्मनीशीं दोन महायुद्धें खेळावीं लागलीं. आतां इंग्लंड हें जगांत प्रथम श्रेणीचें प्रबल राष्ट्र राहिलें नाहीं.

**इंग्लिश खाडी**—इंग्लंड व फ्रान्स या दोन देशांमध्यें ही खाडी डोव्हरपासून लँड्सएन्डपर्यंत आणि कॅलेपासून यूशांट बेटापर्यंत पसरलेली आहे. हिची रुंदी २० ते १४० मैल आहे. पिलचर्ड व मॅकेरल जातीच्या माशांना पकडण्याच्या मच्छीमारीच्या धंद्यामुळें या खाडीला फार महत्त्व आलें आहे. सीन नदी हिला मिळते. ' आइल ऑफ वाइट ' व ' चॅनल द्वीपसमूह ' हीं प्रमुख बेटें असून-प्लायमाउथ, पोर्टस्माउथ, ब्रायटन, डोव्हर, हात्र, डीप, कॅले, वगैरे यावर बंदरें आहेत. महायुद्धांत या खाडीला फार महत्त्व असतें. याखालून बोगदा काढण्याची योजना कित्येक वर्षांपासूनची आहे.

**इचलकरंजी**—ही कोल्हापूर राज्यांतील एक मांडलिक जहागिरी आहे. या जहागिरीची राजधानी इचलकरंजी हें गांव असून या राजधानीच्या नांवावरूनच ' इचलकरंजी ' हें नांव हीस प्राप्त झालें आहे. हिचें क्षेत्रफळ २४० चौ. मैल., लोकसंख्या सुमारें ६०,००० व उत्पन्न सव्वातीन लाखांचें आहे.

इचलकरंजी संस्थानचा मूळ संस्थापक नारो महादेव हा होय. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत जीं कित्येक कोंकणस्थांचीं घराणीं आपलें नशीब काढण्यासाठीं घाटावर आलीं त्यांतच रत्नागिरी जिल्ह्यांतील वरवडेकर जोशांच्या घराण्याचा समावेश होतो.

संताजी घोरपडे यांनीं राजाराममहाराजांच्या कारकीर्दींत महाराष्ट्राचें स्वातंत्र्य राखण्यासाठीं जे असाधारण पराक्रम केले, ज्या अचाट मसलती केल्या त्यांत नारोपंतानें त्यास बहुमोल मदत केली. आपलें मूळचें जोशी हें आडनांव बदललें व आपल्या धन्याचें-संताजीचें-घोरपडे हें नांव धारण केलें. अद्यापहि नारोपंतांचे वंशज ' घोरपडे ' हेंच आडनांव अभिमानपूर्वक आपल्यापुढें लावतात.

नारोपंताचा मुलगा व्यंकटराव याला बाळाजी विश्वनाथ यानें आपली मुलगी अनूबाई (पहा) दिली, त्यामुळें खुद्द पेशव्यांच्या घराण्याशीं नारोपंताच्या घराण्याचा शरीरसंबंध जडला, व त्यामुळें नारोपंतानें स्थापलेल्या इचलकरंजी संस्थानला भाग्याचे दिवस प्राप्त झाले.

पोर्तुगीज लोकांशीं मराठ्यांच्या ज्या लढाया झाल्या त्यांत व्यंकटरावानें चांगलें नांव मिळविलें व पुष्कळ मुलूख काबीज केला. त्यामुळें शाहू खुष होऊन त्यानें व्यंकटरावाला स्वतंत्र सरदारी दिली. व्यंकटरावानें इचलकरंजीचा किल्ला आपल्या कारकीर्दींत बांधला व तें आपल्या राजधानीचें गांव ठरविलें.

व्यंकटरावानंतर त्याचे चिरंजीव नारायणराव याची कारकीर्द झाली. या कारकीर्दींत इचलकरंजी संस्थानची अतिशयच भरभराट झाली.

नारायणरावाच्या मागून त्याचा ज्येष्ठ पुत्र व्यंकटराव यानें संस्थानचा राज्यकारभार हांकण्याला सुरवात केली. हा शूर असून हरिपंत फडके याच्या गुजराथवरील स्वारींत व इतर अनेक स्वाऱ्यांत त्यानें प्रामुख्यानें भाग घेतला.

त्याच्या मृत्यूनंतर त्याची बायको रमाबाई हिनें, पेशव्यांच्या संमतीनें नारायणराव बाबासाहेब यास दत्तक घेतलें.

नारायणरावहि चांगला लढवय्या होता. त्यानें खर्ड्यांच्या लढाईंत पेशवे सरकारला चांगली मदत केली होती.

नारायणरावाच्या मागून त्याचा जेष्ठ पुत्र व्यंकटराव गादीवर बसला. त्याच्यामागून त्याचा धाकटा भाऊ केशवराव नांवाला आला. याच्या अमदानींत इचलकरंजी संस्थान हें करवीरच्या छत्रपतींच्या ताब्यांतलें आहे असें इंग्रज सरकारनें ठरविलें.

केशवरावानंतर व्यंकटराव, त्या मागून गोविंदराव असे दत्तक अल्पायुषी वारस गादीवर आले. त्यानंतर नारायणराव बाबासाहेब (पहा) यांस दत्तक घेण्यांत आलें. त्यांनीं आपल्या पुतण्यास दत्तक घेतलें. परंतु ते वारल्यामुळें व त्यांच्या पाठीमागें त्यांचा पुत्रहि निधन पावल्यामुळें बाबासाहेबांनीं पुन्हा दत्तक घेण्याचा प्रयत्न केला. परंतु ते १९४१ सालीं वारले. त्यानंतर दत्तक-प्रकरणाची विशेष न्यायासनापुढें चौकशी होऊन चित्रकूट घराण्यांतील एका मुलास बाबासाहेबांच्या पत्नीच्या मांडिवर कोल्हापूर संस्थानच्या परवानगीनें दत्तक देण्यांत आलें व त्यास गादीचा वारस ठरविण्यांत आलें.

शहर—इचलकरंजी संस्थानचें हें राजधानीचें शहर आहे. सदर्न-मराठा रेल्वेच्या मिरज-कोल्हापूर या फांट्यावर असलेल्या हातकणंगलें स्टेशनवर उतरून इचलकरंजीला जावें लागतें. गांवांत इंग्रजी शाळा, लायब्ररी, क्लब, इस्पितळ, नाटकगृह व बऱ्याच गिरण्या आहेत. येथील राजवाडा प्रेक्षणीय आहे. याच्या सभोंवार मातीचा रुंद तट आहे. कापडाच्या विशेष उत्पादनामुळें या गांवास हिंदुस्थानचें मँचेस्टर म्हणण्यांत येई, पण म. गांधींच्या वधानंतर दक्षिण महाराष्ट्रांत जी जाळपोळ झाली तींत या शहराचें फार नुकसान झालें.

**इचलकरंजीकर, नारायणराव बाबासाहेब घोरपडे** (१८७०–१९४३)—दक्षिण महाराष्ट्रांतील इचलकरंजी संस्थानचे एक अधिपति. हे चांगले सुविद्य असून यांनीं अनेक शिक्षण-संस्थांना, उद्योगधंद्यांना व वाङ्मयकार्यांना मदत केली व आपल्या संस्थानांत पुष्कळ सुधारणा केल्या. हे मुंबई कायदेमंडळांत व विद्यापीठांत बरींच वर्षें सभासद होते. यांनीं युरोपचा प्रवास करून त्याचें वर्णनहि लिहिलें आहे. त्यांचें चारित्र्य अत्यंत शुद्ध असून ते जुनी परंपरा चांगली असेल तेवढी टिकविण्याचा प्रयत्न करीत. बाबासाहेब शिस्तीचे मोठे भोक्ते होते. त्यांनीं घेतलेला दत्तक व त्याचा मुलगाहि त्यांच्या हयातींतच वारल्यामुळें त्यांच्यामागें जहागिरीचा वारसा कोणाकडे जावा याबद्दल बऱ्याच भानगडी होऊन त्यांत बाबासाहेबांना फार मनस्ताप झाला. त्यांतच १९४३ सालीं त्यांचें देहावसान झालें. यांनीं इचलकरंजी संस्थानची व गांवाची बरीच सुधारणा करून उद्योगधंद्यांस उत्तेजन दिलें.

**इचलकरंजीकर, बाळकृष्णबुवा** (१८४९–१९२७)—एक भारतीय कीर्तीचे गवयी. हे मूळचे कोल्हापूरजवळील चंदूर गांवचे जोशी. यांचे वडील रामचंद्रबुवा हेहि चांगले गवयी होते. बाळकृष्णबुवा अनेक प्रख्यात गवयांजवळ शिकण्यास होते. त्यांनीं मुंबईस एक गायनसमाजहि चालविला होता. त्यांत डॉ. भांडारकर, कुंटे, तेलंग वगैरे शिकण्यास जात. बाळकृष्णबुवा हिंदुस्थानभर हिंडले होते व त्यांनीं मोठा शिष्य-वर्ग तयार केला. त्यांचे चिरंजीवहि चांगले गवयी निघाले. पण ते लवकर वारल्यावर बाळकृष्णबुवांना बाबासाहेब इचलकरंजीकर यांनीं चांगला आश्रय दिला. गायनाचार्य विष्णु दिगंबर पलुसकर हे बाळकृष्णबुवांचे पट्टशिष्य होते. तसेंच पुढें आलेले व बुवांचें नांव सांगणारे अनेक शिष्य जागजागीं आहेत. बुवांच्या गाण्यांत शास्त्रशुद्धता असूनहि ते श्रोत्यांना तल्लीन करून सोडीत. यांना संगीताचे भीष्माचार्य म्हणत तें अगदीं यथार्थ होतें.

**इच्छाभेदी**—एक आयुर्वेदीय औषध. यांत सुंठ, मिरें, पारा, गंधक, टाकणखाराची लाही व जयपाळ हीं औषधें असून खल आल्याच्या रसांत करतात. हें औषध तीव्र रेचक म्हणून प्रसिद्ध आहे. शूल, जलोदर, पोट फुगणें, अग्निमांद्य अपचन इत्यादि रोगांवर याचा तीव्र रेचक म्हणून उपयोग होतो. अंगावर गांधी उठणें, खरूज किंवा खाज सुटणें, तांबडे किंवा काळे पुरळ उठणें, इत्यादि त्वचा-विकारांत इच्छाभेदीचा जुलाब देण्यानें रोगाची तीव्रता कमी होते. हें १ ते ३ गुंजा गरम पाणी किंवा साखर यांबरोबर घेतात.

**इच्छामती**— १. बंगालमध्यें असलेल्या पबना जिल्ह्यामध्यें ही नदी आहे. ह्या नदीस गंगेपासून पाणी मिळतें. ही पबनां शहरांतून वाहत जाते व हुरासागर नदीला मिळते. ही नदी ८ महिने कोरडी असते पण वर्षा ऋतूंत हिचा प्रवाह रुंद व प्रेक्षणीय असतो.

२. ह्याच नांवाची दुसरी नदी बंगालमध्यें नडिया जिल्ह्यामध्यें आहे. ह्या जिल्ह्यांत ही नदी माताभांग ह्या नदीची शाखा आहे. ही दक्षिण बाजूस वाहत जाऊन चोवीस परगण्यांत शिरते व तेथें तिला यमुना हें नांव मिळतें. ह्या नदीचें पाणी फार खोल असून सर्व वर्षभर तिच्यांतून मोठमोठ्या जहाजांना मोकळेपणें जातां येतें.

३. ह्याच नांवाची तिसरी नदी डाक्कामधून जाते व मुनशीगंजाजवळ मेघना नदीला जाऊन मिळते. ऐतिहासिक कालापासून ह्या नदीला महत्त्व आहे व तिच्या तीरांवर पांच पवित्र घाट आहेत. कार्तिकी पौर्णिमेला ह्या नदीवर स्नान करण्यास पुष्कळ लोक येतात.

**इच्छावर**—हें शहर भोपाळ संस्थानांत आहे. याच ठिकाणीं पूर्वीं लक्ष्मीपुर होतें. या ठिकाणीं मराठे लोकांनीं एक मोठा किल्ला बांधला होता. १८१८ सालीं हें शहर भोपाळ संस्थानांत सामील केलें गेलें. इच्छावर नांवाची पूर्वीं एक तहशील होती व त्या ठिकाणीं फ्रान्समधील चवथ्या हेन्रीचा चुलत भाऊ जॉन फिलिप राज्य करीत होता. हा प्रथम हिंदुस्थानांत आल्यावर अकबर बादशहाच्या नोकरीस राहिला व त्याच्या क्विती

बायकोच्या जुलिआनी नांवाच्या बहिणीशीं त्यानें लग्न लावलें व इच्छापूर तहशिलीचा नबाब झाला. याच्या वंशजांवर पुढें अनेक वाईट प्रसंग आले. नादीरशहाच्या स्वारीमुळें त्याच्या वंशजांना हें शहर सोडावें लागले व शेरगडला जावें लागलें. तेथेंहि नरवरच्या राजानें फार त्रास दिल्यामुळें शेवटीं ग्वाल्हेरला त्या मंडळीला जावें लागलें. पण मेजर पोफॅमनें जेव्हां ग्वाल्हेर घेतलें तेव्हां इंग्रज सरकारनें थोडा मुलूख या घराण्यास दिला. या घराण्याचे वंशज अजून हयात आहेत.

**इच्छाशक्ति**— तत्त्वज्ञान आणि मानसशास्त्र या दोन्हींमध्यें हा शब्द येतो. मनुष्याच्या मनांतील इच्छा ही एक मानसिक शक्ति असून ही शक्ति मनुष्याच्या कर्मेंद्रियांना कार्यप्रवृत्त करते, मनुष्याच्या विचारांना मार्गदर्शन करते, आणि मनुष्याच्या भावनांची तीव्रता कमीजास्ती करूं शकते. मनुष्यांतील ती सर्वांत बलिष्ठ अशी नियंत्रणशक्ति आहे. सहजप्रवृत्ति (इन्स्टिंक्ट) आणि प्रेरणा (इंपल्स) यांहून इच्छा (विल्) ही अगदीं निराळी शक्ति आहे. मानवाला आपलें उद्दिष्ट साध्य करण्याकरितां लागणारीं साधनें सुचवणें व त्या साधनांची निवड करणें, हें काम इच्छाशक्ति करते. मनुष्याचें व्यक्तिमत्त्व आणि मनुष्याचा आत्मा (एगो) या दोहोंचें स्वरूप या इच्छाशक्तीप्रमाणें बनतें.

**इच्छास्वातंत्र्य**—अगदीं प्राचीन कालापासून मनुष्याला आपलें वर्तन वाटेल तसें करण्याचें सामर्थ्य आहे, असें वाटत असे. या सामर्थ्याची जाणीव मनुष्याला मोघमपणें होती, परंतु उत्तरोत्तर या प्रश्नाचा अधिकाधिक विचार मनुष्य करूं लागला. प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्यांना या प्रश्नाची जाणीव स्पष्टपणें झाली होती, असें दिसत नाहीं. ईलियाटिक तत्त्ववेत्ते, सॉक्रेटीस, प्लेटो व आरिस्टॉटल यांनीं या प्रश्नाची चिकित्सा आधुनिक तत्त्ववेत्त्यांप्रमाणें केलेली नाहीं. स्टोईक पंथीय तत्त्ववेत्ते हे नियतिवादी (डिटरमिनिस्ट) होते. म्हणजे इच्छास्वातंत्र्यवादाचे विरोधक होते. उलटपक्षीं एपिक्युरस या तत्त्ववेत्त्यानें इच्छास्वातंत्र्यवादाचा पुरस्कार केला. तथापि ख्रिस्तीधर्मसंस्थापना झाल्यापासून या इच्छास्वातंत्र्यवादाच्या प्रश्नाला एक नवेंच स्वरूप आलें. स्कूलमेन नांवाचे तत्त्ववेत्ते यांनीं 'स्वयंस्वातंत्र्य' (लायबेरम आरबिट्रम) हा शब्दप्रयोग रूढ केला, व त्याची व्यापकता व मर्यादा यांबद्दल विवेचन केलें. ग्रीक व रोमन तत्त्ववेत्ते, ख्रिस्ती धर्मगुरु (फादर्स), स्कूलमेन, आणि ख्रिस्ती धर्मसुधारणावादी पंडित या सर्वांनीं इच्छास्वातंत्र्यवादाचा विचार बुद्धिवादानुसार केलेला आहे; तथापि आधुनिक तत्त्ववेत्त्यांनीं आणि मानसशास्त्रज्ञांनीं प्रायोगिक मानसशास्त्रानुसार या प्रश्नाची चिकित्सा केली आहे. एक पक्ष असा कीं, मनुष्याची नीतिमत्ता चांगली किंवा वाईट आहे, असें म्हणावयाचें तर त्या मनुष्याला आपलें वर्तन स्वेच्छेनुसार करण्याचें स्वातंत्र्य असलें पाहिजे, आणि तें स्वातंत्र्य असलें तरच त्याला त्याच्या वर्तनाबद्दल जबाबदार धरतां येईल; नाहीं तर कर्तव्य, जबाबदारी, बंधन, पश्चात्ताप, हे पोकळ अर्थहीन शब्द ठरतील. जर मनुष्याचें वर्तन कोठल्याहि बाह्य सामर्थ्यानें नियंत्रित असेल आणि तें सामर्थ्य त्याच्या इच्छेवर मुळींच अवलंबून नसेल, तर मनुष्याच्या वर्तनाबद्दल त्याला जबाबदार धरतां येणार नाहीं.

दुसरा पक्ष असा कीं, मनुष्याचें मानसिक जीवन मानसिक घटनांचें बनलेलें असतें, असें मानसशास्त्रज्ञ म्हणतात. प्रत्येक मानसिक अवस्था दुसऱ्या एका घटनेशीं संबद्ध असते, याचा अर्थ असा कीं, माणसाच्या मानसिक प्रवृत्ती या बाह्य जगांतील घडामोडींप्रमाणें, कार्यकारणभावानुसार उलगडतां येतात. मनुष्य कांहीं तरी हेतु मनांत धरून कार्यप्रवृत्त होतो; परंतु हे हेतुहि कांहीं बाह्य कारणें आणि त्या मनुष्याचा स्वभाव यांच्यामुळें उत्पन्न होतात, आणि मनुष्याचा स्वभाव त्याच्याच पूर्ववर्तनानुसार किंवा त्याच्या पूर्वजांच्या वर्तनानुसार बनलेला असतो. याप्रमाणें हा इच्छास्वातंत्र्याचा अवघड प्रश्न अद्याप अनिर्णीत आहे.

**इंझवार**—भंडारा व बालाघाट जिल्ह्यांतील एक जात. वैनगंगेच्या खोऱ्यांत शेतकी कामावर व मासे मारून उपजीविका करणारी ही जात आहे. यांची संख्या सुमारें ११,००० आहे.

विंझवार याचें नामांतर इंझवार असें होऊन ही निराळी जात बनली. यांनीं आतां मराठी चालीरीती उचलल्या आहेत; तथापि हे इंझा म्हणजे विंध्यवासिनी देवी हिची पूजा करतात. हे गोवाऱ्यांस आपले दूधभाई म्हणतात; कारण एक इंझवारीण एकदां एका गोवाऱ्यास दूध पाजणारी दाई होती; पण या कथेचा अर्थ बहुतेक यांच्यांत गोवारी रक्ताचें मिश्रण आलें असावें असाच करतां येईल. इंझवार लोक गोवाऱ्यांस श्रेष्ठ समजतात. त्यांच्या हातचें जेवतात व पाणी पितात, पण गोवारी मात्र यांच्याकडे जेवीत नाहींत. यांची जात गोंड, गोवारी, वगैरे लोकांच्या मिश्रणानें तयार झाली आहे.

**इझावा**— त्रावणकोर संस्थानांतील एक जात. संस्थानच्या दुसऱ्या कांहीं भागांत यांना चोवा असें म्हणतात. तामिळी बोलणारे शानार व मलबारांतील तिया यांच्याशीं या जातीचा संबंध असावा असें मानतात. ही जात सिंहलद्वीपांतून इकडे आली असावी. मध्ययुगांत त्रावणकोरचे राजे नायरप्रमाणें इझावांनाहि लष्करी कामें सांगत. श्रीमंत व मध्यम स्थितींतील इझावा पुरुष नटिनेटके व सुस्वरूप असून जवळजवळ नायरासारखेच दिसतात. बायका मात्र वेगळ्या दिसतात. इतर मलबारी

तील मूळ रहिवाशांप्रमाणें इझावत वारसा मरुमक्कथायमप्रमाणें स्त्रीवंशाकडे जातो. नारळाचीं व ताडीचीं झाडें लावणें व दारू गाळणें हा यांचा मुख्य धंदा आहे. बायका पुरुषांच्या बरोबरीनें कामें करितात. मास्तरकी, वैद्यकी व जोसकी पेशाचेहि इझावा आहेत. संस्कृत भाषेचें अध्ययन करणारेहि बरेच आहेत. पुष्कळ ठिकाणीं यांचीं स्वतःचीं देवळें असून तेथील उपाध्यायहि इझावाच असतात. यांची उपास्यदेवता बहुधा भद्रकाली असते.

**इझिकेल**—ज्यू धर्मांतल्या चार श्रेष्ठ भविष्यवाद्यांपैकीं हा एक होय. खि. पू. ५९९ च्या सुमारास याला कैद करून ठेवला होता. बायबल या धर्मग्रंथांतील बुक ऑफ इझिकेल या भागांत जेरुसलेम शहराचा खि. पू. ५८६ मध्यें पाडाव होण्यापूर्वींच्या भविष्यात्मक गोष्टी लिहिलेल्या आहेत; तसेंच आसपासच्या कांहीं टोळ्यांसंबंधींचीं भविष्यें आणि इस्रायल लोकांविषयीं भविष्यें या भागांत वर्तविलीं आहेत; तसेंच कित्येक ईश्वरी साक्षात्कारहि वर्णिले आहेत.

**इंटरनॅशनल्स**—( आंतरराष्ट्रीय संघ ). निरनिराळ्या देशांतील समाजवादी (सोशॅलिस्ट) पक्षांनीं सर्वांच्या धोरणांत एकसूत्रता राहावी म्हणून जे आंतरराष्ट्रीय संघ स्थापन केले, त्यांना हें नांव देण्यांत आलें. पहिला आंतरराष्ट्रीय संघ मार्क्सनें १८६४ सालीं स्थापन केला. दुसरा आंतरराष्ट्रीय संघ (सेकंड इंटरनॅशनल) १८८९ सालीं स्थापन झाला. तिसरा ऊर्फ कम्युनिस्ट इंटरनॅशनल हा संघ दुसऱ्या संघांतून १९२१ सालीं फुटून निघालेल्या कम्युनिस्टांनीं स्थापन केला आणि सेकंड इंटरनॅशनल हा संघ मवाळ सोशॅलिस्ट पक्षाची संस्था म्हणून राहिला. चौथा आंतरराष्ट्रीय संघ ( फोर्थ इंटरनॅशनल ) ट्रॉट्स्कीनें १९३६ सालीं निर्माण केला.

**इंटरलेकन**—स्वित्झर्लंड, सृष्टिसौंदर्याबद्दल व हवा खाण्यासाठीं प्रसिद्ध असलेलें ठिकाण. बर्नच्या आग्नेयीस २६ मैलांवर आहे. या ठिकाणीं दरसाल वीस ते पन्नास हजारांपर्यंत प्रवासी येतात. लो. सं. सुमारें ४,०००.

**इटली**—युरोप खंडाच्या दक्षिण बाजूकडील भूमध्य समुद्रांतलें हें एक द्वीपकल्प असून त्याच्या सभोंवतालचीं सिसिली, सारडिनिया, एल्बा, वगैरे बेटें मिळून हा एक देश समजला जातो. इटलीच्या उत्तर व वायव्य बाजूला आल्प्स पर्वत असून ईशान्येला युगोस्लाव्हिया आहे. याशिवाय बाकीच्या सीमा म्हणजे भूमध्य समुद्र आणि ॲड्रिॲटिक समुद्र होय. या देशाचें क्षेत्रफळ १९१८ नंतर म्हणजे पहिल्या महायुद्धानंतर १,१९,७६४ चौरस मैल होतें. लो. सं. ४,१९६,८१,०००. या देशाची राजधानी रोम हें इतिहासप्रसिद्ध शहर होय. त्याशिवाय मिलान, नेपल्स, टुरिन, पालेर्मो, जिनोआ व फ्लॉरेन्स, हीं दुसरीं महत्त्वाचीं शहरें आहेत. स्वाभाविक विभाग म्हणजे उत्तरेकडील आल्प्स पर्वत व द्वीपकल्पाच्या मध्यभागापर्यंत येणारी आपेनाइन्सची रांग. दक्षिण इटलींत व्हेसुव्हियस व सिसिली बेटांत एटना हे ज्वालामुखी पर्वत आहेत. आल्प्स व आपेनाइन्स यांच्यामध्यें लांबॉर्डीचें सुपीक व प्रचंड मैदान पो नदीच्या गाळानें भरलेलें असून या मैदानाची गणना जगांतील एक सुपीक मैदान म्हणून केली जाते. याच मैदानांतून पो व तिच्या उपनद्या वाहतात. इटलीचा पूर्व किनारा दंतुर नसून सपाट आहे. तसेंच या किनाऱ्यावर सर्वत्र दलदल आहे. परंतु पश्चिम बाजूच्या किनाऱ्यावर दलदलीचा प्रदेश जवळजवळ नाहींच. उत्तर भागांत नांव घेण्यासारखी मोठी व प्रसिद्ध अशी पो नदी असून दक्षिण भागांत आर्नो, टायबर, लुगानो, कोमो, व गार्डा या छोट्या नद्या आहेत. उत्तर इटलींत हवामान हिंवाळ्यांत सौम्य व आल्हादकारक असून जिनोआच्या आखातावरील रेव्हिएरा किनारा आणि व्हेनिसजवळचा लिडो किनारा हीं श्रीमंत लोकांचीं हवा खाण्यासाठीं राहण्याचीं ठिकाणें आहेत.

शेती हा या देशांतील मुख्य उद्योगधंदा असून एकूण ७,६६,२५,२१८ एकर असलेल्या जमिनीपैकीं ७,०५,४८,१३१ एकर जमीन लागवडीखालीं असून त्यांतून मुख्यत्वें तांदूळ, गहूं, मका यांची लागवड लांबॉर्डीच्या मैदानावर करतात. कमी निकस जमिनींतून अंबाडी, ताग व तंबाखू हीं पिकें काढतात. भूमध्य सामुद्रिक हवामानाच्या प्रदेशांत फळफळावळीच्या बागा असून त्यांतून मुख्यत्वें बदाम, अक्रोड, लिंबें, मोसंबीं, संत्रीं, अंजीर, द्राक्षें यांची लागवड प्रामुख्यानें होते; व अगदीं दक्षिणेकडे कापूस व उंस यांची लागवड करतात. तुतीचीं झाडें व द्राक्षवेली विपुल असल्यानें रेशमी किडे ( व त्यांपासून रेशीम ) आणि दारू तयार करण्याचे कारखाने व भट्ट्या या देशांत जोरांत चालतात. त्याचप्रमाणें गवताळ भागांत पशुपालनाचा धंदा जोरांत असून इटलींतील खवा युरोपांत प्रसिद्ध आहे.

इटलींतील खनिज संपत्ति म्हणजे लोखंड, गंधक, दगडी कोळसा व सोनें हीं असून तीं मुख्यत्वें सिसिली, टस्कनी, सार्डिनिया व लांबॉर्डी यांच्या आसमंतांतील भागांत सांपडते. प्रमुख उद्योगधंदे म्हणजे शेती, कातडीं कमावणें, उंसाची साखर तयार करणें, दारूच्या भट्ट्या लावणें, चांदीचीं भांडीं, वगैरे धातुकाम करणें, कागद व तागाच्या वस्तू बनविणें, वादनाचीं हत्यारें बनविणें, वगैरे होत. उत्तर भागांत आल्प्स पर्वतांतील धबधब्यांमुळें वीज उत्पन्न करण्याची चांगली सोय असल्यानें हा भाग मुख्यतः औद्योगिक कारखान्यांचा आहे. निर्यात मालांत मुख्यतः रेशीम, कापूस, फळें, ताग, अंबाडी, गंधक व संगमरवरी दगड यांचा भरणा असून आयात माल ब्रिटन, फ्रान्स, जर्मनी व सं. संस्थानें

या देशातून येतो. त्यांत मुख्यतः पक्क्या मालाचा भरणा जास्त असतो. लिरा हें इटालियन नाणें येथें चालतें. ट्रिएस्टे, जिनोवा, लेगहॉर्न, मेसीना, नेपल्स, पालेर्मो, व्हेनिस, ब्रिंडिसी, आणि कॅटानिया हीं इटालीचीं प्रसिद्ध बंदरें आहेत.

इटलीचा जुना इतिहास म्हणजे रोमन साम्राज्याचा वैभवशाली इतिहास होय. रोमन लोकांचें साम्राज्य एके काळीं जगांत वैभवशाली म्हणून प्रसिद्ध होतें. रोमन कायदा तर जगांत सर्वत्र प्रसिद्ध आहे. त्या काळांतील इटलीची प्रगति वाङ्मय, कला, शास्त्र, वगैरे सर्वच बाजूंनीं झालेली असून त्याच साम्राज्याचीं स्वप्नें अद्यापहि तेथील लोकांना पडत आहेत; परंतु इटलीच्या त्या आकांक्षा काल अद्याप पुऱ्या करूं शकत नाहीं. एके काळीं हा देश सर्व युरोपच्या गुरुस्थानीं असून तेथील कलांची छाप अद्यापहि युरोप खंडावर आहे.

इटलीमध्यें पूर्वी एकराष्ट्रीयत्व नव्हतें. रोमन साम्राज्याचा पाडाव झाल्यावर सर्व देशभर भोंवतालच्या लोकांनीं आक्रमण केलें. इ. स. ८०० मध्यें शार्लमेनच्या साम्राज्यांत इटली गेला होता. १८०६ मध्यें होली रोमन एम्पायरचा लय झाला. मधल्या कालांत वरील साम्राज्य नांवाचेंच होतें. जागजागीं लहानमोठीं संस्थानें निर्माण झालीं होतीं. त्यांपैकीं कांहीं लोकसत्ताक होतीं. पण बहुतेक स्वयंप्रतिष्ठित सरदार, वगैरेंनीं आपापल्या क्षेत्रांत सत्ता बळकावली होती. अशा सामान्य व कमी प्रतीच्या सत्ताधाऱ्यांत सॅव्हायचा काउंट हा एक होता. त्याला १४१६ त डयूक करण्यांत आलें. १४१८ त त्यानें पीडमॉंट संस्थान घेतलें. १७१३ मध्यें याच वंशांतील सत्ताधारी इसमानें सिसिली घेतली. १७२० मध्यें सिसिलीचे मोबदल्यांत त्यानें सार्डिनिआ घेतलें व त्याच वेळीं यानें स्वतःस राजा म्हणवून घेतलें (१८१५). त्या वेळच्या राजानें इटलींतील बाकीचा प्रदेश कबजांत घेतला. १८४८–४९ सालांत मॅझिनी आणि गॅरीबाल्डी यांनीं ऑस्ट्रियाच्या ताब्यांतून नेपल्स, लांबर्डी, इ. शहरें सोडवलीं; तथापि १८८० पर्यंत इटली कोणा एकाच्या आधिपत्याखालीं नव्हता. त्या सालीं व्हिक्टर इमॅन्युएल पहिला सम्राट् झाला. पहिल्या महायुद्धांत इटली जर्मनीच्या विरुद्ध दोस्त राष्ट्रांच्या बाजूला होता. युद्धानंतर देशांत यादवी सुरू होऊन मुसोलिनीनें फॅसिस्ट पक्ष स्थापून सर्वाधिकार आपणाकडे घेतला (१९२२). दुसऱ्या महायुद्धांत इटली जर्मनीच्या बाजूस झाला, पण तीन वर्षांत त्याला दोस्तांना शरण जावें लागलें. एरिट्रिया, सोमालीलँड लिबिया, एजियन बेटें, वगैरे इटलीच्या १९४३ पूर्वी वसाहती होत्या. आतां नवीन तहानंतर किती राहतात हें पहावयाचें आहे.

वाङ्मय:—इटालियन वाङ्मयाचा सर्वांत उत्कर्षाचा काळ म्हटला म्हणजे ख्रिस्ती शकाचें चवदावें शतक होय. याच कालांत अर्वाचीन इटालियन भाषा विशेष प्रचारांत आली. अद्यापिहि पंडिती भाषा म्हणून लॅटिन भाषा प्रचारांत होतीच. परंतु या कालांत तीन प्रसिद्ध लेखकांनीं लोकभाषेचा आश्रय करून आपली ग्रंथरचना केली व त्यांनीं जें उत्कृष्ट गद्य व काव्य निर्माण केलें त्यामुळें तत्कालीन युरोपमध्यें इटालियन वाङ्मयास एकदम अग्रेसरत्व प्राप्त झालें. हे तीन ग्रंथकार म्हणजे डांटे, पेट्रार्क व बोकॅशिओ हे होत. यानंतर सोळाव्या शतकांत ॲरिओस्टो व टॅसो हे ग्रंथकार होऊन गेले. सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत इतर राष्ट्रें पुढें आल्यामुळें इटलीचें युरोपवरील वर्चस्व कमी झालें व त्या देशाचें महत्त्वहि कमी कमी होत गेलें. त्यानंतर आपणांस फेरेरो या इतिहासकाराचें व टी. अनन्झिओ या कवीचें नांव विशेषतः आढळून येतें. परंतु इटालियन वाङ्मयाबद्दल एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, या वाङ्मयानेंच सॉनेट हा गीतप्रकार प्रथम रूढ केला व नंतर त्याचा प्रसार इतर यूरोपीय वाङ्मयांत झाला. तसेंच चॉसर, स्पेन्सर किंवा शेक्सपियर या इंग्रज ग्रंथकारांनीं आपल्या कृतींतील बहुतेक कथावस्तू इटालियन वाङ्मयांतून घेतलेल्या आहेत. एवढेंच नव्हे तर त्या वाङ्मयांतील कल्पना, वृत्तरचना, कथानकें व नाट्यवस्तू यांचें पुष्कळच मोठें ऋण इतर देशांतील वाङ्मयांनीं व विशेषतः इंग्रज ग्रंथकारांनीं घेतलेलें आहे.

**इटा**—हिंदुस्थान, संयुक्त प्रांत, आग्रा विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १७१९ चौ. मै. व लोकसंख्या ९,८४,७६०. जिल्हा चांगला सुपीक असून त्यांत गहूं, बाजरी, कापूस, ऊंस, अफू, इ. पिकें निघतात. विणकाम, साखर शुद्ध करणें, कांच, यांचे उद्योगधंदे आहेत. कासगंज व जलेसर हीं व्यापारी गांवें व सोरोन हें यात्रेचें ठिकाण प्रसिद्ध आहे. या जिल्ह्यांत बौद्धकालीन अवशेष पुष्कळ सांपडतात. इंग्रज अमदानी होण्यापूर्वी हा जिल्हा निरनिराळ्या मुसलमानी अमलाखालीं होता. १८५७ च्या क्रांतियुद्धांत हा बंडखोरांच्या ताब्यांत गेला होता. इटा हें मुख्य शहर कासगांव स्टेशनपासून १९ मैलांवर आहे. लो. सं. सुमारें दहा हजार. पृथ्वीराजाच्या संग्रामसिंह नांवाच्या वंशजानें १४ व्या शतकांत हा गांव स्थापिला असें सांगतात. येथें कापसाच्या गिरण्या आहेत.

**इटारसी**—मध्यप्रांत, हुशंगाबाद जिल्हा, हुशंगाबाद तहशिलींत हें शहर असून मुंबईपासून ४६४ मैल आहे. हें जबलपुरास जाणाऱ्या व कानपूर व आग्र्याकडे जाणाऱ्या फांट्यांचें जंक्शन आहे. बैतुल जिल्हा व हुशंगाबाद जिल्हा या ठिकाणच्या मालाचें हें आगर म्हणतां येईल. या ठिकाणीं गुरांचा मोठा बाजार दर आठवड्यास भरतो.

**इटावा**—संयुक्त प्रांत, अलाहाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १,६६९ चौ. मै.. लो. सं. ८,८३,२६४ ( १९४१ ).

पेशवाईच्या काळीं हा एक परगणा असे, व परगण्यांत पेशव्यांचा एक कमाविसदार असे. या परगण्यांतील बादशाही कारकीर्दीतील नेमणुका पुढें चालू ठेवण्याबद्दल राघोबादादाच्या पत्रांत ( रा. खं. १ पत्र १२३ ) उल्लेख आहे. इ. स. १७५९-६० मधील गोविंद बल्लाळच्या पांचसहा पत्रांत लष्करी हालचालीसंबंधीं इटाव्याचा उल्लेख आहे.

इटावा हें जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. ५३,११४ ( १९४१ ). पैकीं निम्याहून अधिक लोक हिंदू आहेत. मुसलमानकालाच्या अगोदरपासून हा गांव अस्तित्वांत आहे. पण याचा पूर्वेतिहास उपलब्ध नाहीं. फिरोजशहाच्या मृत्यूनंतर धामधुमीच्या काळांत हा गांव बरेच वेळां लुटला गेला. याच वेळीं हिंदू संस्थानिकांनीं बंडावा केला. अकबराच्या एका परगण्याचें हें मुख्य ठिकाण होतें व येथें एक किल्ला होता असें आयनी– अकबरींत लिहिलेलें आहे. पुढें एक शतकपर्यंत हा मोठा सट्ट्याचा व व्यापाराचा गांव म्हणून प्रसिद्धीस आला. पण १८ व्या शतकांत रोहिल्यांच्या स्वाऱ्यांपासून व तदनंतर मराठ्यांच्या स्वाऱ्यांपासून या गांवास फार त्रास पोहोंचला. येथें जुमामशीद ही फार सुंदर व भव्य इमारत आहे. तसेंच येथें कांहीं हिंदु देवालयें, स्नानाकरितां घाट, किल्ल्याचा अवशेष आहे. येथें उत्तमपैकीं मिठाई होते. निर्गत माल : तूप, चणे, कापूस, गळितांचीं धान्यें. येथें सात-आठ कापसाच्या गिरण्या आहेत.

**इटीदांडू**—महाराष्ट्रांत हा खेळ लहान मुलांना फार प्रिय व खेळण्यास सोपा आहे. गलीवर विटी ठेवून दांडूनें ती कोलतात. समोरच्या मुलानें झेलली तर डाव गेला, झेलली नाहीं तर ती विटी गलीजवळ जाईल किंवा दांडूस लागेल अशा रीतीनें विरुद्ध गडी फेंकतो. विटी दांडूस लागली नाहीं किंवा एक दांडूच्या अंतरापुढें विटी पडल्यास राज्य घेणारा भाजी मारतो म्हणजे दांडूवर विटी ठेवून ती उडवून तिच्यावर दांडू मारतो. टोला लागला नाहीं किंवा मारलेली विटी झेलली गेली तर डाव गेला. असा डाव गेला नाहीं तर प्रतिपक्षी ती विटी दांडू मारणाऱ्याकडे गलीजवळ पडेल अशा बेतानें टाकण्याचा प्रयत्न करतात. विटी जेथें पडली असेल तेथपासून गलीपर्यंत दांडू मोजतात. वकट, लेंड, मुंड, नाल, आर, वैद, झक्कू असे अंक मोजून या साताला एक झक्कू धरतात. झक्कू जेव्हां पुरा होत नाहीं तेव्हां ज्या संज्ञेपर्यंत दांडू भरले असतील त्या जागेपासून त्या संज्ञेप्रमाणें ( वकट = पायांच्या बोटांवरून. लेंड = डाव्या हातांत विटी धरून. मुंड = मुठीवरून. नाल = करंगळी व तर्जनी यांवर विटी ठेवून. आर = डोळ्यावरून. वैद = पालथ्या हातावरून किंवा कोंपरावरून ) दांडूनें विटी मारावयाची. कोणाचे जास्त झक्कू होतात यावर डावाचा निर्णय होतो. हा मराठी विटीदांडू ( किंवा झक्कूपाणी ) चा खेळ झाला.

याचा दुसरा प्रकार असून त्याला इंग्रजी किंवा लाल विटीदांडू म्हणतात. यांत विटीच्या निमुळत्या टोंकावर दांडू मारून ती वर उडवितात व टोला मारतात. विटी जेथें पडेल तेथपासून गलीपर्यंत दांडू मोजतात. तेवढे झक्कू धरतात व याचा एक तिसरा ' आवक दुवक ' प्रकार आहे.

या खेळाची सुधारणा होऊन बरेच नियम झालेले आहेत.

**इटैयापुरम् इस्टेट**—मद्रास, तिन्नेवेल्ली जिल्ह्यांतील एक जमीनदारी. क्षेत्रफळ ५७० चौ. मै.. खेडीं ३७४. येथील लोक तेलगू आहेत. जमीनदाराचे पूर्वज उत्तर अर्काट जिल्ह्यांतील चंद्रगिरी घराण्यांतील होत. अल्लाउद्दिन खिलजीच्या स्वारीमुळें झालेल्या गडबडींत कुमार मुत्तुनाईक मदुऱ्यास गेला. तेथें पांड्य राजानें त्याचा सत्कार करून बरीच जमीन त्यास दिली. इस्टेटीचें मुख्य ठिकाण म्हणजे इटैयापुरम् हा गांव १५६७ मध्यें स्थापिला गेला. ३१ वा जमीनदार मुत्तुजगवीर रामनाईक ह्यानें पाळेगार युद्धांत ( १७९९-१८०१ ) ब्रिटिशांस चांगलीच मदत केली. तेव्हां त्यास पाळेगारांच्या हस्तगत झालेल्या जमिनींपैकीं सहा हिश्शांतले चार हिस्से देण्यांत आले. जमीन काळी कापसाची आहे. पाऊसपाणी ३३ इंच. ताडाच्या झाडांपासून साखर तयार करितात. कापूस बराच पिकतो. उत्पन्न ३। लाख व कायमची जमीनदारी पद्धति आहे.

साउथ इंडियन रेल्वेच्या कोईलपट्टी स्टेशनपासून हें शहर दहा मैलांवर आहे.

**इटो, हिरोबुमी, प्रिन्स** ( १८३८-१९०९ )—एक जपानी मुत्सद्दी. १८६३ साली तो इंग्लंडांत राहून इंग्रजी चालीरीती शिकला व आपल्या देशांत जाऊन तो देशाची उन्नति करण्याच्या कामीं फार झटला. विविध अधिकारांच्या जागांवरून तो १८८६ सालीं प्रधानपदावर चढला. १९०१ पर्यंत तो चारदां प्रधान होता. त्याचा खारबिन येथें खून झाला.

**इडा ( इला )**—ऋग्वेदामध्यें 'इडा' चा अन्न, श्रमपरिहारक द्रव्य किंवा दुग्धनिषेध असा मूळचा अर्थ असून नंतर स्तवन स्तोत्र असा अर्थ झाला, तिलाच वाग्देवी असें म्हटलें आहे. मनूची अध्यापिका व यज्ञविधीचे नियम आंखून देणारी, असा तिचा कांहीं ठिकाणीं उल्लेख आहे. ही पृथ्वीची अधिष्ठात्री देवता आहे, असें सायण म्हणतो. पुराणांत ती वैवस्वत मनूची मुलगी, बुधाची बायको व पुरुरव्याची आई असल्याचें लिहिलें आहे. वैवस्वत मनूनें पुत्र होण्यापूर्वीं मित्रावरुण

देवतांना उद्देशून पुत्र व्हावा ह्या इच्छेनें एक इष्टि केली. पण चुकून भलताच हवि पडल्यानें त्या इष्टींतून इला नांवाची स्त्री उत्पन्न झाली व मित्रावरुणांच्या कृपेनें तिला पुरुषत्व प्राप्त झालें.

**इडाहो**—अमेरिका. रॉकी पर्वताच्या पश्चिम उतारावर हें संयुक्त संस्थानांतील एक संस्थान असून त्याचें क्षेत्रफळ ८३,५५७ चौरस मैल आहे. लो. सं. ५,२४,८७३. येथील बहुतेक सर्व प्रदेश डोंगराळ असून त्यांतून स्नेक ही नदी व तिला मिळणारी सालोमन या मोठ्या नद्या वाहतात. हा सर्वच भाग जंगलांनीं समृद्ध असून त्यांतून मौल्यवान् इमारती लांकडाचा पुरवठा सं. संस्थानांना होतो. खनिज संपत्ति या प्रांतांत विपुल असून त्यांत मुख्यत्वें सोनें, रुपें, तांबें, कोळसा, लोखंड व मीठ यांच्या खाणी आहेत. डोंगराच्या मधील दऱ्यांतून शेती करतात व मुख्य पिकें गहूं, ओट, बार्ली हीं होत. जरी या प्रांतांत शेती केली जाते तरी त्यापेक्षां नैसर्गिक वनस्पतिजीवन या नात्यानें गवत पुष्कळ उगवतें व त्यावर जनावरें चरतात. जेथें निर्जल प्रदेश आहे, त्या ठिकाणीं कालवे बांधून पाण्याची सोय करून लागवडीखालीं तो प्रदेश आणला जात आहे. या संस्थानांत सुमारें ३ हजार मैल लांबीचा लोहमार्ग असून राजधानी बाईस ही होय.

सर्व जगांत अत्यंत मोठी अशी लांकूडकटाईची गिरणी येथें आहे व तींत दररोज ७,५०,००० फुटांची कटाई होते. १८०५–६ मध्यें या भागाचा शोध लुईस व क्लार्क यांनीं लावला. ग्रेट ब्रिटन, स्पेन व रशिया यांचेमध्यें यांच्या स्वामित्वाबद्दल वाद होता, परंतु १८४६ चे सुमारास त्यांनीं सर्वांनीं आपापले हक्कवाद सोडले. १८९० मध्यें हें अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांत सामील झालें.

**इंडियन (अमेरिकन) समाज**—(सामान्य माहिती ‘अमेरिकन इंडियन’ या लेखांत दिलीच आहे. येथें इतर सामाजिक-राजकीय माहिती घेतली आहे). अमेरिकेंत आढळणारा तांबूस वर्णी आद्यमानव लोकांचा हा समाज आहे. अमेरिकेंत युरोपियन लोक येण्यापूर्वीच अनेक शतकें हे लोक वस्ती करून होते. मेक्सिकोंतील अझ्टेक व पेरू देशांतील इंका या जातीवरून त्यांच्यांत जुन्या काळीं विशिष्ट संस्कृति असल्याचें आढळतें. हा मानववंश मोंगोलियन वंशासारखा दिसतो. यांच्यांत अनेक जाती दिसतात व त्या संस्कृतीच्या वेगवेगळ्या थरांतील आहेत. हे आपलीं शरीरें रंगवून व गोंदवून घेतात. यांच्यांत अनेक बोली आढळतात, पण त्यांचा पद्धतशीर अभ्यास भाषाशास्त्रज्ञांनीं अद्यापि केलेला नाहीं. आज यांची संस्कृति नाश पावत आहे व युरोपियनांच्या सहवासामुळें यांचें सर्व दृष्टींनीं रूपांतर होत आहे. हा प्राचीन वन्य समाज अजीबात नष्ट होण्याची साधार जी भीति होती ती युरोपियन शासनसंस्थांच्या पद्धतशीर संगोपनामुळें कमी झाली आहे यांत शंका नाहीं.

इंडियन स्वावलंबी नागरिक बनण्याकरितां आरोग्य, शिक्षण व उद्योग यांची सोय त्यांना करून देणें आवश्यक आहे असें संयुक्त सरकार धरून चालतें. तेव्हां या दिशेनें सरकारनें धोरण आंखून त्याच्या सिद्ध्यर्थ “ब्यूरो ऑफ इंडियन अफेअर्स” स्थापण्यांत आला. इंडियनांच्या स्वभावाला धरून वाङ्मयीन व औद्योगिक शाळा स्थापण्यांत आल्या असून, प्रथम घरकामाला व लहान मुलांना योग्य शिक्षण देण्याला लायक अशा बायका तयार करण्याची खटपट जोरानें चालू आहे.

या अमेरिकन सरकारनें आंखलेल्या धोरणामुळें संयुक्त संस्थानें आणि कॅनडा यांमधील इंडियन लोकांची १९१०–१९२० या दशकांत मोठीच प्रगति झाली. एकंदर संख्येपैकीं दोन-तृतीयांश लोक अमेरिकन नागरिकांचा पेहराव करीत असतात. शिक्षणसंस्थांतून शिकून तयार झालेले तरुण जुन्या चालीरीती बदलण्यास व औद्योगिक आणि सामाजिक चळवळींत पडण्यास पुढें सरसावत आहेत. जातिरुढींप्रमाणें पूर्वी होणारे विवाह जाऊन ते आतां अर्वाचीन दृष्टीनें कायदेशीर विधीप्रमाणें होत आहेत, व गुन्हेगारी कमी प्रमाणांत आहे. संयुक्त संस्थानांतील इंडियन मुलांपैकीं तीन-चतुर्थांश मुलें कोटल्या ना कोटल्या तरी शाळांत शिकत आहेत. शेतकी कामांत अर्वाचीन यंत्रसाहित्य उपयोजण्यांत व वैयक्तिक संपत्तींत भर घालण्यांत चांगली प्रगति दिसून येत आहे.

पहिल्या जागतिक महायुद्धांत त्यांचें जें वर्तन दिसून आलें, त्यावरून संस्कृति व राज्यघटना यांचीं तत्त्वें त्यांना मान्य आहेत, असें कळून आलें. संयुक्त संस्थानांत १० हजारांवर इंडियन या वेळीं लष्करी नोकरींत होते. त्यांनीं शिस्त पाळून जें मोठ्या शौर्यानें काम बजावलें त्याबद्दल गोरे लोकहि त्यांची वाखाणणी करतात. १९४० सालीं संयुक्त संस्थानांतून एकंदर ३,३३,९६९ व कानडांत एक लाखावर इंडियन होते. मेक्सिकोंत अर्ध्या कोटीच्यावर शुद्ध रक्ताच्या इंडियनांची संख्या आहे. दक्षिण अमेरिकेंत सुमारें एक कोटी इंडियन आहेत. आतां बहुतेक इंडियन ख्रिस्ती झालेले आहेत.

**इंडियम धातु (इंद)**—ही रुप्यासारखी पांढरी व मृदु धातु असून तिचा प्रथम शोध १८६३ मध्यें राइक व रिक्टर या शास्त्रज्ञांनीं विछिन्न किरणदर्शकयंत्रानें पृथक्करणाचा प्रयोग करतांना लावला. याच धातूचें विशिष्टगुरुत्व ७·४२, द्रवणांक १५५° व परमाणुभारांक ११४·८ आहे. या धातूचें रासायनिक चिन्ह *In.* (इं) हें आहे. ॲल्युमिनिअम धातूसारखीच ही धातु आहे.

**इंडियाना**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतलें एक. हें मिचिगान सरोवराच्या किनाऱ्याच्या बाजूस आहे. क्षे. फ. ३६,२९१ चौ. मैल व लोकसंख्या ३४,२७,७९६. ओहिओ आणि वाबाश या नद्या आहेत. झाडी फार कमी असून बहुतेक सर्व जमीन शेतीलायक आहे. हवा समशीतोष्ण आहे. परंतु उन्हाळा व हिंवाळा हे फार कडक असतात. शेतीचा उद्योग मोठा असून सर्व प्रकारचीं पिकें निघतात. कोळसा, पेट्रोलियम, वगैरेंच्या खाणी आहेत. मोटारीसारखीं स्वयंचलित वाहनें यांचे व इतर कारखाने आहेत. ला साल यानें १६७० मध्यें याचा शोध लावला. व्हिन्सेनिस येथें १७३५ मध्यें पहिली वसाहत झाली. १८०० सालीं इंडियाना स्टेटची संयोजना करण्यांत आली. त्या वेळीं यांत पुष्कळ प्रदेश समाविष्ट करण्यांत आला होता. परंतु मागाहून तो निरनिराळ्या संस्थानांत घातला जाऊन हल्लींचा प्रदेश एवढाच यांत ठेवण्यांत आला. १८१६ मध्यें तें संयुक्त संस्थानांत सामील करण्यांत आलें.

**इंडियानापोली**— अमेरिकेंतील सं. संस्थानांतील इंडियाना नांवाच्या संस्थानच्या राजधानीचें शहर. हें या संस्थानच्या मध्यभागीं व्हाइट नांवाच्या नदीवर वसलेलें आहे. हें शहर अनेक रेल्वे-रस्त्यांचें केंद्र असून अनेक प्रकारचीं धान्यें, गायी, मेंढ्या, घोडे, वगैरे पाळीव जनावरें आणि इमारती लांकूड यांची येथें मोठी बाजार-पेठ आहे. अनेक प्रकारचें लोखंडी सामान, डुकरींचें मांस, शेतकीचीं आउतें, तागाचें कापड, वगैरे प्रकारचा माल बाहेर पाठवला जातो. शिक्षणविषयक पुष्कळ संस्था व एक युनिव्हर्सिटी येथें आहे. या शहराची लोकसंख्या ३८,६,९७२ आहे.

**इंडी**—हिंदुस्थान, मुंबई इलाखा, विजापूर जिल्ह्यांतलि एक तालुका. क्षे. फ. ८३८ चौ. मै.. लो. सं. ११,४,१२६ (१९४१). पाऊस २५ इंच सरासरी पडतो. इंडी हें मुख्य ठिकाण असून एक क्षेत्र मानलें जातें. लो. सं. ५,४९७ (१९४१). टॉलेमीनें या गांवाचा उल्लेख केलेला दिसतो.

**इडेनटाटा**—हा प्राणी एन्चिडनासारखाच असून त्याच्या अंगावर कडक खवले असतात. त्यामुळें त्याच्या शरीराचें रक्षण होतें. हा प्राणी दक्षिण आशिया व दक्षिण आफ्रिका या भागांत असून निरनिराळ्या युगांतून प्राण्यांचा विकास होत असतांना शिल्लक राहिलेला जुन्या काळांतील सस्तन प्राण्यांचा नमुना होय.

**इंडोचीन**— (फ्रेंच). आशिया, एक फ्रेंच वसाहत. ब्रह्मदेश आणि सयाम यांच्या पूर्वेस आणि चीनच्या दक्षिणेस हें राष्ट्र असून यांत कोचीन चीन वसाहत, आनाम, कांबोडिया, लाओस, टाँगकिंग हीं संरक्षित राज्यें व क्वांगच्यौ हे प्रांत येतात. इंडोचीनचें क्षेत्रफळ सुमारें २,८६,००० चौ. मै. व लोकसंख्या २,३८,५३,५०० आहे. ही फ्रेंच वसाहत एका गव्हर्नर जनरलच्या ताब्यांत दिलेली आहे. १९४१ सालीं इंडोचिनी लोकांनीं राष्ट्रीय चळवळ सुरू केली. १९४५ मध्यें आनामी लोकांनीं व्हिएत-नाम नांवानें आपलें लोकसत्ताक राज्य स्थापिलें व पुढील सालीं त्याला फ्रेंच सरकारनें मान्यता दिली. हानोई हें त्याचें राजधानीचें शहर आहे. शेतकी आणि मच्छीमारी हे दोन मुख्य धंदे आहेत. तांदूळ बाहेर जातो.

**इंडो-जर्मानिक भाषा**—मानवी प्राणी ज्या भाषा बोलतात त्या भाषांचे विविध वंश कल्पिले असून इंडो-जर्मानिक हा एक प्रमुख भाषावंश आहे. यांत आशिया आणि युरोप या खंडांतील भाषा येतात. या वंशांतील शाखा अशा : १ ट्युटॉनिक किंवा जर्मानिक शाखेंत इंग्लिश, जर्मन, डच, डॅनिश, स्वीडिश, आइस्लंडिक व मृत गॉथिक या भाषा; २ स्लाव्हानिक शाखेंत पोलिश, रशियन, व बोहेमियन; ३ लुथियानियन शाखा; ४ केल्टिक शाखेंत वेल्श, आयरिश, गॅलिक व ब्रेटन; ५ लॅटिन शाखेंत फ्रेंच इटालियन, स्पॅनिश व पोर्तुगीज; ६ ग्रीक; ७ आर्मेनियन; ८ संस्कृत इ. या सर्व भाषा फार प्राचीन काळीं असलेल्या एका भाषेपासून निघाल्या असाव्यात असें शास्त्रज्ञ मानतात.

**इतखेड**—वऱ्हाड, जिल्हा बुल्ढाणा, तालुका जळगांव. पूर्णा नदीतीरीं जळगांवच्या आग्नेयेस १२ मैलांवर हें लहानसें खेडें आहे. या ठिकाणीं दत्तात्रेयाचें एक देवालय आहे. येथें येणाऱ्या यात्रेकरूंच्या सोईकरितां धर्मशाळा बांधलेल्या आहेत. चैत्र महिन्याच्या शुद्धपक्षांत येथें जत्रा भरते.

**इतिहास**—मानवी इतिहासाचा वास्तविक प्रारंभ मनुष्य जातीच्या उत्पत्तीपासून होतो. या विश्वाची उत्पत्ति प्रथम कशी झाली हें एक गूढ असून तें उकलण्याचा अनेक शास्त्रज्ञ आज हजारों वर्षें प्रयत्न करीत आहेत; परंतु आतांपर्यंत अनेक कल्पना पुढें मांडण्यांत येऊनहि या गोष्टीबद्दलचें समाधानकारक ज्ञान झालें आहे असें म्हणतां येत नाहीं. विशेषतः ज्योतिःशास्त्र व भूस्तरशास्त्र यांच्या अभ्यासकांनीं या बाबतींत बरीच प्रगति केली असून विच्छिन्न किरणपट व त्याचे आलेख यांच्या साहाय्यानें विश्वाची कांहींशी कल्पना अंधुकपणें करतां येण्याइतपत शास्त्रज्ञांची या बाबतींत प्रगति झाली आहे. सूर्यमालेची व त्यांत पृथ्वीची उत्पत्ति कशी झाली, पृथ्वीवर प्राण्यांची उत्पत्ति कोणत्या प्रकारें व कोणत्या परंपरेनें होत गेली. त्यांत सपृष्ठवंशी प्राणी कसे उत्पन्न झाले व त्यांत मानवप्राण्याचा विकास कसा झाला, यांसंबंधीं अर्वाचीन भूस्तरशास्त्रज्ञ व जीविशास्त्रज्ञ यांनीं बरेंच ज्ञान व सुसंगत अनुमानपरंपरा निर्माण केली आहे व मानवप्राण्याची वस्ती भूगोलावर

होण्यास अनुकूल हवामान व योग्य परिस्थिति कोणत्या युगांत निर्माण झाली व त्याप्रमाणें मनुष्यप्राण्याची उत्पत्ति प्रथम कोणत्या भूभागावर झाली असावी व तेथून त्याचें अनुकूल हवामानाप्रमाणें परिभ्रमण कसें झालें असावें, यांसंबंधीं वरीचशी सुसंगत माहिती प्राचीनतम किंवा प्रागैतिहासिक काला-बद्दल आतां उपलब्ध होऊन तत्तदर्शक भूस्तरशास्त्रीय अवशेष उपलब्ध होत आहेत.

यानंतर पृथ्वीवर निरनिराळे मानववंश कसे, कोठें निर्माण झाले व त्यांचा संघर्ष कसकसा होत गेला यांसंबंधीं मानवशास्त्र व मानवेतिहास या शास्त्रांविषयीं बराचसा अभ्यास झाला आहे.

आज आपणांस ईजिप्त देशांतील मानववंश, त्यानंतर असुर-मानववंश अथवा बाबिलोनिया, असुरिया (खाल्डिया), वगैरे देशांत विकास पावलेला मानववंश, ध्रुवप्रदेशांत प्रथम वस्ती करून राहिलेला व नंतर हिमयुगानंतर दक्षिणेकडे प्रसार पावलेला आर्यवंश व त्याच्या इराण, भरतखंड वगैरे पूर्वेकडे गेलेल्या शाखा व ग्रीक वगैरे पश्चिमेकडे गेलेल्या शाखा, जावापासून चीनपर्यंत पसरलेला शालिधान्यपुष्ट संस्कृतीचा पीतवंश, या सुसंस्कृत मानववंशांचा व दक्षिण द्वैपायन व नीग्रो, वगैरे आफ्रिका खंडांतील असंस्कृत लोकांचा इतिहास कांहींसा उपलब्ध झाला आहे. अर्थात् त्यांतील सुसंस्कृत मानववंशाचा इतिहास अधिक ज्ञात असून अधिकाधिक ज्ञात होत आहे व बाकीच्या वंशांबद्दल संशोधन सुरू आहे.

आर्यवंशाच्या पश्चिमेकडे ज्या शाखा गेल्या त्यांचा ईजिप्ती व असुरी लोकांशीं संबंध येऊन त्यांची एक इतिहासपरंपरा निर्माण झाली; तिचा सारांश थोडक्यांत पुढें दिला आहे:—

इतिहासाचे सामान्यतः तीन वर्ग पाडतात: १ प्राचीन, २ मध्ययुगीन, व ३ अर्वाचीन. जगांतील प्रत्येक राष्ट्राचे या वर्गाप्रमाणें इतिहास देण्यांत येतात. युरोपच्या पहिल्या प्राचीन वर्गात हिब्रू, अरब, फिनीशियन, मिसरी, ग्रीक आणि रोमन, इत्यादि लोकराष्ट्रांचा इतिहास येतो. ईजिप्त आणि बाबिलोन या दोन राष्ट्रांच्या संस्कृतीचा इतिहास प्राचीनतम म्हणतां येईल. पुढें असुरी, मिसरी आणि इस्राएल साम्राज्यांचें जगावर वर्चस्व झालें, नंतर इराणी साम्राज्य बलिष्ठ झालें. त्याला ग्रीकांनीं नामोहरम केलें. उलट ग्रीकांची जागा रोमनांनीं घेतली. रोमन साम्राज्य पश्चिम आणि पूर्व भागांवर पसरलें. या साम्राज्याचा ऱ्हास म्हणजेच मध्ययुगाला सुरवात (सुमारें इ. स. ४७६) होय.

मध्ययुगीन इतिहासांत एक चार शतकांचें (६ वें ते ९ वें) 'अंधारी युग' येतें. या कालांत रानटी टोळ्यांनीं पश्चिम युरोपवर चालून जाऊन नवीन राज्यें स्थापिलीं. तींच आज दिसत आहेत. या अंधाऱ्या युगांत पोपची सत्ता व मुसलमानी धर्मसंप्रदाय हीं उदयास आलीं. कॉन्स्टँटिनोपल येथें पूर्व रोमन साम्राज्य जीव धरून होतें.

अंधारी युगानंतरच्या 'मध्यकाला'त पश्चिमेकडे पुन्हां दुसरें एक रोमन साम्राज्य सुरू झालें व पोपच्या सत्तेशीं झगडण्यांत १५ व्या शतकापर्यंत त्यांची शक्ति खर्च झाली. इकडे १४५३ सालीं पूर्व रोमन साम्राज्य तुर्कांनीं बुडविलें व त्या वेळेपासून अर्वाचीन युगाला सुरवात झाली.

अर्वाचीन युगाच्या आरंभीं ज्ञानाचीं नवीं द्वारें खुलीं झालीं. देशपर्यटणामुळें भौगोलिक कल्पना बदलल्या. नवीन भूप्रदेश दिसले व राष्ट्रीय जागृति उत्पन्न झाली. फ्रान्स, स्पेन, इंग्लंड, ऑस्ट्रिया यांसारख्या राष्ट्रांमध्यें साम्राज्यवाढीसाठीं स्पर्धा सुरू होऊन त्यांतच धार्मिक सुधारणांमुळें भर पडत गेली. धार्मिक तत्त्वांमुळें यादवी उत्पन्न झाल्या. अमेरिका आणि हिंदुस्थान या देशांशीं व्यापार करण्यासाठीं निघालेल्या भिन्न राष्ट्रांच्या व्यापारी मंडळ्यांमध्यें वर्चस्वासाठीं लहानमोठ्या लढाया सुरू झाल्या. इकडे युरोपांत फ्रेंच राज्यक्रांतीचा वणवा पेटला. तेथपासूनच खऱ्या अर्वाचीन युगाला सुरवात कोणी धरतात. १९ व्या शतकांत आणि २० व्या शतकांतील पहिलें आणि दुसरें महायुद्ध यांचा इतिहास दिला म्हणजे अर्वाचीन युगाला आजतागाईतपणा आला.

आर्यांच्या ज्या शाखा पूर्वेकडे वळल्या त्यांपैकीं एक शाखा इराण या देशांत स्थायिक होऊन त्यांनीं तेथें एक मोठें साम्राज्य स्थापन केलें व पुढें त्यांचा असुरी, ग्रीक, वगैरे लोकांशीं संघर्ष होऊन त्या सत्तेंत बरेच चढउतार झाले व इराणी साम्राज्य अखेरीस महंमदीयांच्या लोंढ्याखालीं चिरडून गेलें.

आर्यांची जी शाखा भरतखंडापर्यंत येऊन पोंचली, तिनें आपली संस्कृति सर्व भरतखंडभर, एवढेंच नव्हे तर पूर्वेकडील बहुतेक ज्ञात देशांत प्रसृत केली व अनेक राज्यें व साम्राज्यें स्थापन केलीं. या आर्यांचा दक्षिणेंतील किंवा तत्पूर्व द्रविड लोकांशीं संघर्ष झाला व त्यांनीं त्यांस पूर्णपणें आत्मसात् करून घेतलें. त्यानंतर पूर्वेकडील कांहीं वंशांशीं त्यांचा संबंध आला; उदाहरणार्थ, गोंड, मुंडा, वगैरे. त्यांस आस्ट्रो एशियाटिक म्हणतात. तसेंच थई, ब्रह्मी, चीन, बत्ता वगैरे राष्ट्रांशीं यांचा संबंध आला. त्या सर्वांवर यांनीं आपलें सांस्कृतिक वर्चस्व स्थापन केलें.

भरतखंडांत वैदिक कालांतील दिवोदास, सुदास, मरुत्त, वैश्रवण, आविक्षित, वगैरेंचीं साम्राज्यें लोपलीं तरी इक्ष्वाकु, यदु, भरत, वगैरेंचीं साम्राज्यें, त्यानंतर मौर्य, गुप्त वगैरे साम्राज्यें यांनीं ऐतिहासिक कालांत फार बलाढ्य सत्ता स्थापन केल्या व या भरतखंडाचें अशोकानें तर पूर्व समुद्रापासून हिंदुकुश पर्वतापर्यंत साम्राज्य भोगलें. यानंतर अनेक वंश स्थापन झाले, पण

अखेरीस अर्वाचीन काळांत महंमदीयांनीं भरतखंड पादाक्रांत केलें, तें पुन्हां मराठी साम्राज्यानें त्यांच्या पाशांतून सोडविलें. तोंच ब्रिटिश राजसत्तेनें तें अंकित करून टाकलें. या सत्तेच्या मगरमिठींतून युरोपीय क्रांतीमुळें तें नुकतेंच सुटलें असून स्वातंत्र्यसूर्याचा भरतखंडावर उदय होत आहे व त्याचा लवकरच पूर्ण प्रकाश या भरतभूमीवरच नव्हे, तर प्राचीन कालीं भारतीय संस्कृतीनें व्यापलेल्या सर्व प्रदेशावर पडेल अशी अपेक्षा आहे.

**इत्सिंग**—एक प्राचीन चिनी प्रवासी. या बौद्ध श्रमणानें हिंदुस्थानला जाण्याकरितां इ. स. ६७१ त चीन देश सोडला व जावा, मलाक्का या मार्गानें हुगळीच्या मुखाशीं असलेल्या ताम्रलितीस तो ६७३ त जाऊन पोंचला. कांहीं कालपर्यंत त्यानें नालंद येथें अभ्यास केला व बुद्धगया, वाराणशी, श्रावस्ती, कुब्ज, राजगृह, वैशाली, कुशीनगर या ठिकाणीं तो फिरला. ६९२ मध्यें त्या वेळीं चीनला जात असलेल्या तत्सइन नामक चिनी उपाध्याबरोबर त्यानें आपला ग्रंथसंग्रह चीनला पाठविला. ६९५ मध्यें इत्सिंग स्वतः चीनला परत गेला त्या वेळीं तेथें राज्य करीत असलेल्या वु–हाऊ राणीनें त्याचें चांगलें स्वागत केलें. ७०० व ७१२ या मधील कालांत त्यानें ५६ ग्रंथांचें भाषांतर केलें आणि ७१३ मध्यें ७९ व्या वर्षी वारला.

**इथेन**—पॅराफिन मालेंतील एक उज्जकर्ब (हायड्रो कार्बन). हा पेट घेणारा वर्णहीन वायु असून पेनिसिल्व्हानियांतील तेलाच्या खाणींतील वायुरूप पदार्थांत सांपडतो.

**इंदापूर**— हिंदुस्थान, मुंबई इलाखा, पुणें जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ५६७ चौ. मै., लो. सं. ९१,७४९ ( १९४१ ). पाऊस सरासरी २० इंच. मुख्य ठिकाण इंदापूर. हें पुणें–सोलापूर रस्त्यावर पुण्याच्या आग्नेयी दिशेस ८४ मैलांवर आहे. लो. सं. ६,९१९. मामलेदार कचेरी आहे व १८६५ पासून नगरपालिका आहे. इंग्रजी पांच इयत्तांपर्यंतची शाळा व लोकल बोर्डाच्या मुलांमुलींच्या मराठी शाळा आहेत. गांवांत जुनी गढी व ब्रह्मेंद्रस्वामींनीं बांधलेला तलाव आहे. हा गांव प्रथम विजापूरकरांकडे होता. १६४० च्या सुमारास शहाजीच्या जहागिरींत गेला. हें जुन्नर परगण्याचें पेशवाईंत मुख्य ठिकाण होतें.

**इंदूर**—हिंदुस्थान, मध्य हिंदुस्थानांतील एक मोठें संस्थान. याचें क्षेत्रफळ ९,९३४ चौ. मै. आहे. उत्तरेस उदयपूर आणि कोटा संस्थानें ; पूर्वेस ग्वाल्हेर, देवास, धार व भोपाळ हीं संस्थानें आणि मध्यप्रांत ; दक्षिणेसः मुंबई इलाखा ; व पश्चिमेस ग्वाल्हेर, धार व बरवाणी हीं संस्थानें आहेत. संस्थानाची समुद्रसपाटीपासून उंची १,५०० ते २,५०० फूट आहे. हवा समशीतोष्ण आहे. पाऊस सरासरी ३० इंच पडतो. १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें लोकसंख्या १५,१३,९६६ होती.

संस्थानांत तीन कॉलेजें ( होळकर, डॅली व इंदूर ख्रिश्चन ) असून ११ हायस्कुलें आहेत. प्राथमिक शिक्षण सर्वांना मोफत आहे व मुलींना मॅट्रिकपर्यंतचें सर्व शिक्षण मोफत आहे. एक मेडिकल स्कूल, संस्कृत कॉलेज, कला आणि संगीत शाळा, वगैरे कांहीं विशेष शिक्षणाच्या संस्था आहेत. मध्यभारत हिंदी साहित्य समिति व महाराष्ट्र साहित्य सभा या वाङ्मयीन संस्था आहेत. संस्थानांत ५० ग्रंथालयें असून इंदूर जनरल लायब्ररी फार मोठी आहे.

व्यापारामध्यें इंदूर पुढारलेलें आहे. सात कापडाच्या गिरण्या असून हातमाग पुष्कळच आहेत. महेश्वर लुगड्यांविषयीं जुन्या काळापासून प्रसिद्ध आहे. बर्फाची गिरणी, कांच-कारखाना ( राव येथें ), साखरेचा कारखाना (मेहीदपूर), तेलाच्या गिरण्या पाट्यांचा कारखाना ( पिप्लिया ), वगैरे इतर धंदे चालतात. होळकर स्टेट रेल्वे म्हणून स्वतंत्र फांटा बी. बी. सी. आय्. आणि जी. आय्. पी. रेल्वे यांना जोडला आहे. संस्थानांत बऱ्याच पतपेढ्या व पेढ्या आहेत. पाटबंधाऱ्यांचीं कामें सुरू आहेत. लागवडीखालीं २१,४३,८७९ एकर जमीन असून ज्वारी, कापूस, बाजरी, मका, तीळ हीं खरिपाचीं च गहूं, चणा, अळशी हीं रब्बीचीं पिकें निघतात. एकूण ५१७ ग्रामपंचायती संस्थानांत आहेत.

संस्थानचे संस्थापक मराठेशाहींतील सुप्रसिद्ध वीर मल्हारराव होळकर असून त्यांना पेशव्यांकडून ही जहागिरी मिळाली. मल्हाररावाची सून अहल्याबाई हिनें अत्यंत हुषारीनें आणि दक्षतेनें मल्हाररावानंतर राज्यकारभार हांकला. तिचें नांव अजरामर झालेलें आहे. तिच्या मृत्यूनंतर तुकोजीराव गादीवर आला. त्यानें बऱ्याच लढायांतून शौर्य गाजविलें होतें. त्याच्यानंतर काशीराव व यशवंतराव संस्थानिक झाले. यशवंतराव फार शूर असून त्यानें इंग्रजांना कित्येक वेळां चकविलें होतें. पण त्याच्याच कारकीर्दींत संस्थान इंग्रजांचें मांडलिक बनलें. यशवंतराव १८११ त मृत्यु पावल्यानंतर बालराजा मल्हारराव गादीवर बसला. याच्याच अज्ञपणांत सैन्यानें बंड केलें व इंग्रजांशीं सामना केला, पण त्यांत अपयश आलें. मल्हारराव १८३३ त वारल्यानंतर हरिराव व त्याचा मुलगा, नंतर १८४४ मध्यें तुकोजीराव गादीवर अज्ञान असतांच बसला. याच्या कारकीर्दींत संस्थान बरेंच सरसावलें. १८८६ त तुकोजीराव वारल्यावर शिवाजीराव १६ वर्षें राज्यावर होता. नंतर १९०३ सालीं तुकोजीराव ( तिसरे ) अज्ञानपणांतच गादीवर बसले; पण कारभारी-मंडळानें राज्यव्यवस्था चांगली ठेवली व तीच तुकोजीरावांनीं पुढें सज्ञान-

पणांत चालविली; इतकेंच नव्हे तर शिक्षण, व्यापार, लोकांना हक्क देणें, वगैरे या बाबतींत मोठीच प्रगति केली. त्यांनीं १९२७ सालीं राज्यत्याग केल्यानंतर त्यांचे चिरंजीव यशवंतराव गादीवर बसले. यांचें लहानपणीं विलायतेंत शिक्षण झालें आहे. यांना हिज हायनेस महाराजाधिराज राजराजेश्वर सवाई श्री. यशवंतराव होळकर, बाहादूर, जी. सी. आय्. ई. एल्. एल्. डी. असा किताब आहे. एक मंत्रिमंडळ व मुख्य प्रधान यांच्या सल्ल्यानें राज्यकारभार चाले व एक कायदेमंडळ होतें. आतां हें संस्थान मध्य भारत संस्थान संघांत अंतर्भूत झालें आहे. संस्थानचें एकूण उत्पन्न २,६३,२१,३०० रुपये असून त्यांपैकीं ७६,००,००० जमीनमहसूल, ३८,००,००० अबकारी, ३६,००,००० औद्योगिक कर यांचें उत्पन्न आहे. खर्च २,६२,८२,४०० रुपये आहे. इंदूर शहर— संस्थानची राजधानी. उ. अ. २२°४३' व पू. रे. ७५°,५२' आहे. उंची १८२३ फूट. सरस्वती आणि खान यांच्या तीरांवर गांव वसलें आहे व गांवाच्या मध्यभागीं संगम आहे. दक्षिणेंतून उत्तरेकडे जाण्याच्या वाटेवर इंदूर शहर असल्यानें पूर्वीपासून हें शहर प्रसिद्ध आहे. मराठ्यांच्या अमदानींत तर हें भरभराट-लेलें माळव्यातील मध्यवर्ती ठिकाण होतें. १७३३ त पेशव्यानें हें मल्हाररावाला दिलें व त्याच वेळीं येथें बरेच जमीनदारहि राहावयास आले. १८०१ सालीं ही होळकरांची राजधानी बनली व त्या वेळेपासून शहर वाढूं लागलें. गांवांतला जुना राजवाडा, माणिकबाग व लालबाग हे राजप्रासाद आहेत. १८६८ सालीं म्युनिसिपालिटी आली, व १९२४ सालीं इंप्रूव्हमेंट ट्रस्ट स्थापन झालें. यामुळें शहराची रचना बांधेसूद बनली. सर हुकूमचंदाचें जैनमंदिर प्रेक्षणीय आहे. गोपालमंदिर जुनें आहे. इंदूरजवळचें. बदरखा धरण व त्यांतून शहराला पाण्याचा पुरवठा कसा होतो, या गोष्टी शिल्पशास्त्रीदृष्ट्या अभ्यसनीय समजतात.

**इंदैयन**—तामिळ देशांतील धनगरांची एक जात. हल्लीं या जातींत कांहीं लोक नोकरी किंवा इतर धंदे करूं लागले आहेत. या जातींत अनेक वर्ग आहेत; पण मुख्य दोन वर्ग पाडतां येतील. पहिल्या वर्गांतील लोक वैष्णव असून आपणांस यादव म्हणवितात, व दुसऱ्या वर्गांतील लोक शैवपंथी असून भूतराक्षसांची उपासना करतात.

विजयनगरच्या कृष्णदेव राजाचा दिवाण तिम्मराज इंदैयन ज्ञातीचा होता असें लोक म्हणतात.

त्रावणकोर येथील इंदैयनांचे दोन वर्ग पडतात. एक तामिळी बोलणारा व दुसरा मल्याळम् बोलणारा. यांची शिवी नांवाची पोटजात पूर्वी पालखी वाहण्याचें काम करीत असे. एकंदर लोकसंख्या सुमारें ७,००,०००.

**इंदोरी**—१. मध्यप्रांत; कवर्धा संस्थानांतील सर्वांत मोठें गांव. हें राजधानीपासून पूर्वेस १० मैलांवर असून बहुतेक वस्ती चांभार लोकांची आहे. मुख्य पीक तांदुळाचें आहे.

२. हें इंद्रायणी नदीच्या डाव्या तीरावर मावळ तहशिलींतील एक खेडें असून खडकाळ्याच्या पूर्वेस १० मैलांवर वसलेलें आहे. येथें एकबुरुजी किल्ला असून त्याच्या पायथ्यास इंद्रायणी नदी वाहून जाते. तळेगांवच्या दाभाड्यांकडे हें इनामी गांव आहे.

**इंद्र**—१. एक हिंदु देवता. पुराणांतून इंद्राला पहिलें स्थान दिलेलें आढळत नाहीं. त्रैमूर्तींच्या खालचें स्थान आहे. तरी इतर देवांत तो श्रेष्ठ मानला आहे. तो अंतरिक्षाचा आणि पूर्व दिशेचा स्वामी आहे—तो वीज सोडतो व मारतो आणि इंद्रधनुष्य सज्ज करितो. बऱ्याच वेळां तो असुरांशीं लढतो. त्यांची त्याला भीति वाटते व पुष्कळ वेळां त्यांच्याकडून तो पराभवहि पावतो—अशा तऱ्हेचें वर्णन जागजागीं आढळतें. वृत्र नांवाच्या ब्राह्मणाची हत्या घडल्यानें त्याला बरेच दिवस लपून बसावें लागलें. पुढें अश्वमेध केल्यावर त्याचें पातक नाहींसें होऊन पुन्हां इन्द्रपदप्राप्ति झाली. सोमरसाविषयींची त्याची गाढ आसक्ति आहे. त्याच्या दुर्वर्तनाचीं अनेक उदाहरणें पुराणांत आढळतात. इंद्र हा सुरूप असून पांढऱ्या घोड्यावर किंवा हत्तीवर हातांत वज्र घेऊन बसतो. त्याच्या मुलाचें नांव जयंत. त्याची स्त्री इंद्राणी. इंद्राची प्रत्यक्षपणें पूजा होत नसून शक्रध्वजोत्थान (गुढीपाडवा) नांवाच्या सणांत यावरील प्रासंगिक भक्ति दिसून येते. इंद्राचीं नावें व पदव्या पुष्कळ आहेत.

२. एक संस्कृत व्याकरणकार. पण याचें व्याकरण उपलब्ध नाहीं. तरीपण बोपदेवानें आपल्या कविकल्पद्रुमांत याचा उल्लेख केला आहे. इंद्र आणि इंद्रगोमिन् हे दोघे एकच होत. हेमचंद्राच्या बृहद्वृत्तीवरील न्यासांत याचा उतारा दिला आहे.

**इंद्रजित्**—लंकाधिपति रावणास मंदोदरीपासून झालेला पुत्र. यानें जन्मताच मेघासारखी गर्जना केल्यामुळें त्याचें मेघनाद असें नांव ठेवलें होतें. यानें शुक्राचार्यांच्या साह्यानें निकुंभिला येथें सात यज्ञ केले व शिवप्रसादानें दिव्य रथ, धनुष्यबाण, शस्त्रें तामसी माया, इत्यादिक प्राप्त करून घेतलीं.

रावण देवांस जिंकण्याकरितां स्वर्गी गेला असतां तेथें देवांचा व राक्षसांचा घोर संग्राम झाला. या युद्धांत मेघनादानें अपूर्व युद्धकौशल्य दाखवून, इंद्रास आपल्या शस्त्रास्त्रांनीं जर्जर करून बद्ध केलें व ब्रह्मदेवाकडून वर मिळवून इंद्राला सोडलें. तेव्हांपासून मेघनादास इंद्रजित् असें नांव पडलें.

बिभीषणाच्या सांगण्यावरून वानरांनीं त्याचा अ...

रथ मिळवण्यासाठीं चाललेला यज्ञ पुरा होऊं दिला नाहीं; त्यामुळें चिडून तो युद्धास उभा राहिला. लक्ष्मणानें त्याच्याशीं युद्ध आरंभिलें व ऐंद्रास्त्रानें त्यास मारलें. इंद्रजितास सुलोचना या नांवाची स्त्री होती. ही स्त्री अतिशय पतिव्रता होती. हिनें रामाकडून इंद्रजिताचें मस्तक परत आणून त्यासह ती सती गेली.

**इंद्रजी, डॉ. भगवानलाल** (१८३९-१८८८)— एक जागतिक कीर्तीचा हिंदी पुराणवस्तुशास्त्रज्ञ व संशोधक. हे जातीनें नागर ब्राह्मण व संस्कृतचें चांगलें अध्ययन केलेले, पण अचानक इतिहासाकडे वळले. यांनीं डॉ. भाऊ दाजी यांचें शिष्यत्व पत्करून व अहर्निश मेहनत करून हे प्राचीन लिपींचे तज्ज्ञ बनले. हिंदुस्थानांतील बहुतेक शिलालेखांचें वाचन यांनीं करून प्राचीन इतिहासावर चांगला प्रकाश पाडला. डॉ. कनिंगहॅम, डॉ. बुल्हेर, डॉ. कर्न, वगैरे पाश्चात्य संशोधक यांना विशेष मानीत. लंडन युनिव्हर्सिटीनें यांना पीएच्. डी. पदवी अर्पण केली व अनेक विद्वत्संस्थांनीं यांना गौरविलें. नाशिक शिलालेख, उदयगिरि शिलालेख, नाणेघाटांतील लेख, नेपाळी लेख, इ. महत्त्वाचे लेख यांनीं उजेडांत आणले व बॉंबे गॅझेटियरमधील गुजरातचा इतिहास विस्तृतपणें व साधार लिहिला. यांची आर्थिक स्थिति समाधानकारक नव्हती पण ती ते दाखवीत नसत. डॉ. भाऊ दाजी व डॉ. इंद्रजी यांनीं पुराणवस्तुसंशोधनांत अर्धें शतक बहुमोल कामगिरी करून हा इतिहासाचा प्रांत सुगम केला.

**इंद्रधनुष्य**—हा चमत्कार आकाशांत पाऊस पडल्यावर दिसतो व ह्याकडे मनुष्यानें लक्ष अगदीं प्राचीन कालापासून लागलें असलें पाहिजे. इंद्र हा देवांचा राजा व हें धनुष्य आकाशांत दिसतें तेव्हां तें त्याचें मानून आपल्या पूर्वजांनीं त्यास वरील नांव दिलें. याचा आकार अर्धवर्तुळाकार असतो व त्या वर्तुळाचा मध्यबिंदु पाहणारा व सूर्य यांस जोडणाऱ्या रेषेवर असतो. बहुतकरून धनु दोन दिसतात. पहिल्या इंद्रधनुष्याची त्रिज्या ४१° असते व तें फारच मजेदार रंगाचें झालेलें दिसतें. साध्या डोळ्यांनीं आपणांस त्यांपैकीं ४ किंवा ५ रंग दिसतात, पण त्यांत ७ हि रंग असतात व तें इतके एकमेकांत मिसळलेले असतात कीं, एक कोठें संपतो व दुसऱ्याला कोठें सुरुवात होतें हें सांगणें फार कठिण जातें. त्याच्या शेवटीं तांबडा व आंतला जांभळा रंग असतो.

इंद्रधनुष्याचें विवरण करण्याचे पुष्कळ प्रयत्न केले गेले, पण त्यासंबंधीं कोणास नीटसें सांगतां आलें नाहीं. डॉमिनिस, डेकार्टे, इत्यादींनीं भूमितीच्या आधारें त्याचें स्पष्टीकरण केलें व तें पुष्कळ अंशीं बरोबरहि होतें. पण न्यूटननें जेव्हां पांढऱ्या किरणांचें पृथक्करण करून सात किरणांचे निरनिराळे वक्रीभवनाचे कोन असतात व इंद्रधनुष्याचे रंग आणि हे पृथक्कृत सात रंग यांचा क्रम एक असतो हें दाखविलें तेव्हां त्याचें बरेंच बरोबर असें स्पष्टीकरण झालें.

कित्येक वेळां चंद्रप्रकाशामुळें देखील इंद्रधनुष्य दिसतें; परंतु तें फार फिकट असतें. किल्येक वेळां सूर्याच्या समुद्रांत पडलेल्या प्रतिबिंबामुळें सुद्धां इंद्रधनुष्य होऊं शकतें.

**इंद्रप्रस्थ**—महाभारतांतील कौरवपांडवांच्या कथांनीं ज्या इंद्रप्रस्थाचें नांव अजरामर केलें आहे, व जें प्रत्येक हिंदूच्या कर्णपथावर अनेक वेळां आलेलें आहे तें सुप्रसिद्ध नगर दिल्लीच्या दक्षिणेस दोन मैलांवर आहे. तेथें पांडवांच्या वेळची धनसंपन्न नगरी आतां राहिली नाहीं. फक्त मुसलमानी किल्ल्याचा जीर्ण झालेला कांहीं भाग व त्यांत कांहीं जुन्या मशिदी आहेत. येथें पूर्वींचीं उत्तुंग देवालयें किंवा रमणीय उद्यानें वगैरे सांप्रत मुळींच नाहींत.

राज्याच्या वांटणीकरितां कौरवांचें व पांडवांचें भांडण सुरू होईल तें टाळावें म्हणून हस्तिनापुरापासून थोड्याशा अंतरावर जें खांडववन होतें तें उध्वस्त करून तेथ नवें शहर धर्मराजानें वसविलें. पांडवांनीं केलेला राजसूय यज्ञ याच शहरांत झाला व मयासुरानें केलेली विचित्र सभा याच नगरांत होती.

दिल्ली शहरांतून इंद्रप्रस्थ पाहण्याकरितां गेलें म्हणजे प्रथम लाल दरवाजा नामक एक जुनाट पण भरभक्कम असा दरवाजा लागतो. हा शीरशहाच्या राजधानीचा एक प्रसिद्ध दरवाजा होता. ह्या दरवाजाच्या सन्मुख बाजूस हुमायून बादशहानें बांधलेला 'पुराणा किल्ला' दृष्टीस पडतो. हेंच प्राचीन इंद्रप्रस्थ होय. ह्या किल्ल्यामध्यें 'किल्ला कोना मशीद' व 'शेर मंझील' अशा दोन जुन्या प्रेक्षणीय इमारती आहेत.

**इंद्राणी**— इंद्रपत्नी. आजपर्यंत सहा इंद्र होऊन गेले. त्यांचीं नांवें जशीं पृथक् पृथक् आढळतात तशीं इंद्राणीचीं आढळत नाहींत. सांप्रतच्या इंद्राणीस शची असें नांव आहे. परंतु इंद्र किती झाले तरी इंद्राणी एकच अशी समजूत आहे. व यामुळेंच नहुषानें जेव्हां इंद्रपद प्राप्त करून घेतलें तेव्हां त्यानें इंद्राणीस आपल्या सेवेस पाचारण केलें व त्यांतच त्यास भ्रष्ट व्हावें लागलें. तसेंच इन्द्राणीहि अखंड सौभाग्यवती समजून वाग्दानाच्या वेळीं वधूकडून इंद्राणी शचीचें पूजन करविण्यांत येतें. ओरिसांत इंद्राणीची प्रचंड मूर्ति सांपडली आहे.

**इंद्रायणी**— मुंबई, पुणें जिल्ह्यांतील एक नदी. ही लोणावळ्यापासून नैर्ऋत्येकडे तीन मैलांवर कुरवंडें गांवाजवळ उगम पावून पूर्वेकडे सबंध नाणे मावळांतून वाहत जाते. हिला आंद्रा

नदी येऊन मिळते. हिच्या कांठीं देहू आणि आळंदी हीं क्षेत्राचीं स्थानें आहेत. ही तुळापुराजवळ भीमेला मिळते.

**इंद्रावणी**—( कडू इंद्रावण ). इंद्रावणीचे वेल मध्य, दक्षिण व वायव्य हिंदुस्थान, अरबस्तान, पश्चिम आशिया, आफ्रिकेच्या उष्णकटिबंधांतील कांहीं भाग, वगैरे ठिकाणीं आढळतात. या झाडाच्या दोन जाती आहेत–एक गोड इंद्रावण व दुसरी कडू. दुसरीचें फळ लिंबाएवढें असतें. इंद्रावणीचें फळ रेचक असून त्याचा देशी व विलायती औषधांतून उपयोग करितात. बियांपासून स्थिर तेल निघतें. त्याचा दिव्यांत जाळण्याकरितां उपयोग होतो असें म्हणतात.

सर्पदंशावर इंद्रावणीचें मूळ विड्यांत देतात. दंतकृमीवर इंद्रावणीचें पिकलेलें फळ तापलेल्या तव्यावर टाकून त्याचा धूर दांतांस देतात.

**इंद्रिय**—प्राणी अथवा वनस्पती यांच्या शरीरामध्यें विवक्षित क्रिया करणारे जे निरनिराळे भाग किंवा अवयव असतात त्यांस इंद्रियें असें म्हणतात. जिवंत प्राण्यांमध्यें व निर्जीव वस्तूंमध्यें मुख्यतः हा फरक दिसून येतो कीं, निर्जीव वस्तूचे सर्व घटक अगदीं एकसारखे असतात. परंतु सजीव प्राण्याचे निरनिराळे शरीराचे घटक अथवा अवयव यांमध्यें पुष्कळच विविधता असते. यामुळेंच सजीव प्राण्यास सेंद्रिय आणि निर्जीव प्राण्यास निरिंद्रिय असें म्हणतात. इंद्रियांचे ज्ञानेंद्रियें आणि कर्मेंद्रियें असे दोन वर्ग पाडलेले असतात. कर्ण, चक्षु, रसना, नासिका, आणि त्वचा हीं पांच ज्ञानेंद्रियें व हस्त, पाद, गुद, उपस्थ व वाचा हीं पांच कर्मेंद्रियें मानतात. शिवाय मन, बुद्धि, अहंकार आणि चित्त हीं चार अंतरिंद्रियें आहेत.

**इंद्रियविज्ञान**—निरनिराळ्या तऱ्हेचे जिवंत प्राणी अथवा वनस्पती यांच्या शरीरांतील निरनिराळ्या व्यापारांचा अभ्यास ज्या शास्त्रामध्यें करण्यांत येतो त्यास इंद्रियविज्ञानशास्त्र ( फिजिऑलॉजी ) असें म्हणतात. यांपैकीं वनस्पतींच्या व्यापारांचा अभ्यास वनस्पतिशास्त्रामध्यें येतो ; आणि या शास्त्रांत फक्त उच्चवर्गीय प्राण्यांच्या, विशेषतः मनुष्याच्या, शारीरिक व्यापारांचा अंतर्भाव होतो. यामध्यें शरीरांतील क्रिया कशा चालतात याचा विचार केलेला असतो. हा विचार रसायनशास्त्र आणि इंद्रियविज्ञान या दोहोंस अनुलक्षून केलेला असतो. एखाद्या जिवंत प्राण्यामध्यें आपणास पुढील गोष्टी आढळून येतात :–तो अन्नाचें ग्रहण करतो आणि त्याचा उपयोग करून घेतो ; ( २ ) त्याच्या व्यापारामध्यें परिस्थितीस अनुरूप अशा क्रिया व प्रतिक्रिया होतात ; ( ३ ) तो वाढत असतो ; ( ४ ) तो पुनरुत्पादन करीत असतो. कांहीं प्राणी फक्त एकपेशीमय असतात. परंतु बहुतेक वरच्या श्रेणींतील प्राणी अनेक पेशींच्या पुंजांचे बनलेले असतात. प्रत्येक पेशी ही एक जिवंत रक्तगोलक ( प्रोटोप्लॅझम ) नांवाच्या द्रव्याची बनलेली असते.

शरीराची रचना—शरीराचे निरनिराळे भाग निरनिराळ्या द्रव्यांचे बनलेले असतात ; उदा०, अस्थी, स्नायू, चरबी, वगैरे. हा फरक निरनिराळ्या क्रियांस अनुसरून केलेला असतो. कांहीं पेशींचा एकत्र पुंज बनलेला असून तो पुंज एखादी विशिष्ट क्रिया करीत असतो ; उदा०, अस्थी या स्वतः कठिण असून दुसऱ्या मऊ पेशींस त्यांच्यामुळें आधार मिळतो. स्नायू हे संकोचनशील असतात. त्वचा ही शरीरावरचें आच्छादन असते. अंतस्त्वचा ही निरनिराळ्या इंद्रियांमध्यें अस्तरणासारखी असते. ग्रंथी ह्या पेशींचे पुंज असून त्यांतून स्राव होत असतो. मज्जातंतू हे संवेदनावाहनाचें कार्य करीत असतात. अशा तऱ्हेचे निरनिराळ्या पेशींचे पुंज निरनिराळ्या इंद्रियांमध्यें किंवा व्यूहामध्यें संघटित केलेले असतात. प्रत्येक व्यूहाकडून कांहीं तरी विशिष्ट आवश्यक क्रिया केली जाते व शरीराच्या व्यापारांत ती भाग घेत असते. व या सर्व रचना परस्परांवर अवलंबून असतात. कोणताहि एक विशिष्ट घटक योग्य प्रमाणापेक्षां अधिक कार्य करूं शकत नाहीं. किंवा आपलें कार्य थांबवूं शकत नाहीं. कारण तसें झाल्यास इतर इंद्रियांच्या कार्यांत व्यत्यय येण्याचा संभव असतो.

प्रत्येक रक्तगोलकामध्यें एकसारखा बदल होत असतो. त्याची एकसारखी घटना होत असते व विघटनाहि होत असते. या घटनात्मक व विघटनात्मक क्रियेस मेटॅबोलिझम म्हणतात. त्यांतील घटनात्मक क्रियेस ॲनाबोलिझम आणि विघटनात्मक क्रियेस कॅटॅबोलिझम म्हणतात. या क्रिया होण्यास शक्तीचा क्षय व्हावा लागतो व त्याकरितां शक्तीचा संचय करणें आवश्यक असतें. सृष्टीचा एक सर्वसामान्य नियम असा आहे कीं, नवीन शक्ति निर्माण होत नाहीं तर शक्तीचें फक्त रूपांतर होत असतें; व या नियमास शरीर हेंहि अपवाद नाहीं. शरीर हें नवीन शक्ति निर्माण करूं शकत नाहीं तर तें आपणांस लागणारी शक्ति अन्नापासून मिळवितें. अन्नामध्यें गुप्त शक्तीचा सांठा असतो व ती शक्ति मोकळी करून शरीर उपयोगांत आणतें. शरीराच्या पेशींमध्यें बरीचशी पिष्टशक्ति सांठवून ठेवलेली असते व तिचाहि तें अवश्य तेव्हां उपासमारीच्या प्रसंगीं, वगैरे उपयोग करून घेतें. जर गरजेपेक्षां जास्त शक्ति उत्पन्न झाली तर तिच्या योगानें उष्णता उत्पन्न होऊन तिचा क्षय होतो. सामान्यतः अन्नापासून मिळणाऱ्या शक्तीचा अपव्यय होतो, कारण शरीरामध्यें विशिष्ट उष्णतामान नेहमीं कायम ठेवावें लागतें.

अन्न—इंजिनाला ज्याप्रमाणें जळण लागतें त्याप्रमाणें

शरीरास अन्नाची आवश्यकता आहे. त्याशिवाय तें चालू शकत नाहीं. कोणत्याहि प्रकारचें अन्न घेतलें तरी तें ओजस् द्रव्यें (प्रोटीन), कर्बोज्जितें (कार्बोहायड्रेट) व चरबी यांपैकीं कोणत्या तरी एका वर्गांत मोडतें. या सर्वांमध्यें कर्ब, उज्ज व प्राण हीं तीन मूलद्रव्यें असतात, परंतु ओजस् द्रव्यामध्यें नत्र आणि गंधक हे अधिक असतात. अन्न स्वभावतः अक्रियात्मक आहे. परंतु त्यांतील कर्बाचें प्राणिदीकरण करतां येतें, व या क्रियेमध्यें त्यांतून कोळसा ज्याप्रमाणें जाळला असतां शक्ति देतो त्याप्रमाणें शक्ति उत्पन्न होत असते. ही प्राणिदीकरणाची क्रिया शरीर एकसारखी शांतपणें करीत असतें. व ती क्रिया एन्झाइन अथवा पूति-द्रव्यांच्या साहाय्यानें तें करीत असतें.

एन्झाइम अथवा पूतिद्रव्यें—या द्रव्यांचेंज्ञान आपणांस फक्त त्यांच्या क्रियेवरून झालेलें आहे. अत्यंत सूक्ष्म स्वरूपांत त्यांची क्रिया फार जोरानें होत असते व ही क्रिया करीत असतां त्याचा ऱ्हास होत नाहीं. विशिष्ट पूतिद्रव्यांचा परिणाम विशिष्ट पदार्थांवरच होतो. किंवा त्यांच्यासारख्या फार थोड्या त्याच वर्गांतील द्रव्यांवर होतो. या परिणामामधून संमिश्र पदार्थांचें रूपांतर साध्या पदार्थांमध्यें किंवा साध्या पदार्थांचें रूपांतर संमिश्र पदार्थांमध्यें होतें.

पचनव्यूह—पचनव्यूह किंवा अन्नमार्ग ही एक तोंडापासून सुरू होणारी लांब नलिका आहे. तोंडावाटें या नळींत चावलेलें अन्न घशांतून खालीं उतरून जठरांत जातें. तेथें कांहीं वेळ राहून त्यावर जाठररसाचा परिणाम होतो. त्यानंतर तें लघ्वन्त्रामध्यें जातें. तेथें पचनक्रिया पूर्ण होते, व अन्नापासून तयार होणारे पदार्थ रक्तामध्यें शोषले जातात व निरुपयोगी भाग बृहदंत्रामध्यें जातो व तेथून तो शरीरांतून बाहेर पडतो. अन्नमार्गांतून अन्न पुढें जाण्याची क्रिया अन्ननलिकेच्या भिंती ज्या स्नायूंनीं बनलेल्या असतात त्या स्नायूंच्या ततूंचें जें तालबद्ध असें संकोचन होतें त्यामुळें घडून येते. या अन्ननलिकेच्या आंतील भागावर अस्तरासारखा असलेला जो श्लेष्मल अंतस्त्वचेचा भाग असतो त्यामध्यें ज्या लहान लहान ग्रंथी असतात, त्यांमध्यें पाचकरस निर्माण होतो. या पचनक्रियेस यकृत् आणि स्वादुपिंड यांची मदत होते. या दोन ग्रंथींतून होणारा स्राव लघ्वन्त्राच्या आरंभींच अन्नामध्यें मिसळतो.

मल—शरीराच्या रक्तगोलकांमध्यें जो वारंवार बदल होत जातो व त्यामुळें त्यांचें जें विघटन होत असतें त्यामुळें कांहीं निरुपयोगी द्रव्यें अग्नीपासून ज्याप्रमाणें राख तयार होते त्याप्रमाणें तयार होतात. या निरुपयोगी द्रव्यांचें निष्कासन होणें अवश्य असतें. या क्रियेस मलत्याग असें म्हणतात. शरीरांतील मल बाहेर टाकणारीं इंद्रियें : (१) मूत्रपिंड—यामध्यें मूत्र तयार होतें. (२) आंतडीं—यांमधून मल बाहेर पडतो. (३) फुप्फुसें—यांमधून कर्बाम्लवायु किंवा कर्बद्विप्राणिद बाहेर पडतो. (४) कातडीं—ह्यांमधून घाम बाहेर पडतो.

रुधिराभिसरणव्यूह—अन्न पचल्यामुळें शरीरांत जे पदार्थ तयार होतात त्यांचा रुधिराभिसरणद्वारां सर्व शरीरांत पुरवठा होतो. या रचनेमध्यें हृदय हें एक मुख्य प्रेरयंत्र (पंप) असून त्याचा स्नायू व भोंवतीं तालबद्ध पद्धतीनें संकोच पावून रक्त हृदयाच्या बाहेर पाठवीत असतात.

श्वसनव्यूह—छातीच्या आंतल्या बाजूस फुप्फुसें असतात व कांहीं विशेष स्नायूंच्या क्रियेमुळें फुप्फुसांमध्यें हवा आंत जाते व बाहेर येते. ही हवा रक्ताशीं मिसळते, व तींतील प्राणवायु रक्तामध्यें मिसळून तो निरनिराळ्या पेशींस पुरविला जातो. श्वसनक्रियेपासून उत्पन्न होणारा कर्बद्विप्राणिद हा वायु रक्तामार्फत पुन्हां फुप्फुसामध्यें जातो व तेथून तो श्वासांच्या द्वारें बाहेर पडतो. याप्रमाणें फुप्फुसांमध्यें रक्त येतांना तें कर्बद्विप्राणिदयुक्त असतें व बाहेर पडतांना प्राणवायुयुक्त असतें. याप्रमाणें रक्त हें सर्व शरीरास अन्नाचा व प्राणवायूचा पुरवठा करतें.

कोणत्याहि प्राण्यास जिवंत राहण्याकरितां आपल्या सभोंवतालच्या परिस्थितीशीं स्वतःस अनुरूप करून घेतां आलें पाहिजे. ही अनुरूप करून घेण्याची शक्ति बाह्य परिस्थितींत होणाऱ्या बदलांचा आपल्या शरीरावर कितपत परिणाम होईल यावर अवलंबून असते. अशा परिस्थितीमुळें होणाऱ्या परिणामास चेतना असें म्हणतात. व उच्च दर्जाच्या प्राण्यामध्यें अशा चेतनांचा स्वीकार करण्याकरितां स्वतंत्र इंद्रियें असतात. यांस ग्राहक-इंद्रियें असें म्हणतात. यांसच ज्ञानेंद्रियें अशी संज्ञा देण्यांत येते. अशा प्रकारचीं इंद्रियें म्हटलीं म्हणजे प्रकाश ग्रहण करणारे नेत्र, ध्वनि ग्रहण करणारे श्रवण, इत्यादि होत.

अशा तऱ्हेचीं ज्ञानेंद्रियें असणारा प्राणी जर बाहेरील परिस्थितीमध्यें होणाऱ्या बदलापासून मिळणारी चेतना ग्रहण करून तिला संवादीरूपानें प्रतिक्रिया करणार नाहीं तर त्या चेतनांपासून त्याला कांहीं लाभ होणार नाहीं. याकरितां या ग्राहक-इंद्रियांमध्यें विशिष्ट चेतनांस योग्य अशी प्रतिक्रिया करतां येईल अशा तऱ्हेची रचना केलेली असते. ही रचना स्नायुमय असते. हे स्नायू अस्थींस जोडलेले असतात. व त्यांच्या साहाय्यानें प्राण्यास हालचाल करतां येतें.

मज्जातंतुव्यूह—अशा तऱ्हेची ग्राहक व प्रतिक्रियात्मक इंद्रियांची वाढ झाली म्हणजे निरनिराळ्या चेतनांपासून होणाऱ्या क्रिया व त्यांच्या प्रतिक्रिया यांमध्यें विसंगति उत्पन्न होतां कामा

नये व त्या योग्य प्रमाणांत व योग्य वेळीं आणि त्वरित होत जाण्या अशाविषयीं तजवीज करणें अवश्य असतें. याकरितां ग्राहक व प्रतिक्रियात्मक इंद्रियांमध्यें कांहीं दुवे जोडलेले असतात. व यांचीच गुंतागुंतीची रचना म्हणजेच मज्जातंतुव्यूह होय. व या व्यूहाची व्याप्ति सर्व शरीरभर असते. हे दुवे अथवा मज्जातंतू कांहीं रक्तपेशींचे बनलेले असून त्यांना अनेक लांबलांब शाखा फुटलेल्या असतात. प्रत्येक रक्तपेशी ही एक मज्जाकणमय असते आणि सर्व मज्जातंतुव्यूह अशा कणांचा बनलला असतो. असे निरनिराळे मज्जाकण त्यांच्या शाखांच्या योगानें एकमेकांशीं जोडले गेलेले असतात व त्यामुळें त्यांच्यामध्यें रचनासातत्य नसलें तरी क्रियासातत्य असतें. अशा तऱ्हेची या मज्जातंतुव्यूहाबद्दलची अर्वाचीन कल्पना आहे. उच्च दर्जाच्या प्राण्यामध्यें मज्जातंतुव्यूहाचे दोन भाग असतात : एक केंद्रवर्ती भाग. यामध्यें मेंदू, पृष्ठवंश यांचा अंतर्भाव होतो. व दुसरा या केंद्रवर्ती भागास जोडलेल्या व सर्व शरीरभर पसरलेल्या मज्जातंतूंचा असतो. या मज्जातंतूंतून जाणाऱ्या प्रेरणांचेहि दोन वर्ग करतात : एक केंद्रगामी अथवा केंद्राकडे जाणाऱ्या व दुसरा बहिर्गामी म्हणजे केंद्राकडून बाहेर जाणाऱ्या.

ग्रंथी— ग्रंथींचा असा एक लहान समूह आहे कीं, त्यांतून होणारा स्राव प्रत्यक्ष रक्तामध्यें होत असतो. व यामुळें त्यास वाहिनीविरहित ग्रंथी म्हणतात. यांपैकीं पुष्कळशा ग्रंथी आकारानें अगदीं लहान असतात तरी त्यांचें कार्य इतकें महत्त्वाच असतें कीं, त्या कार्यांत विघ्न आल्यास भयंकर परिणाम होऊन मृत्यु येण्याचाहि संभव असतो.

पुनरुत्पादनव्यूह— प्रत्येक प्राण्याची पुनरुत्पत्ति होणें हें त्या प्राण्याच्या जाती क़ायम राहण्याच्या दृष्टीनें अवश्य असल्यामुळें प्रत्येक प्राण्याच्या शरीरांत कांहीं रक्तपेशींचा पुनरुत्पादनव्यूह बनविलेला असतो.

**इंद्रोजी कदम**—एक मराठा वीर. सातारा ज़िल्ह्यांतील साप गांवच्या कदम घराण्यांतील हा होता. आपल्या पराक्रमानें यानें सरकारवरहि जरब बसाविली. गर्विष्ठपणामुळें हा सर्वांस तुच्छ लेखी. यानें आपल्या घोड्यांना रुप्याचे नाल मारले होते. त्याचा हेतु असा असे कीं, हे नाल परकीयांच्या प्रदेशांत पडावेत व आपलें वैभव त्यांना दिसावें. याच्या पुंडाईची, वैभवाची हकीगत ऐकून शाहूनें यास भेटण्यास बोलावलें. इतर प्रधानांप्रमाणें आपणांनजीक येतांच नौबत बंद करणार नाहीं अशी अट घालून अंगावर मौल्यवान् अलंकार चढवून डामडौलांत तो शाहूला भेटण्यास गेला. परंतु शाहूनें त्याच्या मनांतील हेतु जाणून आपल्या अंगावरील दागिने आपल्या कुत्र्याच्या गळ्यांत घातले व त्याची भेट अगदीं साध्या वेषांत घेतली, त्यामुळें त्याचा गर्व हरण झाला. पण त्या वेळेपासून हा प्रसिद्धीस आला. १७३७ सालच्या दिल्ली येथील लढाईत राणोजी शिंद्याच्या लष्करांत हा सरदार होता. १७५० पर्यंत हा साताऱ्याच्या दरबारांत वावरतांना दिसतो.

**इनाम**— ब्रिटिश अमदानीपूर्वी हिंदुस्थानांतील राज्यकर्ते खाजगी व्यक्तींना व धार्मिक संस्थांना देणगीदाखल जमिनी इनाम म्हणजे सरकारसारा माफ करून देत असत. व्यक्तींना इनाम ज़मिनी केवळ देणगी-बक्षीस म्हणून देत, किंवा कांहीं नोकरी बजावण्याच्या अटीवर देत असत; अशा जमिनीच्या देणगीला इनाम म्हणतात. हिंदुस्थानांत व विशेषतः मराठी मुलखांत इनाम याचा अर्थ सरकारसारा माफ करून दिलली जमीन असा आहे. अशी देणगी सामान्यतः निरंतरची व वंशपरंपरा दिलली असते. कित्येकदां, ती जमीन एखाद्या इसमाकडे मालकी हक्कानें असे व तिच्यावरील सरकारसारा देणगी म्हणून माफ करण्यांत येत असे. कित्येकदां जमीन देऊन शिवाय सरकारी तिजोरींतून नक्त रक्कम देणगीदाखल देण्यांत येत असे.

सरकारनें दिलेल्या जमिनीच्या किंवा नक्तीच्या देणग्यांचे केलेले प्रकार येणेंप्रमाणें : ( १ ) कांहीं चाकरी करण्याच्या अटीवर दिलली देणगी. अशा देणग्यांना चाकरी इनाम किंवा वतन म्हणतात. ( २ ) चाकरी करण्याची वगैरे कोणतीहि अट नसून दिलेली देणगी. अशी देणगी सरकारची मेहेरबानी म्हणून दिली जात असे. शुद्धाचरणी, विद्वान्, किंवा सुप्रसिद्ध साधु, किंवा राजाचे नातेवाईक किंवा इतर मर्जीतले इसम अशाना देणग्या देण्यांत येत असत. तसेंच मोडकळीस आलेल्या सरदारांच्या घराण्यांतील इसमांना किंवा लढाईत पडलेल्या शिपायांच्या वारसांना इनामें देत असत. यांना ‘ जात इनाम ’ म्हणतात. ( ३ ) तिसरा प्रकार धार्मिक देणग्यांचा. देवळें, मशिदी, धर्मशाळा, वगैरे संस्थांना दिलेल्या देणग्या या सदराखालीं येतात. यांना देवस्थान इनाम असें म्हणतात.

**इनोनु, इस्मत** ( १८८४- )—तुर्की लोकसत्ताक राज्याचा अध्यक्ष. १९०३ पासून हा लष्करी कामावर असे व मागच्या महायुद्धांत सीरियाच्या आघाडीवर कमांडर होता. १९१९ सालीं केमालपक्षांत शिरला व इनोनु येथें ग्रीकांना पराभव केला व स्मर्ना येथें विजय मिळविला. १९२२ पासून राज्यकारभारांत प्रामुख्यानें भाग घेऊं लागला; १९२३–३७ पर्यंत मुख्य प्रधान होता व १९३८ सालीं केमालपाशा वारल्यावर त्याच्या-मागून राज्याचा अध्यक्ष म्हणून निवडला गेला. तुर्कस्तानांतील लोकशाही पक्षाचा तो तहाहयात पुढारी आहे. तुर्की राष्ट्राची उन्नति करण्यासाठीं इनोनु सारखा झटत असतो.

**इनोसंट, पोप**—या नांवाचे एकंदर १३ पोप होऊन गेले. त्यांपैकीं पुढील पोप विशेष प्रसिद्ध आहेत.

१ ला इनोसंट (मृ. ४१७) — हा इ. स. ४०२ मध्यें १ ला अनास्टेशिअस याच्या मागून रोम शहराचा बिशप नेमला गेला. त्यानें सेंट ख्राइसोस्टोम याच्या मतांना पाठिंबा देऊन पूर्वेकडील धर्मसंस्थां (ईस्टर्न चर्चेस) बरोबर संबंध ठेवण्याबद्दल निषेध केला.

३ रा इनोसंट (११६१—१२१६) — याची पोपच्या अधिकारावर वयाच्या ३७ व्या वर्षी एकमतानें निवड झाली. त्यानें पोपची सत्ता खूप वाढवली. इंग्लंडमध्यें कँटरबरीचा आर्चबिशप या जागीं लँग्टन याची नेमणूक या पोपनें केली; पण त्याला इंग्लंडचा राजा जॉन यानें विरोध केला; म्हणून या पोपनें जॉनचें राज्यच समाजबहिष्कृत करण्याचा हुकूम काढला; आणि १२१२ मध्यें खुद्द जॉन राजाला पदच्युत केल्याचा हुकूम काढला. या पोपनें ११९८ मध्यें इन्क्विझिशन कोर्टाकडून अनेक आल्बिजेन्सेस या पाखंडी लोकांचा क्रूरपणें छळ केला. त्यानें कायदे व धार्मिक विषय यांवर कित्येक ग्रंथ लिहिले.

११ वा इनोसंट (१६११–'६८९) — १० वा क्लेमंट पोप वारल्यानंतर याची पोपच्या गादीवर १६७६ मध्यें निवड झाली. त्याची प्रामाणिकपणाबद्दल व कडक धर्माचरणाबद्दल ख्याति होती. फ्रान्सचा राजा १४ वा लुई याच्याबरोबर याचा तंटा झाला आणि त्यामुळें फ्रान्समध्यें आणि इतर ठिकाणीं पोपच्या अधिकाराला फार मोठा धक्का बसला.

**इन्क्विझिशन**—ख्रिस्ती धर्मांतील रोमन कॅथॉलिक पंथाच्या देशांमध्यें व राज्यांमध्यें या नांवाचीं कोर्टें उर्फ न्यायसभा पाखंडी (म्हणजे कॅथॉलिकांखेरीज ख्रिस्ती धर्मांतल्याच पण प्रॉटेस्टंट–प्यूरिटन वगैरे इतर पंथीय) लोकांची चौकशी करून त्यांना शिक्षा देण्याकरितां स्थापन केल्या होत्या. १२ व्या शतकांत पोप ३ रा इनोसंट यानें फादर डॉमिनिक या नांवाच्या धर्माधिकाऱ्याला कॅथॉलिक पंथीय राजांना व लोकांना पाखंडी लोकांचें निर्मूलन करण्याच्या कामीं उत्तेजन देण्याच्या कामगिरीवर नेमलें होतें, व त्या फादरनें हीं या प्रकारचीं कोर्टें मूळ स्थापन केलीं. पोप ९ वा ग्रेगरी यानें १२३३ मध्यें या कोर्टाची योजना पूर्णपणें अमलांत आणली व तदनुसार इटलीच्या अनेक भागांत आणि फ्रान्समधील कांहीं भागांत हीं कोर्टें स्थापन झालीं. इंग्लंडमध्यें मात्र असलें एकहि कोर्ट नव्हतें. १३ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास स्पेनमध्यें असलीं कोर्टें स्थापलीं गेलीं. पण पुढें युरोपांत स्पेनखेरीज इतर देशांत या कोर्टांना मोठा विरोध होऊन तीं नष्टप्राय झालीं. स्पेनमध्यें मात्र राजा फर्डिनांड व राणी इसाबेला यांच्या कारकीर्दींत १५ व्या शतकाच्या अखेरीस या कोर्टाचा अमल जारीनें सुरू झाला; आणि या कोर्टाकडून सुमारें २०,००० हून अधिक पाखंडी लोकांना शिक्षा दिल्या गेल्या. पाखंडी लोकांना त्यांच्या अपराधाबद्दल जन्मठेप कैद, फटक्यांची शिक्षा आणि त्यांची सर्व खाजगी मालमत्ता जप्त करणें, या शिक्षा होत असत. कांहींना मृत्यूची शिक्षा देण्यांत येई आणि ती शिक्षा त्या पाखंड्याला सार्वजनिक ठिकाणीं जिवंत जाळून अमलांत आणीत असत. पुढें या कोर्टांच्या अधिकारावर नियंत्रणें घातलीं जाऊन जोसेफ बोनापार्ट या राजाच्या कारकीर्दींत १८०८ मध्यें हीं कोर्टें रद्द झालीं. १८१४ मध्यें ७ व्या फर्डिनंड राजानें हीं कोर्टें पुन्हां स्थापलीं, पण १८३४ मध्यें तीं कायमचीं बंद झालीं. स्पेनमधील या कोर्टांनीं १४८१ पासून १८०८ पर्यंत ३,४१,०२१ इतक्या पाखंड्यांना शिक्षा दिल्या व त्यांपैकीं सुमारें ३,२०,००० पाखंडी इसमांना जिवंत जाळलें. गोव्यांत पोर्तुगीज सरकारनें १५६० सालीं ही संस्था स्थापन करून हिंदूंचे अत्यंत हाल केले व असंख्य लोकांना धर्मांतर करावयास लाविलें. पुढें इंग्रजांचें हिंदुस्थानवर वर्चस्व झाल्यावर त्यांनीं १८१२ त ही संस्था मोडून टाकण्यास भाग पाडलें.

**इन्फ्ल्युएन्झा**—हा एक तीव्र सांसर्गिक रोग असून याचीं लक्षणें अनेक आहेत, पण त्यांपैकीं मुख्य म्हणजे श्वासोच्छ्वासास अडथळा होणें हें होय. याची सांथ एखाद्या वेळीं सर्व जगभर येते आणि फार जलद पसरते. हा रोग एखाद्या जंतूपासून उत्पन्न होत असावा अशी समजूत आहे. परंतु तो कोणता असावा याबद्दल अद्यापि मतभेद आहे. परंतु रोग उत्पन्न करणारा एक विशिष्ट प्राथमिक जंतु असून त्यास आनुषंगिक असे इतर जंतू साहाय्यक असतात अशी समजूत आहे. या रोगाची गर्भावस्था फार अल्पकाल–बहुधा दोन दिवस असते. परंतु कधीं कधीं कांहीं तासांपासून पांच दिवसांपर्यंत असूं शकते आणि या अल्प गर्भावस्थेमुळें सांथींमध्यें हा रोग फार जलद पसरतो. याचे मुख्यतः चार प्रकार आहेत: (१) साधा ज्वर प्रकार-याचा उद्भव अचानकपणें होतो आणि आरंभीं पाठ, डोकें व इतर भाग यांत तीव्र कळा येऊं लागतात. थंडी वाजते व ग्लानी येते. ताप भराभर चढूं लागतो आणि जिभेवर बुरा येतो. घसा धरतो व कोरडा खोकला येतो. तीन–चार दिवसांनंतर ताप जातो व रोग्यामध्यें कांहीं दिवस अशक्तता व विमनस्कता राहते. याच प्रकारची वाढ कांहीं कारणांमुळें दुसऱ्या एखाद्या प्रकारांत होण्याचा संभव असतो. याकरितां याची चांगली काळजी घेतली पाहिजे. (२) श्वासबंधक प्रकार—या प्रकारामध्यें वरीलप्रमाणेंच तापाचीं लक्षणें होऊन वेदना होतात व ग्लानी येते, आणि खोकला विशेष वाढतो. या प्रकारांत श्वासनलिकादाह व श्वासजन्य फुप्फुसदाह होण्याचा संभव असतो. या रोगाची तीव्रता दोन ते तीन आठवडे असून

त्यानंतर उतार पडूं लागतो. परंतु पूर्ण बरें होण्यास बरेच दिवस लागतात. या रोगाची फार तीव्रता असल्यास तीस तासांच्या आंत मृत्यु येण्याचा संभव असतो. ( ३ ) जाठर प्रकार—या या प्रकारामध्यें डोकें व पाठ यांमध्यें वेदना होतात; त्याप्रमाणेंच पोटांतहि होऊं लागून वांति व क्वचित् अतिसार होतो. रोग्यास पूर्णपणें अरुचि उत्पन्न होऊन जिभेवर खरे येतात व श्वास दुर्गंधियुक्त येऊं लागतो. हीं लक्षणें प्रारंभींच इतक्या तीव्र स्वरूपाचीं होतात कीं, हा जाठर प्रकार आहे असें वाटूं लागून शस्त्रक्रिया करणें अवश्य होतें. ( ४ ) मेंदूचा अथवा मज्जातंतु प्रकार—या प्रकारांत डोकें दुखी, पाठ दुखो व ग्लानी हीं मुख्य लक्षणें असून निद्रानाश होतो आणि रोगी वरळूं लागतो. अशा रोग्यास बिछान्यावर निजवून पूर्ण विश्रांति देणें अवश्य असतें; तसेंच ताप उतरल्यावर आणि छातींतील सर्व लक्षणें नाहींशीं झाल्यावर कमींत कमी तीन दिवस त्यास बिछान्यांतून उटूं देतां कामा नये. शक्यतों रोग्यास वेगळा ठेवून पातळ आहार द्यावा आणि त्याची शुश्रूषा चांगली करावी. फार अस्वस्थता वाटल्यास झोंपेचें औषध द्यावें. छातीस शेक द्यावा आणि पाठदुखीवर औषध द्यावें.

**इनलंड समुद्र**—होनशू व शिकोकू या दोन जपानी बेटांमधील हा समुद्र सगळीकडून जवळजवळ जमिनीनें वेष्टिलेला आहे. ओसाकाच्या उपसागरापासून सिमोनोसेकी सामुद्रधुनीपर्यंत त्याचा विस्तार आहे. या समुद्रांत पुष्कळ बेटें असून त्यांवर वरींच देवळें आहेत. या बेटांचें नैसर्गिक सौंदर्य अप्रतिम आहे. कांहीं ठिकाणीं बोटींना जरी धोका असला तरी महासागरी बोटी या समुद्रांतून प्रवास करतात. या समुद्रांत मच्छीमारीचा धंदा जोरांत चालतो.

**इनव्हर्नेस**—हें स्कॉटलंड देशामधील इनव्हर्नेसशायर परगण्यांतलें बंदर व मुख्य ठिकाण आहे. याची लोकसंख्या सुमारें ८१,०४० आहे. दारू काढणें, कातडीं कमावणें, साबण व मेणबत्त्या करणें, हे मुख्य धंदे चालतात. जहाजें बांधण्याचा धंदा थोड्या प्रमाणावर चालतो.

इनव्हर्नेस हें पिक्ट लोकांचें अत्यंत मजबूत ठिकाण होतें. ईशान्येस अर्ध्या मैलावर असलेल्या एका टेकडीवर एक किल्ला असून त्यांत मॅक्बेथनें डंकनचा खून केला.

**इन्शा** ( सन १७१५–१७९५ )—( सैयद इन्शा अल्लाखाँ ). एक उर्दू–फारसी कवि. याचें घराणें मूळ समरकंदाचें. याचा जन्म दिल्ली येथें झाला. लहानपणापासूनच हा चलाख व प्रतिभावान् कवि होता. यास गाण्याबजावण्याचाहि बराच नाद असे. याचे गुण जाणून दिल्लीच्या शहाअलम बादशहानें यास आपल्या पदरीं ठेवलें. हा गुणी, हजरजबाबी, मधुर भाषणी असल्यानें दिल्लीच्या दरबारांत याची चांगली चहा झाली. पण पुढें बादशहाशीं न जमल्यानें याचें वेतन कमी झालें. याला हिंदुस्थानांतील बऱ्याच ( मराठी धरून ) भाषा येत. 'उर्दू गझलो का दिवान,', 'मुर्गनामा', 'दीवान बेनुक्त' यांसारखे पंधरा ग्रंथ यानें लिहिले.

**इंपे, सर एलिजा** ( १७३२–१८०९ )—बंगालचा सरन्यायाधीश. त्याचें शिक्षण वॉरन हेस्टिंग्सबरोबर वेस्ट मिन्स्टर येथें झालें. १७७३ मध्यें ह्याला कलकत्त्याला नवीन वरिष्ठ कोर्टामध्यें पहिला सरन्यायाधीश नेमण्यांत आलें. इ. स. १७७५ त नंदकुमाराचा खटला याच्यापुढें चालला होता, व या खटल्यामुळेच याचें नांव इतिहासांत प्रामुख्यानें या काळीं पुढें येतें. १७८७ मध्यें हाऊस ऑफ कॉमन्सपुढें त्याच्यावर नंदकुमाराचा कायद्यानें खून करण्याच्या आरोपावरून खटला करण्यांत आला. बर्क, मिल, थॉर्नटन, मेकाले इत्यादिकांनीं इंपेवर अनेक गुन्हे लादून त्याला दोषी ठरविण्याचा आटोकाट प्रयत्न केला, पण तो सफल झाला नाहीं. हेस्टिंग्सचा हा मित्र होता.

१७८० मध्यें हेस्टिंग्स व त्याचें मंत्रिमंडळ यांच्यांत तंटे सुरू असतां, इंपेला कंपनीच्या कोर्टाचा म्हणजे 'सदर दिवाण अदलत'चा मुख्य नेमण्यांत आलें.

इंपे हा फार धोरणी व हुषार न्यायाधीश होता. त्यानें मोठ्या मेहनतीनें १७८१ त एक कोड तयार केलें. हिंदूंचे आचारविचार ओळखून तो न्याय देत असे.

**इंफाल**—आसाम, मणिपूर संस्थानची राजधानी. ह्या शहराची लोकसंख्या ( १९४१ ) ९९,७१६ होती. ह्यांपैकीं शेंकडा ९६ लोक हिंदू आहेत. एवढी मोठी जरी लोकसंख्या आहे तरी ह्या ठिकाणाला शहर म्हणण्यापेक्षा अति विस्तृत खेडेगांव म्हटलेलें जास्त शोभेल. कारण ह्या ठिकाणाला तीन नद्या येऊन मिळतात व प्रत्येक नदीच्या तीरावर झोपड्यांची एक रांग आहे. भोंवतालीं झाडांची खूप दाटी आहे. ह्या ठिकाणीं पाऊस ७० इंच पडतो. गेल्या महायुद्धांत इंफालवर जपान्यांची स्वारी झाली होती.

**इफेल टॉवर**—गुस्ताव्ह इफेल या गृहस्थानें हा उंच मनोरा १८८९ मध्यें पॅरीसजवळ बांधलेला असून त्याला सुमारें २,६०,००० पौंड किंमतीचें सामान लागलें. याची उंची ९८६ फूट आहे. पहिला मजला १८९ फूट उंच असून दुसरा ३८० फुटांवर आहे आणि तिसरा ९०६ फुटांवर आहे. या मनोऱ्यावरून हवेचा दाब, लंबकाची गति, वस्तु वरून पडतांना तिचा वेग वगैरे शास्त्रीय प्रयोग केले गेले. आणि अलीकडे हा मनोरा म्हणजे बिनतारी तारायंत्राचें एक ठिकाण म्हणून त्याचा उपयोग करतात.

**इबादी पंथ**—एक मुसलमानी पंथ. या पंथाचा संस्थापक अब्दल्ला बिन इबाद हा होता. हा सातव्या शतकांत होऊन गेला. इब्न इबाद यानें काफीर शब्दाचा फांशीची शिक्षा ज्याला आहे असा गुन्हा केलेला मुसलमान असा निराळाच अर्थ केला. अशा काफिरांना जिवें मारावें असें तो म्हणतो. इबादी पंथाचीं तत्त्वें सुनी पंथासारखींच बहुतेक आहेत. आल्जीरियांत या पंथाचे लोक पन्नास हजारांवर आहेत. झांझीबारचा सुलतान इबादी पंथाचा आहे.

**इबेक्स**—ही एक बकऱ्यांची जात असून हीमध्यें दोन प्रकार आहेत. पहिला प्रकार आल्प्स, अपेनाइन आणि मध्य आफ्रिका यांत दिसून येतो. दुसरा प्रकार इराण, कॉकेशस पर्वत, आणि सिंध यांमध्यें दिसून येतो. हिमालयीन इबेक्स (बकरे) सर्वांत मोठे असून कळप करून राहतात. त्यांची फार शिकार करण्यात येते, तथापि त्यांची संख्या कमी होत नाहीं.

**इब्न गॅबिरोल**—(सालोमन बेनजुडा). हा यहुदी कवि व तत्त्वज्ञानी १०२१ च्या सुमारास मलग येथें जन्मला. लहान असतांनाच त्याचे आई-बाप वारले. सॅम्युएल इ नगीद या विद्वानांच्या पोशिंद्यापाशीं तो राहिला. त्याच्या रागीट स्वभावामुळें सॅम्युएलचें व त्याचें भांडण होत असे. गॅबिरोल हा लहान वयांतच वारला असें सर्वांचें मत आहे.

त्याचा वाङ्मयाभ्यास लहान असतांनाच सुरू झाला. सोळाव्या वर्षी त्यानें पद्यें रचिलीं. याच सुमारास व्याकरणावर 'अनक' नांवाचें एक काव्य केलें. हिब्रूमध्यें अरबी छंद योजण्याचा त्यानें परिपाठ घालून दिला. वीणाकाव्यें आणि औपरोधिक काव्यें यांखेरीज सामाजिक प्रार्थनागीतेंहि त्यानें रचिलीं आहेत. त्याच्या प्रार्थनागीतांतील अति विख्यात म्हणजे केथर, मलकूत (प्रायश्चित्त दिनाकरितां) आणि अझरोथ हीं होत.

ज्यू समाजाबाहेर तो तत्त्वज्ञानी अव्हिसेब्रॉन म्हणून ओळखला जाई. अव्हिसब्रॉननें आपला तत्त्वज्ञानी पंथ स्वतंत्रपणें उभारला. त्याचीं मतें ज्यू संप्रदायाला मुळींच मान्य न होणारीं अशीं होतीं. त्याचा दुसरा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे 'इसला अल् अखलाग' (स्वभावसुधारणा). 'मिबहार हपेनीनीम' हा अरबी भाषेंतील सुभाषितांचा ग्रंथ त्याच्याच नांवावर मोडतो.

**इब्न बतूता** (१३०४-१३७७)—हा तांजरचा रहिवासी असून त्यानें ईजिप्त, सीरिया, अरबस्तान, इराण, मध्य आशिया, हिंदुस्थान, चीन, मलाया, पूर्व व मध्य आफ्रिका या ठिकाणीं प्रवास केला. त्यानें आपला प्रवासवृत्तान्त लिहून ठेवला आहे. हिंदुस्थानांत हा महमद तुघलखाच्या कारकीर्दींत (१३४०) आला होता व दिल्ली येथें कांहीं दिवस न्यायाधीश होता. यानें केलेलें दिल्लीचें वर्णन मनोरंजक आहे.

**इब्न साऊद** (१८८०- )—साउदी अरबस्तानाचा राजा. हा वाहाबी घराण्यांतला राजपुत्र हद्दपार केला गेला होता, पण मोठ्या युक्तीनें आणि शौर्यानें यानें आपल्या पूर्वजांचें राज्य मिळविलें. यानें पशुपालनवृत्तीचा आपल्या प्रजेस त्याग करावयास लावून कृषिबल बनविलें व इतर सामाजिक सुधारणा केल्या. १९३८ त त्यानें तुर्कांना पूर्व अरबस्तानांतून घालवून दिलें. यानें ब्रिटिश सरकारच्या मर्जीविरुद्ध हेजाजच्या राज्याशीं युद्ध केलें व मक्का जिंकून घेतली (१९२४). अशा रीतीनें स्वपराक्रमानें तो नेज्द आणि हेजाज या प्रदेशांचा सत्ताधीश झाला. या दोन प्रदेशांचें एक नांव सउिदी अरबस्तान असें ठेवण्यांत आलें. इब्न साऊद हा वाहाबी लोकांचा पुढारी असल्यानें त्याला राज्यांत सुधारणा फार जपून कराव्या लागतात. त्यानें अरबस्तानचें बळ वाढविलें व युरोपियन राष्ट्रांना त्याकडे आदरानें पहावयास लाविलें. आज साउदी अरबस्तान 'युनो' चा एक सभासद आहे.

**इब्राहिम आदिलशहा**—१. (१५३४-१५५७) विजापूरचा एक बादशहा. यानें राज्यांत सुनी पंथ चालू केला व सरकारी दप्तर मराठी भाषेंत आणि मोडी लिपींत ठेवण्याचा प्रघात पाडला. फडणिसींत ब्राह्मण कारकून ठेविले. याची बहुतेक कारकीर्द विजयानगरच्या राज्याशीं लढण्यांत गेली. हा स्वतः मोहिमांवर जात असे. आयुष्याच्या अखेरीस याला व्यसनें लागून याचे पूर्वीचे चांगले गुण मावळले.

२. (१५८०-१६२७) विजापूरचा एक बादशहा. हा वयाच्या नवव्या वर्षी गादीवर बसला. याची चुलती चांदबिबी याच्या शिक्षणावर देखरेख करी. अज्ञानदशेंत दिलावरखान नांवाच्या दिवाणानें राज्याचें चांगलें हित पाहिलें. हा वयांत आल्यावर यानें चांगला दक्षतेनें कारभार केला. यानें कर्नाटक प्रांतावर बऱ्याच स्वाऱ्या केल्या. याला गाण्याचा फार नाद होता व त्यासाठीं तो सरस्वतीची आराधना करी. याच्या फर्मानावर 'पूज्य श्री सरस्वती' असा प्रारंभीं मायना असे. याला हिंदू लोक जगद्गुरु म्हणत. याची एक मुलगी अकबराच्या दानियल नांवाच्या मुलास दिली होती. याचें हिंदुधर्माकडे विशेष लक्ष असल्यानें हा हिंदूंना आवडता होता.

**इब्राहिम कुतुबशहा** (१५५०-१५८०)—गोवळकोंड्याचा एक बादशहा. पहिला कुली कुतुबशहाचा मुलगा व जमशीदचा भाऊ. जमशीदच्या मृत्यूनंतर त्याचे सरदार त्याच्या सात वर्षे

वयाच्या मुलाला गादीवर बसवून राज्य हांकूं लागले; पण जेव्हां हा बाल सुलतान राज्यास अयोग्य वाटला तेव्हां विजयनगराहून इब्राहिमला बोलावणें धाडून त्याला राज्याभिषेक केला (१५५०). इब्राहिमनें इतर मुसलमान राजांना बरोबर घेऊन विजयनगरच्या रामराजावर स्वारी १५६५ त केली. या लढाईंत रामराजाचा पराभव होऊन तो मारला गेला. इब्राहिम ३२ वर्षें मोठ्या ऐश्वर्यांत घालवून वारला. याच्या कारकीर्दीत मराठ्यांचा उत्कर्ष झाला. याचा दिवाण जगदेवराव नांवाचा मराठा सरदार होता. तथापि यानें बरींच हिंदु राज्यें धुळीस मिळविलीं. इब्राहिम स्वतः चांगला विद्वान् होता. राज्यांत त्यानें बंदोबस्तहि चांगला ठेविला. कलाकौशल्याचीं बांधकामेंहि करून घेतलीं. न्याय देण्याच्या बाबतींत फार दक्ष म्हणून या बादशहाची ख्याति होती.

**इब्राहिमखान गारदी**—मराठ्यांकडील एक तोफखान्यावरील सरदार. इब्राहिमखान हा आरंभीं बुसीच्या हिंदी शिपायांवरील एक अमलदार होता. पुढें कांहीं कारणामुळें बुसीची त्याजवर इतराजी झाली; व म्हणून तो बुसीची चाकरी सोडून वऱ्हाडांत निजामअल्लीकडे गेला. परंतु पुढें लवकरच आपला भाऊ सलाबतजंग याचें मन राखण्याकरितां निजामअल्लीनें इब्राहिमखानास आपल्या नोकरींतून कमी केलें. यानंतर इब्राहिमखानास सदाशिवराव भाऊनें आपल्या पदरीं ठेवलें. इब्राहिमखानाजवळ उत्तम तोफखाना असून यानें आपल्या पायदळ सैनिकांस युरोपियन शिपायांच्या धर्तीवर कवायतीचें शिक्षण दिलेलें होतें. हा उदगीरच्या लढाईंत सदाशिवरावभाऊबरोबर होता.

इब्राहिमखानाच्या उत्तम तोफखान्याच्या व कवाईत शिकविलेल्या याच्या पायदळांतील १०,००० शिपायांच्या कार्यक्षमतेवर सदाशिवरावभाऊंचा इतका दृढविश्वास होता कीं, यांच्या मदतीनें आपण अफगाण लोकांशीं समोरासमोर लढून यांचा सहज पराभव करूं शकूं असें त्यास वाटून मल्हारराव होळकर व सुरजमल्ल जाट यांच्या सल्ल्यास न जुमानतां तो आपलें सैन्य घेऊन अबदालीशीं समोरासमोर युद्ध करावयास गेला. दिल्लीचा किल्ला सर करण्यांत व कुंजपुरा घेण्यांत इब्राहिमखानाच्या तोफखान्याची भाऊस फार मदत झाली होती. परंतु पानिपत येथें अडकून पडल्यावर मात्र इब्राहिमखानाचें पायदळ व त्याचा अवजड तोफखाना यांमुळें मराठ्यांस फार पेंच पडला. ता. १४ जानेवारी सन १७६१ रोजीं पानिपतच्या रणभूमीवर मराठे व अफगाण यांमध्यें जी अखेरची घनचक्कर लढाई झाली, तींत इब्राहिमखानानें सुमारें ८,००० रोहिल्यांस रणभूमीवर लोळवून आपल्यासमोरच्या अफगाण सैन्याचा मोड केला होता. परंतु या युद्धांत अखेरीस मराठ्यांचा मोड झाल्यावर तो जखमी होऊन शत्रूच्या हातीं लागला व त्याचा शिरच्छेद करण्यांत आला.



**इब्राहिम पाशा** (१७८९–१८४८)—एक ईजिप्तमधील सेनानी. यानें १८२५ सालीं मोरिआवर स्वारी केली व १८३१ सालीं पॅलेस्टाइन व सीरिया प्रांत जिंकला. १८३९ सालीं तुर्की सैन्याचा यानें पुन्हां मोठा पराभव केला. पण बड्या राष्ट्रांच्या मध्यस्थीवरून इब्राहिमपाशाला ईजिप्तमध्यें परत यावें लागलें.

**इब्राहिम लोदी** (१५१७–१५२६)—लोदी घराण्यांतील दिल्लीचा शेवटचा बादशहा. हा अफगाण सरदारांना फार धाकांत ठेवी. यामुळें लवकरच अप्रिय झाला व ते सरदार हळूहळू स्वतंत्र होऊं लागले. त्यांपैकीं दौलतखान लोदी नांवाच्या पंजाबच्या सुभेदारानें बाबरला काबूलहून बोलाविलें. पानिपत येथें बाबरनें इब्राहिमचा पराभव करून त्याला ठार केलें व मोंगल बादशाही स्थापन केली.

**इब्रो**—स्पेनमधील सांटाडोर या प्रांतांत उगम पावणारी ही नदी सर्व देशांत मोठी होय. ही नदी आग्नेयीकडे सुमारें ५०० मैल वाहत जाऊन भूमध्य समुद्राला मिळते. या नदीच्या खडकाळपणामुळें जलमार्ग या नात्यानें उपयोग होत नाहीं. परंतु तो व्हावा यासाठीं १०० मैल लांबीचा एक कालवा या नदीला खोदलेला आहे. सॅरागोसा हें या नदीवरील मुख्य व महत्त्वाचें शहर आहे.

**इब्लिस**—किंवा एब्लिस. मुसल्मानी पुराणांतील सैतान. शैतान या नांवानें कुराणांत याचा बऱ्याच वेळां उल्लेख आलेला आहे. दुष्ट भुतांचा तो राजा असें त्या ठिकाणीं दाखविलें असून मूळ ज्यू प्रकृतीवरून ही व्यक्ति बनविल्याचें उघड दिसतें. इब्लिसनें अल्लाविरुद्ध बंड केलें, म्हणून त्याला स्वर्गांतून हांकून देण्यांत आलें. त्याला प्रथम देहदंडाची शिक्षा देण्यांत आली होती; पण त्याच्या विनवणीवरून उत्थापनाच्या दिवसापर्यंत त्याला ईश्वरानें अवधि दिला (कुराण ७, १३).

**इब्सेन, हेन्रिक** (१८२८–१९०६)—नॉर्वे देशांतला हा प्रख्यात नाटककार व कवि होय. याचें शिक्षण एका शास्त्रीय शाळेंत फारच थोडें झालें होतें; आणि वयाचीं १६ ते २३ हीं वर्षें यानें एका औषधी–विक्रेत्याच्या दुकानांत खस्तत घालविलीं. त्यानें प्रथम निर्यमक पद्यमय शोकपर्यवसायी नाटक 'कॅटीलिना' स. १८५० मध्यें प्रसिद्ध केलें. स. १८५१ मध्यें त्याला बर्जेन शहरांतील 'ओल बुल्स' नाटकगृहाचा डायरेक्टर नेमिलें. या नाटकगृहांत

करण्याकरितां त्यानें कित्येक अद्भुत रसात्मक नाटकें लिहिलीं. त्यांपैकीं सर्वांत महत्त्वाचें नाटक ' मिस्ट्रेस इंगर ॲट ऑस्ट्राट ' हें रंगभूमीवर स. १८५५ मध्यें आलें. ' दि फीस्ट ॲट सोलहॉग ' हें शोकान्त नाटक १८५६ मध्यें दाखविलें गेलें. पुढील वर्षी इब्सेन खिश्चॅनिआ या राजधानींतील राष्ट्रीय नाट्यगृहाचा व्यवस्थापक झाला, आणि लवकरच त्यानें ' वॉरिअर्स इन् हेंगेलँड, ' या नांवाचें उत्तम नाटक लिहिलें. त्याचें कथानक आइस्लंड बेटांतील संतचरित्रात्मक दंतकथांवर लिहिलें होतें. १८६२ मध्यें ' लव्हज कॉमेडी ' हें फार सुंदर पद्यात्मक नाटक आणि पुढें दोन वर्षांनीं ' दि प्रिटेंडर्स ' हें आणखी एक सुंदर गद्य नाटक प्रसिद्ध झालें. १८६६ ' ब्रँड ' या नांवाचें उज्वल काव्य प्रसिद्ध झालें. १७६९ मध्यें इब्सेननें आपलें पहिलें वास्तववादी गद्य-नाटक ' दि लीग ऑफ यूथ ' हें प्रसिद्ध केलें. १८७३ मध्यें त्यानें आपलें शेवटलें ऐतिहासिक नाटक ' एंपरर ॲंड गॅलिलियन ' हें प्रसिद्ध केलें. यानंतर इब्सेननें सामाजिक नाटकें लिहिण्यास सुरुवात केली. ' पिलर्स ऑफ सोसायटी ' ( १८७७ ) या नाटकांत त्यानें एका मध्यमवर्गीय सुखवस्तु कुटुंबाचा ढोंगीपणा हा सामाजिक दोष दाखवला आहे. ' डॉल्स हाउस ' ( १८७९ ) या नाटकांत त्यानें स्त्रियांचे हक्क व अधिकार याबद्दलच्या नव्या कल्पना जुन्या मतांच्या लोकांना धक्का बसेल अशा रीतीनें पुढें मांडल्या आहेत; त्या नाटकाचा उद्देशहि सिद्धीस गेला. ' घोस्ट्स् ' ( १८७१ ) आणि ' एनिमी ऑफ दि पीपल ' ( १८८२ ) हीं दोन एकमेकांना पूरक अशीं नाटकें त्यानें लिहिलीं. ' दि वाइल्ड डक् ' ( १८८४ ) हें रचनात्मकदृष्ट्या सर्वोत्कृष्ट नाटक, ' रोझमशोल्म ' ( १८८६ ) हें सर्वोत्कृष्ट दुःखान्त नाटक आणि ' मास्टर बिल्डर ' ( १८९२ ) हीं तीन इब्सेनचीं सर्वोत्कृष्ट नाटकें मानलीं जातात. ' लिट्ल् आयोल्फ ' ( १८९४ ) या नाटकांतहि वैवाहिक जीवनाबद्दलचे प्रश्न विवेचिले आहेत व या नाटकाची रचना फार कौशल्यपूर्ण आहे. ' जॉन गेब्रीएल बॉर्कमन् ' ( १८९६ ) हें इब्सेनच्या चांगल्या नाटकांपैकीं शेवटचें नाटक होय. स. १९०० मध्यें त्यानें ' व्हेन वी डेड अवेकन ' हें शेवटचें नाटक लिहिलें, पण त्या नाटकांत इब्सेनची मानसिक दुर्बलताच स्पष्ट दिसते. १९०१ मध्यें त्याची प्रकृति फार ढांसळली आणि तो लवकरच मृत्यु पावला.

इब्सेनचीं नाटकें कांहीं बाबतींत मनाला धक्का देणारीं आहेत; पण एकंदरींत त्याच्या नाटकांनीं युरोपांतील नाट्य-वाङ्मयावर फार चांगला परिणाम केला. नाटकांमधील एकान्तिक भाषणें आणि जनान्तिक भाषणें या प्रकारांची इब्सेननें रंगभूमी-वरून पार हकालपट्टी केली. तथापि, इब्सेनच्या नाटकांतील बहुतेक पात्रें हलक्या दर्जाचीं व तिरस्करणीय असून त्याच्या पुष्कळ नाटकांचीं कथानकें विकृत स्वरूपाचीं आहेत, असें मत सामान्यतः व्यक्त करण्यांत येतें.

**इमरसन, राल्फ वाल्डो** ( १८०३—१८८२ )—अमेरिकन ग्रंथकार व कवि. त्याच्या निबंधांचे दोन संग्रह १८४१ ते ४४ मध्यें प्रसिद्ध झाल्यानंतर पांच वर्षांनीं ' रिप्रेझेन्टेटिव्ह मेन ' हा त्याचा सुप्रसिद्ध ग्रंथ बाहेर पडला. ' पारनॅसस ' नांवाचा कविता-संग्रहहि असाच प्रसिद्ध आहे. अमेरिकेच्या प्रमुख साहित्यिकांत इमरसनला वरचें स्थान आहे. एकोणिसाव्या शतकांतील नीतिशिक्षक म्हणून त्याचें लिखाण फार उपयुक्त आणि परिणामकारक आहे. त्याची इंग्लंडांतील कार्लाइल, कोलरिज, वर्ड्स्वर्थ, वगैरे थोर साहित्यिकांशीं मैत्री होती. इंग्लिश लोकांसंबंधीं त्यानें ' इंग्लिश ट्रेट ' मध्यें सुरेख टीका केली आहे.

**इमादशाही** ( १४८४–१५७४ )—वऱ्हाडांत एलिचपूर येथें अर्वाचीन काळांत हें एकच स्वतंत्र राज्य होऊन गेलें. या घराण्याच्या कारकीर्दींत वऱ्हाडला बरेंच महत्त्व आलें व त्याचा विस्तार बराच झाला. या घराण्याचा संस्थापक फत्तेउल्ला होय.

फत्तेउल्ला इमादशहा हा मूळचा तैलंगी ब्राह्मण. ह्याचा बाप विजयनगरांत राहत असे. विजयनगरच्या राजाबरोबर चाललेल्या लढाईंत कैद होऊन तो मुसलमानांच्या हातीं लागला, आणि त्यास मुसलमानी धर्माची दीक्षा मिळाली. तेव्हांपासून तो बहामनी राज्यांतील महमद गवानच्या मेहेरबानीनें हळू-हळू योग्यतेस चढला. पुढें त्यास इमाद-उलमुल्क हा किताब व वऱ्हाडची सुभेदारी मिळाली. सन १४८४ त इमादशहा असें नांव धारण करून तो आपल्या सुभ्याचा कारभार स्वतंत्रपणें करूं लागला. पुढें तो त्याच वर्षी मरण पावला. त्याच्यानंतर अल्लाउद्दीन इमादशहा गादीवर आला. अल्लाउद्दीन १५२७ त मरण पावला. आणि त्याचा ज्येष्ठ पुत्र दर्या इमादशहा तख्तावर आला.

दर्या इमादशहानें निजामशहाच्या घराण्याशीं सोयरीक केली. त्याच्या अमलांत दंगेधोपे न होतां राज्यांत शांतता होती. त्याचा मुलगा बुऱ्हाण इमादशहा लहान असतांच गादीवर आला. त्याच्या अल्प वयांत तोफलखान नामक एका धाडसी व धूर्त सरदारानें सर्व अधिकार बळकाविला. सन १५७२ ह्या वर्षी तोफलखानवर मुर्तुझा निजामशहानें स्वारी केली. तोफलखान नरनाळ किल्ल्यांत जाऊन राहिला. मुर्तुझा निजामशहा व त्याचा दिवाण जंगीजखान यांनीं तोफलखान व इमादशहाचा वंशज ह्यांस जिंकून ठार मारलें, आणि वऱ्हाडचें राज्य अहमदनगरच्या निजामशाहीस जोडलें. याप्रमाणें इमादशाहीचा शेवट झाला.

इमादशाहींत कलाकौशल्यास चांगलें उत्तेजन मिळालें. एलिचपूरच्या आसपास हल्लीं जे रेशमी व सुती कापडाचे कारखाने आहेत ते त्या वेळपासूनचे होत. लहान-मोठे किल्ले तेव्हांच बांधले गेले.

**इमाम**—हा अरबी शब्द असून याचा अर्थ ज्याचें चांगलें-वाईट अनुकरण करावयाचें तो पुढारी, नेता, असा आहे.

अलीच्या कुळांतील बारा शिया, मुसलमानी राजे, व खलीफ यांना इमाम म्हणत. आज मशिदींतील उपाध्यायांनाहि इमाम म्हणतात.

**इमाम, सर अली**( १८६९-१९३२ )—एक हिंदी मुसलमान पुढारी व कायदेपंडित. हे बॅरिस्टर झाल्यावर यांनीं बिहारमध्यें वकिली सुरू केली व नांव मिळविलें. १९१०-१६ या अवधींत ते व्हॉइसरायच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते. पुढें कांहीं महिने कलकत्ता हायकोर्टाचे एक न्यायाधीशहि होते. लीग ऑफ नेशन्समध्यें हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून बसण्याचा अपूर्व मान यांना मिळाला ( १९२० ). १९१८-२१ हीं तीन वर्षें ते हैद्राबाद संस्थानचे दिवाण होते. त्यांनीं तेथें न्याय आणि अमलबजावणी हीं खातीं वेगळीं केलीं व निजामाला वऱ्हाड मिळवून देण्याचा प्रयत्न केला. मुसलमानांनीं संयुक्त मतदारसंघाची मागणी करावी या मताचे ते पुढील आयुष्यांत बनले. दुसऱ्या राउंड टेबल कॉन्फरन्सला ते उपस्थित होते. लखनौ येथें १९३१ सालीं भरलेल्या राष्ट्रीय मुस्लिम परिषदेचे ते अध्यक्ष होते.

**इमारती लांकूड**—झाडाच्या बाहेरचा भाग बहुधा रंगानें फिकट आणि आंतील गाभ्यापेक्षां लांकूड या दृष्टीनें हलका व कमी प्रतीचा असतो. आंतील गाभा अथवा झाड हें त्यांत जीं द्रव्यें भिनलेलीं असतात, त्यामुळें अधिक कठिण, घट्ट व रंगानें काळसर असतें. लांकूड नाश पावण्याचें मुख्य कारण त्यांतील दमटपणा व त्याला निरनिराळ्या दमट व कोरड्या जागीं वरचेवर हालविण्यांत येणें हें असतें. तसेंच त्यास उष्णता लागली, वारा खेळता नसला, तर लांकूड नाश पावतें. यामुळें जमिनींत खोल पुरलेलीं, पाण्यांत ठेवलेलीं किंवा अगदीं कोरडीं ठेवलेलीं लांकडें लवकर नाश पावत नाहींत. इतर सर्व परिस्थितींत लांकडांचें जर कृमिग्न व बुरशी वगैरेंचा नाश करणाऱ्या औषधांनीं रक्षण केलें नाहीं तर तीं कुजून जातात.

ज्या लांकडांचा व्यापार चालतो त्यांचे मुख्यतः तीन वर्ग करण्यांत येतात: १ कठिण लांकूड, २ नरम लांकूड, ३ देवदार, वगैरे. लांकडाची किंमत ठरविण्यामध्यें त्या लांकडाचे स्वाभाविक गुणधर्म यास फार महत्त्व असतें. लांकडाचें वजन व घनता हीं त्या लांकडामध्यें इतर द्रव्यांच्या मानानें लांकडाचे तंतू ज्या प्रमाणांत असतील त्यावर अवलंबून असतात. घनता मोजण्याचें एकच महत्त्वाचें साधन म्हणजे लांकडाचें विशिष्टगुरुत्व मापून पाहणें हें होय. हें विशिष्टगुरुत्व पुन्हां लांकडांतील आर्द्रतेच्या अंशाप्रमाणें बदलत असतें. उलट लांकडांतील ताठपणा व त्याचा न चुरडण्याचा गुण हे त्याच्या घनतेच्या प्रमाणांत असतात. इमारती लांकडांत विशेष जड अशीं लांकडें म्हटलीं म्हणजे साग, एबनी, वगैरे होत. अगदीं हलकीं लांकडें म्हणजे देवदार, बुचाचीं झाडें, वगैरे होत. लांकडाचा आणि पाण्याचा अथवा आर्द्रतेचा संबंध फार महत्त्वाचा आहे. कठिण लांकडांमध्यें देवदारासारख्या सूचीपर्ण वृक्षांच्या लांकडांपेक्षां कमी प्रमाणांत आर्द्रता असते. तसेंच गाभ्यांतील लांकडापेक्षां किंवा ताडापेक्षां सालीजवळच्या किंवा बाहेरच्या लांकडांत आर्द्रांश अधिक असतो. या आर्द्रतेवर लांकडांतील आकसणें, वाढणें किंवा फुगणें, तिडणें किंवा भेगलणें, अथवा चिरा पडणें, इत्यादि गोष्टी अवलंबून असतात. लांकूड वाळत असतां हळूहळू संकोच पावत असतें किंवा आकसतें. या क्रियेंत जर अनियमितपणा उत्पन्न झाला तर तें तिडतें. परंतु तें जर काळजीपूर्वक मुरविलें किंवा वाळविलें तर तिडण्याचें प्रमाण कमी करतां येतें. जेव्हां आकुंचन होत असतें, त्या वेळीं क्रियेचा मार लांकडास असह्य होतो तेव्हां तें भेगलतें अथवा त्यास चिरा पडतात. आणि लांकूड जर फार जलद वाळविण्यांत आलें तर त्यास अधिक चिरा पडतात. आर्द्रता जितक्या प्रमाणांत कमी होत जाईल तितकी लांकडाची शक्ति वाढत जात असते. परंतु लांकडें मुरवण्यांत जर निष्काळजीपणा झाला तर त्या क्रियेपासून मिळणारा फायदा न मिळतां अधिक दोष उत्पन्न होण्याचा संभव असतो. लांकडांतील लवचिकपणा त्यांतील शक्तीवर किंवा वाळवणावर अवलंबून असतो व तो त्या प्रमाणांत असतो. परंतु त्याची वांकण्याची शक्ति अथवा चिवटपणा हा त्यांतील आर्द्रतेच्या प्रमाणाबरोबर असतो.

एबनी व लिग्नम व्हिटी हीं सर्वांत कठिण झाडांचीं व देवदार व बुचाचें झाड हीं सर्वांत नरम जातीचीं लांकडें आहेत. लांकडांचा टिकाऊपणा ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे आणि ही गोष्ट कोणतेंहि लांकूड ज्या मानानें एकामागून एक कोरड्या व ओल्या स्थितींत ठेवलें जाईल त्यावर अवलंबून असतें. कारण अशा परिस्थितींत बुरशी, वगैरे परोपजीवी वनस्पती लांकडावर वाढण्यास फार अनुकूल परिस्थिति असते. देवदार, वगैरे हलक्या जातीच्या लांकडावर कीटकांचा, वगैरे फार त्वरित परिणाम होतो. याकरितां त्यांस कांहीं रासायनिक द्रव्यें लावून किंवा त्यांत मुरवून अशा शत्रूंपासून त्यांस सुरक्षितता मिळवून देणें हें त्या लांकडांच्या व्यापाराच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. अशा रीतीनें क्रिओसोट किंवा एखाद्या दुसऱ्या द्रव्याची जर हलक्या जातीच्या लांकडावर क्रिया करून त्यास सुरक्षित

केलें तर अनेक जागीं फार भारी लांकडें वापरण्याऐवजीं हलकीं लांकडें वापरतां येणें शक्य होईल.

**इराक**—मेसापोटेमिया. आशियांतील एक राज्य. हें इराण व अरबस्तान आणि सीरिया व इराणचें आखात यांच्यामध्यें बसलेलें आहे. क्षेत्रफळ १,४०,००० चौरस मैल.. लो. सं. सुमारें ५० लक्ष आहे. तैग्रीस व युफ्रेटिस या मुख्य नद्या. बगदाद राजधानीचें शहर. बसरा हें मोठें बंदर आहे. अरबी व कुर्दी या दोन भाषा बोलल्या जातात. रॉकेल तेलाच्या समृद्ध खाणी आहेत व परकीयांच्या चंचुप्रवेशाचें व राजकारणाचें तें एक मूळच आहे. हा पूर्वी मेसापोटेमियाचा एक भाग म्हणून तुर्की साम्राज्यांत सामील होता. प्राचीन काळीं यांत आसुरी, खाल्डी आणि बाबिलोनी लोक राहत. ख्रि. पू. १७०० च्या सुमारास ईजिप्तनें, ख्रि. पू. ३३१ मध्यें अलेक्झांडरनें, इ. स. १६५ त रोमन लोकांनीं व ८ व्या शतकांत अरबांनीं हा देश जिंकून घेतला. तेराव्या शतकाच्या अखेरीस मोंगलांनीं हा उध्वस्त केला. १९१९ सालीं त्याला स्वतंत्र अस्तित्व देण्यांत आलें व ब्रिटिश मॅंडेटखालीं त्याचा कारभार चालला. १९२१ मध्यें फैजल यास या प्रदेशाचा राजा करण्यांत आलें. १९२७ मध्यें ग्रेट ब्रिटननें इराकचें स्वातंत्र्य मान्य केलें. दुसऱ्या महायुद्धांत इराक दोस्तांच्या बाजूस होता. हल्लींचे राजे दुसरे फैजल १९३५ त गादीवर बसले.

**इराण**—मध्य आशियांतील एक मुसलमानी राष्ट्र. याच्याभोवतीं इराणचें आखात, इराक, तुर्कस्तान, अफगाणिस्तान, बलुचिस्तान, ट्रान्सकाकेशिया व कास्पियन समुद्र हीं आहेत. इराणलाच युरोपियन पर्शिया असें म्हणतात. याचें क्षेत्रफळ ६,२८,००० चौ. मै. असून याची समुद्रसपाटीपासून उंची ३ ते ५ हजार फूट आहे. हवा शुष्क व उष्ण आहे. खजुरांचें पीक मोठें आहे. द्विदल धान्येंहि होतात. अफू व तंबाखू यांची पैदास मोठी किफायतशीर आहे. रॉकेल व गालीचे यांची निर्यात मोठी असून कापड, कातडीं, फळें, वगैरेंचाहि व्यापार चालतो. बुशायर हें निर्यात व्यापाराचें मोठें केंद्र असें बंदर आहे. तेहरान ही राजधानी आहे. लो. सं. १,५०,५५,११५. लोकवस्तीपैकीं सुमारें तिसरा हिस्सा लोक फिरते म्हणजे जनावरांचे कळप बाळगून हिंडणारे आहेत. इराणचा इतिहास फार मोठा, पुरातन व चित्तवेधक आहे. तो सुमेरिअन लोकांपासून ग्रीक, तुर्क, अरब, वगैरे लोकांशीं झालेल्या लढाया व झगडे यांनीं भरलेला आहे व तोच प्रकार आजतागायत चालू आहे. इराणांत ख्रिस्त-महमदपूर्व अनेक संस्कृतींचे अवशेष असून वाङ्मय व कला यांची विकासपूर्ण वाढ झालेली आहे.

तलवार व म्यांन
(पर्सेपोलिस येथील पाषाण शिल्प)

इराणचें राज्य ख्रि. पू. ५५० मध्यें सायरसनें स्थापिलें. त्या काळीं इराणी लोकांचा संबंध भारतीय आर्यांशीं फार होता. इराणमधूनच आर्यांची एक शाखा पूर्वेकडे व दुसरी पश्चिमेकडे गेली. अलेक्झांडरनें ख्रि. पू. ३३४–३१ मध्यें हा प्रदेश जिंकला. सारासेन लोक इ. स. ६४२ त येईपर्यंत यावर त्या धर्माची छाप होती. १३ व्या व १४ व्या शतकांत मोंगल टोळ्यांनीं यावर स्वाऱ्या केल्या. आबास दि ग्रेट (१५८६–१६२८) याच्या अमदानींत इराणची फार भरभराट झाली. अगा महंमदानें स्थापलेलें राजघराणें १७९४ ते १९२५ पर्यंत इराणवर राज्य करीत होतें. पण १९२५ सालीं रेझाखान पहलवी या सामान्य माणसानें राज्य बळकावून तो शहा बनला. त्याच्यानंतर १९४४ त त्याचा मुलगा गादीवर बसला. गेल्या दुसऱ्या महायुद्धांत इराणचा ताबा रशिया आणि ब्रिटिश यांकडे होता. दोन्ही महायुद्धांत इराण दोस्तांच्या बाजूचा होता.

'मजलिस' नांवाचें विधिमंडळ मंत्रिमंडळाकडून राज्यकारभार पाहतें. हें विधिमंडळ १९०६ पासून अस्तित्वांत आहे.

इराणांत पारशी लोक सुमारें १०,००० आहेत. सुनी पंथाचे मुसलमान ८½ लक्ष आहेत. दरबारचा धर्म 'इस्ना-अशरिया' असून महंमद पैगंबरानंतरचे बारा इमाम पूज्य मानतात.

या देशांत पूर्वी धार्मिक शिक्षणच फक्त देण्यांत येई. आतां वाङ्मय आणि शास्त्रें यांचें शिक्षण तेहरान विद्यापीठामार्फत देण्याची योजना केली आहे. वाहतुकीसाठीं नवीन रस्ते तयार केले आहेत. राज्यकारभाराला आधुनिक दिशा लागत चालली आहे.

**इराणचें आखात**—इराण आणि अरबस्तान यांमध्यें हें आखात असून अरबी समुद्राला ओर्मझच्या सामुद्रधुनींतून दार आहे. या आखाताची कमाल लांबी ५२० मैल असून सरासरी रुंदी १८० मैल आहे. टाइग्रीस आणि युफ्रेटीस या नद्यांचें व इतर अनेक लहान प्रवाहांचें पाणी यांत पडतें. या आखातांत अनेक बेटें आहेत व त्यांपैकीं किश्म, ओर्मझ व बेहरीन हीं मोठीं आहेत. बेहरीन बेटांजवळ मोतीं काढण्याचा मोठा व्यापार चालतो.

**इरावती नदी**—ब्रह्मदेशांत ही नदी मखौ व मलिखा ह्या दोन नद्यांचा संगम होऊन बनली आहे. ह्या नदीच्या योगानें

ब्रह्मदेशाचे पूर्व व पश्चिम ब्रह्मदेश असे भाग पडतात व ही नदी ९०० मैल वाहत जाऊन अखेरीस बंगालच्या उपसागरास मिळते. ह्या नदीचें महत्त्व ब्रह्मदेशांत फार आहे. पूर्वीची सर्व राजधानीची शहरें हिच्याच तीरावर वसलेली होतीं. अर्वाचीन काळीं सुद्धां अतिशय लोकवस्तीचीं शहरें, उदाहरणार्थ, मंडाले, प्रोम, हेंझाड, मिंग्यान वगैरे हिच्या तीराच्या आश्रयानें आहेत. ही नदी सर्व वर्षभर जलपर्यटनास उपयोगी पडते.

पुष्कळ जमिनीस पाणी पुरविणारी नदी ह्या दृष्टीनें इरावतीचें महत्त्व फार आहे.

ब्रह्मदेशांतला बराच अंतर्व्यापार इरावती नदीच्या मार्गानें चालतो. इरावती फ्लोटिला कंपनीचीं जहाजें तेल, चहा, कापूस व धान्यें यांची, तसेंच मीठ, कापड, व इतर वस्तू यांची ने-आण करीत असतात.

**इरिट्रिआ**—आफ्रिकेच्या तांबड्या समुद्राकडील किनाऱ्यावर ॲबिसीनिया व तांबडासमुद्र यांमधील इटलीची वसाहत. इरिट्रिआचा किनारा ६७० मैलांचा असून त्याचें क्षेत्रफळ ( वसाहतीचें ) ४५,८०० चौरस मैलांचें आहे. या वसाहतीची राजधानी अस्मारा ही असून लोकवस्ती मुख्यतः भटकणाऱ्या अरब टोळ्यांची आहे. लो. सं. ६,००,५७३. मसावा आणि दहलक या ठिकाणीं मोतीं काढण्याचा धंदा चालतो. हमासीनच्या भागांत सोन्याच्या खाणी आहेत. १९३६ सालापासून ही इटलीची वसाहत झाली. इटलीनें या वसाहतींत बऱ्याच सुधारणा केल्या. १९४१ सालीं दोस्तांनीं अस्मरा जिंकून घेतलें. आतां इटलीच्या वसाहती कोणाच्या ताब्यांत येतात हें तदनंतर कळेल.

**इरिडिअम धातु**— (इंद्र, ऐंद्र,). ही एक प्लॅटिनमच्या जातीची धातु असून तिचें चिन्ह Ir आहे. आणि अणुभारांक १९३·१ व घनत्व उर्फ भारमान २२·४ आहे. ही धातु प्लॅटिनमपेक्षां थोडी अधिक जड व पांढरी, चकचकीत व पोलादासारखी असते. इतर पुष्कळ धातूंशीं ही धातु मिश्रण करून मिश्रधातु बनवतात. मात्र या धातूचा सोन्याशीं संयोग होऊं शकत नाहीं. प्लॅटिनम व इरिडिअम् यांची बनलेली मिश्र धातु कारखान्यामध्यें फार उपयोगी पडते.

**इर्कुटस्क**—दक्षिण सैबेरियांतील इरकुट व आंगारा यांच्या संगमावर, बैकल सरोवरापासून चाळीस मैलांवर असलेलें रशियांतील एक महत्त्वाचें शहर. येथें सोनें शुद्ध करण्याचे कारखाने, लोकरीचें कापड व तागाचें कापड विणण्याचे कारखाने आणि कातडीकामाचे कारखाने मुख्यत्वें आहेत. तसेंच येथून चीनशीं व्यापार फार जोरांत चालतो. झारच्या राजवटींत येथें राजकीय बंदिवान् ठेवीत असत. परंतु नवीन जमान्यांत हें एक उत्तम व्यापारी केंद्र बनलें असून प्रसिद्ध ट्रॅन्स-सैबेरियन लोहमार्ग या शहराजवळून जातो. लो. सं. २,४३,०००.

**इलकल**—मुंबई, विजापूर जिल्ह्यांत हुणगुंडी तालुक्यांत हें शहर आहे. येथील लोकसंख्या सुमारें सतरा हजार सहाशें आहे. ह्या गांवाला म्युनिसिपालिटी आहे. हें गांव विणकाम व कापडास रंग देणें ह्या धंद्यांचें मुख्य ठिकाण आहे. येथून रेशमी व सुती कापड आणि शेतीचे पदार्थ बाहेर जातात. ह्या शहरीं पौष महिन्यांत बनशंकरी देवीनिमित्त मोठी जत्रा भरते. येथील लुगडीं प्रसिद्ध असून, एका काळीं दक्षिणी बायकांत त्यांचा प्रसार बराच होता.

**इलांड**—ही एक आफ्रिकेंतील हरणाची जात असून यांचें वैशिष्ट्य म्हणजे हीं हरणें बैलाएवढीं उंच असतात. कलहारीच्या

वाळवंटाजवळील गवताळ भागात व लिंपोपो नदीच्या कांठीं यांची वस्ती फार मोठ्या प्रमाणावर आहे. या हरणांच्या शिकारी त्यांच्या स्वादिष्ट व रुचकर मांसासाठीं करतात.

**इलाम**—हें नांव इराण देशाबद्दल बायबलांत सांपडतें. इराणला प्राचीन भूगोलवेत्ते सुसीयाना या नांवानें संबोधितात. या देशांत निरनिराळ्या जाती राहत असत. व त्या वेगवेगळ्या भाषा बोलत. पश्चिम भागांत मात्र सेमाइट लोक असत. सुसा हें शहर इराणी साम्राज्याची राजधानी झाल्यापासून सुसीयाना नांव प्रचारांत आलें. सुसाखेरीज अन्सान (अन्शान, अषान ) हें शहरहि महत्त्वाचें होतें.

**इलिअट, जॉर्ज (मेरी ॲन् इव्हॅन्स) (१८१९–१८८०)**— एक इंग्लिश लेखिका. ही 'जॉर्ज इलिअट' याच टोपण नांवानें प्रसिद्ध आहे. वयाच्या १७ व्या वर्षी आईच्या मरणामुळें शिक्षण सोडून घरकामांत लक्ष घालणें तिला भाग पडलें. तरुणपणीं मिळालेल्या कडक धार्मिक शिक्षणानें तिचा उत्साह नाहींसा केला व तिचें मन फार अस्वस्थ झालें; पण त्याच सुमारास प्रसिद्ध झालेलीं 'एज्युकेशन ऑफ फीलिंग्ज' व 'फिलॉसाफी ऑफ नेसेसिटी' वगैरे पुस्तकें वाचून तिच्या विचारांत व मतांत क्रांति घडून आली. तिनें प्रार्थना-मंदिरांत जाण्याचें सोडून दिलें व ती बुद्धिप्रामाण्यवादी बनली.

१८५१ त 'वेस्ट मिन्स्टर रिव्ह्यू' च्या दुय्यम संपादकाचें काम तिनें पत्करिलें. हें काम करीत असतां हर्बर्ट स्पेन्सर, कार्लाइल, फ्रान्सिस न्यूमन व हेन्री ल्युइ वगैरे ग्रंथकर्त्यांशीं तिची ओळख झाली. हेन्री ल्युईचा व तिचा स्नेह इतका जमला कीं, लवकरच लोकांच्या टीकेचा तो एक विषय झाला. परंतु एकंदरींत तिच्या बुद्धीची बरीच वाढ त्याच्या संगतीनें झाली. ती फार कोंवळ्या मनाची असल्यामुळें लोकांच्या टीकेचा तिच्यावर परिणाम होत असे. तिनें लिहिलेल्या पुस्तकांत 'ॲडाम बीड', 'सायलास मार्नर', 'रोमोला' वगैरे पुस्तकें फार प्रसिद्ध आहेत. इलिअटची लेखनपद्धति जरी मर्दानी आहे तरी ती फारशी बेपर्वा किंवा अव्यवहार्य नसून तिच्यांत फार भिडस्तपणा आढळून येतो. एखाद्या विषयावर झोड उठविण्याची तिची तऱ्हा जेन ऑस्टिनप्रमाणेंच आहे. जेन ऑस्टिनच्या पुस्तकांतून शिष्ट समाजांतील निर्दोष भावनांचें योग्य वर्णन केलेलें आहे; तर इलिअटच्या पुस्तकांतून समाजांतील मतांच्या व ध्येयांच्या पुंडाव्याचें वर्णन केलें आहे. तिच्या लेखांतून द्वाष्टपणा, कटुत्व व विद्येची चढाई कधींच दिसत नाहीं.

**इलिनॉइस**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील एक शहर. हें लेक मिचिगानच्या किनाऱ्यावर आहे. क्षेत्रफळ ५६,६६५ चौ. मैल, लो. सं. ७८,९७,२४१. राजधानी स्प्रिंगफील्ड. शिकागो हें सर्वांत मोठें शहर आहे. मिसिसिपी व ओही या दोन मोठ्या नद्या आहेत. सर्व प्रदेश बहुतांशीं सपाट असून शेतीचा मुख्य धंदा आहे. पाऊस पुष्कळ पडतो. हवा समशीतोष्ण आहे. तथापि उन्हाळा व हिंवाळा हे तीव्र असतात. सर्व प्रकारचीं धान्यें, भाजीपाला, फळफळावळ हीं होतात. जनावरांची वाढ व जोपासना होते व त्यांचें मांस बाहेर पाठवलें जातें. कापडाच्या वगैरे गिरण्या असून इतर उद्योगधंदेहि बरेच आहेत. रेल्वेची वाहतूक फार मोठी आहे. शिकागोएवढें मोठें रेल्वेस्टेशन जगांत दुसरें नाहीं. यांत १६७३ मध्यें प्रथम फ्रेंच लोक आले. १७६३ च्या पॅरिसच्या तहानें हें ब्रिटनकडे आलें. १८१८ मध्यें तें संयुक्त संस्थानांत दाखल झालें.

**इलिनॉईस–नदी**—इलिनॉईस संस्थानच्या ईशान्य भागांतून ही नदी वाहत असून मिसूरीच्या मुखापासून सुमारें वीस मैलांवर ही नदी मिसीसिपीला मिळते. एकंदर उगमापासून मुखापर्यंतची लांबी ५०० मैल असून त्यांपैकीं सुमारें २५० मैल नदीचा प्रवाह जलमार्ग म्हणून उपयुक्त आहे.

**इलिरिया**—ॲड्रिआटिकच्या पूर्व बाजूच्या मोठ्या प्रदेशाचें हें जुनें नांव आहे. आधुनिक अल्बेनियन लोकांचे पूर्वज ते इलिरियन लोक होत. नेपोलियनचा पराभव झाल्यानंतर इलिरिया प्रांत ऑस्ट्रियाला परत करण्यांत आला. १८४९ सालीं या प्रांताचे कॅरिन्थिआ, कार्निओली व कोस्ट लँड्स असे विभाग पाडण्यांत येऊन इलिरिया नामशेष झालें.

**इव्हानिअस मार**—हा जाकोबाइट पॅट्रिआर्कच्या विरोधी असणाऱ्या मलबारमधील जाकोबाइट ख्रिस्ती लोकांचा बह्मारी येथील आर्चबिशप आहे. हा १९३० मध्यें कॅथॉलिक झाला. त्याची प्रथम फासिया येथील आर्चबिशपच्या पदावर नेमणूक करण्यांत आली. व नंतर त्रिवेंद्रम् येथील आर्चबिशप मेट्रोपॉलिटन या पदावर नेमणूक झाली. हे पश्चिम सीरियन अँटिओकन किंवा मलबारमधें मलनकराइस या नांवानें माहीत असलेले संस्कार करतात. मलनकर हें मलबार यासच दुसरें नामाभिधान आहे.

**इष्टुर फांकडा**—मराठेशाहीमधील तीन फांकडे म्हणजे कोन्हेरराव (एकबोटे), मानाजीराव (शिंदे), व इष्टुर (जेम्स स्टुअर्ट) हे होत. कॅप्टन स्टुअर्टला मराठे लोक त्याच्या शौर्यामुळें मोठ्या कौतुकानें 'इष्टुर फांकडा' असें म्हणत. रघुनाथराव पेशवा पुण्याची पेशव्याची गादी मिळविण्याकरितां मुंबईच्या इंग्रजांस जाऊन मिळाला व त्यांचें सैन्य मदतीस घेऊन पुणें दरबाराच्या सैन्याशीं लढण्याकरितां इ. स. १७७८ मध्यें बोरघाटामध्यें आला. या युद्धप्रसंगांत इंग्रजांच्या बतीनें जे रणशूर योद्धे प्रसिद्धीस आले, त्यांपैकीं कॅप्टन स्टुअर्ट हा एक होय. स्टुअर्ट हा फार पटाईत असून त्यांस सर्व रस्त्यांची व घाटनाक्यांची पूर्ण माहिती होती. मराठ्यांच्या सैन्याच्या वेगवेगळ्या तुकड्या केल्या असून त्यांचें सेनाधिपत्य हरिपंत फडके, रामचंद्र गणेश, बाजीपंत बर्वे, तुकोजी होळकर, महादजी शिंदे, वगैरे

नामांकित योध्यांकडे होतें. हे सर्व सरदार आपापल्या सैन्यां-निशीं तळेगांवापासून बोरघांटापर्यंत मार्‍याच्या जागा रोखून युद्धास सिद्ध होते. अशा प्रकारची इंग्रज आणि मराठे यांत निक-राची लढाई चालू असतां, कॅप्टन स्टुअर्ट यानें आपल्या पराक्रमाची शर्थ करून व शत्रूंच्या तोफांचा भडिमार सहन करून कार्ल्यापर्यंत आपली फौज नेऊन पोहोंचविली. त्या योगानें मराठे सेनापतीस ह्याच्या शौर्याचा प्रभाव फार अलौकिक वाटून त्यांनीं त्याची फार वाहवा केली, व त्यास कौतुकानें ' इष्टुर फांकडा ' असें अभिधान दिलें. पुढें या निकराच्या चकमकी-मध्यें इष्टुर फांकड्यास तोफेचा गोळा लागून तो ता. ४ जानेवारी इ. स. १७७९ रोजीं मरण पावला.

**इसब**— याला आयुर्वेदांत ' विसर्प ' व इंग्रजींत एक्झीमा म्हणतात. हा एक त्वचारोग असून त्यामध्यें त्वचेवर बारीक-बारीक पुटकुळ्या उठतात व त्यांस फार खाज सुटते. हा प्रथम कांहीं जंतूंपासून उत्पन्न होतो किंवा नाहीं याबद्दल त्वक्-शास्त्रज्ञां-मध्यें अजून मतभेद आहे. अपचन, रक्ताशयदोष, मज्जातंतुदोष वगैरे अनेक रोगांमध्यें याचा प्रादुर्भाव होण्याचा संभव असतो. व त्याप्रमाणें यावर उपचार करावे लागतात. सामान्यतः हा स्पर्शजन्य नाहीं. कोरडा व ओला असे याचे दोन प्रकार आहेत. हे मधून मधून मावळतात पण पुन्हां केव्हांतरी सुरू होतात. ओला झांकून ठेवावा लागतो. साबण वापरूं नये.

**इसबगोल**— यास संस्कृतांत स्निग्धजीरक म्हणतात. ह्या झाडाचें मूळ उत्पत्तिस्थान मिसर देश व इराण आहे. तेथून हें हिंदुस्थानांत औषधी कामाकरितां येतें. या झाडाची उंची सुमारें एक हात असते व पानें बारीक असून लांब लांब असतात. ह्यास गव्हासारख्या ओंब्या असतात त्यांत हें बीं असतें. त्यांत तीन जाती असतात : पांढरें, तांबडें व काळें. पैकीं पांढरें सर्वांत उत्तम समजलें जातें व काळें बीं औषधांत उपयोगी पडत नाहीं. इसबगोलाची बारीक पूड पोटांत घेतली असतां शौचास न होतां मनुष्य मरतो. याकरितां अशी पूड कधीं घेऊं नये. सोम-लाच्या विषावर इसबगोल पाण्यांत भिजत घालून तें पाणी गाळून त्यांत बेदाणा, दहीं व गुलाबाचें पाणी घालून प्यावें. म्हणजे विष उतरेल.

**इसवी सन**—सर्वत्र विशेषतः ख्रिस्ती राष्ट्रांतून ही वर्ष-गणना चालू आहे. येशू ख्रिस्ताच्या जन्मकालापासून ( हा बहुधा खि. पू. ६ ते ४ यामध्यें झाला असावा ) हा वर्षारंभ धरला जातो. डायोनिसिअस या ख्रिस्ती भिक्षूनें ६ व्या शतकांत हा पाळण्यास आरंभ केला, तथापि १५ व्या शतकाच्या मध्या-पर्यंत हा रूढ होऊं शकला नाहीं.

**इसाखेल**—पंजाब, मियानवाली जिल्ह्यांत ही तहशील सिंधु नदीपलीकडे आहे. ह्या तहशिलींत इसाखेल व काला बाग हीं गांवें व ४३ खेडीं आहेत. ह्या तहशिलीस इसाखेल असें नांव पडण्याचें कारण येथें इसाखेल नांवाचे लोक राहतात, हें होय.

शहर—सिंधु नदीच्या उजव्या तीरावर आहे. हें शहर १८३० सालीं हल्लीं जे सिंधु नदीपलीकडल्या नियाझाई अफगाण लोकांचे पुढारी खान आहेत, त्यांचा मूळ पुरुष अहमदखान यानें वसविलें.

**इसाटिन**—निळीच्या रंगांतील इंडियोटिनशीं जवळचा संबंध असलेलें नारिंगी रंगाचें स्फटिकमय संयुक्त. कोळशाच्या डांबरांतून नीळ तयार करण्याच्या प्रयत्नाला इसाटिनची पुष्कळच मदत झाली आहे.

**इसाद पाशा** ( १८५६–१९२० )—आल्बेनियन लोकांतील एक सेनानी व राष्ट्रीय पुढारी. १९१२ सालीं आल्बेनियाचें स्वातंत्र्य दोस्तराष्ट्रांनीं मान्य केलें त्या वेळीं स्कुटारी येथील सैन्याचा हा सेनापति होता. त्याला लंडनच्या तहान्वयें स्थाप-लेल्या नव्या आल्बानिया राज्याचा राजा होण्याची इच्छा होती; पण ती विफल झाल्यावर त्यानें युद्धमंत्री व गृहमंत्री या पदांचा स्वीकार केला. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर त्याला सेनेटनें हंगामी सरकारचा अध्यक्ष नेमलें. ऑस्ट्रियन सैन्य चाल करून आलें तरीहि त्यानें जर्मन दोस्तराष्ट्रांशीं युद्ध जाहीर केलें, आणि आल्बानियांत ऑस्ट्रियन सैन्य घुसल्यावर हा निसटून गेला. सालो-निका येथील लढाईत यानें इंग्लंड व दोस्तराष्ट्रें यांना फार चांगली मदत केली. इटालियन लोकांचा डोळा आल्बानियावर होता, त्याला या पाशाचा विरोध असल्यामुळें त्याला आल्बानियांत परत येण्यास इटालियनांनीं परवानगी दिली नाहीं. पुढें त्याचा खून एका आल्बेनियन विद्यार्थ्यानें पॅरिस येथें केला.

**इसाया** ( खि. पू. ७६० ते ६९७ )—हा सर्वांत श्रेष्ठ हिब्रू भविष्यवादी (प्रॉफेट) होऊन गेला. त्याची खाजगी माहिती फार थोडी उपलब्ध आहे. अहाझ (७३९ ते ७२८) या राजाच्या कार-कीर्दींत तो प्रथम हिब्रू लोकांतील सामाजिक व धार्मिक अवनती-बद्दल कडक व धडाडीचा टीकाकार म्हणून पुढें आला. मुत्सद्दी या नात्यानें त्याचा नेहमीं असा सल्ला असे कीं, दक्षिणेस इजिप्तबरोबर किंवा उत्तरेस व पूर्वेस असीरिअन लोकांबरोबर सावरीक किंवा दोस्ती करूं नये व तटस्थ राहावें. कोणाच्याच भानगडींत पडूं नये. पुढें ७०५ मध्यें असीरिया देशांत सार्गननंतर सेनाचेरीब हा राजा राज्यावर आला आणि ७०२ मध्यें तो सैन्यासह पॅलेस्टाइनमध्यें शिरला व जूडा आणि इतर राज्यें नष्ट करण्याची त्यानें तयारी केली. परंतु जेरुसलेम नष्ट होणार नाहीं असा विश्वास इसायानें

प्रकट केला आणि ईश्वर आपलें हें पवित्र शहर उद्दाम असीरिअन लोकांच्या हातून नष्ट होऊं देणार नाहीं असा प्रचार करून हेझेकिया राजा व त्याचे अधिकारी यांना त्यानें लढाई चालू ठेवण्यास उत्तेजन दिलें. असीरिअन लोकांच्या हातीं जेरुसलेम शहर खालीनें जाणार अशी चिंता इतरांना वाटूं लागली, तरीहि या भविष्यवाद्यानें कधींहि आशा सोडली नाहीं. उलट घाबरलेल्या जेरुसलेममधील लोकांना व पुढाऱ्यांना तो उत्तेजन देई. अखेर त्यानेंच भविष्य खरें ठरलें, कारण सेनाचेरीच यानें अकल्पित रीतीनें या शहराचा वेढा उठविला आणि ७०१ च्या अखेरीस असीरिअन सैन्य माघार घेऊन निघून गेलें. या आणीबाणीच्या प्रसंगाचें वर्णन जुन्या करारांत आहे.

या सुटकेमुळें झालेल्या आनंदाच्या भरांत इसायानें आदर्श राज्य व राजा यांचें वर्णन करणारा भाग लिहिला आहे. यानंतर इसाया अदृश्य होतो. ६९७ मध्यें जूडामध्यें मूर्तिपूजक लोकांचें प्राबल्य होतें आणि या लोकांनीं केलेल्या छळामध्यें इसाया मरण पावून हुतात्मा होतो. अशी ज्यू लोकांमध्यें पुराण-कथा आहे.

**इसिस**—ईजिप्तमधील एक प्रमुख प्राचीन देवी. हिचा नवरा व भाऊ ओसिरिस असून तो सूर्यदेव समजला जाई व इसिसला चंद्र समजत. यांचा मुलगा होरस (धाकटा) हाहि सूर्यदेवच मानला जाई. इसिसनें मिसरी लोकांना कृषिविद्या शिकविली म्हणून तिला पहिलीं कणसें वाहण्यांत येतात. तिची पूजाअर्चा मेम्फिस येथें फार मोठ्या प्रमाणांत होत असे. पुढें रोमन साम्राज्यांतहि इसिसची भक्ति लोकांत चालू होतीच.

**इस्पितळें**—भरतखंड, ईजिप्त व ग्रीस देश यांमध्यें फार प्राचीन काळापासून रुग्णालयें स्थापन करण्याचा प्रघात होता असें दृष्टीस पडतें. हरून अल् रशिद (७६३ ते ८०९) यानें बगदाद येथें रुग्णालयें स्थापन केल्याचे उल्लेख आढळतात. लंडन येथें १११८ मध्यें महारोग्यांकरितां एक आश्रम स्थापन करण्यांत आला. सेंट बार्थोलोम्यु रुग्णालय १५४६ त स्थापन झालें. अलीकडे मोठमोठ्या शहरांतून सर्वत्र रुग्णालयें स्थापन झाल्याचें दृष्टीस पडतें. अशीं रुग्णालयें सरकार किंवा स्थानिक संस्थांच्या साहाय्यानें चालविण्यांत येतात. परंतु अशा सार्वजनिक रुग्णालयांमध्यें एक प्रकारचा यांत्रिक कृत्रिमपणा उत्पन्न होऊन वैद्यकीय संशोधन वगैरेंस मुळींच अवसर नसतो. आणि त्यामुळें अशा रुग्णालयावर सार्वजनिक टीका होत असते. परंतु संसर्गजन्य रोगांकरितां अशा तऱ्हेचे सार्वजनिक दवाखाने त्या रोगाची वाढ होण्याचें थांबविण्याच्या दृष्टीनें उपयुक्त असतात. खाजगी रुग्णालयांचे फायदे बरेच असून रोग्यासहि त्यांपासून अधिक समाधान व फायदा मिळतो. परंतु अशीं रुग्णालयें चालविणें फार खर्चाचें असतें. याकरितां रोग्यापासून कायमच्या व्यवस्थेकरितां कांहीं पैसे घेऊन औषधोपचार मोफत करण्याची सोय करणें अधिक उपयुक्त ठरतें. तथापि या कामींहि बराच खर्च येऊन त्याकरितां देणग्या वगैरे मिळविणें अवश्य असतें व त्यावरच लोकांस योग्य औषधो-पचार होण्याची शक्यता अवलंबून असते.

ग्रेट-ब्रिटनमध्यें इस्पितळें देणग्यांवरच चालतात व या देणग्यांची व्यवस्था 'किंग एडवर्ड दि सेवंथ्स हॉस्पिटल फंड' पाहते. संडे (रविवार) व सॅटर्डे (शनिवार) फंडांमार्फतहि मोठमोठ्या देणग्या इस्पितळांसाठीं गोळा करण्यांत येतात.

वेड आणि मानसिक रोग यांसाठीं स्वतंत्र इस्पितळें असतात. आपल्याकडे हे रोग जास्त प्रमाणांत असूनहि या प्रकारचीं पुरेशीं इस्पितळें नाहींत. सुमारें सतरा इस्पितळें पंधरा हजार रोग्यांची सोय करूं शकतात. सर्वांत उत्कृष्ट व सर्व आधुनिक उपचारांनीं सज्ज असें इस्पितळ बंगळूरास म्हैसूर सरकारचें आहे. तेथें डोळ्याचेंहि एक स्वतंत्र रुग्णालय आहे.

सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतून सैनिक आणि नाविक यांच्यासाठीं स्वतंत्र रुग्णालयें बांधलेलीं असतात. युद्धाच्या जागीं तात्पुरतीं इस्पितळें तयार करण्यांत येतात. रुग्णालय-नौका समुद्रावरच्या युद्धांतून असतात. अशा नौकांवर आंतरराष्ट्रीय कराराप्रमाणें शत्रूचे हल्ले होत नाहींत.

**इस्फाहान**—इराण. हें शहर पूर्वेकडील बाजूच्या भव्य शहरांपैकीं एक म्हणून प्रसिद्ध आहे. तेहरानपासून सुमारें २०० मैलांवर झेंदारूद नदीच्या कांठावर हें शहर वसलेलें असून तें एक महत्त्वाचें व्यापारी केंद्रस्थान होय. या शहरांत हत्यारें तयार करणें, पोलादी तलवारी बनविणें, कांचकाम, तांब्याचीं भांडीं, गालिचे विणणें, वगैरे धंदे मुख्यत्वें चालत असून मालाची उतारपेठ म्हणून या शहराची प्रसिद्धि आहे. येथील मशीद व चाळीस खांबांचा राजवाडा प्रेक्षणीय आहे. लो. सं. सुमारें दोन लाख आहे.

**इस्माईल आदिलशहा** (१५१०–१५३४)—विजापूरचा एक बादशहा. हा गादीवर बसला तेव्हां अवघा नऊ वर्षांचा असल्यानें प्रधान कमालखान यानें राज्य बळकावलें, पण याची आई आणि चुलती यांनीं कमालखानाचा वध करून व त्याच्या मुलाशीं लढून राज्य पुन्हां इस्माइलच्या नांवें चालू केलें. इस्माइलला विजयानगरशीं व वऱ्हाडच्या सुलतानांशीं लढावें लागे; पण तो यशस्वी होत असे. हा न्यायशील व विद्वानांचा पोषिंदा होता.

**इस्माईल हाजी, मौलवी महंमद** (१७८१-१८३१)—एक मुसलमानी धर्मसुधारक. सय्यद अहंमदाच्या साहाय्यानें, हिंदुस्थानांतील मुसलमानी धर्म सुधारण्याचा यानें बराच प्रयत्न केला. हे दोघे मक्केलादेखील जाऊन आले. वाहाबी चळवळ आपल्या धोरणावरच चालली आहे, असें त्यांना तेथें आढळून आलें. हिंदुस्थानांत आल्यावर त्यांनीं शुद्ध इस्लामी धर्माचें नव-मत उपदेशिण्यास सुरवात केली व अनेक अनुयायी जमविले. पण त्यांची चळवळ सरकारी मुसलमानी पुढाऱ्यांस पसंत न पडून, त्यांचीं व यांचीं भांडणें लागल्यामुळें १८२७त ब्रिटिश सरकारनें इस्माईल पंथास विरोध केला. तेव्हां यांची लहान टोळी पंजाब येथें गेली. तेथें अफगाण राजाचें पाठबळ मिळून त्यांनीं शिखांना लढाईस आव्हान दिलें; व पेशावर हें आपलें मुख्य ठिकाण केलें (१८२९). शीखांविरुद्ध झालेल्या लढाईत इस्माईल हाजी पडला (१८३१). तथापि त्याची चळवळ नाहींशी झाली नाहीं. वायव्य सरहद्दीवरील पर्वतांतून अद्याप यांचे कांहीं अनुयायी भेटतात.

**इस्राएल्स, जोसेफ** (१८२४-१९११)—हा डच चित्रकार असून याचें पहिलें महत्त्वाचें ऐतिहासिक चित्र, विल्यम प्रिन्स ऑफ ऑरेंज याचा स्पेनच्या राजाच्या आज्ञापत्राला विरोध, या आशयाचें आहे. पुढें लवकरच त्यानें ऐतिहासिक चित्रें काढण्याचें बंद करून मजूरवर्गाच्या आयुष्यक्रमाचीं चित्रें काढलीं. त्यांतहि कोळी लोकांचीं चित्रें काढण्याची त्याला विशेष आवड असे.

**इस्लामपुर**—मुंबई, सातारा जिल्हा. हा गांव वाळवें तालुक्यांत असून साताऱ्यापासून ४८ मैल व पेठपासून ३ मैल अंतरावर आहे. वाळवें तालुक्याचें हें मुख्य ठिकाण आहे. गांवांत मुसलमान लोक फार आहेत; कारण हें एके काळीं मुसलमानांच्या ताब्यांत होतें. याचे उरण व इस्लामपुर असे दोन भाग आहेत. त्यांपैकीं उरण पूर्वेकडील बाजूस असून इस्लामपुरापेक्षां जुनें आहे व यांत मुसलमान पीर बाबाफान याचा शिष्य शंभुअप्पा कोष्टी यानें बांधलेला दर्गा आहे. इस्लामपुरांत सरदार आनंदराव मंत्री यांचा वाडा आहे; त्याच्याभोंवतीं भिंत असून खंदक आहे व समोर एक तलाव आहे. येथून चिपळुणास तंबाखू व गूळ जातो व तेथून मीठ, खजूर, सुपारी, किराणा माल, मसाले, देशी व विलायती कापड आणि धातू हीं इकडे येतात. रेशमी मुकटे व पितळेचीं भांडीं चांगलीं होतात.

**इक्ष्वाकु**—इक्ष्वाकु हें कुल सूत संस्कृतींतील अत्यंत प्रसिद्ध कुलांपैकीं होतें; पण मांत्र संस्कृतीच्या लेखांत अध्वर्युप्रधान यज्ञसंस्थेच्या कालाचा उदय होईपर्यंत या कुलाचा फारसा परिचय नव्हता. इक्ष्वाकु म्हणून एक प्राचीन पुरुष होऊन गेला असावा, असें अथर्ववेदांतील त्याच्या उल्लेखावरून वाटतें.

ऋग्वेदांतील उल्लेखावरून मोठ्या राजकुलाचा संस्थापक जो इक्ष्वाकु त्याशीं या इक्ष्वाकूचा संबंध असेल असें वाटत नाहीं. ब्राह्मण-काल म्हणजे मांत्र संस्कृति व सूत संस्कृति यांच्या एकीकरणाचा काल. या कालामध्यें मात्र इक्ष्वाकूस बरेंच प्राधान्य मिळालेलें दिसतें आणि मंत्रोक्त राजांचा संबंध इक्ष्वाकूशीं जोडण्यांत आलेला दिसतो व इक्ष्वाकु कुलांतील राजांचा संबंध श्रौतविधीशीं जुळविण्यांत आलेला दिसतो.

भारत, भागवत, देवी भागवत, रामायण व अनेक पुराणें हीं सर्व इक्ष्वाकु घराण्याचीं इतिहाससाधनें होत आणि काल्पनिक परंपरा अर्वाचीन कालापर्यंत आणून ठेवावयाची असली तर सध्याच्या उदेपूरच्या राण्यांची वंशावळ पाहावी, म्हणजे थेट इक्ष्वाकूपासून किंबहुना सूर्यापासून आजच्या हयात राण्यापर्यंतची कुलपरंपरा स्पष्ट होईल.

वैवस्वतमनूच्या दहा पुत्रांतील इक्ष्वाकु ज्येष्ठ होय. इक्ष्वाकु राजा अति प्रख्यात असून याचें कुल सूर्यवंशांत अत्यंत प्रसिद्ध आहे. यानें वसिष्ठापासून अध्यात्मविद्या संपादून परमपद प्राप्त करून घेतलें होतें.

---

# ई

**ई**—अक्षरविकासासाठीं 'इ' (ऱ्हस्व) पहा. या 'इ' वरचा रफार (ʿ) हैहयवंशी जाजल्लदेवाच्या वेळच्या (इ. स. १११४) एका लेखांत आढळतो.

**ईजिअन समुद्र**—हा भूमध्य समुद्राचा एक भाग असून ग्रीस आणि आशिया मायनर यांच्यामध्यें वसला आहे. हा सुमारें ६०० मैल लांब व १७० मैल रुंद असून यांत पुष्कळ बेटें आहेत. ग्रीक संस्कृतीपूर्वी या भागांत जी संस्कृति नांदत होती तिला ईजिअन संस्कृति म्हणतात. या संस्कृतीची कल्पना होमरच्या काव्यावरून येते.

**ईजिअन संस्कृति**—जगामध्यें ज्या प्राचीन काळाच्या नष्ट संस्कृतींपैकीं कांहीं संस्कृतींची माहिती अर्वाचीन काळीं उत्खनन व प्राचीन लेखांचें वाचन यांमुळें उपलब्ध झालेली आहे अशा संस्कृतींपैकीं ईजिअन संस्कृति ही एक होय. या संस्कृतीचा उदय ईजिप्शिअन संस्कृति व ग्रीक संस्कृति यांच्या दरम्यानचा असावा. या संस्कृतीचें ज्ञान क्रीट बेटांतील कोनसस या गांवीं शोधून काढलेल्या प्राचीन अवशेषांवरून मिळालें आहे. या संस्कृतीचा ग्रीक

संस्कृतीवर महत्त्वाचा परिणाम घडून आल्यामुळें प्राचीन संस्कृतीच्या अभ्यासकांस या संस्कृतीचें महत्त्व फार वाटतें. या संस्कृतीसंबंधीं पुढील प्रकारचे अवशेष उपलब्ध झालेले आहेत: (१) राजवाड्यासारख्या मोठ्या इमारतींचे व घरें-थडगीं, वगैरेंचे उकरून काढलेले भाग; (२) हस्तिदंत, धातु, दगड यांवरील खोदीव काम, आयुधें, अलंकार, भांडीं, सिंहासनें, शवपेटिका, थडगीं, गटारें, वगैरे; यांखेरीज (३) होमरसारख्यांच्या ग्रंथांतील उल्लेख, स्मारकचिन्हें व समकालीन उल्लेख आणि चालीरीती, पंथ, विधी, वगैरेंचे अवशेष. राजवाड्यांच्या अवशेषांवरून राजसत्तेचें अनुमान करतां येतें. व खंडणीच्या यादीवरून सत्तेचें केन्द्र व मांडलिक राजे अथवा गांवें यांचा बोध होतो. बहुतेक समाधी राजवाड्यांत आढळतात यावरून राजाकडेच धार्मिक सत्ता असावी असें वाटतें. उपासनेमध्यें प्रथम निसर्ग व सूर्य, चंद्र, पर्वत, झाडें यांसारख्या दृश्य नैसर्गिक वस्तू, नंतर आयुधें, वगैरे व त्यानंतर मूर्ती प्रचारांत आल्या असाव्यात. प्राणिपूजाहि रूढ असावी. पारमार्थिक विचार ग्रीक लोकांच्या पारमार्थिक विचारांच्या पूर्वकालीन स्वरूपाचे म्हणजे सुमारें खि. पू. १५०० वर्षांच्या सुमाराच्या कालचे असावे.

सर्पालंकृत देवता

वेनीथ देवतेची प्रतिमा असलेली सुवर्णमुद्रिका

सशस्त्र सैनिक वगैरेंचीं चित्रें फारशीं आढळत नाहींत. यावरून क्षत्रिय वर्ग प्रामुख्यानें नसावा. नोंदणीसंबंधीं विस्तृत नियम आढळतात. यावरून कायद्याची वाढ बरीच झाली असावी. सत्ताधिकाऱ्यांची राहणी ऐषआरामाची असावी. मांसाहार रूढ असावा. मादक पेयेंहि प्रचारांत असावीं. मातीचीं व कांशाचीं भांडीं अनेक प्रकारचीं प्रचलित दिसतात. द्राक्षें व ऑलिव्ह फळांची लागवड होत असे. घरामध्यें उजेड व हवा येण्याकरितां चमत्कारिक गवाक्षें ठेवीत. सांडपाणी काढून टाकण्याची व्यवस्था असे. वृषभयुद्ध, मुष्टियुद्ध, नृत्य, द्वंद्वयुद्ध, वगैरे करमणुकीचे प्रकार असत. सृष्टींतील शक्तिपूजेपासून अवतारोपासनेपर्यंत सर्व प्रकारचीं पारमार्थिक स्थित्यंतरें झालेलीं आढळतात. या संस्कृतीचा उगम प्रास्तरायुधकाळांत झाला असावा. नंतर कांस्य युगामध्यें हिची वाढ झालेली दिसते. व्यापारी दळणवळण मेलॉस, ईजिप्त, ग्रीस देश, वगैरेंशीं असावें असें वाटतें. कारण मेलॉसचीं भांडीं क्रीट बेटांत आढळतात. अन्त्य संस्कारामध्यें शव दगडाच्या पेटींत घालून पुरीत, असें दिसतें. अग्निसंस्कार आढळत नाहीं. मातीचीं भांडीं करण्याच्या कलेंत यांची प्रगति बरीच झालेली दिसते, व हस्तिदंत-पाषाण-शिल्पाचीहि बरीच वाढ झालेली आढळते. तसेंच भांड्यांवरील चित्रकाम, खोदकाम व जडावाचें काम यांतहि बरीच प्रगति दिसून येते. यांची लिपि अगदीं स्वतंत्र असावी, कारण तिचें साम्य दुसऱ्या कोणत्याच लिपीशीं आढळत नाहीं.

या संस्कृतीचा आरंभ प्रास्तर युगांत झालेला असावा व येथें प्रथम वसाहत भूमध्य समुद्राच्या आसपासच्या मानववंशानें केली असावी. येथील जमिनी सुपीक असल्यामुळें या लोकांची सांस्कृतिक प्रगति झपाट्यानें झाली असावी. खि. पू. २५०० च्या सुमारास यांचें एक संघराज्य बनून, एक मुख्य व इतर मांडलिक राजे असावेत. मुख्य राजानें दगडी प्रासाद बांधला असावा. भांडीं वगैरेंचा व्यापार चालत असावा. तटबंदीच्या अभावावरून सर्वत्र शांतता असावी. या संस्कृतीचा खि. पू. १००० च्या सुमारास उच्चतम उत्कर्ष झाला असावा व यानंतर या संस्कृतीचा ठसा आसपासच्या प्रदेशावर पडून दळणवळण व व्यापार बराच वाढला असावा. लोहयुगाच्या सुरुवातीस रानटी लोकांच्या हल्ल्यांमुळें ही संस्कृति अवनतदशेस पोंचली असावी.

**ईजिना**—ग्रीक द्वीपसमूहांपैकीं, अथेन्सच्या दक्षिणेस ईजिनाच्या आखातांत हें सुमारें ३२ चौरस मैलांचें एक बेट आहे. येथील जमीन सुपीक नाहीं. कारण बहुतेक प्रदेश डोंगराळ आहे. येथील लोकवस्ती मुख्यत्वें खलाशांची असून फारच थोडे लोक शेती करतात. पीक मुख्यतः बदाम, ऑलिव्ह यांचें असून कांहीं ठिकाणीं धान्य पेरलें जातें. बहुतेक लोकवस्ती ईजिना या बंदरांतच राहते. लो. सं. ८,५००. एका टेकडीवर अथीनाचें सुंदर देवालय होतें; आतां त्याचे खांब फक्त उरलेले आहेत.

**ईजिप्त**—आफ्रिकेच्या ईशान्येला ईजिप्त हा देश असून त्याच्या उत्तरेकडे भूमध्यसमुद्र, पश्चिमेला लिबिया, दक्षिणेला अँग्लो-ईजिप्शियन, सुदान, आणि पूर्वेला तांबडा समुद्र आहे. लिबियाचा वाळवंटाचा प्रदेश धरून या देशाचें क्षेत्रफळ ३,८३,००० चौरस मैल आहे. लो. सं. १,५९,२०,७०२. परंतु या प्रदेशापैकीं

लोकवस्ती स्थायिक स्वरूपांत असलेला प्रदेश म्हणजे नाईल नदीचें खोरें हा असून त्याचें क्षेत्रफळ सुमारें १२,२२६ चौरस मैल आहे. ईजिप्तचा वरचा भाग म्हणजे हाल्फा ते बेनी सुहफा हा असून त्याची उंची दक्षिणेकडे उंच उंच होत २,००० फुटांपर्यंत येते. परंतु हाल्फापासूनचा खालचा भाग सुपीक व सपाट असून हा सर्व प्रदेश नाईलच्या गाळानें तयार झालेला आहे. नाईलच्या खोऱ्याचा संपन्न व सुपीक प्रदेश सोडल्यावर उरलेला ईजिप्तचा भाग वालुकामय ओसाड असून त्यांत मधून मधून ओलाव्याच्या जागा आहेत. या जागा कोठें कोठें चित्रांत दिसतात त्याप्रमाणें लहान नसतात. त्या म्हणजे २–४ मैलांचें पाण्यासभोंवतालचें मैदानच असतें व त्यांवर लोकवस्ती आणि शेती व पशुपालन चालतें. सिवा, बहारिया, फराफा, आस्यूट, झिफ्ता, वगैरे ठिकाणें अशा वस्तीचीं म्हणून प्रसिद्ध असून त्यांमधील वाहतूक लमाण-मार्गानें चालते. आस्वान, इस्ना, आस्यूट, नागझिफ्ता व हमादी या ठिकाणीं नाईल नदीला धरणें बांधलेलीं असून या धरणांच्या पाण्याखालीं सुमारें ८५,००,००० एकर जमीन भिजली जाते. या जमिनींत मका, कापूस, गहूं, ऊंस, फळफळावळ, भाजीपाला व तंबाखू हीं पेरलीं जातात. वर्षांतून दोनदां पिकें काढतात. 'जर पाणी मिळेल तर काठीलाहि पालवी फुटेल,' अशा अर्थाची अरब म्हण येथील लोकांत आहे; इतका प्रदेश सुपीक आहे. खनिज संपत्ति म्हणजे सोनें, रत्नें (वाळवंटांत) आणि किनाऱ्यालगतच्या भागांत पेट्रोल ही होय. निर्यात मालांत कापूस, तंबाखू, अत्तरें हीं असून कापडाचाहि त्यांत समावेश होतो.

**पिकाला पाणी देण्याची रीत**

ईजिप्तची राजधानी कैरो ही असून मुख्य बंदरें अलेक्झांड्रिया, पोर्ट सैद व सुएझ हीं होत. याशिवाय टांटा, दमणदूर, मनसुरा, डमेटा, आस्वान, फैयूम, बेनिसुएफ, वगैरे शहरें महत्त्वाचीं आहेत. मुसलमान व ख्रिश्चन यांची वस्ती या देशांत मुख्यत्वें आहे. कैरो व अलेक्झांड्रिया येथें मुसलमानी विश्वविद्यालयें असून त्यांतून हजारों विद्यार्थी शिक्षण घेत असतात.

ईजिप्तची संस्कृति ही फार प्राचीन असून जगांत जुन्या काळांत ती फार पुढारलेली होती. ईजिप्तमधील जगप्रसिद्ध मनोरे (पिरॅमिड) व त्यांतील हजारों वर्षें जमीनीच्या तळाशीं असलेलीं त्या काळच्या राजांचीं प्रेतें, त्यांसभोंवार गुंडाळलेलें रेशमी कापड, मसाल्याचीं द्रव्यें, निरनिराळीं जुन्या काळचीं नाणीं, भांडीं, या सर्व गोष्टी तेथील सुधारलेल्या लोकांची त्या काळांतील परिस्थिति प्रगट करतात. पाश्चात्य देशांना येथील लोकांनीं सुधारणेचे धडे दिले; इतका ईजिप्तचा जुना इतिहास उज्ज्वल आहे.

ईजिप्तमधील लोकांची ख्रि. पू. ५,००० वर्षांपूर्वीची संस्कृति फार उच्च प्रकारची होती व तिला तोड म्हणजे मेसापोटेमियांतील असीरियन संस्कृति होय. ईजिप्तमधील पहिलें ज्ञात असें राजघराणें म्हणजे ख्रि. पू. ३,४०० मध्यें मेनीजनें स्थापलेलें होय. या घराण्याच्या अमदानींतच जगप्रसिद्ध मनोरे (पिरॅमिड) बांधण्यांत आले. ख्रि. पू. १६५० पासून पुढें चार शतकेंपर्यंत ईजिप्त वैभवाच्या कळसावर होतें. ख्रि. पू. ३३२ मध्यें अलेक्झांडरनें अलेक्झांड्रिया नगराची स्थापना केली. तेव्हांपासून टॅलेमी राजांच्या अमदानींत हें बंदर जगांत अत्यंत नांवाजलेलें असे. ख्रि. पू. ३० सालीं ईजिप्तचा रोमन साम्राज्यांत व इ. स. ३९५ त बायझॅन्टाइन साम्राज्यांत प्रवेश झाला. नंतर ६३९ त अरबांनीं हें राष्ट्र जिंकून घेतलें. इ. स. च्या ८ व्या शतकापासून १९ व्या शतकापर्यंत अरबस्तानाचा एक स्वसत्ताक देश म्हणून ईजिप्त नांदला. इ. स. १२५० त जुल्मी मामेलूक गुलामांनीं राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. त्यांना १५१७ त ओटोमन सुलतान पहिला सेलिम यानें जिंकलें. महंमदअली या ईजिप्तच्या राजानें १८११ त मामेलूकांची कत्तल करून सुलतानाच्या सत्तेविरुद्ध बंड केलें. सुवेझ कालव्यावरील फ्रेंच आणि इंग्रज यांच्या ताब्यामुळें ईजिप्तच्या आर्थिक धोरणावर या युरोपियन राष्ट्रांची छाप पडूं लागली. १८८१ ते १९२२ पर्यंत हें राष्ट्र इंग्लंडच्या संरक्षणाखालीं होतें; पण १९२२ पासून एक स्वतंत्र राज्य म्हणून ईजिप्त मानला जात आहे.

१९३० सालीं राज्याची एक नवीन घटना तयार करण्यांत आली. पार्लमेंटमध्यें सिनेट व चेंबर ऑफ डेप्युटीज असे दोन भाग केले आहेत. राजघराणें वंशपरंपरागत असून राजा मंत्रिमंडळाच्या मदतीनें कारभार चालवतो. मंत्रिमंडळ पार्लमेंटला जबाबदार असतें. सध्यांचा राजा पहिला फरूक १९३६ त गादीवर बसला.

ईजिप्त राष्ट्राचा धर्म मुसलमानी आहे. व कुराण धर्मशास्त्राचा अभ्यास चालू ठेवण्यासाठीं कैरो येथें इ. स. ९७२ त स्थापलेलें एल् अझहर हें विद्यापीठ आहे. या देशांत अनेक ख्रिस्ती धर्म-पंथांचे लोक आहेत. त्यांमध्यें महत्त्वाचा पंथ कॉप्ट हा आहे.

७ ते १२ वयापर्यंत सक्तीचें शिक्षण आहे. किंडर गार्टन पद्धतीच्या शाळा अनेक आहेत. ५४ शाळांतून व्यावसायिक शिक्षण देण्यांत येतें. कैरो व अलेक्झांड्रा येथें एकेक विद्यापीठ आहे. आगगाड्या, जहाजें, विमानें, इ. बाबतींत हा देश चांगला पुढारलेला आहे.

**ईजिप्ती नाग (ॲस्प)**— ही एक ईजिप्तमध्यें आढळणारी नागाची जात आहे. हा नाग भयंकर विषारी असतो. जेव्हां यास धक्का लागतो किंवा याच्या-जवळ कोणी प्राणी येतो तेव्हां हा आपलें डोकें व शरीर वर उचलतो, आपली मान फुगवतो आणि त्यावर हल्ला करण्याकरितां उभा राहिल्यासारखा वाटतो.

**ईटन**—हें इंग्लंडमधील बकिंगहॅमशायर परगण्यांत थेम्स नदीकांठचें शहर आहे. लोकसंख्या सुमारें दोन हजार. या शहराला मुख्य प्रसिद्धि तेथल्या 'किंग्ज कॉलेज ऑफ अवर लेडी ऑफ ईटन' या नांवाच्या कॉलेजमुळें मिळालेली आहे. ही शिक्षणसंस्था प्रथम सहावा हेन्री याच्या कारकीर्दींत १४४० मध्यें स्थापन झाली. विद्यार्थ्यांची संख्या सुमारें १,१०० असून विद्यार्थी-गृहें २७ आहेत.

**ईडनिंबू**— ईडनिंबू ही एक निंबाचीच जात आहे. हिंदुस्थानच्या सर्व प्रदेशांत हें झाड आढळतें. हें फळ नारिंग वगैरे निंबांहून मोठें असतें. यांत लहान व मोठें निंबू अशा दोन जाती आहेत. त्यांचीं फळें व फुलें सारखींच असतात. लहान जातीच्या फळाची साल पातळ असून मोठ्या फळाची साल

जाड असते. या लिंबाचें उत्तम स्वादिष्ट लोणचें होतें. त्याच्या रसाचें लेमोनेड करतात. ईडनिंबू पित्तकफनाशक आहे. मोरचुताच्या विषावर ईडनिंबाच्या रसांत साखर घालून देतात. आम्लपित्तावर सायंकाळीं थोडा रस पिण्यास देतात.

**ईथर (इंधक)**—पेट घेणारा एक द्रवरूप पदार्थ. अल्कोहोल आणि गंधककाम्ल यांच्या मिश्रणाच्या उत्पातनानें (डिस्टिलेशन) हा तयार होतो. हा अल्कोहोलपेक्षां हलका असून पाण्यांत मिसळत नाहीं. त्याची चव गोड आहे. हा हवेंत सहज उडून जातो व त्यामुळें अतिशय थंडी उत्पन्न होते. चरबी, तेलें व इतर सेंद्रिय (ऑर्गॅनिक) पदार्थ विरघळवण्यासाठीं ईथरचा चांगला उपयोग होतो. शस्त्रक्रियेच्या वेळीं ठराविक जागीं बधिरता आणण्यासाठीं हिचा उपयोग करतात.

**ईद**—या मुसलमानी सणाचे दोन भाग आहेत: १. ईद उल् अझा म्हणजे यज्ञाचा दिवस किंवा बकर-ईद. ही जिल्हेज महिन्याची १० वी तिथि असून प्रत्येक मुसलमानानें या दिवशीं देवाला बळी द्यावा असें मुसलमानी धर्मशास्त्र सांगतें. बळी द्यावयाचा प्राणी ज्या त्या देशाप्रमाणें उंट, बकरा किंवा गाय असतो. हिंदुस्थानांत या दिवशीं मुसलमान गायी बळी देतात. २. ईद-उल् फित्र म्हणजे रमझानचा उपवास सोडण्याचा दिवस. याला रमझानकी ईद असेंहि म्हणतात. सवाल महिन्याच्या १ ल्या तिथीला हा दिवस येतो. या दिवशीं स्नानानें शुद्ध होऊन दानधर्म करतात व वेळ मजेंत घालवितात.

**ईदर संस्थान**—राजपुताना एजन्सींतील एक संस्थान. इ. स. ८९० पासून ९७० पर्यंत हें संस्थान गेहलोट अमलाखालीं होतें. नंतर १००० पासून १३०० पर्यंत परमार रजपूत अमलाखालीं आलें. अमरसिंग या शेवटच्या परमार राजानें हें संस्थान हाथी सोर्द या कोळ्याच्या स्वाधीन केलें. १७२८ सालीं जोधपूरच्या राजाच्या आनंदसिंग व रायसिंग या दोन बंधूंनीं येथें आपली सत्ता प्रस्थापित केली. या संस्थानच्या अधिकाऱ्याला महाराज ही पदवी आहे. त्याला दत्तक घेण्याचा अधिकार आहे व त्याला १५ तोफांची सलामी मिळते. ह्या संस्थानची लोकसंख्या सन १९४१ सालीं तीन लक्ष होती. शहरें व खेडीं मिळून ८८४ गांवें आहेत. सर्वांत हिंदू लोकांची संख्या जास्त आहे, त्यानंतर मुसलमान आणि मग जैन असा संख्यानुक्रम लागतो. ह्या संस्थानांतील मुख्य शहरें-अहंमदनगर, ईदर व वडाली हीं होत. संस्थानचें क्षेत्रफळ १८०५ चौ. मैल आहे. हें संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

संस्थानचें उत्पन्न सुमारें ३५ लक्ष रुपये आहे. सध्यांचे महाराज धीरज श्रीहिंमतसिंघ हे १९३१ सालीं गादीवर बसले. यांचें विश्वविद्यालयीन व लष्करी शिक्षण चांगलें झालें असून हे उत्कृष्ट क्रीडापटु आहेत. यांना जहागिरदारांकडून खंडणी मिळत असे व तेहि गायकवाडांना ब्रिटिश सरकारमार्फत खंडणी (३०३४० रु.) देत.

ईदर शहर—लोकसंख्या सुमारें आठ हजार. बॉंबे, बरोडा अँड सें. इं. रेल्वेच्या अहमदाबाद-प्रांतिज फांट्यावर हें स्टेशन लागतें. येथून एक मैलावर रामलेश्वराचा तलाव आहे. त्याच्या पश्चिम कांठावर ईदर राजघराण्यांतील पुरुषांच्या छत्र्या आहेत. किल्ल्याच्या पठारावर असलेल्या ज्या दोन इमारतींकडे ताबडतोब लक्ष जातें, त्या इमारती म्हटल्या म्हणजे रणमल्लाची चौकी व 'रुथी राणीनो महाल' या होत. गडावर जातांना श्रीशांतिनाथजींचें

व श्री शांभवनाथजींचें अशीं दोन जैन मंदिरें लागतात. हीं दोन देवळें फार प्राचीन काळचीं आहेत.

**ईदिग**—ही तेलगु ताडी-कलालांची जात उत्तर सरकार, नेलोर, कडाप्पा जिल्हा, चिंगलपट, उत्तर अर्काट, सालेम, वगैरे भागांतून आढळते. लो. सं. सुमारें सव्वातीन लक्ष आहे. वालियावंशांतील हे लोक असून धंद्यामुळें दूर झाले आहेत असें कोणी म्हणतात. हे मुख्यतः वैष्णव आहेत. यांच्यांत दोन वर्ग आहेत— एक दंडु ईदिग व दुसरा वालिगा ईदिग. कांहीं धंद्यांसंबंधींच्या चालीमुळें हे तामिळी शानानपासून विभक्त दिसतात. तामिळी ताडी-कलाल दारू नारळीपासून काढतात, पण खजुरीपासून काढीत नाहींत. याच्या उलट तेलगू खजुरीपासून ताडी काढतात, पण नारळीला शिवत नाहींत. यांचा पिढीजात धंदा ताडी गाळण्याचा असला तरी हल्लीं फार थोडे लोक तो चालवितात. पुष्कळसे मोलमजुरी, शेतकी व इतर धंदे करून पोट भागवितात. मद्यदेवता जी एलम्मा तिला हे लोक भजतात. मद्य पिणें यांच्यांत वर्ज्य मानलें आहे. व्यासापासून आपली उत्पत्ति झाल्याचें सांगतात. यांची मूळ भाषा तेलगू आहे.

या जातींत बहुपत्नीत्व रूढ आहे. प्रौढ विवाह करण्यासंबंधीं या जातींत नियमच आहे.

हे मृतांना पुरतात व बारा दिवस सुतक पाळतात. 'ताताचार्य' म्हणून एक वैष्णव ब्राह्मण त्यांचा गुरु असतो. कित्येकांना 'सतानी' गुरु असतो. उच्च जातीच्या लोकांस ते क्वचित् प्रसंगीं आपल्या जातींत घेतात.

**ईलियड**—एक ग्रीक महाकाव्य. याचा कर्ता होमर आहे. ग्रीकांनीं ईलियम किंवा ट्राय याला दहा वर्षें वेढा दिला होता. शेवटच्या वर्षीं अचिलीस जेव्हां रागानें युद्धांतून पराङ्मुख झाला तेव्हां हेक्टरनें पुढें येऊन विजय मिळवून दिला, अशी कथा या काव्यांत आहे. याचीं इंग्रजींत व इतर भाषांत भाषांतरें झालेलीं आहेत.

**ईव्हान्स, सर जॉन** (१८२३-१९०८)—हा इंग्रज प्राचीनवस्तुशास्त्रज्ञ असून याचे मुख्य ग्रंथ-'दि एन्शंट स्टोन इंप्लीमेंट्स, वेपन्स अँड ऑर्नमेंट्स ऑफ ग्रेट ब्रिटन अँड आयर्लंड' आणि 'दि एन्शंट ब्राँझ इंप्लीमेंट्स, वेपन्स अँड ऑर्नमेंट्स ऑफ ग्रेट ब्रिटन अँड आयर्लंड' हे आहेत.

**ईशोपनिषद्**—हा शुक्ल यजुर्वेदाच्या वाजसनेयी संहितेचा चाळिसावा अध्याय आहे. या ईशोपनिषदाची ईशावास्योपनिषद्, वाजसनेयी उपनिषद्, संहितोपनिषद्, मंत्रोपनिषद् अशीं निरनिराळीं नांवें आहेत. इतर उपनिषदांमध्यें व या उपनिषदामध्यें एक मोठा महत्त्वाचा भेद असा आहे कीं, इतर सर्व उपनिषदें ऋषिप्रणीत ब्राह्मण ग्रंथांत अगर आरण्यकांत आलीं आहेत. पण हें एकच उपनिषद् तेवढें वाजसनेयी संहितेमध्यें अंतर्भूत झालें आहे. या दृष्टीनें इतर सर्व उपनिषदापेक्षां याचें महत्त्व अधिक आहे.

या उपनिषदाचे केवळ १८ च श्लोक आहेत; पण या १८ श्लोकांत सर्व वेदान्ताचें सार आलें आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं; पण या १८ श्लोकांतील तात्पर्यासंबंधानें प्राचीन आचार्यांत मतभेद आहे. या उपनिषदाप्रमाणेंच ज्ञानानेंच मोक्ष मिळतो व कर्मानें अगर उपासनेनें किंवा कर्म व उपासना मिळून मोक्ष मिळत नाहीं, असें शंकराचार्यादि अद्वैतवादी अगर ज्ञानमार्गी म्हणतात, तर ज्ञान व कर्म या समुच्चयाच्या अनुष्ठानानें मोक्ष मिळतो, असें बोधायनप्रभृति वृत्तिकार व त्यांचे रामानुजाचार्यप्रभृति अनुयायी प्रतिपादन करतात; पण निर्विकारबुद्धीनें विचार केल्यास हें उपनिषद् निष्कामकर्मपर मानावें लागतें.

ईशोपनिषदावर शंकराचार्य, आनंदतीर्थ, वगैरे अनेक विद्वानांनीं टीका लिहिल्या आहेत.

**ईश्वरकृष्ण**—सांख्यकारिकांचा कर्ता. याच्या काळाविषयीं वाद आहे. चिनी पुराव्यावरून पाहतां हा वसुबंधूचा समकालीन होतासें दिसतें. पण वसुबंधूचाहि काल निश्चित नाहीं. तो चवथें किंवा पांचवें शतक हा असावा.

**ईश्वरविज्ञान**—(थिऑलॉजी). ईश्वराचें स्वरूप कसें आहे याचा तर्कशास्त्रानुसार अभ्यास करणें, हा थिऑलॉजीचा मूळ विषय आहे. नंतर धर्माचीं शाश्वत तत्त्वें प्रतिपादन करणें याचाहि या विषयांत अन्तर्भाव झाला. याप्रमाणें अत्यंत व्यापक अर्थानें ईश्वराविज्ञान म्हणजे एखाद्या विशिष्ट धर्माचीं तत्त्वें व धार्मिक आचार, आणि त्या धार्मिक आचारविचारांचीं कारणें, यांचें प्रतिपादन प्रचलित तत्त्वज्ञानांतील तत्त्वांना अनुसरून करणें. तथापि ईश्वरविज्ञान आणि तत्त्वज्ञान या दोन विषयांमध्यें परंपरागत फरक आहे. ईश्वरविज्ञान या विषयांत ईश्वरानें केलेलें प्रकटीकरण यावर विश्वास ठेवणें, आणि असा विश्वास कां ठेवावा याचीं कारणें सांगणें, यांचा समावेश होतो. यामध्यें पुढील बाबींचा समावेश होतो—(अ) नैसर्गिक ईश्वराविज्ञान म्हणजे ईश्वराविषयींचें धार्मिक सत्तत्त्वविषयासंबंधीं ज्ञान मानवाच्या नैसर्गिक बुद्धीला जग व जीव यांचें निरीक्षण केल्यानें होऊं शकतें. जगांतील घडामोडी आणि मनुष्याचें नैतिक जीवन यांच्यापासून ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल व कर्तृत्वाबद्दल कांहीं अनुमानें काढतां येतात. (आ) ईश्वरानें धार्मिक ग्रंथांत जें ज्ञान प्रकट केलें, तसेंच जीझस ख्राइस्टसारख्या पवित्र व्यक्तींमार्फत जें ज्ञान मिळालेलें आहे, त्यापासून अनुमानपरंपरेनें ईश्वरविषयक ज्ञानाचा विस्तार करणें. (इ) या ईश्वर-

विज्ञानाची एक शाखा बायबलमधील ईश्वरविज्ञान ही आहे. कारण या बायबल ग्रंथांत ईश्वरी प्रेरणेनें झालेलें ज्ञान लिहिलेलें आहे. (ई) यानंतर धार्मिक तत्त्वांची सुसंबद्ध रीतीनें मांडणी केलेली आहे, असे ईश्वरविज्ञानविषयक ग्रंथ. (उ) ऐतिहासिक ईश्वरविज्ञान या प्रकारच्या ग्रंथांत ख्रिस्ती धर्म-संस्थापनेपासून आतापर्यंत या धार्मिक तत्त्वांचा प्रत्यक्ष व्यवहारांत अमल कसा झाला आहे, त्याची माहिती असते. आणि (ऊ) व्यावहारिक ईश्वरविज्ञान या विषयांत क्लर्जीमन वगैरे धर्मोपदेशक या तत्त्वांचें प्रवचन ख्रिस्ती समाजापुढें कसें करतात, तत्संबंधीं माहिती. याप्रमाणें ईश्वरविज्ञानाच्या ख्रिस्ती शाखा आहेत.

**ईश्वरसिंग**—एक जयपूरचा राणा. याचा बाप जयसिंग इ. स. १७४३ त वारल्यावर हा गादीवर बसला. याचा वडील भाऊ माधवसिंग मेवाडांत जहागीरदार होता. तो लागलीच मेवाडराण्याची मदत घेऊन ईश्वरसिंगाशीं लढूं लागला. ईश्वरसिंगानें शिंदे-होळकरांची मदत मागितली. त्यांनीं प्रथम ईश्वरसिंगाचा पक्ष घेऊन राजमहाल येथें माधवसिंगाचा पराभव केला व त्यांचा तंटा तीन लाखांवर तोडला; पण माधवसिंगाचा मदतनीस मेवाडचा राणा जगत्सिंग यानें खुद्द पेशव्यांकडे वकील पाठवून मदत मागितली. माधवसिंगानें यापूर्वीच होळकरास ६५ लक्ष रुपयांचें आमिष दाखवून फोडला होता. शिंदे विरुद्ध असतांहि पेशव्यांनीं पैशाच्या लोभास्तव माधवसिंगाचा पक्ष उचलून जयपूर राज्यांतील नेवाई प्रांतावर स्वारी केली (१७४७.). तेव्हां ईश्वरसिंगानें नेवाईसुद्धां चार महाल माधवसिंगास व पेशवे-होळकरांस नजराणा अशा तऱ्हेचा करारनामा करून दिला. परंतु पेशव्यांशीं केलेला हा करार ईश्वरसिंगानें पाळला नाहीं म्हणून होळकर त्याजवर चालून गेला व त्याची हड्डी नरम करून करार पुरा करून घेतला. यापुढें ईश्वरसिंगास होळकराचा अतोनात जाच होऊं लागला. अखेर तो जिवाला कंटाळून विष खाऊन मेला (१७५१). त्याच्यानंतर माधवसिंग गादीवर आला.

**ईश्वरी योजना**—(प्रीडेस्टिनेशन). या जगांतील सर्व घडामोडी ईश्वरानें पूर्वनियोजित केल्याप्रमाणें घडतात, मनुष्याचें कायमचें भवितव्य ईश्वर आपल्या इच्छेनुसार ठरवतो, असा हा ईश्वरविज्ञानशास्त्रांतला सिद्धान्त आहे. या सिद्धान्ताबद्दल धर्मसंस्थांतून खूप जोराचे वादविवाद आणि कलह झालेले आहेत. पेलॅगियसचें मत असें कीं, सत्कृत्यें करणें ही गोष्ट मानवी स्वभावाला शक्य आहे, आणि म्हणून मुक्ति मिळवणें ही गोष्ट मनुष्याला स्वेच्छेनुसार करतां येण्यासारखी आहे. उलटपक्षीं ऑगस्टाइननें असें प्रतिपादन केलें कीं, ईश्वरी कृपेवेरीज मनुष्याच्या हातून सत्कृत्यें घडणें शक्य नाहीं. विशेषतः आद्य मानव जो आदाम याचा अधःपात झाल्यामुळें मनुष्यमात्राला इच्छास्वातंत्र्यरूप सामर्थ्य मुळींच नाहीं हें सेंट ऑगस्टाइनचें मत पाश्चात्य धर्मसंस्था (वेस्टर्न चर्च) आणि कॅल्व्हिनिस्टिक ईश्वरविज्ञान यांमध्यें प्रभावी आहे. मात्र अँग्लीकन चर्च, आणि ख्रिस्ती धर्म-सुधारणा झाल्यानंतरचें रोमन कॅथॉलिक चर्च, यांनीं या प्रश्नावर निश्चित मत दिलें नाहीं.

घड्याळाच्या आंत जशी स्प्रिंग असते तद्वत् थिऑसफीच्या दृष्टीनें सर्व सृष्टीचे व्यापार चालविणारी ईश्वरनामक एक सुबुद्ध व डोळस शक्ति सृष्टीच्या पाठीशीं आहे. ती सुबुद्धपणानें सृष्टींतील सर्व व्यवहार चालविते. सुबुद्ध माणूस मनांत योजना करून आपले उद्योग तदनुसार करीत असतो तद्वत् ईश्वर नांवाची सृष्टींतील सर्व लहान-मोठे व्यापार चालवणारी जी शक्ति आहे तिनें आपले व्यवहार ठराविक योजनेस धरून चालविलेले असतात. खनिज कोटि, वनस्पतिकोटि, प्राणिकोटि, मानवकोटि हे सृष्टियोजनेंतील शाळेंतल्या वर्गांसारखे वर्ग आहेत. अलीकडील उत्क्रांति हा शब्द ह्या ईश्वरी योजनेचा निदर्शक आहे. उत्क्रांतिक्रमांत उत्तरोत्तर जे जीव निर्माण होत असतात त्यांचे देह अधिकाधिक समृद्ध व सोईस्कर व्हावे व त्या देहांतून जे चैतन्य गुण प्रकट व्हावयाचे ते अधिकाधिक विशाल व ऐश्वर्यवान् असावे अशी ईश्वरी योजना आहे. मानवी प्रगति व मानवी इतिहास यांच्या मागेंहि ही ईश्वरी योजना असते व मानवी इतिहासाच्या रंगभूमीवर त्या योजनेचा चित्रपट क्रमानें उलगडत जात असतो. निरनिराळीं राष्ट्रें, निरनिराळे वंश, राष्ट्रांचे व संस्कृतींचे उदयास्त, निरनिराळ्या लोकांच्या वसाहती व राज्यें, साम्राज्यें, निरनिराळ्या धर्मांची संस्थापना, वगैरे इतिहासांतल्या गोष्टी या योजनेस धरून होतात. ईश्वरी योजनेशीं एकरूप झालेली मनु, व्यास (बोधिसत्त्व), वगैरे ऋषितुल्य माणसें सध्यां पृथ्वीवर विद्यमान असून ही योजना त्यांच्या हातांत असते, अशी थिऑसफीची शिकवण आहे.

**ईसॉप**—एक प्रसिद्ध ग्रीक कल्पितकथाकार. हा ख्रिस्ती शकापूर्वी ६२० ते ५६० या कालांत होऊन गेला. सॅमोस इआड्मनचा तो गुलाम होता, यापलीकडे त्याच्यासंबंधीं कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. पुढें तो लिडियाचा राजा क्रोसिअस याच्या दरबारीं राहिला. तेथें सोलनची व त्याची गांठ पडली. एके ठिकाणीं तो फार कुरूप होता असें दर्शविलें आहे. हा कुबडा होता अशी समजूत आहे व त्यावरून इंग्रजींत ईसॉप म्हणजे कुबडा असें विशेषण रूढ झालें आहे. याच्याउलट ईसॉपला सुंदर म्हणूनहि म्हटलेलें आढळतें.

ईसॉप यानें आपल्या कथा बहुधा लिहून ठेवलेल्या नसून त्या परंपरेनें तोंडींच चालत आल्या असल्या पाहिजेत. 'ईसॉपच्या

कल्पित गोष्टी ' हें पुस्तक अलीकडे रचण्यांत आलें. त्यांतील प्राच्य गोष्टी तर ईसॉपच्या नसून मागाहून त्या त्याच्या नांवावर पडल्या. प्लानुडीजनें आज आपल्यापुढें असलेल्या 'ईसॉप्स फेबल्स'-ची प्रत तयार केली. ईसॉपच्या गोष्टींचा मूळ ग्रीक ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वी १०० गोष्टींचें लॅटिन भाषांतर रोम येथें १४७६ त प्रसिद्ध झालें. नंतर चार वर्षांनीं प्लानुडीजची संहिता मिळविण्यांत येऊन त्याच्या नवीन सुधारलेल्या आवृत्ती काढण्यांत आल्या.

**ईस्ट इंडीज**—ब्रिटिश, डच, फ्रेंच व पोर्तुगीज असे चार ईस्ट इंडीज विभाग आहेत. पूर्वी हिंदुस्थान, फर्दर इंडिया व मलाया आर्चिपेलॅगो या समूहाला ईस्ट इंडीज म्हणत; कारण ज्या वेळीं वेस्ट इंडीजचा शोध लागला त्या वेळीं तो हिंदुस्थानचा पश्चिम भाग असावा असा समज होता. हल्लीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश मुलुखाला ब्रिटिश ईस्ट इंडीज, फ्रेंच मुलुखाला फ्रेंच ईस्ट इंडीज व पोर्तुगीज मुलुखाला पोर्तुगीज ईस्ट इंडीज म्हणतात. कधीं कधीं फक्त मलाया, आर्चिपेलॅगोलाच ईस्ट इंडीज म्हणतात; व या प्रदेशांतील जावा, सुमात्रा वगैरे डच लोकांच्या मुलुखाला साधारणतः ' डच ईस्ट इंडीज ' म्हणतात.

**ईस्ट इंडिया कंपनी**—हिंदुस्थानावर जिनें स्वामित्व मिळविलें व तें अखेर आपल्या सरकारला बहाल केलें ती ही व्यापारी कंपनी जगाच्या इतिहासांत चिरनाम राहील. प्रथम १६०० सालीं इंग्लंडच्या एलिझाबेथ राणीकडून पूर्वेकडे व्यापार करण्याची कंपनीनें सनद घेतली व हिंदुस्थानांत व्यापार सुरू केला. पोर्तुगीज व्यापाऱ्यांवर जेव्हां समुद्रावर विजय मिळविला तेव्हां कंपनीला मोगल बादशहाकडून मान्यता मिळत गेली. पुढें कांहीं काळ डच कंपनीशीं मिळून व्यापार करण्याचा तह झाला, तरी तो फार काळ टिकला नाहीं. ईस्ट इंडिया कंपनी स्वतंत्रपणेंच आपला व्यापार पाहूं लागली. १६४० सालीं तिनें मद्रासकडे वखारीसाठीं जमीन मिळविली. सुरतेला तिचें अधिकारीमंडळ असे, पण बंगाल आणि कारोमांडल किनाऱ्यांवरील वखारींवरील वर्चस्व मद्रास वखारीकडे आलें होतें. कंपनीला वेळोवेळीं इंग्लंडच्या राजाकडून सनद नवी करून घ्यावी लागेच. १६६० मध्यें तिला राजाकडून वखारींबाबत आणि मिळविलेल्या मुलुखाबाबत राजकीय आणि न्यायदानविषयक हक्क मिळाले. तसेंच मुलुखावर गव्हर्नर नेमण्याचा अधिकारहि प्राप्त झाला. इंग्लंडांतील १६८८ च्या राज्यक्रांतीनंतरचा काळ कंपनीला फार वाईट गेला. दुसरी एक प्रतिस्पर्धी कंपनी निघाली; पण १७०८ मध्यें दोघींची एकी होऊन पुन्हां कारभार सुरळीत चालू झाला. या एकीमुळें कंपनीच्या भागीदारांना फार नफा मिळूं लागला. तेव्हां शेकडा ८ हा डिव्हिडंडचा भाव नक्की करण्यांत आला. हिंदुस्थानांत फ्रेंच व्यापाऱ्यांचेंहि चांगलें बस्तान बसूं लागल्यामुळें स्पर्धा उत्पन्न झाली. फ्रेंच-इंग्लंड यांच्यांतील युद्धांचे प्रतिध्वनी इकडेहि उठले. हिंदुस्थानांत कंपनीला जसजसे जास्त मुलूख मिळत चालले तसतसे इंग्लिश पार्लमेंटांत कंपनीला राज्य चालविण्याचे अधिकार आहेत काय, असे मुद्दे जोरजोरानें निघूं लागले. तेव्हां १७७३ सालीं पार्लमेंट-नें एक नियमन (रेग्युलेटिंग) कायदा करून कंपनीचे अधिकार मर्यादित केले व पार्लमेंटची सत्ता तिच्यावर आणून बसविली. १७८४ मध्यें पुन्हां कंपनीचा हिंदुस्थानांतील कारभार अति-शय वाईट आहे अशा तक्रारी आल्या असतां पार्लमेंटनें एक सत्ता-मंडळ (बोर्ड ऑफ कंट्रोल) कंपनीच्या एकंदर कारभारावर देखरेख करण्यासाठीं नेमिलें. तेव्हांपासून कंपनीची राजकीय सत्ता संपुष्टांत येऊं लागली. १८३४ सालीं कंपनीची सनद नवी करून देण्याचा प्रश्न पार्लमेंटपुढें आला असतां, कंपनीच्या कारभारावर जोराची टीका होऊन कंपनीनें आपला व्यापार तावडतोब गुंडाळावा असें ठरलें. १८५७ च्या शिपायांच्या क्रांतियुद्धामुळें तर कंपनीचें आयुष्यच खलास होऊन हिंदु-स्थानचा सर्व कारभार इंग्लंडच्या राज्यकर्त्यांकडे प्रत्यक्ष आला.

**ईस्टमन, जॉर्ज** ( १८५४–१९३२ )—कोडॅक कॅमेराचा जनक. पूर्वी फोटोग्राफींत 'ओली पद्धत' असे. म्हणजे कांचेवरचें रसायन ओल्या स्थितींत असे. त्यामुळें फार त्रास पडे. तेव्हां ईस्टमननें 'कोरड्या कांचा' तयार करण्याची कृति काढली. पुढें कांचांऐवजीं फिल्म वापरणें सुरू केलें. इ. स. १८८९ मध्यें त्यानें सुटसुटीत कॅमेरा बनविला. तो कोडॅक होय. त्यामुळें फोटो घेणें फार सुलभ झालें व या धंद्याचा प्रसार जगभर झाला. नंतर कॅमेरांत सुधारणा केल्या व फोटोला लागणारे सर्व जिन्नस कोडॅक कंपनींत आयते मिळण्याची त्यानें व्यवस्था केली. सिनेमाचा शोध एडिसननें लावल्यावर त्याला लागणारी फिल्म ईस्टमननें तयार केली. त्यानें अतोनात पैसा मिळविला, पण तो सर्व धर्मादाय दिला. सिनेमा व फोटोची कला जोंपर्यंत आहे तोंपर्यंत ईस्टमनचें नांव राहील.

**ईस्टर**—एक ख्रिस्ती सण. येशू ख्रिस्ताच्या पुनरुत्थानाच्या स्मरणार्थ हा साजरा होतो. अँग्लो-सॅक्सन 'एओस्ट्र' या वसंत देवतेवरून इंग्रजी नांव पडलें. हा सण कधीं करावा या-विषयीं ख्रिस्ती धर्मगुरूंत बराच वाद होता. पुढें इ. स. ३२५ त असें ठरलें कीं, २१ मार्चनंतर जी पौर्णिमा येईल तिच्या पुढचा रविवार ईस्टर धरावा. लीग ऑफ नेशन्सच्या कॅलेंडर कमिटीनें याचा पुन्हां विचार केला व १९२८ त पार्लमेंटांत असा कायदा झाला कीं, एप्रिलमधील दुसऱ्या शनिवारनंतर येणारा र

ईस्टर धरावा. या सणांत अंडीं देतात. कारण अंडें हें पुनरुत्थानाचें जुनें प्रतीक आहे.

**ईस्टर बेट**—दक्षिण पॅसिफिक महासागरांत सुमारें १२ मैल लांबीचें हें बेट चिलीपासून सुमारें २,००० मैल असून तें चिलीच्या ताब्यांत आहे. क्षे. फ. ५० चौ. मै.. इ. स. १७२२ सालीं ईस्टरच्या दिवशीं याचा शोध लागला म्हणून हें नांव पडलें. येथील लोक मागासलेल्या अवस्थेंतच असून ते पॉलिनेशियन व मेलानेशियन या वंशांचे आहेत. हे लोक उंचच उंच प्रतिमांचे उपासक असून या प्रतिमा ज्वालामुखींतील राखेच्या दगडाच्या केलेल्या आहेत. दोनतीनशें फूट लांबीच्या चौथऱ्यावर ४ ते ३७ फूट उंचीच्या या अत्यंत प्राचीन मूर्ती आहेत. हल्लींचे तेथील लोक यांचेच वंशज होत.

**ईस्टविक, एडवर्ड बॅक्हाऊस** (१८१४–१८८३)—एक प्राच्य वाङ्मयविशारद अँग्लो-इंडियन. १८४३ त 'किस्सेई संजान' (पारशांच्या हिंदुस्थानांतील आगमनाचा इतिहास) या फारशी ग्रंथाचें भाषांतर यानें केलें व बाँबे एशियाटिक सोसायटीच्या नियतकालिकांतून 'लाइफ ऑफ झोरॉस्टर' (झोरॉस्टरचें चरित्र), सिंधी शब्दकोश व निरनिराळे लेख लिहिले. १८४५ त त्याला हेलबेरी कॉलेजांत हिंदुस्थानी भाषेचा प्रोफेसर नेमलें. पुढें दोन वर्षांनीं त्याचें हिंदुस्थानी व्याकरण प्रसिद्ध झालें. यानंतर गुलिस्तानची गद्य-पद्य भाषांतरासहित नवी आवृत्ति, 'प्रेमसागर' ची हिंदी भाषांतरासहित एक आवृत्ति आणि 'बाग ओ बहार' व बीदपयीचें 'अन्वार इ सुहाइली' यांचीं भाषांतरें त्यानें प्रसिद्ध केलीं. १८६६ त हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरीचा तो प्रायव्हेट सेक्रेटरी झाला. निरनिराळ्या वेळीं त्यानें मरेची अनेक 'इन्डियन हँडबुक्स' लिहिलीं. त्याचा शेवटला ग्रंथ म्हणजे 'केसर-नामा-इ-हिंद' हा होय.

---

# उ

उ—या वर्णाला आजचें स्वरूप येण्याला अशोककालीन अवस्थेपासून इ. ८३७ पर्यंत चार-पांच अवस्थांतून जावें लागलेलें दिसतें. प्रथम काटकोनासारखेंच याचें स्वरूप होतें. पुढें काटकोनाच्या पायाला बांक येऊं लागला.

**उकायली**—ही पेरू देशामध्यें ॲमेझॉन नदीची सर्वांत मोठी शाखा नदी आहे. हिची लांबी १५०० मैल आहे. १००० मैलांपर्यंत ही नौकानयनाला उपयुक्त आहे.

**उकीर घूस**—(इं. मोल रॅट). हा उंदीरवर्गातील एक प्राणी असून शरीरानें आंखूड पण बळकट अवयवांचा असतो. यास लहानशी शेंपूट असून बारीक कान व डोळे असतात. हे प्राणी बागेमध्यें उकरून बोगदे तयार करतात.

**उकीर झुरळ**—(इं. मोल क्रिकेट). झुरळ, वगैरे वर्गातील हा एक कीटक असून त्याचा आकार, वगैरे झुरळासारखा असतो. हा सुमारें दीड इंच लांब असून पिंगट रंगाचा असतो. हा बागेंत बिळें तयार करून बागेची फार नासाडी करतो.

**उखाणा**—'उखाणा' हा शब्द मराठी भाषेंत अनेक अर्थांनें वापरला जातो. पुरुषानें स्त्रीचें अगर स्त्रीनें पुरुषाचें नांव यमकयुक्त वाक्यें योजून घेणें, हा झाला पहिला प्रकार. दुसऱ्या प्रकारांत स्त्री अगर पुरुष यांच्या नांवाचा कांहीं निर्देश नसून एखाद्या वस्तूचीं बाह्य लक्षणें दिलेलीं असतात व त्यांवरून ती वस्तु ओळखावयाची असते. अर्थात् हीं दिलेलीं लक्षणें वेगवेगळीं घेतलीं असतां वेगवेगळी वस्तु म्हणून आठवते; यामुळें 'अशी कोणती वस्तु कीं, तींत सर्व लक्षणें एकत्रित आहेत?' असा कूट प्रश्न उखाण्यांत असतो; कित्येकांत तर उत्तरहि गुप्तपणें गोंवलेलें असतें. तिसऱ्या प्रकारांत काव्यमय भाषेंत उमदा खेळकरपणा व्यक्त केला गेला आहे अशी प्रासयुक्त वाक्यरचना आढळून येते.

वरील तिन्ही प्रकारांत योजलेली भाषा अलंकारयुक्त, प्रासादिक व ओघवती असते. यामुळें उखाण्यास मराठी वाङ्मयांत एक विशिष्ट प्रकारचें वाङ्मय म्हणून स्थान मिळालें आहे, तें योग्यच आहे. पुढें दिलेल्या उखाण्यांत निःसंशय काव्य आहे: (१) महेश्वरी चंद्रकळा, तिला मोतीचुरी कांठ, ++ + रावांच्या जिवावर केला हळदी-कुंकवाचा थाट. (२) काळी कचूबाई, हिरवी बचूबाई, पांढरा आलोबा, उघडी सीताबाई. (उत्तर—कात, पान, चुना, सुपारी).

**उखा**—हिंदुस्थान, काठेवाडांतील एक प्रसिद्ध बंदर. काठेवाड द्वीपकल्पाच्या अगदीं नैर्ऋत्येकडे मोक्याच्या जागीं हें वसलें आहे. गलबतें आंत येण्याजाण्याला आतां चांगल्या सोयी केल्या आहेत. तथापि आडवळणी व कोणत्याहि मोठ्या शहरापासून दूर असल्यानें हें मागें पडलें आहे. हें बंदर बडोदें राज्यांत येतें.

**उखामंडळ**—बडोदें संस्थान, एक तालुका. हा बडोदें संस्थानच्या अगदीं पश्चिमेकडील भागांत आहे. क्षेत्रफळ २७५ चौ. मै.. लो. सं. (१९३१) ३०,३३४. उखामंडळ हें गायकवाड सरकारच्या ताब्यांत सन १८१७ मध्यें आलें. येथील मूळचे रहिवासी वाघेर लोक आहेत. या तालुक्यांत मुख्य गांव म्हणजे द्वारका हें पुराणप्रसिद्ध क्षेत्र होय. शिवाय इतर ४३ खेडीं आहेत.

हा प्रदेश म्हणजे रुक्ष सपाट जमीन आहे. समुद्रकांठचा प्रदेश रेताड असून इतरत्र सर्वसाधारण पीक येतें. मुख्य पीक म्हणजे बाजरी, ज्वारी, वगैरे. पाऊस फार कमी पडतो.

**उग्रसेन**—यदुवंशांतील एक राजा व कंसाचा पिता. यास कंसानें बंदींत ठेवलें होतें, पण कृष्णानें सोडविलें व मथुरेच्या गादीवर बसविलें.

**उग्रिअन**—ही तुराणी लोकांची एक शाखा आहे. त्यांची मुख्य शाखा मग्यार उर्फ हंगेरिअन ही असून त्यांची लोकसंख्या १,००,००,००० हून अधिक आहे. दुसऱ्या दोन उपशाखा आस्तियाक ( लोकसंख्या सुमारें १८००० ) आणि व्होगल ( लोकसंख्या सुमारें ७००० ) ह्या आहेत.

**उचकी**—आपल्या शरीरांत ऊर व उदर यांच्या दरम्यान एक स्नायूचें पटल असून तें अपचनानें अगर इतर कोणत्याहि कारणानें एकदम संकुचन पावतें, तेव्हां उचकी लागते. उचकी पुष्कळदां फार थोडक्या वेळांत थांबते; परंतु केव्हां केव्हां कांहीं दिवस अगर कांहीं आठवडेहि कमीअधिक प्रमाणांत टिकूं शकते. कांहीं मंडळींना एकदम मानसिक धक्का बसल्यानें अथवा अत्यंत हर्ष-शोकादि विकार एकदम झाल्यास उचकी उद्भवते; परंतु असली मंडळी बहुधा मद्यपी असतात. उचकी कितीहि दीर्घकाल टिकली तरी जिवास धोका नसतो. तथापि आजाऱ्यास उचकीनें अतिशय त्रास होतो यांत शंका नाहीं. उचकीला साधे उपाय म्हणजे एकदां खोल उच्छ्वास सोडून क्षणभर श्वास घेऊं नये किंवा नाक दाबून धरून कांहीं घोट पाणी प्यावें अथवा जीभ थोडीशी पुढें ओढावी. पोटांत घेण्याचें औषध म्हणजे नायट्रो ग्लिसरिन ग्रेन $\frac{1}{100}$ ची वडी एकच घेतल्यास पुरी होते. कदाचित् कांहीं वेळानें दुसरी वडी घ्यावी. परंतु हें औषध डॉक्टराच्या सल्ल्यावांचून घेऊं नये. उचकीवर आयुर्वेदिक उपाय म्हणजे बिभीतकावलेह दिवसांतून चार वेळां १–२ मासे याप्रमाणें मधांतून चाटणें.

**उंच राक्षस**—माणसाची उंची सामान्यतः ५ व ६ फुटांच्या दरम्यान असते, परंतु दक्षिण अमेरिकेंतील पॅटॅगोनिअन लोक साधारणपणें ६ फुटांहून अधिक उंच असतात. परंतु ती उंच राक्षसांची ( जायंट ) जात नव्हे. माणसाच्या सर्वसामान्य उंचीहून म्हणजे ६ फूटांहून अधिक उंच असलेले इसम पृथ्वीवरील अनेक जमातींत विशेषतः ट्युटॉनिक जातीच्या लोकांत असतात. ज्याला राक्षसी उंचीचे इसम म्हणतां येईल असे प्राचीन व अर्वाचीन काळांतील इसम ऐतिहासिक ग्रंथांत नमूद केलेले आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें देतां येतात :— १. रोमन बादशहा मॅक्झीमीन, थ्रेशियन जातीचा, उंची सुमारें ९ फूट. २. एलिझाबेथ राणीचा फ्लेमिश देवडीवाला, उंची ७ फू. ६ इं. . ३. सी बायर्न ( मृत्यु. १७८३ ), उंची ८ फू. ४ इं. . ४. पॅट्रिक कॉटर ओब्रायन, उंची ८ फू. ७$\frac{3}{4}$ इं.. ५. प्रशियाचा पहिला फ्रेडरिक विल्यम याच्या ग्रेनेडिअर संरक्षकांपैकीं एक स्वीट सैनिक, उंची ८॥ फूट. ६. पॉलिन वेडु ( मृ. १८८४ ), उंची ८ फू. २ इं. ( वयाच्या १८ व्या वर्षी ). ७. ॲनास्वान, नोव्हास्कोशियाची रहिवासी, उंची ८ फुटांहून अधिक व ८ तिचा नवरा कॅप्टन बेटस् ( मृ. १९१९ ), उंची तेवढीच. ९. चँग वूगोन, चिनी राक्षस, उंची ७ फूट ९ इं. . अशा प्रकारचे राक्षसी उंचीचे इसम सामान्यतः शरीरानें व मनानें दुबळे असतात.

**उचले व भामटे**—उचले, भामटे अथवा गांठचोर म्हणून एक चोरांचा प्रकार आहे. या लोकांची वस्ती पुणें जिल्ह्यांतील भिमथडी, हवेली, खेड व शिरुर ह्या तालुक्यांत आहे. हे लोक तेलगू मुलखांतून इकडे आले असावे. कारण त्यांची घरगुती बोलण्याची भाषा मोडकीतोडकी तेलगूच असून पुष्कळशा बायका-पुरुषांचीं नांवें दक्षिणेकडील नांवांप्रमाणेंच असतात. पुणें जिल्ह्याखेरीज हे लोक महाराष्ट्र, वऱ्हाड व गुजरात या प्रांतांतील कित्येक ठिकाणीं आढळतात. हे भामटे लोक निरनिराळे वेष करतात. जेथें ज्या तऱ्हेचा स्वतःचा वेष असेल तशाच प्रकारचा पोशाख करणाऱ्या लोकांच्या घरांत शिरुन चोऱ्या करतात.

उचले लोक कधीं घरफोडी किंवा मोठी मारहाणीची चोरी करीत नाहींत. खिसे कापणें किंवा गर्दीमध्यें अंगावरचे दागिने पळवणें असल्या चोऱ्या फक्त दिवसांच करतात. अर्थात् जत्रा, यात्रा, वगैरे यांचे चोरी करण्याचे मुख्य प्रसंग होत.

**उच्चारशास्त्र**—कोणत्याहि भाषेमध्यें जे विशिष्ट शब्दोच्चार मनुष्याकडून करण्यांत येतात ते शब्दोच्चार कसे करावे यासंबंधीं ज्या शास्त्रांत विवेचन केलेलें असतें, त्या भाषाविषयक अभ्यासाच्या शाखेस उच्चारशास्त्र असें म्हणण्यांत येतें. फुप्फुसामधून निघणारा श्वास घसा व तोंड यांच्यामध्यें इष्ट तें स्वरुप पावून बाहेर पडतो, व याचा परिणाम म्हणजे भाषा होय. भाषेंतील ध्वनी उच्चारण्याच्या कामीं ओंठ, दांत, जीभ, हिरड्या आणि टाळू या सर्वांचा उपयोग होतो. या सर्वांत महत्त्वाचीं इंद्रियें म्हणजे ध्वनिनाड्या होत. या ध्वनिनाड्या अंतस्त्वचामय असून घशाच्या दोन्ही बाजूंस जोडलेल्या असतात. जेव्हां आपण श्वास बाहेर टाकतों तेव्हां या ध्वनिनाड्या ताणल्या जाऊन त्यांमध्यें एक अरुंद फट राहते व या नाड्यांच्या कडांमध्यें कंप उत्पन्न होऊन ध्वनि उत्पन्न होतो. पूर्वीच्या उच्चारशास्त्रज्ञांनीं ध्वनींचें वर्गीकरण स्वर म्हणजे स्वयंउच्चारक्षमध्वनि आणि व्यंजनें म्हणजे स्वयंउच्चार न होणारे ध्वनी असें केलें होतें.

अर्वाचीन वर्गीकरण घोष आणि संघोष ( सोनंट्स आणि कॉन्सोनन्ट्स ) असें करण्यांत येतें. पहिल्या प्रकारामध्यें जे संघोष-ध्वनी नाहींत-मग ते स्वर असोत कीं व्यंजनें असोत-त्यांत घालण्यांत येतें. संघोषध्वनींचे पुन्हा पुढील निरनिराळ्या तऱ्हांनीं वर्गीकरण करण्यांत येतें-( १ ) त्यांची उच्चारपद्धति. ( २ ) त्यांचा उच्चार होत असतांना घसा किती मोकळा राहतो यावरून. ( ३ ) उच्चारस्थान म्हणजे जेथें वायूचा व ध्वनींद्रियाचा संघर्ष होतो तें स्थान. तसेंच त्यांचे १. (अ) सघोष (ग, द, ब, व) व (आ) अघोष (क, प, त, फ); २. (अ) स्वरोष्म (स, श); ( आ ) मूक व्यंजनें ( त, द् ); ( इ ) अनुनासिक व्यंजनें (न्); ( ई ) तरल व्यंजनें ( ल् व त्याचे प्रकार ); (उ) कंपयुक्त व्यंजनें ( र् व त्याचे प्रकार ). ३. यांच्या उत्पत्तिस्थानावरून-(अ) कंठ्य वर्ण ( क ), ( आ ) तालव्य वर्ण ( च वगैरे ), ( इ ) मूर्धन्य व्यंजनें ( ट् इत्यादि ), ( ई ) दंत्य वर्ण ( त्, द् ); ( उ ) अंतरदंत्य वर्ण ( थ् ); ( ऊ ) ओष्ठ्यवर्ण ( प्, ब्, व् ); ( ए ) दंतौष्ठ्य वर्ण ( फ्, व् ). स्वरामध्यें जिभेच्या उभ्या किंवा आडव्या स्थितीप्रमाणें आणि ध्वनींद्रियांच्या निरनिराळ्या आकाराप्रमाणें बदल होतो. अशा तऱ्हेनें निरनिराळे ७२ ध्वनी काढतां येतात, असें ध्वनिशास्त्रज्ञांचें मत आहे. या ध्वनींचें मंद्र, मध्य आणि तार, तसेंच पुरोध्वनि, मिश्रध्वनि व पृष्ठध्वनि असें, किंवा गोल व अगोल ध्वनि, आणि निरुंद आणि विस्तृत ध्वनि असें निरनिराळ्या प्रकारांनीं वर्गीकरण करण्यांत येतें.

**उच्चोन्नत शिल्प**— ( आल्टोरिलीव्हो ). या प्रकारच्या शिल्पामध्यें दगडांत कोरलेल्या आकृती सर्वांत अधिक उठावदार असतात व त्यामुळें त्या सर्वांत अधिक ठळक दिसतात. मध्योन्नत ( मेझोरिलीव्हो ) पद्धतीमध्यें त्या अर्ध्या उठावदार कोरलेल्या असतात. नीचोन्नत पद्धतीमध्यें ( बासोरिलीव्हो ) त्या किंचित् उठावदार असतात. उच्चोन्नत पद्धतीमध्यें कांहीं आकृती मागील पृष्ठभागापासून बहुतेक सुट्याहि असतात. पेरुळच्या लेण्यांत अशा आकृती आढळतात.

**उज्ज**—( हायड्रोजन ). H. अणुमान १·००८. सर्व मूलद्रव्यांतील अतिशय हलकें मूलद्रव्य. हें सूर्याभोंवतींच्या वातावरणांत स्वतंत्र स्वरूपांत आहे. पृथ्वीवर ज्वालामुखींतून बाहेर पडणाऱ्या वायूंत हें थोड्याबहुत प्रमाणांत असतें. त्याचप्रमाणें तेलाच्या खाणींतून वर येणाऱ्या वायूंतहि हें सांपडतें. पाण्यांत $\frac{1}{9}$ भाग उज्ज असतो. सर्व अम्लांत त्याचें अस्तित्व असतें. वनस्पतिजन्य आणि प्राणिजन्य पदार्थांत हा असतोच. शुद्ध स्वरूपांत उज्ज वर्णहीन, गंधहीन, व रसहीन असतो. हा वायुरूप असून पाण्यांत थोड्या प्रमाणांत विरघळतो. हा स्वतः जळतो, पण जळणाऱ्या पदार्थांना विझवतो. जळतांना हवेंतील प्राणवायूबरोबर ह्याचा संयोग होऊन पाणी तयार होतें. उज्जाल द्रवरूपांत आणतां येतें. द्रवरूप उज्ज वर्णहीन असून २५२° श. ला तो उकळतो. द्रवरूप उज्जाला वेगानें वायुरूप देऊन बर्फासारखा घनरूप उज्ज तयार करतां येतो.

धातूवर (लोखंड किंवा जस्त) ह्यांच्या अम्लांची क्रिया करून उज्ज तयार करतात. १ माप प्राणवायु आणि २ मापें उज्जवायु ह्यांच्या मिश्रणाला काडी लावली तर मोठा स्फोट होतो व पुष्कळ उष्णता तयार होते. प्राणोज्ज ज्योतीमुळें २८००° श. इतकें उष्णतामान तयार करतां येतें. त्यामुळें सांधाजोडीसाठीं ह्या ज्योतीचा उपयोग करतात. ह्याशिवाय विमान-वाहतुकीसाठीं ह्याचा उपयोग होत असल्यामुळें मोठ्या प्रमाणावर ह्याचें उत्पादन होऊं लागलें आहे. कृत्रिम तूप करण्यासाठीं व ॲनीलीन, नॅप्थीलमाइन, वगैरे तयार करण्यासाठींहि उज्जाचा उपयोग होतो. जळण म्हणून जळवायूमध्येंहि हा असतो.

**उज्जाद्विप्राणिद**— ( हायड्रोजन पेरॉक्साइड ). प्राणवायु आणि उज्जवायु ह्यांचें संयुक्त. ह्यांत पाण्यापेक्षां प्राणवायूचें प्रमाण जास्त असतें. शुद्ध स्वरूपांत हा पाकासारखा घट्ट पातळ पदार्थ असतो. त्यांतील अर्धा प्राणवायु सहज मोकळा होत असल्यामुळें ह्या प्रप्राण्यका ( पेरॉक्साइड ) चा प्राणक पदार्थ ( ऑक्सडायझिंग एजंट ) म्हणून चांगला उपयोग होतो. कालांतरानें काळीं पडलेलीं तैलचित्रें पुन्हां स्वच्छ करण्यासाठीं ह्याचा उपयोग होतो. जखम वाहूं नये म्हणून ह्याचा उपयोग करतात. त्याचप्रमाणें रंग घालविण्यासाठीं ह्याचा उपयोग करतात. सजल ( हायड्रेटेड ) भारप्राण्यक ( बेरियम पेरॉक्साइड ) वर तेजाबाची क्रिया करून उज्जाद्विप्राणिद तयार करतात.

**उज्जेत**—( हायड्रेट ). पाणी ( $H_2O$ ) असलेलें स्फटिकमय संयुक्त. नेहमींची धुण्याच्या सोड्याची पूड ( $Na_2 Co_3$ ) पाण्यांत विरघळवून तें पाणी आटवलें तर त्यापासून स्फटिकमय पारदर्शक स्वच्छ खडे मिळतात. ह्या खड्यांचें स्वरूप नुसतें ( $Na_2 Co_3$ ) असें नसून त्याबरोबर कांहीं पाण्याचा अंश असतो, व $Na_2 Co_3, 10H_2O_2$ अशा वर्णसमूहानें दाखवितां येतें. पुष्कळ वेळां हें स्फटिकांतील पाणी ते पदार्थ बाहेर उघड्यावर ठेवले म्हणजे उडून जातें आणि त्या पदार्थांची पूड होते. धुण्याच्या सोड्याचेंहि असेंच होतें.

**उज्जयनी, उज्जैन**—ग्वाल्हेर संस्थानांतील एक मोठें व प्राचीन शहर. हें क्षिप्रा नदीच्या कांठावर वसलें आहे. या शहरावरून उज्जैन-भोपाळ आगगाडी जाते. हें शहर फार प्राचीन कालापासून

एक पवित्र स्थान म्हणून प्रसिद्ध आहे. सुप्रसिद्ध विक्रमादित्याची उज्जयनी नगरी हीच होय. (अवंती पहा). या ठिकाणीं प्राचीन काळीं सुबक दागिने, भांडींकुंडीं व उंची कपडे, सुरत, वगैरे ठिकाणांहून येत असत व त्यांचा व्यापार मोठ्या प्रमाणांत चाले. सध्यांची उज्जयनी म्हणजे गतवैभवाचा अल्प अवशेष आहे. भव्य इमारतींचे अवशेष ठिकठिकाणीं सांपडतात. ते पाहून देखील प्राचीन वैभवाची कल्पना अंशतः येते. येथें पाहण्याजोगीं स्थळें म्हणजे—सवाई जयसिंगानें बांधलेली वेधशाळा (ती आज पडक्या स्थितींत आहे), महाकालीचें देऊळ व दौलतराव शिंद्याचा राजवाडा हीं होत. महाकालेश्वर हें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं आहे. येथें माघ, चैत्र व कार्तिक महिन्यांत मोठी यात्रा जमते. तसेंच बारा वर्षांनीं सिंहस्थ मेळा भरतो.

उज्जनीचा इतिहास माळव्याच्या इतिहासांत समाविष्ट आहे. येथें प्रथम मौर्य राजे उदयास आले. नंतर गुप्त राजवंशाची यावर सत्ता होती. विक्रमादित्यानें आपली राजधानी उज्जनी हीच केली. नंतर हर्ष, परमार, चालुक्य, चंदेल व राष्ट्रकूट या घराण्यांचा अमल यावर होता. नंतर मुसलमान राजांच्या सुभ्यांत याचा अंतर्भाव होऊं लागला. अठराव्या शतकांत पेशव्यांकडे उज्जनी आली व त्या ठिकाणीं शिंद्यांची राजधानी दौलतराव शिंद्यानें १८१० त ती ग्वाल्हेरला नेईपर्यंत होती. अलीकडे नवीन वस्तीचे भाग होऊन शहर फार वाढलें आहे. कापडाच्या गिरण्या, साखरेचा कारखाना, एक कॉलेज, ग्रंथालय, इ. नीं अर्वाचीन अवंती नगर गजबजलें आहे. लो. सं. सुमारें ४०,०००.

**उझबेकिस्तान**—सोव्हिएट रशियांतील एक लोकराज्य. उझबेक ही तुराणी लोकांच्या तुर्की शाखेपैकीं एक उपशाखा आहे. हे लोक तुर्कमेन देशाच्या उत्तरेकडील तुर्कस्तानच्या भागांत राहतात. मुख्यतः यांची वस्ती ऑक्सस नदी आणि आरल समुद्र या भागांत आहे. उझबेक लोकांची एकंदर लोकसंख्या ८,००,००० असून त्यांना मध्य आशियन तुर्क असें म्हणतात. त्यांच्यापैकीं ५,००,००० लोक समरकंदमध्यें आणि २०,००० लोक उत्तर अफगाणिस्तानांत आहेत. अलीकडे १९२४ सालीं रशियन तुर्कस्तानांत उझबेकिस्तान हें रशियांतील लोकशाही संघांतील एक राज्य म्हणून स्थापन झालें आहे. त्याचें क्षेत्रफळ ६६,३९२ चौरस मैल आणि लोकसंख्या ६२,८२,४५० आहे. राजधानी ताशकंद आहे. बुखारा, खीव, समरकंद हीं कांहीं मोठालीं शहरें आहेत. हा शेतकीचा प्रदेश असून कापूस फार पिकतो. खाणींतून तेल व कोळसा निघतो. अलीकडे सीमेंट, गंधक, कागद, कातडीं, कापड, इ. चे कारखाने निघाले आहेत. १९४६ त ३७ उच्च शिक्षणाच्या व ६७ उद्योगधंदे-शिक्षणाच्या शाळा होत्या. आगगाड्या, तारायंत्रें, विमानें, इ. च्या सोयीहि नुकत्याच झाल्यामुळें मध्य आशियाचा प्रदेश आतां सुधारलेला वाटूं लागतो.

१९ व्या शतकापर्यंत मध्य आशियांत हे लोक राज्य करीत होते. यांचीं अनेक लहान लहान राज्यें, तैमूरलंगाचें साम्राज्य १५ व्या शतकांत फुटल्यापासून होतीं. हे सुन्नी पंथाचे मुसलमान आहेत.

**उंट**—एक रवंथ करणाऱ्या चतुष्पाद प्राण्याची जात. यास शिंगें नसतात. यास भेदक दात, सुळे दांत व निमुळते दांत असतात. वरचा ओठ दुभंगलेला असतो. याची मान लांब असून कमानदार असते. यास पाठीवर एक किंवा दोन मदारी असतात व पाय रुंद व लवचिक असून त्यांच्या खालच्या तळव्यांस गिरद्यांसारखा भाग असतो; त्यामुळें याचे पाय रणांतील वाळूंत रुतून बसत नाहींत. याचें मूलस्थान म्हणजे मोरोक्कोपासून चीनपर्यंत नऊशें ते हजार मैलांचा पसरलेला प्रदेश होय. दोन मदारींचा उंट फक्त तुर्कस्तानांत व चीनमध्यें उत्तरेच्या भागांत आढळतो. एक मदारीचा उंट अथवा अरबी उंट आफ्रिकेपासून हिंदुस्थानापर्यंत खालच्या पट्ट्यांत सर्वत्र आढळतो. गोबीच्या अरण्यांत दोन मदारींचा उंट रानटी अवस्थेंत अद्यापि आढळतो, व तो अधिक बळकट असतो व जड ओझीं वाहण्याच्या कामीं चांगला असतो. एक मदारीचा उंट विशेषतः सांडणी (उंटाची मादी) ही जलद चालीकरितां प्रसिद्ध आहे. हा पाण्याशिवाय दीर्घकाल तग धरूं शकतो व रुक्ष पदार्थ, झाडपाला, झुडपें, झाडांचे शेंडे, वगैरे खाऊन निर्वाह करतो. हत्ती किंवा घोडा यापेक्षां उंट हा निर्बुद्ध असून अधिक सहनशील मात्र आहे. परंतु त्यास इजा केली असतां तो सूड घेतो. याचें आयुष्य चाळीस ते पन्नास वर्षें असतें. याचें मांस व दूध अरब लोक खातात. कुंचले, तंबू, गालिचे, कपडे, वगैरे करण्याकरितां याचे केंस उपयोगांत आणण्यांत येतात.

वालुकामय मैदानांतून प्रवास करतांना उंटासारखें अन्य उपयुक्त वाहन नाहीं. रखरखीत वाळवंटांतून चालत जाण्यांत उंटाला अत्यंत सौख्य वाटतें व कित्येक दिवस पाणी मिळालें नाहीं तरी त्याचें नडत नाहीं. त्याच्या शरीराची एकंदर ठेवण पाहिली कीं अशा प्रवासाच्या कामीं यानें मनुष्यास उपयोगीं पडावें असाच परमेश्वरी संकेत असावासें वाटतें. त्याच्या या उपयुक्ततेवरून त्यास 'वालुकारण्य-नौका' असें म्हणतात. वाळवंटांतून प्रवास करतांना याला वादळ, वगैरे केव्हां होणार हें आगाऊच समजतें. अशा वेळीं तो आपले पुढले गुडघे टेकून मान जमिनीवर लांबवून ठेवतो व वादळ बंद होईपर्यंत नाकपुड्या बंद करून घेऊन राहतो; यामुळें विषारी वारे वगैरेंपासून त्याचा साहाजिकच

बचाव होतो. उंटानें अशा तऱ्हेनें मान टाकल्याबरोबर समजावें कीं, लवकरच वादळ उद्भवणार. असें वादळ उद्भवल्यावर आपला बचाव करण्यासाठीं मनुष्यासहि उंटाची पाठीमागील बाजू बरीच उपयोगी पडते. वादळ बंद होईपर्यंत उंटाआड लपून स्वतःचा बचाव करतां येतो.

**उटकटारी**—झेंडू वर्गांतील एक कांटेरी झाड. याच्या अनेक जाती आहेत. ही वनस्पति हिंदुस्थानांतील बहुतेक भागांतील जंगलांत सांपडते. या झाडाची उंची सुमारें दोन हात असते. याचें फळ वाटोळें असून त्यावर लांब लांब कांटे असतात व फुलाचा रंग पांढरा असतो. या वनस्पतीचें मूळ व बीं फार औषधी आहे. डांग्या खोकला होतो त्यावर या झाडाची मुळी शस्त्र न लावतां काढून मुलाच्या गळ्यांत बांधावी. स्कॉटलंडचें राष्ट्रीय चिन्ह 'थिसल' (उटकटारी) आहे. या चिन्हाचें एक नक्षत्राकार पदक विशिष्ट कामगिरीबद्दल सरदारांना देण्यांत येत असे.

**उटकमंड**—(उटी). हें मद्रास इलाख्यांतील नीलगिरि पर्वतावर शहर आहे. या शहरास कुन्नूर स्टेशनपासून एक लहान आगगाडी जाते. हें शहर म्हणजे 'दक्षिण हिंदुस्थानचा सिमला' होय. समुद्रसपाटीपासून याची उंची ७,५०० फूट असून प्रवाशास येथें आल्यानें दुहेरी फायदा मिळतो. उत्तम हवा मिळते व सभोंवार नितांतरम्य असें सृष्टिसौंदर्य पाहावयास मिळतें. येथील विशेष प्रेक्षणीय भाग म्हणजे दोडबेट्टा, वेन्लाक, व डाउन्स हे होत.

**उटा**—अमेरिकेंतील सं. संस्थानांतील एक डोंगराळ संस्थान. त्याचें क्षेत्रफळ ८४,९१६ चौ. मैल व लोकसंख्या ५,५०,३१० असून त्यांपैकीं शें. ७५ मोरमॉन लोक आहेत. राजधानी सॉल्ट लेक सिटी. ओगडेन, प्रोव्हो, लोगन हीं येथील दुसरीं मुख्य शहरें आहेत. येथें शिक्षण सक्तीचें असून यूटा विद्यापीठ व मोरमॉन विद्यापीठ आणि इतर अनेक उच्च शिक्षण देणाऱ्या संस्था आहेत. हा देश मुख्यतः कृषिप्रधान आहे. तेथें गहूं, मका, ओट, राय, बार्ली, बटाटे वगैरे पिकें होतात. फळबागा करणें हाहि फार महत्त्वाचा धंदा आहे. मेंढ्या पाळण्याचा धंदा सुधारला असून वाढत आहे. त्यामुळें पुष्कळ लोंकर पैदा होते. खनिज पदार्थ–शिसें, जस्त, तांबें, लोखंड, गंधक, पेट्रोल, दगडी कोळसा, मीठ, आणि उत्तम व मध्यम दर्जाचीं माल्यवान् रत्नें येथें सांपडतात. मेक्सिकोशीं झालेल्या युद्धांत हें संस्थान अमे. सं. संस्थानांनीं जिंकलें व १८४७ त यांत नॉर्मन लोकांनीं वस्ती केली. १८९६ सालीं संयुक्त संस्थानांत याचा प्रवेश झाला. येथील रेड इंडियन रहिवाशांचा विभाग स्वतंत्र असून त्याचें क्षेत्रफळ २,३८९ चौ. मैल व लोकसंख्या १,५५९ आहे. कायदेमंडळाची सीनेट व हाउस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हज अशीं दोन सभागृहें आहेत.

**उटाळी, उच्चालक**—(लीव्हर). शक्तीच्या साहाय्यानें एका बिंदूवर टेकलेल्या एका लांकडी, लोखंडी किंवा अन्य दांड्याच्या साहाय्यानें एखादी जड वस्तु अथवा वजन तोलून धरणें किंवा उचलणें या क्रियेकरितां वापरलेल्या दांड्यास उच्चालक म्हणतात. स्थिरबिंदूस आधार किंवा टेकू म्हणतात. या क्रियेपासून पुढील सिद्धान्त निघतो–स्थिरबिंदूच्या एका बाजूस जो दांड्याचा भाग असेल त्याची लांबी व वजन यांचा गुणाकार त्या दांड्याच्या उरलेल्या भागाची लांबी व शक्ति यांच्या गुणाकाराबरोबर असतो. जेव्हां शक्तीच्या बाजूचा दांडा लांब असेल व वजनाच्या बाजूचा आंखूड असेल तेव्हां अल्प प्रमाणांतील शक्तीकडून मोठ्या प्रमाणाचें वजन तोललें किंवा उचललें जाईल. परंतु याबरोबर हाहि सिद्धान्त लक्षांत ठेवला पाहिजे कीं, जी शक्तीमध्यें बचत होते ती वेळामध्यें खर्च होते. म्हणजेच जो यांत्रिक फायदा शक्तीमध्यें मिळतो तो वेळामध्यें गमावतो. म्हणजे एखादें वजन एखाद्या उंचीवर न्यावयाचें असल्यास, शक्तीचें अल्प प्रमाण लावावयाचें असल्यास वेळ अधिक मोडावा लागेल, म्हणजे तें वजन हळूहळू वर चढेल. अधिक शक्ति लावल्यास लवकर वर जाईल.

**उडणें**—उडण्याची शक्ति फक्त कीटक आणि सपृष्ठवंशी प्राण्यांच्या अंगीं असते. या क्रियेचे दोन प्रकार आहेत: एक आकाशांत उंच उडणें किंवा भरारी मारणें व उडत राहणें; व दुसरा केवळ उडी मारून एखाद्या वस्तूवर झडप घालणें. पक्षी या दोन्ही क्रिया करीत असतात. पण किंगफिशर, हुमा पक्षी, वगैरे फक्त दुसरीच क्रिया करतात. ही उडण्याची क्रिया पक्ष्यांस कशी करतां येते याचें अद्यापि पूर्ण संशोधन झालें नाहीं. परंतु या क्रियेमध्यें मज्जातंतूंची अतिशय उत्कृष्ट प्रकारची रचना, तोल संभाळून धरण्याची गात्रांची शक्ति, अतिशय संवेदनाक्षम त्वचा व त्यामुळें उडतांना हवेच्या प्रत्येक चलनाचा व ऊर्ध्व गतीचा शक्य तितका फायदा करून घेण्याची पात्रता या गोष्टी प्रामुख्यानें या क्रियेंत उपयोगी पडतात. पक्ष्यांची गति सामान्यतः पुढीलप्रमाणें असते–द्रुतगति दर तासीं ७० ते १०० मैल; बदकें ४४ ते ६९ मैल; हंस ४२ ते ५५ मैल; ससाणा ४० ते ४८ मैल; कबूतर ३० ते ३६ मैल; व लहान पक्षी २० ते ३७ मैल.

**उडता मासा**—हवेंत उडण्याची शक्ति असलेले कांहीं जातीचे मासे असतात. हे मासे उष्ण कटिबंधांत आढळतात. भूमध्य समुद्रांत यांच्या दोन जाती विशेषेंकरून आढळतात.

**उंडसेट, सिग्रिड** (१८८२–)—'नोबल' पारितोषिक मिळविणारी एक नॉर्वेजियन लेखिका. गेल्या महायुद्धांत नॉर्वे आणि

डेन्मार्क देश जेव्हां आपलें अस्तित्व टिकविण्यासाठीं लढत होतें तेव्हां तिनें जी त्यांच्यासंबंधानें अत्यंत निष्ठा दाखविली, त्यामुळें नॉर्वेजियन आणि डेन्स लोक तिला फार चहातात. ऐतिहासिक कादंबऱ्यांतून तिनें ऐतिहासिक स्थलांचें आणि समाजाचें वर्णन सुरेख दिलें असून स्त्री–पुरुषांची आयुष्यभर चाललेली धडपड व शेवटीं परमेश्वराच्या ठिकाणीं विलीन झाल्याखेरीज न लाभलेलें समाधान चांगलें रंगविलें आहे. शाश्वताचे दूरचे डोंगर वाचकांना दाखविण्याची शक्ति तिच्यांत आहे.

**उडिया**— १. भाषा — ओरिसांतील आर्य भाषेला उडिया हें नांव आहे. अंदमान-निकोबर बेटें, आसाम, बंगाल, बिहार, ओरिसा, ब्रह्मदेश, वऱ्हाड-मध्यप्रांत, मद्रास, हैद्राबाद, म्हैसूर या भागांतून उडिया बोलणारे लोक आहेत. यांची संख्या एक कोटीवर आहे. उडियाची व्याकरणपद्धति कांहींशी बंगालीसारखी आहे. तथापि ही बंगालीची पोटभाषा नाहीं. या दोन्हीहि प्राचीन मागध अपभ्रंश भाषेपासून निघाल्या असाव्यात. तेलगू आणि मराठी राजे यांचें स्वामित्व ओरिसावर आलें त्या वेळीं त्या त्या भाषांचा साहजिक परिणाम उडिया भाषेवर झाला.

या भाषेंतील पहिला लेख इ. स. १६ व्या शतकांतला उपलब्ध आहे. सुमारें शंभरावर प्रसिद्ध ग्रंथ या भाषेंत आहेत. बहुतेक रामायण-महाभारतांतील कथांवरून सुचलेले विषय यांत आहेत. या भाषेंत संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरेंहि बरींच झालीं आहेत.

उडिया भाषा बोलणारांची एकूण लो. सं. १,२५,००,००० आहे. उडिया लिपि बोजड व चमत्कारिक आहे. प्रत्येक अक्षराभोंवतीं एक वर्तुळ असतें. त्यामुळें मध्यवर्ती अक्षर सहजच बारीक होतें.

उडिया भाषेस पोटभाषा मुळींच नाहींत. सव्वा कोटी लोक अगदीं एकाच प्रकारची भाषा बोलत आहेत. शेंकडों प्रकारचे छंद हे या भाषेचें विशिष्ट लक्षण आहे. जितके छंद तितके ते म्हणण्याचे वेगवेगळे प्रकार आहेत. कवींनीं भाषेचे, छंदाचे व अलंकारांचे अनेक प्रकार आपल्या काव्यांत घातले आहेत. तसेंच यमक व अनुप्रास यांचाहि मुबलक उपयोग केला आहे. एकएका ओळीचे ३ ते १० अर्थ करतां येतात. उदा०–एक ओळ वसंत ऋतूस अनुलक्षून लिहिली आहे. तिचें पहिलें अक्षर काढून घेतलें कीं तिचा अर्थ ग्रीष्मपर होतो. शेवटलें अक्षर काढून टाकलें कीं ती ओळ वर्षा ऋतूचें वर्णन करूं लागते. एखाद्या ओळीचें एक अक्षर काढलें कीं छंद अजीबात बदलून जातो. उलट-सुलट वाचली तरी सारखीच राहणारी अशा ओळीहि पुष्कळ आहेत.

२. वाङ्मय—उडिया ही भरतखंडांतील फार जुन्या भाषांपैकीं एक आहे. महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री यांस नेपाळांत ताडपत्रांवर लिहिलेले उडिया भाषेंतील पुढील कवींचे ग्रंथ (इ. सनाच्या ६ ते ९ शतकांत लिहिलेले) सांपडले आहेत: लुई, कार्णपद, कृष्ण, आचार्य, धर्मपद, मलीपाळ, लावपाळ, इंद्रभूती, गंभेर वज्र, ज्ञानवज्र, तथागत रक्षित, धर्म श्री मैत्र, गोरखनाथ, मत्स्येंद्रनाथ, इ.. या भाषेंतलें वाङ्मय बरेंच मोठें असून तें बहुतेक धार्मिक व पद्यमय आहे. हरप्रसादशास्त्री यांनीं छापलेल्या ‘ बौद्ध गान ओ दोह ’ या पुस्तकांत ६ व्या ते ९ व्या शतकांतील कवींच्या काव्यांचे नमुने पाहावयास मिळतात. जगन्नाथपुरीस जगन्नाथमंदिरामध्यें ११ व्या शतकापासून ताडपत्रांवर लिहिलेला बखरवजा इतिहास लिहून ठेवला आहे. त्यांत उडियाच्या प्राचीन गद्याचें स्वरूप पाहावयास मिळतें. दोन मंदिरमालकांच्या घरांत दोन स्वतंत्र प्रती ठेवल्या आहेत. यांत ११ व्या व १२ व्या शतकांतील गद्याचें स्वरूप दिसतें. १३ व्या शतकांतील गद्याचा नमुना ओरिसाच्या नरसिंहदेव नृपति याच्या भुवनेश्वर येथील शिलालेखांत सांपडतो. १३ व १४ या शतकांतील या भाषेंतील काव्य फार परिणत स्वरूपास पोंचलें होतें. बच्छादास या कवीनें १४ व्या शतकांत ‘ कलश चौतिसा ’ म्हणून एक काव्य केलें आहे. त्यांत उडिया लिपींतील ३४ अक्षरांपैकीं एक एक अक्षर प्रत्येक श्लोकाच्या आरंभीं आलें आहे. यांतील भाषा अगदीं अर्वाचीन काव्यासारखीच आहे. सरलदासाचें उडिया महाभारत (१४ वें शतक) हा एक प्रचंड व भव्य ग्रंथ आहे. उडियांतील सर्वोत्कृष्ट कवि उपेंद्र भंज (१८ वें शतक) याच्यापूर्वी निदान नीरस तरी चांगले कवि उडिया भाषेंत लिहून गेले. जगन्नाथदासाचें ‘उडिया भागवत’ व सरलदासाचें ‘ उडिया रामायण ’ या दोन ग्रंथांची या प्रांतावर फार मोठी चिरंतन छाप पडलेली आहे. हें पर्वतप्राय ताडपत्रांवरील वाङ्मय अजून ताडपत्रांवरच टिकून राहिलें आहे. प्रकाशनाचें भाग्य फार थोड्या काव्यांस मिळालें आहे.

प्रथम काळ (१०००–१५००)— या काळांतील प्रमुख वाङ्मय पुढीलप्रमाणें आहे:— (१) बौद्ध गान ओ दोह (१० वें शतक). (२) मदल पंजी—जगन्नाथमंदिरांतील ताडपत्रावरील बखरी (११ वें शतक). (३) राजा वत्समत्र भंजाची प्रेमकथा (११ वें शतक). (४) मार्कंडदासाचें ‘केशव कोयली’ नांवाचें ३४ श्लोकांचें एक काव्य. याच्या प्रत्येक श्लोकाचा आरंभ लिपीच्या एक एक वेगळ्या अक्षरानें होतो. ओरिसांतील प्रत्येक विद्यार्थ्यास हें काव्य पाठ येतें. कृष्ण मथुरेस गेल्यानंतर यशोदेनें कोकिळेस उद्देशून केलेलें भाषण यांत आहे. (५) सरलदासाचें उडिया महाभारत (१४ वें शतक). (६) नीलांबर दास याचें जैमिनी भारत व पद्मपुराण यांचें भाषांतर.

जगन्नाथदासाचा कालखंड (१५००–१७००) :—(१) जगन्नाथदास (१६ वें शतक) याचें उडिया भागवत—यांत मूळ भागवतांतील क्लिष्ट तत्त्वज्ञान सोप्या उडिया भाषेत स्पष्ट केलें आहे. उत्तरेकडे जसें तुलसी रामायण तसेंच ओरिसामध्यें हें भागवत अत्यंत लोकप्रिय आहे. ताडपत्रांवर लिहिलेलें हें भागवत या शतकांत सुद्धां ओरिसांतील प्रत्येक घरांत पूजेंत ठेवलेलें असतें. 'भागवत-घर' म्हणून एका वेगळ्या जागेंत तें ठेवतात व रोज संध्याकाळीं खेड्यांतील लोकसुद्धां एकत्र जमून तें पुराणिकांकडून वाचून घेतात. चैतन्यप्रभूंनीं या भागवतकर्त्या जगन्नाथास 'अतिवर्दी' (फार मोठा) अशी पदवी दिली होती. त्याचा ऋषितुल्य आचार व भक्ति पाहून ही पदवी त्यास देण्यांत आली. (२) अच्युतानंददास (१६ वें शतक) यानें हजारों धार्मिक व आध्यात्मिक काव्यें केलीं व गौळी समाजांत धर्मप्रसार केला. (३) जनार्दनदास (१६ वें शतक) याची 'गोपी भाषा'—यात कृष्ण मथुरेस गेल्यावर गोपींनीं केलेला विलाप वर्णन केला आहे. (४) बलरामदासाचें उडिया रामायण. (५) हलधरदासाचें उडिया अध्यात्म रामायण. (६) दीनकृष्णदासाचा रसकल्लोळ. यांत राधा व कृष्ण यांच्या लीला वर्णिल्या आहेत. व याच्या प्रत्येक ओळीचा आरंभ 'क' या अक्षरानें झाला आहे. (७) विश्वनाथ खुंटिया याचें 'विचित्र रामायण' हें अतिशय लोकप्रिय असून खेड्यांमध्यें रामलीला-प्रसंगीं गाण्यांत येतें. (८) धारकोटचा राजा जयसिंग याचें भारताच्या एका पर्वाचें व भगवद्गीतेचें भाषांतर. (९) राजा कृष्णासिंग (धारकोट) याचें भारताचें भाषांतर—उडिया भाषा बोलणारात सर्वत्र हें फारच लोकप्रिय आहे.

उपेंद्र भंज यांचा कालखंड (१७००–१८५०)—(१) उपेंद्र भंज सर्वमान्य महाकवि (१८ व्या शतकाचा आरंभ) असून यानें ४० ग्रंथ केले आहेत. त्यांपैकीं अद्याप २० मुद्रित झाले आहेत. 'बै दे हिस विलास' सुंदर गेय अशा छंदांत रचलेला आहे. या महाकाव्याची प्रत्येक ओळ 'ब' या अक्षरानें सुरू होते. त्याच्या 'कला-कौतुक' या काव्यांत प्रत्येक ओळीच्या आदि-मध्य-अंतीं 'क' हें अक्षर आहे. 'अबनर शतरंग' या काव्यांत जोडाक्षर नाहीं. 'चित्र-काव्य-बंधोदय' या काव्यांत रथ, शकट, मत्स्य, चक्र, कमल, वगैरे चित्रबंध साधले आहेत. 'यमक चौतिश' यांत यमक व अनुप्रासांचे अनेक प्रकार दाखवले आहेत. (२) गोपाल कवि याचें 'अध्यात्म रामायण'. (३) सदानंद कवि सूर्य (१८ शतकमध्य) याचें कृष्ण-प्रेम व भक्ति यावर ९ ग्रंथ. (४) अभिमन्यु सामन्त सिंघर याचा 'विदग्ध चिंतामणि'. यांत राधा-कृष्णाच्या प्रेमाचें तत्त्वज्ञान व आध्यात्मिक स्वरूप फार प्रौढ व सुंदर भाषेंत दाखविलें आहे. याची अलंकारिक भाषा उपेंद्र भंजाच्या तोडीची आहे. (५) पीतांबर दासाचें 'नृसिंहपुराण' यांत अनेक पौराणिक कथा सोप्या भाषेंत सांगितल्या आहेत. (६) बलदेव रथ कवि सूर्य याचा 'किशोर चंद्रानंद चंपू' यांत ३४ गाणीं आहेत व मधून कथानक जुळवून घ्यायला संस्कृत गद्यांत मजकूर आहे. विषय राधाकृष्णप्रेम हा आहे. हीं गाणीं इतकीं लोकप्रिय आहेत कीं, जर एखाद्या गायकाला किंवा नर्तकाला तीं पाठ येत नसलीं तर तो अडाणी माणसांत गणला जातो. त्यानें दुसरा एक चंपू व असंख्य पदें केलीं आहेत. (७) केशव पट्टनायक याचें नृत्य रामायण. हें नृत्य-मंडळींनीं म्हणायचें असतें. (८) यदुमणि महापात्र (एक सुतार) याचें 'प्रबंध पूर्ण चंद्र'. यांत रुक्मिणी-स्वयंवराचें वर्णन आहे. याचे विनोदी चुटके व म्हणी फार प्रसिद्ध आहेत. (९) कन्हू-दासाचा रामरसामृत सिंधु. यांत प्रत्येकीं १०८ श्लोकांचे १०८ अध्याय आहेत. (१०) गोपाळकृष्ण पाट नाईक याचीं राधा-कृष्णप्रेमावर शेंकडों पदें आहेत. (११) अरक्षित दास याचें योगासनासंबंधीं एक लोकप्रिय काव्य 'शरीरभेद.' (१२) ब्रजनाथ बद जेना याचें 'समर तरंग' काव्य. यांत धेनकानल-चा राजा व मराठा सैन्य यांच्यामधील युद्धाचें सविस्तर वर्णन दिलें आहे. यांनींच शिवपार्वती-चरित्रावर 'अंबिका-विलास' म्हणून एक काव्य केलें आहे.

राधानाथ कालखंड (१८५०–१९००)—या काळांत मिशनरींनीं कटक येथें एक बाप्टिस्ट मिशन प्रेस सुरू केला व तेथें बायबलचें भाषांतर व इतर पुस्तकें प्रसिद्ध केलीं. पाश्चात्य धर्तीवर काव्यरचना होऊं लागली. शास्त्रीय गद्य ग्रंथ पुष्कळ छापण्यांत आले. चंद्रशेखर सामंत यांनीं साध्या यंत्रसामग्रीच्या साह्यानें अत्यंत शुद्ध गणिताचीं पंचांगें छापण्यांत यश मिळ-विलें.

रायबहादूर गौरीशंकर राय यांनीं आपल्या 'उत्कल दीपिका' साप्ताहिकांत सतत ४० वर्षेंपर्यंत उडिया वाङ्मय व संस्कृति यांच्याकरितां जोराचें युद्ध केलें. (२) रा. ब. राधानाथ राय यांनीं केलेल्या शालेय पुस्तकांत ओरिसांतील सृष्टिसौंदर्याचें सुंदर भाषेंत वर्णन केलें आहे. त्यांनीं 'महायात्रा' म्हणून एक निर्यमक काव्य केलें आहे. त्यांनीं हिंदी, बंगाली, संस्कृत, इंग्रजी वाङ्मयांतील सुंदर स्थळें उडिया भाषेंत रूपांतरित केलीं आहेत. प्यारी मोहन आचार्य यांनीं सरकारी कागदपत्र, हस्तलिखितें व जगन्नाथमंदिरांतील ताडपत्रांवरील बखरी

यांच्या साहाय्यानें ओरिसाचा इतिहास लिहिला आहे. पहिला कादंबरीलेखक फकीर मोहन सेनापति. यांनीं गद्य व पद्य पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत, व रामायण व भारत यांचीं भाषांतरें केलीं आहेत. गायनवादनकुशल गोविंद सूर देव यांनीं पुष्कळच अत्यंत मधुर पदें रचिलीं आहेत. सध्यांचे ओरिसांतील वाङ्मयलेखक पाश्चात्यांकडून स्फूर्ति घेऊन भारतीय परंपरा व विचारप्रणाली यांची पाश्चात्य विचारांशीं सांगड घालण्याचा प्रयत्न करीत आहेत.

अलीकडील भक्तकवि मधुसूदन यांनीं आपलें सर्व आयुष्य मधुर व शुद्ध भाषेमध्यें परमेश्वरास आळविण्यांत व वाचकांत भक्ति वाढविण्यांत घालविलें. त्यांच्या 'ऋषिप्राणे देवावतरण' या दीर्घ काव्यांत, त्यांनीं ऋग्वेदांतील देवतासूक्तांच्या धर्तीवर अनेक प्रार्थना लिहिल्या आहेत. गंगाधर मेहेर यांनीं आपल्या 'तपस्विनी' या काव्यांत अशोकवनांतील सीतेचें वर्णन फार कौशल्यानें केलें आहे. चिंतामणि महंती यांनीं पुष्कळच काव्यें व कादंबऱ्या उत्कृष्ट भाषेंत लिहिल्या आहेत. अश्विनी कुमार घोष यांनीं पौराणिक व ऐतिहासिक विषयांवर पुष्कळ नाटकें लिहिलीं आहेत. त्यांची उडियांतील सर्वोत्कृष्ट नाटककार म्हणून प्रसिद्धि आहे. पंडित गोप बंधु यांच्या 'कारा कविता' व 'धर्मपद' या काव्यांनीं उच्च-कोटीचा कवि म्हणून त्यांस कीर्ति मिळवून दिली. पहिल्यांत कारावासांत लिहिलेलें काव्य आहे. दुसऱ्यामध्यें जगप्रसिद्ध कोनारकचें देवालय बांधण्याच्या कामीं एका १४ वर्षाच्या कामगार मुलानें आपल्या प्राणांची आहुति कशी दिली, याचें चित्त थरारणारें वर्णन आहे. स्वदेश, परमेश्वर व प्रिया यांचें वर्णन करणारीं सुंदर पदें लिहिणारा 'कांत कवि' सध्यां 'दगारो' नांवाचें विनोदी पत्र चालवीत आहे. गोदावरीश यांचीं 'पुरुषोत्तम देव' व 'मुकुंद देव' हीं दोन ऐतिहासिक नाटकें फार गाजलेलीं आहेत.

उडीद— उडीद हें एक द्विदल धान्य आहे. याच्या दोन जाति आहेत : (१) काळी व (२) हिरवी. पहिल्या जातीचे उडीद मोठे व दुसऱ्या जातीचे लहान असतात. या दोन्ही जातींचे वेल १–२ हातांपेक्षां जास्त उंच नसतात. आपल्या देशांत उडिदाचें पीक बहुतेक ठिकाणीं येतें.

उडीद पौष्टिक असल्यानें त्याचे खाण्याचे अनेक जिन्नस करतात. त्याच्या डाळीची आमटी, लाडू, वगैरे करतात. पिठाचे पापड व शेंगांची भाजी करतात. उडिदाच्या आहारानें शौचास साफ होतें. वीर्य, मांस व बुद्धि वाढते, असें आयुर्वेदांत म्हटलें आहे. याच्या अंगीं कफ वाढविण्याचा दोष आहे, म्हणून याचें सेवन प्रमाणांत ठेवणें आवश्यक आहे. थकलेल्या जनावरांस उडीद भिजवून अगर शिजवून चारीत गेल्यास त्यांत नवी येण्याइतकी ताकद येते.

उडुपी—मद्रास, दक्षिण कानडा जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ७१९ मैल असून खेड्यांची संख्या १५८ आहे; तालुक्याचें मुख्य स्थळ उडुपी हेंच आहे. तांदूळ व नारळ हे उत्पन्नाचे जिन्नस असून पश्चिम घाटाजवळ ताडमाडाच्या बागा आहेत. तालुक्याची जमीन उत्तम काळी असल्यामुळें एकंदर तालुका भरभराटीच्या स्थितींत आहे.

उडुपी हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून येथील लोक-संख्या सुमारें पंधरा हजार आहे. मध्वाचार्यांनीं येथें कृष्णाची मूर्ति स्थापन केलेली आहे. या ठिकाणीं यात्रेकरू पुष्कळ येतात. वैष्णवांचे एकंदर ८ मठ आहेत.

उतरण—( इन्क्लाइन्ड प्लेन ). क्षितिजपातळीशीं काट-कोनाशिवाय दुसरा कोणताहि कोन करणाऱ्या पातळीस उतरण म्हणतात. अशा उतरणीचा फायदा लहान प्रमाणा-वरील शक्तीकडून मोठ्या प्रमाणावरील शक्ति असणाऱ्या पदार्थावर कार्य करून घेण्याकरितां करण्यांत येतो. उदाहरणार्थ, एखादा घोडा जी गाडी एका समपातळींत जागेवरून मुळींच हालवूं शकणार नाहीं तीच गाडी तो घोडा उतरण असली तर तीवर चढवूं शकतो. शक्तीचे सिद्धान्त काढण्या-करितां उतरण असलेल्या फळ्यांची योजना करतात. ईजिप्त-मधील मनोऱ्यांवरील मोठाले दगड उतरण रचून वर नेण्यांत आले.

उत्कर्द—( हायड्रोकार्बन ). कर्ब आणि उज्ज ह्यांच्या-पासून तयार झालेलीं संयुक्तें. ह्या संयुक्तांची अतिशय मोठी संख्या असून त्यांचे वर्गहि अनेक आहेत. मुक्तमाला ( ओपन चेन ) आणि बद्धचक्र ( क्लोज्ड रिंग ) असे त्यांचे दोन मुख्य वर्ग आहेत.

मुक्तमाला वर्गातील पहिला संयुक्त मिथेन $CH_4$ असून ह्यापुढें एका कर्बाला दोन उज्ज अशा तऱ्हेनें इतर संयुक्तें बनत जातात. जसें इथेन $C_2H_6$; प्रोपेन $C_3H_8$. ह्या वर्गाचें सामान्य स्वरूप $C_nH_{2n+2}$ अशा वर्णसारणीनें ( फार्म्युला ) दाखवितां येतें. ह्यांतील n च्या ऐवजीं १, २, ३, ४...असा कोणताहि आंकडा घातला म्हणजे ह्या वर्गातील संयुक्त तयार होतें. ह्या मालेंतील संयुक्तें स्थिर असून त्यांच्या रासायनिक पदार्थांची क्रिया होत नाहीं. ह्यांतील पहिलीं तीन संयुक्तें वायुरूप असून पुढील कांहीं द्रवरूप आणि नंतर शेवटीं घनरूप असतात. पॅराफिन आणि मेण ह्याच मालेंतील घन संयुक्तें होत. ह्या संयुक्तांत कर्बाची संयोगशक्ति पूर्णपणें वापरली गेली आहे; पण ह्याच मालेंतील आणखी अशीं कांहीं

संयुक्तें आहेत कीं, ज्यांमध्यें कर्बाची संयोगशक्ति पूर्ण वापरली गेली नसते. ह्यामुळें ह्यांत उज्जचें प्रमाण कमी असतें. पहिल्यास पूर्ण संयुक्तें ( सॅच्युरेटेड कॉंपउंड ) असें म्हटलें तर त्यांना अपूर्ण संयुक्तें असें म्हणतां येईल. ह्या अपूर्ण संयुक्तांचें स्वरूप $C_nH_{2n}$ किंवा $C_n H_{2n-2}$ अशा वर्णसमूहानें दाखवितां येईल. उदा.—$C_n H_{2n}$– इथिलीन $C_2 H_4$; $C_n H_{2n-2}$ अॅसिटिलीन $C_2 H_2$.

बद्धचक्राच्या संयुक्तांची सुरुवात बेंझेन $C_6 H_6$ ह्यापासून होते. हीं संयुक्तें अतिशय महत्त्वाचीं असून उद्योगधंद्यांत, जळण म्हणून, रंग तयार करण्यासाठीं, स्फोटक द्रव्यें तयार करण्यासाठीं, विद्रावक वगैरे त्याचे अनेक उपयोग आहेत.

**उत्खनन**— मोठमोठ्या बांधकामांमध्यें किंवा नवीन धातु, वगैरे शोधून काढण्याकरितां मोठ्या प्रमाणावर जमिनीमध्यें खणण्याची क्रिया करावी लागते. उदाहरणार्थ, गोदी बांधणें, डोंगराच्या कडेची माती घसरूं नये म्हणून धक्के बांधणें, रेल्वेच्या रस्त्यांत आलेले डोंगर पोंखरून काढणें, कालवे खणणें, पाया खोदणें, इत्यादि. काम लहान असेल तें हातांनीं कुदळीनें खणून फावड्यानें माती ओढून करतां येतें. या कामांत हिंदुस्थानांत वड्डार हे लोक अत्यंत निष्णात असून फार मोठ्या प्रमाणवरचींहि कामें हातांनीं करतात. परंतु मोठें काम असलें म्हणजे, किंवा खडक पोंखरून काढावयाचा असेल तर, सुरुंग लावावे लागतात. मोठमोठ्या कामांत माती उपसण्याकरितां शक्तीनें चालणारीं फावडीं किंवा वाफेनें चालणारी पोलादी बालडी सारखीं भांडीं किंवा गाळ काढणाऱ्या यंत्राप्रमाणें बालड्यांच्या माळा वगैरेची योजना केलेली असते. अशा यंत्रांची रचना यारीप्रमाणें असून तीं रूळांवरून चालतात व मोठ्या प्रमाणावर माती पोंखरून काढून ती आगगाडीच्या मोठ्या उघड्या डब्यांत भरतात व नंतर ती दूर नेऊन टाकण्यांत येते.

इतिहाससंशोधनासाठींहि उत्खनन पुराणवस्तुसंशोधन खातें करीत असतें. अशाच उत्खननामुळें मोहेंजो दडो व हराप्पा या ठिकाणीं खि. पू. ३००० वर्षांपूर्वींच्या संस्कृतीचे अवशेष सांपडले आहेत. प्राचीन नगरें जमिनीच्या पोटांत गाडलीं गेलेलीं असतात, त्यांचा शोध उत्खननानें करतां येतो. हें एक शास्त्रच बनलें आहे. इ. स. च्या पहिल्या शतकांत व्हेसुव्हियसच्या ज्वालामुखीमुळें गडप झालेलीं हर्क्युलानियन आणि पॉंपी हीं दोन शहरें जशींच्या तशीं उकरून काढल्यामुळें त्या वेळची सर्व स्थिति अगदीं बरोबर कळते.

**उत्तंक**—वेद ऋषीचा शिष्य. गुरुपत्नीनें पौष्य राजाच्या स्त्रीचीं कुंडलें मागितलीं. असतां तीं उत्तंकानें तक्षकाचा विरोध चाजूला सारून मोठ्या खटपटीनें गुरुपत्नीला अर्पण केलीं. यानेंच जनमेजय राजास सर्पसत्राची कल्पना सुचवून तक्षकाचा सूड घेतला.

**उत्तमश्लोक** ( १७०९-१७८६ )— एक नाथसंप्रदायी कवि. याचें मूळ नांव माधवराव व्यापारी होतें. यानें प्रबोधसार नांवाचा एक ग्रंथ लिहिला. याला मुकुंदराव नांवाचा एक विद्वान् पुत्र होता. त्याचे वंशज सध्यां उमरखेड येथें आहेत. यानें सप्तशतीवर एक ग्रंथ लिहिला आहे.

**उत्तर**—मत्स्य देशाधिपति विराट राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. विराट राजाचीं गोधनें कौरवांनीं हरिलीं त्या वेळीं याचें सारथ्य करण्याचें बृहन्नडारूपी अर्जुनानें स्वीकारलें, त्यामुळें हा विजयी होऊन परत आला. या संबंधींचें उत्तरगोग्रहण काव्य प्रसिद्ध आहे.

हा भारतीय युद्धांत पांडवांकडे होता व शल्य राजाच्या हातून मरण पावला. याची मुलगी इरावती अभिमन्युपुत्र परीक्षित राजा यास दिली होती.

**उत्तर अमेरिका**—अमेरिकेच्या दोन खंडांपैकीं वरचें. यांत अलास्का, कानडा, संयुक्त संस्थानें, मेक्सिको व न्यू फाउंडलंड यांचा समावेश होतो. एकूण क्षेत्रफळ सुमारें ९३,००,००० चौ. मै. दक्षिणोत्तर लांबी सुमारें ५,६०० मैल व पूर्व-पश्चिम रुंदी २०० ते ३,००० मैल. लो. सं. १४,५०,००,०००. सर्वोच्च शिखर अलास्कामध्यें मौंट मॅकिन्ले ( २०,३०० फूट ) व कमींत कमी उंचीचें शिखर समुद्रसपाटीच्या खालीं २७६ फुट; हें डेथ व्हॅलींत आहे. अत्यंत सुपीक जमीन व मौल्यवान् खनिज संपत्ति यांनीं हें खंड अत्यंत समृद्ध आहे. लोंकरीची निपजहि बरीच आहे. लक्षावधि मैलांची मोल्यवान् जंगलें आहेत. मूळचे रहिवासी जे रेड इंडियन ते आतांपर्यंत कमी कमी होत चालले होते, पण आधुनिक सुधारणांमुळें त्यांची संख्या हळूहळू वाढत आहे. ( अमेरिकन इंडियन पहा). कोलंबसाच्या शोधापासून या खंडाचा इतिहास सुरू होतो. याच्या आधीं ग्रीनलंडमध्यें कांहीं युरोपियन गेले होते. उत्तर अमेरिकेतील देशांची माहिती त्या त्या नांवाखालीं दिलेली आहे.

**उत्तर कॅरोलिना**—अमेरिका, संयुक्त संस्थानांतल्या मूळच्या १३ पैकीं एक. अटलांटिक महासागरास लागून असल्यानें समुद्रकिनारा आहे. क्षेत्रफळ ५२,७१२ चौरस मैल. समुद्रकिनाऱ्याकडे प्रदेश सखल आहे व पश्चिमेकडे समुद्रसपाटीपासून उंची सारखी वाढत गेली आहे व अगदीं पश्चिमेस पर्वतराजी आहे. मौंट मिचेल या शिखराची उंची ६,६८४ फुट आहे. किनाऱ्याजवळ किती तरी लहान लहान बेटें आहेत. केप हाटेरास हें समुद्राच्या त्या भागांतल्या प्रवासास अत्यंत

धोक्याचें ठिकाण आहे. समुद्रकिनाऱ्याकडील हवा उष्ण आहे. परंतु जसजसें पश्चिमेस उंचवट्याकडे व पलीकडे पर्वताकडे जावें तसतशी हवा थंड होत जाते. रॅले हें कारभाराचें मुख्य ठिकाण आहे. चार्लोटी हें अत्यंत मोठें शहर आहे. नॉर्थ कॅरोलिना हें शेतीच्या उत्पादनाबद्दल प्रसिद्ध आहे. कापूस व तंबाखू यांचाहि महत्त्वाच्या पिकांत समावेश होतो. बटाटे, राय, गहूं, बटाटे, फळफळावळ, वगैरे पिकें निघतात. जंगलांतून पिवळा पाइन, वगैरे प्रकारचें लांकूड, व इतर पदार्थ आणि आरमारी बोटी वगैरेकरितां लांकूड, वगैरेचा पुरवठा होतो. टरपेन्टाइन वगैरे निघतें. कापडाचे कारखाने व तंबाखूचे पदार्थ यांचा उद्योगधंद्यांत विशेष महत्त्वाचे म्हणून निर्देश होतो. सोनें, रुपें, तांबें व इतर अनेक प्रकारच्या खाणी आहेत.

१५८४ च्या सुमारास व्हर्जीनियन लोकांनीं या भागांत वसाहत करण्यास सुरवात केली. यापूर्वीहि कांहीं प्रयत्न झाले होते, पण ते यशस्वी झाले नाहींत. १६०३ मध्यें दुसरा चार्लस यानें याच भागांतील अल्बेमार्लचा ड्यूक याला बराच प्रदेश दिला. त्यानें दुसरे सात इसम आपल्या भागींत घेतले. १७२९ मध्यें कॅरोलिनाचे उत्तर कॅरोलिना आणि दक्षिण कॅरोलिना असे दोन विभाग करण्यांत आले. १७८९ मध्यें जीं पहिलीं १३ संस्थानें प्रथम संयुक्त झालीं त्यांत हें उत्तर कॅरोलिना बारावें होतें. लो. सं. ३५,७१,६२३.

**उत्तरकल्पनावादी (चित्रपद्धति)**—(पोस्ट इंप्रेशनिझम). इंप्रेशनिस्ट किंवा कल्पनावादी चित्रपद्धतीच्याविरुद्ध जोराची उठावणी करणारा हा एक नवीन चित्रसंप्रदाय आहे. यांचें म्हणणें असें कीं, चित्रामध्यें केवळ बाह्यतः दिसणाऱ्या निसर्गाचेंच प्रतिबिंब असून चालणार नाहीं, तर त्यामध्यें एक प्रकारची स्वतंत्र व नवीन वास्तवता व नैसर्गिक आकृति यांचा मिलाफ झालेला दिसला पाहिजे. यामध्यें दोन वर्ग पडतातः एकाचें म्हणणें असें कीं, आकृति व रचना किंवा कल्पना यांच्याकडे मुख्य लक्ष दिलें पाहिजे. दुसऱ्याच्या मतें कलेचा उपयोग भावनांचें चित्ररूपी आविष्करण करण्याकडे झाला पाहिजे. पहिल्या वर्गांत पॉल सेझाने (१८४९–१९०६) यानें पुढाकार घेतला होता. याचा अर्वाचीन चित्रकलेवर बराच परिणाम झालेला आहे. याच्या अनुयायांत मार्चंड, डेरेन आणि सेगोंझॅक हे येतात. दुसऱ्या वर्गामध्यें पॉल गौग्विन (१८४८–१९०३) याच्याकडे धुरीणत्व होतें. याच्याच मताचा अनुयायी व्हिन्सेंट व्हान गोघ हा होता. हा डच असून फ्रान्समध्यें राहिला होता. याच्या चित्रांत रचना किंवा कल्पना याबरोबरच जरा भडक रंग वापरण्यांत येत असतात. हा कदाचित् जपानी कलेचा त्याच्यावर झालेला परिणाम असेल, पण त्याबरोबरच या रंगाचें काम निसर्गाचें अनुकरण करण्याचें नसून भावनादिग्दर्शनाचें आहे, असें तो प्रतिपादीत असे. या वर्गामधून पुढें सिंथॅटिस्ट–शुद्धकल्पनावादी नांवाचा एक नवीन वर्ग निघाला. हे खरे कल्पनावादी होत. यांचें म्हणणें असें होतें कीं, चित्राचा मुख्य हेतु कल्पनेचें आविष्करण करणें हा आहे. यांपैकीं विशेष प्रसिद्ध म्हणजे पॉल सेरूसिएर आणि मॉरिस डेनिस हे होत.

**उत्तर डॅकोटा**—अमेरिका संयुक्त संस्थानें यांतलें उत्तर–मध्य भागातलें एक संस्थान. क्षेत्रफळ ७०,६६५ चौरस मैल; लोकसंख्या ६,४१,९३५. उत्तर सरहद्द कानडाला लागून आहे. ग्रेट प्लेन म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सपाट मैदानाच्या प्रदेशांतच हें संस्थान आहे. यांत दोन उंचावरचीं मोठालीं पठारें आहेत. यांत म्हणण्यासारखा एकहि पर्वत नाहीं. तथापि कांहीं लहान डोंगर व टेंकड्या कोठें कोठें आहेत. मिसुरी, रेड व जेम्स ह्या तीन मुख्य नद्या आहेत. हवा नेहमीं व सर्वत्र एकसारखी नसते. हिंवाळ्यांत थंडी व उन्हाळ्यांत उष्णता अतिशय कडक, हवा बहुधा शुष्क व रुक्ष. नैर्ऋत्य भागास 'बॅड लॅन्ट' म्हणतात, कारण नापिक व ओसाड जमिनींचा तो प्रदेश आहे. बिस्मार्क हें मुख्य ठिकाण आहे. शेतीच्या उत्पादनात या संस्थानांतील नाणावलेला पहिल्या प्रतीचा गहूं हा विशेष महत्त्वाचा आहे. याशिवाय राय, ओट, बार्ली, वगैरे बरींच पिकें निघतात. जनावरें व मेंढ्या पाळणें हे दोन्ही उद्योगधंदे महत्त्वाचे आहेत. कांहीं खनिज उत्पादनहि आहे. या संस्थानांत जंगल मात्र अगदीं बेतायाताचें आहे. तरीहि त्यांत ओक, पॉपलर व बर्च, वगैरे चांगलें लाकूड निघतें.

उत्तर डॅकोटामधली अगदीं पहिली वसाहत १७९३ मध्यें 'रेड' नदीच्या खोऱ्यांत झाली. लुई व क्लार्क यांनीं 'यलो स्टोन' (पीताश्मा) नदीच्या मुखाजवळ १८०४ मध्यें प्रवेश व संशोधन केलें. या संस्थानचा कांहीं भाग १८०५ मध्येंच अमेरिकेकडे आला व बाकीचा १८११ मध्यें कानडाकडून अमेरिकेकडे आला. १८३४ मध्यें हा भाग मिचिगान संस्थानांत होता. नंतर कांहीं दिवस विस्कॅन्सिन संस्थानांत होता. पुढें अयोवा, मिनेसोटा व नेब्रास्का संस्थानांतून पाळीपाळीनें जात १८६० मध्यें डॅकोटा टेरिटरी अस्तित्वांत आली. त्यांतून पुढें १८८९ मध्यें उत्तर डॅकोटा व दक्षिण डॅकोटा अशीं दोन संस्थानें संयुक्त संस्थानांत दाखल करून घेण्यांत आलीं.

**उत्तर ध्रुवप्रदेश**—उत्तर ध्रुवप्रदेश हा एका काळीं वसतियोग्य असून तेथील हवामान मानवी जीवनास अनुकूल असावें अशी समजूत आतांपर्यंत शास्त्रज्ञांकडून व पंडितांकडून व्यक्त झालेली आहे. दीर्घकालीन रात्री व दीर्घकालीन दिवस, अशीत

सुंदर उषा व उषःकाल, अरुणप्रकाश, वगैरेसंबंधीं उल्लेख आर्यांचे प्राचीन ग्रंथ जे ऋग्वेदादि संहिता त्यांमधें आढळून येतात. भूस्तरशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणेंहि पृथ्वीची स्थिति कांहीं युगांपूर्वी निराळ्या प्रकारची असावी व पूर्वी अनेक हिमयुगें येऊन गेलीं असावीं असें दिसून येतें. कांहीं कालानंतर हिमप्रलयामुळें उत्तर ध्रुवप्रदेश मानवी जीवनास असह्य झाला आणि त्यामुळें त्या प्रदेशाबद्दलचें ज्ञान हळूहळू लोप पावलें. तथापि या प्रदेशाबद्दलची जिज्ञासा पुन्हां जागृत होऊन अनेक संशोधकांनीं उत्तर दिशेस प्रवास, उत्तरेकडील भूभाग व उत्तर ध्रुव व उत्तर चुंबकीय ध्रुव यांच्या स्थानांचा शोध करण्याचा प्रयत्न केला व त्याकरितां अनेक सफरी केल्या. या सफरींना इंग्लंड, नॉर्वे, रशिया, अमेरिका, वगैरे देशांच्या सरकारांनीं व मस्कोव्ही कंपनी, हडसन बे कंपनी यांसारख्या संस्थांनीं द्रव्यद्वारां मदत केली व असे प्रवास करणाऱ्या धाडशी प्रवाशांबरोबर शास्त्रजिज्ञासेनें अनेक शास्त्रज्ञहि प्रवासास जाऊन त्यांनीं त्या प्रदेशांतील अनेक गोष्टींबद्दलचें ज्ञान मिळवून आणून त्याचा जनतेंत प्रसार केला. अगदीं प्रथम नॉर्स लोकांनींच धाडशी जलपर्यटनांनीं या प्रदेशाच्या संशोधनास सुरुवात केली. उत्तर ध्रुवप्रदेशास जाण्याकरितां चीनच्या ईशान्य दिशेनें मार्ग शोधून काढण्याचा कांहींनीं प्रयत्न केला, तर कांहींनीं नॉर्वेच्या वायव्य दिशेकडून जाण्याचा प्रयत्न केला.

अशा प्रकारच्या सफरींस प्रथम सर फ्रोबिशर यानें सुरुवात केली. पुढें १५६५ मध्यें डच लोकांनीं कोल येथें एक वसाहत स्थापन केली. यानंतर १५९४ मध्यें बेरेन्टस् यानें ग्रेट-आइसकेपपर्यंतच्या किनाऱ्याचें संशोधन केलें. यानंतर स्पिट्सबर्जन या प्रदेशाचा शोध लागला. सोळाव्या व सतराव्या शतकांत अनेक ठिकाणीं वसाहती स्थापन करण्यांत आल्या. रशियानें सैबिरिया प्रांत आपल्या ताब्यांत घेतल्यावर त्याच्या उत्तर किनाऱ्याचें संशोधन करण्यास सुरुवात केली. यानंतर या प्रदेशाचें शास्त्रीयदृष्ट्या बरेंचसें संशोधन करण्यांत आलें. यानंतर पॅरी, फ्रँकलिन व रॉस यांच्या सफरी विशेष प्रसिद्ध आहेत. तसेंच डॉ. नान्सेन यानें आर्क्टिक महासागराच्या आसपासच्या प्रदेशांतील हवामानाचें निरीक्षण करून फार दूरवर प्रवास केला व बरीच उपयुक्त माहिती मिळविली. यानंतर १९०१ मध्यें अमुंडसेन यानें उत्तर ध्रुवप्रदेशांत जाण्याचा प्रयत्न केला. पॅरीनें १९०७ सालीं ८९°५७' अंशांपर्यंत प्रवास करून तें उत्तर ध्रुवस्थान म्हणून तेथें अमेरिकेचें निशाण रोवलें. याच वेळीं स्टीफन्सन या संशोधकानें मॅकेंझी टापूमधील एस्किमोंची बारीकसारीक माहिती व भाषा यांचें ज्ञान करून घेतलें. यापूर्वी या एस्किमो लोकांनीं गोरा मनुष्य पाहिला नव्हता.

अशा तऱ्हेनें उत्तर ध्रुवप्रदेशाबद्दल जसजशी माहिती उपलब्ध होऊं लागली तसतसे अधिकाधिक संशोधक तिकडे जाऊं लागले. १९१८ मध्यें अमुंडसेन या नॉर्वेजिअन संशोधकानें आणखी एक सफर करून आर्क्टिक समुद्राविषयीं व तिकडील प्रदेशाविषयीं बरीच माहिती मिळविली. या नवीन सांपडलेल्या प्रदेशाच्या मालकी-बद्दलहि अनेक राष्ट्रांनीं प्रयत्न केले. अमेरिकेनें ग्रीनलंड बेटावर डेन्मार्कचा ताबा मान्य केला. आशियाच्या उत्तरेकडील बेटांचा ताबा रशियानें घेतला. स्पिट्सबर्जन व बेअर बेटांची मालकी नॉर्वेस मिळाली. अमुंडसेननंतर रॅसमुसेन व स्टीफन्सन यांनीं सफरी करून बरीच माहिती मिळविली.

उत्तर ध्रुवप्रदेशांत फार उत्तरेकडे जरी वनस्पती व फुलें आढळत नाहींत तरी जरा खालीं आलें म्हणजे आढळूं लागतात. ग्रीनलंड बेटांत उन्हाळ्यांत अनेक झाडें, वेली, वगैरे आढळतात. वनस्पतींपेक्षांहि प्राण्यांची वस्ती या प्रदेशांत प्राचीन आहे. येथें कोल्हे, लांडगे, वगैरे प्राणी आढळतात. लोकर देणारे प्राणीहि कांहीं आहेत. पक्षीहि बरेच आढळतात, पण ते ऋतुमानाप्रमाणें आपलें स्थान बदलतात. उ. ध्रुवप्रदेशांपैकीं सैबेरियाच्या उत्तर भागांत कायम वस्ती करून राहणें शक्य आहे. नॉर्वेच्या उत्तर प्रदेशांत कांहीं जाती राहतात व त्या तारायंत्रें, रेल्वे, वगैरेंनीं इतर जगाशीं संबंध ठेवतात. लॅप लोक हे अशा प्रदेशांत राहतात. अमेरिकन इंडियन लोकहि अलास्कांत व कानडाच्या उत्तर भागांत बरेच दूरवर जातात. ग्रीनलंडमधील एस्किमो लोक प्रसिद्ध आहेत.

नवीन वसाहती—पहिल्या महायुद्धानंतर सोव्हिएट रशियानें सैबेरियाचा मोठा प्रदेश पूर्वी जो कैद्यांचें काळें पाणी म्हणून नुसता ओसाड पाडून ठेवला होता व ज्याला व्हाइट हेल् (पांढरा नरक) असें युरोपांत नांव दिलें जात असे त्या प्रदेशाचें उत्तर ध्रुवापर्यंत जवळजवळ औद्योगिक कारखान्यांचें क्षेत्र बनवून सोडलें आहे. त्याप्रमाणेंच कानडाचा उत्तर भाग, ग्रीनलंड, अलास्का, इ. उत्तर ध्रुवाच्या भोंवतालचे प्रदेश आतां मानवी जीवनाला सुखकर बनविले गेले आहेत. या उत्तर ध्रुवप्रदेशांत जमिनीचा सलग भाग मुळींच नसून लहान लहान बेटें इतस्ततः पसरलेलीं आहेत. दुसऱ्या महायुद्धांत असें आढळून आलें कीं, या भागांतील समुद्रामधून जहाजांचें दळणवळण ठेवतां येतें व तसें युद्धाच्या सामुग्रीसाठीं दळणवळण मोठ्या प्रमाणांत चालू केलेंहि होतें. रशियाची ही तयारी गेलीं दहा वर्षें चालली होती. त्यामुळें मुरमान्स्कसारख्या आठ हजार वस्तीच्या बंदरांत दीड लाख वस्ती झाली आहे. या प्रदेशांत खनिज संपत्तिहि फार मोठी आहे.

सोनें, चांदी, निकल, जस्त, लोखंड, तांबें, ग्रफाइट, कोळसा, तेलें व रासायनिक द्रव्यें हीं बाहेर काढण्यासाठीं

लिमिटेड कंपन्या तेथें सुरू झाल्या आहेत. वाहतूकहि फार लवकर होते. विमानानें तर कांहीं थोड्या तासांत इकडे जातां येतें. रशियानें 'नार्दर्न-सी-रूट-अॅडमिनिस्ट्रेशन' नांवाचें एक स्वतंत्र खातेंच उघडलें आहे. या नव्या वसाहतींत धाडशी लोक येऊन राहिले असून त्यांच्या सर्व सुखसोयी सरकार पाहतें.

डिक्सन-आयलंड हें रशियाचें अगदीं उत्तरेकडचें गांव ध्रुवापासून फक्त चारशें मैल दूर आहे. येथें 'आर्क्टिक न्यूज' म्हणून एक वृत्तपत्र निघतें. बातम्या ताज्या असतात. इगार्को शहरहि चांगलें भरभराटीस आलें आहे. यांत शेंकडा ९० स्त्रिया यांत्रिक कामावर आहेत. याप्रमाणें आर्यांनीं पुन्हां उत्तर ध्रुवाकडे वस्ती आरंभली आहे.

**उत्तर मीमांसा**—उत्तर मीमांसा किंवा वेदान्तदर्शन याचा कर्ता बादरायण (वेदव्यास) आहे. यांत ब्रह्ममीमांसा केली आहे म्हणून या दर्शनांतील सूत्रांस ब्रह्मसूत्रें हें नांव देण्यांत आलें आहे. यांस शारीरक सूत्रें असेंहि म्हणतात. बादरायणापूर्वी जे उपनिषद्ग्रंथ निर्माण झाले त्यांत कित्येक ठिकाणीं परस्परविरुद्ध विचार किंवा मतें प्रगट करण्यांत आलीं होतीं. त्यांची एकवाक्यता वेदान्तसूत्रांत करण्यांत आली आहे. आणि त्यामुळें उपनिषदांप्रमाणें वेदान्तसूत्रें हीं प्रमाण धरलीं जातात. वेदान्तसूत्रांचें मत असें आहे कीं, ज्याच्यामुळें जगाची उत्पत्ति, स्थिति व लय होतो तें ब्रह्म आहे.

**उत्तर सरकार**—मद्रास इलाख्याच्या उत्तरेकडील गंजम, विजगापट्टण, गोदावरी, कृष्णा व गंतूर या ५ जिल्ह्यांपैकीं प्रत्येकाचें नांव हें असून तें मुसलमानी अमदानीपासून चालत आलें आहे.

१७५० त मुजफरजंग हा फ्रेंचांच्या मदतीनें दक्षिणेचा सुभेदार झाल्यावर त्यानें मच्छलीपट्टण व सभोंवारचा प्रदेश त्यांच्या स्वाधीन केला. यानंतर सलाबतजंग गादीवर आल्यावर त्यानें मच्छलीपट्टण व १७५३ त सर्व उत्तर सरकार प्रदेश फ्रेंचांना देऊन टाकला. पुढें बुसी यानें यांच्यावर एक नांवाचाच राजा बसवून सर्व सत्ता आपल्या हातीं ठेविली. विजयरामराज राजानंतर आनंदराव हा गादीवर आला. यानें हा प्रदेश बंगाल्यांतील इंग्रजांस देऊं केला व लगेच क्लाइव्ह यानें सैन्य पाठवून मच्छलीपट्टण हस्तगत केलें होतें. पुढें सलाबतजंगाशीं तह करण्यांत आला व या तहान्वयें मच्छलीपट्टण व त्याच्या सरहद्दींतील ८० मैल लांब व २० मैल रुंद असा प्रदेश इंग्रजांस देण्यांत आला. यानंतर १७६५ त शहाआलम बादशहानें पांचहि सरकार कंपनी सरकारास दिले. हैद्राबादच्या निजामाशीं झालेल्या तहान्वयें कंपनी सरकारनें या देणगीच्या मोबदला म्हणून दरसाल ५० हजार पौंड खर्चून निजामाच्या मदतीकरितां फौज ठेवण्याचें कबूल केलें. १८२३ त इंग्रजांनीं निजामास ११६$\frac{1}{2}$ लाख रु. देऊन या प्रांतावर कायमची मालकी मिळविली.

**उत्तरा**—मत्स्य देशाधिपति विराट राजाची कन्या. हिचा अभिमन्यूशीं विवाह झाला. भारतीय युद्धांत अभिमन्यु मरण पावला त्या काळीं ही गरोदर होती. तेव्हां गर्भाचें अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रापासून श्रीकृष्णानें रक्षण केलें. मुलगा झाला. तोच परीक्षित होय.

**उत्तरारुण प्रकाश**—(ऑरोरा बोरिआलिस). अमेरिका व युरोप खंडाचा उत्तर भाग यांत उन्हाळ्यांत व हिंवाळ्यांत *आकाशांत उजेडाचे जे झोत चक्राकार पसरलेले दिसतात यांनाच* 'उत्तरेकडील प्रकाश' असें नांव आहे. या झोतांचा रंग बहुतकरून पांढरा असतो; परंतु तो कधीं कधीं तांबडा, हिरवा अगर पिवळटसर असाहि दिसतो. हे झोत सरळ अगर नागमोडीहि असतात. तसेंच हे झोत कधीं कधीं पंख्यासारखे अगर मुगुटासारखे अगर टांगून खालीं सोडलेल्या पडद्यासारखे दिसतात. उत्तर अक्षवृत्तें ६५° ते ८५° यांच्या दरम्यान व तसेंच दक्षिणेकडेहि हे पट्टे त्याचे दक्षिण वृत्तावर दिसतात. याचें कारण शास्त्रज्ञांच्या मतें असें आहे कीं, सूर्याच्या उष्णतेमुळें उंच वातावरणांतील वायूचें तेज फुटूं लागतें व हें तेज पृथ्वीच्या ध्रुवाजवळील लोहचुंबकामुळें आकर्षिलें जातें. कारण या प्रकाशाचा झोत पृथ्वीच्या ध्रुवाजवळील लोहचुंबकाच्या कमीजास्त जोरावर फिरतो. सूर्यावरचे डाग व हे अरुणप्रकाश यांचा संबंध दिसून येतो. आज जगांतील शास्त्रज्ञांचें याकडे लक्ष लागलें आहे.

**उत्तानपाद**—स्वायंभू मनूचा कनिष्ठपुत्र व प्रियव्रत राजाचा कनिष्ठ बंधु. याला सुनीति व सुरुचि अशा दोन स्त्रिया होत्या. सुनीतीचा मुलगा ध्रुव (पहा).

**उत्पादक**—(जनरेटर). विद्युत्शास्त्रामध्यें यांत्रिक शक्तीचें विद्युत्शक्तीमध्यें रूपांतर करण्याकरितां या यंत्राची योजना करण्यांत येते. या यंत्रामध्यें चुंबक क्षेत्रामध्यें एखाद्या तारेच्या वेष्टणाचे (आर्मेचर) किंवा एखाद्या दुसऱ्या प्रकारच्या विद्युत्ग्राहकाचें भ्रमण करून विद्युत्शक्तीचें उत्पादन करण्यांत येतें. या उत्पादकापासून सरल विद्युत्प्रवाह (डी. सी.) किंवा उलटसुलट विद्युत्प्रवाह (ए. सी.) उत्पन्न करतां येतो.

**उत्पादक वायु**—(प्रोड्यूसर गॅस). हवा किंवा पाणी किंवा दोहोंचें मिश्रण तापलेल्या कोळशांतून सोडलें म्हणजे मिळणारें वायूचें मिश्रण. यांत मुख्यतः कर्बक प्राणिद (कार्बन मोनॉक्साइड),

कर्बद्विप्राणिद (कार्बन डाय ऑक्साइड) असतात; थोड्या प्रमाणांत उज्ज (हायड्रोजन), मिथेन आणि नत्र (नायट्रोजन) हीं असतात; ह्या वायुमिश्रणाचा उपयोग करण्यापूर्वी त्यांतील घाण गाळून काढावी लागते. गेल्या (दुसऱ्या) महायुद्धांत पेट्रोलची टंचाई होती त्या वेळीं मोटारगाड्यांसाठीं ह्याच वायुमिश्रणाचा उपयोग होत होता.

**उत्सर्जक यंत्र**—(इजेक्टर). एखाद्या बंद जागेंतून एखादा वायु, बाष्प, किंवा द्रवपदार्थ दुसऱ्या अधिक दाबाच्या वायूच्या, बाष्पाच्या, किंवा द्रवाच्या साहाय्यानें बाहेर घालवून देण्याकरितां जी यांत्रिक योजना करण्यांत येते, तीस उत्सर्जक असें म्हणतात. उदा०, एखाद्या संचायकांतून हवा काढून घ्यावयाची असल्यास उत्सर्जक वापरण्यांत येतो. अशा वेळीं संचायकापासून बाहेर वातावरणाशीं जोडलेली अशी एक आखूड विशिष्ट आकाराची नळी बसविण्यांत येऊन तींतून वाफेचा सरळ झोत बाहेर टाकण्यांत येत असतो. ज्या वेळीं ही वाफ नळींतून झोताच्या रूपानें बाहेर पडत असते तेव्हां तिची गति फार मोठी असून ती जोरानें वाफ बाहेर टाकण्याचें कार्य करीत असतां एकीकडे संचायकांतून हवा शोषून घेण्याचें कार्य करीत असते.

**उदबत्ती**—सुगंधी वासाची काडी. उदबत्ती करण्याकरितां चंदन, कृष्णागर, नागरमोथे, देवदार, ऊद, सैदालकडी, कोळसा, गूळ व शिलारस हे पदार्थ लागतात. उंची उदबत्तींत गुलाबकळी, पाचपाला, वेलदोडे, वाळा, अंबर, कस्तुरी, इ. आणखी द्रव्यें वापरतात. या जिनसांची एके जागीं कुटून वस्त्रगाळ पूड करतात व त्यास शिलारस ऊन करून चोळतात. नंतर गूळ किंवा मध मिसळतात. हा मसाला झाला. हा भिजवून चोयांस लावतात. वाळल्यावर उदबत्ती तयार होते. जाडी उदबत्तीस अगरबत्ती म्हणतात.

**उदयगिरी**—१. ग्वाल्हेर संस्थान, भेलसा जिल्ह्यांतील एक प्राचीन गांव. बेटवा आणि बेश नद्यांच्या मध्यभागीं भेलशापासून चार मैल दूर हें आहे. येथें पुष्कळ लेणीं असल्यामुळें या ठिकाणास महत्त्व आलेलें आहे. येथें जैन मंदिरांचे अवशेष असंख्य आहेत.

मगध देशाच्या चंद्रगुप्तानें गुजरात आणि माळवा सर केला त्या वेळच्या मिती शिलालेखांत स्पष्ट नमूद केलेल्या आहेत. असेंच आणखीहि दुसरे शिलालेख पुष्कळ आहेत.

२. टेकडी—(सूर्योदय टेकडी). बंगाल, कटक जिल्ह्यांतील जाजपूर पोटविभागांतील आशिया पहाडावरील उंच शिखर. हें जिल्ह्याच्या अगदीं पूर्वेस टेकडीवर असल्यामुळें याला उदयगिरी हें नांव पडलेलें आहे. या ठिकाणीं एक देऊळ असून त्याचे तीन भाग आहेत. यांत एक मोठी प्रचंड बुद्धाची बसलेली मूर्ति आहे.

**उदयन**—मगध देशाचा राजा व शैशुनाग वंशांतील आठवा पुरुष. हा वत्स देशाचा राजा होता, म्हणून याला वत्सराज असेंहि नांव आहे. याचा काल खि. पू. ५०३ चा होय. यानें गंगेच्या कांठीं कुसुमपूर हें शहर वसविलें. याची राणी ही अवंतीच्या महासेन राजाची कन्या होय.

उदयनासंबंधीं बऱ्याच कथा काव्यांतून ग्रथित केलेल्या आहेत. रत्नावली नाटकांतील नायक उदयन आहे. उज्जनीची राजकन्या वासवदत्ता हिनें वत्सराजाला स्वप्नांत पाहिलें तेव्हांपासून तिचें मन त्याच्यावर बसलें. उदयनाला उज्जनीला फसवून नेण्यांत येऊन कैद करण्यांत आलें. पण कैदेंत घालणाऱ्या चंडसेन राजाच्या प्रधानानें त्याची जेव्हां मुक्तता केली तेव्हां तो वासवदत्तेलाहि घेऊन गेला.

**उदयपुर**—मध्यहिंदुस्थान, ग्वाल्हेर संस्थान, भेलसा जिल्ह्यांतील एक गांव. हें ठिकाण प्राचीनकाळीं महत्त्वाचें होतें. येथें मुसलमानांचे अवशेष आढळतात. किल्ल्याच्या तटाला ठिकठिकाणीं भोकें पाडून दरवाजे केलेले आहेत. दक्षिणेस अर्ध्या मैलावर एका टेकडीवर विनचुऱ्याची मोठी चिरेबंदी भिंत असून पूर्वी त्या ठिकाणीं बळकट आश्रयाची जागा असावी असें वाटतें. उदयेश्वराचें देऊळ प्रेक्षणीय आहे. त्याची बांधणी इतकी नाजूक व रंग इतका ताजा दिसतो कीं, सर्व कांहीं शिल्प नुकतेंच रेखाटलेलें आहे असें वाटतें. तेथें एक उदयादित्य परमाराचें देऊळ दाखवितात. येथें शिलालेख आढळतात.

**उदयभानु**—उदेभान राठोड. एक मोंगल सरदार. सन १६७० त तानाजी मालुसऱ्यानें सिंहगड किल्ल्यावर रात्रींच्या वेळीं ५० मावळ्यांनिशीं अचानक हल्ला केला तेव्हां उदयभानु हा त्या किल्ल्याच्या संरक्षणार्थ मोंगलांकडून नेमलेला तेथील अधिकारी होता व त्याच्या हाताखालीं रजपूत लोकांचें भरभक्कम सैन्य होतें, परंतु या हल्ल्याच्या वेळीं हा आपल्या सुमारें पांचशें लोकांसह मावळी लोकांशीं लढतां लढतां मरण पावला. हा मूळचा रजपूत पण बाटून मुसलमान झाला होता.

**उदयसिंह** (१५४१-४२-१५७२)—हा संग राण्यास त्याची हाडवंशीय राणी कर्णावती हिजपासून झालेला मुलगा. संग मरण पावला तेव्हां कर्णावती ही याच्या वेळेस गरोदर होती. त्यानंतर बनवीर गादीवर आला. तेव्हां त्यानें उदयसिंहाचा जीव घेण्याचा प्रयत्न केला. परंतु पन्ना नामक स्वामिभक्त दाईनें उदयसिंहाचा जीव वांचवून त्यास गुप्तपणें कुंभोमेर किल्ल्यावर नेऊन ठेवलें. तेथें उदयसिंहानें सात वर्षें अज्ञातवासांत काढल्यावर तो जिवंत असल्याची बातमी बाहेर फुटून रजपुतान्यां-

तील संस्थानिकांनीं त्यास मेवाडच्या गादीवर आणून बसविलें. पण उदयसिंह एकंदरींत दुर्बल निघाला. हुमायुनाचा पराभव होऊन दिल्लींत अस्वस्थता उत्पन्न झाल्यामुळें बरींच वर्षेपर्यंत त्याच्या वाटेस कोणी गेलें नाहीं. परंतु अकबर बादशहानें इ. स. १५६७ मध्यें चितोडवर स्वारी केली त्या वेळीं लोकांनीं उदयसिंहास चितोड सोडून बाहेर जावयास लाविलें. तथापि चितोडच्या संरक्षणास वीर पुरुषांची वाण पडली नाहीं. बेदनूरचा जयमल्ल व केळव्याचा पुत्त यांनीं मोठें शौर्य गाजविलें, पण ते धारातीर्थी पडल्यावर चितोड मोंगलांच्या हातीं लागलें.

उदयसिंह चितोड सोडून निघाला तो राजपिंपळ्याच्या जंगलांत गोहिलाच्या आश्रयास जाऊन राहिला. तेथून मग तो अरवली डोंगराच्या गिर्वा खोऱ्याकडे गेला. या खोऱ्याच्या मुखाशीं त्यानें कित्येक वर्षांपूर्वी उदयसागर नांवाचा तलाव बांधला होता. तेथें त्यानें आतां उदेपुर नांवाचें शहर वसवून तीं आपली राजधानी केली. चितोड गेल्यावर उदयसिंह चार वर्षें जिवंत होता.

**उदयसिंह** (१४६९-१४७४)—उदयसिंह उर्फ उदाराणा हा आपला बाप कुंभोराणा याचा खून करून इ. स. १४६९ मध्यें गादीवर बसला. त्याच्याविषयीं रजपूत लोकांना इतका तिरस्कार वाटतो कीं, 'हत्यारा' या निंदाव्यंजक नांवाशिवाय त्याला कोणी उल्लेखीत नाहीं. मागील राण्यांनीं आपल्या प्रयत्नांनीं मेवाडच्या राज्यास जें वैभव प्राप्त करून दिलें होतें त्यापैकीं अर्धेअधिक हा आपल्या पांच वर्षांच्या कारकीर्दींत गमावून बसला. त्यानें देवरा ठाकुरास अबू प्रांत देऊन स्वतंत्र केलें आणि जोधपूरच्या राजास सांभर, अजमीर व त्यालगतचे जिल्हे देऊन त्याची मैत्री संपादण्याचा उपक्रम चालविला. या राजांच्या मैत्रीवर विसंबून राहणें त्यास धोक्याचें वाटल्यामुळें अन्यायानें संपादन केलेलें राज्य हातीं ठेवण्याकरितां शेवटीं तो दिल्लीच्या बादशहास शरण जाऊन त्यास आपली मुलगी देण्यास तयार झाला. परंतु उदयसिंह हा बादशहाची भेट घेऊन दिवाणखान्याबाहेर पडतो न पडतो तोंच अंगावर वीज पडून तो ठार झाला.

**उदयादित्य परमार**—हा माळव्याच्या परमारांपैकीं जयसिंहाचा उत्तराधिकारी होता. राज्यावर बसल्यानंतर (१०५९) त्यानें सांभरच्या तिसऱ्या विग्रहराज चौहानच्या मदतीनें आपल्या राज्याची स्थिति सुधारली व गुजरातच्या कर्ण राजास जिंकलें. यानें आपल्या नांवानें ग्वाल्हेर राज्यांत उदयपुर नगर वसविलें. या उदयपुरांत परमारांचे पुष्कळ शिलालेख मिळाले आहेत. हा विद्यानुरागी होता.

**उदर**—पोट. मनुष्याच्या शरीरामध्यें पोट म्हणजे मुख्य धडांतील खालच्या अंगास असलेला पोकळ भाग होय. हा वक्षस्थळापासून एका पडद्याच्या योगानें विभागलेला असतो आणि खालीं कटिप्रदेशपर्यंत पोंचलेला असतो. या भागांत पचनक्रियेचीं व मूत्राशयाचीं गात्रें असतात. इतर प्राण्यांतहि यासारख्या शरीराच्या भागाला पोट हेंच नांव देण्यांत येतें. किड्यामध्यें वक्षाच्या पाठीमागच्या सर्व भागास उदर म्हणण्यांत येतें व त्यास एक वलयांची रांग असते.

**उदरी**—(गॅस्ट्रोल). गर्भविद्येमध्यें अनेक पेशीमय प्राण्यांच्या गर्भाच्या वाढीमधील एका अवस्थेस हें नांव देण्यांत येतें. या अवस्थेमध्यें गर्भाचें स्वरूप दोन थरांच्या एका पिशवीसारखें असून तिच्या आंतील भाग पोकळ असतो व त्या पोकळीचा बाहेरच्या बाजूशीं एका द्वारानें संबंध जोडलेला असतो; त्या द्वारास जंतुरंध्र (ब्लास्टोपोर) असें म्हणतात.

**उदाजी चव्हाण** (मृ. १७६२)—एक मराठा सरदार. याच्या घराण्यांत हिंमतबहादूर हें पद चालत असे.

मालोजी घोरपडे याजवळ उदाजीचा पणजा व बाप होते. उदाजीचा बाप विठोजी यानें औरंगजेबाच्या तंबूचे सोन्याचे कळस कापून आणले होते. तो १६९६ त कर्नाटकाच्या लढाईत पडला. उदाजी हा ताराबाईच्या पक्षांत होता व शाहूचा मुलूख लुटीत असे. तेव्हा शाहूनें आपल्या सरदारांना उदाजीचा कांटा काढण्याची ताकीद केली. वारणातीरीं दोन्ही पक्षांत लढाई होऊन कोल्हापूरवाले हरले. तथापि उदाजी हा पुढें त्रास देतच राहिला व मोंगलांशीं त्यानें संगनमत केलें. नानासाहेब पेशव्यानें मोठ्या मुत्सद्देगिरीनें त्यास वळवून डिग्रज येथें सरंजाम देऊन ठेविलें. तेथें त्याचा वंश आहे.

**उदाजी पवार** (मृ. १७६०)—हा मलठणच्या संभाजी पाटलाचा मुलगा. संभाजी पाटील शिवाजीच्या पदरीं होता. उदाजी हा सध्यांच्या धारच्या पवारांचा मूळपुरुष होय. पवार हा परमार शब्दाचा अपभ्रंश आहे.

उदाजी बाजीरावाचा लहानपणापासून मित्र होता. यानें आपलें ठाणें स. १७२४ मध्यें धार येथें बनविलें.

माळवा व गुजरात या ठिकाणीं मराठ्यांचा जम बसवावयास मुख्य कारणीभूत उदाजी होय. हा फार शूर होता. त्याच्या शौर्यावरून 'जिधर उदा उधर खुदा' अशी म्हणच पडली आहे. याचे वंशज धारेस राज्य करीत आहेत.

**उदारपक्ष**—(लिबरल पार्टी). ग्रेट ब्रिटनमध्यें या नांवाचा राजकीय पक्ष असून त्याला हें नांव १८३० च्या सुमारास मिळालें. या पक्षाला हें नांव या पक्षाच्या विरोधी पक्षानें प्रथम दिलें, आणि 'लिबरल' या शब्दाचा अर्थ तत्त्वाच्या बाबतींत धरसोड असा ध्वनित करण्याचा विरोधी पक्षाचा हेतु होता.

जुन्या 'व्हिग्' नामक राजकीय पक्षांतूनच हा लिबरल पक्ष बनलेला आहे. या पक्षाचें प्रधानमंडळ अनेक वेळां अधिकारारूढ झालें, त्या वेळीं मुख्य प्रधान अनुक्रमें होते ते—अर्ल ग्रे, व्हायकाउंट मेलबोर्न, अर्ल रसेल, व्हायकाउंट पामर्स्टन, डब्ल्यू. ई. ग्लॅडस्टन ( सर्वांत श्रेष्ठ मुख्य प्रधान ), लॉर्ड रोझबरी, सर. एच्. कॅम्बेल-बॅनरमन, आस्क्विथ व लाइड जॉर्ज. या लिबरल पक्षानें राजकीय सुधारणेचे अनेक सुप्रसिद्ध कायदे केले. तथापि लॉर्ड्स सभेबरोबर या पक्षाचें नेहमीं कडाक्याचें भांडण होत असे. कारण या पक्षाचीं कित्येक बिलें लार्ड्स सभेनें नामंजूर केलीं. त्यामुळें अखेर १९११ सालीं लिबरल पक्षानें 'पार्लमेंट ॲक्ट' मंजूर करून घेऊन लॉर्ड्स सभेचे अधिकार महत्त्वाच्या बाबतींत कमी केले. या पक्षांत १८८६ सालीं 'लिबरल युनिअनिस्ट' हा उपपक्ष निघाला आणि नंतर 'नॅशनल' आणि 'इंन्डिपेंडट लिबरल' अशी फाटाफूट होऊन १९२४ सालीं पार्लमेंटच्या निवडणुकींत या पक्षाचे फक्त ४० उमेदवार निवडून आले. त्यानंतर उदार पक्ष नाहींसा होत चालला. १९४५ च्या निवडणुकींत सारे १० उमेदवार निवडून आले.

**उदासीपंथ**—शीख धर्मांतील एक पंथ. या पंथास नानकपुत्र असेंहि नांव आहे; कारण या पंथाची स्थापना नानकाचा वडील मुलगा श्रीचंद्र यानें केली. सर्व उदासी अविवाहित राहतात व तांबडीं वस्त्रें वापरतात. या पंथांतहि आणखी पोटपंथ आहेत; उदा., संगत साहीब, रामदास उदासी, इ.

**उंदीर**— कुरतडणाऱ्या प्राणिवर्गांत हा पडतो. या जातीचे अनेक प्राणी आढळतात, पण त्यांतील विशेष आपल्या परिचयाचा म्हणजे घरांत आढळणारा उंदीर होय. कांहीं उंदीर शेतांत राहतात; ते आकारानें लहान असतात. त्यांचा रंग पिंगट, काळसर असतो. घाणेरड्या व अंधारी जागांत राहण्यामुळें यांच्या अंगावर

गणपति देवतेचें वाहन उंदीर आहे

फार पिसवा होतात, व या पिसवांमुळें प्लेगजंतूंचा प्रसार होतो. म्हणून यांचा नायनाट करण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. उंदीर धान्याचा फार नाश करतात. उंदरांना तेलकट पदार्थ फार आवडतात. कुरतडण्यामुळें दांत जे बोथट होतात त्यांना धार लावण्यासाठीं म्हणून लांकडाच्या सामानावर ते आपले दांत घांसतात. उंदरीण दर महिन्यास विते व तिला प्रत्येक वेळीं दहाबारापर्यंत पिलें होतात.

**उदेपुरी गोसावी**— साताऱ्याच्या बनसीगीर गोसाव्याचा हा चेला होता. हा महंत फार श्रीमंत असून मराठी संस्थानांत सावकारी करीत असे. हा सावकारी करतां करतां पुढें वकिली करूं लागला. भोंसले व कलकत्तेकर इंग्रज यांच्यामधील सर्व महत्त्वाच्या उलाढाली याच्याच मार्फत झाल्या. याचें नैतिक वर्तन शुद्ध नसे.

**उदेपुरी बेगम** (मृ. १७०७)—औरंगजेब बादशहाची एक स्त्री. औरंगजेबाचा समकालीन प्रसिद्ध व्हेनेशियन प्रवासी मनुची हा सांगतो कीं, ती औरंगजेबाचा भाऊ दारा याच्या जनानखान्यांतील एक जॉर्जियन बटकी असून दाराच्या वधानंतर ती औरंगजेबाची रखेली होऊन राहिली. या ख्रिस्ती सुंदरीवर औरंगजेबाची फार मर्जी असे. तिला मद्यप्राशनाची त्यानें मोकळीक ठेवली होती. तिच्याकडे पाहून बादशहा तिचा मुलगा कामबक्ष याचे अपराध पोटांत घाली.

**उदेपूर**—मेवाड. जुन्या राजपुताना एजन्सींतील एक संस्थान. याचें क्षे. फ. १३,१७० चौ. मै. असून लो. सं. १९,२६,६९८ आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें एक कोटी रु. आहे. संस्थानचा बहुतेक भाग डोंगराळ आहे. यांत अरवली पर्वताचा भाग येतो. संस्थानांत सरोवरें व तलाव पुष्कळ आहेत. हवा अतिशय उष्ण व निरोगी आहे. संस्थानांत १७ जिल्हे आहेत. मुख्य धंदा शेतकीचा आहे. मुख्य पिकें मका, ज्वारी, तीळ, कापूस, गहूं, इ. आहेत. खनिज संपत्ति विपुल आहे, पण ती वर काढण्याची पद्धतशीर योजना नाहीं. हत्यारें, मूर्ती, कापड, खेळणीं, इ. चे कारखाने आहेत. राजपुताना-माळवा रेल्वे संस्थानच्या अर्ध्या भागांतून जाते.

मेवाडचा इतिहास इ. स. ७ व्या शतकापर्यंत मागें जातो. रामाचा पुत्र कुश हा मेवाडचा मूळपुरुष मानण्यांत येतो. कनकसेन राजानें लाहोराहून काठेवाडांत राजधानी आणली (वल्लभीपूर). बाप्पानें परमारांचें राज्य हस्तगत केलें व चितोडराज्य स्थापिलें (इ. स. ७२८). बाप्पानंतरचा १८ वा पुरुष समरसिंह फार शूर होता. तो पृथ्वीराजास साहाय्य करतांना स्थानेश्वराच्या लढाईत पडला (११९३). पुढें मुसलमानांशीं टकरा द्याव्या लागल्या. पद्मावतीच्या अभिलाषेनें अल्लाउद्दिनानें स्वारी केल्याचें प्रसिद्धच आहे. पुढें हमीरनें चितोड परत घेतलें व सर्व रजपुतांची एकजूट केली. लाखाराण्यानें अनेक लोकोपयोगी कृत्यें केलीं. त्याचा पुत्र कुंभ हाहि फार पराक्रमी होता. संगराणा तसाच होता, पण बाबरनें त्याचा पराभव केला (१५२७). उदेपूरच्या राजस्त्रियांवर जोहार करण्याचे अनेकदां

प्रसंग आले. बनवीरनें बळकावलेलें राज्य उदयसिंहानें परत घेतलें (१५४१). पण अकबरापुढें त्याचें कांहीं चालेना. तो पळून गेला व त्यानें अरवलीच्या एका खोऱ्यांत नवें राज्य (उदेपूर) स्थापिलें. उदयचा मुलगा प्रतापसिंह हा तर अमर कीर्तिमान् आहे. त्यानें अनेक हाल काढले, पण मोंगलांची ताबेदारी पत्करली नाहीं व आपलें राजघराणें निष्कलंक राखिलें. पुढें मात्र त्याच्या वंशजांना मोंगल बादशहांशीं तडजोड करावी लागली. मराठ्यांनींहि राजस्थानावर स्वाऱ्या करून उदेपूरला बरीच तोपीस लाविली. कृष्णाकुमारीची करुण कथा प्रसिद्धच आहे. १८१७ त उदेपूरच्या भीमसिंहानें इंग्रजांचें स्वामित्व पत्करलें व संस्थान निर्वेध राखिलें. आतां राजस्थान संघांत हें संस्थान सामील झालें आहे.

सध्यांचे महाराणा भूपालसिंह नांवाचे असून ते १९३० सालीं गादीवर आले. यांनीं संस्थानांत बऱ्याच सुधारणा केल्या व उत्पन्न वाढविलें. यांना ले. कर्नल हा लष्करी हुद्दा आहे.

उदेपूर—राजधानी. उदेपूर-चितोड आगगाडीच्या फांट्यावर आहे. पुष्कळ राजवाडे व संस्थानी इमारती प्रेक्षणीय अशा आहेत. पिशोला सरोवरांत जलमंदिरें आहेत. नुकतें बांधलेलें दुसरें 'फत्तेसागर' सरोवरहि फार सुंदर आहे. एकलिंगजीचें प्राचीन स्थान बारा मैलांवर आहे.

**उदेपूर**—(लहान). जुन्या ईस्टर्न स्टेट एजन्सींतील एक संस्थान. क्षेत्रफळ १०४५ चौ. मैल. पूर्वी हें संस्थान बंगालच्या छोटा नागपूरच्या संस्थानांत मोडत होतें. परंतु सन १९०५ सालीं तें मध्यप्रांतांत घातलें, नंतर १९३३ सालीं ईस्टर्न एजन्सींत तें गेलें व आतां मध्यप्रांतांत तें विलीन झालें. याच्या उत्तरेस सुरगुजा संस्थान आणि पूर्वेस जशपूर आणि रायगड संस्थानें, दक्षिणेस रायगड संस्थान आणि पश्चिमेस बिलासपूर जिल्हा. संस्थानचा उत्तरेकडील जवळजवळ अर्धा प्रदेश डोंगराळ असून दक्षिणेकडील सपाट आहे. येथें सोनें, लोखंड, अभ्रक, दगडी कोळसा, वगैरे खनिजें सांपडतात.

हें संस्थान सुरगुजा संस्थानची धाकटी पाती आहे. १८१८ सालीं मुधोजी भोसले (आप्पासाहेब) याजबरोबर झालेल्या तहांत हें संस्थान इतर संस्थानांबरोबर ब्रिटिश अमलाखालीं आलें. या वेळीं संस्थानिक कल्याणसिंग असून त्यानें खंडणी सुरगुजा संस्थानामार्फत दिली होती. १८५२ सालीं संस्थानिक व त्याचे दोन बंधू यांच्यावर खुनाचा आरोप येऊन त्यांस कैदेची शिक्षा झाली व संस्थान खालसा करण्यांत आलें. सन १८५७ च्या बंडांत कांहीं खटपट करून संस्थानिक व त्याचे भाऊ यांनीं उदेपूर संस्थानांत शिरून कांहीं वेळ राज्य केलें. पुढें १८५९ सालीं बंडाचा शेवट झाल्यावर त्यांस काळ्या पाण्याची शिक्षा मिळून अंदमान बेटांत त्यांची रवानगी करण्यांत आली व १८६० सालीं सुरगुजा संस्थानिकाचा भाऊ बिंदेश्वरी प्रसादसिंग देव याच्या स्वाधीन हें संस्थान केलें. कारण यानें ब्रिटिश सरकारास बंडांत उत्तम प्रकारें मदत केली होती. सन १८७६ त हा मरण पावल्यावर त्याचा मुलगा धर्मजितसिंग देव गादीवर बसला. यानें राजकोट आपल्या राहण्याचें ठिकाण करून त्यास धर्मजयगड असें नांव दिलें. १९०० सालीं हा मरण पावला व त्याच्या मागून त्याचा अज्ञान मुलगा चंद्रशेखर प्रसादसिंग देव यास गादी मिळाली. एकंदर खेडीं ११६ आहेत. येथें मुख्य पीक भाताचें असून उडीद, मूग, अवहर व इतर कडधान्याचीं पिकें होतात.

संस्थानिकास ब्रिटिश सरकारला ८०० रुपये खंडणी द्यावी लागत असे. आतां मध्यप्रांतांत १४ संस्थानें जीं विलीन झालीं त्यांत उदेपूर हें एक आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें ४½ लाख रु. आहे व लो. सं. १,१८,३३१ आहे.

**उदेपूर**—छोटा उदेपूर (रेवाकांठा, मुंबई) संस्थानचें मुख्य ठिकाण. येथील तळ्यापलीकडील आंबराई व नदी यांमधील ठिकाणावरच तात्या टोपेच्या लोकांचा १८५८ त पराभव झाला. तळ्याच्या कांठावर एक देऊळ असून त्याच्या शिखरावर चित्रें कोरलेलीं आहेत. राजवाड्याभोंवतालच्या कांहीं घरांखेरीज इतर घरांवरून येथील लोकांच्या निष्कांचनतेची कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे.

**उंदेरी**—मुंबई, कुलाबा जिल्ह्याच्या अलिबाग तालुक्यांतील एक बेट. हें मुंबई बंदराच्या द्वाराशीं असून याच्या नैर्ऋत्येस सव्वा मैलावर खांदेरी नांवाचें दुसरें एक बेट आहे. उंदेरीच्या ईशान्येस एक लहानसें कोरीव लेणें आहे. १६८० सालीं सिद्दी कासमनें या बेटावर तटबंदी करून त्या ठिकाणीं तो राहिला. शिवाजीचा एक आरमारी सरदार दौलतखान नांवाचा होता. खांदेरी येथें त्याचें आरमार होतें. सन १६८० त सिद्दी व मराठे यांच्या दोन लढाया झाल्या. १८६१ त उंदेरी बेट राघोबादादा पेशव्यांनीं इंग्रजांना दिलें, नंतर उंदेरी पेशव्यांच्याकडून आंग्रे यांजकडे आलें. येथील किल्ल्यांत राजकैदी ठेवीत असत. १८४० सालीं उंदेरी इंग्रज सरकारकडे कायमची आली.

**उद्गमन, अनुमानपद्धति**—(इंडक्शन). विगमन या शब्दाचा तर्कशास्त्रांतील अर्थ असा आहे कीं, विशेष उदाहरणांवरून सामान्य नियम प्रस्थापित करणें. उदाहरणार्थ, अ मरण पावला, आ मरण पावला, इ मरण पावला, इत्यादि विशेष उदाहरणांवरून अनुमान-सामान्य नियम-असें कीं, मनुष्यप्राणी मर्त्य आहे. तर्कशास्त्र पाहा.

**उद्गीरची लढाई**— उद्गीर हें गांव पुण्याच्या थेट पूर्वेस सुमारें १०० कोसांवर मांजरा नदीच्या कांठीं आहे. ही मोहीम १७६० जानेवारी ते मार्चपर्यंत चालली होती. लढाईचें कारण असें झालें कीं, नगरचा किल्ला पेशव्यांनीं किल्लेदार कविजंग यास दरसाल ७०,००० उत्पन्नाची जहागीर देऊन ता. ९-११-१७५९ मध्यें हस्तगत केला. यामुळें पूर्वीची निजामशाहीची राजधानीच गेली. तेव्हां निजाम चिडला. व परांडा मोहिमेस प्रारंभ झाला. या मोहिमेंत इब्राहिमखान गारदी याची नेमणूक तोफखान्यावर केली होती. सदाशिवरावभाऊ, विश्वासराव व दादासाहेब असे त्रिवर्ग या मोहिमेंत होते. निजामाचा मोठा पराभव होऊन ६० लक्षांचा मुलूख मराठ्यांस मिळाला.

**उद्दालक**— ( आरुणि ). गौतमगोत्रोत्पन्न अरुणि ऋषीचा पुत्र व धौम्य ऋषीचा शिष्य. आरुणि हा पंचाल देशांतला म्हणून यास आरुणि पांचाल असेंहि म्हणत. गुरूच्या शेतास घातलेला मातीचा बांध पाण्याच्या प्रवाहामुळें राहीना, म्हणून यानें स्वतः बरेच दिवस एकसारखें आडवें पडून पाणी थांबविलें होतें. या एकनिष्ठ सेवेमुळें धौम्य प्रसन्न होऊन त्यांनीं उद्दालकावर अनुग्रह केला. यास श्वेतकेतु व नचिकेत असे दोन मुलगे व सुजाता नांवाची मुलगी होती.

**उद्देशगीत, उद्देशिका**—( इं. ओड ). हा भावगीताचा एक प्रकार आहे. एखाद्या व्यक्तीला किंवा वस्तूला उद्देशून उच्च विचार ज्यांत आहेत असें केलेलें गेय काव्य. प्रथम ग्रीक पिंडार, सॅफो, ॲल्सीअस, वगैरे साहित्यिकांनीं याचा अवलंब केला. होरेस हा रोमन कविहि याचा भोक्ता होता. मिल्टन, ड्रायडन, कॉलिन्स, ग्रे, कोलरिज, वर्ड्स्वर्थ, शेले, वगैरे आंग्ल कवींनीं तर याला फार उच्च स्थान मिळवून दिलें. 'टु ड्यूटी' ( वर्ड्स्वर्थ ), 'टु दि वेस्ट विंड' ( शेले ), 'टु ए नाइटिंगेल' ( कीटस् ), 'टु ए माउस' ( बर्न्स ), वगैरे उद्देशगीतें चिरंजीव झालीं आहेत.

मराठींत केशवसुतांनीं या प्रकाराचेंहि इतर प्रकारांप्रमाणें अनुकरण केलेलें दिसतें. पुढें त्यांचें पाहून '-प्रत' '-स' या प्रकाराच्या स्फुट कविता अलीकडील कवींनीं लिहिल्या, पण हा प्रकार मराठींत फारसा रूढ झाला नाहीं किंवा त्यास भारदस्तपणाहि आला नाहीं.

**उद्धव**—वसुदेवाच्या देवभाग नांवाच्या भावाचा मुलगा. हा मोठा कृष्णभक्त होता. तसेंच महान् योद्धा होता. हा कृष्णाचा जिवलग स्नेही होता. कृष्ण आपलें हितगूज याला सांगत असे व त्याची सल्ला घेत असे. कृष्ण मथुरेस आल्यावर कांहीं दिवसांनीं त्यानें उद्धवास गोकुळवासीयांचें विरहदुःख शमन करण्याकरितां त्यांच्याकडे पाठविलें होतें. कृष्णानें निर्याणाच्या प्रसंगीं उद्धवाला बराच उपदेश केला, व भागवताच्या एकादश स्कंधांत विवेचिलेलें सर्व ज्ञान उद्धवामुळेंच जगाला लाभलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. कृष्णाचा विरह झाल्यानंतर त्याच्याच आज्ञेनें तो बदरिकाश्रमीं जाऊन राहिला.

**उद्धव गोसावी** ( १६२४-१७१३ )— समर्थ रामदासांचा पहिला शिष्य. सदाशिवपंत नांवाच्या ब्राह्मणाचा हा मुलगा. आडनांव दशपुत्रे. समर्थांच्या प्रसादानें हा मुलगा झाला म्हणून आईबापांनीं त्यास समर्थसेवेस वाहिलें. हा टाकळीस समर्थांनीं बांधून दिलेल्या मठांत राहत असे.

**उद्धव चिद्घन**—एक मराठी कवि. इ. स. १६८० च्या सुमारास होऊन गेला. मोगलाईत वाडी स्टेशनपासून ५७ मैलांवर धारूर गांव आहे, त्या ठिकाणीं उद्धवचिद्घन राहत असे. याचें नांव उद्धव असून चिद्घन हें त्याच्या गुरूचें नांव. हा रामभक्त होता व 'ज्याचे वंशीं कुलधर्म रामसेवा। त्याचे वंशीं मज जन्म देगा देवा॥' हें उद्धवस्वामींचें पद प्रसिद्धच आहे. याची कविता अगदीं साधी परंतु भक्तिरसपूर्ण आहे. भाषा अत्यंत सुलभ असून तींत परकीय भाषेंतले शब्द फारसे नाहींत. तथापि काव्यदृष्टीनें त्याची कविता फारशी हृदयंगम नाहीं. याची समाधि धारूर येथें आहे.

**उद्धव योगदेव**— औरंगजेबानें इ. स. १६९० त रायगड काबीज करून येसूबाई व शाहू यांना पकडून नेलें, त्या वेळीं त्यांच्याबरोबर हा होता. याला राजाज्ञा अशी पदवी त्या वेळीं होती. शाहू औरंगजेबाच्या कैदेंत असतां त्याचा राजकीय कारभार उद्धवच पाही. यानेंच शाहूकरितां मुली पाहून त्याचीं लग्नें केलीं. शाहू दक्षिणेंत आला तरी उद्धव मागें येसूबाईबरोबर राहिला होता.

**उद्धवराव** ( १५६६-१६३२ )— हा उदाराम घराण्याचा मूळपुरुष असून याच्या वडिलांचें नांव रामाजीपंत असें होतें. हा दे. ऋ. ब्राह्मण असून वासीमचा राहणारा होता. संस्कृत, फारसी, वगैरे भाषा याला अवगत होत्या. हा दिल्लीस गेल्या वेळीं याच्या मामानें त्याला सरकारी नोकरींत लावून दिलें. आपल्या अंगच्या हुषारीमुळें तो अकबर बादशहाच्या नजरेंत भरला व त्यानें त्याला पांच हजारांची मनसब दिली. लष्करी कामांतहि हा फार हुषार होता. त्यानें एकंदर ४० वर्षें मोगल बादशहाची नोकरी केली.

**उद्यान-नगरें**—मोठाल्या शहरांत अतिशय दाट वस्ती झाल्यामुळें होणारे दुष्परिणाम नाहींसे करण्याकरितां उपाययोजना म्हणून अशीं उद्यान-नगरें स्थापण्याची कल्पना निघाली; आणि या योजनेनें मजुरांना चांगल्या परिस्थितींत आपल्या

मुलाबाळांसह राहण्याची व्यवस्था करण्यांत आली. उद्यान–नगराचा पहिला उपक्रम इंग्लंडांत १८८८ सालीं लिव्हर ब्रदर्स यांनीं आपल्या कामगारवर्गाकरितां करून 'पोर्ट सनलाइट' या नांवाचें एक नमुनेदार खेडें तयार केलें. तेथें बांधलेलीं घरें नगररचना पद्धतीचीं असून त्यांचें भाडें अगदीं थोडें ठेवण्यांत आलें. तें भाडें घरांच्या दुरुस्तीच्या खर्चापुरतें घेण्यांत येत असे. प्रत्येक घराभोंवतीं बाग असे. जॉर्ज कॅडबेरी यानें स्थापलेलें 'बोर्नव्हिले' हें या प्रकारचें दुसरें उदाहरण होय. येथें बांधलेलीं घरें इतर गिरण्यांतील मजुरांनाहि राहावयास देण्यांत येत असत. प्रत्येक घराभोंवतीं बाग असलीच पाहिजे, असा नियम होता. शिवाय प्रत्येक उद्याननगरांत शाळागृहें, सार्वजनिक सभागृहें, इत्यादि सार्वजनिक इमारती असतात. बोर्नव्हिले या नगराची व्यवस्था पाहणारी तेथील रहिवाशांनीं निवडून दिलेली एक समिति आहे, व ती समिति रहिवाशांच्या हिताच्या सर्व बाबींकडे लक्ष देते. फार मोठें पहिलें उद्याननगर बांधण्याची योजना एबेनेझर हॉवर्ड यानें १८९८ सालीं आंखली. या नगराकरितां ४ हजार एकर जमीन मिळविण्यांत आली. सदर उद्याननगरांत पाणीपुरवठा, सांडपाण्याचा निकाल आणि इतर सर्व प्रकारच्या सोयी करण्यांत आल्या. त्यामुळें या नगरांत कित्येक कंपन्यांनीं आपले उद्योगधंदे मूळ ठिकाणाहून हालवून तिकडे नेले. यानंतर इंग्लंडांत मोठ्या शहराच्या नजीक आसपास खेडीं वसविण्याचा (उद्यानोपनगरांचा) उपक्रम करण्यांत आला, व 'गोल्डर्स ग्रीन' हें अशा उद्यानोपनगराचें उत्तम उदाहरण आहे. ही उद्यान–नगरांची योजना इंग्लंडनंतर अनेक देशांतून अमलांत आणण्यांत आली. हिंदुस्थानांत मोठाल्या कारखान्यांची उभारणी करतांना अशीं उद्यान–नगरें वसविलेलीं कांहीं ठिकाणीं दिसतील.

**उद्वेग रोग**—(हायपोकॉन्ड्रियासिस). स्वतःच्या प्रकृतीविषयीं फाजील काळजी वाहण्यानें हा रोग उत्पन्न होतो. काळजीच्या जोडीला पोटांतील थोडी अस्वस्थताहि कधीं कधीं असते. यामुळें माणूस कांहींसा वेड्याप्रमाणें वागतो. आपलें पोट अगदीं बिघडलें आहे, आपला वीर्यनाश झाला आहे, आपल्याला गर्मी, वगैरे जडली आहे, इ. कल्पना वन्याचशा निराधार–करून अशीं माणसें सदा चिंताग्रस्त असतात व भ्रमिष्टपणानें वागतात. यावर उपाय म्हणजे रोग्याचें लक्ष दुसऱ्या गोष्टींकडे लागेल असें करणें. प्रवास, करमणुकीचीं साधनें, गप्पा, इ. मध्यें त्याला गुंतवावें. त्याच्या समाधानासाठीं कांहीं निरुपद्रवी औषध देत जावें. मानसोपचारानें हा रोग बरा होण्याचा फार संभव असतो.

**उनपदेव**— मुंबई, पूर्वखानदेश, चोपडें तालुक्यांत अडावदच्या उत्तरेस तीन मैलांवर हें एक उजाड खेडें असून तेथें एक उन्हाळें आहे. त्याचें ऊन पाणी एका देवळाच्या नौबत्यावरून निघतांना दिसतें व पुढें एका गायमुखांतून एका कुंडांत पडतें. या पाण्यांत स्नान केल्यानें त्वचेचे रोग बरे होतात अशी समजूत आहे. श्रीरामचंद्रांनीं सारंग ऋषीचा रोग नाहींसा करण्याकरितां बाण मारून हा झरा उत्पन्न केल्याची दंतकथा आहे. पाण्याची उष्णता साधारणपणें १४०° आहे.

**उन्नाव**—संयुक्त प्रांत, लखनौ विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १,७३२ चौ. मै.. जिल्ह्यांतून भागीरथी नदी वाहते. येथें लांकूड फार होतें. पावसाचें मान ३५ इंच आहे. हा जिल्हा अल्लाउद्दीनापासून मुसलमानांच्या ताब्यांत होता. तो १८५६ सालीं इंग्रजी राज्यास जोडला गेला. १८५७ सालीं जिल्ह्यांत बरीच धामधूम झाली. जिल्ह्यांत ४ तहशिली आहेत. लो. सं. (१९४१) ९,५९,५४९. मुरादाबाद येथें नक्षीदार भांडीं होतात. उन्नाव हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण रोहिलखंड रेल्वेवर आहे. लो. सं. सु. वीस हजार. हें गांव आठव्या शतकांत कोणी गोडोसिंगानें बांधल्याचें सांगतात. शहाजहान बादशहाच्या वेळच्या इमारती आहेत. येथें साबणाचा कारखाना आहे.

**उन्माद**—(हिस्टेरिया). हा रोग बायकांना जास्त होतो. मुलींच्या यौवनावस्थेमध्यें एखाद्या भावनेचा अतिरेक झाला असतां जी अवस्था उत्पन्न होते तीस उन्माद असें म्हणतात. या रोगामध्यें रोग्यास एकदम भावनेचा उद्रेक होऊन ती स्त्री रडूं लागते किंवा हंसत सुटते व झटका तीव्र असल्यास बेशुद्ध पडते. अशा अवस्थेमध्यें बहुतेक वाचा बंद होते. कानांनीं ऐकूं येत नाहीं व बहुतेक इंद्रियांच्या संवेदना नाहींशा होतात. या रोगाचा संबंध गर्भाशयाशीं नसून मेंदूशीं आहे. कल्पनेचा पगडा शरीरावर बसून तें विकृतपणें चालतें. मन फार हळवार व संस्कारक्षम बनतें. गेल्या महायुद्धामध्यें अनेक शिपायांस युद्धामध्यें जे अतिश्रम पडत त्यामुळें अशा तऱ्हेच्या पक्षघाताच्या किंवा उन्मादाच्या अवस्थेमध्यें विश्रांति मिळाल्यासारखें वाटत असे. विशेषतः अधिकारीवर्गामध्यें एक प्रकारच्या चिंतेमुळें भ्रम होण्याचा संभव असे. या रोगावर उपचार करावयाचा म्हणजे रोगाची विशिष्ट लक्षणें पाहून त्याचें पृथक्करण करून रोगाचें मूळ कारण शोधून काढणें हा होय. या रोगावर औषध देणें किंवा रोग्यास एकान्तांत बसूं देणें, किंवा कोंडून ठेवणें, यापासून उपाय होण्यापेक्षां अपाय होण्याचा अधिक संभव असतो. रोग्याचें मन युक्तीनें वळवून त्यास उत्तेजन देऊन नीट वागण्यास लावावें.

**उन्हउन्ह सावली**— लहान मुलांचा एक खेळ. हा खेळ बहुधा चांदण्यांत खेळतात. ज्याच्यावर राज्य असेल त्यानें उजेडांत उभें राहून सावलींतून उजेडांत येणाऱ्या मुलांस शिवावयाचें. शिवावयास तो आला असें पाहून इतर मुलें सावलींत जातात व पुन्हा

उजेडांत येण्याची हुलकावणी दाखवितात. धरणारा मुलगा चोर. तो ज्यास उजेडांत शिवेल तो चोर होतो व पहिला चोर इतर मुलांत मिसळतो.

**उन्हाळीं**—( गेझर्स ). खडकांतील पोकळींतून किंवा सांधींतून असणारें पाणी फार ऊन होऊन उकळून वर येतें. या पाण्यांत गारा, वाळू, इ. वितळलेल्या स्थितींत असतात. बहुधा ज्वालामुखीच्या प्रदेशांत अशीं उन्हाळीं असतात. आइसलंड, वायोमिंग ( अमेरिकन संयुक्त संस्थानें ) या भागांत खूप उंच उडणारीं उन्हाळीं आहेत. कांहींत २५० फुटांपर्यंत वर पाणी उडतें. कांहीं उन्हाळ्यांतून धूर आणि वाफा वर येत असतात. हिंदुस्थानांतील उन्हाळीं म्हणजे ऊन पाण्याचीं कुंडेंच होत. तीं पुष्कळ ठिकाणीं ( उदा., उनवदेव ) दिसतात.

**उन्हाळी पडसें**—( हे फीवर ). कांहीं गवतांचे अथवा वनस्पतींचे पराग घशामध्यें गेल्यामुळें श्वासोच्छ्वासाचा मार्ग बंद होऊन दम्यासारखी अवस्था होते. या रोगांत डोळे चुरचुरतात. व एकसारख्या एकामागून एक एकवीसपासून पन्नासपर्यंतहि शिंका येतात. यावर उपाय म्हणजे मज्जातंतूंस पौष्टिक औषध देणें, डोंगरावरील हवेंत राहावयास जाणें, नाकावर उपचार करणें, व विषघ्न औषधें घेणें, इत्यादि होत. ज्या जातीच्या परागांपासून हा रोग उत्पन्न झाला असेल ते शोधून काढून त्यावर विषघ्न औषधें घेणें अवश्य असतें.

**उपगंधकायित**—( हायपोसल्फाइट किंवा हायड्रोसल्फाइट ). हायपोसल्फरस किंवा हायड्रोसल्फरस अल्कांचीं लवणें. यामध्यें सिंधुगंधकायित ( सोडियम हायड्रोसल्फाइट ) आणि खटगंधकायित ( कॅल्शियम हायपोसल्फाइट ) हीं विशेष प्रसिद्ध आहेत. हीं लवणें 'लघुकारक' ( रिड्यूसिंग एजंट ) आणि 'रंगहारक' ( ब्लीचिंग ) आहेत आणि त्यांचा—विशेषतः सिंधुगंधकायितांचा—रंगविण्याच्या कारखान्यांत, तेलें आणि साबण ह्यांचा रंग घालविण्यासाठीं, आणि फोटोग्राफींत फार उपयोग होतो.

**उपग्रह**—मोठ्या ग्रहाभोंवतीं फिरणारा लहान ग्रह. पृथ्वीला एक ( याला चंद्र म्हणतात ), वरुणाला पण एक, मंगळाला दोन, प्रजापतीला चार, गुरूला नऊ, व शनीला नऊ किंवा अधिक उपग्रह आहेत. चंद्राप्रमाणें कांहीं मोठ्या उपग्रहांचे आकार, फिरण्याचे काल, इ. ज्ञात झालेले आहेत.

**उपदंश**—( सिफिलिस ). हा रोग सामान्यतः अस्वच्छ लैंगिक संयोगापासून उत्पन्न होतो. हा सांसर्गिक असून वंशपरंपरागतहि असूं शकतो. याच्या प्राथमिक अवस्थेंत जननेंद्रियावर फोड उठतो व त्यानंतर त्याच्या गांठी होतात. या रोगाच्या दुय्यम अवस्थेमध्यें घशांत फोड येऊं लागतात. त्वचेवर लाल पुटकुळ्या दिसूं लागतात. हाडें व मज्जातंतू यांत कळा येऊं लागतात. या रोगाचा एक सूक्ष्म जंतु आहे त्याचा शोध शॉवडिन आणि हॉफमन् यांनीं १९०५ मध्यें लावला. त्या जंतूचें नांव स्पिरोचिटा-पॅलिडा असें आहे. या रोगावर साल्व्हर्सन नांवाच्या औषधाची योजना झाल्यापासून या रोगापासून बरेच रोगी मुक्त करण्यांत येऊं लागले आहेत. अलीकडे पेनिसिलीनचा उपचार फार प्रभावी ठरला आहे.

**उपदंश त्वग्रोग**—( याज् ). हा एक उष्ण कटिबंधांत होणारा सांसर्गिक जीर्ण त्वग्रोग असून कांहींसा उपदंशासारखा दिसतो. याचा गर्भावस्थेचा काल पंधरवड्यापासून सहा महिनेपर्यंत असतो. याचीं लक्षणें म्हणजे थोडा ताप, सांधे दुखणें आणि अपचन हीं होत. याच्या योगानें शरीरावर रासबेरीच्या फळासारखे फोड उठतात. हा संसर्गजन्य असून पिसवांमुळें पसरतो. अर्सेनोबेन्झाल संयुक्तांचा यावर उपयोग होतो; पण रोग्याला दूर ठेवून स्वच्छतेचे उपचार करणें जास्त चांगलें.

**उपनयन**—( मुंज ). त्रैवर्णिकांच्या सोळा संस्कारांपैकीं एक मुख्य. गुरूनें शिष्याला आपल्या जवळ आणणें म्हणजे आपल्यासारखा विद्वान् करणें असा उपनयनाचा खरा अर्थ होता. तुझें हृदय माझ्या हृदयांत राहो; तुझ्या चित्तानें माझ्या चित्ताला अनुसरावें, इत्यादि उपदेशपर गुरु प्रथमच शिष्याला जें सांगतो, हें त्या अर्थाला पोषक आहे. ब्रह्मचर्य व उपनयन हीं भिन्न आहेत. उपनयन हा संस्कार आहे. ब्रह्मचर्य हा आश्रम असून उपनयनानंतर त्याला प्रारंभ होतो. स्मृतिकालापासून उपनयन पिता करतो. तत्पूर्वी ऋषि करी. उपनयनसंस्कार बटूला विद्यार्जनाला अधिकारी करतो. मेखला, हरिणाचें कातडें व दंड हीं ब्रह्मचारी ओळखण्याची बाह्य साधनें आहेत. ( मेखलाजिनदंडैश्च ब्रह्मचारीति लक्ष्यते । -दक्षस्मृति १-१३ ). ह्यांत यज्ञोपवीत सांगितलें नाहीं. वेदाध्ययन त्रैवर्णिकांनाच विहित असल्यानें शूद्रांना उपनयन सांगितलेलें नाहीं. सातवें वर्ष लागलें कीं ब्राह्मण मुलगा उपनयनास पात्र होतो.

**उपनिषदें**—उप + नि + सद् = जवळ बसणें, या संस्कृत धातूपासून उपनिषद् हा शब्द बनला आहे. गुरुजींच्या अगदीं सन्निध बसून पारमार्थिक ज्ञान संपादन करणें असा अर्थ कालांतरानें या शब्दास आला व त्या ज्ञानासहि हेंच नांव पडलें. 'अविद्याविध्वंसिनी ब्रह्मविद्या' म्हणजे अविद्येचा नाश करून पराविद्येचा लाभ करणारी विद्या असा व्यापक अर्थ उपनिषद् शब्दास आला. उपनिषदें हीं आपल्या प्राचीन पूर्वजांच्या अलौकिक बुद्धिमत्तेचीं व अध्यात्मविषयक विचारवैभवाचीं जिवंत स्मारकें आहेत. त्यांतील विचारसरणी, प्रतिपादनशैली व भाषावैभव पाहून पाश्चात्य पंडितहि थक्क होऊन त्या उच्च संस्कृतीचें श्रेष्ठत्व कबूल

करतात. पाश्चात्य राष्ट्रांत १८ व्या शतकापासून जे जे महान् तत्त्ववेत्ते होऊन गेले त्या सर्वांच्या विचारांवर उपनिषदांतील तत्त्वज्ञानाची छाप पडलेली दिसून येते.

उपनिषदांत तत्त्वज्ञानचिकित्सा करण्याची पद्धत सिद्धान्तवादी आहे, कोणतेंहि तत्त्व युक्तिवादानें पटवून देण्याचा त्यांत प्रयत्न नाहीं. तथापि सिद्धान्ताचें प्रतिपादन अत्युत्कट आत्मविश्वासानें केलें आहे. अज्ञ, पण जिज्ञासू माणसानें प्रश्न विचारावेत व तत्त्वज्ञानी माणसानें त्याचें उत्तर अल्प पण योग्य शब्दांत द्यावें अशी एकंदर भूमिका आहे. सारांश उपनिषदें म्हणजे अध्यात्मविषयक प्रमेयरूपी रत्नांची एक मोठी खाण आहे. या खाणींतूनच शंकराचार्यांनीं अद्वैत, रामानुजाचार्यांनीं विशिष्टाद्वैत व मध्वाचार्यांनीं द्वैत हीं तत्त्वज्ञानरूपी रत्नें शोधून काढलीं. उपनिषदें पुष्कळ आहेत. कित्येकांनीं त्यांची संख्या ३०० पर्यंत नेली आहे. अल्लोपनिषद्, ख्रिस्तोपनिषद्, वगैरे कांहीं उपनिषदें तर उघड उघड अर्वाचीन आहेत; तथापि वैदिककालीन व ज्यांचा उल्लेख शंकराचार्यादि आचार्यांनीं वारंवार केला आहे, अशीं उपनिषदें दहाच आहेत.

१ ईशावास्योपनिषत्, २ केनोपनिषत्, ३ कठोपनिषत्, ४ प्रश्नोपनिषत्, ५ मुंडकोपनिषत्, ६ मांडूक्योपनिषत्, ७ तैत्तिरीयोपनिषत्, ८ ऐतरेयोपनिषत्, ९ छांदोग्योपनिषत्, १० बृहदारण्यकोपनिषत्, ११ कौषीतकी उपनिषत्, १२ श्वेताश्वतरोपनिषत्, १३ महानारायणोपनिषत्, १४ मैत्रायणीयोपनिषत् हीं प्रसिद्ध उपनिषदें आहेत.

**उपमन्यु**— १. धौम्यऋषीचा एक शिष्य. हा गुरुगृहीं गायी राखीत असे. हा प्रथम उदरनिर्वाहार्थ माधुकरी मागत असे. ते गुरुनें बंद केल्यावर दुग्धप्राशन, नंतर वासराच्या तोंडावरला फेंस, यांवर निर्वाह करी. पण तोहि गुरुनें निषिद्ध मानल्यावर उपमन्यु रुईचा चीक खाऊन राहूं लागल्यामुळें अंधळा बनून एके दिवशीं विहिरींत पडला. धौम्यऋषि त्याच्या भक्तीनें प्रसन्न झाले व त्याला दृष्टि येण्यास त्यांनीं अश्विनीकुमारांची प्रार्थना करण्यास सांगितलें. तसें केल्यावर उपमन्यूला दृष्टि आली व दिव्य ज्ञान प्राप्त झालें.

२. वसिष्ठकुलोत्पन्न व्याघ्रपाद नामक ऋषीचा पुत्र व धौम्यऋषीचा ज्येष्ठ भ्राता. याची आई यास पाण्यांत पीठ कालवून दूध म्हणून देत असे. एकदां यास खरें दूध मिळालें तेव्हां त्यानें आईजवळ तसेंच दूध मागितलें. तिनें ईश्वरापाशीं मागावयास सांगितल्यावरून त्यानें ईश्वराराधन करून आकल्प आयुष्य व क्षीरसागराचें आधिपत्य, अशीं संपादन केलीं. याची गणना शैवांत असून यानें शिवसहस्रनाम रचिलें आहे. कृष्णानेंहि याजपासून शैवदीक्षा घेतली होती.

**उपयुक्ततावाद**—(सुखवाद). हा तत्त्वज्ञानी विद्वानांचा एक पंथ आहे. सामाजिक तत्त्वज्ञानांतील हा एक पंथ या दृष्टीनें जेरेमी बेंथाम यानें या सुखवादाचें संपूर्ण विवेचन केलें आहे. या सिद्धान्ताचा पाया हा आहे कीं, प्रत्येक मनुष्य जगांत व्यवहार करतांना स्वतःला सुख व्हावें आणि दुःख होऊं नये, असा हेतु मनांत धरून वागत असतो; म्हणून सर्व सामाजिक संस्था व राजकीय संस्था यांच्या उपयुक्ततेची कसोटी हीच असावी कीं, जास्तींत जास्त मानवांचें जास्तींत जास्त सुख, हित साधलें पाहिजे. या उद्देशाला विघातक असेल ती संस्था त्याज्य समजावी. या बेंथामच्या मतांचा परिणाम रिकार्डो, जेम्स मिल्ल, त्याचा मुलगा जॉन स्टुअर्ट मिल्ल आणि तत्कालीन अनेक अर्थशास्त्रज्ञ यांच्यावर फार झाला.

**उपरिचर**— १. उत्तानपादकुलोत्पन्न एक राजर्षि. एकदां देवराज इंद्र आणि महर्षि यांच्यामध्यें असा वाद पडला कीं, यज्ञांत पशुहिंसा करणें हें विहित कीं अविहित. त्यांत विहितत्वाविषयीं इंद्राचा पक्ष असून तद्विरुद्ध महर्षींचा होता. इतक्यांत हा तेथें साहजिक गेला. तेव्हां याचें मत विचारतां यानें इंद्राच्या बाजूनें मत दिलें; म्हणून रागावून 'तूं अधोलोकीं पतन पावशील' असा शाप महर्षींनीं यास दिला. यानें अनेक यज्ञ केले होतेसें दिसतें.

२. एक चेदिराज वसु. इंद्रकृपेनें हा अंतरिक्षांतून विमानांतून संचार करीत असल्यानें याला उपरिचर असें नांव पडलें. शुक्तिमती नदीची गिरिका नांवाची कन्या याची स्त्री झाली. याच्यापासून अद्रिका नांवाच्या मत्स्यरूपी अप्सरेला मत्स्यराज व मत्स्यगंधा असे कन्यापुत्रांचें एक जुळें झालें. हीच मत्स्यगंधा पुढें सत्यवती नांवानें शंतनु राजाची पत्नी झाली.

**उपसाला**—स्वीडन. हें शहर स्वीडनच्या आर्चबिशपचें राहण्याचें व विश्वविद्यालयाचें ठिकाण आहे. येथील लोकसंख्या (१९४५) ४४,६८६ आहे. येथील विश्वविद्यालय स्वीडनमध्यें सर्वांत जुनें व मुख्य असून त्याची स्थापना १४७७ त झाली.

१७३० त स्थापन झालेली एक वेधशाळा आहे. व्हिक्टोरिया पदार्थसंग्रहालयांत ईजिप्तच्या प्राचीन वस्तूंचा संग्रह आहे. रॉयल सोसायटी ऑफ सायन्सेसची स्वतंत्र इमारत असून तींतील ग्रंथसंग्रहालय बहुमोल आहे. शहराच्या उत्तरेस दोन मैलांवर जुनें उपसाला शहर आहे. त्याचा उल्लेख नवव्या शतकापासून आहे. सर्व स्कॅन्डिनेव्हियांत हें शहर येथील सुंदर देवालयांमुळें प्रसिद्ध होतें व देशाचें केंद्र बनलें होतें.

१७०२ च्या आगींत येथील शहर, मंदिर व किल्ला यांची राखरांगोळी झाली. येथील विश्वविद्यालयाच्या प्राध्यापकांत ज्यांचीं नांवें दूर देशांत देखील अजरामर झालीं आहेत असे

विद्वान् म्हणजे थोरले ओलोफ उडबेक (१६३०-१७०२)-अॅटलांटिका ग्रंथाचे लेखक, टारेबर्न बर्गमन (१७३७-१७८४) सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ, व एरिक गुस्टाफ गेजेर (१७८३-१८४७) इतिहासकार, हे होत.

**उपस्फुराम्ल**—(हायपोफॉस्फरस ॲसिड). भार-उपस्फुरित (बेरियम हायपोफॉस्फाइट) यावर गंधकाम्लाची क्रिया करून हें अम्ल तयार करतां येतें. काळजीपूर्वक तापवून विद्रावाचें पाणी काढून टाकलें तर स्फटिकमय स्वरूपांत हें अम्ल तयार होतें. खुद्द भारउपस्फुरित, भारउज्जप्राणिद (बेरियम हायड्रोक्साइड), आणि स्फुर (फॉस्फरस) पाण्यांत उकळून तयार करतात. उपस्फुराम्ल हें 'लघुकारक' आहे. सोनें आणि रुपें यांना त्यांच्या लवणांच्या विद्रावांतून हें स्वतंत्र बाहेर काढतें.

**उपस्फुरायितें**—(हायपोफॉस्फाइट्स). उपस्फुराम्लाचीं (हायपोफास्फरस अम्लाचीं) लवणें. हीं पाण्यांत विरघळतात. हवेच्या सान्निध्यांत त्यापासून स्फुरायित (फॉस्फाइट) आणि स्फुरेत (फॉस्फेट) तयार होतात. सिंधु (सोडियम) आणि खटउपस्फुरायितें (कॅल्शियम हायपोफॉस्फेट) यांचा औषधांत उपयोग होतो.

**उपहरितें**—(हायपोक्लोराइट्स). उपहरस (हायपोक्लोरस) अम्लांचीं अस्थिर लवणें. ह्यांचा प्राणिदीकरणा(ऑक्सडायझिंग) साठीं आणि रंग घालविण्यासाठीं उपयोग होतो. उदा., ब्लीचिंग पावडर.

**उपहासात्मक लेखन**—(विडंबन वाङ्मय). याला 'सटायर' असें इंग्रजी नांव आहे. एखाद्या व्यक्तीमधील किंवा समाजामधील दुर्गुण किंवा मूर्खपणाच्या गोष्टी गद्य किंवा पद्य लेखनाच्याद्वारें हास्यास्पद करून टाकण्याचा प्रकार फार प्राचीन आहे. ज्याला सटायर म्हणतात तें विडंबनात्मक साहित्य रोमन लोकांमध्यें सुरू झालें असलें तरी हास्यरसप्रधान नाटकें लिहिणाऱ्या आर्किलोचस, हिपोनॅक्ससारख्या अनेक ग्रीक साहित्यिकांनीं या प्रकाराचा अवलंब केलेला दिसेल. होरेसचें 'सटायर्स' पुढील विडंबन वाङ्मयाचा पायाच म्हणतां येईल. या वाङ्मयांत देखील व्यावहारिक, तात्त्विक, अलंकारिक, वगैरे पोटभेद पाडतात. ज्युव्हेनलचें (सु. ६०-१४०) विडंबनशस्त्र फार प्रभावी आहे. मध्ययुगांतील 'रेनार्ड दि फॉक्स' या महत्त्वाच्या उपहासिनीला विसरून चालणार नाहीं. फ्रेंच विडंबक राबेले (सु. १४९०—१५५३) व स्पॅनिश लेखक सर्व्हान्टेस (१५४७—१६१६) या दोघांची योग्यता सामान्य उपहासकांपेक्षां फार वेगळी होती. 'डॉन क्विक्झोट' अद्यापि सर्वत्र आवडीनें वाचण्यांत येतें.

१८ व्या शतकाचा प्रारंभ हा विडंबनसाहित्याचा सुवर्णकाल म्हणतां येईल. त्यापूर्वी बार्क्ले, अॅन्ड्रू मर्व्हिल, सॅम्युएल बटलर, ड्रायडनसारखे लेखक होऊन गेले. तथापि पोप, अॅडिसन, स्विफ्टसारख्यांची सर त्यांना नाहीं. स्विफ्टचें 'गलिव्हर्स ट्रॅव्हेल्स' यांत सबंध मानवी प्राण्यावर जें विडंबनपर लेखन केलेलें आहे, तसलें कधीं झालें नसेल. बर्न्स आणि बायरन या कविवर्यांनीं या साहित्यक्षेत्रांतहि मोठी कामगिरी केलेली दिसेल. दुसऱ्या सॅम्युएल बटलरनें स्विफ्टचा कित्ता चांगला गिरवून समाजाचे ढोबळ दोष मोठ्या कुशलतेनें पटवून दिले आहेत.

मराठींत विडंबनलेखनाचे आचार्य म्हणतां येईल असे श्री. अत्रे यांचीं 'झेंडूचीं फुलें' व इतर स्फुट काव्यें प्रसिद्धच आहेत. हा विडंबन प्रकार मराठी नियतकालिकांतून जो एकदां सुरू झाला तो थांबतच नाहीं असें खेदानें म्हणावें लागतें. दीक्षित, बकुलराय, बाबुलनाथ, शामराव ओक, वि. मा. दी. पटवर्धन हे अभ्यांच्या खालोखाल अशा लेखनांत यशस्वी झाले आहेत. प्रा. मा. त्र्यं. पटवर्धन यांनीं 'नकुलालंकार' व 'सुधारक' या काव्यांत जरा भारदस्तपणा ठेवला आहे. 'उपहासिनी' या काव्यसंग्रहांत विडंबनाचे अनेक प्रकार दिसतील.

**उपाध्याय**—ज्या मनुष्याकडे एखाद्या समाजांतील लोकांचे धार्मिक संस्कार करण्याचें, व धर्मतत्त्वांचा उपदेश करण्याचें काम असतें त्यास उपाध्याय म्हणतात. पूर्वीं प्रत्येक कुटुंबांतील जो मुख्य पुरुष असेल तोच त्या कुटुंबाचा मुख्य सत्ताधारी व उपाध्याय असे. बहुतेक सर्व धार्मिक ग्रंथांतून आणि समाजांतून हीच पद्धति व परंपरा आढळते. भारतीय आर्यांमध्यें कुलपति हाच कुलाचा उपाध्याय असे. तसेंच यहुदी लोकांत आब्राहम, आयझॅक, वगैरे कुलपती उपाध्यायांचींच कामें करीत असत. अरब लोकांतील शेख हा आजहि त्या समाजांतील पुढारी व धार्मिक बाबतींतहि प्रमुख असतो. ख्रिस्ती धर्मांतहि अनेक प्रॉटेस्टंट लोकांचें असें मत आहे कीं, विशिष्ट संस्कार करून पुरोहिताची दीक्षा देणें हें ख्रिस्ती धर्माच्या विरुद्ध आहे म्हणून कांहीं ख्रिस्ती धर्मपंथांत उपाध्याय (प्रीस्ट) हा शब्द वापरण्यांत येत नाहीं. परंतु रोमन कॅथॉलिक व ग्रीक संप्रदाय यांत उपाध्यायांचा अधिकार व संस्कार मानण्याची प्रथा आहे. अलीकडे नवीन विचारांच्या प्रसारामुळें उपाध्यायांचे विशिष्ट अधिकार व हक्क हे मानण्यांत येईनासे झाले आहेत. व सर्वांस धार्मिक व संस्कारांचें स्वातंत्र्य देण्याकडे अधिकाधिक प्रवृत्ति होत आहे.

**उप्पर**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक जात. यांची लोकसंख्या सुमारें एक लक्ष आहे. यांच्यापैकीं बरेचसे म्हैसूर संस्थानांत राहतात. त्रावणकोरमध्येंहि यांची थोडीशी वस्ती आहे. यांचा मूळचा धंदा मीठ काढण्याचा होता. पण आजकाल

शेंकडा दोन माणसें देखील हा धंदा करीत नाहींत. त्यांचा हल्लींचा धंदा म्हटला म्हणजे शेतकी व मजुरी होय. तामिळ प्रदेशांत राहणाऱ्या या लोकांस उप्पलिगर म्हणतात. हे लोक वैष्णव असून चन्नकेशव ही त्यांची कुलदेवता आहे. तिरुपति, कादरी, नंजनगुंडी, वगैरे ठिकाणीं ते यात्रेस जातात. येलम्मा, दुर्गम्मा, वगैरे देवतांचेंहि ते पूजन करतात. ब्रिटिश सरहद्दी-पासून पांच मैलपर्यंत मीठ काढण्याची बंदी असल्यामुळे व समुद्रापासून काढलेलें मीठ स्वस्त असल्यामुळें मीठ काढण्याचा यांचा धंदा जवळजवळ नामशेष झाला आहे.

**उफा**—रशिया, उफा सरकारची राजधानी. उफा नांवाची नदीहि असून ती उरल पर्वतांतून निघून उफा शहराजवळ बेलाया नदीला मिळते. या शहरांत अनेक कारखाने आहेत. लो. सं. २,४५,८६३. उफा प्रदेशांत सोनें, रुपें, लोखंड व तांबें खाणींतून काढतात. जमीन फार सुपीक असून जनावरांची जोपासना फार चांगल्या रीतीनें होते.

**उबंगी**—ही आफ्रिकेंत कांगो नदीला मिळणारी एक नदी आहे. ती यूएले आणि म्बोमु या दोन नद्यांचा संगम होऊन बनली आहे. यूएले नदीसुद्धां तिची लांबी १४७० मैल आहे. बेल्जियन कांगो आणि फ्रेंच इक्वेटोरियल आफ्रिका यांच्या सर-हद्दीवर ही नदी आहे.

बेल्जियन कांगोमध्यें उबंगी नांवाचा प्रांत आहे, आणि लिबेंज आणि बँझिव्हिल हीं मुख्य शहरें आहेत.

**उंबर**—हें अत्यंत उपयुक्त असें झाड आहे. याचीं पिकलेलीं फळें गोड लागतात. अंजिराच्या फळांत व यांत बरेंचसें साम्य आहे. उंबरावर राहणारीं कित्येक गरीब माणसें आपल्या देशांत आहेत. उंबराचीं पानें हत्तीला फार आवडतात. पौष्टिक चारा म्हणून तीं गुरांढोरांनाहि देतात. उंबराचें लांकूड घट्ट व टिकाऊ नसतें; यामुळें अस्सल कामाकरितां या लांकडाचा कोणी उपयोग करीत नाहींत. पण खटारगाडीची आडवी दांडी, दारें, वगैरे किरकोळ कामाला हें लांकूड चिवट असल्यामुळें वापरतात. उंबर हा वृक्ष अत्यंत पवित्र मानला असल्यानें त्याचें लांकूड यज्ञा-खेरीज लोक जाळीत नाहींत. उंबराचें झाड हें अत्यंत औषधीहि आहे. त्याची साल, पानें व फळें हीं सर्व औषधी गुणधर्मांनीं युक्त आहेत. साल वीर्यस्तंभक आहे. पानें पित्तविकारावर गुणकारी आहेत व फळें मधुमेहावर देतात; गालगुंडावर उंबराचा चीक घालतात. तोंडास फोड आल्यास उंबराच्या पानावर येणारे फोड जिऱ्याबरोबर वाटून तें खडीसाखरेबरोबर तोंडांत धरावयास देतात. त्यानें तोंडांतील फोड बरे होतात. उंबराचा अवलेह घेतल्यानें अंगांतील कडकी नाहींशी होते. गोंवर, देवी, वगैरेमुळें अंगांत उष्णता वाढली असल्यास उंबरा-च्या मुळ्यांचें पाणी दिलें असतां फार चांगला उपयोग होतो.

**उबवणें**—पक्षी पिलें होण्यापूर्वी आपल्या अंड्यांवर कांहीं दिवस बसून तीं उबवितात त्या क्रियेस अंडीं उबविणें असें म्हणतात. हें काम साधारणतः मादी करते. हा अंडीं उबविण्याचा काल निरनिराळ्या पक्ष्यांच्या बाबतींत भिन्न भिन्न असतो. परंतु एकाच जातीच्या पक्ष्यांमध्यें तो सारखाच असतो. अलीकडे अंडीं उबविण्याची क्रिया कृत्रिम यंत्राच्या साहाय्यानें करण्यांत येते. कृत्रिम रीतीनें अंडीं उबविण्याची क्रिया ईजिप्त आणि चीन देशांतील लोकांस फार प्राचीन कालापासून माहीत होती. अलीकडे उष्ण हवेच्या साहाय्यानें ही क्रिया करण्यांत येते.

**उंब्रज**—मुंबई, सातारा जिल्हा. हें खेडेगांव पुणें-बेळगांव रस्त्यावर असून कऱ्हाडच्या वायव्येस १० मैल व साताऱ्याच्या आग्नेयेस चार मैल अंतरावर आहे. येथील लो. सं. सुमारें ३,००० आहे. याच्याजवळ कृष्णा, तारळी व मांड या नद्यांचा संगम होतो. मांड नदी जेथें मिळते तेथून पाटणांतल्या मल्हार पेठेंतून चिपळुणाकडे जाण्यास रस्ता आहे. येथें या जिल्ह्यांतील एक अतिशय जुनी व मोठी सावकारपेढी आहे. येथील बाजार-रस्ता मोठा व प्रशस्त आहे.

**उमर** (पहिला) (५८१–६६४)—महंमद पैगंबर यांच्या-नंतरचा मुसलमान लोकांचा हा २ रा खलिफ होय. अबूबकर याच्यानंतर तो ६३४ मध्यें गादीवर आला. त्यानें आपलें साम्राज्य ईजिप्त, सीरिआ व पॅलेस्टाइन या देशांवर स्थापलें आणि त्याच्या सेनापतींनीं इराणवरहि स्वारी करून तेथील राजधानी व राज्य जिंकलें.

**उमरकोट**—सिंध, थर आणि पारकर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ १,८६१ चौ. मै.. तालुक्यांत खेड्यांची संख्या ११० असून मुख्य शहर उमरकोट हेंच होय.

नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर कोर नांवाचें स्टेशन आहे. तेथून उमर-कोट ७ मैल आहे. एक मोठा किल्ला असून सुमारें ७०० वर्षांपूर्वी तो बांधलेला असावा. स्थानिक व्यापार धान्यें, तूप, उंट, गुरें आणि तंबाखू यांचा चालतो. उमर नांवाच्या एका पठाणानें हें शहर वसविलें म्हणून यास उमरकोट हें नांव पडलें असें सांगतात. सन १५४२ त अकबर येथें जन्मला. अकबर बादशहा झाल्यावर त्यानें रजपुतांकडून उमरकोट घेतलें. नंतर १८४३ सालीं तें इंग्रजांकडे आलें. उमरकोटहून ३ मैलांवर एक महादेवाचें देऊळ असून दर्शनार्थ पुष्कळ हिंदू लोक येतात.

**उमर खय्याम** (मृ. ११२३)—एक फारसी गणिती, ज्योतिषी व कवि. हा निशापूरचा रहिवासी होता. खय्याम किंवा खय्यामी हें आडनांव आहे. उमर बहुधा इ. स. १०२५–

१०५० यांमधील कालांत जन्मला असावा. वाङ्मय, सृष्टिशास्त्र, धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान आणि वैद्यक या विषयांचें शिक्षण उमरला मिळालें होतें. भूमिति व बीजगणित यांवरचे त्याचे ग्रंथ उपलब्ध आहेत. तो ज्योतिषाचा धंदा करी. जलाली शक सुरू करण्यांत त्याचें प्रमुख अंग होतें. सुलतान मलिकशहा वारल्यानंतर (इ. स. १०९२) उमरनें निशापूर सोडलें.

उमरची जी प्रसिद्धि आहे ती त्याच्या काव्यरचनेमुळें. 'रुबाई-य्यात' नांवाचें त्यानें फारसी काव्य लिहिलें. आज ज्या रुबाया त्याच्या म्हणून मानल्या जातात त्यांपैकीं बऱ्याचशा दुसऱ्या कोणाच्या तरी असून त्या त्याच्या नांवावर दडपून दिलेल्या आहेत. तेव्हां उमरच्या म्हणून गणल्या जाणाऱ्या रुबायांवरून त्याचा खरा स्वभाव कळणार नाहीं. १३ व्या शतकांतील फारसी ग्रंथकार आपण आधारास घेतल्यास कांहीं थोडासा प्रकाश पडणार आहे. इब्नुल किफ्ती म्हणतो कीं, उमरनें आपला धर्मलंडपणा लपविण्याचा प्रयत्न केला, व आपलें खरें मत पुढें मांडण्यास तो कचरला. त्याच्या काव्यासंबंधीं इब्नुल किफ्तीचा शेरा असा पडतो कीं, उमरचें काव्य बहुतेकांच्या आवडीचें झालें आहे तरी त्याचें अंतरंगपरीक्षण करणाऱ्यांस तें अधार्मिक स्वरूपाचें आढळून येईल. उमरच्या म्हणून ज्या रुबाया निश्चित झाल्या आहेत त्यांत सुखप्रयोजनता विवेचिली आहे, अपवित्र चर्चेचा निषेध केला आहे, जुन्या लोकांवर हल्ले चढविले आहेत व दैव-दुर्विलासाबद्दल शोक दाखविला आहे. मनुष्यप्राण्याचें क्षुद्रत्व, दैवी कृपेची आशा, व जीमध्यें दुसऱ्याचें चांगलें करण्याचें कर्तव्य येतें अशी एक नीति यांसारख्या विषयांवर त्याचे विचार ग्रथित केलेले आहेत. समाजांतील दुःखीकष्टी लोकांकरितां तळ-मळ व अज्ञानी आणि ढोंगी भिक्षुकांबद्दल अनादर या गोष्टी-मुळेंच उमर खय्यामला इराणचा किंवा प्राच्य खंडाचा 'व्हॉल्टेअर' म्हणतात; पण उमरचा रंगेलपणा या फ्रेंच तत्त्वज्ञान्यांत नव्हता. तात्त्विक विचारांत व काव्यकल्पनेंत सध्यां जो निराशावाद दिसतो तो उमरच्या रुबायांमध्येंहि आढळतो. १८५९ त फिट्झ-जेराल्डनें त्याच्या काव्याचें सुंदर भाषांतर करीपर्यंत हा कवि जगांत बराचसा अज्ञातच होता. मराठींत माधव जूलियन कवीनें उमरच्या काव्याचें सुंदर रूपांतर केलेलें आहे.

**उमरखान** (१८६०–१९०३)—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील जांडोलचा हा पठाण संस्थानिक १८९५ मधील चित्रळवरच्या मोहिमेस कारणीभूत झाला होता. जांडोलच्या खानाचा हा धाकटा मुलगा. पण यानें आपल्या थोरल्या भावाला मारून राज्य बळकाविलें व सरहद्दीवर प्रबल होऊन राहिला. १८९४ मध्यें सबंध बाजौरवर त्याची सत्ता होती. तो महत्त्वा-कांक्षी असल्यानें चित्रळच्या अंतस्थ कलहांत पडला, तेव्हां हिंदुस्थान सरकारला मध्यें पडून उमरखानला चित्रळहून हांकून देणें भाग पडलें. चित्रळची मोहीम या कारणाकरितांच निघाली होती. उमरखान अफगाणिस्तानांत जाऊन राहिला व त्या ठिकाणीं १९०३ मध्यें वारला.

**उमरखेड**—मध्यप्रांत, जिल्हा यवतमाळ, तालुका पुसद. पुसदगांवाहून रस्त्यानें ४३ मैलांवर हा गांव पैनगंगेच्या कांठीं आहे. हें पूर्वी परगण्याचें ठिकाण असून साधारण महत्त्वाचें होतें. सन १७५० च्या सुमारास हें ठिकाण पेशव्यांकडे आलें. १८१७ सालीं पुण्यास पराजय पावल्यानंतर पूर्वेकडे जात असतांना पेशव्यांनीं या ठिकाणीं मुक्काम केला होता.

येथें गोचरस्वामींचा मठ असून इतर साधुसंतांना पुष्कळ इनाम जमिनी दिलेल्या आहेत. जवळच असलेल्या अंबोना तलावाचा एका काळीं बागाइतीकरतां उपयोग करीत असत.

**उमराव**—फारशी अमीर शब्दाचें अनेकवचन. सरदार-वर्ग या अर्थी उमरा शब्द आहे. उमराव अर्थाच्या इंग्रजी 'पिअर' या शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ समान दर्जाचा व वर्गांतला इसम असा आहे. या अर्थाप्रमाणें इंग्लंडांतील कॉमन लॉ या कायद्याचा असा नियम आहे कीं, प्रत्येक इसमाची चौकशी त्याच्या समान दर्जाच्या इसमाकडून झाली पाहिजे. याशिवाय पिअर या शब्दाला ब्रिटनमध्यें विशेष अर्थ असून तो उच्च वर्गाची (नोबिलिटी) व्यापक पदवी आहे, व त्या पदवीमध्यें पुढील पांच पदव्यांचा अंतर्भाव होतो. त्या पदव्या ड्यूक, मॉर्क्विस, अर्ल, व्हायकाउंट, व बॅरन ह्या होत. ही पदवी वंशपरंपरेनें वारस पुत्रांना व त्यांच्या पुरुष संततीला सामान्यतः मिळते. पण कांहीं विशेष अपवाद म्हणून ही पदवी मुलींना किंवा भावाला मिळूं शकते. स्त्रियांनाहि पिअरेस ही पदवी देण्यांत येते. परंतु अशा स्त्रियांचा लॉर्ड सभेच्या सभासदत्वाचा हक्क मान्य करण्यांत आलेला नाहीं.

**उमरावती**—मध्यप्रांत, वऱ्हाडमधील एक जिल्हा. क्षे. फ. ४७१५ चौ. मै.. लो. सं. ९,८८,५२४ (१९४१). पूर्णा नदी जिल्ह्यांतून वाहते. उमरावती, मोरशी, चांदूर, एलिचपूर, दर्यापूर व मेलघाट हे तालुके आहेत. जिल्ह्याचीं मुख्य पिकें ज्वारी आणि कापूस हीं होत. मुख्य ठिकाण उमरावती; हें समुद्रसपाटी-हून १११८ फूट उंच आहे. लो. सं. ६१,९७१. वऱ्हाडमध्यें उमरावती हें प्रमुख शहर आहे. वऱ्हाडचें सर्व राजकारण येथें चाले व चालतें. कापसाची मोठी पेठ असून सावकारी पेढ्या येथें प्रसिद्ध आहेत. शहरांत पुष्कळ देवळें व मशिदी आहेत. अंबेचें देऊळ फार जुनें आहे. येथून कृष्णानें रुक्मिणीचें हरण केल्याची कथा सागतात. राजा बिसनचंदाची हवेली व पेंढाऱ्यांपासून रक्षण व्हावें म्हणून बांधलेली (१८०४) मोठी भिंत पाहण्यासारखी आहे. १८६९ सालीं म्युनिसिपालिटी

आली. येथें लहानमोठ्या शाळा व एक कॉलेज आहे व कांहीं कारखानेहि आहेत.

**उमरी**—जुन्या मध्य हिंदुस्थान एजन्सींतील एक लहानसें संस्थान. हें ग्वाल्हेर रेसिडेंटच्या देखरेखीखालीं असे. याचें क्षेत्रफळ ६० चौ. मै. आहे. संस्थानिक सिसोदिया रजपूत असून साग्रावत शाखेपैकीं आहेत. उदेपूर शहराचा संस्थापक राजा उदेसिंग याचा धाकटा मुलगा सागरजी नांवाचा होता. हा उमरीच्या संस्थानिकांचा मूळपुरुष आहे. सागरजीपासून पांचवा पुरुष प्रतापसिंह यानें १६१६ त नहरगडच्या राठोड रजपूत नवाबाची मदत घेऊन उमरी घेतली. मराठ्यांच्या अमदानींत उमरी व भदौरचा भाग बराच कमी झाला.

संस्थानची जमीन सुपीक असून लोक संपन्न आहेत. उत्पन्न सुमारें दहा हजार रुपये आहे. १९१७ पर्यंत सारा फुलशाईत वसूल करीत.

**उमरेठ**—मुंबई, खेडा जिल्हा, आनंद तालुक्यांतील एक शहर. उमरेठ मोठ्या भरवस्तीचें व संपन्न असें शहर आहे. शहराच्या जवळच एक विहीर असून सुमारें ५०० वर्षांपूर्वी ती बांधलेली असावी. तिला पांच मजले असून १०९ पायऱ्या आहेत व अनहिलवाड्याच्या सिद्धराज नांवाच्या राजानें ती बांधली आहे. शहरांत कापसाच्या गिरण्या आहेत.

**उमरेड**—मध्यप्रांत, एक तहशील. या तहशिलीनें नागपूर जिल्ह्याचा मध्य आणि ईशान्येकडील प्रदेश व्यापला आहे. क्षेत्रफळ १०४० चौ. मैल, यांपैकीं ७३ चौ. मैल सरकारी संरक्षित जंगल आहे. लोकसंख्या सुमारें दोन लक्ष आहे. या तहशिलींत उमरेड एवढा एकच मोठा गांव आहे. उमरेड नागपूरच्या वायव्येस २९ मैलांवर आहे. येथें एक मराठ्यांचा एक मोडकळीस आलेला किल्ला असून आंत एक देऊळ आहे. लोकसंख्या सुमारें पंचवीस हजार आहे. रेशीमकांठी कापड हातमागावर विणण्याच्या धंद्याला येथें तेजी आहे.

येथें पुष्कळ तलाव असून त्याच्या पाण्यावर विड्याचीं पानें व इतर बागाइती पिकें होतात. हा गांव नागपूरच्या मेहदीबाग जातीच्या मलक घराण्याच्या मालकीचा आहे. परंतु देशमुखी जमिनी निराळ्या असून खाण्याचीं पानें पिकविण्याच्या बागाबरिया जातीच्या लोकांच्या आहेत.

**उमाजी नाईक** (१७९१-१८३२)— एक रामोशी स्वातंत्र्यवीर. दक्षिणेंत इंग्रजांचा अमल सुरू झाल्या वेळीं कोळ्या-रामोश्यांनीं बरीच बंडाळी माजवून सरकारला त्रास दिला. उमाजी नाईक, भगोजी नाईक, वगैरे बंडवाल्यांच्या पुढाऱ्यांना पकडण्याकरितां सरकारनें मोठमोठीं बक्षिसें लावली होतीं. उमाजी व त्याचे रामोशी पुरंदरामोंवतीं धुमाकूळ घालीत होते. पुढें १८२७ त उमाजीनें घोडे, तंबू व ३०० रामोशी यांसह सह्याद्रि ओलांडून पनवेलच्या पूर्वेस १६ मैलांवर प्रचल डोंगराच्या पायथ्याशीं तळ दिला. तेथून त्यानें असा जाहीरनामा काढिला कीं, कोणींहि इंग्रज सरकारला सारा वगैरे न देतां तो पैसा आपणांस द्यावा. असें न केल्यास लुटालूट, जाळपोळ केली जाईल; याची खूण म्हणून गवत, लांकूड व कोळसे लोकांत वांटले. याच वेळीं उमाजीच्या सशस्त्र लोकांनीं मुरबाडचा खजिना लुटून बारातेरा हजार रुपये लांबविले. तेव्हां इंग्रज सरकारनें कॅप्टन मॅकिन्टॉशला या कोळ्या-रामोश्यांचा अजीवात नायनाट करण्याच्या कामावर नेमिलें. त्यानें पुढाऱ्यांप्रमाणें यांचा सर्वत्र पाठलाग करून पकडिलें व फांशीं दिलें. उमाजी गोरगरिबांना न छळतां उलट त्यांना फार मदत करी. कंजूप, बेपर्वा व जुलमी अशा माणसांना तो योग्य शिक्षा लावी, अशी त्याची ख्याति आहे. म्हणून त्याचें नांव लोकांच्या तोंडीं अद्याप आहे. याला पकडणाऱ्या कॅ. मॅकिन्टॉशनेंच याचें चरित्र लिहिलें आहे. उमाजीवर अनेक पोवाडे रचले गेले आहेत.

**उमाबाई दाभाडे** (मृ. १७५३)—सेनापति खंडेराव दाभाडे याची पत्नी. ही कर्तृत्ववान्, दक्ष व पराक्रमी होती. हिचा मुलगा यशवंतराव हा व्यसनी व दुर्बल होता. त्यानें राष्ट्रसेवा कांहीं तरी करावी म्हणून तिनें पराकाष्ठा केली, परंतु उपयोग झाला नाहीं. कित्येक प्रसंगीं स्वतः तरवार घेऊन तिनें लढाया मारल्या आहेत. गायकवाडास आपले दुय्यम नेमून तिनें जातीनें गुजरातचा कारभार कांहीं काळ केला. उमाबाईच्या लढाईत त्रिंबकराव मेला असतां बाजीराव पेशवे यांनीं स्वतः जाऊन बाईची समजूत घातली. शाहूची मर्जी संभाळून पेशव्यांशीं ती बाणेदारपणानें वागे. इ. स. १७५० मध्यें पेशव्यांनीं छत्रपतीच्या आज्ञेवरून तिच्याकडून गुजरात काढून घेतली, त्या वेळीं ती रागावली. पण त्या वेळीं तिचा शाहूचा आधारहि गेला होता. तेव्हां तिनें ताराबाईच्या भेटी घेऊन पेशव्यांविरुद्ध एक कारस्थान उभें केलें. तिनें दमाजी गायकवाडास पेशव्यांवर पाठविलें. परंतु १७५१ च्या एप्रिलांत त्याचा पेशव्यांनीं पुरा मोड केला. तेव्हां बाईनें निरुपायानें गुजरात पेशव्यांस दिली. कांहीं काळ उमाबाई पेशव्यांच्या कैदेंत होती, पण दाभाडे मंडळी कैदेंतून पळाले; तेव्हां अखेर उभयतांत तह झाला. गायकवाड पूर्ववत् दाभाड्यांची चाकरी करतील, दाभाड्यांनीं राज्यांत बखेडा करूं नये, रामराजाला अनुकूल होऊं नये व पेशव्यांच्या विचारें चालावें व दाभाड्यांस खर्चास दरमहा ५० हजार रु. मिळवित. या तहानंतर बाईचा जप केलेला सरंजाम पेशव्यांनीं सोडून दाभाड्यास परत दिला. यापुढें पेशवे व दाभाडे यांचें सूत चांगलें जमलें. चार मुद्दे म्हणाले होते. पुढें ती २८ नोव्हेंबर १७५३ रोजीं वारली. मराठेशाहीतील अनेक

पराक्रमी स्त्रियांत बाईची गणना केली पाहिजे. बाईनें जातीनें अहमदाबाद ( गुजरात ) सर केल्याबद्दल खुद्द शाहूमहाराजांनीं तिच्या पायांत सोन्याचे तोडे घातले होते.

**उमीचंद**—एक शीख सावकार. हा मोठा वजनदार सावकार असून कलकत्त्यास राहत असे. कलकत्त्याचा इंग्रज गव्हर्नर ड्रेक व याची दोस्ती होती. यानें अलिवर्दिखानास बंगालची सुभेदारी मिळवून दिली. सिराजउद्दौल्यास कलकत्त्यावर आणण्याचें व इंग्रजांविरुद्ध चिथवण्याचें काम यानें केलें. या सबबीवर यास इंग्रजांनीं कैद केलें. स. १७५७ त सिराजच्या दरबारीं हा इंग्रजांतर्फे वकील म्हणून राहिला. चंद्रनगर घेण्याच्या कामीं यानें इंग्रजांस अतिशय मदत केली. प्लासीच्या लढाईत उमीचंद हजर होता. पुढें बंगालच्या सुभेदारीवर मीर जाफरला बसवून सिराजउद्दौल्यास पदच्युत करण्याचा व्यूह क्लाइव्हनें चालविला. परंतु ही गोष्ट गुप्त ठेवणें फार आवश्यक होतें. तेव्हां ही गोष्ट गुप्त ठेवण्याबद्दल क्लाइव्हनें उमीचंदास तीस लाख रुपये लांच देण्याचें कबूल केलें. पण क्लाइव्हचा हेतु उमीचंदास पूर्णपणें फसविण्याचा होता. त्याकरितां त्यानें एक तांबडा व एक पांढरा असे दोन कागद केले; त्यांपैकीं पांढरा खरा व तांबडा खोटा होता. तो खोटा तांबडा कागद त्यानें उमीचंदास दिला. पुढें मीर जाफरची सुभेदारीवर स्थापना झाल्यावर त्यानें ठरल्याप्रमाणें सर्वांना बक्षिसें व लांच देण्यासाठीं दरबार भरविला. त्या प्रसंगीं उमीचंदानें आपला कागद दाखवून पैशाची मागणी केली. तेव्हां क्लाइव्हनें त्यास कळविलें कीं, 'तांबडा कागद खोटा आहे, तुम्हांस कांहीं एक मिळणार नाहीं.' हे शब्द ऐकतांच उमीचंद बेशुद्ध पडला. तेव्हांपासून हा भ्रमिष्ट झाला. पुढें उमीचंद वेडा होऊन मरण पावला.

**उमेटा**—रेवाकांठांतील जुन्या पांडुमेहवाच्या बारिया संघांतील हें पश्चिमेकडील संस्थान आहे. ही जहागीर कांहीं भागांत १५ व्या शतकापासून व कांहींत १७ व्याच्या अखेरपासून चालत आली आहे. महंमद बेगडा यानें जेव्हां चंपानेर काबीज केलें (१४८४), तेव्हां तेथील झांजरजी नांवाचा परिहार रजपूत माहीच्या जंगलांत जाऊन राहिला व तेथील भिल्लांच्या हातचें पाणी पिऊन बाटला. पुढें लवकरच जेव्हां त्यानें बिलपारच्या जयसिंगाला मारलें तेव्हां त्याला भेटशी राजाकडून आठ गांवें इनाम मिळालीं. नंतर २०० वर्षांनीं ( १६९४ ) उमेटांच्या राजानें कोळी लुटारूंना भिऊन झांजरजीचा वंशज जो दलपतसिंग याला चार गांवें देऊं करून मदतीस बोलाविलें. पेशवे आणि गायकवाड यांच्या वांटणीच्या वेळीं ( १७५१ ), पेशव्याकडे ५ गांवें व गायकवाडाकडे ७ गांवें आलीं. १८१२ आणि १८२० मध्यें उमेटाच्या ठाकोरला महीकांठा जहागीरदारांत घातलें होतें; व त्याला ब्रिटिश व गायकवाड या दोघांनाहि खंडणी द्यावी लागे.

**उमेदवारी**—एखादी कला, धंदा, शास्त्र किंवा व्यापार शिकण्यासाठीं कोणाजवळ किंवा कोणा कंपनींत शिकाऊ माणूस विशिष्ट काल राहतो. त्यासाठीं कांहीं अटी घालण्यांत येतात. उमेदवार अज्ञान असल्यास त्याच्या पालकानें अटी मान्य असल्याचें लिहून द्यावें लागतें. नोकरीसाठींहि कांहीं उमेदवारी करावी लागते. कांहीं राष्ट्रोपयोगी धंद्यांतूनहि सरकारी नियमांप्रमाणें उमेदवार घेऊन त्यांना शिक्षण देण्यांत येत असतें.

**उर**—हें प्राचीन बाबिलोनी शहरांपैकीं एक प्रसिद्ध शहर होतें. सांप्रत ह्या ठिकाणीं मुघैर अथवा मुकेयरचें टेंकाड आहे. हें बाबिलोनच्या आग्नेयीस १४० मैलांवर होतें. एननारचें प्रसिद्ध मंदिर येथें होतें, व या ठिकाणीं ननार ( नंतरची सिन ) या चंद्रदेवतेची पूजा होत असे. खाल्डियन लोकांच्या अमलाखालील उर हें अब्राहामचें मूळ गांव होतें असा बायबलांत उल्लेख आहे. सुमेरियन काळांत उर हें बाबिलोनियांत प्रमुख होतें. उरचें प्रामुख्य एलामाईट स्वारीपर्यंत होतें. खमूरबीनें बाबिलोनियन साम्राज्याची स्थापना केल्यामुळें ( इ. स. पूर्वी २७४० ) उरचें राजकीय स्वातंत्र्य व महत्त्व कमी झालें. पुढें बाबिलोनी काळाच्या शेवटपर्यंत उर हें धार्मिक व वाङ्मयात्मक बाबतींत प्रसिद्ध होतें. एननार देवालयाचे अवशेष वायव्य भागांत सांपडतात. याशिवाय बरेच शिलालेख व कांहीं इमारतींचे अवशेष सांपडले आहेत.

**उरण**—मुंबई, कुलाबा जिल्हा, पनवेल तालुक्यांतील एक गांव. उत्तरेस कारंजा नांवाचें बेट असून मुंबईच्या आग्नेयीस आठ मैलांवर आहे. दारूबद्दल उरणची प्रसिद्धि पूर्वीपासून आहे. परगांवाहून मोहाचीं फुलें येऊन येथें दारू तयार होत असे. मुंबई, कुलाबा, ठाणें या जिल्ह्यांना दारूचा पुरवठा होई. हें प्राचीन काळीं शिलेदारांचें एक ठिकाण होतें. येथील संगमेश्वर महादेवाचें देऊळ रामाजी महादेव नांवाच्या सरसुभेदारानें ( १७६०–१७७२ ) बांधिलें. हल्लीं उरणगांव ज्या ठिकाणीं वसलेलें दिसतें, त्या जागीं पूर्वी एक किल्ला होता. त्याचे कांहीं अवशेष अद्याप दिसतात.

**उरल**—१. नदी–ही रशियांतील नदी युरोप आणि आशिया या खंडांची सरहद्द म्हणून कांहीं ठिकाणीं बनली आहे. उरल पर्वतांतून निघाल्यानंतर एक हजार मैलांचा प्रवास करून ही कॅस्पियन समुद्रास मिळते.

२. पर्वत– ही रशियांतील पर्वतांची आणि पठारांची श्रेणी असून युरोप आणि आशिया या खंडांची उत्तर-दक्षिण सरहद्द बनली आहे व आर्क्टिक समुद्रापासून सुमारें १,९०० मैल खालपर्यंत पसरली आहे. अत्युच्च शिखर ५,५१३ फूट उंच आहे.

या पर्वतांत सोनें, लोखंड, तांबें, प्लॅटिनम, कोळसा व रत्नें सांपडतात. मिठाच्या खाणी व लांकडाचीं जंगलें यांविषयींहि यांची प्रसिद्धि आहे.

**उर्मिया**— १. हें इराणांतील शहर ४४०० फूट उंचीवर असून अत्यंत सुपीक प्रदेशांत ताब्रिझच्या नैर्ऋत्येस ७८ मैलांवर व उर्मिया सरोवराच्या पश्चिम किनाऱ्यापासून ११–१२ मैलांवर वसलें आहे. चहूंकडेजूम फळोद्यानें व बगीचे आहेत. येथें मोठा बाजार चालतो व कांहीं जुन्या मशिदी आहेत. लोकसंख्या सुमारें २०,००० आहे. महत्त्वाची इमारत म्हटली म्हणजे शहराच्या मध्यभागीं असलेली आर्क अथवा अंतर्दुर्ग ही होय.

२. इराणांत वायव्येस हें एक सरोवर आहे. अजमासें दक्षिणोत्तर ८० ते ९० मैल लांब व पूर्वपश्चिम ३० ते ४५ मैल रुंद आहे. पाण्याची खोली साधारणतः १५ ते १६ फूट असते. यांतून नावा चालतात. सरोवराच्या दक्षिणार्धांत जवळजवळ ५० बेटांचा एक समूह असून 'कोयन डग्वी' हें सर्वांत मोठें आहे. तेथें एक गोड्या पाण्याचा झरा असून फिरस्ते कळपवाले बहुधा वस्ती करून राहतात. बाकीच्या बेटांत वस्ती नाहीं. गोड्या पाण्याच्या बऱ्याच नद्या व ओढे मिळत असले तरी सरोवराचें पाणी खारें असतें.

**उर्वशी**—एक अप्सरा. ही नरनारायण ऋषींच्या ऊरूपासून जन्मलेली म्हणून हिचें नांव इंद्रानें उर्वशी असें ठेविलें. मित्रावरुणांच्या शापानें ही मृत्युलोकीं अवतरली. तेथें केशी दैत्य तिला घेऊन पळत असतां पुरूरव्यानें तिची सुटका केली. पुढें हिचें पुरूरव्याशीं लग्न झालें. पण इंद्रास हिचा विरह सहन न होऊन त्यानें तिला परत आणविलें. ऋग्वेद संहिता आणि शतपथ ब्राह्मण यांत पुरूरवा व उर्वशी यांचें कथानक आहे.

**उलघबेग मिर्झा** (१३९४–१४४९)–एक ज्योतिषशास्त्रज्ञ राजा. उलघबेग अमीर तैमूरचा नातू व मिर्झा शहारुख याचा मुलगा असून ज्योतिषशास्त्रांत चांगला पंडित म्हणून प्रसिद्ध असे. तो इ. स. १४४७ त समरकंदच्या गादीवर बसला. आपल्या आयुष्याचा प्रधान भाग यानें ज्ञानार्जनांत खर्च केल्यामुळें साहजिकच याच्या अंगीं युद्धकला नव्हती. आपल्या राज्यांतील सर्व ज्योतिर्विद् एकत्र जमवून 'झीज उलघबेग' नांवाचा ज्योतिषगणिताचा ग्रंथ यानें तयार केला. त्याच्याजवळ ताऱ्यांचे वेध घेण्याचीं मोठमोठीं यंत्रें होतीं असें म्हणतात. उलघबेगचा अंत फार वाईट प्रकारें झाला. इ. स. १४४९ मध्यें त्याचा मुलगा मिर्झा अबदुल लतीफ यानें त्याला कैद करून ठार मारिलें. उलघबेगचा स्थिर ताऱ्यांचा तक्ता हैडनें ऑक्सफोर्ड येथें १६६५ त प्रसिद्ध केला.

सु. वि. १–३९

**उलुपी**— ऐरावत नाग कुलांतील कन्या, व अर्जुनाची एक स्त्री. धर्म-द्रौपदीचा एकांतवास पाहिल्याचें प्रायश्चित्त म्हणून अर्जुन तीर्थें हिंडत असतां गंगाद्वारीं गेला, व तेथें गंगेंत उतरून स्नान करीत आहे तों उलुपीनें त्याच्या रूपास मोहित होऊन त्यास वरलें. त्यायासून तिला इरावान् हा मुलगा झाला. युधिष्ठिराच्या अश्वमेधांत अर्जुन बभ्रुवाहनाच्या हस्तें मरण पावला तेव्हां उलुपीनें त्याला सजीव केलें. अर्जुन बंधूंसहित महाप्रयाणास गेला, तेव्हां हिनें गंगेंत आपल्या देहाचा त्याग केला.

**उलेमा**—(अरबी शब्द उलमा म्हणजे ज्ञाते). हे इस्लामी पंडित, धर्मवेत्ते, शास्त्रकर्ते, आचार्य, न्यायशास्त्री, मुफ्ती, इत्यादि असून सर्व जण सामान्यपणें मुसलमानी शास्त्रांत तात्त्विक व व्यावहारिक रीतीनें प्रवीण असतात. येथें शास्त्राचा अर्थ, परंपरा, ग्रंथ किंवा लोक यांच्यापासून जें शिकलें जातें, तें ज्ञान उद्दिष्ट आहे. संकुचित अर्थानें हा शब्द सरकारी नोकरींत असलेल्या अशा पंडितांच्या मंडळाला योजितात. उलेमा अर्थाच्या विरुद्ध 'आरिफ' हा शब्द आहे; त्याचा अर्थ ज्यांना धार्मिक ज्ञान उलेमांप्रमाणें परंपरा किंवा बुद्धि यांच्या योगें न मिळतां गूढ दृष्टान्त होऊन मिळतें ते मुसलमान असा आहे.

**उल्का**—सूर्यमंडलाच्या कक्षेंत लाखों पदार्थ एकसारखे फिरत असतात व पृथ्वीच्या कक्षेंत त्यांपैकीं कांहीं आले म्हणजे पेट घेतात. जे पुरे जळून जात नाहींत ते दगड होऊन खालीं पडतात. असे दगड पदार्थ-संग्रहालयांतून ठेवलेले पाहण्यास मिळतील. कांहीं धातुमय दगड असतात. दर तासाला साधारणपणें १०।१५ उल्का पडतात. ऑगस्ट आणि नोव्हेंबर महिन्यांत उल्काकक्षा आणि भूकक्षा एकमेकांना छेदतात तेव्हां उल्कांचा वर्षाव विशेष होतो.

**उल्म**—जर्मनी, वुर्टेम्बर्गमधील एक शहर. डान्यूब नदीच्या डाव्या तीरीं एका सुपीक मैदानांत वसलेलें हें तटबंदीचें शहर आहे. लोकसंख्या ६०,०००. उल्मनें मध्ययुगीन साम्राज्यांतर्गत स्वतंत्र शहराचें आपलें स्वरूप अजून कायम ठेवलें असून ऐतिहासिकदृष्ट्या व कलाकौशल्याच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा त्या वेळच्या पुष्कळ इमारती येथें पाहावयास सांपडतात. प्रॉटेस्टंट लोकांचें जें मोठें चर्च आहे, त्याच्यांत ३० हजार लोकांचा समावेश होऊं शकतो. इतक्या उंचीचें सर्व जगांत याशिवाय दुसरें एकहि देऊळ नाहीं. यंत्रें, सुती व लोंकरी कापड, कातडीं, कागद व पितळी भांडीं येथें तयार होतात. १८०५ त आपल्या २३ हजार सैन्यासह जनरल माक हा या ठिकाणीं नेपोलियनला शरण गेला होता.

**उपवदात**—हा क्षत्रप राजा नहपान याचा जामात व सेनापतिहि असावा. हा नहपानच्या राज्यांत हिंडून वेळोवेळीं

दानधर्म करीत असे. याचे शिलालेख पाली व संस्कृत भाषेत आहेत. यानें राजपुतान्यांत बनास येथें नदीला तीर्थघाट बांधून सुवर्णदान केलें.

गोवर्धन येथील विणकरी लोकांच्या पेढींत पैसे (कार्षापण) ठेवून त्यांचें व्याज भिक्षूंच्या सुखसोयीसाठीं खर्च करण्याविषयीं त्यानें तरतूद केलेली दिसतें. शिवाय बाग तयार केले होते, पोहण्याकरितां तळीं बांधून, नद्यांतून बोटी सुरू केल्या होत्या.

**उषा**—१. पौराणिक कथांमध्यें उषा ही एक देवता आहे. ती फार आल्हादकारक, गुलाबी रंगाची आणि पिवळा पोपाक केलेली, अगदीं पहांटे उठून रथांत बसून आकाशांतून जाणारी, असें तिचें वर्णन आहे. ऋग्वेदामध्यें उषेचें वर्णन फार काव्यमय पद्धतीनें केलेलें आढळतें. या देवतेसंबंधीं बरींच सूक्तें आहेत. विशेषतः आर्यांची वस्ती जेव्हां उत्तर ध्रुवप्रदेशाजवळ होती तेव्हां दीर्घकालीन रात्रीनंतर उषेचा उदय होत असे व त्या वेळीं तिच्या दिसणाऱ्या अद्‌भुत व मनोहर प्रकाशावर तत्कालीन ऋषींनीं अनेक रूपकात्मक व कल्पनामय रम्य वर्णनें करून तिची स्तुति करणें साहजिक होतें. उत्तरारुणप्रकाश हा उषेचाच चमत्कार असावा. सूर्योदयापूर्वी हा प्रकाश दिसत असे. जसजसे आर्य लोक उत्तर ध्रुवापासून दूर दूर दक्षिणेकडे वसाहती करीत आले तसतसें उषेचें महत्त्व कमी होत गेलें व केवळ संधिप्रकाशास म्हणजे संध्येस मात्र महत्त्व राहिलें.

२. ही बलिपुत्र बाणासुर याची कन्या होती. एकदां उषेनें स्वप्नांत एक राजपुत्र पाहून त्याच्या विरहानें ती झुरणीस लागली. तेव्हां तिच्या चित्रलेखा नांवाच्या सखीनें पुष्कळ देव, दैत्य, मानव, ऋषी यांचीं चित्रें काढून तिला तिचा प्रियकर कोणता तें ओळखण्यास सांगितलें. कृष्णपौत्र अनिरुद्ध हाच आपल्या सखीचा स्वप्नगत प्रियकर असें चित्रलेखेनें जाणून त्याला मायाबलानें उषेच्या मंदिरांत आणिलें. बाणासुराला उषा-अनिरुद्ध समागमाची वार्ता कळतांच त्यानें अनिरुद्धाला बंदिवान् केलें. कृष्णाला ही बातमी कळतांच तो मोठ्या सैन्यानिशीं बाणावर चालून आला, व प्रत्यक्ष शिव आणि स्कंद यांची बाणासुरास मदत असतांहि त्याचा पराभव करून अनिरुद्धाला सोडविलें.

**उष्ट्रखाना**— मराठेशाहींतील अठरा कारखान्यांपैकीं एक. याला उष्ट्रशाला किंवा शुतरखाना असेंहि म्हणत. सातारच्या छत्रपतींच्या खाजगी खात्याकडील या कारखान्यासंबंधीं शके १७४१ मधील कांहीं नियम 'जावता उष्टरखाना' म्हणून दिले आहेत. (इतिहाससंग्रह पु. ६, अं. ७-९).

**उष्णकटिबंध**— भूमध्यरेषेपासून उत्तरेकडे कर्कवृत्तापर्यंत २३½ अंश व दक्षिणेकडे मकरवृत्तापर्यंत २३½ अंश असे दोन उष्णकटिबंध पृथ्वीच्या पृष्ठभागाचे पडतात. या कर्कमकरवृत्तांच्या पट्टयांत सूर्याचे किरण लंबरूप पडत असल्यामुळें उष्णता फार असते.

**उष्णता**—उष्णता ही शक्ति सर्व द्रव्यांमध्यें असते व ती त्या द्रव्यांतील अणु-परमाणु व विद्युत्कण यांच्या कंपनापासून उत्पन्न होते. उष्णतेपासून पदार्थावर घडणारे दृश्य परिणाम म्हणजे उष्णमान वाढणें, आकारमान बदलणें आणि स्थित्यंतर हे होत. एखाद्या पदार्थास उष्णता दिली असतां सामान्यतः त्याचें उष्णमान वाढतें. जेव्हां एखाद्या घन पदार्थास सतत उष्णता देण्यांत येते तेव्हां त्यांतील उष्णमान त्या घन पदार्थाचा द्रवबिंदु येईपर्यंत वाढत जातें व नंतर त्या पदार्थाचें घनरूपांतून द्रवरूपांत रूपांतर होतें. हा फरक होत असतांना बर्फ, वगैरेसारख्या स्फटिकमय पदार्थांत उष्णमान स्थिर असतें. पॅरॅफिनसारख्या इतर पदार्थांत उष्णमान पहिल्यापेक्षां थोडें हळू चढत जातें. असें अवस्थांतर अथवा रूपांतर होत असतांना जी उष्णता तो पदार्थ शोषून घेत असतो तीस अनुद्भूत उष्णता (लेटंट हीट) असें म्हणतात. जर त्या द्रव पदार्थास आणखी उष्णता देत राहिलें तर त्या पदार्थाचें उष्णमान उत्क्वथन बिंदूपर्यंत (बॉइलिंग पॉइंट) वाढत जातें. यानंतर उष्णमान स्थिर राहतें. व त्या सर्व द्रव पदार्थाची वाफ होईपर्यंत तो द्रव पदार्थ उकळत राहतो. या वेळीं द्रवरूपापासून बाष्परूपामध्यें जात असतांना सर्व अनुद्भूत उष्णता बाष्परूपांत शोषण करून घेतली जाते.

एका पदार्थापासून दुसऱ्या पदार्थास तीन पद्धतींनीं उष्णता प्राप्त होऊ शकते. त्या म्हणजे उष्णतावहन, उष्णताप्रापण आणि उष्णताविसर्जन या होत. उष्णतावहनामध्यें पदार्थांतील एका कणापासून दुसऱ्या कणास किंवा एका पदार्थापासून त्याशीं संलग्न असलेल्या दुसऱ्या पदार्थास उष्णता प्राप्त होते. निरनिराळ्या पदार्थांची उष्णतावहनशक्ति निरनिराळी असते. धातूमध्यें ही शक्ति सर्वांत मोठ्या प्रमाणांत असते आणि त्या सर्वांत ती रुप्यामध्यें अधिक असते. द्रवरूप पदार्थांची, पारा व द्रव स्थितींतील धातू वगळल्यास, उष्णतावहन शक्ति अल्प असते. व वायूमध्यें तर ती सर्वांत अल्प असते.

उष्णताप्रापण ही क्रिया उष्ण केलेल्या पदार्थामध्यें प्रत्यक्ष गति उत्पन्न होऊन घडून येते. द्रव पदार्थ व वायुरूप पदार्थ यांमध्यें याच पद्धतीनें उष्णतेचें स्थानांतर होत असतें.

उष्णताविसर्जन हें उष्ण स्थितींत असलेल्या पदार्थाकडून शीत स्थितींत असलेल्या पदार्थाकडे एखाद्या मध्यें असलेल्या माध्यमाच्या द्वारें जें उष्णतेचें स्थानांतर होतें त्यास म्हणतात. या वेळीं माध्यम हें स्वतः तापत नाहीं. ज्याप्रमाणें एखाद्या प्रकाशमान पदार्थाकडून दुसऱ्या पदार्थास प्रकाश मिळतो, त्याचप्रमाणें

आणि त्याच गतीनें हें उष्णताविसर्जन होत असतें. प्रकाशमान पदार्थाकडून जे प्रकाशकिरण बाहेर पडत असतात त्यांतील अंशतः कांहीं किरण दृश्य असतात व कांहीं अदृश्य असतात. जे किरण आपल्या डोळ्यांस दिसत नाहींत ते बहुधा उष्णतेचे किरण अतिरक्त व कांहीं अंशीं अतिनील किरण असतात. दृश्य किरण व अतिनील किरण यांपेक्षां उष्णतेच्या किरणांच्या लहरींची लांबी अधिक असते व ती १/८०००० इंचापासून १/३०० इंचापर्यंत असते. ज्या पृष्ठभागापासून उष्णताविसर्जन उत्तम रीतीनें होऊं शकतें तो पृष्ठभाग उत्कृष्ट उष्णताग्राहकहि असतो. व ज्या पदार्थापासून किरणांचें उत्तम परावर्तन होतें त्यापासून निष्कृष्ट किरणविसर्जन होतें. उत्तम किरणविसर्जक पृष्ठभाग म्हटला म्हणजे काळसर रंगाचा होय. यामुळें चकाकित चांदीच्या किटलीमध्यें काळ्या रंगाच्या किटलीपेक्षां अधिक वेळ चहा गरम राहतो.

१९ व्या शतकाच्या आरंभापर्यंत उष्णता हा एक पदार्थ आहे असें मानीत असत. लाव्हॉझिए आणि ब्लॅक हे या मताचे होते. रम्फर्ड आणि डेव्ही यांनीं हें मत खोडून काढून उष्णतेचा गतिसिद्धान्त स्थापन केला व ज्यूल यानें हा सिद्धान्त प्रत्यक्ष उष्णता उत्पन्न करण्यास लागणारी गतिशक्ति मोजून सिद्ध केला. एक पौंड पाण्याचें एक अंश फा. उष्णतामान वाढविण्यास ७७८ फुटपौंड यांत्रिक शक्ति लागते. यास उष्णतेचें गत्यात्मक सममूल्य अथवा ज्यूलचा मूल्यांक म्हणतात.

**उष्णतागतिशास्त्र**— ( थर्मो डायनॅमिक्स ). हें शास्त्र मूळ पदार्थविज्ञानशास्त्राची एक शाखा म्हणून अस्तित्वांत आहे व त्यामध्यें उष्णता आणि यांत्रिक शक्ति यांचे परस्परसंबंध आणि परस्परांचें एकमेकांत रूपांतर, इत्यादि गोष्टींचा अभ्यास करण्यांत येत असे. या शास्त्राचा मुख्य आधार म्हणजे दोन नियम होत. त्यास उष्णतागतिशास्त्राचे पहिला व दुसरा नियम असें म्हणतात. या दोन नियमांवरूनच केवळ दुसरे कोणतेहि प्रयोग न करतां या शास्त्रांतील अनुमानें काढतां येतात. ज्या अर्थी हे दोन नियम उष्णता आणि विद्युद्रसायन, वगैरे यांत्रिक शक्तींखेरीज इतर शक्तींच्या बाबतींत पूर्णपणें लागू पडतात, त्या अर्थी अर्वाचीन कालामध्यें या दोन नियमांवर अवलंबून असणाऱ्या सर्व पदार्थवैज्ञानिक आणि रासायनिक तत्त्वांचा विचार या शास्त्रामध्येंच करण्यांत येतो. यांतील पहिला नियम म्हणजे केवळ शक्तिसातत्य नियम हाच होय. दुसरा नियम मात्र वेगवेगळया तऱ्हेनें मांडण्यांत येतो. क्लासियस यानें या नियमाची मांडणी अशी केली आहे कीं, कोणत्याहि यंत्राकडून दुसऱ्या बाह्यप्रेरणेच्या साहाय्याखेरीज स्वतःपेक्षां अधिक उष्णमान असलेली उष्णता पुरवितां येणें शक्य नाहीं. या शास्त्राचा पाया प्रथम सादी कार्नो यानें घातला. यानें प्रथम हा दुसरा निषेधार्थी नियम स्पष्ट केला. कार्नो यानें प्रथम एका चक्राची कल्पना केली ती अशी कीं, या चक्रामध्यें मध्यंतरीं जे निरनिराळे विकार होतात ते कितीहि झाले तरी आरंभींची व अखेरीची स्थिति एकरूप असते. त्यानें एक अशा तऱ्हेचें निरनिराळ्या विकारांचें चक्र बनविलें कीं, यामध्यें निरनिराळे विकार घडून आल्यानंतर मूळ पदार्थाची अखेरची स्थिति अगदीं तंतोतंत पहिल्यासारखीच असावी. या चक्रास कार्नोचें चक्र असें म्हणतात. या चक्रांत पुढील क्रिया होतें : $T_1$ या उच्च उष्णमानावर असणाऱ्या एका पदार्थांतून $Q_1$ इतकी उष्णता घेतली जाते आणि $T_2$ या कमी उष्णमानाची $Q_2$ इतकी उष्णता बाहेर सोडली जाते व या क्रियेमध्यें कांहीं बाह्य कार्य केलें जातें. यामध्यें पहिल्या नियमाप्रमाणें $Q_1-Q_2$ ही उष्णता खर्च झाली असून तिचें *यांत्रिक मूल्य त्या पदार्थाकडून जें कार्य झालें असेल तें होईल.* हें चक्र उलटहि करतां येतें, म्हणजे सर्व क्रिया उलट रीतीनें करून दाखवितां येते. कार्नो यानें या शास्त्रांत पुढील सिद्धान्त प्रस्थापित करून फार मोठी भर घातली. तो सिद्धान्त असा— कोणत्याहि दोन उष्णमानांमध्यें ( उच्च व नीच ) काम करणाऱ्या यंत्रांकडून त्याच उष्णमानांत उलट प्रकारच्या कार्य करणाऱ्या यंत्रांपेक्षां अधिक कार्य होऊं शकत नाहीं. म्हणजे उलट-सुलट काम करणाऱ्या विशिष्ट मर्यादेमध्यें काम करण्याची शक्ति सारखीच असते. तसें नसतें तर एखाद्या यंत्राकडून त्याच्या उलट दिशेनें काम करणाऱ्या यंत्रास मागें टाकण्यांत आलें असतें. याचा अर्थ असा झाला असता कीं, बाहेरुन कोणतीहि शक्ति न मिळतां एका यंत्राकडून अधिक उष्णता बाहेर टाकली गेली असती व कमी उष्णमानांत ती दुसऱ्या यंत्राकडून शोषून घेतली गेली असती. यामुळें कार्नोच्या चक्रामध्यें काम करणाऱ्या उलटसुलट यंत्रांमध्यें केलेल्या कामाचें आणि खर्च झालेल्या उष्णतेचें प्रमाण नेहमीं सारखें असतें आणि ज्या अर्थी केलेल्या कामाचें प्रमाण हें यंत्रास पुरविलेली उष्णता व यंत्रांतून बाहेर पडणारी उष्णता यांच्यामधील अंतराइतकें असतें त्या अर्थी आंत आलेल्या उष्णतेचें बाहेर पडणाऱ्या उष्णतेशीं प्रमाण फक्त या दोन उष्णमानांवर अवलंबून असतें. या महत्त्वाच्या सिद्धान्तावरुन लॉर्ड केल्व्हिन यानें मूळ उष्णमानाचें कोष्टक तयार केलें व त्यावरुन त्यानें असें दाखवून दिलें कीं, यंत्रास मिळालेली उष्णता आणि त्यांतून बाहेर पडणारी उष्णता यांचें प्रमाण त्या दोन उष्णतांमधील उष्णमानांच्या प्रमाणाइतकेंच असतें. या गोष्टीवरूनच विशिष्ट उष्णमानाचा अंक ठरविण्यांत यावा. यावरून पुढील समीकरण सिद्ध होतें: $\frac{Q_1}{Q_2}=\frac{T_1}{T_2}$. निरनिराळ्या पदार्थांवर प्रयोग केला असतां असें आढळून आलें कीं, पाण्याचें

वर्फ होण्याचें उष्णमान शतांश उष्णमान मापकावर २७३·१° अंश एवढें असतें. कारण $Q_1 - Q_2 \div Q_1 = T_1 - T_2 \div T_2$ आणि $Q_1 - Q_2 = W$ म्हणजे जें काम झालें आहे तें. यावरून त्या यंत्राची कार्यशक्ति $T_2$ ची किंमत ० धरली तर $\frac{T_1 - T_2}{T_1}$ इतकी म्हणजे १ ही येते. यावरून जितकी उष्णता त्या यंत्रामध्यें खर्च केली जाते तितकें आपणांस काम मिळतें; म्हणजे त्यांतून बाहेर पडणारी उष्णता ० असली पाहिजे, म्हणजे संचायकाचें उष्णमान मूल शून्यांश इतकें असलें पाहिजे. याच तत्त्वाप्रमाणें शरीरांतील उष्णमान नेहमीं कायम राहत असतें. याबरोबरच शक्तीचा संचय आणि व्यय यांचेहि सिद्धान्त विचार करण्यासारखे आहेत. ज्या पदार्थामध्यें Q इतक्या प्रमाणांत उष्णता असते त्या वस्तूचें मूल उष्णमान T हें कांहींहि असलें तरी त्यांत Q इतकी शक्ति असते. परंतु या शक्तीचा कांहीं अंशच आपणांस काम करण्यास उपयोगी असतो. व बाकीची शक्ति आपोआपच व्यय पावते. याचें कारण कोणतेंहि कार्य करतांना घर्षण, वगैरे अनेक गोष्टींमध्यें शक्तीचा व्यय होत असतो.

**उष्णतामापक**— ( कॅलोरीमीटर ). उष्णतेचें परिमाण मोजणाऱ्या यंत्रास उष्णतामापक म्हणतात. याचा मुख्य उपयोग विशिष्ट द्रव्यापासून किंवा विशेषतः जळणापासून किती उष्णता मिळेल हें पाहण्याकरितां करण्यांत येतो. याकरितां एखादा पदार्थ किंवा जळण ठराविक वजनाचें घेऊन तें प्राणवायूमध्यें दहन करण्यांत येतें, आणि उत्पन्न होणाऱ्या उष्णतेपासून विशिष्ट परिमाणाच्या पाण्याचें उष्णमान किती वाढतें त्यावरून त्या पदार्थाचें उष्णतामापन करण्यांत येतें.

**उष्णतामापन**— ( कॅलोरीमेट्री ). उष्णतेचें परिमाण मोजण्याच्या क्रियेस किंवा पद्धतीस उष्णतामापन म्हणतात. ज्या उष्णतेचें मापन करावयाचें ती उष्णता एखाद्या वस्तूचें उष्णमान बदलत असतां किंवा तिचें स्थित्यंतर होत असतां किंवा एखादा रासायनिक संयोग होत असतांना किंवा एखाद्या शक्तीचें रूपांतर होत असतांना मिळालेली किंवा बाहेर पडलेली असते. उष्णतेचें मापन करण्याकरितां सामान्यतः तीन प्रकारचीं मूलमानें वापरण्यांत येतात. एक ग्राम वजनाच्या शुद्ध पाण्याची उष्णता १५° पासून १६° शतांश मानापर्यंत चढविण्यास जी उष्णता लागते तिला एक कॅलोरी असें म्हणतात. ब्रिटिश उष्णता मूल्मान (ब्रिटिश थर्मल युनिट B. Th. U.) हें एक पौंड वजनाच्या पाण्याचें उष्णमान एक अंश फॅरनहीट ( १° फॅ. ) उष्णमानापर्यंत चढविण्याकरतां जी उष्णता लागते तें धरण्यांत येतें. एक थर्म म्हणजे १ लक्ष ब्रिटिश थर्मल युनिट होय.

**उष्णतारसायन शास्त्र**—(थर्मोकेमिस्ट्री). ही पदार्थविज्ञान-रसायनशास्त्राची एक शाखा आहे. या शाखेमध्यें, रासायनिक क्रियेमध्यें जें उष्णताविषयक विसर्जन आणि शोषण, वगैरे बदल होत असतात त्यांचा अभ्यास करण्यांत येतो. या विषयामध्यें शक्तिसातत्य यापासूनच निघणारे निरनिराळे उपसिद्धान्त अभ्यासण्यांत येतात. या शाखेचा अभ्यास प्रथम टॉमस अँड्रूज आणि जी. एच्. हेस यांनीं सुरू केला. हेस यानें उष्णतापरिमाण-सातत्याचा नियम ( लॉ ऑफ कॉन्स्टंट हीट सम्स ) शोधून काढला. हा नियम असा आहे कीं, कोणत्याहि रासायनिक क्रियेमध्यें घडणाऱ्या उष्णताविषयक परिणामाचें *परिमाण* एकच असतें. मग ती रासायनिक क्रिया करीत असतांना अखेरचें रासायनिक कार्य कितीहि निरनिराळ्या प्रकारच्या पायऱ्यांनीं झालेलें असो. या नियमाचा अद्यापहि कोणताहि पदार्थ बनवितांना खर्च झालेली उष्णता प्रत्यक्ष प्रयोगानें काढतां येत नाहीं तेव्हां उपयोग करण्यांत येतो. जेव्हां दोन मूलद्रव्यांचा संयोग होऊन एक तिसराच कमी–अधिक स्थिर स्वरूपाचा संयुक्त पदार्थ तयार होतो तेव्हां त्या रासायनिक क्रियेपासून उत्पन्न होणारी उष्णता उत्पादक उष्णता ( हीट ऑफ फॉर्मेशन ) म्हणून संबोधण्यांत येते व ती कॅलोरी या मापानें मोजण्यांत येते. उदा., $C + 2O = CO_2 + ९४३००$ कॅलो. आणि $CO + O = CO_2 + ६८०००$ कॅलो. यांतील पहिल्या समीकरणाचा अर्थ असा कीं, कर्बाचे बारा ग्राम ( कर्बाचा परमाणुभारांक १२ आहे म्हणून ) प्राणाच्या ३२ ग्रामाबरोबर संयोग पावतात आणि ४४ ग्राम कर्बद्विप्राणिद तयार करतात व या वेळीं ९४,३०० कॅलोरी उष्णता बाहेर पडते. किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे ४४ ग्राम कर्बद्विप्राणिद तयार करण्याकरितां कर्ब आणि प्राण यांमधील ९४,३०० कॅलोरी उष्णतेइतकी शक्ति नष्ट होते. वरील दोन समीकरणांची वजाबाकी केली असतां आपणांस असें आढळून येतें कीं, पहिल्या समीकरणाकडून दुसऱ्या समीकरणाकडे जातांना ९४,३०० – ६८,००० = २६,३०० कॅलरी इतकी उष्णता लागते; हीच उत्पादक उष्णता होय. अनेक पदार्थांस घनउत्पादकउष्णता असते. आणि त्यास उष्णता बहिःसारक असें म्हणतात. परंतु कांहीं पदार्थ उष्णता अंतःसारक असतात, व त्यांचें विघटन झालें असतां उष्णता बाहेर पडत असते. म्हणजे त्यांची उत्पादक उष्णता ऋण असते. एखाद्या सेंद्रिय पदार्थाची ज्वलनोष्णता म्हणजे त्या पदार्थातील कर्ब व उज्ज यांचें प्राणिदीकरण होऊन कर्बद्विप्राणिद आणि पाणी तयार होतें, तेव्हां बाहेर पडणारी उष्णता होय. याच शास्त्राच्या दुसऱ्या शाखा म्हटल्या म्हणजे द्रवोष्णता आणि उदासीनोष्णता (हीट ऑफ न्युट्रॅलिझेशन ) या होत. जेव्हां एखादें एकद्रव्यात्मक नायट्रिक

किंवा हायड्रोक्लोरिकसारखें तीव्र अम्ल एखाद्या तीव्र एकद्रव्यात्मक भस्माशीं–उदा०, सोडियम हायड्राक्साइड अथवा पोटॅशियम हायड्रॉक्साइड–संयोग पावतें तेव्हां जवळजवळ एकाच प्रमाणांत उष्णता उत्पन्न होते. आणि ती सुमारें १,३७,००० कॅलोरी असते.

**उष्णतेचें क्षयमान**— ( एन्ट्रॉपी ). ज्याप्रमाणें एखाद्या वस्तूच्या स्थानावरून तिच्यामध्यें वास्तवशक्ति नांवाची एक प्रकारची शक्ति उद्भूत झालेली असते त्याप्रमाणेंच प्रत्येक वस्तूमध्यें एक तिच्या उष्णता व गत्यात्मक गुणधर्मांमुळें दुसऱ्या स्वरूपाची एक महत्त्वाची शक्ति उद्भूत झालेली असते. तिला स्थितिशक्ति असें म्हणतात. या शक्तीचें उदाहरण पुढीलप्रमाणें देतां येईल: समजा, आपणाजवळ सामान्य वातावरणाचा दाब असलेलें व २१२° फा. उष्णमान असलेलें एक पौंड पाणी आहे. या पाण्यास आपण उष्णता दिली व त्याचें तेंच उष्णमान असलेलें एक पौंड वाफेंत रूपांतर केलें तर या क्रियेमध्यें उष्णमान तर वाढत नाहीं; त्यामुळें या पाण्यास आपण जी उष्णता देतों ती त्या वाफेमध्यें अनुद्भूत शक्तीच्या रूपानें वसत असते व ती सुमारें ९६० ब्रिटिश उष्णमानांक इतकी असते. ही एखाद्या पदार्थास एका स्थितींत नेण्याकरितां म्हणून जी शक्ति खर्च करून त्या पदार्थाची स्थितिशक्ति वाढविण्यांत येते तिचें मापन खर्च केलेल्या उष्णतेला म्हणजे ९६० B. Th. U. या संख्येस त्या पदार्थाच्या मूळच्या मूल उष्णमानाच्या अंशानें भागून काढण्यांत येतें. म्हणजे त्या पदार्थाचें मूल शून्यांशापासून उष्णमान ४६१ + २१२ = ६७३ मूल उष्णमान निघालें; म्हणजे त्याची स्थितिशक्ति ९६० ÷ ६७३ = १·४३ इतकी येते.

**उष्णमानमापक**—( थर्मामीटर ). या उपकरणाच्या साहाय्यानें उष्णमान मोजतां येतें. उष्णमान मोजण्याची पद्धति उष्णतेपासून होणाऱ्या परिणामावर आधारलेली आहे. एका पद्धतीमध्यें एका कांचेच्या पात्रांतील द्रव पदार्थ उष्णतेमुळें वृद्धि पावतो या तत्त्वाचा उपयोग करण्यांत आला आहे. दुसऱ्यामध्यें वायूच्या प्रसरणतत्त्वाचा उपयोग केला आहे. तिसऱ्यामध्यें वायूचें घनफळ कायम ठेवण्यांत येऊन त्याच्या वाढणाऱ्या दाबाचा उपयोग करण्यांत येतो; व चवथ्या एका उष्णमानमापकांत एखाद्या धातूमध्यें उष्णमानाबरोबर जी विद्युद्रोधकता वाढत असते, तिचा फायदा घेण्यांत येतो, व पांचव्यामध्यें उष्णमानाच्या वाढीबरोबर जें उष्णतेचें विसर्जन होतें त्यावरून उष्णमान मोजतां येतें.

यांपैकीं पहिल्या पद्धतीप्रमाणें पाऱ्याची उष्णमानमापक उपकरणें बनविलेलीं असून तीं फार आटपशीर व उपयोगास सोयीचीं असतात. दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारचें उष्णमापक हें वायुपूरित असून त्यावरून प्रमाण–उष्णमानमापक पद्धती मिळतात. चौथ्या व पांचव्या पद्धतीमध्यें प्लॅटिनम ही धातु विद्युद्रोधक म्हणून वापरलेली असते व याचा उपयोग फार उच्च उष्णमान मोजण्याकडे करण्यांत येतो.

पाऱ्याचें उष्णतामानमापक— यामध्यें एका कांचेच्या केशाकर्षक नळीला एक कांचेचा फुगा जोडलेला असतो. हा फुगा तापवून त्या नळीचें दुसरें टोंक पाऱ्यामध्यें बुडविण्यांत येतें. नंतर फुगा थंड झाला म्हणजे त्यांत कांहीं पाऱ्याचा अंश ओढला जातो. हा पारा उकळला असतां त्या नळींतील सर्व हवा बाहेर निघून जाते, व ती नळी पुन्हा पाऱ्यामध्यें बुडविली असतां सर्व फुगा व नळीचा भाग पाऱ्यानें भरतो. यानंतर फुगा ऊन करून कांहीं पाऱ्याचा भाग बाहेर काढण्यांत येतो, आणि नळी बंद करण्यांत येते. नंतर हें उष्णमानमापक वितळणाऱ्या बर्फामध्यें व नंतर ७६ सेंटिमीटर दाब असलेल्या पाण्याच्या वाफेमध्यें ठेवून ०° श. ते १००° श., किंवा ३२° फा. ते २१२° फा. या खुणा करण्यांत येतात आणि या दोन खुणांच्यामधील भागाचे सारखे भाग पाडून पहिल्या प्रकारांत १०० आणि दुसऱ्या प्रकारांत १८० सारख्या अंतराच्या विभागरेषा पाडण्यांत येतात.

कमाल आणि किमान उष्णमानमापक—यांचा उपयोग दिवस व रात्र मिळून सर्वांत उच्च व सर्वांत नीच असें उष्णमान किती असतें तें पाहण्याकरितां करण्यांत येतो. यामध्यें एक मध्यें बांक असलेली U आकाराची नळी असून तींत मद्यार्क भरलेला असतो, व वांकड्या भागांत पारा भरलेला असतो. एका टोंकाला एक फुगा असून तो मद्यार्कानें पूर्ण भरलेला असतो व दुसऱ्या टोंकास एक जरा लहान फुगा असून तो मद्यार्कानें अर्धवट भरलेला असतो. पाऱ्याच्या पृष्ठभागावर दोन लोखंडी तारेचे बारीक तुकडे असतात. जेव्हां उष्णमान वाढतें तेव्हां मद्यार्क लहान फुग्याच्या बाजूस वर चढतो. आणि पाऱ्यावरील एक तारेचा तुकडाहि वर चढतो. जेव्हां हवामान थंड होतें तेव्हां हा तारेचा तुकडा त्या जागीं तसाच राहतो. व त्याच्या खालच्या टोंकाशीं असलेल्या आंकड्यावरून सर्वांत उच्च उष्णमान कळून येतें. हा तुकडा चुंबकाच्या साहाय्यानें पाऱ्याच्या पृष्ठभागाशीं आणून ठेवतां येतो. याच्याउलट दुसऱ्या तारेच्या तुकड्याच्या स्थितीवरून अतिनीच उष्णमान कळून येतें.

वैद्यकीय उष्णमानमापक—हें फॅरेनहीट पद्धतीचें लहानसें उष्णमानमापक असून त्यामध्यें ९५ पासून ११० पर्यंत उष्णमानाचे अंक मांडलेले असतात, व त्याचा उपयोग शरीराचें उष्णमान मोजण्याकरितां करण्यांत येतो. हें वरीलप्रमाणेंच उच्च उष्णमान मोजणारें असतें.

वायु-उष्णमानमापक—वायू हे उष्णतेमुळें फार प्रसरण पावतात

व त्यांमध्यें उष्णता ग्रहण करण्याची शक्ति फार थोडी असते, व त्यांचे गुणधर्म कोणत्याहि उच्चनीच उष्णमानांत जवळजवळ सारखेच असतात; याकरितां उष्णमानमापकामध्यें उज्जवायूची योजना करण्यांत येते व विशिष्ट घनफळाच्या उज्जवायूमध्यें निरनिराळ्या उष्णमानांत जी दाबाची वाढ होते तीवरून उष्णमान मोजण्यांत येते. याचा उपयोग सामान्य व्यवहारांत होत नाहीं. तसेंच नीच उष्णमानामध्यें तें स्थित्यंतर उष्णमानाच्याजवळ आलें म्हणजे बॉइलच्या नियमाच्याविरुद्ध वर्तन करूं लागतात. याकरितां विद्युदुष्णमानमापक वापरण्यांत येतात.

**उष्णमान विद्युत्**—( थर्मो इलेक्ट्रिसिटी ). जेव्हां दोन भिन्न भिन्न धातूंमध्यें उष्णतेच्या योगानें विद्युत्प्रवाह उत्पन्न होतो तेव्हां त्या प्रवाहाचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रास उष्णताविद्युच्छास्त्र असें म्हणतात. सिबेक यानें सन १८२१ मध्यें असा शोध लावला कीं, तांबें आणि लोखंड यांसारख्या दोन धातूंच्या जोडावर जर त्यांस उष्णता दिली व तशाच दुसऱ्या जोडावर शीतता उत्पन्न केली तर एक विद्युन्मंडल तयार होऊन उष्ण केलेल्या सांध्यांतून तांब्यापासून लोखंडाकडे जाणारा विद्युत्प्रवाह सुरू होतो व या दोन सांध्यांतील उष्णमानामध्यें जितकें अंतर असेल त्या मानानें त्या विद्युत्प्रवाहाची शक्ति वाढत जाते. जर इतर भागापेक्षां हा सांधा ऊन करण्याच्याऐवजीं अधिक थंड केला तर हाच प्रवाह उलट दिशेनें वाहूं लागतो. अशा तऱ्हेनें विद्युत्प्रवाह उत्पन्न करणाऱ्या निरनिराळ्या धातूंच्या जोड्या लावतां येतात व त्यांची उष्णता विद्युज्जनकशक्ति शिसें या धातूशीं तुलना करून ठरविण्यांत येते.

पेल्टीये या शास्त्रज्ञानें सन १८३४ त असें दाखवून दिलें कीं, दोन भिन्न धातूंच्या सांध्यामधून विद्युत्प्रवाह सोडला तर त्या विद्युत्प्रवाहाच्या गतीच्या दिशेप्रमाणें तो सांधा उष्ण अगर थंड होतो. उदा., बिस्मत या धातूकडून अँटीमनी या धातूकडे जर प्रवाह वाहत असेल तर त्यामधील सांधा थंड होतो आणि उष्णता शोषून घेतो.

थॉमसन या शास्त्रज्ञानें १८४६ मध्यें असें दाखवून दिलें कीं, जर एखादी धातूची तार एका ठिकाणीं दिव्याच्या ज्योतींत धरून तापविली आणि तीमधून विद्युत्प्रवाह सोडला तर एका बाजूनें उष्णतेचें शोषण होतें व दुसऱ्या बाजूनें उष्णता बाहेर पडत असते व विद्युत्प्रवाहाबरोबर उष्णता वाहत आहे असें वाटतें.

अशा तऱ्हेच्या धातूंच्या जोड्या एकावर एक ठेवून त्यांच्या एका बाजूच्या सांध्यांस उष्णता दिली आणि दुसऱ्या बाजूचे सांधे थंड राखले तर बऱ्याच मोठ्या प्रमाणांत विद्युद्‍द्राति मिळूं शकते. अशा रचनेस उष्णतासंचायक ( थर्मोपाईल ) असें म्हणतात. याचा शोध नोबिली या शास्त्रज्ञानें लावला आणि मेलोनी या शास्त्रज्ञानें त्याचा विद्युन्मापकाबरोबर उत्सर्जन पावणाऱ्या उष्णतेचें मापन करण्याकरितां उपयोग केला.

**उष्णरंगपद्धति**—( एन्कॉस्टिक पेन्टिंग ). चित्रामध्यें उष्णतेच्या साहाय्यानें रंग भरण्याची कला ही प्राचीन काळीं बरीच प्रचारांत होती. प्लिनीनें या प्रकारच्या तीन पद्धतींचा उल्लेख केला आहे. त्यांत बहुतेक रंगांबरोबर मेणाचा उपयोग करण्यांत येत असे. हे रंग बहुधा कांशाच्या एखाद्या अणकुचिदार सळईनें भरण्यांत येत. क्वचित् कुंचलीनेंहि भरण्यांत येत. अर्वाचीन काळीं ही पद्धति पुन्हां प्रचारांत आणण्याचे प्रयत्न चालू आहेत. परंतु ती अद्यापि फारशी आढळत नाहीं.

**उष्म विद्युत्**—( पायरो इलेक्ट्रिसिटी ). कांहीं खनिज पदार्थ किंवा सेंद्रिय पदार्थ उष्ण केले असतां किंवा थंड केले असतां त्यांमध्यें जी विद्युत् उत्पन्न होते तीस उष्णताजन्य विद्युत् असें म्हणतात. हा परिणाम प्रथम तोरमल्लीमध्यें आढळून आला. थानंतर हा परिणाम गार, उंसाची साखर, क्विनाइनचें सल्फेट, बोरॅसाइट, वगैरे पदार्थांतहि आढळून आला आहे.

**उष्म विद्युन्मापक**—( पायरोमीटर ). अतिशय उच्च उष्णमान मोजण्याकरितां या यंत्राचा उपयोग करण्यांत येतो. उष्णमानामध्यें फरक पडत गेला म्हणजे धातूच्या तारेंतील विद्युद्रोधक शक्तीमध्यें फरक पडत जातो. या तत्त्वावरून प्रोफेसर ह्यूज एल्. कॅलेंडर यानें प्लॅटिनमच्या तारेपासून उष्णमानमापक तयार केलें. एका अभ्रकाच्या चौकटीवर प्लॅटिनमची तार गुंडाळलेली असते, आणि तिला जोडलेल्या तारा लहान अभ्रकाच्या चकत्यांस छिद्रें पाडलेलीं असतात त्यांतून नेलेल्या असतात. या चकत्यांमुळें त्या तारा कांचेच्या, चिनीमातीच्या किंवा सिलिकाच्या नळ्यामध्यें स्थिर केलेल्या असतात. जेव्हां भिन्न धातू एकमेकांशीं संयुक्त असलेल्या स्थितींत उष्ण करण्यांत येतात तेव्हां त्यांतून एक विद्युद्गतिप्रवाह उत्पन्न होतो. त्याची तीव्रता उष्णमानावर अवलंबून असते. उष्णसंयुक्तमापकानें या संयुक्त धातूंतील आणि त्यांच्या वेगवेगळ्या टोंकांतील उष्णमानाचें अंतर मोजतां येतें. उष्णताविसर्जनमापक हा भट्टयांची उष्णता मोजण्याच्या कामीं फार उपयोगी असतो. अशा प्रकारचें यंत्र फेरी यानें केलेलें सध्यां उपयोगांत आणण्यांत येतें. या यंत्रांत भट्टींतील उष्णतेचे किरण एका अंतर्गोल आरशावर पाडून एका संयुक्त धातूच्या पत्र्यावर परावर्तित करण्यांत येतात आणि त्याचें उष्णमान विद्युद्दर्शक यंत्रावरील रेखांकित आंकड्यांवरून मोजण्यांत येतें.

**उसण**—पाठीच्या खालच्या भागामध्यें जे पेटके येतात त्यास उसण भरणें म्हणतात. हा एक प्रकारचा स्नायूस होणारा

संधिवात असून थंडीवारा लागल्यानें किंवा विशेष ताण पडल्यामुळें उत्पन्न होतो. पाठीला शेक देऊन विश्रांति घेतली असतां सामान्यतः हा रोग बरा होतो. तसेंच सॅलिसिलेट हें औषध दिल्यानेंहि उतार पडतो. कधीं कधीं हा रोग कायमचा जडण्याचा संभव असतो.

**उस्मान** ( १२८९–१३२६ )— तुर्कांचा पहिला सुलतान. याचा आजा सुलेमान हा चेंगीझखानानें बलखवर स्वारी केल्या वेळीं ( १११४ ) तो प्रदेश सोडून रोमला गेला व तेथें बुडून मेला. उस्मानचा बाप अमीर तुग्रल याला सेल्जुक सुलतानानें आपल्या पदरीं बाळगिलें होतें. तो. इ. स. १२८८ मध्यें वारला. उस्मान हा अल्लाउद्दीन कैकुबाद नांवाच्या सेल्जुक सुलतानाच्या पदरीं होता. इकोनियमचें सेल्जुक घराणें नष्ट झाल्यावर ( इ. स. १२९९ ) उस्मानानें बिथिनियाचा कांहीं भाग हस्तगत केला. ' हफ्त अक्लीम ' ग्रंथावरून पाहतां त्याची कारकीर्द इ. स. १२८५ पासून सुरू होते. इ. स. १३२६ त याचा अंत झाला. याच्यामागून याचा मुलगा ओर्खान हा गादीवर आला. शेख एब्दली या पंडिताच्या मुलीशीं उस्मानचें जें लग्न झालें तें काव्यविषय होऊन बसलें आहे.

**उस्मान पाशा** ( १८३२–१९०० )— हा तुर्की सेनापति होता. त्याचा मुख्य पराक्रम रूसो-तुर्की युद्धामध्यें ( १८७७ ) प्लेव्हनाचें संरक्षण करण्याच्या वेळीं दिसून आला. त्यानंतर तो युद्धमंत्री व इतर उच्च अधिकारपदावर चढला.

**उस्मानाबाद**—हैद्राबाद संस्थान, एक पश्चिम भागांतील जिल्हा. यास पूर्वी नळदुर्ग म्हणत. क्षे. फ. ४,०१० चौ. मै.. बहुतेक जमीन निरनिराळ्या जहागिरींतील आहे. जिल्ह्यांतील मोठी नदी मांजरा आहे. पाऊस सरासरी ३३ इंच पडतो. लो. सं. सुमारें सात लक्ष आहे. मराठी लोकांची वस्ती जास्त आहे. कापूस बराच पिकतो. मुख्य धान्याचें पीक ज्वारीचें आहे. नळदुर्ग व परिंडा किल्ला, तुळजापूरची भवानी, थेर येथील बौद्ध शिल्पाचे अवशेष, उस्मानाबादजवळची लेणीं हीं प्रेक्षणीय स्थळें होत. उस्मानाबाद, तुळजापूर, लातूर हीं मोठीं गांवें आहेत. चौदाव्या शतकापासून हा जिल्हा मुसलमानांच्या ताब्यांत आहे.

जिल्ह्याचें मुख्य ठिकाण उस्मानाबाद सोलापूरच्या उत्तरेस ४३ मैलांवर आहे. लो. सं. वीस हजार. येथें मोठा व्यापार चालतो. गावाच्या ईशान्येस दोन मैलांवर जैन व वैष्णव लेणीं आहेत.

## ऊ

ऊ—' उ ' ला एक फांटा नवीन जोडून हें अक्षर तयार झालेलें दिसतें. भरहुतस्तूपावरील लेखांत ' ऊ ' अक्षर असून, अशोकाच्या गिरनार लेखांतील ' ऊ ' आकृतींत खालच्या आडव्या फांट्याच्या जरा वर त्याला समांतर असा दुसरा फांटा काढल्यास वरील भरहुतलेखांतील ' ऊ ' ची आकृति तयार होईल. आजच्या वळणदार ' उ ' ला डोक्यापासून फांटा काढून बनविलेला ' ऊ ' चंबा राज्यांतील सराहां येथें सांपडलेल्या इ. स. १० व्या शतकांतील एका प्रशस्तींत पाहावयास मिळतो.

ऊ—हे प्राणी मनुष्य व इतर सस्तन प्राणी यांच्या शरीरावर होतात. यांच्या सुमारें चाळीस जाती आहेत. हे इतर प्राण्यांचें रक्त शोषण करून आपली उपजीविका करतात. यांची उत्पत्ति फार मोठ्या प्रमाणांत होते. निरनिराळ्या प्राण्यांच्या शरीरांवर राहणाऱ्या यांच्या निरनिराळ्या अनेक जाती आहेत व कधीं कधीं एकाच प्राण्याच्या अंगावरहि दोन-तीन प्रकारच्या उवा आढळतात.

अंगावर ज्या उवा आढळतात त्या बहुधा अंगावरील कपड्यांच्या शिवणींत राहतात. विशेषतः ज्या ठिकाणीं अंगावर कपडे दाबून बसतात अशा ठिकाणीं यांचें वास्तव्य असतें. तसेंच तेथें लिखा म्हणजे उवांचीं अंडींहि आढळतात. तीं लहान असून लंबवर्तुलाकृति व तकतकीत असतात.

उवांवर इलाज म्हणजे स्वच्छता. अंगालगतचे कपडे व अंथरुणावरील पलंगपोस, इ. वारंवार बदलावेत. तसेंच वापरलेले कपडे उत्तमपणें उकळावेत व धुवावेत.

डोक्यांतील उवांपासून पुष्कळदां डोक्यांत कंडू, फोड, इत्यादि उत्पन्न होतात व केंस एकमेकांस घट्ट चिकटून बसतात. केव्हां केव्हां उवा हुडकल्या तरी आढळत नाहींत.

रॉकेल तेलांत फडकें भिजवून तें डोक्यास बांधावें अगर डोक्यास रॉकेल चोपडावें. २४ तासांनंतर डोकें साबण व पाणी यानें स्वच्छ धुवावें म्हणजे उवा जातात.

**ऊधमबाई**—एक राणी. या हिंदु स्त्रीचें दिल्लीच्या महंमदशहा बादशहाबरोबर लग्न झालें होतें. अहमदशहा बादशहाची ही आई; तो गादीवर बसला तेव्हां ( १७४८ ) हिला नवाबबाई, नवाब कुदसिया आणि साहिब झमानी अशा पदव्या मिळून, हिचा भाऊ मानखान याला ६००० ची दरकदारी देऊन मोतकीद-उद्दौला ही पदवी देण्यांत आली. वजीर गाजी-उद्दीन यानें अहमदशहाला कैद करून त्याचे डोळे काढले तेव्हां हिचेहि काढले ( १७५४ ) होते. अहमदशहाचा वजीर सफदर-

जंग व शहा यांचा बेबनाव झाला त्या वेळीं या बाईनें वजिराच्याविरुद्ध कारस्थान उभें केलें होतें.

ऊर्दुबेगी—एक स्त्री-रखवालदार. हिंदुस्थानांत स्त्रियांची पलटण तयार करण्याचा कसकसा प्रयत्न झाला होता याची माहिती चांगलीशी प्रसिद्ध नाहीं. मुसलमानी बादशहांनीं प्रथमतः आपल्या पडदानशीन स्त्रियांची फौज तयार करण्याचा प्रयत्न केला होता असें दिसतें. मनुची म्हणतो कीं, औरंगजेबाच्या जनानखान्यावर पहारा करण्यासाठीं खोजे लोकांच्याऐवजीं स्त्रियांची योजना होऊन त्यांचें एक लष्कर बनलें होतें. या लष्कराच्या मुख्य स्त्रीकामगाराचें नांव ऊर्दुबेगी होतें. या बाईचें एक चित्र मनुचीनें दिलें आहे. यावरून मुसलमानी जनानखान्यावरील लष्करी स्त्रीअमलदारांच्या पोषाखाची कल्पना येईल.

ऊर्दू—१. भाषा—या शब्दाचा अर्थ छावणी असा आहे. यावरून छावणीमध्यें ज्या बोलीचा प्रचार असे तीस ऊर्दू बोली असें नांव. प्रथम ही बोलीस्वरूपांतच अनेक वर्षें अस्तित्वांत असल्यामुळें तींत फारसें, किंबहुना मुळींच वाङ्मय तयार झालें नाहीं. छावणीमध्यें बोलली जात असल्यामुळें या बोलींत अनेक बोलींतील शब्दांचें मिश्रण होणें स्वाभाविक होतें व तसा प्रकार बऱ्याच मोठ्या प्रमाणावर आढळतोहि. सामान्यतः दोन भाषा बोलणारे लोक एकत्र आले म्हणजे त्यांच्या भाषेवर विशेषतः बोलभाषेवर दोन्ही भाषांचा परिणाम होणें स्वाभाविक असतें. त्यांतहि विशेषतः अशी बोली स्थानिक लोकांशीं व्यवहार करतांनाच वापरावयाची असल्यामुळें स्थानिक बोलीचा तीवर विशेष परिणाम घडून येतो व परकीय भाषेंतील फक्त कांहीं शब्द तींत घुसतात. परंतु परकीयांचा वर्ग सत्ताधिष्ठित झाल्यास परकीय भाषेचा वरचष्मा हळूहळू या भाषेवर चढून तिचें व्याकरण व महत्त्वाचे शब्द परकीय व कांहीं सामान्य शब्द देश्य अशा प्रकारचें तिचें स्वरूप होतें व तीच परिस्थिति आपणांस ऊर्दू भाषेमध्यें आढळून येते. मुसलमानांचें भरतखंडांत आधिराज्य स्थापन झाल्यावर या बोलीस थोडेंसें महत्त्व येऊन तीमध्यें कांहीं वाङ्मय तयार होऊं लागलें. अर्थात् हें वाङ्मय परकीयांच्या पुरस्कारामुळेंच; किंबहुना परकीय लेखकांनींच लिहिल्यामुळें त्यांत परकीय भाषेचा, विचारांचा व कल्पनांचा आविष्कार अधिकाधिक होऊं लागला व स्थानिक भाषांस गौणत्व येऊन हळूहळू ऊर्दू म्हणजे फारसी-अरबीमिश्रित हिंदी असें स्वरूप तिला प्राप्त झालें.

२. वाङ्मय—पहिला ऊर्दू लेखक अमीर खुस्रू (इ. स. १२५५-१३२५) याचे फक्त २-३ गझल आज माहीत आहेत. आरंभीं ऊर्दू भाषेस रेखता म्हणत असत. ऊर्दूचा मूळ उत्कर्ष दक्षिणेंतच झाला, व तेथेंच ऊर्दूला वाङ्मयाचें भारदस्त स्वरूप प्राप्त झालें. सय्यद महमद बंदा नवाज गिसूदराज (मृत्यु १४२२) यानें एकंदर १०१ ग्रंथ लिहिले व त्यांपैकीं अजून कांहीं उपलब्ध आहेत. गुजरातमध्यें शहा आली महमद गामधनी (मृ. १५७५), शेख खूब महमद, आणि अमीन यांनीं ऊर्दूमध्यें ग्रंथ लिहिले आहेत. गोवळकोंड्याच्या कुतुबशाहीमध्यें ऊर्दूला पुष्कळ प्रोत्साहन मिळालें (इ. स. १५९०-१६८७). चौथा सुलतान महमद कुली कुतुबशहा (ज्यानें हैद्राबाद शहर वसविलें) यानें कुलियन नांवाचा एक प्रचंड ग्रंथ ऊर्दूमध्यें लिहून ठेवला आहे. त्याच्यामागूनच्या दोन सुलतानांनींहि पुष्कळ ऊर्दू ग्रंथरचना केली आहे. कुली कुतुबशहाचा राजकवि मुल्ला वझी यानें राजपुत्राच्या प्रेमलीला वर्णन करणारें एक 'कुतुब मुश्तरी' नांवाचें काव्य लिहिलेलें प्रसिद्ध आहे. त्यानेंच फारसीमधून एक 'सब रस' नांवाचा ग्रंथ भाषांतरित केला आहे. यांतील गद्य भाषा साधी व सफाईदार आहे. विजापूरचा दुसरा इब्राहिम आदिलशहा यानें ऊर्दूमध्यें संगीतशास्त्रावर 'नवरस नामा' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. हसन शौकी यानें 'फतनामा-इ-निजामशहा' या नांवाचें ऊर्दू काव्य लिहून तालीकोटच्या लढाईचें वर्णन केलें आहे. आदिलशाही अमदानींतील सर्वांत मोठा कवि नुस्रती (मृ. १६८३) हा होता. त्यानें 'गुलशन-इ-इष्क' हें ८००० ओळींचें महाकाव्य लिहिलें आहे. त्यांत मनोहर-मधुमालतीची प्रेमकथा वर्णन केली आहे. त्यानेंच आपल्या "अली नामा" या ग्रंथांत आपल्या मालकाच्या पराक्रमाचें वर्णन केलें आहे. याच्या लेखनांत कल्पनेच्या भराऱ्या, विषयांचें नावीन्य आणि सुंदर भाषा हे विशेष गुण आहेत.

दक्षिणेंतील सर्वांत मोठा कवि शमसुद्दिन वलिउल्ला वाली (मृ. १७४१) हा अतिशय लोकप्रिय होता. याची भाषा सोपी पण भारदस्त होती. त्याचीं ४२२ प्रेमकाव्यें आज ज्ञात आहेत. वालीचा समकालीन औरंगाबादचा सिराजुद्दिन सिराज यानें १०,००० ओळींचें एक दिवाण, एक कुलियत व एक अद्भुत कथा लिहिली आहे. याच्याकडे दर आठवड्यास काव्य-गायनाचे जलसे होत असत. वाली पुढें दक्षिणेंतून निघून उत्तरेस गेला व त्यामुळें ऊर्दू वाङ्मयहि उत्तरेस सरकलें. या नव्या वाङ्मयाचें विशेष लक्षण म्हणजे साधी सोपी भाषा व सूफी संप्रदायाचें प्राबल्य हें होय.

जुहूरउद्दीन हातिम (१६९९-१७८२) याच्या संगतींत पुष्कळ कवी निर्माण झाले. त्यांपैकीं मिर्झा जान-इ-जानान (१६९९-१७८१) हा आपल्या कोरीव, कांतीव भाषेबद्दल प्रसिद्ध आहे. यास ऊर्दूच्या चार खांबांपैकीं एक म्हणत असत.

या कालखंडांतील सर्वांत प्रसिद्ध कवि मीर ताकी (इ. स. १७२४–१८१० ) होता. याचे गझल व मथ्नवी उर्दू वाङ्मयांत सर्वोत्कृष्ट गणलेले आहेत. याच्या भावकाव्याच्या ४० हजार ओळी आहेत व अद्भुतकथाहि पुष्कळ आहेत. त्या सर्व प्रेमविषयक असून त्यांत ग्रूल–इ–इश्क व दर्या–इ–इश्क या प्रमुख आहेत.

महमद रफी सावदा ( इ. स. १७१३–१७८० ). यानें उपहासकाव्य लिहिण्याची पहिल्यानें प्रथा पाडली. नबाबांच्या स्तुतिपर असे यानें ४० कशीदे ( कविता ) लिहिले आहेत. प्रत्येक १०० ओळींचें एक अशीं याचीं डझनभर वीणाकाव्यें आहेत व १०,००० ओळी भरतील इतकीं भावकाव्यें आहेत. 'मीर दर्द' हा उर्दूच्या चार आधारस्तंभांपैकीं चौथा होय. मिर्झा मझार, मीर, सावदा व दर्द हे चार आधारस्तंभ मानले आहेत. दर्द ( इ. स. १७१९–१७८५ ) हा सूफी असल्यानें त्यानें फक्त धार्मिक वीणाकाव्यें केलीं आहेत. त्याचें काव्य उत्कट व प्रभावी आहे. मीर हसन ( इ. स. १७३६–८६ ) यानें १०–११ मथ्नवी ( अद्भुत प्रेमकाव्यें ) केलीं आहेत. त्यांपैकीं सिहरुल बयान हें उर्दूतील सर्वोत्कृष्ट अद्भुत कथाकाव्य गणलें गेलें आहे. त्यांत राजपुत्र बेनझीर व बद्र–ई–मुनीर यांची प्रेमकथा आहे.

गुलाम हमदानी मुशफी ( इ. स. १७५०–१८२४ ). यानें पुष्कळ वीणाकाव्यें व अद्भुत कथाकाव्यें लिहिलीं आहेत. आठ जाडे ग्रंथ भरतील एवढें काव्य त्यानें लिहिलें आहे. व ३०० फारसी कवींच्या वेंच्यांचा एक संग्रह केला आहे. इनशा–उल्लाखान ( मृ. १८१७ ) याचें विनोदी काव्य पुष्कळ आहे. त्याचें दर्या–ई–लतफत हें हिंदुस्थानांतील लेखकानें लिहिलेलें उर्दूचें पहिलें व्याकरण होय. वाली मुहम्मद नझीर (इ. स. १७४०–१८३०) हा उर्दूतील सुप्रसिद्ध कवि होता. त्याचें काव्य लहान मुलांत आवडणारें आहे.

हैदर अली आतिश ( मृ. १८४६ ), इमामबक्ष नासिख ( मृ. १८३६ ), आनिस व सलामत–अली–डबीर हे अलीकडील कवींत प्रमुख होत. आतिश हा उर्दूतील उत्तम वीणाकाव्य–लेखक आहे. त्यानें ४०,००० ओळी भरतील इतके दोन काव्यसंग्रह लिहिले आहेत.

१८५७ च्या बंडापासून नवीन उर्दू वाङ्मयास आरंभ झाला. या वेळेपासून उर्दू भाषा ही फारसीपासून अगदीं स्वतंत्र झाली व तिनें प्रचलित भाषांमध्यें प्रमुख स्थान मिळविलें, आनिस व डबीर यांच्या मागोमाग झौक, अमीर, दाग, हाली, सर सय्यद, आझाद, शिब्ली नुमानी, घालीब व इक्बाल अशी उर्दू लेखकांची परंपरा आहे. आली आनिस ( इ. स. १८०२–१८७४ ) याची भाषा सोपी व प्रवाही आहे व त्याच्या काव्याचे १ लाख ओळींचे ४ ग्रंथ आहेत. डबीरच्या काव्याचे दोन मोठाले भाग आहेत. आनिस व डबीर यांनीं अर्वाचीन उर्दू वाङ्मय लोकप्रिय केलें.

महमद इब्राहिम झौक ( १७८९–१८५४ ). याचें पुष्कळ लेखन ५७ च्या बंडांत नष्ट झालें, तरी त्याच्या १२ हजार ओळी अजून शिल्लक आहेत. त्याचा भर शब्दावडंबरावर फार आहे. असदुल्लाखान घालिब ( इ. स. १७९७–१८६९ ) हा उर्दूतील सर्वश्रेष्ठ कवि आहे. त्याचें गद्य व पद्य हीं दोनहि अत्यंत उच्च दर्जाचीं आहेत. त्याच्या पत्रांचे दोन भागहि नमुनेदार आहेत.

महम्मद मूमीनखान मूमीन ( १८००–१८५१ ) हा ज्योतिष, वैद्यक व काव्य या तीनहि विद्यांत प्रवीण होता. त्यानें भावकाव्यें, 'कशीदे' व मथ्नवी लिहिल्या आहेत. अमीर अहमद मीनाई ( १८२८–१९०० ) व मिर्झाखान दाग ( १८३१–१९०५ ) हे दोघे रामपूर दरबारचे आश्रित होते. अमीरचे 'कशीदे' प्रसिद्ध आहेत. दाग वीणाकाव्यप्रवीण होता. 'मीर आतुल घैब' व 'सनम खाना–इ–इश्क' हे अमीरकृत 'दीवाण' होत. अलीगड येथें मुस्लिम संस्कृतीच्या पुनरुत्थानाची जी लाट उसळली, तिच्यामुळें प्रसिद्धीस आलेले लेखक पुढीलप्रमाणें होत :—सर सय्यद, नबाब मुहसीन उल्मुल्क, मौलवी चिराग आली, महम्मद हुसेन आझाद, अल्ताफ हुसेन हाली, नझीर अहमद, मौलवी धकाउल्ला, शिब्ली नुमानी, इ.. यांपैकीं बहुतेकांनीं गद्याचाच स्वीकार केला आहे. नझीर अहमदच्या नीतिविषयक कादंबऱ्यांनीं अर्वाचीन दीर्घकथांना मार्ग दाखविला. शिब्ली नुमानीचें ऐतिहासिक व टीकात्मक लेखन प्रसिद्ध आहे. हालींचे 'मुसद्दस' व 'शिकवा शाहरी' यांचें महत्त्व चिरंतन टिकणारें आहे.

अर्वाचीन उर्दूतील सर्वोत्कृष्ट लेखक सर महमद इक्बाल होत. यांचें स्वतंत्र तत्त्वज्ञान व उच्च काव्यकौशल्य यांची छाप सर्व देशावर पडली. पाकिस्तानची देशघातक कल्पना यांनींच पहिल्यानें प्रसृत केली. 'बांग–इ–दिरा', इस्लामची पुनर्घटना, बाली जिब्रिल, जावीद नामा, रमूज–ई–बेखुदी, दूर्ब–ई–कलीम, झुबूर–ई–आजम, इ. ग्रंथांनीं उर्दूला व इस्लामी आकांक्षांना जागतिक महत्त्व प्राप्त करून दिलें आहे. निजामांनीं उर्दू ही आपल्या राज्यांत राजभाषा ठरविल्यामुळें व तिचें स्वतंत्र विद्यापीठ स्थापन केल्यामुळें या भाषेचें महत्त्व विशेषच वाढलें आहे.

**ऊर्ध्वपातन**—( डिस्टिलेशन ). द्रवरूप पदार्थाला उष्णता देऊन त्याची प्रथम वाफ तयार करणें आणि नंतर ती वाफ गार करून तिला द्रवरूप करणें, या क्रियेला उत्पातन किंवा ऊर्ध्वपातन म्हणतात. द्रवरूप पदार्थांना शुद्ध करण्यासाठीं या क्रियेचा उपयोग होतो. ज्या वेळीं द्रवरूप पदार्थांत घनरूप पदार्थ विरघळलेला असतो त्या वेळीं ही क्रिया अवश्य

नसते; पण दोन द्रवरूप पदार्थांतून एक निराळा करतांना उत्पातनाची क्रिया पुनः पुनः करावी लागते. कारण अगोदर उकळणाऱ्या पदार्थाबरोबर दुसराहि पदार्थ थोड्याफार प्रमाणांत येतो. याचें नेहमींचें उदाहरण म्हणजे पाणी आणि अल्कोहोल. अल्कोहोल शुद्ध करतांना त्याच्या वाफेबरोबर पाण्याचीहि वाफ येतेच व उत्पातित ( डिस्टिल्ड ) अल्कोहोलांत पूर्वीइतकें नाहीं तरी कांहीं पाणी येतेंच; तेव्हां तें निःशेष घालविण्यासाठीं उत्पातनाची क्रिया अनेक वेळां करावी लागते.

पुनः पुनः उत्पातन करण्याचा त्रास वांचविण्यासाठीं कांहीं स्वतंत्र यंत्रें तयार केलेली असतात. त्यांच्या साहाय्यानें अल्कोहोल ज्या प्रमाणांत शुद्ध हवें असेल त्या प्रमाणांत तें मिळवितां येतें.

कोळसा, लाकूड, हाडें, वगैरे घनरूप पदार्थांचेंहि उत्पातन करतात. पण त्या उत्पातनानें मूळच्या पदार्थांचें विघटन होत असल्यामुळें त्या उत्पातनाला विघटनात्मक ( डिस्ट्रिक्टिव्ह ) उत्पातन किंवा निर्जल उत्पातन म्हणतात. त्या निर्जल उत्पातनाच्या साहाय्यानें अनेक उपयुक्त पदार्थ मिळत असल्यामुळें तो एक स्वतंत्रच धंदा झाला आहे.

**ऊर्ध्वपातन यंत्र**—( रेटार्ट, बकयंत्र ). उत्पातनासाठीं लागणारें भांडें. द्रवरूप पदार्थ शुद्ध करण्यासाठीं किंवा एकमेकांपासून विलग करण्यासाठीं त्याचा उपयोग होतो.

**ऊस**—( वर्ग-ग्रामिनी तृण; सॅकॅरम ऑफिसिनॅरम ). ऊस हें एका जातीचें तृण आहे. यापासून साखर तयार होते. याची जंगली जात कोठें आढळत नाहीं. पण याचें मूलस्थान आशिया खंड असावें. हा ७ ते ८ फूट उंच वाढतो. याचीं पानें रुंद असून त्यांत मध्यें रेषा असतात. याचा पृष्ठभाग गुळगुळीत असतो. याची लागवड सर्व पृथ्वीवरील उष्ण प्रदेशांत करण्यांत येते. याला एक वर्षानंतर फुलें येतात. एकदां लागवड केल्यावर ती सहा ते दहा वर्षें टिकते.

उंसापासून मुख्यत्वेंकरून गूळ व साखर तयार करतात. साखर तयार करतांना वायां जाणाऱ्या काकवीपासून अल्कोहोल ( दारू ) व चिपाडापासून कागद तयार करतां येतो.

उंसाच्या बुंध्यापासून सुमारें मध्यापर्यंत साखरेचें प्रमाण जास्त असतें व वाढयांत साखर अगदीं कमी असते. उंसाच्या वाढ्यांचा पानांसकट जनावरांच्या खाण्याकरितां उपयोग करतात. उंसाचा माणसांच्या खाण्याकरितांहि उपयोग करितात व विशेषतः जेवल्यानंतर उंसाचा मुखशुद्धीकरितां उपयोग करणें आरोग्यकारक समजलें जातें. उंसाचा रस काढून तो ताजा असतांना पिणें हें सुद्धां आरोग्यकारक आहे. कारण त्यायोगें पचनक्रियेस मदत होते.

---

## ऋ

**ऋ**—वर्णमालेंतील सातवें अक्षर. हें अक्षर इ. स. ६ व्या शतकांतील उष्णीषविजयधारणीच्या ताडपत्रांत प्रथम आढळतें. वर्तमान नागरी 'ऋ' याच आकृतीपासून बनला आहे. यानंतर दहाव्या शतकांतल्या एका नेपाळी हस्तलिखित पुस्तकांत व ११ व्या शतकांतील कांहीं लेखांत ऋ दिसतो.

**ऋग्वेद**—चारहि वेदांत ऋग्वेद हा मोठा व त्यांतील अगदीं प्राचीन असा ग्रंथ आहे. या वेदाचीं आठ अष्टकें आहेत. प्रत्येक अष्टकांत आठ आठ अध्याय असतात. मिळून एकंदर अध्याय ६४ आहेत. अध्यायांच्या पोटभागास वर्ग म्हणतात. वर्गांत ऋचा असतात. हे वर्ग सुमारें दोन हजार आहेत. मंत्रद्रष्टे ऋषी यांनीं रचलेले मंत्र निरनिराळे आहेत. ऋषींवरून ऋग्वेदाचे एकंदर दहा भाग केले आहेत. या भागांस मंडल असें नांव आहे. प्रत्येक मंडलांत अनुवाक् असतात. अनुवाकांच्या पोटांत सूक्तें व सूक्तांत ऋचा असे ऋग्वेदाचे विभाग केले आहेत. मंडलें दहा आहेत. अनुवाक् ८५. सूक्तें ( ११ वालखिल्यें धरून ) १०२८ आहेत. एकंदर ऋचा १०,५८०॥ आहेत. पदें १५३८२६, आणि अक्षरें ४,३२,००० आहेत. गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज, आणि वसिष्ठ हे अनुक्रमें २–७ मंडलाचे ऋषी आहेत. या ऋषींना 'माध्यम' म्हणतात. त्यांच्या मंडलांत विशेष रचनापद्धति दिसून येते. पहिल्या मंडलांत अनेक ऋषींचीं सूक्तें आहेत. या ऋषींस शतर्ची म्हणतात, कारण त्यांनीं शंभर शंभर ऋचा केल्या आहेत. आठव्या मंडलास प्रगाथ म्हणतात. नववें मंडल पहिलीं आठ झाल्यावर झालें असावें. यांत फक्त पवमानसोमाचें वर्णन आहे. वर सांगितलेल्या ऋषींनीं केलेलीं पवमानसूक्तें यांतच ग्रथित केलीं आहेत. दहावें मंडल शेवटीं झालें. यांत क्षुद्रसूक्तें व महासूक्तें आहेत. यांत पूर्वीच्या मंडलांत येणाऱ्या विषयांपेक्षां निराळे विषय आले आहेत. रुद्र, अग्नि आणि विशेषतः विश्वदेव, मन्यु, श्रद्धा, इत्यादि देवतांचें वर्णन यांत आहे. शिवाय विवाह, और्ध्वदेहिककर्म, सृष्टीची उत्पत्ति, तत्त्वज्ञान आणि वशीकरण, वगैरेंचे मंत्र, इ. नवीन

विषय या मंडलांत आले आहेत. अनेक देवता आहेत, ही कल्पना कमी कमी होत जाऊन एकच देव आहे ही भावना समाजांत जागृत झाली असावी असें या दहाव्या मंडलांत दिसतें.

ऋग्वेद हा हौत्रवेद असल्यामुळें होतृऋत्विजानें म्हणावयाचे मंत्र यांत आले आहेत. देवतांची स्तुति व त्यांचें माहात्म्य, वैभव, तेजस्वीपणा, औदार्य, ब्रह्मणपणा, इत्यादि गुणांचें वर्णन यांत आलेलें आहे. तसेंच आम्हांस गोधन द्या, संतति द्या, आमची भरभराट होऊं द्या, युद्धांत आम्हांस जय मिळो, आमच्या शत्रूंचें निसंतान होवो, आमचें वैभव वाढो, आणि आम्ही दीर्घायु होवो! अशा प्रकारच्या प्रार्थना या वेदांत आल्या आहेत. ऋग्वेदांत ३३ देवांचें वर्णन आलेलें आहे.

**ऋणमोचनदाय**—(इं. ॲसेट). एखाद्या व्यक्तीच्या किंवा कंपनीच्या मालमत्तेला ही कायदेशीर संज्ञा आहे. दरसाल कंपनीच्या हिशेबांत येणीं आणि देणीं (ॲसेट्स ॲंड लायबिलिटीज़) दाखविलीं जात असतात. कंपनीचें व्यापारांत असलेलें मांडवल व ऋणको व्यक्तीची सर्व मालमत्ता ही ऋणमोचनदायासाठीं घेतली जाते. ज्याला प्रत्यक्ष किंमत नाहीं (उदा., पत, व्यापारी चिन्ह, इ.) तीं येणीं अस्पर्शनीय (इन्टॅंजिबल) समजलीं जातात. ठेवी, रोकड व माल हीं नक्त येणीं (लिक्किड) समजतात.

**ऋतु**—वर्षाच्या हवामानाप्रमाणें पडणाऱ्या विभागांस ऋतु म्हणतात. पृथ्वीचा आंस कक्षेच्या पातळीशीं २३½° अंशांचा कोन करीत असल्यानें वर्षांतून वेगवेगळ्या वेळीं वेगवेगळ्या पृथ्वीवरील भागांना सूर्याचे उभे किरण मिळतात; म्हणजे सर्वांना एका वेळीं सारखी उष्णता मिळत नाहीं. उष्णकटिबंधांतल्यापेक्षां वाढत्या अक्षांशांत ऋतुमान फार जाणवतें. उष्णकटिबंधांत उन्हाळा आणि पावसाळा हे दोनच ठोकळ ऋतु पडतात. उत्तरेकडे हिंवाळा आणि उन्हाळा हे दोन मोठे ऋतु असतात. डिसेंबर ते फेब्रुवारी हिंवाळा व जून ते ऑगस्ट उन्हाळा. यांमध्यें वसंत आणि ग्रीष्म ऋतू पडतात. दक्षिण अक्षांशांत सहा महिन्यांनीं नंतर वरील ऋतू येतात.

ऋग्वेदांतील एका उताऱ्यांत वसन्त, ग्रीष्म आणि शरद् अशीं नांवें आहेत. ऋग्वेदकाळांत पावसाळा (प्रावृष्) आणि हिंवाळा (हिमा, हेमन्त) माहीत होते. वर्षाचे सर्वसाधारण विभाग (ऋग्वेदांत नसलेले) पांच असावेत. वसन्त, ग्रीष्म, वर्षा, शरद् व हेमन्त–शिशिर. कारणपरत्वें वर्षा–शरद् एक विभाग कल्पून हे पांच ऋतु दुसऱ्या प्रकारानें विभागीत. कधीं कधीं हेमन्त आणि शिशिर असे दोन ऋतू धरून सहा ऋतू आहेत असें मानीत. जसजसे वैदिक आर्य पूर्वेकडे येत गेले तसतशी तीनपासून पांच ऋतूंची वाढ झाली असें कांहीं प्राच्यविद्याविशारदांचें म्हणणें आहे.

**ऋतुपर्ण**—इक्ष्वाकुकुलोत्पन्न अयोध्येचा राजा. हा अक्षविद्यादिकांत फार निपुण असे. वीरसेनपुत्र नलराजा याचा परममित्र होता व अज्ञातवासांत नल याच्याकडे अक्षविद्या शिकला. 'ऋतुपर्णस्य राजर्षेः कीर्तनं कलिनाशनम्।' असें प्रातःस्मरणांत याचें स्मरण येतें.

**ऋत्विज**—श्रौतकर्म करण्याकरितां जो पुरोहित असतो त्यास ऋत्विज असें म्हणतात. ऋत्विज म्हणजे नियमित वेळीं यजन करणारा. अग्निहोत्री रोज सकाळसंध्याकाळचा होम स्वतःच करतो. दर्श–पौर्णमासी इष्टींच्या वेळीं अध्वर्यु, ब्रह्मा, होता व आग्नीध्र असे चार ऋत्विज असतात. चातुर्मास्य यागांत प्रतिप्रस्थाता हा एक अधिक लागतो. पशुयागांत मैत्रावरुण या ऋत्विजाची भर पडते. अग्न्याधानांत प्रथम उद्गात्याचा प्रवेश होतो. अग्निष्टोमांत वरील सात व आणखी नऊ अच्छावाक, उन्नेता, ग्रावस्तुत्, पोता, प्रस्तोता, प्रतिहर्ता, नेष्टा, ब्राह्मणाच्छंसी व सुब्रह्मण्य असे मिळून एकंदर सोळा ऋत्विज लागतात. यांखेरीज सद मंडपांत बसणारा सदस्य हा एक सतरावा ऋत्विज लागतो.

यज्ञांतील सात आचार्यांपैकीं मुख्य होतृ. त्याचें काम मंत्र म्हणणें आणि पूर्वी तो मंत्रांची रचनाहि करणारा असे. अध्वर्यु हा मंत्रनिर्दिष्ट तांत्रिक काम करी, आणि काम करतांना प्रार्थनामंत्र आणि अशुभनिवारणार्थ प्रार्थनापठण करीत असे. त्याचा मुख्य मदतनीस आग्नीध्र हा असे आणि हे दोघे जण इतर कोणाच्याहि साहाय्याशिवाय बारीक सारीक होम करीत असत. प्रशास्तृ-उपवक्तृ अथवा त्याचें दुसरें नांव मैत्रावरुण हे दोघे फक्त मोठमोठ्या यज्ञांत होत्याला कांहीं सूचना करण्यांत गुंतलेले असत आणि त्यांच्याकडे सामाजिक प्रार्थनेचें काम सोंपविलेलें असे. पोतृ, नेष्टृ, आणि ब्रह्मा हे सोमयज्ञाच्या विधीला लागत असत. या आचार्यांशिवाय एक पुरोहित म्हणून असे. त्याचें काम म्हणजे राजाला धार्मिक बाबतींत उपदेश करावयाचा.

**ऋषभ**—पहिला जैन तीर्थंकर. वंश इक्ष्वाकु. याचें लांछन वृषभ आहे. निर्वाणस्थान कैलास पर्वत आहे. या तीर्थंकराच्या पंचकल्याणिकांच्या पर्वतिथी पुढीलप्रमाणें—गर्भ० आषाढ व. २; जन्म० व दीक्षा० चैत्र व. ९; केवलज्ञान० फा. व. ११; मोक्ष० मा. व. १४. हिंदु धर्मांतील भागवत व स्कंद पुराणांतून जो ऋषभदेव वर्णिला आहे त्याचींहि मातापितरें जैनऋषभाप्रमाणें मेरुनाभि होत. हा शेवटीं जडोन्मत्ताप्रमाणें नग्नावस्थेंत फिरूं लागला असें म्हटलें आहे. त्यावरून बुद्धाप्रमाणें पहिल्या जैनतीर्थंकरालाहि हिंदु पुराणव्यक्तींत स्थान मिळालें असावें. इतर तीर्थंकरांप्रमाणें ऋषभनाथाचींहि देवळें आहेत.

**ऋषि**—वेदांतील मंत्रांचा साक्षात्कार ज्यांना झाला ते ऋषि, अशी या शब्दाची व्याख्या आहे. आध्यात्मिक जीवनांतील गूढ तत्त्वें ऋषींस पूर्णपणें विदित असतात. तपश्चर्यादि मार्गानें ते काल कंठतात. प्राचीन ऋषींत गौतम, भारद्वाज, विश्वामित्र, वसिष्ठ, जमदग्नि, कश्यप व अत्रि हे प्रमुख म्हणून गणले आहेत व ते सप्तर्षि म्हणून ओळखले जातात. ऋषि शब्द उच्चारला कीं आध्यात्मिक जीवन, त्यांतील गहन सिद्धान्त, साक्षात्कार, दिव्य सिद्धि, वगैरे अनेक कल्पनाचित्रें मनश्चक्षूंपुढें येऊन उभीं राहतात. अर्थात् रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ या अर्वाचीन महनीय व्यक्तीहि डोळ्यांपुढें येऊन प्राचीन ऋषींची ओळख करून देतात.

**ऋषिपंचमी**—हें एक स्त्रियांनीं करावयाचें व्रत आहे. तें करण्याचा दिवस भाद्रपद शुद्ध पंचमी हा होय. या दिवशीं स्त्रियांनीं मोठ्या भक्तिभावानें सप्तर्षि व अरुंधती यांची पूजा करावी व ऋषींची कथा ऐकावी. त्या दिवशीं कंदमुळांवर राहावें. तसेंच बैलाच्या श्रमानें जे जिन्नस तयार झाले आहेत ते सर्व त्या दिवशीं त्याज्य समजावेत.

**ऋष्यशृंग**— विभांडक ऋषीचा पुत्र. याच्या डोक्यावर एक हरणाचें शिंग होतें म्हणून त्याला ऋष्यशृंग हें नांव पडलें. हा बरेच दिवस ब्रह्मचर्याश्रमांत राहून विद्यार्जन करीत असे.

एकदां लोमपाद राजाच्या राज्यांत मोठी अनावृष्टि पडली; तेव्हां ऋषीनें राजास सांगितलें कीं, देव रागावले असल्यामुळें ऋष्यशृंग ऋषीस आपल्या राज्यांत आणिल्यास पाऊस पडेल. राजकन्या शांता हिनें ऋषीला मोह पाडून आणण्याचें काम केलें. ती त्याला आपल्या बापाच्या राज्यांत घेऊन गेली. तो तेथें जातांच मोठा पाऊस पडूं लागला. मोठमोठ्या देणग्या देऊन त्याच्या पित्याचें समाधान केल्यानंतर लोमपादानें ऋष्यशृंगास आपला जांवई केलें.

---

## ए

**ए**—मराठी वर्णमालेंतील आठवें अक्षर. पण संस्कृत वर्णमालेंतील हें अकरावें आहे. या वर्णाला सध्याचें स्वरूप प्राप्त होण्याला पांच अवस्थांतून जावें लागलें आहे: पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार लेखांत; दुसरी इ. स. ६ व्या शतकांतल्या उष्णीषविजय धारणीच्या ताडपत्री पुस्तकांत, तर तिसरी त्याच शतकांतील महानामन्च्या बुद्धगया येथील लेखांत आढळते. चौथी धार येथील शिलेवरील परमार भोजाच्या कूर्मशतक काव्यांत स्पष्ट दिसते; हिचा काळ इ. स. ११ वें शतक हा आहे. यानंतर या अक्षराला अर्वाचीन स्वरूप (पांचवें) प्राप्त होण्याला फार वेळ लागला नाहीं.

**एइग**—स्कॉटलंडच्या पश्चिम किनाऱ्यापासून सुमारें दहा मैलांवर ५ मैल लांबीचें व ३ मैल रुंदीचें हें बेट असून त्याचें वैशिष्ट्य म्हणजे त्याचा किनारा समुद्रापासून उंच असून सर्व बेट खडकाळ आहे. तसेंच एक बाजू भिंतीसारखी असून तिची उंची १३३९ फूट आहे. जणुं काय ही एक पाण्यांतून निघालेली भिंतच असें दिसतें.

**एओसीन**—(नवप्रभात). भूस्तरशास्त्रांत चतुर्थ युगांतील अगदीं खालच्या थरांस एओसीन थर म्हणतात. यांचे दोन थर असतात: एक खालचा व दुसरा वरचा. या वरच्या थरास अलीकडे ओलिगोसीन म्हणतात. यामध्यें कार्बनमिश्रित चिखल, चुनखडी, माती व वालुकामिश्रित दगड असतात. असे थर आइल ऑफ वाइट या बेटामध्यें, आग्नेय इंग्लंडमध्यें, वायव्य फ्रान्समध्यें, मध्य युरोपांत, पश्चिम आशियांत, उत्तर आफ्रिकेंत, व उत्तर अमेरिकेच्या अटलांटिक किनाऱ्यावर आढळतात.

**एकतत्त्ववाद**—(मोनिझम). या जगांत फक्त एकच सत्य तत्त्व आहे, मग तें भौतिक असो किंवा आध्यात्मिक असो, या तत्त्वज्ञानविषयक मतास एकतत्त्ववाद म्हणतात. सर्व ज्ञानाचा उद्देश या विश्वाचें स्पष्टीकरण करण्याचा आहे व दोन किंवा अधिक सर्वस्वीं भिन्न सत्य स्वरूपें गृहीत धरणारे 'द्वितत्त्ववादी' व 'बहुतत्त्ववादी' या विश्वाचें स्पष्टीकरण करूं शकत नाहींत, येथपर्यंत एकतत्त्ववाद्यांचें म्हणणें बरोबर आहे. पण आपल्या बुद्धीस स्पष्ट दिसणारे महत्त्वाचे भेद जेव्हां ते अमान्य करतात तेव्हां हा वाद पटत नाहीं.

एकतत्त्ववादाचे सर्व प्रकार प्लोटिनसपासून आजतागायतचें व्यक्तीचें स्वतंत्र अस्तित्व व इच्छाशक्ति अमान्य करतात व भूतांचा एका निर्गुण, निराकार अशा केवळ शून्य तत्त्वांत अंतर्भाव करतात. यामुळेंच एकतत्त्ववादावर जोराची टीका झाली आहे. या मताच्या ऐतिहासिक स्वरूपाकडे पाहिलें तर प्लोटिनस यास गूढ एकतत्त्ववादी म्हणावें लागेल. तो त्या एक तत्त्वाशीं गूढ संयोगानें तादात्म्य पावून आपण या सर्व दृश्य चमत्कारांपलीकडे गेलों आहों असें प्रतिपादी.

हेगेल हा बौद्धिक एकतत्त्ववादी आहे. तो भौतिक प्रकृति, इंद्रियसंवेदना, व्यक्तित्व व इच्छाशक्ति हीं सर्व विचारांचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत, असें म्हणतो. शॉपेनहार व फॉन हार्टमन यांचा एकतत्त्ववाद एक विश्वव्यापी इच्छाशक्ति असून तींत सर्व वैयक्तिक इच्छाशक्तींचा लोप होतो, अशा प्रकारचा आहे. हेगेलचा एकतत्त्ववाद हा शुद्ध भौतिक वादच या निराळ्या

नांवाखालीं मांडला आहे. या सर्व वादांत आपल्याकडील अद्वैत-वादाचें स्वरूप थोड्या-फार प्रमाणांत आढळतें. या सर्व वादांचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, आपल्या बुद्धीला जे निरनिराळे भेद दिसतात–विशेषतः आपण वैयक्तिक अथवा अवैयक्तिक असे जे भेद करतों–ते एका विवक्षित मर्यादेपर्यंतच तात्पुरते मान्य करून आपल्या अनुभवाला व विचाराला पटेल असें त्यांच्या मुळाशीं जें एकतत्त्व असेल त्याचा शोध करीत गेलें पाहिजे.

**एकतारी**—एक वाद्य. कछव्यास जसा गोल चापटका भोपळा लाविलेला असतो त्या प्रकारचा भोपळा घेऊन त्यास इंच-सव्वाइंच व्यासाची वेळूची दांडी सुमारें दोन-अडीच फूट लांबीची बसवितात व मग सदर भोपळा कातड्यानें मढवितात. ह्याच्या मध्यभागीं घोडी ठेवितात. वेळूच्या दांडीस एक खुंटी बसविलेली असते. तिला तार गुंडाळून ती घोडीवरून भोपळ्याच्या बुडाशीं जो दांडीचा भाग आलेला असतो त्यास मारलेल्या बारीक खुंटीस खिळवितात. यास एकच तार असते म्हणून याला 'एकतारी' असें नांव आहे. भजनी लोक, तसेंच जंगम, गोसावी, वगैरे भिक्षा मागणारे लोक ह्या वाद्याच्या सुरावर पदें, अभंग, वगैरे भक्तिरसात्मक गीतें रस्त्यावर गातात व दुसऱ्या हातांत घेतलेल्या चिपळ्यांनीं ताल देतात.

**एकदली वनस्पती**—(मोनोको टायलेडनस प्लँट). आवृत बीज अथवा सकोशबीज (अँजिओस्पर्म) वर्गांतील लहान वर्ग. या वर्गांतील वनस्पतींच्या बियांमध्यें एकच गर्भपर्ण असतें म्हणून त्यांस एकदल वनस्पती म्हणतात. द्विदल वनस्पतींमध्यें व या वनस्पतींमध्यें मुख्यतः पुढील भेद असतातः या वनस्पतींच्या खोडांतील पेशींचे पुंज इतस्ततः पसरलेले असतात. काष्ठजनकस्तरांचा अभाव असतो. यांच्या पानांतील शिरा समांतर असतात. आणि यांच्या व द्विदल वनस्पतींच्या पुष्पांतील अवयवांच्या संख्येमध्यें फरक असतो.

**एकनाथ** (१५४८–१५९९)–एक मोठा महाराष्ट्र संत व कवि. एकनाथाचा जन्म शके १४७० मध्यें पैठणास झाला. पूर्वी भानुदास या नांवाचा एक भगवद्भक्त देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण पैठणांत होऊन गेला. त्याच्याच वंशांत एकनाथ जन्मला. भानुदासाचा मुलगा चक्रपाणि. चक्रपाणीचा सूर्यनारायण व सूर्यनारायणाचा एकनाथ अशी एकनाथाची पितृपरंपरा आहे. एकनाथाच्या आईचें नांव रुक्मिणी. एकनाथाच्या जन्मानंतर त्याचीं मातापितरें लवकरच निवर्तलीं. यामुळें एकनाथाचें पालनपोषण त्याचा आजा चक्रपाणि यानें केलें. याची सहाव्या वर्षी मुंज होऊन पुढें विद्याभ्यासास सुरुवात झाली. एक दिवस एकनाथास असा दृष्टान्त झाला कीं, देवगिरीस जनार्दनपंत हा दत्तोपासक आहे, त्याचा अनुग्रह घ्यावा. याप्रमाणें एकनाथानें जनार्दनपंताकडे जाऊन त्याचा अनुग्रह घेतला व त्याजपाशीं पुढील ज्ञान संपादन केलें. जनार्दनपंतानें एकनाथास शके १४८० मध्यें उपदेश दिला व एकनाथानें ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांचें अध्ययनहि जनार्दनस्वामीपाशींच केलें. स्वामीच्या आज्ञेनें चतुःश्लोकी भागवत या ग्रंथास एकनाथानें टीका लिहिली ती फारच सरस आहे. पुढें जनार्दनस्वामींनीं एकनाथास श्रीमद्‌भागवताच्या एकादश स्कंधावर व्याख्यान करण्यास सांगितलें. पैठणास नाथानें लेखनास आरंभ करून संवत् १६३० या सालीं हा ग्रंथ पुरा केला. भागवत संपल्यानंतर पुरे पांच महिने लोटले नाहींत तोंच एकनाथानें 'रुक्मिणी स्वयंवर' लिहिलें. पौराणिक आख्यानांवर रचलेले दुसरे लहान लहान ग्रंथ 'बालक्रीडा', 'प्रल्हाद चरित्र' व 'शुकाष्टक' हे होत. हीं आख्यानें रचून एकनाथानें प्रथमच आख्यानवाङ्मयाचा पाया घातला व मराठींत काव्यरस ओतला. 'शुकाष्टका' शिवाय शुकाष्टकाच्या आधारें रचिलेला 'स्वात्मसुख' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे; अद्वैतावर हा लहानसा ग्रंथ फारच उत्कृष्ट उतरला आहे. स्वात्मानुभवाप्रमाणेंच 'आनंद–लहरी', 'अनुभवानंद', आचार्यांच्या हस्तामलकावरील टीका, चिरंजीवपद, गीतासार, मुद्राप्रकाश हे सर्व ग्रंथ वेदान्तपर असून अद्वैतमतप्रधान आहेत. यांखेरीज पदें, भारुड, वगैरे लहान लहान चुटके आणि अभंग अशी विविध रचना एकनाथानें केली आहे.

हे लहानसहान ग्रंथ लिहीत असतांना फार मोठें असें एक मराठी भाषेसंबंधाचें काम एकनाथानें आरंभिलें. तीनशें वर्षांपूर्वी लिहिलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रती मिळवून तो ग्रंथ शुद्ध करण्यास आरंभ केला. एकनाथानें आळंदीस जाऊन ज्ञानेश्वरांच्या समाधीचा जीर्णोद्धार शके १५०५मध्यें ज्येष्ठांत केला आणि नंतर वर्षे-सव्वा वर्षानें म्हणजे १५०६ च्या भाद्रपदांत ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार पुरा झाला.

एकनाथाचा ग्रंथरचनेचा उद्योग अखेरपर्यंत सतत चालू होता असें दिसतें. आपल्या पूर्ववयांत यानें भागवतासारखा ग्रंथ मराठींत आणिला व त्यावर टीका रचिली. तसेंच उत्तरवयांतहि यानें दुसरा एक मोठा ग्रंथ रचण्याचा उपक्रम केला. हा ग्रंथ रामायण होय. मूळ रामायणाच्या आधारें हा ग्रंथ मराठींत लिहिण्यास सुरुवात अगदीं साठीच्या सुमारास केली असावी असें दिसतें. भावार्थ रामायण ग्रंथ युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायापर्यंत रचून झाल्यावर एकनाथाची प्रकृति विशेष क्षीण झाली आणि ग्रंथरचनेचे परिश्रम त्याच्यानें होईनात. तेव्हां पुढील ग्रंथ लिहिण्याचें काम आपला एक शिष्य गावबा यावर एकनाथानें सोंपविलें.

एकनाथ हा शके १५२१ मध्यें फाल्गुन वद्य षष्ठीस पैठणास समाधिस्थ झाला.

एकनाथाची साधु म्हणून मोठी ख्याति आहे. त्यानें केलेले चमत्कार महिपतीनें भक्तिविजयांत वर्णिले आहेत. एकनाथ अस्पृश्यता, जातिभेद, वगैरे सामाजिक दोष मानीत नव्हता, असें दाखवून देणाऱ्या कांहीं कथाहि सांगतात. महाराष्ट्रांत भागवतधर्माची ध्वजा नाथानें भक्कम रोविली. वारकरीपंथांत ज्ञानेश्वरानंतर एकनाथाला मोठा मान देतात.

**एकपेशी प्राणी**—(प्रोटोझोआ) हा एक प्राणिवर्गांतील सर्वांत खालचा वर्ग असून या वर्गांतील प्राण्यांचें शरीर फक्त एकाच पेशीचें बनलेलें असतें व तें केवळ सूक्ष्मदर्शक यंत्रांतूनच दिसूं शकतें. याचें शरीर केवळ जीवनरसयुक्त कणांचें असून त्याला विशेष आकार नसतो, व तें एखाद्या बारीक थेंबासारखें असून त्यामध्यें फक्त थोडी सरण्याची शक्ति असते. या जातीच्या कांहीं प्राण्यांमध्यें शरीरावर एक नाजूक व लवचिक अंतस्त्वचायुक्त आवरण असून त्यास विशिष्ट आकार असतो व अत्यंत सूक्ष्म असे कांहीं सूत्रमय अवयव पुढें आलेले असतात. किंवा कांहीं आंखूड असून ते वरचेवर वांकडे व सरळ होत असतात. या सर्वांचें पुनरुत्पादन पेशीविभजनानें होतें. परंतु कांहीं प्राण्यांच्या बाबतींत स्वतंत्र रीतीनें अयोनिज पद्धतीनें नवीन पेशी निर्माण होतात. हे एकपेशीमय प्राणी सर्वत्र आढळतात. यांपैकीं कांहीं परोपजीवी असून हिंवताप, पीतज्वर, निद्रारोग, वगैरेसारखे रोग उत्पन्न करतात. याचे चार निरनिराळे वर्ग पाडण्यांत येतात.

**एकबटाना**—इराण देशांतील एक प्राचीन शहर. यास हल्लीं हमदान असें नांव आहे. सायरसनें येथें इराणी साम्राज्याची स्थापना केली. येथें इराणचे राजे वास्तव्य करीत. पार्थिअन राजांची हीच राजधानी होती.

**एकर**—(एक्रा अथवा सेंट जीन द एकर). हें पॅलेस्टाइन-मधील एका जिल्ह्याचें मुख्य शहर आहे. एकरच्या उपसागराच्या उत्तर टोंकावरील एका भुशिरावर हें शहर वसलेलें आहे. एकरची लोकसंख्या सु. ११,००० आहे. पैकीं ८,००० मुसलमान व बाकीचे यहुदी व ख्रिस्ती आहेत. किनाऱ्यावर असल्यामुळें व इतर कारणांनीं याला 'पॅलेस्टाइनची किल्ली' म्हणत असत. येथील व्यापार मंद होत चालला असून शहराचा वारंवार नाश झाल्यामुळें येथें पाहण्यालायक इमारती मुळींच नाहींत. येथील पडलेली भिंत धर्मयुद्धाच्या वेळची असून मशीद जेझरपाशानें बांधली आहे. एकर हें बाबिस्ट धर्मपंथाचें मुख्य ठिकाण आहे.

**एकलव्य**—निषादाधिपति हिरण्यधेनुकाचा पुत्र. द्रोणाचार्यांनीं कौरव राजपुत्रांबरोबर याला धनुर्विद्या शिकविण्याचें नाकारल्यावरून यानें त्यांच्या पादुका गुरुस्थानीं स्थापून स्वतःच धनुर्विद्येचा अभ्यास करून तो तींत प्रवीण झाला. कौरव राजपुत्रांना त्याच्या अलौकिक धनुर्धारित्वाबद्दल वैषम्य वाटून त्यांनीं द्रोणाचार्यांकडे तक्रार केली. द्रोणानीं हा अर्जुनाच्या वरचढ होऊं नये म्हणून अशी गुरुदक्षिणा मागितली कीं, तूं बाण सोडतांना अंगठा लावीत जाऊं नकोस. हें मत सर्व किरात अद्याप पाळतात असा समज आहे.

**एकलिंगजी**—मेवाडांत उदेपूर शहरापासून एक मैलावरील एक देवस्थान. एकलिंगजीचें संस्थान मोठें आहे. वैष्णव मारवाड्यांत ज्याप्रमाणें दोन स्नेही एकत्र भेटले असतां 'जय-गोपाल' म्हणून परस्परांस नमस्कार करतात, त्याचप्रमाणें मेवाडांत 'जय एकलिंगजी' म्हणून नमस्कार करतात. येथें प्रत्यहीं दोनशें रुपयांचा खर्च आहे. एकलिंगजीचें देऊळ डोंगराळ प्रदेशांत आहे. एकलिंगजीच्या देवळांत 'गद्धयाची सोगण' म्हणून एक स्तंभ पुरला आहे.

**एकशृंगी**—(युनिकॉर्न). हा एक काल्पनिक प्राणी आहे. हा घोड्यासारखा असून याला कपाळावर एक शिंग असतें अशी कल्पना आहे. इंग्लंडच्या राजचिन्हावर याचें जें चित्र आहे तें मूळ स्कॉटलंडच्या राजचिन्हावर होतें. मोहेंजोदारोच्या उत्खननांत अशा एकशिंगी प्राण्यांच्या प्रतिमा सांपडल्या आहेत.

**एकाकी गोलशिला**—(एरॅटिक्स). फार प्राचीन काळीं हिमयुगामध्यें जे हिमप्रवाह वाहत असत त्यांच्या योगानें मोठमोठे वाटोळे दगड त्यांच्या मूळ ठिकाणापासून हे हिमप्रवाह त्यांस दूरवर वाहून नेत असत व त्यामुळें ते भिन्न परिस्थितींत एकाकी आढळतात. उदाहरणार्थ, स्कॉटलंडमध्यें व इंग्लंडमधील सरः प्रदेशांत जे मोठमोठाले वालुकामय वाटोळे पाषाण आढळतात, तसे दगड इंग्लंडमधील मध्य प्रदेशांत आढळतात व तेथून ते सध्यांच्या ठिकाणीं गेले असावे.

**एकांगवीर**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारा, गंधक, कज्जली, कांतलोहभस्म, वंग, नाग, ताम्र, अभ्रक, तीक्ष्ण लोह, त्रिकटु, त्रिफळा हीं मुख्य औषधें आहेत. पक्षघात, धनुर्वात, इत्यादि वातविकारांवर हें एक महत्त्वाचें औषध आहे. अंगांत चमका निघणें, हातपाय जड होणें, हातापायाला मुंग्या येणें, शरीर रुक्ष होणें, शरीरांतील चेतनाशक्ति कमी होणें, कंबर, मांड्या, गुडघे, इत्यादींतून चमका निघणें, हातपाय आंखडल्यासारखे होणें, इत्यादि लक्षणांवर या औषधाचा चांगला उपयोग होतो. ½ ते १ गुंज आल्याच्या रसाबरोबर हें देतात.

**एकाटेरिनोस्लाव्ह**—रशियन साम्राज्यापैकीं युक्रेन संस्थानांत याच नांवाच्या प्रांताचें राजधानीचें शहर. हें नीपर नदीच्या उजव्या कांठावर वसलेलें आहे. हें लोखंड, यंत्रें, तमाखू व बीअर दारू यांच्या कारखान्यांचें केंद्र आहे. याची लोकसंख्या सुमारें दोन लाख आहे. या प्रांतांत खनिज संपत्ति विपुल आहे.

विशेषतः दगडी कोळसा, लोखंड, मँगॅनीझ धातु व खनिजें मीठ येथें मुबलक सांपडतें. येथील जमीन काळी, सुपीक असून गहूं व इतर धान्यें यांचें पीक विपुल येतें. येथून धान्यें, गुरें, कमावलेलीं कातडीं व सोवीं कातडीं आणि प्राणिज चरबी हा माल बाहेर पाठवला जातो. प्रांताचें क्षेत्रफळ २४,४७८ चौ. मैल आहे.

**एकाटेरिनोदार**—हें रशियांत कॉकेशस पर्वताच्या प्रदेशांत कुबन नदीवर वसलेलें शहर आहे. लोकसंख्या सुमारें एक लाख आहे. १९२० सालीं येथें एक विद्यापीठ स्थापन झालें. येथें गुरांचा मोठा व्यापार चालतो.

**एकात्मकेश्वरवाद्**—( युनिटेरिआनिझम ). हा ख्रिस्त धर्मातील एक पंथ आहे. या पंथाचें मत असें कीं, ईश्वर एकात्मक आहे; पिता, पुत्र व पवित्र आत्मा असा त्र्यात्मक नाहीं. एकात्मक ईश्वर या आशयाचा शब्दप्रयोग प्रथम ट्रानसिल्व्हानियन डायेटनें १६०० सालीं प्रचारांत आणला, आणि १६३८ पासून त्या धार्मिक पंथाला हें नांव देण्यांत आलें. इंग्लंमध्यें जॉन बिडल ( १६१६–१६६२ ) हा पहिला 'युनिटेरियन' होय. या मताचा पुरस्कार करणारा सर्वांत श्रेष्ठ ग्रंथ सॅम्युएल क्लार्क याचा 'दि स्क्रिप्चर डॉक्ट्रिन ऑफ दि ट्रिनिटी' हा होय. १८२५ सालीं 'ब्रिटिश अँड फॉरिन युनिटेरियन असोसिएशन' स्थापन होऊन या पंथाचा प्रसार अमेरिकन संयुक्त संस्थानांत झाला. इंग्लंडांतील या पंथाचे पुरस्कर्ते जॉन जेम्स टेलर, जॉन हॅमिल्टन थॉम, आणि जेम्स मार्टिन्यू ( १८०५–१९०० ) हे असून अमेरिकेंतील पुरस्कर्ते इमर्सन, पार्कर, हेज, इत्यादि होत. इंग्लंडांत ३५० युनिटेरियन धर्ममंडळें आहेत, व संयुक्त संस्थानांत ५०० मंडळें आहेत.

**एकात्मसत्तावाद्**—( सोलिप्सिझम ). हा तत्त्वज्ञानांतील एक पारिभाषिक शब्द आहे. या सिद्धान्ताचा अर्थ असा कीं, विचार करणारा जो मनुष्याचा जीवात्मा ( इगो ) आणि मनुष्याचें मन हींच फक्त वस्तुतः सत्य आहेत, आणि बाह्य जड सृष्टि हिला स्वतंत्र अस्तित्व आहे कीं नाहीं, हा प्रश्न संशयास्पद आहे.

**एकादश रुद्र**—या अकरा रुद्रांचा ब्राह्मणग्रंथांत तेहतीस देवांच्या गटांत "अष्टौवसवः एकादशरुद्राः द्वादशादित्याः" असा उल्लेख आहे. येथें एकादश रुद्रांचीं नांवें दिलेलीं नाहींत. या रुद्रांचीं नांवें निरनिराळ्या पुराणांत निरनिराळीं आढळतात. एकट्या भारतांतच आदिपर्वांत निरनिराळीं आढळतील. सामान्यतः १ वीरभद्र, २ शंभु, ३ गिरीश, ४ अजैकपात्, ५ अहिर्बुध्न्य, ६ पिनाकी, ७ अपराजित, ८ भुवनाधीश्वर, ९ कपाली, १० स्थाणु व ११ भव हे अकरा रुद्र परिचयाचे आहेत.

**एकादशी**—एक वैष्णव व्रत. प्रत्येक पंधरवड्यांतील अकरावी तिथि ती एकादशी. एकादशीच्या दिवशीं उपवास करावयाचा असून दुसऱ्या दिवशीं त्या व्रताची पारणा करतात. हें व्रत काम्य व नित्य करावयाचें असें आहे. एकादशींत स्मार्त व भागवत असे दोन भेद आहेत.

एकादशीच्या उत्पत्तीसंबंधीं पद्मपुराणांत पुढील कथा आहे—कृतयुगांत अत्यंत उन्मत्त अशा मुर नामक दैत्याच्या वधाकरितां देवांनीं विष्णूची प्रार्थना केली. तेव्हां मुर दैत्याचा वध करण्याची प्रतिज्ञा करून विष्णूनें सर्व देवांसह चंद्रावती नगरींत जाऊन दैत्यांशीं युद्ध सुरू केलें. देव पळून गेलेच, पण पुष्कळ वेळ युद्ध करूनहि विष्णूचें कांहीं न चालल्यामुळें शेवटीं तो पळून जाऊन बदरिकाश्रमीं एका गुहेंत दडून बसला. मुर दैत्य विष्णूचा पाठलाग करीत त्याच गुहेजवळ आला असतां तेथें त्यास शस्त्रास्त्रांनीं युक्त अशी एक सुंदरी प्रकट होऊन तिनें नुसत्या हुंकारानेंच दैत्यास मारलें. तेव्हां तिला विष्णूनें वर दिला. ती एकादशी देवता होय.

**एकेश्वरवाद्**—( मोनॉथेइझम् ). धर्मशास्त्रांतील हा एक पंथ आहे. या पंथाचें मत असें कीं, देव किंवा ईश्वर एकच आहे व त्याचें पूजन करावें. हें मत अनेकेश्वरी पंथ (पॉलिथेइझम्) आणि सर्वेश्वरी पंथ ( पॅन्थीइझम् ) यांना विरोधी आहे. एकेश्वरी मताचे आधुनिक धर्म, ज्यूधर्म, ख्रिस्ती धर्म व इस्लामी धर्म हे आहेत. ख्रिस्ती एकेश्वरवाद हा हिब्रू एकेश्वरवादाचाच विकास होय; आणि महमद पैगंबर यांनींहि 'ईश्वर फक्त एकच आहे' ही कल्पना त्या हिब्रू पंथांतून बहुधा घेतलेली असावी. ज्यूधर्मी लोक व इस्लामधर्मी लोक, ख्रिस्ती धर्मातील 'व्यक्तित्रयात्मकदेव' ( ट्रिनिटी–त्रिमूर्ति ) हें मत शुद्ध एकेश्वरी मताचें विकृत स्वरूप आहे, असें मानतात.

**एक्झीटर**—हें शहर इंग्लंडमधील डेव्हनशायर परगण्याचें मुख्य शहर व म्युनिसिपल, राजकीय व पार्लमेंटरी बरो आहे. हें लंडनच्या पश्चिम नैर्ऋत्येस १७२ मैल आहे. १९४५ सालीं येथील लोकसंख्या ३७,३१० होती. येथील हायस्ट्रीट व फोरस्ट्रीट रस्ते फार प्रेक्षणीय आहेत. अर्वाचीन वस्ती व सभोंवतालचा भाग प्रेक्षणीय आहे. येथील कॅथीड्रलहि सुंदर आहे.

एलिझाबेथच्या कारकीर्दींत बांधलेल्या गिल्ड हॉलमध्यें जनरल मंक व ऑलिअन्सची डचेस हेन्री एटा यांचीं चित्रें आहेत. आल्बर्टच्या स्मरणार्थ बांधलेल्या पदार्थसंग्रहालयांत कलाभुवन व मोफतवाचनालय आहे. येथें रोगमाँट नांवाचा किल्ला होता; त्याचे अवशेष आहेत.

येथें विद्यापीठाचें एक कॉलेज आहे. एक्झीटर हें रेल्वेचें केंद्रस्थान असून समुद्रावरील व्यापाराचेंहि ठिकाण आहे. एक्झीटर

जहाज-कालवा, एलिझाबेथच्या कारकीर्दींत बांधला गेला. नदीच्या मुखाजवळ एक्समौथ बंदर आहे. कागद, धान्य व सफरचंदाचें मद्य हा येथील निर्यात माल होय.

**एक्स-ला-शापेल**–आशेन पहा.

**एचिडना**—ऑस्ट्रेलियांतील दांत नसलेला एक सस्तन प्राणी. त्याचा आकार साधारणपणें डुकरासारखा असून त्याची जीभ लांब असते. त्याच्या पायाला पांच बोटें असून ते बळकट असतात. तो आपल्या जिभेनें कृमी व कीटक पकडून खातो व त्यावर त्याची उपजीविका चालते. याचीच एक जात साळ ही असून ती मुंग्यांवर आपली उपजीविका करते.

**एचुका**—ऑस्ट्रेलिया, व्हिक्टोरिया प्रांतांतील मरे नदीच्या कांठावरील एक शहर. न्यू साउथ वेल्समधील मोआमा शहर या शहराशीं पुलानें जोडलेलें असून पुलावरून लोहमार्ग व इतर वाहनांसाठीं मार्ग असे मार्ग आहेत. लोंकर व इमारती लांकडांचा या शहरांतून मोठा व्यापार चालतो. लो. सं. ४,४८०.

**एज्वर्थ, मेरिआ** (१७६७–१८४९)—एक आयरिश कादंबरी लेखिका. तिची आयरिश जीवनक्रमाबद्दलची पहिली कादंबरी 'कॅसल रॅकरेंट' १८०० मध्यें प्रसिद्ध झाली आणि या कादंबरीनें तिला एकदम प्रसिद्धि मिळवून दिली. त्यानंतरच्या तिच्या कादंबऱ्या व इतर ग्रंथांपैकीं 'बेलिंडा,', नैतिककथा, 'लिओनोरा', लौकिककथा, शिष्टकथा, 'पेट्रनेज,' , 'हॅरिंग्टन,' 'ऑर्मंड अँड हेलेन,' हे प्रमुख असून आयरिश बुल्स या विषयावर तिचा एक निबंध आहे.

**एटना**—हा पर्वत युरोप खंडांतील सर्वांत मोठा ज्वालामुखी असून तो सिसिली बेटाच्या कॅटानिया या जिल्ह्यांत आहे. त्याची उंची १०,७५८ फूट असून तो जवळजवळ समुद्रांतूनच वर आल्यासारखा असून त्याचा घेर सुमारें ९० मैलांचा आहे. पर्वताच्या शिखरावर बाराहि महिने बर्फ असून त्याखालील भागांत विपुल जंगलें आहेत. पर्वताच्या पायथ्याला फळांच्या बागा असून त्यांतून मुख्यतः द्राक्षें व ऑलिव्ह या फळांची लागवड करतात. मूळ ज्वालामुखीजवळ लहान लहान अशीं सुमारें २०० पर्वतशिखरें आहेत. हा पर्वत मधूनच जागृत होतो. ११६९, १६६९, १६९३, १७७५, १८३२, १८६५, १८७४, १८७९, १८८६ या सालांतील त्याच्या जुन्या जागृत अवस्था फारच भयंकर स्वरूपाच्या असून त्यांत लाखों लोक मेलेले आहेत. अगदीं अलीकडील जागृत अवस्था म्हणजे १८९२, १८९९, १९११ व १९१४ या सालांतील होत.

**एट्रुरिया**—इटली, अर्वाचीन टस्कनी प्रांताचें प्राचीन नांव. रोमची स्थापना (खि. पू. ७५३) होण्यापूर्वी हा प्रदेश चांगला भरभराटींत होता. रोमन लोकांशीं लढाया देण्यांत ऐट्रुस्कन लोकांना यश लाभलें नाहीं. तथापि त्यांची संस्कृति उच्च दर्जाची होती यांत शंका नाहीं. त्यांचा व्यापार फार मोठा असून समुद्रावरहि त्यांची चांगली सत्ता होती. एट्रुस्कन भाषेतील सुमारें ६,००० लेख उपलब्ध आहेत; पण या भाषेसंबंधीं फारशी माहिती नाहीं. कलाकौशल्याच्या कामांत हे लोक चांगले निष्णात होते. त्यांची रंगीत मातीचीं भांडीं प्रसिद्ध आहेत. ही कला त्यांनीं ग्रीकांपासून उचलली.

**एडन**—अरबस्तानच्या नैर्ऋत्य बाजूला ही वसाहत आहे. हिची राजधानी एडन ही असून वसाहतीचें क्षेत्रफळ सुमारें ७५ चौरस मैल आहे. आणि लगतचें पेरीम बेट हिशेबांत धरल्यास ८० चौ. मैल आहे. लो. सं. ४८,३३८. बंदराची खोली कमींत कमी तीस फूट आहे. युरोपला जाणाऱ्या बोटी आणि युरोपहून हिंदुस्थानाकडे येणाऱ्या बोटी या बंदरांत कोळसा घेण्यास थांबतात. त्यामुळें या बंदराला महत्त्व प्राप्त झालें आहे. एडन शहराची सर्वांत मोठी अडचण म्हणजे पाणी-पुरवठा ही होय. दगडी हौद बांधून पावसाचें पाणी सांठवतात व हें सांठवलेलें पाणी शहरांत सर्वत्र पोंचवलें जातें. तसेंच कांहीं ठिकाणीं शहरांत विहिरीनें पाणी-पुरवठा करतात. हाहि पाणी-पुरवठा कमी पडल्यास समुद्राच्या पाण्याची वाफ तयार करून ती थंड करतात आणि तो गोड्या पाण्याचा पुरवठा म्हणून वापरला जातो. एडनचा व्यापार म्हणजे अरबस्तानच्या वाळुकामय प्रदेशांत होणारे खजूर, कॉफी, वगैरे जिन्नस. तेल, कापड, धान्यें, कातडीं, तंबाखू, कॉफी, साखर हे मुख्य आयातीचे जिन्नस आहेत. हें बंदर फक्त आतांपावेतों ब्रिटिशांच्या ताब्यांत असे. १९३६ सालीं वसाहतीची योजना होऊन एडन द्वीपकल्पांत लहान एडन द्वीपकल्प, शेख ओथमानचा प्रदेश आणि पेरीम बेट यांचा समावेश झाला. या वसाहतीचा कारभार एक गव्हर्नर पाहतो.

**एडन, रॉबर्ट ॲन्थनी** (१८९७–)—एक ब्रिटिश मुत्सद्दी. पहिल्या महायुद्धांत सैन्यांत अधिकारी होता. १९२३ सालीं कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षातर्फे पार्लमेंटांत निवडून आला; यानंतर परदेशच्या राजकारणांत याचा हळूहळू प्रवेश होत जाऊन सर सॅम्यूएल होअरनंतर परराष्ट्रमंत्री झाला. पंतप्रधान बाल्डविनच्या अर्धवट धोरणामुळें याला आबिसिनिया गिळंकृत

करणाऱ्या इटलीविरुद्ध कांहीं करतां येईना. महायुद्ध सुरू झालें तेव्हां मंत्रिमंडळांत वसाहतींचें खातें याच्याकडे आलें; नंतर हा युद्धखात्याचा चिटणीस झाला. १९४२-४५ पर्यंत हाउस ऑफ कॉमन्सचा पुढारी होता.

**एडमंटन**— उत्तर अमेरिका, उत्तर सस्काचिवॉनच्या कांठावरील अल्बर्टा या कॅनडांतील प्रांताची राजधानी. कॅनेडियन नॅशनल रेल्वे व कॅनेडियन पॅसिफिक रेल्वे या लोहमार्गांवरील हें महत्त्वाचें केंद्रस्थान असून शेती व केंसाळ कातड्यांच्या व्यापाराचें कॅनडांतील एक प्रमुख केंद्रस्थान होय. येथें लांकूड कापण्याच्या मोठमोठ्या गिरण्या असून, गवताळ प्रदेशावर पोसल्या जाणाऱ्या जनावरांचें मांस बंद डब्यांतून भरण्याचे कारखाने आहेत. लोकसंख्या ९३,८१७.

**एडवर्ड राजे**—इंग्लंडच्या गादीवर आतांपर्यंत एकंदर आठ एडवर्ड राजे बसले.

पहिला ( १२३९-१३०७ )— यानें वेल्स प्रांत आपल्या राज्यास जोडला. याच्या अमदानींत स्कॉडलंडमध्यें वालेस, ब्रूस, वगैरेनीं केलेलीं बंडें यानें मोडून काढलीं. याच्या कारकीर्दींत इंग्लंडच्या राज्यकारभाराची घडी चांगली बसली.

दुसरा ( १२८४-१३२७ )— पहिल्या एडवर्डचा मुलगा. हा फार दुबळा राजा होता. याला स्कॉटलंडमधील ब्रूसचें बंड मोडतां आलें नाहीं व याचा खून झाला.

तिसरा ( १३१२-१३७७ )— दुसऱ्याचा मुलगा. हा मात्र फार पराक्रमी होऊन गेला. यानें स्कॉटलंडवर सत्ता बसवून फ्रान्सवर मोहिमा केल्या.

चौथा ( १४४२-१४८३ )— यानें सहाव्या हेन्रीचा पराभव करून राज्यपद मिळविलें. पण पुन्हा हेन्री राजा झाला व याला पळून जावें लागलें. तथापि यानें हेन्रीला कैद करून गादी पुन्हां बळकावली.

पांचवा ( १४७०-१४८३ )— चौथ्याचा मुलगा. पण गादीवर बसतो न बसतो तोंच याच्या चुलत्यानें याला कैदेंत टाकून मारविलें व आपण राजा बनला.

सहावा ( १५३७-१५५३ )— गादीवर बसला तेव्हां सारा नऊ वर्षांचा होता. याची कारकीर्द फार दंगलीची व अस्वस्थतेची गेली. यानें बऱ्याच शाळा चालू केल्या व त्या अद्यापि त्याचें नांव घेऊन चालल्या आहेत.

सातवा ( १८४१-१९१० )— व्हिक्टोरिया राणीचा वडील मुलगा. तिच्या मृत्यूनंतर १९०१ सालीं गादीवर आला. यानें अमेरिका आणि युरोपियन राष्ट्रें यांच्याशीं स्नेहभाव राखून देशांत शांतता ठेविली.

आठवा ( १८९४- )— पांचवा जॉर्ज राजा याचा वडील मुलगा. हा जगभर हिंडला व राज्यकारभाराचीहि यानें पुष्कळ माहिती करून घेतली होती. धाडसी जीवनाची याला फार आवड असे. पण १९३६ सालीं एका विधवा बाईशीं विवाह करण्यासाठीं यानें राज्यत्याग केला.

**एडवर्ड सरोवर**— हें आफ्रिकेमध्यें व्हिक्टोरिया सरोवराच्या पश्चिमेस युगांडा प्रोटेक्टरेट आणि बेल्जियन कांगो यांच्या दरम्यान आहे. या सरोवराचें क्षेत्रफळ ८३० चौ. मैल आहे.

**एडवर्ड्स, अमेलिया ब्लँकफोर्ड** ( १८३१-१८९२ )- एक इंग्रज कादंबरीकर्त्री व ईजिप्शियन पुराणवस्तुशास्त्रज्ञ. ही मुख्यतः मिसर लिपीची तज्ज्ञ असून तिच्या अतिशय प्रसिद्ध कादंबऱ्या 'हँड अँड ग्लव्ह' ( १८५९ ), 'हाफ ए मिलियन ऑफ मनी' ( १८६९ ) या आहेत. हिनेंच ईजिप्त संशोधन निधि १८८२ मध्यें सुरू केला.

**एडिंबर्ग**—हें शहर स्कॉटलंडची राजधानी असून पर्थ ऑफ फोर्थच्याजवळ दोन मैलांवर वसलेलें आहे. हें शहर उंच टेंकाडावर असून फक्त उत्तर बाजूला मात्र सपाटी आहे. मध्यभागाच्या उंच टेंकडीवर मूळचें जुनें शहर, त्यांतील किल्ला, वगैरे गोष्टी दृष्टीस पडतात. यापलीकडे नवीन शहर वसलेलें असून तेथील प्रिन्सेस स्ट्रीट, जॉर्ज स्ट्रीट, क्वीन्स स्ट्रीट यांसारखे रस्ते युरोप खंडांत कोठेंहि नाहींत. या शहराला ब्रिटिश बेटांत ऐतिहासिक महत्त्व असून येथील निरनिराळ्या संस्थांनीं इंग्लंडचा बराच इतिहास तयार केला आहे. येथील विश्वविद्यालय प्रसिद्ध असून शिवाय पुष्कळच नामांकित शिक्षणसंस्था या शहरांत आहेत. यामुळें येथील पुस्तकांचा व प्रकाशनाचा धंदा फार मोठ्या प्रमाणावर चालतो. लो. सं. ४,८३,९९८.

**एडिसन, थॉमस आल्व्हा** ( १८४७-१९३१ ) — हा अमेरिकन शास्त्रसंशोधक असून यानें पुष्कळ शोध लावले आहेत. त्यांपैकीं चतुःसंदेशक (क्वाड्रुप्लेक्स) आणि सप्तसंदेशक ( सेप्टुप्लेक्स ) तारायंत्र, कार्बन टेलिफोन ट्रॅन्समीटर, विजेच्या दिव्यांची योजना, विजेची आग-धोकादर्शक घंटा, विजेची रेल्वे, फोनोग्राफ, मेगॅफोन ( कर्णा ) हे प्रमुख शोध आहेत. सिनेमॅटोग्राफच्या यंत्रांतहि त्यानें पुष्कळ सुधारणा केली.

**एडेसा**—हें वायव्य मेसापोटेमियांतील एक प्राचीन शहराचें ग्रीक नांव आहे. १५ व्या शतकात याला उर्फा नांव मिळालें.

भूमध्यसमुद्र व पूर्वेकडील देश यांमधील दळणवळणाच्या मार्गावर 'उरहाई एदेसा' असून बाबिलोनियन व असुरियन काळांत त्याचें बरेंच महत्त्व असावें. इ. स. पूर्वी ३०४ त उरहाईचें पुनरुज्जीवन पहिल्या सेल्युकस निकेटरनें केलें. इ. स. पूर्वी १३२त सातव्या ॲंटाओकस सिडेटेसच्या वेळीं एडेसा हें एका राजघराण्याची राजधानी झालें. लुकुलस, पॉंपे व क्रेसस यांच्या स्वाऱ्यांच्या वेळीं एडेसा हें रोमचें मित्रराष्ट्र होतें.

पुढें एडेसा तुर्कांच्या ताब्यांत गेलें, व त्याला त्यांनीं उर्फा नांव दिलें.

उर्फा निमरूड डाघचे ईशान्येस आहे. शहराच्या पश्चिमेकडील कोपऱ्यांत दोन स्तंभ आहेत. त्यांना 'निमरूडचें सिंहासन' असें म्हणतात. हें व शहर यांच्यामध्यें बिरकेट-अल्खलील नांवाचें तळें आहे. याच्याजवळच आब्राहामचें थडगें आहे. उर्फा हें अलेप्पो प्रांतांतील त्याच नांवाच्या जिल्ह्याची राजधानी आहे.

**एडोम**—अरबस्तान, 'नव्या करारां'त उल्लेखिलेला एक प्रदेश. हा पॅलेस्टाइनचे दक्षिणेस होता. डेव्हिड राजानें एडोमाइट लोकांना जिंकलें. पुढें मधून मधून त्यांनीं स्वातंत्र्य उपभोगिलें. पण पुढें इराण आणि नंतर अरबस्तान यांचा अमल यावर होता. एडोम प्रांत नापीक आहे. या प्रांतांतून व्यापाराचा मार्ग असल्यामुळें याचें महत्त्व फार होतें.

**एड्डा**—आइस्लंड बेटामधील दोन प्राचीन ग्रंथसमूहांना हें नांव दिलेलें आहे. त्यांपैकीं एक ग्रंथसमूह काव्यबद्ध आहे. त्याची रचना १३ व्या शतकांत झालेली असून त्या ग्रंथांचा शोध १६४३ मध्यें आइस्लंडमधील एका बिशपनें लावला. या समूहांत एकंदर ३३ काव्यें आहेत. त्यांतील काव्यरचना अनुप्रासयुक्त आहे. दुसरा समूह गद्यमय आहे. त्यामध्यें उत्तरेकडील पौराणिक कथांचा संक्षिप्त संग्रह केलेला आहे.

**एड्रियन**—या नांवाचे सहा धर्मगुरु (पोप) इटलींत होऊन गेले.

पहिला (७७२–७९५)— हा शार्लमेन बादशहाचा समकालीन होता. याचें व शार्लमेनचें चांगलें सख्य होतें. लॅंबर्डीक राजानें एड्रियनच्या मुलखांत स्वारी केली तेव्हां शार्लमेननें एड्रियनला फार मदत केली. जरी या दोन थोर पुरुषांमध्यें ख्रिस्ताच्या मूर्तीची पूजा करावी किंवा न करावी याबद्दल मतभेद होता तरी यांचें सख्य शेवटपर्यंत कायम राहिलें.

दुसरा (८६७–८७२)— यानें पहिल्या एड्रियनप्रमाणें फ्रान्स देशाच्या बादशहाशीं सख्य ठेवण्याचा प्रयत्न केला. पण त्यास फ्रेंचांचा बादशहा दुसरा लुई याच्या मनाप्रमाणें चालावें लागत असे.

तिसरा (८८४–८८५)— हा वर्म्स गांवास जात असतांना वाटेंत मरण पावला.

चौथा (११५४–११५९)— धर्मगुरूच्या गादीवर बसलेला हा एकटाच इंग्रज होय. ११५४ सालीं हा धर्मगुरु झाला. पुढें रोमची सेनेट सभा व तेथील बादशहा यांमध्यें तंटेबखेडे उत्पन्न झाल्यावरून यास रोम शहर कायमचेंच सोडावें लागलें.

पांचवा—हा १२६६ मध्यें धर्मगुरु झाला व त्याच वर्षी जुलै महिन्यांत मरण पावला.

सहावा (१५२२–२३)— १५२२ सालीं हा धर्मगुरु झाला. यानें धर्मखात्यांत माजलेली अंदाधुंदी नाहींशी करण्याचा प्रयत्न केला. युरोपांतील ख्रिस्ती राजांत एकी करण्याच्या प्रयत्नांत यास यश आलें नाहीं. लूथर यास पाखंडी म्हणून शिक्षा व्हावी असें याचें मत होतें.

**एथिल**— ईथर, अल्कोहोल, वगैरेंमध्यें असलेल्या $C_2 H_5$ ह्या समूहाचें (रॅडिकलचें) नांव. एथिलचें स्वतंत्र अस्तित्व नाहीं. ह्याचा दुसऱ्या एथिलबरोबर संयोग होऊन डाय एथिल किंवा ब्युटेन तयार होतो. मद्यार्क (अल्कोहोल) आणि हराम्ल (हायड्रोक्लोरिक ॲसिड) ह्यांच्या संयोगानें एथिल क्लोराइड तयार होतें. ईथरप्रमाणें ह्याचाहि शीतता निर्माण करण्यासाठीं, आणि ठराविक ठिकाणीं बधिरता आणण्यासाठीं उपयोग होतो. एथिल नायट्राइट हाहि उपयुक्त पदार्थ आहे.

**एथिल ईथर**—ईथर पहा.

**एथिलीन**—($C_2H_4$). (तैलजनित वायु). ऑलिफिन मालेंतील पहिला असंपृक्त उत्कर्ब (हायड्रोकार्बन) व वर्णहीन आणि थोडासा वास येणारा वायुरूप पदार्थ. हा जळूं लागला म्हणजे त्याची ज्योत तेजस्वी व प्रकाशदायक असते. दगडी कोळशापासून तयार केलेल्या वायूंत हा असतो; त्याचप्रमाणें मद्यार्क (अल्कोहोल) आणि त्याच्या दुप्पट (मापी) तेजाब (सल्फ्यूरिक अम्ल) यापासून तयार करतां येतो.

**एदलाबाद**— १. मुंबई, पूर्व खानदेश. एदलाबाद पेट्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. सुमारें तीन हजार. मोंगलांनीं हें गांव घेतलें त्या वेळीं हें भरभराटींत असून येथें एक बारमाही पाणी असलेला तलाव होता (१६००). गांवाभोंवतीं एक चांगला तट आहे. येथील किल्ला मोंगलांनीं बांधला असें सांगतात. हल्लीं हा पडून गेला आहे. याखेरीज कांहीं जुन्या इमारतींचे अवशेष व विहिरी आढळतात.

२. मुंबई, धारवाड जिल्हा. शेगांवच्या पश्चिमेस चार मैलांवर हें एक ओसाड खेडें आहे. तेथें एक पवित्र मानलेली गंगामावी नांवाची विहीर असून जानेवारी महिन्यांत तेथें जत्रा

भरते. विहिरीच्या वायव्येस एक लेणें आहे. कामेश्वर देवळास इनाम जमीन आहे.

**एद्रिसी** ( ११००–सु. ११८० )—एक अरबी भूगोलवेत्ता. अबु अबदुल्ला महंमद एद्रिसी हा त्याच्या वेळच्या जगाचा माहीतगार होता. त्यानें सिसिलीचा राजा दुसरा रॉजर याच्या सांगण्यावरून जगाचा नकाशा व गोल तयार केला ( ११५४ ) व एक ग्रंथहि लिहिला. तो अद्यापि उपलब्ध आहे.

**एनवर पाशा** ( १८८१–१९२२ )— एक तुर्की योद्धा व राजकारणी पुरुष. युद्धमंत्री म्हणून काम केल्यानंतर युनिअन अ‍ॅन्ड प्रोग्रेस कमिटीच्या पुढारी मंडळीपैकीं तो एक होता. तो कट्टा जर्मन पक्षपाती असल्यामुळें पहिल्या महायुद्धांत तुर्कस्तानानें जर्मनीचा दोस्त म्हणून युद्धांत भाग घेण्यास हाच पुष्कळ अंशीं कारणीभूत झाला. १९१८ मध्यें महायुद्ध बंद झाल्यावर एनवर पाशा कॉकेशस पर्वताकडे पळून गेला. पुढें चार वर्षांनीं बुखारा येथें मारला गेला.

**एनिअस** (खि. पू. २३९–१७०)—लॅटीन भाषेंतील काव्याचा हा आद्य जनक होय. त्याच्या चरित्राबद्दल फार थोडी माहिती उपलब्ध आहे. दुसऱ्या प्यूनिक युद्धामध्यें त्यानें भाग घेतला होता, आणि खि. पू. २०४ मध्यें सेंच्युरिअन ह्या अधिकारपदावर होता. नंतर तो रोम शहरांत शिक्षकाचा धंदा करून उदरनिर्वाह करीत असे. एनिअसची बुद्धिमत्ता अष्टपैलू होती. त्यानें सुखान्त व दुःखान्त नाटकें, महाकाव्यें आणि बोधपर कविता लिहिली. परंतु त्याची मुख्य प्रसिद्धि त्यानें लिहिलेल्या बखरी ( अ‍ॅनल्स ) या थोर महाकाव्यामुळें झाली आहे. या काव्याचे १८ भाग आहेत. एनिअसचे सर्व ग्रंथ मूळ स्वरूपांत उपलब्ध नसून त्याच्यानंतरच्या ग्रंथकारांनीं एनिअसच्या ग्रंथांतले जे उतारे उद्धृत केले आहेत तेवढेच आज उपलब्ध आहेत. जरी त्याचे मूळ ग्रंथ नष्ट झाले आहेत तरी त्याच्या ग्रंथांमुळें व्हर्जील या महाकवीला स्फूर्ति मिळाली आणि पुढच्या सर्व लॅटिन वाङ्मयावर एनिअसच्या लेखनाचा परिणाम झालेला आहे.

**एनीमा**—बस्ती घेण्याचें एक साधन. याच्या एका प्रकारांत एका रबरी नळीला एक फुगा असतो; नळीचें एक टोंक पाण्यांत व दुसरें ( तोटीचें ) गुदद्वारांत ठेवून फुगा दाबतात म्हणजे भांड्यांतलें पाणी आंतड्यांत जातें. दुसऱ्या प्रकारच्या एनीमांत फुग्याशिवाय नळी असते. यांत पाण्याचें भांडें उंच टांगून पाणी पोटांत घेतां येतें. पाण्यांत कधीं साबण, तेल, इ. औषधें घालतात.

**एने**— फ्रान्समधील एक नदी. फ्रान्सच्या पश्चिम भागांत उगम पावून ही ओसे नदीला कॉम्पेन्यजवळ मिळते. एकंदर लांबी १७५ मैल आहे. वेल्जममधून या नदीच्या खोऱ्यांत येण्यास सुलभ मार्ग आहे. गेल्या महायुद्धांत या नदीच्या आसपास पुष्कळ लढाया झाल्या.

**एन्के, जोहान फ्रान्झ** ( १७९१–१८६५ )— एक जर्मन ज्योतिषशास्त्रज्ञ. एका धूमकेतूला याचें नांव आहे. हा धूमकेतु १८१८ सालीं एका फ्रेंच ज्योतिषानें जो शोधून काढला, त्याचें सर्व गणित एन्केनें तयार केलें होतें.

**एपिक्टेटस**—हा स्टोइक पंथांतील एक प्रख्यात तत्त्ववेत्ता होऊन गेला. हा सुमारें ९० इसवीमध्यें प्रसिद्धीस आला. हा मुसोनिअस रूफसचा शिष्य होता. हा मूळचा फ्रिजिया येथील राहणारा असून गुलामगिरींत रोम येथें राहत असे.

तत्त्वज्ञानाची व्याख्या त्यानें अशी केली कीं, ज्या शास्त्रापासून अमुक ग्राह्य व अमुक त्याज्य असें ठरवतां येतें तें तत्त्वज्ञान होय. या ज्ञानास तो 'व्यवहारोपयोगी तत्त्वज्ञान' म्हणे. जगांतील सर्व बाह्य वस्तूंपासून अलिप्त राहणें यांतच खरें सुख आहे असें याचें मत होतें.

**एपिक्यूरस**—या तत्त्ववेत्त्याचा जन्म सॅमोस येथें खि. पू. ३४१–३४२ मध्यें झाला. याचा बाप निओक्लिस हा शिक्षक होता. एपिक्युरिअन पंथाच्या तत्त्ववेत्त्यांच्या मतांप्रमाणें पाहतां हा स्वयंशिक्षित होता; परंतु इतर चरित्रलेखकांच्या मतें पॅफिलस व नॉसिफॅनिस हे याचे शिक्षक असावेत. या बाबतींत स्वतः एपिक्यूरसचें असें म्हणणें आहे कीं, तो १४ वर्षांचा असतां जेव्हां हेसिअड या कवीचीं काव्यें वाचतांना त्याच्या शिक्षकांस त्याचें शंकासमाधान करतां येईना तेव्हां त्यानें केवळ स्वतःच्या बुद्धिमत्तेच्या जोरावर आपला पुढील अभ्यासक्रम सुरू ठेवला व पुढें यानें अध्यापनाचा धंदा स्वीकारला.

प्रथम मिलिटिन, नंतर लॅपसकस व शेवटीं अथेन्स येथें तो शिकवीत असे. अथेन्स येथें त्यानें एक शाळा काढली व मरेपर्यंत म्हणजे खि. पू. २७० पर्यंत आपल्या मतांचें अध्यापन केलें. याच्या मतांचा जो पंथ निघाला तो त्याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

याच्या शिष्यांपैकीं मेट्रोडोरस हेमार्कस, डायोनिसिअस व बॅसिलाइडस् हे प्रमुख होते.

तत्त्वज्ञानाची याची व्याख्या "मानवजीवित सुखप्रद करण्याची कला" अशी आहे. हा भाग नीतिशास्त्राचा आहे म्हणूनच एपिक्यूरसच्या तत्त्वज्ञानांत नीतिशास्त्रासच प्रामुख्य दिसून येईल.

**एपिडॉरस**—दक्षिण ग्रीसमधील एक अति प्राचीन शहर. हें अरगॉलिसच्या पूर्व किनाऱ्यास असून त्याच्या उत्तरेस एक नैसर्गिक बंदर आहे.

या ठिकाणीं प्रथमतः केरियन लोकांची वसाहत होती; नंतर आयोनियन लोक येथें राहूं लागले, व पुढें अरगॉस येथील डोरियन लोकांनीं आयोनियनांस धुडकावून लावून स्वतः येथें वस्ती केली.

एपिडॉरसमध्यें थोलास म्हणून एक अतिशय सुंदर इमारत आहे. या इमारतीच्या उत्तरेस अबाटॉन या नांवाचा एक लांब सज्जा आहे. या ठिकाणीं आजारी लोक आपण आजारांतून मुक्त व्हावें म्हणून ईश्वराची प्रार्थना करीत व झोंपीं जात. असें सांगतात कीं, झोंपेंतून उठून पाहावें तों ते रोगी रोगापासून मुक्त झालेले दिसत.

**एंपिडोक्लिस**— १. (खि. पू. ४९०–४३०). एक ग्रीक तत्त्ववेत्ता. याचें घराणें नामांकित असून सांपत्तिक स्थितिहि चांगली होती. हा फार धाडशी होता. यानें ईजिप्त व आशिया मायनरमध्यें प्रवास करून ईजिप्तमधील मगी लोकांपासून ज्योतिष व पौरस्त्यांपासून वैद्यक व जादूटोणा या विषयांचें ज्ञान संपादन केलें. हा स्वतःस परमेश्वर म्हणवीत असे व चमत्कारहि करून दाखवीत असे.

याच्या मरणाविषयीं दोन आख्यायिका आहेत: (१) एका सणाच्या दिवशीं हा सदेह स्वर्गास गेला; व (२) यानें एटना नांवाच्या ज्वालामुखींत उडी घातली.

२. हा आयोनियन तत्त्वज्ञान पंथाचा एक प्रमुख कार्यकर्ता होता. यानें कांहीं काव्येंहि केलीं आहेत. याच्या काव्यांतील भाषासौंदर्यावरून आरिस्टॉटलनें यास पहिला साहित्यज्ञ कवि असें म्हटलें आहे.

संवेदनेपासून अगर इंद्रियांपासून ज्ञान मिळणें शक्य नाहीं. ज्ञानप्राप्तीचा मार्ग म्हणजे परमेश्वरदत्त बुद्धीचा विकास करणें हाच होय, असें याचें मत होतें. सृष्टिरचनेसंबंधीं याचें असें म्हणणें आहे कीं, "सृष्टीचा गोल प्रथम द्रवरूप होता, नंतर हळूहळू घनरूप झाला; हा गोल ज्या चार महाभूतांपासून बनलेला आहे, तीं पृथ्वी, आप, वायु व अग्नि हीं होत. जगांतील सर्व वस्तु हीं महाभूतें निरनिराळ्या प्रमाणांत मिसळून बनतात. हें एकीभवन व पृथग्भवन ज्या शक्तींपासून होतें, त्या शक्ती म्हणजे 'प्रीति व द्वेष' ह्या होत. परमाणुवादाचें मूळ याच्या सृष्टिरचनेच्या विचारांतच सांपडतें.

**एपिनस, फ्रान्झ उलरिच थिओडार** (१७२४–१८०२)— एक जर्मन शास्त्रज्ञ. कांहीं काल वैद्यकी शिकून नंतर त्यानें गणित आणि पदार्थविज्ञानशास्त्र यांचा अभ्यास करण्यास सुरवात केली. या दोन शास्त्रांत त्यानें लवकरच इतकी प्रगति केली कीं, बर्लिनच्या शास्त्रीय ॲकॅडमीनें त्याला आपला सभासद करून घेतलें. सन १७५७ सालीं सेंटपीटर्सबर्ग येथील राजाश्रित शास्त्रीय ॲकॅडमीनें त्याला आपला सभासद केलें व तेथें त्याला प्रोफेसरची जागा मिळाली. या शहरीं तो १७९८ पर्यंत राहिला. यापुढील शेष आयुष्य त्यानें डारपाट येथें घालविलें. रशियांत असतांना हा दुसऱ्या कॅथेराइन राणीच्या फारच मर्जींतला होता. एपिनस यानें विद्युत् आणि चुंबकत्व या विषयांत जे शोध लावले आहेत, जे प्रयोग केले आहेत व सिद्धान्त बसविले आहेत त्यांमुळें तो प्रसिद्धीस आला आहे. यानेंच प्रथम गणिताची विचारसरणी आणि त्या शास्त्राचीं तत्त्वें विद्युच्छास्त्र आणि चुंबकशास्त्र यांस लावून दाखविलीं. एखादा ग्रह सूर्याच्या बिंबावरून जात असतां सूर्याचें अंतर काढण्यास त्या खगोलीय गोष्टीचा उपयोग करून घेतां येईल असें त्यानें दाखवून दिलें होतें.

**एफेसस**—हें प्राचीन आयोनियन शहर आशिया मायनरच्या पश्चिम किनाऱ्यावर आहे. हें शहर कोरेसस व प्रायन या टेंकड्यांच्या उतारावर होतें. येथील प्रसिद्ध आर्टेमिस अथवा डायाना देवीचें मंदिर मैदानांत एका मैलावर ईशान्येस आहे. एफेससची ग्रामदेवता आर्टेमिस होती.

सेंटपॉलनें येथें चर्च स्थापन करून कांहीं चमत्कार दाखविले; त्याचप्रमाणें येथें जादूविषयक ग्रंथ जाळण्यांत आले. तथापि आर्टेमिसची पूजा येथें चालूच होती. आशियांतील पहिल्या प्रतीच्या शहराचा मान मिळावा म्हणून स्मर्ना व परगामम यांच्याशीं एफेससची स्पर्धा होती. रोमन सुभेदार प्रथम येथें उतरून आपल्या हुद्याचीं वस्त्रें घेई. गॉथ लोकांनीं २६२ त शहर व मंदिर लुटून फस्त केलें. पांचव्या शतकानंतर एफेससचा ऱ्हास झाला व जवळच असलेल्या शहरांत लोकवस्ती झाली.

वुडसाहेबानें १८६३–७४ च्या दरम्यान येथें खणून शोध लाविले. आर्टेमिशनचा शोध त्याला १८६९ त लागला. वुडच्या नंतर ऑस्ट्रियन पुराणवस्तुसंशोधक मंडळानें पुढील मुख्य इमारती शोधून काढल्या: (१) भव्य नाटकगृह, (२) हेलिनिस्टिक आगोरा (चौक), व (३) रोमन आगोरा.

**एबोनाइट**—किंवा व्हल्कनाइट हा इंडिया रबराचाच एक घट्ट प्रकार आहे. कच्च्या रबरामध्यें शेंकडा २० ते ५० या प्रमाणांत गंधक मिसळून हा प्रकार तयार करतात. याचा तांब्यावर परिणाम होतो, पण वीज यांतून जाऊं शकत नाहीं, किंवा अम्लक्षारांचा यावर कांहीं परिणाम होत नाहीं.

**एमडेन**—एम्स नदीच्या मुखाजवळील प्रशियांतील एक शहर. हें शहर खोलगट व सपाट जागीं असून शहरांतून पुष्कळ कालवे गेलेले आहेत. बंदरांत मोठमोठ्या बोटी येऊं शकतात. इतकेंच नव्हे तर सर्वांत मोठ्या महासागरी बोटीसुद्धां आंतवर येतात. एमडेनचे निर्यातीचे जिन्नस म्हणजे धान्य, दुभत्याचे पदार्थ, कातडीं, व जिन (एक प्रकारची दारू) हे होत.

**एमॅन्युअल, व्हिक्टर** (दुसरा) (१८२०-१८७८)— इटलीचा एक राजा. जोराच्या प्रतिरोधास न जुमानतां व्हिक्टरनें इटलीची पूर्वीचीच राज्याची घटना कायम ठेविली. यामुळें लोकांत त्याचा 'इटलीच्या स्वातंत्र्याचा वाली' असा बोलबाला झाला. १८५० सालीं काव्हूर हा याचा मुख्य प्रधान झाला व मध्यंतरींचीं कांहीं वर्षे वगळल्यास मरेपर्यंत काव्हूर याचा मुख्य प्रधान होता. व्हिक्टरचें ध्येय इटलीमधून ऑस्ट्रियनांना घालवून द्यावयाचें व पिडमाँट प्रांताचें एक छोटेंसें राष्ट्र बनवावयाचें, हें होतें.

गॅरिबाल्डीनें सिसिलीवर स्वारी करण्याचें ठरविलें तेव्हां व्हिक्टरनें त्याला शक्य त्या बाजूंनीं मदत केली. होतां होतां रोम व व्हेनिस या दोन शहरांखेरीज बाकीचा सर्व इटली प्रांत एकत्र होऊन १८ फेब्रुवारी १८६१ रोजीं व्हिक्टर हा संयुक्त इटली प्रांताचा राजा, असें जाहीर करण्यांत आलें.

यापुढचीं कांहीं वर्षे व्हेनिस शहराचें स्वातंत्र्य परत मिळविण्यांत गेलीं व १८६६ सालीं झालेल्या ऑस्ट्रियन लढाईमुळें व्हेनिस प्रांत इटलीच्या राज्याला जोडला गेला.

रोममध्यें पाऊल ठेवण्यास व्हिक्टरचा आतांपर्यंतचा साह्यकर्ता नेपोलिअन संमति देईना. सरतेशेवटीं ता.२०सप्टेंबर १८७० रोजीं फ्रेंच सैन्य रोममधून माघारें आलें व इटालियन सैन्य तेथें गेलें आणि ता. २ जुलै १८७१ रोजीं व्हिक्टर एमॅन्युअलनें रोममध्यें प्रवेश केला व इटली देशाची रोम ही राजधानी झाली.

व्हिक्टर एमॅन्युअल हा मोकळ्या मनाचा व सुखभावी होता. याची राहणी अगदीं साधी होती. तरी देखील आपण राजे आहों ही कल्पना त्याच्या मनांत पूर्ण जाग्रत होती व त्याच्या बाह्य वेषावरून त्याला ओळखणारे लोक त्याची मुत्सद्देगिरी पाहून चकित होऊन जात. व्हिक्टर हा शूर शिपाईगडी होता.

**एमरी**—(कुरुंदाचा चूर). कुरुंदाची एक काळसर किंवा निळसर रंगाची अशुद्ध जात असते. तीमध्यें शेंकडा ८२ या प्रमाणांत अल्युमिनम व कांहीं लोह यांचें मिश्रण असून ती फार कठीण असते व बहुतेक वितळत नाहीं व तीवर अम्लांचा परिणाम होत नाहीं. या जातीचा उत्तम दगड भूमध्य समुद्राच्या पूर्वेकडील भागांत आढळतो. याचा उपयोग रत्नें, संगमरवर, वगैरेवर जिल्हई आणण्याकरितां व भिंग व कांचा घासण्याकरितां करतात.

**एमू**—हा एक धांवणारा भित्रा पक्षी आहे. हा ऑस्ट्रेलियामध्यें आढळतो. हा कासोवरीसारखाच आहे, पण मैदानांत राहतो. हा शहामृगाएवढा मोठा असून फार त्वरेनें पळतो. याचे पंख आंखूड असून उडण्याच्या कामीं निरुपयोगी असतात.

**एम्मेट, रॉबर्ट** (१७७८-१८०३)— एक आयरिश देशभक्त. आयर्लंडचें स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं हा संयुक्त आयरिशमेन संस्थेचा सभासद झाला. १८०३ सालीं लॉर्ड किलवार्डन याला मारण्याच्या कटांत हा पुढारी म्हणून धरला गेला व याला फांशीं देण्यांत आलें. एम्मेटची देशभक्ति आणि उत्साह फार दांडगा असला तरी त्याच्या अंगीं मुत्सद्देगिरी बिलकुल नव्हती.

**एरंडवर्ग**—[युफोरबिआसिई]. हा एक वनस्पतींचा मोठा वर्ग आहे. यामध्यें झाडें, झुडपें व वनस्पतीहि येतात. तसेंच या वर्गांत पुष्कळ जाती येतात. त्यांत सुरती एरंड, क्रोटन, कासाव्हा, वगैरे झाडें येतात. उष्ण प्रदेशांत हीं झाडें होतात. या झाडास उग्र दुधासारखा चीक येतो. विषयुक्त गुणधर्म यांत असले तरी हीं झाडें औषधी आहेत. मुळ्यांपासून पिठूळ अन्न मिळूं शकतें. बिया वांतिकारक व अतिसारक असतात.

**एरंडी**—एरंड हिंदुस्थानांत आफ्रिकेंतून आला असावा. अबिसिनीयांत याचें झाड रानटी स्थितींत आढळतें. हिंदुस्थानांत

एरंडाची लागवड सर्वत्र आढळते. एरंडाच्या सरासरीनें १६ जाती आहेत. पण या सर्वांचे दोन भाग करतां येतात. पहिला बहुवर्षायु. ही जात फार उंच वाढते. हिची लागवड कुंपणांत उंसाभोंवतीं व बागाइतांत पाटाच्या कडेनें करतात. याचें बीं जाडें असून त्याचें तेल हलक्या दर्जाचें समजलें जातें. दुसरा वर्षायु. ही जात स्वतंत्र पेरतात. याचें झाड लहान असतें व याचें पीक कोरडवाहू जमिनींत करितात. याचें बीं लहान असून त्याचें तेल उत्तम प्रकारचें निघतें. बहुवर्षायु एरंडाचें तेल दिव्यांत जाळण्यास व वंगणास उपयोगी पडतें. व वर्षायूचें तेल औषधास वापरतात. हें तेल सारक आहे.

याच्या मुळांचा काढ्यांत उपयोग करितात. एरंडाचीं पानें रेशमाचे किडे खातात. यामुळें हे किडे बाळगणारे लोकहि याची लागवड करतात.

एरंडेल तेल ज्यापासून होतें त्या झाडास सुरती एरंड असें म्हणण्यांत येतें व याची लागवड केली जाते. याच्या पेंडीचें खत होतें.

मोगली एरंड म्हणून एक अगदीं स्वतंत्र झाड असून तें कुंपणास लावतात.

**एरंडेल**— रिसिनस कॉम्युनिस 'या हिंदुस्थानांत आढळणाऱ्या एका झाडाच्या बियांपासून हें तेल काढण्यांत येतें. हें बहुतेक निर्वर्ण व निर्गंध असें तेल असतें परंतु बेचव मात्र नसतें. हें फार महत्त्वाचें सारक औषध म्हणून वापरण्यांत येतें. हें लहान मुलांना व नाजुक प्रकृतीच्या लोकांना देण्यांत येतें. हें दुधांतून देणें चांगलें. संधिवातावरहि हें चोळण्यानें उपयोग होतो. डोळ्यांत कचरा, वगैरे गेला असतां किंवा त्यांतील घाण काढून टाकण्याकरितां याचे थेंब डोळ्यांत घालण्यांत येतात. हें तेल इटली, फ्रान्स व लंडनमध्यें तयार करण्यांत येतें.

**एरंडोल**—मुंबई, पूर्व खानदेश जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ४५८ चौरस मैल. मोठीं गांवें– एरंडोल व धरणगांव. हा तापीच्या खोऱ्याचा प्रदेश सुपीक आहे. लो. सं. १,२३,२५१.

एरंडोल शहर तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. येथें १८६६ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली. हें अंजनी नदीवर वसलेलें असून सभोंवतीं तट आहे. हें शिवाजीनें १६७० मध्यें लुटलें. हें कागदाकरतां प्रसिद्ध असून अद्याप कांहीं कागद तयार होतो. येथें कापूस, कापड, धान्य, व नीळ, इ. चा व्यापार चालतो. लो. सं. १०,२५४.

येथें पांडवांचा वाडा म्हणून एक जुना दगडी वाडा आहे. याच्या एका टोंकास देऊळ होतें. त्याची आतां मशीद झाली आहे. त्यांत एक फारसी शिलालेख आहे. गांवाच्या आग्नेयीस ५ मैलांवर एक सुंदर तलाव ( पद्मालय ) असून जवळ गणपतीचें देवालय आहे.

**एरफर्ट**— हें जर्मनींतील प्रशिया प्रांतांतलें एक महत्त्वाचें शहर गेरा नदीवर वसलेलें आहे. तेथें पूर्वीं एक किल्ला होता, परंतु आतां तो नाहीं. एरफर्ट हें मोठ्या उद्योगधंद्यांचें शहर आहे. अनेक प्रकारचे कारखाने आहेत. त्यांत मुख्य कारखाने यंत्रें, कमावलेलीं कातडीं, पादत्राणें, रासायनिक द्रव्यें आणि लोखंडी सामान ह्या मालांचे आहेत. येथें फुलबागा फार मोठाल्या असून लहान रोपें व बीबियाणें विकण्याचा धंदा मोठ्या प्रमाणांत चालतो. लोकसंख्या १,६६,६६१ आहे.

**एरॅसमस, डेसिडरियस** ( १४६७–१५३६ )— हा डच विद्वान् कित्येक श्रीमंत इंग्रजांना शिकवण्याचें काम करीत असे. व त्यांच्याबरोबर तो १४९७ मध्यें इंग्लंडांत गेला होता. पुढें १५१० मध्यें त्यानें इंग्लंडला दुसऱ्यांदा भेट दिली, आणि सर थॉमस मूर याच्या सहवासांत राहत असतांना 'प्रेज ऑफ फॉली' हें पुस्तक लिहिलें. केंब्रिज विश्वविद्यालयांत ग्रीक भाषाविषयाचा लेक्चरर आणि ईश्वरविज्ञान ( डिव्हिनिटी ) या विषयाचा प्रोफेसर त्याला नेमलें. १५१४ मध्यें तो युरोपमध्यें परत गेला आणि तिकडेच मरण पावला. एरॅसमस हा गाढा विद्वान् असूनहि मोठा रसिक होता. त्याचा विनोद मृदु व सभ्य असून त्यानें ज्ञानप्रसारास संस्मरणीय मदत केली. प्राचीन अनेक ग्रीक व लॅटीन ग्रंथांच्या आवृत्त्या त्यानें काढल्या आणि ग्रीक टेस्टॅमेंटची मूळ हस्तलिखितावरून पहिली आवृत्ति, लॅटीन भाषांतरासह यानें तयार केली. याचे 'प्रेज ऑफ फॉली' आणि 'कॉलोक्वीज' हे दोन ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. तसेंच त्यानें लिहिलेलीं पत्रें फार बहुमोल आहेत; कारण त्याच्या पत्रांत त्याच्या काळांतल्या महत्त्वाच्या ऐतिहासिक हकीगतींचा उल्लेख पुष्कळ आहे.

**एरॅसीस्ट्रॅटस्** ( ख्रि. पू. ३ रें शतक )— हा एक ग्रीक वैद्य आणि शारीरशास्त्रज्ञ होता. तो आरिस्टॉटलचा नातू होता असें म्हणतात. माणसाच्या शरीराचें पद्धतशीर व्यवच्छेदन त्यानें प्रथम केलें आणि मनुष्याचा मेंदू आणि शरीरांतील मज्जातंतू यांचें वर्णन पूर्वीं होऊन गेलेल्या शारीरशास्त्रज्ञांपेक्षां त्यानें अधिक बरोबर व निश्चितपणें केलेलें आहे.

**एरिअन** ( ९६–१८० ) —( फ्लेव्हिअस एरिॲनस ) हा ग्रीक इतिहासकार व तत्त्ववेत्ता बिथिनियामधील निकोमिडियाचा रहिवासी. हॅड्रियन, अँटोनिनस पायस व मार्क ऑरेलिअस यांच्या कारकीर्दींत उदयास आला. त्याची कर्तबगारी ओळखून त्याला अथेन्स व रोम या दोन्हींचे नागरिक करण्यांत आलें. हॅड्रियन याला फार चहात असून त्यानें याला कॅप्पॅडोशियाचा सुभेदार नेमिलें होतें ( १३१–१३६ ). अथेन्स शहरीं एरिअनचा बराच काळ गेला; त्या ठिकाणीं तो १४७–१४८ मध्यें मुख्य न्यायाधीश होता. उतार वयांत तो आपल्या गांवीं परत येऊन वाङ्मयीन कार्यास लागला.

तरुणपणीं एरिअन एपिक्टेटसचा शिष्य व स्नेही असे. तो आपल्या गुरूचीं व्याख्यानें शब्दशः टिपून घेत असे. तीं त्यानें 'डेझर्टेशन्स' ( आठ खंड ) व 'दि एन्चेइरिडिआन ऑफ एपिक्टेटस' या अर्थाच्या नांवांनीं प्रसिद्ध केलीं. पहिला ग्रंथ स्टोइक तत्त्वज्ञानास आधारभूत असून, दुसरा नीतिशास्त्रावर आहे. दुसऱ्या ग्रंथाचा ख्रिस्ती व पाखंडी लोक शिक्षणाच्या कामीं बरेच दिवस उपयोग करीत.

एरिअननें स्वतः रचलेल्या ग्रंथांपैकीं अतिशय महत्त्वाचा म्हणजे 'अनाबासिस ऑफ अलेक्झांडर' हा अलेक्झांडरच्या राज्यारोहणापासून मृत्यूपर्यंतच्या इतिहासाचा ग्रंथ. हा सात विभागांत लिहिलेला इतिहास अलेक्झांडरच्या स्वाऱ्यांबरोबर असलेले अरिस्टोबुलस व लॅगसपुत्र टॉलेमी यांनीं दिलेल्या माहितीवरून तयार केला. अलेक्झांडरविषयीं जास्त विश्वसनीय व सर्वांगपरिपूर्ण माहिती या ग्रंथाखेरीज दुसरीकडे आढळणार नाहीं.

एरिअनचे इतर उपलब्ध असलेले ग्रंथ खालीलप्रमाणें आहेत– 'इंडिका', 'ॲसिईज कोन्ट्रा ॲलॅनोज'–रोमन लष्करी कारभाराचें ज्ञान देणास महत्त्वाचा लेख, 'पेरिप्लस ऑफ दि युक्झाइन', हॅड्रियन बादशहासाठीं लिहिलेली सरकारी माहिती; 'टॅक्टिका'. याची लिहिण्याची धाटणी साधी, स्पष्ट व जोरकस आहे.

**एरिक्सन, जॉन** ( १८०३ – १८८९ )— हा स्वीडिश अमेरिकन इंजिनिअर होता. त्याचे मुख्य शोध कॅलॉरिक एंजिन व स्क्रू प्रॉपेलर हे असून त्यामुळें जहाजांच्या धंद्यांत मोठी क्रांति झाली. त्यानें बांधलेलीं टरेट या जातीचीं जहाजें यांनीं अमेरिकन यादवी युद्धामध्यें फार प्रसिद्धि मिळविली. या जातीचें पहिलें जहाज 'मॉनिटॅर' हें होय.

**एरिडु**—हें सुमेरियन धर्माचें एक अतिशय प्राचीन केंद्र होतें. प्राचीन बाबिलोनियन ग्रंथांत याला 'समुद्रनगर' अशा अर्थाचें नांव आहे. येथें एका देवतेची पूजा होत असे. ही समुद्रदेवता व ज्ञानदेवता होती. एरिडूची जागा प्रथम जे. ई. टेलरसाहेबानें १८५४ त शोधून काढली. ख्रि. पू. ७०० च्या सुमारास एरिडु बांधलें असावें. ख्रि. पू. ६ व्या शतकापर्यंत याचा शिलालेखांत उल्लेख सांपडतो.

**एरिथ्री**—हें आशिया मायनरमधील एक अयोनियन शहर होतें. हें एका द्वीपकल्पांत आहे; या द्वीपकल्पांत उत्कृष्ट दारू तयार होत असे. बरेच दिवस हें शहर अथेन्सच्या अमलाखालीं होतें. परंतु पेलोपोनेशियन युद्धानंतर या शहरानें अथेन्सचें स्वामित्व झुगारून दिलें. अद्याप हेलेनिक भिंती बुरुजांसह चांगल्या स्थितींत आहेत. याशिवाय किल्ला व बायझन्टाइन इमारती यांचे अवशेष आहेत. आधुनिक लिथ्री हें एक लहानसें बंदर आहे. त्याचा किआस व स्मर्ना यांशीं व्यापार चालतो.

**एरिव्हान**—आर्मेनिया लोकसत्ताक राज्य व शहर. एरिव्हान किंवा आर्मेनियाचें राज्य हें ट्रान्सकॉकेशियन सोव्हिएट रिपब्लिक आहे. १९१७ मध्यें ट्रान्सकॉकेशियानें बोल्शेव्हिकांना मान्यता देण्याचें नाकारलें, आणि १९१८ मध्यें हें स्वतंत्र रिपब्लिक स्थापन झालें. पण हेंहि राज्य लयाला जाऊन जॉर्जिया आणि आर्मेनिया यांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. आर्मेनियन रिपब्लिक दोस्त राष्ट्रांनीं १९२० मध्यें मान्य केलें; आणि दोस्त राष्ट्रें व तुर्कस्तान यांच्यामध्यें १९२० ऑगस्टमध्यें झालेल्या सेव्हरेसच्या तहामध्यें ही मान्यता नमूद करण्यांत आली. १९२१ त आर्मेनिया हें सोशालिस्ट सोव्हिएट रिपब्लिक असल्याचें जाहीर झालें. जॉर्जिया, अझरबैजन, इराण व आशिया मायनर यांच्यामध्यें हें राज्य असून याचें क्षेत्रफळ १५,०९० चौ. मै. व लो. संख्या ८,१०,००० आहे. एरिव्हान हें राजधानीचें शहर असून त्याची लोकसंख्या दोन लाख आहे. हा बहुतेक प्रदेश डोंगर-पठारांचा असून आराराट पर्वतशिखर ( १७,३२५ फूट ) येथपर्यंत पसरलेला आहे. या प्रदेशाला युफ्राटिस, तिग्रिस, आरास व कुर या नद्यांच्या पाण्याचा पुरवठा असून हा प्रदेश फार सुपीक आहे. खाद्यधान्यें, कापूस, जवस, भात, तमाखू, फळें यांचें पीक होतें. मेंढ्या पाळणें व फळबागा हे धंदे खूप किफायतशीर व आणखी वाढण्यासारखे आहेत. खनिज संपत्ति नाफ्तेल, गंधक, शिलाजित, सोरा हीं विपुल आहेत. शिवाय सोनें, रुपें, तांबें, क्षार, इ. सांपडतात.

**एरी कालवा**—सं. संस्थानांतील हा सर्वांत मोठा कालवा आहे. या कालव्यानें मोठीं सरोवरें समुद्राला जोडलीं गेलीं आहेत. हा कालवा बफेलो बंदरापासून हडसन बंदरापर्यंत ३६३ मैल लांब, ७० फूट रुंद आणि ७ फूट खोल आहे.

**एरी सरोवर**—उत्तर अमेरिकेंतल्या सरोवरांच्या मोठ्या रांगेंतलि हें एक सरोवर असून तें ह्यूरॉन आणि ऑंटारिओ या दोन सरोवरांमध्यें आहे. या सरोवराची लांबी सुमारें २६५ मैल आणि क्षेत्रफळ ६,९०० चौ. मैल आहे. या सरोवराचा दक्षिण भाग सं. संस्थानांत आणि उत्तर भाग कानडा देशांत आहे. वेलांड नांवाच्या कालव्यामुळें या सरोवरांतून जहाजें ओन्टारिओ सरोवरांत जाऊं शकतात. या सरोवरावर सं. संस्थानांच्या बाजूला बफेलो, एरी व क्लीव्हलँड हीं मुख्य बंदरें आहेत.

**एरोड**—मद्रास इलाख्यांतील कोइमतूर जिल्ह्याचा एक पोट-विभाग. ह्यांत एरोड, भवानी, धारापुरम् व करूर तालुक्यांचा समावेश होतो.

तालुक्याचें क्षेत्रफळ ५९८ चौ. मैल. खेडीं १९८. एरोड गांव हें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. ३३,६७२. पूर्व सरहद्दीवरून कावेरी नदी वाहते. पाऊसपाण्याचें सरासरी वार्षिक प्रमाण २७ इंच. कापूस बराच पिकतो.

मराठे, हैदर व ब्रिटिश यांच्या वेळोवेळीं होणाऱ्या स्वाऱ्यांमुळें हें गांव बहुतेक पडलें होतें. १६६७ मध्यें म्हैसूर सैन्यानें हा गांव काबीज केला व १७६८ मध्यें हैदराजवळून तो ब्रिटिशांनीं घेतला; पण त्याच वर्षीं त्यानें तो परत घेतला. पुढें १७९० मध्यें

तो मेडोनें घेतला होता. पण टिपू येतो आहे असें समजतांच त्यानें तो सोडून दिला. १७९२ च्या तहानंतर फिरून लोक राहण्यास येऊं लागले. वर लेख असलेलीं येथें दोन प्राचीन देवालयें आहेत.

**एलॅटेरिडी**—हा एक शेणकिड्यांच्यासारखा प्राणिवर्ग आहे. यास जमिनीवर उताणें ठेवलें असतां आपल्या स्नायूंच्या हालचालीनें एकदम हवेंत बरेंच उंच उडतां येतें. यांनीं घातलेल्या अळ्यांपासून पिकांना फार उपद्रव होतो. कारण त्या अळ्या झाडांचीं मुळें खाऊन टाकतात. यांचा आकार बारीक असून त्यास टार किडे असें म्हणतात. अमेरिकेंतील काजवे या वर्गांत मोडतात. यांतील सर्वांत मोठे किडे अडीच इंच लांब असतात.

**एलादि गुटिका**— एक आयुर्वेदीय औषध. यांत वेलदोडे, तमालपत्र, दालचिनी, मनुका, पिंपळी, खडीसाखर, ज्येष्ठमध, खारीक हीं मुख्य औषधें असतात. पित्तजन्य कास, ओकारी, बारीक ताप, मूर्च्छा, चक्कर येणें, पार्श्वशूळ, तोंडाला रुचि नसणें, घसा सुजणें व दुखणें, आवाज बसणें, इत्यादि लक्षणांवर ही गुटिका चांगली आहे. याखेरीज ही वृष्य असून तृप्तिकारक आहे. १ ते २ गोळ्या, मध, दाडिमावलेह, आर्द्रकावलेह यांतून देतात.

**एलास मोथेरियम**—हे गेंड्यासारखे प्राणी युरोपमध्यें एका काळीं अस्तित्वांत होते, पण ते आतां नष्ट झाले असून त्यांचे अवशेष कांहीं ठिकाणीं आढळतात. याला गेंड्याप्रमाणें एक मोटें व एक लहान शिंग असे.

**एलास्मॉब्रँची**—( कूर्चमत्स्य ). हा एक माशांचा पोटवर्ग आहे. यामध्यें शार्क, श्वमत्स्य, वगैरे येतात. यांचा सांगाडा कूर्चामय असतो, व यांच्या हृदयांत स्नायुमय कोष असून त्यामध्यें लहान लहान पडद्यांच्या रांगा असतात, व त्यांतून उघडणाऱ्या कल्ल्यांच्या पांच किंवा अधिक जोड्या असतात. यांची उत्पत्ति अंतस्थ पद्धतीनें होते. नराला कटीरापासून दोन पुढें आलेलीं इंद्रियें फुटलेलीं असतात. हा माशांचा पोटवर्ग फार प्राचीन काळीं अस्तित्वांत असून त्यांतील कांहीं नष्ट जातींचे प्रास्तरावशेष आढळण्यांत आले आहेत.

**एलिचपूर**—मध्यप्रांत, उमरावती जिल्हा, एक तालुका व गांव. एलिचपूर पूर्वीं जिल्हा असे तो १९०५ सालीं मोडला. सातपुड्याच्या पायथ्याशीं हा तालुका आहे. तालुक्यांत चंद्रभागा व पूर्णा या मुख्य नद्या आहेत. पांच मोठीं गांवें व ३०६ खेडीं तालुक्यांत आहेत. ज्वारी, कापूस, तूर व गहूं हीं पिकें होतात. मुख्य ठिकाण एलिचपूर हें पूर्वीं वऱ्हाडची राजधानी होतें. उमरावतीच्या वायव्येस ३० मैलांवर १२०० फूट उंचीवर हें वसलें आहे. लो. सं. सुमारें तीस हजार. येथील जुने पाण्याचे नळ १४२५ सालीं अहमदशहा बहामनी राजानें घातलेले आहेत. पूर्वीं येथें कापूस आणि रेशीम यांचा मोठा व्यापार होता. आज फक्त विणकामाचे कारखाने कांहीं चालले आहेत. उत्तम सतरंज्या होतात. पूर्वींचा ५४ पुऱ्यांचा हा गांव होता व राजधानीचें सर्व वैभव होतें. आज जुन्या इमारतींचे कांहीं अवशेष पाहावयास मिळतात. येथील मशिदी व इदगे पाहण्यासारखे आहेत. बागा व विहिरी नांवाला उरल्या आहेत.

परतवाडा हें याचें लष्करी ठाणें आहे. तो गांव आज एलिचपूरपेक्षां चांगला वसला आहे.

**एलिझाबेथ** ( १५३३–१६०३ )—इंग्लंडची एक राणी. ही आठव्या हेन्री राजाची मुलगी १५५८ मध्यें गादीवर बसली. हिनें आपल्या वडिलानें स्थापन केलेला नवीन प्रॉटेस्टंट धर्मसंप्रदाय जोरानें पुढें चालविला; एवढेंच नव्हे तर युरोपांतील सर्व धर्मसुधारकांना पाठिंबा दिला. त्यामुळें स्पेनच्या फिलिप राजाचा तिच्यावर रोष होऊन त्यानें एक मोठें आरमार इंग्लंडवर पाठविलें; पण त्या आरमाराचा इंग्रज नाविकांनीं धुव्वा उडविला. एलिझाबेथनें शहाणपणानें राज्य केलें. तिच्या पदरीं बरेच नाणावलेले मुत्सद्दी जसे होते तशींच विद्वद्रत्नेंहि होतीं. तिची ४५ वर्षांची कारकीर्द इंग्लंडच्या इतिहासांत अत्यंत वैभवाची म्हणून गाजली. वाङ्मयाचें एलिझाबेदन युग तर चिरस्मरणीय राहिलें. स्कॉटलंडची राणी मेरी ( एलिझाबेथनंतरची गादीची वारस ) ही आश्रयार्थ तिच्याकडे आली असतां तिला १९ वर्षें कैदेंत ठेवून शेवटीं फांशीं दिलें, हा तिच्या चारित्र्यावर मोठा डाग आहे. शिवाय ती अविवाहित असल्यानें तिचें वर्तनहि शुद्ध नव्हतें. तथापि इंग्लंडच्या राज्यकर्त्यांमध्यें एलिझाबेथला बरेंच वरचें स्थान द्यावें लागतें.

**एलिझाबेथ पेट्रोव्हना** ( १७०९–१७६२ )— रशियाची एक महाराणी. ही पीटर दि ग्रेटची मुलगी १७४१ त गादीवर बसली. ही फार कर्तबगार असे. हिनें स्पेन-वारसायुद्धांत आणि सतवार्षिक युद्धांत इंग्लंडच्याविरुद्ध ठाण मांडलें होतें. हिनें मॉस्को येथें विद्यापीठ स्थापिलें.

**एलिस द्वीपसमूह**—ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें ' संरक्षित ' म्हणून या बेटांचा समावेश आहे. पॅसिफिक महासागरांत फिजी बेटांच्या उत्तरेला सुमारें १४ चौ. मैलांचा हा द्वीपसमूह ज्वालामुखीपासून बनलेला असून त्या बेटांचें मुख्य उत्पन्न नारळ हें होय. अर्थात् नारळ हाच निर्यातीचा मुख्य जिन्नस होय. लोकसं. ( १९४० ) ४,६१३.

**एलिस बेट**—हें बेट न्यूयॉर्क उपसागरांत आहे. परदेशांतून येणाऱ्या प्रवासी लोकांना त्यांच्या कागदपत्रांची तपासणी पुरी होईपर्यंत या बेटावर ठेवतात. तसेंच परदेशीं जाणाऱ्या प्रवाशांनाहि वरील कारणास्तव याच बेटावर ठेवतात.

कांचनगंगा (पान ४२३)

कांजीवरम्—श्रीदेवराजमंदिर (पान ४२४)

काराकोरम् दरी (पान ४५८)

**एलेकँपेन**—[वर्ग-कांपोझिटी]. हें झाड युरोप व आशियामध्यें आढळतें. याची उंची ३ ते ४ फूट असते. मुळांपासूनच फुटणारीं याचीं पानें २ फुटांहूनहि अधिक लांब असतात. याचीं फुलें मोठीं व पिवळीं असतात. याचे कांदे बहुवर्षायु असतात आणि त्यांस कापरासारखी कडवट चव असते. या मुळाचा औषधींत खोकला व क्षय यांवर उपयोग करतात. याला हिंदींत फाटमेर म्हणतात.

**एलेनबरो, एडवर्ड लॉर्ड** (१७९०–१८७१)—एक ब्रिटिश मुत्सद्दी व हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल. १८१८ सालीं तो लॉर्ड प्रिव्हिसील या अधिकारावर होता व १८२८ पासून कांहीं वर्षें तो बोर्ड ऑफ कंट्रोलचा अध्यक्ष होता. १८४१ मध्यें त्यानें हिंदुस्थानचें गव्हर्नरजनरलपद स्वीकारलें. आल्याबरोबर त्यानें अफगाण युद्धाची यशस्वी अखेर केली. १८४३ त त्यानें सिंध प्रांत खालसा केला व ग्वाल्हेर जिंकून घेतलें. पण त्याचें हें खालसा धोरण पार्लमेंटला न आवडून त्याला परत बोलावण्यांत आलें (१८४४). परत आल्यावर फर्स्ट लॉर्ड ऑफ अॅड्मिरॅल्टी या हुद्द्यावर त्याला नेमलें व १८५८ त तो परत बोर्ड ऑफ कंट्रोलचा अध्यक्ष झाला.

**एल्क-मूस**—आशिया, युरोपचा उत्तर भाग व अमेरिका या खंडांत सांपडणारी ही हरणांची सर्वांत मोठी जात होय. ही सांबरासारखी असते. उंची सुमारें सहा फूट, भरदार मान, व पुष्कळशा फांद्या असलेलीं शिंगें, व रंग करडा, किंवा तपकिरी असें हें हरिण असतें. विलो, मॅपल, बर्च, वगैरे वृक्षांच्या बारीक रोपट्यांवर हें जनावर जगतें. नॉर्वे व स्वीडन या देशांतून याची शिकार करण्यास बंदी आहे.

**एल्जिन**—स्कॉटलंड, एल्जिनशायर परगण्यांतलें मुख्य गांव आहे. हें लॉसी नदीवर वसलेलें आहे व फार प्राचीन आहे. १९ व्या शतकाच्या आरंभापासून या शहरांत सुधारणा झाली. हें स्कॉटलंडमधील निसर्गरमणीय प्रदेशात असून येथील निरोगी हवा, स्वस्त राहाणी, चांगल्या शिक्षणसंस्था यांमुळें याची भरभराट झाली आहे. इ. स. १२२४ त बांधलेलें प्रार्थनामंदिर, नगरभवन, पदार्थ-संग्रहालय, शिक्षणसंस्था, बाजार, कला व शास्त्र यांचें व्हिक्टोरिया विद्यालय, हीं महत्त्वाचीं स्थळें आहेत. येथील उद्योगधंदे म्हणजे दारू गाळणें, कातडीं कमावणें, लोखंडाचें ओतीव काम करणें, लोकरीचीं वस्त्रें विणणें, वगैरे होत. लो. सं. सुमारें आठ हजार.



**एल्जिन मार्बल्स**—हा प्राचीन शिल्प वस्तूंचा संग्रह असून ७ वा अर्ल एल्जिन (१७६६–१८४१) यानें १८१४ मध्यें या वस्तूंपैकीं बहुतेक अथेन्स शहरामधून इंग्लंडांत आणल्या. पुढें हा वस्तुसंग्रह ब्रिटिश पार्लमेंटनें ब्रिटिश म्यूझियममध्यें ३५,००० पौंड किंमतीला विकत घेतला. या संग्रहांत प्राचीन काळचे देव व देवता आणि पराक्रमी पुरुष यांच्या मूर्ती व पुतळे आहेत. तसेंच कांहीं लढायांचे व मिरवणुकींचे देखावेहि आहेत.

**एल्जिन, लॉर्ड** (१८११–१८६३)— हिंदुस्थानचा एक व्हाइसरॉय व गव्हर्नर जनरल. डलहौसी व कॅनिंग यांच्या जोडीनें हा ईटन व ऑक्सफोर्ड या ठिकाणीं विद्याभ्यास करीत होता. १८४२ त त्याला जमेकाचा गव्हर्नर व चार वर्षांनीं कानडाचा गव्हर्नर जनरल नेमण्यांत आलें. १८५६ त चीन व इंग्लंड यांमध्यें तंटा उपस्थित झाला असतां याला चीनशीं बोलणें करण्याकरितां पाठविलें. लॉर्ड कॅनिंगनंतर याला हिंदुस्थानचा व्हाइसरॉय व गव्हर्नर जनरल नेमण्यांत आलें (१८६२). त्याला या अधिकारावर असतांना फारसें काम करतां आलें नाहीं. सरहद्दीवरील बंडें मोडण्याकरितां त्यानें जय्यत तयारी ठेवली होती. सुमात्रामध्यें वरचढ झालेल्या डच लोकांना आपल्या काबूंत आणण्याची त्यानें मोठी खटपट केली. चहाची लागवड व तिबेट आणि काश्गार यांना जाणारे व्यापारी मार्ग हे प्रश्न निकालांत काढण्याकरितां सिमल्याहून सियालकोटला जात असतां वाटेंत धर्मशाळा या ठिकाणीं तो मरण पावला.

**एल्डर**—[वर्ग-कॅप्रिफोलिआसी, जाति-सांबुकस]. या झाडांच्या अनेक जाती आहेत. हीं लहान झाडें अथवा झुडपें असतात. यांचीं पानें समोरासमोर असून टोंकदार असतात. यांना पांढरीं लहान फुलें येतात. तीं झुबकेदार असतात. यांना लहान बोरांएवढीं तांबडीं किंवा काळीं फळें येतात. यांचीं पानें कडू व दुर्गंधीयुक्त असून तीं रेचक व वामक असतात. यांच्या कोंवळ्या अंकुरामध्यें भेंडाचें प्रमाण बरेंच असतें. याच्या फळांपासून दारू करतात.

**एल्‌फिन्स्टन, मौंट स्टुअर्ट** (१७७८–१८५९)— हिंदुस्थानातील एक ब्रिटिश मुत्सद्दी व अधिकारी. याचें घराणें स्कॉटलंडचें असून हा वयाच्या सोळाव्या वर्षी हिंदुस्थानांत कारकून म्हणून आला. १८०१ सालीं पुण्याचा रेसिडेंट कर्नल क्लोज याचा मदतनीस म्हणून त्याची नेमणूक झाली. पुढें नागपूरचा रेसिडेंट झाला. या दोन्ही ठिकाणीं त्यानें हुशारी दाखवून वरिष्ठांची मर्जी चांगली

संपादन केली. १८०८ सालीं त्याला अफगाणिस्तानच्या वकिलातीबरोबर पाठविण्यांत आलें. या सफरीच्या आठवणींबाबत त्यानें एक ग्रंथहि लिहिला. पुढें त्याला पुण्याला रेसिडेंट केलें (१८११). पुण्यास तो बाजीरावाच्या सारखा पाळतीवर राहिला व त्याला त्यानें सळो कीं पळो करून सोडलें. शेवटीं गंगाधरशास्त्र्याच्या खुनाच्या निमित्तानें त्याला पेंचांत धरून लढाई करण्यास भाग पाडलें. पेशवाईची अखेर लवकर होण्याला एल्फिन्स्टनची कारवाई पुष्कळ अंशीं कारणीभूत झाली आहे. नंतर १८१९–२७ पर्यंत तो मुंबईचा गव्हर्नर होता. या अमदानींत मात्र त्यानें राज्याची घडी पूर्वपरंपरेला धरून कशी नीट बसेल याकडे विशेष लक्ष दिलें. त्यानें नवीन कायदे केले, शाळा काढल्या व हिंदी प्रजेला परकीय राज्य जाचक वाटणार नाहीं अशा गोष्टी करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. त्यानें हिंदुस्थानचा इतिहास लिहिला आहे.

**एल्ब**—बोहिमिया व सायलेसिया या प्रांतांच्या सरहद्दीवरून वाहणारी मध्य युरोपांतील महत्त्वाची नदी. ही नदी उत्तर समुद्राला मिळते. या नदीच्या उगमाजवळील खोऱ्यांतील (सॅक्सन स्वित्झरलंड) सृष्टिसौंदर्य प्रसिद्ध आहे. हिची लांबी ७२५ मैल असून खोऱ्याचें एकंदर क्षेत्रफळ ५६,८६५ चौरस मैल आहे. ही नदी सुमारें ५५० मैलपर्यंत जलमार्ग या दृष्टीनें उपयुक्त आहे. उत्तर समुद्र व बाल्टिक जहाज–कालवा हे कीलच्या उपसागराला या नदीमुळें जोडले गेलेले आहेत. या प्रमुख जलमार्गाशिवाय इतर लहान लहान कालवे या नदींतून काढलेले पुष्कळ असून त्यांतून अगदीं छोट्या नावांतून वाहतूक चालते.

**एल्बरफेल्ड**—हें शहर प्रशियांत आहे. येथें फार मोठाले औद्योगिक कारखाने आहेत. त्यांत मुख्य कारखाने कापूस, रेशीम व लोंकर यांचें कापड, मखमल, गुंड्या, फिती, सूत, दोरा, गालिचे, रंग, लोखंड व पोलाद, यंत्रें, बाजाच्या पेट्या, कागद हे आहेत. रंग देणें, रंग काढून कपडा शुभ्र करणें आणि कापडावर चित्रें काढणें व चिटें छापणें हे धंदेहि मोठ्या प्रमाणावर चालतात. लोकसंख्या सु. दीड लाख आहे.

**एल्बा**—नेपोलियनच्या वास्तव्यामुळें अजरामर झालेलें हें बेट इटलीच्याजवळ असून त्याची लांबी १८ मैल व रुंदी २३⁄४ ते १०१⁄२ मैलांपर्यंत आहे. बहुतेक बेट पर्वतमय असून त्याची उंची कित्येक ठिकाणीं ३,००० फुटांपेक्षां जास्त आहे. येथील खनिज संपत्ति मुख्यत्वें लोखंड ही असून त्याची निर्यात केली जाते. याशिवाय मीठ, संगमरवरी दगड, वगैरे खनिजें निघतात. फळबागांचीहि येथें लागवड होत असून त्यांपासून दारू काढतात. किनाऱ्यानें मासेमारीचा धंदा जोरांत चालतो.

**एल्बुर्झ**—इराणांतील एक पर्वत. कॅस्पियन समुद्राच्या किनाऱ्यावर त्याला समांतर असा पसरला आहे. याची लांबी ६०० मैल व रुंदी सुमारें २०० मैल आहे. अत्युच्च शिखर डेमाव्हेंड (१९,४०० फूट). हें एक मृत ज्वालामुख आहे.

**एल्म**—[ वर्ग-उल्मासी ]. याच्या अठरा जाती आहेत. हीं झाडें उत्तरेकडील समशीतोष्ण कटिबंधांत व आशिया खंडांतील उष्ण कटिबंधांतील पर्वतांवर आढळतात. याच्या दोन जाती इंग्लंडमध्यें आढळतात. हें झाड सुंदर असून सरळ व लवकर वाढतें. याचें खोड उंच असतें. याची उंची ७० ते ८० फूट असते. याचें लांकूड पिंगट, कठिण व चांगल्या रेषांचें असून सहसा तडकत नाहीं. याची डोंगरी जात इतकी उंच नसून सावकाश वाढते. याला फार बिया येतात. याच्या एका जातीच्या झाडांचीं पानें गुळगुळीत असतात. तर एका जातीस आंसुढाळ (वीपिंग) म्हणतात, ही फार डौलदार असते. अमेरिकेमध्येंहि याच्या कांहीं जाती असून त्यांत एक पांढरी व एक तांबडी आहे.

**एल्सिनोर**—(हेल्सिंगोर). हें डेन्माकचें बंदर कोपनहेगनच्या उत्तरेस रेल्वेनें २८ मैलांवर आहे. येथील बंदरांत २५ फूट खोल पाण्यांतून जाणारीं जहाजें येऊं शकतात. येथें दोन कोरड्या गोद्या आहेत. लोखंडी कामाचे व एंजिनियरिंगचे कारखाने आहेत. येथून शेतीचे पदार्थ बाहेर जातात व लोखंड, कोळसा, गळिताचीं धान्यें व सूत हीं बाहेर देशांहून येतात. शेक्सपियरच्या हॅम्लेट नाटकांतील एल्सिनोर हेंच होय. ज्याच्या इतिहासांतून हॅम्लेटची गोष्ट घेतली तो सॅक्सो ग्रॅमॅटिकस येथेंच जन्मला. वृक्षांनीं आच्छादिलेले खडक हॅम्लेटचें थडगें म्हणून व येथील एक ओहोळ ऑफेलियाचा प्रवाह म्हणून दाखविण्यांत येतात. शहराच्या पूर्वेस एका भुशिरावर क्रॉनबर्ग अथवा क्रोनेनबर्ग नांवाचा किल्ला आहे.

**एस्नेर, कुर्ट** (१८६७–१९१९)— बव्हेरियांतील एक क्रान्तिकारक पुढारी. त्यानें समाजसत्तावादी लेख लिहिले आणि नंतर 'वोरवर्ट्स' याचा मुख्य संपादक झाला. १९०७ मध्यें त्यानें 'दि फॉल ऑफ दि एम्पायर' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. १९१८ च्या राज्यक्रान्तीमध्यें त्यानें प्रत्यक्ष भाग घेतला होता, नंतर तो बव्हेरियाचा मुख्य प्रधान नेमला गेला. तो क्रान्तिकारक व समाजसत्तावादी होता, तथापि बोल्शेव्हिझमला त्याचा विरोध असे. व त्यानें न कचरतां तीव्र जोरदार टीका केली आहे. आपल्या कचेरींतून घरीं परत येत असतां त्याचा गोळी झाडून खून करण्यांत आला.

**एसर हडन**—एक अॅसीरियन किंवा असुर राजा. आपला बाप सेन्नाचेरिब याचा खून झाला तेव्हां (इ. स. पू. ६८१)

आराट्यीं झगडत असलेल्या असुरी सैन्याचा एसर हडन मुख्य होता. असुर देशाच्या योद्धयांनीं कटवाल्यांचा पराभव करून एसरला गादीवर बसविलें. तो जसा शूर तसा हुषार, मनमिळाऊ व चांगला राज्यकर्ताहि होता. गादीवर आल्यानंतर त्यानें प्रथम दक्षिण बाबिलोनमधील खाल्डीयनांचें बंड मोडून, बाबिलोन शहर पुनः भरभराटीस आणलें, व ती आपली राजधानी केली. साम्राज्याची दक्षिण सरहद्द ताब्यांत ठेवणें जरूर असल्यानें तो अरबस्तानांत शिरला व अरबी लोकांवर त्यानें मोठी दहशत बसविली ख्रि. पू. ६७३ व ६७० या दोन सालीं एसरनें ईजिप्तवर मोहिमा केल्या व ईजिप्तचे तुकडे तुकडे केले. ख्रि. पू. ६६८ मध्यें जेव्हां पुनः ईजिप्तनें वर डोकें काढलें तेव्हां त्याला दडपण्यासाठीं एसर निघाला असतां वाटेंत आजारी पडून मरण पावला. असुर-बनिपाल व समास-शम-युकिन या त्याच्या दोन मुलांत त्याचें राज्य वांटण्यांत आलें.

**एसेक्स**—हा इंग्लंडचा एक परगणा असून त्याचें क्षेत्रफळ ९,७९,५३२ एकर आहे. प्रदेश अतिशय सुपीक असून त्यांत मुख्यत्वें गव्हाचें पीक काढतात. त्याशिवाय घेवडे, बटाटे, सातू, बारली, कांदे, वगैरेंचीहि लागण होते. परगण्यांतून ५-६ बारीक नद्या वाहतात. थेम्स नदी एसेक्सच्या सरहद्दीवरून वाहते. या परगण्यांत म्हणण्यासारखे उद्योगधंदे नाहींत; तरीसुद्धां रेशमाचें कापड विणणें, वगैरे कारखाने येथें चालतात. चेम्सफोर्ड, साउथ-एन्ड, हारविच, वगैरे शहरें या परगण्यांत आहेत. लो. सं. सुमारें बारा लक्ष आहे.

**एसेन**—जर्मनी, प्रशिया प्रांत, ऱ्हूर व एम्सचर यांमधील प्रदेशांतील लोखंडी सामानाचें मुख्य केंद्र. क्रपचें पोलादी व लोखंडी सामानाचे जगप्रसिद्ध कारखाने एसेनलाच आहेत. येथील क्रपचे कारखाने १८२७ सालीं फक्त दोन माणसांनीं सुरू केले. आणि त्यांची वाढ एवढी झाली कीं, गेल्या दोन्ही महायुद्धांत या पोलादी कारखान्यांत तयार झालेल्या यंत्रसामुग्रीनें सगळ्या जगाचा थरकांप केला. लो. सं. ६,५९,८७१.

**एसेरीन**—धनुर्वातावर उपयोग करीत असलेल्या कॅलाबार (घेवडा) नांवाच्या एका झाडापासून हें औषध तयार करण्यांत येतें. या औषधाचे कांहीं थेंब डोळ्यांत टाकले असतां बुबुळाचें आकुंचन होतें म्हणून याचा कांहीं नेत्ररोगांमध्यें उपयोग करण्यांत येतो.

**एस्किमो**—उत्तर अमेरिकेच्या ध्रुवप्रदेशांत राहणारे हे लोक खुजे असतात. ग्रीनलंड, लॅब्राडोर व यांच्या पश्चिमेकडे बेहरिंग सामुद्रधुनीपर्यंतच्या प्रदेशांत हे लोक आढळतात. यांची संख्या सुमारें २७,००० आहे. उन्हाळ्यांत तंबू ठोकून व हिंवाळ्यांत बर्फाच्या घरांतून राहातात. त्यांचे कपडे लोंकरी कातडयाचे असून त्यांची उपजीविका पाण्यांतील प्राण्यांवर होते. ते चांगले शिकारीहि असून भाले आणि धनुष्यबाण हीं त्यांचीं शस्त्रें होत. त्यांच्याजवळ कुत्रा हा प्राणी फक्त माणसाळून राहतो व त्यांचीं वाहतुकीचीं कामें करतो. यांच्यांत कुटुंबसंस्थेखेरीज इतर शासन-संस्था नाहीं. दुसऱ्याच्या वस्तूला एस्किमो हात लावणार नाहीं. शिकारींतून मिळालेल्या गोष्टी सर्व लोक सारख्या वांटून घेतात. अमेरिकन सं. संस्थानी सरकारनें यांना शिक्षण देण्यासाठीं कांहीं तरतूद केली आहे. व गोऱ्या लोकांच्या चालीरीती उचलण्यानें यांच्यांत कांहीं सुधारणा दिसते.

**एस्टर**—मद्यार्क (अल्कोहोल) आणि अम्ल ह्यांच्या संयोगानें पाण्याचा एक किंवा अनेक अणू (मॉलिक्युल) बाहेर निघून तयार झालेलें संयुक्त. उदा., एथिल अल्कोहोल आणि ॲसेटिक अम्ल यांच्यापासून एथिल ॲसेटेट तयार होतें. पुष्कळशीं एस्टर उत्पतनशील (व्होलटाइल) आणि सुगंधी असतात.

**एस्टोनिया**—युरोपच्या वायव्य भागांत हें एक लोकसत्ताक राज्य आहे. पूर्वीं रशियन साम्राज्यांतील हें एक मांडलिक राज्य होतें. बाल्टिक समुद्राच्या कांठावरचा हा देश फिन्लंडचें आखात, रशिया, लाटव्हिया आणि बाल्टिक समुद्र यांच्यामध्यें आहे. याचें क्षेत्रफळ १८,३५३ चौ. मैल व लोकसंख्या ११,३४,००० आहे. या देशांत अकरा जिल्हे आहेत. राजधानी रेव्हेल असून इतर मोठीं शहरें डोर्पाट, पार्नो व नार्व्हा हीं आहेत. हा प्रदेश बहुतेक सपाट आहे, फक्त उत्तर भाग डोंगराळ आहे. नार्व्हा ही एकच मोठी महत्त्वाची नदी आहे, पण लहान नद्या व सरोवरें पुष्कळ आहेत. निम्मा प्रदेश शेतीचा व चतुर्थांश भागांत पाइन, बर्च व आल्डर या झाडांचें जंगल आहे. सर्व शेतजमिनींची मालकी कांहीं मोठ्या जमीनदारांकडे होती, पण अलीकडे अग्रेरियन रिफॉर्म बिलानें शेतकरी लोकांना या जमिनी वांटून दिल्या आहेत. राय, गहूं, बार्ली व बटाटे हीं मुख्य पिकें असून जंवस, तमाखू हीं पिकेंहि होतात. गाई-म्हशी पाळणें, समुद्रा-वरची मच्छीमारी हे धंदे मोठ्या प्रमाणावर चालतात. इमारती लांकूड, बटाटे, कागद, जंवस, सीमेंट, स्पिरिट हा माल येथून निर्गत होतो. पांच-षष्ठांश लुथेरन लोक व बाकी बहुतेक ग्रीक कॅथॉलिक आहेत. प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें आहे. दुय्यम शिक्षणसंस्था, व्यापारी शिक्षणसंस्था आणि अध्यापन शाळा पुष्कळ आहेत. डोर्पाट येथें टार्टु विद्यापीठ आहे. टॅलिन येथें टेक्निकल युनिव्हर्सिटी १९३६ सालीं निघाली. १९२० मध्यें येथें लोकसत्ताक राज्यपद्धति स्थापन झाली व स्टेट असेंब्ली या नांवानें कायदेमंडळ आहे. राज्यकारभार या असेंब्लीनें निवडलेलें मंत्रिमंडळ व अध्यक्ष यांच्या हातीं आहे. लष्करी शिक्षण सक्तीचें आहे. दहाव्या व बाराव्या शतकांत एस्टोनिया देश डेन्मार्कच्या

ताब्यांत होता. नंतर तो देश स्वीडननें आपल्या राज्यास जोडला. आणि १७१० मध्यें हा प्रदेश रशियानें जिकला. रशियन राज्यक्रांतीनंतर १९१८ च्या फेब्रुवारींत एस्टोनियानें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. १९४० सालीं एस्टोनियाचा प्रवेश रशियाच्या सो. सो. लोकसत्ताक राज्यसंघांत झाला. गेल्या महायुद्धांत कांहीं काळ हा जर्मनीनें आपल्या ताब्यांत ठेवला होता.

**एस्पार्टेरो, वाल्डोमेरो** ( १७९२–१८७९ )— स्पेनमधील एक मुत्सद्दी. याला १८४१–१८४३ पर्यंत राज्याचा रीजन्ट व पुन्हां १८५४–१८५६ पर्यंत सरकारचा मुख्य अधिकारी नेमलें होतें. १८७० मध्यें स्पेनच्या सिंहासनाला उमेदवार म्हणूनहि याचें नांव क्वचित् पुढें करण्यांत येत होतें.

**एस्पेरॅन्टो भाषा**—सर्व राष्ट्रांच्या परस्पर व्यवहाराला उपयोगी पडावी म्हणून वार्सॉच्या डॉ. झामेनोफनें ही नवीन भाषा तयार करून १८८७ मध्यें वृत्तान्तासह प्रसिद्ध केली. या भाषेची घडण फार सोपी केली आहे. धातू, विभक्तिप्रत्यय, वगैरे मिळून सारे २००० शब्द यांत आहेत. व हे शब्द प्रमुख युरोपीय भाषांतून तोंडांत बसण्यास सोपे असे निवडून घेतले आहेत. सर्वनामें ' ओ ' कारान्त असतात व सर्व विशेषणांच्या शेवटीं–a असतो. j लावून अनेकवचन साधतात. सर्व साधित क्रियाविशेषणांच्या शेवटीं–e असतो. la हें एकच उपपद सर्वत्र वापरायचें असतें.

**एहरलिच, पॉल** ( १८५४—१९१५ )—हा एक जर्मनींतील वैद्य असून रक्तासंबंधींच्या सूक्ष्म पिंडरचनाशास्त्रांतील याचे शोध फार महत्त्वाचे आहेत. तथापि याची मुख्य प्रसिद्धि साल्व्हर्सन ( ६०६ ) आणि निओसाल्व्हर्सन ( ६१४ ) या आर्सेनिक संयुक्तांच्या शोधामुळें झालेली आहे; कारण हीं द्रव्यें उपदंशरोगावर फार परिणामकारक औषधें ठरलीं आहेत. १९०८ मध्यें औषधिविज्ञान शास्त्राबद्दलचें नोबेल पारितोषिक हा आणि नोचिकॉफ या दोघांना देण्यांत आलें होतें.

---

# ऐ

**ऐ**— इ. स. पू. २ ऱ्या शतकांतल्या हाथीगुंफा येथील लेखांत पहिल्या अवस्थेतील ' ए ' ला डोक्यावर आडवी रेघ काढून ' ऐ ' बनविल्याचें दिसून येतें. दुसऱ्या अवस्थेतील ' ए ' ला मात्रा देऊन ' ऐ ' केल्याचें उदाहरण इ. स. ६ व्या शतकांतील उष्णीषविजयधारिणीच्या पुस्तकांत आढळतें. पुढील शतकांतल्या कुयारकोट लेखांत तिसऱ्या अवस्थेतील ' ए ' ला चांगली मोठी मात्रा देऊन ऐ अक्षर काढलें आहे. दहाव्या शतकापर्यंत असाच ऐ काढीत असत असें दिसतें. १२ व्या शतकांतील हस्तलिखित पुस्तकांत हल्लींचा वळणदार ऐ पहावयास मिळतो.

**ऐतरेय आरण्यक**—हें ऋग्वेदाचें आरण्यक आहे. याचे पांच भाग असून अठरा अध्याय आहेत. वरील पांच भागांपैकीं प्रत्येकासहि आरण्यक हेंच स्वतंत्र नांव आहे. ऐतरेय आरण्यक हा ऐतरेय ब्राह्मणांपैकीं अवशेष भाग असावा कारण यांत आरण्यक विचारापेक्षां यज्ञविषयक विवेचन जास्त आहे. हौत्रकर्मापैकीं ब्राह्मणांत व आश्वलायन श्रौतसूत्रांत न आलेल्या अशा महाव्रतनामक श्रौतविधीच्या हौत्रासंबंधीं या ग्रंथांत पहिल्या, चौथ्या व पांचव्या आरण्यकांत विवेचन आलें आहे. दुसरें आरण्यक आध्यात्मिक विचारांचें असून पहिल्या तीन अध्यायांत पुरुष या नांवानें विश्वात्म्याचा विचार केला आहे. त्यापुढील चार अध्यायांसच ऐतरेय उपनिषद् म्हणतात. तिसऱ्या आरण्यकांत ऋग्वेद संहिता, पदपाठ व क्रमपाठ या तीन पठनक्रमांच्या गूढ अर्थासंबंधीं व रूपकमय अर्थासंबंधीं आणि अक्षर, वर्ण-स्वर-संधि यांच्यासंबंधीं रूपकात्मक विवेचन असून सृष्टींतील कांहीं चमत्कार प्रत्यक्ष अथवा स्वप्नांत पाहिल्यास त्यांसंबंधीं शांत्यर्थ कांहीं विधी सांगितले आहेत. ऐतरेय आरण्यक हें त्याच्या नांवावरून ऐतरेय ऋषीनेंच रचलें असावें असें वाटतें.

**ऐतरेय उपनिषद्**—ऐतरेय उपनिषद् हें फारच लहान आहे. त्याचे तीन अध्याय आहेत. पहिल्या अध्यायामध्यें जग हें ब्रह्मापासून निर्माण झालें असून मनुष्यप्राणी हा त्याचें अत्युच्च व्यक्त स्वरूप होय असें म्हटलेलें आहे. तसेंच मनुष्यामध्यें इंद्रियें, मन व हृदय या तीन करणांत आत्मा वास करतो व तदनुरूप जागृति, स्वप्नस्थिति व निद्रा या तीन अवस्था उत्पन्न होतात, असेंहि त्यांत म्हटलें आहे. दुसऱ्या अध्यायांत आत्म्याच्या त्रिविध जन्मांचा विचार केला आहे. संसाराचा अंत म्हणजे मोक्ष होय व स्वर्गांतील अमरत्व ( पूर्ण स्थिति ) म्हणजे मोक्ष होय असें म्हटलें आहे. तिसऱ्या अध्यायांत आत्म्याचें स्वरूप वर्णिलें असून प्रज्ञा म्हणजेच ब्रह्म होय असें प्रतिपादिलें आहे.

**ऐतरेय ब्राह्मण**—ऐतरेय ब्राह्मण हा ऋग्वेदाचा ब्राह्मणग्रंथ आहे. या ब्राह्मणाला ऐतरेय ब्राह्मण हें नांव पडण्याचें कारण, सायणाचार्यांनीं आपल्या उपोद्घातांत यासंबंधीं जी आख्यायिका दिली आहे, त्याप्रमाणें इतरानामक ऋषिपत्नीचा पुत्र ऐतरेय महिदास यानें प्रचलित केलेल्या ब्राह्मणग्रंथास ' ऐतरेय ब्राह्मण ' असें नांव वैदिक संप्रदायांत रूढ झालें.

हल्लीं उपलब्ध असलेल्या ऐतरेय ब्राह्मणाचे चाळीस अध्याय असून पांच पांच अध्यायांनीं मिळून एक अशा याच्या आठ पंचिका आहेत. यज्ञांत होतानामक ऋत्विजानें करावयाचें जें

होत्रकर्म त्यासंबंधीं ऋग्वेदांतील ऋचा कोणत्या यागांत कोणत्या म्हणावयाच्या हा या ग्रंथाचा मुख्य विषय आहे. या ब्राह्मणाचा प्रमुख भाग सोमयागविषयक आहे. त्याच्या पहिल्या १-१६ अध्यायांत अग्निष्टोम यज्ञाचा ऊहापोह केला आहे. १७-१८ अध्यायांत ३६० दिवस चालणाऱ्या गवामयन विधीचा विचार केला गेला आहे. १९-२४ या अध्यायांत द्वादशाह म्हणजे बारा दिवस चालणाऱ्या यागाचें विवरण आहे. व २४-३२ या अध्यायांत अग्निहोत्रविषयक चर्चा आलेली आहे. ३३-४४ या अध्यायांत राज्याभिषेकाचा विधि व राजपुरोहिताच्या पदवीचा उल्लेख आलेला आहे. अशा रीतीनें सर्व ऋतूंचें वर्णन असून ठिकठिकाणीं कांहीं प्रासंगिक गोष्टीहि सांगण्यांत आलेल्या आहेत.

ऐतरेय ब्राह्मणांत जनमेजयाच्या राज्याभिषेकोत्सवाचें वर्णन आहे. हा जनमेजय राजा वेदसंहितीकरणाच्या प्राचीन कालाच्या शेवटीं शेवटीं झाला. अर्थात् त्याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत प्रसिद्ध राजा म्हणून येणें साहजिक आहे. यावरून ऐतरेय ब्राह्मण कुरुयुद्धानंतर लवकरच रचलें गेलें असावें.

ऐतरेय ब्राह्मणाची गद्य भाषाशैली अपरिणत, बोजड, तुटक अशा स्वरूपाची आहे. उपमा अगर उत्प्रेक्षा या ब्राह्मणांत सहसा आढळून येत नाहींत. कांहीं कांहीं ठिकाणीं या ब्राह्मणांतील भाषा सोपी, सरळ व जिवंत अशी वाटते. शुनःशेपाची कथा सुलभ व सुंदर भाषेंत सांगितली आहे. शुनःशेपाच्या कथेंत जे छंदोबद्ध भाग आहेत त्या भागांची अगर गाथांची भाषाशैली फार सुंदर व सोपी अशी आढळते व या दृष्टीनें गद्यापेक्षां यांतील गाथा भाषेच्या दृष्टीनें उच्च दर्जाच्या आहेत.

**ऐंद्र**—इंद्रिडिअम पहा.

**ऐन**—[ लॅ. टरमिनॅलिया टोमेंटोसा ]. यास साग, आसन, अशींहि नांवें निरनिराळ्या प्रांतांत आहेत. या झाडापासून स्वच्छ व पारदर्शक असा पुष्कळ डिंक निघतो. संताळ लोक तो खातात व धूपाप्रमाणें जाळण्याकरितां आणि अंगाला लावण्याकरितांहि त्याचा उपयोग करण्यांत येतो, असें म्हणतात. साल औषधी असून रंगाकरितांहि तिचा उपयोग करतात. परंतु सालीचा मुख्य उपयोग कातडीं कमावण्याकरितां होतो. कातडीं कमावण्याकरितां फळाचाहि उपयोग करतात. लांकूड सरपणाकरितां चांगलें असतें व घर बांधणें, खटारगाड्या, मुसळें, होड्या, वगैरे कामाकरितांहि त्याचा उपयोग करितात. छोटा नागपूर व दुसऱ्या कांहीं ठिकाणीं या झाडावर लाख तयार होते; व पानांवर टसर रेशमाचा किडाहि पोसला जातो.

**ऐनी अकबरी**—अबुल फजलचा अकबरकालीन परिस्थितिदर्शक ग्रंथ. फजलच्या 'अकबर-नामा' या प्रचंड ग्रंथाचा हा तिसरा भाग होय. याची रचना इ. स. १५९८ त पुरी झाली. या फारसी इतिहासावरून अकबराच्या वेळच्या परिस्थितीचें उत्तम ज्ञान होतें. इ. स. १७८३ त फ्रॅन्सिस ग्लॅड्विन नांवाच्या इंग्रज लेखकानें मूळ फारसी ग्रंथावरून याचें इंग्रजी भाषांतर केलें व वारन हेस्टिंग्जनें सरकारकडून हें भाषांतर प्रसिद्ध करण्याच्या कामीं थोडाफार आश्रय देवविला म्हणून त्याला अर्पण केलें. हें ग्लॅड्विनचें भाषांतर लंडन येथें प्रसिद्ध झालें (१८००). इ. स. १८४८ त प्रो. ब्लोकमननें केलेलें भाषांतर यापेक्षां चांगलें आहे. ऐनी अकबरीचें एक मराठी भाषांतर वि. का. राजवाडे यांच्या 'भाषांतर' मासिकांतून प्रसिद्ध झालें आहे.

**ऐनु**—एझो, साखालीन, आणि कुरेले या जपानी बेटांवर राहाणारे रानटी लोक. चिनी लोक त्यांना हुंगी असें म्हणतात. जपानी लोकांचे हे मूळ पूर्वज असावेत असा समज आहे. यांची उंची जास्त म्हणजे पाच फूट असून ते शरीरानें दणकट आणि चपळ असतात. पण फार घाणेरडे राहातात. यांच्या केसांची वाढ अतिशय असून पिवळटसर रंगांत किंचित् काळसर छटा मारणारा असा त्यांच्या शरीराचा रंग असतो. त्यांच्या उपजीविकेचें मुख्य साधन म्हणजे शिकार करणें व मासे मारणें हें होय. यांची संख्या सुमारें १८,००० आहे.

**ऐनुन्मुल्क**—हा अयोध्या प्रांताचा एक सुभेदार ( १३०६-१३४३ ) होता. अल्लाउद्दीन खिल्जीनें याला मुलतानची सुभेदारी देऊन माळव्यांतील हिंदुराज्यें जिंकण्याची कामगिरी याच्याकडे सोंपविली होती. त्याप्रमाणें त्यानें स. १३०५ मध्यें माळव्याचा राजा कोक उर्फ हरनंद याच्यावर स्वारी करून त्याचा पराभव केला व त्या प्रांतांत मुसलमानी सत्ता स्थापन केली.

**ऐयनर**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक क्षेत्ररक्षक देवता. ती संकटापासून पिकांचें निवारण करते असें मानलें जातें. दक्षिणेंत बहुतेक प्रत्येक गांवांत ऐयनरचें एक तरी देऊळ असतेंच.

या देवतेची मूर्ति मनुष्याच्या आकाराची असून कधीं कधीं मुकुट व राजदंड धारण करून बसलेली, तर कधीं अश्वारूढ अशी दाखविलेली असते. पुरणी व पुडकला या त्याच्या दोन बायका कधीं कधीं त्याच्या शेजारीं असतात. यांच्यापुढें पशु बळी दिले जातात.

ऐयनर हें नांव 'हरि-हर' या दोन नांवांचा संधि किंवा अपभ्रंश असावा व विष्णूनें जेव्हां स्त्रीरूप घेतलें त्या वेळीं शिवापासून त्याला झालेला हा मुलगा असें मानण्यांत येतें. ही कदाचित् आद्य द्राविड देवता असून, मागाहून आलेल्या आर्यांनीं तिला मान्यता देऊन आपल्या देवांत ओढलें असावें.

**ऐहिकवाद**—( सेक्युलॅरिझम् ). होलियोकच्या समाजनीतिशास्त्रविषयक मतास ऐहिकवाद हें नांव आहे. नांवाप्रमाणें व्यावहारिक नीतिशास्त्राच्या व समाजाच्या भौतिक आणि नैतिक उन्नतीच्या दृष्टीनें या मताची उभारणी केली आहे. हें मत ईश्वराच्या अस्तित्वा-नास्तित्वासंबंधीं मुग्ध आहे. हा एक उपयुक्ततावादाचा प्रकार आहे. होलियोकनें लंडन येथें एक मंडळ स्थापन केलें. चार्लस ब्राडलॉच्या नेतृत्वाखालीं या मंडळानें प्रचलित ख्रिस्ती संप्रदाय मोडून काढण्याचा व इतर राजकीय व सांपत्तिक सुधारणांचा पुरस्कार केला.

**ऐहोळ**—विजापुर जिल्ह्यांतील हुनगंडी तालुक्यांतील एक गांव. या गांवासमोर डोंगरावर मेगुतीचें मंदिर आहे. त्याच्या पूर्वेकडील भिंतींत इ. स. ६३४ मधील चालुक्यकालीन एक शिलालेख आहे. त्यांत महाराष्ट्र या देशाचा उल्लेख प्रथमच आढळतो. सध्यां या देवळास दुर्गादेवीचें देवालय म्हणतात. येथें एक ब्राह्मणी व एक जैन अशीं दोन लेणीं आहेत. यांखेरीज इतर देवालयें असून त्यांवरहि शिलालेख आहेत.

## ओ

**ओ**— ' अ ' पासून ' ओ ' वर्ण तयार झाला असावा ही साहजिक सुचणारी कल्पना चुकीची ठरते. कारण अशोकाच्या गिरनार लेखांत ' ओ ' ची आकृति स्वस्तिकांतील उभ्या भागाप्रमाणें आहे. इ. स. पहिल्या शतकांतील कुशानवंशी राजाच्या वेळच्या मथुरा येथील लेखांत वरील ' ओ ' च्या वरच्या आडव्या रेघेला बराच बांक आहे. पुढील शतकांतल्या नाशिकच्या वासिष्ठीपुत्र पुळुमायीच्या लेखांत खालच्या रेघेलाहि बांक आहे. पांचव्या शतकांतील जयनाथच्या दानपत्रांत हल्लींच्या ' उ ' च्या सारखी ' ओ ' ची आकृति दिसते. प्रतिहार कक्काच्या घटिआला लेखांत ( इ. स. ८६१ ) हें साम्य अधिकच पटतें. १२ व्या शतकांतील एका हस्तलिखित पुस्तकांत ' ओ ' हा ' अ ' ला मात्रा देऊन काढल्यासारखा दिसतो. आज आपण काढतों तसा ओ कोठेंच आढळत नाहीं. पूर्वी अक्षराच्या डाव्या हाताला काना काढून ( पृष्ठमात्रा देऊन ) मात्रेचें काम भागवीत असत.

**ओक, जनार्दन विनायक** ( १८७९–१९१७ ) — एक महाराष्ट्रीय संपादक व कोशकार. यांचा जन्म पुणें येथें झाला. एम्. ए. झाल्यानंतर ( १९०१ ) फर्ग्युसन कालेजांत हे तीन वर्षें प्राध्यापक होते. पुढें मध्यप्रांत शिक्षणखात्यांत वड्या पगाराची जागा मिळाल्यानें त्यांनीं ही नोकरी सोडली. कांहीं दिवस हे नागपुर नील सिटी स्कूलचे सुपरिंटेंडेंट होते. पण रिस्ले सर्क्युलरासारखीं सर्क्युलरें बजावण्याचें पातक आपल्या हातून होऊं नये म्हणून तीं चारशें रुपयांची नोकरी सोडून हे प्रो. विजापूरकरांच्या समर्थ विद्यालयास येऊन मिळाले ( १९०८ ), व विद्यालयाचे चालक झाले. पुढें विद्यालय बंद झालें (१९१०). तेव्हां त्यांनीं ' लोकशिक्षण ' मासिक काढून तें सहा वर्षें चालविलें. याच अवधींत त्यांनीं ' गीर्वाण लघुकोश ' हा संस्कृत-मराठी कोश केला. यांचें मराठी बीजगणितहि प्रसिद्ध आहे.

**ओक झाड**—[ वर्ग-क्युपुलिफेरी ]. कर्कश जातीच्या अनेक झाडांना व झुडुपांना हें सामान्य नांव आहे. या झाडांचीं फुलें

एकलिंगी असतात व त्यांत पुंकेसर आणि स्त्रीकेसर अथवा किंजल्क निराळ्या फुलांत असतात. नरपुष्पांपासून कॅटफिन घड तयार होतात. स्त्रीपुष्पांपासून फळें तयार होतात. हें झाड प्राचीन लोक फार पवित्र मानीत. ब्रिटनमध्यें दोन जातींचे ओक वृक्ष आढळतात. याचें लांकूड कठिण, चिवट, किंचित् लवचिक व बळकट असून फारसें जड नसतें. हें सहसा पाणी खात नाहीं. रंगाऱ्याचा ओक म्हणून याची एक जात आहे. तिच्या सालीचा कातडें कमावण्याकरितां व रंगविण्याकरितां उपयोग करतात. तांबडा ओक, बुचाचा ओक अशाहि दोन जाती आहेत. तुर्कस्तानांतील ओक झाडाचें लांकूड इमारतीच्या कामीं येतें. एका जातीच्या ओक वृक्षाचीं फळें खाण्यालायक असतात. सामान्य ओक वृक्षाच्या सालीचा कातडें कमावण्याच्या कामीं उपयोग होतो. तसेंच तिचा औषधीमध्यें व स्नायुसंकोचक म्हणून उपयोग होतो.

**ओक, वामन दाजी** (१८४५–१८९७)—एक महाराष्ट्रीय ग्रंथकार. जन्म कोंकणांत गुहागराजवळील हेदवी गांवीं. स्थिति फारच गरिबीची होती. अभ्यास रत्नागिरी हायस्कुलांत झाला. १८७० मध्यें हे मॅट्रिक झाले. पुढें २-३ वर्षें मुंबईस खाजगी शाळांतून नोकरी करून १८७५ सालीं नागपूर सिटी स्कूलमध्यें फर्स्ट असिस्टंटच्या जागीं त्यांची नेमणूक झाली व पुढें त्याच शाळेंत हेडमास्तर झाले. नंतर संबळपूर व रायपूर

हायस्कुलांत हेडमास्तर झाले. १८९० पासून आपल्या अंतकालापर्यंत हे 'काव्यसंग्रहा' चे संपादक होते. हे उत्तम कवि आणि लेखक होते. श्रीमन्माधवनिधनात्मक पद्यरत्नमाला (१८८३), लॉर्ड बेकन (१८८४), कादंबरीसार, मुद्राराक्षससार, वासवदत्ताकथासार (१८८९), वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं. यांचा मराठी कवितेचा व्यासंग दांडगा होता. हे स्वभावानें शांत, निगर्वी व निर्व्यसनी होते.

**ओक, विनायक कोंडदेव** (१८४०–१९१५)—एक महाराष्ट्रीय चरित्रकार, कवि व बालोपयोगी निबंधकार. 'काव्यसंग्रह'कार ओकांचे हे चुलतचुलत बंधु. यांचा जन्म हेदवी येथेंच झाला. थोडेंसें मराठी व इंग्रजी तीन इयत्ता एवढेंच यांचें शिक्षण. पण स्वकष्टानें यांनीं आपली मराठी भाषा चांगलीच कमावली. 'कँडीसाहेबानें मला लिहावयास शिकविलें,' असें हे म्हणत. हे आठ रुपये पगाराच्या मास्तरापासून अ. डे. एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या १०० रु. पगाराच्या जागेपर्यंत चढले. यांनीं 'बालबोध' नांवाचें मुलांसाठीं मासिक सतत ३४ वर्षे चालविलें. यांनीं बालबोधांत एकंदर ४०२ चरित्रें, ४०२ कविता, ४०२ निबंध, ३७१ शास्त्रीय विषयांवरील निबंध आणि इतर विषय ८५० एवढें लिहिलें आहे. यांनीं छोटीमोठीं पन्नास पुस्तकें लिहिलीं आहेत व त्यांतील बहुतेक निर्णयसागर छापखान्यानें छापलीं आहेत. यांच्या ग्रंथांचें स्वरूप लक्षांत घेतां यांस बालवाङ्मयाचे जनक म्हणणें अधिक शोभेल. यांची भाषा सुबोध, सरळ व मनोरम आहे.

**ओकलंड**—अमेरिका, कॅलिफोर्नियांतील अलमेडा परगण्याचें मुख्य ठिकाण. हें सानफ्रान्सिस्को उपसागराच्या पूर्व किनाऱ्यावर वसलेलें आहे. येथून सानफ्रान्सिस्को शहर ६ मैल आहे. शहराच्या मध्यभागीं 'मेरिट' नांवाचें सरोवर आहे. व त्यामुळें शहरास एक प्रकारची शोभा आली आहे. येथील 'कॅलिफोर्निया,' व 'सेंट मेरीज'.हीं दोन कॉलेजें व त्याचप्रमाणें मिल्स कॉलेज (स्त्रियांकरितां), वगैरे प्रसिद्ध आहेत. औद्योगिक आणि व्यापारीदृष्ट्या शहर फार महत्त्वाचें आहे. उपयुक्त जिनसांचे कारखाने बरेच आहेत. 'सदर्न पॅसिफिक', 'सेंट्रल पॅसिफिक', वगैरे रेल्वेशाखांचें हें शेवटचें स्टेशन आहे. लो. सं. सुमारें तीन लक्ष.

**ओका**—मध्य रशियांतून वाहणारी ही नदी उरल पर्वतांत उगम पावून सुमारें ८०० मैल वाहिल्यावर निज्नी नोग्होरोडजवळ व्होलगाला मिळते.

**ओकापी**—जिराफासारखा हा एक आफ्रिकेंत आढळणारा प्राणी युगांडामध्यें प्रथम सर एच्. एच्. जॉन्सन यानें (१८९९–१९००) शोधून काढला. परंतु हा जिवंत असा त्याच्या पाहण्यांत आला नव्हता. याचा आकार मोठ्या सांबराएवढा

किंवा खेचराएवढा असतो. याच्या पायावर व शरीराच्या मागल्या भागावर झिब्रासारखे पट्टे असतात.

**ओकायामा**—जपानच्या होनशू बेटावरील आशाईन नदीकांठचें शहर. शिमोनो सेकी व कोबे यांमधील लोहमार्गावर हें शहर असून याच्या आसमंतात् तांदूळ फार पिकतो. येथें कापसापासून सूत व रेशीम यांचे धागे तयार करण्याचे कारखाने प्रचंड प्रमाणावर चालतात. लो. सं. १,६६,१४४.

**ओंकार**—एक मराठी कवि. हा पळसी गांवचा रहिवासी आणि पहाडसिंग नांवाच्या राजाचा आश्रित होता. याचें उपनांव 'चोरमागे' असें होतें. याचें कारण असें सांगतात कीं, याच्या कोणा पूर्वजास चोर म्हणून फांशीं देत असतां एका साधूनें त्याला सोडवलें व आपल्या संप्रदायांत मागून घेतलें; म्हणून 'चोरमागे' हें नांव पडलें. यानें कांहीं काव्यरचनाहि केली आहे.

**ओंकार मांधाता**—मध्यप्रांत, नर्मदेच्या कांठचें एक तीर्थस्थान. राजपुताना–माळवा रेल्वेच्या मोरटक्का स्टेशनापासून हें सात मैल आहे. नर्मदेच्या पात्रांत मांधाता हें बेट आहे. यावर ओंकारेश्वर व अमलेश्वर हीं प्राचीन देवालयें आहेत. ओंकार–अमलेश्वर हें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. सूर्यवंशांतील मांधाता राजानें येथें यज्ञ केला असें पुराणांतरीं आहे. उत्तर तीरावर वैष्णव आणि जैन धर्मीयांचींहि देवळें आहेत. या ठिकाणीं प्राचीन इतिहासाचे अनेक अवशेष सांपडतात.

**ओकुमा, कौंट** (१८३८–१९२२)—एक जपानी मुत्सद्दी. लहानपणीं यानें चिनी वाङ्मयाचा अभ्यास करून इंग्रजी व डच भाषांचेंहि चांगलें ज्ञान मिळविलें. बापानें त्याला लष्करांत घालण्याचें ठरविलें होतें. पण आपली सर्व शक्ति सरंजामी पद्धत मोडून त्या जागीं सनदशीर राज्यपद्धति स्थापन करण्यांत खर्च करावयाची असा त्यानें निश्चय केला. १८६८ च्या जपानमधील राज्यक्रांतींत त्याचें मुळींच अंग नव्हतें तरी त्याच्या विचारांना

लोकांवर बराच परिणाम झालेला दिसला. मिकाडोच्या कारकीर्दींत त्याला परराष्ट्रीय कारभाराच्या खात्यांत दुय्यम अधिकाऱ्याची जागा मिळाली. १८६९ त तो अंतर्व्यवहार व फडणिसी खातें यावरचा चिटणीस झाला. यापुढील १४ वर्षे त्यानें निरनिराळ्या हुद्यांवर कामें करून राजकारणांत घालविलीं. आपल्या सार्वजनिक आयुष्यांत त्यानें विद्यावृद्धीची जरूरी पाहून त्या दिशेनें खटपट केली होती. १८९८ त मार्क्विस इटोच्या मृत्यूनंतर त्यानें परराष्ट्रीय मंत्री व मुख्य प्रधान या जागेवर काम केलें पण मंत्रिमंडळांत वेबनाव उत्पन्न होऊन थोड्या दिवसांतच त्याला राजीनामा देऊन घरीं बसावें लागल. पुन्हां १९१४–१५ सालीं तो मुख्य प्रधान होता. अतिशय थोर सुधारणावादी पुढारी म्हणून याचें नांव राहील.

**ओकेन, लॉरेन्झ** ( १७७९–१८५१ )—एक जर्मन सृष्टिशास्त्रज्ञ. १८०६ त यानें एक लहानसा ग्रंथ लिहून त्यांत कांटनें मानस व नीतिशास्त्रांत योजिलेलीं तत्त्वें यानें भौतिक शास्त्राला लाविलीं. १८०५ सालीं त्यानें उत्पत्तीवर एक पुस्तक लिहिलें. सर्व सेंद्रिय प्राणी पेशींपासून उत्पन्न होतात व ते पेशींचच बनलेले असतात असें त्याचें म्हणणें होतें. या सुमारास ओकेनची कीर्ति गोएटेच्याहि कानावर जाऊन येना विश्वविद्यालयांत वैद्यक शास्त्राच्या प्रोफेसराची जागा मिळाली. एकच्या शरीरांत एकंदर विश्वाच्या हालचालींचें केलेलें एकीकरण म्हणजेच सेंद्रियरचना होय, हें त्यानें १८०८ मध्यें लिहिलेल्या पुस्तकांत प्रामुख्यानें नजरेस येतें. खनिज क्षेत्रांतहि त्यानें धातूंच्या दगडांचें वर्गीकरण धातूंवरून न करतां त्यांच्या प्राणवायु, अम्ल व गंधक यांशीं होणाऱ्या संयोगानुसार केलें; १८१६ त त्यानें 'इसस' नांवाचें एक नियतकालिक काढिलें; त्यांत शास्त्राखेरीज संस्थानांच्या राज्यकारभारावर टीका प्रसिद्ध होत. तेव्हां सरकारचा त्यावर रोष झाला. तेव्हां ओकेननें प्रोफेसरी सोडली. त्यानें लिहिलेल्या ग्रंथांपैकीं १५ । १६ प्रसिद्ध आहेत.

**ओकोनेल, डॅनिएल** ( १७७५–१८४७ )—एक आयरिश देशभक्त. प्रथम यानें कॅथॉलिक लोकांवरच जुलमी कायदे रद्द करवून घेण्याचा प्रयत्न केला व १८२९ सालीं जेव्हां सरकारनें तसें केलें तेव्हां ओकोनेलची मान्यता फार वाढली. नंतर १८४१ पासून त्यानें इंग्लंडपासून आयर्लंडनें फुटून निघावें म्हणून मोठी चळवळ सुरू केली. तींत त्याला बरेच हाल सोसावे लागले. हा सुप्रसिद्ध वक्त्यांमध्यें मोडत असे.

**ओक्लाहोमा**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील मध्यभागाच्या पश्चिमार्धांतलें एक संस्थान. क्षेत्रफळ ६९,९१९ चौरस मैल. लोकसंख्या २३,३६,४३४. जमीन सामान्यतः उंचसखल मैदानांची. पश्चिम भागांतील मैदानांत झाडी मुळींच नाहीं, तर पूर्व बाजूस घनदाट अरण्यें असलेल्या ओझार्क टेंकड्या पसरल्या आहेत. संस्थानच्या मध्यभागांतून आरकन्सास नदी वाहते. दक्षिण सरहद्दीवरून 'रेड' नदी जाते. विविध प्रकारचें हवामान आढळतें; हिंवाळा व उन्हाळा हे कडक असतात. पाऊसहि सर्वत्र सारखा पडत नाहीं. कांहीं भाग तर अर्धवट रुक्षच आहे.

गहूं, ओट, कापूस, वगैरे पिकें निघतात. मध पुष्कळ सांपडतो; जनावरांची पैदास व दुभेन्या ( डेअऱ्या ) हे उद्योगहि महत्त्वाचे आहेत. खनिज पदार्थांत पेट्रोलिअम, गॅस, शिसें, कोळसा, अस्फाल्ट, चुना, जस्त, तांबें, संगमरवर, वगैरे प्रमुख आहेत. सीमेंटहि होतें.

पेट्रोलिअम व तदनुषंगिक उद्योगधंदे मोठ्या प्रमाणावर चालतात.

१५४१ मध्यें कोरोनॅडो यानें या भागांत प्रथम संचार केला. १७ व्या शतकांत फ्रेंच मुलुखांत याचा समावेश झालेला होता. १८०५ मध्यें हा भाग अमेरिकेकडे आला. १८३० मध्यें अमेरिकन इंडियनांची वसाहत करण्याकरितां ह्याचा कांहीं भाग राखून ठेवण्यांत आला होता. १९०७ मध्यें ओक्लाहोमा संस्थान करण्यांत आलें व युनियनमध्यें दाखल झालें. ओक्लाहोमा शहर मोठें असून कारभाराचें मुख्य ठिकाण आहे. नॉर्मन येथें ओक्लाहोमा विद्यापीठ आहे.

**ओगले, गोपाळ अनंत** ( १८८०–१९४४ )— एक महाराष्ट्रीय संपादक. यांचा जन्म विजयदुर्ग येथें. यांचें शिक्षण रत्नागिरी हायस्कूल व फर्ग्युसन कॉलेजमध्यें. कांहीं दिवस हे पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्यें व इतर शाळांत शिक्षक होते. १९०७ ते १९१७ पर्यंत हे 'देशसेवक' या पत्राचे संपादक होते. यांच्यावर एका राजद्रोही लेखाबद्दल जामीनकीच्या कलमाखालीं खटला झाला. नंतर ते 'राष्ट्रमत' या मुंबई येथें निघणाऱ्या दैनिकाच्या संपादकवर्गांत आले. १९१४ मध्यें यांनीं 'महाराष्ट्र' हें पत्र नागपुरास सुरू केलें व त्याचे ते आमरण संपादक होते. एकदां सोलापूर येथील लष्करी कायद्यासंबंधीं लेखाबद्दल यांस तीन महिन्यांची शिक्षा झाली होती.

**ओघम लिपि**—वीस मुळाक्षरांची प्राचीन ब्रिटिश आणि आयरिश लोकांची एक लिपि. मूळ संशोधकावरून हिला नांव पडलेलें दिसतें. ही लिपि विशेषेंकरून

दगडावर कोरलेली सांपडते. एका मुख्य आडव्या रेषेच्या खालीं आणि वर बारीक उभ्या रेषा किंवा काटकोनी–तिरप्या रेषा

काढून लिहिलेले दगड आयर्लंडांत आढळले. या लिपीचा उलगडा १४ व्या शतकांतील बॅलीमोटच्या हस्तलिखित पुस्तकांत केलेला आहे.

**ओजोद्रव्यें**—( प्रोटीन, प्रोतें ). हीं द्रव्यें प्राणी व वनस्पती यांच्या शरीरांत अत्यंत आवश्यक व महत्त्वाचीं असून तीं कर्ब, उज्ज, नत्र, प्राण व गंधक यांचीं मिळून बनलेलीं असतात. हीं द्रव्यें कोलॉइड वर्गाची असून अमिनो अम्लांची विशिष्ट तऱ्हेनें रचना होऊन बनलेलीं असतात. यांचें पूर्णपणें पृथक्करण करणें बरेंच कठिण आहे.

शरीरपोषणासाठीं ओजोद्रव्यें अत्यावश्यक असतात. अन्नांतून हीं मिळतात. वानस्पतिक अन्नापेक्षां प्राणिज अन्नांत हीं जास्त प्रमाणांत असतात. दूध, अंडीं, मासे व मांस यांत ओजोद्रव्यें अतिशय सांपडतात. लहान मुलांना हीं ओजोद्रव्यें वाढीसाठीं आवश्यक आहेत. तसेंच गरोदर व बाळंतीण स्त्रियांनाहि यांची फार आवश्यकता असते.

**ओझर**—जुन्नरच्या आग्नेयीस ६ मैलांवर कुकडीच्या डाव्या तीरावर हें एक लहानसें गांव आहे. हें अष्टविनायक गणपतीचें स्थान आहे. गांवाचें उत्पन्न देवस्थानास इनाम आहे. येथील व्यवस्था देव घराण्याकडे आहे.

**ओझोन**—(.ओषण). हा वायु प्राणवायूचें अन्यरूप आहे. हा तापवला म्हणजे प्राणवायु मिळतो. म्हणून २ भाग ( व्हॉल्यूम ) ओझोनपासून ३ भाग प्राणवायु मिळतो. म्हणून $O_3$ अशी याची सारणी ( फॉर्म्युला ) आहे. हा वर्णहीन वायु असून त्याला एक विशिष्ट वास येतो. हा अतिशय जोरदार प्राणिदोकारक आहे. हवा आणि समशीतोष्णीकरण यांसाठीं ओझोनचा उपयोग होतो.

फान मॅरम (१७८५) ह्यानें प्राणवायूंत विद्युत्स्फुलिंग पाठविला तर हा वायु तयार करतां येतो, असें दाखविलें. ह्यानंतर हा वायु निरनिराळ्या पद्धतींनीं तयार करूं लागले. अम्लमिश्रित पाण्यांतून जेव्हां विद्युत्प्रवाह जातो त्या वेळेस जो प्राणवायु उत्पन्न होतो त्यांतहि हा सांपडतो. भारद्विप्राणिदावर ( बेरिअम पेरॉक्साइड ) स्राविना ( फ्लुओरिन )ची क्रिया केली असतांहि मिळतो. परंतु या सर्व कृतींमध्यें हा वायु प्राणवायुमिश्रित असा सांपडतो.

ओषणवायूस एक चमत्कारिक वास येतो. त्याला रंग नसतो, परंतु तो द्रवरूपांत आणतात तेव्हां त्याचा निळा रंग असतो. हा तीव्र प्राणिदीकारक आहे आणि सेंद्रिय रसायनावर ह्याचा परिणाम फार लवकर घडतो. त्याचा कर्बयुक्त पदार्थांशीं संयोग होऊन निरनिराळीं रासायनिक द्रव्यें होतात.



**ओट**—हें एक खाद्य तृण धान्यांपैकीं असून याची लागवड सर्वत्र समशीतोष्ण कटिबंधांत करण्यांत येते. जरी याची लागवड सामान्यतः घोड्यांच्या खाण्याकरितां करण्यांत येते तरी याचें दळून पीठ केलें म्हणजे मनुष्यांसहि तें खाण्यालायक होतें. याच्या सुमारें ६० जाती आहेत. याचें उत्पन्न एकरीं २० पासून ८० बुशेलपर्यंत होतें. एका बुशेलचें वजन ३५ ते ४५ पौंड असतें. याचें दळून पीठ केलें असतां त्याचें वजन निम्में भरतें. पुष्कळ देशांतून याच्या पिठाची लापशी आणि भाकरी करून नेहमीं खातात.

**ओटॅगो**—हा न्यूझीलंडच्या दक्षिणेकडील बेटांतला एक जिल्हा असून त्याचें क्षेत्रफळ २५,२२० चौरस मैल आहे. लो. सं. २,२३,२२३. या जिल्ह्यांत सोन्याच्या खाणी असल्या तरी मुख्य धंदा शेतीचाच आहे. क्लथा ही न्यूझीलंडमध्यें सर्वांत मोठी नदी आहे. येथें दगडी कोळसाहि विपुल प्रमाणांत सांपडतो. डुनेडिन हें येथील सर्वांत मोठें शहर होय. तेथें विद्यापीठ आहे.

**ओटर**—( पाणमांजर ). हा एक सस्तन मांसाहारी प्राणी असून याचें डोकें मोठें व सपाट असतें. याचे कान आंखूड

असून पायांचीं बोटें कातडीनें बदकासारखीं जोडलेलीं असतात. हा बहुधा नदीकांठीं राहतो व माशांचा फन्ना पाडतो. याची लांबी दोन फूट असून वजन वीस रत्तल भरतें. इंग्लंडमध्यें याची शिकार करतात. पण आतां फारच थोड्या ठिकाणीं चालू आहे. याच्या निरनिराळ्या जाती उत्तर व दक्षिण अमेरिका, आफ्रिका, हिंदुस्थान व मलयामध्यें आढळतात. समुद्राजवळ राहणारीं पाणमांजरें उत्तर पासिफिक महासागराच्या किनाऱ्यावर आढळतात व तीं सील माशासारखीं असतात.

**ऑंटारिओ**—कानडामधला एक प्रांत. क्षेत्रफळ ४,१२,५८२ चौरस मैल. लो. सं. ३७,८७,६५५. युनायटेड स्टेट्स व हा प्रांत यांच्या दरम्यान कांहीं मोठमोठीं सरोवरें आहेत. उद्योगधंदे, खाणी व शेती यांच्या पैदाशींत सर्व संस्थानांत हा अग्रगण्य आहे. इमारती लांकूडहि विपुल निघतें. टोरांटो शहर राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण आहे. ओटावा शहर सरंघ

कानडाचें मुख्य ठिकाण आहे. टोरांटो, किंग्जटन, लंडन, हॅमिल्टन, आणि ओटावा या ठिकाणीं विद्यापीठें आहेत.

या भागांत प्रथम चॅंप्लेन यानें प्रवेश केला. मागाहून जेसूइट पंथाचे मिशनरी व लोंकरीचे व्यापारी यांनीं शिरकाव केला. १७६३ मध्यें हा ब्रिटिशांकडे आला.

**ओंटारिओ सरोवर**—उत्तर अमेरिकेंतील हें सर्वांत लहान सरोवर असून त्याची लांबी १०० मैल व क्षेत्रफळ ५,४०० चौरस मैलांचें आहे. एरी सरोवर व नायगारा यांचें पाणी या सरोवरांतून वाहत जाऊन तें सेंट लॅरेन्स नदीवाटें अटलांटिक महासागरांत जातें. हडसन, ओसवेगो व एरी कालवा या मार्गें अटलांटिक महासागरांतून संयुक्त संस्थानांतील भागांत आगबोटी येतात.

**ओटावा**—(नदी व शहर). ही नदी कानडाच्या क्विबेक प्रांतांत उगम पावून सेंट लॅरेन्सला मिळते. ओटावा शहराला या नदीमुळें पाणीपुरवठा व शहराजवळील धबधब्यामुळें विजेचा पुरवठा होतो. ओटावा ही कानडाची राजधानी या नदीच्या कांठीं वसलेली असून या शहरांतून लोहमार्गानें व जलमार्गानें वाहतूक चालते. येथें पदार्थसंग्रहालय, वेधशाळा पाहण्यासारख्या आहेत. हें शहर म्हणजे कानडाच्या लांकूडतोडीच्या धंद्याचें केंद्रस्थान होय. येथें सिमेंट, लोखंडी सामानाचे कारखाने व लोखंडाच्या भट्ट्या, वगैरे असून ते सर्व विजेवर चालतात. आणि हा विजेचा पुरवठा ओटावा नदीच्या धबधब्यावर यंत्रें बसवूनं केलेला आहे. येथें एक विद्यापीठ आहे. लोकसंख्या १,६३,८२९.

**ओटो दि ग्रेट** (९१२-९७३)— एक रोमन बादशहा. ९३६ सालीं याला जर्मनीचा राजा करण्यांत आलें. त्याच्या ३६ वर्षांच्या कारकीर्दींत त्याला लागोपाठ युद्धेंच करावीं लागलीं. यानें इटालियन लोकांची जुलमापासून मुक्तता केल्यावर यालाच ९६१ मध्यें इटलीचा राजा केलें.

**ओडर**—ही जर्मनींतील नदी मोरोव्हिअन पठारांत उगम पावते व मोरोव्हिया, सिलिशिया, व ब्रॅंडेनबर्ग यांमधून वाहत जाऊन तीन निरनिराळ्या फांट्यांनीं बाल्टिक समुद्राला मिळते. या नदीची लांबी ५५० मैल असून तिच्या कालव्यातून फार मोठ्या प्रमाणावर रहदारी चालते.

**ओडिसस**--(इंग्रजी नांव उलिसेस). हा इथाका बेटाचा राजा असून ट्रॉयचें जें युद्ध झालें त्या युद्धांत भाग घेतलेल्या ग्रीक वीरांपैकीं एक होय. ट्रायचा वेढा उठल्यानंतर तो आपल्या देशांत परत गेला. नंतर त्यानें उत्तर आफ्रिका, सिसिली आणि एइआ बेट येथें प्रवास केला. आणि शेवटीं पाताळांत गेला. याप्रमाणें एकंदर २० वर्षें परदेशीं राहून नंतर तो आपल्या देशांत परत आला. आपल्या राजवाड्यांत आल्यावर त्याला असें आढळलें कीं, त्याची राणी पेनिलोपी हिला मागणी घालण्याकरतां बरेच इसम राजवाड्यांत राहिलेले आहेत. या सर्व इसमांना त्यानें आपला पुत्र टेलेमकस याच्या मदतीनें ठार मारलें आणि नंतर तो १६ वर्षें हयात होता. त्याच्या एकंदर पराक्रमाचें वर्णन होमर कवीनें ओडेसी या नांवाच्या महाकाव्यांत केलें आहे.

**ओडेनबर्ग** - हंगेरी. व्हिएन्नापासून दक्षिणेला ३५ मैलांवर पश्चिम हंगेरीचें हें प्रमुख शहर असून १९२२ सालीं तें हंगेरियांत समाविष्ट झालें. लो. सं. सुमारें ४०,०००.

**ओडेन्स**—डेन्मार्क, फुनेन बेटांतील बंदर. ओडेन्स नदीच्या मुखाशीं आहे. या बंदरांत तंबाखू, कापड विणणें, रसायनें यांचे कारखाने असून निर्यात मालांत मुख्यतः कातडीं व दुभत्याच्या पदार्थांचा भरणा असतो. लो. सं. ८७,५२१.

**ओडेसा**— काळ्या समुद्रावरील दक्षिण रशियाचें महत्त्वाचें बंदर. या बंदराला दक्षिण बाजूकडील लोहमार्गांचें केंद्र म्हणूनहि फार महत्त्व आहे. येथें विश्वविद्यालय आहे. बंदराची खोली ४० फूट असून ५००० हजार टनांपर्यंतचीं जहाजें या बंदरांत येतात. लो. सं. ६,०४,२२३.

**ओतकाम**— (फाउन्ड्री). मोठमोठालीं यंत्रें तयार करीत असतांना त्यांचे निरनिराळ्या आकाराचे भाग करावे लागतात. यांपैकीं बरेच बिडाचेहि केलेले असतात. बिडाचे सर्व भाग ओतून केलेले असतात. हें सर्व काम ज्या ठिकाणीं केलें जातें त्यास ओतशाला असें म्हणतात. भाग लहान असतील व ते थोडेच हवे असतील तर तें बीड मुशींत पातळ करतां येतें. पण भाग मोठे किंवा अनेक करावयाचे असतील तर मूस न वापरतां 'कपोला' (रसपात्र) वापरावा लागतो. हा कपोला करण्यासाठीं २ फूट अगर त्यांहून अधिक व्यासाच्या चंबामध्यें आंतील बाजूस आगमातीचा थर देऊन त्यामध्यें बिडाचे तुकडे व कोकाचे तुकडे भरतात. जेव्हां बिडाचे भाग ओतावयाचे असतात तेव्हां या मिश्रणाखालीं आग पेटवून भात्यांनीं ती प्रज्वलित करावी लागते. या हवेनें कोक इतका तापतो कीं, त्याच्या उष्णतेमुळें बीड तापून त्याचा रस होतो. हा रस काढण्यासाठीं खालील बाजूस एक भोंक ठेवलेलें असतें. रस बराच पातळ झाला म्हणजे तो मातीच्या तयार केलेल्या मुशीमध्यें ओतून बिडाचे भाग तयार करतात. याच तऱ्हेनें पोलाद, पितळ, इत्यादींचें ओतकाम करतां येतें. मात्र त्या त्या गोष्टी तयार करीत असतांना योग्य तो बदल करावा लागतो.

**ओतारी**—ओतकाम करणारांची एक जात. यांची वस्ती वऱ्हाड-मध्यप्रांतांत फार आहे. मुंबई प्रांतांत पुणें, सातारा व खानदेश या जिल्ह्यांतून ओतारी आहेत. ओतारी आपण क्षत्रिय

आहों असें सांगतात. त्यांच्यांत पोटभेद नाहींत. एकाच आडनांवाच्या माणसांत लग्नें होत नाहींत. दसऱ्याच्या दिवशीं तुळजापूरच्या अंबाबाईला बकरा बळी देतात. पैठणची कालिका-देवी ही त्यांची कुलस्वामिनी होय. कांहीं ओतारी देवांच्या मूर्ती ओततात.

**ओतूर**—मुंबई इलाखा, पुणें जिल्हा, जुन्नर तालुक्यांतील एक खेडें. खानदेशांतील भिल्ल लोकांनीं फार त्रास दिल्यामुळें संरक्षणार्थ बांधलेला किल्ला येथें आहे. महादेवाचें व केशवचैतन्याचें अशीं दोन देवालयें येथें आहेत. येथें श्रावण महिन्यांत शेवटच्या सोमवारीं प्रतिवर्षी जत्रा भरते. लो. सं. ६,५३३.

**ओ'नील, युजीन** (१८८८- )—१९३६ सालीं 'नोबेल' पारितोषिक मिळविणारा हा अमेरिकेंतील अग्रणी नाटककार. त्यानें नाट्यविषय आणि नाट्यतंत्र यांत बऱ्याच सुधारणा सुचविल्या. त्याचीं सामुद्रिक एकांकी नाटकें त्याच्या समुद्रासंबंधीं अनुभवाचीं द्योतक आहेत. कट्टर वास्तववादी असूनहि वास्तवता आणि अद्भुतता यांचें सुंदर मिश्रण करण्यांत ओ'नीलचें कौशल्य दिसून येतें. याचें प्रत्यंतर 'मोर्निंग बिकम्स एलेक्ट्रा' यांत आढळेल.

**ओनेगा**—रशिया. हें सरोवर विस्तारांत लाडोगाच्या खालो-खाल आहे. सर्व युरोपांत याचा दुसरा क्रमांक लागतो. स्व्हर नदीवाटें याचें पाणी लाडोगांत जाऊन पडतें. याचें क्षे. फ. ३८०० चौ. मै. आहे. ओनेगा कालवा (४५ मै. लांब) दक्षिण किनाऱ्याच्या बाजूनें काढला आहे. हा स्व्हर व व्हीटेग्रा या दोन नद्या जोडतो. या सरोवराच्या भोंवतीं तुरळक वस्ती आहे.

**ओपवणें**— (ब्लीचिंग). कपड्याचा, कापडाचा किंवा सुताचा रंग घालविण्याच्या क्रियेला ओपवणें म्हणतात. ह्या क्रियेंत खटअधिहरित (कॅल्शिअम हायपोक्लोराइड), सिंधु-अधिहरित (सोडियम हायपोक्लोराइड), सिंधुपरप्राणिद (सोडि-यम परऑक्साइड) किंवा उज्जद्विप्राणिद (हायड्रोजन परऑक्साइड) ह्यांचा उपयोग करतात. प्रथम पाण्यांत चुना कालवून त्यांत कापड किंवा कपडा बुडवतात, व वाफेच्या साहाय्यानें तो सहा ते दहा तासपर्यंत चांगला उकळतात. नंतर पाण्यानें तो स्वच्छ धुतल्यावर सौम्य उज्जहरिकाम्ल (हायड्रोक्लोरिक ॲसिड) च्या पाण्यांत बुडवून त्यावर राहिलेला चुन्याचा अंश खटहरिता (कॅल्शियम क्लोराइड) च्या रूपानें घालवून टाकतात. धुण्याच्या सोड्याच्या पाण्यांत कपडा पुन्हा धुतात व त्यानंतर ओपवण्याची मुख्य क्रिया सुरू होते. 'ब्लीचिंग पावडर' (कॅल्शियम किंवा सोडियम हायपोक्लोराइड) च्या पाण्यांत कपडा तीन-चार तास भिजत ठेवतात. हायपोक्लोराइडवर हायड्रोक्लोरिक ॲसिडची क्रिया होऊन ऑक्सिजन तयार होतो व त्याच्यामुळेंच कापडाचा रंग नाहींसा होतो.

जरूर पडल्यास ही मुख्य क्रिया पुन्हां दुसऱ्यांदां आणि क्वचित् प्रसंगीं तिसऱ्यांदां सुद्धां करावी लागते; पण त्यापूर्वी सोड्याच्या पाण्यांत कपडा पूर्वीप्रमाणें (३-६ तास) धुवावा लागतो. रंग पूर्णपणें किंवा पाहिजे तितका गेल्यावर शेवटीं कपडा दोन तास हायड्रोक्लोरिक ॲसिडच्या पाण्यांत भिजत ठेवतात व नंतर पाण्यानें स्वच्छ धुऊन टाकतात.

वेळ असेल तर कपडा, कापड किंवा सूत उन्हांत वाळवावें.

**ओपोर्तो**— पोर्तुगालमधील दुसऱ्या प्रतीचें शहर व बंदर हें शहर दौरो नदीच्या दोन्ही कांठीं वसलेलें आहे. येथें लोकवस्ती फार दाट आहे व येथील हवा रोगट आहे. तथापि ओपोर्तोमध्यें राहणारे बहुतेक लोक शरीरानें बळकट व सुंदर आहेत. त्याबरोबरच अतिशय दरिद्री आहेत.

प्राथमिक शाळा, शिक्षकांकरितां शाळा, वैद्यक शाळा व्यापारशाळा, आरमारशाळा, वगैरे अनेक शिक्षणविषयक संस्था आहेत. ओपोर्तो हें नकशीच्या व सोन्याच्या मुलाम्याच्या दागिन्यांकरितां प्रसिद्ध असून येथें जवाहिरांचीं दुकानें आहेत ओपोर्तो हें बंदर दारूच्या निर्गतीकरितां प्रसिद्ध आहे. एक तृतीयांश लोकसंख्या कापूस, लोकर, कातडीं, रेशीम यांचा पक्का माल तयार करण्यांत गुंतलेली असते. ओपोर्तोचे हातमोजे व टोप्या पोर्तुगालमधील लोकांस फार आवडतात. ओपोर्तोहून दारू, कापसाचा पक्का माल, लांकूड, दगड, बुचें, मीठ, वगैरे माल बाहेर जातो. लो. सं. २,६२,३०९.

**ओफीर**— प्राचीन काळीं या प्रदेशाची सोन्याबद्दल फार प्रसिद्धि होती. हा देश सुएझच्या दक्षिणेकडे अगर पूर्वेकडे असावा असें अनुमान निघतें.

कांहीं संशोधकांनीं ओफीर हा प्रदेश पूर्व दिशेच्या टोंकाला असावा असें म्हटलें आहे, तर कांहींनीं सिंधु नदीच्या मुखा-जवळील अभीर म्हणजेच ओफीर असें ठरविलें आहे. ओफीर हा प्रदेश अरबस्तानांत असावा असेंहि कांहींचें मत आहे व तेंच सर्वांत अधिक ग्राह्य वाटतें. कदाचित् ओफीर हें सोपारा याचें अपभ्रष्ट रूप असावें असेंहि वाटतें.

**ओबी**—आल्ताई पर्वतांत उगम पावणारी ही नदी सुमारें २,००० मैल लांबीची असून ती सैबेरियांतून वाहत जाऊन ओबीच्या आखातास मिळते. ही नदी व तिला मिळणाऱ्या इरतिश, तोबोल, वगैरे नद्या हे महत्त्वाचे जलमार्ग होत.

**ओब्रायन, विल्यम स्मिथ** (१८०३-१८६४)—एक प्रख्यात आयरिश देशभक्त व मुत्सद्दी. याच्या घराण्याचा मूळ पुरुष आयर्लंडचा राजा ब्रोरेन्द्रे हा होता. त्याचें शिक्षण हॅरो व

केंब्रिज येथें झालें. १८२८ मध्यें तो पार्लमेंटमध्यें एनिस परगण्यातर्फे प्रथम निवडून आला. ओकोनेलनें कॅथॉलिक लोकांच्या उद्धारार्थ चालू केलेली चळवळ त्याला पसंत होती. तरीपण इतर पुष्कळ बाबतींत त्याचें व ओकोनेलचें पटत नव्हतें. ओकोनेलच्या खालोखाल ओब्रायन हाच लोकप्रिय पुढारी होता व या दोघांच्याहि परिश्रमानें ही चळवळ हां हां म्हणतां जिकडे तिकडे पसरली, पण पुढें ओकोनेलच्या वर्तनामुळें हा व याचे इतर स्नेही फुटून त्यांनीं १८४६ सालीं एक तरुणपक्ष स्थापन केला. १८४८ सालीं राजद्रोहाबद्दल त्याच्यावर खटला करण्यांत आला. पण ज्यूरीमध्यें मतभेद होऊन तो सुटला. पुढें पार्लमेंटनें दडपशाहीचे नवीन कायदे सुरू केल्यामुळें ओब्रायन, डिलन, वगैरे पुढाऱ्यांनीं लोकांना बंड करण्याचा उपदेश केला. स्वतः ओब्रायननें त्या बाबतींत पुढाकार घेतला. पण हें बंड एकदोन दिवसांत मोडलें. ओब्रायननें पळून जाऊन आपला बचाव केला. पुढें तो पकडला जाऊन त्याच्यावर खटला करण्यांत आला व त्याला फांशीची शिक्षा फर्मावण्यांत आली होती; पण माफी मागितल्यानें १८५४ मध्यें त्याची सुटका झाली. १८५६ मध्यें त्यानें 'राज्यकारभाराची तत्त्वें अथवा हद्दपारींतील विचार' हा ग्रंथ लिहिला.

**ओम् (ॐ)**—हा वर्णध्वनि प्राचीन वैदिक संहितांतील नाहीं. यज्ञप्रसंगीं होकारार्थी याचा उपयोग असे. ब्राह्मण वाङ्मयांत यांतील अ, उ, म् या अक्षरांना गूढार्थ देऊन ओममध्यें सर्व विश्व सांठवलें आहे अशा तऱ्हेनें प्रतिपादिलें आहे. ओंकाराला प्रणव अशी संज्ञा आहे. अ = विष्णु, उ = शिव, म् = ब्रह्मा असे संकेत पडून वेदाध्ययनारंभीं ओम् म्हणूं लागले. ब्रह्मप्राप्ति होण्यासाठीं ओम् मंत्राचा जप करण्यास धर्मसूत्रांतून सांगितलें आहे. प्रणवाचें माहात्म्य पुराणांतून वर्णिलेलें असतें.

**ओमान**—अरबस्तानच्या आग्नेय कोपऱ्यांत ओमानच्या आखातावरील ओमान हें बंदर असून तेथील मुख्य वस्ती अरब लोकांची आहे. ओमानच्या आखातांतून निर्यात होणारे मुख्य पदार्थ म्हणजे खजूर, फळफळावळ व वाळलेले मासे हे आहेत. मस्कत आणि ओमान या संयुक्त प्रदेशावर एक सुलतान असतो. हा प्रदेश सुमारें ८२,००० चौरस मैलांचा आहे. अंतर्भागांत उंटाणमार्गानें मुख्य वाहतूक चालते. ओमानचें आखात अरबी समुद्राच्या वायव्य भागीं असून ओर्मझच्या भुशिरानें तें इराणच्या आखाताशीं जोडलें आहे.

**ओमास्क**—रशिया. सायबेरिया देशांतील हें शहर ओम व इर्टिश या दोन नद्यांच्या संगमावर व ट्रान्स-सायबेरियन रेल्वे फांट्यावर आहे. लो. सं. २,८०,७०० आहे.

**ओरछा संस्थान**—जुन्या बुंदेलखंड एजन्सीखालील मध्यहिंदुस्थानांतील एक संस्थान. क्षेत्रफळ २०,८० चौ. मै.. उत्तरेस व पश्चिमेस संयुक्त प्रांताचा झांशी जिल्हा; दक्षिणेस मध्यप्रांताचा सागर जिल्हा; व पूर्वेस चरखारी व बिजावर संस्थानें. पूर्वी ओरछा हेंच राजधानीचें शहर होतें, पण १७८३ पासून टिकमगड हें राजधानीचें शहर करण्यांत आलें. बलदेवगड, लथौरा, जटार व बिर्सागड येथें मोठमोठे तलाव आहेत.

बराच भाग जंगलमय आहे. माळव्यापेक्षां येथील हवा उष्ण. पावसाचें मान ४५ इंच. ओरछाचे संस्थानिक राजे हे बनारच्या गहरवारचे वंशज असून जातीनें बुंदेले रजपूत आहेत. १३ व्या शतकांत कोणीं सोहनपालानें येथें येऊन आपली सत्ता स्थापित केली.

लोकसंख्या ३,६३,४०५. भाषा बुंदेलखंडी. शेंकडा ४० लोक शेतकीवर उपजीविका करतात.

जमीन साधारणपणें सुपीक आहे. मुख्य पिकें—ज्वारी, तांदूळ, जव, तीळ, चणे, गहूं. पाटाच्या पाण्याचा बागाइतीकरितां उपयोग करितात.

अलीकडे व्यापाराची वाढ बरीच झाली आहे. येथें पूर्वी लोखंड गाळून बंदुका तयार करीत असत. झांशी–भोपाळ व झांशी–माणिकपूर हे आगगाडीचे फांटे ह्या संस्थानांतून जातात.

संस्थानाच्या प्रधानास मदार–उल्–महाम म्हणतात. संस्थानचें उत्पन्न १३ लाख. गजशाही रुपया चालतो. राजधानीच्या गांवांत टांकसाळ आहे. हल्लींचे संस्थानिक श्रीसवाई महेंद्र महाराजा वीरसिंग देव बहादूर हे १९३० सालीं गादीवर आले. हें संस्थान आतां विंध्य प्रदेश संघांत आहे.

गांव—ओरछा संस्थानाची पूर्वीची राजधानी. भारतीचंदानें १५३१ मध्यें हा गांव वसविला. हा बेटवा नदीच्या कांठावर आहे. झांशीपासून ५ मैल अंतरावर आहे. भोंवतालीं जंगल आहे. येथील राजमंदिर व जहांगीर महाल प्रसिद्ध आहेत. चतुर्भुज, वगैरे बरींच देवालयें आहेत. येथें भारतीचंद, मधुकरसाह, वीरसिंहदेव, पहाडसिंग व त्यांच्या राण्या ह्यांच्या भव्य छत्र्या किल्ल्याच्या पायथ्याशीं आहेत.

**ओरांग उटान**—उपमानव (अँन्थ्रोपॉइड) वंशाच्या वानरजातींतील सर्वांत मोठा प्राणी. हा मनुष्यासारखा दिसणारा वानराच्या जातीचा प्राणी बोर्निओ आणि सुमात्रा बेटांत आढळतो. याचा मेंदू मनुष्याच्या मेंदूसारखा जवळजवळ असतो. याची उंची चार फूट असते, पण यास उभ्यानें चालतां येत नाहीं. याचें शरीर भरभरीत तांबड्या केसांनीं आच्छादित असतें, पण तोंडावर केंस नसतात. याचे हात घोट्यापर्यंत लांब असतात. पाय आंखूड व वाढ खुंटल्यासारखे दिसतात. हातापायांच्या बोटांचीं नखें

सपाट असतात. हे प्राणी बहुतेक फळांवर उपजीविका करतात व झाडावर झोंप घेतात.

**ओरायन**—ग्रीक पौराणिक कथांमधील हा एक शिकारी राक्षस असून तो मरण पावल्यावर तो आकाशांत एक तारकापुंज होऊन राहिला, व त्या तारकापुंजाला ओरायन किंवा मृगपुंज-मृगशीर्ष हें नांव आहे. या नक्षत्रावरून लो. टिळकांनीं वेदकालाचें गणित केलें. ऋग्वेदांत मृगशीर्षावर संपात असल्याचें स्पष्ट विधान असल्यानें हा काळ सुमारें पांच हजार वर्षांपूर्वीचा असावा असें त्यांनीं सिद्ध केलें. त्यांचा ओरायन या नांवाचाच मूळ इंग्रजी ग्रंथ आहे.

**ओरावन**—एक द्राविड जात. यांची बरीचशी वस्ती बिहार प्रांतात आहे. एकंदर लो. सं. सुमारें अकरा लक्ष आहे. यांच्यांत बरींच कुलें असून त्यांचीं ठराविक देवकें असतात. अविवाहितांना निजण्यासाठीं स्वतंत्र जागा ( *धुमकुरिया* ) असते. दोन बायका करण्याची चाल नाहीं. काडीमोड होते. प्रत्येक सणाला पितरांची पूजा होते. परमेश्वरास धर्मेज म्हणतात. पूर्वीं हे लोक देवतांना नरबली देत. हे लोक फार ठेंगणे असतात. नृत्यासाठीं यांची प्रसिद्धि आहे. हे स्वतःला रावणवंशी म्हणवितात. हे मजुरी करून उपजीविका करतात.

**ओरिनोको**—द. अमेरिकेंतील व्हेनेझुएलामधील सिएरा-पारीमामध्यें उगम पावणारी ही नदी सर्व जगांतल्या अति मोठ्या नद्यांपैकीं असून ती त्रिनिदादच्या समोर अटलांटिक महासागराला मिळते. एका मोठ्या मुखाजवळ तिची रुंदी २० मैल असून एकंदर प्रवाह सुमारें १६०० मैलांचा आहे. सुमारें ७५० मैलांवर तिच्यावर एक धबधबा आहे. येथवर बोटी वर येतात.

**ओरिसा**—हिंदुस्थान, एक प्रांत. हा हिंदुस्थानच्या पूर्व भागांत बंगालच्या उपसागरावर आहे. क्षे. फ. सुमारें ३२,१९८ चौ. मै. व लो. सं. ८७,२९,००० आहे. बहुतेक लोक हिंदु धर्माचेच आहेत. हवा समशीतोष्ण आहे. पाऊस सरासरी ५७.५ इंच पडतो. लोक शेतकी करून असतात. मुख्य पीक तांदूळ, ताग, डाळी, ऊंस, इ. आहे. हळद फार पिकविली जाते. रेशमी कापड व दागिने चांगले होतात. लोखंड, कोळसा, चुना, मँगनीज व अभ्रक हीं खनिजें होत. हिंदुस्थानांत निघणाऱ्या लोखंडापैकीं शें. ६० ओरिसा संस्थानांत निघतें. कोळशाच्या खाणी ५-६ ठिकाणीं सांपडल्या आहेत. १९३७–३८ सालीं सुमारें ७२ कारखाने या प्रांतांत होते. मच्छीमारी हा चांगला किफायतशीर धंदा आहे. हजारों मण मासे दरसाल कलकत्त्यास रवाना होतात. प्रांतांत जंगलहि पुष्कळ आहे व त्यांतून इमारती लांकूड निघतें. सुमारें ५०० मैल आगगाडीचा रस्ता आहे. विजगापट्टम् बंदराच्या पुनर्रचनेमुळें परदेशच्या व्यापाराला मोठी तेजी आली आहे. प्रांतांत शहरें कटक, पुरी व बेन्हामपूर हींच काय तीं आहेत. प्रांतांत ६ कॉलेजें असून उत्कल विद्यापीठ १९४३ सालीं निघालें. १९३६ सालीं हा प्रांत स्वतंत्र करून गव्हर्नरच्या अधिकारांत दिला. एक कायदेमंडळ आहे.

ओड्र या प्राचीन नांवाचें ओड्या असें झालें. येथें पूर्वीं कोळी लोकांची वस्ती होती. पुढें आर्यब्राह्मण येऊन त्यांनीं वसाहत केली व प्रदेश सुधारला. आर्यांनंतर बौद्ध लोकांनीं वस्ती केली. हें बौद्धवर्चस्व अशोकापासून इ. स. ३२० पर्यंत होतें. या वर्षी रक्तबाहु राजानें आपलें राज्य चालू केलें. हा ग्रीक राजवंश असावा. इ. स. ४७४ पर्यंत हा वंश टिकला. या अमदानींतील कांहीं लेणीं सांपडलीं आहेत. यानंतर केसरी राजघराणें आलें. तें शैवधर्मी होतें. तेव्हां साहजिकच ठिकठिकाणीं शैवमंदिरें उठलीं. यापैकीं भुवनेश्वर एक आहे. या घराण्याचा अमल ११३२ पर्यंत ओड्या प्रांतावर होता. इ. स. १०३० त कटक राजधानी जी करण्यांत आली ती अद्यापि आहे. यानंतर चोळगंग हें वैष्णव राजघराणें आलें. पुरीचें जगन्नाथाचें देवालय व कोनारक येथील सूर्याचें देवालय या कारकीर्दींतलें आहे. यापुढें मुसलमानांची सत्ता आली. १७५१ त अलिवर्दीखानानें ओरिसा प्रांत नागपूरकर भोंसल्यांना दिला. तो १८०३ पर्यंत भोंसल्यांकडे होता व नंतर ब्रिटिशांकडे आला. ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं आपल्या सोयीप्रमाणें ओरिसा प्रांत बनविला होता. तेव्हां उडिया भाषा बोलणारे जिल्हे एकत्र करून प्रांत करावा अशी लोकांत चळवळ सुरू झाली. त्याला कांहीं यशहि आलें. १९१२ पर्यंत ओरिसा बंगालला जोडला गेला होता, तो नंतर बिहारला जोडला गेला. नंतर १९३५ च्या घटनेप्रमाणें हा प्रांत स्वतंत्र केला गेला.

ओरिसांत २४ मांडलिक संस्थानें आहेत:— १ अथगड, २ तालचेर, ३ मयूरभंज, ४ नीलगिरि, ५ केओंझर, ६ पाळलहरा, ७ धेनकानाल, ८ अथमाल्लिक, ९ हिंदोल, १० नरसिंगपूर, ११ बरम्बा, १२ तिगिरिया, १३ खंडपारा, १४ नयागड, १५ रणपूर, १६ दसपल्ला, १७ बौद, १८ बामरा, १९ रैराखोल, २० सोनपूर, २१ पाटणा, २२ कलहंडी, २३ गंगपूर, २४ बोनाई. मयूरभुजखेरीज यांचें एकंदर क्षे. फ. २३,६३७ चौ. मै. व लो. सं. ( १९४१ ) ४०,४६,०००. या संस्थानांचें एकंदर उत्पन्न सुमारें ९९ लक्ष आहे. यापैकीं मोठ्या संस्थानांची माहिती स्वतंत्र दिलेली आहे. हीं सर्व संस्थानें आतां ओरिसा प्रांतांत विलीन झालीं.

**ओरेनवर्ग**—पूर्व रशियांतील एक माजी राज्य. याचा कांहीं भाग युरोपांत व कांहीं आशियांत असून क्षेत्रफळ ७३,८१६ चौ. मैल व लो. सं. १७,६०,००० आहे. या प्रदेशांत खनिज द्रव्यें

विपुल आहेत. हल्लीं ओरेनबर्ग हें पूर्व रशियांतील किरघिझ या नांवाच्या स्वयंसत्ताक सोव्हिएट लोकसत्ताक राज्यांत प्रमुख शहर आहे. लो. सं. १,२०,००० आहे. या ठिकाणीं घोड्यांच्या जत्रा भरतात व बकऱ्याच्या लोंकरीच्या उत्कृष्ट शालो होतात.

**ओरेल**—मध्य रशियांतील एक माजी राज्य. क्षेत्रफळ १८,०४२ चौ. मैल व लो. सं. २२,६०,००० आहे.

याच राज्याचें राजधानीचें शहर ओरेल असून तें व्यापारी पेठ आहे. ओका व ओर्लिका या दोन नद्यांच्या संगमावर हें शहर वसलेलें आहे. या शहराची लो. सं. ७२,००० आहे. येथून कालव्यांनीं कास्पियन समुद्र, काळा समुद्र व बाल्टिक समुद्र जोडलेला आहे.

**ओरेलिअस, मार्कस** ( १२१–१८० ) — एक रोमन बादशहा व तत्त्वज्ञानी. याला स्टोइक पंथाची फार आवड असे. उत्तरेकडील जातींचा एक संघ तयार होऊन त्यानें इटलीवर हल्ला होण्याची भीति उत्पन्न झाली, तेव्हां ओरेलिअस त्यावर चालून गेला व त्यानें शत्रूंचा अनेकदां पराभव केला. याचा एकच ग्रंथ ( 'मेडिटेशन्स'–मनन ) उपलब्ध आहे. त्यांत व्यावहारिक नीति सुंदर रीतीनें प्रतिपादिली आहे. ओरेलिअसला रोमच्या चांगल्या राजांपैकीं एक समजतात.

**ओर्फिअस**—ग्रीक पौराणिक कथांमध्यें हा एक अत्यंत प्रसिद्ध गायनपटु आणि संगीत कलेचा मुख्य प्रतिनिधि मानलेला आहे. अपोलो देवतेनें त्याला सारंगी दिली आणि म्यूझेस देवतेनें त्याला सारंगीवादन शिकविलें. त्यामुळें तो या कलेंत इतका प्रवीण झाला कीं, त्याच्या गाण्यानें रानांतले पशू गानमुग्ध होत असत. इतकेंच नव्हे तर झाडें आणि खडकहि डोलूं लागत. त्याची बायको यूरिडाईस हिला सर्प चावून ती मयत झाली, त्या वेळीं तिला परत मिळवण्याकरितां तो पाताळांत गेला. तेथें त्याच्या संगीतानें पाताळांतील देवता प्लूटो आणि पर्सीफोन या इतक्या संतुष्ट झाल्या कीं, देवतांनीं त्याला बायको परत नेण्याची परवानगी एका शर्तीवर दिली. शर्त ही कीं, त्यानें पृथ्वीवर पोहोंचेपर्यंत आपल्या पाठीमागून येणाऱ्या बायकोकडे वळून पाहतां कामा नये. परंतु ही शर्त अधीर झालेल्या ओर्फिअसला पाळतां आली नाहीं. त्यानें मागें वळून बायकोकडे पाहिलें तोंच ती अदृश्य झाली आणि तो तिला कायमचा मुकला.

या कथानकावर पुष्कळ धार्मिक वाङ्मय तयार झालें आणि ओर्फिअस व ओर्फिक असे दोन पंथ निघाले, व या लोकांचें आचरण योग्यांप्रमाणें फार शुद्ध असे.

**ओर्मझ**—हें इराणचें आखात व ओमानचें आखात जोडणाऱ्या ओर्मझ सामुद्रधुनींत बंदरआबासच्या समोर बेट आहे. इ. स. ३ ऱ्या शतकांत स्थापन झालेलें हें शहर त्या काळांतील अत्यंत श्रीमंत अशी एक बाजारपेठ म्हणून प्रसिद्ध होतें. पण पुढें १६२२ मध्यें बंदरआबासची स्थापना होऊन त्याची भरभराट होऊं लागल्यावर ओर्मझ नाश पावत गेलें. येथें गेरू किंवा काव पुष्कळ आहे.

**ओर्मेरॉड, एलिअनॉर** ( १८२८–१९०१ )—ही प्रसिद्ध कीटकशास्त्रज्ञ बाई 'हिस्टरी ऑफ चेशायर' या ग्रंथाचा कर्ता जॉर्ज ओर्मेरॉड याची मुलगी होती. लहानपणापासूनच तिला या कीटकशास्त्राचा नाद होता. किड्यांपासून शेतकीला नुकसानकारक असे कोणकोणते रोग उत्पन्न होतात याची माहिती मिळविण्याकरितां रॉयल हॉर्टिकल्चरल सोसायटीनें प्रयत्न सुरू केले होते. त्यांत ओर्मेरॉड बाईची त्या संस्थेला फार मदत झाली व त्या संस्थेनें ओर्मेरॉडला एक पदक बक्षीस दिलें. १८७७ मध्यें तिनें उपद्रवी किड्यांवर एक छोटेंसें पुस्तक प्रसिद्ध केलें. १८८२ सालीं रॉयल ॲग्रिकल्चरल सोसायटीच्या कीटकशास्त्रखात्यांत सल्लागार म्हणून हिची नेमणूक झाली. तिची कीर्ति केवळ इंग्लंडमध्येंच पसरली होती असें नाहीं. तिला मॉस्कोच्या विश्वविद्यालयानें व फ्रान्समधील एका शास्त्रीय संस्थेनें पदकें बहाल केलीं. एडिंबर्ग विद्यापीठानें तिला एल्‌एल्. डी. पदवी दिली. 'कॉबडेन जर्नल्स', 'मॅन्युअल ऑफ इंज्यूरियस इन्सेक्ट्स', 'हँडबुक ऑफ इन्सेक्ट्स इंज्यूरियस टु ऑर्चर्ड अँड बुशफ्रुट्स' इ. तिचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**ओलफ** ( दुसरा ) ( ९९५–१०३० )—नॉर्वेचा एक राजा. याला नॉर्वेचा रक्षक संत समजण्यांत येतें. हा ख्रिस्ती धर्माचा मोठा पुरस्कर्ता होता. कॅन्यूट जेव्हां नॉर्वेंत आला तेव्हां हा रशियाला पळून गेला व आपलें राज्य परत मिळविण्याच्या प्रयत्नांत मारला गेला.

**ओलवण**—वाळुकारण्यांतील सुपीक प्रदेश. ज्या ठिकाणीं पाणी असतें किंवा पाणी जमिनींतून वर काढण्यांत येतें त्या ठिकाणीं मानववस्तीला राहण्यासारखी जागा होते. जर डोंगर असतील तर पाऊस पडून हिरवळ जमते. या ओलवणांत कांहीं ठिकाणीं नुसतीं ताडामाडाचीं, खजुरीचीं झाडें होतात तर कांहीं ठिकाणीं धान्यें पिकून लाखों लोक राहूं शकतात. उत्तर आफ्रिकेंत अशीं ओलवणें आहेत.

**ओलाइट**—हे चुनखडीच्या दगडाच्या वर्गांतील एका जातीचे दगड असून त्यांमध्यें अनेक वाटोळे गोटे कॅल्शियम कार्बोनेटच्या सिमेंटनें जोडलेले असतात. या दगडांचे खे आकारानें निरनिराळे असतात. प्राचीन काळांतील या जातीचे दगड पवळ्यामध्यें आणि समुद्रावरील माशांच्या शिंपल्यामध्यें आढळतात. भूस्तरशास्त्रांतील या दगडांच्या थरामध्यें अनेक प्रकारचे चुनखडीचे दगड, चुनखडी व वाळूचे मिश्रित दगड, चिकणमाती,

वगैरे आढळतात. हे खटिकामय (क्रेटेशियस) थराच्या खालीं आणि कर्कटमय (लिआस) थराच्या वर असे असतात.

**ओलिफंट, मार्गारेट** (१८२८-१८९७)—एक इंग्रज कादंबरीकर्त्री. हिच्या कादंबऱ्या 'सालेम चॅपेल', 'दि मिनिस्टर्स वाइफ', 'कर्स्टीन', एलिनोरचें लग्न, या उत्तम असून तिनें एडवर्ड आयर्व्हिंग, ॲसिसीचा फ्रॅन्सिस, मोलिएर, शेरिडिन, इ. चीं चरित्रें लिहिलीं आहेत.

**ओलिफंट, लॉरेन्स** (१८२९-१८८८)—हा इंग्रज ग्रंथकर्ता असून यानें नियतकालिकांत पुष्कळ लेख लिहिले. 'मासोलम' (कादंबरी), खाटमांडूचा प्रवास, काळ्या समुद्रावरील रशियन तीरें, मिनेसोट, शास्त्रीय धर्म, इ. ग्रंथ यानें प्रसिद्ध केले.

**ओल्डहॅम**—इंग्लंड, लँकेशायरमधील म्युनिसिपल काउंटी व पार्लमेंटरी बरो. या शहरास पुष्कळ स्टेशनें असून मुख्य स्टेशनाचें नांव मंम्स आहे. हें शहर मेडलॉक नदीच्या मुखाजवळ एका उंच जागीं वसलेलें आहे. येथील मुख्य इमारती व संस्था म्हणजे नगरभवन ग्रंथालय, चित्रसंग्रहालय व पदार्थसंग्रहालय, कोर्टें, इ. होत. हें कापडाच्या कारखान्यांचें केन्द्र असून संयुक्त राज्यांत येणाऱ्या कापसापैकीं ⅙ कापूस ओल्डहॅम येथें येतो. अनेक गिरण्या असून त्यांत हजारों मजूर काम करीत असतात. याशिवाय ओतीव कामाचे कारखाने, गिरण्यांचीं यंत्रें व शिवणकामाचीं यंत्रें तयार करण्याचे कारखाने, असे दुसरे उद्योगधंदे आहेत. सर्व कारखान्यांना लागणारा कोळसा जवळच खाणींत सांपडतो. लो. सं. १,१०,७००.

**ओल्डेनबर्ग**—जर्मनी, ओल्डेनबर्ग लोकसत्ताक राज्यांतील मुख्य शहर. हें ब्रेमेनच्या पश्चिमेस २७ मैलांवर हुंटे नदीवर आणि हुंटे एम्स कालव्यावर वसलेलें आहे. ह्या कालव्यांत नावा चालूं शकतात. नवीन इमारतींपैकीं युवराजांचा वाडा, नवीन नगरभवन, न्यायकचेऱ्या, प्राणिशास्त्रीय अजबखाना, पुरातन वस्तुसंग्रहालय यांची गणना होते. येथें धान्याचा बराच मोठा व्यापार चालतो व घोड्यांच्या जत्रा भरतात. इतिहासांत ओल्डेनबर्गचा उल्लेख प्रथम ११०८ त केलेला आढळतो. लो. सं. ६७,७५०.

**ओवा**—ही एक औषधी वनस्पति आहे. हिचीं झाडें बडीशेपेच्या झाडाएवढीं असून हिची लागवड वरकस जमिनींत पावसाच्या आरंभीं करतात. त्यास फुलें व बडीशेपेसारखें बीं येतें. ओव्यावरच्या फुलांचा अर्क करतात. तो घेतल्यास पोटांत दुखणें कमी होऊन भूक लागते. बियांस ओवा म्हणतात. ओवा उष्णवीर्य असून थंडी दूर करतो; म्हणून बाळंतिणीस ओव्याची धुरी देतात व रात्रीं निजताना पाण्याच्या घोटाबरोबर चिमूटभर गिळण्यासहि देतात. त्यापासून पोटांत वायु धरणें, अग्निमांद्य, खोकला, वगैरे विकार होत नाहींत. अजीर्णावर सैंधवाबरोबर ओवा खावा. लघ्वी फार होत असल्यास तिळाशीं, नळाश्रित वायु व खोकला यांवर ऊन पाण्यातून ओवा घ्यावा. शेंदेलोण व पादेलोण हीं ओव्याचे अष्टमांश घालून त्यास माक्याच्या रसाची २०-२५ सूर्यपुटें देऊन तो घेतल्यास अधिक गुण येतो.

ओव्याचें फूल—(थायमॉल). ओव्याच्या व इतर झाडांच्या तेलापासून काढलेला स्फटिकमय पदार्थ. याची रासायनिक सारणी $C_{10}H_{14}O_7$- क$_{१०}$उ$_{१४}$प्र$_७$ ही आहे. या स्फटिकास रंग नसतो. ओव्यासारखा वास येतो. हे पाण्यांत विरघळतात. याचा उपयोग जंतावर औषध म्हणून करतात.

**ओवेन, रॉबर्ट** (१७७१-१८५८)—एक इंग्रज समाजसुधारणावादी. थोड्या शिक्षणानंतर एका कापडवाल्या दुकानांत कांहीं वर्षें नोकरी करून त्यानें मॅन्चेस्टर येथें स्वतंत्र दुकान काढलें. १९ व्या वर्षी तो एका कापसाच्या गिरणीचा मॅनेजर झाला व स्वतःच्या हुषारीनें व मेहनतीनें त्यानें ती ग्रेट ब्रिटनमधील पहिल्या प्रतीची गिरणी बनविली. पुढें तो मॅन्चेस्टरच्या मोठ्या कंपनीचा मॅनेजर व पातीदार होऊन ग्लासगोला १८०० पासून राहूं लागला. त्या गिरणीमध्यें सुमारें दोन हजार कामकरी होते. त्यांपैकीं पांचशें मुलें होतीं. त्यांची सुधारणा करण्याचें काम ओवेननें हातीं घेतलें. लहान वयाच्या मजूर मुलांना शिक्षण देण्यासाठीं रात्रीच्या शाळा, वगैरे नव्या पद्धती त्यानें काढल्या. १८१७ मध्यें तो समाजसत्तावादी बनला. नेपोलियनच्याबरोबरच्या युद्धानंतर व्यापाराला मंदी आल्यामुळें मजूर बेकार होऊन त्यांची उपासमार होऊं लागली. त्याकरितां मजुरांना काम मिळून उपासमार टळावी म्हणून त्यानें मजुरांच्या वसाहतीची योजना सुचविली. १८२५ मध्यें ग्लासगोनजीक ओवेनच्या एका अनुयायानें प्रयोगादाखल अशी एक वसाहत वसविली व खुद्द ओवेननें अमेरिकेंत जाऊन असे प्रयोग केले, पण ते फसले. १८३२ मध्यें न्याय्य श्रमविनिमय पद्धति सुरू करून श्रमदर्शक नोटा काढल्या. आंतरराष्ट्रीय वर्गसंस्था काढली. या संस्थेंतील वादविवादांतच समाजसत्तावाद हा शब्द प्रचारांत आला.

**ओवेन, सर रिचर्ड** (१८०४-१८९२)—एक इंग्रज जीवशास्त्रज्ञ. रॉयल कॉलेज ऑफ सर्जन्स या संस्थेंत १८३६ त त्याला प्राध्यापक नेमलें व १८५६ त ब्रिटिश म्यूझियममध्यें सृष्टिविज्ञानाचा पर्यवेक्षक नेमलें. क्यूव्हियरनंतर त्याच्याइतका तज्ज्ञ प्राचीन-जीवशास्त्रज्ञ झाला नाहीं. त्यानें या शास्त्रावर कांहीं ग्रंथ लिहिले आहेत.

**ओव्हरबरी, सर थॉमस** (१५८१-१६१३)—हा इंग्रज कवि व निबंधकार इतिहासांत नमूद असलेल्या एका निर्घ

गुन्ह्याला बळी पडला. १६०१ मध्यें जेम्स राजाचा दोस्त रॉबर्ट कार याच्याशीं त्याची ओळख होऊन पक्की मैत्री जमली. १६११ मध्यें हा रॉबर्ट कार इसेक्सचा ३ रा अर्ल याची पत्नी फ्रॅन्सीस हॉवर्ड हिच्या प्रेमपाशांत सांपडला. त्यामुळें या लेडी इसेक्सनें कारबरोबर लग्न करतां यावें म्हणून आपला पहिला विवाह रद्द करून घेण्याचा प्रयत्न चालवला! परंतु ओव्हरबरीनें या कारच्या विवाहाला अतिशय विरोध केला; त्यामुळें कौंटेसनें ओव्हरबरीला लंडन टॉवर येथें कैदखान्यांत अडकवण्याचें कारस्थान केलें आणि त्या कैदखान्यांतच ओव्हरबरीला विषप्रयोग करविला. तिनें कारबरोबर नंतर ३ महिन्यांनीं लग्न केलें. कारला त्या वेळीं सॉमरसेटचा अर्ल ही पदवी मिळालेली होती. पुढें १६१५ मध्यें तिच्यावर ओव्हरबरीचा खून केल्याचा आरोप ठेवण्यांत आला. तिनें आपला अपराध कबूल केला तेव्हां तिला माफी देण्यांत आली. परंतु तिचा नवरा कार याला या गुन्ह्याबद्दल ६ वर्षें कैदेंत ठेवलें आणि नंतर या गुन्ह्यांतल्या ४ साथीदारांसह कारला फांशीं देण्यांत आलें. ओव्हरबरीनें 'दि वाइफ' या नांवाचें काव्य लिहिलें आहे.

**ओव्हिड** (खि. पू. ४४-इ. स. १७)—एक रोमन कवि. यानें अनेक काव्यें रचिलीं आहेत. कांहीं फार शृंगारिक आहेत (उदा. 'आर्स आमाटोरिया'-प्रेम करण्याची कला). 'मेटॅमॉर्फोसिस' हें १५ प्रकरणांचें खंडकाव्य आहे व त्यांत रूपांतराच्या पौराणिक गोष्टी वर्णिल्या आहेत. तीस वर्षेपर्यंत छानछोकीचा व रोमच्या अक्कडबाजांचा कवि म्हणून काळ कंठिल्यावर त्याला इ. स. ८ मध्यें हद्दपारी झाली. मग मात्र मरेपर्यंत त्याचे दिवस दुःखांत गेले. वर्णनपर कवितेच्या बाबतींत होमरखेरीज त्याला कोणी वरचढ झाला नाहीं असें म्हणावें लागतें. शेक्स्पियर, मिल्टन, स्पेन्सर, वगैरे बहुतेक मोठ्या कवींनीं ओव्हिडचें अनुकरण केलेलें आहे.

**ओशियानिया**—पॅसिफिक महासागरांतील दक्षिणेकडील भागांत असलेल्या बेटांचा समूह. या बेटांचे ३ निरनिराळे गट आहेत: १ ला ऑस्ट्रेलेशिअन गट. या गटांत न्यूझीलंड बेट, नार्फोक बेट, न्यूकॅडोनिआ, न्यूहेब्रिडीज, सालोमन्स आणि न्यूगिनी इतकीं बेटें आहेत. २ रा मायक्रोनेशिअन गट. या गटांत कारोलाईन बेटें, मार्शल बेटें, सामोआ बेट, फिजी बेट आणि टाँगा इतकीं बेटें आहेत. ३ रा साउथ पॅसिफिक गट. या गटांत सालाई गोमेश, ईस्टर बेट, लोआर्चिपेलागो सोसायटी बेट, कुक बेट, मारक्किसस बेट आणि फोनिक्स बेट इतकीं बेटें आहेत. मानववंशशास्त्रदृष्ट्या या बेटांचे तीन विभाग पडतात: १ मेलेनेशिआ, २ मायक्रोनेशिया व ३ पॉलिनेशिआ. ओशियानियामध्यें ग्रिटन, फ्रान्स, जपान, चिली आणि सं. संस्थानें इतक्या निरनिराळ्या राष्ट्रांचा निरनिराळ्या बेटांवर ताबा आहे.

ऑस्ट्रेलेशिया सोडल्यास ओशियानियांतील बहुतेक भाग उष्ण कटिबंधांत आहे. यांतील स्थानिक लोक काळसर व अगदीं भिन्न भिन्न वंशांचे आहेत. भाषाहि भिन्न आहेत. कांहीं लोक मनुष्यभक्षक आहेत तरी बरेच युरोपियन लोकांचें अनुकरण करतात. खाण्याला सहज मिळत असल्यानें लोक उद्योगी नाहींत.

**ओष्ठपर्णी**—[वर्ग—लेबिआटि]. लव्हेंडर, वगैरे सुगंधी झाडें ज्या वर्गांत मोडतात तो झाडांचा वर्ग. हीं झाडें द्विगर्भपर्णी (द्विदल) जातीचीं आहेत. यांच्या २,८०० जाती असून त्या त्यांच्यापासून मिळणाऱ्या सुगंधी द्रव्यांकरितां प्रसिद्ध आहेत. उदाहरणार्थ, लव्हेंडर, ओवा, वगैरे. या जातीच्या कांहीं झाडांत उत्तेजक गुण असतात; यांमध्यें पेपरमिंट, वगैरे झाडें येतात.

**ओसवाल**— एक वैश्य जात. मुंबई, मध्यप्रांत व उत्तर हिंदुस्थान यांतून यांची वस्ती आहे. १९११ सालीं एकंदर ४,२७,७७८ ओसवाल होते; त्यांपैकीं ३,९६,७०२ जैन होते. मारवाडांतील लूनी नदीजवळ ओस हें ठिकाण आहे. जैन ओसवाल उपकेशगच्छाचे आहेत. राजपुतान्यांत या ओसवालांचा फार मोठा व्यापारउदीम आहे. कच्छी ओसवालांत वीस, दस व पांच अशा पोटजाती आहेत.

**ओसाका**— जपानच्या होनशू बेटावरील औद्योगिक शहर. हें शहर ओसाका उपसागरावर वसलेलें असून त्यांतून सर्वत्र कालव्यांनीं पाणी खेळविलेलें आहे. पोलादी व लोखंडी सामानाचे कारखाने, उंसाची साखर तयार करण्याचे कारखाने, आणि कापसाचें कापड करण्याच्या गिरण्या या शहरांत पुष्कळ आहेत. येथें एक विश्वविद्यालय आहे. ओसाका बंदरांत बोटींची दुरुस्ती करतात. बंदराची खोली २९ फूट आहे. लो. सं. (१९४०) ३२,५२,३४०.

**ओसिअन**—हा एक प्राचीन आयरिश कवि होऊन गेला. यानें केलेलीं २ महाकाव्यें (१७६२) फिंगल आणि टेमोरा (१७६३) जेम्स मॅक्फर्सन यानें प्रथम प्रसिद्ध केलीं. आणि त्याच वेळीं त्या महाकाव्यांच्या कर्तृत्वाबद्दल एक मोठा वाङ्मयीन वाद निर्माण झाला. या दोन्ही महाकाव्यांत फिंगल या नांवाच्या थोर केल्टिक योद्ध्याच्या पराक्रमाचें वर्णन आहे. मॅक्फर्सनचें म्हणणें असें होतें कीं, गॅलिक भाषेंतील हीं महाकाव्यें पोवाडे गाणाऱ्या भाटांनीं अनेक पिढ्या तोंडपाठ करून ठेवलीं. नंतर लेखनपद्धति सुरू झाल्यावर या काव्याच्या हस्तलिखित प्रती तयार करण्यांत आल्या; परंतु मॅक्फर्सनचें हें म्हणणें सर्वमान्य झालें नाहीं. हीं

महाकाव्यें मॅक्फर्सननेंच लिहिलेलीं आहेत हें आतां बहुतेक नक्की ठरलें आहे.

**ओस्कार** (१७९९-१८५९)— हा स्वीडन-नॉर्वेच्या चौदाव्या चार्लस राजाचा मुलगा होय. हा जात्याच फार बुद्धिमान् होता व त्यांतच त्याला मिळालेल्या सुशिक्षणाची भर पडल्यामुळें आपल्या देशाच्या सामाजिक व राजकीय प्रश्नासंबंधीं तो तज्ज्ञ म्हणून मानला जाऊं लागला. त्यानें दोन वेळां नॉर्वेचा व्हाइसरॉय म्हणून काम केलें. १८४४ मध्यें राज्यारूढ झाल्यावर त्यानें मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क लोकांना दिला. आपल्या कारकीर्दींत त्यानें स्वीडनची आर्थिक परिस्थिति सुधारावी या हेतूनें पुष्कळ लोकोपयोगी कायदे केले. परराष्ट्रीय राजकारणांत देखील त्याचें चांगलें वजन असे. १८५० त स्वीडन, डेन्मार्क व नॉर्वे हीं तिन्ही राज्यें एकत्र करण्याचा त्यानें प्रयत्न केला, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. क्रिमियन युद्धामध्यें तो तटस्थ राहिला व रशिया कदाचित् स्कॅंडिनेव्हियावर स्वारी करील या भीतीनें त्यानें १८५५ मध्यें इंग्लंडशीं व फ्रान्सशीं सलोख्याचा तह केला.

**ओस्टवॉल्ड** (१८५३- )—हा जर्मन रसायनशास्त्रज्ञ लाइप्झिग येथें भौतिक रसायनशास्त्राचा प्रोफेसर १८८७ पासून १९०६ पर्यंत होता. या शास्त्रांत त्यानें महत्त्वाचे शोध लावले, त्यांपैकीं एक शोध डायल्यूशन लॉ (विरलीकरणाचा नियम) हा असून या शोधाला त्याचेंच नांव दिलेलें आहे. त्याचा 'अमोनियाच्या तटस्थ प्राणिदीकरणापासून नत्राम्ल तयार करणें' हा ग्रंथ त्याच्या देशाला पहिल्या महायुद्धांत अत्यंत मौल्यवान् व उपयोगी ठरला. ओस्टवॉल्डनें जर्मन शास्त्रीय नियतकालिकें बरींच संपादन केलीं आणि रसायनशास्त्रावर बरेच ग्रंथ लिहिले.

**ओस्म**—(ओस्मिअम. चिन्ह Os. अणुभारांक १९०.९) प्लॅटिनमच्या वर्गांतील निळसर पांढऱ्या रंगाचा चकचकीत धातु. त्याचें विशिष्टगुरुत्व २२.५ आहे व सर्व धातूंत हा जड आहे. त्याचप्रमाणें सर्वांपेक्षां हा लवकर विरघळतो. सूक्ष्मदर्शक यंत्रांतून परीक्षिण्यासाठीं तयार केलेल्या वस्तूंना रंग देण्यासाठीं ओस्मिक अम्लाचा ($OsO_4$ पाण्यांत विरघळवून तयार केलेल्या द्रवाचा) उपयोग करतात.

**ओस्लो**—(पूर्वीचा ख्रिस्तियानिया) ही नॉर्वेची राजधानी समुद्रापासून सुमारें ६० मैल आंतल्या प्रदेशांत आहे. येथें पुष्कळ सुंदर इमारती आहेत; त्यांत राजवाडा, कायदेमंडळाचें सभागृह, खिस्ती धर्ममंदिर, किल्ला, आणि युनिव्हर्सिटीची इमारत या आहेत. येथें लोंकरीचें कापड, लोखंडी माल, तमाखू, कागद, बियर, स्पिरिट, वगैरे मालाचे कारखाने आहेत. इमारती लांकूड व अशुद्ध लोखंड हा मुख्य निर्गत होणारा माल होय. जुनें ओस्लो शहर १६२४ सालीं अग्निदग्ध झालें. नंतर ४ थ्या ख्रिश्चियन राजानें तें पुन्हां बांधलें; व त्या राजाच्या नांवावरून या शहराला ख्रिस्तियानिया नांव मिळालें. परंतु जुनें नांव पुन्हां ता. १ जानेवारी १९२५ पासून देण्यांत आलें. लोकसंख्या २,५३,१२४.

**ओहम्**—विद्युत्प्रवाहांतील प्रतिबंध अथवा रोधकता मोजण्याचें हें मूल्मान आहे. कोणत्याहि विद्युत्प्रवाहास १४.४५२१ ग्रॅम द्रव्यभार असणाऱ्या आणि १०६.३०० संटिमीटर लांबी असणाऱ्या, सर्वत्र सारखाच छेद असलेल्या पारदस्तंभामुळें जो प्रतिबंध अथवा रोधकता उत्पन्न होते ती या मूल्मानाबरोबर असते.

**ओहम्, जॉर्ज सायमान** (१७८७-१८५४)— एक जर्मन शास्त्रज्ञ. त्यानें कित्येक ठिकाणीं प्रोफेसराचें काम केलें. १८२७ सालीं त्यानें बर्लिनमध्यें एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें. या पुस्तकांत ओहमचा सिद्धान्त या नांवानें प्रसिद्ध असलेला सिद्धान्त प्रथमच ग्रथित केला आहे. हा सिद्धान्त विद्युच्छास्त्राचा अगदीं प्राणभूत असें एक सध्यांचें तत्त्व होऊन बसला आहे व तो अनेक प्रयोगांनीं सिद्ध झाला आहे.

हा सिद्धान्त असा:— इतर सर्व गोष्टी सारख्याच असतील तर विद्युत्प्रवाहाचा जोर प्रत्येक बिंदूवर असलेल्या संभाव्य शक्तीच्या चढउतारावर अवलंबून राहील.

**ओहम् मापक**—विद्युद्रोधकता प्रत्यक्ष मोजण्याचें उपकरण. या उपकरणामध्यें दोन तारांचीं वेष्टणें असतात. त्यांतील एक ज्याची रोधकता ज्ञात आहे अशा पदार्थाशीं जोडलेलें असतें व दुसरें वेष्टण ज्या पदार्थाची विद्युद्रोधक्ता मोजावयाची असेल त्या पदार्थाशीं जोडण्यांत येतें. जेव्हां विशिष्ट व्होल्टशक्तीचा विद्युत्प्रवाह त्या वेष्टणांतून सोडण्यांत येतो तेव्हां या दुसऱ्या पदार्थाच्या विद्युत्रोधकतेच्या प्रमाणांत एक टांगलेली सूची परिवर्तन पावते, व हें परिवर्तन रेखांकित प्रमाणपट्टीवरून मोजण्यांत येतें.

**ओहिओ**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतलें एक मध्यवर्ती संस्थान. क्षेत्रफळ ४१२२२ चौरस मैल. लो. सं. ६९,०७,६१२. हें एरी या सरोवराच्या कांठीं आहे. दक्षिण सरहद्दीवरून ओहिओ ही नदी वाहते. हवा समशीतोष्ण पण हिंवाळा व उन्हाळा जरा कडक. जमीन उंचसखल मैदानांची. संस्थानचा मध्यभाग उंचावर आहे (समुद्रसपाटीवर ९०० ते १२०० फूट). कोलंबस हें मुख्य ठिकाण असून क्लीव्हलँड आणि सिनसिनेटी हीं दोन मोठीं शहरें आहेत. अमेरिकेंत सर्वत्र आढळून येणारीं बहुतेक सर्व पिकें येथें निघतात. जनावरांची पैदास

मोठ्या प्रमाणावर होते. यांत्रिक उद्योगधंदे मोठ्या प्रमाणावर चालतात. मोटारी, विविध प्रकारची यंत्रसामुग्री, रबरी धांवा व इतर रबरी पदार्थ, विद्युत्संबंधीं सर्व उपकरणें, वगैरे तयार करण्याचे प्रमुख उद्योगधंदे आहेत.

पेट्रोलिअम्, वायु (स्वाभाविकपणें मिळणारा), कोळसा, लोखंड मीठ, पोटॅश, चिकण माती, चुना, वगैरे अनेक खनिज पदार्थ निघतात.

१६७० मध्यें ला साल यानें ओहिओ नदींतून खाळून वर असा मार्ग काढला. त्यानें मिसिसिपि खोरें आपण शोधून काढलें असें प्रस्थापित केल्यामुळें हें संस्थान १६८२ मध्यें फ्रेंचांच्या मालकीचें झालें. १७६३ मध्यें पारिसचा तह झाला व युरोप आणि हिंदुस्थान यांत चाललेलें युद्ध थांबलें. या तहानें ओहिओ संस्थान इंग्रजांकडे आलें. अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धाच्या वेळीं जॉर्ज रॉजर्स् क्लार्क यानें जिंकलेल्या मुलुखांत हेंहि होतें व नॉर्थवेस्ट टेरिटरीमध्यें तें सामील करण्यांत आलें होतें. १८०२ मध्यें त्याच्या हल्लींच्या सरहद्दी निश्चित झाल्या व १८०३ मध्यें तें युनियनमध्यें दाखल झालें.

---

# औ

औ— इ. स. ६ व्या शतकांतील राजा यशोधर्मन् याच्या वेळच्या मंदसोर येथील लेखांत प्रथम 'औ' ची गांठ पडते. पांचव्या शतकांतील जयनाथ दानपत्रांतील 'ओ' च्या कमरेवर एक वांकडी रेघ काढून हा औ तयार केलेला दिसतो. इतर वर्णांप्रमाणें ओ व औ या वर्णांचा संगतवार विकास आढळून येत नाहीं.

**औक जमीनदार**—अवुकु हें घराणें विजयनगरच्या राजघराण्यापैकींच एक होय. हें घराणें एका काळीं त्या प्रांतांत बरेंच सामर्थ्यवान् होतें. हे सर्व जमीनदार आपणांस राजे म्हणवीत असत. बुक्क राजाचा मुलगा रामराजा यानें लक्कमाम्बा हिच्याशीं लग्न लाविलें. तिच्यापासून त्याला तीन पुत्र झाले. त्यांचीं नांवें तिम्म, कोंड व श्रीरंग हीं होत. त्यांत तिम्म हा अवुकूचा व कोंड हा आदवाणी (अदोनी) चा सुभेदार होता. बुक्क राजाचा दुसरा मुलगा सिंग यास त्यानें नंद्याळची जहागिरी दिली. या घराण्यानें विजयनगर राजांना वेळोवेळीं लढायांच्या व इतर कामीं साहाय्य केलें आहे.

**औट्रॅम, सर जेम्स** (१८०३–१८६३)—एक ब्रिटिश सेनानी. हा १८५६ सालीं अयोध्येचा चीफ कमिशनर होता व त्यानें १८५६–५७ सालीं इराणवरील मोहिमेचें नेतृत्व पत्करलें होतें. १८५७ च्या शिपायांच्या बंडांत कानपूर येथें हा हॅवलॉकच्या मदतीला होता. त्याला या कामगिरीबद्दल लेफ्टनंट-जनरल करण्यांत आलें.

**औतें**—शेतीचीं अवजारें. शेतकीच्या कामास उपयोगी पडणाऱ्या हत्यारांना औतें म्हणतात थोड्या मजुरींत व थोड्या श्रमांत फार काम होण्यास चांगल्या औतांची फार जरूरी असते. औत (नांगर) वापरण्याची चाल आपणांकडे वेदकालापासूनची आहे. ऋग्वेदांत लांगल व सीरा हे शब्द आढळतात. सीरा (नांगर) ओढण्यास बैलांचा उपयोग करीत असत.

मळ्यास लागणाऱ्या औतांत जनावरांनीं चालणारी नांगर, कुळव, दंताळें, मैंद, पेटारी हीं औतें असून हातानें उपयोगांत येणारीं कुदळ, फावडें, टिकाव, पहार हीं होत. लागवडीस व लागवडीनंतर उपयोगांत येणारीं करवडी, कोळपीं, पाभर, खुरपीं, वगैरे होत. गाडी, टोपल्या हीं स्थलांतरासाठीं उपयोगांत येणारीं औतें व कोयता, विळा, कोयती, कुऱ्हाड हीं कापणीचीं औतें होत.

यांतील मुख्य औत नांगर हें होय. जमीन फाडून खालचा थर वर आणणें हें त्याचें कार्य असतें. नांगरलेल्या जमिनींतील ढेकळें फोडण्याचें काम मैदानें करतात. यानंतर दंताळ्याचा उपयोग करावयाचा असून त्यानें जमीन मोकळी होते. कुळवाचेंहि हेंच काम असतें. लागवडींत उगवलेलें गवत काढून रान मोकळें करण्यास कोळप्यांचा उपयोग होतो. खुरप्याच्या योगानें हातानें भांगलण करतात. बीं पेरण्याच्या औतास पाभर म्हणतात. यासहि दंताळ्याप्रमाणें दांते असून त्यांत पोकळ वेळूच्या नळ्या बसविलेल्या असतात. त्या सर्व नळ्यांचीं तोंडें एकत्र करून त्यांवर एक लांकडी पेटी अथवा चाटें बसविलेलें असतें. तींत बीं टाकलें म्हणजे तें नेमकें दांत्यांनीं पडलेल्या चरांत जाऊन पडतें.

आपल्याकडील शेतीच्या कामीं हल्लीं उपयोगांत येणारीं हीं सर्व औतें जुन्या पद्धतीचीं असून त्यांत सुधारणा होणें जरूर आहे. या बाबतींत लोखंडी नांगरांनीं चांगलीच लोकप्रियता मिळविली आहे. लोखंडी नांगर तयार करण्याचे कारखाने महाराष्ट्रांत बरेच आहेत. किर्लोस्कर-कूपर यांचे कारखाने प्रसिद्ध आहेत. पाश्चात्य देशांत नांगरांत फार सुधारणा झालेल्या आहेत. नांगरांना दोन चाकें असून पुढें फळीवर हांकणारा बसतो. अशा नांगरांना दोन किंवा अधिकहि फाळे असतात. अशा औतांचे गट करून ट्रक्टरनें ओढण्यांत येतात. एक एकर जमीन तीन-चार मिनिटांत याप्रमाणें नांगरणें शक्य होतें.

**औदीच्य ब्राह्मण**— उत्तरे (उदीची) कडून हे गुजरातेंत आले म्हणून यांना औदीच्य असें नांव पडलें. १९११ च्या खानेसुमारींत मुंबई इलाख्यांत एकंदर ८३,१८० औदीच्य

आढळले. पैकीं उत्तर भागांत १६८४३ व गुजराथेंतील संस्थानी भागांत ६२१२७ होते. एकंदर औदीच्य ब्राह्मणांतले अजमासें निम्मे तर एकट्या बडोदें संस्थानांत आहेत. यांत औदीच्य सहस्र व औदीच्य टोळकिया असे दोन मोठे वर्ग आहेत.

औदीच्य ब्राह्मण बहुधा भिक्षा-भिक्षुकीवर राहतात; कांहीं थोडे शेतकरी, आचारी किंवा उपाध्ये म्हणून आहेत. हलक्या जातींच्या लोकांची भिक्षुकी केल्यामुळें यांच्यांत अनेक पोटवर्ग निर्माण झाले आहेत. विधवांचा पुनर्विवाह लावणारे आणि शेतावर शिजविलेलें अन्न घेऊन जाणारे औदीच्य हलक्या प्रतीचे समजून त्यांच्याशीं इतर ब्राह्मण व्यवहार करीत नाहींत.

यांची शैक्षणिक स्थिति चांगली नाहीं.

**औदुंबर**—( सं. उदुंबर. ) उंबर पहा. ऋग्वेदांत जरी हें नांव नाहीं, तथापि अथर्ववेद आणि त्यानंतरच्या ग्रंथांत हें नांव आढळतें. कोणच्याहि धर्मविधींत याच्या समिधांचा उपयोग करीत असत व आजहि करतात. श्रूप आणि दर्वी यांचीच करीत असत आणि उदुंबराच्या ताइतांचा देखील उल्लेख आहे. त्याचें लांकूड यज्ञामध्यें उपयोग करण्याला योग्य आहे असें मानीत असत. ऐतरेय ब्राह्मणांत त्याचीं फळें गोड असल्याकारणानें त्या फळांना 'मधु' म्हटलें आहे. औदुंबराखालीं दत्तात्रेयाच्या पादुका स्थापलेल्या असतात व म्हणून हें झाड पूज्य मानतात.

**औद्योगिक कलह-निवारणाचा कायदा**—( दि ट्रेड डिस्प्यूट्स ॲक्ट, १९२९ ). या कायद्याचा उद्देश व्यापार, धंदा किंवा कारखाना यांमधील कामगार आणि मालक किंवा कामगार-कामगार, ( कामगार म्हणजे कौशल्याचें किंवा बिनकौशल्याचें शारीरिक काम करणारे किंवा कारकुनीचें काम करणारे नोकर ) यांच्यामध्यें नोकरीच्या शर्ती, किंवा कामकाजाच्या इतर बाबींसंबंधीं उत्पन्न होणारे तंटे यांची चौकशी करून ते तंटे आपसांत मिटवावे हा आहे. जेव्हां मालक व कामगार यांच्यामध्यें औद्योगिक कलह सुरू होतो, किंवा सुरू होण्याचीं लक्षणें दिसूं लागतात, त्या वेळीं प्रांतिक सरकारनें त्या कलहाच्या बाबींची चौकशी करून कलह मिटवण्याकरितां ती बाब एका चौकशी-कोर्टाकडे, किंवा कन्सिलिएशन बोर्डाकडे सोंपवावी. आणि जर मालक आणि कामगार या दोघांनीं अर्ज केला तर प्रांतिक सरकारनें सोंपवलीच पाहिजे. या कोर्टानें किंवा बोर्डानें जाहीर किंवा खासगी रीतीनें चौकशी सिव्हिल प्रोसीजर कोडप्रमाणें करावी, आणि त्याचा लेखी अहवाल सरकारी अधिकाऱ्यांकडे पाठवावा, व त्या अधिकाऱ्यानें तो अहवाल योग्य असेल तितका प्रसिद्ध करावा. सार्वजनिक उपयोगाच्या कोणत्याहि उद्योगधंद्यांतील कोणी कामगार एक महिना आगाऊ नोटीस दिल्याशिवाय संप करील तर त्याला एक महिना कैद किंवा ५० रु. दंड, किंवा दोन्ही शिक्षा होतील; आणि कोणी मालक एक महिना आगाऊ नोटीस दिल्याशिवाय अशा कारखान्याला कुलूप लावून कामगारांना बंदी करील तर त्याला एक महिना कैद, किंवा एक हजार रुपये दंड, किंवा दोन्ही शिक्षा होतील.

**औद्योगिक परिषद्** ( अखिल भारतीय )— या परिषदेची स्थापना १८९१ सालीं न्या. रानडे यांनीं केली. तिचे उद्देश सभा व परिषदा भरवून औद्योगिक विषयासंबंधीं चर्चा, निबंध, प्रदर्शनें, शास्त्रीय प्रयोग, प्रात्यक्षिकें, कलाकौशल्याचें शिक्षण, इ. साधनांनीं व सरकार आणि संस्थानिक यांस सूचना करून देशाचा व्यापार व उद्योगधंदे यांची अभिवृद्धि करणें हा होता. या सभेचें १८९३ सालीं तिसरें अधिवेशन झाल्यानंतर ही सभा बंद पडली. तिचें १२ वर्षांनीं १९०५ सालीं लाला मुनशी माधवलाल व रमेशचंद्र दत्त यांनीं पुनरुज्जीवन करून बनारस येथील राष्ट्रीय सभेच्या मंडपांत पुनः अधिवेशन भरविलें व रा. ब. मुधोळकर यांस जनरल सेक्रेटरी नेमण्यांत आलें. पुढें १९१७ सालीं परिषदेची कचेरी मुंबईस आल्यावर शेट मनमोहनदास रामजी तिचें काम पाहूं लागले. १९०५ सालापासून १९१८ पर्यंत या परिषदेचीं १४ अधिवेशनें झालीं.

या परिषदेनें अहवालाच्या रूपानें बरीच माहिती प्रसिद्ध केली आहे. याखेरीज एक कारखानदारांची जंत्री, एक यंत्रांची जंत्री, व विद्यालयांची जंत्री अशीं तीन पुस्तकें इंग्रजींत प्रसिद्ध केलीं आहेत. तसेंच राष्ट्रांत औद्योगिक चळवळ व जागृति उत्पन्न केली. आज बऱ्याच वर्षांपासून ही संस्था अस्तित्वांत नाहीं व तिचें कार्य व्यापारी संस्था ( चेंबर्स ) करीत असतात.

**औद्योगिक शाळा**—या प्रकारच्या शाळा दुर्वर्तनी किंवा गुन्हेगार मुलांसाठीं असतात. इंग्लंडमध्यें जॉन पाउंड्स या पोर्टस्माउथ शहरांतील एका गरीब चर्मकारानें अशा प्रकारची पहिली शाळा काढली. व अशा संस्थांना पुढें औद्योगिक शाळांचें स्वरूप आलें. १८१९ सालीं या इसमानें आजूबाजूच्या भागांतील गरीब मुलें आपल्या भोंवतीं जमविलीं. आणि आपल्या धंद्याचें काम त्यांना फुकट आणि त्या मुलांच्या इच्छेनुसार शिकविलें. १८४७ सालीं डॉक्टर गुथ्रे यानें 'प्ली फॉर रॅग्ड स्कूल' हें पुस्तक प्रसिद्ध केलें, तेव्हांपासून ही औद्योगिक शाळांची चळवळ सुरू झाली, म्हणून गुथ्रेला औद्योगिक शाळांचा जनक म्हणतात. १९२१ पासून या शाळा बोर्ड ऑफ एज्युकेशनच्या ताब्यांत देण्यांत आल्या. या शाळांत गुन्हेगार मुलांना घेत नाहींत. पण ज्या मुलांना योग्य पालक नाहींत किंवा जीं मुलें उनाड असतात त्यांना अशा संस्थांत घेण्यांत येतें.

अशा शाळा हिंदुस्थानांतहि कांहीं ठिकाणीं तुरुंगांना जोडून किंवा 'रिमांड होम' काढून गुन्हेगार मुलांना औद्योगिक शिक्षण देण्याची थोडीफार सोय सरकारनें केलेली आहे.

**औंध**—मुंबई, एक जुनें संस्थान. औंध हें सातारा जिल्ह्यांत साताऱ्यापासून आग्नेयेस २६ मैलांवर आहे. गांवाच्या उत्तरेस व पूर्वेस टेंकड्या असून मध्यंतरीं खोलांत गांव आहे. संस्थानचें क्षेत्रफळ ५०१ चौ. मैल असून लोकसंख्या ८८,७२३ आहे. आणि एकंदर वसूल ५,४८,००० रुपये आहे. हल्लींचे वृद्ध अधिपति श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव उर्फ बाळासाहेब पंत प्रतिनिधि हे सुविद्य असून उत्तम चित्रकार व कीर्तनकार आहेत. त्यांनीं प्रजेच्या कल्याणासाठीं अनेक उपयुक्त संस्था काढिल्या व संस्थानाबाहेरहि अनेक संस्थांना मदत केली. राज्यकारभारांतहि त्यांनीं सुधारणा केल्या होत्या.

संस्थानचे राजे पंतप्रतिनिधि मूळचे किन्हईचे. तेथील कुलकर्णी परशुराम त्र्यंबक हा घराण्याचा मूळपुरुष. परशुराम त्र्यंबक याला शाहूनें प्रतिनिधिपदाची सनद वंशपरंपरेनें दिली, त्या वेळीं राजपुरापासून दाभोळपर्यंत कोंकणपट्टी धरून सातारा, वांई, मेढें, माण, खटाव, मिरज, कोल्हापूर, वगैरे प्रांत प्रतिनिधींच्या जहागिरींत येत होते. पुढें कोल्हापूरचें राज्य निराळें होऊन मराठी साम्राज्याची वांटणी झाल्यानंतर कोल्हापूर, पन्हाळा, विशाळगड हे प्रांत प्रतिनिधीच्या इलाख्यांत जाऊन त्याऐवजीं हल्लीं असलेल्या विजापूर जिल्ह्यापैकीं बराचसा भाग आणि खानापूर व आटपाडी तालुके हे आले. औंध संस्थान आतां इतर दाक्षिणी संस्थानांबरोबरच मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

औंधास जुने २ तलाव आहेत. श्रीमंतांचा राजवाडा मराठी पद्धतीचा दुमजली व तीन चौकी आहे. वाड्याच्या डावीकडे प्रतिनिधींच्या कुलदेवतेचें (यमाई देवीचें) सुंदर देऊळ आहे. गांवाजवळ ८०० फूट उंचीच्या टेंकडीवर यमाईचें प्राचीन देऊळ आहे, त्याला मूळ पीठ म्हणतात. देवळास तटबंदी आहे. जवळ एक प्राचीन पदार्थसंग्रहालय (म्यूझियम) नुकतेंच केलें आहे. औंध गांवांत सरकारी हायस्कूल आहे.

**औंधपट्टा**—मुंबई इलाखा, नाशिक जिल्हा. सिन्नर तालुक्याच्या नैर्ऋत्य सरहद्दीवर देवळाली स्टेशनपासून दक्षिणेस १० मैलांवर औंध हें निसर्गतःच बळकट ठिकाण आहे. हा पट्टा जरा मोठा असून अहमदनगर तालुक्यांत आहे. याचें शिखर सपाट असून एका ठिकाणीं थोडें उंच आहे.

येथील किल्ले बहामनी राज्याची दाक्षिणेंत स्थापना झाल्यानंतर चौदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत बांधलेले असावेत. बहामनी राज्याचे विभाग झाल्यानंतर हे किल्ले अहमदनगरच्या वांट्यास आले. इ. स. १६२७ मध्यें ते दिल्लीच्या सत्तेखालीं आले. इ. स. १६७१ मध्यें शिवाजीचा सरदार मोरोपंत पिंगळे यानें ते काबीज केले.

**औरंगजेब** (१६१८–१७०७)— हिंदुस्थानचा एक मोगल बादशहा. हा शहाजहानचा चौथा मुलगा. मुमताज महाल ही याची आई.

यास अरबी व फारसी या भाषा उत्तम येत. व्यवहारापुरती हिंदीहि समजे. तसेंच चघताई व तुर्की याहि भाषा साधारण समजत. शहाजहान गादीवर बसल्यावर याचें शिक्षण सुरू झालें.

यानंतर त्यास दौलताबाद (१६३६–४४), गुजरात (१६४५-४७), बल्क व बदकशान (१६४७–४८), मुलतान (१६४८–५२) व बऱ्हाणपूर (१६५२) या ठिकाणीं सुभेदारी करावी लागली. वरील ठिकाणीं एकंदरींत यानें चांगली कामगिरी केली म्हणून बापानें त्यास मोठे मोठे अधिकार देतां देतां शेवटीं १६३९ सालीं त्याला पंधरा हजारांचा सरदार केला.

१६५७ त दिल्लीला बादशहा आजारी पडला म्हणून तो तिकडे निघाला. वाटेंत यानें मुरादला आपल्या बाजूला वळविलें व स्वपक्षबलवर्धक पुष्कळ गोष्टी केल्या. प्रथमतः जसवंतसिंहाला त्यानें नर्मदातीरीं चांगलाच हात दाखविला. नंतर दाराला चकवून हा आग्र्याकडे निघाला. दारानें त्याचा पाठलाग आरंभला, पण औरंगजेबानें समुगड येथें त्याचा पराभव केला. त्यानें आग्रा शहर ताब्यांत घेतलें व तेथें दरबार भरवून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली. पुढें यानें 'आलमगीर गाझी' ही पदवी धारण केली. आपलें आसन स्थिर होतांच यानें दारा व मुराद या भावांना ठार केलें. राहिला सुजा, तो हिंदुस्थानाबाहेर पळून गेला; यामुळें याचा मार्ग निष्कंटक झाला. म्हणून १६५९ त यानें राज्यारोहणाचा टोलेजंग समारंभ पार पाडला. या दिवसापासून त्यानें पारशी नवरोझ बंद करून हिजरी वर्ष चालू केलें.

यानें १६६२–६४ पर्यंत काश्मिरांत वास्तव्य केलें. बापाच्या मृत्यूमुळें पुढें हा आग्र्यास परत आला. नंतर १६७४ पावेतों हा दिल्लीस राहिला. यानें आफ्रिडी लोकांच्या बंडाचा मोड १६७६ त केला. १६७९ त जसवंतसिंगाचें राज्य लाटण्याचा याचा बेत होता. पण त्या कामीं याचें नुकसान होऊन सर्व रजपूत उलटल्याकारणानें याचें बळ एकदम कमी झालें. हें प्रकरण मागें पडल्यावर हा १६८२ च्या मार्च महिन्यांत दक्षिण सर करण्यास

बाहेर पडला. या कामीं २५ वर्षें खटपट करूनहि त्यास यश आलें नाहीं. शेवटीं हा अहमदनगर येथें १७०७ त मृत्यु पावला.

'फतवा इ आलमगिरी' हा मुसलमानी कायद्याचा उत्तम ग्रंथ यानें तयार केला. हा फार विद्वान् होता. याच्या इस्लामेतर धर्मपंथीयांच्या छळामुळें यास शेवटीं शेवटीं अपयशी राजकारण करण्याची पाळी आली. त्याचा कारभार एकतंत्री असल्यामुळें त्याच्या कारकीर्दींत व नंतर कर्तबगार माणसें तयार झालीं नाहींत. धर्मांचें राजकारणावर फार वर्चस्व झाल्यामुळें अकबराप्रमाणें औरंगजेबाला सर्व प्रजा खुष ठेवतां आली नाहीं व अनेक बंडें मात्र उद्भवलीं. विशेषतः रजपूत आणि मराठे यांचा छळ झाल्यामुळें मोगली साम्राज्य खिळखिळें झालें व एवढा पराक्रमी आणि हुषार बादशहा झाला असूनहि देशाला कांहीहि फायदा झाला नाहीं, असें नाइलजानें म्हणावें लागतें. मराठ्यांचा प्रत्यक्ष कट्टा शत्रु म्हणून औरंगजेबाचे कांहीं खरे गुण महाराष्ट्रांत तरी झांकले जातात यांत शंका नाहीं. अकबराखालोखाल तो श्रेष्ठ बादशहा होऊन गेला; पण अकबराची योग्यता उपकारक ठरली व याची मुसलमानी साम्राज्य आणि हिंदुस्थान यांना हानिकारक झाली, असें दिसून येतें.

**औरंगाबाद**—हैद्राबाद संस्थान, एक जिल्हा. क्षे. फ. सु. ११,००० चौरस मैल. लो. सं. सुमारें दहा लक्ष. जिल्ह्यांतील मुख्य नदी गोदावरी आहे. पाऊस सरासरीं २५ इंच पडतो. ज्वारी, बाजरी व गहूं हीं मुख्य पिकें होत. चांदीचीं भांडीं, जर, किनखाप, मश्रू, वगैरे कापड, लुगडीं, रेशमी कापड, कागद यांविषयीं जिल्हा प्रसिद्ध आहे. औरंगाबाद, जालना व पैठण हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत. अजंठा, वेरूळ व दौलताबाद हीं ठिकाणें प्रेक्षणीय आहेत. दरसाल अनेक लोक तीं पहाण्यास येतात. पैठण हें गांव प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. या प्रदेशावर प्रथम चालुक्य, नंतर राष्ट्रकूट, यादव व बहामनी असे राजवंश होऊन गेले. यानंतर निजामशाहीकडे जिल्हा आला व तो पुढें मोंगलांनीं जिंकून घेतला.

औरंगाबाद हें मुख्य ठिकाण मलिकंबरनें खडकी गांवाजवळ फत्तेपूर या नांवानें १६१० त वसविलें. औरंगजेब या ठिकाणीं राहिला म्हणून औरंगाबाद हें नवें नांव पडलें. येथील औरंगजेबाच्या बायकोची 'बीबीका मुकरबा' नांवाची मशीद ताजमहालाच्या धर्तीवर बांधलेली आहे. येथेंच प्रथम निजाम असफजाह रहात असे. पुढें त्यानें हैद्राबादेस राजधानी नेली. येथील मशिदी प्रेक्षणीय आहेत. शिक्षणसंस्था अनेक आहेत. लो. सं. ३६,८७०. येथूनच बहुधा अजंठा आणि वेरूळ या प्रेक्षणीय स्थळीं प्रवासी जातात.

**औषधक्रिया**— (फार्मसी). उपयुक्त अशा प्रकारचीं निरनिराळीं औषधें (पोटांत घेण्याचीं किंवा बाहेरून लावण्याचीं) कशीं तयार करावीं याचें शास्त्र किंवा विद्या आहे. फार प्राचीन कालापासून वैद्यक आणि औषधी विद्या यांचें साहचर्य आहे. अनेक औषधांचा नामनिर्देश प्राचीन ग्रंथांतून आढळून येतो. परंतु त्यांचें वास्तविक ज्ञान करून घेणें फार कठीण असतें. पाश्चात्य देशांत १६ व्या व १७ व्या शतकांमध्यें अनेक निरनिराळ्या प्रकारचीं औषधें तयार करण्यांत येत व कांहींमध्यें ४० पर्यंत निरनिराळीं द्रव्यें वापरण्यांत येत असत. हीं औषधें कोणीं बनवावीं व तीं कशीं बनविण्यांत यावीं यासंबंधीं निरनिराळे कायदे वेळोवेळीं निरनिराळ्या देशांत संमत करण्यांत येतात.

अगदीं आरंभीं आपल्याकडील वैद्यांप्रमाणें डॉक्टर लोक स्वतःच आपल्याला लागणारीं औषधें बनवीत. पण पुढें त्यांचा धंदा वाढला व औषधेंहि बाहेर वापरण्यांत येऊं लागलीं तेव्हां औषधें तयार करण्याचा हा स्वतंत्र धंदाच निघाला. त्यानंतर साहजिक यासंबंधींचें शिक्षण आणि औषधांची शास्त्रीय निर्मिति यांवर सरकारी बंधनें पडलीं. औषधें तयार करण्याच्या धंद्याचें शिक्षण शाळाकॉलेजांतून देण्यांत येऊं लागलें.

आपल्या आयुर्वेदांतहि भेषजविज्ञान आहे. औषधें तयार करण्याविषयीं धन्वंतरिनिघंटु, मदनविनोद, राजनिघंटु, इ. स्वतंत्र ग्रंथ आहेत.

**औषधी ग्रंथ**— (फार्माकोपिआ). वैद्यकांत जीं निरनिराळीं औषधें वापरण्यांत येतात त्यांचे गुणधर्म व तीं औषधें कोणत्या द्रव्यांचीं बनलेलीं असतात व कोणत्या द्रव्यांपासून कोणतीं औषधें बनविण्यांत येतात त्याचें वर्णन ज्यांत दिलेलें असतें असा प्रमाणभूत ग्रंथ. असे प्रमाणग्रंथ प्रत्येक राष्ट्राचें सरकार तयार करवून घेत असतें. ब्रिटिश फार्माकोपिआ वेळोवेळीं प्रसिद्ध होत असतात. अमेरिकेचा असा पहिला ग्रंथ १८२० सालीं प्रसिद्ध झाला. आयुर्वेदाचेहि असे ग्रंथ आहेत.

**औसले, सर विल्यम** (१७६९–१८४२)—एक आयरिश प्राच्यविद्याकोविद. याचें प्राथमिक शिक्षण घरींच झालें. त्यानंतर १७६९ मध्यें पॅरिस येथें फ्रेंच भाषा शिकण्याकरितां त्याला धाडण्यांत आलें. तेथें त्याला पर्शियन भाषेची गोडी लागली. १७९५ मध्यें त्यानें 'पर्शियन मिस्लेनीज' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. १७९७–९९ यांच्या दरम्यान् 'ओरिएंटल कलेक्शन्स' हा ग्रंथ प्रकाशित केला. १७९९ मध्यें 'एपिटोम ऑफ दि एन्शन्ट हिस्टरी ऑफ पर्शिया', १८०० सालीं 'दि ओरिएंटल जिऑग्रफी ऑफ इब्न हौकेल', १८०१ मध्यें बख्त्यारनामाचें भाषांतर असे ग्रंथ केले. १७९७ सालीं त्याला डब्लिन विश्वविद्यालयानें एल्एल. डी. ची पदवी अर्पण केली. १८०० त त्याला नाइटहुडचा किताब

मिळाला. १८१९-१८२३ या अवधींत त्यानें पूर्वेकडील प्रवासासंबंधीं-विशेषतः इराणांतील १८१०-१२ मधील प्रवास यावर तीन भागांत एक ग्रंथ प्रसिद्ध केला.

---

## क

**क**— देवनागरींतील पहिलें व्यंजन. या अक्षराला पांच प्रगतिपर अवस्था आहेत. पहिली अशोककालीन (गिरनार शिलालेख), दुसरी कुशानकालीन असून तिसरी इ. स. दुसऱ्या शतकांतील क्षत्रप रुद्रदामनूच्या लेखांत प्रतीत होणारी, चौथी जपानी मठांतील ताडपत्री पोथींत ( ६ वें शतक ) व पांचवी अकराव्या शतकांत प्रतिहारवंशी नागभट राजाच्या शिलालेखांत दृष्टीस पडते.

**कंक**— अज्ञातवासांत विराटाच्या घरीं असतांना युधिष्ठिरानें धारण केलेलें नांव. कंक ( धर्मराज ) विराटाशीं अक्षक्रीडा खेळत असे. दाक्षिण गोग्रहणकालीं विराटराजा युद्धास गेला असतां त्यानें कंकास बरोबर घेतलें होतें व तेथें त्यास सुशर्मा बांधून नेत असतां कंकानें आपल्या पांडव भ्रात्यांकडून विराटाची मुक्तता करविली.

**कंकनहळ्ळी**—म्हैसूर संस्थान, बंगलूर जिल्ह्यांतील कंकनहळ्ळी तालुक्याचें मुख्य ठिकाण. अर्कावती नदीच्या तीरीं हें बंगलूरच्या दक्षिणेस ७० मैलांवर आहे. लोकसंख्या सु. सात हजार. येथील किल्ला चन्नापट्टणाच्या जगदेवरायानें १५७७ त बांधला. ब्रिटिश सैन्यास येथें स्थान मिळूं नये म्हणून टिपूनें हें दोनदां उध्वस्त केलें.

**कंकर**—मध्यप्रांतांतील एक संस्थान. उत्तरेस द्रुग व रायपूर जिल्हे, पूर्वेस रायपूर, दक्षिणेस बस्तर संस्थान, व पश्चिमेस चांदा. मुख्य ठिकाण कंकर हें आहे. क्षे. फ. १,४१३ चौ. मै.. लो. सं. १,४९,४७१. यांत खेडीं ५१० आहेत. उत्पन्न ६,८२,५६१ रु. आहे. संस्थान बरेंच डोंगराळ आहे व पूर्वेकडे महानदी वाहत जाते. येथें तांदूळ पिकतो. बहुतेक लोक गोंड आहेत. येथील राजा जुन्या रजपूत कुळांतील असून याचा पूर्वज लोकनियुक्त होता. मराठ्यांना ५०० शिपायांची मदत देण्याचें अंगीकारल्यामुळें हें संस्थान मराठ्यांनीं टिकूं दिलें. छत्तिसगडी व गोंडी भाषा येथें मुख्यतः वापरतात. रेल्वेचा फांटा येथें सुरू केल्यापासून येथील जंगलांतील लांकडापासून बराच फायदा संस्थानास होऊं लागला आहे. शिक्षण बरेंच मागासलेलें आहे. १९४८ सालीं हें मध्यप्रांतांत विलीन झालें. संस्थानांत एक हायस्कूल चालतें.

**ककुत्स्थ**—सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजर्षीचा पौत्र व विकुक्षीचा पुत्र. इंद्राचें दैत्यांशीं युद्ध चाललें असतां त्यानें यास आपल्या साहाय्यास बोलाविलें होतें. त्या वेळेस यानें इंद्रास वृषभ करून त्यावर आरोहण केलें व दैत्यांचीं पुरें जिंकलीं. यास क्वचित् इंद्रवाह, पुरंजय अशीं नांवेंहि आढळतात व इंद्रानें धारण केलेलें शुभ्र वृषभरूप, त्यावर याचें आसन होतें अशा अर्थानें यास कोठें इंद्रवाह असेंहि म्हटलें आहे.

**कंकोळ**—ह्या वेलीची मूळ उत्पत्ति जावा व सुमात्रा बेटांत आहे. हिची हिंदुस्थानांत फारच थोडी लागवड होते. सिंगापूरहून कंकोळ बाहेरप्रदेशीं मोठ्या प्रमाणावर जातो. या वेलीच्या वाळलेल्या फळासच कंकोळ म्हणतात. सुगंधासाठीं याचा उपयोग करतात. कंकोळ औषधी आहे.

**कक्क प्रतिहार**—हा भिल्लादित्याचा पुत्र. यानें मुद्गगिरि येथें गौडांशीं लढून जय मिळविला. व्याकरण, ज्योतिष, तर्क व काव्य यांत हा निष्णात होता. याच्यानंतर याचा मुलगा बाऊक गादीवर बसला.

**कक्काजी भोसले**—भांबोरकर भोसल्यांचा मूळपुरुष. याचा बाप खेळोजी व भाऊ शहाजी, रुस्तुमजी व सुभानजी असे होते. कक्काजी नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दीत कर्नाटकाच्या स्वारींत होता. याला चिमणाजी व आप्पाजी असे दोन मुलगे होते.

**कॅक्स्टन, विल्यम** ( १४२२-१४९१ )— पहिला इंग्रज छापखानेवाला. तो फ्रान्समधील कोलोन येथें १४७१ सालीं मुद्रणकला शिकला व त्यानें बर्जेस येथें छापखाना काढला. १४७६ सालीं त्यानें छापलेलें इंग्लिश भाषेंतील पहिलेंच छापील पुस्तक होय. सदर सालीं इंग्लंडमध्यें येऊन त्यानें वेस्टमिन्स्टर अॅबेजवळ आपला छापखाना सुरू केला व लॉर्ड रिव्हर्सच्या तत्त्वज्ञानाचीं वचनें ( दि डिक्टेट्स् ऑर सेइंग्ज ऑफ दि फिलॉसफर्स ), ट्रॉयच्या अद्भुत गोष्टींचीं भाषांतरें, चॉसरच्या कँटरबरी टेल्स, कौपरचें कन्फेशिओ अम्यान्टिस, गोल्डन लीजन्ड, वगैरे पुस्तकें आपल्या छापखान्यांत छापलीं. सदर पुस्तकांत चित्रें छापण्याकरितां कॅक्स्टन कोरीव ठोकळ्यांचा उपयोग करीत असे.

**कच**— हा बृहस्पतीचा पुत्र. त्याला दैत्यगुरु शुक्राचार्य यांच्याकडे संजीवनी विद्या शिकण्याकरितां इंद्रानें पाठवलें व त्यानें गुरु शुक्राचार्य यांची फार एकनिष्ठपणें सेवा केली. गुरुकन्या देवयानी कचावर प्रेम करूं लागली. कचाला संजीवनी विद्या मिळूं नये म्हणून दैत्यांनीं त्याला दोन वेळां ठार मारलें व दोन्ही वेळां देवयानीच्या विनंतीवरून शुक्राचार्यांनीं कचाला

जिवंत केलें. शेवटीं दैत्यांनीं कचाला ठार मारून जाळून त्याची राख मद्यांतून शुक्राचार्यांना पाजली. देवयानीच्या विनंतीवरून शुक्राचार्यांनीं कचाचा शोध अंतर्दृष्टीनें केल्यावर कच स्वतःच्या पोटांत असल्याचें त्यांना आढळलें, तेव्हां आपण व कच दोघेहि जिवंत राहावें म्हणून पोटांत कचाला जिवंत करून त्यास संजीविनी विद्या शिकविली. आपल्या मद्यासक्तीमुळें हा प्रसंग ओढवला याचा खेद होऊन यापुढें कोणींहि ब्राह्मणानें मद्याला स्पर्श करूं नये असा कडक निर्बंध शुक्राचार्यांनीं घातला. कच जिवंत झाल्यावर गुरूची आज्ञा घेऊन स्वर्गास जावयास निघाला. तेव्हां देवयानीनें आपलें पाणिग्रहण करण्याविषयीं त्याला विनविलें. पण एकाच उदरांतून निर्माण झाल्यामुळें आपण दोघे बहीणभाऊ आहोंत असा युक्तिवाद करून कचानें तिला झिडकारिलें. तेव्हां या प्रेमळ निरागस बालिकेला सात्त्विक संताप येऊन तिनें कचाला, तूं शिकलेली विद्या तुझ्या उपयोगी पडणार नाहीं असा शाप दिला. कचानेंहि उलट तुला ब्राह्मण पति मिळणार नाहीं असा देवयानीला शाप दिला.

**कचकडी**—( सेल्युलॉइड ). हा कृत्रिम पदार्थ हस्तिदंत, हाड, टणक रबर किंवा पोंवळें यांच्या जागीं वापरतात; कारण हा त्यांच्यासारखाच कठिण, लवचिक व दिसण्यालाहि तसाच असतो. हा कापूर आणि विस्फोटक तूल ( गन्‌कॉटन ) यापासून तयार होत असल्यानें फार लवकर पेटहि घेतो. उष्णता आणि दाब यांच्या मदतीनें याला वाटेल तो आकार देतां येतो. गुंड्या, चाकूच्या मुठी, छत्र्यांच्या मुठी, बिलियर्डचे चेंडू, फण्या, फोटो फिल्म, इ. अनेक जिनसा कचकड्याच्या करतात. याला विविध रंगहि देण्यांत येतात. इ. स. १८५६ मध्यें प्रथम याचा शोध निघाला व न्यू जर्सी देशांत याच्या उपयोगाच्या बऱ्याच तऱ्हा काढण्यांत आल्या.

**कचकड्याचें ( काष्ठ ) द्रव्य**—( सेल्युलोज ). ज्या द्रव्यापासून वनस्पतींच्या पेशी बनतात त्या द्रव्यास सर्वसाधारण नांव. याची रसायन सारणी क६ उ१० प्र५ ( $C_6H_{10}O_5$ ) ही आहे. हें द्रव्य कर्बनित जातीचें असून पिष्ठ सत्त्वासारखेंच असतें. त्यामुळें त्यामध्यें खनिज अम्लद्रव्य मिसळलें असतां इतर पिष्ठ सत्त्वाप्रमाणेंच यापासून साखर तयार होते. काष्ठद्रव्य हें वनस्पतींच्या पेशींपासून मिळतें. कापसाचा रुई हें शुद्ध काष्ठद्रव्य होय. तसेंच कागद तयार करण्याकरितां लागणारा लगदा हा बहुतेक काष्ठद्रव्यमय असतो. कागद स्वतः एक अशुद्ध काष्ठद्रव्यच आहे. कृत्रिम रेशीम तयार करण्याच्या निरनिराळ्या पद्धती या काष्ठद्रव्यावर निरनिराळ्या रसायनांच्या केलेल्या क्रियांवर मुख्यतः आधारलेल्या असतात. छायाचित्रें ( फोटो ) घेण्याचे जे निरनिराळे पट ( फिल्म ) तयार करण्यांत येतात त्यांकरितां वापरण्यांत येणारें मुख्यतः द्रव्य जें व्हिस्कोज तें एक प्रकारचें विशिष्ट पद्धतीनें तयार केलेलें काष्ठद्रव्यच होय. काष्ठद्रव्यापासून केलेल्या अनेक पदार्थांचा निरनिराळ्या कामीं उपयोग करण्यांत येतो. उदाहरणार्थ, कोलोडिअन व गनकॉटन हे पदार्थ काष्ठद्रव्यावर नत्राम्लाची क्रिया करून तयार करण्यांत येतात.

**कचेरा**— कांचेच्या बांगड्या करणारांची ही जात जबलपूर जिल्ह्यांत आढळते. लो. सं. सु. तीन हजार. ही जात महादेवानें आपल्या लग्नांत पार्वतीच्या हातांत बांगड्या भरण्याकरितां यज्ञवेदींतून निर्माण केली, असें सांगतात. हे लोक देवींची पूजा करतात व मद्यमांस खातात. विधवाविवाहाची व काडीमोडीची चाल यांच्यांत आहे. कच्ची कांच घेऊन तिच्या बांगड्या हे लोक करतात. उच्च हिंदु जातींच्या मुलींकरितां हिरव्या बांगड्या व मुसलमान स्त्रियांकरतां हिरव्या व काळ्या बांगड्या हे लोक तयार करतात. बांगड्या विकण्याचें काम यांच्या बायका करतात.

**कचेश्वर** ( मृ. शके १६५३ )— एक महाराष्ट्र संतकवि. हा सिद्धेश्वर ब्रह्मे याचा मुलगा चाकण ( जि. पुणें ) येथें जन्मला. लहानपणापासून तुकारामाच्या अभंगांचें भजन करण्याचा नाद त्याला लागला व अगदीं विरक्त झाल्यामुळें त्याची गणना साधुपुरुषांत होऊं लागली. शके १६०७ मध्यें त्यानें पाऊस पाडून दाखवला त्याबद्दल त्याला चाकण परगण्यापैकीं दर गांवांतून १ टक्का व धान्य १ मण मिळत असे. त्याबद्दल शाहूनें करून दिलेलें पत्र उपलब्ध आहे. ( भा. इ. सं. मं. इतिवृत्त–श. १८३५, पा. २५३ ). शाहूराजा त्याचा शिष्य झाल्यामुळें त्याला राजगुरु असें नांव पडलें. त्यानें बहुविध पद्यरचना चामर, सवाई, वगैरे वृत्तांत केली. त्याचीं सुदामचरित्र व गजेंद्रमोक्ष हीं आख्यानें बायका मोठ्या भाविकपणें म्हणतात. कचेश्वराचें एक आत्मचरित्र आहे.

**कचोरा**— कचोऱ्याचीं झाडें हळदीच्या झाडांसारखीं असतात. परंतु हळदीच्या पानापेक्षां कचोऱ्याचें पान किंचित् काळसर असतें. या पानाची लांबी सुमारें दोन हात असते. ह्याचे कंद जमिनींत सांपडतात. कोंकणांत हीं झाडें पुष्कळ होतात. वास सुवास चांगला असल्यामुळें हा सुगंधी मसाल्यांत वांटून अंगास लावितात. या झाडाचीच एक जात असते. तीस कापूर काचरी असें म्हणतात. तीस सुगंध जास्त असल्यामुळें कचोऱ्यापेक्षांहि महाग असते. पटकीवर कचोऱ्याच्या कंदाचा व कांद्याचा रस एकत्र करून घेतात व जंतावर कचोऱ्याच्या कंदाचे काप काढून त्यांची माळ करून गळ्यांत बांधतात.

**कच्चें शिसें**—( गॅलेना ). हें अशोधित शिसें आहे. याचे स्फटिक घन सांपडतात. त्यांचा रंग निळसर करडा असतो. हें

केचें शिसें मऊ व ढिसूळ असून हराम्ल आणि नत्राम्ल यामध्यें फसफसतें. यापासून शेंकडा ८६ इतकें शिसें व कांहीं रुपें निघतें.

**कच्छ**—पश्चिम हिंदुस्थानांतील एक देशी संस्थान. हें अरबी समुद्रानजीक आहे. क्षे. फ. ८,४६१ चौ. मैल असून आठ मोठीं गांवें व ९३७ लहान खेडीं आहेत. राजधानी भूज. या संस्थानचा बहुतेक भाग रुक्ष, ओसाड रण असून दक्षिणेकडील किनाऱ्यानजीकचा २० ते ३० मैल प्रदेश सखल व सुपीक आहे. येथें एक ज्वालामुखी असून धरणीकंप होतात. १८१९ सालीं मोठा धरणीकंप होऊन भूज येथील राजवाड्याचा व इतर ७००० घरांचा नाश झाला. येथें पाऊस सरासरीं १२ इंच पडतो. अलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळच्या ग्रीक ग्रंथामध्यें कच्छचा उल्लेख आहे. ९ व्या शतकांत अरब लोक येथील किनाऱ्यावर येऊन राहिले. १४ व्या शतकांत सम्मा रजपुतांनीं हा प्रदेश जिंकला व आपलें राज्य स्थापलें व सम्मा वंशांतील जोजाड या राजाच्या नांवावरून येथील लोकांना जडेजा नांव पडलें. त्यांचा धर्म हिंदु व मुसलमानी धर्माच्या मिश्रणानें झालेला आहे. १८१५ सालीं इंग्रजांशीं संस्थानचा तह केला. हल्लींचे संस्थानिक महाराव श्रीविजय राजजी सवाई बहादुर १९४२ सालीं गादीवर बसले. १९२१ सालीं वसाहतींच्या परिषदेला मागचे महाराव स्वतः हजर होते. लो. सं. ५,००,८००. पैकीं हिंदु निम्याहून बरेच अधिक आहेत. येथें गहूं, बाजरी, कापूस, कडधान्यें, बागायती जिन्नस हीं मुख्य पिकें आहेत. लोखंड, कोळसा, पिवळा संगमरवरी दगड येथें सांपडतो. कच्छचे घोडे प्रसिद्ध आहेत. या संस्थानांत आठ जिल्हे आहेत. संस्थानचें उत्पन्न ८०,००,००० आहे. आतां हें संस्थान हिंदी संघराज्यांत विलीन झालें आहे.

**कच्छी**—बलुचिस्तानांत कलात संस्थानचा एक भाग आहे. क्षे. फ. ५,३१० चौ. मै. लो. सं. सु. एक लाख असून यांत ५९० गांवें आहेत. जाटांची वस्ती बरीच आहे. पहिल्या अफगाण युद्धाच्या वेळीं हा प्रदेश ब्रिटिशांच्या ताब्यांत आला. छलगरी आणि तंबू येथें बौद्ध कालांतील पुष्कळ अवशेष सांपडतात. हिराकस व सोडा येथें बराच सांपडतो.

**कच्छी मेमन**—मुसलमानांतील मेमनजातीपैकीं एक वर्ग. यांची वस्ती मुंबई व गुजरातमध्यें फार आहे. बगदादचा साधु मौलाना अबदुल कादर जिलानी याचा वंशज सय्यद यसुफुद्दीन कोरदिरी यानें १४२१ सालीं सिंधमध्यें येऊन तेथील लोहाणा जातीच्या हिंदूंना मुसलमानी धर्माची दीक्षा दिली. हे लोक १६ व्या शतकांत कच्छ संस्थानांत आले व तेथून मुंबई, मद्रास, कलकत्ता, मलबार, ब्रह्मदेश, सयाम, जावा, आफ्रिका, वगैरे ठिकाणीं गेले आहेत. त्यांचा धर्मगुरु (यसुफुद्दीनचा वंशज) मुंबई येथें राहतो. यांच्यांत हिंदु चाली शिल्लक आहेत. वारसाहक्क हिंदुशास्त्राप्रमाणें चालतो. हे लोक दारू पीत नाहींत व गोमांस खात नाहींत.

**कछवा**—ही एक सतारच आहे. फरक एवढाच कीं, त्याचा भोपळा डेरेदार नसून कांसवाच्या पाठीसारखा असतो व हा भोपळा क्वचित् लांकडी वापरतात. ह्यासहि कांहीं लोक तर्फा बसवितात. सतारीप्रमाणें ह्यांतहि रागदारीच्या व लयकारीच्या गती वाजवितात. तारा मिळविण्याची व वाजविण्याची पद्धति सतारीप्रमाणेंच आहे.

**कंजर**—ही जिप्सी लोकांप्रमाणें फिरस्ते लोकांची जात आहे. लो. सं. १९३१ सालीं सु. २५,००० होती ती १९४१ सालीं फक्त १०,००० मोजली गेली ! बहुतेक हिंदू असून यांची वस्तीस युक्त प्रांत, काश्मीर, पंजाब, मध्यप्रान्त, वगैरे भागांत आहे. शिवाय इराण, ईजिप्त, स्पेन, तुर्कस्तान व इंग्लंड या देशांतहि यांची कांहीं वस्ती आहे. यांच्या बायका गाऊन-नाचून पैसा मिळवतात, व वाळ्याच्या ताट्या व झाडण्या करण्याचा धंदा करतात. चटया विणणें, टोपल्या व पिशव्या करणें, मुंज गवताच्या दोऱ्या वळणें, कुंचले करणें, नगारे करणें हेहि यांचे इतर धंदे आहेत. ही जात म्हणजे हिंदू व वन्य लोक यांची मिश्र जात म्हणतां येईल.

**कज्जेदलाली**—(शांपर्टी). कायद्यामध्यें याचा अर्थ असा कीं, कोर्टांत चालणाऱ्या दाव्यांत वादीला किंवा प्रतिवादीला तो दावा शेवटपर्यंत चालवण्यास पैशाची, सल्लामसलतीची व इतर सर्व प्रकारची मदत करावयाची, आणि तो दावा जिंकला तर त्या मदतगार इसमाला त्या दाव्यांतील स्थावर किंवा जंगम मिळकतीपैकीं आगाऊ केलेल्या कराराप्रमाणें विशिष्ट भाग मिळावयाचा. उलटपक्षीं दावा बुडाला तर मात्र सदर मदतगाराला कांहींहि मिळावयाचें नाहीं. हे असले करार जुगारीच्या स्वरूपाचे असल्यामुळें ते कायद्यानें बेकायदेशीर ठरवले आहेत, म्हणजे अशा प्रकारच्या करारावाबत कोर्टांत दावा करतां येत नाहीं. ( इंडियन कॉंट्रॅक्ट ॲक्ट कलम ३० पहा).

**कझन, व्हिक्टर** (१७९२-१८६७)—हा फ्रेंच तत्त्ववेत्ता व लेखक तत्त्वज्ञानाच्या 'सारसंग्रह' (एक्लेक्टिक) पंथाचा संस्थापक होय. तो १८१५ मध्यें सोरबॉन येथें तत्त्वज्ञान विषयाचा दुय्यम प्राध्यापक झाला. १८२२ मध्यें कांहीं राजकीय आक्षेपांमुळें तो आपल्या प्राध्यापकाच्या जागेला मुकला. १८३० च्या जुलै क्रांतीनंतर तो कौन्सिल ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शनमध्यें शिरला. १८४० मध्यें मंत्रिमंडळांत त्याला शिक्षणमंत्र्याची जागा

मिळाली. पण १८४८ च्या राज्यक्रान्तीनंतर त्याला सार्वजनिक कार्यांतून निवृत्त व्हावें लागलें. त्यानें बरेच ग्रंथ लिहिले आहेत.

**काझिन्स, डॉ. जेम्स हेन्री** ( १८७३- )— एक आयरिश साहित्यिक व शिक्षण-कला विशारद. वीस वर्षांचे असल्यापासून हे कवि म्हणून पुढें आहेत व त्यांचे बरेच काव्यग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. १९०४ सालीं थिऑसॉफिकल सोसायटीचे सभासद झाले व १९१५ सालापासून हिंदुस्थानांत त्या संस्थेचें कार्य करीत आहेत. हे उत्कृष्ट शिक्षक व कलावंत असून जगांतील अनेक विद्यापीठांतून यांनीं प्राध्यापकाचें काम केलें आहे. यांची पत्नी मार्गारेट एलिझाबेथ याहि चांगल्या विदुषी असून अखिल भारतीय महिला परिषदेच्या संस्थापक आहेत. या चांगल्या संगीतज्ञहि आहेत.

**कटक**—ओरिसा, एक जिल्हा. क्षे. फ. ४,५७१. लोकसंख्या २४,३१,४२७. पैकीं शें. ९७ हिंदू आहेत. याचा पश्चिम भाग डोंगराळ असून नल्तीगिरि व उदयगिरि येथें बौद्धांचे अवशेष बरेच आहेत. या भागांत महानदी, वैतरणी व ब्राह्मणी या नद्या आहेत. पाऊस सरासरी ६० इंच पडतो. कडधान्यें, ऊंस, बटाटे, तमाखू हीं पिकें होतात. तांदूळ हें मुख्य पीक आहे. मुख्य ठिकाण कटक व शिवाय केंद्रपार व जाजपूर हीं मोठीं शहरें आहेत. २,६७० खेडीं आहेत. या जिल्ह्यांत सहा निरनिराळे कालवे आहेत.

कटक शहर १० व्या शतकांत वसविण्यांत आलें. मकरकेसरी यानें बांधलेला किल्ला व बाराबाती हा किल्ला अद्यापि आहे. मोंगल आणि मराठे यांच्या राजकारणांत कटक शहराला प्राधान्य असे. फॉल्सपॉइंट बंदर कटकशीं कालव्यानें जोडलेलें असल्यानेंहि आज कटकला महत्त्व आहे. सोन्या-चांदीवरचें नकसकाम फार चांगलें होतें. लो. सं. ५१,००७

**कंटकत्वक् वर्ग**—( एचिनोडर्माटा ). हा एक अपृष्ठवंशी प्राण्यांचा पोटवर्ग आहे. याच्यावर एक कठिण कवच असतें. त्यामध्यें चुन्याचे थर वसतात. याचे नऊ वर्ग आहेत : १ तारकामत्स्य ( स्टारफिश अथवा ॲस्टरॉइडस् ), २ समुद्रपुष्प ( सीआचिन्सा ), ३ समुद्रकर्कटी ( होलोथुरॉयडी ), ४ समुद्रकमल ( क्रिनोइडीआ ). यांखेरीज इतर वर्ग आतां नष्ट झाले आहेत.

बाल्यावस्थेंत या वर्गांतील प्राण्यांचें शरीर दोन सारख्या बाजूंचें असतें, पण पुढें तें चक्राकार बनतें. हे प्राणी आपली उपजीविका समुद्राच्या तळाशीं असलेले प्राणी व वनस्पती यांवर करतात. या प्राण्यांना आपल्या शरीराचा एखादा भाग सहज टाकतां येतो व त्या जागीं नवीन बसवितांहि येतो.

**कँटन**—चीन, एक प्रमुख शहर आणि बंदर. याचें चिनी नांव क्वाँगचौफू. हें शहर क्वांगटुंग प्रान्तांत पर्ल नदीच्या पूर्व तीरावर आहे. शहराभोंवतीं ६ मैल परिघाचा कोट आहे. लो. सं. ८,६१,०२४ आहे. बरेच लोक नदींत नावांतूनच राहतात. कँटनला येणाऱ्या अरब दर्यावर्दी लोकांनीं १० व्या शतकांत बांधलेली एक मशीद, एक फार मोठें बुद्ध-मंदिर, पांचशें देवांचें एक हिंदु देऊळ व इतर अनेक हिंदु देवळें आहेत. १५१७ पासून युरोपीयांचें दळणवळण येथें सुरू झालें. प्रथम पोर्तुगीज व इंग्रज व्यापारी आले. त्यांचे आपसांत तंटे होऊन १६८५ नंतर संयुक्त ईस्ट इंडिया कंपनी झाली. तेव्हां चिनी बादशहानें परराष्ट्रीय व्यापाराला फर्मान काढून परवानगी दिली. १६६७ पासून चहाचा प्रचार इंग्लंडांत सुरू झाला, व चहाच्या व्यापाराचा मक्ता तेव्हांपासून १८३४ पर्यंत ईस्ट इंडिया कंपनीकडे होता. ती मुदत संपल्यावर इंग्रज व चिनी लोकांचे तंटे सुरू होऊन १८६१ सालीं सर चार्लस स्ट्रॅबेन्झी यानें हल्ला करून कँटन शहर घेतलें व नंतर तह होऊन सर्व देशांच्या लोकांना व्यापार करण्यास कँटन खुलें करण्यांत आलें. नंतर तेथें युरोपीय व्यापाऱ्यांनीं राहण्यासाठीं एक वसाहत स्थापन केली. तिला शामा एन म्हणतात. येथील हवा थंड व निरोगी आहे. शहराची व्यवस्था व स्वच्छता चांगली आहे. येथील व्यापारी हुषार, मेहनती व आदरशील आहेत.

**कटनी**—मध्यप्रांत, जबलपूर जिल्ह्यांतील एक शहर. हें आगगाड्यांचें मोठें केंद्रस्थान आहे. चुन्याचे व लाल वाळूचे दगड कटनीच्या आसपास फार आढळतात. तेथें एक मोठा सीमेंटचा कारखाना आहे. तसेंच दारू गाळण्याचा एक व इतर भांड्यांचे कारखाने आहेत.

**कँटरबरी**—इंग्लंडमध्यें केंट परगण्यांत स्टौर नदीवर हें शहर आहे. लो. सं. १९,५००. सॅक्सन राजा एथलबर्ट याची राजधानी येथें होती. ५९७ मध्यें रोमहून ऑगस्टाइन एथलबर्ट राजाकडे आला व येथें राहूं लागला. तेव्हांपासून हें शहर आर्चबिशपचें कायमचें स्थान झालें. ऑगस्टाइननें येथें मोठें देऊळ व मठ बांधला. येथेंच आर्चबिशप बेकेटचा खून झाला. येथें पुष्कळ यात्रेकरू येत असत. या यात्रेचें उत्तम वर्णन चॉसर कवीनें केलेलें आहे. येथील आर्चबिशप साऱ्या इंग्लंडचा मुख्य उपाध्याय असतो. येथें धर्मसंबंधीं संस्था बऱ्याच आहेत. गिल्डहॉल, पदार्थ-संग्रहालय, कलाभुवन, वगैरे मुख्य इमारती आहेत. या शहराचा पार्लमेंटमध्यें एक प्रतिनिधि असतो. येथें पुरातन काळापासून धान्यांचा व गुरांचा बाजार भरत असतो. ऑगस्टच्या ४, ५ व ६ तारखांना येथें ६ व्या हेन्री राजाच्या कारकीर्दीपासून जत्रा भरत असते.

**कॅटलिन, जॉर्ज** ( १७९६-१८७२ )— हा एक अमेरिकन मानववंशशास्त्रज्ञ असून यानें अमेरिकन इंडियन लोकांसंबंधीं कांहीं महत्त्वाचे ग्रंथ लिहिले आहेत.

**कॅटानिया**—सिसिली बेटांत पूर्व किनाऱ्यावरचें हें शहर याच नांवाच्या प्रांताची राजधानी आहे व तें माउंट एटना या ज्वालामुखीच्या पायथ्याशीं आहे. त्यामुळें अनेक वेळां हें शहर प्रचंड धरणीकंपांत सांपडून माउंट एटना ज्वालामुखीच्या उद्रेकांतून निघालेल्या तप्त रसानें कमी-अधिक प्रमाणांत नष्ट झालें, पण प्रत्येक वेळीं त्या शहराची पुनर्रचना करण्यांत आली. या शहरांत राजधानीचीं प्राचीन स्मृति-चिन्हें पुष्कळ सांपडतात. त्यांत एक प्राचीन नाट्यगृह आणि कांहीं प्राचीन इमारती पडक्या स्थितींत सांपडल्या आहेत. येथें रेशीम, गंधक, तमाखू, साबण, आगपेट्या, पोर्टलंड सीमेंट, वगैरेचे कारखाने आहेत. १६६९ मध्यें झालेल्या ज्वालामुखीच्या स्फोटानें हें बंदर बुजून गेलें होतें. पण नंतर तें पुन्हां चांगलें सुधारण्यांत आलें. येथून गंधक, दारू, तेलें, नारिंगें, लिंबें हा माल परदेशीं जातो. या शहराची लो. सं. २,४४,९७२ आहे. येथें एक विद्यापीठ आहे.

**कटास**—पंजाब, झेलम जिल्ह्यांत मिठाच्या डोंगराच्या मध्यभागीं असलेलें पवित्र सरोवर. हें पिंडी दादनखानच्या उत्तरेस असून समुद्रसपाटीपासून २,००० फूट उंचीवर आहे. या सरोवरापासून एक प्रवाह निघून शेजारच्या चोवा सैदानशहा गांवावरून गंधालखोऱ्यांत जातो. दरवर्षी हजारों लोक ह्या सरोवरांत स्नान करण्याकरितां येतात.

गंघाल खोऱ्यांतून वाहणाऱ्या कटास नदीच्या कांठीं मूर्ति नांवाच्या डोंगरावर एका स्तूपाचे अवशेष आहेत. त्याच्याजवळच एक जैन देवालय होतें. ज्या ठिकाणीं महावीराला ज्ञान झालें तें ठिकाण हेंच होय असें म्हणतात. त्याचप्रमाणें काश्मीरच्या सार्वभौमत्वाखालीं असलेल्या राजाची राजधानी असें ह्यूएनत्संगनें ज्याचें वर्णन केलेलें आहे तें सिंघपूरहि येथेंच होतें असें म्हणतात.

**कटिप्रदेश**—कटिरास्थींच्या योगानें जें एक आस्थिमय पात्र

कांहीं मणक्यांच्या साहाय्यानें तयार होतें व ज्यामुळें शरीराच्या खालील व मागील भागास आधार मिळतो त्यास कटिप्रदेश असें म्हणतात. यामध्यें चार अस्थी येतात. त्यांपैकीं दोन अस्थींमुळें पुढचा व बाजूचा भाग तयार होतो आणि दोन मागील बाजूस असतात. पुरुषाचा कटिप्रदेश स्त्रियांच्या कटिप्रदेशाहून पुष्कळच भिन्न असतो. तसेंच निरनिराळ्या मानववंशामध्येंहि कटिप्रदेशांत फरक आढळतो.

**कॅटुलस, गायस व्हॅलेरिअस** (ख्रि. पू. ८४-५४)—हा प्राचीन रोम येथील सर्वोत्कृष्ट भावगीतें लिहिणारा कवि होता. सुमारें ख्रि. पू. ६२-६३ सालीं तो रोम शहरीं गेला असतां तेथें तो क्लाडिय्या नांवाच्या त्याच्यापेक्षां ११ वर्षांनीं वडील असलेल्या स्त्रीच्या प्रेमपाशांत सांपडला. आणि लेस्बिया या टोपण नांवानें त्यानें त्या स्त्रीचें नांव अजरामर करून ठेविलें आहे. ख्रि. पू. ५७ मध्यें तो बिथीनियाला गेला असतां त्या प्रवासासंबंधींच्या त्यानें केलेल्या कविता मनोरंजक आहेत. कॅटुलसनें लिहिलेल्या कविता एकंदर ११६ असून त्या प्रत्येकीं आठ ओळींपासून दोनशें ते चारशेंपर्यंत ओळींच्या आहेत. प्राचीन काव्यांतील अलेक्झांड्रियन पंथाचा तो होता. त्याचीं भावगीतें सहजस्फूर्त असून सुरेख आहेत. आणि सॅफो व शेले या कवींच्या तोडीचा तो मानला जातो. काव्यप्रतिमा आणि मधुर भाषा यांमुळें सर्व लॅटिन कवींमध्यें हा श्रेष्ठ आहे. प्रेमगीतें तर त्याच्यापेक्षां अधिक सरस आजपर्यंत कोणाहि कवीनें लिहिलेलीं नाहींत, असें विद्वान् मानतात. सर्व रोमन कवींमध्यें त्याचा दर्जा फारच उच्च आहे.

**कॅटेकोंब**—(शवगुंफा). मृत इसमाचें शव ठेवण्याकरितां

जमिनीखालीं तयार केलेल्या जागा किंवा गुहा. ह्या गुहांमध्यें खड्ड्यांतून प्रेतें ठेवीत असत. ईजिप्त, उत्तर आफ्रिका, सिसिली,

माल्टा, वगैरे ठिकाणीं असे पुष्कळ कॅटेकोंब आहेत. आशिया मायनरमध्येंहि अनेक उत्खननांमध्यें जमिनीखालीं अशा तऱ्हेच्या गुहा सांपडल्या आहेत. नेपल्स येथील गुहा फारच मोठाल्या आहेत. तथापि रोम येथील गुहा अधिक महत्त्वाच्या आहेत. खुद्द रोम शहर आणि आजूबाजूचा प्रदेश अशा बऱ्याच भागांत जमिनीखालीं या गुहा असून यांत सुमारें साठ लक्ष थडगीं आहेत. या गुहा फार मोठाल्या असून त्यांत एकावर एक मजले खोदलेले आहेत. प्रत्येक थडग्यावर कोरीव लेख आहे आणि शिवाय चित्रेंहि कोरलेलीं आहेत. लोंबार्ड टोळ्यांनीं रोमला वेढा दिला त्या वेळीं कांहीं कॅटेकोंब नष्ट करण्यांत आले व १२ व्या शतकांत यांची माहितीहि कोणाला उरली नव्हती. १६३२ मध्यें एन्टोशिओ यानें प्रथम या कॅटेकोंबकडे लोकांचें लक्ष वेधलें. पण यांचें खरें संशोधन गिओव्हानी यानें केलें (१८६४-१८७७). तो आणि पार्कर या दोघांनीं मिळून फार काळजीपूर्वक आणि परिश्रमपूर्वक उत्खनन आणि संशोधन करून यांचा मूळ आरंभ आणि पुढील इतिहास यांवर पुष्कळ प्रकाश पाडला आहे.

**कंठधमनी**— रक्ताशयापासून डोकें व मेंदू यांस रक्त पोंचविणाऱ्या ज्या दोन मुख्य रक्तवाहिन्या असतात त्यांस म्हणतात. या मानेच्या दोन्ही बाजूंस असतात, आणि त्यांच्या पुन्हां बाहेरील व आंतील अशा दोन शाखा असतात. या मुख्य धमन्यांस इजा झाली असतां तावडतोब मृत्यु येतो.

**कंठनाडीच्छेदनक्रिया**— (ट्रॅचेटोमी-श्वासनलिकाछेद). जेव्हां मनुष्यास स्वाभाविक श्वसनेंद्रियांतून श्वास करणें कांहीं प्रतिबंधामुळें अशक्य होतें तेव्हां कंठनालामध्यें एक छिद्र पाडून व त्यांत नळी घालून त्यांतून श्वासोच्छ्वास करण्याची क्रिया चालू करतां येते. या शस्त्रक्रियेस वरील संज्ञा आहे. घटसर्प, कंठरोग, पक्षघात, वगैरे रोगांमध्यें अशी अवस्था उत्पन्न होते व सदरहू शस्त्रक्रिया करणें अवश्य होतें. ही नळी स्वच्छ ठेवणें, नळींत गार हवा जाऊं न देणें व आहार काळजीपूर्वक घेणें या तीन गोष्टींकडे विशेष लक्ष द्यावें लागतें.

**कठा**—उत्तर ब्रह्मदेश, मंडाले विभागांतील एक जिल्हा. ह्याचा बहुतेक भाग इरावतीच्या कांठीं असून याचें एकंदर क्षेत्रफळ ६,९९४ चौरस मैल आहे. जिल्ह्याचा बहुतेक भाग डोंगराळ आहे. मंगिन रांगेंतील मैंगटोन हें शिखर सर्वांत उंच असून त्याची उंची समुद्रसपाटीपासून ५,४५० फूट आहे. इरावती, कौंके, श्वेली, मेझ, मू व नम्यिन या जिल्ह्यांतील मुख्य नद्या होत. मंगिन डोंगरांत कांहीं ठिकाणीं सुवर्णयुक्त गारगोटी आढळते; व गंगॉ डोंगरांत दक्षिणेकडे अभ्रक व उत्तरेकडे ग्रानाइट हे पदार्थ थोड्या प्रमाणांत आहेत. वाघ, चित्ता, हत्ती, गवा, हरिण व आन्दल हे कठा जिल्ह्यांतील जंगली प्राणी होत. येथील हवा वाईट असून मलेरिया व इतर तापाच्या सांथी नेहमीं सुरू असतात. कठा तेथें वार्षिक पाऊस सरासरीं ५८ इंच आहे व म्यझेदी, श्वेगुजि, ऐंगतल्ल, म्यथेंदन व श्वेचाथे हीं जिल्ह्यांतील प्रसिद्ध पवित्र देवालयें आहेत. जिल्ह्याची लोकसंख्या सुमारें तीन लाख आहे. शें. ९५ पेक्षां अधिक लोक बौद्ध आहेत. बहुतेक लोक ब्रह्मी भाषा बोलतात. शें. ७७ लोकांची उपजीविका शेतकीवर होते. डोंगरावरून वाहत आलेला गाळ सांचून जेथें साधारण सपाट जमीन बनलेली आहे त्या ठिकाणीं भाताची लागवड होते. तीळ, चहा व तंबाखू हे जिन्नसहि थोड्या प्रमाणांत होतात. जंगलांत मुख्यतः सागाचीं झाडें आहेत. कळक व वेतहि पुष्कळ मिळतो. या जिल्ह्यांत सोनें, तांबें, लोखंड व शिसें हे धातू सांपडतात. जिल्ह्याच्या पूर्व भागांत इरावती नदी हेंच दळणवळणाचें मुख्य साधन आहे.

तालुका—वरच्या ब्रह्मदेशांतील कठा जिल्ह्यांतील या नांवाचा तालुकाहि आहे. क्षे. फ. ११५२ चौरस मैल असून लो. सं. सुमारें तीस हजार. या तालुक्यांत ८२ खेडीं व कठा हें एकच शहर असून तें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या पांच हजार आहे.

**कठुमर**—(कटुंबर). राजपुताना, अलवार संस्थानांतील एक तहशील व शहर. हें ८०० वर्षांपूर्वी वसलेलें आहे. येथें एक किल्ला आहे. या तहशिलींत ७८ खेडीं आहेत. शेंकडा ९० वस्ती हिंदूंची आहे. १७७८ पासून १७८४ पर्यंत यावर मोंगलांचा प्रत्यक्ष ताबा असे. पुढें १७८४ मध्यें हें मराठ्यांनीं जिंकून येथें आपला अमल सुरू केला. पुढें कटुमर तहशील भरतपूरच्या महाराजास देण्यांत आली होती, परंतु त्यानें आपले इंग्रजांशीं झालेले करार मोडल्यामुळें १८०५ सालीं या तहशिलीचा ताबा अलवारकडे गेला.

**कडधान्यें**—ह्या वर्गांत द्विदल धान्यें येतात व त्यांत मुख्य पोषक द्रव्य प्रोत (प्रोटीड) असतें. कडधान्य फार पौष्टिक व शक्तिवर्धक असतें. मांस खाल्ल्यानें जें काम होतें तेंच काम कडधान्यें खाल्ल्यानें प्राण्याच्या शरीरांत बहुतेक घडून येतें. याच तत्त्वावर तृणधान्यें व कडधान्यें या दोहोंची खाण्याच्या धान्यांत आपल्या आर्य पूर्वजांनीं मोठी सांगड घालून ठेवली आहे. या वर्गांत कांहीं पिकांचीं खोडें अर्धवट वेलीसारखीं (उदा.—वाल, चवळी, मूग, कुळीथ, इ.) असतात व कांहींचीं (उदा., ताग, तूर, गवारी) खोडें ताठ उभीं राहतात. या झाडांच्या पानास तीन किंवा तिहींपेक्षां जास्त लहान पानें असतात. या सर्वांचें बीं शेंगांत येतें. या पिकांच्या मुळ्या जमिनींत खोल जातात, म्हणून जमिनीची मशागत, नांगरट, वगैरे खोल करावी लागते,

कडधान्याचीं झाडें हवेंतील नत्रवायु शोषून घेतात. हवेंतून नत्रवायु घेणारे अति सूक्ष्म जंतू यांच्या मुळ्यांवर ज्या लहान गोळ्या असतात त्यांत राहतात. या झाडांचीं मुळें जमिनींत राहिलीं म्हणजे त्यांतील नत्रवायु जमिनींत सांठून राहतो. हरभरा, लाख, मसूर, वाटाणा, हीं मुख्य रब्बींतील कडधान्यें होत. बाकीचीं खरिपांत करितात. कांहीं दोन्ही हंगामांतहि होतात. खरिपांतील कडधान्यें हीं ज्वारी, बाजरी, कोद्रा, नाचणी, वगैरे पिकांबरोबर मिसळून पेरतात. मूग, उडीद व कुळथी, ह्यांचा कडधान्यांतच समावेश होतो.

**कडान संस्थान**— मुंबई इलाखा, रेवाकांठांतील छोटें संस्थान. संस्थानचा इतिहास फारसा सांपडत नाहीं. भाटांच्या म्हणण्यावरून असें दिसतें कीं, पंचमहालांतील झालोड शहराचा संस्थापक जो जालमसिंग त्याचा एक लिमदेवजी नांवाचा वंशज सध्यांच्या संस्थानिकाचा मूळपुरुष होय. लिमदेवजीच्या वेळेपासून कडान स्वतंत्र आहे. सुंथ, डुंगरपूर व बालासिनोर यांशीं कडानच्या नेहमीं लढाया होत. या भागांतील हवा रोगट आहे; व सर्व प्रदेश डोंगराळ आहे. संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

कडान गांव हें संस्थानचें मुख्य ठिकाण आहे. येथील ठाकुराचा किल्ला किंवा राजवाडा एका निमुळत्या सुळक्यावर बांधलेला आहे.

**कडाप्पा**—मद्रास इलाख्यांतील जिल्ह्यांपैकीं अगदीं आग्नेयेकडील जिल्हा. क्षे. फ. ५९२३ चौरस मैल. तेलगू भाषेंत कडाप्पा याचा अर्थ 'दरवाजा' असा असून कडाप्पा गांव हें तिरुपति येथील पवित्र ठिकाणीं जाण्याचा दरवाजा असल्यामुळें यास हें नांव पडलें. याच्या पश्चिमेकडील चार तालुके म्हैसूरच्या पठारांत असून, जिल्ह्याच्या इतर भागांपेक्षां उंचावर आहेत. या दोन भागांच्या दरम्यान शेषाचलम् व पालकोंड हे डोंगर आहेत. पेन्नार ही या जिल्ह्यांतील मुख्य नदी पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहत जाऊन सोमसीलच्या खिंडींतून वेल्लोर जिल्ह्यांत शिरते. कडाप्पा गांवाच्या आसपासच्या भागांतील हवा मलेरियाची आहे; व उंचवट्याच्या बहुतेक भागाची हवा निरोगी व तकवा आणणारी आहे. येथील वार्षिक पावसाचें मान सरासरी २८ इंच आहे.

अकराव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत हा जिल्हा तंजावरच्या चोल राजांच्या ताब्यांत होता. चौदाव्या शतकांत विजयानगरकडे राहून त्याचा मोड झाल्यानंतर तो गोवळकोंड्याच्या कुतुबशाही सुलतानाकडे आला. टिपूच्या मरणानंतर उरलेला भागहि निजामास मिळाला व निजामाकडून मदतसैन्याच्या खर्चाकरितां सर्व जिल्हा १८०० त इंग्रजांस देण्यांत आला. गुर्मकोंडा व गंडिकोटा हे किल्ले जुने आहेत. पेन्नारच्या खोऱ्यांत ऐतिहासिक कालापूर्वीचीं दगडाचीं हत्यारें, जुनीं हिंदु नाणीं, वगैरे सांपडलीं आहेत. सोमपल्ले व कादिरी येथील हिंदु देवालयें प्रसिद्ध आहेत. कडाप्पा जिल्ह्याची लो. सं. (१९४१) १०,५६,५०७ आहे. पुरुषांची संख्या स्त्रियांपेक्षां जास्त आहे. तेलगू ही येथील मुख्य भाषा आहे. पण हिंदू–मुसलमानांच्या संकरापासून उत्पन्न झालेल्या दुदेकुलांची संख्या बरीच आहे. शें. ७१ लोकांची उपजीविका शेतकीवर अवलंबून असते. चोलम, कंबु व रागी हीं येथील मुख्य पिकें आहेत. यांशिवाय तांदूळ, कापूस, तंबाखू, ऊंस, वगैरे पिकेंहि होतात. या जिल्ह्यांत पुष्कळ तळीं आहेत, त्यांचाहि शेतांना चांगला उपयोग होतो. जिल्ह्यांतील कांहीं जंगलें बरींच मोठीं आहेत. पुलंपेठचे जरीचे कपडे प्रसिद्ध आहेत. प्रादेतूर येथें कापूस दाबण्याच्या दोन गिरण्या हंगामांत चालतात. प्रोदतूर, जम्मल मदुगु, वायलपाद, व पुलंपेठ हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत. कडाप्पा तालुक्याचें व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण जें कडाप्पा तें मद्रासहून रेल्वेनें १६१ मैल आहे व समुद्रसपाटीपासून ५०७ फूट उंच आहे. लो. सं. सु. पंचवीस हजार. पैकीं अर्धी लोकसंख्या मुसलमानांची असून हे लोक अगदीं निरक्षर व धर्मवेडे आहेत. सन १८०० मध्यें निजाम सरकारनें हा प्रदेश कंपनी सरकारास दिला. सन १८६८ मध्यें येथें छावणी ठेवण्यांत आली. येथें दगडाच्या खाणीहि बऱ्याच आहेत. हा दगड वेगळ्या प्रकारचा असतो.

**कडाळी**—हें इमारती लांकडाचें झाड आसाम, पूर्व बंगाल, चितागाँग, ब्रह्मदेश, छोटा नागपूर आणि हिंदुस्थानचा पश्चिम किनारा या भागांत सांपडतें. जहाजें, बोटी, गाड्या, वगैरे करण्याकडे या लांकडाचा उपयोग करतात. पाण्यांत या झाडाचें लांकूड फार वेळ टिकतें, पण जमिनींत मात्र तें लवकर कुजतें.

**कडिया**—कुंभाराची एक जात. ही गुजरातेंत आढळते. यांस विटा पाडणारे किंवा चुनारा म्हणजे चुनखडीवाले असेंहि म्हणतात. यांची संख्या सु. दहा हजार असून ते मुंबई इलाख्यांतच आढळतात. त्यांच्यापैकीं कांहीं गवंड्याचेंहि काम करतात. मुख्य विटा पाडणारास मेस्त्री म्हणतात. परनामी, स्वामीनारायण, रामानंदी व कबीरपंथी या पंथांचे हे लोक अनुयायी आहेत. हिंदूंचे उपासतापास व सणवार हे पाळतात. घटस्फोट, पुनर्विवाह रूढ आहेत. शिष्टमंडळी जातींतील भांडण-तंटे मिटवतात. मुसलमान कडिया फार थोडे आहेत व ते बहुतेक बाटलेले हिंदूच होत.

**कडी**— बडोदें संस्थानांतील एक प्रांत. क्षे. फ. ३,०५० चौ. मै.. गायकवाड राज्यांतील चार प्रांतांपैकीं सर्वांत जास्त उत्पन्नाचा हा प्रांत आहे. यांत साबरमती, सरस्वती आणि बाणा या नद्या प्रमुख होत. या प्रांतांतील बहुतेक जमीन

लागवडीखालीं आहे. बहुतेक सर्व प्रांत गायकवाड राज्यांतील अत्यंत निरोगी भाग म्हणून समजण्यांत येतो. लो. सं. (१९३१) ९,२४,८६६. या प्रांताचे १० तालुके अथवा महाल असून दोन पेटे आहेत. सुमारें शें. ८० एकर जमीन रेताड असून योग्य खत व पाण्याची सोय असल्यास या जमिनींत उत्तम पीक येतें. विहिरीच्या पाण्यावर येथील बागायती अवलंबून आहेत. येथील मुख्य पीक बाजरी, ज्वारी, गहूं, बंटी, वरी, कोद्रा, हरभरा व कडधान्यें हीं होत. कापसाचें व रेशमाचें सूत काढणें व सुती कापड विणणें हे या प्रांतांतील मुख्य धंदे होत. अबकारी उत्पन्न बरेंच आहे.

कडी हें तालुक्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. (१९३१) १३,४५५. इ. स. १९०४ पर्यंत हें कडी प्रांताचें मुख्य ठिकाण होतें. येथील किल्ला किंचित् उंचवट्याच्या प्रदेशावर असून लहानसाच आहे. येथें चीट चांगलें तयार होतें. जस्ताचीं व पितळेचीं भांडींसुद्धां येथें बनवितात. जस्ताच्या भांड्याची ठेवण विशेषतः पाणी थंड राहील अशी केलेली असते. दमाजी गायकवाडानें येथील बाबी लोकांना हांकून देऊन आपला मुलगा खंडेराव याला हा भाग जहागीर म्हणून दिला.

कँडी—हें शहर सिलोनमधील एका सरोवराच्या कांठीं आहे. याचें सिंहली नांव गलउदर असें आहे. त्याच्यासोंवतीं २००० पासून ४००० फूट उंचीचे पर्वत आहेत. १५९२-१७९८ पर्यंत सिलोनच्या राजाचें येथें वास्तव्य असे. येथें एका लहानशा सुंदर देवळांत बुद्धाचा दांत ठेवलेला आहे असें सांगतात. येथें चार हिंदु देवळें व दोन बौद्धांचे विहार आहेत. येथील लोक नांवाला बौद्ध पण खरेखुरे हिंदु आहेत. १६ व्या शतकांत हें शहर पोर्तुगीजांच्या व १७६३ पासून डच लोकांच्या ताब्यांत होतें, पण दोन्ही वेळीं तेथील राजांनीं परकीय सत्ता झुगारुन दिली. १८०३ मध्यें हें ठिकाण ब्रिटिशांच्या ताब्यांत आलें व १८१५ त बंडाळी झाल्यामुळें तेथील राजाला पदच्युत करुन ब्रिटिश सत्ता कायम करण्यांत आली. येथें पाणीपुरवठा व विजेची रोषणाई आहे. येथून नजीक रॉयल बोटॅनिकल गार्डन्स नांवाची बाग आहे. येथें पूर्वी ख्रिस्ती मिशनरी मंडळें धर्मप्रसाराचें काम जारीनें करीत. पाऊस सरासरीं ८० इंच पडतो. लो. सं. ३६,५४१ आहे.

कडू जिरें—काळें जिरें, कडू कारळीं हीं याचीं दुसरीं रुढ नांवें होत. याचें झाड सुमारें दोन-तीन हात उंच वाढतें. त्यास जीं बोंडें येतात त्यांत हें जिरें असतें. हें जिरें मूळचें दक्षिण युरोपांतील आहे. पण याची बियांकरितां हिंदुस्थानांत बरीच लागवड करतात. काळ्या जिऱ्यांतून दोन प्रकारचें तेल निघतें. पहिल्या प्रकारचें तेल काळें, सुवासिक आणि लवकर उडून जाणारें असतें. दुसऱ्या प्रकारचें तेल स्वच्छ, पांढरें व एरंडीच्या तेलाइतकें पातळ असतें. हें मसालेदार, वायुनाशक आणि पचन-क्रिया वाढविणारें असतें. आमटी, शिरका, वगैरे खाण्याच्या पदार्थांत हें टाकतात.

कडू निंब—हा वृक्ष फार मोठा होतो, व कर्नाटक, मुंबई इलाखा, मध्यप्रांत, वगैरे बहुतेक ठिकाणीं तो आढळतो. लांकूड इमारतीकरितां व इतर औद्योगिक दृष्टीनें उपयुक्त आहे. कडू-निंबाच्या सेवनानें अनेक व्याधी बऱ्या होतात म्हणून वर्षप्रति-पदेच्या दिवशीं या वृक्षाची कोवळीं पानें व फुलें मिरीं, सैंधव हिंग, जिरें, ओवा, चिंच व गूळ यांच्या मिश्रणाबरोबर शुचिर्भूत होऊन सर्वांनीं भक्षण करावीं असा निर्बंध आर्य शास्त्रकारांनीं घालून दिला आहे. या वृक्षाचीं नुसतीं पानेंच खाऊन कांहीं माणसें राहतात. याची छाया फार थंड व आरोग्यकारक असते. यास्तव देवालयें, धर्मशाळा, रस्ते, आदिकरुन सार्वजनिक ठिकाणीं हे वृक्ष फक्त छायेसाठीं व आरोग्यासाठीं लावितात. निंबाचा वृक्ष फार जुनाट झाला म्हणजे त्याच्या आंतील गाभ्यास शुद्ध चंदनाप्रमाणें सुवास येतो. या झाडाचें लांकूड इमारतीच्या कामास अतिशय उत्तम असून त्याच्या अंगच्या जास्त कडूपणा-मुळें त्याला कीड लागत नाहीं. झाडाची अगर मुळाची साल कडू, शक्तिवर्धक, स्तंभक आणि पाळीचे ताप नाहींसे करणारी आहे. तसेंच ती जंतुघ्नहि असल्यानें जखमा, वगैरे धुण्याकरितां सालीचा उपयोग करावा. पाळीचे ताप, विषमज्वर किंवा इतर ज्या तापांत ज्वरवेग अगदीं नाहींसा होऊन ताप पुनः भरतो अशा तापावर कडूनिंब फार गुणकारक होय. पानें चांगलीं बारीक वाटून त्यानें पोटीस तयार करावें. तें व्रणावर बांधलें असतां व्रण लवकर भरुन येतो. उत्तम जंतुघ्न असल्यानें कडू-निंबाच्या पंचांगांचा काढा तयार करुन त्यानें व्रण धुतल्यास लवकर भरुन येतो.

कडूनिंबाचें बीं नुसतें पाण्यांत वाटून अंगास लावल्यानें अंगावरील फोड, पुरळ, चकदळें नाहींशीं होतात. कडूनिंबाच्या बियांचें तेलहि अत्यंत उपयुक्त वस्तु होय. अंगावर फोड, खरुज, नायटे, अगर इतर भयंकर त्वग्रोग हें तेल लावल्यानें बरे होतात. कडूनिंबाच्या तेलाचा उपयोग महारोगावरहि उत्तम होतो. हें तेल अल्पप्रमाणांत पोटांत दिल्यासहि कुष्ठरोगांत उत्तम उपयोग होतो. मोठा उपयोग म्हणजे औषधी साबण करणें हा होय.

कडूर—म्हैसूर संस्थान, एक जिल्हा. सर्वांत जास्त डोंगराळ आहे. क्षे. फ. २,७८८ चौ. मै., पाऊस सरासरी १५० इंच. तुंगा व भद्रा या दोन नद्या या जिल्ह्यांतून वाहत जातात व कडूर गांवाजवळ त्यांचा संगम होतो. जिल्ह्याचें ठिकाण चिकमंगळूर आहे. तरीकेरे येथें अमृतेश्वराचें देऊळ १२ व्या

शतकांत बांधलेलें आहे. अंगडी येथें जुनीं जैन देवळें आहेत. शृंगेरी येथें शंकराचार्यांचा मठ व विद्याशंकर देऊळ चांगलें आहे. येथें कडधान्यांखेरीज महत्त्वाचीं पिकें, सुपारी व कॉफी हीं होत. वेलदोड्याचीं झाडें येथील जंगलांत होतात. पश्चिम भागांत उत्तम प्रतीचें जंगल आहे. कडूरजवळ कुरुंदाचा दगड पुष्कळ सांपडतो. तेल, पेंड, सुती कापड, बांगड्या, कांचेच्या बांगड्या येथें तयार होतात. येथून कॉफी, मिरीं, वेलदोडे व गळिताचीं धान्यें बाहेर रवाना होतात.

पाऊस २२ इंच पडतो. तंबाखू व नारळ यांची लागवड चांगली असून होरगीबेट्टा येथें लोखंड सांपडतें.

**कडूस**—मुंबई, पुणें जिल्हा. भीमेस येथून मिळणाऱ्या कमंडलू नदीवर खेडच्या वायव्येस ६ मैलांवर हें आहे. आठवड्याचा बाजार बुधवारीं भरतो. नदीकांठीं गांवाच्या पश्चिमेस सिद्धेश्वराचें देवालय आहे. तेथें चैत्र शु. दशमीस जत्रा भरते. लो. सं. ४,८०३.

**कंडेरा**—एक जात. कंडेरा यांची वस्ती मध्य हिंदुस्थान व राजपुताना यांत फार आहे. शोभेची किंवा आतषबाजी दारू तयार करून त्यानें निरनिराळे देखावे दाखविण्याचें काम करण्याचा धंदा हे लोक करतात. लो. सं. तीस हजार.

**कढणबिंदु**—(बॉइलिंग पॉइंट). ज्या उष्णतामानाला द्रवरूप पदार्थ वायुरूप होतात तें उष्णतामान. ज्या ठिकाणीं उष्णता दिलेली असते त्या ठिकाणीं द्रवाचें वायुरूप होत असल्यामुळें उकळ्या खालून वर आल्यासारख्या दिसतात; त्यांत एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, नवीन तयार होणाऱ्या वायूचा दाब बाहेरील हवेच्या दाबाइतका होतो तेव्हांच उकळ्या फुटून आंतील वाफ बाहेर येते. नेहमींच्या हवेच्या दाबाच्या वेळीं वायुरूप होण्याचें प्रत्येक द्रव पदार्थाचें एक विशिष्ट उष्णतामान असतें, व तें त्याच्या गुणधर्मांतलि प्रमुख अंगांपैकीं एक असून त्या पदार्थाची निश्चिति करतांना त्याचा उपयोग होतो.

**कणवाद**—(क्वान्टम थिअरी). जेव्हां न्यूटननें शोधून काढलेले यांत्रिक शक्तीचे नियम पदार्थविज्ञानशास्त्रांतील परमाणूस (ॲटमला) लावण्यांत येतात तेव्हां त्यांच्या क्रियेमध्यें कांहीं अडचणी आढळून येतात. त्यांचें निराकरण करण्यासाठीं ही नवीन कणवादाची उपपत्ति बसविण्यांत आली आहे. या उपपत्तीचे मुख्य विशेष हे आहेत कीं, किरणविसर्जक पदार्थांतून निघणारी विसर्जक शक्ति ही सतत निघत नसून अंतराअंतरानें निघत असते व ती ज्या अंतरांनीं बाहेर पडत असतें, त्यावर तिचें निश्चित प्रमाण अवलंबून असतें. हें अंतर आणि एच् हा स्थिरगुणक याच्या गुणकारास शक्तिकण असें म्हणतात. या स्थिरगुणकास प्लँकचा स्थिरगुणक असें म्हणतात. याची किंमत $६.५५ \times १०^{-२७}$ शक्तिसेकंद इतकी आहे. प्रकाश वैद्युतिक परिणाम, वगैरे कांहीं चमत्कारांची उपपत्ति लावण्यास ही उपपत्ति उपयोगी पडते. या उपपत्तीचा उपयोग प्रथम बोहर यानें द्रव्यांतील परमाणूंतील विद्युत्कणांची उपपत्ति लावण्याकरितां केला होता. आणि बोहरनें या उपपत्तीवरून काढलेले सिद्धान्त आणि वर्णपटावरून प्रत्यक्ष दिसून आलेले परिणाम यांमध्यें आश्चर्यकारक साम्य दिसून आलें व याचमुळे पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ आणि भौतिक रसायनशास्त्रज्ञ यांनीं या उपपत्तीचा स्वीकार केला.

**कणा** (पाठीचा)—सपृष्ठवंश प्राण्याच्या पाठीच्या हाडास कणा म्हणतात व त्याला कांट्यासारखे मणके असतात. लहान मुलांच्या पाठीच्या कण्यांत ३३ निरनिराळे मणके असतात. परंतु मोठ्या मनुष्याच्या कण्यांत फक्त २६ असतात. कारण त्यांतील कांहीं एकमेकांस जोडले जातात. या कण्याचा मुख्य भाग एका वाटोळ्या कडीसारखा असून त्याच्या बाहेरच्या बाजूस कमानीसारखा आकार असतो व त्यापासून निरनिराळे भाग पुढें आलेले असतात व त्यांस कांहीं खांचा असतात. त्यामुळें ते एकमेकांस जोडले जातात. जेव्हां पाठीचा सर्व कणा स्वाभाविक स्थितींत असतो तेव्हां या सर्व कड्या एकावर एक असतात आणि त्यांपासून जी पोकळ नळी तयार होते तीमध्यें पृष्ठवंशरज्जु असतो. या कण्याला जो रोग होण्याचा संभव असतो त्यास कणा वांकणें, अथवा पॅाटचा रोग म्हणतात. १० ते १५ वर्षांच्या वयांत पाठीच्या कण्यांत विकृति होण्याचा संभव असतो.

**कणाद**—वैशेषिक न्यायशास्त्राचा कर्ता. कणाद हें याचें खरें नांव नसून त्यानें कण(अणु)वादाचा जोरानें पुरस्कार केला, म्हणून त्याला कणाद, कणभक्ष किंवा कणभुज् (कण-खाणारा) अशा तऱ्हेचीं निंदाव्यंजक नांवें पडलीं. त्यानें वैशेपिक सूत्रें इ. स. २०० ते ४०० या दरम्यान रचलीं असावीत. या दर्शनांत दहा अध्याय व ३७० सूत्रें आहेत. विश्वांतलि सर्व पदार्थांचे द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष आणि समवाय असे सहा वर्ग पडतात; हेच सहा मुख्य पदार्थ आहेत, असें वैशेषिकांचें मत आहे. पदार्थांसच उद्देश म्हणतात. त्यांचीं लक्षणें व परीक्षा ग्रंथांत केली आहे. या सहा पदार्थांपैकीं 'विशेष' हा एक स्वतंत्र पदार्थ आहे, असें प्रतिपादिल्यावरून या मताच्या लोकांना 'वैशेपिक' हें नांव पडलें. द्रव्याचे परमाणू असतात, ही कल्पना प्रथम कणादानें काढली; तेव्हां वैशेपिक दर्शनांत प्रथमच परमाणुवादाची सुरवात झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**कण्व**—कश्यप कुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. याचा आश्रम मालिनी नदीतीरीं असे. यास जी एक कन्या सांपडली होती तिचें नांव यानें शकुन्तला असें ठेवलें होतें. कालिदासानें आपल्या शाकुंतल नाटकानें कण्वाला पुष्कळ प्रसिद्धि दिली.

**कण्व राजघराणें**—उत्तर हिंदुस्थानांत शुंगांचें घराणें खि. पू. ७२ च्या सुमारास नष्ट होऊन हें घराणें आलें. पण हें फार काळ टिकलें नाहीं. हें ब्राह्मण घराणें असून यांतील चार राजांनीं ४५ वर्षें राज्य केलें. शेवटचा राजा सुशर्मा राज्य करीत असतां आंध्रांनीं मगधावर स्वारी करून हें घराणें बुडविलें.

**कण्हेर**—एक फुलझाड. संस्कृतमध्यें करवीर म्हणतात. याला पांढरीं, तांबडीं, पिवळीं फुलें येतात. पांढरा कण्हेर औषधी असतो. सर्पादि विषावर मुळीचा लेप करतात; किंवा मूळ उगाळून पाजतात. हें झाड विषारी आहे.

**कंतुल**—[ वर्ग अमरिलिडासी-इं. अगेव्ह ]. याला अमेरिकन कोरफड म्हणतात. याचीं झाडें जरा मोठीं असून त्यांस मांसल पानें असतात व तीं टोंकदार असतात. यांस पुष्कळ वर्षांनीं फूल येतें. यांतील कांहीं जाती व्यापारीदृष्ट्या महत्त्वाच्या आहेत. कारण त्यांपासून बरेच पदार्थ मिळतात. याच्या पानांपासून व मुळांपासून वानस्पतिक रेशीम किंवा अमेरिकन ॲलो मिळतें. तसेंच याच्या एका जातीपासून घायपातीसारखा वाख मिळतो. याचा रस आंबविला असतां एक प्रकारचें बीर मद्य मिळतें.

**कत्तलखाना**—वेदकालापासून, शस्तृ व गोघात असे खाटिक वर्गाचे वाचक शब्द आढळतात. शस्तृ हा शब्द ऋग्वेदांत एक वेळ व अथर्ववेदांत एक वेळ आलेला आहे. गोघातांचा देखील उल्लेख पुरुषमेधांत आलेला आहे. अतिथि आला तर गाय, वगैरे मारावी व मधून मधून शूलगव करावा, असे विधी धर्म म्हणून आश्वलायनानें सांगितलेच आहेत. पशुवध गांवाबाहेर जाऊन करावा असें सूत्र आश्वलायन स्मरतो.

सांप्रत कत्तलखान्यांच्या बांधणीसंबंधीं आरोग्यविषयक कायद्याचीं कलमें आहेत. त्या जागेवर सपाट फरशी असावी; कत्तलींत माती, वगैरे उडूं नये, गुरांना जातांना अडथळा होऊं नये म्हणून विस्तीर्ण दरवाजे असावे; भिंतीला सीमेंट केलेलें असावें; पाणी भरपूर असावें; इ.

इंग्लंडमध्यें १८४८ च्या पब्लिक हेल्थ ॲक्ट या कायद्यानें असें ठरवलें कीं, स्थानिक स्वराज्यसंस्थांतील अधिकाऱ्यांनीं सार्वजनिक कत्तलखाने बांधावे. कत्तलखाना शहराबाहेर असावा, तेथें जाण्याला जनावरांना गर्दी होऊं नये इतके रुंद रस्ते असावे, आणि कत्तलखान्यांपर्यंत रेल्वेचा फांटा नेलेला असावा. जनावरांचा वध करण्याची खोली अशी असावी कीं, त्या खोलीकडे जाणाऱ्या जनावरांना त्या खोलींतील कत्तलकाम किंवा मरून पडलेलीं जनावरें दृष्टीस पडूं नयेत. कत्तल कोणत्या हत्यारानें कशी करावी म्हणजे ती कत्तल योग्य व अतिशय दयार्द्र रीतीची होईल, याबद्दल नीट चौकशी अलीकडे झाली असून, क्लिझ व इतर हत्यारांची शिफारस करण्यांत आली; तथापि कुऱ्हाडमारी ( पोल-ॲक्सिंग ) हीच वधपद्धति चांगल्या तज्ज्ञ इसमांनीं पसंत केली; व वधानंतर पाठीचा कणा काढून टाकावा, ही पद्धत योग्य होय. आपल्याकडील सरकारी कत्तलखान्यांतून अशीच व्यवस्था सुरू आहे.'

**कथला**—( मांज ). हा एक परोपजीवी जंतूपासून उत्पन्न होणारा चर्मरोग असून तो घोडे, गुरेंढोरें आणि कुत्रीं यांत होतो. हा रोग मेंढ्यास झाला असतां त्यास खरूज म्हणतात. हा रोग उत्पन्न करणारे दोन जातींचे जंतू असतात. जंतुघ्न औषधें वापरल्यानें व रोग झालेल्या प्राण्यास वेगळें ठेवल्यानें हा रोग बरा करतां येतो.

**कथील**—कथील हें एक धातुरूप रासायनिक मूलद्रव्य आहे. ओतीव कथलाचा रंग पांढरा असतो. परंतु त्यावर थोडीशी निळसर छटा असते. तें चकचकीत असून हवेंत मुळींच गंजत नाहीं. ओतीव कथलाचें विशिष्टगुरुत्व ७·२९ व वैद्युतिक रीतीनें तयार केलेल्या धातूचें ७·१४३ ते ७·१७८ पर्यंत असतें. लोखंडाच्या योगानें कथील कठिण व ठिसूळ बनतें. तांबें व शिसें यांच्या योगानें तिचा कठिणपणा व मजबुती हीं वाढतात; परंतु तिची घनवर्धनीयता कमी होते. २३०° श. ला कथील वितळतें व १६००° पासून १८००° श. पर्यंत उकळूं लागतें. त्याचा प्रसरणगुणक ( ०° ते १००° श. पर्यंत ) ०·००२७१७ व विशिष्ट उष्णता ०·०५६२ आहे. कथलाचें उष्णतावाहकत्व व विद्युत्वाहकत्व अनुक्रमें १४५ ते १५२ व ११४·५ ते १४०·१ आहे ( चांदीचें वाहकत्व १००० असतें ).

यास संस्कृतांत वंग व त्रपु, हिंदींत कलई, मलायांत तिमा, ब्रह्मदेशांत वये-पक्यू अशा तऱ्हेचीं नांवें आहेत. सर्व जगाच्या पाठीवर कथलाचा जेवढा खप होतो त्याच्या जवळजवळ अर्धें कथील संयुक्त मलाया संस्थानांतून येतें. या ठिकाणची कथलाची खनिज धातु ही मुख्यत्वेंकरून ओढ्यामधून सांठलेल्या कथलाच्या खनिज द्रव्यांचा सांठा होय. हल्लीं ब्रह्मदेशांतूनहि कथलाचा बराच पुरवठा होतो. हीं कथलाचीं उत्पत्तिस्थानें म्हटलीं म्हणजे मर्गूई आणि तवॉय या नांवाचे प्रांत होत. १९३९ सालीं सर्व जगांत १८९००० ( मेट्रिक ) टनाची उत्पत्ति झाली. युनायटेड किंगडम आणि मलाया हीं दोन प्रमुख उत्पत्तिस्थानें होत. या जगाच्या पाठीवर कथलाचा एकंदर पुरवठा जेवढा होतो

त्यापैकीं निम्याहून अधिक कथलाची उपज फक्त ब्रिटिश साम्राज्यांत होते.

कथलाचा पहिला उपयोग म्हटला म्हणजे भांडयास कल्हई करण्यास होतो. प्रस्तुत लोखंडाचीं मोठमोठीं भांडीं व छपरावर घालण्याचे पत्रे यांसहि कल्हई करण्यांत येते. शुद्ध कथलावर हवेचा परिणाम होऊन तें गंजत नाहीं. त्याप्रमाणेंच त्याजवर आम्ल द्रवाचा ( ॲसिड लिक्विड )-जसें आसव, लिंबाचा रस, चिंच, वगैरे यांचा परिणाम होत नाहीं. म्हणून मुसलमानांत स्वयंपाकांतील आणि घरकामांतील भांडीं कथलाचीं करितात. त्याशिवाय बाष्पीभवन करण्याचीं पात्रें ( इव्हॅपोरेटिंग बेसीन्स ), काढे उकळण्याचीं भांडीं ( इन्फ्यूजन पॉट्स ), इत्यादि अनेक उपकरणीं करण्याकडे कथलाचा उपयोग करितात. भांडीं, उपकरणीं, वगैरेशिवाय कथलाचे वर्खासारखे पातळ पत्रेहि करितात. त्यांचा उपयोग भिंगास चढविण्याच्या पाऱ्याऐवजीं करून आरसे करतात. दुसऱ्या जातीचे पत्रे असतात त्यांचा उपयोग तंबाखूचे चिरूट, साबूच्या वड्या, चॉकोलेटच्या वड्या, वगैरे गुंडाळण्याकडे करितात. कथलाचा उपयोग पुष्कळ प्रकारच्या मिश्र धातू ( अलॉय ) करण्याकडेहि होतो. जसें—निरनिराळ्या प्रकारचे कांसे ( ब्रॉंझ ) म्हणजे तोफांची धातु ( गनमेटल ), घंटेची धातु ( बेलमेटल ), इत्यादि; यांमध्यें कथील तांब्याशीं मिश्र केलेलें असतें. कथील आणि शिसें हीं एकत्र वितळवून त्यांपासूनहि एक प्रकारची मिश्रधातु करतात. या मिश्रधातूसहि मराठींत कांसें असें म्हणतात, परंतु इंग्रजींत यास प्युटर असें नांव आहे. यांत कथील चार भाग आणि शिसें एक भाग वितळविलेलें असतें. पुष्कळ प्रकारचे डाक तयार करण्याकडेहि कथलाचा उपयोग होतो. अंज ( ॲंटीमनी ) आणि कथील वितळवून तयार केलेल्या मिश्रधातूस 'ब्रिटानिया' धातु असें म्हणतात. या धातूचा उपयोग चमचे, पळ्या, वगैरे तयार करण्याकडे अतिशय होतो. 'क्वीन्स मेटल' ही कथील, शिसें आणि अंज धातु मिश्र करून तयार केलेली असते. डाकाच्या ( फ्यूजिबल- डाक लावण्याकरितां जलद वितळणारी धातु ) धातूमध्यें कथील आणि शिसें यांच्या मिश्र धातूचा उपयोग केलेला असतो. याशिवाय रंग देण्याच्या कामीं लागणारे निरनिराळे कथलाचे क्षार आणि इतर रासायनिक कला यांत कथलाचा उपयोग अतिशय होतो.

इतिहास— फार प्राचीन काळापासून कथलाची माहिती सांपडते. ऐतिहासिक कालापूर्वी हजारों वर्षें या धातूचा उपयोग कांसें ( ब्रॉंझ ) तयार करण्याकडे होत होता. मानवी जातीची उन्नति आणि कांसें यांचा फार निकट संबंध आहे. पाषाणयुगानंतर लोहयुगाचा आरंभ होण्यापूर्वी कांस्ययुगाचा आरंभ झाला. युरोपमध्यें इ. स. पूर्वी २००० ते १८०० च्या दरम्यान् कांस्ययुगाचा आरंभ झाला असावा असें पुष्कळ संशोधक पंडितांनीं निश्चित केलें आहे. स्वित्झर्लंड देशांत जीं सरोगृहें होतीं, त्यांत कथलाच्या पातळ पत्र्यांनीं मढविलेले कांहीं पदार्थ, मातीचीं भांडीं आणि मोगरे ( नॉब्स ) सांपडलेले आहेत. त्याचप्रमाणें श्लेस्विग हॉलस्टिनजवळील आमरूम बेटावरील प्राचीन कबरस्तानांत कथलाच्या निरनिराळ्या वस्तू सांपडलेल्या आहेत. ईजिप्त देशांत दहा भाग कथील असलेल्या कांस्याचा उपयोग बऱ्याच पूर्वकाळीं म्हणजे बाराव्या राजघराण्याच्या कारकीर्दींत निरनिराळ्या प्रकारचीं हत्यारें व इतर कामें यांकरितां करीत असत. तांबें आणि कथलि यांची मिश्र किंवा जोड धातु ही तांब्यापेक्षां अधिक कठिण असते, म्हणून तिचा उपयोग तलवारी, भाले आणि कुऱ्हाडी करण्याकरितां करीत असत. हिंदुस्थानांत वेदकालीं कथील माहीत होतें. सोनें आणि रुपें यांशिवाय कथलाचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत व शुक्ल यजुर्वेदांत आला आहे. उदाहरणार्थ, "सिसं च मे त्रपुश्च मे लोहं च मे" ( तै. सं. ४, ७, ५ ), त्याचप्रमाणें छांदोग्य उपनिषदामध्यें ( ४, १, ७७ ) कथलाचा उल्लेख आहे. उदाहरणार्थ—"लवणेन सुवर्णं संदध्यात सुवर्णेन रजतम्, रजतेन त्रपुं ( कथील ), त्रपुणा सीसम्, सीसेन लोहम्, लोहेन दारू, दारू चर्मणा।" फार प्राचीन काळीं हिंदुस्थानांत तांबें आणि कथील एकत्र वितळवून तयार केलेल्या कांस्याचा उपयोग माहीत होता. उदा., "यथा त्रपुस्ताम्रयोः संयोगे धात्वन्तरस्य कास्यस्योत्पत्तिः।" मनुसंहितेमध्यें घरांत उपयोगी पडणाऱ्या कथलापासून केलेल्या भांड्यांचा उल्लेख आलेला आहे. युरोपमधील प्राचीन पूर्वज ज्या कथलाचा उपयोग करीत असत, तें बहुतेक सर्व कथील फिनीशियन लोकांनीं कॅसिटेराइड्सकडून आणलेलें असे.

कथली पत्रा —( टिन प्लेट ) हा पत्रा लोखंडाचा पातळ पत्रा घेऊन त्यावर कथलाची अतिशय पातळ कल्हई देऊन तयार करण्यांत येतो. या पत्र्याचे निरनिराळे जिन्नस ठेवण्याकरितां डबे करण्यांत येतात. उदा., फळें, दूध, मांस, बिस्किटें, तंबाखू, पेट्रोल, वगैरे अनेक जातींचे पदार्थ या डब्यांत ठेवण्यांत येतात. वेल्सच्या दक्षिण भागांत, जर्मनींत व अमेरिकेंत असे डबे करण्याचा धंदा मोठ्या प्रमाणावर चालतो.

**कॅथेराइन** ( १७२९–१७९६ )— रशियाची एक महाराणी. हिचें नांव सोफिया आगस्टा फ्रेडरिका. हिला फ्रेंच शिक्षकिणीकडून शिक्षण मिळालें. रशियाचा मुगुट धारण करण्यास आवश्यक म्हणून तिनें रशियन भाषेचा अभ्यास केला व ग्रीक चर्च या ख्रिस्ती धर्मपंथाचा स्वीकार केला. १७४५ सालीं सेंट पीटर्सबर्ग येथें तिचा विवाह झाला. पण या विवाहानें तिला

सुख प्राप्त झालें नाहीं, कारण तिचा पति पीटर हा नीच, दुष्ट, दुर्व्यसनी व कुरूप होता, व रशियन लोकांचा द्वेष्टा होता. त्यामुळें तो कॅथेराइनचा द्वेष व अनेक प्रकारें छळ करी. त्यामुळें कॅथेराइनचें आचरण नीतिबाह्य झालें; तिचे अनेक इसम प्रियकर होते. १७६२ सालीं रशियाची महाराणी एलिझाबेथ मरण पावल्यावर पीटर गादीवर आला, परंतु तो रशियन लोकांना अप्रिय झाल्यामुळें त्याला पदच्युत करून लोकांनीं कॅथेराइनला महाराणी केलें. नंतर पीटर लवकर रोपशा येथें मरण पावला— त्याचा खून करण्यांत आला, असें म्हणतात.

कॅथेराइननें १७६२ ते १७९६ पर्यंत लोकप्रियता संपादून राज्य केलें. ती मोठी मुत्सद्दी होती. ती परोपकारी असून रशियन लोकांना सुसंस्कृत करण्याचा व देशाची उन्नति करण्याचा तिनें फार प्रयत्न केला. तिला लेखनकलेची फार आवड होती; तिनें फ्रेंच व रशियन भाषेंत कित्येक लेख व नाटकें लिहिलेलीं आहेत. व्होल्टेयर व इतर ज्ञानकोशकार यांना तिनें मोठमोठ्या देणग्या दिल्या, त्यामुळें त्यांनीं तिची फार स्तुति केली आहे. कलाकौशल्याच्या व अपूर्व वस्तूंच्या संग्रहासाठीं तिनें फार खर्च केला. परदेशच्या राजकारणांतहि तिनें लक्ष घालून शेजारच्या देशांकडून मानमान्यता मिळवून आपली वाहवा करून घेतली, यावरून तिचें कर्तृत्व दिसून येतें. इतर देश जिंकण्याचे तिनें अनेक बेत केले, पण सैन्याची चांगली व्यवस्था तिला ठेवतां आली नाहीं. हिंदुस्थानवर तिबेटमार्गें स्वारी करण्यासाठीं २०,००० सैन्य पाठवण्याचें तिनें ठरवलें होतें. पोलंडच्या दुसऱ्या फाळणींत तिनें भाग घेतला. ग्रीक साम्राज्याचें पुनरुज्जीवन करण्याचें तिच्या मनांत होतें, पण फ्रान्स, इंग्लंड, प्राशिया व ऑस्ट्रिया यांच्या विरोधामुळें तो बेत तिनें रहित केला.

**कॅथोलिक मंडळी**—ज्यांचा बाप्तिस्मा झालेला असतो व जे येशू ख्रिस्तावर विश्वास ठेवतात आणि सर्व आध्यात्मिक बाबतींत पोप हा येशू ख्रिस्ताचा या पृथ्वीवरील अधिकृत प्रतिनिधि आहे व त्याचा अधिकार अबाधित आहे असें मानतात त्यांस कॅथोलिक म्हणतात.

येशू ख्रिस्तानें आपल्यासभोंवतीं कांहीं प्रेषित गोळा केले आणि त्यांस आपलें कार्य या जगांत चालू ठेवण्यास पाठविलें. "मला स्वर्गांत आणि पृथ्वीवर सर्व अधिकार प्राप्त झाले आहेत. म्हणून तुम्ही जा आणि सर्व राष्ट्रांमध्यें शिष्यवर्ग निर्माण करा. व त्यांस पित्याच्या, पुत्राच्या आणि पवित्र आत्म्याच्या नांवानें बाप्तिस्मा द्या. मीं जें सर्व कांहीं तुम्हांस सांगितलें आहे तें त्यांस शिकवा. आणि पहा ( लक्षांत ठेवा ) मी नेहमीं तुमच्या सन्निध आहें आणि जगाच्या अन्तापर्यंत राहीन." ( मत्तय २८ : १८–२० ). "जो विश्वास ठेवील आणि बाप्तिस्मा घेईल त्याचें तारण होईल आणि जो विश्वास ठेवणार नाहीं त्याचें शासन होईल." ( मार्क १६ : १६ ).

यावरून कॅथोलिक मंडळीचें काम मुख्यतः पुढीलप्रमाणें आहे : ( १ ) ख्रिस्ताच्या प्रकटीकरणाची आणि विश्वास ठेवण्यास तारण होण्यास जें आवश्यक असेल त्याची शिकवण देणें. ही शिकवण देण्याचा अधिकार पोपचा आहे. ( २ ) विहित संस्कार करून आपले विधी, प्रार्थना व नैतिक शिकवण यांचें पावित्र्य राखणें. ( ३ ) मंडळीची जी शिस्त असेल तिला अनुसरून सर्व श्रद्धावान् लोकांचें पालन करणें.

कॅथोलिक मंडळीमध्यें इतर ख्रिस्ती मंडळींपेक्षां पुढील वैशिष्ट्यें असतात : ( १ ) ऐक्य : सर्व कॅथोलिक लोकांची श्रद्धा एकाच प्रकारची असते व ते सर्व त्यांचा दृश्य प्रमुख जो पोप त्याच्या सत्तेखालीं एकत्र होतात. कारण पोपला ख्रिस्तानें आपल्या मंडळीसंबंधीं सर्व अधिकार दिलेले आहेत. इतर सर्व मंडळ्या निरनिराळ्या शतकांत या मूळ मंडळीपासून विभक्त झालेल्या आहेत. ( २ ) मंडळीचें तत्त्व पवित्र आहे व तें पवित्र राखण्याकरितां मंडळी सर्व प्रकारचीं साधनें पुरविते व या मंडळीमध्यें आतांपर्यंत पुष्कळ उच्च प्रतीचे पवित्र पुरुष आणि स्त्रिया होऊन गेल्या. कांहीं कॅथोलिक व्यक्तिशः दुर्गुणी असले तरी त्यामुळें मंडळीच्या पावित्र्यास बाध येत नाहीं. ( ३ ) सर्वव्यापकता अथवा विश्वव्यापकता. ख्रिस्ताच्या काळापासून कॅथोलिक मंडळीचें अस्तित्व सर्व शतकांत आढळून येतें व त्या मंडळीनें सर्व राष्ट्रांस शिकवण दिली आहे व सत्याचें रक्षण केलें आहे. या मंडळीचें ध्येय सर्व मनुष्यजात आपल्या मंडळीमध्यें सामील करून घेण्याचें आहे. ( ४ ) प्रेषितत्व : ख्रिस्ताच्या प्रेषितांपासून परंपरेनें बिशपांमार्फत ही मंडळी सतत व अखंड चालत आलेली आहे आणि तेव्हांपासून तिनें आपलें कार्य चालू ठेवलें आहे.

**कंद**—कंद हा वास्तविक पानकळ्याचाच एक प्रकार आहे. हा जमिनीच्या वर अथवा खालीं झाडाच्या पृष्ठभागावर तयार होतो व त्यापासून मुळें निघतात. कळ्यांमध्यें मांसल भाग असतो किंवा संकेंद्रक थर असतात. यामध्यें भविष्यकाळीं उत्पन्न होणाऱ्या झाडाची प्रथमावस्था असते व त्याकरितां लागणारें अन्न असतें. कांदा, लसूण, वगैरे कंद होत.

**कदफिसेस**—१. कुजुलो कदफिसेस ( सन ४०–७८ )— युएची नांवाच्या चीनमधील एका फिरत्या टोळीस चरितार्थाच्या

अभावीं चीनची सरहद्द सोडून बाहेर पडावें लागलें. त्या टोळीचा कदफिसिस हा पुढारी हिंदुकुशाच्या दक्षिणेस उतरला. हा युद्धप्रिय असून यानें गांधार, काबूल व इराण यांपासून सिंधूपर्यंत राज्यें जिंकलीं. सन ४५–७० च्या दरम्यान यानें इंडो-पार्थियनांचा पराभव करून हिंदुस्थानची सरहद्द जिंकली व सन ५० मध्यें इंडो-ग्रीक राजा हरमॉइस यांजकडून काबूल प्रांत बळकावला. मरणसमयीं हा ८० वर्षांचा होता.

२. ओइमो कदफिसेस (सन ७८–१२०)— पहिल्या कदफिसेसचा हा मुलगा सन ७८ मध्यें आपल्या बापाच्या पश्चात् गादीवर आला. बापाप्रमाणेंच हा महत्त्वाकांक्षी असून यानें पंजाब, गंगानदीच्या जवळील बनारसपर्यंतचा प्रदेश व सिंधु नदीच्या मुखाजवळील प्रदेश मिळवले. सुभेदार नेमून प्रत्येक प्रांतावर हा राज्य करी. यानें आपल्या नांवाचीं तांब्याचीं व ब्राँझचीं नाणीं पाडलीं. याच वेळीं चीननें आपलें साम्राज्य रोमन साम्राज्यापर्यंत नेऊन भिडवलें. यास चीनच्या आधिपत्याखालीं राहणें न आवडून यानें चीनच्या पारिपत्यासाठीं ७,००० घोडेस्वार पाठवले. परंतु यांपैकीं कांहीं सैन्य पामीरच्या ताशघर खिंडींत हाल होऊन मरण पावलें व राहिलेलें चीनकडून मारलें गेलें. यानंतर चिनी साम्राज्याखालीं हिंदुस्थान व रोम आल्यानें या देशांत परस्पर व्यापार चालू झाला. कदफिसेस हा शिवभक्त असून सन १२० मध्यें मरण पावला.

**कदंब आणि कादंब**—हीं एकसारखीं नांवें धारण करणारीं तीन घराणीं होतीं. त्यांपैकीं पहिलें जास्त जुनें होतें; तें कदंब हें नांव धारण करीत असे व नंतरचीं दुसरीं दोन घराणीं कादंब या नांवानें ओळखलीं जात असत.

यांतील सर्वांत जुनें कदंब घराणें हें पलाशिका (बेळगांव जिल्ह्यांतील हळसी) येथें व उत्तर कानड्यांतील वैजयंती अथवा बनवासी येथें होतें. तें इ. स. च्या सहाव्या शतकाच्या सुमारास होऊन गेलें असावें.

बनवासी व हानगळ येथील कादंब हे वरील कदंबांचे वंशज नसावेत असें यांच्या नांवांतील फरकावरून दिसतें असें कांहींचें मत आहे.

गोंवें येथील कादंब—हें एक तिसरेंच कदंबांचें घराणें असून यांचा बनवासी येथील कादंबांशीं कांहीं संबंध असावा; यांनीं गोंवें व हळसी (पलाशिका) येथें राज्य केलें. यांच्यापैकीं षष्ठदेव (पहिला) व जयकेशिन् (पहिला) हे चालुक्यांचे (पश्चिम) मांडलिक होते.

पश्चिम चालुक्य पहिला सोमेश्वर याचा मांडलिक, गोंव्याचा कादंब पहिला जयकेशिन् हा श. ९७४ त राज्य करीत होता. यानें कापर्दिक द्वीपाच्या राजाला ठार मारिलें असें म्हणतात.

गोंव्याचा कादंब पहिला जयकेशिन् याच्यामागून राज्यावर बसलेला त्याचा मुलगा विजयादित्य अथवा पहिला विजयार्क या नांवाचा असून त्यानें चट्टलदेवी हिच्याशीं लग्न केलें (इ. स. १०८८).

शके १०२२–१०५२ मध्यें बनवासी आणि हानगळ या जिल्ह्यांचा कादंब अधिकारी जो शांतिवर्मन् त्याच्यामागून राज्यावर आलेला त्याचा मुलगा तैल अथवा दुसरा तैलप हा सहावा विक्रमादित्य आणि तिसरा सोमेश्वर या चालुक्य राजांच्या सार्वभौमत्वाखालीं राज्य करीत होता. विष्णुवर्धन् होयसळ यानें हानगळला वेढा दिला असतां अगर त्या वेढ्यानंतर शके १०५८ (इ. स. ११३५) सालीं तैलप मरण पावला असावा. त्याचे प्रांत कांहीं दिवसपर्यंत विष्णुवर्धनाच्या ताब्यांत गेले होते. पांड्य कुलांतील बाचलदेवी आणि चामलदेवी अशा दोन बायका तैल राजाला होत्या.

पश्चिम चालुक्य सहावा विक्रमादित्य याचा मांडलिक (गोंव्याचा कादंब) जो दुसरा जयकेशिन् तो या वेळीं गादीवर होता. शके १०४१–१०४८ त त्यानें चालुक्य घराण्याचें सार्वभौमत्वरूपी जूं झुगारून देण्याचा प्रयत्न केला; परंतु येलबुर्गेचा सिंद व आचुगीचा मुलगा पर्माडि यांनीं त्याला पळावयास लावलें. नंतर त्यानें विक्रमादित्याची मुलगी मैनलदेवी हिच्याशीं लग्न केलें.

तिसरा सोमेश्वर आणि दुसरा जगदेवमल्ल (१०५५-१०६७). या चालुक्य राजांच्या सार्वभौमत्वाखालीं पहिला मल्लिकार्जुन (त्रिभुवनवल्लभरस) कादंब, हा बनवासी आणि हानगल या प्रांतांवर सुभेदार होता. शके १०५५ मध्यें तो आपल्या बापाच्या मदतीनें राज्य करीत असावा व शके १०६० आणि १०६६ सालीं तो एकटाच राज्य करीत असावा असें दिसतें. शके १०७० त दुसरा जयकेशिन् याच्यामागून राज्यावर बसलेला त्याचा मुलगा पर्मार्डि अथवा परमर्दि शिवचित्त हा राज्य करीत होता.

शके ११०३–११२६ त चौथा सोमेश्वर चालुक्य याचा मांडलिक कामदेव अथवा कावदेव हा बनवासी, हानगळ आणि पुलिगर जिल्ह्यांवर राज्य करीत होता.

शके १११० त तिसरा जयकेशिन् हा त्याचा बाप दुसरा विजयादित्य याच्यामागून राज्यावर बसला. सौंदत्तीच्या रट्ट राजांनीं या गोंव्याच्या कादंबापासून बेळगांवसभोंवतालचा प्रांत जो जिंकून घेतला तो या तिसऱ्या जयकेशिन् याच्या कारकीर्दींत असावा.

यापुढें कादंब कुलांतील वीरमल्लिदेव अथवा मल्लिकार्जुन यानें बनवासी आणि हानगळ जिल्ह्यांवर राज्य करण्यास सुरवात

केली. शके ११६३ आणि ११७३ या सालच्या शिलालेखांवरून पाहतां तो स्वतंत्र असावा असें दिसतें.

शके ११६८ त (इसवी सन १२४६) दुसरा षष्ठदेव हा त्याचा बाप त्रिभुवनमल्ल याच्या मागून गादीवर बसला. षष्ठदेव हा त्याच्या (कादंब) घराण्यांतील अगदीं शेवटचा राजा असावा असें दिसतें. रट्ट आणि शिलाहार राजांनीं त्याचे प्रांत जिंकून घेतल्यामुळें त्याच्या हातांत फारच थोडी सत्ता राहिली होती. त्यानें इसवी सन १२५७ पर्यंत राज्य केलें.

**कदम, इंद्रोजी**—इंद्रोजी पहा.

**कदम, कंठाजी**—कंठाजी कदम बांडे हा पुणें जिल्ह्यांतील चांब्याच्या वडगांवचा राहणारा. ताराबाईच्या पदरीं दामाडे सेनापतीच्या हाताखालीं अमृतराव कदम हा एक मोठा शूर पुरुष होऊन गेला. याचाच तिसरा मुलगा कंठाजी कदम. हाहि बापाप्रमाणेंच शूर होता. याला पश्चिम खानदेशांत रनाळें, तोरखेड, कोपरली हीं गांवें पेशव्यांनीं इनाम दिलीं. इ. स. १७२४ मध्यें कंठाजी कदम यानें निजामचा काका, गुजरातचा नायब सुभेदार हमेदखान यास मदत करून गुजरातेंत चौथाई वसूल करण्याचा हक्क मिळवला. १७३१ सालीं कंठाजी कदम यानें आपला भाऊ रघोजी याच्यासह त्र्यंबकराव दाभाडे यास बाजीरावाविरुद्ध लढण्यास मदत केली; पण त्या लढाईत पहिलाच हल्ला आल्याबरोबर यानें आपल्या सैन्यासह समरांगणांतून पलायन केलें. या कंठाजीच्या पागेंतच प्रसिद्ध मल्हारराव होळकर हा अगदीं सामान्य शिलेदार होता. १७३४ सालीं मल्हारराव व कंठाजी यांनीं गुजरातेंत पालनपूर, अहमदाबाद, ईदर या प्रांतांवर हल्ला करून पुष्कळ लूट मिळविली. यापुढें कंठाजीचें नांव ऐकूं येत नाहीं. त्याला चित्रसिंग नांवाचा मुलगा होता. त्याचा वंश खानदेशांत वरील जहागीरगांवीं आहे.

**कंदाहार**— अफगाणिस्तानांतील एक प्रांत. कंदाहार शहराच्या दक्षिणेस रेजिस्तान नांवाचें एक अरण्य आहे. या प्रांतांतून कडेनई, तरणक, अरघस्तान, अरघंदाब, हेलमंड, हरुत आणि फरा रुड या नद्या वाहतात. येथें पूर्वी हिंदूंची वस्ती असून ते हिंदू ग्रीक लोकांस 'गांधार' या नांवानें माहीत होते. यावरूनच यास कंदाहार हें नांव पडलें आहे. परंतु हल्लीं या प्रांतांत दुराणी लोकांची वस्ती आहे. या भागांत पारसीवानांची (पार्शियन वंशांतील लोक) बरीच वस्ती असून खुद्द कंदाहार शहरांत चारपांचशें हिंदू आहेत. येथील हवा चांगली आहे. डोंगराळ प्रदेशांत हिंवाळा जरा कडकच असतो. प्रांताची राजधानी कंदाहार, हिरातपासून ३५४ मैल व काबूलहून ३१२ मैल आहे. या शहराभोंवतीं २४ फूट रुंद व २० फूट खोल असा एक खंदक असून २७ फूट उंचीची एक भिंत आहे. शहराच्या उत्तरेस बालेकिल्ला आहे. दक्षिणेस एक मोकळी जागा असून तीस तोफखाना असें नांव आहे. या शहरांत सुनी पंथाच्या सुमारें १८० मशिदी आहेत. यांपैकीं खिरका मुबारक ही प्रसिद्ध आहे. येथें शिया पंथांतील लोकांचीहि पुष्कळ वस्ती आहे. या शहराची लो. सं. सुमारें ६,००० असावी असा तर्क आहे. पारसीवान लोकांचाच भरणा जास्त आहे. येथील गंजांत गुरें, मेंढरें व धान्य यांचा बाजार प्रतिदिवशीं भरतो. पाणीपुरवठा अरघंदाब नदीपासून काढलेल्या कालव्यांपासून होतो. पाऊस फारच थोडा पडतो. फळफळावळीविषयीं कंदाहार प्रसिद्ध आहे. अप्रिकॉट, पीच, डाळिंबें, द्राक्षें, अंजीर, कलिंगडें, वगैरे फळें ताजीं व सुकविलेलीं बाहेर रवाना होतात. तंबाखूची लागवडहि पुष्कळ आहे. ही तंबाखू हिंदुस्थानांत येते. कंदाहारमध्यें हिंदु लोकांची वस्ती पुष्कळ असून त्यांपैकीं बरेच व्यापारी आहेत व ते फार श्रीमंत आहेत. ते सिंध प्रांतांत व मुंबई बंदराशीं व्यापार करतात. ते ब्रिटिश व हिंदी कारखान्यांतील माल आपल्याकडे नेऊन, हिंग, लोंकर सुकी फळफळावळ, तंबाखू, इत्यादि जिन्नस बाहेरदेशीं पाठवितात. येथें एक लोंकरीची गिरणी आहे.

**कंदियारो**—सिंध प्रांत, हैद्राबाद जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ३२२ चौ. मै., लो. सं. सुमारें पाऊण लाख. एकंदर खेडीं ६१. मुख्य पिकें—गहूं, ज्वारी, हरभरा. एकंदर जमिनीपैकीं ¾ जमिनीस कालवे व विहिरी यांचें पाणी मिळण्याची सोय आहे. कंदियारो तालुक्याचें मुख्य ठिकाण असून चसरत कालव्यावर आहे. लो. सं. सुमारें ५,००० आहे. येथील मुख्य धंदा शेतकीचा आहे. येथें एक धंदेशिक्षणाची शाळा आहे.

**कंदुकुर**—मद्रास, नेलोर जिल्ह्यांतील एक विभाग. यांत कंदुकुर व कणगिरी हे तालुके आणि दारसी आणि पोलिदी या तहशिली आहेत. तालुक्याचें क्षे. फ. ७८७ चौरस मैल. लो. सं. सुमारें दोन लाख. कुंदुकुर तालुक्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. १५,०००. येथें विष्णु व शिव यांचीं दोन फार प्राचीन देवळें आहेत.

**कद्रा**—(कदमा). लोकसंख्या सु. दोन लक्ष. हे लोक बरेचसे बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांत आहेत. टोपल्या व इतर बुरडाचें काम करणारी ही जात आहे. यांपैकीं कांहीं लोक मध्यप्रांतांत रायपूर व बालाघाट या जिल्ह्यांत आहेत. भंडारा जिल्ह्यांतील या जातीचे लोक ही गोंडांची एक शाखा आहे व गोंडी भाषेचेंच अपभ्रष्ट स्वरूप असलेली भाषा बोलतात. हे लोक फार अपवित्र समजले जातात.

**कद्रू**— प्राचेतस् दक्षाची कन्या व कश्यप ऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. ही सर्पांची माता असून हिला शेष, वासुकी,

तक्षक, वगैरे शंभर पुत्र होते. त्यांना काद्रवेय असें म्हणतात. सूर्यरथाचा अश्व श्याम आहे कीं गौर आहे, याविषयीं विनतेशीं हिचा वाद झाला होता. त्यांत हिनें आपला पक्ष कपटानें सिद्धीस नेऊन विनतेला आपल्या दास्यांत गुंतविलें होतें.

**कनकदास** (सु. १५५०)—एक कानडी कवि. हा धारवाड जिल्ह्यांतील बांड गांवचा राहणारा. पुढें कागिनेले येथें जाऊन राहिला. याच्या पदांच्या शेवटीं कागिनेले गांवाचा उल्लेख येतो. हा जातीनें अस्पृश्य होता व उडुपीच्या देवळामागें उभा राहून भजन करी तेव्हां देऊळ फिरलें अशी कथा आहे. मोहनतरंगिणी (कृष्णचरित्र), रामध्यानचरित्र, नळचरित्र, हरिभक्तिसार, इ. ग्रंथ व अनेक पदें यानें रचिलीं. हा वैष्णवपंथी होता.

**कनकफळ**--(जमालगोटा). हिंदुस्थानच्या बहुतेक सर्व भागांत याची लागवड होते. कॉफीच्या झाडांना सावली करण्याकरितां हीं झाडें लावितात. ह्याच्या फळापासून पुष्कळ तेल निघतें व तें औषधी असतें. ह्या झाडास जें बीं येतें त्यास जयपाळ किंवा जमालगोटा म्हणतात. हें दिसण्यांत एरंडीच्या बींसारखें असून फार विषारी असतें. विंचवाच्या विषावर व अर्धशिशीवर याचा उपयोग होतो.

**कनकमुनि**—हा चालू युगांतील चार बुद्धांपैकीं दुसरा होय. त्याच्या मागचा बुद्ध क्रकुछंद व पुढचे काश्यप आणि शाक्यमुनि हे होत. अशोकानें कनकमुनीच्या जन्मस्थानीं आपण गेल्याचें स्मारक म्हणून व कनकमुनीप्रीत्यर्थ उभारलेला स्तंभ हा पुराणवस्तुसंशोधकांना १८९९ त हिंदुस्थान व नेपाळ यांच्या सरहद्दीवर संशोधन करीत असतांना सांपडला. बौद्ध ग्रंथांतील गौतमाच्या मागील अनेक बुद्धांपैकीं कश्यप व कनकमुनि यांच्याविषयीं काय ती कांहीं ऐतिहासिक माहिती सांपडते.

**कनकसुंदर**— एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें हिंगूळ, मिरें, गंधक, टांकणखाराची लाही, पिंपळी, बचनाग व धोत्र्याचें बीं हीं असतात. भांगेच्या काढ्यांत खल करतात. वातप्रधान अतिसार, ग्रहणीचे विकार, अमांश होणें, शौचाला वारंवार जावें लागणें, मुरडा होणें, इत्यादि विकारांत हें औषध अतिशय उपयुक्त आहे. रोग नवीन असला तर या औषधाचा विशेष उपयोग होतो. दांत येतांना होणाऱ्या अतिसारावर हें एक चांगलें औषध आहे. हें ॥ ते १॥ गुंज मधांत किंवा ऊन पाण्याबरोबर देतात.

**कनकन**—लोकसंख्या सुमारें ७५,०००. मद्रास, कोचीन व म्हैसूर संस्थान यांतून हे लोक आढळतात. मासे धरणारे आणि नावाडी यांची आपणाकडील कोळ्यांप्रमाणें ही एक जात आहे. श्रेष्ठ वर्गांतील लोक यांचा विटाळ मानतात. कनकन शेतकी आणि मजुरी करतात. म्हैसूरमध्येंहि कोलार येथील सोन्याच्या खाणींत काम करणारे या जातीचे कांहीं थोडे लोक आहेत. हे तामीळ भाषा बोलतात व हिशेबाच्या कामांत हे फार निष्णात असतात.

**कनखल**—एक तीर्थस्थान. कनखल गांव हरिद्वारापासून दीड-दोन मैलांवर आहे. येथें दक्षप्रजापतीचें मोठें देऊळ आहे. नदीच्या तीरावर प्रसिद्ध कनखलतीर्थ आहे. कनखल गांवांत 'रामकृष्ण मिशन हॉस्पिटल' नांवाचा विवेकानंदांनीं चालू केलेला एक दवाखाना आहे.

**कॅनन व कॅननाइट**—या भूगोलविषयक व जातिविषयक संज्ञा अनेक निरनिराळ्या भागांना व लोकांना लावलेल्या आढळतात. कॅननाइट लोक फार देशांतर करीत. भूमध्यसमुद्रकिनारा, जॉर्डन नदीचें खोरें, फिनिशिया, फिलिस्टिया या प्रांतांतील लोकांना कॅननाइट म्हणत. जुन्या करारांत कॅनन हा हॅमच्या चार मुलांपैकीं एक होता असें आहे. कॅननाइट यांच्यामागून येणाऱ्या लोकांना बहुधा अमोराइट म्हणत असावे. अमोराइट हें नांव जुन्या करारांत कांहीं ठिकाणीं प्रामुख्यानें दिलें आहे. एल, बाल, अम्य, वगैरे देव यांच्यांत होते. कांहीं बाबीलोनी व ईजिती देवता कॅननाइट लोकांत आहेत.

**कॅनबेरा**—ही ऑस्ट्रेलिया संघराज्याची राजधानी आहे. हें शहर सिडनेपासून १९० मैल दूर असून त्या शहराची रचना अगदीं नवीन पद्धतीवर झाली आहे. १९२७ मध्यें फेडरल पार्लमेंटची पहिली बैठक या शहरांत झाली, त्या वेळीं ब्रिटनच्या बादशहांचे प्रतिनिधि म्हणून ड्यूक ऑफ यॉर्क यांच्या हस्तें हा उद्घाटन-समारंभ झाला.

संघराज्याचें पार्लमेंट येथें भरतें. येथें एक युनिव्हर्सिटी कॉलेज, एक टेक्निकल कॉलेज व कांहीं उच्च शिक्षणाच्या शाळा आहेत. एक नाविक शिक्षणाची चांगली संस्था आहे. लो. सं. २५,०००.

**कॅनरी पक्षी**—कॅनरी बेटांमध्यें आढळणारा हा एक गाणारा पक्षी आहे. तेथून हे पक्षी पंधराव्या शतकाच्या शेवटीं व सोळाव्या शतकाच्या आरंभीं युरोपमध्यें आणण्यांत आले. त्यांस पिंजऱ्यांत ठेवण्यांत येतें. परंतु अलीकडे यांत बराच संकर झाला आहे.

**कॅनरी बेटें**—हा द्वीपसमूह ॲटलांटिक महासागरांत आफ्रिकेच्या वायव्य किनाऱ्यानजीक ६० मैलांवर असून तो स्पेनच्या मालकीचा आहे. हीं बेटें एकंदर १३ असून त्यांपैकीं ७ मोठालीं आहेत. १९२७ सालीं या बेटांचे दोन प्रांत (ला पाल्मा व सान्ताक्रूझ द तेनेराईफ) केले. हीं सर्व बेटें ज्वालामुखीचीं, डोंगराळ आहेत. येथील मुख्य शिखर टेनेरीफ १२,१८२ फूट उंच आहे. सर्व बेटांचें मिळून क्षेत्रफळ ७,४९६ चौ. मैल आहे.

लो. सं. ६,८०,२९४. येथील हवा चांगली असून जमीन सुपीक आहे. म्हणून ह्या बेटांचें प्राचीन नांव 'फॉर्च्युनेट आयलंड्स'- (भाग्यशाली द्वीपसंघ) हें योग्य आहे. परंतु येथें गोडें पाणी फारसें नाहीं. येथें दारू चांगली होते आणि केळीं, बटाटे, टोमॅटो आणि दारू येथून निर्गत होतात. या बेटांची राजधानी सांताक्रूझ टेनेरीफ बेटांत आहे. अलीकडे विशेषतः हिंवाळ्यामध्यें पुष्कळ लोक या बेटांत सहलीला जातात आणि म्हणून येथें हॉटेलें व इतर करमणुकीचीं साधनें आहेत.

**कॅनिंग, चार्लस जॉन लॉर्ड**— हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. हा इंग्रज मुत्सद्दी १८४१ सालीं परराष्ट्रीय खात्यांत अंडर सेक्रेटरी ऑफ स्टेट नेमला गेला. आणि १८४६ मध्यें जंगलखात्याचा कमिशनर झाला. १८५३ मध्यें आबर्डीन मंत्रिमंडळांत आणि १८५५ मध्यें पामर्स्टनच्या हाताखालीं त्याला पोस्टमास्तर-जनरल नेमिलें. १८५६ मध्यें त्याला हिंदुस्थानांत गव्हर्नर जनरल नेमलें. १८५७ च्या बंडांत आरंभापासून अखेरपर्यंत त्यानें फारच शांतपणानें आणि अत्यंत हुशारीनें कारभार केला. तें बंड मोडल्यावर त्याला व्हाइसरॉय (राजप्रतिनिधि) नेमण्यांत आलें. याच्या कारकीर्दींत विश्वविद्यालयें व वरिष्ठ कोर्टें प्रांतांतून स्थापन झालीं, प्रांतिक कायदे मंडळें तयार झालीं व चलनी नोटा निघाल्या. परंतु प्रकृति फार खालावल्यामुळें तो लवकरच १८६२ मध्यें इंग्लंडांत परत गेला व त्याच सालीं मरण पावला.

**कॅनिंग, जॉर्ज** (१७७०-१८२७)—हा ब्रिटिश मुत्सद्दी १७९३ मध्यें प्रथम पिटनें पार्लमेंटमध्यें आणला. आणि १७९६ मध्यें तो अंडर सेक्रेटरी ऑफ स्टेट झाला. १७९७ मध्यें त्यानें कांहीं मित्रांच्या मदतीनें 'दि ॲन्टी जॅकोबिन्' सुरु केलें. त्यांत कॅनिंगच्या कांहीं कविता आणि लेख प्रसिद्ध झाले. १८०७ मध्यें त्याला परराष्ट्रीय खात्याचा सेक्रेटरी ऑफ स्टेट नेमलें. १८१४ मध्यें त्याला पोर्तुगालमध्यें परराष्ट्रमंत्री नेमिलें, व दोन वर्षें तो परदेशांत राहिला. १८२२ मध्यें ब्रिटिश मंत्रिमंडळांत त्याला फॉरिन सेक्रेटरी नेमिलें. १८२७ त प्रधान मंत्री म्हणून त्याची नेमणूक झाली. पण लवकरच तो मरण पावला. त्याच्या हयातींत जे महत्त्वाचे राजकीय प्रश्न उपस्थित झाले त्या वेळीं त्यानें टोरी पक्षाच्या बाजूनें जोरानें पुरस्कार केला.

**कनिंगहॅम, ॲलन** (१७८४-१८४२)— एक स्कॉटिश कवि व पंडित. त्यांनें लिहिलेले ग्रंथ म्हणजे 'सर मार्माड्यूक मॅक्स्वेल' हें नाटक; 'पॉल जोन्स', 'सर मायकेल स्कॉट' आणि 'लॉर्ड रोल्डन' या कादंबऱ्या; 'स्कॉटलंड गीतें', प्रमुख ब्रिटिश चित्रकार, शिल्पकार व मूर्तिकार यांचीं चरित्रें, इ. होत.

**कॅनिझारो, स्टॅनिस्लास** (१८२६- ? )— एक इटालियन रसायनशास्त्रज्ञ. १८४९ त पॅरिस येथील रसायनशाळेंत त्यानें प्रवेश करून घेतला. त्याच वेळेस आमोनिया व कर्बनत्र वायूचे हरिद यांच्या संयोगानें कर्बनत्राभिद त्यानें तयार केलें. पुढें तो अलेक्झांड्रिया येथें अध्यापक झाला. तेथें असतांना सेंद्रिय अल्डीहाइडचा मद्यार्क व अम्ल तयार होतो असा शोध त्यानें लावला. शिवाय अणुभारांक व परमाणुभारांक असा मूलद्रव्याच्या भारांकांत भेद केलाच पाहिजे असें त्यानें सिद्ध केलें. ज्या द्रव्याच्या वाफेचें विशिष्टगुरुत्व मोजतां येतें त्यांचा अणुभारांक कसा काढावा व ज्यांच्या वाफेचें विशिष्टगुरुत्व मोजतां येत नाहीं त्यांच्या विशिष्ट उष्णतेवरून त्यांचे अणुभारांक कसे काढावे हें त्यानें दाखविलें.

**कनिष्क** (१२५-१५३)— एक कुशान राजा. याच्या जन्मापूर्वी म्हणजे इसवी सनापूर्वीच्या पहिल्या शतकांत हिंदुस्थानच्या उत्तर सरहद्दीवर शक, युएची, व भारतीय पृथु या निरनिराळ्या लोकांची सत्ता होती, असें चिनी बखरींवरून दिसतें. या वरील राज्यांपैकीं कुशानांचें राज्य शेवटीं विजयी होऊन हिंदुस्थानच्या उत्तरेस त्यांनीं आपली सत्ता बसविली. यांच्यांत (चिनी बखरींप्रमाणें) किऊ त्सिऊ-किओ व येन्-कॉ-चेन हे बापलेक पराक्रमी होऊन गेले. यांपैकीं पहिला कनिष्क असावा असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. कनिष्क हा त्याच्या नाण्यावरील लेखांवरून कुशान प्रांताचा राजा होता हें ठरतें. अशोकानंतर तो बौद्ध धर्माचा मोठा पुरस्कर्ता असून तसाच मोठा बलाढ्य राजा होऊन गेला यांत शंका नाहीं. अशोकाच्या मरणानंतर लागलीच मगध प्रांताच्या वायव्य सरहद्दीच्या प्रांतांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें असावें व या आपसांतील भांडणाच्या काळांत ख्रि. पू. १६० च्या सुमारास ग्रीक लोकांनीं पुढें रेटलेले शक किंवा सिथियन लोक पुढें आले असावेत. मध्यंतरीं यू-एचींचे पांच संघ शकांच्या पाठोपाठ येऊन ख्रि. पू. १२० च्या सुमारास ते लोक बॅक्ट्रिया देशाचे राजे बनले. यानंतर सुमारें एक शतकानें कुशान नांवाची या संघांतली एक जात प्रबळ होऊन बसली. पुढें कुशान लोकांनीं हळूहळू हिंदुस्थानांत पाय पसरण्यास सुरवात केली. या विस्तृत राज्याची राजधानी तक्षशिला ही झाली. कनिष्काचें राज्य हिंदुस्थानांतल्यापेक्षां हिंदुस्थानाबाहेर जास्त होतें. त्यानें अनेक बुद्धदेवालयें बांधिलीं. त्याच्या शिलावर ग्रीको-रोमन छाप स्पष्ट दिसते. कुशान राजांच्या नांवाच्या याद्या सांपडतात त्यांवरून व नाण्यांवरून यांची वंशावळ बऱ्याच निश्चितपणानें बसवितां येते. बुद्धचरित्राचा कर्ता अश्वघोष हा कुशान वंशांतला प्रसिद्ध राजा जो कनिष्क त्याच्या वेळेस होता, हें आतां सर्वांना मान्य झालें आहे.

**कनीनिकादाह**— (इरिटिस). डोळ्यांतील कनीनिका (बाहुलीचा पडदा) सुजून आग होते त्यास हें नांव देतात. याच्यामुळें डोळ्यांची आग होऊन कपाळ दुखूं लागतें. डोळा लाल होतो व बुबुळ संकोचन पावतें. जखम, संधिवात, उपदंशरोग, क्षय व इतर सांसर्गिक रोग यांपासून हा दाह उत्पन्न होतो.

**कनेक्टिकट**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतलें पूर्वभागचें न्यू इंग्लंड गटापैकीं एक संस्थान. क्षेत्रफळ ५,००९ चौरस मैल. लो. सं. १७,०९,२४२. हें आरंभींच्या १३ संस्थानांपैकीं होय. हार्टफर्ड हें आरभाराचें मुख्य ठिकाण. कनेक्टिकट याच नांवाची नदी संस्थानच्या मध्यभागांतून दक्षिणेकडे वाहत जाते. कपडा, धातुकाम, चिनीमातीचीं भांडीं, घड्याळें, वगैरे अनेक प्रकारचे कारखाने आहेत. तंबाखूची पैदास दांडगी आहे. हार्टफर्ड येथें विमा कंपन्यांच्या कार्यालयांची इतकी गर्दी आहे कीं, त्यामुळें या शहराला 'अमेरिकेची विमा-राजधानी' म्हणूनच त्याला ओळखतात.

अगदीं प्रथम १७ व्या शतकाच्या सुरवातीस डच लोकांनीं येथें वसाहती केल्या. ते न्यूयॉर्क संस्थानांतून आले. त्यांच्या मागोमाग मॅसॅच्यूसेट्स संस्थानांतून इंग्लिश लोक आले व त्यांनींहि वसाहती केल्या. या १६३६ च्या सुमारास झाल्या. १६३९ मध्यें या संस्थानची घटना ठरविण्यांत आली. आरंभींच्या १३ संस्थानांतली ही अशा प्रकारची पहिलीच घटना होती.

**कनेत**—पंजाबमधील एक जात. लो. सं. सुमारें चार लाख. हे पंजाबमधील डोंगराळ मुलुखांतले मूळचे रहिवासी होत. ते मूळचे स्वतंत्र व शूर असत. ते शेतकीकडे दुर्लक्ष करून रात्रीं दरवडे घालीत असत. कनेत लोक हे आपणांस ब्राह्मण व रजपुत यांच्या मिश्र विवाहापासून उत्पन्न झालेले समजतात. हे आपलीं प्रेतें जाळतात. यांच्यांत काडीमोड व पुनर्विवाहहि आहेत. यांच्यामध्यें अशी चाल आहे कीं, चारपांच भावांपैकीं वडील भाऊ रीतीप्रमाणें एका मुलीशीं लग्न करतो व ती सर्व भावांची बायको होते.

**कनोज**—आजच्या सं. प्रांताला प्राचीन काळीं मध्यदेश म्हणत. हा प्रदेश म्हणजे गंगायमुनांचें खोरें. हें प्राचीन भारतीय सुधारणेचें केंद्र होतें. प्राचीन भारतीयांचा सांस्कृतिक विकास येथेंच झाला आणि येथूनच त्यांनीं भरतखंडाच्या उत्तर भागावर आपलें राज्य स्थापिलें. येथेंच पूर्वी यादवांचें राज्य होतें; पुढें त्यांना जरासंधानें हांकून दिलें. या प्रदेशाचें हवामान निरोगी असे. हा प्रांत फार सुपीक असल्यानें या लहान प्रदेशांत पूर्वीपासून अनेक राज्यें स्थापन होत होतीं. याच प्रांतांतील कनोज हें राजधानीचें शहर आहे.

गुप्तांचें साम्राज्य चालू असतां कनोज येथें पहिलें राज्य मौखरी या वंशानें स्थापन केलें. गुप्तांचें साम्राज्य दुसऱ्या कुमारगुप्ताच्या मृत्यूमुळें नाहींसें झाल्यानंतर हे मौखरी प्रबळ झाले. मौखरी वंश कनोजेस होता हें हर्षचरित्रावरून समजतें. मौखरी वंशाचीं बरींचशीं नाणीं सांपडलीं आहेत त्यांवरून त्यांचा काल दिलेला आहे. राज्यवर्धनाचा भाऊ हर्ष हा ठाणेश्वरास गादीवर बसला (स. ६०६). हर्ष हा यापुढें ठाणेश्वर सोडून कनोज येथेंच अखेरपर्यंत राहिला. कनोज ही त्या वेळीं हिंदुस्थानची राजधानी होती. हर्षानें कनोजेस बुद्धाच्या उत्सवाकरितां (स. ६४३) एक फार मोठी परिषद् भरविली होती. तिला ह्युएनत्संग स्वतः हजर होता. हिंदु व बौद्ध दोन्हीहि धर्म तेथें प्रचारांत होते. हर्षानंतर प्रत्येक सार्वभौमाला तीच राजधानी करावीशी वाटे. या कालांत या शहराचें ऐश्वर्य व संपत्तिहि वर्धिष्णु होती. ह्युएनत्संगाच्या वेळीं ५ मैल लांब आणि १ मैल रुंद असें हें तटबंदीचें शहर होतें. लोक रेशमी वस्त्रें वापरणारे श्रीमंत होते. कारागीर व विद्वान् लोकांचा भरणा शहरांत बराच होता. त्यांत रम्य उपवनें, हौद, पदार्थसंग्रहालयें होतीं. सातव्या शतकाच्या अखेरीस कनोजेस यशोवर्मा म्हणून राजा होऊन गेला. हा विद्वानांचा चहाता असून याच्या पदरीं भवभूति, वाक्पति, वगैरे कवी होते. यानें दिग्विजयहि केला. परंतु काश्मीरचा राजा मुक्तापीड व चालुक्य राजा यांनीं त्याचा मोड केला.

मिहिर भोज यानें जवळजवळ अर्धे शतकपर्यंत राज्य केलें. हा फार शूर होता. यानें राज्यविस्तार केला व स्वतः सम्राट् बनला. पंजाब, राजपुताना, संयुक्तप्रांत, ग्वाल्हेर इतक्या प्रदेशांवर त्याचें साम्राज्य होतें. या भोजानें स्वतःला आदिवराह हें बिरुद धारण केलें. वराहाचें चित्र काढलेलीं याचीं नाणीं उत्तर हिंदुस्थानांत पुष्कळ सांपडतात.

सुलतान महंमुदानें १०१९ च्या जानेवारीमध्यें खुद्द कनोजवरहि स्वारी केली. राज्यपालानें कनोज सोडून महंमुदाचें मांडलिकत्व पत्करलें. त्यामुळें राज्यांतील सारे हिंदू चिडले व त्याच्याविरुद्ध त्यांनीं बंड केलें. त्यांचा पुढारी चंदेलराजा विद्याधर हा होता. चंद्रदेव गहरवार यानें १०९० मध्यें कनोज घेऊन आपला वंश तेथें स्थापिला. या गहरवारास पुढें राठोड वंश असें नांव मिळालें.

तहशील— संयुक्तप्रांत, फरुक्काबाद जिल्ह्याची आग्नेयीकडील तहशील. क्षे. फ. १८० चौ. मैल. लो. सं. सुमारें सवा लाख. एकंदर खेडीं २११ आणि एक मोठें गांव. या तहशिलींतील कनोज हा प्राचीन गांव असून कुशस्थल, कौश, गाधिपुर आणि महोदय हीं कनोजचीं दुसरीं नांवें होत. या गांवाच्या तटाखालून एके काळीं गंगा नदी वाहत होती; परंतु हल्लीं तिचा ओघ दूर कांहीं मैल

अंतरावरून वाहत आहे. लो. सं. वीस हजार. या गांवाचा उल्लेख महाभारतांत येत नाहीं; तथापि रामायणांत दंतकथा आहे कीं, कुशनाभानें हें गांव वसविलें. वायुनामक ऋषीचा कुशनाभाच्या मुलींनीं तिरस्कार केला. तेव्हां त्यानें त्या सर्वांस पोंक येईल असा शाप दिला. त्यावरून या शहरास कान्य-कुब्ज असें नांव पडलें. ख्रिस्ती शकारंभीं टॉलेमी या गांवाचा कनोगिझ असा उल्लेख करतो. पांचव्या शतकांत हें गांव गुप्तांच्या राज्यांत मोडत होतें. नवव्या शतकाच्या उत्तरार्धांत रघुवंशी राजांची ही राजधानी होती. इ. स. ११९४ मध्यें महंमद घोरीनें शेवटचा राठोड राजा जयचंद याचा पराजय केला, व त्या वेळीं कनोजचें राज्यहि लयास गेलें! अकबराच्या कारकीर्दीत जेव्हां शांतता नांदूं लागली तेव्हां कनोज एका सरकाराचें मुख्य ठिकाण होतें, असें ऐनी-इ-अकबरीवरून दिसतें. आज गांव अगदीं लहान व पडीत आहे. येथील अत्तराचे कारखाने प्रसिद्ध आहेत.

**कनोजी ब्राह्मण**— वर्मे राजवटींत (कनोजचे) कनोजे ब्राह्मण हे सर्व उत्तर हिंदुस्थानांतील ब्राह्मणांत अग्रेसर गणले गेले. या वेळीं पंचगौड व पंचद्राविड असा ब्राह्मणभेद निश्चित झाला नसावा. कनोज्यांचें वर्चस्व यशोवर्म्याच्या वेळीं सुरू झालें तेव्हां कनोज येथील पांच ब्राह्मण व पांच कायस्थ यांना बंगाल्यांत बोलावून नेऊन तेथील आदिसूर नांवाच्या प्राचीन धर्माभिमानी राजानें त्यांची तेथें वसाहत करविली. हर्षाच्या वेळीं हे कनोजे निवृत्तमांस होते; परंतु या वेळीं पूर्वीप्रमाणें फिरून मांसाहारी झाले.

**कॅनोव्हा, ॲन्टोनिओ** (१७५७-१८२२)— एक इटालियन शिल्पकार. यानें १७८२ पासून पुतळे करण्यास सुरवात केली व अनेक प्रसिद्ध पुतळे तयार केले. (उदा०.-१. व्हीनस ॲंड ॲडोनिस, २. साइक ॲन्ड बटरफ्लाय, ३. हेबे, ४. दि प्युजिलीस्ट, ५. क्युपिड ॲंड साइक, इ.). १८०२ मध्यें त्याला नेपोलियन बोनापार्टनें आपला स्वतःचा मोठा पुतळा तयार करण्याकरितां पॅरिसला बोलाविलें. पुढील वयांत त्यानें मोठाले पुतळे बनविले ते- १. वॉशिंग्टन, २. व्हीनस रायझिंग फ्रॉम दि बाथ (ओलेती व्हीनस), ३. ग्रेसेस रायझिंग फ्रॉम दि बाथ (ओलेती ग्रेसेस), डान्सिग गर्ल (नर्तकी), ५ हेक्टर, ६ पारिस.

**कॅनोव्हास, डेलकस्टोल्लो ॲन्टानिओ** (१८२७-१८९७)— एक स्पॅनिश मुत्सद्दी. यानें आपलें प्राथमिक शिक्षण संपविल्यावर वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचा अभ्यास करण्याकरितां १८४५ सालीं तो मॅड्रिड येथें गेला. याच कालांत यानें आपली ऐतिहासिक कादंबरी व स्पेनचा ३ ऱ्या फिलिपपासून २ ऱ्या चार्लसपर्यंतचा उतरत्या काळाचा इतिहास असे दोन ग्रंथ प्रसिद्ध केले. याच वर्षीं हा स्पेन देशाच्या प्रतिनिधिसभेचा सभासद झाला. व्यापारात हा संरक्षक पद्धतीचा पुरस्कर्ता असून याचें परराष्ट्रीय धोरण जर्मनी व ऑस्ट्रिया यांच्याशीं मैत्री ठेवण्याचें होतें. हा चांगला मुत्सद्दी, विद्वान्, लेखक व वक्ता होता.

**कॅन्थाराइड**—फोड आणणारें एक औषधी द्रव्य. यांत स्पॅनिश फोड्या माशाचे वाळलेले पंख असतात. या द्रव्यांत कॅन्थारिडिन नांवाचें जहाल कामोद्दीपक असतें.

**कन्नड**—हैद्राबाद संस्थानांतलि औरंगाबाद जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ६८७ चौरस मैल. जहागिरी धरून लोकसंख्या सुमारें नऊ लक्ष. ह्या तालुक्यांतील १०४ खेड्यांपैकीं ६८ खेडीं जहागिरींत आहेत. शिवनदीच्या कांठीं कन्नड गांव आहे. लोकसंख्या ४,००० असून तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. याच्या उत्तरेच्या बाजूला घाटांतून खानदेशांत जाण्यास रस्ता आहे. येथील द्राक्षें, अंजीर, आंबे, इ. फळें प्रसिद्ध आहेत.

**कन्फ्यूशिअस** (खि. पू. ५५१-४७८)— (कुंगफ्युत्से). चीनमधील नीतिधर्म व राजधर्म यांचा मोठा संप्रदायप्रवर्तक.

त्याचें कुलनाम कुंग असून हें घराणें फार प्राचीन होतें. त्याचा बाप शुहलिआंग हा जिल्हाधिकारी असून धाडस व बल यांबद्दल प्रसिद्ध असे. कन्फ्यूशिअस लहान असतांनाच त्याचा बाप वारला. १९ व्या वर्षी लग्न होऊन त्यानें शिक्षकाचा धंदा पत्करला. तो संगीत विद्येंतहि प्रवीण होता. तो स्वभावतःच रुढमार्गवादी होता. प्राक्कालीन थोर मनुष्यांचें उत्तम उदाहरण व शिक्षण जपून ठेवून त्यांचा लोकांत प्रसार करणें, व त्याकरितां प्राचीन उच्च कोर्टांतले विद्वान् व राज्यकर्ते यांच्या प्राचीन व सर्वमान्य ग्रंथांच्या संपादनाचें काम करणें, हा त्यानें आपला जीवितोद्देश ठरवला. स्वतः उत्तम वर्तन ठेवून नैतिक दुर्वर्तन, जुल्म, अपराध या गोष्टींचा तो अतिशय तिटकारा करूं लागला. त्यानें स्वतंत्र एकहि ग्रंथ लिहिला नाहीं. पण इतिहास, काव्य, विधिपालन म्हणजे राजे व सरकारी अधिकारी व सामान्य लोक यांच्या आचरणाचे नियम, गायन व शकुनविद्या या पांच विषयांवरील ग्रंथांचा संग्रह व प्रसार त्यानें केला. त्यामुळें त्याची मानमान्यता फार वाढली. वयाच्या ५२ व्या वर्षी त्याला चुंगटू शहराचा न्यायाधीश नेमण्यांत आलें. त्याच्या कर्तबगारीनें लू संस्थानची भरभराट होऊन त्याचा कारभार लोकांना फार पसंत पडला. पण इतर अधिकारी त्याचा हेवा करूं लागले, म्हणून..

त्यानें तो अधिकार ५६ व्या वर्षी सोडला. इतर संस्थानांत राज्यकारभार मिळेल, अशी त्याला आशा होती; पण लोक जरी त्याचा आदरसत्कार करीत, तरी त्याच्या मताप्रमाणें चालण्यास कोणी तयार होईना. म्हणून ४८३ सालीं लूला परत येऊन आपल्या शिष्यांना उपदेश देत व वाङ्मयीन कार्य करीत त्यानें आपलें उरलेलें आयुष्य कंठिलें. त्याचें थडगें ही चीन देशांत अतिशय पवित्र जागा मानतात. तेथें कन्फ्यूशिअसचे वंशज राहतात, व तेथें असलेल्या प्राचीन वस्तूंचें संरक्षण करतात.

कन्फ्यूशिअसचें कार्य आपल्याकडील व्यासाच्या कार्यासारखें आहे. शू, शिह, यी व लिची या चार प्राचीन ग्रंथांवर त्याच्या संप्रदायाची उभारणी आहे. 'खन् खिऊ' हा इतिहास ग्रंथ त्यानें स्वतः लिहिला; व शू ग्रंथांतील 'लुन् यू' मध्यें त्याच्या म्हणी व संवाद दिले आहेत. त्यानें आपल्या संप्रदायांत ज्ञानाचें, विशेषतः निसर्गज्ञानाचें, संवर्धन हें आद्य तत्त्व गोंवून दिलें; कारण ज्ञानानें आत्मोन्नति होते व आत्मोन्नत मनुष्य साम्राज्य स्थिर करण्यांत भाग घेऊं शकतो. परोपकारशीलता, मनाची ऋजुता, वागणुकींत औचित्य, व्यावहारिक चाणाक्षपणा, व सद्धेतु हे पांच गुण कौटुंबिक व सामाजिक व्यवहारांत आवश्यक असून प्रतियोगी सहकारितेच्या तत्त्वावर वागल्यानें आयुष्य सुखमय होतें. घरांत किंवा राज्यांत नियमबाह्य वर्तन मुळींच होतां कामा नये. काव्यानें मोठालीं कृत्यें करण्यास स्फुरण येतें; संस्कारविधींनीं सरळ वर्तनाची संवय जडते; गायनानें चांगलें वातावरण उत्पन्न होऊन स्वभावाला ठाकठिकी येते, आणि धनुर्विद्या नैतिक शिस्त लावण्यास उपयोगी पडते. राजाला दैवी हक्क असतो, तसेंच प्रजेचेहि हक्क असतात. याप्रमाणें कन्फ्यूशिअसचा संप्रदाय राजा व प्रजा दोघांच्या हिताला पोषक असल्यामुळें त्याला अतिशय लोकप्रियता व सर्वमान्यता व राजमान्यताहि लाभली. सरकारी नोकरींत शिरण्यापूर्वी या विषयाची परीक्षा द्यावी लागे, इतकें सरकारी महत्त्व त्याला मिळालें. राज्यक्रांति होईपर्यंत कन्फ्यूशिअस धर्म हा राजधर्म होता. आज त्याचे अनुयायी २५ कोटींवर आहेत.

**कन्याकुमारी**—१. दुर्गेचें एक नांव. दक्षिण हिंदुस्थानांत हिची उपासना रूढ आहे.

२. (कामोरिन). मद्रास, त्रावणकोर संस्थान, अगस्तिस्वरम् तालुक्यांतील एक गांव, देवस्थान व भूशिर. हें हिंदुस्थान द्वीपकल्पाच्या दाक्षिणेकडील अगदीं अखेरचें टोंक आहे व येथून पश्चिम घाटांची रांग उत्तरेकडे गेली आहे. लोकसंख्या दोनतीन हजार आहे. समुद्रकांठीं कन्याम्मालेचें प्रसिद्ध देवालय आहे. पेरिप्लसमध्यें येथील एका बंदराचा उल्लेख आहे, पण हल्लीं तें नाहीं. साधारण जहाजें शहरापर्यंत येऊं शकतात.

**कन्यागत**—कन्या राशीस गुरु आला असतां त्या कालास कन्यागत असें म्हणतात. गुरु प्रत्येक राशींत तेरा महिने असतो. त्यामुळें कन्यागताचा काल तेरा महिने असतो व तेरा वर्षांनीं येतो. या कालांत भागीरथी नदी कृष्णा नदीस भेटावयास येते, असा समज आहे. या कालांत कृष्णा व भागीरथी यांच्यामधील स्थलांत विवाह, उपनयन, इत्यादि मंगलकार्यें करीत नाहींत. तसेंच काशीक्षेत्र, वगैरे ठिकाणीं गेल्यावर ज्याप्रमाणें क्षौर, श्राद्ध, गंगापूजन, वगैरे कृत्यें करतात त्याप्रमाणें कृष्णा नदीच्या कांठीं (विशेषतः वांईक्षेत्रीं) कन्यागतांत करण्याचा परिपाठ आहे.

**कॅन्यूट** (९९४-१०३५)—इंग्लंड व डेन्मार्क देशांचा हा राजा, आपल्या बापाच्या मरणानंतर १०१४ मध्यें इंग्लंडच्या गादीवर आला. एडमंड आयर्नसाइड मारला गेल्यावर हा सर्व इंग्लंड देशाचा राजा झाला (१०१७). हॅरोल्डच्या मरणानंतर १०१८ मध्यें डेन्मार्क देश ह्याच्या अमलाखालीं आला. १०२८ मध्यें त्यानें नॉर्वे देश जिंकला. आणि १०३१ मध्यें स्कॉटलंडच्या माल्कम राजानें याचें आधिपत्य मान्य केलें. स्वीडन देशावरहि यानें आपलें स्वामित्व स्थापिलें.

**कन्सस**—१. संस्थान—अमेरिका, सं. संस्थानांतील एक संस्थान. क्षे. फ. ८२,२७६. लो. सं. १८,०१,०२८. टोपेका हें राजधानीचें शहर आहे. या संस्थानांतील कन्सस शहराची लो. सं. १,२१,५४८ आहे. मका, गहूं व गवत हीं मुख्य पिकें होत. कोळशाच्या व तेलाच्या खाणी चांगल्या चालतात. कत्तलखाने व गिरण्या फार मोठ्या व किफायतशीर आहेत.

२. शहर—अमेरिका, मिसोरी संस्थानांतील जॅक्सन तालुक्यांतील एक शहर व बंदर. शहरांतील एकंदर लो. सं. ३,९९,१७४ असून इंग्लिश, जर्मन, इटालियन, स्वीडिश, वगैरे लोकांची वस्ती आहे.

**कपडवंज**—मुंबई, खेडा जिल्ह्यांतील एक तालुका व शहर. क्षे. फ. २७९ चौ. मैल व लो. सं. ११,४,४२०. शहर—हें बरेंच प्राचीन काळचें आहे. ५०० ते ८०० वर्षांचीं जुनाट घरें अद्याप येथें पाहावयास मिळतात. याचें जुनें नांव कर्पटपूर होतें असें म्हणतात. १९ व्या शतकांत या शहराची बरीच भरभराट होती. येथें साबण, कांच व लोणीं ठेवण्याच्या पिशव्या करीत असत. येथें सिद्धराज जयसिंहानें बांधलेला एक तलाव, चालुक्यांच्या शिल्पधर्तीवर बांधलेली कमान, विष्णु व महादेव यांचीं देवालयें, एक जैन मंदिर व व्होऱ्याच मशिदी व कचरी हीं पाहण्यासारखीं स्थलें आहेत. लोकसंख्या सुमारें पंधरा हजार.

**कंपतंतू**—(सिलिड). बहुतेक प्राण्यांच्या व कांहीं वनस्पतींच्या पेशींच्या पृष्ठभागावर आढळणारे मृदु केसासारखे तंतू. यांची लांबी १⁄२००० इंच असते. यांचें नेहमीं चलनवलन चाललेलें असतें. आणि त्यामुळें ते ज्या शरीराच्या द्रवाशीं संलग्न असतात त्यास एक प्रकारचें चलन उत्पन्न करतात. या गतीस कंपगति म्हणतात. चऱ्याचशा पाण्यांत राहणाऱ्या क्षुद्र प्राण्यांमध्यें श्वासोच्छ्वासाची क्रिया या तंतुजन्य कंपामुळें होते. कांहीं प्राण्यांची गतिहि या कंपामुळें उत्पन्न होते. कांहीं उच्च प्रकारच्या प्राण्यांमध्येंहि हे तंतू कांहीं महत्त्वाचें कार्य करतात.

**कॅंपबेल, थॉमस** (१७७७–१८४४)— एक स्कॉटिश कवि. १७९९ मध्यें त्यानें आपलें 'प्लेझर्स ऑफ होप' हें पुस्तक प्रसिद्ध केलें, व तो एकदम कीर्तिशिखराला पोंचला. त्याच पुस्तकांत आणखी उत्तम वीणाकाव्यें घालून त्या पुस्तकाची त्यानें दुसरी आवृत्ति काढली. त्यांत 'होहेनलिंडन' 'यी मॅरिनर्स ऑफ इंग्लंड' आणि 'एक्झाइल ऑफ एरिन' या सुप्रसिद्ध कविता आहेत. १८०९ मध्यें त्यानें 'गर्टिट्यूड ऑफ व्योमिंग', 'लॉर्ड युलिन्स डॉटर' आणि 'बॅटल ऑफ बाल्टिक' या कविता प्रसिद्ध केल्या. लंडन युनिव्हर्सिटी स्थापन करण्याच्या कामांत त्यानें भाग घेतला, व १८२७ मध्यें त्याची ग्लासगो युनिव्हर्सिटीचा रेक्टर या जागेवर निवड झाली होती.

**कपर्दिक भस्म**— कवडी भस्म. परिणाम शूलावर हें एक अतिशय उत्तम औषध आहे. पोट दुखणें, करपट ढेकर येणें, संग्रहणी असणें, आम्लपित्त, आमातिसार, जीर्णज्वर, पान्थरी वाढणें, इत्यादि लक्षणांवर याचा उत्तम उपयोग होतो. कानांतून पू येत असल्यास पोटांत हें औषध दिल्यानें स्राव थांबतो. ॥ ते २ गुंजा आल्याचा रस, लिंबाचा रस किंवा मध यांतून देतात.

**कंपली**— मद्रास इलाखा, बल्लारी जिल्हा, होसपेट तालुक्यांतील एक गांव. लोकसंख्या सु. आठ हजार. हल्लीं या गांवाचें महत्त्व कमी होत चाललें आहे. अकराव्या शतकांत ही चालुक्यांची राजधानी होती. येथें तुंगभद्रा नदीच्या कांठावर एक किल्ला असून तो पूर्वी भक्कम असावा असें दिसतें.

**कॅपाडोशिया**—हें प्राचीन भूगोलांत आशिया मायनरमधील एका मोठ्या जिल्ह्याला नांव दिलें होतें. या जिल्ह्यांत माउंट टॉरसपासून युक्राइनपर्यंतचा प्रदेश येत असे. कॅपाडोशियां हें नांव इराणी लोकांनीं दिलें होतें. या देशांत पूर्वी पुष्कळ ठिकाणीं देवालयें होतीं. यांत मोरी मेनीमधील कोमाना व व्हेनासा हीं देवळें प्रसिद्ध होत. हा प्रदेश घोडे व मेंढ्यांचे कळप या बाबतींत प्रसिद्ध होता.

कॅपाडोशियन लोक—हे लोक मूळचे सेमेटिक वंशांतले आहेत. हे मोठे शूर व लढवय्ये होते. त्यांची युद्धदेवता चंद्र ही होय. मा किंवा मेने ही त्या लोकांची दुसरी देवता होती. तिच्या देवालयांत पुष्कळ पुजारी आणि सेवक असत. या देवतेचा 'एक्झोडस' म्हणून मुख्य उत्सव होत असे. देवतेच्या पूजेकरितां जमलेले लोक स्वतःच्याच अंगाला जखमा करून घेत, आणि इंद्रियभोगविषयक सुखांत अतिशय मग्न असत.

**कपिल**— या नांवाच्या अनेक व्यक्ती होऊन गेल्या. त्यांपैकीं एक कर्दम प्रजापतीपासून देवहुतीस झालेला पुत्र. यास महामुनि असें म्हटलेलें असून याची सिद्धनामक देवांत गणना आहे. हा सांख्यशास्त्राचा प्रणेता होता, असें मानतात. यानें आपली माता देवहुति हिला ब्रह्मज्ञानाचा बोध केला होता. सगरपुत्र याच्याच कोपाग्नीनें भस्म झाले होते. कपिलाच्या नांवावर बरेच ग्रंथ मोडतात.

**कपिलर** (इ. स. ९०–१३०)— हा तामीळ ब्राह्मण कवि प्रसिद्ध कवयित्री अव्वयौर (पहा) हिचा भाऊ. चेर राजा अथन याच्यावर खुप होऊन त्यानें याला अनेक गांवें इनाम दिलीं. नंतर हा पारी राजाच्या दरबारीं राहून त्या राजाचा आवडता व जिवलग भाट बनला. पारी राजा वारल्यावर परमार रजपुतांच्या अग्निकुलांतील विच्छिककोन आणि हरुकोवेल या राजांकडे आश्रयार्थ गेला, पण आश्रय न मिळाल्यामुळें त्यानें आपल्या दोघी मुलींचीं लग्नें कशीं तरी लावून दिलीं व स्वतः अन्न वर्ज्य करून प्राणत्याग केला.' पेरुंककुरिंची' (डोंगरी लोकांची प्रेमकथा), 'इन्ननारपट्टु' (४० खंडपद्यें), 'ऐंक रू–नुरु' (१०० कविता), 'पथिरुप पट्ट' (चेरराजा अथनची प्रशंसा), वगैरे त्याचें काव्य फार गोड व लोकप्रिय आहे. तामीळ भाषेंतला तिरुवल्लुवर हा पहिल्या प्रतीचा व कपिलर हा दुसऱ्या प्रतीचा कवि असें मानलें जातें.

**कपिलवस्तु**—बुद्ध (गौतम शाक्यमुनि) याचें पिढीजाद ठिकाण म्हणून हें बौद्धपुराणांतून प्रसिद्ध आहे. या नगराचें बुद्धाच्या वेळचें वैभव व शुद्धोदन राजाचा तेथला अलौकिक दरबार यांचें वर्णन ललितविस्तारादि ग्रंथांत दिलें आहे. बुद्धचरित्रांत कपिलवस्तूला फारसें महत्त्व नसून त्याच्या पूर्वेस कांहीं मैलांवर असणाऱ्या लुंबिनी वनराईला आहे. बुद्धानंतर कपिलवस्तूला कधींच ऊर्जितावस्था आली नाहीं. कपिलवस्तु नक्की कोठें होतें, हें सांगणें कठिण आहे. रुम्मिन (लुंबिनी) देवीचें ठिकाण ब्रिटिश हद्दींतल्या बस्ती जिल्ह्यांतील दुल्हा गांवापासून सहा मैलांवर असलेल्या नेपाळी तराईत आहे.

**कपिल शैवाल**— (पिंगट शेवाळ). [ फिओफायसी ]. समुद्रावर तऱ्हेतऱ्हेची व विस्तृत प्रमाणावर आढळणारी एक शेवाळाचीच जात. हिचा रंग पिंगट किंवा पिंकट दिसत असतो, कारण तिच्या वर्णपेशीमध्यें हिरवें रंजक द्रव्य

(क्रोमोफिल) असून शिवाय लव्हाळ्यांत आढळणारें तांबडसर पिंगट रंगद्रव्यहि (फायकोफिन) असतें. समुद्रकिनाऱ्यावरील व उथळ पाण्यांतील बहुतेक लव्हाळे यांचेच बनलेले असतात. याची वाढ थंड समुद्रांत फार झपाट्यानें होते. यांपैकीं केल्प ही जात फार मोठी असते व एलोकार्पस ही अगदीं साधी असते. यांचे आणखीहि कांहीं प्रकार आहेत.

**कपिलाषष्ठी**— भाद्रपद महिन्यांतील वद्य षष्ठीच्या दिवशीं मंगळवार, व्यतिपात योग, रोहिणी नक्षत्र, इत्यादि योग जुळून आल्यास त्या षष्ठीला म्हणतात. या पंधरवड्यांत सूर्य हस्त नक्षत्रीं असेल, म्हणजे हस्त हें महानक्षत्र असेल तर तो योग विशेष श्रेष्ठ मानिला जातो. हें सूर्यपर्व असल्यामुळें याचा पर्वकाल दिवसांच मानितात. या पर्वाच्या दिवशीं हवन, दान, वगैरे कृत्यें करावयाचीं असतात. कपिलाषष्ठी हें पर्व फार क्वचित् येतें, यामुळें एखादी न घडणारी गोष्ट अवचित घडून आल्यास तिला 'कपिलाषष्ठीचा योग' असें म्हणण्याचा वाक्प्रचार पडला आहे.

**कॅपुआ** – हें प्राचीन कॅंपेनिआचें मुख्य शहर असून कॅंपेनिअन मैदानाच्या ईशान्य सरहद्दीवर निओपोलिसच्या उत्तरेस १६ मैलांवर आहे. केटोच्या मताप्रमाणें हें इ. स. पूर्वी २६० मध्यें इट्रुस्कन लोकांनीं वसविलें असावें. दुसऱ्या प्युनिक युद्धाच्या वेळेस कॅपुआ शहर बरेंच भरभराटीस आलें होतें. त्या वेळेस येथें ३०,००० पायदळ आणि ४,००० घोडेस्वार सैन्य होतें. मसाला, दारू आणि गुलाब ह्यांकरितां हें शहर फार प्रसिद्ध आहे. येथें ब्रॉन्झ धातूचें सामान तयार होतें. येथील लोकांना कुस्त्या खेळण्याचा फार शोक आहे. कॉन्स्टन्टाइनच्या कारकीर्दींत येथें एक प्रार्थनामंदिर बांधलें गेलें. कॅपुआ येथें एक ज्युपिटरचें मंदिर असून एक अर्धचंद्राकृति नाटकगृह आहे.

**कपुरथळा**—पंजाबांतील एक संस्थान. एकंदर क्षे. फ. ६५२ चौ. मैल. व लो. सं. ३,७८,३८०. हवा बहुतेक चांगली आहे. संस्थानांत ६३० खेडीं व ३ मोठीं गांवें आहेत. लोकसंख्येपैकीं शें. ६० मुसलमान, २२ हिंदू व २० शीख आहेत. संस्थानचें उत्पन्न सुमारें ३५ लक्ष रु. आहे. संस्थानिक रजपूत शीख असून सध्यां सर जगत्सिंग बहादूर गादीवर आहेत. हे राष्ट्रसंघाचे तीन वेळां प्रतिनिधि होते. यांनीं संस्थानचें लष्करी बल चांगलें वाढविलें. संस्थानांत साखरेचे कारखाने आहेत. येथील जाजमें, पडदे व टेबलावर घालण्याचें कापड युरोपांत पाठविण्यांत येतें. गहूं, तंबाखू व साखर येथून बाहेर पाठविण्यांत येतात. आतां संस्थान पूर्व-पंजाब संघांत सामील झालें आहे.

गांव—कपुरथळा संस्थानची राजधानी. हें सध्यांच्या राजाच्या पूर्वजानें म्हणजे राणा कपूर यानें वसविलें. येथें म्युनिसिपालिटी, रणधीर कॉलेज, कांहीं शाळा, व्हिक्टोरिया ज्युबिली हॉस्पिटल यांसारख्या संस्था आहेत. नवा राजवाडा प्रेक्षणीय आहे. लो. सं. सुमारें वीस हजार आहे.

**कॅपो, जॉन ॲन्टनी** (१७७६-१८३१)— एक ग्रीक मुत्सद्दी व ग्रीक लोकराज्याचा अध्यक्ष. त्याचा बाप मोठा वजनदार सनातनी गृहस्थ होता. प्रथम कॅपोनें वैद्यकीचा धंदा केला, पण १८०० त तो कायदे-कौन्सिलचा सेक्रेटरी व १८०७ सालीं जादा लष्करी गव्हर्नर झाला. या वेळीं त्याची ग्रीक स्वातंत्र्यवादी पुढाऱ्यांशीं ओळख झाली. ग्रीसच्या स्वातंत्र्याला मदत व्हावी म्हणून १८११ पासून परराष्ट्रखात्यांत नोकरी केली. १८२२ सालीं ती नोकरी सोडून ग्रीक स्वातंत्र्ययुद्धांत लक्ष घातलें. १८२७ त ग्रीकांनीं स्वातंत्र्य मिळवून लोकराज्य स्थापल्यावर कॅपोला अध्यक्ष नेमलें. त्याची कारकीर्द यशस्वी झाली. राज्यकारभारी मंडळांत त्यानें लायक सुशिक्षित ग्रीक लोकांच्या नेमणुका केल्या. पण त्यामुळें स्वातंत्र्ययुद्धांत लढलेले रणमस्त सरदार नाखुष होऊन त्यांनीं बंड उभारलें, तेव्हां त्यांचा पुढारी पेट्रोबी याला १८३१ सालीं कैद करण्यांत आलें. त्याचा सूड म्हणून पेट्रोबीचा भाऊ कान्स्टंटाइन यानें कॅपो चर्चमध्यें जात असतां त्याच्यावर गोळी झाडली, व कॅपो खालीं पडल्यावर पेट्रोबीचा पुत्र जॉर्ज यानें उरांत खंजीर खुपसून कॅपोचा प्राण घेतला.

**कॅप्टन**—(कप्तान) एक सैन्यांतील हुद्दा. हा पायदळांतील कंपनीचा मुख्य किंवा घोडदळांतील स्क्वॉड्रनचा दुय्यम अधिकारी किंवा तोफखान्यांतील सहा तोफांच्या बॅटरीचा दुय्यम अधिकारी यास लावतात. १९१४ मध्यें डबल कंपनीची पद्धति अमलांत आल्यापासून कंपनीच्या मुख्यास मेजर किंवा माउंटेड कॅप्टन (स्वारकप्तान) म्हणूं लागले व कंपनीवरील दुय्यम अधिकारीहि कप्तान ठेवण्यांत येऊं लागला. आरमारांतील जहाजाच्या मुख्यासहि कप्तान म्हणतात. हा कमांडरच्या वरच्या हुद्याचा अधिकारी असतो. सैन्यांतील कप्तान लेफ्टनंट कर्नलच्या हुद्याचा असतो व तीन वर्षांनीं कर्नल होतो. व्यापारी गलबताच्या मुख्यासहि कप्तान म्हणतात.

**कप्पी**— (पुली). एखाद्या दांड्यावर एक वाटोळें चाक बसविलेलें असतें. हें चाक त्या दांड्याशीं संकेंद्रक असतें आणि तें पट्ट्याच्या साहाय्यानें फिरविलें जातें. अशा चाकास कप्पी म्हणतात. ही बहुधा बिडाची किंवा पोलादी अथवा लांकडाची केलेली असते. जेव्हां या कप्पीवरून पट्ट्यामुळें गति उत्पन्न होते, तेव्हां या कप्पीच्या दोन्ही बाजूंवर पट्ट्यामुळें उत्पन्न होणाऱ्या ताणामध्यें बरेंच अंतर असतें.

कॅप्रीव्ही (१८३१-१८९९)—(काउंट फॉन कॅप्रीव्ही डी कॅप्रेराडी मॉटेक्यूकोली जॉर्ज लिओ) हा जर्मनींतील प्रसिद्ध वीर व मुत्सद्दी शार्लोटेनबर्ग येथें जन्मला. शिक्षण बर्लिन येथें झाल्यावर १८४९ सालीं लष्करांत शिरून बढती होत होत १८८३ सालीं आरमाराचा मुख्य झाला. १८९० सालीं बिस्मार्कनंतर मुख्य मंत्री झाला. आफ्रिकेंतील वसाहतींचा इंग्रज-जर्मनांमधील तंटा त्यानें सामोपचारानें मिटवला. त्यानें परदेशी राजकारण व व्यापारी धोरण चांगलें सांभाळून देशाचा फायदा केला. कॅप्रीव्हीनें अनेक कायद्यांच्या सुधारणा केल्या, पण त्यामुळें शेतकरीवर्ग नाखुष झाला, व त्यामुळें बादशहानें त्याला १८८४ सालीं बडतर्फ केलें. हा आमरण अविवाहित होता. अखेरचे दिवस त्यानें एकान्तांत काढले.

कफ— हा शरीरांतील तीन (कफ-वात-पित्त) दोषांपैकीं एक दोष आहे. शरीरास स्थैर्य आणणें, तें स्निग्ध राखणें, शरीराचे सांधे एकमेकांपासून वेगळे न होऊं देणें, शरीर थंड राखणें, क्षमादि मनाचे गुण असणें या सर्व गोष्टी कफामुळें होऊन शरीराचें रक्षण होतें. ऊर, जिह्वा, डोकें, आमाशय व सांधे या ठिकाणीं असलेल्या कफाच्या विशिष्ट कार्यावरून त्याचे मुख्य पांच प्रकार मानतात. पोटांत जें अन्न जातें त्यांत कफ मिसळला म्हणजे त्याच्या द्रवणामुळें तें अन्न मऊ होऊन विरघळतें. कफाच्या द्रवानें अन्नाचे घन भाग वेगवेगळे होतात व तसें झालें म्हणजे अन्नाचा रस होण्यास मदत होते. उरांत असलेल्या कफानें मानेच्या खालील भागाचे मणके व दोन बाहू हे एकमेकांस जोडल्यामुळें जें त्रिग (तीन हाडांचा सांधा) होतें, त्यास हालचाल करण्याचें सामर्थ्य येतें. उरांतील कफाचें दुसरें कार्य हृदयास शक्ति देण्याचें आहे. जीभ व कंठ यांत असलेल्या कफामुळेंच चव समजते. यास बोधक कफ म्हणतात. डोक्यांत जो कफ आहे त्याचें काम इंद्रियांना (घ्राण, रसना, नेत्र) स्निग्ध ठेवण्याचें व त्यांस प्रसन्न राखण्याचें आहे व यामुळेंच त्यास तर्पक कफ म्हणतात. विकृत कफाचे दोन प्रकार आहेत: एक वाढलेला व दुसरा कमी झालेला. वाढलेला कफ दुसऱ्या दोषाच्या स्थानांत जाऊन तेथें त्रास देऊं लागला म्हणजेच कफाच्या व्याधी होतात. शेकणें, रेचन, व्यायाम; तिखट, कडू व तुरट रसांचें सेवन; तीक्ष्ण, उष्ण व रूक्ष गुणाचे पदार्थ खाणें, इत्यादिकांनीं कफविकार बरे होतात.

कफस्रावी ग्रंथी—(पिचुइटरी बॉडी). मेंदूच्या खालच्या बाजूस असलेली ही एक लहान ग्रंथि असते. या ग्रंथीस प्रग्रहनलिका जोडलेली नसते. हिच्या मागील भागाची वाढ झाली असतां एक प्रकारचा रोग होतो व त्यामुळें चेहऱ्याच्या अस्थींची प्रमाणाबाहेर वाढ होते.

कफक्षय—क्षय हा फुप्फुसांत होणारा रोग आहे. याचे तीन प्रकार असतात: १. तीव्र क्षय-यास धांवता क्षय असेंहि म्हणतात. हा यौवनावस्थेंत अधिक होतो. हा सामान्यतः फुप्फुसदाहाच्या स्वरूपाचा असतो, पण अधिक काळ घेतो. २. गळवापासून होणारा क्षय-या रोगांत फुप्फुसामध्यें चिवाड झाल्यामुळें गळवें होऊं लागून तीं नरम होतात व क्षय होतो. हा रोग हळूहळू वाढीस लागतो व याचे प्रकार अनेक आहेत. हा बहुधा फुप्फुसावरणदाहापासून उत्पन्न होतो. प्रथम फुप्फुसांतून रक्तस्राव होऊन नंतर या रोगाचा फुप्फुसामध्यें जलद प्रसार होतो. अनेक रोगांमध्यें हा कफापासून उत्पन्न होतो व धुळीची बाधा झाल्यानें हा कफ उत्पन्न झालेला असतो. ३. फुप्फुसामोंवतीं एक प्रकारची दाट अशी तंतूंची वाढ होते. अशा वेळीं कदाचित् रोग दबला जाऊन मनुष्य बरींच वर्षें जिवंत राहण्याचा संभव असतो. या रोगाचा प्रतिबंध करण्याकरितां अनेक उपाय करण्यांत येत असतात: १. लोकांस शिक्षण देणें, २. रोगाची माहिती जाहीर करणें, ३. घरांची सुधारणा करणें, ४. थुंकण्यासंबंधीं व इतर संसर्गासंबंधीं कायदे व तपासणी करणें. ५. आरोग्याश्रम व दवाखाने स्थापन करणें. क्षयरोग्यांची थुंकी नष्ट करण्यासंबंधीं काळजी घेणें जरूर आहे; कारण यापासूनच या रोगाचा प्रसार फार होतो. आरोग्याश्रमामध्यें प्राथमिक अवस्थेंतील रोग्यास उपचार करण्यांत येतात व त्याचा पुष्कळच उपयोग होतो. परंतु अशा संस्था फार थोड्या असतात. कोच नांवाच्या गृहस्थानें शोधून काढलेलें ट्युबरक्यूलीन या औषधाचा रोगाचें निदान व चिकित्सा या कामीं बराच उपयोग करण्यांत येतो; पण अद्यापि त्याचा परिणाम समाधानकारक आढळत नाहीं.

कफक्षयोत्थ मज्जावरणदाह—(ट्युबरक्युलर मेनिन्जायटिस). यांत मस्तकशूल उत्पन्न होतो व बेशुद्धिहि येते. वांति व मलावरोध हींहि लक्षणें होतात. लहान मुलांना हा रोग फारकरून होत असतो.

कफक्षयोत्थ शब्देंद्रियदाह—(ट्युबरक्युलर लारिंजिटिस). हा कफक्षयजनक विषामुळें उत्पन्न होतो. या रोगाचा आवाजावर परिणाम होऊन रोगी थकत जातो. गिळतांना अतिशय त्रास होतो व शब्देंद्रियाच्या भागांत वेदना होतात.

कबंध— दंडकारण्यांतील एक राक्षस. विश्वावसु गंधर्वास स्थूलशिरा ऋषीचा अपमान केल्यामुळें ही शिरविरहित राक्षसयोनि प्राप्त झाली होती. रामानें याचे हात तोडून यास मारलें.

कंवर—सिंधप्रांत, लारखाना जिल्ह्यांतील एक तालुका. यापैकीं सुमारें ३ जहागीर आहे. लोकसंख्या सुमारें एक लाख. कंवर हें मुख्य ठिकाण असून इतर ९४ खेडीं आहेत.

घर नांवाच्या कालव्यावर हा तालुका अवलंबून आहे. भाताचें पीक येथें चांगलें येतें.

कंचर गांवची लोकसंख्या सुमारें ५०००. इ. स. १८४९ सालीं हा गांव बलुची लोकांनीं लुटला होता.

**कॅबॉट, सेबास्टिअन** ( १४७५-१५५७ )— एक इटालियन भूसंशोधक. हा जलपर्यटनकार जॉन कॅबॉटचा मुलगा व व्हेनेशियन खलाशी ब्रिस्टल येथें राहत असे. १४९६ मध्यें ७ व्या हेन्री राजानें जॉन कॅबॉट व त्याचा मुलगा यांना अज्ञात असलेले देश व बेटें शोधून काढण्याचा परवाना दिला. १४९७ मध्यें जॉन कॅबॉटनें आपला मुलगा सेबास्टियन व आणखी मुलगे यांच्यासह समुद्रसफर करून उत्तर-अमेरिका खंड शोधून काढलें आणि नोव्हास्कोशिया व केप ब्रिटन बेट या बाजूसहि जाऊन आले. सेबास्टिअन यानें स्पॅनिश सरकारच्या नोकरींत १५२६ मध्यें ब्राझील व प्लाटा नदीचा प्रदेश यांकडे सफर केली. त्यानें आपला सुप्रसिद्ध जगाचा नकाशा १५४४ मध्यें तयार केला. १५५३ मधलि विलोबीची सफर आणि १५५६ मधील स्टीफन बरोची सफर यांची जमवाजमव करण्यांत तोच पुढारी होता. न्यू फाउंडलंड आणि केप ब्रेटन बेट यांमधील सामुद्रधुनीला कॅबॉटचें नांव आहे. तसेंच ब्रिस्टलमध्यें ब्रॅन्डन डोंगरावर कॅबॉट टॉवर बांधलें आहे.

**कबीर** ( मृ. १५१७ ? )—एक हिंदी संतकवि व धर्मसुधारक. याच्या जन्माविषयीं नामदेवाच्याप्रमाणेंच कथा आहेत. हा हिंदु कीं मुसलमान हेंहि निश्चित नाहीं. याचा गुरु रामानंद होता. कबीर हा अत्यंत रामभक्त असून त्यानें भागवत संतांप्रमाणेंच भक्तिमार्गाचा प्रसार केला. त्याचे दोहेरे तुकारामाच्या अभंगांप्रमाणें सुपरिचित व सर्वांमुखीं आहेत. हिंदुस्थानांत याचे अनुयायी दहा लाखांवर भरतील व त्यांच्यांत एकजूटहि आहे. कबीर जातिभेदाविरुद्ध होता. त्याचे स्वतःचे ग्रंथ दिसत नाहींत. पण पदें व दोहोरें असंख्य आहेत. 'कहत कबीरा', हें त्यांच्या शेवटीं असावयाचेंच. धर्मदास आणि गोपाळदास हे त्याचे दोन पट्टशिष्य होते. त्यांनीं कबिराच्या कवितांचा संग्रह केला. कबीर मगहर येथें मृत्यु पावला.

कबीरपंथी—कबिराच्या मुसलमान अनुयायांचें मुख्य स्थान गोरखपुराजवळील मगहर गांवीं आहे. हे आपल्या हिंदु गुरुबंधूंपासून तुटक राहतात. हिंदु अनुयायांत दोन मुख्य वर्ग आहेत. मगहर येथील हिंदुपीठ काशींतील मुख्य पीठाची केवळ एक शाखा आहे. दुसरें पीठ मध्यप्रांतांत छत्तीसगड येथें आहे. धर्मदास नांवाच्या एका वाण्यानें तें स्थापिलें. कबीर जरी जातिभेदाविरुद्ध होता तरी अर्वाचीन कबीरपंथीयांना हीन वर्णाचे लोक आपल्यांत येऊं नयेत, त्यांनीं आपल्याप्रमाणें गळ्यांत तुळशीच्या माळा घालूं नयेत असें वाटतें. ब्राह्मण कबीरपंथी माळा घालून शिवाय जानवें घालितात. दीक्षाविधींत मुख्य गोष्ट म्हणजे गुप्त मंत्र देण्याची होय. सर्व कबीरपंथी बीजक या ग्रंथाला फार महत्त्व देतात व तो नित्य पठण करितात. तो भागोदास नांवाच्या कबीरशिष्यानें कबिराचीं पदें व दोहोरे एकत्र करून रचला. याशिवाय गुरुबोध, मानसविचार, पंचकोष व निर्णयसार या ग्रंथांना कबीरपंथी लोकांनीं फार महत्त्व दिलेलें आढळतें. महंतांचे दोन वर्ग आहेत: एक संन्यासी व दुसरा घरवासी किंवा गृहवासी.

**कबीर-वट**— भडोच शहरापासून सुमारें बारा मैलांवर शुक्लतीर्थाजवळ हा एक अति पुरातन वृक्ष होता. आज नुसती जागाच दाखविण्यांत येते. कबीर त्या ठिकाणीं एकदां आला असतां त्याच्या पायाचें तीर्थ या वृक्षास घातलें तेव्हां त्याला पालवी फुटली, अशी आख्यायिका आहे. हा वृक्ष फार पुरातन व अवाढव्य होता. याबद्दलचीं जुनीं वर्णनें बरींच आहेत. याच्या मोठाल्या बुंध्यांनीं सुमारें २००० फूट परिघाइतका प्रदेश व्यापिला होता. याच्या फांद्याखालीं शिताफळें व इतर फळझाडें अनेक वाढलीं होतीं. ७,००० वर माणसें याच्या आश्रयास राहत.

**कबूतर**— हा पारव्याच्या वर्गांतील पक्षी आहे. हे पक्षी सर्वत्र आढळतात. हे फार पटाईत उडणारे आहेत. हे सामान्यतः झाडामध्यें राहतात व आपलीं घरटीं उंच बांधतात. बहुधा यांचा नर-मादीचा जोडा असतो व दोघेहि आपलीं अंडीं उबवितात. यांच्या अनेक जाती व प्रकार आहेत. यांच्या कांहीं जाती पाळण्यांत येतात. हे आपल्या घरट्याकडे नेहमीं लक्ष ठेवून कितीहि दूर उडाले तरी परत येतात. या त्यांच्या गुणांवरून त्यांचा चिठ्ठी पोंचविण्याच्या कामीं उपयोग करून घेण्यांत येतो. यांचे रंग निरनिराळे असतात व उडतांना हे मजेदार हावभाव करतात.

टपाली कबूतरें— हें एका जातीचें पाळीव कबूतर असून

याचा निरोप पाठविण्याच्या कामीं उपयोग करतात. अशा प्रकारच्या अनेक जाती आहेत. परंतु त्यांतील विशेष सामान्य जात ही आकारानें मोठी असून पंख लांब असतात; चोंचीच्या प्रारंभीं कातडीचा ग्रंथीसारखा कांहीं भाग उघडा असतो. तसेंच

डोळ्याभोंवतींच्या कातडीवरहि पिसें नसतात. परंतु वास्तविक ही एक केवळ दिखाऊ जात आहे. परंतु निरोप नेण्याच्या कामीं प्रत्यक्ष उपयोगांत आणली जाणारी जात सामान्य इतर कबूतरां-प्रमाणेंच असते. कबूतरांबरोबर चिठ्या पाठविण्याचा प्रघात प्रथम पूर्वेकडील देशांतच उत्पन्न झाला; तथापि तारायंत्र सुरू होण्यापूर्वी याचा इतर देशांतहि प्रसार झाला होता. प्रत्यक्ष टपाल नेण्या-आणण्याच्या कामीं कबूतरांचा उपयोग बगदाद येथील सुलतान नुरुद्दिन महमद यानें सुरू केला. हा बादशहा इ. स. ११७४ मध्यें मृत्यु पावला. तथापि हा प्रघात सन १२५८ मध्यें मोंगल लोकांनीं बगदाद शहर काबीज करुन त्याचा नाश करीपर्यंत चालू होता. या पक्ष्यांच्या अंगीं अत्यंत दूरच्या अंतरा-वरुनहि आपलें घर शोधून काढण्याची जी अद्भुतशक्ति आहे, तिचा उपयोग करुनच ही टपालाची पद्धति सुरू करण्यांत आली व या पद्धतीचा कांहीं अंशांनीं इतरत्रहि निरोप पाठवि-ण्याच्या कामीं उपयोग करुन घेण्यांत येत असे. परंतु ही त्यांची घराची स्मृति सुमारें पंधरा दिवसपर्यंतच कायम राहते. त्यापेक्षां जास्त दिवस त्यांना घरापासून दूरच्या ठिकाणीं ठेवल्यास ती नष्ट होते. यांना प्रथम थोडथोड्या अंतरावरुन उडवून शिक्षण देण्यांत येत असे. पाठविण्याची चिठ्ठी यांच्या पंखांत किंवा शेपटींत बांधण्यांत येत असे व ती अगदीं लहान असल्यामुळे तिचा उडण्याच्या कामीं व्यत्यय येत नसे. अशा रीतीनें सूक्ष्म फोटो-पद्धतीनें बरीच माहितीहि पाठवितां येणें शक्य आहे. १८७०-७५ मधील फ्रान्स-जर्मनीमधील युद्धांत अशा तऱ्हेनें यांचा उपयोग करण्यांत आला होता. यांचा वेग ताशीं ३० ते ४० मैलहि असूं शकतो. अशा तऱ्हेचीं कबूतरें अनेक देशांत पाळण्यांत येऊन त्यांच्या शर्यतीहि लावण्यांत येतात. गेल्या दोन्ही महायुद्धांतहि यांचा उपयोग बराच करण्यांत आला होता.

**कब्बाल दुर्ग**—म्हैसूर संस्थान, म्हैसूर जिल्ह्यांत मळवल्ली तालुक्यांतील एक किल्ला. हिंदु व मुसलमानी राज्यांत राजकीय कैदी येथें कैदेंत ठेवीत असत. हैदरअल्लीनें गुत्तीचा राजा मुरार-राव घोरपडे यास येथेंच आणून ठेविलें होतें.

**कब्बालिगर**—एक जात. एकंदर लो. सं. सुमारें ऐंशीं हजार. यांची वस्ती मुंबई व मद्रास इलाख्यांत आहे. हे तेलगू भाषा बोलतात व यांमध्यें लग्नसमारंभीं द्राविडांप्रमाणें हालागाम व धारे हे संस्कार करितात. यावरुन ते मूळचे मद्रासमधील बल्लारी जिल्ह्याचे रहिवासी असावे असें दिसतें. कोठें कोठें या जातीचे लोक ब्राह्मणांप्रमाणें गोत्रेंहि लावूं लागले आहेत. या जातींत पुष्कळ मुली अविवाहित राहून वेश्यांचा धंदा करितात. मासे धरणें, होड्या चालविणें व पालख्या वाहणें हे त्यांचे परंपरागत धंदे होत. 'बुधवंत' व 'म्हेत्री' यांचा अधिकार जातीच्या सर्व लोकांवर असतो. म्हेत्री व बुधवंत यांच्या जागा परंपरागत असतात.

**कॅम्ब्राइन पद्धति**—ॲडॅम सेजविक नांवाच्या भूस्तरशास्त्रज्ञा-नें या स्तरपद्धतीचा प्रथम वेल्समध्यें कॅंब्रिया येथें अभ्यास केल्यामुळें या स्तरपद्धतीस कॅंब्रियन असें नांव देण्यांत आलें. या स्तरपद्धतींत तीन थरांची रचना एकावर एक अशी आढळते. हे थर खालून वर अशा क्रमानें आढळतातः १. ओलेनेलस, २. पॅरेडॉक्साइडस्, ३. ओलेनस. पहिल्या थराचे दगड इंग्लंड व वायव्य स्कॉटलंडमध्यें डोंगरांत आढळतात. या थराच्या खालीं आढळणाऱ्या थरास प्रीकॅंब्रिअन किंवा कॅंब्रियनपूर्वस्तर असें म्हणतात व ते पूर्वपाषाणयुगाच्या पूर्वीचे असले पाहिजेत असें गृहीत धरण्यांत येतें त्या अर्थी या ओलेनेलस थरास फार महत्त्व देण्यांत येतें. यानंतर इंग्लंडमध्यें मेनेव्हिअन (पॅरे डॉक्साइड रांग) आणि लिंगुला फ्लॅग आणि टेमाडॉक थर (ओलेनस रांग) येतात. या भूस्तरामध्यें आढळणारे स्कॉटलंडमधील प्राण्यवशेष वेल्सपेक्षां उत्तर अमेरिकेंतील प्राण्यवशेषाशीं अधिक सदृश असतात. या थरांत पृष्ठवंशयुक्त प्राण्यांचे अवशेष आढळत नाहींत.

हे भूस्तर फार प्राचीन असल्यामुळें त्यांमध्यें फरक झालेला आहे व ते दबले आहेत. स्कॉटलंडमध्यें टॉरिडन थराच्या वर असलेले चुनखडीचे दगड आतां गारेचे दगड बनलेले आहेत व ते पर्वतमाथ्यावर बर्फासारखे दिसतात. तसेंच शिंपले वगैरेंखरील, भारानें दबून त्यांचा पाटीचा दगड बनतो.

**कंब्राय**—उत्तर फ्रान्स, नोर्ड विभागांतील मुख्य शहर. येथील लो. सं. सुमारें तीस हजार आहे. कंब्राय हें सब् प्रीफेक्ट व आर्च बिशप ह्यांचें राहण्याचें स्थान आहे व येथें पहिल्या प्रतीचें न्यायकोर्ट आहे. शिक्षणसंस्थांमध्यें कम्यूनल कॉलेज, धर्मविषयक शाळा, चित्रशाळा व गायनशाळा आहेत. येथें 'कॅंब्रिक' नांवाचें मलमलीचें कापड व दुसऱ्या बारीक सुताचेंहि कापड विणतात. बीटमुळांपासून साखर करण्याचे कारखाने, कलाली भट्ट्या व यंत्रानें दारू काढण्याच्या भट्ट्याहि आहेत. गेल्या महायुद्धांत या ठिकाणाला फार महत्त्व होतें.

**कॅमडेन, विल्यम** (१५५१-१६२३)—एक इंग्रज पुराणवस्तुशास्त्रज्ञ आणि इतिहासकार. १५८६ मध्यें ब्रिटॅनिआ या याच्या ग्रंथाची १ ली आवृत्ति प्रसिद्ध झाली तेव्हां त्याबद्दल त्याची फार वाहवा झाली. पुढें त्यानें याच ग्रंथाच्या सुधारलेल्या अनेक आवृत्त्या काढल्या. शिवाय त्यानें एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीचा इतिहास प्रसिद्ध केला. आणि वेस्टमिन्स्टर ॲबे-मधील शिलालेख आणि स्मारकें यांच्या वर्णनपर ग्रंथ लिहिला.

**कमरुद्दिनखान** (मृ. १७४८)—दिल्लीचा वजीर महमद अमीनखान याचा हा मुलगा व निजामउलमुल्क याचा चुलत-भाऊ. बाप वारल्यानंतर १७२१ सालीं निजाम दिल्लीचा वजीर झाला व कमरुद्दिनला सरदारकी मिळाली. बाजीरावानें थेट दिल्लीवर स्वारी केली, त्या वेळीं हा बाजीरावावर चालून आला, पण त्याला बाजीरावानें झुकांडी देऊन दिल्लीचीं उपनगरें लुटलीं (१७३७); नंतर सदर खानाच्या सैन्याचा मराठ्यांनीं वोडर्से येथें १७३९ सालीं पुरा पराभव केला. लवकरच कमरुद्दिनला दिल्लीची वजिरी मिळाली, आणि तो व निजामउलमुल्क दोघे शेवटपर्यंत मराठ्यांचे शत्रू राहिले. त्यामुळें मराठ्यांना दिल्ली व भागानगर कायम काबीज करतां आलीं नाहींत. अबदालीच्या स्वारीला यानें विरोध केला, पण तंबूंत निमाज पढत असतां तोफेचा गोळा लागून मेला.

**कमल**—सरोवरांत किंवा तळ्यांत उगवणारें व कंदापासून उत्पन्न होणारें हें एक फूल आहे. यास संस्कृतमध्यें पद्म, कमल, अरविंद, पंकज, इत्यादि नांवें आहेत. याच्या मुख्य श्वेत, रक्त व नील या तीन जाती होत. झाडाचें बीज व मूळ हीं औषधी कामाकडे लावतात. फुलास अनेक लांबट पाकळ्या असून त्या सूर्यफुलासारख्या एकमेकांस अगदीं लागलेल्या असतात. यास पावसाळ्यांत फार फुलें येतात. या कमळांच्या फुलांचा भर थंडीच्या दिवसांत असतो. पांढऱ्या कमळास पुंडरीक म्हणतात. रक्त कमळास कोकनद व नील कमळास इंदीवर अशीं नांवें आहेत. कमलाक्ष—कमळाच्या बिया फोडून आंतील मगज काढितात. त्याच्या कित्येक ठिकाणीं लाह्या करतात. त्या दुधांत घालून खातात किंवा त्यांचें पीठ करून त्यांत तूपसाखर घालून लाडू बनवितात. कमलाक्ष फार पौष्टिक आहे.

सर्व फुलांत कमल हें भारतीयांना अत्यंत प्रिय आहे. अति-प्राचीन काळापासून तों आजतागाईत हिंदुस्थानच्या सर्व भागांत याला जी मान्यता लाभलेली आहे ती इतर कोणत्याहि फुलाला नाहीं. ऋग्वेदांत कमलाच्या दोन जाती आढळतात: एक पुंडरीक व दुसरी पुष्कर. महाभारतासारख्या इतिहास-पुराणांतून ब्रह्मा विष्णूच्या नाभिकमलापासून उत्पन्न झाल्याचें वर्णिलें आहे. विष्णूला पद्मनाभ, लक्ष्मीला पद्मा अशा तऱ्हेचीं विशेषणें लावलीं आहेत.

अर्वाचीन संस्कृत वाङ्मयांत तर मुख, चरण, हस्त, नेत्र, वगैरे अवयवांना कमलाची उपमा दिलेली आढळते. कमल हें सूर्यरूप आहे. बुद्धाचीं पावलें कमलासारखीं उमटतात, तसेंच हें पुष्प देवों जन्माचें दर्शक आहे, इतकेंच नव्हे तर अमरत्वाचेंहि दर्शक आहे, यासारख्या कल्पना बौद्ध ग्रंथांतून आढळतात, व त्या शिल्पांत उतरविल्या आहेत. बौद्धांना अवगत असणाऱ्या १ आंकड्या-पुढें ११८ शून्यें देऊन होणाऱ्या अति मोठ्या संख्येला पद्म असें नांव आहे. १ पुढें ११२ शून्यें देऊन होणाऱ्या संख्येला पुंडरीक म्हणतात. महायान पंथाच्या एका महत्त्वाच्या धार्मिक ग्रंथाला 'सद्धर्मपुंडरीक' असें नांव आहे. धार्मिक कलाकौशल्याच्या उदयापासून कमलाची त्याला महती आहे. जिन्याच्या तळाशीं असणाऱ्या अर्धवर्तुळ दगडावर अर्धकमल कोरलेलें सिंहलद्वीपांत पाहावयास मिळेल. गांधार व मथुरा शिल्पांत देंठासकट कमलें काढलेलीं आहेत. उदयगिरी, भरहूत व सांची या ठिकाणच्या शिल्पांतून लक्ष्मी कमलासनावर दाखविली आहे. राजगृह, कान्हेरी, वगैरे शिल्पांतून बुद्ध कमलावर बसलेला किंवा उभा असलेला दिसतो. अवलोकितेश्वराला पद्मपाणि असें नांव असून 'ओम् मणि पद्मे हुम्' हा मंत्र त्याच्याचसंबंधीं आहे. बहुतेक हिंदु देवता कमलासनस्थ असतात; कोणी हातांत कमल धरितात.

कमलाचीं अनेक प्रकारचीं झाडें आहेत व कमल हें फार पुरातन कालापासून माहीत आहे. ग्रीक लोकांसहि कमल माहीत होतें. झिझिफस लोटस याचें झुडूप दोन ते तीन फूट उंच असून त्याला बोराएवढीं फळें येतात. हें हिंदी कमलापासून अगदीं निराळें आहे.

'लोटस' हें नांव पाण्यांत वाढणाऱ्या लिली जातीच्याहि कांहीं झाडांस लावण्यांत येतें. हिंदी कमल या वर्गांत मोडतें. ब्रिटनमध्यें दुसऱ्याच एका वर्गातील [वर्ग-लेग्युमिनोसी] कांहीं वनस्पतींस लोटस अथवा कमल हें नांव देण्यांत येतें. याच्या चार-पांच जाती ब्रिटनमध्यें आढळतात. त्यांस त्रिपर्णी पांखरांचे पाय म्हणतात.

**कमलदेवी**—गुजरातचा राजा कर्ण याची ही सुस्वरूप पत्नी. कर्णराज अनहिलवाड येथें पराभव पावून पळून गेल्यावर ही अल्लाउद्दिनाच्या हातीं लागली (१२९७). त्यानें तिला आपल्या जनानखान्यांत ठेविली. पुढें कमलदेवीनें आपली मुलगी देवलदेवी हिलाहि आपल्याकडे आणवून घेतली व तिचें शहाजाद्याशीं लग्न लावून दिलें. देवलदेवी पहा.

**कमलगड**—१. पंजाब, हा मंडी संस्थानांतील एक प्राचीन किल्ला असून तो बिआस नदीच्या दक्षिण तीरावर वसलेला आहे. मंडी संस्थानच्या पूर्वेतिहासांत या किल्ल्यानें बराच महत्त्वाचा भाग घेतला आहे.

२. ही टेंकडी वाईच्या पश्चिमेस १० मैलांवर असून समुद्रसपाटीहून ४,५११ फूट उंच आहे. टेंकडीवर एक खोल विहीर आणि गोरखनाथाचें देऊळ आहे.

**कमलाकर भट्ट**—१. एक प्रसिद्ध भारतीय ज्योतिषी. या ज्योतिष्याचा 'सिद्धांततत्त्वविवेक' म्हणून जो ग्रंथ काशी येथें

रचला त्याच्या शेवटीं त्यानें आपणांविषयीं थोडीशी माहिती दिली आहे. गोदावरीच्या उत्तर तीवरारील गोलग्राम या नांवाच्या गांवीं भरद्वाज गोत्री राम नांवाचा महाराष्ट्रीय ब्राह्मण राहत होता. तो कमलाकर भट्टाचा निपणजा होय. पणजा दिवाकर, आजा कृष्ण, बाप नृसिंह व बंधु दिवाकर होता असें समजतें. भागीरथी नदीच्या उत्तर तीरीं असणाऱ्या काशीपुरींत कमलाकर भट्टानें शके १५८० व १५८१ या कालाच्या दरम्यान हा सिद्धान्त ग्रंथ रचला. कमलाकर सर्वस्वीं सूर्यसिद्धान्तानुसारी होता. अपूर्व भावनोपपत्ति, जातकतिलक, ज्योत्पत्तिविचार, वगैरे यानें केलेले ग्रंथ आफ्रेक्ट सूचींत नमूद केले आहेत.

२. एक धर्मशास्त्रज्ञ. सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला. याचा 'निर्णयसिंधु' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. व्रतें, धार्मिक संस्कार, तिथिनिर्णय, वगैरेसाठीं कमलाकराचे ग्रंथ आधारभूत मानतात.

**कमलाबाई पालकर**—थोरल्या छत्रपति शिवाजीची सकवारबाईपासून झालेली ही मुलगी. ही जानोजी पालकर यास दिली होती.

**कमान**—तोरण. निमुळत्या दगडांची अथवा विटांची अशा प्रकारें कंसाकार रचना केलेली असते कीं, तीमुळें हे दगड आपलें परस्परांचें वजन तोलून धरूं शकतात. अशा रचनेस तोरण किंवा कमान म्हणतात. अशा कमानीचे वाटोळी, दीर्घ वर्तुळाकृति, वगैरे अनेक प्रकार असतात. त्यांस त्यांच्या आकारावरून निरनिराळीं नांवें दिलेलीं असतात. उदा., नालाकृति, मल्लाकृति, समत्रिकोणात्मक, त्रिकेंद्रक, चतुःकेंद्रक, ओजी (कळसपान), वगैरे. तसेंच रोमन कमान, सॅरॅसेनिक कमान, वगैरेहि त्या त्या लोकांत प्रचलित असलेल्या कमानींवरून नांवें पडलेलीं आहेत.

**कमार**—एक जात. हा संस्कृत कर्मारि शब्दाचा अपभ्रंश असावा. कमारांत हिंदू, शीख, जैन व वन्यधर्मीय लोकहि आहेत. यांची एकंदर संख्या तीन लाखांवर आहे. आसाम, बंगाल, वऱ्हाड व मध्यप्रांत यांतून यांची विशेष वस्ती आहे. सोनार, कासार, लोहार यांसारखे धंदे हे करितात. आसामांत सुमारें २५,००० कमार चहाच्या मळ्यांत मजुरी करतात. यांचे बंधाजिया व माकडिया असे दोन वर्ग आहेत. बहुतेक प्रौढ विवाहाचीच चाल आहे. बहुपत्नीत्व व विधवाविवाहाची पूर्ण मोकळीक यांच्यांत आहे. हे दुल्हा देवाची पूजा करतात. यांच्या एकंदर संवयी फार बाणेरड्या आहेत. हे फारच क्वचित् स्नान करतात. हे फारच ठेंगणे आहेत. हे तिरकमठ्यानें शिकार करतात.

**कमाल**— हा साधु कबीर याचा मुलगा म्हणून समजतात. पण पुष्कळ कबीर संप्रदायी तसें मानीत नाहींत. कमाल नदींत वाहत असतांना कबिरास दिसला व तो त्यानें सांभाळिला म्हणून कमाल स्वतःला कबीरसुत म्हणवितो. कमालाचीं पदें बरींच आहेत.

**कॅमेरा**— (प्रकाशलेखन यंत्र). दृक्शास्त्रांतील एक यंत्र. याचा उपयोग नैसर्गिक वस्तूंची प्रतिमा त्यांच्या आकाराप्रमाणें व रंगाप्रमाणें पाडण्याकरितां करण्यांत येतो. या प्रतिमेवरून त्या वस्तूचें चित्र काढतां येतें किंवा प्रकाशलेख अथवा छायाचित्र घेतां येतें. या यंत्रामध्यें एक बहिर्गोल भिंग बसविलेलें असतें. त्यांतून जाणारे किरण एका आरशावर पडून दुसऱ्या एका कांचेवर परावर्तित होतात. हा आरसा ४५° चा कोन करून बसविलेला असतो. त्याच्यावर पडलेल्या प्रतिमेवरून त्या पदार्थाची आकृति काढतां येते. प्रकाशलेखक अथवा फोटोग्राफर जे यंत्र वापरतात त्यामध्यें एक पेटी असून तिची लांबी कमीजास्त करतां येते. या पेटीस पुढच्या भागीं एक नळी असून तिच्या तोंडाशीं भिंग बसविलेलें असतें. या पेटीच्या मागील बाजूस एक घासलेली कांच किंवा पडदा बसविलेला असतो. त्यावर इष्ट वस्तूची प्रतिमा पडते. ती इष्ट वस्तु बरोबर केंद्रांत यावी याकरितां पुढील भिंग अथवा मागील पडदा पुढेंमागें करण्याची व्यवस्था केलेली असते. या घासलेल्या कांचेच्या जागीं रासायनिक लेप लावलेली व प्रकाशसंवेदनाक्षम अशी कांच किंवा पट्टी बसविण्यांत येते, आणि तीवर योग्य तितका वेळ इच्छित वस्तूपासून निघणारा प्रकाश पडेल अशी व्यवस्था करण्यांत येते व याप्रमाणें तिचें चित्र काढण्यांत येतें.

कॅमेरा ल्युसिडा (सप्रकाशपेटिका) व कॅमेरा ऑब्स्कुरा (छायाचित्रपेटिका) हे कॅमेराचे प्रकार वस्तूंचे स्थूल आराखडे काढण्यासाठीं पूर्वी वापरीत असत. वनस्पति आणि प्राणी यांचे बारीक भाग काढण्यासाठीं प्रयोगशाळांतून कॅमेरा ल्युसिडा याचा बराच उपयोग होतो. यांतील त्रिपार्श्वकांचेमुळें कागदावर वस्तूची मोठी प्रतिमा दिसून येते. सृष्टींतील दृश्यें, घरें किंवा इतर मोठाल्या वस्तू-वास्तू यांचे आराखडे घेण्यास कॅमेरा ऑब्स्कुरा पूर्वी फार वापरीत. फोटोग्राफी आल्यानंतर हा मागें पडला. याचा उपयोग अंधाऱ्या जागीं करावा लागतो. एका बंद पेटींत ४५° अंशांचा कोन करून एक आरसा ठेवलेला असतो. त्या आरशाच्या वर एक घासलेल्या कांचेचा पडदा असतो,

कॅमेराच्यापुढें नेहेमींप्रमाणें एक भिंग (लेन्स) वसविलेलें असतें. या भिंगांतून आंत आरशावर वस्तूचें प्रतिबिंब पडल्यावर तें वरच्या कांचेच्या पडद्यावर प्रतिबिंबित होतें. पेशवाईच्या अखेरीस हाच कॅमेरा इकडे माहीत झाला.

**कॅमेस, हेन्री होम, लॉर्ड** (१६९६–१७८२)—हा स्कॉटलंडांतील वकील आणि तत्त्ववेत्ता असून त्याला १७५२ मध्यें सेशन कोर्टाचा जज्ज नेमण्यांत आलें आणि त्याला लॉर्ड कॅमेस ही पदवी मिळाली. त्यानें कायदेविषयक ग्रंथ लिहिले असून शिवाय पुढील ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत: (१) एसेज् ऑन ब्रिटिश ॲन्टीक्विटीज्, (२) एसेज् ऑन दि प्रिन्सिपल्स् ऑफ मोरॅलिटी ॲन्ड नॅचरल रिलिजन, (३) इंट्रोडक्शन टू दि आर्ट ऑफ थिंकिंग, (४) एलेमेन्ट्स ऑफ क्रिटिसिझम. त्याचा शेवटला ग्रंथ सर्वांत अधिक प्रसिद्ध आहे.

**कॅमोएन्स** (१५२४–१५७९)— एक पोर्तुगीझ महाकवि. गोंव्यांतील पोर्तुगीझ अधिकाऱ्यांच्या उन्मत्तपणावर आपल्या काव्यांतून यानें टीकास्त्र सोडल्यामुळें यास मकाव येथें हद्दपार करण्यांत आलें. तेथें त्यानें आपल्या सुप्रसिद्ध 'लुसिआद' या महाकाव्याला आरंभ केला. वास्को द गामाचा हिंदुस्थानचा प्रवास यांत वर्णिला आहे. हा सन १५५६ त परत गोंव्यास आला. यानें चौल येथील सरकारी बांधकामखात्यांत १६ वर्षे नोकरी केली व १५७० मध्यें स्वदेशाला गरीच स्थितींतच परत गेला.

**कम्मा**—एकंदर लोकसंख्या सुमारें बारा लाखांवर आहे. बहुतेक लोक मद्रास इलाख्यांतच असतात. ही मूळची लष्करी जात असून सध्यां शेतकरी बनली आहे. सगोत्र विवाह यांस संमत नाहीं; पण मातुल गोत्रीयाबरोबर विवाह केला तर चांगला समजला जातो. तेव्हां आपल्या बहिणीच्या मुलीबरोबर लग्न करण्याची यांच्यांत मोकळीक आहे. तामीळ देशांतील कम्मा लोकांत नवऱ्यापेक्षां बायको मोठी असते. कधीं कधीं आपल्या तान्हेल्या नवऱ्याला कडेवरून नेतांना बावीस वर्षांची तरुणी दृष्टीस पडते!

**कम्माल**— कारागिरांची एक जात. कूर्ग, मद्रास, कोचीन, व त्रावणकोर या भागांतून कम्माल आढळतात. यांची एकंदर संख्या सुमारें अकरा लाख आहे. मल्याळम् व तामीळ असे दोन वर्ग पडतात. त्यांच्यांत बहुभर्तृत्वाचा चाल होती. पुष्कळ बंधूंची एकच बायको असून तिच्यापासून झालेली प्रजा सर्वांची समजली जाई. तामीळ कम्माल, मल्याळम् कम्मालांपेक्षा श्रेष्ठ होत. तामीळ कम्माल लोक यज्ञोपवीत घालतात व ब्राह्मणांप्रमाणें त्यांना गोत्रेंहि आहेत.

**कर**—खाजगी व्यक्तींनीं किंवा संस्थांनीं सरकारमार्फत होणाऱ्या लोकोपयोगी कामाबद्दल मोबदला म्हणून द्यावयाचें आवश्यक देणें. अर्थशास्त्राच्या व्याख्येप्रमाणें कर म्हणजे सरकारच्या श्रमाचा मोबदला किंवा मजुरी. अनियंत्रित राजसत्ताक पद्धतींत राजे लोक कररूपानें मिळणारा पैसा आपल्या खाजगी मालकीचा समजून स्वतःच्या खाजगी खर्चाकडे, चैनीकडे व व्यसनांत खर्च करतात. त्यामुळें करवसुली म्हणजे नाहक जुलूम असा प्रजेचा समज होतो. वास्तविक प्रजेचें व देशाचें शत्रूपासून संरक्षण करणें, देशांत दंगाधोपा होऊं न देतां शांतता राखणें, प्रजेच्या शिक्षणाकरितां, आरोग्याकरितां व इतर हरएक लोकोपयोगीं कामांकरितां खर्च करणें सरकारचें कर्तव्य आहे व त्या खर्चाकरितां प्रजेनें कर द्यावयाचा असतो. ही भावना हिंदुस्थानांत तर पूर्वापार चालत आलेली आहे. महाभारतांत, "आकरे, लवणे, शुल्के, तरे, नागबले तथा।" म्हणजे खाणी, मीठ, व्यापारी माल, नावांतून जाणारा माल, हत्तींचे कळप यांचें उत्पन्न राजाचें असे. गुरांच्या वाढीपैकीं $\frac{1}{50}$ भाग आणि पिकांचा $\frac{1}{6}$, $\frac{1}{8}$ किंवा $\frac{1}{12}$ भाग घ्यावा, असें मनूचें वचन आहे. कौटिलीय अर्थशास्त्रांत स्वदेशांत होणारा माल, तसेंच परदेशांत जाणारा (निष्क्रम्य) व परदेशांतून येणारा (प्रवेश्य) माल यांवर जकातीच्या व करांच्या बाबींची मोठी यादी दिली आहे. तदनुसार दक्षिणेंतील चोल राजे, विजयानगरचे राजे, नंतर मराठे, पेशवे व मोगल राजे जमिनीवर $\frac{1}{3}$ किंवा $\frac{1}{2}$ आणि इतर धंद्यांवर सालीना आठ आण्यांपासून आठ रुपयांपर्यंत कमजास्त कर घेत असत.

मराठे अमदानींत नेहमींच्या करांखेरीज प्रासंगिक कर बसवीत त्यास पट्टया म्हणत. राज्यारोहण अथवा राजाचें स्मारक ह्या निमित्तानें, तसेंच लोकोपयोगी कामांकरितां म्हणून हल्लीं वर्गण्या गोळा करतात त्याच प्रकारच्या ह्या पट्टया असत. पट्टयांचीं नांवें: १ कबारपट्टी, २ मालेपट्टी, ३ दारूपट्टी, ४ नजरपट्टी, ५ कर्जपट्टी, ६ दिवाणपट्टी, ७ बाभूळपट्टी, ८ बैलपट्टी, ९ दहकपट्टी, १० नहरपट्टी, ११ मोरी, १२ सरंजाम, १३ इनाम, १४ लग्न, १५ तनेपट्टी, १६ भिकारपट्टी, १७ चवाळेपट्टी, १८ संतोषपट्टी, १९ कोलारपट्टी, २० पालखी, २१ पालकपट्टी, २२ सरपट्टी, २३ सवाईपट्टी, २४ दिंडीपट्टी, इ०. ज्या कामाकरितां पैसा लागेल त्याकरितां मुद्दाम पट्टी बसवून पैसा वसूल करावयाचा असा रिवाज असल्यामुळें त्या कामाचें नांव पट्टीस दिलें जाई, अथवा ज्यावर पट्टी बसवावयाची त्याच्या नांवावरून ती पट्टी ओळखली जाई. उदा.—सरंजाम, इनाम ह्यांवर बसविलेली पट्टी सरंजाम व इनाम पट्टी होय. लग्नाकरितां अगर कर्जफेडीकरितां बसविलेली पट्टी ती लग्नपट्टी व कर्जपट्टी होय. तळें बांधण्याकरितां व नळ टाकण्याकरितां

तळेपट्टी आणि नळपट्टी बसविण्यांत आली. तोफखान्याच्या कामासाठीं बाभूळ व बैलपट्टी निर्माण झाली. उत्पन्नाच्या कराला दहकपट्टी नांव प्राप्त झालें. दहा वर्षांच्या अंतरानें जमा केलेल्या कराला बहुधा दहकपट्टी म्हणतात. चवाळेपट्टी हा धनगरांनीं द्यावयाचा शेळ्यामेंढ्यांवरील कर असावा.

कोल्हारपट्टी म्हणजे शेतपट्टी, शेतावरील पट्टी, असाच अर्थ घेतला पाहिजे. सवाई, दिडी व सर इत्यादि शेतावर बसवलेल्या पट्ट्या होत. सवाई व दिडीपट्टी म्हणजे वाढो दिडी होय. थकलेल्या बाकीचें व्याज म्हणावयास हरकत नाहीं. सरपट्टी हा मुद्दाम बसविलेला कर असावा. पालकपट्टी म्हणजे बाजारांत पाल मात्र उभारून त्यांत दुकान मांडतात त्यावरचा कर. परंतु ही पट्टी तिसरे सालीं द्यावयाची असे.

करांचा वसूल नेमलले अधिकारी करून पाठवीत. कमाविसदार, मामलेदार, सुभेदार हे मुलकी अमलदार गांवाचा, तालुक्याचा अगर सुभ्याचा वसूल करीत. जकात अधिकारी स्वतंत्र नेमलेले असत व त्यांचे प्रांतहि मुलकी प्रांतांहून निराळे होते. उत्पन्नाचा अंदाज अगोदर केला जात असे आणि आगाऊ निश्चित केलेली रक्कम सरकारला देण्याची जबाबदारी तो तो अमलदार पतकरीत असे. ह्या ठरलेल्या रकमेचीं खतें लिहून घेत. अधिकाऱ्यांनीं सरकारला द्यावयाच्या रकमेला रसद म्हणत. ही रक्कम आगाऊ देत किंवा हप्त्याहप्त्यांनीं देत. रसदेची रक्कम सरकार वराता काढून वसूल करी. हल्लीं सेक्रेटरी ऑफ स्टेट ज्याप्रमाणें आपल्या कचेरीच्या खर्चाकरितां हुंड्या काढतो त्याच प्रकारची वरातांची पद्धत होती. सध्यां सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या हुंड्या बाजारांत व्यापारी लोक विकत घेतात त्याप्रमाणें सरकारी वराता पुण्याचे हुंडीवाले विकत घेऊन सरकारास तावतोब पैसे देत आणि वरातांची रक्कम आपण वसूल करीत. सरकारी हुंडीलाच वराता शब्द लावीत. रसदेची रक्कम कराराच्या मुदतीच्या आंत घेतल्यास सरकारांतून व्याज कापून मिळे.

युरोपांत आडाम स्मिथ यानें अर्थशास्त्रावर पहिला व्यवस्थित ग्रंथ लिहून त्यांत करवसुलीचीं चार तत्त्वें नमूद केलीं व तीं सर्वमान्य झालीं. तीं तत्त्वें अशीं: (१) कराची समता म्हणजे प्रत्येक प्रजाजनाच्या ऐपतीप्रमाणें त्याच्याकडून कर घेणें; (२) कराची निश्चितता म्हणजे कर भरण्याची वेळ, कर भरण्याची तऱ्हा व कराची रक्कम स्पष्ट करणें; (३) कराचा सोयीस्करपणा म्हणजे प्रजेला सोयीच्या वेळीं व सोयीच्या रीतीनें कर घेणें; (४) कराची काटकसर म्हणजे करवसुलीचा खर्च शक्य तितका कमी लागून कराची बहुतेक रक्कम सरकारी तिजोरींत पडावी. या आडाम स्मिथच्या तत्त्वांत पुढील अर्थशास्त्रज्ञांनीं भर घातली ती—(१) मारामार बारीक सारीक करांपेक्षां मोठें उत्पन्न देणारे थोडेच कर बसवावे; (२) करवसुलीचा खर्च न वाढतां करांचें उत्पन्न वाढवतां येईल असे कर, उदाहरणार्थ—प्राप्तीवरील कर, मिठावरील कर, वगैरे प्रकारचे कर बसवावे; (३) सरकारच्या गरजांबरोबर करांचें उत्पन्न आपोआप वाढतें असावें. अप्रत्यक्ष करांमध्यें हा गुण असतो.

प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर— करांचा बोजा ऐपतीप्रमाणें प्रत्येकावर पडावा, हें सामान्य तत्त्व अमलांत आणतांना कराचा बोजा किंवा संपात खरोखर कोणावर हें समजणें फार कठीण असतें; कारण समाजांतील व्यवहार इतके विविध व गुंतागुंतीचे असतात कीं, कर शेवटीं कोण भरतो, हें सांगणें कठीण होतें. कराच्या संपातमीमांसेला धरूनच करांचें वर्गीकरण (१) प्रत्यक्ष कर व (२) अप्रत्यक्ष कर असें केलें आहे. जमिनीवरील कर हा प्रत्यक्ष कर आहे, असें मानतात; कारण जमीनधारा किंवा घरपट्टी जमीनदार व घरमालक भरतो. परंतु जमीनधारा वाढवला तर जमीनमालक कुळांकडून जास्त मक्ता वसूल करील, व त्यामुळें या कराचा बोजा जमीनदारावर न पडतां कुळांवर पडेल. पण जमिनीचे मक्ते कायम ठरलेले असले, किंवा मक्ता वाढवल्यास चढाओढीनें जास्त मक्ता देण्याला कुळें तयार नसलीं, तर हा कराचा वाढलेला बोजा जमीनदारावर पडेल. प्राप्तीवरील कर हा प्रत्यक्ष कर मानला जातो. डोईपट्टी हाहि प्रत्यक्ष कर होय. आयात जकात, निर्गत जकात व अन्तर्गत जकात हे अप्रत्यक्ष कर होत. कारण, आयात मालावर कर वाढवला तर व्यापारी तितक्या मानानें मालाच्या किंमती वाढवतील, व तो कर अप्रत्यक्षपणें त्या मालाच्या गिऱ्हाइकांवर पडेल. पण सदर माल आवश्यक गरजेचा नसून चैनीचा असेल तर गिऱ्हाईक वाढलेल्या किंमतीचा माल घेणार नाहीं, म्हणून व्यापारी किंमत वाढवूं शकणार नाहीं, व कराचा बोजा व्यापाऱ्याला सोसावा लागेल. तात्पर्य, कराचा संपात शोधून काढणें कठीण असतें.

आज हिंदुस्थानांत कर बसवण्याचा अधिकार (१) हिंदुस्थान सरकार, (२) प्रांतिक सरकारें व (३) लोकल बोर्डे व म्युनिसिपालट्या या स्थानिक स्वराज्यसंस्था या संस्थांना आहे.

**करकंब**—मुंबई, सोलापूर जिल्हा, पंढरपूरच्या उत्तरेस १४ मैलांवरचें एक मोठें गांव. येथें सूत रंगविण्याचा व लुगडीं विणण्याचा धंदा चांगला चालतो. येथें पानांचे मळे आहेत. या ठिकाणीं सोमवारीं बाजार भरतो.

**करकुंब**—मुंबई, पुणें जिल्हा, सोलापूर रस्त्यावरचें एक खेडें. येथें फिरंगाई देवीचीं दोन जुनीं देवालयें आहेत. टेंकडीवरचें देवालय फलटणचा देशमुख, मुधोजी नाईक निंबाळकर यानें १७५९ मध्यें बांधलें असें देवळांत असलेल्या लेखावरून समजतें.

**करकोचा पक्षी**—(क्रौंच). बगळयाच्या जातींतील हे पक्षी उंच असून यांची चोंच लांब असते. यांचा स्वतंत्र वर्ग आहे. यांच्या निरनिराळया जाती निरनिराळया देशांत राहतात. हिंदुस्थानांतील एका जातीस अड्जूटन्ट म्हणजे क्रौंच पक्षी म्हणतात. आफ्रिका, अमेरिका व ऑस्ट्रेलियामधील एका जातीस जबीरु म्हणतात. पोलंड व रशिया देशांत काळा करकोचा असतो.

हे पक्षी कळप करून राहतात. नर आणि मादी असें जोडपें भक्ष्य शोधीत हिंडतें. बगळ्याप्रमाणें मान वांकवीत करकोचा उडत नाहीं, तर ताठ मान ठेवून जातो.

**करंज**—हें एक मध्यम आकाराचें रानझाड आहे. हीं झाडें छायेसाठीं रस्त्याच्या बाजूस किंवा शेताच्या बांधावर लावितात. याची छाया फार दाट व आनंदकारक असते. याच्या झाडास ज्या शेंगा येतात, त्यांत चपटें बीं सांपडतें. त्यापासून तेल काढतात. तें जाळावयास चांगलें उपयोगी पडतें व त्याचे औषधी गुणहि बरेच आहेत.

**करंज**—मुंबई, कुलाबा जिल्हा, पनवेल तालुक्यांतील एक पेटा, खेडेगांव व द्वीपकल्प; हें मुंबईच्या कारनॅक बंदराच्या आग्नेयीस सुमारें ६ मैलांवर आहे. येथून मीठ व दारू हे जिन्नस बाहेरगांवीं रवाना होतात.

करंज हें बेट अनेक सरकारांच्या अमलाखालून गेलें असून त्यावर निरनिराळीं संकटें आलीं होतीं. बाराव्या शतकांत, शिलाहारांच्या कारकीर्दींत तें भरभराटींत होतें. हें वसई प्रांताचा एक भाग असून त्याला तटबंदी केलेली होती. १७३७ त तें मराठ्यांच्या ताब्यांत गेलें व त्यांच्याकडून १७८४ त इंग्रजांनीं घेतलें.

या बेटाजवळच १९४७ सालीं रामदास ही उतारूंची बोट बुडाली.

**करजगांव**—वऱ्हाड, उमरावती जिल्हा, एलिचपूर तालुका, एक गांव. एलिचपूरच्या ईशान्येस आठ मैलांवर व परतवाड्याहून सहा मैलांवर हें आहे. हें पूर्वीं जामदारखान्याच्या जहागिरीपैकीं एक असून तालुकदाराचें मुख्य ठाणें होतें. आठवड्याचा बाजार दर सोमवारीं भरतो. गांवाचे दोन 'खल'—भाग 'चौधरी' आणि 'मोहल' नांवाचे आहेत. येथें तांब्या-पितळेचीं भांडीं होतात.

**करजगी**—मुंबई, धारवाड जिल्ह्याचा पूर्व तालुका. क्षे. फ. ४४१ चौरस मैल. यांत हावेरी हें मुख्य गांव व १२६ खेडीं आहेत. एकंदर लोकसंख्या १,१२,९७३. नैर्ऋत्येस डोंगराळ भाग खेरीज करून इतर प्रदेश सपाट आहे. यांतून तुंगभद्रेला मिळणारी वरदा नदी पूर्व-पश्चिम गेलेली आहे. वार्षिक पाऊस सरासरी ३० इंच पडतो.

**गांव**—हरिहर आणि हुबळी यांच्या दरम्यानचें सदर्न मराठा रेल्वेवरचें हें एक स्टेशन आहे.

**कॅरट**—(सुवर्ण भारमान) जव्हेरी लोकांचें रत्नें व मोत्यें वजन करण्याचें एक वजन. हें ३·१६ ग्रेन (ट्राय) भाराचें असतें. या शब्दाचा बहुधा उपयोग सोन्याचा कस दाखविण्याकरितां करतात. उदा.—एखाद्या सोन्याच्या चिपेमध्यें २४ भागांपैकीं २२ भाग शुद्ध सोनें असेल तर त्याला २२ कॅरटचें सोनें म्हणतात.

**करटोली**—करटोलीचे वेल रानांत पर्जन्यकाळीं येतात. हा वेल पांच-दहा हात पसरतो. या वेलास आषाढाच्या सुमारास फळें येतात. हीं फळें रंगानें हिरवीं असून त्यांवर सुरेख कांटे असतात. याची भाजी स्वादिष्ट असून पथ्यकर असते. गुजरातेंत हीं फार होतात. सर्व प्रकारच्या विषांवर करटोलीचा कांदा उपयोगी आहे.

**करडई**—पानें लांबट व कातरलेलीं अशीं असतात. हिचें झाड मोठें असून फुलें पिवळ्या रंगाचीं असतात. बियांचें तेल काढतात. फुलांचा कुसुंबा रंग होतो. पानांची भाजी होते.

**करंडक वर्ग**—या अलव्याच्या जातीच्या वनस्पती आहेत. यांमध्यें सूक्ष्म अशी एकच पेशी असते. या गोड्या व खाऱ्या पाण्यांत आणि दमट जागीं होतात. यांना पिंगट रंजक तंतू असतात. यांच्या पेशीभित्तींत मोठ्या प्रमाणांत सिकताद्रव्य (सिलिका) असतें. समुद्रांतील प्राणी या वनस्पतींवर निर्वाह करितात व खाद्य मत्स्यांचा आहारहि बहुतेक या वनस्पतींचाच असतो, त्यामुळें यांचें महत्त्व फार आहे. या वनस्पतींचे तृतीय युगांतील प्रास्तर अवशेष संयुक्त संस्थानांत रिचमंड येथें आढळतात. ग्वानो या पक्षिविष्टेमध्यें या वनस्पतींचें प्रमाण मोठें असतें.

**कॅरॅडोक भूश्रेणी**—भूस्तरशास्त्रामध्यें खालच्या सिल्यूरियन खडकांपैकीं वरच्या वर्गास हें नांव देण्यांत येतें. यामध्यें तांबड्या, जांभळ्या, हिरव्या, आणि पांढऱ्या रंगांचे अभ्रकमिश्र व गारमिश्र कंकर आणि चुनखडीच्या दगडामध्यें पोवळी, शिंपले (मोलस्का) व इतर जलचरांचे (ट्रीलोबाइट) प्रास्तर अवशेष सांपडतात. या श्रेणीस श्रॉपशायरमधील कायेरकरडोक या टेकड्यांच्या रांगेवरून नांव पडलें आहे.

**करण**—ही लेखकांची एक जात आहे. १९११ सालीं हिंदुस्थानांत एकंदर करण २,५५,६०९ होते. पैकीं बिहार-ओरिसामध्यें १,४७,५११, बंगालमध्यें ५३,१८६, मद्रासमध्यें ५४,१०९ व वऱ्हाड-मध्यप्रांतांत ९६३ होते. ययातिकेसरी

नांवाच्या ओरिसाच्या राजानें (इ. स. ४४७-५२६) यांस कारकुनी करण्याकरितां उत्तर हिंदुस्थानांतून आणिलें. हे हिंदु देवतांची पूजा करतात. यांच्यांत परमार्थ व कुंभीपतिया असे दोन पंथ आहेत. यांचा धंदा कारकून, शाळामास्तर, पटवारी व जमाखर्च लिहिण्याचा आहे. ओरिसामध्यें क्षत्रिय, करण, खांडाईत व उढिया अशा चार जाती आहेत.

**करताल**—एक वाद्य. चिपळ्यांप्रमाणेंच एका बाजूनें निमगोल व आंतील अंगानें सपाट असे काशाचे दोन तुकडे असतात. प्रत्येक तुकडा टीचभर लांब व तीन बोटें रुंद असतो; ह्याचा आकार मध्यावरून दोनहि अंगांस निमुळता होत जाऊन शेवटीं हाताच्या बोटाच्या टोंकासारखा असतो. प्रत्येक हातांत दोन, असे दोन्ही हातांत मिळून हे चार तुकडे असतात. हे चार तुकडे अंगठा व अनामिका आणि मधलें बोट ह्यांच्या पेरांत अटकळीनें खेळते धरावे लागतात, म्हणजे मधुर आवाज निघतो. ह्याचा उपयोग ताल धरण्याकडे होतो; तथापि पखवाजावर गत, पर्ण, आड, वगैरे तालांच्या खटपटींची मौज चालू असतां त्याच्या साथींत ह्याचा उपयोग झालेला दृष्टीस पडतो.

**करतोया**—बंगाल प्रांतांतील एक नदी. ही जलपैगुरी जिल्ह्याच्या अगदीं वायव्येस वैकुंठपूर जंगलांत उगम पावून २१४ मैल वाहत गेल्यावर बोग्रा जिल्ह्यांत इल्हालिया नदीला मिळते. या दोन्ही नद्या मिळून होणाऱ्या प्रवाहाला फुलझूर नदी म्हणतात व ती यमुनेला मिळते.

प्राचीन काळीं ही नदी फार पवित्र मानली जात असे, असें पुराणांवरून समजतें.

करतोया नदींत हल्लीं गाळ सांचलेला असून तींतून नावाहि चालत नाहींत, त्यामुळें तिला फारसें महत्त्व उरलेलें नाहीं.

**करंदीकर, जनार्दन सखाराम**—एक महाराष्ट्रीय संपादक व लेखक. यांचा जन्म १८७५ मध्यें झाला. यांचें शिक्षण पुणें येथें झालें. हे १८९८ ते १९०३ पर्यंत मुधोळ हायस्कूलचे हेडमास्तर होते. १९०३ मध्यें हे एल्एल्. बी. झाले व १९०५ पर्यंत धारवाड येथील व्हिक्टोरिया हायस्कूलमध्यें शिक्षक होते. तेथून ते समर्थ विद्यालयास येऊन मिळाले व तेथील बोर्डिंगचे सुपरिटेंडेंट होते. 'समर्थ' व 'ग्रंथमाला' या नियतकालिकांचे ते सहसंपादक होते. १९१५ मध्यें ते 'केसरीचे' दुय्यम संपादक झाले व १९३५ मध्यें संपादक झाले. सध्या ते 'केसरी'चे एक विश्वस्त आहेत. यांनीं मुळशी सत्याग्रहांत भाग घेतला होता. सत्याग्रहाच्या चळवळींत यांस शिक्षा झाली होती. यांनीं कौटिलीय अर्थशास्त्राचें भाषांतर केलें आहे व 'जगांतील क्रांतिकारक युद्धें' व 'हिंदुत्ववाद' हीं पुस्तकें लिहिलीं आहेत. यांचा महाभारताचा व ज्योतिषशास्त्राचा खोल अभ्यास आहे. गीतेची सर्वांगीण चर्चा करणारा 'गीतातत्त्वमंजरी' नांवाचा ग्रंथ यांनीं नुकताच प्रसिद्ध केला आहे.

**करंदीकर, रघुनाथ पांडुरंग**—(१८५७-१९३५). एक महाराष्ट्रीय कायदेपंडित. यांचा जन्म २१ ऑगस्ट १८५७ रोजीं झाला. हे खाडिलकर घराण्यांत जन्मले व करंदीकर घराण्यांत दत्तक गेले (१८८५). यांचें शिक्षण सातारा व पुणें येथें झालें. १८८४ मध्यें हे सबजज्ज होते. १८८५ मध्यें मोर फॉरेस्ट कमिटीचे सभासद होते. १९११ मध्यें हे मुंबई कायदेमंडळांत निवडून गेले. १९१९ मध्यें यांच्या हस्तें इंग्लंडमधील यार्कशायर परगण्यांतील लिव्हले या गांवीं भरलेल्या हिंदी परिषदेचें उद्घाटन करण्यांत आलें. १९२८ मध्यें भरलेल्या प्रांतिक पोस्टल व आर. एम. एस्. परिषदेचे हे अध्यक्ष होते. वेस्टर्न इंडिया लाइफ इन्शुअरन्स कंपनीच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सचे हे चेअरमन होते. हे कौन्सिल ऑफ स्टेटचे पांच वर्षें सभासद होते. पुणें येथील लॉ कॉलेजमध्यें कांहीं काळ प्रोफेसर होते. डॉ. केतकर यांनीं पुणें येथें भरविलेल्या राजकीय परिषदेचे हे अध्यक्ष होते.

**करन कवि**—गोड व सुरस काव्यांबद्दल प्रसिद्ध असलेले हे हिंदी कवि कान्यकुब्ज देशांत जमीनदार असून छत्रसालच्या वंशजाच्या (पन्ना-नरेश) दरबारीं असत. 'साहित्यरस' व 'रसकल्लोळ' या नांवाचीं त्यांचीं दोन काव्यें (रीती ग्रंथ) सुप्रसिद्ध आहेत. यांनीं व्यंजना, लक्षणा, ध्वनिभेद, प्रास, अनुप्रास, वगैरे विषयांचें संपूर्ण विवेचन साहित्यरसांत केलें आहे. यांचा कविता-काल सन १८०२ चा सुमार असावा.

**करबला**—इराक. हें शहर बगदाद प्रांतांतील एका भागाची राजधानी आहे. चौथा खलिफा अली याचा मुलगा हुसेन याची त्याचा प्रतिस्पर्धी जो यझीद त्याच्या सैन्यानें ह्या गांवीं ता. १० ऑक्टोबर ६८० रोजीं कत्तल केली. ह्या ठिकाणीं पाहण्यासारखी अशी हुसेनची कबर असून तिचा घुमट सोन्याचा आहे. शिया पंथाचे मुसलमान येथें यात्रेला येतात. मक्केच्या खालोखाल या ठिकाणीं यात्रेकरूंचा भरणा असतो. येथील लोकसंख्या सुमारें १,२४,२९०. त्यांपैकीं बहुतेक लोक शिया पंथाचे इराणी आहेत. यहुदी व ख्रिस्ती लोकांना येथें राहण्यास मनाई आहे.

**करमणूक कर**—नाटकें, सिनेमा, प्रदर्शनें, खेळ, गाणीं, इ. करमणुकींवर सरकार कर बसवितें व तो तिकिटांच्या विक्रीवर ठराविक दरानें वसूल करतें. इंग्लंडमध्यें हा कर प्रथम १९१६ त आला. हिंदुस्थानांत बहुतेक प्रांतिक सरकारांनीं आतां हा कायमचाच बसविलेला आहे. मुंबई प्रांतांत प्रथम शिक्षणखात्याकडे याचा उपयोग करण्याचें सरकारनें आश्वासन दिलें होतें, पण तें पाळलें गेलें नाहीं. मोफत तिकिटांवर, तसेंच शैक्षणिक आणि धर्मार्थ खेळांवर हा कर कांहीं अटींवर माफ करण्यांत येत असतो.

**करमाळें**—मुंबई, सोलापूर जिल्ह्यामधील तालुका. क्षे. फ. ७७२ चौरस मैल. यांत करमाळें (मुख्य ठिकाण) व दुसरीं १२२ गांवें आहेत. लोकसंख्या १,०३,०२१.

करमाळें गांव हें जी. आय्. पी. रेल्वेवरील जेऊर स्टेशनापासून उत्तरेस सुमारें १२ मैलांवर आहे. हें तालुक्याचें ठिकाण असून लोकसंख्या ७,२१० आहे. येथें पूर्वी निंबाळकर घराण्याची एक शाखा असून त्यांच्याकडे सभोंवतालच्या मुलुखाची जहागीर असे. या गांवाचा संस्थापक रंभाजी बावाजी यानें बांधलेला एक किल्ला येथें असून त्यामध्यें तालुका–कचेरी आहे. येथें कांहीं विणकरी आहेत व पागोट्याचा कुसुंबी रंगहि चांगला होतो. व उत्तम टिकाऊ कापड निघतें. हें इ. स. १७२५ पासून निजामउलमुल्कच्या ताब्यांत होतें. तें त्यानें १७२७ मध्यें रंभाजीराव निंबाळकर यास त्याच्या कांहीं पुण्यांतील प्रदेशांबद्दल मोबदला म्हणून दिलें.

**करवती मासा**—हे रे-माशाच्या जातीचे मासे असून यांची लांबी बारा ते अठरा फूट असते. हे लहान माशांचे थवेच्या थवे नाहींसे करतात व देव माशावरहि चाल करून जातात. यांच्या तोंडापुढें करवतीसारखा भाग असतो.

**करवंद**—हें एक कांटेरी झुडुप आहे. अयोध्या, बंगाल, दक्षिण हिंदुस्थान, कोंकण व कानडा येथील जंगलांतून हीं झाडें आपोआप उगवतात. ऐने-इ-अकबरींत (१५९०) हीं फळें एका रुपयाला ४० शेर मिळत असल्याचा उल्लेख केला आहे. कातडीं कमाविण्यास व रंग बनविण्यास यांचा उपयोग करितात. कच्च्या फळांचें लोणचें व शिजवलेल्या फळांचें रायतें, मुरंबा, करतात. पिकलेलीं फळें खातात. हीं फळें पित्त व दाहशामक आहेत. याचीच दुसरी जात नेहमीं हिरवें असणारें कांटेरी झुडुप आहे.

**करवली**—करौली. हे राजपुतान्यांतील पूर्वेकडील एक संस्थान आहे. क्षेत्रफळ १,२४२ चौ. मैल. दक्षिणेकडे भैरव व उटगीर हीं सर्वांत मोठीं शिखरें आहेत. चंबळा, बनास, मोरेल व पंचनद ह्या संस्थानांतील मुख्य नद्या होत. जंगलांत वाघ, चित्ता, आस्वल, वगैरे प्राणी पुष्कळ आढळतात. हवा एकंदरींत बरी असून वार्षिक पाऊस सरासरी २९ इंच पडतो. संस्थानांत ४३७ गांवें असून एकंदर लोकसंख्या सुमारें दीड लाख आहे. शें. ९४ लोक हिंदु धर्मी असून मुख्यतः कृष्णभक्त आहेत. बाजरी, हरभरा, उडीद, गहूं, खसखस व ऊंस हीं पिकें संस्थानांत होतात. करवली हेंच संस्थानच्या राजधानीचें ठिकाण. याची लोकसंख्या १९,८०३ आहे. गांवाच्या बाहेर तटबंदी व खंदक असल्यामुळें गांवाची सुरक्षितता दुप्पट झाली आहे. प्रताप सरोमान देवालय हें सर्वांत सुंदर आहे. हल्लींचे महाराज सर भोमपालदेव बहादूर आहेत. संस्थानचें उत्पन्न साधारणपणें सातआठ लाख रुपये असतें. संस्थान आतां मत्स्य संघांत सामील झालें आहे.

**करवी**—संयुक्त प्रांत, बांडा जिल्ह्याची आग्नेयीकडील तहशील. क्षे. फ. ४७८ चौ. मैल. लोकसंख्या सुमारें पन्नास हजार. तहशिलीचें मुख्य ठिकाण करवी. पश्चिमेस पैशुनी नदी आहे. येथून चित्रकूट जवळ आहे. लो. सं. दहा हजार आहे. १८२९ मध्यें करवी येथें दुसऱ्या बाजीरावाचे दत्तक भाऊ अमृतराव पेशवे यांचे चिरंजीव विनायकराव यांनीं कित्येक सुंदर देवालयें, वाडे व विहिरी बांधल्या. या वेळीं दक्षिणेकडील पुष्कळ व्यापारीहि तेथें राहावयास गेले. त्यांच्या गणेशबाग राजवाड्यांत हल्लीं तालुका कचेऱ्या व शाळा आहेत. करवीस विनायकराव यांच्या मुलीचा दत्तकवंश नांदत आहे.

**करसनदास, मूळजी** (१८३२–१८७१)—एक गुजराती समाजसुधारक. यांना गुजरातचे आगरकर म्हणतां येईल. यांनीं वल्लभपंथाच्या गुरूंनीं धर्माच्या नांवावर चालविलेले अनाचार लोकांपुढें मांडले. तेव्हां यांचा भाटिया जातीकडून बराच छळ झाला, तथापि यांनीं कोर्टांत खटला लढविला. हा खटला 'महाराजा लायबेल केस' म्हणून प्रसिद्ध आहे. हे 'सत्यप्रकाश', 'रास्तगोफ्दार', 'स्त्रीबोध' या नियतकालिकांचे संपादक होते व यांनीं गुजराती वाङ्मयांत अनेक ग्रंथ लिहून उत्कृष्ट भर घातली आहे. 'इंग्लंडचा प्रवास' या प्रवासवर्णनाचें मराठींत भाषांतर झालें आहे.

**कॅराकस**—दक्षिण अमेरिका, व्हेनेझुएलाची राजधानी. या शहरांतून ग्वायना व तिला मिळणाऱ्या नद्या वाहतात. येथें बरेच धरणीकंप झाले आहेत. कित्येक शोभिवंत चौक, पुतळे व वृक्षलता यांनीं युक्त असे सार्वजनिक बगीचे येथें आहेत. प्लाझा दबोलिव्हार या मुख्य चौकाच्या समोर कॅथेड्रल, आर्च बिशपचा वाडा, कासा ॲमॅरिला, राष्ट्रीय पुस्तकालय, पोस्ट ऑफिस व इतर सार्वजनिक इमारती आहेत. कागद, सीमेंट साबण व कापड येथें तयार होतें. कोको, कॉफी, तंबाखू हीं निर्यात होतात. दगो द लेसादा यानें १५६७ मध्यें हें शहर वसविलें. येथील लोकसंख्या २,६९,०३०.

**कराची**—सिंध प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. ११,९७० चौ. मैल. मुलूख डोंगराळ आहे. सिंधु नदीच्या मुखप्रदेशांतील प्रदेश विस्तीर्ण, सखल व सपाट पसरलेला असून त्यांत फक्त समुद्राला जाऊन मिळणाऱ्या लहान लहान खाड्या तेवढ्या आहेत. आंबा, बोर, खजूर, अंजीर, केळें व डाळिंब हीं मुख्य फळें होत. कराची शहर व त्याच्या आसपासचा प्रदेश खुला असून तेथें समुद्रावरील वारे वाहतात. हवा फार चांगली आहे. जिल्ह्यांतील सरासरी वार्षिक पाऊस ७·५ इंच आहे. या जिल्ह्यांत कराची,

काटी, कोत्री, मानझंद व ठठ्ठा हीं मोठीं गांवें व ६२८ लहान गांवें असून एकंदर लो. सं. सात लाख आहे. पैकीं शें. ७७ मुसलमान, शें. २१ हिंदू व शें. १ ख्रिस्ती पाकिस्तान होण्यापूर्वी होते. बहुतेक लोक सिंधी भाषा बोलतात. ज्वारी, बाजरी, तांदूळ व गहूं हीं या जिल्ह्यांतील मुख्य पिकें आहेत. कराची जिल्ह्यांतील म्हशींचें तूप प्रख्यात आहे. येथील गाईंचीहि दूध देण्याबद्दल ख्याति असून त्या मुंबईस विक्रीकरतां पाठविण्यांत येतात. मुसलमान लोकांपैकीं मुहान जातीचे लोक समुद्रकांठीं मासे मारण्याचा धंदा करतात. सुती कापड, रेशमी ओढण्या, गालिचे, रंग व सामान्य धातूचीं भांडीं, वगैरे जिन्नस येथें तयार होतात. ठठ्ठा शहर बायकांच्या लहंग्याकरतां प्रसिद्ध आहे. कराची जिल्ह्यांत कराची, काटी व सिरगंद अशीं तीन बंदरें आहेत.

कराची ही पाकिस्तानची राजधानी. हें शहर मुंबईपासून रेल्वेनें ९९३ मैल व जलमार्गानें ४८३ मैल आहे. लो. सं. ३,५९,४९२. बंदर रस्त्याच्या बाजूला जुना व अतिशय दाट वस्तीचा भाग आहे. मॅकलिऑड रस्त्यावर मुख्य कोर्टें, बँका, रेल्वे स्टेशन, पोस्ट व तार ऑफिसें, इत्यादि आहेत. गांवाच्या उत्तरेस व पूर्वेस लष्करी छावणी असून तेथून सुमारें अर्ध्या मैलावर सार्वजनिक बाग आहे; तींत वन्य प्राण्यांचा संग्रह केला आहे. कराची येथील म्युनिसिपालिटी १८७२ त स्थापन झाली. आर्टस् कॉलेज, एंजिनिअरिंग कॉलेज, सरकारी व निमसरकारी हायस्कुलें, प्राथमिक शाळा व व्यापारी शाळा या शहरांतील शिक्षणसंस्था होत. या शहरांत इंग्रजी, सिंधी, गुजराती व फारसी भाषेंत मिळून सुमारें १७-१८ वर्तमानपत्रें निघतात. कराची हें हिंदुस्थानांतील एक महत्त्वाचें व्यापारी बंदर असून विमानमार्गांना प्रमुख तळ येथें आहे.

**करार, जुना व नवा**— बायबलमध्यें ( Exodus 19 ) सांगितल्याप्रमाणें परमेश्वर आणि हिब्रू लोक यांच्यामध्यें जो करार झाला त्यास ख्रिस्ती दैवतशास्त्रामध्यें हें नांव देण्यांत आलें आहे. याचा अर्थ मृत्युपत्र किंवा इच्छा असून तो येथें व्यापक अर्थानें वापरण्यांत आलेला आहे. परमेश्वरानें हिब्रू लोकांनीं जर त्याचे नियम पाळावयाचें कबूल केलें तर त्यांस आपले लोक असें मान्य करावयाचें वचन दिलें होतें. ही गोष्ट त्यांनीं मान्य केली व नंतर परमेश्वरानें आपल्या आज्ञा मोझेस यास सिनाई पर्वतावर बोलून दाखविल्या. या करारास जुना करार असें म्हणतात. हा करार परमेश्वराचा प्रेषित येशू ख्रिस्त या जगांत येईपर्यंत पाळावयाचें ठरलें होतें. येशू ख्रिस्त आल्यानंतर त्यानें नवा करार स्थापन केला. नव्या करारांचें जुन्या कराराशीं फारच क्वचित् साम्य आहे. या दोहोंमध्यें परमेश्वराचे नियम पाळणें ही आवश्यक अट आहे. परंतु हे नियमहि अंशतः भिन्न आहेत. मोझेसनें घालून दिलेले बहुतेक पाळावयाचे नियम येशू ख्रिस्तानें बदलून टाकले आणि त्यानें शुभवर्तमानामध्यें प्रस्तुत केलेले नियम दाखल केले. जुन्या करारामध्यें आकुंचित राष्ट्रीय वृत्ति होती व त्यामुळें फक्त हिब्रू लोकांनाच या संप्रदायांत प्रवेश मिळूं शकत होता. नवीन करारामध्यें सर्व जगांतील लोकांस अमर्यादित प्रवेश मिळूं लागला. परमेश्वराच्या या नवीन लोकांमध्यें येशूनें स्थापन केलेल्या संप्रदायामध्यें कोणासहि मज्जाव नव्हता, मग त्याचा वंश, वय, लिंग किंवा सामाजिक परिस्थिति कोणतीहि असो. जुन्या कराराप्रमाणें पाळावयाच्या नियमांमध्यें बरेचसे बाह्य विधी असून अन्तःकरणांतील पावित्र्याची भावना फारशी नव्हती. नवीन कराराप्रमाणेंहि जरी कांहीं विधी पाळावयाचे असले, व तसे सर्वच समाजांमध्यें असतातच, तरी मुख्य भर अन्तर्गत लीनता व दया यांवर दिलेला असून प्रत्येक ख्रिस्ती मनुष्यास स्वतःच्या क्षुद्रतेची जाणीव झालेली असली पाहिजे आणि त्यानें परमेश्वरावर व मनुष्यावर आपला प्राणहि अर्पण करण्याइतकें प्रेम केलें पाहिजे. मनुष्यानें धारण करावयाच्या या नम्रतेच्या उलट परमेश्वरानें मनुष्याला फार मोठ्या योग्यतेस चढविलें आहे. नव्या करारामध्यें परमेश्वरानें मनुष्यास आपला दत्तक पुत्र मानिलें आहे. तो त्याचा पिता आहे आणि सर्व लोक त्याचे बंधू आहेत.

जसा जुन्या करारावर एका यज्ञानें शिक्का करण्यांत आला होता तसा नवीन करारावर येशू ख्रिस्तानें आत्मयज्ञ करून शिक्का केला आहे. तो स्वतः यज्ञकर्ता व यज्ञबलि होऊन त्यानें आपल्या मृतभूमीवर रक्त सांडून नव्या करारावर शिक्कामोर्तब केलें आहे व मनुष्यास परमेश्वराचीं लेंकरें होण्याचा व स्वर्गाचे वारस होण्याचा हक्क मिळवून दिला आहे.

करार हा शब्द शास्त्र या अर्थींहि वापरण्यांत येतो. ख्रिस्तपूर्व बायबलच्या भागास जुना करार व ख्रिस्तोत्तर भागास नवा करार असें मानतात.

**करार**—सौदा; बोली; कायद्यानें अमलबजावणी करतां येईल अशी कबुलायत. व्यवहारांत हा कायदा अत्यंत महत्त्वाचा आहे. याज्ञवल्क्यस्मृतींत सध्यांच्या कायद्याप्रमाणें करार नाहीं; तथापि वेतनादान, ऋणादान, वगैरे प्रकरणांत कराराचा कांहीं भाग सांपडतो. पाश्चात्य देशांत रोमन लोकांनीं या बाबतींत उत्कृष्ट कायदा केलेला होता.

कर्जाऊ दिलेल्या पैशाबद्दलच्या फिर्यादीला करारशास्त्रांत स्थान आहे. वचनभंगाबद्दल दावा लावण्याचा हक्क इंग्लंडांत १७ व्या शतकांत लोकांना मिळाला व कोणत्याहि तऱ्हेचा कायदेशीर सौदा न्यायकोर्टाला मान्य होऊन त्याची बजावणी होण्यास

अडचण राहिली नाहीं. या कायद्याची बजावणी त्या वेळेपासून सुरू आहे.

एखादें वचन कायदेशीर होण्यास तें कांहीं मोबदला घेऊन नंतर दिलें गेलें पाहिजे; वचन आणि मोबदला या क्रिया एकाच वेळीं झाल्या पाहिजेत. करारांचें बंधन दोन्ही पक्षांच्या खुषीनें तयार होत असतें व ठरविलें जातें. लेखी करारांतील अटी तोंडी पुराव्यानें बदलतां येत नाहींत. जे करार पहिल्यापासूनच उघड उघड अप्रयोजक, अयुक्त किंवा अशक्य असतील त्यांची अमलबजावणी करतां येणार नाहीं. स्वाभाविक प्रेमानें व नेहमींच्या चालीरीतीप्रमाणें दिलेल्या मोठमोठ्या देणग्या किंवा नमूद केलेले करार तेवढेच कायद्याला संमत आहेत. एरवीं अशा गोष्टीला कोणतेंहि सुधारलेलें कायदेशास्त्र पुष्टि देत नाहीं. अज्ञान्यांशीं केलेले करार विशेष आवश्यक गोष्टींपुरतेच त्यांना बंधनकारक होतात.

पूर्वी लग्न झालेल्या बायकांना आपल्या नांवानें करार करतां येत नसे, पण आतां त्यांची इस्टेट निराळी करून त्यांना करार करतां येतो. कंपन्यांनीं जें उद्देशपत्रक व स्थापनेच्या नियमांची यादी सरकारांत रजिस्टर केलेली असते तो एक भागीदारांशीं केलेला करारच होय. कंपन्यांना तो बंधनकारक असतो.

करारानें प्राप्त झालेले हक्क हे वचन देणारावर व त्याच्या कायदेशीर प्रतिनिधीवर गाजवावयाचे वैयक्तिक हक्क आहेत. हे हक्क पैशांनीं देखील मोजतां येतात व मनुष्याच्या मिळकतीचा एक भाग असे यांस मानतात ( उदा., वहींत नोंदलेलें कर्ज ). हे हक्क म्हणजे जिंदगीच होय. यांची देवघेव करतां येते. हिंदुस्थानांत ( १८७२ चा ९ वा ) कराराचा कायदा इंग्लिश कायद्याला धरूनच केलेला आहे.

**करराष्टमी**— अश्विन महिन्यांतील वद्य अष्टमी. या दिवशीं कुमारिका गंगोदकानें भरलेला करा हातांत घेऊन देवीची पूजा करितात. ही चाल काशीच्या बाजूस दृष्टीस पडते.

**कॅरिअन लोक**—ह्यांचा देश ईजियन समुद्राच्या पूर्व किनाऱ्यावर लीडियाच्या दक्षिणेला आहे. कॅरियन लोक मूळचे कॅरियांतलेच असा डोरियनांचा समज आहे. हे लोक चांगले लढवय्ये होते. ग्रीकांच्या सैन्यांत कॅरियन लोक द्रव्याच्या आशेनें नोकऱ्या करीत असत. ख्रि. पू. ८ व्या व ७ व्या शतकांत कॅरियन लोकांनीं समुद्रावर लुटालुटी चालवून इतरांना बरेंच भंडावून सोडलें होतें. झ्यूस ही त्यांची देवता असून त्यांच्या नाण्यांवर याच देवतेची मूर्ति असे. कॅरियामध्यें हालिकारनेसस हें शहर सर्वांत प्रसिद्ध होतें. पुढें कॅरिया रोमन साम्राज्याला जोडण्यांत आलें.

**करिआप्पा, जनरल** ( १९०१– )—स्वतंत्र हिंदुस्थानचे पहिले सरसेनापति. हे कुर्ग प्रांताचे रहिवासी असून १९२० सालीं हे इंडियन कॅडेट म्हणून लष्करांत दाखल झाले. १९२३ सालीं रजपूत रेजिमेंटमध्यें नेमणूक व पुढें चढत जाऊन मुख्य अधिकारी झाले. गेल्या महायुद्धांत यांनीं बरीच महत्त्वाची कामगिरी केली. हिंदी लष्कराच्या पुनर्घटनेच्या समितीचे ते एक सभासद होते. १९४७ त चीफ ऑफ जनरल स्टाफ व नंतर जानेवारी १९४८ त तीन विभागांचे प्रमुख झाले. जानेवारी १९४९ पासून सरसेनापति.

**करिकाल चोल** ( १५०–१८० )— चोल घराण्यांतील हा पहिला प्रसिद्ध ऐतिहासिक पुरुष. याचा पिता उरुवप्पहरेर इळचोन. चेर राजा व चोल यांचें वांकडें असल्यानें चेर राजानें याचें बरेंचसें राज्य हस्तगत केलें. त्यामुळें यास कांहीं दिवस अज्ञातवासांत काढावे लागले. परंतु यानंतर यानें तयारी करून पाण्ड्य व चेर या दोन्ही राजांना जिंकून चेर राजकन्येशीं लग्न केलें. आपली बहीण चेर राजास देऊन दोन्ही घराण्यांतील यादवी नाहींशी केली. आपल्या राज्यास चिरस्थायित्व यावें, व्यापाराची भरभराट व्हावी, न्याय योग्य तो मिळावा, यांसाठीं यानें प्रयत्न केले. आपल्या राज्याची मर्यादा यानें उत्तरेस हिमालयापर्यंत वाढवल्याचे उल्लेख आढळतात. शेवटीं हा सम्राट् झाला. हा विद्वानांचा चहाता होता. अवंतीराज, मगधराज, आणि बुंदेलखंडाचा वज्रराज हे याचे मित्र होते.

**कॅरिंगटन, रिचर्ड ख्रिस्तोफर** ( १८२६–१८७५ )— हा ब्रिटिश खगोलशास्त्रज्ञ असून यानें १८५३ मध्यें सरे परगण्यांत रेड हिल येथें एक वेधशाळा उभारिली आणि तेथें त्यानें सूर्यावरील डाग आणि सूर्याचें भ्रमण यांबद्दल महत्त्वाचें संशोधनकार्य केलें. त्याच्या ग्रंथांपैकीं 'ध्रुवाभोंवतालचे तारे', 'सूर्यावरील डाग' यांसंबंधाचे ग्रंथ महत्त्वाचे आहेत.

**करीमखान**—हा एक शिंदेशाहींतील पेंढारी असून यानें खर्ड्याच्या लढाईनंतर ( इ. स. १७९५ ) निजामाच्या सैन्याची जी लूट झाली, तींत बराच पैसा मिळविला. कावेबाजपणा व धाडस या गुणांत हा सर्व पेंढाऱ्यांत श्रेष्ठ असल्यामुळें त्यांचा पुढारी बनला. अमीरखानानें करीमखानास शुजालपूर जिल्हा दिला. एकदां तर त्याच्या मुलखाचा वसूल १५ लाख रुपयांपर्यंत गेला होता असें म्हणतात ! शिंद्यानें एकदां कांहीं तोफा देण्याचें मिष करून त्याला आपल्या भेटीस बोलाविलें व कैद करून ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत अटकेंत ठेवलें. पुढें करीमखानानें पैसे भरून आपली सुटका करून घेतली. करीमखान इंग्रजांस शरण आल्यानें त्याला गणेशपूर येथील जहागिरी दिली.

परंतु १८५८ च्या बंडांत भाग घेतल्याच्या आरोपावरुन ही जहागिरी खालसा झाली.

**करीमगंज**—आसाम, सिल्हट जिल्ह्याचा आग्नेय पोटविभाग. क्षे. फ. ८२० चौ. मै.. यांत करीमगंज हें मोठें गांव (मुख्य ठिकाण) व शिवाय १०८६ खेडीं आहेत. दक्षिणेचा भाग टेंकड्यांच्या योगानें बराच तुटलेला आहे. लो. सं. सुमारें चार लाख. करीमगंज गांवांत पाऊस १६० इंचांपर्यंत पडतो. परंतु लगई खोऱ्यांत पावसाचें मान यापेक्षां ५० इंच कमी असतें. या पोटविभागांत चहाची लागवड बरीच होते.

गांव कुसियारा नदीच्या डाव्या तीराला आहे व व्यापाराला फार सोईचें असून नदींतून चालणारीं जहाजें येथें लागतात. शिवाय हें आसाम-बंगाल रेल्वेचें स्टेशन आहे. लो. सं. आठ हजार.

**करीमनगर (एलगंडल)**—हैद्राबाद संस्थान, वारंगळ विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ७,२०३ चौ. मै. या जिल्ह्यांतून गोदावरी व तिच्या शाखा वाहतात. पाऊस ३३ इंच. करीमनगर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. शेंकडा ९६ लोक हिंदू आहेत. शें. ३५ लोक शेतकीवर उपजीविका करतात. मुख्य पीक ज्वारीचें आहे. जिल्ह्यांत लोखंड सांपडतें; विणकाम पुष्कळ होतें. व्यापार पुष्कळ चालतो. साक्षरता फार कमी आहे. पूर्वी हा वारंगळ राज्याचा एक भाग होता. यांत बरेच किल्ले, देवळें व मशिदी पाहण्यासारख्या आहेत.

**करूर**—मद्रास इलाख्यांतील त्रिचनापली जिल्ह्यामधील आग्नेय तालुका. क्षे. फ. ६१२ चौ. मैल. लो. सं. सु. तीन लाख.

गांव-याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें अमरावती नदीच्या कांठीं असून साउथ इंडियन रेल्वेवर आहे. लो. सं. सु. वीस हजार. सात पवित्र स्थलांपैकीं करूर हें एक आहे. 'करूर' याचा अर्थ गर्भपूर असा असून ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न करण्यास येथूनच सुरुवात केल्यामुळें या गांवाला हें नांव मिळालें अशी समजूत आहे. पौराणिक दंतकथांतून या गांवाचा उल्लेख ब्रह्मपुरी या नांवानें केलेला आढळतो. प्राचीन काळीं हें गांव बरेंच महत्त्वाचें असावें. येथें वेस्लेयन मिशनचें ठाणें असून त्याच्या दोन औद्योगिक शाळा आहेत. हिंदूंचीं बरींच छत्रें गांवांत आहेत.

**कॅरे, हेन्री चार्लस** (१७९३-१८७९)—एक अमेरिकन अर्थशास्त्रज्ञ. यानें राज्यशास्त्रावर व इतर अनेक आर्थिक आणि सामाजिक विषयांवर ग्रंथ लिहिले आहेत.

**कॅरे, विल्यम** (१७६१-१८३४)—एक इंग्रजी मिशनरी व प्राच्यविद्यापंडित. यानें श्रीरामपूर येथें १८०० सालीं एक मिशनरी कॉलेज उघडलें. तसेंच एक छापखाना घालून बायबलची देशी भाषांतून भाषांतरें छापलीं व यानें बऱ्याच भाषांचे कोश व व्याकरणें तयार केलीं. इ. स. १८१० मधील त्याचा लहानसा मराठी कोश मोडी लिपींत छापलेला आहे. तसेंच बंगाली कोश व व्याकरण, कानडी आणि तेलंगी व्याकरण त्यानें रचलेलें असून हीं पुस्तकें त्या त्या भाषेंतील पहिलीं छापील पुस्तकें होत. कलकत्त्याच्या फोर्ट विल्यम कॉलेजांत कॅरे ३० वर्षे प्राध्यापक होता व तो हिंदुस्थानांतच वारला.

**करेण**— नैर्ऋत्य चीनच्या दिशेनें ब्रह्मदेशांत आलेल्या इंडो-चिनी राष्ट्रजातीचा समुदाय. थटोक, म्यौंगम्या व टोंग जिल्ह्यांत त्यांची वस्ती सर्वांत जास्त आहे. १९०१ मध्यें एकंदर करेणांची संख्या ११,०२,६९५ होती; त्यांत बहुधा स्त्री-करेणांचें प्रमाण जास्त असावें. करेण हे बहुशीं डोंगरी लोक असले तरी त्यांच्यापैकीं पुष्कळ लोक मैदानी प्रदेशांत कायमचे राहूं लागले आहेत. निरनिराळ्या गोत्रांचे लोक ओळखतां यावेत म्हणून त्यांच्या पोषाखांत भिन्नता ठेवलेली असते. करेण हे मुख्यतः शेतकरी आहेत. आतां त्यांच्यापैकीं पुष्कळांनीं बौद्ध किंवा ख्रिस्ती धर्म स्वीकारले आहेत. करेणांच्या मुख्य दोन पोटजाती आहेत. त्यांपैकीं प्रत्येकीची भाषा स्वतंत्र व परस्परांपासून अगदीं निराळी आहे.

**करेण्णी**—ब्रह्मदेशांत, साल्वीन नदीच्या दोन्ही तीरांवर असलेल्या तांबड्या करेण लोकांचा देश. या देशाचे पूर्व करेण्णी व पश्चिम करेण्णी असे दोन भाग आहेत. पैकीं पहिल्यांत गंतरवडी (२,५०० चौ. मैल) हें एकच संस्थान असून दुसऱ्यांत क्येबोग्यी, बवलेक, नमोकोन व नौंगपले अशीं चार लहान संस्थानें आहेत. या देशांतून साल्वीन व तिला मिळणारी नमपॉन या दोन नद्या वाहतात. करेण्णींतील सर्व संस्थानें ब्रिटिशांचीं मांडलिक होऊन त्यांना खंडणी देऊं लागलीं. १९०१ त करेण्णींची एकंदर लो. सं. ४५,९७५ होती. ह्या देशाची मुख्य संपत्ति सागाचें लांकूड ही होय. त्याचें साहित्यग्रंथांतील नांव किरात हें असून ते लढाऊ लोक आहेत. करेण्णी लोक शपथा फार इमानानें पाळतात. करेण लोक हे ज्यू लोकांपैकीं असून त्यांची भाषा व हिब्रू भाषा यांमध्यें साम्य आहे. हे लोक नाहींसा झालेल्या दहा जातींपैकीं असले पाहिजेत असें कांहीं पाद्री समजतात. केल्हा व आत्मा हे एक नाहींत, केल्ह्याचा अर्थ जीवित किंवा अस्तित्व असा आहे, तो आपल्या मनाप्रमाणें शरीरांत राहतो व वाटेल त्या वेळीं निघून जातो, अशा यांच्या धार्मिक समजुती आहेत.

**करेला**—आपल्या देशी तालमींत व्यायाम करण्याचीं जीं अनेक उपकरणीं आहेत त्यांत करेला हें एक महत्त्वाचें साधन आहे. निरनिराळ्या तालमींतून निरनिराळ्या आकाराचे करेले

दृष्टीस पडतात. करेला जोडीपेक्षां जास्त उंच व जास्त वजनदार असतो, त्यामुळें तो त्याच्या वजनास अनुसरून दोन्ही हातांनीं अथवा साधल्यास एका हातानें फिरवितात. करेला लांच व वजनानें जड असल्यामुळें त्याचे फिरविण्याचे हात थोडेच आहेत. सुरवातीस कमी वजनाचा करेला फिरवावा व नंतर हातांत शक्ति येईल त्या मानानें जास्त वजनाचे करेले फिरवावे. करेला फिरविल्यानें खांद्याच्या स्नायूंस उत्तम प्रकारची मेहनत होते व खांदे चांगले घाटदार होतात.

**करोड**—मुंबई, भडोच पोटविभागांतील नर्मदेच्या उजव्या तीरावरील हिंदु यात्रेचें ठिकाण. अधिक वैशाखांत कोटिलिंगेश्वर किंवा कोटेश्वर याच्या नांवानें येथें यात्रा भरते व ती एक महिना चालते.

**कॅरोलस, ड्युरान** (१८३८–१९१७)—हा फ्रेंच चित्रकार असून त्याचीं पहिलीं दोन चित्रें (१) दि ईव्हिनिंग प्रेअर (सायंप्रार्थना) व (२) दि व्हिक्टीम ऑफ ॲसॅसिनेशन (खुनाचा बळी) यांकडे लोकांचें लक्ष वेधलें. त्यानें १८६९ मध्यें तयार केलेल्या 'लेडी वुइथ दि ग्लोव्ह' (हातमोजाची बाई) या चित्रानें त्याची फार प्रसिद्धि झाली. तें चित्र हल्लीं लग्झेंबर्ग म्यूझियममध्यें आहे. त्यानें ऐतिहासिक आणि धार्मिक चित्रें काढलेलीं आहेत. शिवाय त्यानें कांहीं कादंबऱ्या व लघुकथाहि लिहिल्या आहेत.

**कॅरोलिना, उत्तर**— उत्तर कॅरोलिना पहा.

**कॅरोलिना, दक्षिण**— हें अमेरिकन संयुक्त संस्थानांतील एक संस्थान असून त्याचें क्षेत्रफळ ३१,०५५ चौ. मैल (पैकीं ४९४ पाणी) आहे. लोकसंख्या १८,९९,८०४ आहे. याची राजधानी कोलंबिया शहर आहे. पण चार्ल्स्टन हें सर्वांत मोठें शहर आहे. या प्रदेशांत नद्या बऱ्याच आहेत. त्यामुळें २४०० मैल इतकी जहाजांची वाहतूक या एकंदर नद्यांमधून होते. येथें आगगाड्याहि बऱ्याच आहेत. चार्ल्स्टन हें मुख्य बंदर आहे. याचा समुद्रकिनाऱ्याकडील भाग सपाट असून पलीकडे आपालाचीयन पर्वताकडील भाग उंच डोंगराळ असून कित्येक ठिकाणीं त्याची उंची चार हजार फूट आहे. पश्चिम भाग सुपीक व तेथें पाण्याचा पुरवठा भरपूर असल्यामुळें शेती उत्तम होते. कापूस व भात हें मुख्य पीक असून दरसाल बराच कापूस व तांदूळ परदेशीं जातो. शिवाय गहूं, बार्ली, ओट व इतर धान्यें होतात. पण त्यांकडे कमी लक्ष असतें. या प्रदेशांत खनिज द्रव्यें विपुल आहेत. सोनें, लोखंड, मँगॅनिज, तांबें, शिसें, ग्रॅनाइट, चुना आणि स्फुरितखटमृत्तिका (फॉस्फेट-मार्ल) हीं येथें सांपडतात. येथें शिक्षण सक्तीचें नाहीं. परंतु अशिक्षित मुलांना खाणींत किंवा कारखान्यांत कामावर लावण्याबद्दल नियंत्रण आहे. कोलंबिया येथें १८०५ मध्यें स्थापन झालेलें विद्यापीठ आहे. भाताची लागवड येथें प्रथम १६९५ मध्यें सुरू झाली आणि नंतर कापसाची लागवड सुरू झाली. आणि या दोन पिकांमुळें या वसाहतीची भरभराट झाली.

**कर्क वर्ग**—(क्रस्टासिआ). हा एक संधिगात्रयुक्त अपृष्ठवंश प्राण्यांचा मोठा वर्ग आहे. ह्या प्राण्यांचें शरीर शीर्ष, वक्ष आणि उदर यांचें बनलेलें असतें. यांपैकीं शीर्ष आणि वक्ष मिळून एकच भाग झालेला असतो त्यास कपालवक्ष (सेफॅलोथोरॅक्स) असें म्हणतात. यावर एक ढालीसारखें कवच असतें. उदराचा भाग शेपटीसारखा दिसतो. कांहीं प्राण्यांमध्यें (उदा., वालुकाटोळ किंवा काष्ठयूका) डोक्याचा भाग वक्षस्थळापासून किंचित् पृथक् असतो. हे प्राणी आपल्या कल्ल्यांनीं किंवा अंतस्त्वचामय पिशव्यांच्या साहाय्यानें किंवा शरीराच्या पृष्ठभागाच्या साहाय्यानें श्वासोच्छ्वास करतात व यांचें शरीर निरनिराळ्या वलयांचें बनलेलें असतें. यांच्यामध्यें तुटलेलीं गात्रें पुन्हा वाढण्याची शक्ति फार मोठ्या प्रमाणांत असते. हे प्राणी प्रौढावस्थेंत येण्यापूर्वी यांच्यामध्यें अनेक रूपांतरें होतात व त्यांवरून त्यांचें वर्गीकरण करण्यांत येतें. यांच्या गर्भावस्थेच्या पहिल्या अवस्थेमध्यें यांचा आकार तीन गात्रांच्या जोड्यासारखा असतो. दुसऱ्या अवस्थेंत यांच्या शरीरांतील कपाल वक्षयुक्त भागास पुढचे, मागचे व बाजूचे कणे तयार होतात. यानंतर अनेक रूपांतरें होऊन हे प्राणी प्रौढावस्थेंतील स्वरूपांत दिसूं लागतात. परंतु सामान्यतः यांचे चार वर्ग करण्यांत येतात: १ सिरिपेडिआ. या वर्गांतील प्राणी कवचाबाहेर आपले पाय काढूं शकतात. २ एन्टोमोस्ट्राका, ३ पोडोफ्थाल्मिया अथवा शृंगाक्ष, आणि ४ एड्रीओफ्थाल्मिया—अंगनेत्री. यांपैकीं पहिल्या वर्गाचे प्राणी खुबा (बार्नेकल) जातीचे होत. दुसऱ्या वर्गाचे सायक्लोप, डाफानिया, इ.. तिसऱ्या वर्गांत खेकडे, शिंप हे येतात. आणि चौथ्या वर्गांत मत्स्ययूका, काष्ठयूका व हिमालयावरील डांस हे मोडतात.

कर्क उपवर्ग—हा एक पृष्ठवंश नसलेला समुद्रांतील प्राण्यांचा वर्ग आहे. हे कवचधारी असून यांचें रूपांतर व्युत्क्रम पद्धतीनें झालें आहे. हे मोठे झाल्यावर दुसऱ्या एखाद्या पदार्थास चिकटून असतात. खुबा (बार्नेकल) हा प्राणी या वर्गांत मोडतो.

**कर्कोट** (कर्कोटक)—१ कद्रूपुत्र एक नाग. हा नारदाच्या शापानें दावाग्नींत सांपडला असतां नल राजानें त्यास बाहेर काढून वांचविलें होतें. त्या उपकारानें त्यानें नलास दंश करून मुख्यत्वेंकरून कलीपासून त्यास पीडा न होईल असें केलें होतें. तसेंच वनवास संपेपर्यंत त्यास कोणीं ओळखूं नये म्हणून विरूपहि

केलें होतें. याच्या स्मरणानें कलिनाश होतो असें प्रातः-स्मरणाच्या श्लोकांत म्हटलें आहे.

२. भारतवर्षीय एक देश. भारतांत कर्कोटक लोकांस विधर्मीय म्हटलें आहे ( कर्णपर्व, अ. ४४ ).

३. एक राजवंश. काश्मीरांत इ. स. ६०२–८५६ पर्यंत कर्कोटक वंश होऊन गेला ( काश्मीर पाहा ). कर्कोटक नाग या वंशाचें रक्षण करीत असे, अशा समजुतीवरून हें नांव पडलें. या वंशांत १७ राजे होऊन गेले. यांचा मूळपुरुष दुर्लभवर्धन होता. हे राजे शिवोपासक असल्यानें काश्मीरांत बौद्ध धर्म उरला नाहीं. प्रतापादित्य, ललितादित्य यांसारख्या राजांनीं वाङ्मय आणि कला यांना उत्तेजन दिलें व राज्याची मोठी वाढ केली.

**कर्चहॉफ, गुस्ताव्ह रॉबर्ट** ( १८२४–१८८७ )— एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. विद्युच्चलनविषयक उपपत्त्यांसंबंधीं त्यानें महत्त्वाचें कार्य केलें; तसेंच बारीक शलाकांची स्थिति-स्थापकता यांतहि महत्त्वाचें संशोधन केलें आहे. वर्णलेखविश्ले-षणाची पद्धति हिचें श्रेय कर्चहॉफ व बुनसेन या दोघांना आहे.

**कर्ज**—स्वतःच्या उपयोगाकरितां घेतलेला दुसऱ्याचा पैसा, तो पैसा भाड्यासह ( व्याजासह ) परत करण्याच्या करारानें घेतल्यास त्या रकमेस ‘ कर्ज ’ म्हणतात. कर्ज घेणारास ‘ ऋणको ’ आणि कर्जाऊ रक्कम देणारास ‘ धनको ’ म्हणतात. बिनव्याजी रक्कम घेतल्यास तिला ‘उसनवार’ म्हणतात. याज्ञवल्क्यस्मृतींत व्यवहाराध्यायांत ऋणादान, आदानविधि या शब्दांखालीं कर्जाऊ व्यवहाराबद्दलचे सविस्तर नियम दिले आहेत. गहाण घेऊन कर्ज दिलें असल्यास दरमहा सव्वा टक्का ( कर्जरकमेचा ८० वा भाग ) व्याज घ्यावें; पण गहाण घेतलें नसेल तर दरमहा व्याज दोन ते पांच टक्के घ्यावें; आणि शिकारी व सैनिक यांच्याकडून व्याज दहा टक्के आणि जलमार्गानें जाणाऱ्या व्यापारी लोकांकडून वीस टक्के व्याज घ्यावें; कारण यांचा जीव धोक्यांत असल्यामुळें मुद्दल बुडण्याचा संभव असतो. पण व्याजाबद्दल महत्त्वाचा नियम, व्याजमुद्दलाची एकूण रक्कम दामदुप्पटीपेक्षां जास्त वेऊं नये, असा मनुस्मृतींत सांगितला असून अद्यापहि दामदुप्पटीचा नियम हिंदु कायद्यांत लागू आहे. तेल, तूप, वस्त्र, धान्य, सोनें, वगैरे जिन्नस कर्जाऊ घेतल्यास व्याजासह दुप्पट ते जास्तींत जास्त आठपट घ्यावें, असें सांगितलें आहे. एकत्र हिंदु कुटुंबपोषणार्थ भावांनीं, मुलांनीं किंवा पत्नीनें केलेलें ऋण कुटुंबाच्या मुख्यानें फेडावें; बापाचें ऋण मुलांनीं व नातवांनीं फेडावें. पण या नियमास महत्त्वाचा अपवाद असा आहे कीं, एकत्र कुटुंबाच्या मुख्यानें किंवा बापानें केलेलें कर्ज अनीतिकारक किंवा गैरकायदा असेल, म्हणजे मद्यप्राशन, जुगार, बाहेरख्याली, इत्यादि व्यसनांकरितां केलेलें असेल, तर तें कर्ज मुलांनीं फेडूं नये. मयत हिंदूचें कर्ज फेडण्याची जबाबदारी वारसावर व्यक्तिशः जातीवर नसते, तर मयताची जेवढी इस्टेट असेल ती इस्टेट जप्तीविक्रीस पात्र असते. तसेंच बापाच्या कर्जफेडीला मुलाची स्वसंपादित इस्टेटहि जबाबदार नाहीं. मुलगा नसेल तर पत्नीलाहि हाच नियम लागू आहे. एकत्र कुटुंबांत सरकारसारा, एकत्र कुटुंबांतील माणसांचें पोषण, मुलांमुलींचीं लग्नें, मृतांच्या अन्त्यसंस्काराचा खर्च, एकत्र कुटुंबाच्या इस्टेटीच्या रक्षणार्थ कोर्टातील दावेफिर्यादींचा व इतर खर्च यांचा समावेश एकत्र कुटुंबाच्या कर्जांत होतो, व तें इस्टेटींतून फेडण्याची जबाबदारी कुटुंबाच्या कर्त्यावर व त्याच्या वारसावर असते.

इंग्लंडच्या कायद्यांत कर्ज व्यक्तिशः करार कायदा, किंवा कोर्टाचा ठराव या तीन प्रकारांनीं उत्पन्न होतें. एकाच्या देण्या-बद्दल दुसऱ्यानें हमी दिल्यास तें त्या दुसऱ्याचें कर्ज होतें. तसेंच एकाच्या नांवाचें कर्ज दुसऱ्यास वेचन करून देतां येतें. कर्जफेड करणें ती तडजोडीनें, हप्तेबंदीनें, किंवा धनकोस ऋण-कोचें दुसरें कांहीं देणें असल्यास वजावटीनें करतां येते. ऐपत नसल्यास नादार होणें, हा कर्जफेडीचा कायदेशीर मार्ग आहे. १८६९ पासून कर्जाबद्दल तुरुंगांत टाकण्याची पद्धत कायद्यानें बंद करून फक्त ४८ तास ऋणकोस तुरुंगांत ठेवण्याचा अधिकार आहे.

इतिहास— वेदकालीन भारतीय लोकांची सर्वसाधारण कशी स्थिति होती हें ऋग्वेद व त्यानंतरच्या ग्रंथांतील उल्लेखां-वरून उघड दिसतें. जुगाराच्या वेळीं कर्ज काढीत असत असा उल्लेख अनेक वेळां केलेला आहे. कर्जमुक्त होणें ह्याला शब्द-समुच्चय ‘ ऋणं संनयामसि ’ असा आहे. परत न देण्याच्या उद्देशानें कर्ज काढीत असत असाहि उल्लेख आहे. कर्ज परत न देण्याचा परिणाम फार भयंकर होत असे; कदाचित् जुगाऱ्याला दास देखील व्हावें लागे. सावकार लोक ऋणकोंना, चोर, वगैरे अपराध्यां-प्रमाणें, त्यांनीं किंवा त्यांच्या मित्रांनीं कर्ज परत द्यावें म्हणून खांबाला ( द्रुपद ) बांधीत. व्याजाची रक्कम काय होत असे हें समजणें अशक्य आहे. सामान्यतः असा तर्क करण्यास हरकत नाहीं कीं, व्याज वस्तु किंवा धान्यरूपानें देत असत.

मराठी राज्यांत कर्ज देण्याघेण्याचा व्यवहार फार मोठ्या प्रमाणावर चालत असे. खुद्द सरकार व त्याचे सरदार-दरकदार ह्यांना नेहमीं कर्ज काढावें लागे. त्यामुळें सावकारी धंदा करणाऱ्या पेढ्यांचें जाळें राज्यांत निर्माण झालें. ब्राह्मण सावकारहि पुष्कळ होते. लाखों रुपये एका रकमेनें ते कर्ज देत. रक्कम फार मोठी असल्यास तीन-चार सावकार मिळून समाधिक कर्ज देत. हातावर कर्जाऊ रकमा देत. परंतु बहुधा खतें लिहून घेऊनच कर्ज

देण्याचा प्रघात होता. वचनचिठीचा प्रकार मात्र आढळत नाहीं. कर्जरोखे व गहाणखतें हींच मुख्यतः असत. तारणगहाण असे, तसेंच कबजेगहाण असे. हातावरील कर्जाला थोड्या महिन्यांची मुदत ठेवण्यांत येई. मुदतींत कर्ज न दिल्यास गहाण डुबत असे. मुदत संपली तरी गहाण नष्ट होत नाहीं ही समजूत नव्हती. मुदतींत कर्जफेड न झाल्यास सावकार खतांत नमूद केलेली मिळकत आपल्या कबजांत घेई. स्थावर मिळकत व कुळकरणासारखीं वतनें कर्जाकरितां गहाण टाकीत. जंगम मालांत सोनें, पागा, तरवार, कापड हीं गहाण टाकलेलीं आढळतात. कर्ज देतांना मनोती कापून घेत. मनोतीचा दर शेंकडा १ पासून २ रुपयांपर्यंत असे. कर्जफेडीच्या वेळीं सूट देण्यांत येई; तथापि बिनसुटीची शर्त असल्यास सूट देत नसत. कर्जफेडींत मामलत लावून घेण्याचाहि प्रघात होता.

प्रामाणिकपणा बऱ्याच प्रमाणांत होता. दंग्याच्या भीतीनें दुसऱ्यापाशीं ठेव ठेवीत. अशा ठेवी तो मनुष्य मेल्यावर त्याच्या स्त्रीनें कबूल करून परत दिल्याचीं उदाहरणें नमूद आहेत. कर्ज वसूल करण्यास हल्लींप्रमाणें कोर्टें नव्हतीं. फारकरून सावकारालाच वसुलीचा उपाय करावा लागे. हा उपाय म्हणजे धरणें बसणें हा होय. लोकांच्या त्या वेळच्या समजुतीवर ह्या उपायाची उभारणी केलेली दिसते. सावकार कर्ज मागण्यास कुळाकडे आपला नोकर अथवा इतर कोणी पाठवी. हा मनुष्य कुळाच्या घरांत चोवीस तास उपाशी बसून राही. ओटीच्या दरवाजांत बसे. घरांत कोणी उपाशी राहिल्यास घरांतील माणसांनाहि उपवास पडे. आपणांस उपोषण घडतें व दुसरा उपवासानें तळमळत आहे, ह्याचा परिणाम आपणांस भोगावा लागेल ह्या भीतीनें कूळ हरप्रयत्न करून कांहीं तरी वसूल देई. कधीं कधीं यजमान स्वतः धरणें धरून बसे. कुळानें चटकन् पैसे द्यावे म्हणून धरण्याकरतां परजातीच्या माणसाचा उपयोग करीत. ऋणकोस उपोषण पाडणें ह्याला क्षेत्र करणें म्हणत (—पेशवाईच्या सावलींत).

**कर्जखत**—( बाँड ). ठरलेली रक्कम देईन, किंवा ठरलेलें काम करीन, किंवा अमुक एक ठरलेलें कृत्य करणार नाहीं, अशाबद्दल जो लेखी करार करतात, त्याला बाँड म्हणतात. अशा करारपत्रांत एखादें बेकायदेशीर कृत्य करण्याचें किंवा एखादें कायदेशीर कर्तव्य न करण्याचें लिहून दिलें असेल, तर तो करार बेकायदा ठरतो. तसेंच जो इसम अज्ञान आहे किंवा वेडा आहे त्यानें असा करार दुसऱ्याला लिहून देणें, हें कायदेशीर नाहीं. पण कोणीं इसमानें अशा अज्ञानाला किंवा वेड्या इसमाला करार लिहून दिला तर तो कायदेशीर बंधनकारक असतो. अशा करारपत्रांत अमुकच शब्द लिहिले पाहिजेत, असें कायद्यानें ठरलेलें नाहीं. हिंदुस्थानांतील कायद्यांत बाँड म्हणजे कर्जाऊ घेतलेली रक्कम परत देण्याचा लेख असा अर्थ आहे. ( इंडियन स्टँप ॲक्ट, कलम २ ).

**कर्जफेड तहकुबी**—( मॉरॅटोरियम ). ज्या वेळीं आर्थिक परिस्थिति फार बिकट होते तेव्हां सरकार पेढ्या व सावकार यांना कर्ज वसूल करण्याची मुदत वाढविण्यास सांगतें. व्यापारांत धनको ऋणकोला हुंडीची रक्कम फेडण्यास जो जास्त अवधि देतो त्याला हा शब्द लावतात.

**कर्जत**—१. मुंबई इलाख्यांत कुलाबा जिल्ह्यांतील ईशान्य तालुका. क्षे. फ. ३५९ चौ. मै.. या तालुक्यांत खालापूर हा लहान पेटा आहे. तालुक्यांतील गांवांची संख्या २७० असून कर्जत हें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. ८९,५४५. पश्चिम घाट व माथेरानचे डोंगर यांच्यामध्यें कर्जत तालुका हा डोंगराळ भाग आहे.

कर्जत हें तालुक्याचें मुख्य ठिकाण जी. आय्. पी. रेल्वेचें स्टेशन होण्यापूर्वी फार लहान होतें. गांव उल्हास नदीच्या दक्षिण तीरावर वसलेला आहे. इ. स. १८६९ पासून मामलेदार कचेरी येथें आली. पूर्वी ती दहिवली गांवीं असे. येथून खोपोलीस आगगाडी जाते.

२. मुंबई इलाख्यांत, अहमदनगर जिल्ह्यांतील दक्षिण तालुका. क्षे. फ. ५७१ चौ. मैल. यांत कर्जतसुद्धां ८१ गांवें आहेत. लो. सं. ६३,२९०.

कर्जत गांव तालुक्याचें मुख्य ठिकाण असून येथें मामलेदार व मुनसफ कचेऱ्या आहेत. येथें गोदडबाबा साधूची समाधि असून त्या ठिकाणीं अश्विनांत यात्रा भरते.

**कर्झन, लॉर्ड**—(१८५९–१९२५) हिंदुस्थानचा एक गव्ह. जनरल व व्हाइसरॉय, तसेंच ब्रिटिश राजकारणी, राज्यकारभारी ( ॲडमिनिस्ट्रेटर ), व प्रवासी. १८८५ मध्यें मार्क्विस ऑफ सॅलिसबरीचा प्रायव्हेट सेक्रेटरी होता. १८८६ ते १८९८ पर्यंत पार्लमेंटचा सभासद असून हिंदुस्थानचा दुय्यम चिटणीस होता. नंतर १८९८ ते १९०५ पर्यंत हिंदुस्थानचा व्हाइसरॉय झाला. त्याची हिंदुस्थानांतील कारकीर्द मोठी खळबळीची झाली. त्यानें बंगालची विभागणी केली, तिबेटवर स्वारी करविली; विद्यापीठांत सरकारी वर्चस्व जास्त होईल असा कायदा केला व अनेक कामिशनें बसविलीं. हुकूमशाहीचा पुरस्कर्ता म्हणून हा दुर्लौकिक घेऊन राजीनामा देऊन परत गेला. १९१५ मध्यें संयुक्त प्रधान–मंडळांत शिरून तो लॉर्ड प्रिव्हीसील या पदावर १९१५ ते १९१६, एअर–बोर्डाचा प्रेसिडेंट १९१६, आणि कौन्सिलचा लॉर्ड प्रेसिडेंट १९१६–१९ व परराष्ट्रखात्याचा स्टेट–सेक्रेटरी १९१९–१९२३ या सालांमध्यें होता. १९२४

मध्यें हाउस ऑफ लॉर्ड्सचा पुढारी झाला. त्यानें ग्रंथ लिहिले ते– १ रशिया इन् सेंट्रल एशिया अँड दि अँग्लो-रशियन क्वश्चन; २ पर्शिया अँड दि पर्शियन क्वश्चन; ३ प्रॉब्लेम्स ऑफ दि फार ईस्ट; ४ जपान, कोरिया, चायना; ५ मॉडर्न पार्लमेंटरी एलेक्शन्स; ६ सब्जेक्ट्स ऑफ दि डे; आणि ७ ब्रिटिश गव्हर्नमेंट इन् इंडिया.

**कर्ण**—एक प्राचीन भारतीय योद्धा. हा कुंतीला कौमार्यावस्थेंत सूर्यापासून झाला. याला लहानपणीं एका सूतानें वाढविलें. त्याच्या बायकोचें नांव राधा होतें. म्हणून कर्णाला सूतपुत्र, राधेय अशा तऱ्हेचीं नांवें आहेत. हा द्रोणाजवळ धनुर्विद्या शिकून तरबेज झाला. तेव्हां दुर्योधनानें आपल्या पक्षास ओढण्यासाठीं त्याला अंग देशाचें राज्य दिलें. तो शेवटपर्यंत त्या पक्षांत टिकून होता. एकवचन व दातृत्व यांबद्दल कर्णाची फार ख्याति होती. सूर्यानें याला शस्त्राभेद्य अशीं कवचकुंडलें दिलीं होतीं तीं यानें आपलें वचन पाळण्यासाठीं ब्राह्मणरूपी इंद्राला देऊन टाकिलीं. परशुरामाच्या शापामुळें त्याला धनुर्विद्या युद्धांत उपयोगी पडली नाहीं. भारतीय युद्धांत १६ व्या दिवशीं याच्याकडे सेनापत्य आलें. त्या वेळीं मागच्या शापामुळें त्याचा पराभव होऊन तो मारला गेला. कर्ण फार स्वाभिमानी, पराक्रमी व दाता होता. दातृत्वाबद्दल कर्णाची उपमा देतात.

२. राजाराम छत्रपतीचा लेकवळा. हा मराठ्यांच्या तत्कालीन राजकारणांत भाग घेत असे. जेधे शकावलींत इ. स. १६९७ मध्यें राजारामानें कर्ण याला मोंगलाईत पाठविल्याचा उल्लेख आहे. पुढें कर्नाटकांतहि यानें कामगिरी केली. हा शूर होता.

**कर्ण ( सोळंकी )** (१०६३–१०९३)—अनहिलवाड्याच्या भीमदेव सोळंकीचा उदयमतीपासून झालेला पुत्र. यानें जयकेशी कदंबाची मुलगी मीनल किंवा मैनलदेवी हिच्याशीं लग्न केलें व हिच्यापासून त्यास सिद्धराज जयसिंह नांवाचा पुत्र झाला. माळव्याचा राजा उदयादित्य यानें यास जिंकलें. गुजरातेंतील कोळी व भिल्ल यांना जिंकून यानें त्यांच्यावर अमल बसवला. यानें आपल्या अनेक लोकोपयोगी कृत्यांनीं प्रजेला सुख दिलें. बिल्हणकृत 'कर्णसुंदरी' नाटिकेंतील कर्णनामक नायक हाच. याचा मुलगा सिद्धराज जयसिंह अज्ञान असतांनाच हा मृत्यु पावला. सन १०७० त हल्लींच्या अहमदाबाद शहराच्या जागीं कर्णावती नांवाच्या शहराची यानें स्थापना केली.

**कर्णक**—ईजिप्तमधील नाईल नदीच्या कांठीं थीबिज नांवाचें एक शहर असून त्याच्या उत्तर भागाला कर्णक हें नांव आहे. येथें मॉंट देवाचें देवालय असून तें अमेनोफिसनें बांधलें. याचें मध्य आवार हें जवळजवळ १५०० फुटांचें चौकोनी आवार असून येथें अेमॉन देवतेचें एक प्रचंड देवालय आहे. लेग्रेन नांवाच्या प्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधकानें या देवळाचा भाग खणण्याचें काम १९०३ मध्यें सुरु केलें. त्यानें ७५० पुतळ्यांचे व २,००० लहान लहान मूर्तींचे अवशेष शोधून काढले आहेत.

**कर्णदेव कलचुरी**— १. (१०३८–८०)— त्रिपुरीच्या कलचुरी घराण्यापैकीं गांगेयदेवाचा हा पुत्र मोठा शूर होता. हूण राजकन्या आल्हणदेवी ही याची पत्नी. यानें सन १०३५ त मगधच्या पाल राजाचा व सन १०४२ त चंदेल्ल, भीमदेव गुर्जर, कीर्तिवर्मा, चालुक्य, उदयादित्य परमार व मालवराज भोज यांचा पराभव केला. यानंतर मात्र याच्या शत्रूंनीं सन १०७० त यास माघार घ्यावयास लावली. काशीस 'कर्णाचा मेरु' नांवाचें एक देऊळ यानें बांधलें.

२. (१०४२ चा सुमार)— हा कल्याणीचा अधिपति होता. हल्लींचें तेवूरजवळील कर्णवेद नांवाचें खेडें म्हणजेच यानें स्थापलेलें कर्णावती नगर होय. बिहारमधील चंपारण्याचा यानें विध्वंस केला. वीर-श्री नांवाच्या आपल्या मुलीचें लग्न यानें बंगाल्च्या वर्म घराण्यांतील जतवर्म्याशीं केलें. दुसरी मुलगी यौवन-श्री ही यानें बिहारचा राजा विग्रहपाल यास दिली.

**कर्णधार**—(इं. पायलट). नावाडी, सुकाणूदार. नावेला इष्ट दिशेनें गति देणाऱ्या कामगारास म्हणतात. प्रत्येक लहान-मोठ्या नावेला सुकाणूं असतें व त्या सुकाणूमुळें नावेच्या गतीची दिशा बदलतां येते. हें काम कौशल्याचें असतें व बहुधा मुख्य कामगार हाच पूर्वी लहानसान होड्यांवर किंवा गलबतांवर कर्णधाराचें काम करीत असे. पण मोठमोठालीं जहाजें झाल्यावर कर्णधाराचें काम हें एक स्वतंत्र काम झालें व मुख्य अधिकाऱ्याचें एकंदर व्यवस्थेचें काम वाढलें. तसेंच ठिकठिकाणीं निरनिराळ्या बंदरांतील परिस्थिति सर्वच नाविकांस ठाऊक नसते; त्यामुळें मोठमोठ्या बंदरांत कायद्यानें कर्णधार नेमलेले असतात व त्यांची परीक्षा घेऊन मुख्य किंवा दुय्यम कामगारांसच कर्णधाराचा दाखला देण्यांत येतो. तसेंच कायद्याप्रमाणें ज्या बंदरांत कर्णधार ठेवलेले आहेत त्या बंदरांत कर्णधाराकडूनच जहाज चालविलें गेलें पाहिजे व तसें चाललें असतां जर अपघात वगैरे झाला तर त्याची जबाबदारी जहाजाच्या अधिकाऱ्यावर येत नाहीं. परंतु कर्णधार न घेतां बंदरांत जहाज आल्यास होणाऱ्या अपघातादिकांची जबाबदारी अधिकाऱ्यावर असते व त्यावरील मालाच्या विम्याबद्दल वगैरे कांहींहि मागण्याचा त्याला अधिकार राहात नाहीं. तसेंच दाखला मिळालेल्या कर्णधारानें, मागणी केल्यावर जहाजाचें मार्गदर्शन केलेंच पाहिजे असें बंधन आहे.

**कर्णपट्टी**— ( डायागोनल स्केल ). कर्णमापनपट्टीचा उपयोग इंचाचे अपूर्णांक मोजण्याकरितां होतो. नेहमींप्रमाणें पट्टीच्या लांबीचे इंचामध्यें विभाग करा व त्यांपैकीं एक इंच

विभागाचे दहा सारखे विभाग करा. तसेंच १ किंवा अधिक इंच रुंदी घेऊन व तिचे १० सारखे भाग करून काटकोन चौकोन पुरा करा. आडव्या व उभ्या रेषा काढून लहान काटकोन चौकोनाचे समांतर कर्ण काढा. म्हणजे आडव्या रेषांवर कर्णाच्या योगानें इंचाचे शतांश मोजतां येतील. लांबीवरील अर्ध्या इंचाचे सारखे १० विभाग केल्यास वरीलप्रमाणें कर्ण काढल्यास इंचाचे $\frac{१}{२००}$ पर्यंत विभाग मोजतां येतील.

अ ब क हा त्रिकोण आहे. त्याच्या अब बाजूचे सारखे ८ भाग केले आहेत व प्रत्येक छेदनाबिंदूतून पायाला समांतर रेषा काढल्या तर त्या पायाचे अष्टमांश होतात. उदा., ४ ह्या छेदांतून काढलेली रेषा पायाचा $\frac{४}{८} = \frac{१}{२}$ होतो. एक बिंदूतून काढलेली रेषा पायाचा $\frac{१}{८}$. उभ्या व आडव्या समांतर रेषा सारख्या अंतरावर काढून पट्टी तयार करावयाची व आकृतींत येणाऱ्या लहान काटकोन चौकोनाचे कर्ण काढल्यास इंचाच्या $\frac{१}{२००}$ पर्यंत सूक्ष्म भाग मोजतां येतात.

**कर्णप्रयाग**—उत्तर हिंदुस्थानांत गढवाल प्रांतांत अलकनंदा आणि पिंडर ( कर्णगंगा ) नद्यांच्या संगमावर हें ठिकाण आहे. हें समुद्रसपाटीपासून २३०० फूट उंचावर आहे. गंगेच्या वरच्या उगमावर हें असल्यानें यात्रेचें ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे.

**कर्णफुली**—पूर्वबंगाल व आसाम यांतील नदी. चितगांवच्या डोंगरी प्रदेशापलीकडे उगम पावून सामान्यतः नैर्ऋत्य दिशेनें १२१ मैल वाहत गेल्यावर ही बंगालच्या उपसागरास मिळते. ह्या नदींतून चितगांवपर्यंत समुद्रांत चालणारीं जहाजें व रांगामाती ( चितागांवच्या डोंगरी प्रदेशाचें मुख्य ठिकाण ) पर्यंत लहान जहाजें जाऊं शकतात.

**कर्णभूषणें**—कर्णाभरणाची चाल फार प्राचीन आहे. 'अलंकार' पहा. भारतीय पाषाणशिल्पांतील मूर्तींच्या कानांतून कुंडलें, वगैरे दृष्टीस पडतात. जुन्या दक्षिणी बायका काप, बाळ्या, लवंगा, कुरडू, वगैरे दागिने कानांत घालतात. कानडी बायकाहि बुगड्या, चमकी, कर्णफुलें, तनविदा हीं घालतात. मुसलमानी बायका पातबाळिया, करणफूल, झुमझा, बाळी यांसारखे कानांतील दागिने पसंत करितात. हिब्रू व ईजिप्शिअन बायकाच मात्र अशीं भूषणें वापरीत, पण इतर पौरस्त्य लोकांत पुरुष व बायका या दोघांनाहि ही सवलत असे. पश्चिमेकडे ग्रीक व रोमन लोकांत हा बायकांचा दागिना असे व कोणा पुरुषाच्या कानांत तो असेल तर तो पौरस्त्य म्हणून ओळखिला जाई. अर्वाचीन पाश्चात्य स्त्रियांत कर्णवलयें घालण्याची चाल वाढतच आहे व तिचें अनुकरण आपल्याकडे होत आहे.

**कर्णमूलशोथ**—( पॅरोटिटिस ). हा विकार गालाच्या मागच्या बाजूस जबडा व कान यांच्यामधील कोनांत ज्या ग्रंथी असतात त्यांचा दाह झाला असतां उत्पन्न होतो. या रोगाची कधीं कधीं सांथ येते. तीस गालगुंड व इंग्रजींत मंप्स असें म्हणतात.

**कर्ण वाघेला** (१२९६-१३०४)—अनहिलवाडचा राजा. त्याच्या वाघेल जहागिरीवरून त्याच्या वंशास वाघेल हें आडनांव मिळालें. या वंशांत वीरधवल हा फार शूर व धाडसी राजा झाला. त्यानें आपली राजधानी अनहिलवाड्यास केली. त्यानें दिल्लीच्या पातशाहासहि थकविलें. त्यानें प्रजेस सुख दिलें. तो मेला तेव्हां त्याच्या १८० सेवकांनीं व आप्तांनीं अग्निकाष्ठें भक्षण केलीं. यानें अनेक कलाकौशल्याच्या इमारती व देवळें बांधलीं. वीरधवलाचा पुत्र सारंगदेव याचा पुत्र कर्णदेव होय. तो दुर्गुणी व 'घेलो' ( वेडा ) या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यानें आपला नागर ब्राह्मण प्रधान माधव याच्या पत्नीवर बलात्कार केला. *त्यामुळें माधवानें अल्लाउद्दीन खिलजीला* राष्ट्रद्रोह करून गुजरातेवर आणलें व अनहिलपट्टणचें राज्य त्याच्या हातांत दिलें. राजा कर्ण हा अज्ञातवासांत मृत्यु पावला. या गुजरातच्या राजावर भाटांनीं अनेक कवितें रचिलेलीं आहेत. कर्णाची राणी कमला( कौला )देवी हिला पकडून दिल्लीस पाठविलें; तेथें अल्लाउद्दिनानें तिला आपली बेगम केली. तिची मुलगी देवलदेवी हिलाहि मलिक काफूरनें पकडून दिल्लीस रवाना केलें. तेथें अल्लाउद्दिनानें तिचा निका शाहाजादा खिजरखान याच्याशीं लावून दिला.

**कर्णशोथ**—( ओटिटिस ). कानाचा दाह होऊन अत्यंत वेदना होतात त्यास म्हणतात. हा रोग कानाच्या पड्याच्या आंतील बाजूस होतो. हा भयंकर असून त्यामुळें बधिरपणा येतो. आंतर, मध्य आणि बाह्य असे याचे स्थानाप्रमाणें प्रकार आहेत. बाहेरून सूज, फोड, वगैरे येणें हा बाह्य प्रकार फार

महत्त्वाचा नाहीं. कानामध्यें दुखणें सर्वसाधारण आहे तरी तें उपेक्षणीय नाहीं. गोंवर, कांजिण्या, घसादुखी, वगैरेपासून लहान मुलांस हा रोग जडतो. कानाच्या पडद्याच्या बाजूस होणाऱ्या विकारामुळें पडदा फुटण्याचा संभव असतो व पुढें मेंदूलाहि धक्का पोंचतो. कर्णशोथामुळें घेऱ्या येणें, ओकाऱ्या होणें, झोंक जाणें हीं लक्षणें होतात.

**कर्णसिंह** ( १५८४-१६२८ )— उदेपूरचा एक महाराणा. अमरसिंहाचा हा पुत्र २६ जानेवारी १६२० मध्यें उदेपूरच्या गादीवर आला. यानें आपल्या हुशारीनें राज्य सुयंत्रित ठेवून प्रजेकडून वाहवा मिळवली. शहाजहान यास बादशहा होण्याच्या कामीं याची मदत झाली. याचा चेहरा भव्य, व पाणीदार होता. यानें प्रजेस चांगलें सुख दिलें. यास सात पुत्र व दोन मुली होत्या.

**कर्णा**—हें वाद्य पितळेचें असतें; ह्याची लांबी सुमारें चार हात असते व थोरलें तोंड सुमारें वीतभर व्यासाचें असतें; व तोंडांत धरावयाचें टोंक हाताच्या अंगठ्याएवढें असतें. ह्याचा नाद गंभीर असतो; तो शिंगाच्या नादाइतका लांब ऐकूं जात नाहीं. देवळांतील नगारखान्यांत चौघडा वाजण्याचा बंद व्हावयाच्या वेळीं कर्णा वाजलेला ऐकूं येतो.

**कर्णाटक**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक देश. हा कानडी भाषा बोलणारांचा देश होय. बेळगांव, धारवाड, व कारवार हे मुंबई प्रांतांतील जिल्हे, म्हैसूर संस्थान, हैद्राबाद संस्थानचा पश्चिम भाग व मद्रास इलाख्यांतील कानडा आणि बल्लारी हे जिल्हे हा सर्व प्रदेश मिळून कर्णाटक होईल. मनुस्मृतींत म्हटलें आहे कीं, "झल्लो मल्लश्च राजन्यात् व्रात्यान् निच्छिविरेव च। नटश्च करणश्चैव खसो द्रविड एव च॥" यावर कुल्लुकाची व्याख्या: "क्षत्रियात् व्रात्यात् सवर्णायां झल्ल...नटकरण...द्रविडाख्या जायन्ते॥ एतानि अपि एकस्य एव नामानि॥" म्हणजे व्रात्य क्षत्रियांपासून सवर्ण स्त्रीच्या ठायीं जी प्रजा होते तिला देशपरत्वें झल्ल, मल्ल, निच्छिवि, नट, करण, खस, द्रविड, अशीं नांवें आहेत. करण व नट हे जेथें रहात तो करणनट = करणणट = कर्णाटक. यास कन्नड असेंहि दुसरें नांव आहे. कर्नाटक याची करि = काळा व नाड = देश अशीहि एक व्युत्पत्ति आहे.

इतिहास— आंध्र किंवा सातवाहन, कदम्ब, पल्लव, गंग, चालुक्य, राष्ट्रकूट, चोल, होयसल, व विजयनगरचे राजे या राजघराण्यांनीं येथें राज्य केलें.

कर्णाटकाचा पूर्वी चोल देशामध्यें समावेश होत असे व त्याला दुसरें नांव चोलमण्डलम् हें होतें. या प्रांताचें हवापाणी उत्तम आहे. या प्रांतावर फार प्राचीन कालापासून चोल राजे राज्य करीत होते. अशोकाच्या शिलाशासनांत व रामायण-महाभारत या प्राचीन ग्रंथांत चोलांचा उल्लेख येतो. त्यांची पहिली राजधानी ( २ रें शतक ) त्रिचनापल्लीजवळ कावेरी कांठचें ऊरईयुर, सातव्या शतकांत मल्लीकुरम् आणि १० व्या शतकांत तंजाऊर या राजधान्या होत्या. या प्रांताला मालकूट असेंहि नांव असे. १ ला इतिहासप्रसिद्ध चोल राजा करीकाल यानें कावेरीपट्टण ही राजधानी करून कावेरी नदीला मोठमोठे बंधारे घातले. २ ऱ्या शतकापासून १३१० पर्यंत चोल राजांचें राज्य येथें होतें. आदित्य हा चोल राजा (इ. स. ८८०-९०७) फार प्रसिद्ध आहे. त्यानें पल्लव व पांड्य राजांना जिंकून लंकेवर स्वारी केली. आपल्या राज्यांत सर्वत्र ग्रामपंचायती स्थापून प्रजेला फार सुख दिलें. राजराजदेव हा चोल राजाहि ( ९८५-१०१३ ) फार शूर होता; त्यानें चेर राजांचें आरमार जिंकून त्यांना मांडलिक बनविलें. शिवाय कूर्ग, पांड्य, पल्लव, कोलम, कलिंग, सिंहलद्वीप हे देश आणि लखदीव व मालदीव हीं बेटें जिंकून घेतलीं. तो शैव होता तरी पण बौद्ध वगैरे इतर धर्मांना साहाय्य करीत असे. त्याचा मुलगा राजेंद्र (गंगाईकोंडा) हा बापापेक्षां शूर होता. त्यानें अंदमान, निकोबार व पेगू ( ब्रह्मदेश ) हा प्रदेश काबीज करून ( १०२५-२७ ) बंगाल-बिहारवर स्वाऱ्या केल्या. त्यानें गंगाईकोंडा चोलपूर ही राजधानी वसवली व ८ कोस विस्ताराचें मोठें तळें बांधलें व ३० फूट उंची असलेल्या पिंडीच्या महादेवाचें उत्तम कलाकुसरीचें देऊळ बांधलें. १०७० मध्यें अधिराजेंद्र हा राजा झाला. पण तो प्रजेस नावडता होऊन १०७४ सालीं त्याचा खून झाला व येथें चोलांची औरस वंशपरंपरा खुंटली. चोलांची मुलगी गंगाईकोंडा चालुक्य घराण्यांत दिली होती. तिचा मुलगा राजेंद्र उर्फ कुलोत्तुंग हा गादीवर आला व चालुक्य-चोल वंश सुरू झाला. हा राजा फार शूर व मुत्सद्दी असून त्यानें ४९ वर्षें राज्य केलें. कलिंग, गंग हे राजे त्यानें जिंकले. जमिनीची धारापद्धति त्यानें उत्तम प्रकारें बसविली ( १०८६ ). या घराण्याचा शेवटचा नांवाजण्यासारखा राजा ३ रा कुलोत्तुंग ११८७ त गादीवर आला व त्यानें ४० वर्षें राज्य केलें. १३१० सालीं मलिक काफूरनें इकडील हिंदू राजांचा पराभव केला. पण पुढें वारंगळ, विजयानगर व द्वारसमुद्र येथील हिंदू राजांनीं एकत्र होऊन मुसलमानांना हाकून लावलें ( १३४४ ). नंतर कर्णाटकावर विजयानगरचें साम्राज्य झालें. व या सम्राटांतर्फे नायक राजे तंजावरवर राज्य करीत होते ( १५४९-१६७३ ). या राजांनीं इमारती, कालवे, देवळें, वगैरे बांधलीं; विद्येला उत्तेजन दिलें व ग्रंथसंग्रह केला. १७ व्या शतकांत व्यंकोजी राजे भोसले हे तंजावरचे राजे झाले. हें घराणें १९व्या शतकापर्यंत होतें.

**कर्णाटकचे नवाब**—औरंगजेबानें हा प्रांत जिंकून कर्नाटकाचा स्वतंत्र सुभा केला व अर्काट ही त्याची राजधानी असल्यामुळें तेथील सुभेदारांस अर्काटचे नवाब हें नांव पडलें. झुलफिकारखान हा पहिला नवाब होय. १७४४ च्या सुमारास अर्काटच्या नबाबाच्या जागेवर महंमदअली व चंदासाहेब हे दोघे हक्क सांगूं लागले आणि मद्रास प्रांतांत व्यापार करणारे परकी इंग्रज व फ्रेंच यांनीं या भांडणांत भाग घेतल्यामुळें फ्रेंच व इंग्रज यांच्यामधील वस्तुतः हें भांडण होऊन बसलें. त्यांत फ्रेंचांच्या हिंदुस्थानांत सर्व बाजूंनीं पाडाव झाल्यामुळें १७६३ सालीं पॅरिसचा तह होऊन फक्त पाँडेचरी फ्रेंचांना मिळाली व बाकीच्या प्रदेशावर इंग्रजांनीं हळूहळू आपलें अधिराज्य स्थापलें. इंग्रजांनीं म्हैसूरचा राजा हैदर व त्याचा मुलगा टिपू यांच्याबरोबर युद्ध करून कर्नाटक प्रांत हस्तगत केला. पण मांडलिक म्हणून कर्नाटकच्या नबाबांची सत्ता चालू ठेवली. १८५५ सालीं कर्नाटकाचा नामधारी नबाब गुलाम घोस खान मरण पावल्यावर मद्रास सरकार व लॉर्ड डलहौसी यांनीं एकमतानें नबाबाचा हुद्दा रद्द केला व कर्नाटक प्रांत ब्रिटिश राज्यांत सामील केला.

हिंदुस्थानची भाषावार प्रांतरचना करण्याची जी ठिकठिकाणीं चळवळ आहे तींत संयुक्त कर्णाटक करण्याचीहि चळवळ बऱ्याच दिवसांपासून आहे.

**कर्तारपूर**—पंजाब, जालंदर तहासिलीमधील एक गांव. हें नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर असून जालंदरपासून ९ मैलांवर आहे. लो. सं. सुमारें दहा हजार. पांचवा शीख गुरु अर्जुन यानें हें शहर वसविलें असून त्याचे वंशज व त्याचा आदिग्रंथ येथें असल्यामुळें हें फार पवित्र मानलें जातें. १७५६ त हें शहर जाळून टाकलें होतें.

**कर्दम**—एक प्रजापति. हा ब्रह्मानसपुत्र स्वायंभुव मन्वंतरांत होऊन गेला. स्वायंभू मनूनें यास आपली देवहूतिनामक कन्या दिली होती. यांचा पुत्र कपिल महामुनि या नांवानें प्रसिद्धीस आला.

**कर्नाळ**—पंजाब प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,१५३ चौ. मै. घग्गर, उमला, चौतंग, मार्कंडा, नै, बुऱ्ही व राक्षी या मुख्य नद्या होत. या जिल्ह्यांत वार्षिक पाऊस सरासरी ३० इंच पडतो. जिल्ह्यांत ७ मोठीं गांवें व १,३८३ खेडीं असून एकंदर लो. सं. १९४१ मध्यें ९,९४,५७५ होती. पैकीं सुमारें शें. ७० हिंदू, शें. २७ मुसलमान आहेत. शें. ५८ शेतकीवर व शें. १९ औद्योगिक धंदे करून पोट भरतात. शें. ९६ लोक हिंदी भाषा बोलतात. गहूं, हरभरा तांदूळ, ज्वारी, मका, कापूस, ऊंस हीं पिकें होतात. येथें सोरा शुद्ध करण्याचे चार कारखाने आहेत. कर्नाळ येथील घोडे पूर्वीं प्रसिद्ध असत. कर्नाळ ताल्लुका यमुनेच्या तीरावर असून क्षे. फ. ८३८ चौ. मैल व लो. सं. सुमारें तीन लाख आहे. कर्नाळ हें जिल्ह्याचें व तहसिलीचें मुख्य ठिकाण आहे. हें शहर अर्जुनाचा प्रतिस्पर्धी कर्ण यानें वसविलें असून त्याच्याच नांवावरून यास कर्नाळ हें नांव पडलें असावें, असें म्हणतात. गांवची हवा रोगट आहे. गांवांत हायस्कुलें व व इतर प्राथमिक शाळा व एक सरकारी आणि एक ख्रिस्ती मिशनऱ्यांचें ( स्त्रियांकरितां ) अशीं दोन रुग्णालयें आहेत. दिल्ली आणि अंबाला ह्या शहरांशीं मोठा व्यापार चालतो. लो. सं. सुमारें २२,०००.

**कर्नाळा किल्ला**—मुंबई, कुलाबा जिल्हा, पनवेल तालुक्यांतील एक डोंगर व किल्ला. हा पनवेलच्या दक्षिणेस ८ मैलांवर आहे. समुद्रसपाटीपासून उंची १५६० फूट.

देवगिरीचे यादव ( १२४८—१३१८ ) व दौलताबादचें मुसलमानी घराणें ( १३१८–१३४७ ) यांच्या कारकीर्दींत उत्तर कोंकणांतील हें मुख्य ठाणें म्हणून कर्नाळ्यास महत्त्व होतें. पुढें हा किल्ला निरनिराळ्या वेळीं मुसलमान, पोर्तुगीज, मराठे वगैरे लोकांनीं घेतला होता. १८१८ त पेशव्यांच्या सर्व प्रदेशाबरोबर इंग्रजी मुलुखास जोडण्यांत आला.

**कर्नूळ**—मद्रास इलाख्यांतील एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ ७,५८० चौ. मैल आहे. तुंगभद्रा व कृष्णा या मुख्य नद्या असून त्यांना मिळणाऱ्या लहान नद्या पुष्कळ आहेत. नल्लमलाय जंगल २,००० चौ. मैल क्षेत्रफळाचें आहे. साग, बिवळा, वगैरे इमारतीचें लांकूड मुबलक सांपडतें. वन्य पशू–वाघ, चित्ते, लांडगे, वगैरे शिकारीस योग्य अशीं रानटी श्वापदें–इतस्ततः भ्रमण करीत असतात. दरसाल पावसाचें मान २६ इंच असतें. कर्नूळ जिल्ह्यांत तीन शहरें व ७५१ खेडीं आहेत. जिल्ह्याची लो. सं. १९४१ सालीं ११,४६,२५० होती. एकंदर क्षेत्रफळांत शें. ३४ जंगल असून, कोरा व चोलम् हीं मुख्य धान्यें होत. साग वगैरे इमारतीचें लांकूड, चंदन, वांबू हीं विपुल होतात. खनिज द्रव्यें तांबें, शिसें, लोखंड हीं होत. कर्नूळ जिल्ह्यांत महत्त्वाचा उद्योग कापूस काढणें हा होय. कर्नूळ व कंबम् येथें सतरंज्या उत्तम प्रकारच्या तयार होतात. इकडे जो पांढरा दगड मिळतो त्याचा उपयोग शिळाछापासाठीं चांगला होतो. कर्नूळचें राज्य विजयानगरचें मांडलिक असून पुढें हैदरकडे आलें. गांव तुंगभद्रा व हिंद्री या दोन नद्यांच्या संगमावर कर्नूळ रोड स्टेशनापासून ३३ मैल लांब असून येथून मद्रास ३५० मैल आहे. येथें कापूस दाबण्याचे व सतरंज्या, हातमागावरील सुती कापड, चामडीं, सरकी यांचे कारखाने आहेत. किल्ल्यांत नबाबाचा राजवाडा, अब्दुल वहाब याची मशीद व विजयानगर कारंजा हीं प्रेक्षणीय आहेत.

**कर्नूळ-कडाप्पा कालवा**—मद्रास इलाख्यांतील हा मोठा कालवा असून कर्नूळ शहरापासून वर १७ मैलांवर तुंगभद्रा नदीवर आहे. हा कालवा कर्नूळ व कडाप्पा जिल्ह्यांतून १९० मैल वाहत जाऊन कडाप्पा शहरापर्यंत गेलेला आहे. दुष्काळांत पाऊस कमी पडला म्हणजे या कालव्याचा उपयोग बराच होतो.

**कर्फ्यू हुकूम**—(संचारबंदी). इंग्लंडांत वुइल्यम दि कॉंकरर या राजानें आपल्या हुकुमानें अशी वहिवाट सुरू केली कीं, रात्रीं आठ वाजतां घंटा वाजल्या कीं सर्व लोकांनीं आपल्या घरांतील विस्तव, दिवे, वगैरे कोणत्याहि प्रकारचा उजेड देईल ती गोष्ट झांकून टाकली पाहिजे. त्या वेळीं घरें लांकडी असल्यानें आगीची भीति असे. हा कायदा पहिल्या हेन्री राजानें इ. स. ११०० सालीं रद्द केला. तथापि पुष्कळ परगण्यांत वरीलप्रमाणें घंटा वाजविण्याची पद्धत चालू होती. ती अगदीं अलीकडील काळांत बंद झाली. हल्लीं ज्या वेळीं गांवांत दंगे चालू असतात त्या वेळीं लोकांना घराबाहेर पडण्यास बंदी करणारा हुकूम सरकार जारी करतें. यामुळें जाळपोळ, दंगेधोपे करण्यास गुंडांना वाव मिळत नाहीं.

**कर्ब**—(कार्बन). कोळसा, पेन्सिल-शिसें (ग्रफाइट) आणि हिरा ह्या तीन स्वरूपांत हें मूलद्रव्य निसर्गांत सांपडतें. हिरा हें शुद्ध स्फटिकमय रूप; काजळी (लँप ब्लॅक) हें त्याचें स्फटिकहीन शुद्ध रूप. साधा कोळसा आणि दगडी कोळसा यांत आणखी इतर उत्पतनक्षम (व्होलटाइल) दुसरे पदार्थ असतात. वनस्पतिजन्य आणि प्राणिजन्य पदार्थ हवा बंद करून उत्पातित केले असतां इतर पदार्थ उडून जाऊन कर्ब मागें राहतो. कर्बाच्या संयोगानें तयार झालेल्या पदार्थांना सेंद्रिय अथवा जीवनसंयुक्तें (ऑर्ग्यानिक कॉम्पाउंड) असें नांव असून रसायनशास्त्रांत त्यांचा एक स्वतंत्र विभाग आहे. उज्जाच्या संयोगानें कर्बाचे जे अनेक पदार्थ बनतात त्यांना उज्जकर्बें असें म्हणतात. राष्ट्रीय जीवनांत ह्या उज्जकर्बांपैकीं कांहींचें अतिशय महत्त्व आहे. प्राणवायूबरोबर कर्बाचीं दोन संयुक्तें होतात. भरपूर हवा असली म्हणजे कर्ब जळल्यानंतर कर्बद्विप्राणिद तयार होतो. तोच कमी असला म्हणजे कर्बेकप्राणिद बनतो.

**कर्बचतुर्हरिद**—(कार्बन टेट्रा क्लोराइड). कर्बद्विगंधकिदावर (कार्बन डाय सल्फाइडवर) हरची (क्लोरीनची) क्रिया करून हा तयार करतां येतो. हा रंगहीन द्रवरूप पदार्थ असून क्लोरोफॉर्मसारखा त्याला वास येतो. डिंक, राळ, वगैरेसारखे पदार्थ विरघळविण्यासाठीं त्याचा उपयोग होतो; त्याचप्रमाणें आग विझविण्याच्या कांहीं यंत्रांत त्याचा उपयोग केलेला असतो. पेन्झीनो फॉर्म असें त्याला व्यापारी नांव आहे.

**कर्बद्विगंधकिद**—(कार्बन डाय सल्फाइड). वायुरूप गंधकाच्या वातावरणांत कर्ब जाळला म्हणजे कर्बद्विगंधकिद (कार्बन डाय सल्फाइड) तयार होतो. हा वर्णहीन व अत्यंत उत्पतनक्षम (व्होलटाइल) द्रवपदार्थ आहे. ४०° सें.ला हा उकळतो. पाण्यांत हा मिसळत नाहीं. वायुरूपांत किंवा द्रवरूपांत हा सहज पेट घेतो. गंधक, स्फुर (फॉस्फरस), आयोडीन, इत्यादिकांचा विद्रावक म्हणून त्याचा उपयोग होतो. त्याचप्रमाणें तेलें गाळण्यासाठींहि हा उपयोगी पडतो.

**कर्बद्विप्राणिद**—(कार्बन डायॉक्साइड). कर्ब आणि प्राणवायु ह्यांच्या संयोगानें तयार झालेला वर्णहीन, जड, विषारी वायु. कार्बनचें ज्वलन पूर्ण झालें म्हणजे हा तयार होतो. त्याचप्रमाणें आसवनाच्या (फर्मेन्टेशन) वेळीं प्राणिजन्य आणि वनस्पतिजन्य द्रव्याचें विघटन होत असतांना आणि प्राण्यांचा श्वासोच्छ्वास चालू असतांना हा वायु तयार होत असतो. ज्वालामुखी प्रदेशांत कर्बद्विप्राणिद स्वतंत्र स्वरूपांत सांपडतो. आणि कांहीं अंतःप्रवाही झऱ्यांच्या पाण्यांत हा विरघळलेला असतो. धातूंच्या प्राणिदाबरोबर ह्याचा संयोग होऊन कर्बितें तयार होतात. कर्बद्विप्राणिद हा प्रत्यक्ष विषारी नाहीं; पण हवेंत त्याचें प्रमाण शेंकडा ०·५ वर गेलें तर त्या हवेचा दुष्परिणाम होऊं लागतो. सोडावॉटर किंवा त्यासारखीं इतर फसफसणारीं (एरेटेड) पेयें यांतील तरतरी आणणारा गुण त्यांत मिसळलेल्या ह्या वायूमुळें आलेला असतो. कर्बद्विप्राणिद फारसे प्रयास न करतां द्रवरूप आणि घनरूप स्थितींत नेतां येतो. पुष्कळ उद्योगधंद्यांत ह्याचा उपयोग होत असल्यामुळें मोठ्या प्रमाणावर ह्याचें उत्पादन होतें. साखर शुद्ध करण्यासाठीं, सफेता (व्हाइट लेड) तयार करण्यासाठीं, त्याचप्रमाणें सिंधुद्विकर्बनित (सोडियम बाय कार्बोनेट) तयार करण्यासाठीं ह्याचा उपयोग होतो. द्रवरूपांत हा मिसळतात. बर्फ तयार करण्यासाठीं, पोलादाला कठीणपणा आणण्यासाठीं, अत्यंत थंड उष्णतामान उत्पन्न करण्यासाठीं व आग विझविण्याच्या यंत्रांत असा अनेकविध त्याचा उपयोग आहे.

**कर्बयुक्त पद्धति**—(कार्बनिफेरस सिस्टिम). भूगर्भशास्त्रांतील तांबडा वाळूचा खडक (ओल्ड रेड सँडस्टोन) आणि पर्मियन घडणीचा खडक ह्यांमधील प्रस्तरसमूहांत दगडी कोळसा सांपडत असल्यामुळें त्याला हें नांव मिळालें आहे. इंग्लंडमधील ह्या प्रस्तरसमूहांत कोळशाचे थर, चकीचा दगड आणि समुद्रापासून तयार झालेला समुद्र चुनास्म (मरीन लाइमस्टोन) हे येतात. ह्यांशिवाय ह्या समूहांत लोखंडाची खनिज धातु, चिनी माती आणि इमारतींना उपयोगी पडणारा दगडहि मिळतो. वनस्पतींचे प्रस्तरावशेष ह्यांत अनेक प्रकारचे मिळतात.

**कर्बामिद**—( कार्बामाइड ). एक सेंद्रिय रासायनिक पदार्थ. जखम भरून आणणें, स्नायूंची दुरुस्ती करणें अथवा या गोष्टींची नवनिर्मिति करणें अशा क्रिया रसायनानें होतात. डॉ० लेन्हांडर यांनीं या दृष्टीनें संशोधन करून पुष्कळच यश मिळविलें आहे. शरीरांतील दूषित हाडें काढून टाकून त्यांच्या जागीं नवीन हाडें निसर्गतः त्याच जागीं वाढवणें या औषधी रसायनानें शक्य होईल. पुढेंमागें कृत्रिम दांत बसवण्याऐवजीं त्या जागीं नवे दांतच उगवतां येतील.

**कर्बाम्ल**—बेंझेनजन्य पदार्थ $C_6H_5OH$. दगडी कोळशाच्या डांबरांत हा मिळतो. ह्याला फेनॉल असेंहि नांव आहे. शुद्ध स्वरूपांत फेनॉल रंगहीन स्फटिकमय असून त्याचा वास उग्र आणि चव जळजळीत असते. शुद्ध अवस्थेंत शुभ्र असलेला हा पदार्थ कालांतरानें काळसर होतो. फेनॉल पाण्यांत विरघळतो. हा विषारी असून अंगावर पडल्यास त्या ठिकाणीं फोड उठतात. आसवनाची आणि नासण्याची क्रिया थांबवण्याची त्याचप्रमाणें जंतुनाशनाची शक्ति ह्याच्यांत असल्यामुळें औषधांत आणि शस्त्रक्रिया करतांना ह्याचा अतिशय उपयोग होतो.

**कर्बित**—कर्बाम्लांचें लवण. उदा., खट कर्बित ( कॅल्शियम कार्बोनेट ) ( $CaCO_3$ ), सिंधुकर्बित ( सोडियम कार्बोनेट ) ( $Na_2CO_3$ ), भारकर्बित ( बेरियम कार्बोनेट ) ( $BaCO_3$ ), सिंधुद्विकर्बित ( सोडियम बायकार्बोनेट ) ( $NaHCO_3$ ). बऱ्याच कर्बितांचा उद्योगधंद्यांत आणि औषधांत पुष्कळ उपयोग होतो.

**कर्बिद**—( कार्बाइड्स ). कर्ब आणि कोणताहि धातु ह्यांच्या संयोगानें तयार झालेला पदार्थ. कर्बिदें तयार करण्यासाठीं अतिशय उष्णता लागते, व तीं प्रायः विजेच्या भट्टींत तयार करतात. खट कर्बिद ( कॅल्शियम कार्बाइड ) पासून ॲसिटिलीन वायु तयार करतां येतो. धातु सांधण्यासाठीं ह्या वायूचा उपयोग होतो.

**कर्बेकप्राणिद**—( कार्बन मोनॉक्साइड ). कोळसा जळतांना हवेचें प्रमाण पुरेसें नसल्यास किंवा लाल तापलेल्या कोळशावरून कर्बद्विप्राणिद नेला म्हणजे हा वायु (Co) तयार होतो. याला रंग नाहीं, वास नाहीं, चव नाहीं. पण हा विषारी वायु आहे. हा ज्वलनक्षम असून ह्याची ज्योत फिकट निळ्या रंगाची असते. हा संपूर्ण जळला म्हणजे कर्बद्विप्राणिद तयार होतो व पुष्कळशी उष्णता तयार होते. युद्धकाळांत पेट्रोलच्या अभावीं मोटारींना जीं गॅसप्लँट्स लावलेलीं होतीं त्यांत हाच वायु ( Co ) तयार करून मोटार चालविण्याच्या कामीं त्याचा उपयोग करीत असत. मोठमोठ्या कारखान्यांत जळवायु ( वॉटर गॅस ) किंवा प्रोड्युसर गॅस जळणासाठीं तयार करतात. त्यांत प्रामुख्यानें हाच वायु असतो. प्राणवायूशीं सहजसुलभतेनें संयोग होण्याच्या त्याच्या गुणामुळें ह्या वायूचा धातुसंधानांत ( मेटालर्जी ) ही उपयोग होतो.

**कर्बोज्जित**—( कार्बो हायड्रेट ), साखर, पिष्ट ( स्टार्च ), काष्ठद्रव्य ( सेल्युलोज ), मधुज ( ग्लूकोज ), वगैरे पदार्थांचें रासायनिक जातिविषयक नांव. हे पदार्थ कर्ब, उज्ज आणि प्राणवायु ह्यांच्या संयोगानें बनलेले असून उज्ज आणि प्राण ह्यांचें एकमेकांशीं प्रमाण पाण्यांतल्याप्रमाणें ( $H_2O$ ) असतें.

**कर्म**—माणूस मनानें किंवा देहानें जी क्रिया इतरांवर करतो तिची सृष्टींत प्रतिक्रिया होते व हे परिणाम त्याला पुढें अवश्यमेव भोगावे लागतात असा हिंदु धर्माचा व अंशतः इतर धर्मांचाहि सिद्धान्त असून तो थिऑसफीमध्यें अधिक चांगल्या रीतीनें मांडलेला आहे. माणूस वाटेल ती गोष्ट करण्यास स्वतंत्र असतो, पण एकदां त्यानें त्या स्वातंत्र्याचा उपयोग करून एखादी गोष्ट केली कीं तिचे परिणाम त्याला टाळतां येत नाहींत. कधीं ते परिणाम लवकर परिपक्व होऊन त्याला भोगावे लागतात, तर कधीं परिणाम परिपक्व होण्यास फार काळ लागतो, व त्या काळांत जर तो माणूस मेला असला तर पुढच्या जन्मीं ते परिणाम त्याच्यापर्यंत येऊन पोहोंचतात व त्याला भोगावे लागतात. माणसानें दुसऱ्याशीं सद्वर्तन केलें तर त्याचा परिणाम 'सुख' असतो, दुर्वर्तन केलें तर त्याचा परिणाम 'दुःख' असतो व हे सुखदुःखरूपी परिणाम त्या माणसाला आजार, आपत्ति, दारिद्र्य, कुसंगति, श्रीमंती, सुशिक्षण, सत्संग, कौटुंबिक सौख्य, साधनांची अनुकूलता, वगैरे अनंत द्वारांनीं भोगावे लागतात. हें सुखदुःख शिक्षणात्मक असतें; व त्या शिक्षणानें माणसाची उत्क्रांति होत असते. कर्मांचा नियम हा फक्त पूर्वकालीन क्रियांचीं माणसास फळें देणारा नसून तो मानवी उत्क्रांति योजनेचाहि एक भाग आहे. कर्म जसें देहानें होतें तसें विचारवासनांनींहि होतें व जसें व्यक्तीला कर्म असतें तद्वत् जात, राष्ट्र, वगैरे व्यक्तींच्या गटांनाहि कर्माचा नियम लागू असतो. अशी कर्माच्या सिद्धान्ताची थिऑसफींत मांडणी आहे व थिऑसफीय पुढाऱ्यांनीं सूक्ष्मदृष्टीनें मनुष्याच्या पूर्वेतिहासाचें संशोधन करून कर्माचा नियम नुसता युक्तिवादावर आधारलेला नसून त्याच्या प्रक्रियेची अनुभवसिद्ध माहिती प्रसिद्ध केलेली आहे.

भारतीय तत्त्वज्ञानांत कर्मास फार महत्त्व देण्यांत आलेलें आहे. मनुष्यानें केलेल्या प्रत्येक बऱ्यावाईट कृत्याचें फल त्यास केव्हां तरी मिळतें. अर्थात् सत्कृत्याचें फल चांगलें व दुष्कृत्याचें वाईट असतें. हेंच कर्म, संचित, प्राक्तन, पूर्व, वगैरे नांवांनीं ओळखलें जातें व त्याप्रमाणें मनुष्याची उन्नति अगर अधोगति होत जाते.

आपल्या कर्माचें फळ या जन्मांत प्राप्त न झाल्यास पुढील जन्मांत मिळतें व हा पुढील जन्म कोणत्या योनींत मिळावयाचा हेंहि कर्मावर अवलंबून आहे अशी समजूत आहे. कर्मवादावर सर्व तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांत चर्चा केलेली आढळते (कर्मवाद पहा).

**कर्मकांड**— धार्मिक आचार-विधी कसे करावेत याबद्दलचे नियम. या नियमांत कालांतरानें फरक होऊं लागतात व त्या फरकांवरून निराळे संप्रदाय पडतात. ख्रिस्ती धर्मांत रोमन कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट व प्यूरिटन या संप्रदायांचे आचार निराळे आहेत. गेल्या शतकांत अँग्लिकन उपाध्यायांनीं नवे धार्मिक आचार सुरू केल्यामुळें इंग्लंडांत खळबळ माजली व पार्लमेंटला कायदे करावे लागले. तथापि हे नवीन आचार पुढें वरच्या समाजांतून रूढ झालेच.

सर्व धर्मांतून संस्कारविधी आहेतच. जों जों खालीं खालीं प्राथमिक अवस्थेंतील धर्माकडे जावें तों तों संस्कारांची गर्दी व त्यांवरची दृढश्रद्धा आढळून येते. मंत्रांतील एखादें अक्षर चुकलें किंवा तंत्र बिघडलें तर इष्ट फलप्राप्ति होत नाहीं असा समज पुष्कळांचा असतो. आचारविधींवरच बहुतेक भर असल्यामुळें मंत्रांच्या योग्यतेकडे किंवा अर्थाकडे लक्ष जात नाहीं. हिंदूंचे सोळा संस्कार, व्रतवैकल्यें, जपजाप्य हीं कर्मकांडाचें प्राबल्य दाखवितात. संस्कार पहा.

**कर्मनाशा**— पुराणांत त्याज्य मानलेली ही नदी बंगालमधील कैमूर डोंगरांत उगम पावते. हिची लांबी १४६ मैल आहे. अयोध्येचा राजा सत्यव्रत हा चांडालत्व पावला होता. त्याच्या माथीं तीन पापरूपी शंकू बसले होते म्हणून त्याला त्रिशंकु असें नांव पडलें. आजतागाईत या नदीस दोषयुक्त मानतात हें खरें. हिचें पाणी स्फटिकासारखें स्वच्छ आहे तरी कोणीहि हिंदू हिच्यांत स्नान करीत नाहीं. नाना फडणविसानें कर्मनाशेवर पूल बांधण्याची योजना केलेली आढळते. या नदीवरील पूल काशी येथील प्रसिद्ध व्यापारी राजा पटणीमल यानें बांधून काढला. या पुलावरून व ईस्ट इंडियन रेल्वेवरील दुसऱ्या एका पुलावरून धार्मिक हिंदूंना कर्मनाशेला न शिवतां पलीकडे जातां येतें.

**कर्ममार्ग**—कर्ममार्ग म्हणजे श्रौत कर्में करणें. वेदग्रंथांपैकीं संहिता व ब्राह्मण या वेदभागाला कर्मकाण्ड म्हणतात, आणि वेदांपैकीं आरण्यकें व उपनिषदें यांना ज्ञानकांड म्हणतात. भारतीय तत्त्वज्ञानांत मोक्ष मिळवण्याचे कर्ममार्ग, ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग असे तीन मार्ग सांगितले आहेत. त्यांपैकीं कर्ममार्गाचा उदय सर्वांत अगोदर झाला. पुढें उपनिषदें तयार झाल्यावर कर्ममार्ग आणि ज्ञानमार्ग यांमध्यें विरोध उत्पन्न होऊन त्याबद्दलचा वाद अद्यापहि चालू आहे. भक्तिमार्गाचा उदय बराच उत्तरकालीन आहे. ऋग्वेदकालीं मनुष्याचा देवतांशीं प्रत्यक्ष संबंध असावा, अशीं वर्णनें असून त्यांना संतुष्ट करण्याकरितां श्रौतकर्में म्हणजे यज्ञयाग सुरू झाले. कर्मानुळें म्ह. यज्ञ केल्यानें मनुष्याला स्वर्गप्राप्ति होते, व मोक्षहि मिळतो. (श. ब्रा. ३.१,४,३; ऐ. ब्रा. २.१,१) ब्राह्मणग्रंथांतच मनुष्याचीं तीन ऋणें— देवऋण यज्ञयागांनीं, ऋषिऋण स्वाध्याय म्हणजे वेदांच्या अभ्यासानें आणि पितृऋण पुत्रप्राप्तीनें—फेडावयाचीं, हें तत्त्व आढळतें. यामुळें यज्ञयागांचा इतका विकास झाला व पशुहत्या इतकी वाढली कीं, मोक्षप्राप्तीकरितां तत्कालीन विचारवंतांनीं आत्मा, ईश्वर, मोक्ष यांचा खोल विचार करणारीं आरण्यकें व उपनिषदें लिहिलीं. संसारांत राहून व यज्ञयागादि कर्में करून चांगलें किंवा वाईट कर्माचें फल भोगण्याकरितां पुनर्जन्म घ्यावा लागतो, त्यापेक्षां ज्ञानप्राप्ति करून व कर्मसंन्यास करून मोक्ष मिळविणें अधिक चांगलें असें प्रतिपादन उपनिषदांत केलेलें आढळतें. तथापि एकदम ज्ञानप्राप्ति होणें शक्य नसल्यामुळें कांहीं कर्में केल्यानंतरच ज्ञानप्राप्ति करून घेण्यास मनुष्याची तयारी होते, अशी कर्ममार्ग व ज्ञानमार्ग यांची तडजोड वेदान्ती लोक प्रतिपादन करीत. ज्ञानास साधन म्हणून वेदविहित कर्में म्हणजे मुख्यतः यज्ञयाग करावे. या विचारसरणीमुळें कर्ममार्गाला म्हणजे यज्ञयागांना ज्ञानापेक्षां अधिक महत्त्व देऊन कर्में केल्यानेंच मोक्ष मिळतो, असें प्रतिपादन जैमिन्यादि मीमांसकांनीं पूर्वमीमांसेंत केलें (जै. सू. ५.२,२३ वरील शाबरभाष्य पहा). धर्मसूत्रांत ज्ञानमार्ग व कर्ममार्ग यांची संगति लावून मनुष्यानें व्यवहारांत कसें आचरण करावें, हें सांगितलें आहे. त्रैवर्णिकांस ब्रह्मचर्य व त्यांत स्वाध्याय, गृहस्थाश्रम व त्यांत यज्ञकर्में, वानप्रस्थाश्रम व त्यांत ज्ञानप्राप्ति, आणि अखेर संन्यासाश्रम व मोक्षसाधन अशा आश्रमधर्मांची व त्या त्या आश्रमांतील कर्मांची व्यवस्था सांगितली आहे. मनु-याज्ञवल्क्यादिकांनीं आपल्या स्मृतिग्रंथांत याच चार आश्रमव्यवस्थेनुसार आचारधर्मांची मांडणी केली आहे. संसारी व व्यवहारी मनुष्याला आयुष्यक्रमाचा इतका व्यवस्थित मार्ग इतर कोठल्याहि धर्मांत सांगितलेला नाहीं.

कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग यांचा सुंदर समन्वय श्रीमद्भगवद्गीतेंत केला आहे. मोक्षप्राप्ति या तीन मार्गांपैकीं कोणत्याहि मार्गानें होणें शक्य आहे. तथापि अखिल मानवजातीला गृहस्थाश्रम अजीबात वगळून संन्यासाश्रम आयुष्यभर पाळणें शक्य नसल्यामुळें 'संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।, तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥' असा सामान्य जनसमाजाला मार्ग दाखवला असून मोक्षप्राप्तीकरतां निष्कामकर्म करावें, असा कर्मयोग प्रतिपादिला आहे. रामानुज

अध्यात्मरामायण, महाभारत, मन्वादिकांचे स्मृतिग्रंथ यांत आश्रमव्यवस्थेचें गृहस्थाश्रमाचें महत्त्व प्रतिपादिलें असून अगदीं अलीकडील श्रीसमर्थ रामदासकृत दासबोध ग्रंथांत 'प्रपंच सोडून परमार्थ केला। तरी अन्न मिळेना खायाला॥' (दा. १३.१२.३) असें सांगितलें आहे.

**कर्मयोग**—म्हणजे व्यापार, चळवळ किंवा कार्य करण्याचें तत्त्व. 'कर्म' या शब्दांत सर्व प्रकारच्या शारीरिक क्रिया येतात. 'योग' याचा साधा अर्थ उपाय, युक्ति असा घेण्यांत येतो. एकच कर्म करण्याचे जे अनेक मार्ग त्यांपैकीं पराकाष्ठेचा चांगला व शुद्ध मार्ग कोणता, व तोच विशिष्ट मार्ग चांगला कां व इतर मार्ग वाईट कां, इत्यादि गोष्टींचें जें शास्त्र तें 'कर्मयोगशास्त्र' होय. श्रीमद्भगवद्गीता ही कर्मयोगपर आहे, असें सांगणाऱ्या विद्वानांत लोकमान्य टिळक अग्रणी होत. (गीतारहस्य, पान ४६२). 'सांख्य' म्हणजे संन्यास हाच एक मोक्षमार्ग नसून 'कर्मयोग' हाहि एक दुसरा मोक्षमार्ग आहे व तोच भगवद्गीतेंत प्रतिपादिला आहे, असें टिळकांचें म्हणणें आहे. ब्रह्मविद्या किंवा आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर मोक्षप्राप्तीस कर्मसंन्यास (सांख्य) व कर्मयोग असे दोन मार्ग आहेत, त्यांचीं तत्त्वें तुलनेसाठीं येथें दिलीं आहेत :—

कर्मसंन्यासाचीं तत्त्वें—१. मोक्ष आत्मज्ञानानेंच मिळतो, कर्मानें नाहीं. ज्ञानविरहित पण श्रद्धेनें केलेल्या यज्ञयागादि कर्मांनीं मिळणारें स्वर्गसुख अनित्य होय. २. आत्मज्ञान होण्यास इंद्रियनिग्रहानें बुद्धि स्थिर, निष्काम, विरक्त व सम झाली पाहिजे. ३. म्हणून इंद्रियांच्या विषयांचा पाश तोडून मोकळें व्हावें. ४. तृष्णामूलक कर्में दुःखमय व बंधक आहेत. ५. म्हणून चित्तशुद्धि होईपर्यंत कर्में केलीं तरी तीं अखेर सोडून दिलीं पाहिजेत. ६. यज्ञार्थ केलेलीं कर्में बंधक नसल्यामुळें गृहस्थाश्रमांत तीं केल्यास हरकत नाहीं. ७. देहाचे धर्म सुटत नसल्यामुळें संन्यास घेतल्यावर पोटासाठीं भिक्षा मागणें गैर नाहीं. ८. ज्ञानप्राप्तीनंतर स्वतःचें कर्तव्य शिल्लक राहत नाहीं. ९. तथापि अपवाद म्हणून अधिकारी पुरुषांनीं ज्ञानोत्तरहि आपले व्यावहारिक अधिकार जनकादिकांप्रमाणें आमरण चालू ठेवण्यास हरकत नाहीं. १०. परंतु कांहीं झालें तरी कर्मत्यागरूपी संन्यासच श्रेष्ठ. इतर आश्रमांचीं कर्में चित्तशुद्धीचीं साधनें किंवा पूर्वतयारी असून ज्ञानाचा व कर्माचा स्वभावतःच विरोध आहे. म्हणून पूर्वाश्रमांत होईल तितक्या लवकर चित्तशुद्धि करून घेऊन ज्ञानोत्तर अखेर कर्मत्यागरूपी संन्यास घेणें. चित्तशुद्धि जन्मतः किंवा पूर्ववयांत झाली असेल, तर गृहस्थाश्रमीचीं कर्में करीत बसण्याचीहि जरूर नाहीं. कर्माचा स्वरूपतः त्याग करणें हाच खरा संन्यासाश्रम होय. ११. कर्मसंन्यास घेतल्यावरहि शमदमादिक धर्म पाळिले पाहिजेत. १२. हा मार्ग अनादि असून श्रुतिस्मृति-प्रतिपादित आहे. १३. शुक, याज्ञवल्क्यादि या मार्गानें गेले.

कर्मयोगाचीं तत्त्वें—(१) मोक्ष आत्मज्ञानानेंच मिळतो, कर्मानें नाहीं. ज्ञानविरहित पण श्रद्धेनें केलेल्या यज्ञयागादि कर्मांनीं मिळणारें स्वर्गसुख अनित्य होय. (२) आत्मज्ञान होण्यास इंद्रियनिग्रहानें बुद्धि स्थिर, निष्काम, विरक्त व सम झाली पाहिजे. (३) म्हणून इंद्रियांचे विषय न सोडितां यांतच वैराग्यानें म्हणजे निष्कामबुद्धीनें वागून इंद्रियनिग्रह कसोटीस लावणें—निष्काम म्हणजे निष्क्रिय नव्हे. (४) दुःख व बंध कशांत आहे याचा नीट विचार केला तर असें दिसून येईल कीं, अचेतन कर्में कोणासहि बांधीत किंवा सोडीत नसून त्यांच्या ठायीं असणारा कर्त्यांच्या मनांतील काम किंवा फलाशा हेंच बंधाचें व दुःखाचें मूळ आहे. (५) म्हणून चित्तशुद्धीनंतरहि फलाशा सोडून सर्व कर्में धैर्यानें, उत्साहानें करणें. कर्में सोडूं म्हटल्यासहि सुटत नाहींत. सृष्टि म्हणजेच कर्म, त्याला विसांवा नाहीं. (६) निष्कामबुद्धीनें किंवा ब्रह्मार्पणविधीनें केलेलीं सर्व कर्में हा एक मोठा 'यज्ञच' आहे. यासाठीं स्वधर्मविहित सर्व कर्में निष्कामबुद्धीनें केवळ कर्तव्य म्हणून नेहमींच केलीं पाहिजेत. (७) पोटासाठीं भिक्षा मागणें तरी कर्मच, व तेंहि 'लाजिरवाणें'. हें कर्म जर करावयाचें तर इतर कर्मेंहि निष्कामबुद्धीनें कां करूं नयेत? शिवाय गृहस्थाश्रमीयाखेरीज भिक्षा तरी कोण घालणार? (८) ज्ञानप्राप्तीनंतर स्वतःसाठीं कांहीं प्राप्त करून घेणें राहिलें नसलें तरी कर्म सुटत नाहीं. यासाठीं जें कांहीं शास्त्रतः प्राप्त होईल तें 'मला नको' अशा निर्ममबुद्धीनें लोकसंग्रहाकडे दृष्टि देऊन करीत जाणें. लोकसंग्रह कोणासहि सुटत नाहीं. उदाहरणार्थ, भगवंताचें चरित्र पहा. (९) गुणविभागरूप चातुर्वर्ण्यव्यवस्थेप्रमाणें लहान-मोठे अधिकार सर्वांसच जन्मतः प्राप्त होतात; आणि स्वधर्मांप्रमाणें प्राप्त झालेले हे अधिकार लोकसंग्रहार्थ सर्वांनींच निःसंगबुद्धीनें आमरण निरपवाद चालविले पाहिजेत. कारण हें चक्र जगाच्या धारणार्थ परमेश्वरानेंच निर्माण केलेलें आहे. (१०) सांसारिक कर्में शास्त्रोक्तरीत्या केल्यानें चित्तशुद्धि होते हें खरें आहे; तरी पण चित्तशुद्धि हा कर्माचा एकच उपयोग आहे असें नाहीं. जगाचा व्यवहार चालण्यासहि कर्माची जरूर आहे. तसेंच काम्य कर्में व ज्ञान यांचा जरी विरोध असला, तरी निष्कामकर्म व ज्ञान यांमध्यें बिलकूल विरोध नाहीं. म्हणून चित्तशुद्धीनंतरहि फलाशेचा त्याग करून चातुर्वर्ण्याचीं सर्व कर्में आमरण निष्कामबुद्धीनें जगाच्या संग्रहार्थ चालू ठेवणें हाच खरा संन्यास होय. कर्माचा स्वरूपतः त्याग करणें केव्हांच उचित व शक्यहि नाहीं.

(११) ज्ञानप्राप्तीनंतर फलाशात्यागरूप संन्यास घेऊन शमदमादिक धर्मांखेरीज आत्मौपम्यदृष्टीनें प्राप्त होणारे सर्व धर्म पाळणें आणि या शमानें म्हणजे शांत वृत्तीनेंच शास्त्रतः प्राप्त झालेलीं सर्व कर्में लोकसंग्रहार्थ आमरण करीत जाणें. निष्काम-कर्मेंहि सोडूं नये. (१२) हा मार्ग अनादि असून श्रुतिस्मृतिप्रतिपादित आहे. (१३) व्यास-वसिष्ठ-जैमिन्यादि आणि जनक-श्रीकृष्णादि या मार्गानें गेले. दोनहि मार्गांचें अंतिम साध्य मोक्षप्राप्ति हेंच आहे.

**कर्मवाद**—या जगामध्यें मानवाला जी भिन्न भिन्न स्थिति प्राप्त होते व त्याला जीं निरनिराळीं दुःखें प्राप्त होतात, त्याच्या कारणमीमांसेला 'कर्मवाद' म्हणतात. 'कर्मवाद' म्हणजे जीवात्म्यास अनेक जन्मांच्या फेऱ्यांतून जावें लागतें व त्याला विशिष्ट जन्मांत जें सुख किंवा दुःख मिळतें, तें त्याच्या पूर्व-जन्मांतील कर्मांचें फल होय. ही उपपत्ति सर्वथैव समाधानकारक नाहीं; कारण हिच्यामुळें अगदीं आरंभींच्या जन्माबद्दल कांहींच उलगडा होत नाहीं. तथापि या उपपत्तीमुळें बऱ्याच लोकांस मनःस्वास्थ्य लाभतें, पुष्कळांची नैतिक आचरणाकडे प्रवृत्ति होते, व एकंदरीनें समाजांत द्वेषबुद्धि कमी होऊन शांतता, सहिष्णुता, सलोखा, दयाबुद्धि, वगैरे अनेक गुणांचा परिपोष होतो.

'कर्मवाद' अथवा कर्मांचें फळ भोगावेंच लागतें, ही कल्पना भरतखंडांत वैदिक काळापासून आहे, (बृहदारण्यक उपनिषद् ३·२१३). रामायण, महाभारत व इतर पुराणग्रंथांत अनेक कथाप्रसंगानें कर्मवादाचा सविस्तर पुरस्कार व विवरण केलें आहे. अनुशासनपर्व, अध्याय २२ व ५७ यांत कोणतें कर्म केलें असतां कोणतें फल मिळतें, याची एक लांबलचक यादी दिली आहे. भगवद्गीतेंत कर्मवादाचें विवेचन चांगलें केलें आहे (गी. १४·११–१५). वेदान्त व सांख्य या दोन्ही शास्त्रांत आणि मन्वादिकांच्या स्मृतिग्रंथांत या कर्मवादाचा विस्तार आहे. (वेदान्तसूत्रें ४. १, १३–१५; सांख्यकारिका ६७; मनुस्मृति १२·३१–३४). कर्मांचे कायिक, वाचिक व मानसिक असे तीन भेद करून त्या प्रत्येक कर्मांचे सात्त्विक, राजस, तामस असे तीन भेद करून त्यांचीं लक्षणें दिलीं आहेत. मीमांसकदृष्ट्या सर्व कर्मांचे नित्य, नैमित्तिक, काम्य आणि निषिद्ध असे चार भेद होतात. संध्यादिक नित्यकर्में व नैमित्तिक कर्में केलींच पाहिजेत, न केल्यास पाप लागतें. निषिद्ध कर्में केल्यानें पाप लागतें. काम्य कर्में केल्यानें त्यांचें फल भोगण्यास पुन्हा जन्म घ्यावा लागतो. या कर्मांतून म्हणजे जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून सुटण्याचे म्हणजे मोक्ष मिळविण्याचे मार्ग सांख्यशास्त्रांत व वेदान्तशास्त्रांत निर-निराळे सांगितले आहेत.

बौद्ध संप्रदायांत कर्मवादाची वाढ पराकाष्ठेची झाली. आत्मा व त्याचें अमरत्व बौद्ध मानीत नाहींत. 'जीव' म्हणजे कर्मांच्या योगानें अनेक द्रव्यांचा एकत्र झालेला व क्षणोक्षणीं बदलणारा समुच्चय, असें म्हटलें आहे. यामुळें बौद्ध पुनर्जन्म मानीत नाहींत. जेव्हां एखादा मनुष्य मृत होतो, तेव्हां एक नवीन मनुष्य जन्मास येतो व मृत जीवाचें कर्म ग्रहण करतो, अशी त्यांची उपपत्ति आहे. कर्मांचे कुशल (चांगलें फल देणारे), अकुशल (वाईट फल देणारे), आणि अव्याकृत (कोणतेंच फल न देणारे) असे तीन विभाग करतात. कर्म दोन प्रकारचें असतें: शुद्ध व अशुद्ध. शुद्धकर्म वासना, अज्ञान, इत्यादिकांपासून अलिप्त असतें. म्हणून त्याचें फल भोगावें लागत नाहीं. अशा शुद्ध कर्मांपासून संसाराचा उच्छेद होऊन निर्वाणप्राप्तीचा मार्ग सुकर होतो. जैनांच्या मतें वासना, अज्ञान यांना महत्त्व नाहीं. ज्याप्रमाणें अग्नि जाणल्यास व अजाणत्यास दोघांनाहि दग्ध करतो, त्याप्रमाणें जाणता व अजाणता मनुष्यवध करणारा सारखाच दोषी असतो.

**कर्माकर्मविचार**—विवक्षित कृत्य नैतिकदृष्ट्या योग्य की अयोग्य आहे, यासंबंधींचा विचार अथवा व्यावहारिक नीति. परंतु नीतिविषयक कल्पना वरचेवर बदलतात; व अलीकडे पाश्चात्य विद्वानांनीं या विषयाचा प्राचीन काळापासून अभ्यास करून या विषयाचें एथिक्स उर्फ मॉरल फिलासॉफी म्हणजे आचारशास्त्र (सायन्स ऑफ कॉन्डक्ट) हें स्वतंत्र नीतिशास्त्र बनविलें आहे. प्राचीन काळीं जेथें व्यवस्थित धर्मस्थापना झाली तेथें धर्म व उपासना व व्यावहारिक आचरण यांबद्दलचे नियम धर्म-ग्रंथांतच अन्तर्भूत करण्यांत आले; स्वतंत्र नीतिशास्त्रावर प्राचीन ग्रीक लोकांत व रोमन लोकांत धर्मग्रंथ नसल्यामुळें नीतीच्या कल्पना निराळ्या तऱ्हेनें वाढीस लागल्या ('नीतिशास्त्र' पहा). हिंदु आर्यांमध्यें 'वेदोऽखिलो धर्ममूलम्' हें तत्त्व प्रस्थापित होऊन तदनुसार पुढें आचारधर्म सांगणारीं धर्मसूत्रें आणि मनुयाज्ञ-वल्क्यादिकांचे स्मृतिग्रंथ निर्माण होऊन ब्रिटिश अमदानी सुरू होईपर्यंत धार्मिक आचार, व्यावहारिक नीतिनियम आणि हिंदुकायदा या तिहींचा आधार हे स्मृतिग्रंथ असत.

पाश्चात्य ज्यू व खिस्ती लोकांत बायबल हा धर्मग्रंथ, आणि नंतर मुसलमानांत अरबस्तानापासून हिंदुस्थानापर्यंत व जिकडे जिकडे इस्लामी लोकांची राज्यसत्ता प्रस्थापित झाली तिकडे तिकडे कुराण हा धर्मग्रंथ धर्म, नीति व कायदा या तिघांनाहि एकच आधार होऊन बसला. अगदीं अलीकडे पश्चिमेकडे तुर्कस्तानांत केमल पाशा या सत्ताधीशानें धर्म, नीति व कायदा यांची फारकत केली, आणि तुर्कांच्या व्यावहारिक आचरणाला व कायद्याला आधुनिक पाश्चात्य वळण लावलें. ईजिप्त, इराण,

अफगाणिस्तान या देशांतहि हेंच वळण लागत आहे. हिंदुस्थानांतील 'पाकिस्तान' या स्वतंत्र मुस्लिम राज्याची घटना नवी तयार होत आहे.

युरोपांत खिस्ती धर्माचा प्रसार झाल्यावर १६ व्या शतकापर्यंत बायबल हाच प्रमाणग्रंथ होता. तदनुसार रोम येथील खिस्ती धर्मगुरु पोप व इतर धर्माधिकारी आर्चबिशप, बिशप, वगैरेंनीं मिळून आचारनियम, दोप व प्रायश्चित्तें यांच्या लांबलचक याद्या तयार केल्या. पातकी मनुष्यानें उपाध्यायासमोर (प्रीस्ट) स्वतः पापोच्चार केल्यावर उपाध्यायानें त्याला पापमुक्त केलें पाहिजे, ही खिस्ती लोकांत फार महत्त्वाची बाब बनली, व तदर्थ पापविमोचनपत्रें (इन्डल्जन्सेस) तयार झालीं. यालाच मुख्यतः विरोध करण्याकरितां खिस्ती धर्मात प्रॉटेस्टंट पंथ निर्माण झाला. अलीकडे पाश्चात्य विद्वानांनीं नीतिशास्त्र (एथिक्स), कायदेशास्त्र (ज्यूरिसप्रूडन्स) राज्यशास्त्र उर्फ शासनशास्त्र (पॉलिटिक्स) हीं तीन स्वतंत्र शास्त्रें निर्माण करून बायबल या धर्मग्रंथाचें अधिकारक्षेत्र फार मर्यादित केलें. हिंदुस्थानांतहि हिंदु कायदा स्वतंत्र तयार होत आहे.

**कर्मान**—इराण नांवाच्या प्रांताच्या राजधानीचें शहर. हें ६,१०० फूट उंचीवर आहे. याची लो. सं. ५०,००० आहे. यांपैकीं २००० पारशी, १०० यहुदी व कांहीं शिकारपुरी हिंदू लोक आहेत. येथें उत्कृष्ट गालिचे व बुरणुस तयार होतात. येथील गालिचांची विणकामाबद्दल व टिकाऊपणाबद्दल फार ख्याति आहे.

**कर्मानशहा**—इराण, याच नांवाच्या प्रांताची राजधानी. येथें मुख्यतः गालिचे व रेशमी कापड तयार होतें. या शहराचा व्यापार तेहरान, बगदाद व इस्फाहान या शहरांबरोबर चालतो. लो. सं. सुमारें ९०,००० आहे.

**कर्ल्यू**—सुतार पक्ष्याच्या जातीची एक पक्ष्यांची जात आहे. याची चोंच लांब, चिंचोळी व बांकदार असते. यांचे पाय लांब असून त्यांवर फारशीं पिसें नसतात व शेपटी वाटोळी असते. यांच्या कांहीं जाती ब्रिटिश बेटांत व कांहीं अमेरिकेंत आढळतात.

**कर्वे, केशवभट**—पेशवाईतील एक मोठा सावकार. याची पेढी इ. स. १७४४ ते १७७७ पर्यंत पुण्यास फार भरभराटींत होती. दमाजी गायकवाडास या पेढीवरून बरेंच कर्ज मिळत असे व त्याला जामीन पेशवे राहत. या कर्व्यांचे वंशज श्री. धों. के. कर्वे (हिंगण्याच्या महिलाश्रमाचे संस्थापक) हे होत.

**कर्वे, धोंडो केशव** (१८५८– )—महिलोन्नति करण्यासाठीं झटणारा एक साधुवृत्तीचा महाराष्ट्रीय पुरुष. मूळ गांव कोंकणांतलें मुरुड. उच्च शिक्षण मुंबईस व नंतर फर्ग्युसन कॉलेजांत प्राध्यापक. १८९३ सालीं यांनीं पुनर्विवाह करून स्त्रियांच्या उन्नति-कार्याची मुहूर्तमेढ रोवली. १८९६ सालीं हिंगण्यास

अनाथबालिकाश्रम ही संस्था विधवांसाठीं काढली. ही चांगली चालूं लागल्यावर १९१६ सालीं महिला विद्यापीठ स्थापन केलें. नंतर बहुतेक या संस्थाकार्यांतून निवृत्त होऊन ग्रामशिक्षणाची चळवळ हातीं घेतली (१९३६). १९४४ सालीं जगांतील मानवसमाजांत सर्व प्रकारांनीं समता नांदावी या उद्देशानें समतासंघ काढला. प्रतिकूल परिस्थितींतहि सत्कार्य नेटानें करण्याची व आपल्या विमल आणि सात्त्विक चारित्र्यानें समाजांत आदर उत्पन्न करावयाची हातोटी अण्णासाहेब कर्वे यांना चांगली साधली असून त्यांच्याप्रमाणें कार्य करणाऱ्यांना त्यांचें 'आत्मवृत्त' नमुनेदार आहे.

**कऱ्हाड**—मुंबई, सातारा जिल्ह्यांतील तालुका. क्षे. फ. ३३८ चौ. मैल. यांत कऱ्हाड हें मुख्य ठिकाण व दुसरीं ९८ लहान गांवें आहेत. एकंदर लो. सं. १,६६,००२. आगाशी, बहिरोबा, कमळेश्वर, चंदोबा, चोरोबा, इत्यादि मुख्य डोंगर आहेत. *आगाशीच्या डोंगरांत* कोरीव लेणीं आहेत. येथील जमीन चांगली सुपीक आहे. पाऊस सरासरी ३० इंच पडतो. हें गांव शातवाहनकालीन आहे, असें उत्खननांत सांपडलेल्या अवशेषांवरून दिसतें. येथें सांपडलेल्या ताम्रपटांत याला करहाट म्हटलें आहे. शिलालेखांत काळिआदि बारा गांवें अग्रणी नदीच्या आसपास आहेत असें दिलें आहे. या प्रांतांत चार हजार शहरें असावीं म्हणून याला करहाट (चार हजार) प्रांत म्हणत. बहामनी आणि आदिलशाही अमदानींत या गांवास महत्त्व होतें. शहर सदर्न मराठा रेल्वेवर साताऱ्याच्या दक्षिणेस एकतीस मैलांवर असून कृष्णा व कोयना या नद्यांच्या संगमावर आहे. याचें क्षे. फ. चौरसचौरस अर्धा मैल असून यांतील जमीन काळी (सुपीक) आहे. याच्या वायव्येस असलेला (मातीचा) किल्ला पहिल्यानें मुसलमानांच्या ताब्यांत होता. त्या किल्ल्याजवळ व नद्यांच्या संगमाजवळ देवळें आहेत. सुमारें पन्नासावर देवळें कृष्णा नदीच्या घाटावर आहेत. ईशान्येच्या बाजूस पंतप्रतिनिधींचा किल्ला असून तो परशुराम श्रीनिवास प्रतिनिधींच्या मातुश्री काशीबाई यांनीं १८०० त बांधला. किल्ल्यावर एकंदर बारा बुरूज आहेत, व भोंवतालची तटबंदीची भिंत ६ फूट उंच असून तिच्यांत जंग्या आहेत. येथील लो. सं. १७,९९६ आहे.

म्युनिसिपालिटीची स्थापना १८५५ त झाली. गांवांत तीन हायस्कुलें व कांहीं मराठी शाळा आहेत. तालुक्याचें मुख्य ठिकाण असल्यामुळें मामलेदार, मुनसफ, वगैरे अधिकाऱ्यांच्या कचेऱ्या आहेत. याच्या नैर्ऋत्येकडील टेंकड्यांत बौद्ध लोकांची कोरीव लेणीं आहेत. त्यांत ६४ गुहा आहेत. दुसऱ्या पुष्कळ लहान गुहा व एक पाण्याचें कुंड आहे. हीं लेणीं फार जुनीं आहेत, असें दिसतें. एका लेखाचा कांहीं भाग उपलब्ध झाला आहे. त्यांतील ओबडधोबड अक्षरांवरून तो पहिल्या किंवा दुसऱ्या शतकांतला असावा. कऱ्हाडास करहाटक म्हणत असत. शालिवाहन शकाच्या ११ व्या शतकांत येथें शेलारांचें राज्य होतें. कऱ्हाडच्या मनोऱ्यांत कैदी ठेवण्याची चाल मुसलमान-शाहींत होती. कोटांतील नकटया रावळाची जंगी विहीर पाहण्यासारखी आहे. कऱ्हाड हें पूर्वी पंतप्रतिनिधींचें राहण्याचें मुख्य ठिकाण होतें.

**कलकत्ता**— पश्चिम बंगाल प्रांताची राजधानी. १९१२ पूर्वी हें हिंदुस्थानच्या राज्याची राजधानी असून व्हाइसरॉयचें वसतिस्थान होतें. हें हुगळी नदीच्या पूर्व किनाऱ्यावर वसलेलें असून बंगालमधील २४ परगण्यांच्या जिल्ह्यांत आहे. समुद्रापासून ८६ मैल दूर असून समुद्रसपाटीपासून फक्त १८ ते २१ फूट उंच आहे. हें प्रत्यक्ष समुद्रावरील बंदर नसलें तरी येथून हिंदुस्थानचा निम्म्याहून अधिक समुद्रव्यापार चालतो. कालीदेवीच्या उपासनेशीं ह्या शहराच्या नांवाचा कांहीं संबंध आहे असें म्हणतात. कलकत्ता शहराची लो. सं. २१,०८,८९१ आहे. साऱ्या आशिया खंडांत टोकिओशिवाय इतकी लोकसंख्या कोणत्याहि शहराची नाहीं. ब्रिटिश राज्यांत लोकसंख्येच्या बाबतींत लंडन शहराच्या खालोखाल ह्या शहराचाच नंबर आहे. शहराच्या मध्यभागीं फोर्ट विल्यम किल्ला असून भोंवतालीं मैदान नांवाचा भव्य बाग आहे. ह्याच्या उत्तरेस युरोपियन लोकांचीं मोठमोठीं दुकानें आहेत. ह्याच्याभोंवतीं सर्व लोकवस्ती आहे. शहरांत लोकवस्ती दाट असून अस्वच्छ आहे. कलकत्ता शहराचें क्षेत्रफळ १२८३ एकर आहे. हवामान उष्ण व सर्द आहे. पावसाचें सरासरी मान ६१ इंच आहे. बंगाली, हिंदी, इंग्रजी, उर्दू, वगैरे एकंदर ५७ भाषा या शहरांत चालतात. श. ६५ लोक हिंदू आहेत व बाकीचे मुसलमान, ख्रिश्चन, बौद्ध, ज्यू, ब्राह्मो, इत्यादि जातींचे आहेत. हिंदूंत ब्राह्मण, कैवर्त, सुवर्ण, वाणीक, इत्यादि लोकांचा भरणा अधिक आहे. लालबझार व बाऊबझार हे शहराच्या मध्यमार्गीं आहेत. कलकत्ता शहर हौऱ्याशीं एका तरत्या पुलानें जोडलेलें आहे. कलकत्ता कार्पोरेशनचें उत्पन्न २ कोट रुपयांचें आहे. १९१२ सालीं इंप्रुव्हमेन्ट ट्रस्ट स्थापन होऊन शहराची पुष्कळ सुधारणा झाली. कलकत्त्यास खाजगी व सार्वजनिक अशा पुष्कळ चांगल्या इमारती आहेत. मेटकॉफ हॉलमध्यें इंपीरिअल लायब्ररी, अलीपूर येथें एक प्राणिसंग्रहालय व गुन्हेगार मुलांकरितां शाळा व दूलुंदा येथें वेड्यांचें रुग्णालय आहे. १८५७ सालीं कलकत्ता विद्यापीठाची स्थापना झाली. व प्रेसिडेन्सी कॉलेज, डोव्हटन कॉलेज, मार्टिनरी कॉलेज, डफ कॉलेज, संस्कृत कॉलेज, बिशप कॉलेज, सेंट झेवियर कॉलेज, मेट्रो पोलिटन कॉलेज, सिटी कॉलेज, रिपन कॉलेज, सेन्ट्रल कॉलेज, स्त्रियांकरितां बेथून कॉलेज, कलकत्ता मेडिकल कॉलेज, इंजिनिअरिंग कॉलेज, वगैरे अनेक कॉलेजें आहेत. इंग्रजी वृत्तपत्रें 'इंग्लिशमन', 'इंडियन डेली न्यूज', 'स्टेट्स्मन', 'एम्पायर', 'बंगाली', 'अमृतबझार पत्रिका', 'इंडियन मिरर', 'हिंदू पेट्रियट', 'फॉरवर्ड', वगैरे आणि 'मॉडर्न रिव्ह्यू', 'बिझिनेस वर्ल्ड', 'इंडियन एक्सप्रेस', 'इंटस्ट्री', वगैरे इंग्रजी मासिकें आणि इतर भाषेंत 'हितवादी', 'वसुमती', 'बंगवार्ता', 'भारतमित्र' वगैरे प्रसिद्ध होतात. कँपबेल हॉस्पिटल हें सर्वांत मोठें हॉस्पिटल असून ५१६ सामान्य रुग्णालयें, स्त्रियांकरितां डफरिन व्हिक्टोरिया हॉस्पिटल व एडन हॉस्पिटल, शिवाय दोन वेड्यांचीं हॉस्पिटलें व एक कुष्ठरोग्यांकरितां हॉस्पिटल आहे. शहराच्या दक्षिणेस कालीघाट आहे.

इतिहास—१५३० सालीं पोर्तुगीझ लोकांच्या हातीं व्यापार होता त्या वेळीं सरस्वती नदीवरील सातगांव हें व्यापाराचें ठाणें होतें. नंतर हुगळी हें झालें; व लवकरच गोविंदपूर नांवाचें गांव वसवण्यांत आलें. त्याच ठिकाणीं सध्यां फोर्ट विल्यम आहे. १५९० सालीं इंग्रजांनीं सुतानाटी हें व्यापाराचें ठाणें कायम केलें. कलकत्ता शहराला व्यापारी महत्त्व येण्याचें कारण, गंगानदीच्या प्रदेशांत होणारा सर्व तऱ्हेचा उत्तमोत्तम माल हुगळी नदींतून येथें येतो व कलकत्त्यापर्यंत व्यापारी बोटी जाऊं शकतात. १७०२ सालीं इंग्रजांनीं या शहरास तटबंदी करून एक मोठें शहर तयार केलें. त्यांत गोविंदपूर, सुतानाटी व कलकत्ता या तिघांचा समावेश होतो. १७४२ सालीं मराठ्यांच्या स्वारीच्या भीतीनें इंग्रजांनीं संरक्षणार्थ या शहराभोंवतीं एक मोठा खंदक खोदला त्यास 'मराठा डिच' असें म्हणतात. १७५६ सालीं बंगालचा नबाब सिराजउद्दौला यानें हें शहर काबीज केलें; पण १७५७ मध्यें क्लाइव्हनें पुन्हां कलकत्ता आपल्या ताब्यांत घेतलें. प्लासीच्या लढाईनंतर मीर जाफरनें कलकत्ता व इतर खेडीं इंग्रजांस इनाम दिलीं. नंतर गोविंदपूर निर्जन करून त्या ठिकाणीं फोर्ट विल्यम उभारण्यांत आला. वॉरन हेस्टिंग्ज हिंदुस्थानचा गव्हर्नर-जनरल झाला तेव्हांपासून कलकत्ता शहर हिंदुस्थानची राजधानी बनलें. १९११ सालच्या डिसेंबर महिन्यांत येथून दिल्लीस राजधानी नेण्यांत आली.

**कलंकी**—कलीच्या अंतीं शंभलग्राममध्यें राहणाऱ्या विष्णुयशानामक ब्राह्मणाच्या कुलांत जन्मास येणारा विष्णूचा अवतार ( भारत, वनपर्व, अ. १९० ). हा विष्णूचा १० वा अवतार होय ( भा., शां., अ. ३४० ). श्रावण शु. ॥ ६ हा कल्कीजयंतीचा दिवस मानतात. व कलियुगाच्या शेवटीं या दिवशीं कलंकी अवतार होणार असें पुराणग्रंथ म्हणतात. या अवताराला निष्कलंकावतार असें म्हणतात. कारण कलियुगांत मानवांची जी अवनति झाली आहे ती या अवतारांत सुधारेल व लोक सत्ययुगांतल्याप्रमाणें वर्तन करतील असें पुराणग्रंथ उल्लेखितात.

**कलगीतुरा**—महाराष्ट्रांत खालच्या वर्गाच्या लोकांत तमाशांत फडावर जें गाणें रात्रंदिवस ठिकठिकाणीं होत असलेलें दृष्टीस पडतें त्यांत कलगीतुऱ्याच्या गाण्याच्या बैठकी बहुतकरून असतात. या गाणारांत दोन पक्ष आहेत. त्यांत एक आपल्याला कलगीवाले व दुसरे तुरेवाले म्हणवून घेतात. कलगीवाल्यांना 'नागेश' व तुरेवाल्यांना 'हरदास' म्हणतात. कलगीवाले हे प्रकृतीचे व तुरेवाले हे पुरुषाचे सांप्रदायिक समजण्यांत येतात.

गणपतीचें स्तवन झाल्यानंतर पहिल्यानें कलगीवाले सवाल करितात व त्याचें उत्तर तुरेवाले देतात. याप्रमाणें प्रश्नोत्तररूपी हें गाणें आहे. तुरेवालेहि उत्तर देतांना कलगीवाल्यांना सवाल करितात. याप्रमाणें एकदां हा सामना सुरू झाला म्हणजे कोणता तरी एक पक्ष निरुत्तर होईपर्यंत हें गाणें चालतें.

या कलगीतुऱ्याच्या कवितेचा विस्तार अफाट आहे. तुळजापुराकडे यांचीं पांच पांच हजार पदें आहेत असें सांगतात. ही कविता सयमक अशी असून ती कटाव व पदें यांनीं युक्त अशी आहे. तरी कटाव फारच थोडे आहेत.

या कवितेंत महाभारत, रामायण, अठरा पुराणें, वेदान्त, कृष्णलीला, मुसलमानी धर्मशास्त्र, इत्यादि भरलेलें आहे. प्रत्येक ठिकाणचे शाहीर वेगळे असून त्यांची वेगवेगळी कविता आहे. कलगी म्हणजे माया व तुरा म्हणजे ब्रह्म, अथवा प्रकृति–पुरुष किंवा पत्नी–पति होत असा समज आहे.

**कलघटगी**—मुंबई, धारवाड जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तालुका, क्षेत्रफळ २७५ चौरस मैल. एकंदर खेडीं ९७. लो. सं. ४१,९८६ होती. बहुतेक प्रदेश डोंगराळ असून जंगलमय आहे. हा गांव मराठ्यांच्या अमदानींत एक संमत होता.

**कलचुरी**—या राजघराण्याचीं नांवें कलचुरी, कलचुर्य, कटचुरी अशीं भिन्न आढळतात. हें क्षत्रिय घराणें वास्तविक हैहय या अत्यंत प्राचीन घराण्याचीच एक शाखा आहे. हें चेदी देशावर राज्य करीत होतें. महाभारतांत या चेदी देशाचें नांव येतें. कलचुरी यांची राजधानी त्रिपुर होती. त्रिपुरकर कलचुरी यांनीं आपला स्वतःचा एक शक सुरू केला. त्याला चेदी शक असें नांव असून त्याचा आरंभ इ. स. २४८ सप्टेंबर ५ रोजीं झाला. या चेदी शकाला कलचुरी शक हें नांव मात्र इ. स. च्या ८ व्या शतकांत मिळालें. मध्य हिंदुस्थानांतील रतनपूरचे राजे–हेहि आपणास चेदी अगर हैहय ( कलचुरी ) वंशीय म्हणवितात. दक्षिणेंतील कलचुरी घराणें–याचा आरंभींचा उल्लेख इ. स. ११४८ च्या सुमारचा आढळतो. या वेळीं तिसरा सोमेश्वर चालुक्य हा सार्वभौम असून त्याचा मांडलिक म्हणून एक ( जोगयाचा पुत्र ) पर्मादि कलचुरी तर्दवाडी प्रांताचा राजा होता ( ११२८ ). हे कलचुरी राजे पश्चिम चालुक्याच्या सार्वभौम सत्तेखालीं वैभवास चढले. यानंतरच्या कलचुरींचा मागमूस लागत नाहीं. कारण पुढें होयसल बल्लाळ यादव यानें कल्याणीचें सर्व राज्यच पादाक्रांत केलें.

तैल तिसरा ( चालुक्य ) याचा बिज्जल कलचुरी हा सेनापति होता. यानें बंड करून व तैलाला एकीकडे ठेवून आपण राज्य घेतलें ( ११५६ ). हा शूर होता. बिज्जल हा जैन होता, आणि या वेळीं कर्नाटकांत बौद्ध व जैन धर्मांविरुद्ध वीरशैव धर्माची एक लाट उसळली होती. त्याचा फायदा घेऊन बसव नांवाच्या बिज्जलाच्या ब्राह्मण प्रधानानें प्रथम त्याला पदच्युत करून व त्यानें आपल्या लिंगायत पंथांतील दोघां साधूंचे डोळे काढल्याचा आरोप त्याच्यावर ठेवून त्याचा वध केला. बिज्जलाच्या वंशजांनीं ११८३ पर्यंत कल्याणीस राज्य केलें. पश्चिम चालुक्य, पूर्व चालुक्य, राष्ट्रकूट यांनीं या कलचुरी घराण्याशीं अनेकदां लग्नव्यवहार केलेले होते. होयसल यादव वीरबल्लाळ ( दुसरा ) यानें त्याचा पराभव करून ( व चालुक्य आणि कलचुरी या दोन्ही घराण्यांचा नाश करून ) आपली सत्ता स्थापिली ( ११८४ ).

**कलथथलई** ( ३०–६० )—चेर राजाच्या पदरीं असलेला हा भाट तामिळी भाषेंतील एक कवि होता. चेरल–अथन राजाच्या चोलकिल्ली व करिकाल चोल या राजांच्याबरोबर झालेल्या लढाईच्या वेळीं हा हजर होता. इरंकोवेलची राजधानी अरैयम ही तेथील राजानें या कवीचा मान ठेवला नाहीं म्हणून रसातळास गेली!' असें कपिलर कवीचें म्हणणें आहे. कलथथलईकृत सहा पदें पुरुनानुरुमवमध्यें आहेत.

**कलन**—(च्युति) (इं. डेक्लिनेशन). खस्थ पदार्थाचें खस्थ विषुववृत्तापासूनचें अंतर. हें ध्रुव आणि खस्थ पदार्थ यांतून जाणाऱ्या महावर्तुळावर मोजण्यांत येत असतें. ( भू ) रेखांशाशीं याचें साम्य आहे. पृथ्वीवरील स्थळांचें स्थान काढण्यास ज्याप्रमाणें अक्षांश आणि रेखांश लागतात त्याप्रमाणें आकाशांतील ग्रहताऱ्यांचें नक्की स्थान काढण्यास विषुवांश आणि कलन लागतात.

होकायंत्रांतील सुईचें कलन किंवा चुंबकीय कलन हें स्थलाच्या खऱ्या याम्योत्तर वृत्तापासून चुंबकीय सुईचें होणारें चलन होय. हें निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें असतें. तसेंच एकाच स्थळीं निरनिराळ्या वेळीं निरनिराळें असतें.

**कलनगणित**—(कॅल्क्युलस). ·१, ·०१, ·००१, ·०००१ अशा अनंत संख्या मांडतां येतील. अर्थात् त्यांची किंमत कमी कमी होत जाईल, पण अगदीं शून्य कधीं होणार नाहीं. अशा संख्यांस शून्यसीमासंख्या (इन्फिनिटेसिमल) असें म्हणतात. अशा संख्यांची बेरीज, वजाबाकी, गुणाकार व भागाकार करतां येतात. $य = क्ष^2$ असें समीकरण घ्या. क्ष ला ०, १, २, ३, ४ अशा किंमती द्या, म्हणजे य = ०, १, ४, ९, १६ अशा किंमती येतील. येथें य ही चल राशी क्ष वर अवलंबून आहे व क्ष स्वतंत्र आहे. बाजूच्या आलेखानें हा संबंध दाखवितां येईल.

प, फ हे आलेखावर दोन बिंदू आहेत. प चे संदर्भ क्ष, य. येथें क्ष = ओम व य = मप. फ चा संदर्भ क्ष + छक्ष, य + छय. छक्ष याचा अर्थ क्ष (क्ष¹), मधला फरक. आकृतींत पब = छक्ष. बफ = छय व $\frac{छय}{छक्ष}$ हा पफ चा कल. फ बिंदु वक्रावरून सरकून प पर्यंत आणा. तो असा कीं, या दोन बिंदूंचें अस्तित्व कायम पण त्यांमधील अंतराची सीमा शून्य राहील. अशा स्थितींत पफ रेषा वक्राची स्पर्शरेषा होईल. $\frac{छय}{छक्ष}$ या अपूर्णांकाची कांहीं ठराविक सीमा ( लिमिट ) येईल. ही सीमा वक्रावरील प बिंदूशीं येणाऱ्या स्पर्शरेषेचा कल ( ग्रेडियंट ) होईल. ह्या सीमेला आंतरगुणक ( डिफरेन्शिअल कोइफिशंट ) किंवा क्ष चे संदर्भानें य चें कलन ( डेरिव्हेटिव्ह ) म्हणतात.

हीं कलनें अथवा निरनिराळ्या सूत्रांनीं दर्शविलेल्या फलाचे आंतरगुणक काढणें हें कलनगणिताचें मुख्य काम व नंतर फलांच्या ( फंक्शन्स ) उच्चनीच किंमती, वक्रांची भूमिति व फलांचा विस्तार विशेषतः ज्या ठिकाणीं चढउतार, बदल आला अशा गणिताचा विचार करते वेळीं बदलाच्या दराचा ( रेट ) संबंध येतो. विश्वामध्यें प्रत्यहीं सर्व ठिकाणीं घडामोडी अथवा बदल एकसारखा होत असतो, म्हणून या शास्त्राचा अभ्यास सर्व शास्त्रें समजण्यास अवश्य आहे.

$\frac{दय}{दक्ष}$ दिला असतां य काढणें हें संकलनगणित ( इंटीग्रल कॅल्क्युलस ) याचें काम आहे. क्षेत्रें, व्याप, वगैरे अनेक बाबींचा विचार यामध्यें येतो.

**कलबगूर**—हैद्राबाद संस्थान, मेदक जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ३९० चौरस मैल आहे. लोकसंख्या (१९११) १,२६,९१७. या तालुक्यांत २ गांवें व १७२ खेडीं आहेत. पैकीं ६० जहागीर आहेत. या तालुक्यांत तळीं पुष्कळ असल्यामुळें भात व ऊंस पुष्कळ होतो. कलबगूर येथें एक सुंदर देऊळ आहे.

**कलम**—फलवृक्षसंवर्धनामध्यें झाडें बनविण्याचा एक प्रकार. यामध्यें एका झाडाची-एक किंवा दोन डोळे असलेली फांदी घेऊन ती दुसऱ्या एखाद्या झाडाच्या खोडामध्यें बसविण्यांत येते. कलमें करण्याच्या भेट कलम, खुंटीचें कलम, दाब कलम, डोळे भरणें, वगैरे अनेक पद्धती आहेत.

वनस्पतीच्या अवयवाची छाटणी केल्यास छाटलेल्या भागापासून पूर्ववत् झाड तयार होतें. या नैसर्गिक क्रियेमुळें कलम करण्यापासून नवी अभिवृद्धि होते.

**कलमदाने**—कमलदान राखणारा अधिकारी. मराठी राज्यांत अनेक खात्यांपैकीं कचेरी खातें असून त्याच्या पोटीं हा कलमदाने अधिकारी होता. त्यानें पाळावयाचे नियम एका जाबत्यांत आले आहेत.

**कल(ळ)मेश्वर**—मध्यप्रांत, नागपूर जिल्हा व तहशिलींतील एक लहान गांव. हें गांव अहीर लोकांनीं वसविलें असा समज आहे व कलम हें त्यांच्या देवाचें नांव आहे. बख्त बुलंदच्या वेळीं आलेल्या एका हिंदु घराण्यानें येथें एक किल्ला बांधलेला आहे.

**कलरायण डोंगर**—मद्रास, दक्षिण अर्काट जिल्हा व सालेम जिल्ह्याच्या अतूर व उत्तंगरि तालुक्यांत हे डोंगर आहेत. या डोंगरांत करिरामन नांवाचें देऊळ असून डोंगरांत राहणाऱ्या मल्याळी लोकांचें तें एक क्षेत्र आहे. या डोंगराच्या ओळीस ठिकठिकाणीं निरनिराळीं नांवें असून त्यांची पांच जहागिरींत विभागणी झालेली आहे.

**कलश**—काश्मीर देशांतील एक राजा. पांचवा राजवंश जो लोहर त्या घराण्यांतील अनंत राजाचा हा मुलगा. बायकोच्या आग्रहावरून म्हातारपणीं अनंत राजानें कलशास गादी देऊन आपण वानप्रस्थाश्रम घेतला. पुढें कलश दुर्व्यसनी निघाला. त्याबद्दल बापानें त्याची कानउघाडणी केली असतां त्यानें बापाला ठार मारण्याचा प्रयत्न केला. कलशानें पुन्हां त्याचा क्रम सतत सुरूच ठेवला. शेवटीं कंटाळून अनंत राजानें आत्म-

हत्या केली. मुलगा आईच्या भेटीस गेला नाहीं तेव्हां तीहि सती गेली. पुढें कलश सन्मार्गानें चालूं लागला. कलश हा इ. स. १०७२ त मरण पावला.

**कलसिया**—पंजाबांतील एक संस्थान. या संस्थानाचे अंबाला आणि फेरोझपूर जिल्ह्यांत निरनिराळे वीस तुकडे आहेत. क्षे. फ. १९२ चौ. मै. लो. सं. ६७,३९३. या संस्थानांत दोन गांवें व १८१ खेडीं आहेत. उत्पन्न सुमारें ६ लाख रुपये. राजा रविशेर सिंह शीखधर्मीय आहे.

**कलहंडी संस्थान**—ओरिसा प्रांतांतील एक संस्थान. याला पूर्वी करोड असें नांव होतें. १९०५ सालीं दुसऱ्या कांहीं संस्थानांबरोबर हेंहि संस्थान मध्यप्रांतांतून काढून ओरिसा विभागाला जोडण्यांत आलें. पूर्व घाटांची एक रांग या संस्थानांतून ईशान्येकडून नैर्ऋत्येला जाते. क्षे. फ. ३,७४५ चौ. मै. व लो. सं. ४,१८,९९३. यांत एक शहर व २,१५१ खेडीं आहेत. लोकसंख्येपैकीं सुमारें अडीच लक्ष हिंदू व दीड लक्ष वन्य धर्मीय आहेत. संस्थानचें उत्पन्न सुमारें तीन लाख रुपये आहे. खंडणी १० हजार आहे. वस्ती बहुतेक खोंड जातीच्या लोकांचीच आहे. संस्थानची राजधानी भवानी पाटणा आहे.

**कलहस्ती**—मद्रास इलाख्यांतील ही सर्वांत मोठी जमीनदारी असून तीपैकीं कांहीं भाग उत्तर अर्काट जिल्हा, कांहीं नेलोर व कांहीं चिंगलपट जिल्ह्यांत आहे. या जमीनदारींतील जिल्हे, खेडीं व त्यांचें क्षेत्रफळ पुढीलप्रमाणें: उत्तर अर्काट-खेडीं ४०६. क्षे. फ. ६३८ चौ. मैल, नेलोर-खेडीं २०१. क्षे. फ. ५७६ चौ. मैल, चिंगलपट खेडीं-२०६. क्षे. फ. २५० चौ. मैल. कलहस्ती गांव हें मुख्य ठिकाण असून तेथेंच जमीनदार राहतो. जमीनदारास वंशपरंपरेनें राजा हा किताब देण्यांत आला आहे. तहशिलीचें क्षे. फ. ६३८ चौ. मैल असून लो. सं. दीड लक्ष आहे. एकंदर उत्पन्न दोन लक्ष रुपये आहे. कलहस्ती गांवाची लो. सं. १३,१५२ असून हें साउथ इंडियन रेल्वेचें स्टेशन आहे. येथील शिवाचें देऊळ प्रसिद्ध असून काशीइतकें या देवस्थानाचें महत्त्व येथील लोक मानितात.

**कलहारी**—हें वाळवंट दक्षिण आफ्रिकेंत असून क्षेत्रफळ १,२०,००० चौ. मै. आहे. याचा दक्षिणेकडील भाग बचुआना प्रोटेक्टोरेटच्या हद्दींत असून पश्चिमेकडील भाग जर्मन आफ्रिकेंत होता. ह्या ठिकाणीं सिंह, चित्ते, पाणघोडे, गेंडा, म्हैस, झिब्रा, बबून नांवाचीं माकडें व शहामृग हे प्राणी आढळतात. वार्षिक पाऊस १० इंचांपेक्षां जास्त नसतो. पाऊस उन्हाळ्यांत पडतो. ह्या वाळवंटांत बुशमेन राहतात. हे धनुष्यानें शिकार करून आपला निर्वाह करितात. हे सिंहाची पूजा करणारे लोक आहेत. या वाळवंटांतून १८७८ मध्यें लिव्हिंग्स्टननें पहिल्यानें प्रवास केला.

**कला**—कला या शब्दाची व्याख्या व उपपत्ति अद्याप शास्त्रशुद्ध झालेली नाहीं. ज्या गोष्टींत कौशल्य दिसून येतें, ती कला, अशी सामान्य व्याख्या आहे. व्यवहाराच्या प्रत्येक गोष्टीमध्यें कौशल्य लागतें म्हणून प्रत्येक गोष्ट कलाविषयक होय. त्यामुळें निरनिराळे धंदे यांना कला हें नांव पडलें. व्यावहारिक उपयुक्ततेमुळें अगदीं प्राचीन रानटी लोकांतहि अनेक कला निर्माण झाल्या. उपजीविकेकरितां शिकारीची हत्यारें करण्याची कला, स्त्रीजातीला आकर्षिण्याकरितां शरीरविभूषणें करण्याची कला, मृत पितरांचें स्मारक म्हणून मूर्ती व देवालयें, पशुपक्ष्यांची माहिती पुरवण्याकरितां गुहेवरील चित्रें, याप्रमाणें सुतारकाम, लोहारकाम, सोनारकाम, शिल्पकला, चित्रकला, इत्यादि कलांचा आरंभ व विकास अगदीं रानटी लोकांत झाला. इतकेंच नव्हे तर, हृदयांतील भावना प्रदर्शित करण्याच्या प्रवृत्तीचा जोर आहारनिद्रादि प्रवृत्तींच्या खालोखाल असल्यामुळें रानटी इसमहि आपला आनंद ओरडून, नाचून, टाळ्या वाजवून व्यक्त करूं लागला व गायन, वादन, नर्तन या कला मानवाच्या रानटी अवस्थेंतच निर्माण झाल्या. या तीन कलांचा उपयोग वैयक्तिक स्वार्थाकरितां नसून लोकरंजनाकरितां असल्यामुळें रानटी जातींतहि उन्नत कला उर्फ ललितकला उगम पावल्या. तथापि उपयुक्त कला आणि ललितकला यांची शास्त्रशुद्ध व्याख्या आणि उपपत्ति सुधारलेल्या प्राचीन ग्रीक प्लेटो, आरिस्टॉटल या विद्वानांनीं सांगण्यास सुरुवात केली; आणि उपयुक्ततादृष्टीला महत्त्व देऊन वैद्यक, शेतकी, चांभारकाम, वगैरे कलांना महत्त्व देऊन केवळ मनोरंजनाच्या ललितकला कुचकामी ठरविल्या. संगीत, काव्य, चित्र, या कलांनीं शरीरपोषणाला मदत होत नाहीं, किंवा संपत्तींत भर पडत नाहीं, असें असूनहि या कलांची वाढ प्राचीन काळापासून चालू आहे, याबद्दल आरिस्टॉटलनें आश्चर्य प्रकट केलें आहे. तरीहि खुद्द ग्रीस व रोममध्यें संगीतकला, काव्यकला, चित्रकला, शिल्पकला यांची उत्कृष्ट प्रगति सतत चालू राहून १४-१५ व्या शतकांपर्यंत या कला अत्यंत उन्नत दशेला पोंचल्या.

प्लेटो-आरिस्टॉटलनंतर ललितकलांची उपपत्ति व व्याख्या यांकडे अर्वाचीन जर्मन कवि शिलर याच्या काळापर्यंत कोणींच विद्वानांनीं लक्ष दिलें नाहीं. कँट व शिलर या जर्मन पंडितांची ललितकलांबद्दलची विचारपद्धति एकाच धर्तीची आहे. मनुष्यमात्रांत इंद्रियसुखाच्या पाशवी वृत्तीचें आणि नैतिक प्रवृत्तीचें द्वंद्वयुद्ध सतत चालू असतें. याशिवाय एक तिसरी प्रवृत्ति म्हणजे लीलाप्रवृत्ति मनुष्यमात्रांत असून संगीत, काव्यकला, चित्रकला यांचा उगम या लीलाप्रवृत्तींतूनच होतो; आणि सदभिरुचि, सौंदर्यप्रेम या उच्च भावनांचें शिक्षण ललितकलांमुळेंच

मिळतें. मनुष्य स्वसमाजोपयोगी बनतो, आणि इंद्रियवासना व नैतिक भावना यांचें द्वैत कमी करून स्वतःचें आयुष्य सुखी करतो. ही उपपत्ति शिलरनें विस्तारपूर्वक मांडली, व ती व्यापक व उत्साहजनक व उच्च दर्जाची असल्यामुळें गेल्या शतकभर विद्वन्मान्य झाली.

तथापि केवळ लीलाप्रवृत्तीमुळें ललितकला निर्माण झाल्या, ही उपपत्ति अलीकडे विद्वानांना पटत नसून लीलाप्रवृत्ति, अनुकरणप्रवृत्ति, स्मारकेच्छा आणि भावनाप्रदर्शनप्रवृत्ति या चार प्रवृत्तींमुळें ललितकलांचा उगम व विकास होतो. ' ललितकला म्हणजे भावना व्यक्त करण्याकरितां स्वार्थनिरपेक्ष इतरांना आनंद देण्याकरितां केलेली कृति ' अशी व्याख्या व उपपत्ति सांप्रत दिली जाते. तथापि ही व्याख्याहि शास्त्रशुद्ध नाहीं. मनोधर्माचें पृथक्करण करून सौंदर्यशास्त्र व ललितकला यांची उपपत्ति व व्याख्या व्हावयास पाहिजे.

आकृति, रंग, ताल, मेळ, ठोकळमानानें पाहतां निसर्गकृति नसलेली म्हणजे कृत्रिम जी रचना, तिला कला म्हणावें. हावभाव, ध्वनि, इ. गोष्टींत भावना व उत्पादक कल्पना यांचा आविष्कार जो होतो त्याला हें नांव देतां येईल. निसर्गाच्या कृतीची वाढ यामुळें होत असते. कला या संज्ञेत संगीत, नृत्य, नाट्य आणि साहित्य हीं येतात, पण विशिष्ट अर्थानें वास्तुशिल्प, मूर्तिशिल्प, रेखाकला आणि रंगकला यांनाच कला हें अभिधान लावण्यांत येतें. ज्या यांत्रिक किंवा हस्तकृतींत कौशल्य लागतें त्यांनाहि कला म्हणतात. या योगानें कलेचा कृतीशीं व शास्त्राचा ज्ञानाशीं अविभाज्य संबंध जोडला जातो. कलेचा इतिहास कलाकृतींच्या इतिहासांत पाहावयास मिळेल. उदा०, रंगकला, शिल्पकला यांची वाढ त्या त्या लेखांत दाखविली जाईल. तत्त्वज्ञान, शास्त्र आणि इतिहास यांसारख्यांना उदात्त कला ( लिबरल आर्ट्स ) म्हणण्याची वहिवाट आहे. आपल्याकडे जुन्या कलांची यादी चौसष्ट किंवा त्यांहून अधिक भरते. चौसष्ट कलांसाठीं वाक्संप्रदाय कोश पाहा.

प्राचीन पाश्चात्य कला— ईजिप्तमध्यें ख्रि. पू. ३००० वर्षांपासून शिल्पकला उच्च दर्जाला पोंचलेली दिसते. पिरॅमिड म्हणजे राजाचें शव ठेवण्याकरितां घडीव दगडांच्या केलेल्या कृत्रिम टेंकड्या, ओबेलिस्क नांवाचे मनोरे, भव्य देवळें हें ईजिप्शियन शिल्पकलेचे प्राचीन नमुने होत.

बाबिलोनिया व असुरिया— बाबिलोनियांतील बेलचें देऊळ पिरॅमिडपेक्षां अधिक उत्तम वास्तुकलेचा नमुना होय. असुरियांतील नेबूचाड नेझरचा राजवाडा उत्कृष्ट शिल्पाचा नमुना आहे. यांनीं रंगीत व चकचकीत विटांवर गालीचासारखी नक्षी काढून वास्तुकला प्रगत केली.

ग्रीक वास्तुशिल्प— ग्रीकांनीं संगमरवरी दगडांचा उपयोग करून ॲक्रोपोलीस टेंकडीवरील देवळें, ऑलिंपिक खेळांच्या जागेवरील इमारती, राजवाडे व नाटकगृहें, इत्यादिकांत अथेन्स शहरीं वास्तुशिल्प कळसास पोंचविलें होतें.

रोमन वास्तुशिल्प— रोमन लोकांनीं उपयुक्ततेवर भर देऊन मोठमोठीं नाटकगृहें, अर्धवर्तुलाकार रंगशाला, विजयाच्या कमानी, रोमन स्नानगृहें, जलमार्ग, इत्यादि उत्तमोत्तम बांधकामें बांधण्यांत आपलें वास्तुशिल्पकलाकौशल्य व्यक्त केलें आहे.

बायझंटाइन वास्तुशिल्पकला— जस्टीनियन व कॉन्स्टन्टाइन यांच्या अमदानींत वास्तुशिल्पकलेचा उत्कर्ष झाला. या कालांत मध्यें चौक व वर घुमट अशी इमारत ही शिल्पकलेची लोकप्रिय पद्धत बनली आहे.

मुसलमानी शिल्पकला—मशिदींना घुमट, उंच व बारीक मनोरे आणि नालाच्या आकाराच्या अणकुचीदार कमानी हें इस्लामी कलेचें वैशिष्ट्य आहे.

भारतीय कला— कला या शब्दाचें विषयव्यापकत्व प्राचीन भारतीयांनीं लक्षांत घेऊन कला ६४ ठरवल्या आहेत. पण त्यांची यादी शुक्रनीतींत, भागवतांत व वात्स्यायन कामसूत्रांत निरनिराळी दिली आहे. अगदीं प्राचीन वैदिक काळांत यज्ञयागाशीं संबद्ध अशा अनेक कलांचा विकास झाला. वैदिक वाङ्मयांत कुंभारकाम, गवंडीकाम, सुतारकाम, सोनारकाम, कृषि, पशुपालन, रथकाम, संगीत, गायनवादन, नृत्य, खाटीककाम, वगैरे अनेक उपयुक्त कलांची वाढ झालेली दिसते. शुक्रनीतींत ६४ कलांची यादी दिली आहे. त्या यादींत १ ते ७ हें गांधर्व कलासप्तक, ८ ते १७ हें आयुर्वेद कलादशक आणि १८ ते २२ हें धनुर्वेद कलापंचक आहे.

(अ) गांधर्व कलासप्तक—( १ ) साभिनय नर्तन, ( २ ) वाद्यकरण व वादन, ( ३ ) वस्त्रालंकारसंधान, (४) अनेकरूपाविर्भावकृतिज्ञान, ( ५ ) शय्यास्तरणसंयोगपुष्पादिग्रथन ( ६ ) द्यूतादि क्रीडानुरंजन, ( ७ ) अनेकासनसंधानयुक्त रति.

(आ) आयुर्वेद कलादशक—(८) मकरंदासव मद्यकृति, ( ९ ) शल्यगूढाहृति शिराव्रणव्यध, ( १० ) हिंग्वादि संयोगादन्नपचन, ( ११ ) वृक्षादि प्रसवारोपपालनकृति, ( १२ ) पाषाणधात्वादिदृति भस्मीकरण, ( १३ ) इक्षुविकारादि कृतिज्ञान, ( १४ ) धात्वोषधि संयोगक्रियाज्ञान, ( १५ ) धातुसांकर्यपार्थक्यकरण, ( १६ ) धात्वादि संयोगपूर्वविज्ञान, ( १७) क्षारनिष्कासनज्ञान.

( इ) धनुर्वेदकलापंचक—(१८) पदन्यासपूर्वक शस्त्रसंधानविक्षेप, ( १९ ) संध्याघाताकृष्टि भेदयुक्त मल्लयुद्ध, ( २० ) बाहुयुद्धनिपीडन व प्रतिक्रिया, ( २१ ) यंत्रायस्त्रनिपातन, व्यूहरचना, ( २२ ) गजाश्वरथगत्या युद्धसंयोजन.

याशिवाय आणखी कला आहेत त्या — (२३) चित्रकला, (२४) सोनारकाम (दागदागिने), (२५) शिवणकाम, (२६) वेतकाम, (२७) कातारीकाम, (२८) सुतारकाम, (२९) वास्तुविद्या, (३०) रत्नपरीक्षा, (३१) धातुशुद्धि, (३२) रत्नरंगज्ञान, (३३) शुकसारिका-प्रलापन, (३४) नेत्रपल्लवी, करपल्लवी, (३५) यंत्रविद्या, (३६) मुलांच्या खेळणी, (३७) वैनायिकीविद्या (विघ्ननाश करण्याची विद्या), (३८) वैतालिकी विद्या (भूतपिशाच विद्या), (३९) हस्तलाघव (हातचलाखी), (४०) प्रतिमाला (मेंड्या लावणें), (४१) सूत्रक्रीडा (बाहुल्या नाचवणें), (४२) पाकशास्त्र, (४३) पेयपदार्थज्ञान, (४४) ऐंद्रजाल (जादुगिरी), इत्यादि.

आधुनिक पाश्चात्य कला— पदार्थविज्ञानशास्त्रांतील प्रकाश, उष्णता, वीज, ध्वनि, या शाखांत अतिशय शोध लागल्यामुळें व्यवहारोपयोगी कलांची सतत झपाट्यानें वाढ चालू आहे. ललितकलांची प्रगति प्राचीन काळापासून चालू असल्यामुळें काव्य, नाट्य, संगीत, चित्रकला, मूर्तिकला या आतांपर्यंत पूर्ण विकास पावल्या आहेत. संगमरवरी दगड, व ब्रॉंझधातु, लांकूड, हस्तीदंत, वगैरे यांच्या मूर्तिशिल्पाचे मुख्य विषय देव, मानव व उच्च प्राणी हे होत. मूर्तीचें ध्यान व मुद्रेवरील भावदिग्दर्शन शिल्पकारांचें कौशल्य दाखवितात. चित्रकला कागद, कापड व भिंत यांवर जलरंग व तैलरंग या साधनांनीं १६ व्या, १७ व्या शतकांतच पूर्ण प्रगत झालेली दिसते. तेव्हांपासून सृष्टिसौंदर्याकडे चित्रकारांचा ओढा वाढत गेला. १९ व्या व २० व्या शतकांत इतिहास व काव्य-कादंबरीनाट्य या विषयांच्या पुस्तकांकरितां व मासिकांकरितां चित्रें, नौकानयन व व्यापार यांसंबंधीं देखाव्यांचीं चित्रें हे चित्रकारांचे नवे नवे विषय निघत आहेत. याप्रमाणें प्रत्येक ललितकला प्रगत होत असून प्रत्येक कलेची माहिती स्वतंत्र लेखांत दिली आहे.

**कलात**—बलुचिस्तान एजन्सींतील एक संस्थान. पूर्वी हिंदुस्थान सरकारच्या अमलाखालीं ब्रिटिश बलुचिस्तानांतील संस्थानांपैकीं हें एक महत्त्वाचें संस्थान होतें. या संस्थानाला लागून असलेल्या अफगाणिस्तान या स्वतंत्र देशामुळें या संस्थानाला विशेष महत्त्व आहे. या संस्थानचें क्षे. फ. ७३,२७८ चौ. मैल व लोकसंख्या २,५०,२११ आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें १६ लाख रुपये आहे.

हल्लींचे अधिपति मीर सर अहमद यार खान १९३३ सालीं गादीवर आले. क्वेट्टा, नुश्की व नसिराबाद हीं तीन शहरें ब्रिटिश सरकारकडे कायम भाडेपट्ट्यानें ठेवलेलीं असत. आतां कलात संस्थान पाकिस्तानचें मांडलिकत्व पत्करील असें दिसतें.

**कलाल**—कलाल यांस संस्कृत कल्यपाल, कलवार, कलार, कलान अशीं नांवें आढळतात. ही कलालांची जात हिंदुस्थानांतील सर्व भागांत विशेषतः बिहार, ओरिसा, संयुक्तप्रांत मध्यप्रांत यांतून आढळते. १९११ च्या खानेसुमारींत यांची संख्या ९,५४,२४१ भरली. पैकीं ८,७६,०९५ हिंदू, ६४,२८३ मुसलमान, १२,६९५ शीख व ९६३ जैन होते. बंगाल्यांत हे जरी आपले संस्कार ब्राह्मणांकडून करवितात तरी चांगले ब्राह्मण त्यांच्याकडे जात नाहींत. संयुक्तप्रांतांतील कलवारांचा दर्जा बंगाल्यांतल्यापेक्षां थोडा वरचा आहे. दारूची भट्टी चालू असतां कलवार मदन या मद्यदेवतेची पूजा करतात. कलवार प्रामुख्यानें आवळ्याच्या झाडाविषयीं भक्ति बाळगतात. त्याचप्रमाणें लिंबाचें व पिंपळाचें झाड पूज्य मानतात. आदितवारीं सूर्यनारायणाप्रीत्यर्थ उपवास करतात; व पृथ्वीदेवता जी सायरी तिला मद्यार्पण करतात.

पंजाबांतील कलालांत हिंदू, शीख, मुसलमान या धर्मांचे लोक आहेत. त्यांचा पिढीजात धंदा दारू गाळण्याचा होता. परंतु त्यांनीं आतां तो सोडला आहे. ते आतां शेतकी, सरकारी नोकरी, व्यापार, वगैरे करतात. मध्यप्रांत व वऱ्हाड या भागांत यांची संख्या सुमारें दोन लक्ष आहे. त्यांना कलार म्हणतात. मालवी, लाट, उहारिया, जेसवार, कनोजिया, इत्यादि वर्गांचीं नांवें स्थानिक आहेत. यांपैकीं राय कलार हे उच्च समजले जातात. ब्याहुत कलार मात्र फारच निवडक आहेत. हे लोक आपल्या जातींतील विधवांस विवाह करूं देत नाहींत व बंगाल्यांत तर हे मद्य देखील विकीत नाहींत. यांच्या लग्नाच्या चाली इतर स्थानिक हिंदु रीतीप्रमाणेंच असतात. यांच्यांत काडीमोडीची चाल रूढ आहे.

मठिया कलार— वऱ्हाडांत मठिया कलार म्हणून एक जात आहे. ते आपणांस क्षत्रिय म्हणवितात. जातिपंचायतपद्धति फार व्यवस्थेशीर चाललेली दिसते. मुंबई इलाख्याचा मध्यभाग व गुजरात यांतून कलालांची वस्ती आहे. ठाणें जिल्ह्यांत कांहीं कलार आढळतात. उत्तर हिंदुस्थानांतून हे इकडे आले असावेत. हे गुरेंढोरें पाळतात. मद्य व मांस खातात. यांच्यांत विधवाविवाह संमत आहे. विशेषतः खंडोबा, भैरोबा, देवी हीं यांचीं उपास्य दैवतें असतात.

**कॅलाव**—पेरू देशांतील लिमा जिल्ह्यांतलें हें बंदर असून येथें ५२ एकर क्षेत्रफळ असलेली मोठी गोदी आहे. व शिवाय तरंगती लोखंडी गोदी आहे. पेरू देशांतला सर्व माल या बंदरांतून बाहेरदेशीं जातो. तांबें, लोंकर, झाडांची साल, सोरामीठ, समुद्रपक्ष्यांची विष्ठा (guano) वगैरे माल परदेशीं जातो. येथें बिनतारी संदेशस्टेशन आहे. लो. सं. ७५,००० आहे.

कलावंत—मुंबई इलाख्यांत कानडा आणि रत्नागिरी जिल्ह्यांतून या जातीची पुष्कळ वस्ती आहे. अप्सरा आणि गंधर्व यांचे आपण वंशज आहोंत असें सांगून पुष्कळशा देवळांशीं हे आपला पिढीजात सेवासंबंध पुराव्यादाखल पुढें आणतात. प्राचीन विजयानगरांत राजाजवळ अनेक कलावंतिणी असत. कलावंतांतील कोंकणी, मराठा, कर्नाटकी, लिंगायत, तेलंगी आणि मुसलमान या सहा वर्गांचा एकमेकांशीं रोटीबेटी व्यवहार होत नाहीं. पूर्वी आठव्या-नवव्या वर्षी मुलींचा शेज नांवाचा एक लग्नसोहळा होई. हा समारंभ मोठा खर्च करून चांगला साजरा करीत. पण हल्लीं हायकोर्टानें हीं लग्नें गुन्हा म्हणून ठरविलीं आहेत. म्हणून मुलगी वयांत आल्यावर गाजावाजा न करतां हा समारंभ उरकून घेतात. पूर्वी स्त्रीवारसाची पद्धत असे. परंतु हल्लीं पुरुष-बायकांमध्यें मालमत्ता सारखी वांटून द्यावी असें हायकोर्टानें ठरविलें आहे. ब्राह्मण आणि ग्रामदेवता यांची हे लोक पूजा करितात. कार्तिकस्वामी ही यांची यजमानदेवता आहे. गोकर्ण, रामेश्वर, काशी, पंढरपूर, इत्यादि क्षेत्रांची हे यात्रा करितात. कलावंतांचा पिढीजात धंदा गाण्यानाचण्याचा होय. कांहीं देवळांतून सेवेकरितां यांना इनामी जमीन असते. गाण्यानाचण्याखेरीज कलावंतिणी कसबिणीचा धंदा करितात. पुष्कळशा आपलें घरदार सोडून मुंबई, कोल्हापूर, बंगळूर यांसारख्या ठिकाणीं जातात.

मराठा कलावंत—हा वर्ग सर्व आचरणांत वरील कोंकणी वर्गासारखाच आहे.

कर्नाटकी कलावंत—यांना पात्त दवरू किंवा शाल विणणारे म्हणतात. या आपण रंभा व उर्वशी यांच्या प्रतिनिधि आहोंत असें सांगतात.

लिंगायत कलावंत—साईच किंवा लिंगायत कसबिणी, यांच्यांत व लिंगायत कलावंतिणींत विशेष फरक नाहीं.

जुन्या राजवटींत कलावंतखातें म्हणून स्वतंत्र खातें असे. देवापुढें रोज हजिरी देणें व दरबारांत आणि समारंभाच्या प्रसंगीं नाचणें यांसाठीं कलावंतिणी ठेवलेल्या असत.

कलि—अधर्मवंशांतील क्रोध आणि हिंसा यांचा पुत्र. दुरुक्ति नांवाच्या बहिणीपासून याला भय आणि मृत्यु अशीं दोन मुलें झालीं. यानें नलाच्या शरीरांत शिरून त्याला पीडा दिली. यानें जेव्हां धर्म आणि पृथ्वी यांचा छळ मांडला तेव्हां परीक्षितानें यास १ द्यूत, २ मद्यपान, ३ स्त्रीसंग, ४ हिंसा व ५ सुवर्ण या पांच जागा दिल्या असें भागवतांत सांगितलें आहे. भविष्यपुराणांत हा म्लेंच्छ असून विष्णूच्या वरानें अदम आणि हव्यावती यांपासून म्लेंच्छ प्रजा वाढली अशी कथा आहे (कलियुग पाहा).

कलिंग—हें हिंदुस्थानांतील फार प्राचीन राज्यांपैकीं पूर्वेकडील एक राज्य होतें. ऋग्वेदामध्यें कक्षीवान् ऋषीचा उल्लेख आढळतो. हा कक्षीवान् कलिंग देशाच्या राणीच्या दासीचा मुलगा होता. महाभारतांत या देशाचें नांव आर्यावर्ताच्या ईशान्येस येतें. या वेळीं याची राजधानी राजपूर असून राजे चित्रांगद व भानुमंत होते. इंद्रप्रस्थाच्या नैर्ऋत्येस हा देश होता. एका तंत्रग्रंथांत कलिंगाची व्याख्या अशी केली आहे.—जगन्नाथात्समारभ्य कृष्णा तीरांतगः प्रिये। कलिंगदेशः स प्रोक्तो वाममार्गपरायणः॥ अशोकानें दिग्विजय करतांना हा कलिंग देश ख्रि. पू. २६१ या वर्षी काबीज केला. कलिंग युद्धांतील दुःखें एक लक्ष मेलेल्या लोकांच्या आप्तांचा शोक याचा जबरदस्त परिणाम अशोकाच्या मनावर झाल्यामुळें तो बौद्ध धर्मानुयायी झाला. ख्रि. पू. २५६ च्या सुमारास कलिंग येथील चेत या राजवंशाच्या ताब्यांत आला. त्या वंशांतील प्रख्यात राजा खारवेल महामेघवाहन होता. हा जैनधर्मी होता. खारवेल याचा वंश चेत नांवाचा असून त्यांतील हा तिसरा राजा होय. पुढें चोलांकडे हा देश एक शतक राहून पुढें चाळुक्य-चोल-वंशी पहिला कुलोत्तुंग यानें कलिंग जिंकून घेतला. पुढें तो बहामनी व कुतुबशाही, मोंगल, निजाम व इंग्रज यांच्या हातीं क्रमाक्रमानें आला असावा.

कलिंगड—सर्व हिंदुस्थानभर व उष्ण प्रदेशांतून याची लागवड करतात. जानेवारी व फेब्रुवारी महिन्यांत हे वेल नदीच्या वाळवंटांत लावितात व त्यांचीं फळें उन्हाळ्याच्या आरंभीं तयार होतात. नदीच्या वाळवंटांतून मुबलक पाणी व जागा असल्यामुळें कलिंगडाचे वेल तेथें चांगले वाढतात. उत्तर हिंदुस्थान व मध्यप्रांत यांमधील कलिंगडापासून सरबत तयार करितात. दुष्काळांत बियांचें पीठ करून लोक त्याच्या भाकरी करतात. बिया दाहनाशक व मूत्ररेचक आहेत. कलिंगडांची कोवळेपणीं अगर पिकल्यावर फळाच्या पांढऱ्या गराची भाजी करितात.

औषधी उपयोग—पुष्ट्रतेस कलिंगडाच्या बियांतील मगज अर्धा तोळा व खडीसाखर अर्धा तोळा एकत्र वाटून घेणें. पोटांत दाह झाल्यास कलिंगड खावें.

दिलपसंत—ही कलिंगडाचीच दुसरी जात आहे. यांच्या बियांचा औषधांत उपयोग करितात व कधीं कधीं लोक त्या वाळवून व भाजून खातात. यांची भाजी करतात.

कलिंगपट्टम्—मद्रास, गंजम जिल्ह्यांतील चिकाकोल तालुक्याच्या गांवापासून १७ मैलांवर असलेलें बंदर. हें तेलगू प्रदेशांतील मुसलमानी राज्याच्या राजधानीचें गांव होतें. येथें मशिदी, वगैरे जुन्या इमारतींचे अवशेष असून त्यांत जुनीं नाणीं सांपडतात.

हें जहाजांना सुरक्षित ठिकाण असल्यामुळें पुष्कळ दिवसपर्यंत व्यापारी बंदर होतें; पण मद्रास इलाख्यांतील पूर्व किनाऱ्यावर रेल्वे झाल्यापासून या बंदराचें व्यापारी महत्त्व कमी झालें आहे. येथें समुद्रांत एका मैलावर ७३ फूट उंचीचें व समुद्रांतून १४ मैल पर्यंत दिसणारें दीपगृह बांधिलें आहे.

**कलित**—आसामांतील या जातीची लोकसंख्या २,२१,९४२ आहे. त्यांना आरंभीं कुलुत म्हणत असत. कांहींचें म्हणणें कायस्थांपैकीं शेती करणारे हे लोक आहेत व कांहींचें म्हणणें हे लोक मूळच्या आर्य लोकांपैकीं असावेत असें आहे. बंगाल्यांत धंद्याप्रमाणें जातिभेद होण्यापूर्वी 'कलित' हें नांव ब्राह्मणेतर सर्व आर्यांना लावीत असत.

**कॅलिफोर्निया**—अमेरिका सं. संस्थानें यांतील पॅसिफिक महासागरास लागून असलेलें एक संस्थान. याचे ५८ परगणे आहेत. क्षे. फ. १,५८,६९३ चौ. मैल. लो. सं. ६९,०७,३८७. जास्तींत जास्त लांबी ८०० मैल. समुद्रकिनारा १,०९७ मैल. जास्तींत जास्त रुंदी २७० मैल. दक्षिणोत्तर ( किनाऱ्याकांठचा ) पर्वत आहे. त्याची उंची ८००० फुटांपावेतों आहे. सेरानेवदा पर्वतावर माउंट व्हिटने हें सर्वांत उंच शिखर ( १४,४९६ फूट ) आहे. या संस्थानांतच अमेरिकेंतील सर्वोच्च ( माउंट व्हिटने ) व सर्वांत सखल ( डेथ्व्हॅली समुद्रसपाटीखालीं २०० फूट ) अशीं दोन्ही ठिकाणें आहेत. हवा समशीतोष्ण व उष्ण दोन्ही प्रकारची आहे.

या संस्थानांत जंगलें पुष्कळ आहेत. त्यांतलीं बरींच राखीव आहेत. या जंगलांतून जगामध्यें अत्यंत जुनाट असून जिवंत असलेले कित्येक मोठमोठे वृक्ष आहेत. या संस्थानांत अनेक नद्या आहेत. त्यांत तीन बऱ्याच मोठ्या आहेत. संत्रीं व लिंबू वर्गांतील अनेक फळें व इतर बागाईत फळफळावळ आणि शेती यांचें उत्पन्न बरेंच आहे. सोनें, रुपें, तांबें व पेट्रोलियम, वगैरे खनिज उत्पादन बरेंच आहे. लॉस् अँजेलिस व सानफ्रान्सिस्को हीं मोठीं शहरें आहेत. सॅक्रामेन्टो हें राजधानीचें ठिकाण आहे. होलीवुड हें सिनेमाचें माहेरघर याच संस्थानांत आहे. संस्थानांत तीन मोठीं विद्यापीठें आहेत. सार्वजनिक ग्रंथालयांची व्यवस्था उत्कृष्ट आहे. कॅलिफोर्निया हें नांव एका स्पॅनिश ग्रंथांतील एका काल्पनिक ठिकाणाचें आहे व तेथें त्याचा अर्थ 'पृथ्वीवरील दुसरा स्वर्गच' असा दिलेला आहे. १५४० मध्यें अलारकॉंज यानें कोलोरॅडो नदींतून प्रवास करून सर्व नदीच्या भागाची पहाणी केली व १५४२ मध्यें कॅब्रिलो यानें किनारापट्टी पाहून टाकली. १५७९ मध्यें सर फ्रॅन्सिस ड्रेक यानें या भागांत किनाऱ्यावर पदार्पण केलें. १५७९ मध्येंच येथें सेंट फ्रॅन्सिसच्या पाद्री लोकांनीं प्रथम वसाहत केली. १९ व्या शतकाच्या सुरवातीस या भागांत यांचीं १८ मिशनें झालीं. त्यांपैकीं कांहीं अद्यापहि चालू आहेत. १८४६ मध्यें मेक्सिकोबरोबर झालेल्या युद्धांत हें संयुक्त संस्थानांकडे आलें. १८४८ मध्यें या संस्थानांत सोन्याचा शोध लागला, त्यामुळें १८४९ मध्यें या संस्थानांत सोन्यासाठीं लोकांची झुंबडच आली. १८५० मध्यें संयुक्त संस्थानांत हें सामील करून घेण्यांत आलें.

**कॅलिमॅकस** ( खि॰ पू॰ २५० )—एक ग्रीक कवि आणि वैयाकरण. यानें गॅलाटिआ नांवाचें महाकाव्य आणि दुसरे कित्येक गद्यग्रंथ आणि दुःखान्त नाटकें, सुखान्त नाटकें व शोकपर काव्यें, इत्यादि लिहिलीं. परंतु त्यांपैकीं ७२ चुटके आणि ६ स्तोत्रें हल्लीं उपलब्ध आहेत.

**कलियुग**—चार युगांतील चौथें युग व त्याची मूर्ति. कलियुगकल्पना ब्राह्मण ग्रंथांतून ( तै. ब्रा. १५ ) आढळते. तै. संहितेंत युगकल्पना आहे. परंतु त्या ठिकाणीं ( ४·३, ३ ) कृत, त्रेता व द्वापर हीं तीनच नांवें आढळतात. ब्राह्मण ग्रंथांत मात्र चारहि युगांचीं नांवें आलीं आहेत. पुराणग्रंथांत कृत, त्रेता, द्वापर व कलि असा युगांचा अनुक्रम आहे.

याची वर्षसंख्या देवमानानें चार लक्ष बत्तीस हजार वर्षांची असते. याचा संध्या व संध्यांशकाल देवमानानें दोनशें संवत्सरांचा गणलेला आहे ( मत्स्य, अ. १६४ ). मघा नक्षत्रीं सप्तर्षि आले म्हणजे कलियुगास आरंभ होतो ( भाग., स्कं. १२, अ. ३ ).

कलियुग हें सर्वांत निकृष्ट प्रतीचें युग मानतात व त्यांत माणसें अत्यंत दुराचारी आणि दुःखी असतात अशीं पुराणांतून वर्णनें आहेत.

**कलियुगवर्ष**—कलियुग संवत् ( वर्ष ) व भारती युद्ध संवत् हीं दोन्ही एकच आहेत अशी एक समजूत आहे. परंतु ती बरोबर दिसत नाहीं. कारण भारती युद्धानंतर धर्माचें राज्यारोहण झालें त्या वेळीं कलियुग सुरू झालें असलें पाहिजे. शालिवाहन शकापूर्वी ३१७९ या वर्षीं ( खि. पू. ३१०२ ता. १८ फेब्रुवारी ) भारतीय युद्ध झालें व तदनंतर थोडक्याच दिवसांनीं कलियुग संवत् सुरू झालें. याला युधिष्ठिर शक असेंहि म्हणतात.

**कॅलिस्थेनीज** ( खि. पू. ३६०–३२८ )— एक ग्रीक तत्त्ववेत्ता आणि इतिहासकार. याला अलेक्झांडर दि ग्रेटनें राजद्रोहाच्या आरोपावरून देहान्त शासन दिलें. त्यानें अलेक्झांडरच्या कामगिरीचा इतिहास आणि इतर ऐतिहासिक ग्रंथ लिहिले.

**कलुषा**—संभाजी छत्रपतीचा कारभारी. हा कादिसरी ब्राह्मण असून याचें मूळचें नांव 'कबकलस', ( कविकलुश ) असें होतें. हा कनोजा ब्राह्मण असून संभाजीच्या राज्यारोहणापूर्वी थोडे दिवस दक्षिणेंत आला होता. हा साधारण योग्यतेचा होता. याला मंत्र, तंत्र, जादूटोणे करण्याची कला अवगत

असून हा वाममार्गीहि होता. संभाजीच्या उग्र प्रकृतीला त्याच्या राज्य चालविण्याच्या कामास अर्थातच याचा उग्रस्वरूपी सल्ला अधिकच मानवला. या प्रकारें संभाजी हा या 'आदिशक्ति' उपासक 'शाक्ताच्या' शक्तीच्या गवसणींत सांपडला. कलुशावर जरी संभाजीचा विश्वास बसला होता, तरी तो त्याची किंमत जाणून होताच. त्यानें त्याला कोणतेंहि प्रधानपद दिलें नाहीं. फक्त त्याला 'छंदोगामात्य' हें नवेंच पद दिलें. अकबराचा बंदोबस्त आणि विशेषतः त्याच्या हालचालींवर करडी नजर ठेवण्याकरितां म्हणून संभाजीनें कवजीबावास रायगडाहून दूर करून अकबराजवळ पालीस (ता. सुधागड, सं. भोर) पाठविलें. तेथें अण्णाजी दत्तो व अकबर यांच्यामध्यें चाललेल्या कारस्थानाची वर्दी बावानें संभाजीस पोहोंचविली. या कटाच्या स्फोटांत कलुशानें अण्णाजी दत्तो, महादजी अनंत यांस परळीखालीं मारविलें. पुढें इंग्रजांशीं इ. स. १६८३ त तह झाला. त्या वेळीं कबजी एकटाच वडील, सन्निध, चोलका व व्यवहारचतुर असल्याकारणानें त्यासच इंग्रजांकडे पाठविलें. संगमेश्वरीं ता. १ फेब्रुवारी १६८९ रोजीं संभाजी व बावा यांस वरकड लोकांनिशीं खानानें पकडलें. औरंगझेबानें ता. ११ मार्च १६८९ रोजीं प्रथम बावास व नंतर संभाजीस 'जिवेंच मारून शिरच्छेद' केला. संभाजी पूर्णपणें कलुशाच्या अधीन झाला होता असेंहि दिसत नाहीं. कलुशा यानेंच फितूर होऊन संभाजीस औरंगझेबाच्या स्वाधीन केलें, असें मत आहे. त्याला फारसा आधार नाहीं. याच्या मुलास राजारामानें वतनाच्या सनदा दिल्या आहेत. हा हिंदींत कविता करीत असावा.

**कॅले**—हें फ्रान्सच्या उत्तर भागांत एक प्रसिद्ध बंदर व कारखान्याचें शहर आहे. १९३६ सालीं येथील लो. सं. ६७,५६८ होती. कॅलेचा किल्ला पुरातन कालापासून प्रसिद्ध असून त्याचें संरक्षण पुरातन कालीं बांधलेल्या ४ दुर्गांनीं केलेलें आहे. १५६० सालीं बांधलेल्या बालेकिल्ल्यानें व मोर्चेबंदीनें किल्ल्यास फार मजबुती आली आहे. १७ व्या शतकांत 'नोत्र दाम' खिस्ती देवालय बांधण्यांत आलें. त्याचें भव्य शिखर नाविकांस उपयोगी पडतें. युरोपमधून इंग्लंडांत जाण्यास किंवा तेथून युरोपांत येण्यास फक्त कॅले हाच मार्ग आहे. येथें जहाजें बांधण्याचें काम होतें व मासे धरण्याचा उद्योग चालतो.

**कलेवल**—अथवा कालेवाला हें फिन्लंड देशाचें ऐतिहासिक महाकाव्य आहे. ईलियड, रामायण, महाभारत या जगांतील नामांकित महाकाव्यांमध्यें याची गणना मॅक्समुल्लरसारख्या पंडितांनीं केली आहे. १८३५ सालीं एलियस लन्रॉट यानें पोवाडे व काव्यें एकत्र करून दोन भागांत प्रकाशित केलीं. या संग्रहाला त्यानें कलेवल हें नांव देऊन त्याचे २५ रूनो अगर सर्ग पाडले होते. पुढें त्यानें तो काव्यसंग्रह वाढवून त्याचे ५० सर्ग पाडले. या संग्रहांत त्यानें फिनिस लोकांतील ऐतिहासिक काव्यें, दंतकथा, कल्पित काव्यें, भावगीतें व चेटूकगीतें या सर्वांचा समावेश केला आहे. या मोठ्या काव्यांत त्यानें सूत्रबद्धता ठेवण्याची शक्य ती खबरदारी घेतली आहे.

कलेवल याचा अर्थ वीरांची जन्मभूमि असा आहे. फार पूर्वी फिन्लंडमध्यें 'कलेव' नांवाचा सर्वगुणसंपन्न असा वीर होऊन गेला. त्याच्यानंतरच्या चार वीर पुरुषांची हकीगत यांत लन्रॉटनें गुंफिली आहे. ते वीर व्हाइनामोइनेन, इल्मरिनेन, लेम्मिन कैनेन, व कुलेर्व्हो हे होत; आणि त्यांतील इल्मटर (जगाची जननी), ऐनू (लॅप जातीची सुंदर तरुणी व व्हाइनामोइनेनची प्रेयसी), लाही (उत्तर फिन्लंडची स्वामिनी) व तिच्या दोन मुली (इल्मरिनेनच्या बायका), आणि मर्जेट्टा या प्रमुख नायिका आहेत. प्रेम व विवाह हाच ह्या काव्याचा मुख्य विषय आहे. तथापि या चारहि वीरांना मंत्रविद्येचें ज्ञान असतें, आणि व्हाइनामोइनेन हा विद्यासंपन्न कवि व वीरपुरुष असून तो आपला जन्मदेश संपन्न करतो, इत्यादि विषय या काव्यांत असल्यामुळें हें काव्य मनोहर असून चांगलें विरुद्ध वाईट हा झगडा दाखवून त्यांत शेवटीं सत्याचा अगर चांगल्याचा जय होतो, असें दाखविलें आहे. असंबद्धता व पुनरुक्ति हे दोषहि यांत आहेत.

**कॅल्टानिसेटा**—हें सिसिली बेटामधील याच नांवाच्या प्रांताच्या राजधानीचें शहर. या शहरानजीक पेट्रोलियमचे आणि हायड्रोजन गॅसचे झरे आहेत. एक ज्वालामुखी आणि महत्त्वाच्या गंधकाच्या खाणी आहेत. लोकसंख्या सुमारें साठ हजार.

**कल्प**—एक वेदांग. यांत श्रौत व गृह्यसूत्रें येतात. या सूत्रांतून आचार, विधी यांचें वर्णन असतें.

**कल्प**—एक कालमान व ब्रह्मदेवाच्या एका दिवसाचें साधारण नांव. मनुष्यांच्या एका महिन्यांत जसे साधारणतः तीस दिवस असतात, तसेच ब्रह्मदेवाच्या महिन्यांतहि तीस कल्प असतात. कल्पाचें मान केवढें असतें तें पुढें दिलें आहे— कृत, त्रेता, द्वापर आणि कलि या चार युगांचा एक पर्याय (चौकडी) असे सहस्र पर्याय झाले म्हणजे ब्रह्मदेवाच्या प्रातःकाळापासून संध्याकाळपर्यंतचा केवळ दिवस होतो; व इतकीच पुढें रात्र; याप्रमाणें जें एक अहोरात्र त्यास कल्प असें नांव आहे; ब्रह्मदेवाच्या दिवसांत स्वर्गांत चौदा इंद्र आणि पृथ्वीवर चौदा मनू होतात. या मनूचा मनुष्यमानाचे एकाहत्तर पर्याय व वरती कांहीं अधिक इतका काळ मन्वंतर चालतो (भाग., स्कं. ३, अ. ११).

कल्पारंभीं जो अवतार होतो तेंच नांव त्या कल्पास पडतें. जसें हल्लींच्या कल्पारंभीं श्वेत वराहावतार झाला होता म्हणून त्यास श्वेत वराहकल्प असें नांव चालत आहे.

बौद्धांत सुद्धां कल्पांची कल्पना आहेच. जसें:—अंतरकल्प, असंख्येयकल्प, महाकल्प, इ. (युगें पाहा).

**कल्पना**—हा शब्द सामान्य व्यवहारांत व तत्त्वज्ञानांत उपयोगांत आणितात. याचा इंग्रजी प्रतिशब्द 'आयडिया' हा होय. 'आयडिया' हा शब्द सर्व युरोपीय भाषांत सर्व कालीं रूढ आहे. लॉक म्हणतो कीं, जेव्हां मनुष्य विचार करूं लागतो तेव्हां त्या विचाराचा जो विषय असेल ती कल्पना होय. ह्यूमनें गोष्टींच्या प्रत्यक्ष ज्ञानाचें अगर संवेदनेचें पुन्हां मानसिक क्रियेनें जें चित्र आपल्यापुढें उभें राहतें त्यास हा शब्द लावला आहे. वुंट यानें हा शब्द थोड्या विस्तृत अर्थानें वापरला असून आपण एखाद्या भौतिक वस्तूचें मुद्दाम मनश्चित्र आपल्यापुढें उभें करतों, त्यास हा शब्द लावला आहे. कल्पना या शब्दानें आपणांला जो अर्थ ध्वनित होतो तो एका विशिष्ट गोष्टीसंबंधीं नसून बहुधा संमिश्र असतो. उदा०– किन्नर किंवा नागकन्या यांची कल्पना केली असतां अश्व व मनुष्य व सर्प व स्त्री यांच्या संमिश्र कल्पना आपल्या मनश्चक्षूंपुढें येतात.

**कल्पनावाद**—मानवी इंद्रियांना ग्राह्य वस्तूंचें जें ज्ञान होतें, तें ज्ञान कल्पनामय असतें, असें मानणाऱ्या कोणत्याहि तत्त्वज्ञानाच्या संप्रदायाला 'कल्पनावाद' म्हणतात. आधिभौतिक कल्पनावादाचे (मेटॅफिजिकल आयडिॲलिझम्) दोन पोटभेद आहेत:—

(अ) आरिस्टाटल व प्लेटो यांचा कल्पनावाद, त्यांचें मत असें कीं, वास्तवांत कल्पनामय तत्त्वाचा वरचढपणा असतो.

(आ) हेगेलचा कल्पनावाद, हेगेलचें मत असें कीं, सत्याचा प्रत्यक्ष गाभाच बुद्धि किंवा तर्कशक्ति आहे.

(इ) ज्ञानविद्यापंडितांचा कल्पनावाद (एपिस्टेमॉलॉजिकल आयडिॲलिझम्) असा कीं, मानवाला आपलें मानसिक जीवन फक्त ज्ञात होतें, आणि म्हणून ज्ञान म्हणजे बाह्य वस्तु प्रत्येक व्यक्तीच्या मनाला जशा दिसतात तें वस्तूंचें ज्ञान होय. बाह्य वस्तूंच्या वास्तविक खऱ्या स्वरूपाचें ज्ञान मनुष्याला होत नाहीं. म्हणून आपल्या भोंवतालचें बाह्य जग हें आपल्या मानवी मनानें उत्पन्न केलेलें आहे.

(ई) आधुनिक कल्पनावादाचा उत्पादक बिशप बर्कले याचें मत असें कीं, ज्याला आपण जडद्रव्य म्हणतों तें ईश्वराच्या प्रत्यक्ष प्रेरणेनें आपल्या मनामध्यें ज्या कल्पना किंवा दृश्यें उत्पन्न होतात, तें होय.

आधिभौतिक कल्पनावादाचा विरोधी पक्ष भौतिक जडवाद हा होय; आणि ज्ञानविद्यापंडितांच्या कल्पनावादाचा विरोधी पक्ष वास्तवतावाद हा होय. डेकार्टे, लीबनीत्झ, स्पिनोझा आणि कँट हे सर्व कांहीं अंशीं कल्पनावादाचेच पुरस्कर्ते आहेत. अलीकडील ब्रिटिश कल्पनावादी तत्त्ववेत्त्यांत टी. एच्. ग्रीन, एडवर्ड केअर्ड, बर्नार्ड बोझांको, आणि एफ्. एम्. ब्राडले हे प्रमुख आहेत.

**कल्पनावादी कला**—(इंप्रेशनिझम्). चित्रकलेमधील एक विशिष्ट पद्धति. या पद्धतीचे चित्रकार चित्रामधील रचनेकडे विशेष लक्ष न देतां त्यांतील शुद्ध रंगसंगति व नैसर्गिक सौंदर्याचें प्रतिबिंब यांकडे विशेष लक्ष देत. यांनीं पूर्वीच्या चित्रकलेवरील रूढीमुळें अस्तित्वांत आलेलीं कृत्रिम बंधनें तोडून टाकलीं आणि चित्रकारानें निसर्गाचा अभ्यास काळजीपूर्वक व सूक्ष्मरीत्या केला पाहिजे या गोष्टीस महत्त्व दिलें व अशा रीतीनें एक नवीन व जोरकस पद्धति प्रचारांत आणली. या पद्धतीचा फ्रान्समध्यें एकोणिसाव्या शतकामध्यें उदय झाला व तिचा अर्वाचीन चित्रकलेवर फार महत्त्वाचा परिणाम झालेला आहे. या पद्धतीचे प्रणेते एडवर्ड मानेट (१८३२–१८८३), जे. एम्. व्हिसलर (१८३४–१९०३) हे होत. यानंतर सी. डब्ल्यू. फुर्स, जे. एस्. सार्जंट, सर विल्यम ऑर्पेन येतात.

**कल्पनासाहचर्य**—हें तत्त्व तत्त्वज्ञान व मानसशास्त्र या दोहोंतहि आढळतें. मानसशास्त्रामध्यें एखाद्या वस्तूचें प्रत्यक्ष ज्ञान झालें असतां त्यामुळें जें मागील अनुभवाचें स्मरण होतें त्या क्रियेस हा शब्द लावतात. अशा तऱ्हेचे तीन साहचर्यनियम दिलेले आढळतात: (१) सान्निध्य, (२) साम्य आणि (३) विरोध. हे साहचर्याचे नियम सर. डब्ल्यू. हॅमिल्टन याच्या मतें आरिस्टॉटलमध्यें दिसून येतात. स्टोइक, एपिक्यूरियन व स्कूलमेन या तत्त्वज्ञानांतील संप्रदायांनीं कल्पनासाहचर्याचें तत्त्व मान्य केलें होतें. पण त्यांनीं याविषयींच्या ज्ञानांत फारशी भर घातली नाहीं. हॉब्जनें कल्पनासाहचर्याचा सिद्धान्त व तत्त्वज्ञानांतील सिद्धान्त या दोहोंची सांगड घालून दिली आहे. हार्टलेनें आपल्या मानसशास्त्रीय उपपत्तीचा इंद्रियविज्ञानशास्त्राशीं संबंध जोडला आहे. फ्रान्समध्यें कॉन्डिलॅक, स्कॉटलंडमध्यें थॉमस ब्राउन, इंग्लंडमध्यें जे. एस्. मिल यांनीं या उपपत्तीचा पुरस्कार केला. जर्मन तत्त्ववेत्त्यांपैकीं हर्बर्ट, वुंट आणि कुल्प यांचीं मतें हार्टले व मिल यांच्या मतांशीं बरींच जुळतात. स्टाउटच्या मानसशास्त्रांतहि आपणांस जाणीव, साधर्म्य-वैधर्म्य-निरीक्षण, व सात्मीकरण यांचें ऐक्य कल्पिलेलें दिसतें.

**कल्पसूत्रें**—वेदग्रंथांच्या षडंगांपैकीं एक अंग. यांचा तैत्तिरीय आरण्यकांत उल्लेख आढळतो. कल्पसूत्रें म्हणजे श्रौत व

स्मार्त किंवा गृह्य कर्मांचे प्रयोगग्रंथ होत. पाणिनीच्या शिक्षेंत (८, ४) कल्प हे वेदपुरुषाचे हात होत असें म्हटलें आहे. कल्पसूत्रें हीं वेदग्रंथाच्या प्रत्येक शाखेचीं श्रौत व स्मार्त अथवा गृह्य अशीं वेगवेगळीं आहेत.

जैन कल्पसूत्र— पज्जोसवणाकप्प हेंच खरें कल्पसूत्र होय असें एक मत आहे. यांत जैन यति व जोगिणी यांनीं कोणत्या गोष्टी कराव्या व कोणत्या करूं नयेत याविषयीं नियम दिले आहेत.

प्रथम परिच्छेद—जोग्यांनीं गांवांत एक महिना राहावें. वस्ती असल्यास एक महिना गांवांत व एक महिना बाहेर असे दोन महिने तेथें राहावें. ज्या घरांत बायका नसतील त्या घरांत जोग्यांनीं राहावें व ज्या घरांत पुरुष नसतील त्या घरीं जोगिणींनीं राहावें. जोग्यांनीं पावसाळ्यांत पर्यटन करूं नये. त्यांनीं रात्रीच्या वेळीं भिक्षा ग्रहण करूं नये किंवा रस्त्यांत मरकूं नये.

द्वितीय परिच्छेद— त्यांनीं उंटाचे केस, ताग, सण, लोंकर यांचे केलेले कपडे वापरावयाचे.

तृतीय परिच्छेद— जोग्यांनीं जोगिणींच्या किंवा जोगिणींनीं जोग्यांच्या घरांत पाऊल देखील ठेवूं नये. त्यांनीं उंची व भडकीं वस्त्रें वापरूं नयेत. भिक्षा मागावयाच्या वेळीं कोणाच्या घरांत शिरूं नये.

चतुर्थ परिच्छेद— एखाद्या जोग्याच्या हातून कांहीं चूक झाली तर त्यानें गुरूपाशीं जाऊन आपला अपराध कबूल करावा.

पंचम परिच्छेद— जोगिणीनें कोणतेंहि अमर्याद वर्तन करूं नये.

षष्ठ परिच्छेद— जोग्यांनीं किंवा जोगिणींनीं खोटें बोलूं नये, कोणाला हंसूं नये, कोणाचा अपमान करूं नये. जोगी व जोगिणी यांनीं सद्वर्तनाच्या आड येणाऱ्या लोकांची संगत टाळावी; वगैरे सविस्तर नियम सांगितले आहेत.

**कल्पित कथा**—प्राण्यांच्या कल्पित कथा भारतीयांमध्येंच फार प्राचीन कालापासून आहेत. बौद्धांच्या जातक कथांतून प्राण्यांच्या ज्या सुंदर गोष्टी आहेत त्यांचा उद्देश माणसाला नीतीचे धडे देण्याचा उघड आहे. पंचतंत्र, हितोपदेश, बृहत्कथा यांसारख्या प्राचीन कथावाङ्मयांत अशाच असंख्य आणि विविध प्रकारच्या गोष्टी भरलेल्या असून त्या फार लोकप्रियहि आहेत. इराण आणि अरबस्तान हीं जुनीं राष्ट्रें सुद्धां या बाबतींत मागें नाहींत. ग्रीकांमध्यें ईसॉप जो होऊन गेला (खि. पू. ६ वें शतक) त्याची ख्याति अद्यापि कमी झाली नाहीं. ईसॉपच्या गोष्टींचीं अनेक भाषांतून भाषांतरें झालीं. अर्वाचीन कालांत जर्मनींत गेलर्ट आणि लेसिंग, इंग्लंडांत गे, स्पेनमध्यें य्रिआत (Yriate), इटलींत पिग्नोटी व रशियांत ईव्हान क्रायलोव्ह हे नांवाजलेले कल्पितकथालेखक असले तरी फ्रान्सच्या ला फोन्टेन (१६२१-१६९५) ची सर कोणाला नाहीं.

मराठींत जुन्या लोककथा आजीबाईच्या गोष्टी म्हणून ज्या असतात त्यांतून संस्कृतची उसनवारी नसलेले कल्पित चुटके असतात. इंग्रजी आणि संस्कृत वाङ्मयांतून भाषांतरित कथा बालवाङ्मय म्हणून मराठींत गेल्या पन्नास वर्षांत अनेक आल्या आहेत.

**कल्माषपाद**— सूर्यवंशी इक्ष्वाकुकुलोत्पन्न सुदास राजाचा पुत्र. मित्रसह, वीर्यसह, किंवा सौदास हीं याचीं इतर नांवें आहेत. हें नांव यास पडण्याचें कारण निरनिराळ्या पुराणांत निरनिराळें आढळतें. हा राजा मृगयेस अरण्यांत गेला असतां तेथें त्यानें दोन राक्षस पाहिले. एकास तर त्यानें मारिलें, पण दुसरा पळाला. पळालेल्या राक्षसानें भोजनप्रसंगीं वसिष्ठऋषीस राजाकडून नरमांस वाढविलें. तेव्हां ऋषीनें राजाला तूं राक्षस होशील असा शाप दिला. उलट राजानेंहि उदक अभिमंत्रित करून वसिष्ठास शाप देण्याची तयारी केली. राणी मदयंती हिनें त्याला गुरूस शाप देण्याचें थांबविलें. तेव्हां मित्रसह राजानें अभिमंत्रित-जल जमिनीवर टाकलें तर वसुंधरा दग्ध होईल म्हणून आपल्याच पायावर तें टाकलें तेव्हा त्याचे पाय जळून निघाले. त्या दिवसापासून त्याला कल्माषपाद हें नांव पडलें.

**कल्याण**— मुंबई, ठाणें जिल्ह्याचा दक्षिणेकडील तालुका. क्षे. फ. २७६ चौ. मैल. यांत कल्याण हा गांव व २२३ खेडीं आहेत. या तालुक्याची लो. सं. १,२२,१४२. तालुका त्रिकोणाकृति असून पश्चिमेकडील प्रदेश सुपीक आहे. भात, नागली, वरी, वाल, मूग, हरभरा यांचें पीक बरेंच होतें. पाऊस सरासरी ९१ इंच पडतो. यांत सुमारें ११० तळीं, १२०० विहिरी, १९० नद्या व ओढे आहेत.

गांव— कल्याण तालुक्याचें मुख्य ठिकाण. मुंबईच्या ईशान्येस ३३ मैलांवर जी. आय्. पी. रेल्वेचें स्टेशन आहे. लो. सं. ३१,३५६. इ. स. १८५५ सालापासून येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें साबण, बर्फ, विटा, इ. चे कारखाने आहेत. व्यापारहि मोठा आहे. येथें एक जुना दुर्गाडी नांवाचा किल्ला आहे. शहाजहान बादशहाचा प्रधान मोतबरखान याची मशीद व काळी मशीद प्रेक्षणीय आहे.

इतिहास— १२।१५ व १६ व्या शतकांतील शिलालेखांत कल्याणचा उल्लेख सांपडतो. चौदाव्या शतकांत कल्याण हें एका जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. मुसलमानांच्या ताब्यांत हा गांव आल्यावर त्यांनीं या गांवाचें नांव इस्लामाबाद असें ठेवलें. इ. स. १६४८ सालीं शिवाजीचा सेनापति आबाजी सोनदेव यानें कल्याणवर आकस्मिक छापा घालून तेथील सुभेदारास कैद

केलें. इ. स. १६७४ सालीं इंग्लिशांस येथें फॅक्टरी काढण्याची शिवाजीनें परवानगी दिली. मुंबई अगर कोंकण यांतून वर घांटी माल जावयाचा असल्यास जकात (मराठी राज्यांत) द्यावी लागे. सरकारी निरुपयोगी मालाचा लिलांव करण्याचें हें एक मोठें ठिकाण होतें.

**कल्याण गोसावी**— समर्थ रामदासस्वामींचा पट्टशिष्य. त्याचें मूळ नांव अंबाजी. वडील काशीस निघून गेल्यामुळें मामांनीं अंबाजीचें पालन केलें; आणि मामांनीं समर्थ रामदासांना गुरु केल्यावर अंबाजीला समर्थांचे स्वाधीन केलें व त्याचें नांव कल्याण ठेवलें. समर्थांनीं दासबोधास प्रारंभ केला असतां कल्याणानें त्याचें सर्व लेखन केलें. समर्थांचे बहुतेक ग्रंथ कल्याणानें स्वहस्तें लिहिले आहेत. याची कविता व पदें पुष्कळ आहेत. हा आजन्म ब्रह्मचारी होता. याची शक्ति अचाट होती. त्याचें देहावसान परंड्यास झालें. हल्लीं डोम गांवीं समाधि आहे. कल्याणस्वामींचा बराच शिष्यसंप्रदाय असून त्या शिष्यांचे मठ या प्रांतांत बरेच आहेत.

**कल्याणदुर्ग**— मद्रास, अनंतपूर जिल्ह्याच्या अगदीं पश्चिमेकडील तालुका. क्षे. फ. ८१७ चौ. मैल. लो. सं. (१९२१) ८०,१६४. पावसाची सरासरी २१ इंच. तालुका खडकाळ व ओसाड असून जमीन निकृष्ट दर्जाची आहे.

गांव— कल्याणदुर्ग तालुक्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. ६,६५९. पूर्वी हें जरा महत्त्वाचें गांव होतें. गांवाभोंवतीं डोंगर असून त्यापैकीं एकावर प्रागैतिहासकालीन शेंकडों स्मारकें सांपडतात.

**कल्याणपूर**—मद्रास, दक्षिण कानडा जिल्हा; उडिपी तालुक्यांतील एक खेडें. कॉस्मस इंडिकोप्लुस्टस् यानें ज्या कल्याणाचा सहाव्या शतकांत 'हें बिशपचें ठिकाण होतें' असा उल्लेख केला आहे, तें हेंच असावें. वैष्णव मताचा उत्पादक मध्वाचार्य ११९९ त या गांवीं जन्मला. इ. स. १६७८ सालीं पोर्तुगीझांनीं येथें एक फॅक्टरी स्थापली होती.

**कल्याणी**—हैद्राबाद संस्थान. बेदर जिल्ह्यांतील एक जहागिरीचें गांव. बेदरच्या पश्चिमेस ३६ मैलांवर हें आहे. लोकसंख्या (१९०१) ११,१९१. अकराव्या शतकांत पहिल्या सोमेश्वरानें कल्याणी हें गांव चालुक्यांच्या राजधानीचें ठिकाण केलें. पुढें शंभर वर्षांनीं त्या राज्याचा सेनापति बिज्जल कलचुरी याच्या हातांत सर्व सत्ता जाऊन चालुक्यांचें राज्य लयास गेलें. तथापि कल्याणी गांवाचें पूर्वीचेंच महत्त्व कायम राहिलें. मिताक्षराचा कर्ता विज्ञानेश्वर व लिंगायत धर्माचा संस्थापक बसव हे येथेंच होऊन गेले. कलचुरीनंतर देवगिरीच्या यादवांकडे या गांवाचें स्वामित्व गेलें व चौदाव्या शतकांत बहामनी राज्याची स्थापना झाल्यावर त्यांच्याकडे व नंतर विजापूरच्या मुलुखांत याचा समावेश झाला. इ. स. १६५३ सालीं हा गांव मोंगलांनीं लुटला. इ. स. १६५६ सालीं येथील किल्ला औरंगझेबानें मोठी शिकस्त करून सर केला.

**कल्लादनार** (१००-१३०)— एक तामीळ कवि. हा बहुतेक वेंकडम्चा रहिवासी असून एका भयंकर दुष्काळांत कुटुंबासह त्याला तें गांव सोडावें लागलें. दक्षिणेकडे येऊन कावेरीच्या तीरावरील सुपीक प्रदेशांत तो राहिला. तेथें पोरैयुर व अंबर येथील राजांनीं त्याचा चांगला सत्कार करून त्याला दरबारीं ठेवलें. तोल्काप्पियन या तामिळी व्याकरणावर यानें एक टीका लिहिली असें म्हणतात. पण ती सध्यां उपलब्ध नाहीं. मदुरेंतील शिवलीला ज्यांत वर्णिलेली आहे तो कल्लाडम् नांवाचा काव्यग्रंथ यानेंच रचिला म्हणतात.

**कल्लार**—उर्फ कल्लण. वस्ती मद्रास इलाखा. लो. सं. (१९११) ५,३६,६२९. यांत पुरुषांपेक्षां बायकांची संख्या ज़ास्त आहे. यांचें मूळ ठिकाण चोल देशांत किंवा तंजावरांत असावें असें म्हणतात. तंजावरांत यांचे आचार ब्राह्मणांसारखे असून घरफोडी, दरोडे, गुरें चोरणें हे यांचे नेहमींचे गुन्हे होत. तामीळ भाषेंत 'कल्लण' या शब्दाचा अर्थ दरवडेखोर असा आहे. बहुतेक लोक प्रामाणिक आहेत. यांचे पूर्वज मोठे धाडशी असत व हा गुण त्यांच्या पुढील पिढ्यांत दिसून येतो. पटाईत गुन्हेगार हा मोठा वीर मानला जातो व खेड्यांतील मुलींना तो पति होण्यास सर्वस्वीं योग्य आहे असें वाटत असतें. तीस वर्षांपूर्वी मदुरा जिल्ह्यांत कल्लारांविरुद्ध मोठी चळवळ झाली व त्यांना बाहेर घालवून देण्याचा प्रयत्न केला गेला. कल्लार लोकांच्या 'तपुकुली' (गुरें चोरणें) व 'कावल' (चोरी होणार नाहीं या हमीकरितां पैसे घेणें) अशा पैसे उकळण्याच्या दोन तऱ्हा आहेत. त्यांनीं चोऱ्या करूं नयेत म्हणून तेल काढणें, चटया करणें, कापड विकणें हीं कामें कल्लारांना देण्यांत आलीं. जमीन विकणार नाहीं व गहाण ठेवणार नाहीं या करारावर त्यांना पडीक जमिनीहि दिल्या आहेत. घटस्फोट सहज होतो. पुनर्विवाहाला मोकळीक आहे. अलगरस्वामी हा त्यांचा मुख्य देव होय.

**कल्लोळ**—मुंबई, बेळगांव जिल्हा, चिकोडी तालुका. हा गांव कृष्णेच्या कांठीं असून हें प्रसिद्ध क्षेत्र आहे. येथें दरवर्षी पौष कृष्ण अमावास्येस मोठी यात्रा भरते. त्याखेरीज कन्यागतांत पुष्कळ दूरदूरचे लोक तीर्थयात्रेकरतां येथें येतात. याचें मूळचें नांव 'कहोळ क्षेत्र'. कहोळ महामुनींचा येथें आश्रम होता. या गांवाजवळ वेदगंगा व कृष्णा यांचा संगम आहे. रामानें येथें यज्ञ केला म्हणून याला 'रामगया' असें नांव पडलें. या ठिकाणीं

उत्तम सुवासिक भस्म निघतें असें सांगतात. संगमतीर्थापासून खालीं एका फर्लांगावर नागतीर्थ प्रसिद्ध आहे. येथें नरसिंहाचें जागृत असें स्थान आहे.

**कॅल्व्हरले, चार्लस स्टुअर्ट** (१८३१-१८८४)—एक इंग्रज कवि. याचें शिक्षण कॅंब्रिज येथें झाल्यावर तो वकिली करूं लागला; पण लवकरच त्याला एक जबर अपघात होऊन वकिलीचा धंदा सोडावा लागला आणि त्यानें लेखनव्यवसाय सुरू केला. त्याची स्फुट कविता फार उच्च दर्जाची आहे आणि शिवाय त्यानें होमर, थिऑक्रिटस आणि होरेस या महाकवींच्या काव्यांचीं भाषांतरें केलीं आहेत तींहि फार सुरेख आहेत. त्याचा एक लेखसंग्रह १९०१ मध्यें प्रसिद्ध झाला.

**कॅल्व्हिन, जॉन** (१५०९-१५६४)—एक स्विस समाजसुधारक आणि प्रॉटेस्टंट धर्मपंथीय लेखक. त्याला वयाच्या १२ व्या वर्षींच धर्मोपदेशका (प्रीस्ट) ची वृत्ति (उत्पन्न) मिळाली, पण या वर्गाबद्दल त्याच्या मनांत शंकाकुशंका येऊं लागल्या म्हणून त्यानें ती वृत्ति सोडून देऊन ऑर्लिन्स येथें कायद्याचा अभ्यास सुरू केला. १५३२ मध्यें पक्का प्रॉटेस्टंटपंथी बनून तो पॅरिस शहरीं आला. पण तेथून त्याला पळून जाणें भाग पडलें. १५३४ मध्यें बाझल येथें राहून त्यानें आपला महत्त्वाचा ग्रंथ 'दि इन्स्टिट्यूट्स ऑफ दि ख्रिश्चन रिलिजन' हा लिहिला. नंतर तो इटलीमध्यें फेरारा व जिनिव्हा येथें गेला, पण तेथून त्याला १५३८ मध्यें हद्दपार करण्यांत आलें. म्हणून तो बर्नला व नंतर स्ट्रॅसबर्गला गेला. १५४१ मध्यें त्याला जिनिव्हाला परत येण्याची परवानगी मिळाली. तेथें त्यानें चर्चच्या शिस्तीबद्दलचें आज्ञापत्रक (ऑर्डिनन्सेस) तयार केलें व तें सर्वांना पसंत पडलें म्हणून प्रसिद्ध करण्यांत आलें. त्या आज्ञापत्रकाप्रमाणें वागणारा एक संघ त्यानें निर्माण केला. १५६१ पर्यंत लूथरच्या व कॅल्व्हिनच्या अनुयायांत मतभेद नव्हता, पण नंतर मतभेद उत्पन्न होऊन त्यानें आपला निराळा पंथ काढला, व त्याला कॅल्व्हिनिस्ट हें नांव देण्यात आलें. ख्रिस्ती धर्माचें पूर्ण ज्ञान आणि वादविवादपटुता यांमध्यें कॅल्व्हिन तत्कालीन विद्वानांमध्यें पहिल्या दर्जाचा होता.

**कल्हण** (१२ वें शतक)—एक काश्मिरी कवि व राजतरंगिणी नांवाच्या काश्मिरी इतिहासाचा कर्ता. संस्कृत पद्यांत लिहिलेल्या काश्मीरच्या इतिहासाच्या चार बखरी आहेत. पैकीं पहिली कल्हणाची असून हींत सुमारें इ. स. ११४८ पर्यंतचा इतिहास आहे. राजतरंगिणी रचण्यापूर्वी कल्हणानें त्याच्यापूर्वी लिहिलले अकरा इतिहास व नील ऋषीनें लिहिलेला काश्मीरचा इतिहास अभ्यासिला होता, असें तो स्वतःच राजतरंगिणीच्या प्रस्तावनेंत म्हणतो.



**कवकरीक**—ब्रह्मदेश, ॲम्हर्स्ट जिल्ह्याचा पोटविभाग. याचें क्षे. फ. १९६३ चौ. मै. असून याच्या पश्चिमेस हॉंगपरा व पूर्वेस थॉंगीन व सयाम सरकारच्या ताब्यांतील मुलूख आहे. कवकरीक परगणा हा बहुतेक डोंगराळ आहे. मागच्या खानेसुमारींत या परगण्याची लोकसंख्या अर्धा लाख होती. या परगण्यांत १६२ खेडीं असून त्यांत कवकरीक हें मुख्य शहर आहे.

**कवचधर प्राणी**—(एन्टोमोस्ट्राका). हा एक कवचधारी प्राण्यांचा पोटवर्ग असून तो आकारानें फार लहान असतो. यामध्यें पुन्हां चार पोटवर्ग आढळतात: १ ब्रिऑपोडा (श्वासेंद्रियपाद)-यामध्यें पाण्यांतील क्षिवा व समुद्रांतील शिंप, वगैरे प्राणी मोडतात. २ कोपेपोडा (वल्हपाद)—यामध्य गोड्या पाण्यांतील सायक्लोप नांवाचे प्राणी व कांहीं खाऱ्या पाण्यांतील पाण्यावर तरंगणारे प्राणी मोडतात. ३ सिरीपेडीया (कूर्चपाद)—यांत बार्नेकल्स हे येतात. ४ ओस्ट्राकोडा (शुक्तिवर्गीय)-यामध्यें शिंपल्यांत राहणारे प्राणी मोडतात.

**कवचफल**—(इं. नट्). ज्या फळावर एक कठिण काष्टमय किंवा चामडीसारखें कवच असतें व आंत एकच पुट असून त्यांत एकच बी असते व जें पिकल्यावर सहसा आपोआप उकलत नाहीं अशा फळास कवचधारी किंवा कवचफळ म्हणतात. अशा जातीच्या फळांपैकीं अनेक फळांचा व्यापार चालतो. अक्रोड व नारळ, वगैरे फळांस कोणी कवचफळें म्हणतात, पण तीं खरोखरीचीं कवचफळें नाहींत.

**कवटी**—डोक्याच्या अस्थीस कवटी असें म्हणतात. या कवटींत चेहऱ्याचा आणि मेंदूचा असे दोन भाग असून तिच्या आंतल्या बाजूस मेंदू आणि ज्ञानेंद्रियांची रचना असते.

मनुष्याच्या कवटींत २२ अस्थी असतात. कवटीच्या खालच्या भागाशीं मुख्य छिद्र असतें त्यास फोरमेन मॅग्नम (महारंध्र) असें म्हणतात. यांतून मेंदू व पृष्ठवंशरज्जु यांचा संबंध जोडलेला असतो. यानंतर दोन लहान छिद्रें असतात. त्यांतून दृक् मज्जातंतू जातात. यांखेरीज अनेक लहान लहान छिद्रें असून

त्यांतून मेंदूस रक्ताचा पुरवठा करणारे व इतर मज्जातंतू जात असतात. निरनिराळ्या सपृष्ठवंश प्राण्यांच्या कवट्यांत पुष्कळच फरक असतो व त्या सर्वांत मनुष्याची कवटी ही पूर्ण विकास पावलेली कवटी आहे.

**कवठ**—कवठाचीं झाडें दक्षिणेंत व गुजरातेंत फार होतात. हा वृक्ष मोठा होतो. त्याच्या फळास कवठ म्हणतात. हें वाटोळें व आंव्याएवढें असतें. त्याचें कवच कठीण असतें. याची चटणीहि करितात. पिकलेल्या कवठाचा मुरंबाहि होतो. कवठ औषधी आहे. पित्त, विषबाधा, उचकी, वगैरेवर देतात.

**कवडा**—हा पक्षी करड्या रंगाचा असून त्याचे पंख व

शेपटी हीं आंखूड असतात व मधून मधून काळे व पिंगट ठिपके असतात. हे धान्य व इतर गवताचें बीं, वगैरे खातात. याची शिकार करतात. हा घरांत शिरला असतां अपशकुन मानतात.

**कवडी**—पोटानें सरपटत जाणाऱ्या कालवांच्या एका जातीच्या समुद्रकीटकांचीं हीं कवचें आहेत. हे गोगलगायी-सारखे असतात. कवड्यांचा नाणीं म्हणून व माळा करून गळ्यांत घालण्याकरितां कांहीं देशांत उपयोग करतात. लखदीव बेटें यांत व हिंदुस्थानांतहि कांहीं काळापूर्वी कवड्या नाण्या-प्रमाणें चलनांत होत्या.

**कवध**—हें इराणी लोकांतील एक पदवीवजा नांव असून सस्सानिद घराण्यांतील दोन राजांनीं हें नांव धारण केलें होतें.

पहिला—हा इराणचा राजा पेरोझ याचा पुत्र होय. इ. स. ४८४ मधील हूणांच्या स्वारींत पेरोझ हा मारला गेला. मझ्दक नांवाचा एक समाजसत्तावाद्यांचा पंथ होता. त्याचें तत्त्व असें होतें कीं, श्रीमंतांचें धन व त्यांच्या बायका यांची गरीब लोकांमध्यें समान वांटणी व्हावी. या पंथाला व या तत्त्वाला कवधनें आसरा दिला. हा दूरदर्शी राजा होता. कवधनें आपल्या कारकीर्दींत पुष्कळ शहरें वसविलीं, करपद्धति सुरू केली, व आपल्या राज्यांत शांतता प्रस्थापित केली.

दुसरा—हा दुसऱ्या खुश्रूचा मुलगा. त्यानें आपल्या बापाला व अठरा भावांना निर्दयपणें ठार मारिलें, पण थोडेच महिने राज्य केल्यावर हा मरण पावला.

**कवनाई किल्ला**—मुंबई, नाशिक जिल्हा. इगतपुरीच्या उत्तरेस १० मैलांवर आहे. हा किल्ला मोंगलांनीं बांधला असें म्हणतात. हा उदगीरच्या लढाईनंतर झालेल्या तहामध्यें निझामा-कडून पेशव्यास मिळाला ( १७६० ). इ. स. १८१८ मध्यें त्र्यंबकेश्वराबरोबर इंग्रजांस मिळालेल्या १७ किल्ल्यांमध्यें हा एक होता.

**कवर्धा**—हें मध्यप्रांतांतील एक मांडलिक संस्थान आहे. या संस्थानचें क्षे. फ. ७९४ चौ. मैल आहे. याची राजधानी कवर्धा असून ती बंगाल-नागपूर रेल्वेच्या टिला स्टेशनापासून ५४ मैलांवर आहे. कवर्धा हें नांव 'कवीरधाम' या शब्दापासून बनलेलें आहे अशी समजूत आहे. येथें भोराम देवाचें एक सुंदर देवालय आहे. गोंड घराण्याचे वंशज कवर्धा संस्थानावर राज्य करितात. येथील लो. सं. ७७,२८४ होती. गोंड, चांभार, तेली या मुख्य जाती होत. हिंदी भाषा प्रचलित आहे. संस्थानचें वार्षिक उत्पन्न सुमारें सहा लाख रुपये आहे. १९४७ सालीं हें संस्थान मध्यप्रांतांत विलीन झालें.

**कवष**—एक अब्राह्मण ऋषि व वैदिक सूक्तांचा द्रष्टा. याला अब्राह्मण व व्यसनी म्हणून यज्ञास अयोग्य ठरविण्यांत आलें असतां यानें अपोनप्त्रीय सूक्तानें सरस्वती नदीला आपणांकडे वळविली व आपली थोरवी सिद्ध केली. कवषस्मृति म्हणून एक ग्रंथ उपलब्ध आहे.

**कवार**—( कंवर ). ही जात वऱ्हाड-मध्यप्रांतांत आढळते. एकंदर २,३३,४२३ लोकसंख्येपैकीं ( १९११ ) वरील भागांतून २,२९,४१२ कवार होते. मद्रास इलाख्यांतील कवराई जात व ही एकच असावी. हे हिंदी भाषाच बोलतात. हे द्रविड वर्गांतील लोक असावे असें वाटतें. यांचे ८ भिन्नवर्गविवाही उपवर्ग आहेत. ते तंवर, कमलवंशी, पैकर, दूधकवर, मटिया, चांटी, चेरवा व रोतिया हे होत. त्यांपैकीं तंवर लोक स्वतःला तोमार रजपूत समजतात व जानवें घालतात. यांनीं ब्राह्मण गोत्रें देखील धारण केलीं आहेत. सिरगुजाच्या कंवरांनीं सतीची चाल उचलली होती. सतीला यांच्यांत फार मान असे. बहुधा सर्व लोक प्रेतें पुरतात. श्रीमंत लोक मात्र दहन करूं लागले आहेत. त्यांच्या जातीचे अनेक देव आहेत. वाघाची देवता वाघरा देव या नांवानें प्रसिद्ध आहे. मंडवा राणी म्हणून एक देवता आहे. एक कोळीण सती व 'सारंगन्हिणी' अशा दोन

देवता दोन वायकांपासून बनल्याचें मानितात. युद्ध करणें हा खरा धंदा असें हे लोक समजतात. यांच्या पंचायतीच्या मुख्यास परधान (प्रधान) म्हणतात.

**कवि** — कवि म्हणजे काय, तसेंच कवितेची व्याख्या काय, कवि कशानें होईल, कवि जन्मसिद्ध गुणांनीं बनतो कीं कृत्रिम उपायांनीं, याची प्राचीन कालापासून पुष्कळ चर्चा विद्वानांनीं केली आहे, पण सर्वमान्य उत्तरें अद्याप कोणीं दिलेलीं नाहींत. अडाणी लोकांतून बरेचसे कवी पुढें आले आहेत, विद्वत्व व कवित्व या दोन गोष्टी परस्परविरुद्ध असून विद्वत्ता वाढली तर ती कवित्वास अपकर्षक आहे, वगैरे मुद्यांची चर्चा चिपळूणकरांनीं आपल्या निबंधमालेंत केली असून पांगारकरांनीं त्यांचीं मतें खोडून काढलीं आहेत. इंग्लंडांतहि याच प्रकारचा वाद १८ व्या व १९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत होता. तथापि जे कवी म्हणून पुढें आले आहेत, ते कवित्व करूं लागल्यावर स्वतःच्या मनोविकासासाठीं व बुद्धिविकासासाठीं कांहीं तरी शिक्षण किंवा ज्ञान पैदा करीत, यात शंका नाहीं.

लोकांचें चित्तरंजन करणें ही गोष्ट अगदीं प्राचीन व मागासलेल्या समाजांतहि दिसून येते, त्यामुळें पोवाडे, लावण्या, वगैरे साध्या चालींचीं गीतें निरक्षर लोकसमाजांतहि तयार होऊन गायन, वादन व नृत्य या कला अस्तित्वांत आल्या. अशा लघुकाव्यापासून पुढें महाकाव्य निर्माण होतें, असा होमरच्या ईलियडच्या कथेचा इतिहास आहे. असुरो-बाबिलोनियनांच्या गिलगामेशसारखीं महाकाव्यें तत्पूर्वीच्या लघुकाव्यांच्या आधारानें तयार झालेलीं दिसतात. हिंदुस्थानांतील 'महाभारत' हें महाकाव्य तत्पूर्वीच्या वाङ्मयांतील मोठमोठ्या पुरुषांच्या कथा एकत्र करून प्रचंड झालें आहे. ऋग्वेदांत लहान लहान खंडकाव्यें अन्तर्भूत झालीं आहेत; सूतसंस्कृतींतील आख्यानवाङ्मय वैदिक उर्फ मांत्रसंस्कृतीपेक्षांहि प्राचीन आहे. लावण्या, आख्यानें, स्तोत्रें हीं काव्याचीं आद्यस्वरूपें असून त्यानंतर रामायण महाभारतादि महाकाव्यें निर्माण झालीं. भारतांतील आद्यकवि वाल्मीकि होय.

अलीकडे महाकाव्यें निर्माण होत नाहींत, याचें कारण मनुष्यांतले काव्यगुण कमी झाले आहेत, असें नाहीं. कवींचें व लेखकांचें अस्तित्व आज छापखान्याच्या धंद्यावर अवलंबून असून छापखाना या धंद्याचें अस्तित्व त्वरित विक्रीवर अवलंबून आहे. महाकाव्याची तयारी करणें म्हणजे संविधानक पाहणें, वर्णनीय प्रसंग शोधणें, त्यांचा चित्ताकर्षक अनुक्रम साधणें, अनेक रसांच्या उत्पादनास अनुकूल अशीं व्यक्तिचरित्रें बनविणें या सर्व गोष्टी मोठे परिश्रम व भरपूर अवसर व कौटुंबिक स्वास्थ्य असल्याशिवाय होणें शक्य नाहीं. सांप्रतच्या वैयक्तिक किंवा सांघिक जीवनकलहांत दीर्घकालीन चित्तस्वास्थ्य लाभणें अशक्यप्राय आहे. 'पॅराडाईस लॉस्ट' हें महाकाव्य लिहिण्याची मिल्टन कवीची पूर्वतयारी वीसपंचवीस वर्षें चालू होती. गद्यरूपी प्रचंड कादंबऱ्या जे लेखक लिहितात; त्यांच्यांत महाकवींचे पण गुण असतात. पण आजच्या सामाजिक परिस्थितींत महाकाव्य नको आहे; त्वरित मुद्रण व त्वरित वाचन होईल अशा लघुकाव्य, लघुकथा, कादंबऱ्या, नाटकें अशा स्वल्प वाङ्मयाचा हा काल आहे. (काव्य पहा.)

**कविकंकण मुकुंदराय** (मृ. १६४०)— हा ध्येयवादी बंगाली कवि वास्तववादाचा पुरस्कर्ता होता. बरद्वान परगण्याच्या सुभेदाराच्या क्रूरपणास कंटाळून दामन्या नामक आपलें गांव सोडून हा आडरा (मेदिनीपूर) येथील बाकुंडराय राजाच्या पदरीं त्याच्या मुलांस शिक्षक म्हणून राहिला. राजाच्या दरबारीं त्याला फार मान असे. आपल्या देशाची परिस्थिति सुधारतांच हा आपल्या मायभूमीस परत गेला. उरलेलें आयुष्य यानें चंडी देवीच्या उपासनेंत घालवलें. 'चंडि-मंगल' हा याचा प्रसिद्ध ग्रंथ आहे.

**कविजंग**— हा निझामाचा नोकर अहमदनगरचा किल्लेदार होता. पेशव्यांना हा किल्ला पाहिजे होता; कारण तो पुण्यानजीक असल्यानें लष्करीदृष्ट्या तो ताब्यांत असणें जरुरीचें होतें. तेव्हां पेशव्यानें त्याच्याकडे १७५७–५८ सालीं प्रेप पाठविला होता. अखेर ९।११।१७५९ रोजीं कविजंगानें किल्ला दारुगोळा व शस्त्रास्त्रांसहित पेशव्यांना दिला. त्याबद्दल दरसाल पन्नास हजार रुपयांची जहागीर वंशपरंपरेनें पेशव्यांनीं त्याला दिली. कविजंग (अर्थ रणशूर) हें आडनांव आहे. याचें मूळ ठिकाण दिल्ली असून मूळपुरुष शागुलखां हा होय. ज्यानें किल्ला मराठ्यांना दिला तो कविजंग ख्वाजा शरीफ. पन्नास हजारांच्या जहागिरीबरोबरच सरदेशमुखी व चौथाईहि त्याला माफ केली होती. ख्वाजा शरीफ याचें थडगें नगर येथें डांगेगल्लीजवळ कमानी मशिदींत आहे.

**कविराक्षस**—(भीमकवि). या तेलगू कवीचा जन्म तेराव्या शतकाच्या प्रारंभीं गोदावरी प्रांतांतील वेमुलवाडा खेड्यांत एका गरीब विधवेच्या पोटीं झाला. मोठा झाल्यावर लोक यास 'विधवेचा पोर' म्हणून हिणवीत. या त्रासाला कंटाळून यानें कांहीं वर्षें द्राक्षाराम् येथें शिवाच्या उपासनेंत घालवून हा परत आपल्या मातृभूमीस आला व आपल्या अद्भुत गुणांनीं यानें जातींत प्रवेश मिळविला. हा तेलंगण चालुक्य राजा चोक्क याच्या दरबारीं होता. या कवीचे छंदःशास्त्रावरील 'भीमकवी छंदसु' व ज्योतिषशास्त्रावरील 'भीमन्ना ज्योतिष' हे ग्रंथ सुप्रसिद्ध अ

**कविरोंडो**—ब्रिटिश पूर्व आफ्रिकेंतील लोकांची एक जात. या जातीमध्यें बंटू व निलोटिक अशा दोन उपजाती आहेत. या दोन्ही जाती शरीरानें सुंदर बांध्याच्या आहेत. या लोकांचा विशेष म्हणजे ते नग्न राहतात हा होय. युरोपियन लोकांशीं संबंध आल्यामुळें या जातींतील बरेच लोक हल्लीं पाश्चात्य तऱ्हेचे पोषाख वापरूं लागले आहेत. कविरोंडो लोक भांडखोरपणा, स्वातंत्र्यप्रियता, प्रामाणिकपणा व नीतिमत्ता या गुणांबद्दल प्रसिद्ध आहेत. व्यभिचारी बायको व मुली व मुलें यांना पूर्वी देहान्त शिक्षा दिली जात असे. मृत मनुष्याबद्दल सुतक पाळण्याची खूण म्हणजे मानेभोंवतीं व कमरेभोंवतीं केळीच्या सोपटाचे तंतू बांधून घेणें ही होय. हे लोक मुख्यतः शेतकीवर उदरनिर्वाह करतात. मका, तंबाखू, भांग हीं पिकें होतात. पुरुष व बायका दोघेंहि धूम्रपान करतात. दारू पिण्याचाहि सरास प्रघात आहे. कविरोंडो लोक शिकारीच्या कामांत पटाईत आहेत. यांच्यामध्यें देवकपूजेचें माहात्म्य बरेंच आहे. पितृपूजा हें त्यांच्या धर्माचें एक विशिष्ट अंग आहे. मंत्रतंत्रावर यांचा फार विश्वास असतो. यांच्यांतील गाणीं करुणरसपरिपूर्ण व सुंदर असतात. याशिवाय पुष्कळ प्रकारचीं वाद्यें त्यांच्यामध्यें आहेत.

**कवींद्र**—'रसचंद्रोदय', 'विनोदचंद्रिका' व 'जोगलीला' या ग्रंथांचा निर्माता कवींद्र कवि हा कालिदास त्रिवेदीचा मुलगा असून सन १६७८ त जन्मास आला. याचें मूळचें नांव उदयनाथ असून याचा कविताकाळ सन १७१९-१७४६ हा मानला जातो. याची भाषा मधुर व प्रसादपूर्ण आहे. आपल्या अपूर्व गुणांनीं यानें थोडक्याच अवधींत नांव मिळवलें.

**कवाश्वर, शार्दूलसिंग** (१८८६- )—एक शीख पुढारी. यांनीं लाहोर येथील सरकारी कॉलेजमध्यें पदवीनंतरचें शिक्षण घेतलें. हे पहिल्या प्रतीचे खेळाडू आहेत; फुटबालमध्यें प्रवीण असून क्रिकेटटीमचे कप्तान होते. यांनीं दिल्ली येथें 'सीख रिव्ह्यू' नांवाचें पत्र सुरू केलें. १९१७ मध्यें हे हिंदु युनिव्हर्सिटीचे फेलो निवडून आले. १९१८ मध्यें लाहोर येथें येऊन यांनीं 'न्यू हेरल्ड' नांवाचें पत्र सुरू केलें. १९२५ सालीं हे पंजाब प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते. शीख लोकांमध्यें यांनीं नवचैतन्य उत्पन्न करून राष्ट्रीय चळवळ सुरू केली. १९२६ मध्यें यांनीं काँग्रेसचें कार्य करण्यास सवड मिळावी म्हणून अनेक शीख संस्थांच्या पदांचे राजीनामे दिले. १९२८ मध्यें त्यांची काँग्रेस वर्किंग कमिटीवर निवड झाली व तेव्हांपासून ते बरींच वर्षे तीवर काम करीत होते. ते १९३२ मध्यें काँग्रेसचे तात्पुरते अध्यक्ष होते. यांनीं १९२६ मध्यें पीपल्स इन्शुअरन्स कंपनी नांवाची संस्था काढली. यांनीं 'अहिंसात्मक असहकार', 'यशस्वी विमा एजंट', 'शीख धर्माचा अभ्यास', वगैरे अनेक धार्मिक व राजकीय ग्रंथ लिहिले आहेत.

**कॅव्हेंडिश, थॉमस** (१५५५-१५९२)—हा समुद्रपर्यटन करणारा इंग्रज असून तो १५८६ मध्यें प्लिमाउथ बंदरांतून निघाला आणि वाटेंत बरींच जहाजें पकडून आणि नाश करून नंतर तो चिली, पेरू आणि न्यू स्पेन या देशांत गेला व तेथें किनाऱ्यावरील लोकांना ठार मारून केप ऑफ गुड होप मार्गानें परत आला. या सफरींत त्यानें सर्व पृथ्वीला २ वर्षें आणि ४९ दिवसांत पूर्ण प्रदक्षिणा केली. त्या काळांत ज्यांनीं ज्यांनीं पृथ्वीप्रदक्षिणा केली त्यांच्यापेक्षां कमी मुदतींत यानें आपली पृथ्वीप्रदक्षिणा पुरी केली.

**कॅव्हेंडिश, हेन्री** (१७३१-१८१०)—एक इंग्रज पदार्थविज्ञान-रसायनशास्त्रज्ञ. याला बापाची सर्व दौलत मिळून तो अति श्रीमंत झाला. याचें पुस्तकालय सोहो येथें होतें. तो जन्मभर अविवाहित राहिला. त्यानें १७६४ त शास्त्रीय शोध लावण्यास सुरवात केली. यानें ताल (आर्सेनिक) उपधातूवर प्रयोग केले. कर्बद्विप्राणिदाचेंहि यानें सूक्ष्म निरीक्षण केलें. तसेंच यानें विद्युच्छास्त्रांतहि पुष्कळ शोध लावले. १७७७ पासून यानें पुन्हां हवेसंबंधीं शोध चालू केले. १७८३ सालीं नवें वायुमापनयंत्र (युडिओमीटर) तयार केलें. पृथ्वीचें विशिष्टगुरुत्व ठरविणें हा त्याचा महत्त्वाचा शोध होय. याचीं यंत्रें लंडन येथील रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें ठेवलेलीं आहेत, व केंब्रिज विश्वविद्यालयाला जोडून याच्या नांवानें एक रसायन शाळा बांधिली आहे.

**कॅव्हेल, एडिथ** (१८६५-१९१५)—ही इंग्रज नर्स होती. या कामाचें शिक्षण घेतल्यावर तिला ब्रुसेल्स येथें १९०७ मध्यें मेट्रन नेमण्यांत आलें. पहिलें महायुद्ध सुरू झालें त्या वेळीं ती तेथें होती. त्यामुळें जर्मनांनीं तिला १९१५ सालीं कैद करून मरणाची शिक्षा दिली. तिच्यावर असा आरोप ठेवण्यांत आला होता कीं, तिनें आपल्या घरांत फ्रेंच, ब्रिटिश व बेल्जियम सोल्जरांना आश्रय दिला आणि त्यांना बेल्जममधून पळून जाण्याला मदत केली. हिच्या देशभक्तीबद्दल इंग्लंडांत स्मारक उभारण्यांत आलें आहे.

**कश्यप**—ऋग्वेदांतील एक सूक्तकार. सर्वानुक्रमणीप्रमाणें याच्या कुलांत ऋग्वेदांतील बरेच सूक्तकार झाले. गोत्रप्रवर्तक ऋषींपैकीं हा एक आहे. शतपथ ब्राह्मणांत कश्यपापासून सर्व प्रजा निर्माण झाल्या असा उल्लेख आहे. स्वायंभुव मन्वंतरातील ब्रह्ममानसपुत्र जो मरीचि ऋषि, त्यास कर्दमकन्या कला हिच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील हा ज्येष्ठ होय. हा स्वारोचिष मन्वंतरांतील सप्तर्षींमध्यें होता. याच्या नांवानें संहिता-स्मृति-सिद्धान्त प्रसिद्ध आहेत. चरकसंहितेंत बरेच पाठ कश्यपाचे

आहेत. याच्या अनेक स्त्रिया व त्यांपासून झालेली संतति पुराणांतून दिली आहे.

**कंस**—यदुकुलोत्पन्न सात्वत पुत्र जो अंधक त्याच्या वंशांत जन्मलेल्या उग्रसेन राजाच्या नऊ पुत्रांतील ज्येष्ठ. हा कालनेमिनामक असुरांशानें जन्मला होता, म्हणून स्वभावतःच दुष्टबुद्धीचा असे. देववाणीनें त्याला असें सांगितलें कीं, देवकीचा अष्टम गर्भ तुला मारील. त्यावरून यानें तात्काल देवकीवर खड्ग उपसलें, तेव्हां वसुदेवानें हिला जें जें अपत्य होत जाईल तें तें मी तुला आणून देत जाईन, असें कंसाला वचन दिलें. पुढें कंसानें वसुदेव-देवकीस प्रतिबंधांत ठेवलें. अष्टम बालक जन्मलें तेव्हां वसुदेवानें त्यास गोकुळांत पोंचवून तिकडे झालेली कन्या मथुरेस बंदिशाळेंत आणिली. त्या कन्येस कंस मारूं लागला तों त्याच्या हातून निसटून ती आकाशांत अदृश्य झाली. कंसास पुढें असें कळलें कीं, बलराम व कृष्ण हे दोघे वसुदेवपुत्र गोकुळात वाढत आहेत. म्हणून पूतना, अघासुर, केशी, इत्यादि दैत्यांना त्यानें गोकुळांत पाठविलें. पण त्यांचा वध झाला. पुढें कंसास कृष्णानें धरिलें व त्याच्याच खड्गानें त्याचा शिरच्छेद केला.

**कसबी**—गाणाऱ्या व नाचणाऱ्या वेश्यांची ही एक जात बनली आहे. कलावंतापेक्षां ही जात हलकी समजतात. कसब (शरीरविक्रय करणें) या अरबी शब्दापासून कसबी शब्द तयार झाला आहे. हिंदुस्थानांत उघडपणें नृत्य करणाऱ्या व गाणाऱ्या स्त्रिया बहुधा आतांपर्यंत वेश्याच असत. गरती स्त्रियांपेक्षां भाषणांत, गायनांत, नृत्यांत व पोषाखांत वेश्या जास्त कुशल असल्यामुळें हिंदु समाजांत त्यांची जास्त चहा होत असे. त्यांच्याकडून त्या विद्या करवीत असत. सभ्य लोकांच्या समाजांत देखील समारंभांतून यांचा प्रवेश होत असे. यांच्या मुलांपैकीं कोणी लग्नें करून गृहस्थ बनतात. त्यांच्यापैकीं कसबी व नायकिणी म्हणविणाऱ्या हिंदू असतात. तवाईफ मुसलमान व भोगम तेलंगी असतात. मोठ्या शहरांतून सर्व जातींच्या वेश्या सांपडतात. निराश्रित झालेल्या मुली यांना बळी पडतात. पूर्वी तर मुली विकण्याचा मोठा धंदा चाले. मुंबई इलाख्यांत ठाणें, बेळगांव, विजापूर, कानडा व रत्नागिरी या जिल्ह्यांतून कसबिणी आढळतात. घरदार सोडलेल्या, विधवा, नवऱ्यानें टाकलेल्या यांसारख्या बायकांतून या जातींत भरती होत असते. रमजानी किंवा कलावंत टकाई किंवा कमाऊ अशा दोन पोटजाती कसबिणींत आहेत.

**कसर**—या कीटकांस पंख नसतात, व यांत रूपांतरहि नाहीं. हा फार उपद्रवी कीटक असून बाल्यावस्थेंत व पूर्णावस्थेंत सारखाच उपद्रव करतो. कसरीचा रंग पांढरा असून अंग फार मऊ असतें. यांना पिष्टमय पदार्थ आवडतात, त्यामुळें आपल्या कपाटांत किंवा पेट्यांत ठेवलेल्या कपड्यांना, तसेंच जुने कागद, पोथ्या, वगैरेंना यांचा उपद्रव होतो. विशेषतः पुस्तकें किंवा कपडे बांधून किंवा पेटींत ठेवून बरेच दिवस पाहिलें नसल्यास कसरी खाऊन खराब करतात. पेट्यांत, कपाटांत किंवा वासनांत डांबराच्या गोळ्या ठेवल्यास त्यांच्या वासानें कसरीची आत वाढ होऊं शकत नाहीं.

**कॅसलरॉक**—मुंबई, उत्तर कानडा जिल्ह्याच्या हलयाळ तालुक्यांतील सुपें पेट्यामध्यें (सदर्न मराठा रेल्वेचें स्टेशन) असलेलें एक खेडें. येथून गोव्याची सरहद्द तीन मैल असल्यामुळें हें गोवा सरहद्दीवरील महत्त्वाचें ठाणें आहे. हें समुद्रसपाटीपासून २,००० फूट उंच असल्यामुळें येथून सभोंवारची निसर्गरमणीय शोभा चांगली दिसते. पोर्तुगीज सरहद्दीच्या पलीकडे कांहीं मैलांवर 'दूधसागर' धबधबा पाहण्यासारखा आहे.

**कसाई**—१९११ च्या खानेसुमारींत एकंदर ३,६३,१२३ कसाई गणले गेले. त्यांपैकीं ३,६०,९०० मुसलमान होते. सर्वांत जास्त वस्ती संयुक्त प्रांत व पंजाब यांमध्यें आहे. पंजाबांत यांना कसाब असेंहि नांव आहे. यांच्यांत दोन वर्ग आहेत. एकास गायकसाई व दुसऱ्यास बकरकसाई म्हणतात. ज्या हिंदु लोकांनीं हा धंदा उचलला आहे त्यांस खाटिक म्हणतात. मुसलमान कसायांचीहि एक जात बनली आहे. इतर मुसलमान यांच्याशीं लग्नसंबंध करीत नाहींत. पण मुसलमानांच्या चालीरीतीप्रमाणेंच हे लोक वागतात.

दक्षिणेंतील हिंदू कसायांत धनगर, मराठे, कुणबी या वर्गांचा बराच भरणा असतो. तथापि रीतीरिवाजांत मराठे कुणब्यांहून यांच्यांत फारसा फरक नाहीं. (खाटिक पहा).

**कॅसाब्लांका**—(दार इलबैदा=शुभ्र गृह). हें बंदर मोरोक्को देशांत अटलांटिक महासागराच्या किनाऱ्यावर फ्रेंच विभागांत आहे. हें मध्यमोरोक्कोचें लोकरीचें व धान्याचें बंदर असून मूरिश किनाऱ्यावरील तिसऱ्या प्रतीचें शहर होय. पोर्तुगीजांनीं ॲफा शहराचा नाश करून (इ. स. १४६८) तेथें कॅसाब्लांका शहर वसविलें. परंतु त्यांना लवकर तें सोडून जावें लागलें. लो. सं. ४,५३,००० (पैकीं युरोपियन १,३१,०००).

**कॅसिनी**—या नांवाचे इसम तीन पिढ्या खगोलशास्त्र आणि पदार्थविज्ञानशास्त्र यांत प्रसिद्धि पावले. (१) गिओव्हॅनी डॉमेनिको (१६२५–१७१२)–यानें शनीचे चार नवे उपग्रह शोधून काढले. आणि असें सिद्ध केलें कीं, चंद्राचा आंस क्रांतिवृत्ताशीं लंबरूप नाहीं व चंद्राच्या आंदोलनाचीं कारणेंहि त्यानें दाखवून दिलीं. (२) जॅकीज (१६७७–१७५६)–यानें आपल्या वडिलांचें शनीच्या उपग्रहासंबंधीं आणि वलयासंबंधीं

उरलेलें संशोधनकार्य पुरें केलें. ( ३ ) कॅसिनाइड थुरी सीझर फ्रान्स्वा ( १७२४-१७८४ )-यानें फ्रान्सची भूमितिविषयक मोजणी करण्याचें काम हातीं घेतलें. कॅसिनी जीन डॉमिनिक (१७४८-१८४५)-हा गणितशास्त्रज्ञ असून हुशार मुत्सद्दीहि होता.

**कसेई**— कासे गवत. याला संस्कृतमध्यें काश म्हणतात. त्याचें बीं माळेचे मणी करण्याकडे उपयोगांत आणीत असत. प्राच्य देशांत त्याचा अन्नाप्रमाणें उपयोग होत असे. आयुर्वेदकांत व वैदिक वाङ्मयांत या खाद्य धान्याचा उल्लेख केला आहे व आर्य लोकांनीं हिमालयाच्या पायथ्याशीं त्याची लागवडहि केली होती असें म्हणतात. हें एक प्रसिद्ध शक्तिवर्धक व मूत्ररेचक औषध आहे. अरब लोकांनीं ह्याचीं झाडें युरोपांत नेलीं. दार्जिलिंग, उत्तर व पूर्व आसाम, खासिया, गारो, ब्रह्मदेश व शान संस्थान येथें हें धान्य चांगलें पिकतें. चहाऐवजीं या धान्याचा काढा करून पितात. नागा टेकड्यांवरील प्रदेशांत हें धान्य आंबवून त्यापासून दारू काढतात. हें रक्तशुद्धि करणारें तसेंच उत्तम मूत्ररेचकहि आहे. उन्हाळ्यांत थंडाईसारखा याचा उपयोग करतात. हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांमधील मूळच्या जंगली लोकांत याचा उपयोग दागिने करण्याकडे करीत. टोपल्या, पाकिटें, कपडे, इत्यादि जिनसा सुशोभित करण्याकडेहि याचा उपयोग करितात.

**कॅसोवरी**— ही एक ऑस्ट्रेलियांतील धांवणाऱ्या पक्ष्यांची जात आहे. यांचे कॅसोवरी व एमु असे दोन प्रकार आहेत व त्यांच्याहि अनेक जाती आहेत. यांपैकीं एका जातीच्या डोक्यावर शिरस्त्राणासारखा शृंगमय भाग असतो. हे पक्ष्यांच्या अंड्यांवर व फळांवर वगैरे निर्वाह करतात. हे मोठे अधाशी आहेत. हे दाट जंगलांत व झुडपांमध्यें राहतात व फार त्वरेनें पळतात.

**कसौली**— पंजाबांतील एक डोंगरी ठाणें व छावणी. याची समुद्रसपाटीपासून उंची ६,३३५ फूट आहे. लो. सं. तीनचार हजार. इ. स. १८४२ त कसौली हें लष्करी ठाणें म्हणून वसविलें होतें. परंतु हल्लीं तें आजारी माणसांकरितां हवा खाण्याचें ठिकाण झालें आहे. युरोपियन शिक्षकांकरितां एक शाळा, किंग जॉर्ज हायस्कूल, लॉरेन्स मिलिटरी असायलम यांसारख्या शिक्षणसंस्था आहेत. पिसाळलेल्या कुत्र्याचा दंश झालेल्या माणसांना उपचार करण्याकरितां येथें १९०१ सालीं पाश्चूर संस्था स्थापन झाली. १९०६ सालीं येथें एक संशोधनशाळा स्थापण्यांत आली.

**कॅस्कारा साग्राडा**—[ पवित्र ( कॅस्कारा ) साल ]. हें एका झाडाच्या ( -हॅम्नस पुर्शिआना ) वाळलेल्या सालीपासून तयार केलेलें सारक औषध आहे. याचा वृक्ष उत्तर अमेरिकेंत आढळतो. कॅस्कारा साग्राडा हें चांगलें सौम्य रेचक आहे. पण याची चव कडू असल्यानें त्यांत ग्लिसरिन मिसळतात.

**कस्तुरी**— कस्तुरी मृगापासून काढण्यांत येणारा एक सुगंधी पदार्थ. हा कस्तुरी मृगाच्या बेंबींतल्या गांठींत असतो. हा गोठलेल्या रक्तासारखा व स्निग्ध असून याचा वास फार तीव्र असतो. व्यापारीदृष्ट्या कस्तुरीचे तीन प्रकार आहेत : १ रशियन, २ आसामी, ३ टांकिन अथवा चिनी. हिमालयीन कस्तुरीला आज मागणी फार कमी आहे. एका औंसाला युद्धपूर्वकाळीं सुमारें ७५ रु. पडत. कृत्रिम रीतीनेंहि कस्तुरी होत असल्यानें एवढी महागाईची खरी कस्तुरी फार थोडे घेतात. औषधाला कस्तुरी वापरतात. ( कस्तुरी मृग पहा. )

**कस्तुरी चिचुंद्री**—(मस्क रॅट). हा प्राणी अमेरिकेंत आढळतो. हा उंदीर किंवा चिचुंद्री वर्गांतील एकटाच प्राणी आहे. याचा आकार लहान सशाएवढा असतो. याच्या अंगास उन्हाळ्यामध्यें कस्तुरीसारखा वास येतो पण तो हिंवाळ्यांत नाहींसा होतो. याचें चामडें व त्यावरील केंस फार मौल्यवान समजले जातात. युरोप खंडांत दक्षिण रशियामध्यें व पिरिनीज पर्वतांत अशा प्रकारचे एका जातीचे उंदीर आढळतात. ते पाण्यांत राहतात व किडे वगैरे खाऊन उपजीविका करतात.

**कस्तुरी मृग**—हा हरणाच्याच जातीचा एक प्राणी आहे. हे काश्मीरकडे आढळतात. या जातीच्या नरांमध्येंच मात्र कस्तुरी आढळते. ही त्याच्या बेंबीच्या ठिकाणीं असते. हिमालयांत ८,०००-१२,००० फूट उंचीवर, तिबेटांत आणि मध्य आशियांत सैबेरियापर्यंत हे आढळतात. हे मृग मस्त झाले म्हणजे त्यांची बेंबी वाढत जाते व तींत कस्तुरी बनते. एका जनावरापासून सरासरी १ औंस कस्तुरी मिळते. या प्राण्याचें मांस चवदार लागलें तरी त्याला वास मात्र नसतो.

**कस्तुरी वृषभ**— हा प्राणी बैल आणि मेंढा यांच्या दरम्यानच्या प्राण्यासारखा दिसतो. तो दिसावयास मंद दिसतो, पण खरोखर चपळ असून डोंगर, वगैरे सहज चढून जातो. याचा आकार सामान्यतः आपल्या पाळीव बैलाएवढाच असतो. हे सामान्यतः वीसविसांचे कळप करून भटकत असतात. हे आपली उपजीविका गवत, शेवाळ, वगैरेंवर करतात. हे अमेरिकेच्या उत्तरेकडील आर्टिक महासागराच्या बाजूस राहतात. यांचें मांस रुचिकर असतें.

**कॅस्टिलेजो, क्रिस्टोव्हाल** ( १४९४-१५५६ )— हा स्पॅनिश कवि प्राचीन स्पॅनिश दरबारी काव्याचा शेवटचा प्रतिनिधि म्हणतां येईल. त्यानें इटालियन वाङ्मयाच्या प्रकारांचा प्रसार होण्याला जोराचा विरोध केला.

**कॅस्टेलर यी रिपोल, एमिलिओ** ( १८३२-१८९९)— हा एक स्पॅनिश मुत्सद्दी होता. प्रथम यानें १८४८ सालीं कायद्याचा अभ्यास सुरू केला. नंतर कांहीं दिवसांनीं त्याचा वाङ्मयाच्या व तत्त्वज्ञानाच्या शाळेंत प्रवेश होऊन तेथेंच १८५३ सालीं याला डॉक्टर ही पदवी मिळाली. स्पेनच्या राज्यक्रांतीच्या वेळीं यानें आपलें पहिलें राजकीय भाषण केलें. हें भाषण इतकें उत्तम वठलें कीं, याची प्रमुख राजकारणी पुरुषांत गणना होऊं लागली. १८६६ च्या राज्यक्रांतींत त्याला फांशीची शिक्षा झाली असतां तो पळून फ्रान्समध्यें गेला. तो परत आल्यावर त्याला माद्रिद विद्यापीठांत इतिहास-शिक्षकाच्या जागीं नेमलें. हा १८७३ त लोकसत्ताक राज्याचा परराष्ट्रीय मंत्री झाला. यानें पुष्कळ ऐतिहासिक ग्रंथ व कादंबऱ्या लिहिल्या.

**कॅस्ट्रेन, मॅथिअस अलेक्झांडर** ( १८१३-१८५२ )—हा फिनलंडमधील भाषाशास्त्रज्ञ असून त्यानें फिनिश महाकाव्य कलेवाला याचें स्वीडिश भाषेंत भाषांतर केलें. शिवाय त्याचे व्याकरणावर बरेच ग्रंथ आहेत.

**कहार**—( संस्कृत स्कंधकार = खांद्यावर ओझीं वाहणारे ) ही भोई, शेतकरी आणि मजूर यांची जात आहे. १९११ सालची लो. सं. ८,३८,६९८ होती. पैकीं १८,३१,३०५ हिंदू व ६,९६५ मुसलमान होते. ब्राह्मणवंशशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें कहार ही संमिश्र जात असून ती ब्राह्मण पिता व निषाद किंवा चांडाल जातीच्या माता यांपासून झाली आहे. रामाच्या सांगण्यावरून नारदानें कहार जातीचा गुरु केला. म्हणून आपण ब्राह्मणांचे गुरु आहोंत असें कहार म्हणतात. या लोकांची पंचायत असून मालमत्तेसंबंधीं वादांचे निकाल लावणें, गुन्हेगारांस बहिष्कृत करणें, हीं कामें पंचायतीकडे असतात. ओझीं वाहणें, पाणी आणणें, टोपल्या विणणें, पालखी वाहणें, विहिरींत बुडी मारणें, हे कहार जातीचे धंदे आहेत.

**कहोळ**—शतपथ ब्राह्मण व अश्वलायन गृह्यसूत्र या ग्रंथांत उल्लेखिलेला एक ऋषि. हा याज्ञवल्क्याचा समकालीन होता. ब्रह्मतर्पणांत याचें नांव येतें. हा उद्दालक ऋषीचा शिष्य असून त्याची कन्या सुजाता ही यास दिली होती. यांचा मुलगा प्रसिद्ध अष्टावक्र होय.

**कळंक**—( व्हर्डिग्रिस ). तांबें आणि अशीतिक अम्ल ( सिरका ) हवेवर उघडें ठेवून तयार केलेला हिरव्या किंवा त्यांत थोडीशी निळ्या रंगाची छटा असलेल्या रंगाचा पदार्थ. तांबें नुसतें हवेवर उघडें राहिलें तरी हा पदार्थ हळूहळू तयार होतो. मालाकिटप्रमाणें हा तांब्याचा भस्मिक कर्बेत ( बेसिक कार्बोनेट ) आहे. हा विषारी आहे. तथापि रंगासाठीं आणि औषधांतहि त्याचा उपयोग करतात.

**कळंब**—१. मुंबई, पुणें-जुन्नर मार्गावर खेडच्या आग्नेयेस १३ मैलांवर हें खेडें आहे. येथील भोंवतालच्या टेंकड्यांत कांहीं लेण्यीं आहेत. लो. सं. ८,२०३. येथें एक मोठा साखरेचा कारखाना आहे.

२. हैद्राबाद संस्थान, उस्मानाबाद जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका. क्षेत्रफळ ६०५ चौ. मैल, व लोकसंख्या एक लाखावर आहे. कळंब गांव मांजरी नदीच्या कांठीं आहे.

**कळमनूरी**—हैद्राबाद संस्थान, परभणी जिल्ह्याचा ईशान्येकडील तालुका. क्षेत्रफळ ५९४ चौरस मैल. जहागीर धरून लोकसंख्या सुमारें एक लाख. वऱ्हाडचा वाशीम जिल्हा व हा तालुका यांच्या दरम्यान पेनगंगा नदी आहे. औंढ्या नागनाथ हें ज्योतिर्लिंग या तालुक्यांत आहे. कळमनूरी येथें बांगड्या तयार होतात.

**कळवण** - मुंबई, नाशिक जिल्ह्याचा वायव्येकडील एक तालुका. क्षेत्रफळ ५२१ चौरस मैल. यांत एकंदर खेडीं १८७ आहेत. लोकसंख्या ७४,४०२. कळवण हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे.

**कळसा**—म्हैसूर संस्थान, कडूर जिल्हा. मुदगेर तालुक्यांतील हें खेडें मुदगेर गांवाच्या वायव्येस २४ मैलांवर आहे. या खेड्याभोंवतीं उंच उंच डोंगर आहेत. येथें कळसेश्वराचें देऊळ असून देवळांत तेराव्या शतकांतील जैन राजांनीं दिलेले ताम्रपट आहेत व त्यांसभोंवतीं पंधराव्या व सोळाव्या शतकांतील शिलालेख आहेत. येथील सुपारी फार चांगली समजतात.

**कळसूत्री बाहुल्या**— लांकडी किंवा कागदी बाहुल्यांच्या खेळाचा प्रकार फार प्राचीन दिसतो. नाटकांच्या पूर्वी सामान्य जनसमूहाच्या करमणुकीसाठीं असे खेळ होत असले तरी आधुनिक सुधारणेच्या माहेरघरींहि जिवंत माणसांच्या अभिनयाचा कंटाळा आला म्हणूनच कीं काय सिनेमांतून पडद्यावर

बाहुल्यांचीं कामें दाखविलीं जातात व या प्रकारांत एक विशिष्ट कौशल्य मानलें जातें. हिंदुस्थान हें कळसूत्री बाहुल्यांच्या खेळाचें उगमस्थान असून 'सूत्रधार' हो संस्कृत नाट्यांतील संज्ञाच याचें प्रत्यंतर आहे. गेल्या शतकांत नाटकांचे प्रयोग सुरू होण्यापूर्वी या खेळांची चलती असे. परवांपर्यंत 'यमपुरी' दाखविण्यांत येत असे. हिंदुस्थानांतून पूर्व आणि पश्चिम राष्ट्रांत ही कला गेली व तिचे अवशेष अद्यापि पाहावयास मिळतात. जावामध्यें या खेळाला चांगलें स्वरूप आलें होतें. इराणच्या मार्गानें ही कला युरोपांत शिरली. ईजिप्तमधील कांहीं थडग्यांतून या खेळांतील जोडबाहुल्या सांपडल्या आहेत.

फ्रान्समध्यें तर लसाजसारख्या प्रसिद्ध साहित्यिकांनींसुद्धां या बाहुल्यांच्या खेळांसाठीं प्रहसनें लिहून दिलीं आहेत व आजहि मॉरिस मीटरलिंक हेंच करीत आहे. आपल्यांकडील रामलीला-कृष्णचरित्र अशा बाहुल्यांकडून दाखवितात. त्याप्रमाणें ट्रॅफल-गारची लढाई, नेपोलियनचा आल्प्स पर्वतांतून ससैन्य प्रवास, इ. प्रसंग इंग्लंडांतहि कळसूत्री बाहुल्यांकडून दाखविले जातात. या खेळांचीं स्वतंत्र नाटकप्रहें तयार केलेलीं असतात. हिंदुस्थानांत मात्र हा खेळ अशिक्षित लोकांकडे राहून नामशेष झाला आहे.

**कळसूबाई**—मुंबई, नाशिक जिल्हा, इगतपुरीच्या आग्नेयीस दक्षिणेमधील सर्वांत उंच शिखर (५,४२७ फू.). या टेंकडीस हें नांव कळसू नांवाच्या एका कोळी मुलीवरून पडलें असें सांगतात. शिखरावर तिचें एक देऊळ असून दर मंगळवारीं त्या बाजूचे लोक दर्शनास जातात.

या शिखरावर त्रिकोणमितीय मोजणीचें एक स्थान आहे. शिखरावरून फार दूरवरचे डोंगर, किल्ले, वगैरे प्रदेश दिसतात.

**कळा (कळी)**—वनस्पतींचा एक भाग. यामध्यें त्यांच्या पुढें

उत्पन्न होणाऱ्या सर्व अवयवांचें मूळ असतें. सामान्यतः प्रत्येक वर्षी पानाच्या व देंठाच्या बेचकामध्यें एक कळा तयार होतो. तसेंच एक कळा प्रत्येक शाखेच्या शेवटीं असतो. त्याला अंत्य कळा म्हणतात. हिंवाळ्यामध्यें झाडाचें चैतन्य गर्भाप्रमाणें या कळ्यांत सांठविलेलें असतें आणि वसंत ऋतु सुरू झाला म्हणजे या कळ्यांतील चैतन्ययुक्त क्रियेनें झाडाच्या शरीरांत पुन्हां मुळापासून जीवनरसाचा संचार सुरू होतो. कळ्यांचे पर्ण-कळा व पुष्पकळा असे दोन प्रकार असतात.

**कल्लिकोटा आणि अंतगड**— मद्रास, गंजम जिल्ह्यांतील दोन जमिनदाऱ्या. क्षेत्रफळ ५०७ चौ. मैल. लो. सं. सुमारें दोन लक्ष. कल्लीकोट्टा जमीनदारीचा मूळपुरुष रामभूय नांवाचा असून ओरिसाचा गजपति राजा पुरुषोत्तम यानें त्यास जमीनदार बनविलें. पुढें मराठ्यांचा प्रतिकार करण्यांच्या कामीं मदत दिल्याबद्दल त्यास 'मद्रराज देव' हा किताब मिळाला होता.

**कक्षावाद्य**—(बॅगपाइप). हें फार प्राचीन काळापासून चालत आलेलें वायुवाद्य आहे. प्राचीन ग्रीक लोकांत हें प्रचारांत असून १९ व्या शतकामध्यें सर्व युरोपमध्यें हें फार लोकप्रिय होतें. अद्यापि हें पोलंड, इटली, फ्रान्स, स्कॉटलंड व आयर्लंड या देशांत प्रचारांत आहे. या वाद्यामध्यें एक चामड्याची पिशवी असून तींत तोंडांतून हवा फुंकण्यांत येते, व तिला जोडलेल्या नळ्यांतून ती

पिशवी खाकेखालीं दाबून बाहेर घालविण्यांत येते. या वाद्यास चार नळ्या असून एका नळींतून मुख्य राग गाण्यांत येतो, व बाकीच्या तिहींपैकीं दोन या मुख्य नळींतील स्वरांशीं संवादी असून तिसरी सर्वांत लांब असून एका खालच्या सप्तकांतील स्वर काढीत असते. हे स्वर धातूच्या जिभांच्या साहाय्यानें निघतात. मुख्य नळीस आठ छिद्रें असतात व तीं वाजविणारा पाहिजे तेव्हां उघडतो अथवा बंद करतो. निरनिराळ्या देशांत याचे निरनिराळे प्रकार आढळतात.

**काकवर्ग**—(कोर्व्हिडी). हा एक चिमणीसारख्या पक्ष्यांचा वर्ग असून याची चोंच मजबूत आणि निमुळती असते, व ती घट्ट असून सरळ उघडते. याच्या नाकपुडीवर राठ तुऱ्या-सारखीं पिसें असून तीं पुढें झुकलेलीं असतात, या वर्गांत कावळा, रुक, जय, भारद्वाज, ससाणा, वगैरे पक्षी येतात.

**कॉकचेफर**—हे शेणकिड्यासारखे पातळ कवच असलेले एक प्रकारचे कीटक आहेत. हे फार दीर्घकाल जगतात व पिकांचें, वगैरे भयंकर नुकसान करतात. यांची लांबी एक इंचावर असते. हे झाडांचीं पानें साफ खाऊन टाकतात.

**काकडशिंगी**—या झाडास गांठी येतात. त्यांचा औषधांत उपयोग होतो. हीं झाडें सुलेमान पर्वतावर व मिठाच्या डोंगरावर सांपडतात. पूर्वेस कुमाऊनपर्यंत व पश्चिम हिमालयाच्या बाह्य प्रदेशांत ६५०० फूट उंचीपर्यंत हीं झाडें होतात. रंगविण्याकडे व कातडीं कमावण्याकडे यांचा फारच थोडा उपयोग होतो. आतिसारावर काकडशिंगीचें चूर्ण देतात.

**कांकडी**—हें एक वेलीचें फळ आहे. मावळी काकडी, खिरे, टर काकडी, कांटेवाळूक, तवसें, नारंगी ह्या जाती आहेत. काकडीचें फळ हिरवें अगर हिरवट पांढरें असून तें वितीपासून दीड हातपर्यंत लांब होतें. काकडीचे वेल परसांत लहान झाडावर, कुंपणावर अगर मांडवावर चढवितात. हिचे वेल वाळवंटांत व मळ्यातहि होतात. वाळूक हें फळ कोवळेपणीं काळसर हिरवें व पिकण्याच्या सुमारास तपकिरी पिवळें होतें. तें सुमारें ४ ते ९ इंच लांब व २-३ इंच जाड असतें. पिकलेल्या काकड्यांचें सांडगे अगर वडे करून वाळवून ठेवितात व ते तळून खातात. टर काकडीचीं फळें दुरून लांबट दुध्या भोपळ्यासारखीं दिसतात. हीं एक फुटांपासून अडीचतीन फुटांपर्यंत लांब व तीनपासून सहा इंचांपर्यंत जाड होतात. उन्हाळी, मूत्ररोग, धुपणी, इ. वर काकडी औषधी आहे.

**काकडीवर्ग**—(कुकुर्बिटासिई). दुध्या भोपळा ज्या वर्गांत मोडतो तो वर्ग. हीं वनस्पतिमय एकवर्षायु किंवा बहुवर्षायु रोपें असून त्यांस एकाआड एक अशीं पानें येतात. या पानांच्या शिरा हाताच्या पंजासारख्या असतात व त्यांवर कुसळें व ग्रंथी असतात. फुलें नर व मादी अशीं निरनिराळीं असतात; म्हणजे एकलिंगी असतात. या वर्गांतील कमींत कमी ५६ जाती व तीनशें उपजाती माहीत झालेल्या आहेत. यांमध्यें काकडी, टरबूज, दुध्या भोपळा, वगैरे येतात. हीं उष्णकटिबंधांत सर्वत्र होतात.

**काकतीय राजवंश** (१११७-१३६४)—या घराण्याचा संस्थापक दुर्जयराज होय. याचा काल इ. स. ११०० च्या सुमारास असावा. त्याची प्राचीन राजधानी अनमकोंडा होती. याचा मुलगा प्रोल यानें आपली राजधानी अनमकोंडाहून बदलून वारंगळ येथें नेली व तेलंगणचें राज्य स्थापलें. या घराण्यांत रुद्रम्मा नांवाची स्त्री राज्यकर्ती होऊन गेली. तिनें चालुक्य वंशांतील राजपुत्राशीं लग्न केलें होतें. दुसऱ्या प्रतापरुद्राचा पराभव मलिक काफूरनें केला (१३०९). व शेवटीं राजा विनायक याला महंमदशहा बहामनी यानें ठार केलें.

सु. वि. १-५३

करिकाल चोलाचे आपण वंशज आहों, असें काकतीय म्हणवीत.

**काकर**—१. मुंबई, पालनपूर संस्थानांतील कांक्रेजची जुनी राजधानी. येथें जुनें जैन मंदिर आहे.

२. सिंध, लारखाना जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ४४८ चौ. मै. लोकसंख्या सु. सत्तर हजार. या तालुक्यांत ८० खेडीं आहेत. पश्चिम नारा कालव्यावर हा तालुका अवलंबून आहे. मुख्य पीक ज्वारी.

**कॉकस**—कवचधारी रक्तशोषक कीटकांची ही एक जात आहे. यांतील मादी एखाद्या झुडपाला किंवा झाडाला चिकटून येते व तेथेंच ती अखेरपर्यंत राहते. यांच्यापैकीं लाखेचे किडे, कोचिनील किडे, वगैरे फार महत्त्वाचे आहेत. यांपैकीं कांहीं किड्यांच्या वाळलेल्या शरीरांपासून किंवा कांहीं किड्यांच्या उत्सर्गापासून किरमिजी रंग, लाख, वगैरे पदार्थ मिळतात.

**काकाकुवा**—हा एक पोपटाच्या वर्गांतील झाडावर चढणारा पक्षी असून याच्या अनेक जाती आहेत. याची चोंच मोठी असून बळकट असते व डोकीवर एक तुरा असून तो त्याला पाहिजे तेव्हां खालींवर करतां येतो. याचा रंग सामान्यतः पांढरा असतो व याचे पंख लांब असतात. हे पक्षी बहुधा पूर्वेकडील बेटांत व ऑस्ट्रेलियांत आढळतात. ते मुळें, फळें, धान्य, किडे, वगैरे खाऊन बहुधा कळप करून राहतात.

**कांकायनगुटिका**—आयुर्वेदांत ही गुटिका अतिशय प्रसिद्ध आहे. ओंवा, जिरें, धने, मिरें, अजमोदा, काळें जिरें, हिंग, सैंधव, पादेलोण, चिडलोण, मीठ, सांचरलोण, तड, दंतीमूळ, पोखरमूळ, वावडिंग, डाळिंबाचे दाणे, हिरडे, चित्रक, कचोरा, आम्लवेतस, सुंठ, हीं औषधें घालून महाळुंगाच्या रसांत खल देतात. या औषधामध्यें दीपन, पाचन व सारक गुण आहेत. गुल्म व मूळव्याध या रोगांवर हें अतिशय उपयोगी पडतें. पोटांत दुखणें, संग्रहणी, पोटांत वारा धरणें, कृमि, इत्यादि रोगांत या गुटिकेचा अतिशय चांगला उपयोग होतो. १ ते २ गोळ्या मध, गोमूत्र, उंटिणीचें दूध, दशमूळाचा काढा, किंवा लिंबाचा रस याबरोबर घेतात.

**कांकेर संस्थान**— मध्यप्रांत, छत्तीसगडातील एक संस्थान. उत्तर अक्षांश २०° ६' ते २०° २४' व पूर्व रेखांश ८०°४१' ते ८१°४८'. क्षेत्रफळ १४१३ चौरस मैल. संस्थानचें मुख्य ठिकाण कांकेर असून हें चार हजार लोकवस्तीचें गांव आहे. हें बंगाल-नागपूर रेल्वेच्या धरमतरी स्टेशनपासून सुमारें ३९ मैल आहे. संस्थानचा बहुतेक भाग डोंगराळ व जंगलमय आहे.

इतिहास— संस्थानिकांचें घराणें आपण सोमवंशीय रजपूत घराण्यापैकीं आहोंत असें म्हणवितें. याचा संस्थापक वीर कन्हर देव हा होय. याचे वंशज सिहिवा येथें राज्य करीत होते, असें शक १११४ च्या लेखावरून दिसतें. मराठ्यांच्या अमदानींत कांकेर संस्थाननें ज्या वेळीं जरूर असेल त्या वेळीं ५०० माणसांची लष्करी तुकडी मराठ्यांस द्यावी या अटीवर हें राज्य चाललें होतें.

संस्थानिकांना वंशपरंपरेची महाराजाधिराज ही पदवी आहे. संस्थानांत एकंदर ५१० खेडीं आहेत. उत्पन्न सुमारें सात लाख रुपयांचें आहे. लोकसंख्या १,४९,४७१. पैकीं हिंदू सु. ६०,००० व वन्यधर्मी सु. ७०,०००. इतर सतनामी, कबीर पंथी आणि मुसलमान आहेत.

येथील भाषा म्हणजे छत्तीसगडी, हिंदी, हळबी, गोंडी व त्यांच्या उपभाषा. १९४७ सालीं हें संस्थान मध्यप्रांतांत विलीन झालें.

**कॉकेशस**— कर्चच्या सामुद्रधुनीपासून आग्नेयीकडे ९०० मैल लांबीवर पसरलेल्या ह्या आशियामधील रशियाच्या राज्यांतील पर्वत-पंक्ती असून आकार व इतर बऱ्याच बाबतींत ह्यांचें पिरिनिज पर्वतांशीं साम्य आहे. कॉकेशसचा पश्चिम भाग कर्चच्या सामुद्रधुनीपासून एलब्रुज पर्वतापर्यंत ४२० मैल लांबीवर पसरलेला असून काळ्या समुद्रालगत व समुद्राच्या ईशान्येकडील किनाऱ्यांशीं समान्तर रेषेंत आहे. फिश (८०४० फू. उंची), ओशटेन (९२१० फू.), शुगुझ (१०६४० फू.) व सायश (१२४२५ फू.) हीं या भागांतील महत्त्वाचीं उंच शिखरें आहेत. अतिशय पर्जन्यवृष्टि व इतर कांहीं कारणामुळें वनस्पतींची वाढ विपुल होते. बहुतेक भाग दाट अरण्यांनीं व्यापलेला आहे. मध्य कॉकेशस हा भाग सरासरी २०० मैल लांबवर पसरलेला आहे. या भागांत सरासरी ९०० बर्फवाहिनी नद्या असाव्यात असा तर्क आहे. त्यांपैकीं बेझिंगी, जंगाटाऊ सेया अथवा झी, लेकसायर, झानर या महत्त्वाच्या नद्या आहेत. मध्य कॉकेशस पूर्वभाग-हा भाग कसबेक व डेरियल खिंडीपासून बाबादघ-पर्यंत २३० मैल लांबीवर पसरलेला आहे. या भागांतील शिखरें ९००० फुटांपेक्षां जास्त उंच नाहींत. रिओन, इंगर, अरस, लायख्वा, अराग्वा, वगैरे नद्या मोठ्या असून महत्त्वाच्या आहेत. या पर्वतांत खनिजें पुष्कळ व मौल्यवान् आहेत. जॉर्जियन, अबासियन, लेसघियन, ओसेटे, सरकेशियन, तार्तर, आर्मेनियन, इ. वंशाचे व भाषांचे लोक आहेत. हा भाग फार प्राचीन व ऐतिहासिक महत्त्वाचा समजला जातो.

**कॉंक्रीट**—दगडाची खडी किंवा गोटे, वाळू व चुना किंवा सीमेंट यांचें प्रमाणशीर मिश्रण केलें असतां त्यांस कॉंक्रीट म्हणतात. याचा उपयोग इमारती, पुलाचे खांब, व भिंती यांचा पाया भरण्याकरितां ठोकळे करून, किंवा ठोकून उपयोग करतात. याचे गटाराचे दीड फुटापासून चार फूट व्यासाचे नळ करण्यांत येतात. रस्त्यावर फार वाहतूक असली तर याचा थर पसरण्यांत येतो; तसेंच याच्या भिंती, जमिनी व खांब आणि अलीकडे २,००० टनांपर्यंत वहनशक्ति असलेलीं गलबतें बांधण्याकरितां उपयोग करण्यांत येतो.

चुन्याचें कॉंक्रीट—यांत सहा भाग गोटे किंवा विटांचे रोडे, दोन भाग धुतलेली वाळू व एक भाग मळलेला चुना असें प्रमाण असतें. हें पहिल्यानें कोरडें मिसळण्यांत येऊन नंतर तें जमण्यापुरेसें पाणी घालून चांगलें ढवळण्यांत येतें. पाणी अधिक घालतां कामा नये.

सीमेंट कॉंक्रीट— अलीकडे चुन्याचें कॉंक्रीट मागें पडून सीमेंटचें कॉंक्रीट प्रचारांत आलें आहे. याची मजबुती अधिक असते. याचें मिश्रणहि वरील प्रमाणांतच करण्यांत येतें. दगडाचे तुकडे अथवा गोटे जसें काम असेल त्या मानानें अर्ध्या इंचापासून ३ इंचांपर्यंत जाडीचे असावे. वाळूचें प्रमाण या दगडांतील फटी किंवा पोकळी भरून निघण्यापर्यंत असावें व सीमेंटचें प्रमाण या दोहोंतल्या मिश्रणांतील पोकळी भरून काढण्यापुरतें असावें. पाणी स्वच्छ असावें व सर्व वाळू, वगैरे धुऊन घेतलेली असावी.

**कांक्रेज**—बनास नदीच्या दोन्ही तीरांवर सुमारें ३५ मैल पसरलेल्या या कांक्रेज संस्थानच्या मर्यादा उत्तरेस पालनपूर; पूर्वेस बडोदें संस्थानांतील जिल्हे; दक्षिणेस राधनपूर आणि पश्चिमेस तेरवाड व दिओदर अशा आहेत. क्षे. फ. ५०७ चौ. मै. असून लो. सं. सुमारें चाळीस हजार आहे. प्रदेश सपाट असून झाडी बरीच आहे. जमीन रेतीची व काळी असून पाणीहि मुबलक आहे. या संस्थानांतील २६ जहागिऱ्या बहुतेक रजपूत असलेल्या कोळी ठाकरडा लोकांच्या मालकीच्या आहेत. थर ही मोठी जहागीर असून तिची मालकी एका वाघेला कोळ्याकडे आहे. नानाजीनें अहमदशहाची नोकरी करून कांक्रेज व चुनवळ येथें स्थायिक वस्ती करण्यास बादशहास मदत केली. १८१९-२० पासून कांक्रेजचा ब्रिटिश सरकारशीं संबंध आला व तेव्हांच महीकांठा एजन्सी स्थापन झाली.

**कांकोली**—उदेपूर संस्थानांतील कांकोली जहागिरीचें मुख्य स्थान. येथील लोकसंख्या सु. पांच हजार आहे. हें वल्लभाचार्यांच्या वंशजांचें मुख्य स्थान आहे. यांस सुमारें २१ खेड्यांची जहागीर असून ती महाराण्यानें देणगी म्हणून दिलेली आहे. राजसमंद नांवाचा सुमारें तीन मैल लांब व दीड मैल रुंद तलाव येथें असून त्यावर संगमरवरी दगडाचा प्राकार आहे. तो सुमारें २०० यार्ड लांब व ७० यार्ड रुंद आहे. या प्राकाराच्या एका टोंकास द्वारकाधीशाचें देऊळ असून त्यांतील मूर्ति औरंगझेबाच्या भयानें वल्लभाचार्य येथें पळून आले तेव्हां त्यांनीं आपणाबरोबर आणलेली आहे असें म्हणतात. येथील एका टेंकडीवर एका जैन देवालयाचा मोडलेला भाग अजून शिल्लक आहे.

**कॉक्स, डेव्हिड** (१७८३–१८५९)—हा इंग्रज चित्रकार असून त्यानें बहुतेक इंग्लंडमधील सृष्टिविषयक देखाव्यांचीं चित्रें काढलीं आहेत; व त्या चित्रांना हल्लीं फार मान्यता आहे. कॉन्स्टेबल व इतर जे कांहीं पहिल्या प्रतीचे इंग्रज चित्रकार आहेत त्यांत याची गणना आहे. याचीं उत्तमोत्तम चित्रें बर्मिंगहॅम आर्ट गॅलरींत आहेत; शिवाय ब्रिटिश म्यूझियममध्यें त्याचीं कांहीं जलरंगी चित्रें आहेत. फार मोल्याचीं किंमतीचीं चित्रें म्हणजे क्लाइड दरी, शांति आणि युद्ध, बाजाराला जाणें, चॅडेल, इ. होत.

**कागद**—लेखनसाहित्यांत कागदाला प्रमुख स्थान दिलें पाहिजे. जगांत कागदाचा प्रथम उपयोग चीनमध्यें खि. पू. दुसऱ्या शतकांत झाला असें इतिहासावरून दिसतें. निरनिराळ्या झाडवनस्पतींपासून कागद तयार होतो. हातकागद व यंत्राचा कागद असे कागदाचे दोन प्रकार आहेत. यांत्रिक पद्धतीनें कागद तयार होत असला तरी यंत्राच्या साहाय्याशिवाय जुन्या कृतींनीं तयार होणाऱ्या कागदालाहि मागणी असते. एक महत्त्वाचा व फायदेशीर हस्तव्यवसाय म्हणूनहि हातकागदाला किंमत आहे. इंग्लंडमध्यें एकोणिसाव्या शतकांत मोठ्या प्रमाणावर कागद तयार करण्याला यंत्राचें साहाय्य मिळूं लागलें.

कागद तयार करण्यासाठीं चिंध्या, गवत, सुतळ्या, दोरे, कागदाची रद्दी, वगैरे 'टाकाऊ' समजला जाणारा माल गोळा करून, तो स्वच्छ धुऊन नंतर त्यांत कांहीं अल्कद्रव्यें टाकून उकळवितात. म्हणजे रांधा तयार होतो. बारीक तारेच्या जाळ्यांवर हा पातळ रांधा घेतात. म्हणजे पापुद्रा बनतो. तो रुळांमधून दाबून काढतात व सुकवितात. रंगीत कागद पाहिजे असल्यास रांध्यांत रंग मिसळतात. जलचिन्ह (वॉटर मार्क) उठवावयाचें असल्यास कागदांचा पापुद्रा ओला असतांना 'डन्डी' रुळानें तो उठवितात. टिपकागद (ब्लॉटिंग पेपर) व गाळणी कागद (फिल्टर पेपर) तयार करण्याची कृति अशीच. फक्त रांधा फार दाबून काढीत नाहींत व त्यास खळ लावीत नाहींत. एकावर एक ओले कागदाचे तक्ते ठेवून व ते घट्ट दाबून पुठ्याचा कागद (कार्डबोर्ड) तयार करतात.

हिंदुस्थानांत कागद साधारणपणें इ. स. च्या २ ऱ्या शतकापासून माहीत असावा. जुने कागदी पुरे तर प्रत्येक शहरांतून असत. जुन्नरी, दौलताबादी कागद फार प्रसिद्ध असत. कागद तयार करण्याचें पहिलें यंत्र श्रीरामपूर येथें डॉ. विल्यम कॅरे यानें उभें केलें. तथापि गेल्या शतकाच्या मध्यापर्यंत कागदाचा धंदा या दृष्टीनें हिंदुस्थानांत फारसें कांहीं नव्हतेंच. इ. स. १८६७ त कॅरेची गिरणी जवळच बॅली येथें हालविण्यांत येऊन रॉयल पेपर मिल नांवानें नवीन सुरू झाली. पुढें पंधरा वर्षांनंतर लखनौला आणि टिटाघरला दुसऱ्या गिरण्या निघाल्या व हळूहळू देशांत इतर ठिकाणींहि गिरणीचे कागद तयार होऊं लागले.

प्रथम कागदाला चांगला पांढरेपणा येत नसे. याला कारण चिंध्या आणि रद्दी यांपासूनच तो तयार करावा लागे. पुढें बांबू, मुंजगवत, सबई (Ischaemum Angustifolium) वगैरे देशी तंतुमय कच्च्या मालांची माहिती होऊन त्यांचा उपयोग होऊं लागला. १९२५ सालीं बांबू कागदाच्या धंद्याविषयींचा कायदा होऊन मोठ्या प्रमाणावर चांगला कागद निघण्याला उत्तेजन मिळालें. महायुद्धाच्या काळांत बाहेरून—स्वीडन–नॉर्वे, जर्मनी, जपान, अमेरिका, ग्रेट ब्रिटन, इ. देशांतून—कागद येण्याचें बंद झालें होतें तरी नवीन गिरण्या निघून व सरकारी सवलतींनीं हिंदुस्थान टिकाव धरूं शकला. वर्तमानपत्रांना लागणारा कागद (न्यूज प्रिंट) मात्र अद्यापि निघूं शकत नाहीं. प्रयत्न सुरू आहेत. १९४४ सालीं हिंदुस्थानांत सुमारें १८ गिरण्या असून अदमासें एक लाख टन कागद निघत असे. दहा वर्षांपूर्वी याच्या निम्म्यानेंहि निघत नव्हता. यांत न्यूज प्रिंट म्हणजे छापण्याचा कागद नाहीं; कारण तो येथें तयार होत नाहीं.

दर माणशीं कागदाचा खप—

| | | |
|---|---|---|
| स्वीडन–नॉर्वे | ९६१ | पौंड |
| सं. संस्थानें | २४१ | ,, |
| ब्रिटन | १५४ | ,, |
| जपान | ७७ | ,, |
| हिंदुस्थान | १·२ | ,, |

हिंदुस्थानांत दरवर्षी सर्व प्रकारचा कागद धरून २,१५,००० टन खपतो. पैकीं निम्मा देशांत तयार होतो.

**कागल**—मुंबई, दक्षिण महाराष्ट्र. या नांवाचीं दोन लहान संस्थानें आहेत. एक मोठी पाती व एक छोटी पाती. येथील जहागीरदार घाटगे आडनांवाचे मराठे आहेत. ही जहागीर

कोल्हापूर संस्थानची मांडलिक आहे. ही जहागीर दुधगंगा नदीच्या खोऱ्यांत वसलेली असल्यानें व जमीन सुपीक असल्यानें चांगल्या उत्पन्नाची आहे. लो. सं. मोठ्या पातीची सु. पन्नास हजार व छोट्या पातीची आठ हजार असून दोहोंतील गांवांची संख्या अनुक्रमें ४१ व ६ आहे. सर्जेराव घाटगे हा दौलतराव शिंद्याचा सासरा कागलचा जहागीरदार होता. कोल्हापूरचे माजी छत्रपति शाहूमहाराज हे या कागल घराण्यांतीलच असून दत्तक गेले होते. स. १७७५ नंतर ५० वर्षांत कोल्हापूरकरांनीं कागलवर स्वाऱ्या करून कित्येक वेळां हा गांव जाळला होता. येथें एक इंग्रजी शाळा, मुलांमुलींच्या मराठी शाळा व एक दवाखानाहि आहे. जुन्या मशिदींचे व देवळांचे कांहीं अवशेष येथें आहेत. जयसिंगराव घाटग्यांनीं १ लाख रुपये किंमतीचा नवीन वाडा बांधला आहे.

**कांगारू**—हे सस्तनवर्गाचे प्राणी असून ऑस्ट्रेलियामध्यें आढळतात. यांच्या पोटाला एक पिशवी असते. तींत यांचे

बच्चे बसतात. यांचें डोकें लहान असून हरणासारखें असतें व कान मोठे असतात. यांचे पुढील पाय आंखूड असून त्यास पांच बोटें असतात. परंतु मागील पाय बरेच मोठे असून फार बळकट असतात व त्यांस चार बोटें असतात. यांची शेपटी लांब असून ती जमिनीस टेकून तीवर हे बसूं शकतात. तसेंच उडी मारण्याच्या वेळीं ते शेपटीचा आधार घेतात. यांचीं पिलें सामान्यतः आठ महिनेपर्यंत यांना पोटांत असलेल्या पिशवींत बाळगावीं लागतात. हे वनस्पत्याहारी आहेत. यांच्यापैकीं कांहीं जाती फार मोठ्या असून कांहींचा रंग तांबडा असतो. न्यू गिनी व उत्तर ऑस्ट्रेलिया यांमधील कांहीं कांगारूंच्या जाती झाडावर राहतात.

कांगारू जातीचे प्राणी—(मार्सुपिआलिआ) हा एक सस्तन प्राण्यांचा फार मोठा वर्ग असून या प्राण्यांच्या पोटाशीं एक पिशवी असते व तींत स्तन असून त्या पिशवींत त्यांचें पिल्लूं बसून दूध पिऊं शकतें. हीं पिलें जन्मतः अर्धवट स्थितींत असतात. या वर्गापैकीं ओपोसम आणि ओपोसुम्राट या दोन जातींचे प्राणी अमेरिकेंत आढळतात. परंतु बाकी सर्व जाती ऑस्ट्रेलियामध्यें आढळतात. यांचे मांसाहारी आणि वनस्पत्याहारी असे दोन मुख्य पोटवर्ग आहेत.

**कांगो**—ही आफ्रिकेंत सर्वांत मोठी नदी असून जगांत ॲमेझॉनशिवाय दुसरी हिच्यापेक्षां मोठी नदी नाहीं. हिची लांबी ३,००० मैल व दोन्ही बाजूंनीं हिचें खोरें २,८०० मैल रुंद आहे. ही उत्तरेकडून पश्चिमेकडे वाहत जाते. हिच्यांत नावा चालूं शकतात. इतकेंच नव्हे तर हिच्या उपनद्यांत सुद्धां नावा चालूं शकतात. कांगो नदींत एकंदर ४०० बेटें असून यांतील कांहीं बरींच मोठीं आहेत.

**कांगो, बेल्जिअन**—(जुनें कांगो फ्री स्टेट). कांगो नदीचें पात्र व्यापून असलेल्या भूमध्य रेषेवरील आफ्रिकेंतल्या एका संस्थानाचें हें नांव आहे. क्षे. फ. ९,०२,०८२ चौरस मैल. हें संस्थान इ. स. १९०८ मध्यें बेल्जमला जोडण्यांत आलें. बेल्जम कांगो प्रदेशाचा विशेष तेथील घनदाट झाडी हा होय. या जंगलाचें क्षे. फ. २५,००० चौ. मैल असून त्यांत टेंबूरणी, महोगनी, साग, इत्यादिकांचीं झाडें विपुल आहेत. लो. सं. सुमारें एक कोटी आहे. यांपैकीं छत्तीस हजार युरोपियन आहेत. लोक बांटू–निग्रो वंशाचे आहेत. यांच्यांत कांगो, बा-सुंडी, बा-लुबा या मुख्य पोटजाती आहेत. बा-लुबा ही जात हस्तिदंताची व निरनिराळ्या धातूंचीं कामें करण्यांत फार कुशल आहे. हे लोक गुलाम बाळगणें अनीतीचें समजतात. प्रत्येक जात ही आपल्यापुरती स्वतंत्र आहे. येथें सोनें व लोखंड यांच्या पुष्कळ खाणी आहेत. जस्त, गंधक, पारा ह्या वस्तू पुष्कळ सांपडतात. सरकारनें शेतकी आणि औद्योगिक शिक्षणाच्या कांहीं संस्था येथें स्थापलेल्या आहेत. तद्देशीय सर्व लोकांत बहुपत्नीकत्वाची चाल आहे.

**कांगोरी किल्ला**—हा किल्ला रायगडच्या घेऱ्यांतील एक आहे. याला 'मंगळगड' असेंहि नांव आहे. हा किल्ला शिवाजीनें १६५६ च्या सुमारास घेतला. या किल्ल्यावरून रायगड, प्रतापगड, राजगड व तोरणा हे किल्ले दिसतात. किल्ल्यावर कांहीं टांकीं व देवालयें आहेत.

**काग्निआर्ड** (१७७७–१८५९)—एक फ्रेंच एंजिनिअर आणि पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. विविधकला–शाळेंतील याचें शिक्षण पुरें झाल्यानंतर याला भौगोलिक शिल्पी करण्यांत आलें. त्यानें बुडबुड्याचें यंत्र, व इ. स. १८१९ मध्यें ध्वनिशास्त्रोपयोगी यंत्र शोधून काढलें. याच्या साहाय्यानें कोणत्याहि सुराचीं किती कंपनें होतात हें काढतां येतें. पाण्यास ३६२° सेंटीग्रेडपेक्षां

जास्त उष्णता लावली तर (कितीहि दाब असला तरी) ह्या पाण्यास वायुरूप प्राप्त होतें, हा शोध त्यानें लावला. किण्वांचे (यीस्ट) नैसर्गिक गुणधर्म व त्यांत असणाऱ्या सूक्ष्म जंतूंवर अतिशीततेपासून होणारे परिणाम यांविषयींची माहिती त्यानें दिली.

**कांग्रा**—(कांगडा). पूर्व पंजाब, जालंदर भागाचा ईशान्येकडील जिल्हा. क्षे. फ. ९,९७८ चौ. मै.. याचा बहुतेक भाग हिमालय पर्वतांत आहे. येथील वनश्री फारच सुंदर आहे. वाघ, चित्ते, अस्वलें, लांडगे, इत्यादि वन्य प्राणी सांपडतात. कांग्रा खोऱ्यांत भाताची लागवड सररहा होत असल्यामुळें जमीन पाणथळ झाली आहे. पावसाची सरासरी ७० इंच आहे. १९०५ सालीं या भागांत धरणीकंप होऊन सुमारें २०,००० माणसें मेलीं. कांग्राचा किल्ला पूर्वीपासूनच फार महत्त्वाचा होता. नरपूर, सिबा, गोलेर, बगाहळ आणि कांग्रा हीं लहान राज्यें कांग्रा खोऱ्यांत आहेत. गझनीच्या महंमदानें हिंदू राजाचा पराभव करून कांग्राचा किल्ला हस्तगत करून घेतला. १३६० सालीं येथील देऊळ मुसलमानांनीं लुटलें व मूर्ति मक्केस नेण्यांत आली. १५५६ सालीं अकबरानें या भागावर स्वतः स्वारी केली; तेव्हांपासून कांग्राचा किल्ला मोंगलांच्या ताब्यांत कायमचा गेला. तेथील अतिशय सुपीक भाग त्यांनीं व्यापला. या जिल्ह्यांत एकंदर ३ शहरें व ७१५ खेडीं असून लो. सं. ८,९९,३७७ आहे. लोकसंख्येंत हिंदूंचें प्रमाण मुसलमानांपेक्षां जास्त आहे. गहूं, मका, सातू, तांदूळ, द्विदल धान्यें, कापूस, चहा, बटाटे हीं पिकें येथें होतात. सपाटीवरील होशियारपूर, जालंदर, अमृतसर आणि पठाणकोट हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत.

कांग्रा तहशिलीचें एकंदर क्षे.फ. ४२९ चौ. मै. असून लो. सं. सु. पंधरा हजार आहे. दोन शहरें व १३४ खेडीं आहेत. शहर— कांग्रा तहशिलीचें मुख्य ठिकाण. लो. सं. सु. सात हजार. याचा प्राचीन इतिहास बराच सांपडतो; १००९ मध्यें गझनीच्या महंमदानें येथील देऊळ लुटून अपार संपत्ति परदेशीं नेली. मोंगल लोकांनीं येथें कायमचें ठाणें बसविलें. येथें एक मिशनरी लोकांची शाळा व सरकारी रुग्णालय आहे.

**कॉंग्रीव्ह, विल्यम** (१६७०–१७२९)—एक इंग्रज नाटककार. यानें एकविसाव्या वर्षी 'इन्कॉग्निटा' ही कादंबरी टोपण नांवानें प्रसिद्ध केली व नंतर 'दि ओल्ड बॅचलर' हें सुखान्त नाटक प्रसिद्ध केलें; नंतर 'दि डबल-डीलर' व 'लव्ह फॉर लव्ह' हीं दोन सुखान्त नाटकें व 'दि मोर्निंग ब्राइड' हें दुःखान्त नाटक (१६९७) प्रसिद्ध केलें. त्यांपैकीं शेवटचीं दोन लोकप्रिय झालीं. १७०० मध्यें त्याचें 'वे ऑफ दि वर्ल्ड' हें नाटक पडलें, तेव्हां त्यानें नाटकें लिहिण्याचें बंद केलें; व पुढें कांहीं कविता लिहिल्या. सुखान्त नाटकें लिहिण्यांत हा इंग्रज नाटककार सर्वश्रेष्ठ आहे असें पुष्कळ तज्ज्ञ टीकाकारांचें मत आहे. मोलियरच्या तोडीचीं याचीं 'दि वे ऑफ दि वर्ल्ड' सारखीं नाटकें आहेत.

**कॉंग्रेगेशनॅलिस्ट**—(स्वतंत्र ख्रिस्ती धर्मानुयायी). ख्रिस्ती धर्मांतील हा एक पंथ आहे. मूळ ख्रिस्ती धर्मशास्त्राप्रमाणें वागण्याच्या विचारानें हा फुटून निघाला (१५५०). यांचे स्वतःचे उपाध्याय असतात. यांचा इंग्लंडांत १७ व्या शतकांत जेव्हां छळ होऊं लागला तेव्हां यांपैकीं कांहीं नेदर्लंड व उत्तर अमेरिका येथें गेले. १९ व्या शतकांत यांची संघटना होऊन यांना मान्यता मिळूं लागली. ग्रेट ब्रिटनमध्यें यांचीं ५,००० वर देवस्थानें असून लोकसंख्या पांच लाखांवर आहे.

**काच**—हा हिंदुस्थानांतील सम्राट् गुप्तांच्या घराण्याचा मूळ पुरुष. इसवी सनाच्या तिसऱ्या शतकांत उत्तर हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा प्रसार जोरांत झाला आणि वैदिक धर्म मागें पडला, अशा वेळीं वैदिक धर्माच्या रक्षणासाठीं या पराक्रमी पुरुषानें कंबर बांधली. आपल्याकडील शिवाजीप्रमाणेच डोंगरी लोकांच्या साहाय्यानें यानें मगध देश पादाक्रांत करून बौद्ध धर्माविरुद्ध मोहीम सुरू केली. आपल्या नांवाचीं नाणीं पाडून 'सर्वराजोच्छेदा' असें बिरुद यानें धारण केलें.

**कॉच, रॉबर्ट** (१८४३–१९१०)—एक जर्मन जंतुशास्त्रज्ञ. काळपुळी व क्षय या रोगांचे जंतू यानें सिद्ध करून त्यांवर इंजेक्शनचे उपायहि काढले. १९०५ सालीं याला नोबेल पारितोषिक देण्यांत आलें. याचीं कॉलरा, मलेरिया, इ. वर पुस्तकें आहेत.

**कांच**— हा बहुधा पारदर्शक असा अस्फटिक पदार्थ असून याच्या पृष्ठभागावर परावर्तन आणि वक्रीभवन क्रिया होतात. निसर्गांत हा पदार्थ जशाचा तसा सांपडत नसून वाळू आणि धातव प्राणिदें (मेटॅलिक ऑक्साइड) यांच्या एकत्र द्रावणापासून हा तयार होतो. घटकद्रव्यांच्या आवश्यक त्या संयोगापासून कांचेचे निराळे पारदर्शक व अर्धपारदर्शक प्रकार होतात. पुष्कळशी कांच दारांखिडक्यांना लागते. चष्म्यांच्या कांचा विकिरण आणि वक्रीभवनशक्ति असलेल्या अत्यंत पारदर्शक स्वरूपाच्या पाहिजे असतात. अम्ल पदार्थांच्या योगानें विद्रावक आणि दाहक क्रिया ज्या होतात त्यांना कांचेच्या मांड्यांत प्रतिबंध होत असतो. यामुळें बाटल्या, बरण्या, नळ्या, इ. रासायनिक उपकरणीं कांचेचीं करतात. उपयोगांवरून कांचेचे निरनिराळे वर्ग पडतात: (१) तावदानी कांच— ही यंत्रानें फुंकून सपाट केली जाते व बरीच ओढून आरशाची जाड कांच होते. याला पन्हळ पाडतात व वर आकृतीहि काढतात. (२) बाटली कांच—

यांत हातांनीं व यंत्रांनीं केलेल्या बाटल्या येतात. (३) दाबलेली कांच. (४) फुंकून केलेली कांच--यांत रासायनिक आणि उष्णतारोधक कांचेचा माल येतो. सांचांत किंवा तशीच फुंकलेली कांच; ओढून केलेल्या नळ्या, इ. (५) भिंगाची कांच--याचे अनेक प्रकार आहेत.

कांचेतील प्रधान द्रव्य म्हणजे वाळू. ही १२००° ते १४००° सेंटि. उष्णमान असणाऱ्या भट्टींत निरनिराळ्या इतर द्रव्यांबरोबर द्रवण करून पाहिजे ती कांच काढतात. धातूंच्या किंवा धातव प्राणिदांच्या संयोगानें विविध रंग उत्पन्न करतां येतात (कोबाल्ट-पासून गडद निळा, क्रोमियमपासून हिरवा, इ.). कांचद्रव्याचा रस पोकळ नळीच्या एका तोंडाशीं घेऊन दुसऱ्या तोंडानें फुंकतात; व पाहिजे तेवढा फुगा झाला कीं तो सांचांत घालून विशिष्ट आकार देतात. फ्लुवाम्लाच्या (हायड्रोफ्लुओरिक ॲसिड) योगें कांचेवर विविध लेखन किंवा खोदन करतात.

कांच ही उष्णताविरोधी आहे. कांच तापवून तिचे वाटेल ते पदार्थ, वस्तू करतां येतात. कांचेचीं सुतें काढून कपडेहि विणतात.

कांच फार प्राचीन काळापासून तयार करतां येत होती. ईजितमध्यें तीनचार हजार वर्षांपूर्वींहि माहीत होती.

हिंदुस्थानांतील कांचेचा उल्लेख प्लिनी करतो. कांचेच्या बांगड्या व मणी करण्याचे कारखाने १६ व्या शतकांत होते.

ख्रिस्ती शकाच्यापूर्वी ८०० वर्षे मागें हिंदुस्थान देशांत कांच-कला होती. यजुर्वेद, महाभारत, युक्तिकल्पतरु, वगैरे ग्रंथांत कांचेसंबंधीं उल्लेख आलेले आहेत. बौद्धस्तूपांतून स्फटिकाचीं अस्थिपात्रें सांपडलीं आहेत त्यांवरून आपले लोक पुरातन काळीं कांच स्फटिकापासून करीत असत असें अनुमान निघतें. कांच करण्याची युक्ति प्रथमतः फिनिशियन लोकांनीं काढली. ईजित देशांत फार प्राचीन काळीं कांचेचे मणी, वगैरे जिन्नस फार उत्तम दर्जाचे तयार होत.

फ्रान्स, रोम, कान्स्टान्टिनोपल, व्हेनिस, इंग्लंड, जर्मनी, बेल्जियम या ठिकाणीं कांचेचे जिन्नस बनविण्याचे कारखाने सुरू झाले. इ. स. १२९५ च्या सुमारास व्हेनेशियन प्रवासी मार्कोपोलो हा तार्तरी, चीन, हिंदुस्थान, वगैरे देशांत प्रवास करून आपल्या देशीं परत गेला व खोटीं रत्नें, कांचेचे मणी वगैरे जिन्नस तिकडे खपतील असें त्यानें कळविल्यावर व्हेनेशियन लोकांनीं ते तयार करून धाडून फार संपत्ति मिळविली. १६६५ मध्यें मि. कोलबर्ट या फ्रेंच गृहस्थानें आपल्याबरोबर २० व्हेनेशियन कांचकोविद पॅरिस शहरीं नेऊन कांचेचे जिन्नस बनवण्याचें, परावर्तक कांच करण्याचें, व कांचेस जिल्हई देण्याचें काम सुरू केलें. बेल्जियम कारागिरांनीं अर्धस्फटिक कांचेंत बरेंच नैपुण्य मिळविलें. इंग्लंड देशांत एलिझाबेथच्या अमदानींत प्रथम कांचेचे कारखाने सुरू झाले. १८५५ त पॅरिस येथें भरलेल्या प्रदर्शनांत बार्मिंगहॅम येथील कारागिरांनीं २९ फूट व्यासाचे लेन्स ठेवले होते.

हिंदुस्थानांत जुन्या पद्धतीचे कारखाने कपडवंज, नाशिराबाद, चिंचणी, तारापूर, फिरोझाबाद, वगैरे ठिकाणीं असून तेथें बांगड्या, बाटल्या, अत्तराचे फुगे, कागद दडपणीं, खेळण्याच्या गोट्या, वगैरे जिन्नस तयार होतात. आधुनिक सुधारलेल्या पद्धतीचा पहिला कांचेचा कारखाना पंजाबांत झेलम येथें १८७०. सालीं निघाला. नंतर अलिगड, बंगाल्यांत भागलपूर, टिटाघर, सोदेपूर, सितारामपूर आणिकलकत्ता; मुंबई इलाख्यांत हैद्राबाद-सिंध, तळेगांव दाभाडे, माटुंगा, बडोदें, शिवरी व ओगलेवाडी; मद्रास इलाख्यांत एनूर व मद्रास, इत्यादि ठिकाणीं सुमारें २५-३० कारखाने निघाले, पण त्यांपैकीं बरेच पुढें बंद पडले. बंद पडण्याचीं कारणें कांचकोविद नालायक, माल हलक्या प्रतीचा, भट्टी बांधण्यांत चुका, कारागिरांची फंदफितुरी, अवाढव्य खर्च, अव्यवस्था, अपुरें भांडवल, कुशल कारागिरांचा अभाव, राजाश्रयाचा अभाव, रेल्वे कंपन्यांचें प्रतिकूलत्व, इत्यादि आहेत.

पैसाफंड कांचशाळा हा कारखाना पुणें जिल्ह्यांत तळेगांव दाभाडे येथें १९०८ सालीं ३७,५०० रुपये भांडवलावर सुरू झाला. पैसाफंडांतून औद्योगिक शिक्षण देऊन कांचेचे कारखाने हिंदुस्थानांत अनेक निघावे हा या संस्थेचा हेतु होता व त्याप्रमाणें या ठिकाणीं शिकून गेलेल्या कांहीं तज्ज्ञांनीं कांच-कारखाने सुरू केलेले आहेत; त्यांपैकीं ओगले ग्लास वर्क्स हा एक आहे. मुंबईच्या विजय ग्लास वर्क्सचे चालक प्रथम कित्येक वर्षे तळेगांव पैसाफंडाच्या कारखान्यांतच होते.

१९४४ सालीं हिंदुस्थानांत १७४ कांच कारखाने असून देशांत लागणाऱ्या मालपैकीं ८० टक्के पुरवठा यांतून होतो. शास्त्रीय व यांत्रिक उपकरणींहि चांगलीं होऊं लागलीं आहेत.

**कांचकागद**— (पॉलिश पेपर). कारखान्यांतील यंत्रावर चढलेला गंज काढून टाकण्याकरितां निरनिराळ्या प्रकारचे सफाई करण्याचे कागद किंवा कपडा उपयोगांत आणावा लागतो. या कागदास किंवा कपड्यांस कांचकागद, वाळूचा कागद, कुरुंदाचा कागद अशीं नांवें आहेत. पितळ अगर इतर धातूंचें सामान यांजवर तजेला येण्यासाठीं, चांदी-सोन्याच्या भांड्यांना जिल्हई येण्याकरितां हेच कागद वापरतात. या धंद्यास भांडवलहि फार लागत नाहीं. सारख्या आकाराचे कागद किंवा कापडाचे तुकडे कापून त्यांवर सरसाचा पातळ हात ब्रशानें सारखा द्यावा. नंतर या कागदावर कांचेची भुकटी किंवा वाळू पसरावी; वाळू किंवा कांच कागदावर चिकटल्यावर राहिलेली वाळू किंवा कांच झाडून

टाकावी. नंतर हे कागद गरम झालेल्या फरसबंदीवर अगर तापलेल्या लोखंडी पत्र्यावर ठेवून वाळवावे. या रीतीनें कांचकागद करतात.

**कांच स्पंज**—नैसर्गिक स्पंज कितीहि मृदु असला तरी अंगाला खरचटतोच. आतां एक प्रकारचा नवा स्पंज तयार करण्यांत आला आहे. त्यांत संपूर्णपणें कांचतंतू वापरलेले आहेत. यांत पाणीहि अधिक शोषून धरण्यांत येतें. नैसर्गिक स्पंजांत जीवांश असल्यानें तो पुष्कळदां आरोग्याला बाधक ठरतो. कांचेचा स्पंज पूर्णपणें शुद्ध, स्वच्छ, जन्तुरहित व मृदु असतो.

**कांचन**—हा वृक्ष बराच मोठा होतो. हा बहुतेक आपट्या-प्रमाणेंच दिसतो. याचीं पानें आपट्याच्या पानासारखीं परंतु त्या पानांहून मोठीं व पातळ असतात. कांचनाच्या पांढरा, पिवळा व तांबडा अशा तीन जाती आहेत. याच्या लांकडाचा रंग तांबूस असतो. हें लांकूड रंगाच्या कामीं उपयोगी पडतें. हें फार चिवट असतें व यामुळें त्याच्या काठ्या करतात. गंडमाळेवर कांचन औषधी आहे.

**कांचनगंगा**—जगांतील सर्वांत मोठें दुसरें पर्वतशिखर. हें हिमालय पर्वताच्या पूर्वेकडील भागाचें शिखर असून, सिक्कीम आणि नेपाळ या दोन संस्थानांच्या हद्दीवर आहे. दार्जिलिंग स्टेशनावरुन या पर्वताचा पायथ्यापासून तों नेहमीं बर्फाच्छादित असलेल्या शिखरापर्यंतचा सर्व भाग पाहावयास मिळतो. कांचनगंगा पर्वताचें शिखर २८,१४६ फूट उंच आहे. कांचनगंगा हें तिबेटी नांव आहे व त्याचा अर्थ 'बर्फाच्या प्रचंड राशींचे पांच समूह' असा आहे.

**कांचना किल्ला**—मुंबई, नाशिक जिल्हा. चांदोरच्या वायव्येस १० मैलांवर व कोळधैरच्या पश्चिमेस दोन मैलांवर हा किल्ला आहे. हा डोंगर कोळधैरपेक्षां जास्त उभा आहे. याला उत्तरेच्या बाजूकडे रस्ता असून तेथून गंगाथडीच्या बाजूनें चिकट चढण आहे. यावर तट असून त्यास दोन दरवाजे आहेत. वरती पाणी विपुल असून खडकांत खोदलेलीं पुष्कळ तळघरें आहेत. तेथें पेशव्यांची शिबंदी असे. हा किल्ला इंग्रजांना त्र्यंबकेश्वरा-बरोबर मिळालेल्या सतरा किल्ल्यांतील एक होय.

**कांचनारगुग्गुळ**—एक आयुर्वेदीय औषध. कांचनाराची साल, त्रिफळा, त्रिकटु, वेलदोडे, दालचिनी, तमालपत्र हीं यांतील मुख्य औषधें आहेत. या गुग्गुळाचा मुख्य उपयोग गंडमाळेमध्यें होतो. अंगावर व्रण असणें, त्यांतून पू वाहणें, कुष्ठाचे कांहीं प्रकार, गुल्म म्हणजे पोटांत गोळा होणें, जीर्ण भगंदर; इ. रोगांवर हें औषध चांगलें लागू पडतें. १ ते २ गोळ्या गरम पाणी किंवा कांचनाराचे सालीचा काढा यांत घेतात.

**कांचनीन**—(क्वावसीन). हा एक उपक्षार असून दगडी कोळशाच्या डांबराचें दोनदां ऊर्ध्वपातन केल्यानंतर हा त्यांत आढळून येतो. अंबराच्या निर्जलपातनानंतर त्यांत याचा थोडा अंश दिसून येतो. याचे चपटे अष्टपैलू स्फटिक होतात; त्यांचा रंग जांभळा असतो. अशुद्ध कांचनीन सोन्यासारखें पिवळें असतें म्हणून हें नांव दिलें आहे.

**कांचमिना**—(एनॅमेल). धातू, भांडीं, इ. वर जो तकतकीत मुलामा देतात, किंवा लांकूड, धातू आणि कातडें यांवर जो लाखी किंवा रोगण रंग देतात त्याला नांव आहे. ही कला ईजिप्त, ग्रीस, रोम, बायझान्टाइन व इतर मध्ययुगीन राष्ट्रें यांना चांगली माहीत होती, इतकेंच नव्हे तर ह्यांत त्यांनीं नैपुण्य मिळविलें होतें. हिंदुस्थानांतील कांहीं जुन्या इमारतींवर कांच-मिन्याचे रंग आहेत. प्रथम कांचमिन्याचें काम अपारदर्शक असे; पण १३ व्या शतकांत इटलींतील सोनारांनीं पारदर्शक एनॅमेलला महत्त्व दिलें. प्रथम जिनसावर कांचेसारखा पदार्थ फांसून तो जिन्नस भट्टींत तापवितात; म्हणजे कांचमिन्याची क्रिया झाली. बायसिकल एनॅमेलची कृति म्हणजे तेलामध्यें डामर, किंवा राळ मिसळून लावावयाची व प्रत्येक थरानंतर उष्णता द्यावयाची. धातव प्राणिदांशीं (मेटॅलिक ऑक्साइड) डामर, रोगण, वगैरे मिसळून एनॅमेलचा रंग तयार करतात. कातड्याला एक विशिष्ट रोगण लावून 'पेटंट' कातडें बनवितात.

**काचार**—आसाममधील एक जिल्हा. काचारी लोक येथें राहतात म्हणून ह्यास हें नांव मिळालें. क्षे. फ. ३,८६२ चौरस मैल. लो. सं. ६,४१,१८१. उत्तरेस कापिली व दोई आंग ह्या नद्या आहेत. यांत चांबूचीं झाडें पुष्कळ आहेत. चहाचे मळे व तेथेंच मळेवाल्यांच्या राहण्याच्या जागा दृष्टीस पडतात. जंगली भागांत हत्ती, वाघ, हरिणें व इतर वन्य पशू सांपडतात. वार्षिक पाऊस १०० ते १६५ इंच आहे. दिमापूर, मैबंग, खासपूर ह्या राजधान्या होत्या. १७९० सालीं येथील राजघराणें हिंदु धर्मीय झालें. १८५४ त ब्रिटिश सरकारनें हा प्रदेश पूर्णपणें आपल्या ताब्यांत घेतला. येथें ३०,००० हिंदु धर्माचे मणिपुरी लोक आहेत. शें. ८५ लोक शेतकीवर उपजीविका करतात. तांदूळ, ऊंस, कडधान्यें, चहा हीं पिकें होतात. उत्तर काचार भागांत व इतर भागांत इमारती लांकूड व थोड्या प्रमाणावर रबर तयार होतें. बदरर व मासीमपूर येथें मातीच्या तेलाचे झरे आहेत.

उत्तर काचारचें क्षे. फ. १,७०६ चौरस मैल आहे. सर्व प्रदेश टेंगराळ असून जंगल विपुल असल्यामुळें लो. सं. फारच कमी आहे. याचें मुख्य ठिकाण हाफ्लांग येथें आहे. ह्यांत एकंदर २५४ खेडीं आहेत. हाफ्लांग येथें ७७ इंच पाऊस पडतो.

**काचिन**—तिबेटो-ब्रह्मी रक्तापासून झालेली ब्रह्मदेशांतील एक जात. बहुतेक लोक बौद्ध धर्मीय आहेत. या जातींत पांच पोटजाती असून सुमारें १०० घराणीं आहेत. एकाच घराण्यांत आपसांत लग्नव्यवहार होत नाहीं. मृतांस पुरण्यांत येतें. यांचा भुतांखेतांवर विश्वास आहे. यांची चेहरेपट्टी बहुतेक मंगोली वळणावर आहे व हे थेडे ठेंगणे आहेत. हे लोक ब्रह्मी भाषेची एक पोटभाषा बोलतात. लो. सं. सुमारें दोन लाख आहे.

**काची**—काछी, काचिया. ही एक शेतकरी जात असून यांची सर्वांत मोठी वस्ती उत्तर हिंदुस्थानांत आहे. १९११ सालीं १३,०४,२९६ काची लोकांपैकीं संयुक्तप्रांतांत ७,२८,८००, मध्यहिंदुस्थानांत २,७२,४९६ व राजपुतान्यांत ६०,६६६ होते. मध्यप्रांतांत लाख दीड लाख लोक आहेत. बहुतेक काची हिंदु धर्मीय आहेत. फळें, ऊंस, अफू हीं पिकें हे लोक काढतात. ही जात विशेषेंकरून शाक्तपंथाची दिसते. दुर्गादेवी व शीतळादेवी या उपासनेच्या देवता व धरित्रीमाता व तिचा पति भूमिया या यांच्या ग्रामदेवता होत.

मध्यप्रांत व वऱ्हाड भागांत हे लोक भाज्या, फळें पिकविणें हे धंदे करतात. हरदिया काछी, आलिया काछी, फूलिया काछी, जीरीया काछी, मुराई काछी हीं नांवें हळद, आलें, फुलें, जिरें व मुळें यांच्या लागवडीवरून मिळालीं असावीं.

मुंबई इलाख्यांत, गुजरातेंतील सर्व जिल्ह्यांत व संस्थानांत हे लोक आहेत. अहमदाबादी लोकांचा दर्जा सर्वांत श्रेष्ठ असून इतर भागांतील लोक फक्त त्यांच्याच हातचें खातात. अंधारिया व खत्री लोकांखेरीज इतर काची हिंदु धर्माचे आहेत. भडोच जिल्ह्यांत एक मध्यवर्ती पंचायत आहे. अहमदाबाद शहरांत काची लोकांची एक पंचायत आहे.

**काजवा**—या किड्यांपासून उजेड निघतो. हे उष्ण प्रदेशांत आढळतात. दक्षिण अमेरिका व पश्चिम हिंदी बेटें यांतील या जातीचे किडे फार लखलखीत असतात. नरापेक्षां मादीमध्यें चमकण्याचा गुण जास्त असतो. काजव्यांतील प्रकाश देणारा भाग बाहेर काढला तरी तो बराच वेळ प्रकाश देत राहतो.

**काजळी रोग**—हा एक पिकावर होणारा रोग आहे. ह्या रोगाच्या योगानें कणसाच्या ठिकाणीं दाण्यांच्याऐवजीं काजळी-सारखी काळी पूड तयार होते. हा एका परोपजीवी वनस्पतीच्या जाती( स्टिलॅगो )पासून उत्पन्न होतो. बीं पेरावयाच्या आधीं तें मोर्चुदाच्या पाण्यांत भिजविलें किंवा कढत पाण्यांत भिजवून नंतर पेरलें तर हा रोग होत नाहीं.

**कांजिण्या**—हा बहुतकरून लहान मुलांना येणारा असा ज्वर असून त्याचें मुख्य लक्षण म्हणजे अंगावर येणाऱ्या पुळ्या. दोन ते सहा वर्षें वयाच्या मुलांना हा ताप बहुतकरून येतो. छाती, पोट, पाठ या ठिकाणीं लाल पुळ्या उमटतात. १२ ते २४ तासांत त्या चांगल्या फुगून त्यांत पाण्यासारखी लस जमते. चौथ्या दिवसानंतर हे फोड सुकावयास लागून वर खपली धरते. गालफडाच्या आंत टाळ्यासहि फोड येतात. तापाचें मान १०२° च्यावर बहुधा जात नाहीं. यावर उपचार म्हणजे खाण्यापिण्यास हलके पदार्थ द्यावेत. रोग्यास पुळ्या खाजवूं देऊं नये. या तापाचें व पुळ्यांचें देवीच्या पुळ्यांशीं बरेंच साहश्य असतें. कांजिण्याचे फोड छाती, पोट, हात व पाय यांवर असतात. यांची पूर्णावस्था १२ ते २४ तासांत होते. देवीच्या पुळीस खळगा पडतो व ती पुळी बारीकशा ज्वालामुखीसारखी दिसते. कांजिण्याची पुळी फुटून तिला खळगा पडत नाहीं.

**कांजीवरम्**—हा मद्रास इलाख्याच्या चिंगलपट जिल्ह्यांतील पश्चिमेकडील एक तालुका असून याचें क्षे. फ. ४१२ चौ. मैल आहे. लो. सं. सु. अडीच लाख. कांजीवरम् व श्रीपेरुंबुदुर हीं दोन शहरें व ३६४ खेडीं आहेत. पालार नदीच्या तीरावर चिंच, नारळ व खजूर यांचीं झाडें आहेत.

शहराची लो. सं. ( १९४१ ) ७४,६३५. मोक्षदायक सात पुऱ्यांपैकीं ही एक आहे. पूर्वींचें नांव कांचीपुरम् होतें. पूर्वीं ही पल्लवांची राजधानी होती. विद्येसाठीं काशीप्रमाणें हें शहरहि दोन हजार वर्षांपासून प्रसिद्ध आहे. बौद्ध व जैन देवळांप्रमाणें शैव व वैष्णव देवळेंहि येथें बरींच आहेत. शिवकांची, विष्णु-कांची व *पिल्लयर पालियम्* असे या शहराचे तीन धार्मिक विभाग पडले आहेत. येथें एक हजारावर देवळें आहेत. १६७७ त हें शहर मराठ्यांनीं घेतलें. हा जिल्हा १७५९ त कर्नाटकाच्या नबाबानें ई. इं. कंपनीस दिला. मुसलमानांनीं येथें मोठमोठ्या मशिदीहि बांधल्या आहेत. येथील एकांबरेश्वराचें देऊळ साऱ्या हिंदुस्थानांत मोठें आहे. शिवकांचींत सात वारांचीं सात मोठीं व पवित्र तळीं आहेत. विशिष्टाद्वैत मताची एक मोठी पाठशाळा येथें असून इतर संस्कृत शाळा व इंग्रजी हायस्कुलेंहि आहेत. सुती व रेशमी कापड, दागिने व तांब्यापितळेचीं भांडीं तयार होतात.

**काजुपुट तेल**—हिंदी द्वीपसमूहांत आढळणाऱ्या काजुपुट नांवाच्या झाडाच्या पानांपासून ऊर्ध्वपातनानें काढलेलें तेल. याचा रंग फिकट निळसर हिरवा असतो. तें युकॅलिप्टस तेलासारखें दिसतें. संधिवातावर हें लावण्यांत येतें व जुनाट संधिवात असल्यास पोटांतहि देतात.

**काजू**—काजूचीं झाडें मूळचीं दक्षिण अमेरिकेंतील आहेत; परंतु अलीकडे हिंदुस्थानच्या किनाऱ्याच्या जंगलांतून व चितगांव, तेनासरीम, अंदमान बेटें या भागांत, तसेंच रत्नागिरी, सावंत-वाडी, गोंवा, कर्नाटक या भागांत हीं झाडें बरींच आढळतात. काजूस वर्षांतून एक वेळ फळें येतात. याच्या दोन जाती आहेत.

ऐहोळ — शिल्प (पान ३३४)

ओरछा — चतुर्भुज मंदिर (पान ३४०)

ओलवण — सहारामधील एक गांव (पान ३४२)

पांढरी व तांबडी. फळापुढें जी बी येते तीस काजूची बी म्हणतात. ती बी खाण्यास रुचकर असते.

या झाडापासून डिंक, तेल, औषध, इमारती लांकूड व खाण्यांचे पदार्थ तयार होतात. सालीपासून शंक्वाकृति पिवळा किंवा तांबूस रंगाचा डिंक निघतो. या झाडापासून दोन प्रकारचें तेल निघतें: (१) बियांपासून फिकट पिवळ्या रंगाचें निघणारें तेल; हें बदामाच्या तेलाइतकेंच पौष्टिक व उत्तम असतें. (२) बियाच्या कवचीपासून निघणारें तेल. या तेलाला 'कारडोल' म्हणतात. काजूच्या बिया भाजून खातात. व त्यांत साखर मिसळून त्याची मिठाई करतात. यापासून होणाऱ्या इमारती लांकडाचें एका घनफुटाचें वजन १५ ते १९ शेर असून त्याचा बोटी, सामान व लांकडी कोळसा तयार करण्याकडे उपयोग करतात. काजूच्या बिया गोंव्याहून मुंबईला फार येतात.

**काझन**— युरोपीय रशियांतील हें एक शहर असून येथें एक विद्यापीठ आहे. हें शहर पौरस्त्य विद्यांचें अभ्यासपीठ म्हणून प्रसिद्ध आहे. बोटी बांधणें आणि इतर अनेक प्रकारचे कारखाने येथें आहेत. हे तातार लोकसत्ताक राज्याच्या राजधानीचें शहर आहे. लोकसंख्या चार लाख आहे.

**कॉटन, सर रॉबर्ट ब्रूस** (१५७१–१६३१)—हा इंग्रज पुराणवस्तुसंशोधक व प्राचीन वाङ्मयाच्या अवशेषांचा संग्राहक असून प्राचीन सनदा (चार्टर), ऐतिहासिक कागदपत्रें व इतर हस्तलिखितें यांचा फार मौल्यवान् संग्रह त्यानें केला व याबद्दल त्याचें नांव चिरस्मरणीय झालें आहे. हा संग्रह १७०० मध्यें राष्ट्राच्या हवालीं करण्यांत आला; त्यापैकीं कांहीं भाग अग्नीच्या भक्ष्यस्थानीं १७३१ मध्यें पडला व बाकीचा ब्रिटिश म्यूझियममध्यें ठेवण्यांत आला.

**कॉटन, सर हेन्री** (१८४५–१९१६)— हा एक अँग्लो-इंडियन अधिकारी असून याचा आजा व बाप ईस्ट इंडिया कंपनीचे डायरेक्टर होते. हेन्रीचा जन्म तंजावर जिल्ह्यांतील कुंभकोणम् गांवीं झाला. शिक्षण लंडन येथें झाल्यावर १८६७ सालीं बंगाल सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरला. पुढें १८९१ मध्यें बंगाल सरकारचा मुख्य चिटणीस व १८९६ त हिंदुस्थान सरकारचा गृहमंत्री झाला. १९०६ मध्यें तो लिबरल सभासद म्हणून पार्लमेंटांत निवडून आला. शेवटपर्यंत हिंदुस्थानकडे त्याचें लक्ष असे. त्याचें 'न्यू इंडिया' नांवाचें पुस्तक बरेंच लोकप्रिय होऊन त्याच्या बऱ्याच आवृत्ति निघाल्या.

**काटमांडू**— नेपाळची राजधानी. हें शहर विष्णुमती नदीच्या पूर्व किनाऱ्यावर तिच्याशीं होणाऱ्या बागमतीच्या संगमावर वसलें आहे. हें हिंदुस्थानच्या सरहद्दीपासून ७५ मैलांवर आहे. हें नेपाळमधील सर्वांत मोठें शहर असून येथील लो. सं. १,०८,८०५ आहे. बहुतेक रहिवासी नेवार आहेत व त्यांपैकीं कै-बौद्धधर्मी आहेत. शहरांतील थोडी मुसलमान वस्ती एका भागांत स्वतंत्र राहते. या मोहोल्ल्याच्या बाहेर त्यांना ताबुताची किंवा कसलीहि मिरवणूक काढतां येत नाहीं. हें शहर इ. स. ७२३ मध्यें राजा गुणकाम देव यानें वसविलें, असें म्हणतात. मंजुश्री नांवाच्या बौद्धधर्मी साधूच्या नांवावरून या शहराला मंजूपाटण असें म्हणत असत. भिदेशी, कांतीपूर, काटमांडू किंवा काटमांडू अशीं दुसरीं नावें आहेत. येथील राजवाडा राजा लछमनसिंगमल यानें भिक्षूंच्या उतरण्याच्या सोईकरितां १५९६ सालीं बांधला. ही नेवार राजांची राजधानी होती. शहरांत बरींच देवळें आहेत. पुष्कळ देवळांतील मूर्तिशिल्प अश्लील आहे. सर्वांत मोठी व महत्त्वाची इमारत म्हणजे 'दरबार' अथवा 'राजवाडा' होय. तीन इस्पितळें शहरांत आहेत. एक कॉलेज, दरबार हायस्कूल, ट्रेनिंग स्कूल व कांहीं प्राथमिक शाळा असून एक वैद्यक शाळाहि आहे. शहराच्या उत्तरेस पशुपतिनाथाचें मंदिर तीन मजली उंच असून तेथें दरवर्षी महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते.

**काटवा**— बंगाल प्रांतांत बरद्वान जिल्ह्याच्या ईशान्येकडील एक पोटविभाग. क्षे. फ. ४४१ चौरस मैल. लो. सं. सुमारें तीन लाख. या पोटविभागांत काटवा व दैनहाट हीं दोन गांवें व ३७१ खेडीं आहेत. आग्रादिप व दादिया येथें दरवर्षी मोठ्या जत्रा भरतात. टसर नांवाचें रेशीम काढणें हा येथील महत्त्वाचा धंदा आहे.

काटवा गांव भागीरथी आणि अजय या नद्यांच्या संगमावर वसलेलें आहे. लो. सं. सुमारें दहा हजार. मुरादाबाद येथें पूर्वी बंगालची राजधानी असतांना काटवा गांव मुरादाबादचें नाक समजलें जात असे. येथें एक किल्ला आहे. येथें चैतन्य महाराजांनीं संसाराचा त्याग करून तपस्व्याचें व्रत धारण केलें म्हणून वैष्णव लोक या स्थानास पवित्र मानतात. पूर्वी येथें आगबोटी जात-येत असत.

**कांटेरिंगणी**—(विलायती). [जाति–सोलानम. नाइट शेड]. ही एक कांटेरिंगणी (सोलानम) जातीच्या वनस्पतीची उपजाति आहे. या वनस्पतीस 'रात्रछाया' हें इंग्लंडमधील एका जातीस लौकिक नांव आहे. ब्रिटनमध्यें एक काष्ठमय रात्रछाया व दुसरी गुळचट कडु रात्रछाया अशा दोन जाती आहेत. या दुसऱ्या (एस. डलकामारा) वनस्पतीचीं मुळें व पानें यांपासून गुंगी येते. या वनस्पतीचीं फळें जरी विषारी नसलीं तरी अनिष्ट असतात. बेलाडोना, रिंगणी पाहा.

**कांटेरी तार**—कुंपणाला लावावयाची धातूची तार. या तारेंत मधून मधून दुसरे तारेचे अणकुचीदार तुकडे बसविलेले

असतात त्यामुळें या तारेंतून गुरें, वगैरे येऊं शकत नाहींत. सार्वजनिक रस्त्यास लागून असलेल्या कुंपणास असली काटेरी तार लावण्यांत येऊं नये असा इंग्लंडमध्यें कायदा आहे व अशा काटेरी तारेपासून शेजाऱ्याचें नुकसान झाल्यास त्याला नुकसानीबद्दल फिर्याद करतां येते. युद्धामध्यें अडथळे उत्पन्न करण्याकरितां काटेरी तारेचा फार उपयोग होतो. गेल्या महायुद्धांत खंदकांभोंवतीं अशा काटेरी तारांचें जाळें उभारण्यांत येत असे.

**काटोल**—मध्यप्रांतांत नागपूर जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तहशील. क्षेत्रफळ ६१७ चौ. मै.. लोकसंख्या सुमारें दीड लाख. या तहशिलींत काटोल, नाडखेड, माहोपो, केळोद व मोवार हीं पांच गांवें फार महत्त्वाचीं आहेत. या तहशिलींतील वर्धा आणि जाम या नद्यांमधील जमीन फारच सुपीक आहे. येथें कापूस फार पिकतो.

गावाची लोकसंख्या सुमारें आठ हजार. येथें एका जुनाट किल्ल्याचे अवशेष पाहण्यास सांपडतात. तसेंच येथील एक फार जुनें देवालय पाहण्यासारखें आहे. महाभारतांत उल्लेखिलेलें कुंतलपूर हेंच असावें, अशी समजूत आहे. या गांवास कापसाच्या व्यापारामुळें फार महत्त्व आलें आहे.

**काठिण्य**—काठिण्य हा एक वस्तुधर्म आहे व प्रत्येक वस्तूला काठिण्यमापनांत एकेक विशिष्ट स्थान असतें. दोन वस्तूंपैकीं जी जास्त कठिण ती दुसऱ्याला घांसते. पुढील वस्तू एकापेक्षां एक कठिण आहेत: (१) संगजिरें, (२) गोदंती (जिप्सम), (३) खटिका (कॅल्साइट), (४) प्लुग्रत (फ्लुओराइट), (५) अपाटाइट, (६) ओर्थोक्लास, (७) गार, (८) पुष्कराज, (९) नीलमणि (सॅफायर), (१०) हिरा. का. ८.५ चें काठिण्य म्हणजे पुष्कराजाहून कठिण पण नीलमण्याहून कमी कठिण.

**काठी**—पश्चिम खानदेशांत तळोदें तालुक्यांत एक प्रमुख व सर्वांत मोठें संस्थान. याचें क्षे. फ. १५० चौ. मै. असून लो. सं. सु. आठ हजार व वसूल पन्नास हजारांचा आहे. या संस्थानांत सातपुड्याचे तुटलेले कडे, अरुंद खोरीं व अतोनात झाडी आहे. देव नांवाची नदी आहे. हिंवतापाचीं व अपचनाचीं दुखणीं फार होतात. संस्थानांत साग, मोहाचीं फुलें, मध, मेण हीं होतात. येथील रहिवासी सर्व भिल्ल असून त्यांच्यांत पावरा, मेंथवाडी, वारली, पाडवी या पोटजाती आहेत. पठारावरील जमिनींत भात, चारोळी, वरी, उडीद, वगैरे धान्यें होतात. संस्थानचें मुख्य शहर काठीच होय. यांतून तांदूळ, इमारती लांकूड, तूप, वरी, उडीद, वगैरे माल निर्गत होतो. येथील राजा बुधावल संस्थानचा मांडलिक होता. इंग्रजांनीं तें संस्थान खालसा केल्यामुळें हा स्वतंत्र संस्थानिक बनला. इंग्रजांस त्याला थोडी वार्षिक खंडणी द्यावी लागत असे. हें आतां प्रांतांत विलीन झालें आहे.

**काठी लोक**—काठी ही काठेवाडमधील अनेक जातींपैकीं एक मुख्य जात असून तिची लो. सं. सु. तीस हजार आहे. रजपूत टोळ्यांप्रमाणें काठी लोकहि कच्छ प्रांतांतूनच काठेवाडांत आले. हे लोक हत्ती, वाघ, नाग, वानर व झाडें यांची पूजा करीत. गुजरातेंत वासुकी व धरणीधर यांचीं देवळें यांनीं बांधलीं. काठी लोक सर्वत्र लुटारूपणा करीत. काठी लोकांचें सर्वांत शूर कुल काठेवाडच्या नैर्ऋत्येकडील खुमान काठी यांचें होय. हे लोक पूर्वीं गुरें पाळणारे असून त्यांना जनावरें फार आवडत. काठी लोक सूर्योपासक असून ते प्रत्येक कार्यामध्यें कोळ्याच्या आकाराची सूर्याची प्रतिमा उपयोगांत आणतात. हे लोक देव, गाय व ब्राह्मण यांना पूज्य मानतात. काठी लोक जात्या शूर, उदार व आतिथ्यपर आहेत. काठेवाडांत त्यांचे जेतपूर, मंदर्द, बगसर, कुंडल, वगैरे मोठे किल्ले आहेत. यांची महिआ म्हणून एक पोटजात सोरठ प्रांतांत व गीरच्या डोंगराळ भागांत असून ते अत्यंत त्रासदायक लोक आहेत. हे आपापसांत विवाहसंबंध करतात. पुष्कळसे काठी लोक जमीनदार व तालुकदार आहेत.

**काठेवाड**—मुंबई, हें अरबी समुद्रांतील गुजरातच्या पश्चिमेकडील द्वीपकल्प आहे. याची सर्वांत जास्त लांबी सरासरी २१५ मै. व रुंदी १६० मै. असून याचें क्षे. फ. अजमासें २३,५०० चौ. मैल आहे. काठेवाडच्या क्षेत्रफळापैकीं २०,८८२ चौ. मै. क्षेत्रफळांत २०० वर संस्थानें आहेत. लो. सं. सुमारें तीस लाख आहे. काठेवाडचें प्राचीन नांव सौराष्ट्र; मुसलमानी अमलांत याला सोरठ म्हणत. झालवाड, हलर, गोहेलवाड व सोरठ असे या द्वीपकल्पाचे चार मोठे प्रांत आहेत. हें द्वीपकल्प एके काळीं बेट असावें व फार पूर्वीं सिंधु नद याच भागांतून खंबायतच्या आखातास जाऊन मिळत असे असा समज आहे. याचा उत्तरेकडील भाग सपाट असून इतर ठिकाणीं अलेक, कमळ, दलकानिआ, सनोसर, वगैरे डोंगर आहेत. अजी, माछू, सरस्वती, भोगवा व शेत्रुंजी या नद्या आहेत. प्राचीन काळापासून ग्रीक, रोमन, मुसलमान, वगैरे लोक या बंदरीं व्यापाराकरितां येत असत. पिरम, चांच, शंखोदर, नोर करूंभर, दीव हीं इतर बेटें आहेत. सरोवरें थोडीं असून त्यांपैकीं नाल व धेंडस हीं मुख्य आहेत. साबरमतीच्या मुखापासून वायव्येकडे ३५ मैल दूरवर जाणाऱ्या दलदलीच्या पात्राला खंबायतचें रण म्हणतात. दक्षिण किनाऱ्यावर नारळाचीं झाडें विपुल आहेत. महुवा येथें उत्तम आंबे होतात. सिंह, चिव्या वाघ, चित्ता, डुक्कर, कोल्हा, जंगली

मांजर हे येथील वन्य पशू आहेत. ४२ इंच पाऊस जुनागड येथें पडतो.

गेल्या शतकांत येथें बऱ्याच वेळां भूकंप झाला. बहुतेक काठेवाड गायकवाडांच्या आधिपत्याखालीं आहे. १८०७–८ पासून काठेवाडमधील लहान लहान सरदारांच्या यादवीचा शेवट झाला. काठेवाडमध्यें प्राचीन काळचे अवशेष दक्षिणेस व आग्नेयीस सांपडतात. अशोकाच्या वेळचे लेख, बौद्धांचीं लेणीं व जैनांचीं देवळें हीं येथें आहेत. जुनागड, भावनगर, नवानगर, धंदुका, लिमडी, वांकानेर, द्वारका, अमेरळी, राजकोट, पोरबंदर व वढवाण हीं मुख्य शहरें आहेत. येथें रजपूत, काठी, कुणबी, कोळी, ब्राह्मण, मेमन, खोजे व धानवी जातीचे लोक आहेत. सर्वांत मुख्य काठी लोक आहेत. काळ्या जमिनींत कापूस होतो व लाल जमिनींत पाटाच्या पाण्यानें गहूं व सातू चांगला होतो. उत्तम फळफळावळ, भाज्या, ऊंस, हळद व मूग यांचें उत्पन्न होतें. लालपुरी, अलानसागर, पनेली, चंपा व मोलदी हे मुख्य तलाव आहेत. काठेवाडी घोडे प्रख्यात आहेत. खनिज पदार्थ—लोखंड, इमारती दगड, पांढरीं व तांबडीं पोवळीं व मोतीं हे आहेत. या द्वीपकल्पांतील लोक सधन आहेत. पाण्याचा पुरवठा मुबलक असल्यामुळें येथील जमिनीचें उत्पन्न चांगलें येतें. कापडाचे कारखाने व इमारती लांकडाचा व्यापार इकडे बराच भरभराटीस आला आहे. सोन्यारुप्याच्या कलाबतूचें विणकाम, सुगंधी तेलें व उटणीं, गुलाबाचें व इतर अत्तर आणि हस्तीदंती व चंदनी कोरीव काम येथें चांगलें होतें.

**काडतूस**—बंदुकींतून गोळी उडविण्याकरितां वापरण्यांत येणारी एक वस्तु. काडतुसाचे मुख्य दोन भाग असतात : एक नळी अथवा टोपण आणि गोळी. टोपण पितळेचें असतें आणि त्यांत दारू भरलेली असते. याच्या मागें केप ( टोपी ) बसविलेलें असतें. हें केप पाऱ्याच्या एका संयुक्तापासून बनविलेलें असतें. [ फुलमिनेट–फुलमिनिक ॲसिड ( नायट्रो असेटोनिट्रिल $C_2 H_2 N_2 O_2$ क२ उ२ न२ प्र२ ) व पारा यांचें संयुक्त ]. यावर चापाचा आघात होतांच दारूचा बार उडतो. दारू व गोळी यांच्यामध्यें एक पुठ्ठ्याची गुंडाळी असते. छऱ्याचीं काडतुसें थोडीं निराळीं असतात. त्यांत दारू व छरे एकाच टोपणांत भरलेले असतात. छऱ्यांच्या काडतुसांचीं टोपणें पितळेचीं किंवा पुठ्ठ्याचीं करून त्यांस मागें पितळी तुकडा लावतात.

**कॉड मासा**—हा मऊ कल्ले असलेला एक जातीचा मासा आहे. याचें शरीर लांबट चौकोनासारखें असतें. याच्या शरीरावर मऊ खवले असतात. याचीं फुप्फुसें मोठीं असून वक्षाखालीं असतात. याच्या खालच्या जबड्याला लहान दाढी असते. याच्या पाठीवर दोन किंवा तीन कल्ले असून पश्चाद्भागीं दोन व शेपटीजवळ एक असतो. हे न्यू फाउंडलंडच्या आसपास विपुलतेनें सांपडतात. हा खाण्यास पथ्यकर व रुचकर असतो. याच्या यकृतास उष्णता देऊन व दाब घालून तेल काढतात; तें औषधी असतें. यांना एप्रिलपासून जूनअखेर पकडण्यांत येतें. याची लांबी साधारणतः दोन ते तीन फूट असते व वजन ३० ते ५० पौंड असतें.

कॉडलिव्हर तेल—कॉड नांवाच्या जातीच्या माशाच्या यकृतास वाफ देऊन त्यापासून हें तेल काढण्यांत येतें. याच्या सर्वांत फिकट जातीचा उपयोग औषधाच्या कामीं करण्यांत येतो. या तेलांत अनेक द्रव्यें असतात. त्यांमध्यें जेकोलीन व थेरॅपिन हीं मुख्य आहेत. औषधामध्यें याचा फार उपयोग असून त्याला औषधापेक्षां अन्न मानण्यांत येतें. सर्व प्रकारच्या चरबीपेक्षां हें तेल शरीरांत लौकर मिळून जातें, व क्षय वगैरे रोगांमध्यें याचा फार उपयोग होतो. तसेंच लहान मुलांस योग्य पौष्टिक अन्न न मिळाल्यास याचा उपयोग करण्यांत येतो.

**कांदू**—भडभुंजे, हलवाई यांची एक जात. हिंदुस्थानांत यांची एकंदर वस्ती १९११ सालीं ६,६४,४२३ होती. पैकीं बिहार-ओरिसांत ५,०२,८५५, संयुक्तप्रांतांत १,४६,८९२, बंगाल्यांत १५,६०३ व बाकीची आसामांत होती. कहार बाप व शूद्र आई यांपासून झालेली ही संतति असावी असें मानतात. बनियासारखी ही एक वैश्य जात आहे असेंहि कांहीं समजतात. खाद्य पदार्थ करण्या-विकण्याखेरीज इतर पुष्कळ धंदे या जातीचे लोक करतात. एकंदर सर्व कांदू हिंदुधर्मी आहेत; पैकीं कांहीं शाक्त तर कांहीं वैष्णव आहेत. कांहीं कांदू रामानंदी व कांहीं कबीरपंथीहि आहेत. पाथरवट, गवंडी, वाणी यांचे धंदेहि कांदू लोक करतांना दिसतात. आसामांतील कांदू चहाच्या मळ्यांत काम करतात.

**कॉंडोर**—हा एक गिधाडाच्या जातीचा प्रचंड पक्षी ॲंडीज पर्वतावर आढळतो. याचे पंख फार मोठे असतात; ते १० फुटांपर्यंत लांब असतात. हा फार उंच जागेवर घरटें बांधून राहतो. हे तीन–चारांच्या टोळक्यांनीं राहतात व भक्ष्य शोधण्याकरितां जमिनीवर उतरतात. हे बहुधा मृत प्राण्यांच्या शवांवर निर्वाह करतात व इतके अघाशी आहेत कीं, प्रसंगीं

आहारानंतर त्यांस हालचाल करणें शक्य होत नाहीं. व त्या वेळीं मनुष्य त्यांस पकडूं शकतो.

**काणे, पांडुरंग वामन** ( १८८०— )—एक संस्कृत पंडित व धर्मशास्त्रग्रंथकार. लहानपण कोंकणांत गेलें व नंतर उच्च शिक्षणासाठीं मुंबईस राहिले. एल्.एल्.एम्. पर्यंतच्या पदव्या पारितोपिकांसह मिळविल्या. कांहीं काळ कॉलेजांतून प्राध्यापकाचें काम केलें. मुख्य व्यवसाय वकिलीचा आहे; तथापि यांनीं पुष्कळ लेखन केलें आहे. धर्मशास्त्राचा इंग्रजी इतिहास तीन भागांत प्रसिद्ध केला व मोठी कीर्ति संपादन केली. सरकारनें यांना 'महामहोपाध्याय' पदवी देऊन गौरविलें आहे. हिंदुस्थानांतील एक गाढा संस्कृत पंडित म्हणून यांची जगांतील विद्वानांमध्यें ख्याति आहे. अनेक संस्थांशीं यांचा निकट संबंध आहे. मुंबई विद्यापीठाचे कुलगुरु ( व्हाइस चॅन्सेलर ) म्हणून सरकारनें १९४७ सालीं यांची निवड केली.

**काण्व घराणें**—यास काण्वायन असेंहि म्हणत. शुंग घराण्यांतील शेवटचा दुर्व्यसनी राजा देवभूति अगर देवभूमि यास त्याचा ब्राह्मण प्रधान वसुदेव यानें कट करून मारलें व आपण स्वतः राजा झाला ( खि. पू. ७३ ). वसुदेवानंतर त्याचे तीन वंशज गादीवर बसून त्यांनीं ५५ वर्षें राज्य केलें ( खि. पू. ६३ ते २८ ). सुशर्मन् याला आंध्र शातवाहन घराण्यांतील एका राजानें मारून राज्य बळकाविलें ( खि. पू. २८।२७ ) व पाटलीपुत्र ( काण्वांची राजधानी ) एक सुभ्याचें ठिकाण झालें.

**काण्व शाखा**—शुक्ल यजुर्वेदाच्या वाजसनेयी शाखेचे काण्व व माध्यंदिन असे दोन भेद आहेत. या दोन पाठांमध्यें विषयाच्या बाबतींत फारसा भेद नाहीं. काण्व संहितेचे अध्याय ४० आहेत.

या संहितेचें ब्राह्मण शतपथ या नांवाचें असून त्याचेहि माध्यंदिन व काण्व असे दोन पाठ आहेत. माध्यंदिन पाठांत चौदा प्रपाठक असून काण्व ब्राह्मणांत सतरा प्रपाठक आहेत. शतपथ ब्राह्मणाचा शेवटचा भाग म्हणजेच बृहदारण्यक उपनिषद् होय. याचेहि अर्थात् काण्व व माध्यंदिन पाठ आहेत.

या शाखेचें सूत्र कात्यायन हें होय. या शाखेचे ब्राह्मण वऱ्हाडामध्यें विशेष आढळतात. तेथें त्यांचें काण्णव असें नांव रूढ झालें आहे.

**कात**—अनेक झाडांच्या लांकडापासून, सालींपासून व फळांपासून कात बनवितात. काताच्या तीन जाती आहेत. काळा कात मुख्यतः औद्योगिक कामाकरितां वापरतात. फिक्का कात हा विड्यांत खातात किंवा औषधाकरितां याचा उपयोग करतात. खैरसाल लांकडांत सांपडतो.

काळा किंवा पेगु कात करण्याची कृति अशी आहे—लांकडाचे तुकडे १५।१६ शेर पाणी असलेल्या मातीच्या भांड्यांत उकळून अर्धें पाणी उरल्यावर २०।२५ भांड्यांतील पाणी एका लोखंडी कढईत ओतून घट्ट होईपर्यंत सर्व रस आटवतात. पुढें हा रस थंड झाल्यावर तें द्रव्य विटाळ्यासारख्या लांकडी सांचांत पानें घालून त्यावर ओततात. एका रात्रींत हा रस वाळून कात तयार होतो. इज्जतनगर स्टेशनजवळ इंडियन वुड प्रॉडक्ट्स कंपनीचा काताचा कारखाना आहे. खैराच्या लांकडांत एक स्फटिकाकार पदार्थ सांपडतो त्यालाच खैरसाल म्हणतात. आंवळी, सुपारी यांपासून कात काढितात. मलायामधील गॅंबिअर नांवाच्या झाडाच्या पानांपासून कात काढतात. प्रत्येक झाडापासून अर्धा टन कात निघतो.

रंगविण्याकडे, रेशमाला रंग देण्याकडे व खाण्याकडे काताचा उपयोग होतो. काताच्या अंगीं स्तंभक धर्म असल्यामुळें हगवणींत अथवा रक्तस्रावांत त्याचा चांगला उपयोग होतो. दांत किडल्यामुळें ठणकूं लागल्यास काताची पूड दातांच्या खळग्यांत भरावी. साध्या मलमांत कात मिसळून तें मलम व्रणांवर लावलें असतां ते बरे होतात.

**कातकरी**—काथकरी, काथोडी. लो. सं. सु. एक लाख. ठाणें व कुलाबा जिल्ह्यांतील पश्चिमघाट, सुरतेभोंवतालचीं संस्थानें, पुणें व नाशिक रस्त्यांवरील सह्याद्रीचा पायथा या भागांतून हे मुख्यत्वेंकरून आढळतात. हे मूळचे भिल्ल असून ते उत्तरेंतून सुरत जिल्ह्यांत आले असावे. रामाच्या वानरसेनेपासून आपली उत्पत्ति आहे असें हे सांगतात. त्यांच्या भाषेंत कांहीं भिल्लांच्या भाषेंतील शब्द आहेत. यांचा मूळचा धंदा कात करण्याचा होता. हे लोक जळाऊ लांकडें व मध विकून पोट भरतात. हे रानउंदीरहि खातात. हे चोर व लुटारू म्हणून प्रसिद्ध आहेत.

या लोकांचे अथावर, धेड किंवा ढोर, सिधी, सोन किंवा मराठे व वरप असे पांच पोटभाग असून त्यांमध्यें बेटीव्यवहार होत नाहीं. कातकरी लोक वन्य हिंदू आहेत. वाडीमधील पुढारी लोकांच्या सभेंत नाईक किंवा कारभारी हा अध्यक्ष असून तींत मुसलमान, खिस्ती, इत्यादिकांबरोबर जेवणें, बायकोनें नवऱ्याबरोबर न राहणें, इत्यादि सामाजिक प्रश्नांचा निकाल दिला जातो. काथोडिया हे सुरतच्या पूर्वेकडील व आग्नेयीकडील संस्थानांतून आढळतात. त्यांना

अस्पृश्य मानण्यांत येतें. सोन कातकरी हे साधारणतः ठाणें जिल्ह्यांत स्थायिक झाले आहेत. शेतकीचीं कामें हे लोक करतात. भाद्रपद, शिमगा व दिवाळी यांत मृतांचें श्राद्ध करतात. घराच्या छपरावर पिंड ठेवणें ह्राच प्रायः श्राद्धविधि असतो.

**कांतकाम**—'कांतकाम' याचा साधारण अर्थ लांकूड किंवा धातु यास यंत्रावर चढवून, फिरवून हत्यारानें त्याला निरनिराळे आकार देणें, असा आहे. लांकडाचें कांतकाम व धातूचें कांतकाम असे याचे दोन मुख्य प्रकार आहेत. रंगीत खेळणीं, खुर्च्या, टेबलें, पलंग, वगैरेंना लागणारें सामान, आरशाच्या चौकटीला लागणाऱ्या नक्षीदार पट्ट्या, पातळ लांकडी चश्या, लहान लहान लांकडी पुतळे सुद्धां यंत्रानें कांतून करतात. सर्वसाधारणपणें कांतकाम करण्यासाठीं लागणाऱ्या यंत्राला कांतयंत्र (लेथ) असें म्हणतात. लांकडाच्या लहान लहान पातळ चश्या करण्याचें कांतयंत्र निराळें असतें. लांकडाचे एकाच जातीचे दांडे करण्यास निराळेंच कांतयंत्र लागतें. धातूचें काम चांगल्या यंत्राशिवाय चांगलें होत नाहीं. हीं कांतयंत्रें निरनिराळ्या प्रकारचीं असतात: (१) अगदीं साधें, (२) स्क्रू करणारें, (३) उभें (व्हर्टिकल), (४) सपाट (हॉरिझॉंटल), (५) टेरेट, (६) स्पेशल, (७) बोअरिंग, इत्यादि. दांते पाडण्याचें मिलिंग यंत्रहि याच सदरांत येतें. भोंकें पाडण्याचें कांतयंत्र उभ्या आणि आडव्या दोन्ही जातींचें असतें. भोंकें पाडण्याच्या कांतयंत्रावर, पोकळ नळकांडें करणें, चाकें कांतणें, वगैरे विशेष तऱ्हेचें काम होतें. कांतकामांत पितळ, पोलाद किंवा लोखंड व बीड या तीन धातू वापरतात. पितळ फार मऊ असल्यानें काम करण्यास जवळजवळ लांकडाइतकें सोपें जातें. बीड कांतीत असतांना मात्र गति फार ठेवून चालत नाहीं. कारण तें घनवर्धनीय नाहीं. बिडाच्या डागाच्या वेळीं कांतयंत्र हें डबल गिअरनेंच चालवावें लागतें. दांत्यांच्या यंत्रावर दांते पाडणें, चावीचे गाळे पाडणें, दागिने घासून काढणें, हीं कामें होतात. शेपिंग व प्लेनिंग या यंत्रांत दागिने घासण्याचें काम होतें. हत्यारांना धार लावण्याची (पानविण्याची) तऱ्हाहि निरनिराळी आहे.

**कांतडीं**—चामडें पाहा.

**कांतणी**—कापसाच्या किंवा लोंकरीच्या तंतूंपासून प्रथम पेळू बनवून त्यापासून सूत कांतण्याच्या क्रियेस कांतणी म्हणतात. फार प्राचीन काळापासून एका लांकडाभोंवतीं कापूस गुंडाळून त्याचे पेळू बनविण्यांत येत असत व चातीनें त्यापासून सूत कांतण्यांत येत असे. या चातीस एका बाजूस एक जड चकती बसविलेली असे. दुसऱ्या टोंकाभोंवतीं निघणारें सूत गुंडाळलें जात असे. सुतास पीळ भरण्याकरितां ही चाती हाताच्या बोटांनीं किंवा उजव्या मांडीवर फिरविण्यांत येत असे आणि डाव्या हातानें कापूस धरून त्यापासून पाहिजे तसें बारीक सूत काढण्यांत येत असे. यानंतर ही चाती पायानें फिरवण्याची योजना करण्यांत आली व त्यानंतर १७६७ च्या सुमारास अलीकडील जेनी हें सूत कांतण्याचें यंत्र निघालें.

**कांतारी**—लांकडी कांतकाम करणारांची ही एक जात आहे. काठेवाड व गुजरातमध्यें यांची वस्ती बरीच आढळते. दक्षिणेंतील कांताऱ्यांची राहणी कुणब्याप्रमाणेंच असते. कांहीं कांताऱ्यांस, विशेषतः मुसलमान कांताऱ्यांस, खराडी म्हणतात. हे मूळचे हिंदू असून नंतर बाटलेले आहेत. यांची राहणी इतर मुसलमानांप्रमाणेंच असते. हे सुनीपैकीं हनाफी पंथाचे आहेत.

**कांतिया**—मुख्य वस्ती वऱ्हाड-मध्यप्रांत व मध्यहिंदुस्थान. १९११ सालीं त्यांची संख्या ४१,९९७ होती. पैकीं वऱ्हाड-मध्यप्रांत ४१,३११ कांतिया होते. सातपुड्यांतील जिल्ह्यांतून सूत कांतणाऱ्या व गांवाची रखवालदारी करणाऱ्या लोकांची ही जात असून यांची गणती महार व कोरी लोकांमध्यें झाली आहे. त्यांना नांवें स्थानांपासून, पशूंपासून व झाडांपासूनच मिळालीं आहेत. विधवाविवाह व काडीमोड प्रचलित आहे. यांचा धंदा आजकाल बुडत चालला आहे. कांहीं लोक मालगुजार बनले आहेत. कांहीं शेती, कांहीं मजुरी व कांहीं रखवालदारी करतात.

**कांतीण उठणें**—हा एक तीव्र स्वरूपाचा रोग असून यामध्यें शरीरावर चट्टे उठतात व त्यांमध्यें पुळ्यांचे पुंजके असून एकसारखी आग होत असते व अस्वस्थता वाटत असते. सामान्यतः हा रोग एखाद्या विशिष्ट पृष्ठवंशीय मज्जातंतूमुळें ज्या भागांत संवेदना मिळत असते तेवढ्या भागापुरता प्रथम दिसूं लागतो. ज्या ठिकाणीं या रोगाचा उद्भव होणार असेल तेथें प्रथम मज्जातंतूंत वेदना होऊं लागतात. हळूहळू या वेदना वाढूं लागून त्या बराच वेळ राहण्याचा संभव असतो. वेदनांच्या तीव्र स्वरूपांत ॲस्पिरिन घ्यावें व रोग झालेल्या ठिकाणीं 'क्ष' किरणाचा उपचार करावा. पुरळ पाहा.

**कात्यायन**—एक प्राचीन आचार्य व शुक्लयजुर्वेदाचा सूत्रकार. 'भाषिक सूत्र' हा त्याचा ग्रंथ प्रसिद्ध असून त्यांत वैदिक स्वरपद्धति, वैदिक व्याकरण, विशेषतः वाजसनेयी संहिता व शतपथ ब्राह्मण यांस अनुलक्षून विवेचन आहे. वार्तिककार म्हणूनहि एक कात्यायन प्रसिद्ध आहे. पाणिनि व पतंजली यांच्यामधला दुवा कात्यायन हा असून तो पतंजलीपूर्वी सुमारें १०० वर्षें होऊन गेला असावा. कात्यायनाच्या श्रौत सूत्राचे २५ अध्याय आहेत. पाणिनीच्या १२४५ सूत्रांवर त्यानें वार्तिकें लिहिलीं आहेत. सूत्रकार कात्यायन, वार्तिककार कात्या-

यन आणि प्राकृत कात्यायन असे एकंदर तीन कात्यायन झाले असावे. एक कात्यायनस्मृतिहि आहे. या स्मृतीचा भविष्य-पुराणांत छत्तीस स्मृतींमध्यें उल्लेख आहे.

**कांत्रा किल्ला**— मुंबई, नाशिक जिल्हा. अंकाईच्या पूर्वेस ४ मैलांवर हा किल्ला आहे. हा ज्या टेंकडीवर आहे ती बाजूच्या टेंकड्यांहून ठेंगणी असून तिच्यापासून १००० यार्डांवर असलेल्या एका टेंकडीच्या हा पूर्णपणें माऱ्यांत आहे. याची चढण सोपी असून दरवाजा चांगला नाहीं. किल्ल्यावर टांकीं व तळघरें आहेत.

**काथकोट**— वागदमधील ( मुंबई, कच्छ ) एका उजाड व खडकाळ टेंकडीवरील जुना किल्ला. ८ व्या शतकांत काठी लोकांची येथें राजधानी होती व १३ व्या शतकांत वाघेला लोकांची होती. १५ व्या शतकांत गुजरातच्या सुलतान मुजफरनें ( १३९०–१४११ ) हा किल्ला काबीज केला.

**काथरवाणी**—वाण्यांतील ही एक पोटजात आहे. यांना कंथार, कथार अशींहि इतर नांवें आहेत. लो. सं. अजमासें ३,५०० असून २,५०० लोक मोंगलाईत औरंगाबाद जिल्ह्यांतील भोकरदन व कन्नड या दोन तालुक्यांत राहतात. खानदेशांत ९०० लोक आहेत व बाकीचे १००–१५० लोक नाशिक जिल्ह्यांत राहतात. यांच्यांत पंचायत असून ती फक्त लग्न, मोहतूर या प्रसंगीं कांहीं रुपये घेते. अपराध्यांची दंड व प्रायश्चित्त यांवर सुटका होते. यांच्यांत नेवे, चितोडे, लाडसके आणि लिंगायत या चार पोटजाती आहेत. हे आपणांस चातुर्वर्ण्यसंस्थेंतील वैश्य म्हणवितात. यांची भाषा मराठीच असून हे मद्यमांसनिवृत्त आहेत. लग्नें व मोहतुरादि कार्यें यजुर्वेदी भिक्षुकांकडून करवितात. यांच्यांत पुनर्विवाहाची चाल असून त्यांचा मुख्य व्यवसाय वाणसवद्याचा व सावकारीचा आहे. मोंगलाईत यांच्यापैकीं कांहीं जणांना पाटिलकीचीं वतनें आहेत.

**कादंबरी**—हा शब्द बाणभट्टाच्या 'कादंबरी' या अद्भुतरम्य कथानामावरून रूढ झाला. बहुधा मराठींतील कथावाङ्मय संस्कृत कथावाङ्मयाचें रूपांतर असून त्यावर पाश्चात्य संस्कार झाले आहेत. संस्कृत वाङ्मयांत गांधर्वकथा, कल्पित नीतिकथा व वृत्तान्तपर कथा असे तीन प्रकार आहेत. बौद्ध व जैन वाङ्मयांतहि हे प्रकार आहेत. गांधर्वकथेंत गुंतागुंतीची आश्चर्यकारक मांडणी व नीतिकथेंत सुभाषितें व विनोद असतो. महाकाव्य व नाट्यवाङ्मय यांपेक्षां कथावाङ्मयांत विविधता अधिक असून त्यांत सद्गुणी राजे, धीरोदात्त पुरुष, सुंदर व सुस्वभावी राजकन्या व आदरार्ह आचार्य या व्यक्ती आहेत. शिवाय शेतकरी, कारागीर, व्यापारी, जुगारी, जादूगार, ठक, ढोंगी बैरागी, वेश्या आणि वारांगना, इत्यादि समाजांतील इतर अनेक दर्जाचे लोक या कथावाङ्मयांत आहेत. त्यामुळें या कथावाङ्मयाला जागतिक वाङ्मयांत स्थान मिळालें आहे. म्हणजे या कथांचें भाषांतर युरोप व आशियांतील बहुतेक सर्व देशांतील भाषांत व आफ्रिकेंतील कांहीं भाषांतहि झालें आहे. हें कथावाङ्मय गद्य व पद्य यांचें मिश्रण होऊन तयार झालें आहे, म्हणजे या अद्भुतरम्य कथांतून मधून मधून कांहीं पद्यें घातलीं आहेत. गोष्टींत गोष्ट घालण्याची पद्धत वृतान्तपर ग्रंथांतून सार्वत्रिक व लोकप्रिय झालेली आहे.

भारतीय प्राचीन कथावाङ्मय—( १ ) पंचतंत्र–यांत राजपुत्रांकरितां ग्रंथमालिका तयार करण्याचा उद्देश आरंभीं दिसतो, पण पुढें सर्व दर्जांच्या तरुणांकरितां उपयुक्त अशा नैतिक कथा या ग्रंथांत मागाहून घुसडलेल्या दिसतात. या ग्रंथाच्या पांच जुन्या प्रती सांपडल्या असून त्यांपैकीं एक इ. स. ५०० च्या सुमाराची पेहेलवी भाषेंतील आहे. या पंचतंत्रावरून १० व्या शतकाच्या सुमारास एका जैन यतीनें तंत्राख्यायिक या नांवाचा ग्रंथ तयार केला; त्यांत नीतिकथा जास्त असून अनेक गांधर्वकथाहि घुसडल्या आहेत. १६६० च्या सुमारास मेघविजय नांवाच्या जैन यतीनें मुलांकरितां पंचाख्यानोद्धार हा ग्रंथ तंत्राख्यायिकेवरून केला.

पंचतंत्राचें भाषांतर पेहेलवी भाषेंत ( ६ वें शतक ), सीरियन भाषेंत, अरबी भाषेंत ( ८ वें शतक ), ग्रीक भाषेंत ( १० वें शतक ), नंतर लॅटिन, जर्मन, स्लाव्ह, डॅनिक, डच, वगैरे भाषांत होऊन सर्व युरोपभर या ग्रंथाचा फैलाव १४ व्या शतकांतच झाला.

( २ ) हितोपदेश— हा ग्रंथ १० व्या शतकाच्या सुमारास नारायण नांवाच्या लेखकानें लिहिला.

( ३ ) बृहत्कथा— हा ग्रंथ ३ ऱ्या शतकाच्या सुमारास गुणाढ्यानें पैशाची भाषेंत रचला. त्यांत उदयन राजा व त्याचा मुलगा नरवाहन दत्त यांचीं धाडशीं कृत्यें वर्णिलीं आहेत. या ग्रंथाच्या आधारें क्षेमेंद्राची बृहत्कथा-मंजरी व सोमदेवाचें कथा-सरित्सागर आणि बुधस्वामीकृत बृहत्कथा श्लोकसंग्रह हीं पुस्तकें तयार झालीं असावींत असें दिसतें.

( ३ ) वेताळपंचविंशतिका– जादूविद्या हस्तगत करण्याच्या कामीं विक्रमसेन राजाला मदत देणाऱ्या वेताळानें या गोष्टी सांगितल्या आहेत.

( ४ ) सिंहासनद्वात्रिंशिका—सिंहासनबात्तिशी–विक्रम राजालाच सांगितलेल्या ३२ गोष्टींचा हा समूह आहे. याशिवाय विक्रमोदय, वीरचरित्र, शुकसप्तति, दिनालापनिक शुकसप्तति, भारतक द्वात्रिंशिका, धूर्ताख्यान, पुरुषपरीक्षा, वगैरे कथावाङ्मय

असून वृत्तान्त-ग्रंथामध्यें प्रबंधचिंतामणी, प्रबंधकोश, भोजप्रबंध, वगैरे ग्रंथ आहेत. संस्कृत गद्यकाव्य दंडीचें दशकुमारचरित, सुबंधूची वासवदत्ता, कंदर्पकेतु, बाणभट्टकृत हर्षचरित व कादंबरी, इत्यादि फार उच्च दर्जाचें आहे.

सर्वांत प्राचीन भारतीय नीतिकथा ख्रि. पू. ५ व्या शतकांतील असावी. ईसापमुळें ग्रीक प्राणिकथा ख्रि. पू. ५ व्या शतकांतच कळसास पोंचली होती. अलेक्झांडरच्या स्वारीपासून हिंदुस्थान व ग्रीस यांच्यांत बौद्धिक दळणवळण सुरू झालें. तथापि प्राचीन ग्रीक वाङ्मयांत नीतिकथा-वाङ्मयाची प्रगति बराच काळ झालेली दिसत नाहीं.

चंपू ही गद्यपद्यमिश्रित काव्याची विशिष्ट शाखा आहे. त्रिविक्रमभट्टकृत नलचंपू (दमयंतीकथा), भोजराजाचा रामायणचंपू, अनंतकृत भारतचंपू हे कीर्तनकारांत अतिशय लोकप्रिय असून पारिजातहरणचंपू, मंदारमरंदचंपू, स्वाहासुधाकरचंपू, शंकरचेतोविलासचंपू, इत्यादि १८ व्या शतकापर्यंत चंपूकाव्य निर्माण झालें आहे.

पाश्चात्य कादंबरी वाङ्मय— हा साहित्याचा प्रकार पाश्चात्यांत चांगलाच वाढला असून त्यांत कर्त्याच्या समकालीन व भूतकालीन समाजाच्या स्वभावाचें व चालीरीतींचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यावरून बनवलेल्या खऱ्या किंवा काल्पनिक कथानकांचा समावेश होतो. हा प्रकार पाश्चात्यांत बहुशः अर्वाचीन आहे. करमणूक करणें, सृष्टीच्या गूढ तत्त्वांचा व नियमांचा सहज व सुलभ बोध करून देणें, आणि समाजांत सामाजिक, धार्मिक, राजकीय, इत्यादि सुधारणा करणें, इत्यादि हेतू कादंबरी-लेखनाचे असतात. पूर्वी या प्रकारचें साहित्य कोणत्याहि देशांत कमीच होतें. समाजावर परिणाम घडवणारें काव्य किंवा कादंबरी लिहिण्यास बुद्धिमत्ता बऱ्याच उच्च कोटींतील असावी लागते. प्राचीन युरोपांत आरिस्टीडी यानें सहा भागांत लिहिलेली 'मिलेसीआका' ही युरोपांतील पहिली कादंबरी होय. तींत त्या वेळच्या (ख्रि. पू. २ रें शतक) समाजाच्या प्रणयकथा विनोदी व श्लेषात्मक मार्फत दिल्या होत्या. प्राचीन ग्रीक वाङ्मयांत लाँगस (६ वें शतक) याच्या 'डाफनी' आणि 'चलोई' यांत तत्कालीन पशुपालक समाजाचें दृश्य दिसतें. प्राचीन रोमन वाङ्मयांत अप्युलिअसची सुप्रसिद्ध कादंबरी 'सुवर्ण गर्दभ', आणि पेट्रोनिअसची 'सत्रिकन' या कादंबरींत तत्कालीन चालीरीतींचें सूक्ष्म परीक्षण केलेलें आहे.

इटली—अर्वाचीन कादंबरीचें जनकत्व उत्तर इटलीकडे आहे. संस्कृत नव, नवल या शब्दांवरून लॅटिन 'नॉव्हेलस, नोव्हस', आणि इंग्रजी 'नॉव्हेल' हे शब्द निघाले आहेत. १३ व्या शतकांत 'इल्नेव्हेलिनो' या नांवाच्या नवलकथा पौराणिक गोष्टींच्या आधारें लिहून त्यांत तत्कालीन याचक, उपाध्यायवर्ग व शेतकरी यांच्याबद्दल व सामाजिक चालीरीतींबद्दल मतें दिलेलीं आहेत. पहिला कादंबरीकार फ्रान्सिस्को याची 'डॉ. क्यूमेटिद अमूर' (१३४८) ही कादंबरी प्रख्यात असून बोक्याचिओ, सचेटी, फिओरेंटिनी (यानें ५० कादंबऱ्या लिहिल्या), मॉसुचिओ (यानें मत्सरी नवरे, जारिणी स्त्रिया व व्यभिचारी उपाध्ये यांचीं चित्रें रंगविलीं आहेत), कॉर्नझेनो, ग्रेन्झिओ, बॅंडेलो हे सुप्रसिद्ध कादंबरीकार होत. त्यांपैकीं बॅंडेलो सर्वश्रेष्ठ कादंबरीकार असून त्याच्या कादंबऱ्यांचीं भाषांतरें सर्व युरोपीय भाषांत झालीं आहेत. १९ व्या शतकांत जर्मन धर्तीवर कादंबऱ्या लिहिणारे मन्झोनी (१८७३), व्हर्गो व सेराओ (१८५६) हे होत.

फ्रान्स— १४ व्या शतकापर्यंत पौराणिक कथा, नंतर इटालियन कादंबऱ्यांचीं भाषांतरें, १५ व्या व १६ व्या शतकांत काल्पनिक साध्या गद्य गोष्टी लिहिणारे बोनाव्हेंचूर, वेरोआल्दे, यांच्यानंतर रावेले हा पहिला ऐतिहासिक कादंबरीलेखक, उर्फे याची पहिली प्रेमविषयक कादंबरी (१६१०), गॉम्बरव्हिल (१६७८) व गॅंविल्द, स्कुदेरी (१७००) व फायत या दोन लेखिका, फॉंतेन, फेनेलन, लेसेज (विनोदी), मॅरिव्हो (मानवी वृत्ति व ऊर्मींचा अभ्यासक), वगैरे प्रसिद्ध फ्रेंच लेखक झाले. व्होल्टेर (श्लेषात्मक कथा), डिडेरो, रूसो, पेरी वगैरे लेखकांनंतर १८३० पासून निव्वळ काल्पनिक कादंबरी-लेखनास सुरवात होऊन अलेक्झांडर ड्यूमा, फ्लाबेर (१८५६), झोला, ह्यूगो, मोपासां हे अलीकडील प्रसिद्ध कादंबरीकार होत.

इंग्लंड—१४ व्या शतकापर्यंत ग्रीक गोष्टींचीं भाषांतरें फक्त होऊन १४७० मध्यें मॅलोरी यानें पहिली नवलकथा लिहिली. १५६० पासून इटालियन कादंबऱ्यांचीं भाषांतरें व लिली, ग्रीन, डिकीन्सन, लॉज, नाश यांच्या प्रेमविषयक कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीत गायकी व नाट्यवाङ्मय जास्त होतें. १८ व्या शतकांत रिचर्डसन (१७६०), स्मॉलेट (विनोदी लेखक), फील्डिंग, टॉम जोन्स, डॉ. जॉन्सन, गोल्डस्मिथ, वगैरे कादंबरी-लेखक झाल्यावरें १८५० नंतर मानसशास्त्रानुसार, तसेंच ऐतिहासिक कादंबरी-लेखन सुरू झालें. जेन ऑस्टेन, वॉल्टर स्कॉट, चार्लस डिकन्स (१८७० पिकविक पेपर्स), थॅकरे, इलियट, मिसेस गॅस्केल, किंग्स्ले, रीड, मेरिडिथ, किपलिंग, गार्विस, इ. यानंतरचे लोकप्रिय कादंबरीकार होत.

स्पेन—१५ व्या शतकांत बखरीच्या रूपानें गद्यवाङ्मय सुरू झालें. अमेरिकेच्या शोधामुळें १६ व्या शतकांत धाडसी व विनोदी वाङ्मय उत्पन्न झालें, त्यांत मॉंटिमर याचा 'डायाना' व 'डॉन क्विझोट' या दोन कादंबऱ्या त्याच्या युगामध्यें लोक-

प्रिय झाल्या. सेसिला वोहल ड. फावर ही लेखिका १८७० मध्यें होऊन गेली. त्यानंतरचे लेखक सामान्य प्रतीचे आहेत.

जर्मनी— जर्मनींत या कलेचा उदय फार उशिरां झाला. पहिला कादंबरीकार ग्रिमेल-शौसेन यानें लढाईतील शौर्यविषयक कादंबरी १६७९ त लिहिली. १८ व्या शतकांतील कादंबऱ्यांत प्रणयाचा भरणा जास्त आढळतो. खरा स्वतंत्र लेखक गोएटे याची प्रसिद्ध कादंबरी 'तरुण वेंर्टरचीं दुःखें' ही होय. योहान पॉल (१८२५) ह्या उत्कृष्ट लेखकाच्या साऱ्या कादंबऱ्या प्रेमविषयक असून त्यांची छाप सर्व युरोपवर बसली. यापुढील चांगले लेखक गस्टाव्ह फ्रेटाग, अलेक्सीस, फॉन्टेन, एवर्स, वगैरे होत.

रशिया—रशियांत मात्र या कलेंत स्वतंत्र शोधक बुद्धि आढळते. गोगोल यानें स्लाव लोकांच्या मनोवृत्ति, दया, दाक्षिण्य, वैराग्य यांनीं मिश्रित अशा कादंबऱ्या लिहिण्यास सुरुवात केल्यावर (१८६४) गोंचरोर, डोस्लौव्हस्की, पिसेम्स्की, तुर्गिव्ह व कौंट टॉलस्टॉय या लेखकांचें वजन सर्वत्र जगांत पडलें. नंतरचा प्रसिद्ध कादंबरीकार माक्झिम गॉर्की होय.

पहिल्या महायुद्धानंतर युरोपियन कादंबरीकारांचें सर्व लक्ष मनोविश्लेषणात्मक रचनेकडे लागलें व त्यांचाच कित्ता पौरस्त्य देशांतील लेखक गिरवीत आहेत.

आशियांत फार पूर्वीपासून ओबडधोबड स्वरूपांत कादंबरीलेखन चालू होतें. चीनमध्यें पहिला कादंबरीकार ली कुआनचंग (१३ वें शतक) यानें लढाया व धाडसाचे प्रवास यांच्या कथा लिहिल्या. १७ व्या शतकांत नैतिक गुणांचा परिपोष झालेली 'दोन बहरी वृक्ष' कादंबरी व चिनी सामाजिक दृश्य असलेली उत्तम कादंबरी 'लाल महालाचें स्वप्न' या अति उत्तम आहेत. जपानांत १० व्या शतकांत बखरींना सुरुवात झाली. पहिली कादंबरी जपानी लेखिका मुरासाकी शिकीबु हिनें १००४ मध्यें रचली असल्यानें ती हिंदुस्थानखेरीज साऱ्या जगांतील पहिली कादंबरी होय. १७ व्या शतकांत शौकाकू यानें विनोदी गोष्टी लिहून कादंबरीलेखनास सुरुवात केली. जिशो व किसेकी प्रख्यात जपानी कादंबरीकार होत.

अगदीं अलीकडल्या काळांतील कादंबऱ्यांचें विवेचन त्या त्या देशाच्या वाङ्मयविवेचनप्रसंगीं येईल.

मराठी कादंबरी— मराठींत प्रथम (१) इसापनीति, बाळमित्र, पंचोपाख्यान, वेताळपंचविशी, वगैरे लहान लहान गोष्टी; नंतर (२) मुक्तामाला, मंजुघोषा, विचित्रपुरी, वगैरे अद्भुतकथा; आणि अखेर (३) आजकालच्या गोष्टी, पण लक्षांत कोण घेतो, नारायणराव व गोदावरी, शिरस्तेदार, वेणू, वाईकर भटजी, वगैरे वास्तविक कथात्मक कादंबऱ्या; याप्रमाणें मराठी कादंबऱ्यांची पहिली तीन पायऱ्यांची परंपरा आहे. ऐतिहासिक कादंबऱ्यांचा वास्तववादी कादंबऱ्यांतच अन्तर्भाव होतो. यांपैकीं बऱ्याच कादंबऱ्या व गोष्टी परभाषेंतील ग्रंथांचीं भाषांतरें किंवा रूपान्तरें आहेत. वास्तविकतेची स्फूर्ति मराठी लेखकांना इंग्रजीपासून मिळालेली आहे. गोल्डस्मिथचा व्हिकार, स्मॉलेटचा अंकल टोबी, फील्डिंगचा ऑलवर्दी, स्कॉटचा आयव्हॅनो, डिकन्सचा पिकविक, ईलियटचा रोमोला, वगैरे पात्रांच्याद्वारें पाश्चात्यांची देशप्रीति, परोपकार, वात्सल्य, प्रेमबंधन, वगैरे उदात्त भावनांची चिकित्सा केलेली आहे. जगांतील सर्व राष्ट्रांत प्रसिद्ध अशा 'पिलग्रिम्स प्रोग्रेस', 'गलिव्हर्स ट्रॅव्हल्स,' व 'रॉबिन्सन क्रूसो' या इंग्लंडांतील तीन कादंबऱ्या, आणि 'अंकल टॉम्स केबिन' ही एक अमेरिकेंतील कादंबरी एकूण अशा चारच इंग्रजी कादंबऱ्या आहेत; पण मराठींत या दर्जाची एकहि कादंबरी नाहीं. *मराठींत स्वतंत्र रचना करणारे प्रख्यात कादंबरीकार हरि नारायण* आपटे हे डिकन्स-थॅकरेच्या तोडीचे नाहींत; ह्यूगो, टॉलस्टॉय, झोला यांच्यापासून तर ते फारच दूर आहेत. आपल्यांच्या वास्तववादी कादंबऱ्यांइतकी लहानशी मजल गांठण्यास मराठीला इतकीं वर्षे लागलीं, तर टॉलस्टॉयपर्यंत जाण्याला किती युगें लागतील कोण जाणे! अशा प्रकारचें विवेचन इतिहासाचार्य राजवाडे यांनीं केलें आहे (राजवाडे, संकीर्ण लेखसंग्रह).

मराठी वाङ्मयसूचींत कादंबऱ्या व गोष्टी मिळून सुमारें १० हजारांवर पुस्तकांची नांवनिशी दिली आहे; पण त्यांत इंग्रजी, गुजराती, हिंदी, बंगाली, फारसी, वगैरे बाह्य वाङ्मय, किंवा रूपांतरवजा ग्रंथांचा संभार फार आहे. मराठी लेखकांचें रचनाकौशल्य हीन दर्जाचें नाहीं, अशी खात्री कित्येक स्वतंत्र कादंबऱ्या व नाटकें यांवरून पटते. पण जमीनदार, जहागीरदार, डॉक्टर, वकील, व्यापारी, इत्यादि साक्षर व उच्च वर्गांना आयुष्यक्रम रेखाटणें, इतकेंच आकुंचित क्षेत्र मराठी नाटक-कादंबरींत दिसून येतें. शिवाय स्त्रियांचें चांचल्य दाखवणाऱ्या कादंबऱ्या व नाटकें महाराष्ट्रीय अभिरुचीस रुचत नाहींत. इतर अनेक उद्योगधंदेवाला मराठी समाज फार मोठा पण निरक्षर व मागासलेला असल्यामुळें अखिल महाराष्ट्रीय समाजाचें सर्वांगीण चित्रण अद्याप झालें नाहीं. आणि तितकें सर्वांगीण चित्रण होण्यास व फ्रेंच, रशियन, आदि श्रेष्ठ कादंबरीकारांइतकी मजल गांठण्यास अद्यापि किती काल लागेल, हें निश्चित सांगतां येत नाहीं.

गेल्या तीस-चाळीस वर्षांतील कादंबरी-वाङ्मय हें बहुधा प्रणयी वर्णनांनीं बेसुमार भरलेलें दिसलें तरी डॉ. केतकर, प्रा. वा. म. जोशी, ना. ह. आपटे, पु. य. देशपांडे, द. र. कवठेकर, इ. लेखकांचा दृष्टिकोन सामाजिक आणि मनोविश्लेषणात्मक

आहे. वा. म. जोशी यांनीं हरिभाऊ आपट्यांच्या ध्येयनिष्ठ वाङ्मयाची परंपरा चालू ठेवली व आपट्यांच्या जवळ मानाचें स्थान मिळविलें. वामनरावांच्या कादंबऱ्या अनुभवसिद्ध सत्यकथा वाटतात. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या समाजशास्त्रीय आहेत. पण त्यांनीं जुनें तंत्र, परंपरा, वगैरे कांहीं पाळलेलें नाहीं. फक्त विविधांगी समाजाचें चित्र तें निर्भीडपणें रंगवितात. त्यांनीं सुशिक्षित समाजाला नैतिक आणि धार्मिक अशा जुन्या कल्पनांचा फेरविचार करावयास लाविलें यांत शंका नाहीं. श्री. न. चिं. केळकर यांनीं हा प्रांत आक्रमिला आहे. पण आत्माविष्काराचा आनंद अनुभविण्याकडेच त्यांची वृत्ति असे. शिवरामपंत परांजप्यांच्या कादंबऱ्या थोड्याच आहेत; पण त्यांतहि त्यांच्या वाग्विलासाची आणि कल्पनाचातुर्याची छटा उमटलेली दिसेल.

आधुनिक कादंबरीकारांत अतिशय मोठी लोकप्रियता पावलेले कादंबरीकार म्हणजे फडके, खांडेकर व माडखोलकर हे तिघे होत. यांच्याच कादंबऱ्या आणि लघुकथा फार वाचल्या जातात. यांचें अनेक लेखकांनीं अनुकरणहि केलें आहे व करीत आहेत. पाश्चात्य वाङ्मयांतील आणि समाजांतील सुखविलासाची लज्जत प्रा. फडके इकडील युवकांना चाखवितात. त्यांची लेखणी स्त्रियांचीं शृंगारिक वर्णनें सुंदर रीतीनें रेखाटण्यांत फार कुशल आहे. तारुण्यसुलभवृत्तींची ते फार जोपासना करतात. कधीं कधीं भोंवतालच्या राजकीय परिस्थितीचाहि कथानकांत उपयोग करून घेतात; पण या कामीं जास्त कुशल असे खांडेकर व माडखोलकर हे म्हणतां येतील. खांडेकर यांनीं जीवितांतील सुखदुःखें आणि कर्तव्यें यांची जास्त ओळख आपल्या कादंबऱ्यांतून करून दिली व समाजाशीं व्यक्तीच्या सुखदुःखाचा निकट संबंध दाखवून दिला. कथानकांतील पेंचप्रसंग ते दैववादानें किंवा देववादानें सोडवितात. गडकऱ्यांची छाप त्यांच्यावर विलक्षण दिसते. माडखोलकर राजकारणाचा फार जिव्हाळा दाखवितात. व ते राजकीय कादंबरीकार म्हणून ओळखले जातात. तथापि त्यांच्या कादंबऱ्यांतून उत्तान शृंगाराचीं वर्णनेंच फार. तो मोह त्यांना सुटत नाहींसा दिसतो.

नाटकांप्रमाणें कादंबऱ्यांकडेहि श्री. भा. वि. वरेरकर वळलेले दिसतील. नवविचारांचा प्रचार ते आपल्या लेखनांत तावडतोब आणतात. त्यांचें तंत्रहि स्वतःचेंच आहे. पु. य. देशपांडे हे उघड उघड नवमतवादी आहेत. वैयक्तिक सुखाच्या आड सामाजिक बंधनें येऊं लागल्यास त्यांपलीकडे बेलाशक जावें असें ते प्रतिपादितात. ते समाजसत्तावादी पक्षाचे आहेत, तेव्हां तो वाद साहजिकच त्यांच्या कादंबऱ्यांत उठून दिसतो. हडप हे प्रथम प्रणयपंथी होते, नंतर राष्ट्रीयपंथी झाले व नाथमाधवांप्रमाणें ऐतिहासिक कादंबऱ्या लिहूं लागले. बडोद्याचे वा. वि. जोशी स्त्रीजीवनविषयक कथा लिहून स्त्रियांची वकिली करतात. द. र. कवठेकर हे ग्रामीण जीवनाचीं मनोविश्लेषणात्मक चित्रें फार सुंदर रंगवितात. त्याचप्रमाणें श्री. दिघे हेहि या क्षेत्रांत कुशल आहेत. नवीन प्रकारचे कथाविषय ते पुरवितात.

अनुवादात्मक कादंबऱ्या आज बऱ्याच चांगल्या प्रकारें निघत आहेत व कादंबरीलेखनाचें तंत्र लेखकांनीं चांगलें हस्तगत केल्याचें आढळून समाधान वाटतें. तथापि कथाविषयांत विविधता कमी आहे. स्त्री-पुरुषसंबंधाचाच एक विषय पुष्कळांच्या आवडीचा दिसतो. राजकीय आणि शास्त्रीय कादंबऱ्या कमीच. त्या विषयांचा जिव्हाळा लेखकांना नाहीं. मनोविश्लेषणाचा पुष्कळ जण आव आणतात; पण फसवणूक होते.

आजकाल कादंबरीवाङ्मयाचें क्षेत्र लघुकथांच्या अफाट निर्मितीमुळें संकुचित होत आहेसें दिसतें. दोहोंत कथाविषय तेच पण विस्तार कमीअधिक इतकेंच. कादंबरींत नावीन्य येण्यासाठीं क्रांतिकारक प्रसंग तरी पाहिजेत किंवा भिन्न भिन्न क्षेत्रांचें अवलोकन व मनन पाहिजे. "सर्व लोकांच्या आकांक्षा मोठ्या होतील आणि जगांतील अत्यंत प्रगमनशील, श्रीमान् व कर्तृत्ववान् लोकांच्या बरोबरीचा आपला आयुष्यक्रम पाहिजे अशी जेव्हां आपली मनोवृत्ति होईल तेव्हांच वाङ्मयहि वैभवास चढेल", ही डॉ. केतकरांची उक्ति यथार्थ आहे.

**कांदा**— हिंदुस्थानांत कांदा सर्वत्र पिकतो. त्याचा रोपा सुमारें हातभर उंच वाढतो. कांद्यामधून देंठ निघतो तो कोंवळा असतांना त्याची भाजी करितात. कांद्याच्या पांढरा, तांबडा व पिवळा अशा तीन जाती आहेत. तांबडा कांदा जास्त तिखट असतो. मद्रास, मुंबई इलाखा व बिहार प्रांत यांत कांदा विशेष पिकतो. कांदा बागाइतांत करतात. कांद्याची लागवड केव्हांहि व कोणत्याहि ऋतूंत वर्षभर करतां येते. कांदा पौष्टिक व औषधी असून औषधांत पांढऱ्या कांद्याचा जास्त उपयोग करतात. कांद्याचे पोटीस करतात व बियांचें तेल काढतात. कांद्याच्या पिकावर 'थ्रिप' नांवाची कीड पडते. कांद्याचें रसायनशास्त्राच्या साहाय्यानें पृथक्करण केलें असतां त्यांत गंधक, अल्बुमेन, साखर, चुना, फास्फरिक ॲसिड व क्विनिन हे पदार्थ आढळतात. ज्वर, उदर-रोग, पटसें व खोकला, गळवें, अतिसार, फेफरें, नाकांतून रक्त येणें, यांवर कांदा फार उपयोगी आहे.

**कादीर**—कादिर किंवा कादन. ही जात आवगकोटच्या उत्तरेकडील पर्वतांत व अनेमले टेकड्यांत आढळते. हे लोक अगदीं असंस्कृत व अडाणी असून रानांतील लांकूडफांटा, वगैरे विकून आपली उपजीविका करतात. अनमले टेकड्यांवर मेण, मध, वेलदोडे, आंवळे, सुंठ, धूप, हरणांचीं शिंगें, वगैरे जिन्नस गोळा करून दरवर्षी सुमारें २-३ हजार रुपये मिळवितात.

पशुपक्ष्यांचें मांस हें त्यांचें अन्न होय. दुःस्वभाव, जारकर्म, आज्ञाभंग या आरोपांवरून गुरुजनांच्या संमतीनें लग्न मोडतां येतें. यांच्यांतील पुरुष अनेक बायका करतात. हे अनेक देवांना भजतात. हे मृतांना पुरतात. या लोकांना कोचीनच्या राजाविषयीं फार आदर व प्रेम वाटतें.

**कादोद**—मुंबई, भडोच जिल्हा, भडोच तालुक्यांतील हिंदूंचें एक यात्रेचें स्थान. हें नर्मदा तीरावर आहे. ज्या वेळीं वैशाख अधिक महिना येतो त्या वेळीं कोटेश्वर अथवा कोटिलिंगेश्वराची येथें मोठी यात्रा भरते.

**कान**—हें श्रवणाचें इंद्रिय होय. आपणांस बाहेर दिसणारा कान हा केवळ कूर्चामय कर्णा असून त्याचें काम ध्वनिलहरी

एकत्र करून त्या आंतील भागीं पाठविण्याचें असतें. ह्या आंतील भागांत प्रथम पुढें आलेला एक भाग असतो आणि त्यानंतर श्रवणनलिका ( ऑडिटरी कॅनॉल ) असून ती आंतील श्रवणपटल अथवा पडदा ( टिंपॅनम् किंवा ड्रम ) यापर्यंत जाते. हा पडदा अर्धपारदर्शक असून फार नाजूक असतो. यावर ध्वनिलहरींचा आघात झाला असतां तो कंप पावतो आणि हे कंप पडद्याच्या पोकळींत असलेल्या हाडांपर्यंत पोंचतात. या अस्थींस घण ( मॅलिअस ) आणि ऐरण ( इन्कस ) आणि रिकिब ( स्टेपिस ) अशीं नावें आहेत. या अस्थी हे कंप अंतःकर्णापर्यंत पोंचवितात. अंतःकर्णामध्यें अनेक गुंतागुंतीच्या नलिका असतात. त्यांस अंतःत्वचाजाल ( मेंब्रेनस लॅबेरिन ) म्हणतात. यामध्यें एक द्रव असतो. या द्रवास बाह्यकंप येऊन पोंचतात. या जाळ्याचा खालचा भाग गोगलगाईच्या कवचासारखा वाटोळा असतो त्यास कॉकलिया म्हणतात. हेंच मुख्य श्रवणेंद्रिय होय.

यापुढें कानाचे कांहीं रोग दिले आहेतः कान चिडणें—आरंभीं बाह्य कान फार लाल होऊन तो सुजतो. नंतर पुटकुळ्या येण्यास आरंभ होऊन त्यातून चिकट लस निघते. हा विकार नवीन असल्यास अफूच्या अर्काचे थेंब टाकून लेड ॲसिटेट या औषधाच्या धावनाची पट्टी कानावर ठेवावी. पांढरा कात म्हशीच्या दुधांत उगाळून लावणें हा घरगुती उत्तम उपाय आहे.

रक्तग्रंथि—कानावर मार लागून अगर इजा झाली असतां रक्त सांखळून तेथें लालसर गांठ बनते. यावर उपचार थंड पट्टी अगर बर्फ ठेवावें. पिकल्यास ती शस्त्रानें फोडावी. बाह्यकर्णनलिकेस दडा बसतो व कानांतून पू वाहतो. कान वाहूं लागल्यास कोमट बोरिक ॲसिडच्या धावनाचे थेंब घालावेत. उष्ण प्रकृतीमुळें बारीक गळवें येतात. पोटिसानें शेकणें अगर जळवा लावणें हे उपचार आहेत. कानांतील पडद्यावर लाली येते व त्यावर बारीक गळवे दिसतात व पडदा सुजतो. बोरिक ॲसिडनें कान धुवावा व वर कापसाचा बोळा बसवावा.

कर्णमूळ—कानाच्या मागील हाडाचें टेंगूळ सुजतें. तेथें गळूं होऊन तें फुटतें. यावर पोटीस बांधणें, शेकणें हे उपचार आहेत. कानांतील बोगद्यांत रक्तसंचय होऊन मोठा कर्णनाद ऐकूं येतो व भोवळ येते. क्विनाइन व विजेची पेटी लावणें हे उपचार करावे.

कर्णशूळ-हें लक्षण कानाच्या बऱ्याच रोगांमध्यें असतें. मज्जातंतु-दुर्बलतादर्शक असा कर्णशूळ रोग स्वतंत्रपणें होतो. कानामागें पलिस्तर मारून कानांत कोकेनचे थेंब घातल्यानें शूळ थांबतो.

**कानगी**—कोंकणच्या दक्षिण भागांतील नेहमीं हिरवें असणारें जंगलांतील हें एक मोठें झाड आहे. याच्या बिया उकळून त्यांचें साधारण पिवळ्या रंगाचें तेल काढतात. तें तेल औषधासाठीं व जाळण्यासाठीं उपयोगी पडतें. जायफळांत याच्या फळांची भेसळ करतात. याचें लांकूड साधारणपणें कणखर असतें. तें इमारतीला लावतात.

**कानडा**—ब्रिटिश साम्राज्यांतील एक संघराज्य (डोमिनियन) उत्तर अमेरिकेंतील उत्तरार्ध भाग, व संयुक्त संस्थानांच्या उत्तरेस पॅसिफिक व ॲटलांटिक महासागरांमध्यें पसरलेला विस्तीर्ण प्रदेश. संयुक्त संस्थानें व कानडा यांच्यामध्यें अक्षांश ४९° वरून जाणारी रेषा सरहद्द म्हणून ठरवण्यांत आली आहे. याप्रमाणें ती पश्चिमेकडून १०५ रेखांशपर्यंत सरळ आहे; परंतु पुढें पूर्वेकडे ती वेडीवांकडी होऊन खालीं उतरली आहे व मोठ्या सरोवरास दुभागून ४२° अक्षांश व ८२° रेखांश पासून पुन्हां वर जाऊन पूर्वेकडे ॲटलांटिकपर्यंत गेली आहे. याचें क्षेत्रफळ ३६,९५,१८९. लो. सं. १,१५,०६,६५५ आहे. मूळच्या रेड इंडियनांची संख्या १,१८,३१६ आहे.

कानडाचा बहुतेक भाग सपाट मैदान आहे. परंतु पश्चिम बाजूच्या भागांत मोठमोठ्या पर्वतराजींनीं जागा व्यापली आहे. रॉकी पर्वत याच भागांत आहे. १०,००० फुटांपावेतों उंचीचीं

अनेक शिखरें आहेत. त्यांत मौंट लोगन याची उंची १९,८३० फूट आहे. सेंट लॉरेन्स ही मुख्य नदी आहे. या नदींतून मॉन्ट्रिअलपावेतों मोठमोठीं जहाजें येतात. मॅकेन्झी, पीस, नेल्सन्, चर्चहिल, यूकोन, वगैरे आणखी कांहीं नद्या आहेत. चारहि 'मोठीं सरोवरें' (सुपीरिअर लेक, हुरन, एरी व ऑंटेरिओ) कानडा व अमेरिका यांच्यांत विभागलीं गेलीं आहेत. पांचवें मोठें सरोवर मिचिगान हें सबंध अमेरिकेंत आहे. ग्रेट बेअर, ग्रेट स्लेव्ह, विनिपेग, वगैरे आणखीहि कांहीं मोठालीं सरोवरें कानडांत आहेत. कानडा हा अकरा प्रांतांचा एक संघ आहे. १८६७ मध्यें प्रथम क्विबेक, ओन्टेरिओ, मूळ कानडा, नोव्हास्कोशिया व न्यू ब्रन्स्विक् यांचें संघराज्य स्थापन झालें. प्रिन्स एडवर्ड बेट, ब्रिटिश कोलंबिया हे मागाहून संघांत दाखल करून घेण्यांत आले. वायव्य भागांतील विस्तीर्ण भूप्रदेशांतून मानितोबा, अल्बर्टा, सासाकाचवान् हे प्रांत बनविण्यांत आले. ओटावा ही सबंध कानडाची राजधानी आहे.

गहूं व इतर धान्यें मुबलक पिकतात. जनावरें पाळणें, दुधेऱ्या (डेअरीज), फळसंवर्धन, वगैरे कृषीसंबंधीं उद्योगहि चांगले चालतात. मच्छीमारीचा धंदाहि महत्त्वाचा आहे. कोळसा, कोबाल्ट, तांबें, निकेल, रुपें व सोनें वगैरेंच्या खाणीहि आहेत. जंगलविभागाच्या उत्पन्नांतील महत्त्वाचा व मोठा भाग म्हणजे कागदाकरितां लागणारा पल्प-पुरवठा. उद्योगधंदे, वगैरेंना संरक्षण असल्यानें त्यांची वाढ होत आहे. मॉन्ट्रिअल हें मोठें शहर आहे. टोरोंटो, क्विबेक, विनिपेग, व्हँकोव्हर, ओटावा, वगैरे कांहीं आणखी शहरें आहेत.

कानडामध्यें प्रथम १६ व्या शतकांत फ्रेंचांनीं वसाहत केली. मॉन्ट्रिअल व क्विबेक या फ्रेंच वसाहतीच होत्या. या वसाहतींस 'न्यू फ्रान्स' असें त्यांनीं नांव योजलें होतें. 'न्यू फ्रान्स' मध्यें नोव्हास्कोशियाचाहि समावेश होत असे. कारण त्या वेळीं क्विबेकमध्येंच नोव्हास्कोशियाचाहि अंतर्भाव होत असे.

इंग्लंड व फ्रान्स यांच्या दरम्यान झालेल्या युद्धांत १७१३ च्या सुमारास नोव्हास्कोशिआ व १७६३ मध्यें संपूर्ण क्विबेक फ्रान्सकडून इंग्लंडकडे आलें. वरचा कानडा अथवा ऑंटेरिओ येथें इंग्रजांच्याच वसाहती होत्या. त्यांत बरेचसे संयुक्त संस्थानांमधून आलेले राजनिष्ठ लोक होते. १७८३ मध्यें तेथें त्यांनीं वसाहतीला सुरुवात केली. १७९१ मध्यें खालचा व वरचा कानडा (क्विबेक व ऑंटेरिओ) हे अलग करण्यांत आले. बरेच दिवस या दोन प्रांतांत असस्थता माजली होती व १८४१ मध्यें ते पुनः एकत्र करण्यांत आले. १८६७ मध्यें डोमीनिअन ऑफ कॅनडाची संघटना करण्यांत आली. त्या वेळीं सर जे. ए. मॅक्डोनल्ड हा पहिला पंतप्रधान निवडला गेला व कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष सत्तारूढ झाला. १८७४ ते १८७८ हीं मधलीं ४ वर्षे सोडून १८६७ ते १८९६ या दीर्घ कालांत हाच पक्ष एकसारखा अधिकारावर होता. १९११ मध्यें सर लॉरियर पंतप्रधानपदावर आला. हा लिबरल पक्षाचा होता. १९१४ सालच्या महायुद्धांत कानडानें भाग घेतला होता. मध्यंतरीं कांहीं दिवस संयुक्त मंत्रिमंडळ होतें. १९३५ मध्यें मॅकेंझी किंग याच्या नेतृत्वाखालीं पुन्हां लिबरल पक्ष सत्तारूढ झाला तो अद्यापि आहे. गेल्या महायुद्धांत कानडानें दोस्त राष्ट्रांना चांगली मदत केली.

**कानडा, उत्तर**—मुंबई, दक्षिण भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३९४५ चौ. मै., लो. सं. ४,४१,१५७. बालाघाट व पायनघाट असे या जिल्ह्याचे दोन भाग झाले आहेत. उत्तरेकडे काळी नदी, मध्यभागांत गंगावली आणि ताद्री व दक्षिणेकडे शरावती या नद्या आहेत. शरावती नदी होनावरच्या पूर्वेस ३५ मैलांवर ८२५ फूट उंचीच्या कड्यावरून उडी घेते. हा धबधबा 'गिरसप्पाचा धबधबा' म्हणून जगप्रसिद्ध आहे. या जिल्ह्यांत जंगल विपुल आहे. सागवान, बांबू, वगैरेचीं जंगलें आहेत. कारवार, कुमठा, अंकोला आणि होनावर या भागांत दारू नारळाच्या झाडापासून काढतात. वाघ, चित्ते, अस्वलें, बिबट, हरणें, वगैरे वन्य प्राणी या जिल्ह्यांत विपुल आहेत. किनाऱ्यावरील हवा दमट असून निरोगी आहे. कारवार येथें सरासरी ११९ इंच पाऊस पडतो.

इतिहास— ख्रिस्ती शकापूर्वी ३ ऱ्या शतकांत अशोकानें बनवासी येथें बौद्ध धर्माचे प्रचारक पाठविले होते. हा भाग निरनिराळ्या काळीं बनवासीचे कदंब, रट्ट, पश्चिमेकडील चालुक्य व यादव या राजांकडे होता. जैन धर्माचें हें बरींच वर्षे अभेद्य स्थान होतें. १६ व्या शतकांत ज्या वेळीं पोर्तुगीझ लोकांनीं आपली सत्ता किनाऱ्यावर प्रस्थापित केली, त्या वेळीं हा भाग विजयानगर राज्यांत होता. इ. स. १६७५ च्या सुमारास मराठ्यांचा ताबा या भागावर होता. हा प्रदेश व हैदराकडून जिंकलेला किनाऱ्यावरील मुलूख मद्रास इलाख्यास इ. स. १७९९ सालीं जोडला. बनवासी, गिरसप्पा आणि भटकळ येथील जुनीं जैन देवळें पाहण्यासारखीं आहेत. गिरसप्पाजवळ नगरबस्तिकेरे येथें कांहीं जैन देवळें आहेत. गोकर्ण येथील हिंदु देवालयें १५ व्या शतकांतील आहेत. भटकळ, बनवासी आणि गिरसप्पा येथें बरेच शिलालेख सांपडले आहेत. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण कारवार असून कुमठा, भटकळ, होनावर आणि सिरसी हीं प्रमुख गावें होत. भात, नाचणी, मूग, उडीद हीं मुख्य पिकें आहेत. किनाऱ्यावर, नारळ, सुपारी यांच्या बागा आहेत. या भागांत जंगल अगदीं दाट आहे. खैर, हेद, शिसव, धावडा, काजू, अबनूस, जांभूळ, एरंड, चिंच, साग हीं मुख्य

झाडें आहेत. कुमठा व बनवासी येथें चंदनावर खोदकाम करणारे कारागीर आहेत. अंकोला तालुक्यांत मिठागरें आहेत. खिस्ती शकाच्या पूर्वीपासून भटकळ आणि होनावर हीं बंदरें लोकांस माहीत आहेत. येथून तांदूळ, इमारतीचें लांकूड, नारळ व मसाल्याचे जिन्नस बाहेर जातात. येथें पावसाळा नियमित असल्याकारणानें कधीं दुष्काळ पडत नाहीं. या जिल्ह्यांत ८ गांवें व १२८१ खेडीं आहेत. सुपा पेट्यांत उळवी येथें कांहीं लिंगायत लेणीं असून बसवाची एक विहीर आहे.

**कानडा, दक्षिण**—मद्रास, उत्तरेकडचा एक जिल्हा. क्षे. फ. ४,०४५ चौ. मै.. परशुरामानें समुद्रापासून ही जमीन मिळविली अशी दंतकथा आहे. भूस्तरशास्त्रदृष्ट्या देखील या भागावर पूर्वी समुद्र होता असें ठरतें. या भागांत नद्या पुष्कळ आहेत. पावसाची सरासरी १४५ इंच आहे. नारळ, सुपारी, आंबे, फणस हीं झाडें विपुल असून विड्याचीं पानें, केळीं, हळद, मिरच्या, वगैरे बागायती पिकें या भागांत होतात. येथील हवा दमट आहे. वाघ, चित्ता, गवा, सांबर, इत्यादि वन्य प्राणी आहेत.

इतिहास—कांचीच्या पल्लवांच्या राज्यांत हा भाग मोडत होता असें शिलालेखांवरून दिसतें. कांची हें अर्वाचीन चिंगलपूट जिल्ह्यांतील कांजीवरम् होय. या पल्लवांची राजधानी वातापी म्हणजे मुंबई इलाख्यांतील विजापूर जिल्ह्यांतील बदामी नांवाचें शहर होतें. सहाव्या शतकाच्या सुमारास द्वारसमुद्राच्या—म्हैसुरांतील अर्वाचीन हळेबीड—होयसळ बल्लाळांनीं हा प्रदेश पादाक्रांत केला. १५ व्या शतकांत पोर्तुगीझ लोक पश्चिम किनाऱ्यावर वसाहत करूं लागले. इ. स. १७९९ सालीं टिपू लढाईत मरण पावल्यावर या प्रांताचें लुटालुटीमुळें अत्यंत नुकसान झालें. या सालीं झालेल्या तहांत हा भाग ब्रिटिशांकडे आला. करकळ, मुडबिद्री, आणि येन्नूर, वगैरे ठिकाणीं जैनांचे पुष्कळ अवशेष आहेत. हे अवशेष तीन प्रकारचे आहेत: (१) बेटे—यांत मोठमोठ्या मूर्ती असून त्यांच्याभोंवतीं एक भिंत असते. (२) बस्ति—जैन देवळें. (३) स्तंभ. हा जिल्ह्याचे पांच तालुके आहेत. या जिल्ह्यांतच हिंदी महासागरांतील अमिनादिवी बेटांचा अंतर्भाव होतो. येथील बहुतेक प्रदेश डोंगराळ व जंगलमय आहे. लो. सं. (१९४१) १५,२७,५१६ आहे. एकंदर लोकवस्तींत शें. ८१ हिंदू, शें. ११ मुसलमान, शें. ७ खिश्चन आणि शें. १ जैन यांची वस्ती आहे. भात, नारळ व सुपारी हीं मुख्य पिकें आहेत. नेलावती नदींत व इतर ठिकाणीं मडकीं व कौलें करण्यायोग्य माती आढळते. सोनें व लालडी (गार्नेट) हे खनिज पदार्थ एकदोन ठिकाणीं सांपडतात. या जिल्ह्यांत कौलें बनविणें, काथ्याचे दोर वळणें, किनाऱ्यावर मासे खारवणें हे धंदे चालतात. मासे खारवणें या धंद्यास सरकारचा कर माफ आहे. येथून कॉफी, कौलें, नारळ, सुपारी, तांदूळ, खारलेली मासळी, इमारती लांकूड व मसाल्याचीं द्रव्यें, इत्यादि, माल बाहेर जातो. मंगळूर हें या भागांतील प्रमुख बंदर असून येथून बहुतेक व्यापाराची ने-आण होते. म्हैसूर संस्थानांतून चंदन आणून उडिपी तालुक्यांत त्याचें तेल काढतात. येथें पाऊस भरपूर पडत असल्यामुळें दुष्काळाचा उपद्रव या जिल्ह्यास कधीं होत नाहीं.

**कानडी वाङ्मय**—कानडी ही तामिळी, तेलगू आणि मल्याळम् भाषांशीं नातें असलेली आणि त्यामुळें द्राविड भाषाकुलांत मोडणारी भाषा होय. गोंव्यापासून गंगातीरावरील राजमहालापर्यंत एक रेषा काढल्यास तिच्या दक्षिणेकडील भाग द्राविड भाषांनीं व उत्तरेकडील भाग आर्य भाषांनीं व्यापला आहे असें दिसून येईल. बलुचिस्तानांतील ब्राहुइ ही एक किरकोळ भाषा वगळल्यास जगांत द्राविडी भाषांशीं निकट संबंध असणाऱ्या दुसऱ्या भाषा मुळींच आढळून येत नाहींत. गोंव्याची भाषा ही देखील कानडीशीं थोडी संबद्ध आहे.

कानडी बोलणाऱ्या लोकांची संख्या एक कोटी वीस लक्ष आहे. ही भाषा बोलणाऱ्यांचा प्रदेश म्हणजे सबंध म्हैसूर संस्थान, निजामी राज्याचा पश्चिमार्ध, मुंबई इलाख्यांतील दक्षिण जिल्हे, आणि मद्रास इलाख्यांतील उत्तर कानडा व बल्लारी हे जिल्हे इतका मिळून आहे. खोदीव लेख, बखरी, स्थानिक नांवें, इत्यादि पुराव्यांवरून कोल्हापूर एके काळीं कानडी हद्दींत होतें असें दिसतें. याचप्रमाणें सोलापूर शहर व जिल्हा यांतून पुष्कळ कानडी खोदीव लेख आढळून येतात.

कानडी भाषा—कानडी लिपींत १६ स्वर आहेत. मात्र ऐ व आ हे अधिक असून ऌ मुळींच नाहीं. मराठींतील सर्व व्यंजनेंहि आहेत. तेलगू व कानडी लेखनलिपि एक असून ती पश्चिम हिंदुस्थानांतल्या लेण्यांवरील दक्षिण अशोकी लिपीपासून निघालेली आहे. बहुतेक सर्व अमूर्त, धार्मिक, शास्त्रीय व तत्त्वज्ञानविषयक संज्ञा संस्कृत आहेत. संस्कृत ही कानडीची आई नसली तरी दाई खास आहे, असें जें म्हणण्यांत येतें त्यांत पुष्कळ तथ्य आहे. कारण संस्कृतनें तिच्या ठिकाणीं तेज घातल्यानें तर ती वाङ्मयभाषा होण्याला योग्य झाली.

कानडी वाङ्मयाचे कालविभाग—हे विभाग चार आहेत: (१) १२ व्या शतकाच्या मध्यापर्यंत निव्वळ जैन वाङ्मय होतें. या भागांतील जैन आचार्यांनीं जैन संप्रदायाचें वैशिष्ट्य स्थापन करण्यांत जितकी खटपट केली तितकी इतर कोणत्याहि भागांतील आचार्यांनीं केली नाहीं. (२) इ. स. ११६० सालापासून म्हणजे बसवाचार्यांनीं जुन्या वीरशैव उर्फ लिंगायत धर्माचा

पुनरुद्धार केला तेव्हांपासून लिंगायत वाङ्मयास सुरुवात झाली. जैन वाङ्मयापेक्षां हें वीरशैव वाङ्मय अधिक विस्तृत आहे. (३) वैष्णव धर्मी कानडी वाङ्मयाचा काल १५०८ पासून सुरू होतो. (४) अर्वाचीन वाङ्मय ब्रिटिश सत्ता स्थापन झाल्यानंतर पाश्चात्य विचारांचा आघात होऊन तयार होऊं लागलें. जैन वाङ्मय चंपूरूपांत म्हणजे गद्यपद्यांत आहे. लिंगायत वाङ्मय बहुतेक गद्यरूपांत असून अर्वाचीन वाङ्मयहि बहुतेक तसेंच आहे.

कानडी वाङ्मयाला आश्रय देणारीं राजघराणीं व राजधानीचीं शहरें येणेंप्रमाणें:—इ. स. ४००–५५०–वनवासी (कदंब); वातापी (पहिले पल्लव); तलकाड (गंग). इ. स.५२०-८२०–वातापी (चालुक्य आणि राष्ट्रकूट); तलकाड. इ. स. ८२०–१०४०–तलकाड, मान्यखेट (राष्ट्रकूट). इ. स. १०४०–१३१२–कल्याणी (पश्चिम चालुक्य); द्वारसमुद्र (बल्लाळ). इ. स. १३१२–१५६५–विजयानगर. इ. स. १५६५–म्हैसूर. आज म्हैसूर संस्थानांत कानडीला मोठाच राजाश्रय आहे. तेथील कानडी शुद्ध स्वरूपांत राहिली आहे.

आद्य वाङ्मय— कन्नड म्हणजे कानडी भाषेचें मूळ स्वरूप हळेबिडी येथील ४५० व ५०० च्या दोन शिला-लेखांत दिसून येतें. भारतांतील कोणच्याहि इतर देशभाषेंत इतका प्राचीन नमुना सांपडत नाहीं. अस्तित्वांत असलेलें पहिलें कानडी पुस्तक म्हणजे 'कविराजमार्ग' हें इ. स. ७०० च्या सुमारास लिहिलेलें आहे. तें नृपतुंग (८०८–८८०) या राष्ट्रकूट राजानें प्रसिद्धीस आणलें. राजशास्त्र हा त्याचा विषय आहे. त्यांत पूर्वींच्या कांहीं कन्नड गद्यपद्य ग्रंथकारांचीं नांवें दिलीं आहेत. जैनांच्या लोककथा, तत्त्वज्ञान व धर्म यांवर दुर्विनीत, विमलोदय व नागार्जुन यांनीं ग्रंथ लिहिले असावेत असें दिसतें. चूडामणि नांवाच्या जैन ग्रंथावर केलेल्या एका टीकेचा उल्लेख आहे. एक जैन रामायणहि होतें.

चंपूंचा कालखंड (९००–१२००)— या काळांत कन्नड म्हणजे कानडी भाषेला संस्कृताच्या वळणावर नेण्यांत आलें. गद्यपद्यमिश्रित अशीं चंपूकाव्यें रचण्यांत आलीं. त्यांचे विषय रामायण, भारत किंवा जैन कथा यांतून घेत असत. पंप (स. ९४१) हा पहिला चंपूकवि. त्याच्या 'विक्रमार्जुनविजय' काव्यांत वाच्यार्थानें अर्जुनाचे पराक्रम वर्णन केले आहेत. परंतु व्यंग्यार्थानें आपला आश्रयदाता राजा अरिकेसरी याचा जयजयकार केला आहे. 'आदिपुराण' या पंपाच्या दुसऱ्या ग्रंथांत संस्कृत वळणाचें चंपूकाव्य व जैनपुराण यांचें मिश्रण असून त्यांत पहिल्या तीर्थंकराचें चरित्र वर्णिलें आहे. या दोन काव्यांत वीर व शांत रस अनुक्रमानें प्रधान आहेत. पंप हा कर्नाटकाचा फार मोठा कवि, तसाच रणांगणावर गाजलेला योद्धाहि होता. याच वेळीं पोन्न (इ. स. ९५०) यानें 'रामकथा' व 'शांतिपुराण' हीं काव्यें लिहिलीं. रण्ण यानें 'गदायुद्ध' व 'अजितपुराण' लिहिलें. नागचंद्र (११००) यानें 'रामचंद्रचरितपुराण' व 'मल्लिनाथपुराण' लिहिलें. पहिल्या काव्यांत जैन पद्धतीनें रामचरित कथन केलें आहे.

चावुंड राजाचें (इ. स. ९७८) 'चावुंडराजपुराण' हा कन्नड भाषेंतील पहिला सर्वमान्य गद्य ग्रंथ आहे. नागवर्मा (पहिला) यानें 'कादंबरी' व 'छंदोंबुधि' हे दोन ग्रंथ लिहिले (इ. स. ९९०). पहिल्यांत बाणाची कादंबरी कानडींत दिली आहे व दुसऱ्यांत छंदःशास्त्राचें विवरण आहे. नागवर्मा (दुसरा) (इ. स. ११४५) यानें 'काव्यालोकन' व 'वस्तुकोश' असे दोन ग्रंथ केले. पहिल्यांत काव्यशास्त्राची चर्चा आहे व दुसरा कोश आहे.

भिन्न प्रवाहाचा काळ— बाराव्या शतकांत संस्कृतप्रचुर भाषा व काव्यरचना यांविरुद्ध पुष्कळ ठिकाणीं बंडाची भूमिका उत्पन्न झाली. न्यायसेन या जैन ग्रंथकारानें सोप्या कानडींत गोष्टी लिहिल्या. वीरशैव पंथाच्या उगमापासून ही प्रवृत्ति जास्तच चळावली. बसवेश्वराला व त्याच्या अनुयायांना आपल्या नवीन मतांचा प्रसार सर्वसाधारण लोकांत करण्याकरितां अगदीं सोपी भाषा वापरणें जरूरच झालें. यांतूनच कन्नड भाषेंत 'वचनवाङ्मय' नांवाचें गद्य लिखाण उत्पन्न झालें. या वचनकारांत बसव, अलंप्रभु व अक्कमहादेवी हे महनीय आहेत. बसवाचा भक्तीवर, अलंप्रभूचा ज्ञानावर व अक्कमहादेवीचा परमेश्वरप्रेमावर विशेष भर होता. हें 'वचन'-वाङ्मय म्हणजे तत्त्वज्ञानाचीं गद्य गाणीं होत. कन्नड वाङ्मयाचा हा इतरत्र न सांपडणारा विशिष्ट प्रकार आहे.

बाराव्या शतकाच्या अखेरीस रगळे या षट्पदीसारख्या शुद्ध कानडी छंदामध्यें हरिहर व राघवांक यांनीं काव्यलेखनास आरंभ केला. यांनीं छंद व काव्यरचना यांत नवीन युग सुरू केलें. हरिहर यानें बसव व इतर शिवभक्त यांचीं चरित्रें काव्यग्रथित केलीं. राघवांक याचें कथा-कथनकौशल्य फार उत्कृष्ट होतें. त्याच्या 'हरिश्चंद्र काव्य' या ग्रंथाला कोणच्याहि भारतीय भाषेंत जोड नाहीं. रुद्रभट्ट (सु. ११८०) पहिला भक्तिमार्गी ब्राह्मण कवि असून त्यानें विष्णुपुराणांतील एका कथेवर अलंकारिक भाषेमध्यें एक चंपूकाव्य लिहिलें आहे. जन्न (सु. १२००) यानें प्रेम व विषयासक्ति यांच्या कटुमय परिणामांविषयीं जोरदार भाषेंत विवेचन केलें आहे. केशिराज (सुमारें १२६०) यानें बरींच काव्यें व 'शब्दमणिदर्पण' नांवाचें प्रमाणभूत कन्नड व्याकरण केलें आहे.

लिंगायत पंथाचा संस्थापक बसव याची या काळाच्या वाङ्मयावर फार मोठी छाप पडली आहे. पंप हा सनातनी वाङ्मयाचा जसा मोठा आधार, तसा बहुजनसमाजाच्या विचारप्रवृत्तीचा बसव हा प्रतिनिधि होता. त्याचीं 'वचनें' हीं अति सोप्या भाषेंत कळकळीनें भरलेलीं फार भव्य व विचारपूर्ण अशीं आहेत.

ऐश्वर्याचा काळ (इ. स. १३३६–१५६५)— विजयानगर साम्राज्य पूर्ण भरभराटीमध्यें होतें. त्याच्या कृपाछत्राखालीं सर्व पंथांच्या कवींनीं कन्नडवाङ्मय समृद्ध केलें. कुमार व्यास (सुमारें १४३०) यानें महाभारताचीं १० पर्वें भामिनी षट्पदी या शुद्ध कानडी वृत्तामध्यें रचिलीं. स्वभावरेखन, कथानक-कौशल्य व भाषासौंदर्य या गुणांमुळें या कवीस कन्नड भाषेंतील प्रमुख कवीचें स्थान मिळालें आहे. मानवी जीवनांत ईश्वरी शक्तीचा किती प्रभाव असतो हें याच्या भारतांतील कृष्ण व पांडव यांच्या स्वभावरेखनावरून दिसतें. कुमार वाल्मीकि (सुमारें १५००) हा दुसरा एक ब्राह्मण महाकवि होऊन गेला.

व्यासराज याचे शिष्य पुरंदरदास व कनकदास यांनीं भक्तिमार्गीय पुष्कळ पद्यें लिहिलीं व 'दासकूट' या वाङ्मय प्रकाराची स्थापना केली. त्यांनीं साध्या कानडींत काव्यरचना करून ईश्वरभक्तीचा संदेश अगदीं अडाणी लोकांपर्यंत पोंचविला. लक्ष्मीश (सुमारें १६००) याचें षट्पदी वृत्तांतील 'जैमिनी भारत' हें कन्नड भाषेंतील अतिशय लोकप्रिय असें आख्यानक काव्य आहे व त्याची रचना व भाषा फार मनोरम आहे. याच सुमारास वीरशैव संत व कवी यांचीं पुष्कळ चरित्रें लिहिण्यांत आलीं. त्यांपैकीं चामरसाचें 'प्रभुलिंगलीले' हें विशेष वाचनीय आहे. लक्कण्ण दंडेश, (सु. १४७०), निजगुण शिवयोगी (सु. १५००) व विरूपाक्ष पंडित (इ. स. १५८४) हे प्रमुख वीरशैव लेखक होते. भंगरस, शाल्व (इ. स. १५५०) आणि रत्नाकर वर्णी (इ. १५५०) हे तत्कालीन जैन कवी होत. संगत्य वृत्तांतील 'भरतेश वैभव' हा रत्नाकराचा मुख्य ग्रंथ होय. हें कन्नडमधील अतिसुंदर काव्यांपैकीं एक आहे. त्यांत मानवी जीवनाविषयीं खोल विचार आहेत व भाषा सोपी परंतु प्रभावी आहे. संगत्य वृत्त पूर्वी अशिक्षित लोकच वापरीत. त्यांतच रत्नाकरानें अत्युच्च काव्य-कल्पना ग्रथित केल्या. या काळांत चंपूपद्धति मागें पडून षट्पदी व संगत्य हे नवीन छंद लोकप्रिय झाले.

१७ व्या शतकांत जुनी संस्कृतप्रचुर चंपूकाव्यपद्धति पुनः पुढें आली. म्हैसूरराजाश्रित तिरुमलराय व चिक्कुपाध्याय यांनीं श्रीवैष्णव पंथाच्या कथा, चरित्रें आणि तत्त्वज्ञान कानडीमध्यें काव्यनिविष्ट केलें. तिरुमलरायानें आपला धनी चिक्कदेवराय याची स्तुति काव्यांत केली आहे. सर्वज्ञ या कवीनें त्रिपदी (तीन ओळींच्या) वृत्तामध्यें कन्नड देशांतलें ज्ञान आणि विनोद चटकदारपणें ग्रथित केला आहे. १८ व्या शतकांत यक्षगान म्हणजे ग्रामनाट्यें प्रसिद्धीस आलीं. १९ व्या शतकाच्या शेवटीं मुद्दण्णा यांनीं रामाश्वमेध ही कादंबरी लिहिली. हिच्यांत मानवी व दैवी प्रेमाचें चित्र आहे. तसेंच रामचरित्रांतील एका भागावर गद्यमहाकाव्यहि आहे. मुद्दण्णा हे प्राचीन परंपरेचे शेवटचे लेखक होत. कन्नड भाषेंत लोककाव्यें व पोवाडे हीं असंख्य आहेत. विशेषतः तीन ओळींच्या त्रिपदी छंदांत कन्नड स्त्रियांचीं सुखदुःखें व गृहस्थिति यांचें सुंदर वर्णन आहे. बायकांच्या जात्यावरील गाण्यांतहि पुष्कळदां विलक्षण विनोद व व्यावहारिक ज्ञान सांपडतें.

अर्वाचीन काळ—चालू शतकाच्या पहिल्या २५ वर्षांत वृत्तपत्रें, भाषांतरें व रूपांतरें यांद्वारें पुष्कळ वाङ्मयवृद्धि झाली. त्यानंतर अर्वाचीन जगांतील स्वतंत्र लेखनाचे सर्व प्रकार कानडीमध्यें सुरू झाले. भावगीतांच्या प्रदेशांत गुंडाप्पा, श्रीकंठय्या, मास्ती, पंजे, बेंद्रे, शाली, आनंदकंद, सीतारामय्या, मधुरचेन्न, पुट्टाप्पा, नरसिंहाचार, राजरत्न, शंकरभट्ट, विनायक, रसिक रंगे यांचीं नांवें उल्लेखनीय आहेत. लघुकथेच्या क्षेत्रांत केरूर, पांजे आणि मास्ती हे प्रमुख आहेत. आनंद, आनंदकंद, कृष्णकुमार व ए. एन्. कृष्णराव यांचीं नांवेंहि उल्लेखनीय आहेत. कादंबरीकार म्हणून पुढील नांवें प्रसिद्ध आहेतः— केरूर, गळगनाथ, वेंकटाचार, पुट्टण्णा, कारंत, कृष्णराव, आनंदकंद, पुट्टाप्पा, गोकाक, इ. हुइलगोळ आणि केरूर यांनीं सामाजिक नाट्यरचनेला सुरुवात केली. म्हैसूरचे टी. पी. कैलासम् हे प्रचलित कानडींत नाट्यमय समाजचित्रें रंगविण्यांत कुशल आहेत. यांचीं सामाजिक नाटकें कोणत्याहि भाषेंतील नाटकांस मागें सारतील. त्यांचें तंत्र, स्वभावरेखन, विनोद, इ. गुण खरोखर आश्चर्यकारक आहेत. आर्. व्ही. जाहागिरदार हे आपल्या नाटकांत समाजाचें दोषदर्शन करवून सुधारणामार्ग दाखवितात. कारंत, कस्तूरी व शंस हेहि उत्तम नाटककार आहेत. एकांकी नाटकें कामत कृष्णराव, एन्. के. कुलकर्णी, बेंद्रे व श्रीरंग यांनीं लिहिलीं आहेत. कारंत यांनीं संगीत नाटकें व छाया नाटकेंहि केलीं आहेत. ए. एन्. मूर्तिराव हे प्रसिद्ध निबंधलेखक आहेत. वाङ्मयटीका, चरित्रें व शास्त्रीय वाङ्मय यांत मंदपणेंच कार्य चालू आहे. सर्व विषयांचें ज्ञान देणारीं सोप्या भाषेंत लिहिलेलीं पुस्तकें प्रकाशित करण्याचें काम म्हैसूर विद्यापीठानें चालविलें आहे. प्रो. गोकाक यांचीं काव्यें—कलोपासक, पायन, वन आणि मन, मातृभूमिगान, जीवनगान, इ. इ.—फार उच्च विचारांनीं परिपूर्ण आहेत. प्रो. मुगळी यांच्या वाशिक, चटक, सह्याद्रि, मुंबई, नवयुगमयूर, इ. काव्यांवरून त्यांचें भाषासौंदर्य व विचारगांभीर्य

दिसून येतें. प्रो. बेंद्रे यांनीं आपल्या विस्तृत व विविध प्रकारच्या काव्यनिर्मितीनें काव्यलेखनाचें उच्च शिखर गांठलें आहे. लघुकथा लिहिण्यांत गौराम्मा, कल्याणअम्मा, श्यामला, करंत, जयलक्ष्मी, इ. स्त्री-लेखकांनीं यश मिळविलें आहे.

**कानपूर**—हिंदुस्थान, संयुक्त प्रांतांतील अलाहाबाद विभागाच्या उत्तरेकडील जिल्हा. क्षे. फ. २,३७२ चौ. मैल. जमीन एकसारखी सपाट असून ठिकठिकाणीं लहान लहान ओढे आहेत. नद्यांचीं नांवें इसान, पांडु, रिन्ह, सेंगर हीं होत. बहुतेक सर्व भागांत कंकर सांपडतो. ढाक नांवाचें मोठें जंगल असून त्यांत चित्ते, रानडुकरें, वगैरे जनावरें आहेत. पाऊस सरासरी ३३ इंच पडतो. ह्या जिल्ह्यांत ६ शहरांचा व १९६२ खेड्यांचा समावेश होतो. लो. सं. १५,५६,२४७. शेंकडा ९० लोक हिंदू आहेत. प्रचारांतील भाषा कनोजिआ. ब्राह्मण, चांभार, अहीर, रजपूत, लोध, कुर्मी, कोरी, बोरीआ, इत्यादि जातींचे लोक आहेत. शें. ६२ लोक शेतकीवर उपजीविका करतात. एकंदर जमीन फार सुपीक आहे. यांत ४,३३५ जमीनदाऱ्या असून ९५७ पातीदाऱ्या आहेत. तहशिलीचें क्षे. फ. २७९ चौ. मै. असून लो. सं. सुमारें तीन लाख आहे. यांत २२६ खेडीं असून कानपूर व बिठूर हीं दोन शहरें आहेत.

कानपूर हें गंगानदीच्या उत्तर तीरावर वसलेलें असून प्रयागाच्या गंगायमुनांच्या संगमापासून वर १२० मैल आहे. १९४१ सालीं लोकसंख्या ४,८७,३२४ होती. याचें पौराणिक नांव कर्णपूर असें असून कर्ण येथें राहत होता असें म्हणतात. या स्थलीं कर्णतीर्थ म्हणून भागीरथीतीरीं एक तीर्थ असून तेथून ब्रह्मावर्त ६ कोस लांब आहे. ८ व्या शतकाच्या सुरुवातीस कानपूर म्हणजे कन्हय्यापूर नांवाचें खेडें होतें. १८५७ सालच्या बंडांत कानपूरचा बराच संबंध येतो व या बंडाचीं स्मारकें या शहरांत दिसतात. १८७१ पासून कानपूर येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें उद्योगधंदे व व्यापार मोठा चालतो. कापडाच्या गिरण्या आहेत. विटा व कौलें यांचे कारखाने, आगपेट्यांचे, अशांचे व रासायनिक कारखाने चालतात. यांशिवाय दळणाच्या, बर्फाच्या, लोखंडी कामाच्या, साखरेच्या, कातडीं कमावण्याच्या, वगैरे पुष्कळ प्रकारच्या गिरण्या व कारखाने कानपुरांत आहेत. सूत काढणें, विणणें व जोडे, वगैरे चामड्याचा माल तयार करणें हे येथील तीन मुख्य उद्योगधंदे आहेत. त्याचप्रमाणें लोखंडी सामान, उंची कपडा, साखर, इत्यादि मालहि तयार होतो. उच्च शिक्षणाकरितां येथें सहा आर्ट्स कॉलेजें, दोन लॉ कॉलेजें, शेतकी कॉलेज, दोन व्यापारी कॉलेजें, कांहीं औद्योगिक-व्यावसायिक शिक्षणसंस्था व सामान्य हायस्कुलें आहेत. मुलींच्याहि बऱ्याच शाळा आहेत. हिंदी, ऊर्दू व इंग्रजी नियतकालिकें निघतात. चांगलीं आठ-दहा वाचनालयेंहि आहेत.

**कानफाटे**—हा शैव यतींचा एक पंथ आहे. कानाचा खालचा भाग चिरून त्यांतून मोठीं कर्णभूषणें घालण्याच्या त्यांच्या पद्धतीवरून त्यांना 'कानफाटे' हें नांव पडलेलें आहे. त्यांना गोरखपंथी अगर दर्शनी अशींहि नांवें आहेत. या पंथाचे अनुयायी गोरखनाथाच्या पूर्वी या पंथाचा उदय झाला असें मानतात. कानफाटे हे पूर्वी शंकराचार्यांच्या अनुयायीवर्गांतच मोडले जात असत. पण यांनीं मद्यसेवन करण्याचें सुरू केल्यामुळें यांना बहिष्कृत करण्यांत आलें. 'गोरखबोध' हा या पंथाचा मुख्य तत्त्वज्ञानपर ग्रंथ हिंदींत असून त्यांत ६० पद्यें आहेत. कानफाटे लोक सर्व हिंदुस्थानभर पसरलेले आहेत. गोमांस व डुकराचें मांस खेरीजकरून सर्व प्रकारचें मांस, मद्य, अफू, इत्यादि संन्यासधर्मनिषिद्ध वस्तूंचें सेवन करतात. या पंथांतील प्रापंचिक लोक सावकारी, विणकाम, शेतकी, शिपाईगिरी, इत्यादि धंदे करतात. या लोकांची शूरत्वाबद्दल ख्याति आहे. कच्छच्या रणामध्यें कानफाट्यांची पुष्कळ वस्ती आहे. उ. हिंदुस्थानांतील व द. हिंदुस्थानांतील कानफाटे हे पुजाऱ्याचाहि धंदा करतात. डोंगराळ प्रदेशांत राहणारे कानफाटे हे मंत्रतंत्रांवर उपजीविका करतात. मृत मनुष्यांना पुरण्याची चाल यांच्यांत आढळून येते. महाराष्ट्रांतहि बरेच कानफाटे आहेत व अद्यापहि होताहेत.

**कानाझावा**—हें जपानांत वायव्य किनाऱ्यानजीक टोकिओच्या वायव्येस मोठें शहर आहे. येथील लोकसंख्या १,६३,७३३ आहे. येथें रेशमी कापड आणि चिनी मातीचीं भांडीं यांचे कारखाने आहेत.

**कॉनॉट, अर्थर ड्यूक ऑफ** (१८५०-१९४२)—हा व्हिक्टोरिया राणीचा तिसरा राजपुत्र असून त्याचा विवाह प्रशियाच्या राजकन्येबरोबर १८७९ मध्यें झाला. त्यानें कानडा, ईजिप्त व हिंदुस्थान या देशांतील नोकरवर्गाची पाहणी केली. १९११ ते १९१६ पर्यंत तो कानडाचा गव्हर्नर-जनरल होता. १९२० मध्यें त्यानें हिंदुस्थानला भेट दिली व १९२१ मध्यें नव्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचा उद्घाटन-समारंभ याच्याच हस्तें झाला.

**कॉनॉट, प्रिन्स अर्थर** (१८८३-१९३८)—वरील ड्यूकचा मुलगा. याचा विवाह प्रिन्सेस रॉयल हिची कन्या अलेक्झांड्रा हिच्याबरोबर १९१३ सालीं झाला. तो १९२० ते १९२३ पर्यंत दक्षिण आफ्रिकेचा गव्हर्नर जनरल व कमांडर-इन-चीफ होता.

**काननोर**—मद्रास इलाख्यांत मलबार जिल्ह्यांतील चिरक्कल तालुक्याचें मुख्य ठिकाण. ऐतिहासिकदृष्ट्या व व्यापारीदृष्ट्या हें महत्त्वाचें गांव असून येथें सरकारी कचेऱ्या, तुरुंग,

तसेंच बारीक सुताच्या व कापडाच्या गिरण्या आहेत. येथें १५ व्या शतकापूर्वी एक मुसलमानी राजधानी होती. येथें पोर्तुगीझांनीं किल्ला बांधला तो कांहीं काळ पोर्तुगीझ व त्यानंतर डच यांच्या ताब्यांत होता. हा किल्ला, अरक्कल राजवाडा व तुरुंग हीं ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. येथें उत्तम बंदर असल्यामुळें प्राचीन काळापासून हें समुद्रावरील परदेशी व्यापाराचें मोठें ठिकाण होतें. आजहि सुंदर व टिकाऊ कापडाकरितां कानानोर प्रसिद्ध आहे. हें मलबारांतील लष्करी ठिकाण आहे.

**कानिटकर, नारायण बापूजी** (१८५२–१८९७)—एक महाराष्ट्रीय नाटककार. हे पुण्यास वकिली करीत व सार्वजनिक कामांत पुष्कळ भाग घेत. यांनीं सामाजिक व ऐतिहासिक अशीं बारा नाटकें लिहिलीं. सुधारकांवर यांचा मोठा कटाक्ष असे. यांच्या 'तरुणी–शिक्षण' नाटिकेनें फार खळबळ उडवून सोडली होती. यांची भाषा ओघवती असे व लेखनशैली परिणामकारक होई.

**कानीफनाथ**—नवनाथांपैकीं एक व जालंदरनाथाचा शिष्य. हा भद्र देशच्या सुरथ राजाचा पुत्र. हा जातीचा क्षत्रिय होता. याच्या आईचें नांव भामिनी होतें. हा पुत्र सुरथ राजाला जालंदरनाथाच्या प्रसादानें झाला व पुढें राज्य न करतां जालंदराचा शिष्य होऊन त्याबरोबर वैराग्यवृत्तीनें हिंडूं लागला. गोपीचंदानें जालंदरास लिदींत पुरलें असतां यानें तेथें जाऊन त्यास काढिलें व गोपीचंदास अमर केलें.

**कानो**—पश्चिम आफ्रिकेंतील उत्तर नायगेरिआ देशांतील कानो नांवाच्या प्रांताचें हें राजधानीचें शहर आहे. हुआसा नांवाच्या लोकांचें हें मूळ शहर आहे. येथील राजा एमिर येथें राहतो. तो ब्रिटिश संरक्षणाखालीं या प्रान्तावर राज्य करतो. हें शहर व्यापाराची महत्त्वाची पेठ आहे. या शहराची लोकसंख्या ८०,६३४.

कानो प्रांताचें क्षेत्रफळ २८,६०० चौ. मैल. व लोकसंख्या ३५,००,००० आहे.

**कानौद**—पंजाब, पतियाळा संस्थान. मोहिंदरगड निझामतीचें आणि तहशिलीचें मुख्य ठिकाण असून दारीच्या दक्षिणेस चोवीस मैलांवर आहे. लो. सं. बारा हजार. हें गांव बाबरचा नोकर महमूदखान यानें वसविलें. कनोदिया नांवाच्या ब्राह्मणांनीं येथें प्रथम वसाहत केली म्हणून या गांवास हें नांव पडलें. सन १८६१ त ब्रिटिश सरकारनें पतियाळाच्या महाराजास कानौद व कुधुआना हे परगणे दिले. कानौद जिल्ह्याचें नांव मोहिंदरगड असें आहे.

**कान्ट, इम्यान्युएल** (१७२४–१८०४)—हा जर्मन तत्त्वज्ञानी कोनिग्जबर्ग येथें जन्मला. त्याच्या बापाचा धंदा कातड्याच्या वाद्या करण्याचा होता. त्याची आई फार भाविक होती. १६ व्या वर्षी मॅट्रिक होऊन ७ वर्षें युनिव्हर्सिटींत त्यानें अभ्यास केला. प्रथम शिक्षकाचा धंदा त्यानें नऊ वर्षें करून १७५५ मध्यें तात्त्विक विषयावर एक स्वतंत्र ग्रंथ लिहून डॉक्टरची पदवी मिळविली. नंतर कोनिग्जबर्ग विश्वविद्यालयांत त्याला बिनपगारी शिक्षकाची जागा मिळाली व १५ वर्षें काम केल्यानंतर १७७० सालीं तत्त्वज्ञानाचा प्रोफेसर नेमलें, व मरेपर्यंत तो त्या जागेवर होता. त्याचें सारें आयुष्य अध्ययन, अध्यापन व लेखन यांत गेलें. त्यानें विवाह केला नव्हता. गणित व भौतिक शास्त्रें हे त्याचे आवडते विषय होते. त्यानें अनेक निरनिराळ्या प्रचलित विषयांवर मासिकांत लेख लिहिले; त्यांतील कांहीं लेख फारच मनोरंजक व विनोदी आहेत. १७५५ सालीं 'धरणीकंप' या विषयावर व १७६४ सालीं 'सौंदर्य व भव्यता' या विषयावर उत्तम निबंध लिहिले. ईश्वरावर त्याचा भरंवसा होता, आणि सर्व व्यवहारांत आपलें कर्तव्य बजावलें म्हणजे ईश्वराची खरी भक्ति झाली, असें त्याचें मत होतें. १७६० च्या सुमारास स्वीडनबर्ग नांवाचा इसम मृतांच्या आत्म्याशीं संभाषण करणारा म्हणून प्रसिद्धीस आला, त्यामुळें कान्टनें अतींद्रिय विज्ञानशास्त्राचा अभ्यास करून त्यावर सुरेख निबंध लिहिला. पण तत्त्ववेत्ता म्हणूनच कान्ट विशेष प्रसिद्ध असून आपल्या तत्त्वज्ञानाला 'परीक्षणात्मक तत्त्वज्ञान' असें नांव त्यानें दिलें, व त्याचें विवेचन तीन ग्रंथांत केलें; ते ग्रंथ 'शुद्ध विवेकाचें परीक्षण', 'सदसद्विवेकाचें परीक्षण' आणि 'भावनेचें परीक्षण' या विषयांवरचे होत. मनुष्याच्या नैतिक अनुभवांवरून व सौंदर्यविषयक अनुभवांवरून परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल श्रद्धा व भावना उत्पन्न होते, असें कान्टनें या ग्रंथांत प्रतिपादन केलें आहे.

**कान्यकुब्ज**—उत्तर हिंदुस्थानांतील ब्राह्मणांची ही एक शाखा असून तिचा अंतर्भाव पंचगौड ब्राह्मणांत होतो. प्राचीन कान्यकुब्ज उर्फ कनोज शहरावरून त्यांना हें नांव पडलें. कात्यायन, कश्यप, शांडिल्य, संस्कृत, उपमन्यु आणि भारद्वाज या मूळ सहा कुळांतील हे लोकच अस्सल कनोजिया ब्राह्मण होत. पट्कुल कान्यकुब्जांत एकविवाहमत रूढ आहे. ते लोक पुनर्विवाह करीत नाहींत. पट्कुलाखालोखाल पंचादरी व त्यांच्याखालीं धाकार अशा जाती आहेत. बालकीशुक्ल म्हणून पट्कुलामध्यें आगळी एक वर्ग आहे. हे लोक सुरापान करतात व 'छिन्नमस्तका' नांवाच्या देवीची उपासना करतात. उपाध्येपणाशिवाय कृषिकर्म, शिपाईगिरी, नोकरी, इत्यादि धंदे कनोजिया ब्राह्मण करतात. हे लढवय्येहि आहेत. बंगालमध्यें पांडे रेजिमेंट म्हणून कनोजियांची एक स्वतंत्र तुकडीच होती.

**कॉन्वे, सर विल्यम मार्टिन** ( १८५६-१९३७ )—एक इंग्रज कलाविषयक लेखक व प्रवासी. लिव्हरपूलच्या युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें हा कलाशिक्षक म्हणून बरींच वर्षें होता, आणि १९०१ ते १९०४ पर्यंत केंब्रिजला ललितकलांचा अध्यापक होता. त्यानें १९१८ ते १९३१ पर्यंत स्पिट्झबर्जेन, हिमालय पर्वत, व अँडीज पर्वत येथें पुष्कळ संशोधन केलें व सोराटा, इलीमनी व आकांकाग्वा, हिमालय, वगैरे उंच उंच शिखरांवर आरोहण केलें. अर्ली फ्लेमिश आर्टिस्ट्स, आकांकाग्वा अँड टेरा डेल फ्युगो, दि आल्प्स, आणि दि अॅबे ऑफ सेंट डेनीस हे ग्रंथ त्यानें लिहिले.

**कॉन्स्टन्टाइन**—अल्जीरियांमधील, कॉन्स्टन्टाइन प्रांताची राजधानी. लो. सं. १,०६,८३० ; पैकीं निम्मे युरोपियन आहेत. येथील खिंड जोडण्यासाठीं रोमन लोकांनीं पूल बांधला होता. पण १८५७ सालीं तो एकाएकीं मोडला. या शहराला एक कोट आहे. अहमद पाशानें १८३० ते १८३६ च्या दरम्यान बांधलेला प्रासाद म्हणजे १९ व्या शतकांतील मूरिश शिल्पकलेचा एक उत्तमोत्तम नमुना होय. येथील पदार्थसंग्रहालयांत प्राचीन सुंदर वस्तूंचा संग्रह आहे. कातड्यांचें व लोंकरीचें सामान तयार करणें हा येथील एतद्देशीयांचा मुख्य धंदा आहे. सिर्टा अथवा किर्था हें कॉन्स्टन्टाइनचें मूळचें नांव होय. इ. स. ३१३ त कॉन्स्टन्टाइननें याचा पुनरुद्धार केल्यामुळें या शहरास त्याचें नांव पडलें आहे.

**कॉन्स्टन्टाइन दि ग्रेट**—हा रोमन बादशहा पहिला कॉन्स्टेंटियस व फ्लेव्हिआ हेलेना यांचा अनौरस पुत्र होय. कॉन्स्टन्टाइन हा डान्यूब नदी प्रांतांतील आपल्या नोकरीवरून पळून बोलोन येथें आपल्या बापास जाऊन मिळाला. इंग्लंडमध्यें त्याचा बाप फ्रान्समधून स्वारीस जात असतां एकाएकीं वारला, तेव्हां सैन्यानें त्यालाच आपला सेनापति केलें. कॉन्स्टन्टाइननें फ्रँक लोकांविरुद्ध जय मिळविले व न्हाइन नदीकांठचीं रोमचीं ठाणीं मजबूत केलीं. पुढें रोम येथें कॉन्स्टन्टाइन व मॅक्झेमिनस हे कॉन्सल झाले. कॉन्स्टन्टाइन यानें बादशहा ही पदवी धारण केली. सासऱ्याशीं भांडण झाल्यामुळें त्यानें त्याला मॅसिला येथें कैद करून ठार मारलें. रोम येथें कॉन्स्टन्टाइननें ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. पुढें कॉन्स्टन्टाइन हा रोमन साम्राज्याचा व ख्रिस्ती धर्माचा बादशहा झाला. ३२६ मध्यें रोम येथील राजधानी हालवून त्यानें तिची कॉन्स्टँटिनोपल येथें स्थापना केली. रोम येथील सेनेटमधील बरेच बडबडे लोक पुरातन धर्माचे पक्षपाती असल्यामुळें त्यांना न दुखवितां राजधानीच बदलणें त्याला बरें वाटलें. कॉन्स्टन्टाइनला 'दि ग्रेट' ही पदवी देतात, पण तिला आवश्यक अशी बुद्धिमत्ता किंवा नीतिमत्ता त्याच्या अंगीं नव्हती.

**कॉन्स्टँटिनोपल**—युरोपांतील तुर्कस्तानची ही जुनी राजधानी आहे. मराठी बखरकार याला कुस्तुंतुनिया व मुसलमान लोक इस्तंबोल असें म्हणतात. हें शहर फार प्राचीन असून रोमप्रमाणें यांतहि टेंकाडें आहेत. हें शहर प्रथम पूर्व रोमन साम्राज्याची राजधानी ( ख्रि. पू. ३३० ते इ. स. १४५३ ) होतें. आशिया व युरोप या दोहोंच्या सांध्यावर व भूमध्य आणि काळा समुद्र या दोहोंच्या नाक्यावर हें वसलेलें असल्यानें राजकीयदृष्ट्या व व्यापारीदृष्ट्या जगांतील एकंदर बंदरांत याला बरेच वरच्या दर्जाचें महत्त्व आलें आहे. शहराभोंवतीं मजबूत तटबंदी आहे. येथें १२०३ मधील क्रुसेड ( धर्म ) युद्ध घडलें. येथील ख्रिस्ती देवळांच्या मुसलमानांनीं मशिदी बनविल्या. व्यापाराची पेठ म्हणून हें शहर प्रख्यात आहे. जुन्या बायझंटाइन राजवाड्याच्या धर्तीवर सुलतानाचे प्रचंड राजवाडे बांधले गेले. अजबखान्यांत फार प्राचीन पेट्यांचा मोठा संग्रह आहे. कलाभवन, वैद्यकशाळा, अनाथगृह, वगैरे बऱ्याच सरकारी संस्था आहेत. अनेक देशांचे, धर्मांचे, जातींचे, मापांचे, पोषाखांचे असे लोक येथें आहेत. पहिल्या महायुद्धानंतर या शहराचें महत्त्व थोडेंसें कमी झालें, कारण तुर्कस्तानची राजधानी येथून हालवून अंगोरा येथें नेली. लो. सं. ( १९४५ ) ८,४४,०१०. १९०४ सालीं येथें विद्यापीठ स्थापन झालें. या शहरांत मुस्लिमेतर वस्तीहि बरीच आहे.

**कॉन्स्टन्स**—१. एक सरोवर. स्वित्झर्लंडच्या ईशान्य मर्यादेवर हें असून न्हाइन नदीच्या योगानें हें बनलेलें आहे. याचा विस्तार जिनिव्हा सरोवराच्या खालोखाल आहे. हें समुद्रसपाटीपासून १३०९ फूट उंच आहे. सर्वांत जास्त रुंदी व खोली अनुक्रमें ११॥ मैल व ८२७ फूट आहे. २०४ चौ. मै. इतकें याचें क्षेत्रफळ आहे. सरोवरगृहांचे अवशेष पुष्कळ ठिकाणीं सांपडतात.

२. शहर—जर्मनी, बेडन संस्थानांतील एक शहर. लो. सं. ३३,०००. हें न्हाइन नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर वसलेलें आहे. कॉन्स्टन्स सरोवरांतून न्हाइन नदी जेथून बाहेर पडते तें स्थान येथून जवळच आहे. सहाव्या शतकापासून येथें बिशपचें पीठ होतें. ऑस्ट्रियन लोकांचा या शहरावर पूर्वीपासून डोळा असल्यामुळें १५४८ त पांचव्या चार्लसनें येथें आपलें वर्चस्व स्थापित केलें. परंतु १८०५ त प्रेसबर्गच्या तहानें हें शहर ऑस्ट्रियाकडून बेडनकडे आलें.

**कॉन्स्टेबल**—एक लष्करी व पोलिस अधिकारी. युरोपांत मध्ययुगीन कालांत बऱ्याचशा राजसत्ताक देशांत हा एक वरिष्ठ दर्जाचा अधिकारी असे. फ्रँक लोकांच्या राज्यांत हा राजाच्या हाताखालचा पहिल्या दर्जाचा अधिकारी असे. सैन्याचा मुख्य अधिकारीहि तोच असे. आणि लष्करी बाबतींत सर्वांत वरिष्ठ

न्यायाधीशहि तोच असे. १६२७ सालीं १३ व्या लुई राजानें ही अधिकाराची जागा रद्द केली. परंतु नेपोलियननें तो हुद्दा पुन्हां चालू केला. परंतु नेपोलियनचा पाडाव झाल्यावर हा नाहींसा झाला. इंग्लंडमध्यें 'लॉर्ड हाय कॉन्स्टेबल' या नांवाचा अधिकारी नेमण्याची सुरुवात विल्यम दि कॉंकररनें केली. १५२१ पासून लॉर्ड हाय कॉन्स्टेबल याचा अधिकार कांहीं विशिष्ट प्रसंगांपुरताच ठेवून मर्यादित करण्यांत आला. स्कॉटलंडमध्यें लॉर्ड हाय कॉन्स्टेबल हा अधिकार वंशपरंपरा अर्ल्स ऑफ एरोल या सरदार घराण्याकडे चालू आहे. अलीकडील कायद्याच्या भाषेंत कॉन्स्टेबल हा पोलिस खात्यांत खालच्या दर्जाचा एक अधिकारी असतो. देशामध्यें विशेष दंगेधोपे चालू असल्यास खाजगी नागरिकांपैकीं जरूर तेवढ्यांना स्पेशल कॉन्स्टेबल नेमण्यांत येतें.

**कॉन्स्टेबल, आर्किबाल्ड** (१७७४—१८२७)— हा स्कॉटिश पुस्तकविक्रेता व प्रकाशक असून 'एडिन्बर्ग रिव्ह्यू' मासिकाचा, तसेंच सर वॉल्टर स्कॉटच्यीं काव्यें व वेव्हरली नॉव्हेल्स, एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिकाची पुरवणी व इतर अनेक ग्रंथ यांचा मूळ प्रकाशक होता. पण १८२६ मध्यें २,५०,००० पौंडांहून अधिक कर्ज झाल्यामुळें याच्या प्रकाशनसंस्थेला पैसा देण्याचें बंद करणें भाग पाडलें.

**कॉन्स्टेबल, जॉन** (१७७६–१८३७)— हा इंग्रज सृष्टि-विषयक देखाव्यांचा चित्रकार असून याचीं मुख्य चित्रें म्हणजे 'दि व्हॅली फार्म', 'दि हे वेन' व 'दि कॉर्नफील्ड' हीं होत. हीं नॅशनल गॅलरीमध्यें ठेवलेलीं आहेत; आणि सॅलिस्बरी कॅथेड्रल हें चित्र व्हिक्टोरिया अँड आल्बर्ट म्यूझियममध्यें आहे.

**कान्हेरा किल्ला**— मुंबई, नाशिक जिल्हा. घोडपच्या पायथ्येस ७ मैलांवर चांदोर टेंकड्यांमध्यें हा आहे. १८१८ मध्यें याचा तट बहुतेक सर्व पडून गेला होता. किल्ल्यावर टांकी असून पाणी विपुल आहे. त्र्यंबकेश्वराबरोबर ब्रिटिशांच्या स्वाधीन झालेल्या सतरा किल्ल्यांमध्यें हा एक होता.

**कान्हेरी लेणीं**— (संस्कृत कृष्णागिरि शब्दाचा कान्हेरी हा अपभ्रंश आहे). ठाणें शहराच्या पश्चिमेस व मुंबईच्या उत्तरेस साष्टी बेटाच्या मध्यभागीं हीं लेणीं आहेत. जी. आय्. पी. रेल्वेच्या भांडूप स्टेशनापासून किंवा बॉंबे बरोडा रेल्वेच्या बोरिवली स्टेशनापासून लेण्यांस जातां येतें. क्रमांक ८,९,५८ व ५९ चीं लेणीं साधीं व फार जुनीं आहेत. येथल्या सुमारें ५० कोरीव लेखांचा अर्थ लाविलेला आहे. हीं लेणीं इ. स. १ ल्या शतकापासून ४ थ्या शतकापर्यंतचीं असावींत. शातकर्णी गोतमीपुत्र राजाच्या कारकीर्दीत कान्हेरी येथील विहारांची भरभराट होती. भिक्षूंच्या सोईकरितां गुहा, पाण्याचीं टांकीं, जमिनी व रोकड पैका यांच्या देणग्या दिल्याचा उल्लेख आहे. हीं लेणीं एकंदर १०२ आहेत. सुमारें २७ लेणीं चांगलीं आहेत. चैत्यें (देवळें) व दहाव्या क्रमांकाचें दरबार भरण्याचें लेणें यांखेरीज बाकीच्या सर्व लेण्यांत लोक राहत असत. सगळ्या विहारांना पाण्याचा पुरवठा चांगला होत असे. डोंगराच्या माथ्यावरील खडकांत पाण्याचीं कित्येक टांकीं कोरलेलीं आहेत.

**कान्होजी आंग्रे** (मृ. १७२९)— एक मराठा आरमारी सरदार. मूळचें आडनांव सकपाळ, व मूळ ठिकाण हर्णैजवळील आंगरवाडी होय. याच्या आजाचें नांव सेखोजी व बापाचें तुकोजी आंग्रे. तुकोजीला शिवाजीच्या आरमारांत २५ असामींची सरदारी होती. कान्होजी आंग्रे हा सिधोजी गुजर याच्या हाताखालीं सुवर्णदुर्गाचा सरनोबत म्हणून मराठ्यांच्या आरमारांत काम करीत होता. सन १६९८ त कान्होजी आंग्र्याचें व सिद्दीचें मोठें कडाक्याचें युद्ध झालें. मराठेशाहीवरील भयंकर आपत्तींत कान्होजी आंग्र्यानें पश्चिम किनाऱ्यावरील मराठ्यांच्या सत्तेचें उत्तम प्रकारें संरक्षण केलें होतें. सर्व राष्ट्रांच्या गलबतांवर तो हल्ले करी. इंग्रज, फिरंगी व मुसलमान हे त्रिवर्ग एकत्र जमून आंग्र्यांशीं युद्ध करूं लागले. पण मुसलमानांनीं थोड्याच दिवसांनीं आंग्र्यांशीं तह केला. कान्होजी आंग्र्यानें इंग्रजांशीं जोरानें झगडा चालू ठेवला. हा जिवंत असेपर्यंत पाश्चात्यांचा शिरकाव पश्चिम किनाऱ्यावर झाला नाहीं. कान्होजी आंग्रे हा बंदुका, दारूगोळा व इतर लष्करी सामुग्री यांच्या रूपानें पेशव्यांना मदत करी. इंग्रजांनीं कान्होजीस चांचा म्हटलें आहे, पण इंग्रजांचा चांचेगिरीचा पिढीजात धंदा होता. कान्होजीचा दरारा इंग्रजांस इतका बसला होता कीं, अरबी समुद्रांतून येणारीं इंग्रजांचीं जहाजें किनाऱ्यावर सुखरूप आणण्याबद्दल आंग्र्याच्या वाटाड्यांस ५ हजार रुपये बक्षीस देण्याचा कंपनीचा रिवाज पुढें पुष्कळ दिवस चालू होता. पेशव्यांनीं शाहूमहाराजांकडून कान्होजी आंग्रे यास सरखेलीचें पद देवयून वस्त्रें व शिक्काकट्यार पाठविलीं. कान्होजी व शाहू छत्रपति या उभयतांची भेट इ. स. १७१८ त जेजुरीस मोठ्या समारंभानें झाली. कान्होजी आंग्रे हा इ. स. १७२९ त मरण पावला. तो वर्णानें काळा व बांध्यानें मजबूत होता. त्याची शिस्त कडक असे. पण तो हाताखालच्या लोकांशीं फार उदारबुद्धीनें, ममतेनें व बरोबरीच्या नात्यानें वागे.

**कान्होजी जेधे** (मृ. १६६०)— एक मराठा सरदार. मावळांतील हा एक प्रमुख देशमुख रणदुल्लाखानाच्या हाताखालीं आदिलशहाच्या फौजेवरील एक अधिकारी होता. याची स्वामिनिष्ठा व कर्तृत्व पाहून शहाजीनें यास आपल्या पदरीं ठेवलें, व यवनांची नोकरी सोडून शिवाजीस हिंदुराज्यप्रस्थापने-साठीं मदत करण्याची याजकडून शपथ घेववली. शहाजीनें शिवाजीस जीं विश्वासू माणसें मिळून दिलीं त्यांत कान्होजीची

गणना होते. शिवाजीच्या पदरीं राहिल्यावर अफजुलखानाकडून यास फितवून आपल्या बाजूस वळविण्याचे प्रयत्न झाले. परंतु कान्होजीच्या स्वामिनिष्ठेपुढें त्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं; शिवाजीच्या सेवेसाठीं यानें आपल्या वतनावरहि पाणी सोडण्यास कमी केलें नाहीं. याच्या उदाहरणामुळेंच बांदल, हैबतराव, सिलीमकर, ढमाले, वगैरे सरदार शिवाजीस लाभले व त्यास आपलें स्वराज्यस्थापनेचें काम पुरें करतां आलें. अफजुलखानाच्या वधानंतर झालेल्या प्रतापगडच्या लढाईच्या वेळीं हा हजर असावा.

**कान्होजी भोंसले**—वऱ्हाडांतील भोंसले घराण्याचा मूळपुरुष जो परसोजी त्याचा हा पुत्र. याला १७०९ मध्यें सेनासाहेब सुभा हें पद व जरीपटका, साहेबी नौबत व शिक्काकट्यार हीं शाहूनें दिलीं. यानें १८ वर्षें कारभार करून शाहूची मर्जी संपादिली. गोंड राजांना कान्होजीनें कबजांत आणलें होतें. तेव्हां त्यांच्या मदतीनें रघूजीनें कान्होजीविरुद्ध खटपट चालविली. त्यानें साताऱ्यास येऊन शाहूची मर्जी संपादन केली, आणि त्या बळावर कान्होजीस पकडून साताऱ्यास आणलें. तेथें तो मरेपर्यंत कैदेंतच होता. या कान्होजीचा वंश उमरावतीस आहे.

**कान्होजी राणोजी शिर्के**—थोरल्या शाहू छत्रपतीची राणी सकवारबाई हिचा हा थोरला भाऊ. बाळाजी विश्वनाथ व चंद्रसेन जाधव यांच्या तंट्याच्या वेळीं बाळाजीस यानें अमूल्य मदत केली. हा ब्रह्मेंद्रस्वामीचा भक्त होता.

**कान्हो पाठक**—एक मराठी कवि. हा केंदूर पाबळ (पुणें जिल्हा) येथील रहिवासी असून वृत्यंशी जोशी होता. याचें घराणें पूर्वीपासून विद्वानांचें होतें. ज्ञानेश्वरांनीं समाधि घेतांना आपली सारी चीजवस्त या घराण्यांतील मूळपुरुषाला दिली असें म्हणतात व अजूनहि ज्ञानेश्वरांच्या आरतीच्या वेळीं विडा-खिरापतीचा मान याच्या वंशजांकडे आहे. याचा 'गीतासार' नांवाचा एक ग्रंथ व इतर काव्य उपलब्ध आहे.

**कान्होपात्रा**—एक महाराष्ट्र संत-कवयित्री. मंगळवेढें येथील शामा नांवाच्या एका कळवंतिणीची ही कन्या होय. हिच्या आईनें हिला बेदरास नेऊन हिचा गुण बादशहास दाखवावा व द्रव्य मिळवावें असा बेत केला. परंतु तिनें तो बेत नाकारून पंढरपुरास देवापुढें भजन करणें आरंभिलें. हिच्या स्वरूपाची तारीफ बादशहाच्या कानांवर जाऊन तो हिच्याविषयीं फारच लुब्ध झाल्यामुळें त्यानें हिला आणण्यासाठीं पंढरीस कामगार पाठविला. हिनें मी देवदर्शन करून येतें व मग आपणांबरोबर निघतें असें सांगितलें. पुढें देवाची आळवणी करीत असतांच देवळांत हिचें प्राणोत्क्रमण झालें. भक्तिविजयांत हिचें चरित्र (१९व्या अध्यायांत) सविस्तर आहे. हिचा काल शके १३९० असावा. हिचे कांहीं अभंग आहेत.

**कापडी नळ**—(होज पाइप). हे विनाशिवणीचे विणलेले जड कापडी नळ आग विझविण्याच्या बंबासाठीं वापरतात. यांतून पाणी नेऊन आगीवर झोत टाकतात. हे विशिष्ट प्रकारानें वाटोळे विणून, दोनदां उकळून व घट्ट ठोकून तयार केलेले असतात. त्यामुळें हे भक्कम व लवचिक बनतात. नंतर मोरचुदाच्या पाण्यांत बुडवितात म्हणजे ते नीट आकसले जातात.

**कापणी यंत्र**—हें यंत्र पीक वगैरे कापण्याकरितां उपयोगांत

आणण्यांत येतें. हें बहुतेक घोड्यांनीं चालवितात; परंतु अलीकडे मोटारसारखें पेट्रोलवरहि चालविण्यांत येतें. पीक कापणारीं पातीं या यंत्राच्या चाकाशीं जोडलेलीं असतात. हीं बहुधा तिकोनी असून एका पोलादाच्या दांड्यास बसविलेलीं असतात. हा दांडा या यंत्रापासून काटकोनामध्यें जमिनीवर पडलेला असतो. एक पांच हातांचा रहाट ह्या यंत्राच्या चाकाच्या साहाय्यानें फिरत असतो. तो पिकाचीं झाडें या पात्यांच्या दांड्यावर आणून टाकतो. कापलेलीं झाडें यंत्राच्यामागें एक पेंढ्या बांधण्याचें यंत्र जोडलेलें असतें त्यांत पडतात व तेथें त्यांच्याभोंवतीं दोरी गुंडाळली जाऊन तीस गांठ मारली जाते आणि ती दोरी तोडली जाऊन पेंढी मागें टाकली जाते.

**कापशी**—१. मुंबई, कोल्हापूर संस्थान. हा गांव कोल्हापूरच्या दक्षिणेस १२ कोसांवर आहे. येथील जहागीरदार घोरपडे आडनांवाचे मराठे असून ते प्रख्यात सेनापति संताजी घोरपडे यांचे वंशज आहेत. येथें खादी व धातूचीं भांडीं विकावयास येतात. ही जहागीर कोल्हापूरकरांची मांडलिक आहे. संताजीची बायको द्वारकाबाई हिची समाधि येथें आहे. सोंडूरकर, गजेंद्रगडकर, दतवाडकर, मुधोळकर घोरपडे व कापशीकर घोरपडे हे भाऊबंद असून यांचा मूळपुरुष माहलोजी म्हणून होता.

२. मध्यप्रांत, जिल्हा वर्धा, तहशील हिंगणघाट. हिंगणघाटच्या पश्चिमेस २० मैलांवर हें सुमारें ६०० लोकवस्तीचें खेडें आहे. येथें नानाजी महाराज नांवाचे प्रसिद्ध साधु राहत असत. त्यांची समाधि त्यांनीं बांधलेल्या लक्ष्मीनारायणाच्या देवळासमोरच

आहे. त्यांच्याप्रीत्यर्थ माघ महिन्यांत दहा दिवसपर्यंत येथें जत्रा भरत असते.

**कांपान** ( १७५२–१८२२ )—एक फ्रेंच अध्यापनशास्त्रज्ञा. हिनें सेंट जर्मेन येथें मुलींकरितां एक बोर्डिंग स्कूल काढलें व ती शाळा लवकरच फार प्रसिद्धि पावली. तिची आणखी प्रसिद्धि फ्रेंच सम्राज्ञी मेरी आन्त्वानेतसंबंधीं एक ग्रंथ लिहिल्याबद्दल आहे.

**कांपानेला** ( १५६८–१६३९ )—एक इटालियन तत्त्ववेत्ता. १५९१ मध्यें त्यानें नेपल्स येथें आपला तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ प्रसिद्ध केला, व त्यांत आरिस्टॉटल पंथांतील तत्त्वांचें वैयर्थ्य दाखवण्याचा त्याचा हेतु होता. या ग्रंथाचे स्तुतिकार कांहीं होते, पण शत्रूच अधिक निघाल्यामुळें कांपानेलाला कायमच्या तुरुंगवासाची शिक्षा झाली. त्यानें तुरुंगांतहि अनेक विद्वत्ताप्रचुर ग्रंथ लिहिले, पण ते नंतर प्रसिद्ध झाले. 'सिटी ऑफ दि सन' हा त्यांपैकीं एक ग्रंथ असून शिवाय आणखी त्याचे ग्रंथ आहेत.

**कापालिक**—एक पाशुपत शैवपंथ. एक माळ, एक अलंकार, एक चूडामणि, राख व यज्ञोपवित या सहा यांच्या मुद्रिका आहेत. भवभूतीच्या मालतीमाधवावरून कापालिकांचें मुख्य स्थान श्रीशैल असल्याचें समजतें. शिवाचें अत्युग्र स्वरूप जो भैरव व त्याची स्त्री चंडिका यांच्या गळ्यांत नररुंडमाळा असून तीं यांचीं दैवतें होत. मद्यमांसाचा या कापालिकांच्या देवतांना नैवेद्य लागतो. नर-कपालांत जेवणें, अंगाला चिताभस्म फांसणें यांसारख्या अघोर गोष्टी महाव्रतांत येतात. कृष्णमिश्रकृत प्रबोधचंद्रोदय नांवाच्या काव्यांत कापालिक शैवांचा उल्लेख आहे. कांहीं बौद्ध भिक्षू व जैन यती यांनींहि हा शैव पंथ स्वीकारला होता.

**कांपिली**—म्हैसूर प्रांतांतील एक गांव. चोल राजांच्या वेळीं हें एक मोठें लष्करी ठाणें व सुभेदाराचें राहण्याचें ठिकाण होतें.

**कापू**—एक जात. मद्रास, ब्रह्मदेश व हैद्राबाद या प्रांतांतून यांची वस्ती आहे. लोकसंख्या सुमारें पस्तीस लाख. शेती हेंच कापूंचें मुख्य उपजीविकेचें साधन आहे. त्यांच्या स्त्रिया सुवर्णालंकार वापरतात. कापू म्हणजे पहारेकरी व रेड्डी म्हणजे राजा असा अर्थ आहे. कापू जातीच्या मुख्य उपजाती १४ असून त्या मदुरा, तिनवेल्ली, वगैरे भागांत आढळतात. पंट्टा रेड्डींचे लग्नविधी ब्राह्मणांच्या समारंभाप्रमाणेंच असतात. तिनवेल्लीच्या रेड्डी लोकांत १६ किंवा २० वर्षांच्या मुलीचें ५।६ वर्षांच्या मुलाबरोबर लग्न करीत. कापूंमध्यें जांवयास दत्तक घेण्याची चाल आहे. पुनर्विवाहाची चाल यांच्यांत आहे. कापू लोक धर्मानें **शैव व वैष्णव असून** यल्लाम्मा, नागरपम्मा, पुतलाम्मा, अंकाम्मा व देशम्मा, इत्यादि देवतांची ते पूजा करतात. वऱ्हाड-मध्यप्रांतांतील कापूंना कापेवार म्हणतात. यांची वस्ती चंद्रपूर व वऱ्हाड या भागांत आहे.

**कापूर**—( $C_{10}H_{16}O$ ). टरपीन जातीचा एक स्फटिकमय पदार्थ. विशिष्ट झाडांच्या लांकडापासून उत्पातनाच्या ( डिस्टिलेशन ) पद्धतीनें हा तयार करतात. हा सौम्य प्रकाराचा जंतुनाशक आहे.

हिंदुस्थानांत कापूरकेळ या जातीचें एक झाड आहे. यापासून कापूर करतात. ऐने-इ-अकबरीमध्यें भीमसेनी कापराचीं झाडें, व सिंधबादच्या दुसऱ्या सफरींत कापराचीं झाडें यांचा उल्लेख आहे. जपानी कापूर हें साधारण उंच व हिरवें झाड चीन, जपान कोचीन व फोर्मोसा या ठिकाणीं होतें. कलकत्ता, साहरणपूर, डेहराडून, व नीलगिरि पर्वत यांवर हीं झाडें विपुल होतात. बोर्निओ व सुमात्रा यांमध्यें कापराचें झाड उंच असतें. गेल्या महायुद्धापूर्वी सर्व जगास कापराचा पुरवठा करण्याचा मक्ता जपाननें घेतल्यामुळें कापराचा भाव फारच वाढला. सिनामोमम् कॅम्फोरा यांच्या पानाच्या तेलापासूनहि कापूर तयार करतां येतो. दिल्ली व मुंबई येथें कापूर शुद्ध करण्याचा मोठा धंदा आहे. कापूर ज्वालाग्राही असून त्याची ज्योत सतेज पण धुरकट असते. त्याच्या उग्र वासामुळें कपडे व पुस्तकें ठेवण्याच्या कपाटांत व मृत प्राण्यांच्या पेट्यांत कापूर ठेवतात. त्याचे अनेक औषधी उपयोग आहेत. सेल्युलॉइड तयार करण्याच्या कामींहि कापूर उपयोगी आहे.

**कापूस**—खाण्याच्या धान्याच्या खालोखाल महत्त्वाचीं पिकें तंतूंचीं होत. तंतुवर्गांत कापूस व ज्यूट (पाट) हीं फार महत्त्वाचीं आहेत. त्यांच्या खालोखाल काथ्या, केकताड, ताग, अंबाडी, कागद व दोऱ्या करण्याचे तंतू वगैरे होत. सर्वांमध्यें कापसाचीं वस्त्रें जास्त वापरलीं जातात व

कापसाचें पीक उष्ण व समशीतोष्ण कटिबंधांत विषुववृत्ताच्या उत्तर व दक्षिण बाजूंस चांगलें येतें म्हणून कापसाचें विशेष

महत्त्व आहे. हिंदुस्थानांत कापसाचें कापड विणण्याची पहिली गिरणी इ. स. १८१८ मध्यें कलकत्ता येथें स्थापन झाली व वाफेनें चालणारी पहिली गिरणी मुंबई येथें इ. स. १८५३ सालीं उभारली गेली.

वेदामध्यें आश्वलायन श्रौत सूत्रांत कापसाच्या वस्त्राबद्दल उल्लेख आहे. ब्राह्मणाचें यज्ञोपवीत कापसाचें असावें असा नियम रूढ आहे. ख्रिस्ती शकापूर्वी ४५० या वर्षी हिरोडोटस नांवाच्या प्रवाशानें 'हिंदुस्थानांत कांहीं झाडें आहेत, त्यांच्या फळास लोंकर येते' असें नमूद केलें आहे. तसेंच मच्छलीपट्टणांत रंगविलेल्या कपड्याचा पुष्कळ व्यापार चालतो असें म्हटलें आहे. ईजिप्तमध्यें प्राचीन ग्रंथांत किंवा चित्रांत कापसाचा उल्लेख कोठेंच आढळत नाहीं. डाक्क्याची मलमल ग्रीक लोकांना 'गंगेतिका' या नांवानें माहीत होती. १७२१ सालीं मँचेस्टर-करितां हिंदुस्थानांतून 'कालिको' चें कापड आणण्याच्या बंदी-बद्दल कायदा पसार करण्यांत आला. इ. स. १७८४ मध्यें अमेरिकेंतून पहिल्यानें लिव्हरपूल येथें थोडा कापूस आला व त्यानंतर कापसाच्या व्यापाराची दिशा बदलली. ज्या हिंदुस्थानां-तून पाश्चात्य देशांत कापड जात असे, तेंच हिंदुस्थान आपल्याला लागणाऱ्या कापडाकरितां युरोपवर अवलंबून राहूं लागलें. याचें कारण युरोप खंडांत विद्या व कला यांची वाढ होऊन यंत्रांच्या व वाफेच्या साहाय्यानें बहुतेक माल तयार होऊं लागला, हें होय. त्यामुळें इकडील हातमागाचा धंदा बसला व बऱ्याच कोष्ट्यांना आपला धंदा सोडून शेतीकडे वळावें लागलें.

१७९३ सालपर्यंत कापसांतील सरकी हातांनीं काढीत व त्याला फार वेळ लागे. त्या सालीं एली व्हिटने यानें 'जिन' यंत्र तयार केल्यामुळें या धंद्यांत मोठी क्रांति घडून आली.

कापसाचें झाड साधारणपणें ४३° उत्तर आणि ३३° दक्षिण या अक्षांशांमधल्या टापूंत तयार होतें. याचे बरेच प्रकार आहेत. लांब धाग्याच्या कापसाला फार महत्त्व आहे. सरकी काढल्यानंतर कापसाचें वजन मूळच्या ⅓ उरतें. हा कापूस यंत्रानें दाबून याचे साधारणपणें ५०० पौंडांचे गठ्ठे करतात. हा कापूस नंतर कांतकाम व विणकाम यांसाठीं कारखान्यांत जातो. कापसाचें कापड काढण्यासंबंधांत इंग्लंडांतील लँकेशायरची फार प्रसिद्धि होती. बहुतेक जगांत लँकेशायरचें कापड जाई. पण दुसऱ्या महायुद्धापूर्वी जपान आणि हिंदुस्थान यांनीं त्याचा व्यापार बराच बसविला.

जगांतील लागवडींत असलेल्या कापसाच्या जाती आशिया, आफ्रिका व अमेरिका या ठिकाणीं होतात. आशियांतील मूळच्या कापसाच्या कोणत्याहि जातीची सरकी सूक्ष्मतंत्वावरण-रहित नसते. अमेरिकेंत जेव्हां यादवी युद्ध सुरु झालें (इ. स. १८६२) व अमेरिकेंत कापसाचा दुष्काळ पडला, त्या वेळीं १८६३ त मुंबई इलाख्यांत कापसाकरितां एक स्वतंत्र कमिशनर नेमण्यांत आला व दुसऱ्या वर्षी वऱ्हाड व मध्यप्रांत यांतहि कमिशनरची नेमणूक झाली. त्या वेळीं यादवी युद्धामुळें हिंदुस्थानांतून कापसाची निर्गत अतोनात वाढली. कापसांत तीन तऱ्हांनीं अंतर्गत सुधारणा करण्याचे प्रयत्न चालू आहेत: (१) धाग्याची लांबी वाढविणें, (२) उत्पन्न वाढविणें, व (३) रुईचें प्रमाण वाढविणें. शेतकऱ्याच्या फायद्याच्या दृष्टीनें दरएकरीं कापसाचें उत्पन्न व रुईचें प्रमाण जास्त पडणें हें महत्त्वाचें आहे. आंखूड धाग्याच्या जातीचें उत्पन्न जास्त येऊन रुईचें प्रमाण जास्त पडतें. जगांत देशपरत्वें कापसाच्या अनेक जाती आहेत. त्यांपैकीं कांहीं एकवर्षायु व कांहीं बहुवर्षायु आहेत. एक-वर्षायु कापशीचीच लागवड जास्त प्रमाणावर करतात. वऱ्हाडी कापूस खरबरीत व आंखूड धाग्याचा असतो. भडोचचा कापूस नरम व लांब धाग्याचा असतो. धारवाड व अमेरिकन कापूस सरकीला चिकटून राहतो. कापसामध्यें एक ८।९ महिने लाग-णारी लांब धाग्याची जात व दुसरी सुमारें ४।५ महिने लाग-णारी आंखूड धाग्याची जात अशा दोन जाती आहेत.

सर्व जगांत उत्तम कापूस सी-आयलंडचा होय. दुसरा ईजिप्शिअन, तिसरा अमेरिकन, चौथा भडोच व कुमटा व पांचवा वऱ्हाडी, वगैरे. गॉसीपिअम अथवा देवकापूस हें झाड लहान असून मूळचें आफ्रिका खंडांतलें आहे. माकासर येथें हीं झाडें विपुल आहेत. दंतकथांवरून हाच कापूस यज्ञो-पवीत तयार करण्याला उपयोगांत आणला पाहिजे असें दिसतें. ईजिप्शियन धर्मोपाध्याय याच कापसाचा उपयोग धार्मिक कृत्यांकडे करीत. उत्तम, खोल, काळ्या व चिकण जमिनींत कापूस चांगला होतो. तेल काढण्याकरितां व जनावरांना खावयास घालण्याकरितां सरकीचा उपयोग होतो. सन १८९९ पासून तेल काढण्याकरितां सरकीला परदेशाची मागणी एकदम वाढली. सरकीचें तेल काढल्यानंतर ढेप गुरांना खाण्यास उपयोगी पडावी म्हणून फोल काढणें अवश्य असतें. सरकी अथवा टरफल यांचा उच्च प्रतीचा कागद तयार करण्याच्या कामीं उपयोग होतो. गुरांनीं पऱ्हाटीचा खाण्यासारखा भाग खाल्ल्यानंतर तिची साल काढतात. पऱ्हाटी व साल यांचें ५:१ हें प्रमाण असतें. या सालीपासून तंतू काढून त्यांचा तागाप्रमाणें उपयोग करतात. १ टन सालीपासून ७,०५० दोर ताग निघतो. डाक्का, बनारस, वगैरे ठिकाणीं अत्यंत पातळ मलमल होतें. डाक्क्याचें सूत बारीक व बळकट राहतें; म्हणून डाक्क्याचें सूत काढणारे लोक अमेरिकन सुयांचा उपयोग करीत नाहींत. हिंदुस्थानांत खपणारें कापड म्हणजे धोतरें, साड्या, शर्ट, कोट,

पटके, वगैरेंचें होय. चित्रित मलमलीसाठीं डाका, शांतिपूर, चितागांग, वगैरे ठिकाणें बरींच प्रसिद्ध आहेत. कापसाच्या आयात मालावर शें. २५ टक्के कर आहे.

हिंदुस्थानांत होणारा कापूस आंखूड धाग्याचा व हलक्या प्रतीचा असतो. हिंदुस्थानांतील गिरण्यांत दिवसेंदिवस जास्त सूत निघत आहे. कापसाचा व्यापार सर्वस्वीं परदेशी बाजारावर अवलंबून आहे. स्वतःच्या हिमतीवर भावांत चढउतार करण्याची आणि परदेशांस त्या भावांतच खरेदी करण्याला लावण्याची ताकत हिंदुस्थानास अद्यापि नाहीं. इकडून इंग्लंड आणि जपान या दोन देशांत माल जास्त जातो. पक्का माल पुरेसा तयार करण्याइतक्या गिरण्या हिंदुस्थानांत नाहींत, पण परवांच्या महायुद्धापासून जपानची स्पर्धा बंद झाली व हिंदुस्थानांतच पुष्कळ सूत व कापड निघूं लागलें आहे.

जगांत सर्वांत जास्त कापूस अमेरिकेंत पिकतो. एकंदर २,७७,४८,००० गठ्यांपैकीं १,४५,१४,००० गठ्ठे अमेरिकेचे असतात. ब्रिटिश हिंदुस्थानांत ३६,००,००० इतके गठ्ठे होतात. ईजिप्तमध्यें हिंदुस्थानच्या खालोखाल कापूस होतो. जगांत एकंदर १५,००,००,००० सुताच्या चात्या भरल्या जातात, त्यांपैकीं ५,७०,००,००० ग्रेट ब्रिटनच्या असतात व अमेरिकेच्या ३,५०,००,००० असतात. हिंदुस्थानांत १९४३ सालीं ४०१ कापसाच्या गिरण्या असून १,०१,३०,५६८ चात्या होत्या.

**कापेक, कॅरेल** ( १८९०–१९३८ )— सर्व चेक ग्रंथकारांपेक्षां जास्त विख्यात असा नाटककार. आर्. व्ही. आर्. या त्याच्या नाटकानें त्याला सार्वराष्ट्रीय कीर्ति मिळवून दिली. काल्पनिक चित्रें रंगविण्यांत तो हातखंडा असे व रंगभूमीचें तंत्र त्याला फार अवगत असे. यांत्रिक सुधारणेचे दुर्गुण दाखवितांना चेक शेतकऱ्यांचें सामान्य जीवन त्याच्या डोळ्यांपुढें असे. ‘ दि लाइफ ऑफ दि इन्सेक्टस् ’ या नाटकांत त्याच्या ठिकाणीं असलेला विक्षिप्तपणा दिसून येतो. त्याच्या प्रवासवृत्तांत, त्याचीं मानवसुखांचीं ध्येयें व एकंदरींत माणसाचें जीवन सुखाचें आहे ही त्याची समजूत आढळून येते.

**कॉप्ट**—ईजिप्तमधील तद्देशीय प्राचीन ख्रिस्ती लोकांना कॉप्ट म्हणतात. कॉप्ट हें नांव या लोकांना १४ व्या शतकापासून लावण्यांत आलें आहे. हल्लीं ईजिप्तमधील फक्त शुद्ध रक्ताच्या ख्रिस्ती लोकांनाच हें नांव दिलें जातें. गोपति या आर्य शब्दाचा अपभ्रंश कॉप्ट असावा. यांचा जुना व्यवसाय गोपालनाचाच होता. आजचे कॉप्ट शेतकरी मुसलमान शेतकऱ्यांप्रमाणेंच आहेत.

कॉप्ट लोक प्राचीन ईजिप्तमधील भाषेपासून झालेल्या उपभाषा बोलतात. सरकारी नोकरी व शेती हे त्यांचे मुख्य धंदे आहेत.

ईजिप्त देशांतील जे ख्रिस्ती कॉप्टिक विधी पाळतात त्यांस कॉप्ट असें म्हणतात. हे आपल्या पंथाची स्थापना सेंट मार्क या धर्मप्रसारकानें केली असें म्हणतात. पांचव्या शतकामध्यें या पंथामध्यें ‘ मोनोफिसाइट ’ तत्त्वाचा प्रसार झाला. यांच्यापैकीं जे रोमन धर्माध्यक्षाची सत्ता मानतात त्यांस रोमन कॅथॉलिक कॉप्ट मानण्यांत येतें. इतरांस ‘ मोनोफिसाइट ’ म्हणतात. त्यांचे स्वतंत्र मुख्य धर्मोपदेशक ( पॅट्रिआर्च ) असून हे सर्व कॉप्टिक विधींचें आचरण करतात.

अबिसिनिया देशांत जे कॅथॉलिक आहेत ते कॉप्टिक विधी पाळीत असले तरी प्रत्यक्ष पोपच्या सत्तेखालीं येतात व जे कॅथॉलिक नाहींत असे अबिसीनियन कॉप्ट त्यांच्या कॅथॉलिकेतर अबिसिनियाच्या संप्रदायामध्यें मोडतात व त्यांवर त्यांच्या मुख्य धर्मोपदेशकाची सत्ता चालते. अबिसिनियामध्यें या संप्रदायाची स्थापना चौथ्या शतकांत झाली.

**काफमन, मेरी आंजेलिक** ( १७४१–१८०७ )— ही स्वित्झर्लंडमधील चित्रकार असून तिनें प्रथम इटालिअन चित्रकलेचा अभ्यास केल्यानंतर ती व्हेनिसहून लंडनला गेली (१७६५). लंडनमध्यें रॉयल ॲकेडमी ही संस्था ज्या ३६ सभासदांनीं प्रथम स्थापली ( १७६८ ) त्या सभासदांपैकीं ती एक होती. तिनें इंग्लंमध्यें जीं चित्रें काढलीं त्यांत ‘ग्राचीची माता’, ‘मेसालिसचा बळी’, ‘मदन आणि रति’ या अर्थाच्या नांवांचीं चित्रें प्रसिद्ध आहेत.

**काफा**—ईशान्य आफ्रिकेंतील एक देश. अबिसिनियन साम्राज्याचा हा देश एक भाग आहे. खुद्द काफा देशाचें क्षेत्रफळ ५,००० चौरस मैल आहे. या देशांतील मुख्य नदी ओनो ही होय. कॉफीचीं झाडें येथें फार वाढत असल्यामुळें या देशाला काफा हें नांव मिळालें आहे.

सुमारें १८९५ सालीं अबिसिनियनांनीं हा देश जिंकला.

**काफिर**—१. आग्नेय आफ्रिकेंतील एक बंटु मानववंश. हे मुसलमान नसल्यानें अरब यांना काफिर (पाखंडी) म्हणतात. केप प्रॉव्हिन्स आणि डेलागोआ आखात यांमधील भूप्रदेशांत या काफिर जाती आहेत. यांच्या अनेक शाखा आहेत; त्यांपैकीं प्रसिद्ध म्हणजे पोंडो, फिंगो, झुलू व स्वाझी या होत. जातींचे राजे असतात. आतां या सर्वांवर ब्रिटिशांची सत्ता आहे. मागें ब्रिटिशांशीं कांहीं जातींच्या चांगल्या लढाया झालेल्या आहेत.

२. काफिरिस्तानांतील लोक. ( काफिरिस्तान पाहा. )

काफिरकोट—पाकिस्तान, वायव्येकडील सरहद्दीवरील प्रांत, डेरा इस्माएलखान जिल्ह्यांतील कांहीं अवशेष भाग. या स्थलास तिळकाफिरकोट अथवा राजा शिरकोट अशींहि नांवें आहेत. या ठिकाणीं तटबंदीची फार जुनाट अशीं पडकीं कामें असून आंतील भागांत असलेल्या पुरातन इमारतींचे अवशेष पुष्कळ आहेत.

काफिरिस्तान— हें अफगाणिस्तानच्या एका प्रांताचें नांव आहे. काफिरिस्तान म्हणजे काफिर किंवा नास्तिक लोकांचा देश. पूर्वी या देशांत नास्तिक पहाडी लोक राहात असत. ते स्वतंत्र होते. १८९५ त अमीर अबदूल रहमान यानें त्यांना जिंकून इस्लामधर्माची दीक्षा बलात्कारानें दिली. ह्याचें क्षे. फ. ५,००० चौ. मैल आहे. लो. सं. सुमारें दीड लक्ष आहे. हा प्रदेश खोल, निरुंद व ओबडधोबड दऱ्या यांचा बनलेला आहे. निश्चल शिखरें, बर्फमय प्रदेश, पाइन झाडांचीं वनें, जंगली द्राक्षें व डाळिंबें यांचीं अरण्यें, वगैरे डोंगरी दृश्यांचा प्रत्येक प्रकार येथें आढळतो. नद्यांत मासे विपुल आहेत. तांबड्या पायांचीं तित्तिरें, कबुतरें, बदकें, कोंबड्या, वगैरे पक्षी येथें आहेत. मारखोर नांवाचा बकरा, ऊरियल नांवाची शेळी, अस्वलें, चित्ते हे वन्य पशू आढळतात. उत्तरेकडील घाट १५,००० फुटांहून जास्त उंच आहेत. मुख्य घाट मंडळ, कमाह, कुलाम, रामगळ हे होत. क्ती, आस्किन, व वाई या नद्या आहेत. समुद्रसपाटीपासून ४,००० फुटांहून जास्त उंचीच्या प्रदेशांत सर्वत्र बर्फ पडतें. पर्जन्याचा अभाव आहे.

काफिर लोक—या देशांतील सध्यांचे रहिवासी पूर्व अफगाणिस्तानच्या विस्कळित झालेल्या टोळ्यांचे वंशज आहेत. या प्रदेशांत गुलाम पुष्कळ आहेत. यांची उत्पत्ति फार पुरातन रहिवासी व लढाईतील कैदी यांच्यापासून झालेली आहे. या गुलामांना लोक अपवित्र समजत व कांहीं पवित्र क्षेत्रांजवळ जाण्याची त्यांना मुभा नव्हती. सर्व गुलाम स्त्रिया पोशांप्रमाणें पोशाख वापरतात असें आढळून येतें.

हे लोक बायकांना फारच थोडा मान देतात. त्या पुरुषांच्या रक्षा व बटकी असतात. त्यांना विकतां येतें व शेतकीच्या कामांत मजुरांप्रमाणें त्यांचा उपयोग करून घेतां येतो. अबदूर रहमान यानें या लोकांना जिंकण्यापूर्वी काफिर लोक मूर्तिपूजक होते. मोनी ही यांची पुरातन देवता असून गिश ही रणदेवता होती. देवळांत दगडाच्या व लांकडाच्या मूर्ती असत. हे लोक त्यांच्यापुढें जनावरांचे बळी देत असत. बऱ्याचशा टोळ्या निरनिराळ्या घराण्यांच्या बनलेल्या होत्या. प्रत्येक टोळीचें सर्व महत्त्वाचें कामकाज जास्ट लोकपंचायती करीत असत. टोळींतील अंतर्व्यवस्था बारा मदतनिसांच्या साहाय्यानें एक लोकनियुक्त न्यायाधीश पाहात असे. यांच्यांतील लग्न म्हणजे दलालामार्फत बायको विकत घेणें होय. घटस्फोट म्हणजे बायकोला गुलाम म्हणून विकणें. या लोकांची नीतिमत्ता फार हलक्या दर्जाची आहे. शेतकीचीं कामें बायका करतात. गुरें चारणें, व दूधदुभतें करणें हे काफिर लोकांचे मुख्य धंदे आहेत. यांच्यांत रंगेलपणा फार असून व्यभिचार म्हणजे शिष्टाचार समजला जातो. काश्मीर व काबूल यांच्यामधल्या लोकांच्या प्रदेशालाच सध्यां काफिरिस्तान म्हणतात. १८९५ मध्यें हिंदुस्थान सरकार व काबूलचा अमीर यांच्यामधील तहान्वयें हा प्रदेश काबूलचा अमीर अबदूल रहमान याच्या सत्तेखालीं नांवाला मात्र आला.

कॉफी—[ वर्ग-रुबिआसी कॉफिआ अरेबिका ]. कॉफी या एका नेहमीं हिरवगार राहणाऱ्या व उष्ण कटिबंधांत होणाऱ्या झुडुपाच्या बिया आहेत. झाड हें मूळ अबिसिनियांत व अरबस्तानांत आढळलें. याची उंची १५ ते २० फूट असून हें रुबिआसी वर्गांतील आहे. याचीं पानें हिरवीं व वरच्या बाजूनें तकतकीत असतात. फुलें पांढरीं असून त्यांस मधुर वास येतो. फळ दीर्घवर्तुळाकार असतें. त्याचा आकार लहानशा बोराएवढा असतो. व त्याचा रंग पिकल्यावर काळसर लाल होतो. या फळांत दोन बिया असतात. या बिया भाजून त्यांची कॉफी करतात. अरबस्तानांत या झाडाची फार निगापूर्वक लागवड करण्यांत येते. एका झाडापासून सामान्यतः एक रत्तलापेक्षां कमीच कॉफी मिळते. परंतु चांगल्या वाढलेल्या झाडापासून ३ ते ४ पौंडहि कॉफी मिळते. मक्का येथील कॉफी नामांकित आहे. सध्यां ब्राझिल देशांत सर्वांत अधिक कॉफी होते. जावा, मध्य व दक्षिण अमेरिका, केनिया व हिंदुस्थानांतहि कॉफी तयार होते. युरोप, अमेरिका व पूर्वेकडील देशांत कॉफी पिण्याचा प्रचात फार आहे.

कॉफीच्या बिया भाजण्याच्या कौशल्यावर कॉफीचा गुण अवलंबून असतो. त्या फार भाजल्या तर कॉफी तुरट होते. व जळकट वास येतो व कमी भाजल्या तर स्वाद येत नाहीं. कॉफीमध्यें सुमारें दीड टक्का कॅफीन या नांवाचें द्रव्य असतें, त्यामुळें तिच्या अंगीं मादकपणा येतो. हें कॅफीन एक प्रकारचें नत्राचें संयुक्त असून अल्क द्रव्य आहे. चहामध्यें हेंच द्रव्य २ ते ५ टक्के असतें व कोकोमध्यें ५ टक्के असतें. हें मेंदूस उत्तेजक असून मूत्ररेचक आहे. कॉफीच्या बिया भाजल्या म्हणजे त्यांच्यांत असलेलें एक बाष्पभावी तेल बाहेर येतें; त्यामुळें चहासारखाच कॉफीलाहि एक प्रकारचा सुगंध येतो.

इतिहास— कॉफीपासून पेय तयार करण्याची कल्पना फार अलीकडची असून तिचा उगम इराणांत असावा. काव्हा नांवाचें पेय फळाच्या आंतील गाभ्यानें करीत असत. पण तें

फार वेळ तसेंच ठेवल्यास तें मादक बनून त्याला एक प्रकारचा वासहि येत असे. पिएट्रो डेलाव्हॅले ( १६६५ ) यानें कॉफीची कीर्ति दिली असून कॉफी पाचक, तरतरी आणणारी व रक्तशुद्धि करणारी आहे, असें म्हटलें आहे. कॉफीच्या भाजलेल्या बियांचा उपयोग प्रमुखत्वानें आरंभीं एडन येथें करण्यांत आला. पण लवकरच जास्त धर्मभोळ्या लोकांनीं सार्वजनिक कॉफीगृहांना प्रतिबंध केला. १५११ मध्यें मक्केच्या गव्हर्नरनें कॉफी हें पेय मादक असल्यामुळें त्याचें सेवन जाहीर रीतीनें बंद पाडलें. परंतु सुलतान हा स्वतः कॉफी पिणारा असल्यामुळें त्यानें आपल्या गव्हर्नरचा हुकूम रद्द केला. पुढें कॉफीगृहांत दंगेधोपे होऊं लागल्यामुळें तीं बंद करण्यांत आलीं. हिंदुस्थानचे प्राचीन राजे, प्रवासी व वनस्पतिशास्त्रज्ञ यांच्यापैकीं फारच थोड्या लोकांनीं कॉफीची माहिती दिली आहे. १६९० पर्यंत जगांतील कॉफीचा पुरवठा अरबस्तान व अबिसिनिया येथूनच होत असे. सुमारें दोन शतकांपूर्वीं बाबा-बुदन नांवाच्या एका मुसलमान यात्रेकरूनें मक्केहून परत येतांना आपणांबरोबर सात बिया आणल्या. १८२३ च्या सुमारास कलकत्त्याच्या बागांतून कॉफीचीं झाडें असल्याची माहिती मिळते. उ. हिंदुस्थानच्या सपाट प्रदेशापेक्षां दक्षिणेकडील डोंगराळ प्रदेशांतच कॉफीचीं झाडें चांगलीं वाढतात. १६९० त डच लोकांनीं कॉफीची पद्धतशीर लागवड सिलोनमध्यें सुरू केली. कॉफीच्या वाढत्या मागणीबरोबर तिची लागवड जगाच्या इतर भागांतूनहि सुरू झाली.

१९३९–४० सालीं सर्व जगांत एकंदर दोन कोटी दहा लक्ष क्विन्टल कॉफी तयार झाली. त्यांपैकीं हिंदुस्थानांतील सुमारें दीड लक्ष होती.

हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व कॉफीची निर्गत विशेषतः ग्रेट ब्रिटन व फ्रान्स यांकडे होते. व सन १९४०–४१ मध्यें ५२,३२४ हंड्रेडवेट वजनाची कॉफी परदेशीं रवाना झाली. ब्राझीलची स्वस्त कॉफी युरोपच्या बाजारपेठेंत असल्यानें हिंदुस्थानांतून होणारी निर्गत कमी होत आहे.

**काफी**—गायनांतील एक राग. हा काफी थाटाचा आश्रय-राग आहे. याचा आरोहावरोह सातहि स्वरांचा आहे म्हणून याची जाती संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. याचा गानसमय मध्यरात्र मानितात. कोणी याला सार्वकालिकहि समजतात. याच्या आरोहांत तीव्र गांधार व तीव्र निषाद हे स्वर घेतलेले अनेक वेळां दृष्टीस पडतात. हा राग फार लोकप्रिय व मधुर आहे.

**काफीखान**—एक मुसलमान इतिहासकार. याचें खरें नांव महमद हाशमखान हें असून त्याचा बाप खाजे मीर हा देखील एक इतिहासकारच होता. महमद हाशमखानानें औरंगजेबाच्या सैन्यांत व दरबारांतहि कामें केलीं होतीं. यानें आपला इतिहास औरंगजेबाच्या मरणानंतर २६ वर्षांनीं लिहिला. शहाजहानाची स्वारी व औरंगजेबाची पूर्व कारकीर्द ही काफीखानानें सरकारी कागदपत्रांतून सारांशरूपानें दिलेली आहे. त्याच्या इतिहासांत मुसलमानांची अवास्तव खोटी स्तुति व हिंदूंची निर्भर्त्सना असते.

**काफीन**—चहा आणि कॉफी यांमधील प्रभावी द्रव्य. त्यांत नत्राचें प्रमाण पुष्कळ असतें. ह्याची चव थोडीशी कडवट असते. चहांतील आणि कॉफींतील उत्तेजकता ह्या पदार्थामुळेंच आलेली असते. बाजारांत मिळणाऱ्या कॉफींत ह्या पदार्थाचें प्रमाण शेंकडा १·५ असतें व चहांत २ ते ४ पर्यंत जातें.

**काफ्रारिया**—( आजचें नांव ट्रॅन्सकीआन टेरिटोरीज् ). दक्षिण आफ्रिकेंतील केप प्रांताच्या आग्नेयीकडील भागास काफ्रारिआ म्हणत. याचा अर्थ काफिर लोकांचा देश असा होतो. ब्रिटिश काफ्रारिया १८६५ सालीं केपकॉलनीस जोडलें गेलें. यांत विल्यम राजाचें शहर व पूर्व लंडन अशीं दोन शहरें आहेत. याचें क्षे. फ. १६,५५४ चौ. मै. व लो. सं. ७,९१,५७४. के, बाशी, उमटाटा, सेंट जॉन ह्या येथील प्रसिद्ध नद्या आहेत. काफ्रारिया फार सुपीक असून तेथील हवा आरोग्यकारक आहे. येथें गहूं व दुसरीं द्विदल धान्यें पिकतात. कॉकस्टाड, उमटाटा, पोर्ट सेन्टजॉन, बुटरवर्थ हीं मुख्य शहरें आहेत. प्रॉटेस्टंट धर्मप्रसारक मंडळाचीं धर्ममंदिरें व शिक्षणसंस्था येथें बऱ्याच आहेत. फिंगोलंड येथील लोक मूर्तिपूजक असून ग्रीक लोक ख्रिश्चन धर्माचे आहेत.

**काबरा**—[ कॅपारिस स्पिनोसा ]. या नांवाचीं लहान लहान झुडपें उत्तर हिंदुस्थानांतील डोंगराळ प्रदेशांत आढळतात. काबराकरीला अथवा नेपतीचें झाड ( कॅपारिस ऑफिल ), अरदंड ( कॅपारिस हॉरिडा ) व पचोंदा ( कॅपारिस ग्रॅंडिस ), या महत्त्वाच्या जाती आहेत. या निरनिराळ्या जातींपासून तेल काढतात. अफगाणिस्तान, युरोप, आफ्रिका या ठिकाणीं तें पाठवितात. पचोंदापासून निघणाऱ्या तेलाचा जाळण्याकरितां व औषधाकरितां उपयोग करितात. करीला व काबरा यांचीं फळें हिंदुस्थानांतील लोक खातात. करीला लांकडाच्या फण्या करितात. त्याच्या तुळया व वासे इमारतींकरितां उपयोगांत आणतात.

**काबा**—हें 'ईश्वरमंदिर' मक्का शहरांतील जी मोठी मशीद तिच्या आवारांत मध्यभागीं आहे आणि सर्व मुसलमानी धर्माचे लोक, ते पृथ्वीच्या पाठीवर कोठेंहि असले तरी, प्रार्थनेच्या वेळीं आपलीं तोंडें मक्केंतील काबाकडे वळवतात. तसेंच सर्व मुसलमान लोक आपल्या आयुष्यांत निदान एकदां तरी मक्केची

यात्रा करण्याचा प्रयत्न करतात, आणि तेथें महंमद पैगंबर-साहेब यांच्या धार्मिक कायद्यांत सांगितल्याप्रमाणें धार्मिक विधी आचरतात. दक्षिणेकडील भिंतीच्या पूर्व टोकाकडील भिंतींत हा सुप्रसिद्ध काळा दगड बसवलेला असून तो नंदनवनांतून आद्य-मानव ॲडाम याला बाहेर घालवलें तेव्हां येथें पडला, अशी दंतकथा आहे. हा गॅब्रियल देवदूतानें अब्राहामला दिला असें महंमद पैगंबर सांगे. हा उल्कापाषाण असावा.

**कायानिस** ( १७५७-१८०८ )— एक फ्रेंच वैद्य, तत्त्ववेत्ता व लेखक. त्याचा सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ 'मनुष्याचा नैतिक आणि प्राकृतिक वृत्तान्त' या नांवाचा आहे. त्यावरून कायानिसची पृथक्करणशक्ति चांगली दिसून येते; व त्यानें या ग्रंथांत भौतिकवादाची पराकोटीला गेलेलीं तत्त्वें प्रतिपादिलीं आहेत.

**कावालेरो, फर्नान** ( १७९६-१८७७ )— एक स्पॅनिश कादंबरीकर्ती. हिची पहिली कादंबरी 'लागाविओटा' १८४९ मध्यें प्रसिद्ध झाली, व नंतर 'एलिआ', 'क्लेमिन्सिआ', इत्यादि कादंबऱ्या आणि बरेच लघुकथासंग्रह प्रसिद्ध झाले.

**काबूल**—अफगाणिस्तानाचा मध्यवर्ती व महत्त्वाचा प्रांत. समुद्रापासून सुमारें ७००० फुटांहून जास्त उंचीवर हा प्रांत असावा. येथील हिंवाळा फार कडक असतो. या भागांत इराणी, ग्रीक, हिंदू, मुसलमान या लोकांचें अस्तित्व शाबीत करणारे पुष्कळ प्राचीन अवशेष सांपडतात. काबूल ही अफगाणिस्तानची राजधानी असून समुद्रसपाटीपासून ५,७८० फूट उंचीवर आहे. पेशावर ते काबूल रस्ता २२८ मैल लांबीचा आहे. चिनतारी व रेडिओ स्टेशन नुकतेंच झालें आहे. येथें सुमारें सवा लाख वस्ती आहे. पूर्वी या शहरास तट होता. घरें साधीं विटांचींच आहेत. काबूलची हवा निरोगी व आल्हाददायक असल्यानें मृत्यूचें प्रमाण इतर गांवांपेक्षां कमी आहे. धान्य बरेंच स्वस्त असतें. कित्येक मैलपर्यंत फळबागा सारख्या लागलेल्या आहेत. पिअर, सफरचंद, पीच, चेरी, द्राक्षें, मलबेरी हीं फळें विपुल होतात. कलिंगडें फार दूरवर पाठविलीं जातात. काबूल विद्यापीठ १९३२ पासून अस्तित्वांत आहे. काबूलचें प्राचीन नांव कापिश होतें. त्या वेळीं येथील राजा क्षत्रिय असून बौद्धमतानुयायी होता. काबुली लोक व राजे हे आर्यवंशी असून भारतीय व पारसिक आर्यांशीं त्यांचा विवाहसंबंध होई. पार्थिअन लोक या देशाला 'श्वेतभारत' म्हणत.

**काबूल नदी**—ही हिंदुस्थानच्या वायव्येस असून अफगाणिस्तानांत उनई खिंडीजवळ व काबूल शहराच्या पश्चिमेस सुमारें ४० मैलांवर उगम पावते. ही नदी मिचनी किल्ल्याजवळ ब्रिटिश मुलखांत शिरते व अटकजवळ अखेरीस ही सिंधु नदीस मिळते.



काबूल नदीच्या वेसूट तीरावर सिमसन यास एक विहारमालिका सांपडली. ही बौद्ध लोकांनीं बांधलेली किंवा निदान उपयोगांत आणलेली असावी याबद्दल संशय नाहीं.

**काबूल नदीचा कालवा**— पाकिस्तान. वायव्य प्रांताच्या पेशावर जिल्ह्यांतील एक कालवा. जुनें बांधकाम मोंगलांच्या वेळचें आहे. याची एकंदर लांबी १९ मैल असून ३०,००० एकर जमीन याखालीं आहे. हा कालवा इ. स. १८९३ मध्यें पुन्हां सुरू करण्यांत आला. यापासून सरकारला लाखावर उत्पन्न येतें.

**काबे लोक**— द्वारकेचें राज्य हें पूर्वी यादवांचें होतें. तें काबे लोकांनीं म्हणजे वाघीर लोकांनीं घेतलें. तेव्हांपासून ओखा मंडळ प्रांतहि काब्यांकडे होता. पुढें वाघीर लोक द्वारकेच्या बंदरांतून जहाजें घालून इंग्रजांचीं जहाजें लुटीत. याकरितां इंग्रजांची व गायकवाडांचे दिवाण रावजी आप्पाजी यांची मसलत ठरून त्यांनीं काब्यांचें राज्य घेतलें; व तें गायकवाडांस दिलें. तेव्हांपासून म्हणजे सन १८०३ पासून हा प्रांत गायकवाडांकडेच आहे. पूर्वी काब्यांच्या ठाकुरांस जी पेन्शन दिलीं होतीं तीं पुढें बंद केल्यावर पुन्हां त्यांनीं एकदां दंगा केला होता. तेव्हां गायकवाडांस पुन्हा इंग्रज सरकारची मदत घ्यावी लागली व त्यांच्या लढाईंत गोमती, द्वारका व बेट द्वारका हीं पार लुटलीं गेलीं.

**काबेट, विल्यम** ( १७६६-१८३५ )— एक इंग्रज लेखक व राजकारणी पुरुष. त्यानें कांहीं दिवस सैन्यांत नोकरी केल्यावर तो अमेरिकेंत राजकारणी लेखक होण्याकरितां गेला. १८०० च्या जून महिन्यांत तो इंग्लंडांत परत आल्यावर त्यानें 'वीक्ली पोलिटिकल रजिस्टर' सुरू केलें, आणि ब्रि. सरकारच्या विरोधी टीकाकारांमध्यें त्यानें अग्रस्थान मिळवलें. १८१९ मध्यें त्यानें 'रूरल राइड्स' या नांवाची लेखमाला सुरू केली, त्यांत इंग्लंडमधील खेडेगांवी दृश्यांचें हुबेहूब व मनोवेधक वर्णन आहे. त्यानें ग्रंथ लिहिले ते—'ए पार्लमेंटरी हिस्टरी ऑफ इंग्लंड फ्रॉम दि कॉन्क्वेस्ट टू १८०३' (१८०३ पर्यंतचा पार्लमेंटचा इतिहास); 'ॲडव्हाइस टू यंग मेन ॲन्ड वीमेन' (युवक-युवतींना उपदेश); 'ए जिऑग्राफिकल डिक्शनरी ऑफ इंग्लंड ॲन्ड वेल्स' (इंग्लंड-वेल्सचा भौगोलिक कोश); 'हिस्टरी ऑफ दि रीजन्सी ॲन्ड रेन ऑफ जॉर्ज दि फोर्थ' (चौथ्या जॉर्जच्या कारकीर्दीचा इतिहास) आणि 'व्हिलेज सरमन्स' (ग्रामोपदेश). त्याची इंग्लिश भाषा फार शुद्ध व जोरदार आहे व ग्रंथांत उपयुक्त माहिती पुष्कळ असून त्यांतील त्याचीं मतें निर्दोष आहेत.

**कांबोज**—भरतखंडाच्या वायव्येकडील एक राष्ट्र. या राष्ट्राचा उल्लेख यास्कांनीं निरुक्तांत केला आहे. यांत कांबोजांची भाषा इतर आर्यांच्या भाषेहून निराळी म्हटली आहे. पाणिनीनें कम्बोजाल्लुक् या सूत्रांत कांबोजांचा उल्लेख केला

आहे. महाभारतामध्यें कांबोज राष्ट्राचा उल्लेख अनेक ठिकाणीं आलेला आहे. शांतिपर्वांत, यवन, किरात, गांधार, चीन, शबर, बर्बर, शक, पुलिंद्र, रमठ आणि कांबोज हे सर्व ब्राह्मणांपासून व क्षत्रियांपासून उत्पन्न झालेले वैश्य व शूद्र या जातींचे संकरवर्ण असून चौर्यावर उपजीविका करणारे आहेत, असा उल्लेख आहे. या देशाची उत्तम घोड्यांकरितां प्रसिद्धि होती. रामायणामध्यें ते सुवर्णाचीं कमळें धारण करीत, असें आहे. पंजाबांतील कांबोह जातीचा कांबोजांशीं संबंध असावा.

काम्बोज लोक सिंधु नदीच्या वायव्येस राहत असत आणि जुन्या पारशांच्या ग्रंथांत त्यांना कंबुजीय असें म्हटलें आहे. मद्रगार याचा शिष्य काम्बोज औपमन्यव हा अध्यापक म्हणून वंशब्राह्मणांत आलेला आहे. यावरून पारशी लोक व आर्यन लोक यांच्यांशीं संबद्ध असणारे काम्बोज लोक यांचा मद्र अथवा विशेषतः उत्तर मद्र यांच्याशीं संबंध असावा असें वाटतें.

**कांबोडिया**— इंडोचीनमधला एक प्रांत. हा फ्रेंचांच्या ताब्यांत आहे. क्षेत्रफळ ६७,५०० चौ. मै.. लोकसंख्या ३०,४६,०००. समुद्रकिनारा २०० मैल लांबीचा आहे. तांदूळ व कापूस यांचें मोठें पीक निघतें. जनावरें, लांकूड व डिंक यांचें उत्पन्न बरेंच आहे. ३/४ वस्ती ख्मर लोकांची आहे. बाकीचे चिनी, चाम व मलायी आहेत. नाम्पेन हें राजधानीचें ठिकाण आहे. तेथें फ्रेंच-संरक्षणाखालीं तेथील राजा राहतो. हल्लींचा राजा सिआनौक हा १९४१ सालीं गादीवर बसला. १८६३ सालीं हा प्रदेश फ्रेंच-संरक्षणाखालीं आला. १९४५ त याला आंतरस्वायत्तता प्राप्त झाली. या देशांत प्राचीन वास्तूंचे अवशेष फार आहेत. अंकोर तर प्रख्यातच आहे.

**कांबोह**—जमीनदारी व शेती करणारा एक वर्ग. हा पंजाब व संयुक्तप्रांत या विभागांत आढळून येतो. १९११ मध्यें १,७९,०६७ कांबोह लोक आढळले. यांपैकीं सुमारें ७० हजार मुसलमान, तितकेच शीख व बाकी हिंदू आहेत. शिखांच्या अमदानींत ते कपुरथळ्याहून जालंदरास आले. ते मथुरेचे मूळ राहणारे असून क्षत्रिय होत. यांचे कलमी खांबू व जमीनदारी खांबू असे दोन वर्ग आढळतात. त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. हिंदूंप्रमाणें ही जात नेभळट नसून अफगाणी लोकांप्रमाणें कडवी आहे. बदमाषगिरींत अफगाण हा पहिला, कांबोह हा दुसरा व काश्मिरी हा तिसरा आहे, अशी म्हण आहे.

**कॉब्डेन, रिचर्ड** ( १८०४–१८६५ )—हा इंग्रज राजकारणी पुरुष खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचा प्रमुख पुरस्कर्ता होता. त्यानें प्रथम इंग्लंड, आयर्लंड व अमेरिका यांवर एक राजकीय निबंध लिहिला (१८३५) व नंतर रशियावर लिहिला (१८३६). १८४१ मध्यें पार्लमेंटचा सभासद झाला आणि तेथें धान्यासंबंधीं कायदे रद्द करण्याबद्दल कित्येक वर्षें अविश्रांत परिश्रम करून अखेर त्यानें त्या वेळचा मुख्य प्रधान सर रॉबर्ट पील याचें मन वळवलें आणि १८४६ मध्यें यश मिळविलें. त्यानें सार्वजनिक कार्याला वाहून घेतल्यामुळें त्याच्या खाजगी भरभराटीच्या धंद्याला नुकसान पोहोंचलें, म्हणून त्याची नुकसानभरपाई म्हणून सार्वजनिक वर्गणीनें फंड जमवून त्याला ७०,००० पौंडांची थैली अर्पण करण्यांत आली. इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें १८६० मध्यें जो तह झाला, त्या बाबतींतली कामगिरी हें त्याचें अखेरचें महत्कार्य होय.

**काब्राल, पेड्रो आल्वारेझ** (१४६०-१५२६)—एक पोर्तुगीज जलपर्यटणकार. हा ब्राझील देश शोधून काढणारा पहिला किंवा दुसरा संशोधक होय. १५०० मध्यें ईस्ट इंडीज बेटांकडे जाणाऱ्या एका आरमारी काफिल्याचा तो कमांडर होता, व लिस्बन येथून निघून फारच पश्चिम दिशेनें गेल्यामुळें दक्षिण अमेरिकन जलप्रवाहांत सांपडून ब्राझील देशाला गेला; व त्या देशाचा ताबा त्यानें पोर्तुगाल सरकारच्या नांवानें घेतला.

**काम, कामदेव**—प्रेमाची हिंदु देवता. ऋग्वेदांत ( १०, १२९,४ ) परमेश्वराला प्रथम कामोत्पत्ति झाल्याचें सांगितलें आहे. अथर्ववेदांत एक सबंध सूक्त ( ११·२ ) या कामाच्या स्तुतीप्रीत्यर्थ दिलें आहे. याची पुराणांतली बायको रती किंवा रेवा आहे. तपाचरणांत मग्न असलेल्या शिवाच्या मनांत पार्वतीविषयीं कामुक विचार यानें उत्पन्न केले, म्हणून शिवानें आपला तृतीय नेत्र उघडून याला भस्म केलें. पण पुन्हां शिवाची कृपा होऊन कामदेवानें कृष्ण–रुक्मिणीच्या पोटीं जन्म घेतला. हाच कृष्णपुत्र प्रद्युम्न होय. या प्रद्युम्नाला अनिरुद्ध व तृषा अशीं दोन मुलें होतीं.

कामदेवाचें वर्णन काव्यांतून व पुराणांतून फार मनोहर केलेलें आढळतें. हा अप्सरांचा राजा असून हातीं पुष्पांचे धनुष्यबाण घेऊन सज्ज असतो.

पाश्चात्यांत क्युपिड (ग्रीक एरॉस) ही कामदेवता आहे. क्युपिड हा बालस्वरूप व नग्न असून त्याच्या हातीं धनुष्यबाण असतो. याला पंख असतात.

**कामगारसंघ**— ( ट्रेड युनियन ). कामगार व इतर मजूर यांच्या हितसंबंधांची दाद मालकवर्गाकडे लावण्याकरितां स्थापन झालेल्या संस्थांना हें नांव आहे. या संस्था मजुरांना भरपूर पगार, कामाचे कमी तास, व इतर अनेक प्रकारचे फायदे मिळवून देण्याचा प्रयत्न करतात. मालक–मजुरांमधील नोकरीचे करार व्यक्तिशः न करतां संघशः करावे, व त्या करारांचा फायदा सभासदेतर मजुरांनाहि मिळावा, असा या संस्थांचा उद्देश असतो. शाब्दिक वाटाघाटींना यश आलें नाहीं, तर संप करणें

हें साधन या संस्था उपयोगांत आणतात. १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात ट्रेड यूनियन संस्था बंद पाडण्याचे व त्यांचा छळ करण्याचे प्रयत्न करण्यांत आले; पण त्याच शतकाच्या उत्तरार्धात युरोपांत या संस्थांना सार्वत्रिक मान्यता मिळाली. अमेरिकेंत ट्रेड यूनियनच्या तत्त्वाला कायद्याची मान्यता १९३४ सालीं न्यू डील या कायद्यानें देण्यांत आली. ब्रिटनमध्यें ही चळवळ १८३० च्या सुमारास रॉबर्ट ओवेनच्या चार्टिस्ट चळवळीच्या अनुषंगानें सुरू झाली; १८६० च्या सुमारास ट्रेड यूनियन कॉंग्रेस ही संस्था सर्व यूनियनांनीं मिळून स्थापली; आणि १८७१ व १८७४ सालीं ट्रेड यूनियन ॲक्ट्स नांवाच्या कायद्यांनीं अशा कामगार-संघांवरील सर्व नियंत्रणें रद्द करण्यांत आलीं. ट्रेड यूनियन कॉंग्रेसला अनेक ब्रिटिश कामगार-संघ जोडले गेले असून या कॉंग्रेसच्या सभासदांची संख्या ५०,००,००० हून अधिक झाली आहे. सुमारें निम्म्या उद्योगधंद्यांतील मजुरांनीं आपापले संघ स्थापले आहेत, पण मोठाल्या आवश्यक मालाच्या उद्योगधंद्यांतील (*Key industries*) बहुतेक मजुरांचे संघ स्थापन झाले आहेत. जगांतील सर्व कामगार-संघांपेक्षां ब्रिटिश ट्रेड यूनियन्स या संस्था अत्यंत सुसंघटित आहेत.

जर्मन ट्रेड यूनियन्सच्या सभासदांची संख्या ५० लाख झाली होती, पण हिटलरच्या नाझी पक्षानें १९३३ सालीं या संस्था नष्ट केल्या. फ्रेंच ट्रेड यूनियन्सचे सभासद १५ लाख आहेत. ट्रेड यूनियन्स आपापल्या देशांतील मवाळ सोशॅलिस्ट पक्षांशीं संबद्ध झालेल्या आहेत; व ब्रिटिश ट्रेड युनियनांनीं संघशः मजूर पक्षाचें सभासदत्व स्वीकारलें आहे. लोकशाही राज्यपद्धतीच्या सर्व देशांतील ट्रेड यूनियन्सनीं ट्रेड यूनियनांची एक इंटरनॅशनल फेडरेशन आमस्टरडॅम येथें स्थापली आहे. तिचे सभासद दीड कोटीवर आहेत. सोव्हिएट रशियांत 'रेड यूनियन्स' नांवाच्या कामगार संस्था असून त्यांचे एकंदर सभासद पावणेदोन कोटींवर आहेत आणि या संस्था कम्यूनिस्ट पक्ष व सोव्हिएट सरकार यांच्या नियंत्रणाखालीं आहेत. सोव्हिएट सरकारचें तात्त्विक मत असें आहे कीं, समाजसत्ताक राज्यपद्धति असलेल्या देशांतील ट्रेड यूनियन्सचीं कर्तव्यें भांडवलशाही राज्यपद्धति असलेल्या देशांतील यूनियन्सच्या कर्तव्यांहून भिन्न आहेत; कारण समाजसत्ताक देशांत उद्योगधंद्यांवर नियंत्रण प्रत्यक्ष कामगारांचेंच असतें. म्हणून रशियांतील कामगारसंघांचें कर्तव्य उत्पादन वाढवणें, कामगारांना संरक्षण देणें, आणि देशांतील आर्थिक योजनांत, सांस्कृतिक चळवळींत सरकारशीं पूर्ण सहकारिता करणें, हें आहे.

आमस्टरडॅम येथील इंटरनॅशनल फेडरेशननें रशियांतील ट्रेड यूनियन्सना सभासदत्व नाकारलें आहे. कारण सदर संस्था सोव्हिएट सरकारच्या नियंत्रणाखालीं आहेत. नाझी जर्मन सरकार ट्रेड यूनियन्स स्थापण्यास परवानगी देत नव्हतें. नाझी पक्षानें जर्मन लेबर फ्रंट या नांवाची संस्था स्थापली असून त्या संस्थेंत मालक व मजूर दोन्ही सामील झालेले आहेत. इटलींत फॅसिस्ट यूनियन्स असून त्यांचे एकंदर सभासद ३५ लाख होते. या संस्था फॅसिस्ट पक्ष व फॅसिस्ट सरकार यांच्या नियंत्रणाखालीं असत.

कामगार-हितवर्धक सभा—हिंदुस्थानांत पहिल्या महायुद्धापूर्वी कामगारसंघविषयक चळवळ फारशी नव्हती. मुंबईतील मजूर वर्गाची सर्वांगीण उन्नति करण्याच्या उद्देशानें ही संस्था १९०९ सालीं मुंबईत स्थापण्यांत आली. मजुरांचे कामाचे तास कमी करणें, मद्यपानाला आळा घालणें, रात्रीच्या शाळा सुरू करून शिक्षण देणें, कारखानदार व मजूर यांतील भांडणें सलोख्यानें मिटविणें व सरकारची सहानुभूति मजुरांना मिळवून देणें या गोष्टी आजपर्यंत या संस्थेनें आस्थेवाईकपणें केल्या आहेत. परळ, दादर व मोईवाडा या भागांत संस्थेच्या शाखा आहेत.

पहिल्या महायुद्धानंतर १९१९-२३ या पांच वर्षांत हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं संघ निघाले. यांचें एकीकरण करण्यासाठीं १९२० सालीं अखिल भारतीय ट्रेड यूनियन कॉंग्रेस संस्था स्थापन झाली. रेल्वे, टेलिग्राफ, पोस्ट, विणकाम, इत्यादींतील कामगारांचीं फेडरेशनें निघालीं. सर्वांचे प्रतिनिधी जागतिक संघाच्या परिषदांना उपस्थित होऊं लागले. तथापि प्रत्यक्ष कामगारांचे प्रतिनिधी संघांतून फारच कमी असत. कम्यूनिस्ट चळवळ्यांच्या ताब्यांत हे संघ जाऊं लागले. दुफळ्या झाल्या. इंडियन (नॅशनल) ट्रेड्स यूनियन फेडरेशन संस्था निघाली. पुन्हां एकोप्याचे प्रयत्न झाले (१९३८). पण दुसऱ्या महायुद्धास मदत करण्याच्या बाबतींत पुन्हां तंटे सुरू झाले. एम्. एन्. रॉय यांनीं एक नवा संघ काढला. हिंदुस्थान मजदूर सेवा संघ ही दुसरी कॉंग्रेसनिष्ठांची संस्था निघाली.

सरकार मूळ ट्रेड यूनियन संस्थाच मान्य करतें. एकंदर हिंदुस्थानांत सध्यां ८६५ कामगार संघ असून ८,८९,३८८ सभासद आहेत. हे संघ सरकारमान्य असेच आहेत.

**कामटा-राजोला**—मध्य हिंदुस्थान. चोबे जहागिरींपैकीं ही एक जहागीर असून बाघेलखंड येथील पोलिटिकल एजंटच्या हुकमतीखालीं असे. हिचें क्षेत्रफळ १३ चौरस मैल व लोकसंख्या (१९४१) १,४११ आहे. जहागीरदार कायस्थ जातीचा आहे. मूळपुरुषास ही जहागीर इ. स. १८१२ मध्यें इनाम मिळाली. राजोला हें जहागिरीचें मुख्य ठिकाण जी. आय्. पी. रेल्वेच्या झांशी-माणिकपूर फांट्यावर असलेल्या नारवी स्टेशनच्या

दक्षिणेस आठ मैलांवर आहे. आतां ही जहागीर विंध्य प्रदेश संघांत सामील आहे.

**कामटी**— मध्यप्रांत, जिल्हा नागपूर. नागपूरपासून १० मैलांवर बंगाल–नागपूर रेल्वेचें हें एक स्टेशन असून नागपूर जिल्ह्यांतील लष्कर येथें असतें. कन्हान नदीच्या कांठीं हा गांव असून येथें झाडी पुष्कळ आहे. या गांवाचा सर्वांत उंच भाग समुद्रसपाटीपासून ९९६ फूट आहे.

मराठी अमल चालू असतांना देखील कामटीची व्यापारी दृष्टीनें भरभराट होत होती. परंतु हल्लीं रेल्वे, वगैरे झाल्यामुळें नागपुरासच सर्व व्यापारी देवघेव मोठ्या प्रमाणांत होत असल्यामुळें कामटीचें महत्त्व जात चाललें आहे. जवळपास मँगेनीजच्या खाणी असल्यामुळें येथें मँगेनीजचा व्यापार मोठ्या प्रमाणावर होतो. अॅस्बेस्टॉस, दारू व लोंकरीचें कापड तयार करण्याचे कारखाने येथें आहेत.

**कामठा**—मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. टिरोरा तहशिलीच्या ईशान्येस ही जमीनदारी असून प्रदेश फार सुपीक आहे. क्षे. फ. २८८ चौ. मैल. १८१८ सालीं कामठा तालुक्याचा वहिवाटदार चिमणा हा आप्पासाहेबांच्या बंडांत त्यांच्या बाजूस मिळाला. याचा परिणाम असा झाला कीं, बहुतेक सर्व जमीनदार घराणीं या जमीनदारीस मुकलीं. जमीनदारीची लो. सं. एक लाख व उत्पन्न तीन लाख आहे. कामठा येथें एक जुनें देऊळ असून एक किल्लाहि आहे. इ. स. १८१८ मध्यें ब्रिटिशांनीं या किल्ल्यावर भडिमार केला होता. येथें अडकित्ते आणि जोडे तयार होतात.

**कामंदक** (७००–७५०)—एक काश्मिरी कवि. 'नीतिसार' नांवाचा एक सुप्रसिद्ध ग्रंथ यानें लिहिला असून डॉ. विंटरनिझ्नीं आपल्या भारतीय वाङ्मयपरीक्षणांत त्याची फारच प्रशंसा केली आहे. कणिक, कौटिल्य यांप्रमाणेंच हा कवि शास्त्रनीतींत पारंगत होता.

**कामदुघा**—एक आयुर्वेदीय औषध. मुख्य औषधें मौक्तिक, प्रवाळ,शौक्तिक, कपर्दिक व शंख हीं भस्में, सोनकांव व गुळवेलसत्त्व हीं असून खल आंवळकाठीच्या काढ्यांत करतात. हें औषध अतिशय शीतवीर्य आहे. शरीरांत वाढलेली उष्णता, कडकी, त्यामुळें हातापायाची आग होणें, डोळ्यांची आग होणें, डोकें दुखणें, चक्कर येणें, इत्यादि उष्णताप्रधान रोगांवर हें एक अमूल्य औषध आहे. मूत्रमार्गाची जळजळ व सूज, शौचाला रक्त पडणें, मूळव्याधीचें रक्त पडणें, नांकातून रक्त पडणें, इत्यादि रक्तस्रावावर या औषधाचा उपयोग होतो. १ ते ३ गुंजा लोणी, खडीसाखर किंवा दूधसाखर यांतून घेतात.

**कामवक्ष** (१६६७–१७०९)—औरंगजेब बादशहाचा सर्वांत धाकटा मुलगा. बापानें मरणसमयीं पत्रांत दक्षिणची सुभेदारी याला दिली होती. पुढें त्याचा वडील भाऊ जो बहादूरशहा हा गादीवर आल्यानंतर त्याचें वर्चस्व कबूल न करतां हा आपल्या नांवानें जेव्हां नाणीं पाडूं लागला तेव्हां बहादूरशहानें त्याला पुष्कळ सवलती देऊन आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केला. पण तो ऐकेना. तेव्हां बहादूरशहानें दक्षिणेंत त्याच्यावर स्वारी केली व हैद्राबादजवळ त्याचा पराभव केला. या लढाईंत कामबक्षाला जखम होऊन तो मरण पावला. त्याच्या आईचें नांव उदेपुरीमहाल असें होतें. उदेपुरी बेगम पाहा.

यानें बापाविरुद्ध थोडीशी चळवळ केल्यामुळें बापानें त्याला कांहीं दिवस (डिसेंबर १६९८ ते जून १६९९) कैदेंत ठेवलें होतें. राजाराम छत्रपति जिंजीस असतां तेथें वेढा घालून बसलेल्या झुलफीगारखानाच्या मदतीस कामबक्ष आला होता. परंतु त्या दोघांत भांडणें सुरू झालीं व कामबक्ष मराठ्यांकडे राजकारणें करूं लागला. तेव्हां झुलफीगारखानानें त्याला कैद करून औरंगजेबाकडे पाठवून दिलें होतें (इ. स. १६९२).

**कामरान**—मोगल बादशहा बाबर याचा एक मुलगा. त्याचा वडील भाऊ हुमायून. कामरान हा तिरसट व विश्वासघातकी होता. त्यास हुमायूननें काबूल व पंजाब हे दोन प्रांत तोडून दिले. पुढें शेरखानचें बंड झालें त्या वेळीं कामराननें हुमायुनास मदत केली नाहीं. पुढें रानटी लोकांनीं कामरानला पकडून हुमायूनच्या स्वाधीन केलें. तेवीस वर्षें त्यानें हुमायूनशीं बेइमानगिरी केल्यानें हुमायूननें त्याचे डोळे काढले. कामरानासहि पश्चात्ताप होऊन त्यानें त्याची क्षमा मागितली. तो शूर, धाडसी पण कपटी व क्रूर होता. तो सिंध प्रांतांतच मरण पावला.

**कामरूप**—आसाम प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,८४० चौ. मै. व लो. सं. १२,६४,२००. या प्रांतांत भाताची लागवड होते. दक्षिणेकडील पर्वताच्या पायथ्याशीं जंगल असून यांत हत्ती, गवे, वाघ, चित्ते, अस्वल, हरीण, ससा हे वन्य प्राणी आहेत. पावसाची सरासरी ६७ इंच आहे. रघुवंशांत हें नांव दोन-तीन वेळां आलें आहे. कामरूप हें आसाम देशाचें संस्कृत नांव आहे. या प्रांताचा घेर १,६६७ मैल आहे. त्यांत ब्रह्मपुत्रा नदीचा सर्व प्रदेश, कुचबिहार आणि भूतान हे प्रदेश येतात. कुचबिहार हा कामरूपचा पश्चिम भाग होता. त्याची कामतीपूर राजधानी होती. तीवरून सर्व प्रदेशास हें नांव पडलें. १८२६ त पहिली ब्रह्मी लढाई झाल्यावर कामरूप ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आलें. गोहत्ती, कामाख्या आणि हाजो येथें प्राचीन हिंदु देवळांचे अवशेष पुष्कळ सांपडतात. या जिल्ह्यांत हिंदूंची वस्ती शें. ६९, मुसलमान शें. ३९ व वन्यधर्मी लोक शें. २१ आहेत. मुख्य पीक भाताचें आहे. चहाची लागवड हा येथील महत्त्वाचा धंदा आहे. व्यापारी वर्ग हा मारवाडी लोकांचा आहे.

**कामशाटका**— हें द्वीपकल्प सैबेरियाच्या ईशान्येस ओखोटस्क समुद्र व बेहरिंग समुद्र यांमध्यें आहे. रशियाचा हा एक समुद्रस्थ प्रांत असून त्याचें क्षे. फ. १,०४,२६० चौ. मैल आहे. हचिनस्का हा ज्वालामुखी पर्वत १६,९२० फूट उंच आहे. आग्नेय भागांत ज्वालामुखी पर्वतांची मालिकाच लागलेली आहे. सर्वांत उंच कलचेव्हेस्किया नांवाचा ज्वालामुखी हा १६,९९० फूट उंचीवर आहे. कामशाटका नांवाची मुख्य नदी ३२५ मैल लांब आहे. तेथील रहिवासी 'नेटल' झाडाच्या तंतूंपासून वस्त्रें विणून तयार करितात. लो. सं. सुमारें १२,०००. मासे धरणें व शिकार करणें हा त्यांचा मुख्य धंदा होय. १७ व्या शतकाच्या अखेरीस रशियन लोकांनीं कामशाटकामध्यें पहिली वसाहत केली. कामशाडेल ही मोगलवंशीय जात पूर्वी फार महत्त्व पावली होती. कोर्यंक ही भटकी जात आहे.

**कामशास्त्र**— भरतखंडांत अर्थशास्त्राच्या जोडीनें हें शास्त्र प्रगत झालें. धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गापासून निघालेलीं हीं दोन्ही शास्त्रें शुद्ध व्यावहारिक स्वरूपाचीं आहेत. आपला काम अति उत्तम तऱ्हेनें कसा तृप्त करतां येईल याचीं साधनें व मार्ग यांचें शिक्षण देण्याचाच केवळ उद्देश कामशास्त्राचा आहे. कामशास्त्र मुख्यतः नागरिकांना उद्देशून लिहिलें आहे. प्रेमकलेवरील अतिपुरातन ग्रंथ जो वात्स्यायनाचें कामशास्त्र तो कौटिलीय अर्थशास्त्राच्या धर्तीवर लिहिलेला दिसतो. या ग्रंथाचा बराचसा भाग मानववंशशास्त्रज्ञ किंवा स्त्रीपुरुषविषयक प्रश्नांचे विवेचक यांना फार उपयुक्त आहे. १३ व्या शतकांत कोक्कोकानें रतिरहस्य हा ग्रंथ लिहिला. अनंगरंग हा लोकप्रिय ग्रंथ कल्याणमल ह्या राजकवीनें लिहिलेला आहे. जयदेव कवीची सुप्रसिद्ध रतिमंजरी हा कामशास्त्रीय ग्रंथ होय.

**कामा, भिकाजी रुस्तुम** (मृ. १९३६) — एक क्रांतिकारक हिंदी महिला. या इंग्लंडांत स्थायिक झाल्या होत्या. यांची व स्वातंत्र्यवीर सावरकर यांची भेट झाल्यावर यांच्या चळवळीला स्वरूप आलें. जर्मनींत भरलेल्या आंतरराष्ट्रीय समाजवादी परिषदेंत यांनीं नवीन तयार केलेला वंदे मातरम् चा हिंदी राष्ट्रध्वज फडकवून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या ठरावावर मोठें जहाल भाषण केलें. त्यानंतर त्यांचें नांव फारसें पुढें आलें नाहीं.

**कामाठी**—एक जात. एकंदर लो. सं. साडेतीन हजार; पैकीं बहुतेक मुंबई इलाख्यांत असून बाकीचे वऱ्हाड-मध्यप्रांतांत आहेत. हे पुष्कळ धंदे करतात. पण साधारणपणें ते कलाकुसरीचा धंदाच हातीं घेतात. हे लोक प्रायः मजूर असतात म्हणून यांना कामाठी म्हणतात. हे लोक उंच, कृष्णवर्णी व धडधाकट असून यांची भाषा तेलगू असते. स्मार्तपंथी भस्म व गंध लावतात व भागवतपंथी नाम लावतात. हिंदु देवतांचे हे उपासक असून पंढरपूर, काशी, नाशिक, जेजुरी, वगैरे क्षेत्रीं यात्रेस जातात. हे हिंदूंचे सर्व सण पाळतात. यांच्यापैकीं कोमटी, सोनार व सुतार या जाती मौंजीबंधन विधि करतात. यांचा कुलगुरु तेलंगी ब्राह्मण असतो. खुद्द मद्रासमध्यें मात्र या नांवाचे कोणीहि लोक नाहींत. मध्यप्रांतांत हे लोक गवंड्याचें काम करतात.

**कामेरून**—पश्चिम आफ्रिकेंतील एक संरक्षित संस्थान. १५ व्या व १६ व्या शतकांतील पोर्तुगीज शोधकांनीं कामेरून हें नांव प्रथम प्रचारांत आणलें. १८८४ मध्यें जर्मनीनें हा देश काबीज केल्यावर या देशाचें कामेरून असेंच नांव कायम ठेवलें. १९११ सालीं कांगोंतील बराचसा मुलूख कामेरूनमध्यें समाविष्ट झाला. याचें क्षे. फ. १,९०,००० चौ. मैल आहे. कामेरून व अप्पर गिनी हे दोन पर्वत असून अत्यंत उंच शिखराचें स्थानिक नांव मांगोमा लोबा असें आहे. दुआला, बेलटाउन, अकाटाउन, व्हिक्टोरिया अशीं प्रसिद्ध शहरें आहेत. येथें कडाक्याची थंडी व पाऊसहि बराच असतो. डोंगराळ प्रदेशांतील अरण्यांत इमारती व इतर उपयुक्त लांकूड उत्पन्न होतें. बेनू नदीच्या उत्तरेकडील प्रदेश सुपीक असून त्यांत रबर, मका, तांदूळ, ऊंस, इत्यादि पिकें होतात. गोरिला नांवाचें मोठें वानर येथें आढळतें. लोखंड गाळणें, माले, बाण व तरवारी बनविणें या धंद्यांत हे नीग्रो लोक वाकबगार आहेत.

पहिल्या महायुद्धानंतर हा जर्मनीचा प्रदेश फ्रान्स आणि ब्रिटन यांच्या संरक्षणाखालीं आला. फ्रेंच मुलखांत मूळ लोक सुमारें २५ लाख आहेत. यावूंदे हें मुख्य ठिकाण आहे. ब्रिटिश मुलूख थोडा आहे. लो. सं. ८,६८,६३७ आहे. व्हिक्टोरिया हें बंदर व मुख्य ठिकाण आहे.

**कामोद**—हा राग कल्याण थाटांतून उत्पन्न होतो. ह्याच्या आरोहावरोहांत सातहि स्वर लागत असल्यामुळें ह्याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादीस्वर पंचम असून संवादी ऋषभ आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर आहे. ऋषभावरून पंचमस्वरावर जेव्हां गायक जातो तेव्हां ह्या रागाची प्रतीति तात्काल होते. दोन मध्यम घेणाऱ्या रागांपैकीं हा एक आहे; पण तीव्र मध्यम आरोहांतच येतो. दोन मध्यमांच्या इतर रागांप्रमाणें यांतहि गांधार स्वर अवरोहांत वक्र आहे आणि निषाद आरोहांत असत्प्राय आहे. अवरोहांत विवादी या नात्यानें कोमल निषाद स्वर केव्हां केव्हां घेतलेला दृष्टीस पडतो. या रागांत हमीर गौड हे राग मिसळलेले दिसतात.

**काम्यकवन**—काम्यकवन आणि द्वैतवन हीं भारतांत प्रसिद्ध आहेत. वनवासांत पांडव असतां पुष्कळ काळ या वनांत राहिले होते. हस्तिनापुराच्या पश्चिमभागीं कुरुक्षेत्राच्याहि पश्चिमेस सरस्वतीतीरावर काम्यकवन होतें.

**कायगांवकर**—नारायण दीक्षित पाटणकर नांवाचा एक कोंकणांतील ब्राह्मण १७ व्या शतकांत देशावर येऊन गंगातीरीं पैठण येथें तपश्चर्या करूं लागला. तो संस्कृतज्ञ, विद्वान् व कर्मठ होता. औरंगाबादेजवळील सातारें गांवीं भिक्षावृत्ति अवलंबन करून राहत असे. त्यानें सर्व हिंदुस्थानभर तीर्थयात्रा केली. ब्रह्मेंद्रस्वामी व नारायण दीक्षित समकालीन होते. दक्षिणेंतील व कोंकणांतील कारस्थानांत दीक्षितांचें अंग होतें. त्यांचें पुढें काशीसच वास्तव्य झालें. त्यांनीं अनेक ठिकाणीं अन्नछत्रें, सदावर्तें, वगैरे घातलीं. काशीस दीक्षितपुरा म्हणून त्यांनीं वसविलेला एक भाग आहे. गोदाप्रवरा-संगमीं कायगांवास दीक्षितांनीं वास्तव्य केलें, म्हणून त्यांस कायगांवकर हें नांव पडलें. हे सावकारी करीत. शेंदूर्णीचे हल्लींचे जहागीरदार यांचेच वंशज होत. वासुदेव दीक्षित व बाळकृष्ण दीक्षित यांचा व पेशव्यांचा पत्रव्यवहार आढळतो व पेशव्यांनीं यांना बरीच जहागिरी दिली होती.

**कायदे**—कोणत्याहि स्वतंत्र देशाच्या सरकारनें प्रजेकरितां केलेल्या नियमांना कायदा म्हणतात. इंग्लंडांत हल्लीं कोणताहि कायदा पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांनीं मान्य करून नंतर त्याला राजाची मान्यता मिळावी लागते. इतका विधि पुरा होईपर्यंत त्याला 'बिल' असें म्हणतात, आणि राजाचे शिक्कामोर्तब झाल्यावर त्याला 'कायदा' म्हणतात. कायदे दोन प्रकारचे असतात– १ सार्वजनिक कायदे–म्हणजे जे कायदे सर्व प्रजाजनांना लागू असतात ते, व २ खासगी कायदे–म्हणजे कांहीं ठराविक इसमांना त्यांच्या खासगी बाबतींत लागू असतात ते कायदे. इंग्लंडांत पार्लमेंटनें केलेला कायदा दुरुस्त करण्याचा किंवा रद्द करण्याचा अधिकार पार्लमेंटला आहे. एकट्या राजाला नाहीं. (कायदेशास्त्र पाहा).

हिंदुस्थान—१९१९ च्या 'गव्हर्नमेंट ऑफ इंडिया' या इंग्लंडच्या पार्लमेंटानें मान्य केलेल्या कायद्यानें हिंदुस्थानला बरेच राजकीय हक्क देण्यांत आले. १९३५ च्या कायद्यानें हिंदुस्थानला स्वराज्याचे व संवराज्या(डोमिनियन स्टेटस)चे हक्क देण्याच्या बाबतींत फार मोठी मजल मारली. १९३५ च्या गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टपैकीं प्रांतिक राज्यकारभारासंबंधींचा भाग अमलांत १९३७ सालीं आला; परंतु मध्यवर्ती संयुक्त राज्यघटनेसंबंधींचा भाग (फेडरल प्रोग्रॅम) लागू करण्याचें तहकूब ठेवण्यांत आलें. राज्यकारभारांत १९३५ च्या कायद्यानें मुख्य दोन तत्त्वें लागू केलीं तीं—(१) प्रांतांमध्यें प्रांतिक स्वायत्तता व लोकनियुक्त सभासदांपैकीं बहुमतवाल्या पक्षाचें कायदेमंडळाला जबाबदार मंत्रिमंडळ स्थापणें; आणि (२) वरिष्ठ सरकारांत ब्रिटिश प्रांत व हिंदी संस्थानें यांचें संयुक्त राज्यपद्धतीचें कायदेमंडळ (फेडरल लेजिस्लेचर). प्रत्येक प्रांतांत गव्हर्नर हा प्रांताधिपति असून प्रांतिक कायदेमंडळाला जबाबदार मंत्रिमंडळ गव्हर्नरनें नेमावें. मद्रास, मुंबई, बंगाल, संयुक्तप्रांत, बिहार व आसाम या प्रांतांत कायदेमंडळाचीं दोन सभागृहें–असेंब्ली व कौन्सिल–असावींत; आणि इतर प्रांतांत एकच सभागृह – असेंब्ली – असावें. अल्पसंख्याक मुसलमानांकरितां स्वतंत्र मतदार-संघ व जादा जागा देण्यांत आल्या. सर्व हिंदुस्थानकरितां एक फेडरल कोर्ट स्थापण्यांत आलें. प्रांतांना राज्यकारभाराचीं पृथक् खातीं देण्यांत आलीं तीं—(१) न्यायखातें व न्यायकोर्टें, (२) पोलिस, (३) तुरुंग, (४) राष्ट्रीय कर्ज, (५) प्रांतिक सरकारी नोकरवर्ग, (६) जमीनदार, (७) स्थानिक स्वराज्य संस्था, लोकलबोर्डें, म्युनिसिपालिट्या, (८) आरोग्य व दवाखाने, (९) शिक्षण व विद्यापीठें, (१०) पाणीपुरवठा व कालवे, (११) शेती, (१२) जंगल, (१३) खाणी, (१४) व्यापार, वगैरे ५४ बाबी. शिवाय ३६ बाबी प्रांतिक व वरिष्ठ दोन्ही सरकारांनीं समान अधिकाराच्या ठरविल्या आहेत (कॉन्करंट लेजिस्लेटिव्ह लिस्ट) त्यांत (१) फौजदारी कोर्टांचा कायदा (क्रिमिनल प्रोसीजर व पीनल कोड), (२) दिवाणी कायदा (सिव्हिल प्रोसीजर कोड), पुराव्याचा कायदा, विवाह–घटस्फोट, वारसा, नादारी, वृत्तपत्रें, कारखाने, मजूरवर्ग, वीज, वगैरे आहेत. वरिष्ठ सरकार १९१९ च्या कायद्याप्रमाणेंच चालू असून वरिष्ठ कायदेमंडळाची असेंब्ली १०५ सभासदांची, आणि स्टेट कौन्सिल ३४ सभासदांचें आहे. १९३५ च्या कायद्यानें ब्रह्मदेश हिंदुस्थानपासून तुटक करून स्वतंत्र राज्य करण्यांत आला. हिंदुस्थानच्या राज्यकारभारावर वरिष्ठ सत्ता इंग्लंडांतील इंडिया ऑफिसचा मुख्य अधिकारी जो स्टेट सेक्रेटरी त्याच्याकडे असे; आणि त्याच्या कौन्सिलचे किमान आठ व कमाल बारा सभासद असत; त्यांत एकदोन हिंदी सभासद असत. हिंदुस्थानवर अंतिम वरिष्ठ सत्ता ब्रिटिश पार्लमेंटची आहे. १९४७ मध्यें पार्लमेंटनें 'दि इंडियन इन्डिपेंडन्स ॲक्ट' पास करून हिंदुस्थान व पाकिस्तान अशीं दोन प्रथक् वसाहत राज्यें (डोमीनिअन्स) ता. १५ ऑगस्ट १९४७ पासून स्थापन करून त्यांना संपूर्ण डोमिनियन स्टेटसचे अधिकार दिले आहेत. तदनुसार हिंदुस्थानची व पाकिस्तानची राज्यघटना तयार करण्याकरितां दोन पृथक् घटनासमित्या दिल्ली व कराची येथें काम करीत आहेत. १९४७ च्या कायद्यानें मर्जी नसेल तर ब्रिटिश साम्राज्यांतून बाहेर पडून पूर्ण

स्वतंत्र होण्याचा हक्क हिंदुस्थान व पाकिस्तानला देण्यांत आला असून या राज्यघटना तयार होऊन १९४८ च्या जूनला त्यांची प्रत्यक्ष अमलबजावणी व्हावयाची, असें ठरलें होतें. हिंदुस्थान आणि पाकिस्तान यांनीं स्वतःच्या राज्यघटना तयार करावयाच्या आहेत व त्यांसाठीं दोघांनीं घटना समिती नेमल्या असून त्यांचें काम चाललें आहे.

**कायदेभंग**—(ब्रीच). कायद्यामध्यें या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखादा कायदा उल्लंघन करणें किंवा एखादें कायदेशीर कर्तव्य न करणें.

१. शांततांभग (ब्रीच ऑफ पीस)– सार्वजनिक सुरक्षिततेचा किंवा शांततेचा भंग स्वतः करणें किंवा तसा भंग करण्यास दुसऱ्याला उत्तेजन देणें हा गुन्हा आहे. पीनल कोडाप्रमाणें गर्दी, मारामारी, दुसऱ्याच्या ताब्यांतील जमिनीवर किंवा घरांत जबरदस्तीनें धाक देऊन, वगैरे शिरणें किंवा बेकायदेशीर केलेला कबजा कायम ठेवण्याकरितां जबरदस्ती करणें, किंवा हातांत घातक शस्त्रें घेऊन लोकांना भीति दाखवीत हिंडणें, किंवा मारामारीला या असें आव्हान देणें, या सर्व कृत्यांनीं शांतताभंगाचा गुन्हा होतो.

२. वचनभंग (ब्रीच ऑफ प्रॉमिस)–उदा., एखाद्या इसमानें दुसऱ्याला तुझ्याशीं लग्न करीन असें वचन देऊन नंतर तें वचन जर मोडलें तर अशा स्त्रीला त्या पुरुषाविरुद्ध नुकसानभरपाईचा दावा लावतां येतो.

३. विश्वास-करारभंग (ब्रीच ऑफ ट्रस्ट)–जेव्हां एखादा विश्वस्त (ट्रस्टी) किंवा व्यवस्थापक (एक्झीक्यूटर), त्याच्या ताब्यांतील इस्टेटीचा उपयोग स्वतःच्या फायद्याकरितां करतो, तेव्हां त्याला म्हणतात.

**कायदेशास्त्र**—(ज्यूरिस्प्रुडन्स). मानवसमाजांत परस्परांचे व्यावहारिक संबंध कोणत्या सामान्य तत्त्वांवर आधारलेले असावे, याचा विचार करणाऱ्या शास्त्राला कायदेशास्त्र म्हणतात. विशिष्ट समाजानें केलेले कायदे उल्लंघन करणाराला शासन करण्याचा अधिकार त्या समाजाला असतो. कायदे करण्याचा मुख्य हेतु मानवांच्या आपसांतील व्यवहारांत शिस्त व न्याय असावा, हा असतो. त्यामुळें कायदेशास्त्रांत प्रत्येक मनुष्याचे हक्क कोणते व कर्तव्यें कोणतीं यांचा विचार करून त्यांचें उल्लंघन करणाराला शासन काय करावें, व कोणीं करावें याचाहि विचार करावा लागतो. समाजाचें नियमन नीतिनियम, पारमार्थिक विचार आणि सरकारनें ऊर्फ शासनसंस्थेनें केलेले हुकूम यांनीं होत असतें. नीतिनियमांचें व कायदेपद्धतीचें अंतिम ध्येय 'उपयुक्तता' (युटिलिटी) किंवा हित, कल्याण हें असतें. 'कायदा' याचा सामान्य अर्थ (१) धर्माचार्यांनीं–शंकराचार्य, पोप, खलीफा, इत्यादींनीं केलेल्या आज्ञा; (२) समाजानें केलेले नीतिनियम; आणि (३) राजानें किंवा सरकारनें केलेले हुकूम, असा फार व्यापक आहे; पण 'कायदा' याचा विशिष्ट अर्थ राजानें किंवा सरकारनें केलेले कायदे हा सर्वमान्य अर्थ आहे. सरकारी कायद्याचें वैशिष्ट्य हें असतें कीं, या कायद्यांनीं दिलेल्या हक्कांची अमलबजावणी करण्याची व्यवस्था, आणि कायद्यांचें उल्लंघन करणारास शासन करण्याचा अधिकार न्यायकोर्टाकडे दिलेला असतो. न्यायदानाची अशी व्यवस्था कोणत्याहि धर्मसंस्थेंत किंवा समाजांत आढळत नाहीं.

तात्त्विक कायदेशास्त्राचा पाया इंग्लंडांत जॉन ऑस्टिन यानें घालून 'कायदा' या सामान्य शब्दाचें वर्गीकरण केलें. आणि सरकार, आज्ञा, कर्तव्य, शासन, वगैरे शब्दांच्या अर्थांचें विस्तृत विवेचन केलें. नंतर हॉलंड, फ्रेडरिक हॅरिसन, ब्लॅकस्टोन, वगैरे विद्वानांनीं ऑस्टिनच्या विवेचनांतले दोष दाखवून कायदेशास्त्र परिणत केलें; सर हेन्री मेन व साव्हिनी यांनीं कायद्याच्या ऐतिहासिक अभ्यासपद्धतीची दिशा दाखवणारे ग्रंथ लिहिले; आणि कान्टनें या अभ्यासाला आध्यात्मिक वळण लावलें. याप्रमाणें कायदेशास्त्रांत वैश्लेषिक पंथ (ॲनॅलिटिकल स्कूल), ऐतिहासिक पंथ (हिस्टॉरिकल स्कूल) आणि तत्त्वज्ञानी पंथ (फिलॉसॉफिकल स्कूल), असे तीन पंथ आहेत.

**कायदेशीर चलन**—(लीगल टेंडर). जें नाणें कर्जदार कर्जफेडीकरितां आपल्या सावकाराला घेण्यास भाग पाडूं शकतो त्याला कायदेशीर चलन म्हणतात. इंग्लंडमध्यें १८७० सालच्या 'कॉइनेज ॲक्ट' या कायद्यानें पुढील चलन कायदेशीर ठरविलें आहे : (अ) कोणत्याहि किंमतीचें सोन्याचें नाणें; (आ) दोन पौंड किंमतीपर्यंतचें रुप्याचें नाणें; (इ) एक शिलिंग किंमतीपर्यंतचें ब्रॉन्झचें नाणें आणि (ई) पांच पौंडांहून अधिक किंमतीच्या 'बँक ऑफ इंग्लंड'च्या कागदी नोटा.

हिंदुस्थान — १८७० त हिंदुस्थानचा नाण्याचा कायदा झाला. १८९३ सालीं टांकसाळींचा उपयोग लोकांना नाण्यासाठीं करतां येऊं नये असा कायदा झाला. १८७० नंतर सोन्याच्या मोहरा बंदच झाल्या. रुप्याच्या नाण्यांत मिश्रण जास्त येऊं लागलें व १९३५ सालीं एक रुपयाची नोटहि निघाली. तांब्याचीं नाणीं या देशांत फार पूर्वीपासून आहेत. त्यानंतर आतां निकलचीं नाणीं आलीं. कागदी नोटा रुपया किंमतीपासून १०० रु. पर्यंतच आहेत. (चलन व नाणकशास्त्र पाहा).

**कायदेसंग्रह**— (कोड). कायदे किंवा नियम यांच्या संग्रहाला ही संज्ञा आहे. उदा., पीनल कोड. आहे तेच कायदे क्रमवार लावून पुनर्रचना केलेल्या कायदेग्रंथास कोड म्हणतात. रोमन साम्राज्याच्या अमदानींत जे वेळोवेळीं अनेक कायदे

करण्यांत आले ते जस्टिनियन बादशहानें एकत्र करून त्यांचें जें कोड तयार केलें तें अर्वाचीन काळींहि उपयोगी पडत आहे. पहिलें इंडियन पीनल कोड लॉर्ड मेकॉलेनें तयार केलें (१८३३). आतां नवीन तयार करण्याचा हिंदी सरकारचा विचार चालू आहे.

**कायफळ**—एक लहान झाड. रानजायफळालाच कायफळ म्हणतात. याचें साल व बीं औषधाच्या उपयोगी असून अंगाला लावण्याच्या उटण्यांतहि घालतात.

**कायम निधि**—(फंड). सरकारला दिलेलें कर्ज, राष्ट्रीय कर्ज. या कर्जाचे दोन प्रकार आहेत : १ स्थायी ऋण व २ अस्थायी किंवा चल ऋण. स्थायी ऋणावरचें फक्त व्याज वेळोवेळीं दिलें जातें, पण मुद्दल कधींच परत केलें जात नसतें. अस्थायी ऋण ठराविक वेळीं परत करावयाचें असतें. एखादी ठेव कधीं परत करण्याची किंवा घेणाऱ्याच्या इच्छेनें परत करण्याची असेल तेव्हां तिला कायम किंवा बंद्या ठेवीचें स्वरूप येतें.

**कॉयस, जेम्स फर्डिनांड** (१८७७-१९४४)— एक फ्रेंच औषधी संशोधक व शास्त्रज्ञ. यांनीं हिंदुस्थानांत औषधी वनस्पतींचें संशोधन करून ग्रंथ लिहिले आहेत. मुंबईच्या हॉफकिन्स इन्स्टिट्यूटमध्यें यांनीं सर्पविषावर औषधें तयार केलीं आहेत. ते नॅचरल हिस्टरी सोसायटीचे अध्यक्षहि होते. संशोधनाचा व्यवहारांत उपयोग होऊन मानवी जीवन सुखी करण्याकडे लक्ष असावें यावर कॉयसचा कटाक्ष असे व त्यांचें सर्व आयुष्य लोकसेवेंत खर्च झालें.

**कायस्थ**—कायस्थांची हिंदुस्थानांतील एकंदर लो. सं. (१९११) २१,७७,३९० होती. संयुक्त प्रांतांत ४,८५,०७३, बिहार-ओरिसामध्यें ३,४७,६१३; आसामांत ८१,९६७; मध्य हिंदुस्थानांत ७१,३९२; मध्यप्रांत-वऱ्हाडांत ३३,५८४; रजपुतान्यांत २३,६१०; पंजाबांत १३,३७४ व इतर प्रांतांत ८,०९३ याप्रमाणें यांची वस्ती आढळून आली. यांत कायस्थ प्रभूंची संख्या येत नाहीं. कायस्थ जातीचा केंद्र मध्यदेशच आहे. बंगालमधील कायस्थांच्या संख्येंत कलितांचें मिश्रण आहे. कलकत्त्याकडे कायस्थ व वैद्य या दोन जातींत लग्नव्यवहार होतो तसा संयुक्त प्रांतांत होत नाहीं. बंगालमधील व संयुक्त-प्रांतांतील कायस्थ हे पूर्णपणें एकवंशीय नसावेत.

इतिहास— कैथ शब्दापासून कायस्थ शब्द बनला असावा. कैथ ही मूळ जात जुन्या कथा सांगणारी व जुनीं गाणीं म्हणणारी असावी. त्यावरून कैथ हें नांव पडलें असावें. कायस्थ हें प्रथम एक राष्ट्र असून तें पुढें नामशेष झालें असावें. जन्म, लग्न व मरण या प्रसंगीं यांच्या चालीरीती उच्च हिंदूंप्रमाणेंच असतात.

कायस्थांच्या पोटजाती श्रीवास्तव्य, भटनागर, सक्सेन, अमिष्ट, ऐथन, अस्थान, वाल्मीकि, माथुर, सूर्यध्वज, कुलश्रेष्ठ, करण, गौर अथवा गौड ऊर्फ निगम ह्या होत. लेखन-शिक्षण-विषयक काम करणें हाच या जातीचा धंदा आहे. वाल्मीकि, माथुर व भटनागर हे तीनच पोटभेद गुजरातेंत आढळतात.

वाल्मीक कायस्थ— हे सुरत परगण्यांत आढळतात. यांचे औदिच्य ब्राह्मण उपाध्याय असून हे वल्लभानुयायी आहेत.

माथुर कायस्थ— अहमदाबाद, बडोदें, डभोई, सुरत व नडियाद येथें आढळतात. आतां हे लोक शाकाहारी बनले आहेत. यांच्यापैकीं कांहीं कायस्थ रामानुजपंथी, कांहीं वल्लभाचार्यांचे अनुयायी व कांहीं शैव आहेत. यांची उपजीविका सर्वथैव कारकुनीच्या पेशावर अवलंबून असते. हिंदु सणांखेरीज माथुर कायस्थांचें इतर पुष्कळ सण असतात.

भटनागर कायस्थ—अहमदाबाद, बडोदें व तुरळक सुरत येथें आढळतात. भटनागर कायस्थांचे आचारविचार माथुर कायस्थांच्या आचारविचारांबरोबर जुळतात. उपाध्याय श्रीगौड ब्राह्मण असतात. खानदेशांत कायस्थ जातीचे लोक भुसावळ व चोपडा येथें सांपडतात. हे मांसाहारी असून दारूदेखील पितात. पुरुष गळ्यांत यज्ञोपवीत घालतात व दारू पिण्याच्या वेळीं तें काढून ठेवितात. यांच्यांत विधवांना पुनर्विवाहाचा अधिकार नाहीं.

**कायेने**— ही फ्रेंच ग्वायनाची राजधानी व बंदर आहे; व कायेने बेटाच्या वायव्य टोंकावर कायेने नदीच्या मुखाजवळ आहे. लोकसंख्या ११,७०४. येथून सोनें, कोको, फॉस्फरस, कातडीं, लांकडें व मसाले बाहेरदेशीं पाठवतात व फ्रेंच दारू, स्पिरिट, लोंकर, रेशीम व कापसाचें कापड, तंबाखू, लोखंडी सामान, कांचेचें सामान, मातीचीं भांडीं, मसाले लावलेलें मांस व मासे, भाजीपाला, मका, कणीक, वाळलेलें गवत, भुसा, तेल व गुरें बाहेर देशांहून येथें येतात.

**कारकुनी**—मराठ्यांच्या इतिहासांत ही संज्ञा येते. कारकुनानें जें सरकारी काम करावयाचें तें करण्याकरितां त्याला ज्याचें काम असतें तो पैसा देतो त्यास कारकुनी म्हणतात. अर्थात् खाजगी व्यक्तीचें काम पण तें काम सरकारमार्फत व्हावयाचें अशाच वेळीं कारकुनी देण्याचा प्रश्न उद्भवतो. मराठी राज्यांत कारकुनी राजरोस देण्याघेण्यांत येई.

सनदपत्रें लिहून देणें ही एक कारकुनी मिळविण्याची संधि असे. अधिकाऱ्यांची कारकुनी कामांवर असे असेंच केवळ नव्हे तर ती वर्षासनासारखीहि असे. दरसालची कारकुनीची रकम निरनिराळ्या अधिकाऱ्यांची ठरलेली असे. कारकुनीची अगर दरबारखर्चाची रकम सालीना बांधलेली असली म्हणजे त्यास वर्षासन म्हणत. हुजूरफडणीस व हुजूरचिटणीस ह्यांस कारकुनीचीं बांधलेलीं वर्षासनें प्रत्येक प्रांतांतून मिळत. खालचे फड-

णीस व चिटणीस ह्यांसहि लहान प्रमाणांत का होईना, पण कारकुनी सालोसाल मिळत असे. जेथें कारकून ठेवावा लागे तेथें कारकुनाचा पगार सुटण्याकरितां कामगारांच्या पगारांत कपात करीत. प्रातीवरील कराच्या स्वरुपाची ही कारकुनी आहे. ( चापेकर-पेशवाईच्या सावलींत ).

**कारखाना कायदे**—( फॅक्टरी ॲक्ट ). कारखाने, गिरण्या व अशा प्रकारचे इतर उद्योगधंदे यांविषयीं जे नियम सरकारनें केलेले असतात त्यांना म्हणतात. १८७८ पूर्वी इंग्लंडांत यासंबंधीं निरनिराळे कायदे होते. ते सर्वत्र एक करून फॅक्टरी ॲण्ड वर्कशॉप ॲक्ट तयार करण्यांत आला. त्यांत आणखी दुरुस्ती करून १९०१ सालीं व्यापक कायदा करण्यांत आला. सदर कायद्यांत कारखान्यांतील ड्रेनेज, आरोग्याबाबत इतर सोयी, फार गर्दी ( ओव्हरक्राउडिंग ), आणि घातक यंत्रांभोंवतीं संरक्षण ( फेन्सिंग ), वगैरे बाबतींत नियम करण्यांत आले. फॅक्टरी म्हणजे जेथें वाफेच्या किंवा विजेच्या, वगैरे शक्तीवर चालणारीं यंत्रें आहेत ती ; व इतरांना वर्कशॉप म्हणतात. या कायद्याचे मुख्य नियम आहेत ते— ( १ ) कापडाच्या गिरण्यांत स्त्रियांना आणि १४ ते १८ वयाच्या बालमजुरांना दररोज काम दहा तास व शनिवारीं ६॥ तास. ( २ ) इतर गिरण्यांत आठवड्याचें काम ६० तास. (३) बारा ते चौदा वयाच्या बाल-मजुरांना दररोज काम ६॥ तास. ( ४ ) वर्षांतून ठराविक दिवस सुट्टी. शिवाय या कायद्यांत रंगाचे कारखाने, आगपेट्यांचे कारखाने, यंत्रें तयार करण्याचे कारखाने, इंडिया रबर, कागद, कांच, तमाखू, छापखाने, वगैरे प्रकारचे कारखाने यांबद्दल निरनिराळे नियम आहेत.

हिंदुस्थानांत १९२२ सालीं वरीलप्रमाणें कारखाना-कायदा करण्यांत आला. हिंदी मजुरांची पाहणी करण्यासाठीं नेमलेल्या रॉयल कमिशननें सुचविल्याप्रमाणें १९३४ सालीं सरकारनें नवाच कायदा केला व त्यांतहि पुढें चार-पांच वेळां बदल करण्यांत आले. हे सर्व कायदे आंतरराष्ट्रीय मजूरसंघाच्या योजनेप्रमाणेंच केलेले आहेत. १९४७ सालीं हिंदी संघाच्या पार्लमेंटांत इंडियन फॅक्टरीज ॲक्ट, कामकऱ्यांना जास्त सवलती व सोयी देण्याच्या दृष्टीनें नवीन बनविण्याचा ठराव पुढें आला आहे.

**कारंजा**——वऱ्हाड, जिल्हा अकोला, तालुका मूर्तिजापूर. कारंजा हें गांव फार पुरातन असून तेथील किल्ला व राहिलेले चार दरवाजे पुरातनत्वाची साक्ष देतात. तेथें कै. रामजी नाईक काण्णव यांचा वाडा असून तो पाहण्यालायक आहे. कारंज नांवाच्या ऋषीस झालेला रोग बरा करण्याकरितां अंबादेवीनें येथील तलाव उत्पन्न केला अशी कथा आहे. याच ऋषीच्या नांवावरून या गांवास कारंज गांव हें नांव पडलें. येथें एक बिंदुतीर्थ नांवाचें कुंड आहे. हा गांव अहमदनगरच्या राजाच्या मुलीच्या स्त्रीधनापैकीं होता. येथें तीन जैन मंदिरें आहेत. व जैनांचें एक केंद्रस्थान आहे. औरंगझेबानें येथील हेमाडपंती देऊळ मोडून त्याची मशीद बनविली आहे. समर्थसंप्रदायांतील रोकडा रामाची समाधि व मठ येथें आहे. येथें कापसाचा मोठा व्यापार चालतो. कुंकवाकरितां गांव प्रसिद्ध आहे.



**कारंजी विहीर**—( आर्टेसिअन वेल ). जमिनींत भोंक पाडून केलेली विहीर. फ्रान्समधील आर्त्वास प्रांतांत याची

मोठ्या प्रमाणांत योजना असल्यावरून 'आर्टेसिअन विहीर' असें नांव पडलें. यांत कारंजाच्या क्रियेप्रमाणें समुद्रसपाटीखालील पाणी वर येतें. ज्या ठिकाणीं जमिनीवर पाणी कमी असतें, त्या प्रदेशांत अशा विहिरी खणतात. अमेरिकेंत कांहीं ठिकाणीं पिकासाठींहि यांचा उपयोग करतात.

**कारण**—तत्त्वज्ञानांत कारण म्हणजे जें कार्य घडवून आणतें तें. आरिस्टॉटलनें याचे चार वर्ग पाडले आहेत: १ निमित्त, २ युक्ति, ३ उपादान आणि ४ उद्देश. ज्याच्यामार्फत फल प्राप्त होतें, तें निमित्तकारण; ज्या साधनानें तें प्राप्त होतें तें युक्तिकारण; ज्या पदार्थापासून फल उत्पन्न होतें तें उपादानकारण; व ज्या हेतूसाठीं फलप्राप्ति आहे तें उद्देशकारण होय.

**कारमोरंट** — हा एक बदकासारखा पायाचा चोंच सांधलेला समुद्रावर आढळणारा पक्षी आहे. याची चोंच लांब असून बांकदार असते; व मान लांब असून पंख आंखूड असतात; व शेंपटी लांब व खाटोळी असते. याचा रंग काळा किंवा पिंगट असतो. यास चांगलें उडतां येतें; तसेंच हा अट्टल पोहणारा व बुडी मारणारा आहे. चिनी लोक याचा

उपयोग मासे धरण्याकरितां करतात. पण हा अतिशय खादाड असल्यामुळें अशा वेळीं त्याच्या गळ्यांत मानेभोंवतीं एक वाटोळी कडी अडकवितात, त्यामुळें त्यास मासे गिळतां येत नाहींत. याच्या निरनिराळ्या देशांत अनेक जाती आहेत.

**कारलें**—कारलीचे मोसमावरून उन्हाळी व पावसाळी, व रंगावरून पांढरी व हिरवी, व महाराष्ट्राबाहेर आकारावरून 'कोरली' (लहान) व 'कारेला' ( मोठा ) असे प्रकार आहेत. कारल्याची भाजी, कोशिंबीर, इत्यादि पदार्थ करतात. व कारल्याचा औषधी उपयोगहि आहे. पित्तविकारावर कारल्याचा रस द्यावा; त्यानें ओकारी होऊन पित्त पडेल.

**कारवान**—बडोदें संस्थान, मिया गांवापासून पूर्वेस ५ मैलांवर व डभोईपासून पश्चिमेस ७ मैलांवर हें प्राचीन क्षेत्र आहे.

कारवानमाहात्म्य नांवाचा एक ग्रंथ आहे. येथील तळें फार पवित्र मानतात. अनेक जुनीं देवळें व लिंग या ठिकाणीं आहेत. मुसलमानांनीं हें उध्वस्त केलेलें उघड दिसतें.

इ. स. च्या १३ व्या शतकांतल्या अर्जुनदेव या वाघेला राजाच्या अमदानीपर्यंत हें गांव क्षेत्र म्हणून प्रसिद्ध होतें. शैव पंथीय नकुलीशाचा पाशुपत संप्रदाय या ठिकाणीं चालू होता, असें नकलेश्वर या नांवावरून दिसतें.

**कारवान**—फार लांबच्या प्रवासासाठीं प्रवाशांचा जो एक मोठा तांडा असतो त्याला हा फारसी शब्द आहे. विशेषतः आफ्रिका आणि आशिया खंडांतील वाळवंटांतून उंटावरून जाणारे व्यापारी व यात्रेकरू यांना ही संज्ञा लावण्यांत येते. या कारवानांचे रस्ते ठराविक असत व मधून मधून उतरण्यासाठीं 'कारवान सराया' असत. या सरायांतून अनेक माणसें आणि जनावरें यांची राहण्याची सोय होई. आजहि अशा सराया आहेत व त्यांतून खाणावळीप्रमाणें जेवण्यासहि मिळतें.

**कारवार**—मुंबई इलाखा, कानडा जिल्ह्यांतील अगदीं वायव्येकडील तालुका. क्षे. फ. २८१ चौ. मैल व लो. सं. ६८,३७६. कारवार हें जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. याचें जुनें नांव काडवाड. हें गोंव्याच्या आग्नेयीस आहे. लो. सं. १५,८१२. १६३८ त कारवार येथें ई. इं. कंपनीनें आपली वखार उघडली. १७१५ त सोंधच्या राजानें कारवारचा जुना किल्ला पाडून सदाशिवगड नांवाचा नवा किल्ला बांधला. मुंबईपासून कारवारपर्यंत आगबोटीनें ३६ तासांत जातां येतें. येथें सरकारी कचेऱ्या, एक इस्पितळ, एक हायस्कूल व कित्येक प्राथमिक शाळा आहेत. कारवारचें बंदर लहान पण सुंदर आहे. भोंवतालीं दाट अरण्य असून सृष्टिसौंदर्य प्रेक्षणीय आहे.

**कारस्कर**—बौद्धायन सूत्र व आपस्तंब सूत्र यांतून कारस्कर लोकांचा उल्लेख आढळतो. या कारस्कर शब्दाचा एक रानटी जात या अर्थी उपयोग दोन्ही ठिकाणीं केला आहे. कारस्कर नांवाचा एक देश होता, व तेथील वृक्षांना कारस्कर वृक्ष म्हणत. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या मतें पाणिनीच्या व बौद्धायनाच्या वेळचे हे कारस्कर म्हणजे सध्यांच्या महाराष्ट्रांतील कातकरी लोक होत. कारस्करपासून अपभ्रंशानें कातकरी हा शब्द मराठींत आला असावा.

**काराकुल**—ह्या नांवाचीं मोठीं व लहान अशीं दोन सरोवरें रशियन तुर्कस्तानांत फरघन प्रांतांत पामीर पठारावर आहेत.

मोठें काराकुल— याची लांबी १२ मैल व रुंदी १० मैल आहे. सरोवर सरासरी १३, २०० फूट उंचीवर आहे.

लहान काराकुल— हें सरोवर ईशान्येस पामीर पठारावर १२,७०० फूट उंचीवर आहे. हे हिमनदीच्या गाळानें भरलेलें असतें. सरोवरामधून गाळाचा एक प्रवाह वाहतो व प्रवाहाला पूर्व तुर्कस्तानांत काशगरकडे वाहत आल्यावर 'गेझ' असें म्हणतात.

**काराकोरम**— हें मंगोलियांतील दोन शहरांचें नांव होतें. एक शहर ८ व्या शतकांतल्या उईघुर राज्याची राजधानी होतें व दुसरें शहर १३ व्या शतकांत मंगोलियांतील दुसऱ्या एका राज्याची राजधानी होतें. आणखी हेंच नांव खांगाई पर्वतावलीस लावितात.

मध्य आशियांतील ही पर्वतराजी हिमालय आणि हिंदुकुश यांमधील दुवा आहे. तीवर गॉड्विन–ऑस्टेन नांवाचें २८,२५० फूट उंचीचें शिखर आहे. जगांतील हें दुसरें अत्युच्च शिखर होय.

**कारिकल**—कारोमांडल किनाऱ्यावर तंजावर जिल्हा व बंगालचा उपसागर यांच्यामधील फ्रेंच वसाहत. हिचें एकंदर क्षे. फ. ५३ चौ. मै. असून पाँडिचेरीच्या सुभेदाराच्या (गव्हर्नरच्या) हाताखालचा एक अधिकारी येथील कारभार पाहतो. लो. सं. (१९४८) ७०,५४१. या वसाहतीचे सहा विभाग आहेत. यांत ११० गांवें आहेत.

अरसालरच्या उत्तर तीरावर, तिच्या मुखापासून सुमारें १॥ मैलावर या वसाहतीचें मुख्य ठिकाण आहे. येथें तांदुळाचा बराच व्यापार चालतो. कारिकल येथून पुष्कळ हिंदी मजूर फ्रेंचांच्या इतर वसाहतींत जातात. कारिकलपासून तंजावर जिल्ह्यांतील पेरलपर्यंत आगगाडी झालेली आहे. लो. सं. २२,००८.

चंदासाहेब याजकडून फ्रेंचांनीं हें गांव मिळविलें. १७४९ त अशाच परिस्थितींत फ्रेंचांना आणखी ८१ गांवें मिळालीं. ही सर्व वसाहत कित्येक वेळां इंग्रजांच्या ताब्यांत आली होती. परंतु १८१७ त ती कायमची परत करण्यांत आली.

**कॉरिन्थ**—ग्रीसमधील एक शहर. हें कॉरिन्थच्या संयोगभूमीजवळ आहे. हें एक व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. शहरा-

भोंवतीं १० मैल घेराची भिंत आहे. होमरच्या वेळेस कॉरिन्थ हें स्वयंशासित राष्ट्र नसून परतंत्र राष्ट्र होतें. इ. स. पूर्वी ६५७ ते ५८१ हीं वर्षे कॉरिन्थला फार भरभराटीचीं गेलीं. या वेळीं सिप्सेलस आणि नंतर त्याचा मुलगा पेरीअँडर हे राज्यकर्ते होते. मातीचीं भांडीं आणि चित्रकला यांत कॉरिन्थ सर्व युरोपच्या पुढें होतें. भव्य देवळें आणि टोलेजंग इमारती यांनीं शहराला फार शोभा आली होती. पुष्कळसे ऐतिहासिक अवशेष ग्रीक सरकारनें मुद्दाम बांधलेल्या पदार्थसंग्रहालयांत ठेवले आहेत. अर्वाचीन शहर प्राचीन शहराच्या ईशान्येस ३॥ मैलांवर १८५८ त वसलें. बिनबियांचीं द्राक्षें, ऑलिव्ह तेल, रेशीम व धान्य येथून बाहेर जातें.

**कारीचा दगड**—(बॅसाल्ट). हा ज्वालामुखीमुळें उत्पन्न होणारा अग्निजन्य खडक आहे. हा खेदार असून जड व स्फटिकमय खडक असतो व यामध्यें फेल्स्पार, ऑगाइट व मॅग्नेटिक लोह, आणि थोडेंसें ऑलिव्हिन असतें. हा विषमाकृति किंवा विशिष्ट आकारहीन, खांबासारखा, किंवा सपाट, किंवा वाटोळा अशा आकारांत आढळतो.

**कारू**—द. आफ्रिका, केप प्रॉव्हिन्स. एका पठाराला हें नांव आहे. समुद्रसपाटीच्यावर याची उंची ३,००० ते ४,००० फूटपर्यंत आहे. हा उंचवट्याचा प्रदेश २ पर्वतांच्या रांगांमध्यें पसरलेला आहे. येथील जमीन उथळ पण सुपीक त्यामुळें येथें भाजीपाला फार विपुल होतो. शिवाय येथें गुरें, मेंढ्या व अंगोरा जातीचीं बकरीं यांना चरण्यास कुरणें फार उत्तम आहेत. प्रदेशाची पू. प. लांबी ३०० मैल व रुंदी ७० मैल आहे.

**कारेलिआ**—सोव्हिएट रशियांतील एक लोकसत्ताक राज्य. हें श्वेतसमुद्र आणि फिनिश सरहद्द यांच्या दरम्यान आहे. या राज्याची राजधानी प्रेट्रोझाव्होड्स्क हें शहर आहे. या राज्याचें क्षेत्रफळ ५५,३२८ चौ. मैल व लो. सं. २,६७,५०० आहे.

**कॉरेली, मेरी** (१८६४–१९२४)—या प्रसिद्ध आंग्ल कादंबरी-लेखिकेचा बाप इटालियन व आई स्कॉटिश होती. लहानपणींच तिला गाण्याच्या चालींवर कविता रचण्याचा नाद असे. अकरा वर्षे वयाला होण्यापूर्वीच, स्कॉट, थॅकरे, डिकन्स यांच्या कादंबऱ्या तिनें वाचून टाकल्या होत्या. शेले, बायरन व कीट्स या प्रसिद्ध आंग्लकवींच्या कवितांचेंहि तिनें अध्ययन केलें. तिनें कादंबऱ्या लिहिल्या त्या: 'अर्डाथ' (१८८९), 'दि सोल ऑफ लिलिथ' (१८९२), 'बॅराब्बास' (१८९३), 'दि सॉरोज ऑफ सेटन' (१८९५), 'दि माइटी ॲटम' (१८९६), 'दि मास्टर ख्रिश्चन' (१९००), 'टेंपोरल पॉवर' (१९०२), 'व्हेंडेट्टा', 'थेल्मा', 'दि लाइफ एव्हरलास्टिंग', इत्यादि. तिची भाषा आवेशयुक्त पण सुंदर असे. तत्कालीन स्त्री-समाजांत तिला फार मान मिळत असे. तिची गरीब लोकांविषयींची कळकळ तिच्या कादंबऱ्यांत जागोजागीं व्यक्त होते.

**कारोमांडल किनारा**—हा हिंदी द्वीपकल्पाचा व मद्रास इलाख्याचा पूर्वकिनारा पाल्क समुद्र, पाल्क सामुद्रधुनी आणि पेन्नार नदी यांमध्यें आहे. या किनाऱ्यावर चांगलें बंदर नाहीं.

कारोमांडल हा शब्द मूळ कसा प्रचारांत आला व ह्याचा अर्थ कोणता समजला जात असावा, ह्याबद्दल तज्ज्ञांत एकमत नाहीं. हा शब्द 'चोलमन्डलम्' म्हणजे चोलांचा प्रदेश ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा असा एक तर्क आहे.

**कॉर्क**—आयर्लंड, कॉर्क परगण्याचें मुख्य शहर. हें डब्लिनच्या नैर्ऋत्येस ली नदीच्या कांठीं असून फार रमणीय आहे. याच्या मध्यमागीं फादर मॅथ्यूचा पुतळा आहे. प्रॉटेस्टंट लोकांचें एक खिस्ती देवालय आहे. चामडें कमाविणें, मद्य काढणें व शुद्ध करणें, लोखंड गाळणें, लोकरीचीं वस्त्रें विणणें व रासायनिक द्रव्यें तयार करणें, हे मुख्य उद्योगधंदे होत. हें आयर्लंडांतील तिसरें व्यापारी शहर आहे. या शहराचें क्षे. फ. २,६८५ एकर असून लो. सं. ७५,४८४ आहे. कॉर्क बंदर हें ली नदीच्या मुखावर असून चोहोंबाजूंनीं जमिनीनें घेरलेलें आहे. याच्याजवळ असलेल्या स्पाइक बेटांत पूर्वी गुन्हेगार लोक पाठवीत असत. शेजारील रॉकी आयलंड बेटावर दारुगोळ्याचा सांठा आहे.

**कार्टराइट, एडमंड** (१७४३–१८२३)—हा एक इंग्रज संशोधक असून यानें १७८५ मध्यें यांत्रिक शक्तीनें चालणारा हातमाग प्रत्यक्ष सुरू केला. या यांत्रिक विणकाम-पद्धतीला त्या वेळचे इतर कारखानदार आणि कामकरी यांनीं जोराचा विरोध केला. तरीहि कार्टराइटनें आपले यांत्रिक माग (पॉवर लूम) सुधारण्याचें काम चालू ठेवलें आणि त्यांत पुष्कळ सुधारणा केल्या. त्यानें बनविलेला यांत्रिक माग हल्लीं सर्वत्र उपयोगांत आहे.

**कार्टाजेना**—१. स्पेनमधील एक तटबंदीचें बंदर असून भूमध्य समुद्रांतलें तें एक फार मोठें व फार सुरक्षित बंदर आहे; कारण या बंदराभोंवतीं उंच टेकड्या आहेत. या बंदरांतील साधारण पाण्याची खोली २८ फूट असून येथें सरकारी कोरडी गोदी आहे. हें आरमारी व लष्करी ठाणें असून येथें दारूगोळ्याचा कारखाना आहे. येथून नजीक अनेक उत्तम लोखंडाच्या खाणी आहेत. येथून कच्चें लोखंड, शिसें, एस्पार्टो गवत, नारिंगें, वगैरे माल परदेशीं जातो. बिनतारी संदेशाचें स्टेशन येथें आहे. लो. सं. १,०२,५१८ आहे.

२. द. अमेरिका, कोलंबिया लोकराज्यांतील एक बंदर. ही बोलिव्हार संस्थानची राजधानीहि आहे. कॉफी, कापूस, लांकूड, रबर, कातडीं, इ. माल बाहेर जातो. लो. सं. ९२,४३४, येथें एक विद्यापीठ आहे.

**कार्टेघिन**—मध्य आशियांत बुखाराच्या अमलाखालीं हें एक लहान संस्थान आहे. लोकसंख्या १,००,००० आहे.

**कार्डन, गिरोलामो** ( १५०१–१५७६ )—एक इटालियन तत्त्ववेत्ता, पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ आणि गणितशास्त्रज्ञ. त्यानें बीजगणितांत कांहीं महत्त्वाचे शोध लावले. खगोलशास्त्राचा अभ्यास केला आणि बरेच ग्रंथ लिहिले.

**कॉर्डाइट**—एक स्फोटक रासायनिक पदार्थ. कापसावर तीव्र नत्राम्ल व तेजाब यांचें कार्य करून गनकॉटन तयार झाला. त्याच जातीचा हा पदार्थ आहे. सरसमिश्रित नत्रकाष्ठोज ( नायट्रोसेल्युलोज ) आणि नत्रमधुज ( नायट्रोग्लिसरिन ) यांचा उपयोग करून एक असें कॉर्डाइट तयार होतें कीं, त्याचा एकदम स्फोट न होतां त्याचा जळण्याचा वेळ हवा त्याप्रमाणें कमीजास्त करतां येतो. या तत्त्वाचा उपयोग करून कॉर्डाइटच्या वाती जाळून विमानांचे पंखे फिरवणें, मोटारी पळवणें, इत्यादि क्रिया साध्य होतील.

**कार्डिफ**—इंग्लंड, ग्लॅमोर्गनशायर परगण्याचें मुख्य शहर. हें एक चांगलें बंदर असून व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. येथें १८८३ मध्यें युनिव्हर्सिटी कॉलेज स्थापिलें गेलें. या संस्थेंत शास्त्रें, शिल्पकला, आरोग्यशास्त्र, वैद्यकशास्त्र, इत्यादि निरनिराळ्या विषयांचें शिक्षण दिलें जातें. अनाथगृहें, दवाखाने, भाजीबाजार, मूक व अंध विद्यालयें, औद्योगिक शाळा आणि इतर सार्वजनिक इमारती पाहण्याजोग्या आहेत. कोळशाच्या निर्गतींत कार्डिफ बंदराचा सर्व जगांतील बंदरांत पहिला क्रम लागतो. कोळशाच्या व लोखंडाच्या व्यापाराखेरीज कार्डिफ येथें कागद, कापड, यंत्रें, भांडीं, कल्हई, इत्यादि करण्याचे कारखाने पुष्कळ आहेत. ख्रिस्टोफर लव्ह, विल्यम् एरबरी व वॉल्टर क्रॅडॉक हे प्रसिद्ध पुरुष कार्डिफ येथें जन्मले. लो. सं. २,१५,८००.

**कॉर्डोवा**—१. स्पेनमधील एक प्राचीन शहर. याच नांवाच्या प्रांताची राजधानी आहे. लो. सं. १,४८,९००. येथें शाळा, दवाखाने व इतर संस्था भरपूर आहेत. मूर लोकांच्या अमदानींत येथून कातड्याचे तयार केलेले जिन्नस अनेक देशांत जात असत. हल्लीं येथें सोनें व रुपें यांचे जिन्नस, कापड, मातीचीं भांडीं तयार होतात. रोमन लोकांनीं स्पेनमध्यें स्थापलेली पहिली वसाहत कॉर्डोवा ही होय. मूर लोकांच्या अमदानींत ७५६ नंतर अरबी स्पेनची राजधानी येथें होती व त्यामुळें अरबी कलाकौशल्य, विद्या, शास्त्रें व उद्योगधंदे यांचें हें केंद्र होतें.

२. आर्जेंटाइन लोकराज्यांत हें शहर याच नांवाच्या प्रांताची राजधानी असून लो. सं. २,८७,४९८ आहे. येथें पुष्कळ इमारती फार सुंदर आहेत व शहराची रचना पूर्णपणें आधुनिक पद्धतीची आहे. येथें १६१३ मध्यें स्थापन झालेली युनिव्हर्सिटी आहे. कॉर्डोवा प्रांतांत सोनें, रुपें, तांबें, शिसें, मीठ, इमारती लांकूड, खाद्यधान्यें तयार होतात.

**कार्तवीर्य**—हैहयाधिपति कृतवीर्याचा पुत्र. याचें नांव अर्जुन किंवा ( सहस्रबाहू असल्यानें ) सहस्रार्जुन होतें. हा अनुप देशावर राज्य करीत असे. याची राजधानी माहिष्मती होती. दत्तात्रेयाच्या प्रसादानें त्याला सहस्र हस्त व सुवर्णमय रथ यांची प्राप्ति झाली होती. पृथ्वीवरचे सर्व प्राणी त्याच्या अंकित असत. त्याच्या रथाची गति कोठेंहि कुंठित होत नसे. रावणास तर यानें लीलेनें पराजित केलें होतें. दत्ताच्या वरप्रसादानें त्याच्या हातून कांहीं पाप होत नसे. यानें ८५,००० वर्षें पृथ्वीचें उत्तम प्रकारें राज्य केलें.

एकदां जमदग्नीच्या आश्रमांत जाऊन कार्तवीर्यानें त्याच्या होमधेनूचें वांसरूं हरण करून आश्रमाचा नाश केला. तेव्हां जमदग्निपुत्र भार्गवरामानें त्याच्याशीं युद्ध करून त्याचे हजार हात तोडले व त्यास ठार मारलें.

**कार्तिकस्वामी**—१. स्कंद. शंकरपार्वतीचा ज्येष्ठ पुत्र. याच्या जन्माविषयीं अनेक कथा आहेत. याला ६ तोंडें असल्यानें षडानन म्हणतात. महाराष्ट्रांत स्त्रिया याचें दर्शन वैधव्य येईल या भीतीनें घेत नाहींत. हा ब्रह्मचारी मानतात. पण दक्षिण हिंदुस्थानांत याला दोन बायका आहेत. *सुब्रह्मण्य* हें कार्तिकस्वामीचें एक स्वरूप आहे. दक्षिणेंत याचीं देवळें बरींच आहेत.

२. मद्रास इलाख्यांत सोंडूरपासून कार्तिकस्वामीचें स्थान तीन कोसांवर आहे. लोहाचल पर्वत चढावा लागतो. स्वामी कार्तिकाचें दर्शन कृत्तिकायोग आहे तोंपर्यंत सर्वांस झालें पाहिजे म्हणून या वेळीं मोठी यात्रा लोटते. स्वामी कार्तिकाची मूर्ति काळ्या पाषाणाची असून फार सुंदर आहे. खालीं क्रौंच पक्षी असून मूर्ति उभी बारा वर्षांच्या मुलाइतकी उंच आहे. लोहाचल पर्वतावर कपटस्वामी, मयूरस्वामी, गुप्तस्वामी, कार्तिकस्वामी व इतर दोन अशीं सहा स्थानें आहेत. येथें मोठाल्या पेवांत दगड टाकतात व तीन वर्षांनीं कृत्तिकायोगांत तीं पेवें उकरतात; तेव्हां आंत टाकलेल्या दगडांचें भस्म होऊन त्याचे मोठाले खडे निघतात, असें सांगतात. येथें अगस्तीनें स्नानाकरितां निर्माण केलेल्या तीर्थास अगस्तितीर्थ म्हणतात. दुसरा बाजीराव पेशवा दोन वेळां या क्षेत्रीं कृत्तिकायोगीं स्वामिदर्शनास गेला होता. तेथें संध्या करतांना वरून गडगडत त्याच्याजवळ येऊन पडलेल्या दगडास अद्याप 'बाजीरावाचा दगड' म्हणतात.

**कार्थेज**—हें आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावरील अतिप्राचीन व प्रसिद्ध शहरांपैकीं एक शहर होतें. फिनिशियन लोकांनीं हें शहर ख्रि. पू. ८२२ मध्यें वसविलें. ख्रि. पू. ५५० ते ख्रि. पू. १४६ मध्यें कार्थेजियन साम्राज्याची राजधानी येथें असून मलकस

(ख्रि. पू. ५५०), हस्ड्रूबल (४९०), हमिल्कार (४८०), हॅनो (४६०), हॅनीबॉल (४०६), हॅमिल्कार (२४१), हस्ड्रूबल (२२७), हॅनीबॉल (२१०), हस्ड्रूबल (१४९), वगैरे अनेक थोर वीर पुरुषांनीं कार्थेजची साम्राज्यसत्ता चालविली. २२० च्या सुमारास कार्थेजची भरभराट शिखरास पोंचली. ट्यूनीसच्या आखाताच्या दुसऱ्या बाजूस पर्वताची एक उंच ओळ आहे. तेथें रोम व कार्थेज आणि रोम व व्हॅन्डॉल यांच्यामधील ख्रि. पू. २१९ ते १४६ पर्यंत व इ. स. ४२९ ते ४७० पर्यंत निकराच्या लढाया झाल्या. ख्रि. पू. १४६ सालीं शेवटच्या प्रतिकारांत रोमन सैन्यानें हस्ड्रूबलच्या सैन्याचा पूर्ण पराभव करून सर्व शहर–घरें, मंदिरें, तटबंदीसुद्धां–जमीनदोस्त केलें. नंतर १२७ ते ६९७ पर्यंत रोमन व बायझंटाइन साम्राज्य-सत्तेखालीं या शहराची पुन्हां स्थापना, वाढ व भरभराट झाली. इ. स. ६९७ मध्यें अरबांनीं कार्थेज जमीनदोस्त केल्यामुळें तें इतिहासांतून कायमचें नाहींसें झालें.

चंदरांत २० गलबतें राहण्याची सोय होती. येथील अवशेषांत घोडदौडीचें ठिकाण, एक मैदान, प्रतिनिधिसभागृह, अपोलोचें मंदिर व थिओडोरसचें स्नानगृह, वगैरे अवशेष आढळतात. येथील अवशेषांच्या शास्त्रीय संशोधनास इ. स. १८३३ पासून सुरुवात झाली.

**कॉर्नवालीस, लॉर्ड** (१७३८–१८०५)— हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. हा अमेरिकनांशीं झालेल्या युद्धांत एक सेनापति होता. इ. स. १७८६ त आपल्या वयाच्या ४८ व्या वर्षी मोठ्या नाखुशीनें हिंदुस्थानच्या ग. जनरलच्या कामावर रुजू झाला. हा जातीचा शिपाई होता व उपजत तैलबुद्धीचा नसला तरी धाडशी व करारी होता. चढाईचें धोरण त्याला मान्य नव्हतें. पण इ. स. १७९२ मध्यें टिपूच्या कारवाईमुळें लॉर्ड कॉर्नवालीसनें मराठ्यांच्या मदतीनें टिपूचा पराभव करून त्याचें अर्धें राज्य व ३ कोटी ३० लक्ष रुपये खंडणी मिळविली. नंतर तो विलायतेला निघून गेला. १७९८ ते १८०१ पर्यंत तो आयर्लंडचा सुभेदार (लॉर्ड लेफ्टनंट) होता. मार्किस ऑफ वेलस्लीनें अनेक युद्धें करून कर्ज फार केल्यामुळें कंपनीच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं लॉर्ड कॉर्नवॉलीस याची गव्हर्नर जनरलच्या जागीं पुन्हां एकदां नेमणूक करून त्यास पाठविलें (१८०५). पण तो लवकरच गाझीपूर येथें मरण पावला. त्यानें हिंदु राज्यें घशाखालीं उतर-विण्याच्या वेलस्लीच्या प्रयत्नाला पाठिंबा दिला नाहीं, म्हणून त्याला इंग्रज इतिहासकारांनीं दोष दिला आहे. त्यानें सिव्हिल सर्व्हिस, पोलिसखातें, न्यायखातें व लष्कर यांत सुधारणा केल्या. वरिष्ठ अधिकाराच्या जागांवर कोणीहि हिंदी इसम नेमावयाचा नाहीं, हें महत्त्वाचें धोरण त्यानें सुरू केलें. पण त्याची सरणीय महत्त्वाची सुधारणा म्हणजे कायमधाऱ्याची पद्धति होय. या पद्धतीपासून जसे कांहीं फायदे तसे तोटेहि आहेत.

**कॉर्नीली, थॉमस** (१६२५–१७०९)—हा फ्रेंच नाटककार खालील नाटककाराचा भाऊ होय. त्यानें स्पॅनिश नाट्यपंथाचें अनुकरण करून अनेक सुखान्त नाटकें लिहिलीं व त्यानें आपल्या भावापेक्षांहि अधिक वाहवा मिळवली. त्याचें उत्तम दुःखान्त नाटक 'आरिआन' (१६७२) हें आहे.

**कॉर्नीली, पीरी** (१६०६–१६८४)— हा एक फ्रेंच नाटककार आणि कवि असून त्यानें चारपांच सुखान्त नाटकें लिहिलीं. १६३५ मध्यें त्यानें 'मेदी' हें दुखान्त नाटक लिहिलें आणि नंतर 'सिद' हें सुप्रसिद्ध दुःखान्त नाटक लिहिलें व त्यामुळें तो थोर नाटककार गणला गेला.

**कार्नू, मेरी आल्फ्रेड** (मृ. १९०२)—या फ्रेंच पदार्थ-विज्ञानशास्त्रवेत्त्याचा जन्म आर्लिआंस येथें झाला. पुढें १८६७ सालीं त्याला तेथील संस्थेंत प्रोफेसर नेमण्यांत आलें. त्यानें पदार्थ-विज्ञानशास्त्राच्या निरनिराळ्या शाखांत अनेक शोध लावले. परंतु त्याचें महत्त्वाचें कार्य प्रकाशशास्त्र व प्रकाशपृथक्करणशास्त्र या दोन शास्त्रांत मुख्यत्वेंकरून झालें आहे. कार्नू यानें प्रकाशाची गति अति सूक्ष्म प्रमाणांत निश्चित केली. याबद्दल १८७९ सालीं त्याला 'प्रिक्स लाकेश' नांवाचें पारितोषिक मिळालें. इंग्लंडांतील रॉयल सोसायटीनें त्याला रम्फोर्ड पदक अर्पण केलें.

**कार्नेजी, अँन्ड्र्यू** (१८३५–१९१९)—हा एक अमे-रिकेंतील सुप्रसिद्ध कोट्याधीश व लोकहितकारी दानशूर गृहस्थ असून त्याचा जन्म स्कॉटलंड देशांत झाला. १८४५ मध्यें त्यानें अमेरिकेंतील सं. संस्थानांत येऊन पिट्‌सबर्ग येथें वास्तव्य केलें. अँन्ड्र्यू यानें एका छोटेखानी बाष्पयंत्राची स्थापना करून आपल्या व्यापारी आयुष्यक्रमास सुरुवात केली व नंतर तो तारायंत्रानें संदेश पोहोंचविण्याचें काम करूं लागला. नंतर तो ध्वनिवाहक तारायंत्राचा चालक झाला. ऑइल क्रीक येथील ४०,००० पौंड किंमतीची मालमत्ता खरेदी केली व या धंद्या-पासून त्याला एका वर्षांत रोख १०,००,००० पौंडांचा फायदा झाला. कार्नेजी हा पुढें 'होमस्टेट अँड एडगर थॉम्सन् स्टील वर्क्स' आणि दुसरे कांहीं मोठे कारखाने यांचा मालक झाला. त्यानें १८ इंग्लिश वृत्तपत्रें आपल्या मतप्रतिपादनार्थ कित्येक वर्षेंपर्यंत चालविलीं होतीं. लोककल्याणकारक व शैक्षणिक संस्थांना त्यानें दहा कोटी पौंडांवर देणग्या दिल्या. कार्नेजी यानें कित्येक ग्रंथ व लेख लिहिले.

आयुष्याच्या अखेरच्या दिवसांत तो आपल्या मायभूमींत (स्कॉटलंडमध्यें) येऊन राहिला. त्याला ग्रंथालयांचा फार

हव्यास; त्यामुळें त्याच्या पैशांतून ब्रिटन आणि अमेरिका या देशांत अनेक ग्रंथालयें निघालीं. आंतरराष्ट्रीय शांततेसाठीं त्यानें एक मोठा निधि वेगळा ठेवला. विविध लोकसेवेच्या क्षेत्रांत त्याच्या पैशानें परोपकारी कार्यें चाललीं आहेत.

**कॉर्नेलिअस, पीटर फॉन** (१७८४–१८६७)— हा जर्मन चित्रकार १८११ मध्यें रोमला गेला व तेथें त्यानें जर्मन कला या नांवाचा नवा पंथ सुरू केला आणि मिचेलँजेलो व रॅफेल या सुप्रसिद्ध चित्रकारांच्या चित्रांचें अनुकरण करून आर्द्र-भित्तिचित्रांचें (फ्रेस्को-पेन्टिंगचें) पुनरुज्जीवन केलें. नंतर तो म्यूनिक येथें राहिला आणि त्यानें आपलें सर्व लक्ष 'ग्लिप्टोथेक' आणि 'लुडविगकर्च' यांच्या चित्रांकडे दिलें. १८४१ मध्यें ४ था फ्रेडरिक विल्यम राजानें त्याला बर्लिनला बोलावलें, आणि त्याला तेथील राजघराण्याच्या स्मारक-इमारतींचें रंगकाम करण्यास सांगितलें.

**कार्नो, सादी निकोलस लिओनार्ड** (१७२६–१८३२) —हा एल्. एन्. एम्. कार्नो नांवाच्या प्रसिद्ध फ्रेंच सेनापतीचा मुलगा होय. हा एक प्रसिद्ध पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ होता. त्यानें लष्करी परीक्षा देऊन लेफ्टेनंटची जागा मिळवली. त्यानें संगीत व इतर ललितकला यांत बरेंच प्रावीण्य संपादन केलें. अभ्यासाचा कंटाळा घालविण्याकरितां तो मर्दानी खेळ खेळत असे. त्यानें एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे; पण त्यांत त्यानें लावलेल्या फारच थोड्या शोधांचा समावेश केला गेला आहे. 'कार्नोचें तत्त्व' म्हणून उष्णताशास्त्रांत जी गोष्ट गृहीत धरतात ती गोष्ट गत्युष्णताशास्त्रांत आधारभूत मानिली गेली आहे.

**कार्पेंटर, विल्यम बेंजामिन** (१८१३–१८८५)— हा एक इंग्रज शारीरशास्त्रज्ञ असून त्यानें या विषयावर पुढील सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिले:—(१) 'प्रिन्सिपल्स ऑफ जनरल अँड कंपॅरेटिव्ह फिजिऑलजी' (तौलनिक शारीरशास्त्राचे सिद्धान्त); (२) 'प्रिन्सिपल्स ऑफ मेंट्ल फिजिऑलजी' (मानसिक शारीरशास्त्राचे सिद्धान्त); (३) 'प्रिन्सिपल्स ऑफ ह्यूमन फिजिऑलजी' (मानवी शारीरशास्त्राचे सिद्धान्त); (४) 'ए मॅन्युअल ऑफ झूऑलजी' (प्राणिशास्त्रावरचें छोटें पुस्तक), इत्यादि. १८६८ ते १८७० च्या काळांत ब्रिटिश सरकारनें उत्तर महासागरांत खोल संशोधन करण्याकरितां अनेक सफरींवर जे तज्ज्ञ इसम पाठविले त्यांचा हा पुढारी असे. १८७२ मध्यें त्याला ब्रायटन येथील ब्रिटिश असोसिएशनचा अध्यक्ष नेमिलें.

**कार्पेथियन पर्वत**—ही मध्य युरोपांतील पर्वतांच्या रांगांतील पूर्वेकडील रांग होय. याची लांबी ८०० मैल असून रुंदी ७ ते २३० मैलांइतकी आहे. युरोपमध्यें आल्प्सच्या खालोखाल सर्वांत जास्त लांबवर पसरलेला असा हाच पर्वत होय. ७२,६०० मैल क्षेत्रफळ यानें व्यापिलें आहे.

**कार्मेलाइट**—कार्मेल पर्वतावरील ख्रिस्ती देवमातेच्या पंथांतील सभासदांस कार्मेलाइट असें म्हणतात. हे आपल्या पंथाची स्थापना कार्मेल पर्वतावर राहणाऱ्या सेंट एलियास या प्रवक्त्यानें केली असें म्हणतात. यरुशलेमचा लॅटिन पॅट्रिआर्क सेंट आल्बर्ट यानें इ. स. १२०६ मध्यें घालून दिलेल्या नियमाप्रमाणें या पंथांतील लोक प्रथम पूर्वेकडील देशांत होते ते पश्चिमेकडे पसरले. इ. स. १४३२ मध्यें चौथ्या यूजेनियस या पोपनें हा नियम बदलून टाकला. सोळाव्या शतकामध्यें आविला येथील सेंट टेरेसा व सेंट जॉन ऑफ क्रॉस यांनीं या पंथांत बरीच सुधारणा केली. या वेळेपासून या पंथाच्या दोन शाखा झाल्या. त्यांपैकीं जे १४३२ सालीं बदल करण्यांत आले त्यांस अनुसरून वागणाऱ्यांस कॅल्स्ड (पादत्राणयुक्त) कार्मेलाइट व इतरांस डिस्कॅल्स्ड (पादत्राणविहीन) कार्मेलाइट असें म्हणण्यांत येतें. हे १२०६ मध्यें घालून दिलेले नियमच पाळतात.

या कार्मेलाइट पंथालाच जोडलेल्या अनेक संस्था आहेत त्यांस तिसरा पंथ मानण्यांत येतें. हिंदुस्थानांत या पंथाच्या स्त्री-पुरुषांकरितां कार्मेलाइट तृतीय पंथीय सभा (टार्शिअरी काँग्रेगेशन्स) आहेत. त्यांमध्यें सिरो-मलबारी व लॅटिन विधी पाळण्यांत येतात. या पंथाची स्थापना १९३१ मध्यें दोन असंस्कृत धर्मोपदेशकांनीं केली.

**कार्यक्षमता**—(एफिशिएन्सी). यंत्र चालविण्यास लागणारी शक्ति व त्या यंत्रापासून मिळणारें कार्य यांच्या प्रमाणास त्या यंत्राची कार्यक्षमता म्हणतात. नवीन शक्ति निर्माण करतां येत नाहीं किंवा शक्ति नष्ट करतां येत नाहीं. तर शक्तीचें स्वरूप आपणांस पाहिजे तसें बदलतां येतें व तिचें अनेक प्रकारें रूपांतर करतां येणें शक्य असतें. यंत्र म्हणजे एका स्वरूपांतील शक्तीचें दुसऱ्या स्वरूपांत परिवर्तन करण्याचें साधन होय. प्रत्यक्ष व्यवहारांत एका स्वरूपांतील शक्तीचें पूर्णतः दुसऱ्या स्वरूपांत परिवर्तन करणें शक्य नसतें. या क्रियेंत कांहीं शक्ति खर्च होते किंवा व्यर्थ जाते. हें शक्ति खर्च होण्याचें प्रमाण जितकें अल्प असेल तितकी यंत्राची कार्यक्षमता अधिक समजण्यांत येते. वाफेच्या यंत्रामध्यें 'रॅंकिन सायकल' ही प्रमाण समजली जाते व तिच्याशीं तुलना करून वाफेच्या यंत्राची कार्यक्षमता मापण्यांत येते. जर एखाद्या वाफेच्या इंजिनाची उष्णतेची कार्यक्षमता २७ असेल व रॅंकिन यंत्राची ३० असेल तर त्या एंजिनाची कार्यक्षमता $\frac{२७}{३०}$ म्हणजे ९० टक्के येते. याप्रमाणें उष्णताविषयक (थर्मल), तापकाविषयक (बॉयलर) व यांत्रिक (मेकॅनिकल) कार्यक्षमता काढण्यांत येते. तापक-क्षमता ही जळणापासून

मिळणाऱ्या उष्णतेच्या प्रमाणावरून ठरवितात. ती सामान्यतः ७५ टक्के असते. यांत्रिक क्षमता ही मुख्य अक्षाच्या (क्रँकशाफ्ट) पासून मिळणारें कार्य व दट्ट्यापासून ( पिस्टन ) मिळणारें कार्य यांच्या प्रमाणावरून ठरवितात. ही यांत्रिक कार्यक्षमता म्हणजे रुद्धअश्वशक्ति (ब्रेक हॉर्स पॉवर) व प्रत्यक्ष अश्वशक्ति ( इंडिकेटेड हॉर्स पॉवर ) यांचं प्रमाण होय. ही चांगल्या यंत्रांत ८० टक्के असते. यंत्राची एकंदर कार्यक्षमता काढण्याकरितां या सर्वांचा गुणाकार करावा लागतो. दगडी कोळशामध्यें उष्णतेचें प्रमाण १०,००० व डिझेल तेलामध्यें १८,००० असें धरल्यास वोलॅस्टन यानें एका रुद्धअश्वशक्तीमध्यें पुढें दिल्याप्रमाणें उष्णतेचें प्रमाण असतें असें दाखविलें आहे—

वाफेचें इंजिन १९,०००, बाष्पभ्रामक ( स्टीमटर्बाइन ) २१,०००, धूम्रयंत्र ( गॅसएंजिन ) १५,०००, डिझेल यंत्र ९,०००. विजेच्या यंत्रांची कार्यक्षमता अधिक असून तिचें प्रमाण अधिक असतें. विजेचीं रूपांतरयंत्रें ( ट्रॅन्सफॉर्मर ) हीं सर्वांत अधिक कार्यक्षम यंत्रें असून त्यांच्या कार्यक्षमतेचें प्रमाण लहान यंत्रांत ९० टक्के तर मोठया पूर्ण भार असलेल्या यंत्रांत ९८·५ टक्के इतकें पडतें.

**कार्ले** ( १८८७-१९२२ )—हा ऑस्ट्रियाचा माजी बादशहा आणि हंगेरी देशाचा राजा होय. तो आपला चुलतआजा फ्रॅन्सीस जोसेफ याच्यानंतर १९१६ मध्यें गादीवर आला, आणि १९१८ त त्यानें राजपदाचा त्याग केला. नंतर १९२१ च्या मार्च व ऑक्टोबर महिन्यांत पुन्हां हंगेरीचें सिंहासन मिळवण्याचा २ वेळां प्रयत्न केला, पण तो फसला. पुढें तो मादिरा येथें मरण पावला.

**कार्लेफेल्ड, एरिक ॲक्सेल** ( १८६४-१९३१ )— हा अर्वाचीन स्वीडिश कवींचा प्रमुख समजला जातो. जुन्या लोककथा, सृष्टिप्रेम, विद्वत्ता, आणि विनोद हीं त्याच्या लेखनांतील कांहीं वैशिष्ट्यें होत. जुनी भाषा आणि नव्या गोष्टी यांचा मिलाफ त्याला साधतो. त्याच्या मृत्यूनंतर त्याला 'नोबेल' पारितोषिक मिळालें.

**कार्लस्रुहे**—जर्मनी. बेडन या लोकराज्याची राजधानी. येथील ग्रँड-ड्यूकल लायब्ररींत १,००,००० ग्रंथ आहेत. त्याशिवाय येथें आणखी एक मोठें ग्रंथालय , कांहीं मौल्यवान् वस्तुसंग्रहालयें, एक वनस्पतींची बाग, आणि बहुविध कलांचें विद्यालय आहे. लो. सं. १,८९,८५० आहे.

**कार्लाइल, टॉमस** ( १७९५-१८८१ )— एक इंग्रज निबंधकार, इतिहासकार व तत्त्ववेत्ता. एडिन्बर्ग येथें शिक्षण होऊन त्यानें प्रथम शिक्षकाची नोकरी केली, व १८१७ पासून एडिन्बर्ग येथें शिकवण्या व चरित्रलेखन यांवर उदरनिर्वाह करूं लागला. जर्मन भाषेचा अभ्यास करून त्यानें गोएटेच्या 'विलहेल्म मीस्टर' या लेखाचें भाषांतर व शिलरचें चरित्र लिहिलें, व गोएटेच्या परिचयामुळें व उत्तेजनामुळें त्यानें पुढील सर्व आयुष्य इतिहास व तत्त्वज्ञान या विषयांवर लेख लिहिण्यांत घालवलें. १८२६ सालीं जेन वेली वेल्श या बाईशीं त्यानें विवाह केला. त्यानें 'सार्टर रिसार्टस्' ( १८२९ ) या पुस्तकांत जडवाद व नास्तिकवाद यांविरुद्ध आपलीं मतें दर्शविलीं आहेत. 'फ्रेंच रेव्होल्युशन' ( १८३६ ) या पुस्तकांत फ्रेंच राज्यक्रान्तीबद्दल तात्त्विक विवेचन स्पष्टपणें केल्यामुळें या पुस्तकास फार महत्त्व आलें. 'हिस्टरी ऑफ जर्मन लिटरेचर' ( जर्मन वाङ्मयाचा इतिहास ) ( १८३७ ), 'लेटर्स अँड स्पीचेस ऑफ ऑलिव्हर क्रॉमवेल' ( ऑलिव्हर क्रॉम्वेलचीं पत्रें आणि भाषणें ) (१८५१), 'हिस्टरी ऑफ फ्रेडरिक दि ग्रेट' (फेडरिक दि ग्रेटचा इतिहास) ( १८६५ ), हे ग्रंथ त्यानें केले. 'आयुष्यांतील आठवणी' हें पुस्तक त्याच्या हयातीनंतर प्रसिद्ध झालें. 'हीरो अँड हीरोवर्शिप' ( वीर व वीरपूजा ) व 'पास्ट अँड प्रेझेंट' ( भूत आणि वर्तमान ) हीं दोन कार्लाइलचीं अत्यंत महत्त्वाचीं पुस्तकें होत. कार्लाइलनें व्यक्तिशः व लेखनद्वारें तत्कालीन विचारांवर जबरदस्त पगडा बसवला. त्याची लेखनपद्धति मोठी सामर्थ्यवान्, स्पष्ट व सुंदर असून मधून मधून बंडखोर वृत्ति डोकावते. विनोद, नर्मोक्ति, अन्तर्दृष्टि, कोमलता व भयंकर राग हे त्याच्या लेखनांतले मुख्य विशेष होत.

**कार्ले**—मुंबई. पुणें जिल्ह्यांत मावळ तालुक्यामध्यें मळवली स्टेशनापासून १ कोसावर हें खेडें आहे. याला विहारगांव असें दुसरें नांव आहे. कार्ल्यांचीं लेणीं प्रसिद्ध आहेत. इंद्रायणी खोऱ्यांत हा पहाड आहे. लेण्याच्या तोंडाशीं दगडी कमानीवरील नगारखाना व एकवीरा देवीचें देऊळ आहे. देवीचें स्थान फार प्राचीन आहे. ही एकवीरा देवी ठाणें व पुणें जिल्ह्यांतील आणि कोंकणांतील कोळ्यांची कुलदेवता असल्यानें त्यांनीं देवीला नजर केलेल्या वस्तू येथें आहेत. हिची यात्रा चैत्र शु. अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत असते. कोंबडीं व बकरीं यांचे बळी देतात. ही देवी येथील बौद्ध विहाराच्याहि पूर्वींची असावी. मुख्य चैत्याला स्थानिक लोक धर्मराजाचा टेरा असें म्हणतात. या मुख्य चैत्याशिवाय विहार वरेच आहेत. चैत्याची लांबी १२५ व रुंदी ४५ फूट आहे. सभामंडपांतील ओवऱ्यांच्या खांबांवर घोडेस्वारांच्या मूर्ती आहेत. शिवाय प्रत्येक खांबावर निरनिराळ्या प्रसंगांचीं चित्रें आहेत. मुख्य गाभाऱ्यांत दागोबा ( धातुगर्भ ) आहे. दर्शनीं तीन हत्ती, त्यांच्यावर असलेल्या उत्तरकालीन बुद्धाच्या चैत्या मूर्ती, शिलालेखाच्या शिलापट्टिका, देवळाचें

दरवाजे, स्त्री-पुरुष नर्तकांचीं दोन जोडपीं हीं पाहण्यासारखीं आहेत. बुद्धाच्या दोन्ही बाजूंस चोपदार, चवरीवाले व इतर कांहीं मूर्ती आहेत. अशा बुद्धाच्या चार-पांच मूर्ती आहेत. पद्मपाणि बुद्धाच्या दोनतीन मूर्ती आढळतात. येथेंच लेणें कोरणाऱ्याचा मूळ शिलालेख आहे. पडवी व गाभारा मिळून सर्व लेण्यांत एकंदर बावीस शिलालेख आहेत. सिंहस्तंभाच्या वायव्येस कांहीं विहार आहेत. त्याच्याहि उत्तरेस आणखी विहार, टाकीं व पडका दागोबा आहे. चैत्यागाराच्या दक्षिणेस अनेक कोरींव कामें आहेत. एक प्रशस्त पण अपुरा असा दिवाणखाना, एक लहान खोली, एक पाण्याचें टाकें व एक मोठा विहार आहे. या विहारांत मागल्या भिंतींत एक बुद्धाची मूर्ति, कमळावर बसलेली, कमळाखालीं दोन हरिणांच्यामध्यें चक्र असलेली, मागें दोन पूजक असलेली, दोन्ही बाजूंस चवऱ्या असलेली व डोकीवर दोन विद्याधर असलेली अशी आहे. कार्ल्याच्या आसपासच्या डोंगरांत अनेक ठिकाणीं अशींच पण थोडथोडीं व अपुरीं कोरींव कामें आहेत. कार्ल्याजवळील देवगड येथें एक अपुरा विहार आहे. त्यांतील खांब पाहण्यासारखे आहेत. वलुरक हें कार्ल्याच्या बौद्धविहाराचें प्राचीन नांव असावें. हीं लेणीं ख्रि. पू. १ ल्या शतकापासून पुढें चारपांच शतकांत तयार झालीं असावींत.

**कार्सन, एडवर्ड हेन्री** (१८५४-१९३५)—हा एक ब्रिटिश मुत्सद्दी व कायदेपंडित असून १८९२ सालीं आयर्लंडमध्यें सॉलिसिटर जनरल आणि १९०० मध्यें इंग्लंडचा सॉलिसिटर जनरल झाला. आयरिश होमरूल बिलाचा तो कट्टा विरोधक असून होमरूल बिलाला १९१२ मध्यें अल्स्टरतर्फे विरोध करणाऱ्यांचा कार्सन हा मुख्य होता. तसेंच त्यानें अल्स्टर स्वयंसेवक सैन्य बनविण्याच्या कामांत फार महत्त्वाचा भाग घेतला आणि पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर या सैनिकांनीं सैन्यांत शिरावें असा त्यानें जोराचा पुरस्कार केला आणि तदनुसार बरेच सभासद सैन्यांत शिरले. पहिल्या महायुद्धाच्या काळांत कार्सन ॲटर्नी जनरल (१९१५), फर्स्ट लॉर्ड ऑफ ॲड्मिरॅल्टी (१९१७), आणि इंग्लंडच्या मंत्रिमंडळांत मंत्री (१९१७-१९१८) झाला. १९२१ मध्यें त्याला लॉर्ड ऑफ अपील या जागेवर नेमलें.

**कॉर्सिका**—हें भूमध्य समुद्रांत फ्रान्सच्या मालकीचें बेट असून त्याची लांबी ११० मैल व रुंदी सुमारें १० मैल आहे. क्षेत्रफळ ३३६७ चौ. मैल व लोकसंख्या सु. तीन लाख आहे. त्याच्या पश्चिम किनाऱ्याला बरेच खोल उपसागर आहेत. या बेटावर एक पर्वतांची रांग असून तेथें मॉन्ट सिन्टो हें सर्वांत उंच शिखर ८८९१ फूट उंच आहे. पूर्व व पश्चिम अंगाला अनेक जलप्रवाह वाहतात. येथें मोठालीं जंगलें असून त्यांत पाईन, ओक, बीच, कॉर्क, वगैरे झाडें होतात. पर्वतावरील सृष्टिसौंदर्य अप्रतिम आहे. सपाट प्रदेशांतील जमीन सुपीक आहे, पण शेतीचा धंदा मागासलेला आहे. येथें मच्छीमारीचा धंदा चांगला चालतो. येथें खनिज द्रव्यें फार नाहींत. ॲजॅशिओ आणि बॅस्टीया हीं मुख्य शहरें आहेत. या बेटांत दोन अत्यंत सुप्रसिद्ध इसम जन्मले ते म्हणजे पाओली आणि नेपोलिअन होत.

**कालगणना**—मोठ्या प्रमाणांत कालाची गणना करण्याच्या पद्धतीस म्हणतात. ऐतिहासिक घटना कोणत्या कालखंडांत किती अंतरानें झाल्या हें दाखवविण्यासाठीं बहुधा याचा उपयोग करतात. कॅलेंडर (कालदर्शक) हें या कालगणना प्रकाराचें एक ठळक उदाहरण आहे. चंद्रसूर्यावरून कालमान होतेंच; तेंच जमेस धरून विशिष्ट आरंभकालापासून कालगणनेला सुरुवात होते. ज्यू लोक विश्वोत्पत्तीपासून काल मोजतात; ख्रिस्ती ख्रिस्तजन्मापासून, ग्रीक ऑलिंपियडपासून, रोमन रोम शहर वसविल्यापासून, मुसलमान महमदाच्या पलायन (हिजरा) कालापासून, भारतीय विक्रमादित्य आणि शालिवाहन या राजांच्या पराक्रमवर्षा (?)पासून कालगणना करतात. या ऐतिहासिक कालांतील घटना झाल्या. पण त्यापूर्वीच्या कालासंबंधीं कालगणना पद्धती पाहिजेतच. त्या भूस्तरशास्त्राच्या, पुराणवस्तुशास्त्राच्या किंवा कांहीं सांस्कृतिक चिन्हांवरून बसविलेल्या आहेत. उदा., तृतीयवर्ग, मायोसीनवर्ग, प्रस्तरयुग, लोहयुग, इ. (युग, शक, संवत् पाहा.)